श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि
## मराठी भाषांतर

भाग १ (अध्याय १, पाद १, २)

भाषांतरकार

**महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर**



पुणें

श्रावण वा। ११ शके १८६०

# प्रास्ताविक चार शब्द

महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री यांच्या सोसायटीशीं असलेल्या अनेक वर्षांच्या संबंधाला चिरकालीन स्वरूप यावें हा उद्देश पुढें ठेवून आणि शास्त्रीबुवांच्या पंचाहत्तराव्या वाढदिवशीं ह्या ग्रंथाचा निदान पहिला भाग प्रसिद्ध करावा असें योजून दोन वर्षांपूर्वी डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें या ग्रंथाचें प्रकाशन हातीं घेतलें. अमळनेरचे दानशूर श्री. शेठ मोतीलाल माणेकचंद (प्रतापशेठ) यांनीं ह्या कामाला रोख ५०० रुपये दिल्यामुळें मुद्रणाला प्रारंभ करितां आला ही गोष्ट नमूद करणें आमचें कर्तव्य आहे. ज्या इतर गृहस्थांनीं ह्या ग्रंथास द्रव्यसाहाय्य केलें आहे त्यांचा यथावकाश निर्देश केला जाईल. विविधज्ञानविस्ताराचे संपादक रा. तटणीस यांनीं हा ग्रंथ 'विस्तारां'त क्रमशः प्रसिद्ध होत असलेला आमच्या विनंतीस मान देऊन थांबविला आणि आम्हांला हा ग्रंथ प्रकाशित करण्यासंबंधीं उदारपणें मोकळीक दिली त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. ग्रंथाच्या मुद्रणप्रतीचें लेखन वे. शा. सं. शंकरशास्त्री मारूलकर यांनीं केल्यामुळें मुद्रणाचें काम सोपें झालें याबद्दल ते धन्यवादार्ह आहेत. महा. शास्त्रीबुवांची मुद्रणप्रत आतां पूर्ण झाली असल्यानें जितक्या लवकर आवश्यक द्रव्यनिधि मिळेल तितक्या लवकर हें प्रकाशन संपूर्ण होईल हें जाणून महाराष्ट्रिय जनतेनें आम्हांस द्रव्यद्वारा आणि ग्रंथ घेऊन साहाय्य करावें हें क्रमप्राप्त आहे.

प्रस्तुत भागांत पहिल्या अध्यायाचे पहिले दोन पाद आले आहेत. पुढील भागांत अनुक्रमें (भाग २) पहिला अध्याय पाद ३,४ आणि दुसरा अध्याय; (भाग ३) तिसरा आणि चौथा अध्याय, (भाग ४) पांचवा आणि सहावा अध्याय, (भाग ५) सातवा आणि आठवा अध्याय, अशा तऱ्हेनें पांच भागांत हा ग्रंथ संपूर्ण होईल. शेवटच्या भागांत ग्रंथाला उपोद्घात लिहिण्याचा महा. शास्त्रीबुवांचा मानस आहे.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४<br>
२१ ऑगस्ट १९३८

वा. गो. परांजपे,<br>
ग्रंथप्रकाशनाच्या कामीं डे. ए. सो.चा नियुक्त



श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचितं

# व्याकरणमहाभाष्यम्

## अथ शब्दानुशासनम् ॥

अथेत्ययं शब्दोऽधिकारार्थः प्रयुज्यते । शब्दानुशासनं शास्त्रमधिकृतं वेदितव्यम् ॥ केषां शब्दानाम् । लौकिकानां वैदिकानां च । तत्र लौकिकास्तावत् । गौरश्वः पुरुषो हस्ती शकुनिर्मृगो ब्राह्मण इति । वैदिकाः खल्वपि । शं नो देवीरभिष्टये । इषे त्वोर्जे त्वा । अग्निमीळे पुरोहितम् । अग्न आ याहि वीतय इति ॥

अथ गौरित्यत्र कः शब्दः । किं यत्तत्सास्नालाङ्गूलककुदखुरविषाण्यर्थरूपं स शब्दः । नेत्याह । द्रव्यं नाम तत् । यत्तर्हि तदिङ्गितं चेष्टितं निमिषितं स शब्दः । नेत्याह । क्रिया नाम सा ॥ यत्तर्हि तच्छुक्लो नीलः कृष्णः कपिलः कपोत इति स शब्दः । नेत्याह । गुणो नाम सः ॥ यत्तर्हि तद्भिन्नेष्वभिन्नं छिन्नेष्वच्छिन्नं सामान्यभूतं स शब्दः । नेत्याह । आकृतिर्नाम सा ॥ कस्तर्हि शब्दः । येनोच्चारितेन

---

## पातञ्जल महाभाष्याचें मराठी भाषांतर

आतां शब्दशास्त्र लिहिण्यास आरंभ करितों.

येथें 'अथ' हा शब्द अधिकार या अर्थी घालण्यांत आला आहे. 'शब्दानुशासन' या नांवाच्या शास्त्राचा अधिकार म्हणजे प्रारंभ केला आहे असें समजावें.

कोणत्या शब्दांचें शास्त्र ?

लौकिक व वैदिक दोन्ही शब्दांचें शास्त्र. त्यांपैकीं लौकिक शब्द म्हणजे गौः, अश्वः, पुरुषः, हस्ती, शकुनिः, मृगः, ब्राह्मणः इत्यादि इत्यादि. वैदिक शब्द म्हणजे 'शं नो देवीरभिष्टये' 'इषे त्वोर्जे त्वा' 'अग्निमीळे पुरोहितम्' 'अग्न आ याहि वीतये' इत्यादि इत्यादि.

बरें तर, 'गौः' या ठिकाणीं शब्द कोणता, म्हणजे शब्द कशाला म्हणावयाचें ? तो जो पोळी, शेंपूट, वशिंड, खूर व शिंग असलेला पदार्थ म्हणजे प्राणी तो का शब्द ? आम्ही म्हणतों की तो नव्हे शब्द; त्याला द्रव्य म्हणावयाचें.

बरें तर, तें जें खुणविणें, चळवळ करणें, डोळे मिटणें, उघडणें, तो का शब्द ? आम्ही म्हणतों की तोहि शब्द नव्हे; त्याला क्रिया म्हणावयाचें.

बरें तर, तो जो पांढरेपणा, निळेपणा, काळेपणा, पिंगटपणा किंवा पारवेपणा, तो का शब्द ? आम्ही म्हणतों तोहि शब्द नव्हे; त्याला गुण म्हणावयाचें.

बरें तर, निरनिराळ्या व्यक्तींमध्यें जें प्रत्येकींत तेंच म्हणून दिसतें, किंवा व्यक्ति मोडली, तोडली तरी जें कायम राहतें असें जें सामान्य स्वरूप तें का शब्द ? आम्ही म्हणतों, तें स्वरूप शब्द नव्हे; त्याला आकृति म्हणावयाचें.

तर मग शब्द कोणता ?

सास्नालाङ्गूलककुदखुरविषाणिनां संप्रत्ययो भवति स शब्दः ॥ अथवा प्रतीतपदार्थको लोके ध्वनिः शब्द इत्युच्यते । तद्यथा । शब्दं कुरु । मा शब्दं कार्षीः । शब्दकार्ययं माणवक इति । ध्वनिं कुर्वन्नेवमुच्यते । तस्माद् ध्वनिः शब्दः ॥

कानि पुनः शब्दानुशासनस्य प्रयोजनानि । रक्षोहागमलघ्वसंदेहाः प्रयोजनम् ॥ रक्षार्थं वेदानामध्येयं व्याकरणम् । लोपागमवर्णविकारज्ञो हि सम्यग्वेदान्परिपालयिष्यति ॥ ऊहः खल्वपि । न सर्वैर्लिङ्गैर्न च सर्वाभिर्विभक्तिभिर्वेदे मन्त्रा निगदिताः । ते चावश्यं यज्ञगतेन यथायथं विपरिणमयितव्याः । तान्नावैयाकरणः शक्नोति यथायथं विपरिणमयितुम् । तस्मादध्येयं व्याकरणम् ॥ आगमः खल्वपि । ब्राह्मणेन

---

शब्द तो की, जो उच्चारिला असतां पोळी, शेपूट, वशिंड, खूर व शिंग हीं असलेली व्यक्ति समजते तो शब्द; अथवा हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे ज्याच्यापासून व्यवहारांत पदार्थाचें ज्ञान होतें असा जो ध्वनि म्हणजे आवाज त्याला लोकांत शब्द म्हणतात. उदाहरणार्थ, तोंडानें वर्णोच्चार करणाऱ्याला म्हणतात 'चालूं दे तुझा शब्दोच्चार', 'बोलूं नको शब्द', 'हा माणवक फार शब्द करणारा आहे' वगैरे वगैरे. तेव्हां आवाज किंवा वर्णोच्चार हाच शब्द होय.

बरें तर, हें शब्दशास्त्र शिकण्याचे फायदे काय?

रक्षण, विभक्ति बदलणें, वेदाध्ययन, सौलभ्य व संशयराहित्य हे शब्दशास्त्र शिकण्याचे फायदे आहेत.

वेदाचें रक्षण करण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करावयास पाहिजे; कारण ज्या मनुष्याला लोप, आगम व वर्णाची बदल यांचें ज्ञान असेल तो मनुष्य वेदांचें चांगल्या रीतीनें रक्षण करील[3].

ऊह म्हणजे विभक्ति बदलणें हाही फायदा आहे. वेदांमध्यें जे मंत्र उच्चारले आहेत, त्यांमध्यें सर्व लिंगें व सर्व विभक्ति लावून शब्दांचे प्रयोग केले नाहींत; यज्ञकर्त्याला यज्ञाच्या वेळीं त्यांमध्यें योग्य तो विभक्तींचा किंवा लिंगांचा फेरबदल करावा लागतो; व व्याकरण न पढलेल्या माणसाला तो फेरबदल योग्य रीतीनें करतां येणें शक्य नसतें. तेव्हां ऊह म्हणजे शब्दांच्या लिंगविभक्तींचा फेरबदल करण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

---

१. वैयाकरणमतीं शब्द नित्य आहे आणि अर्थ हा त्या नित्य शब्दालाच आहे. त्या नित्य शब्दालाच स्फोट असें म्हणतात. त्या स्फोटाची उत्पत्तिही होत नाहीं आणि नाशही होत नाहीं. मनुष्य बोलूं लागला म्हणजे फक्त त्या वेळीं त्या बोलण्यानें म्हणजे ध्वनीनें तो स्फोटरूपी नित्य शब्द प्रकाशित होतो आणि श्रोत्यांच्या मनामध्यें आपला अर्थ आणून देतो.

२. आवाज म्हणजे ध्वनि. हा आवाज फक्त स्फोटाचा दर्शक आहे. याला स्वतःला कांहींएक अर्थ नाहीं. तेव्हां वैयाकरणमतीं जरी ह्याला शब्द असें म्हणतां येत नाहीं, तरी तूर्त तो वाद भाष्यकारांनीं एकीकडे ठेवला आहे. फक्त येथें तो पशु किंवा त्याच्यावरची जाति वगैरे नव्हे हाच सांगण्याचा येथें भाष्यकारांचा मुख्य उद्देश आहे.

३. वेदामध्यें जहार या क्रियापदाच्या ऐवजीं जभार असें क्रियापद घातलेलें दृष्टीस पडतें. ज्याला व्याकरणशास्त्राचें ज्ञान नाहीं, त्याला साधारण रीतीनें जभार हें अशुद्ध आहे; येथें जहार असें पाहिजे आहे, असें वाटून कदाचित् तो तसें म्हणूंही लागेल आणि त्यामुळें वेदामध्यें बऱ्याच ठिकाणीं शब्दाचा बदल होण्याचा संभव आहे. परंतु ज्याला व्याकरणशास्त्राचें ज्ञान आहे त्याला हृ धातूच्या हकाराला वेदामध्यें भकार होतो असें ज्ञान असल्यामुळें जभार हें क्रियापद शुद्ध आहे असेंच समजेल. आणि अशा रीतीनें वेदाच्या अक्षरशः आनुपूर्वीचें रक्षण केलें जाईल.

४. अग्नये त्वा जुष्टं निर्वपामि असें वेदामध्यें वाक्य आहे. अग्निदेवतेला उद्देशून निर्वाप करतांना हा मंत्र म्हटला जातो; परंतु ज्या वेळीं सूर्यदेवतेला उद्देशून निर्वाप करण्याचा प्रसंग येतो, त्या वेळीं सूर्याय त्वा जुष्टं निर्वपामि असें म्हणावें लागतें. हा फेरबदल वैयाकरणाला बरोबर करतां येईल.

निष्कारणो धर्मः षडङ्गो वेदोऽध्येयो ज्ञेय इति । प्रधानं च षट्स्वङ्गेषु व्याकरणम् प्रधाने च कृतो यत्नः फलवान्भवति ॥ लघ्वर्थं चाध्येयं व्याकरणम् । ब्राह्मणेनावश्यं शब्दा ज्ञेया इति । न चान्तरेण व्याकरणं लघुनोपायेन शब्दाः शक्या ज्ञातुम् ॥ असंदेहार्थं चाध्येयं व्याकरणम् । याज्ञिकाः पठन्ति । स्थूलपृषतीमाग्निवारुणीमनड्वाहीमालभेतेति । तस्यां संदेहः । स्थूला चासौ पृषती च स्थूलपृषती स्थूलानि पृषन्ति यस्याः सा स्थूलपृषतीति । तां नावैयाकरणः स्वरतोऽध्यवस्यति । यदि पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं ततो बहुव्रीहिः अथान्तोदात्तत्वं ततस्तत्पुरुष इति ॥

इमानि च भूयः शब्दानुशासनस्य प्रयोजनानि । तेऽसुराः । दुष्टः शब्दः । यदधी-

[५]आगम म्हणजे वेद; हाही व्याकरणाचें अध्ययन करण्याला कारणीभूत आहे. "ब्राह्मणानें 'कशाकरितां' असा प्रश्न न करितां धर्मस्वरूप जो सहा अंगांनीं संपन्न वेद त्याचें पठण करावें व अर्थज्ञान संपादन करावें," हें वचन सर्वविश्रुत आहे. वेदाच्या सहा अंगांमध्यें व्याकरण हें तर मुख्य अंग आहे. व मुख्य अंगाच्याकरितां केलेल्या प्रयत्नाला चांगलेंच फळ मिळतें. तसेंच सौलभ्यानें शब्दार्थज्ञान होण्याकरितां व्याकरण पढावयास पाहिजेच. ब्राह्मणानें अवश्य शब्दांचें ज्ञान संपादन केलें पाहिजे हें सर्वांना माहीतच आहे; व व्याकरणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही सोप्या उपायानें शब्दांचें ज्ञान होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें संशयराहित्याकरितां[६] व्याकरणाचें अध्ययन करावयास पाहिजे. याज्ञिक लोक वाक्य म्हणतात—"स्थूलपृषतीमाग्निवारुणीमनड्वाहीमालभेत" म्हणजे स्थूलपृषती अशा गाईचा अग्नि व वरुण या दोन देवतांना उद्देशून बलि द्यावा. या वाक्यांत स्थूलपृषती शब्दाच्या अर्थाविषयीं संशय येतो. स्थूलपृषती म्हणजे स्थूल व पृषती, म्हणजे धिप्पाड व ठिपक्याठिपक्याची, का स्थूलपृषती म्हणजे जिला स्थूल पृषत् म्हणजे मोठेमोठे ठिपके अंगावर आहेत अशी? स्वरावरून येथें अर्थाचा निश्चय करतां येतो. जर पूर्वपद जें स्थूल याचे स्वर स्थूलपृषती या समासांत कायम राहिले असतील तर हा बहुव्रीहि समास आहे; पण जर शेवटचा स्वर म्हणजे ती येथील ई हा उदात्त असेल तर हा तत्पुरुष[७] समास आहे. पण ज्यानें व्याकरण म्हटलें नाहीं, त्याला स्वरावरून स्थूलपृषती या शब्दाच्या अर्थाचा निर्णय करतां येणार नाहीं.

खालीं दिलेले आणखीही शब्दशास्त्र अध्ययन करण्याचे फायदे आहेत.[८]—तेऽसुराः०, दुष्टः शब्दः०. यदधीतम्०, यस्तु प्रयुङ्क्ते०, अविद्वांसः०, विभक्तिं कुर्वन्ति०, यो या इमाम्० चत्वारि०, उत त्वः०, सक्तुमिव०, सारस्वतीम्०,

५. व्याकरणशास्त्राचे उपयोग सांगतांना भाष्यकारांनीं व्याकरणशास्त्र शिकण्याचें हें एक कारण दाखविलें आहे. पूर्वी रक्षा वगैरे जें प्रयोजन आहे असें जें म्हटलें आहे, तेथें प्रयोजन शब्दाचा अर्थ प्रयोजक असाही आहे.

६. संशय उत्पन्न न होण्याकरितां किंवा आलेला संशय दूर होण्याकरितां.

७. स्थूलपृषती या शब्दामध्यें समास दोन तऱ्हेनें संभवतो. स्थूला चासौ पृषती च स्थूलपृषती असा कर्मधारय समास होतो. व्याकरणशास्त्रामध्यें कर्मधारयाला तत्पुरुष असें म्हणतात. तत्पुरुषामध्यें अन्त उदात्त होतो आणि स्थूलपृषती असें रूप होतें. दुसरी तऱ्हा अशी की, स्थूलानि पृषन्ति यस्यां सा असा बहुव्रीहि समास होतो. हा बहुव्रीहि समास झाला असतां स्थूल या पूर्वपदांतील शेवटचा वर्ण उदात्त होतो, त्यामुळें त्याच्या पुढील वर्णाला स्वरित होतो. त्या स्वरिताच्या पुढील दोन अनुदात्ताला प्रचय होतो, आणि स्थूलपृषती असें रूप होतें. तेव्हां हे स्वर पाहून येथें कोणता समास आहे तें वैयाकरणाला निश्चित करतां येतें.

८. भाष्यकारांनीं हे फायदे जे निराळे सांगितले आहेत, त्याचा हेतु इतकाच कीं, हे फायदे गौण

तम् । यस्तु प्रयुङ्क्ते । अविद्वांसः । विभक्तिं कुर्वन्ति । यो वा इमाम् । चत्वारि । उत त्वः । सक्तुमिव । सारस्वतीम् । दशम्यां पुत्रस्य । सुदेवो असि वरुणेति ॥

तेऽसुराः । तेऽसुरा हेलयो हेलय इति कुर्वन्तः पराबभूवुः । तस्माद् ब्राह्मणेन न म्लेच्छितवै नापभाषितवै । म्लेच्छो ह वा एष यदपशब्दः । म्लेच्छा मा भूमेत्यध्येयं व्याकरणम् ॥ तेऽसुराः ॥

दुष्टः शब्दः ।

दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा
मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह ।
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति
यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधादिति ॥

दुष्टाञ्शब्दान्मा प्रयुक्ष्महीत्यध्येयं व्याकरणम् ॥ दुष्टः शब्दः ॥

यदधीतम् ।

यदधीतमविज्ञातं निगदेनैव शब्द्यते ।
अनग्नाविव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित् ॥

तस्मादनर्थकं माधिगीष्महीत्यध्येयं व्याकरणम् ॥ यदधीतम् ॥

यस्तु प्रयुङ्क्ते । यस्तु प्रयुङ्क्ते कुशलो विशेषे शब्दान् यथावद्व्यवहारकाले ।

---

दशम्यां पुत्रस्य०, सुदेवो असि वरुण० हे ते होत. त्यांपैकीं तेऽसुराः० याचा अर्थ—ते दैत्य 'हेऽरयः, हेऽरयः' (म्हणजे अरे शत्रूंनो, अरे शत्रूंनो), याचे ऐवजीं 'हेलयो, हेलयः' असें ओरडले व त्यांचा पराभव झाला, म्हणून ब्राह्मणानें म्लेच्छन[9] करूं नये म्हणजे अशुद्ध शब्द बोलूं नये; म्लेच्छ म्हणजे अपशब्द होय. आपल्या तोंडांतून अपशब्द निघूं नयेत म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां "दुष्टः शब्दः" याचा अर्थ—"स्वरानें किंवा वर्णानें अशुद्ध शब्द हा बरोबर न योजल्यामुळें योग्य अर्थ प्रतिपादन करीत नाहीं. असा शब्द हा वज्रासारखा होतो व ज्याप्रमाणें इन्द्रशत्रु[10] या शब्दानें स्वरचुकीमुळें यजमानाचाच नाश केला, त्याप्रमाणें हा शब्दही यजमानाचा नाश करतो. भलत्या म्हणजे चुकीच्या शब्दांचा आपण प्रयोग करूं नये म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

'यदधीतम्' याचा अर्थ—ज्याचें अध्ययन केलें, पण ज्याचा अर्थ कळला नाहीं; थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे जें केवळ शब्दतःच उच्चारण केलें जातें असें शुष्क अध्ययन. ज्याप्रमाणें शुष्क लांकूड अग्नीशिवाय मुळींच जळत नाहीं, त्याप्रमाणें ते मुळींच प्रकाशमान होतें[11] नाहीं. म्हणून, अर्थ कळल्याशिवाय अध्ययन करूं नये, म्हणून व्याकरण म्हणावें.

"यस्तु प्रयुङ्क्ते" या श्लोकाचा अर्थ—शब्दाच्या व्यवहारांत सूक्ष्म भेदांचें व विशिष्ट उपयोगांचें ज्याला चांगलें ज्ञान आहे असा जो मनुष्य योग्य रीतीनें शब्दांचे प्रयोग करतो

---

आहेत; पूर्वीं सांगितलेले फायदेच मुख्य होत.

९. हेलयः हेलयः असें म्हणण्यांत हे अलयः असें दोन्ही शब्दांना मिळून द्वित्व केलें आहे ही एक चूक होय. तसेंच अरयः या ठिकाणीं लकार उच्चारला ही दुसरी चूक होय. अशा तऱ्हेचें भलत्या तऱ्हेचें जें उच्चारण हेंच म्लेच्छन होय.

१०. इन्द्रशत्रु यांतील शत्रु या शब्दाचा अर्थ घातक असा आहे. इन्द्राला मारणारा पुत्र उत्पन्न व्हावा या उद्देशानें केलेल्या यज्ञामध्यें इन्द्रशत्रु असा पुत्र दे अशी देवतेची प्रार्थना केली, ती प्रार्थना करतेवेळीं ऋत्विजांनीं इन्द्रशत्रु शब्दाला बहुव्रीहि समासाचे स्वर लावून इन्द्रशत्रु असें उच्चारण केलें. वस्तुतः यजमानाच्या मनाप्रमाणें इन्द्रशत्रु शब्दाला तत्पुरुष समासाचे स्वर लावावयास पाहिजे होते; म्हणजे त्याप्रमाणें इन्द्राला मारणारा मुलगा झाला असता; तेव्हां या स्वराच्या चुकीमुळें इन्द्र ज्याला मारणारा आहे असा मुलगा झाला व पुढें युद्धामध्यें त्या मुलाला इन्द्रानें मारिलें.

११. निष्फळ होतें.

सोऽनन्तमाप्नोति जयं परत्र
वाग्योगविद्दुष्यति चापशब्दैः ॥

कः । वाग्योगविदेव । कुत एतत् । यो हि शब्दाञ्जानात्यपशब्दानप्यसौ जानाति । यथैव हि शब्दज्ञाने धर्म एवमपशब्दज्ञानेऽप्यधर्मः । अथवा भूयानधर्मः प्राप्नोति । भूयांसोऽपशब्दा अल्पीयांसः शब्दाः । एकैकस्य हि शब्दस्य बहवोऽपभ्रंशाः॥तद्यथा गौरित्यस्य शब्दस्य गावी गोणी गोता गोपोतलिकेत्येवमादयोऽपभ्रंशाः । अथ योऽवाग्योगवित् । अज्ञानं तस्य शरणम् । नात्यन्तायाज्ञानं शरणं भवितुमर्हति । यो ह्यजानन्वै ब्राह्मणं हन्यात्सुरां वा पिबेत्सोऽपि मन्ये पतितः स्यात् । एवं तर्हि सोऽनन्तमाप्नोति जयं परत्र वाग्योगविद्दुष्यति चापशब्दैः । कः । अवाग्योगविदेव । अथ यो वाग्योगवित् । विज्ञानं तस्य शरणम् ॥ क्व पुनरिदं पठितम् । भ्राजा नाम श्लोकाः । किं च भोः श्लोका अपि प्रमाणम् । किं चातः । यदि प्रमाणमयमपि श्लोकः प्रमाणं भवितुमर्हति ।

यदुदुम्बरवर्णानां घटीनां मण्डलं महत् ।

---

तो शब्दप्रयोग करण्यांत कुशल विद्वान् स्वर्ग लोकांत अक्षय्य जय मिळवितो; पण भलतें शब्द योजिले तर मात्र त्याला दोष लागतो.

पण, कोणाला बरें हा दोष लागतो? शब्दप्रयोग जाणणाऱ्याला का न जाणणाऱ्याला?

शब्दप्रयोग जाणणाऱ्यालाच ना? असें कशावरून म्हणाल, तर ज्याला शुद्ध शब्दांचें ज्ञान होतें, त्यालाच 'हा अशुद्ध शब्द आहे' असें अशुद्ध शब्दांचेंही ज्ञान होतें; आणि ज्याप्रमाणें शब्दज्ञानानें पुण्य लागतें त्याचप्रमाणें अपशब्दज्ञानानें पाप लागतें; त्यांतसुद्धा वास्तविक पाहतां पापच पुष्कळ लागेल; कारण अपशब्द पुष्कळच आहेत, व शुद्ध शब्द असे थोडेच आहेत. एकेका शुद्ध शब्दाचे पुष्कळ अशुद्ध शब्द होतात. उदाहरणार्थ, गौः या शुद्ध शब्दाचे 'गावी', 'गोणी', 'गोता', 'गोपोतलिका' वगैरे पुष्कळ अपभ्रंश होतात. (तेव्हां हें शब्दज्ञानानें व अपशब्दज्ञानानें लागणारें पुण्य व पाप हें शब्दप्रयोग जाणणाऱ्यासंबंधानेंच सांगितलें आहे.) आतां ज्याला शब्दप्रयोग कळत नाहींत, त्याचा बचाव मात्र उलट त्याचें अज्ञानच करतें. त्याला पुण्यही लागत नाहीं व पापही लागत नाहीं.

हें म्हणणें योग्य नाहीं. शब्दप्रयोगाचें ज्ञान नसण्यानें पूर्णपणें बचाव होणें शक्य नाहीं. कारण आपण पाहतोंच की, न जाणतां का होईना, जो ब्राह्मणाचा वध करतो किंवा दारू पितो तोही जातिबाह्य होतोच. तर मग वरील 'सोनन्तमाप्नोति' या ओळीचा अर्थ करावयाचा, म्हणजे पुढें लिहिल्याप्रमाणेंच करावयाचाः—"तो शब्दप्रयोग करण्यांत कुशल विद्वान् स्वर्गात अक्षय्य जय मिळवतो, पण भलतेच शब्दप्रयोग केले तर मात्र त्याला दोष लागतो." कोणाला दोष लागतो? ज्याला शब्दप्रयोगाचें ज्ञान नाहीं त्याला; कारण ज्याला शब्दप्रयोगाचें ज्ञान आहे त्याचा बचाव त्याचें ज्ञानच करूं शकतें.

पण हा श्लोक कोठें कोणीं सांगितला आहे?

भ्राज[१२] नांवानें प्रसिद्ध जे श्लोक आहेत त्यांपैकींच हा एक श्लोक आहे.

पण, काय हो? आपणांला श्लोकसुद्धां प्रमाण आहेत का?

मग त्याला काय हरकत आहे?

तर मग, जर हा 'यस्तु प्रयुङ्क्ते०' श्लोक प्रमाण आहे, तर पुढील श्लोकही प्रमाण होण्यास योग्य आहे. "तांब्याच्या रंगाच्या दारूनें भरलेल्या घड्यांचें जाळेंच्या जाळें

---

१२. हे भ्राज नांवाचे श्लोक कात्यायनानें केलेले आहेत. (कैयट)

पीतं न गमयेत्स्वर्गं किं तत्क्रतुगतं नयेदिति॥ प्रमत्तगीत एष तत्रभवतो यस्त्वप्रमत्तगीतस्तत्प्रमाणम् ॥ यस्तु प्रयुङ्क्ते ॥

अविद्वांसः । अविद्वांसः प्रत्यभिवादे
नाम्नो ये न प्लुतिं विदुः ।
कामं तेषु तु विप्रोष्य
स्त्रीष्विवायमहं वदेत् ॥

अभिवादे स्त्रीवन्माभूमेत्यध्येयं व्याकरणम् ॥ अविद्वांसः ॥

विभक्तिं कुर्वन्ति । याज्ञिकाः पठन्ति । प्रयाजाः सविभक्तिकाः कार्या इति । न चान्तरेण व्याकरणं प्रयाजाः सविभक्तिकाः शक्याः कर्तुम् ॥ विभक्तिं कुर्वन्ति ॥

यो वा इमाम् । यो वा इमां पदशः स्वरशोऽक्षरशो वाचं विदधाति स आर्त्विजीनः । आर्त्विजीनाः स्यामेत्यध्येयं व्याकरणम् ॥ यो वा इमाम् ॥

चत्वारि । चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा
द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति
महो देवो मर्त्याँ आविवेशेति ॥

चत्वारि शृङ्गाणि चत्वारि पदजातानि नामाख्यातोपसर्गनिपाताश्च । त्रयो अस्य पादास्त्रयः काला भूतभविष्यद्वर्तमानाः । द्वे

पिऊन सुद्धा जर (लोकांत) स्वर्ग मिळत नसतो तर सौत्रामणि नामक यज्ञामध्यें थोडीशी दारू पिऊन स्वर्ग कसा मिळेल''?

हा श्लोक प्रमाण नाहीं; कारण बेताल माणसांनीं म्हटलेला हा श्लोक आहे. जो श्लोक समंजस पुरुषानें लिहिलेला असतो, तो प्रमाणच असतो.

'अविद्वांसः०' श्लोकाचा अर्थः—प्रत्यभिवादनाच्या[१३] वेळीं ज्या व्याकरण न जाणणाऱ्या गुरुजींना नामांमध्यें प्लुत करून उच्चारण कसें करावें तें माहीत नसतें, त्या गुरुजींच्या पुढें प्रवास आटोपून गेलेल्या शिष्यानें, आपलें नांव न उच्चारतां, जसें स्त्रियांपुढें साध्या शब्दांनीं 'हा मी आलों' असा उच्चार केला जातो, तसाच उच्चार करावा. शिष्यांकडून अभिवादन, म्हणजे नमस्कार केलें जाणें, त्या वेळीं स्त्रियांपुढें जसा नमस्कार केला जातो तसा आपल्यापुढें केला जाऊं नये, एवढ्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

'विभक्तिं कुर्वन्ति' म्हणजे विभक्ति लावतात. याविषयीं खुलासा पुढीलप्रमाणेंः— याज्ञिक म्हणतात, प्रयाज मंत्रांचें विभक्ति[१४] लावून उच्चारण करावें. पण व्याकरण म्हटल्याशिवाय प्रयाज मंत्रांना विभक्ति लावून उच्चारण करणें शक्य नाहीं.

'यो वा इमाम्०' याचा अर्थः—'जो ही वाणी प्रत्येक पद, प्रत्येक स्वर व प्रत्येक अक्षर स्पष्ट करून उच्चारतो तो यज्ञ[१५] करण्याला योग्य होतो.' तशा रीतीनें आपण योग्य व्हावें, याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

आतां 'चत्वारि०' याचा अर्थः—'ह्याला चार शिंगें आहेत, तीन पाय आहेत; दोन डोकीं आहेत; सात हात पण आहेत; तीन ठिकाणीं बांधलेला हा बलवान् वृषभ मोठा शब्द करीत असतो, हा मोठा (शब्दरूपी) देव मर्त्यलोकांत प्रविष्ट झाला.' येथें चार शिंगें म्हणजे चार प्रकारचीं पदें—नाम, क्रियापद, उपसर्ग, व निपात. तीन पाय म्हणजे भूत, भविष्य व वर्तमान हे तीन काल; दोन मस्तकें

१३. नमस्कार केल्यानंतर नमस्कार करणाऱ्याला वडील माणसें जो आशीर्वाद देतात तो आशीर्वाद देतांना त्या नमस्कार करणाऱ्याचें नांव उच्चारून आणि त्या नांवांतील शेवटच्या अक्षराला प्लुत करून द्यावा असा विधि आहे. उदा० आयुष्मानेधि देवदत्ता ३.

१४. अग्नि शब्दाला अग्ने अग्ने अशा रीतीनें संबोधन-विभक्ति लावून.

१५. यज्ञ करणें म्हणजे ऋत्विजाकडून यज्ञ करविणें आणि यजमानानें सांगितल्याप्रमाणें ऋत्विजांनीं आपापलें काम करणें या दोन्ही गोष्टींचा 'यज्ञ करण्याला' ह्या म्हणण्यांत संग्रह होतो.

शीर्षे द्वौ शब्दात्मानौ नित्यः कार्यश्च । सप्त हस्तासो अस्य सप्त विभक्तयः । त्रिधा बद्ध-स्त्रिषु स्थानेषु बद्ध उरसि कण्ठे शिरसीति । वृषभो वर्षणात् । रोरवीति शब्दं करोति । कुत एतत् । रौतिः शब्दकर्मा । महो देवो मर्त्याँ आविवेशेति । महान्देवः शब्दः । मर्त्या मरणधर्माणो मनुष्याः । तानाविवेश । महता देवेन नः साम्यं यथा स्यादित्यध्येयं व्याकरणम् ॥ अपर आह ।

चत्वारि वाक्परिमिता पदानि
तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति
तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥

चत्वारि वाक्परिमिता पदानि । चत्वारि पदजातानि नामाख्यातोपसर्गनिपाताश्च । तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः । मनस ईषणो मनीषिणः । गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति । गुहायां त्रीणि निहितानि नेङ्गयन्ति । न चेष्टन्ते । न निमिषन्तीत्यर्थः । तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति । तुरीयं ह वा एतद्वाचो यन्मनुष्येषु वर्तते । चतुर्थमित्यर्थः ॥ चत्वारि ॥

उत त्वः । उत त्वः पश्यन्न ददर्श वाच-
मुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ।

---

म्हणजे शब्दाचीं दोन स्वरूपें—नित्य[१६] व उत्पाद्य; याचे सात हात म्हणजे प्रथमा वगैरे सात विभक्ति; तीन ठिकाणीं बांधलेला म्हणजे छाती, गळा व मस्तक या तीन ठिकाणीं बांधलेला. याला वृषभ म्हटलें आहे; कारण हा इच्छा पूरित करतो. रोरवीति याचा अर्थ शब्द करतो. हा अर्थ कोठून काढतां? 'रु' धातूचा अर्थ 'शब्द करणें' असा आहे. 'महो देवो मर्त्यां आविवेश' म्हणजे हा मोठा देव शब्द मर्त्यांमध्यें म्हणजे मरण पावणाऱ्या प्राण्यांमध्यें म्हणजे मनुष्यांमध्यें शिरता झाला. मोठ्या देवाशीं–शब्दाशीं–आपलें साधर्म्य[१७] व्हावें यास्तव व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

दुसरे कोणी व्याख्याकार 'चत्वारि०' या पदानें 'चत्वारि वाक्परिमिता०' ही ऋचा समजतात; त्याचा अर्थ—वाणीचीं मोजकीं चार पदें म्हणजे स्थानें आहेत; जे मनीषी म्हणजे मन ताब्यांत आणलेले विद्वान् ब्राह्मण आहेत तेच तीं चार पदें जाणूं शकतात; कारण चार पदांपैकीं तीन आंतल्या बाजूस खोल ठेवल्यामुळें चकाकत नाहींत; फक्त चवथें पद म्हणजे वाणीचा चवथा भागच माणसें उच्चारूं शकतात.[१८] 'चत्वारि वाक्परिता पदानि" याचा अर्थ—वाणीचीं मोजकीं चार पदें आहेत; म्हणजे चार प्रकारचीं पदें आहेत—नाम, आख्यात, उपसर्ग व निपात. 'तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः.' मनीषिणः म्हणजे मनाचे ईश्वर म्हणजे मन व्याकरणाध्ययनानें पूर्ण ताब्यांत ठेवणारे. 'गुहा त्रीणि निहिता नेङ्गयति'—गुहेमध्यें ठेवलेलीं तीन ठिकाणें हालतचालत नाहींत म्हणजे प्रकाशत नाहींत. 'तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति' जें माणसामध्यें वाणीचें स्थान दिसतें, तें वास्तविक चवथा भागच आहे.

'उत त्वः पश्यन्' हा श्लोकः—'वाणीचें अध्ययन करून सुद्धा कांहीं लोक वाणी म्हणजे काय हें नीट जाणीत नाहींत; त्याप्रमाणें कांहीं लोक वाणीचें श्रवण करून सुद्धां खरी वाणी ऐकूं शकत नाहींत. पण ज्याप्रमाणें कामसंपन्न भार्या सुंदर वस्त्र नेसून पतीपुढें आपली तनु प्रकट करिते त्याप्रमाणेंच ह्या वैयाकरणाचे पुढें ही

---

१६. नित्य म्हणजे स्फोटरूपी शब्द आणि उत्पाद्य म्हणजे स्फोटाचा व्यंजक ध्वनि.

१७. शब्दांशीं तादात्म्य झालें असतां अर्थातच त्या शब्दाचा जो अर्थ परब्रह्म वगैरे त्याच्याशींही त्या वैयाकरणाचें तादात्म्य होतें.

१८. वर्णोच्चार होतांना नाभीपासून वारा उत्पन्न होऊन तो मुखांतून बाहेर पडतो; त्या वाऱ्याच्या संबंधानें नाभिप्रदेशाच्या खालच्या बाजूला एक, नाभिप्रदेशामध्यें दुसरा आणि हृदयामध्यें तिसरा, अशा रीतीनें आंतल्या बाजूला सूक्ष्म शब्दाचा उच्चार होतो तो समजण्यांत येत नाहीं. फक्त मुखामध्यें त्या वायूच्या आघातानें होणारा जो ध्वनि तो सर्वांना

उतो त्वस्मै तन्वं विसस्रे
जायेव पत्य उशती सुवासाः ।

अपि खल्वेकः पश्यन्नपि न पश्यति वाचम् । अपि खल्वेकः शृण्वन्नपि न शृणोत्येनाम् । अविद्वांसमाहार्धम् । उतो त्वस्मै तन्वं विसस्रे । तनुं विवृणुते । जायेव पत्य उशती सुवासाः । तद्यथा जाया पत्ये कामयमाना सुवासाः स्वमात्मानं विवृणुत एवं वाग्वाग्विदे स्वात्मानं विवृणुते । वाङ्नो विवृणुयादात्मानमित्यध्येयं व्याकरणम् ॥

उत त्वः ॥

सक्तुमिव । सक्तुमिव तितउना पुनन्तो
यत्र धीरा मनसा वाचमक्रत ।
अत्रा सखायः सख्यानि जानते
भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधिवाचि ॥

सक्तुः सचतेर्दुर्धावो भवति । कसतेर्वा विपरीताद्विकासितो भवति । तितउ परिपवनं भवति ततवद्वा तुन्नवद्वा । धीरा ध्यानवन्तो मनसा प्रज्ञानेन वाचमक्रत वाचमकृषत । अत्रा सखायः सख्यानि जानते ।

वाणी आपली तनु प्रकट करिते. श्लोकाचें पदशः स्पष्टीकरणः—एखादा मनुष्य अवलोकन करून सुद्धां पूर्णपणें जाणीत नाहीं. तसेंच एखादा ऐकून सुद्धां खरें श्रवण करीत नाहीं.[१९] कशाचें अवलोकन व श्रवण? अर्थात् वाणीचें. हा श्लोकाचा पहिला अर्धा भाग व्याकरणाचें अध्ययन न केलेल्या माणसाला उद्देशून लिहिला आहे. पुढील अर्धभागांतील "उतो त्वस्मै तन्वं विसस्रे' यांतील तन्वं विसस्रे म्हणजे तनु प्रकट करिते. पुढील 'जायेव पत्य उशती सुवासाः' ह्या अर्धभागांत उपमा देऊन अर्थ स्पष्ट केला आहे. ज्याप्रमाणें प्रेमानें युक्त भार्या उत्तम वस्त्र परिधान करून पतीला आपली तनु दाखवते, त्याप्रमाणें वाणी ही वाणीचें म्हणजे शब्दाचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या माणसाला आपलें स्वरूप प्रकट करिते. वाणीनें आपलें स्वरूप आपणापुढें प्रकट करावें या हेतूनें व्याकरणाचें अध्ययन करावें.

'[२०]सक्तुमिव०' याचा अर्थ—'ज्याप्रमाणें चाळणीनें सातू चाळतात त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं विद्वान् लोक बुद्धीनें वाणी शुद्ध करून उच्चारतात, त्या ठिकाणीं एकमेकांचे स्नेही सोबती विद्वान् लोक ऐक्यभावनेनें वागतात; कारण त्यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक लक्ष्मीचा निवास असतो.' श्लोकांतील सक्तु शब्दाचा अर्थ सातू. 'सक्तु' हा शब्द सच् धातूपासून आला आहे. 'सच्' म्हणजे 'चिकटणें'. सातू हा निर्मल करण्यास कठिण असतो. अथवा सक्तु म्हणजे विकसित होणारा हाही अर्थ होईल व कस् धातूपासूनही वर्णांची उलटापालट करून 'सक्तु' शब्द साधतां येईल. तितउ हें वस्तु निर्मल करण्याचें साधन आहे. तितउ म्हणजे चाळणी. ततवत् म्हणजे पसरल्यासारखी ती विस्तृत असते किंवा तुन्नवत् म्हणजे तिला भोकें भोकें असवात म्हणून तिला तितउ म्हणतात. धीराः म्हणजे मनन करणारे; मनसा म्हणजे बुद्धीनें; 'वाचमक्रत' येथें 'अक्रत' याचा अर्थ 'अकृ-

समजण्यांत येतो.

१९. कारण व्याकरणआध्ययन नसेल तर त्याच्या कानीं नुसता शब्द पडला, तरी त्याला त्याच्या खऱ्या अर्थाचें ज्ञान नसल्यामुळें तें त्यानें केलेलें श्रवण पशुपक्ष्यांप्रमाणें निरर्थक होतें.

२०. या मंत्राचा अर्थ उद्योतानें असा केला आहे: ज्याप्रमाणें चाळणीनें चाळून सातू शुद्ध करितात त्याप्रमाणें ज्या ह्या व्याकरणशास्त्रामध्यें पंडित लोक आपल्या मनाप्रमाणें वाणी शुद्ध करितात म्हणजे त्यांतले अपशब्दरूपी खडे बाजूला सारून त्याचा बरोबर अर्थ काय आहे तो मनांत घेतात, त्यामुळें त्या पंडित वैयाकरणांची शब्दाशीं आणि त्याच्याशीं ऐक्यभावना होते. आणि त्यामुळें ते सर्व वस्तूंशीं आपलें ऐक्य आहे असें समजतात; म्हणजे ब्रह्मज्ञानी होतात. कारण त्यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक लक्ष्मीचा निवास असतो.

अत्र सखायः सन्तः सख्यानि जानते। सायुज्यानि जानते। क। य एष दुर्गो मार्ग एकगम्यो वाग्विषयः। के पुनस्ते। वैयाकरणाः। कुत एतत्। भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि। एषां वाचि भद्रा लक्ष्मीर्निहिता भवति। लक्ष्मीर्लक्षणाद्भासनात्परिवृढा भवति ॥ सक्तुमिव ॥

सारस्वतीम्। याज्ञिकाः पठन्ति। आहिताग्निरपशब्दं प्रयुज्य प्रायश्चित्तीयां सारस्वतीमिष्टिं निर्वपेदिति। प्रायश्चित्तीया मा भूमेत्यध्येयं व्याकरणम्। सारस्वतीम्।

दशम्यां पुत्रस्य। याज्ञिकाः पठन्ति दशम्युत्तरकालं पुत्रस्य जातस्य नाम विदध्याद्घोषवदाद्यन्तरन्तःस्थमवृद्धं त्रिपुरुषानूकमनरिप्रतिष्ठितं तद्धि प्रतिष्ठिततमं भवति द्व्यक्षरं चतुरक्षरं वा नाम कृतं कुर्यान्न तद्धितमिति। न चान्तरेण व्याकरणं कृतस्तद्धिता वा शक्या विज्ञातुम् ॥ दशम्यां पुत्रस्य ॥

सुदेवो असि।

---

षत' म्हणजे 'गाळून काढते झाले' असा आहे, 'अत्र सखायः सख्यानि जानते' म्हणजे या ठिकाणीं हे विद्वान् लोक एकमेकांचे स्नेही असल्यामुळें दृढ स्नेह संपादितात. या ठिकाणीं म्हणजे कोठें? हा जो बिकट (मोक्ष-)मार्ग आहे, जो केवळ ज्ञानानेंच प्राप्य आहे व जो वेदवाणीचा विषय आहे, त्याच्या ठिकाणीं. हे स्नेही म्हणजे कोण? वैयाकरण. दृढ स्नेह संपादन करतात हें कशामुळें? उत्तर—'भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि' म्हणजे यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक लक्ष्मी राहिलेली असते म्हणून. लक्ष्मी ही लक्षण किंवा भासन म्हणजे प्रकाशित होणें या गुणामुळें अज्ञान दूर करण्यास समर्थ असते म्हणून तिला लक्ष्मी शब्द लावतात.

आतां 'सारस्वतीम्' हें वाक्य घेऊं. याज्ञिक लोक म्हणतातः—ज्यानें गृह्याग्नि पाळला आहे, त्याच्याकडून जर अपशब्दाचा प्रयोग झाला तर त्यानें प्रायश्चित्तादाखल 'सारस्वती'[21] इष्टि' करावी. आपणांला प्रायश्चित्ताची जरूर न लागावी म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां 'दशम्यां पुत्रस्य' हें वाक्य घेऊं. याज्ञिक लोक म्हणतात, "दहाव्या दिवसाच्यानंतर नूतन झालेल्या पुत्राचें नांव ठेवावें; नांवाचा आरंभ घोषवत्[22] व्यंजनानें व्हावा; नांवाच्या मध्यें अन्तस्थ व्यंजन असावें; तें वृद्ध नसावें; तें तीन पुरुषांच्या नांवापैकीं असावें, व तें अनरि असावें म्हणजे माणसांचें नसावें, किंवा शत्रूच्या ठिकाणीं प्रतिष्ठित झालेलें नसावें; असें जें नांव तें अत्यंत प्रतिष्ठित होतें. नांवाचीं अक्षरें दोन असावीं किंवा चार असावीं; तें कृदन्त[23] असावें, तद्धितान्त नसावें". व्याकरणाच्या अध्ययनाशिवाय कृत्प्रत्यय किंवा तद्धितप्रत्यय यांचें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां सुदेवो असि याचा अर्थ— 'हे वरुणा, तूं खरोखरच देव आहेस. कारण,

---

२१. सरस्वतीदेवतेला उद्देशून केल्या जाणाऱ्या इष्टीला सारस्वती असें म्हणतात.

२२. वर्गांतील तिसरा, चवथा आणि पांचवा वर्ण आणि य र ल व ह या वर्णांना घोष असें म्हणतात. य र ल व या चार वर्णांना अंतःस्थ असें म्हणतात. ज्या शब्दामध्यें स्वरापैकीं पहिला स्वर आ, ऐ किंवा औ यांपैकीं असतो त्या शब्दाला वृद्ध असें म्हणतात. (१।१।७३ सूत्र पाहा.) मुलाचें नांव ठेवतांना बापानें आपला बाप, आजा आणि पणजा या तिघांपैकीं कोणाचें तरी नांव ठेवावें. तें नांव मनुष्यभिन्न म्हणजे कोणत्या तरी देवता या अर्थी रूढ झालेलें असावें; व तें नांव आपल्या शत्रूच्या ठिकाणीं रूढ झालेलें नसावें.

२३. धातूला जो प्रत्यय लागून नाम तयार होतें, त्या प्रत्ययाला कृत् असें म्हणतात. (३।१।९३ सूत्र पाहा.) नामालाच जो प्रत्यय लागून फिरून जें दुसरें नाम तयार होतें त्या प्रत्ययाला तद्धित असें म्हणतात. (४।१।७६ सूत्र पाहा.)

सुदेवो असि वरुण यस्य ते
सप्त सिन्धवः
अनुक्षरन्ति काकुदं सूर्म्यं सुषिरामिव ॥

सुदेवो असि वरुण सत्यदेवोऽसि यस्य ते सप्त सिन्धवः सप्त विभक्तयोऽनुक्षरन्ति काकुदम्। काकुदं तालु। काकुर्जिह्वा सास्मिन्नुद्यत इति काकुदम्। सूर्म्यं सुषिरामिव। तद्यथा शोभनामूर्मिं सुषिरामग्निरन्तः प्रविश्य दहत्येवं तव सप्त सिन्धवः सप्त विभक्तयस्ताल्वनुक्षरन्ति। तेनासि सत्यदेवः। सत्यदेवाः स्यामेत्यध्येयं व्याकरणम्। सुदेवो असि।

किं पुनरिदं व्याकरणमेवाधिजिगांसमानेभ्यः प्रयोजनमन्वाख्यायते न पुनरन्यदपि किंचित्। ओमित्युक्त्वा वृत्तान्तशः शमित्येवमादीञ्शब्दान्पठन्ति ॥ पुराकल्प एतदासीत्। संस्कारोत्तरकालं ब्राह्मणा व्याकरणं स्माधीयते। तेभ्यस्तत्र स्थानकरणानुप्रदानज्ञेभ्यो वैदिकाः शब्दा उपदिश्यन्ते। तदद्यत्वे न तथा। वेदमधीत्य त्वरिता वक्तारो भवन्ति। वेदान्नो वैदिकाः सिद्धा लोकाच्च लौकिकाः। अनर्थकं व्याकरणमिति। तेभ्य एवं विप्रतिपन्नबुद्धिभ्योऽध्येतृभ्य आचार्य इदं शास्त्रमन्वाचष्टे।

---

ज्याप्रमाणें अग्नि पोकळ प्रतिमेंत शिरून (आंतील मळ जाळून) प्रतिमा शुद्ध करतो, त्याप्रमाणें तुझ्यापासून निघून सात प्रवाह म्हणजे विभक्ति ह्या टाळूप्रत जाऊन तिला प्रकाशित करतात.' 'सुदेवो असि वरुण' म्हणजे वरुणा, तूं सुदेव म्हणजे सत्यदेव आहेस. 'यस्य ते सप्त सिन्धवः' येथील सप्त सिन्धू म्हणजे सात विभक्ति. 'अनुक्षरन्ति काकुदं' येथील काकुदं या पदाचा अर्थ टाळू. काकु म्हणजे जीभ; ती ज्या भागाकडे नुद्यते म्हणजे फिरवली जाते तो भाग काकुद. 'सूर्म्यं सुषिरामिव' हा दृष्टांत दिला आहे. ज्याप्रमाणें पोकळ सुंदरशा प्रतिमेंत अग्नि आंत शिरून तिचा मळ जाळतो व तिला लखलखीत करतो, त्याप्रमाणें (तुझ्यापासून निघून) या सात विभक्ति टाळूचा भाग स्वच्छ करतात.[२४] म्हणून तूं सत्यदेव आहेस. आपण सत्यदेव व्हावें म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

बरें पण, व्याकरण पढूं इच्छिणाऱ्यालाच व्याकरणाध्ययनाचे फायदे येथें सांगितले आहेत; दुसरे कांहीं वेद वगैरे अध्ययन करणाऱ्याला वेदाध्ययनाचे फायदे कां सांगितले नाहींत ? फायद्याचा प्रथम विचार केल्याशिवायच वेदाध्ययनाला प्रवृत्त होऊन पाठ्यामागून पाठ या क्रमानें 'शं नो देवीः' वगैरे वेदवाक्यें हजारों लोक पठण करतात; त्यांना कोणी वेदाध्ययनाचे फायदे कां नाहीं सांगत ? पूर्वीच्या काळीं अशी स्थिति होती की, उपनयनसंस्कार झाल्यानंतर प्रथम ब्राह्मण व्याकरणाचें अध्ययन करीत; आणि त्यांना तीं तीं निरनिराळीं स्थानें,[२५] करणें, नाद वगैरे गोष्टींचें ज्ञान झाल्यावरच वेद शिकवीत. आजची गोष्ट तशी नाहीं. वेदांचें अध्ययन झालें की तावडतोब गृहस्थाश्रमी होऊं इच्छिणारे लोक असें बोलावयाला लागतात : वेद शिकल्यानें आम्हांला वैदिक शब्दांचें ज्ञान झालें व लोकांमधील रोजच्या आमच्या व्यवहारामुळें आम्हांला लौकिक शब्दांचेंही ज्ञान झालें आहे; आतां व्याकरण शिकण्याची कांहीं जरुरी नाहीं. अशा तऱ्हेनें भलत्या दिशेनें विचार करणाऱ्या शिष्यांना स्नेहाखातर मित्राप्रमाणें आचार्य[२६]

---

२४. विभक्तिप्रत्यय हे शब्दोच्चार करतांना तालुप्रदेशामध्यें प्रकाशित होऊन शरीरांतील पातक दूर करितात; त्यामुळें स्वर्ग प्राप्त होतो हें व्याकरणाचें फल होय.

२५. कंठ, तालु वगैरे स्थानें होत. स्पृष्ट, ईषत्स्पृष्ट वगैरे आभ्यंतर प्रयत्नांना करण असें म्हणतात. नाद वगैरे बाह्य प्रयत्न होत.

२६. येथें मूळांतील आचार्य-शब्दानें भाष्यकारच

इमानि प्रयोजनान्यध्येयं व्याकरणमिति ॥

उक्तः शब्दः। स्वरूपमप्युक्तम्। प्रयोजनान्यप्युक्तानि। शब्दानुशासनमिदानीं कर्तव्यं तत्कथं कर्तव्यम्। किं शब्दोपदेशः कर्तव्य आहोस्विदपशब्दोपदेश आहोस्विदुभयोपदेश इति। अन्यतरोपदेशेन कृतं स्यात्। तद्यथा। भक्ष्यनियमेनाभक्ष्यप्रतिषेधो गम्यते। पञ्च पञ्चनखा भक्ष्या इत्युक्ते गम्यत एतदतोऽन्येऽभक्ष्या इति। अभक्ष्यप्रतिषेधेन वा भक्ष्यनियमः। तद्यथा। अभक्ष्यो ग्राम्यकुक्कुटोऽभक्ष्यो ग्राम्यशूकर इत्युक्ते गम्यत एतदारण्यो भक्ष्य इति। एवमिहापि यदि तावच्छब्दोपदेशः क्रियते गौरित्येतस्मिन्नुपदिष्टे गम्यत एतद्गाव्यादयोऽपशब्दा इति। अथापशब्दोपदेशः क्रियते गाव्यादिषूपदिष्टेषु गम्यत एतद्गौरित्येष शब्द इति।

किं पुनरत्र ज्यायः। लघुत्वाच्छब्दोपदेशः। लघीयाञ्शब्दोपदेशो गरीयानपशब्दोपदेशः। एकैकस्य शब्दस्य बहवोऽपभ्रंशाः। तद्यथा। गौरित्यस्य शब्दस्य गावी गोणी गोता गोपोतलिकादयोऽपभ्रंशाः। इष्टान्वाख्यानं खल्वपि भवति ॥

---

पाणिनि 'हे फायदे आहेत, व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें' असा हेतु मनांत धरून व्याकरणशास्त्र प्रतिपादन करितात.

शब्द कोणता तें सांगितलें; शब्दाचें स्वरूप काय तेंहि पण सांगितलें. शब्दशास्त्र शिकण्यापासून फायदे कोणते तेंहि सांगितलें. आतां शब्दशास्त्र प्रतिपादन करावयाचें, तें कशा रीतीनें करावयाचें? यच्चयावत् सगळ्या शुद्ध शब्दांचें प्रतिपादन करावें, का सगळ्या अपशब्दांचें प्रतिपादन करावें, अथवा शुद्ध शब्द व अपशब्द दोन्ही सांगावे?

शुद्ध शब्द किंवा अपशब्द दोन्हीपैकीं एकाचें प्रतिपादन करण्यानें काम भागेल. उदाहरणार्थ, जेव्हां खाण्यास योग्य पदार्थ कोणते तें आपण नियमस्वरूपानें म्हणजे अमुकच असें सांगतों, तेव्हां अमुक पदार्थ खाऊं नयेत अशा तऱ्हेच्या अभक्ष्य पदार्थांच्या निषेधाचें आपोआपच ज्ञान होतें. पांच नखांचें पांचच[२७] प्राणी खावे असें म्हटलें असतां पांचांशिवाय दुसरे पांच नखांचे कोणतेही प्राणी खाऊं नयेत असें आपोआपच समजतें. त्याचप्रमाणें अभक्ष्य पदार्थांचा निषेध केल्यानें भक्ष्य पदार्थांबद्दलही नियम समजला जातो. जसें गांवकोंबडा खाऊं नये, गांवडुक्कर खाऊं नये असें म्हटलें असतां रानडुक्कर किंवा रानकोंबडा खाण्यास हरकत नाहीं, असें कळतें. प्रस्तुत स्थळीं सदरहूप्रमाणेंच जर शुद्ध शब्दांचें प्रतिपादन केलें, उदा० जर गौः हा शुद्ध शब्द आहे असें सांगितलें, तर त्यावरून कळून येतेंच की, गावी वगैरे बाकीचे अपशब्द आहेत; तसेंच अपशब्दांचें प्रतिपादन केलें, उदा० गावी वगैरे बाकीचे अपशब्द सांगितले, तर त्यावरून कळून येतें की गौः हा शुद्ध शब्द आहे.

या दोहोंपैकीं बरा मार्ग कोणता?

लघुत्वामुळें शुद्ध शब्द सांगणें हा बरा मार्ग; शुद्ध शब्द सांगणें हें थोडक्यांत भागणारें काम आहे; अपशब्द सांगणें फार मोठें काम आहे; कारण एकेका शुद्ध शब्दाचे अनेक अपभ्रंश असूं शकतात. उदाहरणार्थ, गौः या शुद्ध शब्दाचे गावी, गोणी, गोता, गोपोतलिका वगैरे पुष्कळ अपभ्रंश होतात. शिवाय शुद्ध शब्द सांगण्यानें इष्ट म्हणजे आपल्याला[२८] जे शब्द पाहिजेत ते सांगितले जातात.

---

घ्यावेत असें उद्योतकार म्हणतात. तेव्हां उद्योतकारांनीं हें वाक्य एकदेशीच्या तोंडचें आहे असें गृहीत धरलें असावें असें दिसतें.

२७. शशक, शल्यक, खड्गी, कूर्म आणि गोध हे पांच नखांचे पांच प्राणी होत.

२८. अपशब्द कितीही सांगितले तरी त्यावरून

अथैतस्मिञ्शब्दोपदेशे सति किं शब्दानां प्रतिपत्तौ प्रतिपदपाठः कर्तव्यः । गौरश्वः पुरुषो हस्ती शकुनिर्मृगो ब्राह्मण इत्येवमादयः शब्दाः पठितव्याः । नेत्याह। अनभ्युपाय एष शब्दानां प्रतिपत्तौ प्रतिपदपाठः । एवं हि श्रूयते । बृहस्पतिरिन्द्राय दिव्यं वर्षसहस्रं प्रतिपदोक्तानां शब्दानां शब्दपारायणं प्रोवाच नान्तं जगाम । बृहस्पतिश्च प्रवक्तेन्द्रश्चाध्येता दिव्यं वर्षसहस्रमध्ययनकालो न चान्तं जगाम । किं पुनरद्यत्वे यः सर्वथा चिरं जीवति स वर्षशतं जीवति । चतुर्भिश्च प्रकारैर्विद्योपयुक्ता भवत्यागमकालेन स्वाध्यायकालेन प्रवचनकालेन व्यवहारकालेनेति । तत्र चागमकालेनैवायुः पर्युपयुक्तं स्यात् । तस्मादनभ्युपायः शब्दानां प्रतिपत्तौ प्रतिपदपाठः । कथं तर्हीमे शब्दाः प्रतिपत्तव्याः । किंचित्सामान्यविशेषवल्लक्षणं प्रवर्त्यं येनाल्पेन यत्नेन महतो महतः शब्दौघान् प्रतिपद्येरन् । किं पुनस्तत् । उत्सर्गापवादौ । कश्चिदुत्सर्गः कर्तव्यः कश्चिदपवादः । कथंजातीयकः पुनरुत्सर्गः कर्तव्यः कथंजातीयकोऽपवादः । सामान्येनोत्सर्गः

---

बरें, अशा रीतीनें शुद्ध शब्दांचा उपदेश करावयाचा, म्हणजे शब्दज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्दाचें उच्चारण करावयास पाहिजे, होय ना ? 'गौः', 'अश्वः', 'पुरुषः', 'हस्ती', 'शकुनिः', 'मृगः', 'ब्राह्मणः' वगैरे सर्व शब्द सांगावयास पाहिजेत ना ?

नको, असें आम्ही म्हणतों. शब्दांचें ज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्द सांगणें हा कांहीं खरा उपाय नाहीं. असें ऐकिवांत आहे की,[२९] बृहस्पतीनें इन्द्राला एक हजार देवांचीं वर्षें प्रत्येक शब्द उच्चारून शब्दशास्त्र सांगितलें, पण शब्द संपले नाहींत. बृहस्पतीसारखा प्रख्यात वक्ता, इन्द्रासारखा चलाख विद्यार्थी; एक हजार देवांचीं वर्षें अध्ययनाचा काल; तरी शब्दांचा अंत सांपडला नाहीं. मग आजकालची गोष्ट कशाला बोलतां ? जो सर्व प्रकारांनीं निरोगी राहून दीर्घ काल जगतो तो फार तर शंभर वर्षें जगतो. शिवाय, विद्येचा उपयोग चार प्रकारांनीं होतो: गुरुमुखांतून समजून घेते वेळीं म्ह. शिकते वेळीं, मनन करते वेळीं, दुसऱ्यास शिकवते वेळीं आणि व्यवहारामध्यें म्हणजे सभाप्रसंग व यज्ञ यांच्या वेळीं. तेव्हां सर्व शब्दांचें अध्ययन करावयाचें म्हटल्यास सबंध आयुष्य गुरुमुखांतून विद्या शिकण्यांतच खर्च होईल. तेव्हां शब्दांचें ज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्द सांगणें हा कांहीं खरा उपाय नाहीं.

तर मग हे शब्द कोणत्या रीतीनें शिकवावयाचे ? सामान्य धर्म व विशेष धर्म यांनीं युक्त अशीं कांहीं सूत्रें सांगावीं म्हणजे थोडक्या श्रमांत मोठमोठ्या शब्दांच्या राशींच्या राशी शिकवितां येतील.

असें सामान्यधर्म व विशेषधर्म यांनीं युक्त शास्त्र कशा प्रकारचें सांगावयाचें ?

सामान्य नियम व अपवाद या प्रकारचें : एखादा साधारण नियम सांगावा; नंतर त्यास अपवाद सांगावा.

कोणत्या प्रकारचा सामान्य नियम सांगावा व कोणत्या प्रकारचा अपवाद सांगावा ? बऱ्याच ठिकाणीं लागू पडेल असा सामान्य नियम सांगावा. उदा० 'कर्मण्यण्' (३।२।१)

---

शुद्ध शब्दाचें स्वरूप समजत नाहीं; आणि आपणांला तर शुद्ध शब्दाचीच जरूरी आहे. कारण शुद्ध शब्द उच्चारला असतांनाच त्यापासून मोठें पुण्य उत्पन्न होतें.

२९. हें अर्थवाद वाक्य आहे. ह्याचें तात्पर्य असें की, प्रत्येक साधु शब्द सांगत बसणें हें सर्वथा असंभवनीय आहे.

कर्तव्यः । तद्यथा । कर्मण्यण् [३-२-१] तस्य विशेषेणापवादः । तद्यथा । आतो ऽनुपसर्गे कः [३-२-३] ॥

किं पुनराकृतिः पदार्थ आहोस्विद्द्रव्यम् । उभयमित्याह । कथं ज्ञायते । उभयथा ह्याचार्येण सूत्राणि पठितानि । आकृतिं पदार्थं मत्वा जात्याख्यायामेकस्मिन्बहुवचनमन्यतरस्याम् [१.२.५८] इत्युच्यते । द्रव्यं पदार्थं मत्वा सरूपाणाम् [१.२.६४] इत्येकशेष आरभ्यते ॥

किं पुनर्नित्यः शब्द आहोस्वित्कार्यः । संग्रह एतत्प्राधान्येन परीक्षितं नित्यो वा स्यात्कार्यो वेति । तत्रोक्ता दोषाः प्रयोजनान्यप्युक्तानि । तत्र त्वेष निर्णयो यद्येव नित्योऽथापि कार्य उभयथापि लक्षणं प्रवर्त्यमिति ॥ कथं पुनरिदं भगवतः पाणिनेराचार्यस्य लक्षणं प्रवृत्तम् ।

सिद्धे शब्दार्थसंबन्धे

कर्म उपपद लावलेल्या धातूला कर्ता या अर्थी 'अण्' प्रत्यय लावावा. नंतर त्याला कांहीं विशिष्ट अपवाद सांगावा. उदाहरणार्थ 'आतोऽनुपसर्गे कः' (३।२।३) आकारान्त धातूंना उपसर्ग पूर्वी जोडला नसल्यास कर्ता या अर्थी 'क' प्रत्यय लावावा.

बरें, पण पदांचा अर्थ आकृति म्हणजे जाति असते, का द्रव्य म्हणजे व्यक्ति असते ?

दोन्ही—जाति व व्यक्ति—पदांचा अर्थ होऊं शकतात.

हें कशावरून समजावयाचें ?

दोन्ही प्रकारचीं आचार्य पाणिनींनीं सूत्रें लिहिलीं आहेत त्यावरून.—पदाचा अर्थ जाति असतो, अशा अभिप्रायानें आचार्यांनीं 'जात्याख्यायामेकस्मिन् बहुवचनमन्यतरस्याम्' (१।२।५८) सूत्र लिहिलें आहे. पदाचा अर्थ व्यक्ति असतो अशा अभिप्रायानें आचार्यांनीं "सरूपाणामेकशेष एकविभक्तौ" (१।२।६४) सूत्र लिहिलें आहे.[३०]

बरें; शब्द नित्य आहे का उत्पन्न होणारा असल्यामुळें अनित्य[३१] आहे ?

व्याडि आचार्यांनीं लिहिलेल्या "संग्रह[३२]" नांवाच्या ग्रंथांत शब्द नित्य असावा का अनित्य असावा या प्रश्नाचा प्रामुख्यानें विचार केला आहे. दोन्ही मतांवर दोष काय येतात तेंही तेथें सांगितलें आहे. दोन्ही मतें घेण्यांत उद्देश काय आहेत तेंही सांगितलें आहे तेथें निकाल हा दिला आहे की, 'शब्द नित्य असो अथवा अनित्य असो, दोन्ही तऱ्हांनीं शब्दशास्त्र लिहावयास[३३] पाहिजे.'

पण, भगवान् पाणिनि आचार्य यांनीं सांगितलेलें हें शब्दशास्त्र शब्दाच्या अर्थाविषयीं कोणता अभिप्राय मनांत धरून लिहिलें आहे ?[३४]

(वा०) शब्द, अर्थ आणि त्यांचा संबंध हे सिद्ध असतांना—

३०. तेव्हां एकंदरींत जातीनें युक्त व्यक्ति, अभिव्यक्तीनें युक्त जाति असें दोन्ही अर्थ वैयाकरणांना मान्य आहेत. प्रयोगामध्यें वक्त्याचें तात्पर्य काय आहे त्याकडे लक्ष देऊन जातीला प्राधान्य देणें किंवा व्यक्तीला प्राधान्य देणें हें ठरवावें.

३१. येथें नित्य किंवा अनित्य हा विचार करण्याचें कारण असें कीं, जर शब्द नित्य असेल तर व्याकरणशास्त्र करण्याचेंच कारण राहत नाहीं. अशाही अभिप्रायानें हा विचार चालू केला आहे.

३२. व्याडिनामक आचार्यांनीं संग्रह नांवाचें पुस्तक लिहिलें आहे, असें उद्योतामध्यें सांगितलें आहे. प्राचीन वैयाकरणतंत्रामध्यें ह्या ग्रंथाची गणना आहे.

३३. जरी शब्द नित्य असले व पाणिनी हा त्या शब्दांचा उत्पादक नसून केवळ स्मरण करणारा असाच असला, तरीदेखील व्याकरणशास्त्र अवश्य पाहिजे. कारण भ्रमानें लोक अपशब्द बोलूं लागतील, त्याची निवृत्ति होण्याकरतां व्याकरणशास्त्र अवश्य पाहिजे.

३४. शब्द नित्य असो अथवा अनित्य असो, व्याकरणशास्त्र केलें पाहिजे हें खरें; तरी पण पाणिनीनें हें जें व्याकरण केलें, तें शब्द नित्य आहे असें मनांत धरून केलें किंवा अनित्य आहे असें मनांत धरून केलें.

सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति । अथ सिद्धशब्दस्य कः पदार्थः । नित्यपर्यायवाची सिद्धशब्दः । कथं ज्ञायते । यत्कूटस्थेष्वविचालिषु भावेषु वर्तते । तद्यथा । सिद्धा द्यौः सिद्धा पृथिवी सिद्धमाकाशमिति । ननु च भोः कार्येष्वपि वर्तते । तद्यथा । सिद्ध ओदनः सिद्धः सूपः सिद्धा यवागूरिति । यावता कार्येष्वपि वर्तते तत्र कुत एतन्नित्यपर्यायवाचिनो ग्रहणं न पुनः कार्ये यः सिद्धशब्द इति । संग्रहे तावत्कार्यप्रतिद्वन्द्विभावान्मन्यामहे नित्यपर्यायवाचिनो ग्रहणमिति । इहापि तदेव अथवा सन्त्येकपदान्यप्यवधारणानि तद्यथाऽब्भक्षो वायुभक्ष इत्यप एव भक्षयति वायुमेव भक्षयतीति गम्यत एवमिहापि सिद्ध एव न साध्य इति ॥ अथवा पूर्वपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । अत्यन्तसिद्धः सिद्ध इति । तद्यथा । देवदत्तो दत्तः सत्यभामा भामेति ।अथवा व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षण-

---

पण सिद्ध शब्दाचा अर्थ काय ?

नित्य शब्दाला पर्यायशब्द म्हणून येथें 'सिद्ध' शब्द घातला आहे.[३५]

हें कशावरून समजतें ?

अशावरून की, सिद्ध शब्दाचा प्रयोग नाश न पावणाऱ्या व हालणाऱ्या वस्तूंच्याविषयीं केला जातो. उदा. आपण "सिद्धा द्यौः", "सिद्धा पृथिवी", "सिद्धमाकाशं" (स्वर्ग सिद्ध म्हणजे नित्य आहे, पृथिवी सिद्ध आहे, आकाश सिद्ध आहे) असें म्हणतों.

पण काय हो, कार्य म्हणजे उत्पाद्य वस्तूंविषयींही सिद्ध शब्दाचा प्रयोग दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, आपण म्हणतों "सिद्ध ओदनः" (भात शिजला), "सिद्धः सूपः" (वरण शिजलें), "सिद्धा यवागूः" (पेज शिजली). तेव्हां कार्य म्हणजे 'तयार झालेला' या अर्थी 'सिद्ध' शब्द जर योजतात तर 'नित्य' याच शब्दाचा पर्याय म्हणून येथें 'सिद्ध' शब्द घ्यावा असें काय म्हणून ? 'कार्य' म्हणजे 'तयार झालेला' या अर्थी सिद्ध शब्द कां घेऊं नये ?

संग्रह ग्रंथामध्यें शब्द नित्य आहे किंवा कार्य आहे असा हाच विचार चालू करून 'कार्य' या अर्थाशीं विरुद्ध अर्थ दाखविण्याच्या उद्देशानें सिद्ध शब्दाचा प्रयोग केला असल्यामुळें 'नित्य' या अर्थीच तेथें 'सिद्ध' शब्द आहे असें समजतें; तेव्हां येथेंही त्याप्रमाणेंच 'सिद्ध' शब्द हा 'नित्य' या अर्थीच घातला आहे असें ठरतें.

अथवा कांहीं ठिकाणीं 'एव' वगैरे दुसरा शब्द घातल्याशिवाय फक्त एकच शब्द घातला तरी निश्चयार्थाचें ज्ञान होतें. उदाहरणार्थ 'अब्भक्षः', 'वायुभक्षः' असें म्हटलें की 'फक्त पाण्याचेंच प्राशन करतो, दुसरें कांहीं खातपीत नाहीं,' 'फक्त वायुभक्षण करूनच राहतो; कांहीं खातपीत नाहीं' अशा अर्थाचा बोध होतो. याच रीतीनें प्रस्तुत ठिकाणीं 'सिद्ध' शब्दापासून 'जो नेहमीं सिद्धच आहे, साध्य नव्हे' या अर्थाचा बोध[३६] होईल.

अथवा 'सिद्ध' या शब्दांत पूर्वपदाचा लोप केला आहे असें समजावें. ज्याप्रमाणें देवदत्ताला 'दत्त' म्हणतात, किंवा 'सत्यभामा' याऐवजीं 'भामा' म्हणतात, त्याप्रमाणें येथेंही 'अत्यन्त सिद्ध'[३७] याऐवजीं सिद्ध शब्द घातला आहे.

अथवा, व्याकरणशास्त्रांत "अर्थ लावतेवेळीं हा अर्थ किंवा तो अर्थ असा संशय

---

३५. येथें सिद्ध या शब्दाचा नित्य असा अर्थ आहे.

३६. साध्य म्ह. उत्पन्न होणारे जे पदार्थ असतात त्यांचा प्रागभाव व प्रध्वंसाभाव होत असल्यामुळें ते पदार्थ नेहमीं सिद्धच आहेत, असें म्हणतां येत नाहीं.

३७. कायमचा सिद्ध म्हणजे नित्य.

मिति नित्यपर्यायवाचिनो ग्रहणमिति व्याख्यास्यामः ॥ किं पुनरनेन वर्ण्येन किं न महता कण्ठेन नित्यशब्द एवोपात्तो यस्मिन्नुपादीयमानेऽसंदेहः स्यात् । मङ्गलार्थम् । माङ्गलिक आचार्यो महतः शास्त्रौघस्य मङ्गलार्थं सिद्धशब्दमादितः प्रयुङ्क्ते मङ्गलादीनि हि शास्त्राणि प्रथन्ते वीरपुरुषकाणि च भवन्त्यायुष्मत्पुरुषकाणि चाध्येतारश्च सिद्धार्था यथा स्युरिति। अयं खल्वपि नित्यशब्दो नावश्यं कूटस्थेष्वविचालिषु भावेषु वर्तते । किं तर्हि । आभीक्ष्ण्येऽपि वर्तते । तद्यथा । नित्यप्रहसितो नित्यप्रजल्पित इति । यावताभीक्ष्ण्येऽपि वर्तते तत्राप्यनेनैवार्थः स्याद्व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति । पश्यति त्वाचार्यो मङ्गलार्थश्चैव सिद्धशब्द आदितः प्रयुक्तो भविष्यति शक्ष्यामि चैनं नित्यपर्यायवाचिनं वर्णयितुमिति । अतः सिद्धशब्द एवोपात्तो न नित्यशब्दः ॥

अथ कं पुनः पदार्थं मत्वैष विग्रहः क्रियते सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति । आकृतिमित्याह । कुत एतत् । आकृतिर्हि नित्या द्रव्यमनित्यम् ॥ अथ द्रव्ये पदार्थे

---

आला असतां शास्त्रकारांनीं केलेल्या विशिष्ट व्याख्यानावरून अर्थ ठरवावयाचा असतो, 'संशय आला' या सबबीवर शास्त्राचा त्याग करावयाचा नाहीं," असा नियम असल्यामुळें येथें 'सिद्ध' हा शब्द नित्य या अर्थाचा आहे असें व्याख्यान करूं.

बरें, पण इतकें विवरणरूप स्पष्टीकरणाची भानगड कशाला वार्तिककारांनीं केली ? सिद्ध शब्द न घालतां एकदम स्पष्टपणें 'नित्य' शब्द कां नाहीं घातला ? 'नित्य' शब्द घातला असतां कोणताही संशय राहिला नसता.

ही सगळी भानगड मंगलाकरितां. मंगल करण्याकरितां प्रवृत्त झालेले आचार्य वार्तिककार वार्तिकपाठरूपी मोठ्या शास्त्रप्रवाहाच्या सुरवातीला मंगल म्हणून सिद्ध शब्द घालतात. सुरवातीला मंगल करून लिहिलेले शास्त्रग्रंथ प्रसिद्धीस पावतात, त्यांचें श्रवण करणारे शिष्य शूर होतात, दीर्घायु होतात, थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे अध्ययन करणाऱ्या शिष्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

शिवाय वार्तिककारांनीं 'सिद्ध' शब्दाच्या ऐवजीं 'नित्य' शब्द घातला असता तरी काम भागलेंच असतें, असें नाहीं. कारण 'नित्य' शब्द जशाचे तसे राहणारे व ज्यांचें स्वरूप बदलत नाहीं अशा तऱ्हेचे जे पदार्थ असतात त्यांजविषयींच उपयोगांत येतो असें नाहीं; तर पुनः पुनः या अर्थीही नित्य शब्द वापरला जातो. उदा० 'नित्यप्रहसितः', 'नित्यप्रजल्पितः' (पुनः पुनः हंसणारा, पुनः पुनः बडबड कणारा). तेव्हां नित्य शब्दाचा 'पुनः पुनः' असाही अर्थ आहे. म्हणून नित्य शब्द उच्चारला, तरी "अर्थ लावते वेळीं संशय आला असतां विशिष्ट अर्थ शास्त्रकारांनीं केलेल्या व्याख्यानावरून घ्यावयाचा असतो. संशय आला म्हणून शास्त्र अनर्थक ठरवावयाचें नाहीं," हा नियम मनांत घेऊनच त्या नित्य शब्दाचा अर्थ ठरवावा लागेल. तेव्हां आचार्य विचार करतात— "मंगलाकरतांच सिद्ध शब्द आरंभीं घातला जाऊं द्या; त्याचा अर्थ नित्य आहे असें आपण व्याख्यानानें सांगूं शकूं." तेव्हां मंगलाकरितांच सिद्ध शब्द घातला आहे. नित्य शब्द घातला नाहीं.

बरें, कोणता पदाचा अर्थ (जाति का व्यक्ति) समजून 'शब्दार्थसंबन्धे' या समासाचा शब्द, अर्थ व संबंध हे नित्य असतांना असा विग्रह करावयाचा ?

आकृति म्हणजे जाति हा अर्थ समजून तसा विग्रह केला आहे.

हें कशावरून ?

आकृति नित्य असते; द्रव्य अनित्य असतें म्हणून.

बरें, पण द्रव्य म्हणजे व्यक्ति हा पदाचा

कथं विग्रहः कर्तव्यः । सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति । नित्यो ह्यर्थवतामर्थैरभिसंबन्धः ॥ अथवा द्रव्य एव पदार्थ एष विग्रहो न्याय्यः सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति । द्रव्यं हि नित्यमाकृतिरनित्या । कथं ज्ञायते । एवं हि दृश्यते लोके । मृत्कयाचिदाकृत्या युक्ता पिण्डो भवति । पिण्डाकृतिमुपमृद्य घटिकाः क्रियन्ते । घटिकाकृतिमुपमृद्य कुण्डिकाः क्रियन्ते । तथा सुवर्णं कयाचिदाकृत्या युक्तं पिण्डो भवति । पिण्डाकृतिमुपमृद्य रुचकाः क्रियन्ते । रुचकाकृतिमुपमृद्य कटकाः क्रियन्ते । कटकाकृतिमुपमृद्य स्वस्तिकाः क्रियन्ते । पुनरावृत्तः सुवर्णपिण्डः पुनरपरयाकृत्या युक्तः खदिराङ्गारसवर्णे कुण्डले भवतः । आकृतिरन्या चान्या च भवति द्रव्यं पुनस्तदेव । आकृत्युपमर्देन द्रव्यमेवावशिष्यते ॥ आकृतावपि पदार्थ एष विग्रहो न्याय्यः सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति । ननु चोक्तमाकृतिरनित्येति । नैत-

---

अर्थ समजला, तर विग्रह कसा करावयाचा ?

शब्द व त्याचा अर्थाशीं संबंध नित्य असतांना असा विग्रह करावयाचा.[३८] कारण शब्दांचा म्हणजे वाचकाचा अर्थाशीं संबंध (ज्याला शक्ति म्हणतात तो) नित्य असतो, म्हणून शब्द व अर्थसंबंध हा सिद्ध असतांना असा विग्रह करावयाचा. अथवा पदाचा अर्थ द्रव्य घेतला तरी वरील विग्रह 'शब्द, अर्थ व संबन्ध' हे सिद्ध असतांना हा योग्य होईल. कारण, वास्तविक पाहतां द्रव्यच नित्य असतें; आकृति[३९] अनित्य असते.

हें कशावरून कळतें की द्रव्य नित्य असतें व आकृति अनित्य असते ?

लोकांत नेहमीं दृष्टीस पडतें की, मातीलाच विशिष्ट आकृति दिली, की ती पिंड म्हणजे गोळा बनते; पिण्ड आकृति मोडून टाकून लहान लहान घागरी केल्या जातात; घागरींची आकृति मोडून कुंड्या केल्या जातात, त्या मोडून लहान मडकीं केलीं जातात.

तसेंच, सोनें घ्या. त्याला विशिष्ट आकृति दिली म्हणजे तो गोळा होतो; गोळा ही आकृति मोडून त्याचे रुचक[४०] करतात; रुचक मोडून कडीं करतात; कडीं मोडून स्वस्तिकें[४१] करतात; पुन्हा त्याच सुवर्णाचा गोळा बनवितां येतो आणि त्याला निराळा एक आकार देऊन त्याचीं खैराच्या निखाऱ्यासारखीं लाल लाल दोन कुंडलें करतां येतात. एकंदरींत काय, दोन्ही उदाहरणांवरून स्पष्ट होतें की, आकृति बदलते व निरनिराळी होते, पण द्रव्य (सुवर्ण किंवा मृत्तिका) प्रत्येक आकृतींत तेंच कायम राहतें. आकृति जरी मोडली तरी द्रव्य कायम राहतें. आतां पदाचा अर्थ जरी आकृति घेतला, तरी 'शब्द, अर्थ आणि संबंध' हे सिद्ध असतांना असा विग्रह करणें योग्य आहे.

पण आतांच नाहीं का वर सांगितलें की, आकृति अनित्य असते म्हणून ? आणि आकृति जर अनित्य घेतली तर सिद्ध म्हणजे नित्य असा जो शब्द, अर्थ (आकृतिरूप) व संबंध हा विग्रह बरोबर होणार नाहीं.

आकृति अनित्य असते हें म्हणणें बरोबर नाहीं. आकृति नित्य असते.

---

३८. आतां 'अर्थ म्ह. पदार्थ हा जर अनित्य आहे; तर अर्थ नसतांना त्याच्याशीं संबंध कसा अस्तित्वांत असूं शकेल' अशी शंका घेऊं नये; कारण, शब्दाचा अर्थाशीं संबंध म्ह. अर्थ दाखविण्याची योग्यता. तेव्हां अर्थ म्ह. पदार्थ जरी अस्तित्वांत नसला, तरी अर्थ दाखविण्याची योग्यता शब्दामध्यें कायमच आहे.

३९. येथें आकृति शब्दाचा आकार असा अर्थ आहे.

४०. घोड्याच्या गळ्यांत घालण्याचा एक विशेष प्रकारचा सोन्याचा अलंकार.

४१. स्वस्तिकासारख्या आकाराचा सोन्याचा अलंकार.

दृस्ति । नित्याकृतिः । कथम् । न क्वचिदुपरतेति कृत्वा सर्वत्रोपरता भवति द्रव्यान्तरस्था तूपलभ्यते ॥ अथवा नेदमेव नित्यलक्षणं ध्रुवं कूटस्थमविचाल्यनपायोपजनविकार्यनुत्पत्त्यवृद्ध्यव्यययोगि यत्तन्नित्यमिति । तदपि नित्यं यस्मिंस्तत्त्वं न विहन्यते । किं पुनस्तत्त्वम् । तद्भावस्तत्त्वम् । आकृतावपि तत्त्वं न विहन्यते ॥ अथवा किं न एतेनेदं नित्यमिदमनित्यमिति । यन्नित्यं तं पदार्थं मत्वैष विग्रहः क्रियते सिद्धे शब्देऽर्थे संबन्धे चेति ॥

कथं पुनर्ज्ञायते सिद्धः शब्दोऽर्थः संबन्धश्चेति । लोकतः । यल्लोकेऽर्थमर्थमुपादाय शब्दान्प्रयुञ्जते नैषां निर्वृत्तौ यत्नं कुर्वन्ति । ये पुनः कार्या भावा निर्वृत्तौ तावत्तेषां यत्नः क्रियते । तद्यथा । घटेन कार्यं करिष्यन्कुम्भकारकुलं गत्वाह कुरु घटं कार्यमनेन करिष्यामीति । न तद्वच्छब्दान्प्रयोक्ष्यमाणो वैयाकरणकुलं गत्वाह कुरु शब्दान्प्रयोक्ष्य इति । तावत्येवार्थ-

कशावरून ?

एखाद्या ठिकाणीं एक विशिष्ट आकृति स्पष्ट दिसेनाशी झाली, म्हणजे ती आकृति सर्वत्र दिसेनाशी झाली असें कधींही होत नाहीं; दुसऱ्या ठिकाणीं ती आकृति दृष्टीस[४२] पडते.

अथवा,—"जें ध्रुव असतें म्हणजे एका स्वरूपाचें कायम राहणारें,[४३] न बदलणारें, क्षय आणि परिणाम हे विकार ज्याला नाहींत असें, उत्पन्न न होणारें, न वाढणारें व नाश न पावणारें असतें तें नित्य" अशीच नित्य शब्दाची व्याख्या आहे, असें नाहीं. तर तेंही नित्य असतें की, ज्याचें तत्त्व नाहींसें होत नाहीं.

तत्त्व म्हणचे काय ?

एखाद्या वस्तूचा जो भाव म्हणजे स्वभाव किंवा स्वरूप तेंच त्या वस्तूचें तत्त्व. आकृति बदलली तरी त्यांतील तत्त्व नाहींसें होत नाहीं.

अथवा हें नित्य किंवा हें अनित्य ह्या विचाराचें येथें कांहीं प्रयोजन नाहीं. जें कांहीं नित्य आहे तो पदाचा अर्थ असें मानून "शब्द, अर्थ व संबंध" हे सर्व सिद्ध असतांना असा शब्दार्थसंबंध या समासाचा विग्रह केला आहे असें समजावें.

पण शब्द, अर्थ व संबंध हे तिन्ही सिद्ध म्हणजे नित्य आहेत हें कसें समजतें ?

लोकव्यवहारावरून समजतें. कारण, लोकांमध्यें जेव्हां जेव्हां निरनिराळे अर्थ मनांत घेऊन निरनिराळ्या शब्दांचा प्रयोग करतात तेव्हां तेव्हां ते शब्द तयार करण्याचा प्रयत्न कोणी करीत नाहींत. पण ज्या वस्तु कार्य असतात त्या वस्तु तयार करण्याकरितां यत्न केला जातो. उदाहरणार्थ, घटानें कांहीं अर्थ साधण्याची इच्छा असलेला मनुष्य कुंभारवाड्यांत जाऊन सांगतो— एक घडा बनवा, मी आपलें काम घड्यानें करीन. पण शब्दाचा प्रयोग करूं इच्छिणारा मनुष्य वैयाकरणांच्या कुळांत जाऊन कधीं म्हणत नाहीं की, करा शब्द तयार, मला प्रयोग करावयाचा आहे. वैयाकरणांच्या कुळांत न जातांच अर्थ मनांत धरून निरनिराळ्या अर्थीं शब्दांचे प्रयोग करतात.

४२. तेव्हां मातीची पिंडाकृति असतांना जरी तेथें घटाचा आकार दृष्टीस पडला नाहीं, तो घटाकार त्या मृत्तिकेच्या गोळ्यामध्यें अस्पष्ट असतोच. तोच आकार पुढें कुलालाच्या व्यापारानें व्यक्त होतो. इतर ठिकाणीं व्यक्त असलेला घटाकार पाहून तोच आकार या मृत्पिंडाला द्यावा अशी कल्पना कुलालाच्या मनांत येते, तेव्हां यावरून आकार हा कुठें अस्पष्ट व कुठें स्पष्ट असला तरी तो सर्वत्र एक व नित्य आहे असें सिद्ध होतें.

४३. एका स्वरूपानें कायम राहणारें म्हणजे जसा अळत्याजवळ ठेवलेला स्फटिक अळत्यासारखा तांबडा दिसतो, तसा दुसऱ्या पदार्थांच्या संसर्गानेंसुद्धां ज्याच्या स्वरूपामध्यें फरक झालेला कधींही भासत नाहीं असें, न बदलणारें म्हणजे जसा हिरव्या आंब्याचा परिणाम होऊन पिवळा होतो तसा परिणाम ज्याचा कधींही होत नाहीं असें.

मर्थमुपादाय शब्दान्प्रयुञ्जते ॥ यदि तर्हि लोक एषु प्रमाणं किं शास्त्रेण क्रियते ।

**लोकतोऽर्थप्रयुक्ते शब्दप्रयोगे शास्त्रेण धर्मनियमो**

लोकतोऽर्थप्रयुक्ते शब्दप्रयोगे शास्त्रेण धर्मनियमः क्रियते । किमिदं धर्मनियम इति । धर्माय नियमो धर्मनियमः । धर्मार्थो वा नियमो धर्मनियमः । धर्मप्रयोजनो वा नियमो धर्मनियमः ।

**यथा लौकिकवैदिकेषु ॥१॥**

प्रियतद्धिता दाक्षिणात्या यथा लोके वेदे चेति प्रयोक्तव्ये यथा लौकिकवैदिकेष्विति प्रयुञ्जते । अथवा युक्त एव तद्धितार्थः ।

यथा लौकिकेषु वैदिकेषु च कृतान्तेषु॥ लोके तावदभक्ष्यो ग्राम्यकुक्कुटोऽभक्ष्यो ग्राम्यशूकर इत्युच्यते । भक्ष्यं च नाम क्षुत्प्रतीघातार्थमुपादीयते । शक्यं चानेन श्वमांसादिभिरपि क्षुत्प्रतिहन्तुम् । तत्र नियमः क्रियत इदं भक्ष्यमिदमभक्ष्यमिति । तथा खेदात्स्त्रीषु प्रवृत्तिर्भवति समानश्च खेदविगमो गम्यायां चागम्यायां च । तत्र

---

बरें तर, अशा रीतीनें या शब्दांविषयीं लोकव्यवहारच जर प्रमाणभूत मानला तर शास्त्र काय करतें ?

(वा.)लोकव्यवहारावरून अर्थाच्या धोरणानें शब्द प्रयोग होत आहेच; त्यामध्यें शास्त्रानें केवळ धर्मनियम केला जातो.

धर्मनियम या शब्दाचा अर्थ काय समजावयाचा ?

(१) धर्माय नियमः म्हणजे धर्माकरितां[४४] नियम;(२)धर्मार्थ नियम म्हणजे धर्माकरितां[४५] जो नियम; अथवा (३) धर्मप्रयोजन नियम म्हणजे धर्मामुळें सांगितलेला[४६] असा नियम.

(वा.)ज्याप्रमाणें लोकांमध्यें व वेदामध्यें नियम केलेले दिसतात, त्याप्रमाणें येथेंही धर्मनियम केला आहे. दक्षिणेकडील लोकांना तद्धितप्रत्यय लावण्याची फार आवड असते. 'यथा लोके वेदे च' असें वार्तिक लिहिण्याऐवजीं 'यथा लौकिकवैदिकेषु' असें दाक्षिणात्य वार्तिककार लिहितात.

अथवा येथें तद्धित प्रत्यय केवळ आवड म्हणूनच लावला आहे, असें न मानतां तद्धित प्रत्यय येथें योग्य अर्थींच लावला आहे असेंही म्हणावें. 'यथा लौकिकवैदिकेषु' म्हणजे ज्याप्रमाणें लौकिक व वैदिक[४७] बाबतीमध्यें. लोकांमध्येंही 'गांवकोंबडा खाऊं नये', 'गांवडुक्कर खाऊं नये' असें प्रतिपादन केलें आहे. खाद्य हें भूक शमविण्याकरितां खावयाचें असतें; मनुष्याला कुतऱ्याचें मांस खाऊनही भूक शमवितां येणें शक्य आहे, गांवकोंबडा किंवा गांवडुक्करच खावयास पाहिजे असें नाहीं. तेव्हां येथें मुद्दाम 'गांवकोंबडा खाऊं नये' किंवा 'गांवडुक्कर खाऊं नये' असें जें प्रतिपादन केलें आहे, त्यामुळें नियम केला जातो : 'अमुक अमुक खाण्यास योग्य, व अमुक अमुक खाण्यास अयोग्य.' लोकांमधील आणखी उदाहरण घ्यावयाचें म्हणजे पुरुषाला स्त्रीकडे जाण्याची इच्छा होते ती कामवासनेमुळें (इंद्रियांच्या असंयमामुळें[४८]). गम्य स्त्रीकडे गेल्यानें काय, किंवा अगम्य स्त्रीकडे गेल्यानें काय कामवासनेची तृप्ति

---

४४. अपशब्दाचा प्रयोग केला असतां प्रत्यवाय उत्पन्न होईल तो न होण्याकरतां.

४५. धर्म म्ह. यज्ञ वगैरे कर्में. यज्ञामध्यें अपशब्दाचा प्रयोग केला असतां तें यज्ञकर्म बरोबर होणार नाहीं; तेव्हां तें बरोबर व्हावें याकरितां.

४६. एखाद्या साधु शब्दाचा प्रयोग केला, तरी तेवढ्यानें मोठें पुण्य लागतें. त्या पुण्यामुळें सांगितलेला म्ह. तें पुण्य प्राप्त व्हावें याकरतां सांगितलेला.

४७. लोकांतील बाबत या अर्थी लोक शब्दाच्या पुढें इक हा तद्धित प्रत्यय लागून हा लौकिक शब्द साधला आहे.

४८. असंयम म्ह. इंद्रियें ताब्यांत न ठेवणें.

नियमः क्रियत इयं गम्येयमगम्येति ॥ वेदे खल्वपि पयोव्रतो ब्राह्मणो यवागूव्रतो राजन्य आमिक्षाव्रतो वैश्य इत्युच्यते । व्रतं च नामाभ्यवहारार्थमुपादीयते । शक्यं चानेन शालिमांसादीन्यपि व्रतयितुम् । तत्र नियमः क्रियते । तथा बैल्वः खादिरो वा यूपः स्यादित्युच्यते । यूपश्च नाम पश्वनुबन्धार्थमुपादीयते । शक्यं चानेन किंचिदेव काष्ठमुच्छ्रित्यानुच्छ्रित्य वा पशुरनुबन्द्धुम् । तत्र नियमः क्रियते । तथाग्नौ कपालान्यधिश्रित्याभिमन्त्रयते भृगूणामङ्गिरसां तपसा तप्यध्वमिति । अन्तरेणापि मन्त्रमाग्निर्दहनकर्मा कपालानि संतापयति। तत्र नियमः क्रियत एवं क्रियमाणमभ्युदयकारि भवतीति ॥ एवमिहापि समानायामर्थगतौ शब्देन चापशब्देन च धर्मनियमः क्रियते शब्देनैवार्थोऽभिधेयो नापशब्देनेत्येवं क्रियमाणमभ्युदयकारि भवतीति ॥

अस्त्यप्रयुक्तः । सन्ति वै शब्दा अप्रयुक्ताः । तद्यथा । ऊष तेर चक्र पेचेति । किमतो यत्सन्त्यप्रयुक्ताः। प्रयोगाद्धि भवाञ्शब्दानां साधुत्वमध्यवस्यति य इदानीमप्रयुक्ता नामी साधवः स्युः ॥ इदं

---

सारखीच. तेव्हां त्या बाबतींत नियम केला जातो कीं, अमुक एक स्त्री योग्य व अमुक अयोग्य. वेदामध्येंसुद्धां नियम दृष्टीस पडतात. एके ठिकाणीं वेदांत सांगितलें आहे—ब्राह्मण हा दूध पिण्याचें व्रत पाळतो, क्षत्रिय हा पेज पिण्याचें व्रत पाळतो, व वैश्य हा आमिक्षा (कढत दुधांत मिसळलेलें दहीं) पिण्याचें व्रत पाळतो. कोणत्याही व्रताचा आहाराकरितांच स्वीकार करावयाचा असतो; साळी (तांदूळ) किवा मांस खाण्याचेंसुद्धां व्रत करणें शक्य असतें. तेव्हां ज्या अर्थी 'पयोव्रतो' या वाक्यानें दूध, पेज व आमिक्षा हे तीन पदार्थ व्रताकरितां सांगितले आहेत, त्या अर्थी 'पयोव्रतो' हें वाक्य व्रताचा नियमच सांगतें. तसेंच दुसऱ्या एका वेदांतील वाक्यांत सांगितलें आहे—'यज्ञस्तंभ हा बेलाचा अथवा खैराचा करावा.' त्या खांबाचें काम यज्ञांतील पशु बांधणें हें होय; तें काम कोणत्याही झाडाचें लांकूड घेऊन तें तासून किंवा न तासतां (जमिनींत पुरून अथवा न पुरतां) करतां येईल. तेव्हां बेलाचें किवा खैराचेंच लांकूड घेऊन त्याचाच खांब करावा असा नियम केला जातो. त्याचप्रमाणें यज्ञामध्यें अग्नीवर कपालें ठेवून मंत्र म्हणतात—'भृगू व अंगिरस यांच्या कडकपणाच्या तपश्चर्येमुळें तप्त व्हा.' वास्तविक पाहतां मंत्र म्हटल्याशिवायही तप्त करणें हा त्याचा स्वभाव असल्यामुळें अग्नि हा कपालें तापवतोच. तेव्हां मंत्र म्हणण्याची आवश्यकता नसतांनासुद्धां ज्या अर्थी मंत्र म्हणावा म्हणून सांगितलें आहे, त्या अर्थी मंत्र सांगणें नियमादाखल समजलें जातें की मंत्र म्हणून तापवलें तरच पुण्य उत्पन्न होतें. तेव्हां अशाच तऱ्हेनें प्रस्तुत स्थलीं शब्दानें काय किंवा अपशब्दानें काय अर्थ समजण्याचें काम सारखेंच होतें असें असून सुद्धां व्याकरणशास्त्रामध्यें मुद्दाम शुद्ध शब्द सांगितले आहेत, त्या अर्थी धर्मनियम केला जातो : "शुद्ध शब्दानेंच अर्थ सांगावा, अपशब्दानें कधींही सांगू नये;" हा नियम पाळण्यानें मनुष्याचा अभ्युदय होतो.

(वा.) पण कांहीं शब्दांचा प्रयोग दिसत नाहीं. उदा० 'ऊष' (तुम्ही राहिलां), तेर ( तुम्ही तरलां ), 'चक्र' (तुम्ही केलेंत), 'पेच' (तुम्हीं पाक केला) वगैरे.

मग त्यांत काय झालें शब्द असले आणि त्यांचा प्रयोग न दिसला तर ?

शब्द बरोबर किवा चूक हें प्रयोगावरून आपणच निश्चित करतां, तेव्हां शब्दांचा प्रयोग नसला तर ते शब्द (व्याकरणानें जरी बरोबर साधले गेले तरी) बरोबर ठरणार नाहींत.

विप्रतिषिद्धं यदुच्यते सन्ति वै शब्दा अप्रयुक्ता इति। यदि सन्ति नाप्रयुक्ताः। अथाप्रयुक्ता न सन्ति। सन्ति चाप्रयुक्ताश्चेति विप्रतिषिद्धम्। प्रयुञ्जान एव खलु भवानाह सन्ति शब्दा अप्रयुक्ता इति। कश्चेदानीमन्यो भवज्जातीयकः पुरुषः शब्दानां प्रयोगे साधुः स्यात्॥

नैतद्विप्रतिषिद्धम्। सन्तीति तावद्ब्रूमो यदेताञ्शास्त्रविदः शास्त्रेणानुविदधते। अप्रयुक्ता इति ब्रूमो यल्लोकेऽप्रयुक्ता इति। यदप्युच्यते कश्चेदानीमन्यो भवज्जातीयकः पुरुषः शब्दानां प्रयोगे साधुः स्यादिति न ब्रूमोऽस्माभिरप्रयुक्ता इति। किं तर्हि। लोकेऽप्रयुक्ता इति। ननु च भवानप्यभ्यन्तरो लोके। अभ्यन्तरोऽहं लोके न त्वहं लोकः॥

**अस्त्यप्रयुक्त इति चेन्नार्थे शब्दप्रयोगात्॥२॥**

अस्त्यप्रयुक्त इति चेत्तन्न। किं कारणम्। अर्थे शब्दप्रयोगात्। अर्थे शब्दाः प्रयुज्यन्ते। सन्ति चैषां शब्दानामर्थाः येष्वर्थेषु प्रयुज्यन्ते॥

**अप्रयोगः प्रयोगान्यत्वात्॥३॥**

अप्रयोगः खल्वेषां शब्दानां न्याय्यः। कुतः। प्रयोगान्यत्वात्। यदेतेषां शब्दानामर्थेऽन्यान्शब्दान्प्रयुञ्जते। तद्यथा। ऊषेत्यस्य शब्दस्यार्थे क्व यूयमुषिताः। तेरेत्यस्यार्थे किं यूयं तीर्णाः। चक्रेत्यस्यार्थे

---

पण अगोदर 'शब्द आहेत आणि त्यांचा प्रयोग नाहीं' हेंच बोलणें विसंगत होत नाहीं का? जर शब्द आहेत तर त्यांचा प्रयोग नाहीं असें व्हावयाचें नाहीं; जर प्रयोग नसेल तर ते शब्दच नसतील. 'शब्द आहेत आणि त्यांचा प्रयोग नाहीं' हें बोलणें विसंगत होतें. शिवाय स्वतः शब्द उच्चारूनच स्वतः तुम्ही म्हणतां की त्या शब्दाचा प्रयोग नाहीं. तेव्हां आपल्यासारखा स्वतः शब्द उच्चारून 'त्याचा प्रयोग नाहीं' असें म्हणणारा दुसरा कोणता शहाणा मनुष्य शब्दांचा प्रयोग करण्यांत निष्णात म्हणून समजला जाईल?

आम्ही बोलतों त्यांत कांहीं विसंगत नाहीं. आम्ही जे 'शब्द आहेत' असें म्हणतों त्याचें कारण हें की, शास्त्रकारांनीं केलेल्या शास्त्रावरून ते शब्द सिद्ध होत आहेत. तसेंच जें म्हणतों की, 'प्रयोग दिसत नाहीं' त्याचा 'लोकांमध्यें प्रयोग दिसत नाहीं' असा अर्थ आहे. आतां 'आपणांसारखा दुसरा कोणता शहाणा मनुष्य शब्दांचा प्रयोग करण्यांत निष्णात म्हणून समजला जाईल' असें जें म्हटलें आहे, त्यासंबंधानें आमचें म्हणणें की, 'त्या शब्दांचा आम्ही प्रयोग करीत नाहीं' असा अर्थ नाहीं; तर 'त्या शब्दांचा लोक प्रयोग करीत नाहींत' असा अर्थ.

पण लोकांमध्यें आपण येतांच ना?

आम्ही लोकांमध्यें आहोंच; नाहीं म्हणत नाहीं. पण आम्हीच लोक होत नाहीं.

(वा.) 'प्रयोग दिसत नाहीं' म्हणून त्या शब्दांना असाधुत्व येईल हें म्हणणें बरोबर नाहीं.

काय म्हणून?

अर्थाकरतां शब्दप्रयोग होतो म्हणून. अर्थबोध करण्याकरतां शब्दप्रयोग केला जातो.

(वा.) 'ऊष, तेर' इत्यादि शब्दांना अर्थ आहे, तो अर्थ सांगण्याकरितां त्या शब्दांचा प्रयोग होणें शक्य आहे, हें योग्य आहे; परंतु प्रयोग दिसत नाहीं. कारण या शब्दांच्याच अर्थी दुसऱ्या शब्दांचा प्रयोग लोक करतात. उदाहरणार्थ, 'ऊष' याच्या ऐवजीं लोक बहुशः "क्व यूयमुषिताः[४९]" असें बोलतात. त्याचप्रमाणें

---

४९. ऊष हें क्रियापद वस् धातूपासून साधलें आहे. येथें लिट् प्रत्यय करून त्याच्या स्थानीं मध्यम पुरुष बहुवचन थ प्रत्यय झालेला आहे. वस्धातूचा अर्थ राहणें ही क्रिया. ती क्रिया प्रत्यक्ष झालेली नाहीं, असा लिट् प्रत्ययापासून बोध होतो. हा क्रियेचा अप्रत्यक्षपणा दाखविण्याकरितां क्व असें पद येथें

किं यूयं कृतवन्तः। पेचेत्यस्यार्थे किं यूयं पक्वन्त इति ॥

## अप्रयुक्ते दीर्घसत्त्रवत् ॥४॥

यद्यप्यप्रयुक्ता अवश्यं दीर्घसत्त्रवल्लक्षणेनानुविधेयाः। तद्यथा। दीर्घसत्त्राणि वार्षशतिकानि वार्षसहस्रिकाणि च। न चाद्यत्वे कश्चिदपि व्यवहरति केवलमृषिसंप्रदायो धर्म इति कृत्वा याज्ञिकाः शास्त्रेणानुविदधते ॥

## सर्वे देशान्तरे ॥५॥

सर्वे खल्वप्येते शब्दा देशान्तरे प्रयुज्यन्ते। न चैत उपलभ्यन्ते। उपलब्धौ यत्नः क्रियताम्। महान्हि शब्दस्य प्रयोगविषयः। सप्तद्वीपा वसुमती त्रयो लोकाश्चत्वारो वेदाः साङ्गाः सरहस्या बहुधा विभिन्ना एकशतमध्वर्युशाखाः सहस्रवर्त्मा सामवेद एकविंशतिधा बाह्वृच्यं नवधाथर्वणो वेदो वाकोवाक्यमितिहासः पुराणं वैद्यकमित्येतावाञ् शब्दस्य प्रयोगविषयः। एतावन्तं शब्दस्य प्रयोगविषयमननुनिशम्य सन्त्यप्रयुक्ता इति वचनं केवलं साहसमात्रम्॥ एतस्मिन्नतिमहति शब्दस्य प्रयोगविषये ते ते शब्दास्तत्र तत्र नियतविषया दृश्यन्ते। तद्यथा। शवतिर्गतिकर्मा कम्बोजेष्वेव भाषितो भवति विकार एनमार्या भाषन्ते शव इति। हम्मतिः सुराष्ट्रेषु रंहतिः प्राच्यमध्येषु गमिमेव त्वार्याः प्रयुञ्जते। दातिर्लवनार्थे प्राच्येषु

---

'तेर' याच्या ऐवजीं 'क्व यूयं तीर्णाः', 'चक्र' याच्या ऐवजीं 'क्व यूयं कृतवन्तः', आणि 'पेच' याच्या ऐवजीं 'क्व यूयं पक्ववन्तः'.

(वा.) आणि जर या शब्दांचा प्रयोग न केला तरी दीर्घ काल चालणाऱ्या सत्त्राप्रमाणेंच हे शब्द सूत्रें देऊन साधले पाहिजेतच. उदाहरणार्थ, शंभर वर्षें किंवा हजार वर्षें चालणारीं सत्त्रें घ्या. जरी आज कोणी असे यज्ञ करीत नाहींत, तरी 'ऋषींनीं घालून दिलेला संप्रदाय हा धर्म होय' म्हणून याज्ञिक लोक शास्त्रांमध्यें या यज्ञांचें वर्णन करितात.

(वा.) शिवाय या सर्व शब्दांचा इतर देशांत प्रयोग केला जातो.

मग ते कां बरें आढळून येत नाहींत ?

शोधून काढण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. शब्दांच्या प्रयोगाचें क्षेत्र फार मोठें आहे. सात द्वीपें असलेली पृथ्वी, तीन लोक, अंगें व गूढार्थ सांगणारे ग्रंथ यांनीं युक्त व ज्यांच्या अनेक शाखा आहेत असे चार वेद, अध्वर्युवेद म्हणजे यजुर्वेद याच्या एकशें एक शाखा आहेत, सामवेदाच्या एक हजार शाखा आहेत, ऋग्वेदाचे एकवीस प्रकार आहेत, व अथर्ववेद नऊ शाखांचा आहे. शिवाय संभाषणात्मक ग्रंथ, इतिहास, पुराण, वैद्यक हे सर्व मिळून शब्दांच्या प्रयोगाचें क्षेत्र होतें. तेव्हां एवढें मोठें शब्दांच्या प्रयोगाचें क्षेत्र न पाहतां "शब्दांचा प्रयोग दिसत नाहीं" असें म्हणणें म्हणजे निव्वळ धाडसाचें काम आहे.

शिवाय एवढ्या अत्यंत मोठ्या शब्दांच्या प्रयोगक्षेत्रांत कांहीं कांहीं शब्द कांहीं कांहीं विशेष देशांतच उपयोगांत आलेले आढळतात. उदाहरणार्थ, जाणें या अर्थी शव् धातू कंबोज देशांतच प्रचारांत आहे; पण आर्य लोक जीवद्देहाचा विकार म्हणजे 'मृत देह' या अर्थीच 'शव' शब्दाचा प्रयोग[५०] करतात,(स्वतंत्र रीतीनें 'शव्' धातूचा प्रयोग कधींही करीत नाहींत.) तसेंच जाणें या अर्थी हम्म धातू सुराष्ट्र (काठेवाड) देशांत वापरतात; 'रंह' धातू पूर्वेकडे व मगध देशांत वापरतात; पण

---

घातलें आहे, तसाच मध्यम पुरुष बहुवचनापासून ज्या अर्थाचा बोध होतो तो अर्थ दाखविण्याकरितां यूयं असें पद घातलें आहे,

५०. शव्धातूचा अर्थ 'विकृत होणें' असा आहे. 'विकार पावलेला देह' असा शव शब्दाचा अर्थ आहे.

दात्रमुदीच्येषु ॥ ये चाप्येते भवतोऽप्रयुक्ता अभिमताः शब्दा एतेषामपि प्रयोगो दृश्यते । क्व । वेदे । यद्वो रेवती रेवत्यं तदूष । यन्मे नरः श्रुत्यं ब्रह्म चक्र । यत्रा नश्चक्रा जरसं तनूनामिति ॥

किं पुनः शब्दस्य ज्ञाने धर्म आहोस्वित्प्रयोगे । कश्चात्र विशेषः ।

**ज्ञाने धर्म इति चेत्तथाधर्मः ॥६॥**

ज्ञाने धर्म इति चेत्तथाधर्मः प्राप्नोति ।यो हि शब्दाञ्जानात्यपशब्दानप्यसौ जानाति। यथैव शब्दज्ञाने धर्म एवमपशब्दज्ञानेऽप्यधर्मः । अथवा भूयानधर्मः प्राप्नोति । भूयांसोऽपशब्दा अल्पीयांसः शब्दाः । एकैकस्य शब्दस्य बहवोऽपभ्रंशाः । तद्यथा । गौरित्यस्य गावी गोणी गोता गोपोतलिकेत्येवमादयोऽपभ्रंशाः ॥

**आचारे नियमः ॥७॥**

आचारे पुनर्ऋषिर्नियमं वेदयते । तेऽसुरा हेलयो हेलय इति कुर्वन्तः पराबभूवुरिति ॥ अस्तु तर्हि प्रयोगे ।

**प्रयोगे सर्वलोकस्य ॥८॥**

यदि प्रयोगे धर्मः सर्वो लोकोऽभ्युदयेन युज्येत । कश्चेदानीं भवतो मत्सरो यदि सर्वो लोकोऽभ्युदयेन युज्येत । न खलु कश्चिन्मत्सरः । प्रयत्नानर्थक्यं तु भवति । फलवता च नाम यत्नेन भवि-

---

आर्य लोक 'गम्' धातूचाच प्रयोग करितात. तसेंच कापणें या अर्थी 'दा' धातू (दाति शब्द) पूर्वेकडील देशांत वापरतात; 'दात्र' हा शब्दच फक्त उत्तरेकडे वापरतात.

शिवाय, जे शब्द तुम्ही प्रयोगांत 'आढळून येत नाहींत' म्हणून देतां त्यांचाही प्रयोग दिसतो.

तो कोठें दिसतो ?

वेदामध्यें, पुढील वैदिक वाक्यें पाहा—'सप्तास्ये रेवती रेवदूष', 'यद्वो रेवती रेवत्यं तदूष', 'यन्मे नरः श्रुत्यं ब्रह्म चक्र', 'यत्रा नश्चक्रा जरसं तनूनाम्' इत्यादि.

बरें, पण वरती धर्मनियम केला जातो असें म्हटलें आहे, तेथें शुद्ध शब्दांच्या नुसत्या ज्ञानानें धर्म होतो का नुसत्या प्रयोगानें धर्म होतो, काय समजावयाचें ?

दोहींमध्यें फरक काय ?

(वा.)शुद्ध शब्दांच्या ज्ञानानें धर्म होतो म्हणावें, तर ज्याला शुद्ध शब्दांचें ज्ञान आहे त्याला अपशब्दांचेंही ज्ञान असतेंच; तेव्हां अशा विद्वान् मनुष्याला ज्याप्रमाणें शुद्ध शब्दाच्या ज्ञानानें धर्म होतो, त्याप्रमाणेंच अपशब्दाच्या ज्ञानानें अधर्मही होऊं लागेल. अथवा अधर्मच पुष्कळ होऊं लागेल; कारण अपशब्द पुष्कळ आहेत; शुद्ध शब्द थोडे आहेत; एकेका शुद्ध शब्दाला अनेक अपभ्रष्ट शब्द असूं शकतात. उदाहरणार्थ 'गौः' या एका शुद्ध शब्दाचे गावी, गोणी, गोता, गोपोतलिका वगैरे अनेक अपभ्रंश होतात.

(वा.) शिवाय आचाराविषयीं म्हणजे प्रयोगाविषयींच ऋषि म्हणजे वेद धर्मासंबंधानें नियम घालून देतो; कारण वेदांतच म्हटलें आहे—ते राक्षस 'हेलयो हेलयः' असें म्हणाले व पराभूत झाले.[५१]

तर मग प्रयोगानेंच धर्म होतो असें होऊं द्या.

(वा.) जर शुद्ध शब्दांच्या प्रयोगानें धर्म होतो असें म्हणावें तर यच्चयावत् सर्व लोकांचा अभ्युदय होईल.

मग झाला तर झाला सर्व लोकांचा अभ्युदय ! तुम्हांला काय म्हणून त्याचा हेवा वाटावा ?

हेवा वाटण्याची गोष्ट नाहीं; पण व्याकरण.

---

५१. यज्ञामध्यें असुरांनीं शत्रु या स्वरूपानें देवांना संबोधिलें त्या वेळीं 'हेऽरयः' म्ह. हे शत्रूहो, असें म्हणावयाचें, त्याच्याऐवजीं 'हेऽलयः' असें ते म्हणाले. या अपशब्दाच्या उच्चारण्यानें त्यांना पातक लागून त्यांचा पुढें युद्धामध्यें पराभव झाला. तेव्हां यावरून शुद्ध व अशुद्ध शब्दांच्या नुसत्या ज्ञानानें धर्म व अधर्म होत नाहींत, तर त्यांच्या प्रयोगानें होतात असें सिद्ध होतें

तव्यम्। न च प्रयत्नः फलाद्व्यतिरेच्यः। ननु च ये कृतप्रयत्नास्ते साधीयः शब्दान्प्रयोक्ष्यन्ते त एव साधीयोऽभ्युदयेन योक्ष्यन्ते। व्यतिरेकोऽपि वै लक्ष्यते। दृश्यन्ते हि कृतप्रयत्नाश्चाप्रवीणा अकृतप्रयत्नाश्च प्रवीणाः। तत्र फलव्यतिरेकोऽपि स्यात्॥ एवं तर्हि नापि ज्ञान एव धर्मो नापि प्रयोग एव। किं तर्हि।

**शास्त्रपूर्वके प्रयोगेऽभ्युदयस्तत्तुल्यं वेदशब्देन ॥९॥**

शास्त्रपूर्वकं यः शब्दान्प्रयुङ्क्ते सोऽभ्युदयेन युज्यते। तत्तुल्यं वेदशब्देन। वेदशब्दा अप्येवमभिवदन्ति। योऽग्निष्टोमेन यजते य उ चैनमेवं वेद। योऽग्निं नाचिकेतं चिनुते य उ चैनमेवं वेद॥ अपर आह। तत्तुल्यं वेदशब्देनेति। यथा वेदशब्दा नियमपूर्वमधीताः फलवन्तो भवन्त्येवं यः शास्त्रपूर्वकं शब्दान्प्रयुङ्क्ते सोऽभ्युदयेन युज्यत इति॥ अथवा पुनरस्तु ज्ञान एव धर्म इति। ननु चोक्तं ज्ञाने धर्म इति चेत्तथाधर्म इति॥ नैष दोषः। शब्दप्रमाणका वयम्। यच्छब्द आह तदस्माकं प्रमाणम्। शब्दश्च शब्दज्ञाने धर्ममाह नापशब्दज्ञानेऽधर्मम्। यच्च

---

शास्त्र शिकण्याचा प्रयत्न म्हणजे खटाटोप व्यर्थ होईल. मोठा माणूस जेव्हां एखादा प्रयत्न करीत असतो, तेव्हां त्याचा प्रयत्न फलानें युक्त असतो. प्रयत्न आणि फल यांची ताटातूट असूं नये; कारण तसें असल्यास प्रयत्न व्यर्थ होतो.

बरें पण, जे यत्न करतील तेच उत्तम तऱ्हेनें शब्दांचा प्रयोग करतील आणि तेच उत्तम रीतीनें उदयशाली होतील.

असेंच कांहीं नाहीं; विरुद्ध प्रकारही दृष्टीस पडतो. प्रयत्न करूनही प्रयोग करण्यांत निष्णात न झालेले कांहीं लोक दृष्टीस पडतात व कांहीं लोक फारशा प्रयत्नाशिवायही शब्दप्रयोग करण्यांत निष्णात झालेले दृष्टीला पडतात. तेव्हां प्रयत्नाशिवायही फल मिळेल व प्रयत्नालाही फल मिळणार नाहीं, अशी प्रयत्न व फल यांची ताटातूटही होईल. असें होईल तर मग आम्ही म्हणूं कीं, केवळ शुद्ध शब्दांच्या ज्ञानानें धर्म लागत नाहीं, किंवा शुद्ध शब्दांच्या प्रयोगानेंही धर्मप्राप्ति होत नाहीं.

तर मग कशानें धर्म घडतो ?

(वा.) शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें समजूत येऊन जो प्रयोग करतो त्याचा उदय होतो. ही गोष्ट वेदशब्दासारखीच आहे. वेदशब्दसुद्धा असेंच प्रतिपादन करतात. उदाहरणार्थ, पुढील वाक्यें घ्या. "योग्निष्टोमेन यजते, य उ चैनमेवं वेद"; "योग्निं नाचिकेतं चिनुते य उ चैनमेवं वेद," येथें जो अग्निष्टोम यज्ञ करतो आणि अग्निष्टोम यज्ञ जाणतो त्याला पुण्य लागतें, तसेंच जो नाचिकेत अग्नीचें चयन करतो आणि जो हें जाणतो त्याला पुण्य लागतें असें म्हटलें आहे. त्यावरून वैदिक वाक्यें 'जाणणें म्हणजे वेदार्थज्ञानपूर्वक प्रयोग करणें हें पुण्यकारक आहे' असें सांगतात. येथेंही शास्त्रपूर्वक प्रयोगापासून अभ्युदय होतो असें म्हटल्यानें तीच गोष्ट सांगितली जाते.

दुसरा व्याख्याकार 'तत्तुल्यं वेदशब्देन' याची व्याख्या अशी करतोः—ज्याप्रमाणें वेदवाक्यांचें नियमपूर्वक अध्ययन करणाऱ्यांना वेदांत सांगितलेलें फल मिळतें त्याप्रमाणें जो मनुष्य व्याकरणशास्त्राचें अध्ययन करून जो शब्दप्रयोग करतो त्याचा अभ्युदय होतो.

अथवा, ज्ञानानेंच धर्म घडतो असें म्हटलें तरी हरकत नाहीं.

पण तसें म्हटल्यास वरतीच नाहीं का दोष दाखविला की, ज्ञानानें धर्म घडतो असें म्हटल्यास अधर्मही घडूं लागेल ?

हा दोष येत नाहीं. आम्ही शब्दाला प्रमाण मानतों. शब्द म्हणजे वेद जेवढें बोलतो तेवढें आम्हांला अक्षरशः प्रमाण. शब्द

पुनराशिष्टाप्रतिषिद्धं नैव तद्दोषाय भवति नाभ्युदयाय । तद्यथा । हिक्कितहसितकण्डूयितानि नैव दोषाय भवन्ति नाप्यभ्युदयाय ॥ अथवाभ्युपाय एवापशब्दज्ञानं शब्दज्ञाने । योऽपशब्दाञ्जानाति शब्दानप्यसौ जानाति । तदेवं ज्ञाने धर्म इति ब्रुवतोऽर्थादापन्नं भवत्यपशब्दज्ञानपूर्वके शब्दज्ञाने धर्म इति । अथवा कूपखानकवदेतद्भविष्यति । तद्यथा । कूपखानकः कूपं खनन्यद्यपि मृदा पांसुभिश्चावकीर्णो भवति सोऽप्सु संजातासु तत एव तं गुणमासादयति येन स च दोषो निर्हण्यते भूयसा चाभ्युदयेन योगो भवत्येवमिहापि यद्यप्यपशब्दज्ञानेऽधर्मस्तथापि यस्त्वसौ शब्दज्ञाने धर्मस्तेन स च दोषो निर्घानिष्यते भूयसा चाभ्युदयेन योगो भविष्यति ॥ यदप्युच्यत आचारे नियम इति याज्ञे कर्मणि स नियमः । एवं हि श्रूयते । यर्वाणस्तर्वाणो नामर्षयो बभूवुः प्रत्यक्षधर्माणः परापरज्ञा विदितवेदितव्या अधिगतयाथातथ्याः । ते तत्रभवन्तो यद्वा नस्तद्वा न इति प्रयोक्तव्ये

म्हणतो की 'शुद्धशब्दज्ञानानें धर्म घडतो!' 'अपशब्दज्ञानानें अधर्म घडतो' असें शब्द सांगते[52] नाहीं. तेव्हां जी गोष्ट करावी म्हणून सांगितली नाहीं किंवा करूं नये म्हणून तिचा निषेधहि केला नाहीं ती गोष्ट करण्याने पाप लागत नाहीं किंवा पुण्य लागत नाहीं. उदाहरणार्थ, उचकी देणें, हसणें, खाजवणें यांपासून पापहि नाहीं किंवा पुण्यहि नाहीं.

अथवा, असें म्हटलें तरी चालेल की, अपशब्दांचें ज्ञान हें शब्दांचें ज्ञान होण्याचाच एक उपाय आहे. कारण, जो 'हा अपशब्द आहे' असें जाणतो तो शुद्ध शब्दहि जाणतो. तेव्हां ज्ञानाने धर्म घडतो असें म्हटलें म्हणजे अर्थातच समजलें जातें की, अपशब्दज्ञानपूर्वक जें शब्दज्ञान त्यानें धर्म घडतो.[53]

अथवा विहीर खणणाऱ्याप्रमाणें हें होईल. उदाहरणार्थ, विहीर खणणारा विहीर खणीत असतांना जरी तेथील चिखलानें व धुळीनें व्याप्त होऊन जातो, तरी विहिरीला पाणी लागलें की त्याच पाण्यानें तो स्वच्छ होतो की त्यामुळें त्याचा दोष (मलिनपणा) पूर्ण नाहींसा होतो; एवढेंच नव्हे तर त्याचा पुष्कळ उत्कर्षहि होतो. प्रस्तुत गोष्टही याप्रमाणेंच आहे. जरी अपशब्दज्ञानानें अधर्म घडत असला, तरी शब्दज्ञानानें जो धर्म घडून येतो त्या धर्मामुळें अधर्मरूप दोष उत्पन्न न झाल्यासारखाच होतो; एवढेंच नव्हे, तर त्या माणसाचा पुष्कळ उत्कर्षहि होतो[54].

आतां 'आचाराविषयीं म्हणजे प्रयोगाविषयींच धर्माचा नियम आहे' असें जें म्हटलें आहे तो नियम फक्त यज्ञकृत्यांविषयींच आहे, इतर ठिकाणीं कांहीं तसा नियम नाहीं; असें ऐकिवांत आहे की, यर्वन् व तर्वन् या नांवाचे मोठे ऋषि होऊन गेले, ते अलौकिक प्रत्यक्षानें धर्माचें खरें स्वरूप जाणणारे होते, त्यांना परअपर विद्यांचें ज्ञान होतें, जाणण्यास योग्य गोष्टी त्यांना सर्व माहिती होत्या, व त्यांना आत्मसाक्षात्कार होता. हे ऋषि 'यद्वा नः, तद्वा नः' हे शब्द उच्चारण्याची वेळ आली असतां ते न उच्चारतां त्यांच्याऐवजीं

५२. 'हेऽलयो हेऽलयः' इत्यादि वाक्यामध्यें अपशब्दामुळें अधर्म घडला असें जें सांगितलें आहे त्याचें तात्पर्य 'अपशब्दाच्या प्रयोगानें अधर्म घडला' असें आहे, 'अपशब्दाच्या ज्ञानानें अधर्म घडला' असें नाहीं. (उ.)

५३. तेव्हां धर्मोत्पादक जें साधुशब्दज्ञान त्याचें धर्म उत्पन्न करण्याच्या कामीं 'अपशब्दज्ञान' हें एक विशेष प्रकारचें साधन असल्यामुळें त्या अपशब्द ज्ञानानें अधर्म घडतो असें म्हणतां येत नाहीं. (उ.)

५४. मागील ५१ टीप पाहा.

यर्वाणस्तर्वाण इति प्रयुञ्जते याज्ञे पुनः कर्माणि नापभाषन्ते । तैः पुनरसुरैर्याज्ञे कर्मण्यपभाषितं ततस्ते पराभूताः ॥

अथ व्याकरणमित्यस्य शब्दस्य कः पदार्थः । सूत्रम् ।

**सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोऽनुपपन्नः ॥१०**

सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थो नोपपद्यते व्याकरणस्य सूत्रमिति । किं हि तदन्यत्सूत्राद् व्याकरणं यस्यादः सूत्रं स्यात् ॥

**शब्दाप्रतिपत्तिः ॥११॥**

शब्दानां चाप्रतिपत्तिः प्राप्नोति व्याकरणाच्छब्दान्प्रतिपद्यामह इति । न हि सूत्रत एव शब्दान्प्रतिपद्यन्ते । किं तर्हि । व्याख्यानतश्च । ननु च तदेव सूत्रं विगृहीतं व्याख्यानं भवति । न केवलानि चर्चापदानि व्याख्यानं वृद्धिः आत् ऐजिति । किं तर्हि । उदाहरणं प्रत्युदाहरणं वाक्याध्याहार इत्येतत्समुदितं व्याख्यानं भवति ॥ एवं तर्हि शब्दः ।

**शब्दे ल्युडर्थः ॥१२॥**

यदि शब्दो व्याकरणं ल्युडर्थो नोपपद्यते । व्याक्रियतेऽनेनेति व्याकरणम् । न हि शब्देन किंचिद् व्याक्रियते । केन तर्हि । सूत्रेण ॥

---

व्यवहारांत 'यर्वाणस्तर्वाणः' असें उच्चारीत; पण यज्ञकर्मामध्यें मात्र कधींही भलता उच्चार करीत नसत. (त्यांचा उत्कर्षच झाला.) पण ते प्रसिद्ध असुर यज्ञकर्मांत अपभ्रष्ट शब्द बोलले आणि त्यांचा पराजय झाला.

आतां, 'व्याकरण' या शब्दाचा अर्थ काय ?

व्याकरण म्हणजे सूत्र (समूह).

(वा.) व्याकरण म्हणजे सूत्र म्हणावें तर 'व्याकरणाचें सूत्र' या ठिकाणीं षष्ठीप्रत्ययाचा अर्थ जमणार नाहीं. कारण (व्याकरण व सूत्र हीं एकच असल्यानें) सूत्रापेक्षां व्याकरण हें काय निराळें असणार की ज्या व्याकरणाचें सूत्र म्हणून सांगण्यांत कांहीं अर्थ राहील ?

(वा.) शिवाय, व्याकरण शब्दाचा सूत्र हा अर्थ समजल्यास त्यावरून शब्दांचें ज्ञान होतें असें म्हणतां येणार नाहीं. आपण नेहमीं म्हणतों की, व्याकरणावरून आम्ही शब्द समजतों. पण सूत्रावरून कांहीं कोणाला शब्दाचें ज्ञान होत नाहीं. तें सूत्रांच्या व्याख्यानावरून होतें. (सूत्र व व्याकरण एक म्हटल्यास व्याकरण म्हणजे सूत्रांचें स्पष्टीकरण असा अर्थ होणार नाहीं; व असा अर्थ झाला नाहीं तर व्याकरणावरून आम्ही शब्द समजतों हें वाक्य बरोबर ठरणार नाहीं.)

पण सूत्र हेंच त्याच्या पदांची फोड केली म्हणजे व्याख्यान होतें ना ?

असेंच नाहीं. सूत्राचीं निरनिराळीं केलेलीं पदें म्हणजे व्याख्यान नव्हे; उदाहरणार्थ— 'वृद्धिः आत् ऐच्' हें व्याख्यान नव्हे, तर उदाहरण देणें, प्रत्युदाहरण देणें, जे शब्द कमी पडले असतील ते पुरवणें ह्या सर्व गोष्टी मिळून व्याख्यान होतें.

बरें, तर मग व्याकरण म्हणजे शब्द असें समजूं.

(वा.) जर व्याकरण याचा अर्थ शब्द घेतला तर 'व्याकरण' शब्दांत जो 'ल्युट्' प्रत्यय आहे त्याचा अर्थ जुळत नाहीं. करण या अर्थीं येथें ल्युट् (अन) प्रत्यय केला आहे. त्यावरून 'ज्याच्या योगानें स्पष्टीकरण केलें जातें तें व्याकरण', असा व्याकरण शब्दाचा अर्थ होतो. शब्दानें कांहीं स्पष्टीकरण केलें जात नाहीं; उलट शब्दाचेंच स्पष्टीकरण केलें जातें.

मग कशानें स्पष्टीकरण केलें जातें ?

सूत्रानें.

(वा.) शिवाय जर व्याकरण शब्दाचा शब्द अर्थ घेतला तर व्याकरण शब्दाच्या पुढें 'भव' या अर्थीं तद्धितप्रत्यय लागणार नाहीं. उदा. 'वैयाकरण' शब्द घ्या. 'व्याकरणशास्त्रामध्यें असणारें' सूत्र या अर्थाचा या वैयाकरण

**भवे**

भवे च तद्धितो नोपपद्यते । व्याकरणे भवो योगो वैयाकरण इति । न हि शब्दे भवो योगः । क तर्हि । सूत्रे ॥

**प्रोक्तादयश्च तद्धिताः ॥१३॥**

प्रोक्तादयश्च तद्धिता नोपपद्यन्ते । पाणिनिना प्रोक्तं पाणिनीयम् । आपिशलम् । काशकृत्स्नमिति । न हि पाणिनिना शब्दाः प्रोक्ताः । किं तर्हि । सूत्रम् ॥ किमर्थमिदमुभयमुच्यते भवे प्रोक्तादयश्च तद्धिता इति । न । प्रोक्तादयश्च तद्धिता इत्येव भवेऽपि तद्धितश्चोदितः स्यात् । पुरस्तादिदमाचार्येण दृष्टं भवे तद्धित इति तत्पठितम् । तत उत्तरकालमिदं दृष्टं प्रोक्तादयश्च तद्धिता इति तदपि पठितम् । न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति ॥ अयं तावददोषो यदुच्यते शब्दे ल्युडर्थ इति । नावश्यं करणाधिकरणयोरेव ल्युड् विधीयते । किं तर्हि । अन्येष्वपि कारकेषु कृत्यल्युटो बहुलम् [३.३.११३] इति । तद्यथा । प्रस्कन्दनं प्रपतनमिति । अथवा शब्दैरपि शब्दा

शब्दांत 'तत्र भवः' (४-३-१०३)(या सूत्रानें तेथें असलेला) या अर्थी 'अ' प्रत्यय झाला आहे. योग म्हणजे सूत्र. तें शब्दामध्यें नसतें. तर मग तें कोठें असतें ? सूत्रपाठामध्यें.

(वा.)त्याचप्रमाणें जर 'व्याकरण' शब्दाचा 'शब्द' अर्थ घेतला तर 'प्रोक्त' (म्ह. सांगितलेले) इत्यादि अर्थांचे तद्धितप्रत्यय पाणिनि वगैरे शब्दांना लावतां येणार नाहींत. उदाहरणार्थ, 'पाणिनीय' शब्द घ्या, आपिशल शब्द घ्या, किंवा काशकृत्स्न घ्या. हे सर्व शब्द साधण्याची पंचाईत पडेल.[५५] कारण पाणिनीनें शब्द सांगितले नाहींत. तर मग काय सांगितलें ? सूत्रपाठ.

बरें, पण 'भवे' 'प्रोक्तादयश्च तद्धिताः' हीं दोन वार्तिकें येथें निरनिराळीं कां लिहिलीं ? तशीं लिहूं नयेत. 'प्रोक्तादयश्च तद्धिताः' एवढेंच एक लिहिलें म्हणजे 'भव' या अर्थी जो तद्धित प्रत्यय आहे त्याचाहि संग्रह होईल.

आचार्यांच्या प्रथम लक्षांत आलें की, भवार्थी तद्धित प्रत्ययाची उपपत्ति सांगतां यावयाची नाहीं. तें लक्षांत आल्याबरोबर त्यांनीं तेवढाच दोष सांगितला. नंतर मागाहून त्यांच्या लक्षांत आलें की, 'प्रोक्त' वगैरे अर्थी असलेलेही तद्धित प्रत्यय उपपन्न होणार नाहींत; तेव्हां तोही दोष त्यांनीं मागाहून सांगितला. आचार्यांनीं एकदा सूत्रें लिहिलीं कीं लिहिलीं; ते तीं परत घेत नाहींत.

आतां 'व्याकरण' शब्दाचा शब्द हा अर्थ घेतला असतां जे हे दोष दाखविले त्यांपैकीं 'व्याकरण' शब्दांत जो ल्युट् प्रत्यय आहे त्याचा अर्थ जुळत नाहीं, असा जो वरती दोष दिला आहे तो दोष येत नाहीं; कारण करण व अधिकरण एवढ्या दोनच अर्थी 'ल्युट्' प्रत्यय सांगितला आहे असें नाहीं. मग आणखी कोणत्या अर्थी सांगितला आहे ?

आणखी इतर जीं कारकें आहेत त्या अर्थी सुद्धां. पाणिनीनेंच (३-३-११३) सांगितलें आहे की, 'कृत्य' प्रत्यय आणि ल्युट् प्रत्यय हे बाहुल्येंकरून होतात, म्हणजे प्रयोगाला अनुसरून वाटेल त्या अर्थी होतात. उदा. 'प्रस्कन्दनम्,[५६] 'प्रपतनम्' शब्द बघा. अथवा, करण या अर्थी 'ल्युट्' प्रत्यय घेऊन सुद्धां शब्द या अर्थी 'व्याकरण' शब्द उप-

५५. पाणिनीय हा शब्द सूत्रपाठ या अर्थी साधेल; परंतु व्याकरण (म्ह. शब्दः) या अर्थी साधण्याची पंचाईत पडेल.

५६. स्कंद् धातूचा गति हा अर्थ आहे. ज्या ठिकाणापासून वस्तूला गति मिळते त्या ठिकाणाला प्रस्कंदन म्हणतात. तसेंच ज्यापासून लोकांचें पतन होतें, अशा पर्वताच्या कडा वगैरे प्रदेशाला प्रपतन म्हणतात. येथें ल्युट् (अन) हा प्रत्यय अपादान या अर्थी केला आहे.

व्याक्रियन्ते । तद्यथा । गौरित्युक्ते सर्वे संदेहा निवर्तन्ते नाश्वो न गर्दभ इति । अयं तर्हि दोषो भवे प्रोक्तादयश्च तद्धिता इति । एवं तर्हि

**लक्ष्यलक्षणे व्याकरणम् ॥१४॥**

लक्ष्यं च लक्षणं चैतत्समुदितं व्याकरणं भवति । किं पुनर्लक्ष्यं लक्षणं च । शब्दो लक्ष्यः सूत्रं लक्षणम् । एवमप्ययं समुदाये व्याकरणशब्दः प्रवृत्तोऽवयवे नोपपद्यते । सूत्राणि चाप्यधीयान इष्यते वैयाकरण इति । नैष दोषः । समुदायेषु हि शब्दाः प्रवृत्ता अवयवेष्वपि वर्तन्ते । तद्यथा । पूर्वे पञ्चालाः । उत्तरे पञ्चालाः । तैलं भुक्तम् । घृतं भुक्तम् । शुक्लो नीलः कृष्ण इति । एवमयं समुदाये व्याकरणशब्दः प्रवृत्तोऽवयवेऽपि वर्तते ॥ अथवा पुनरस्तु सूत्रम् । ननु चोक्तं सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोऽनुपपन्न इति । नैष दोषः । व्यपदेशिवद्भावेन भविष्यति॥ यदप्युच्यते शब्दाप्रतिपत्तिरिति न हि सूत्रत एव शब्दान्प्रतिपद्यन्ते किं तर्हि व्याख्यानतश्चेति ।

---

पन्न होईल. कारण, शब्दानेंही शब्दाचें व्याकरण केलें जातें. उदाहरणार्थ, 'गौः' (हा बैल आहे) असा शब्द उच्चारला, की सर्व संशय दूर होतात व 'हा घोडा नाहीं', 'हा गाढव नाहीं'[५७] असें कळतें.

पण 'भवे' व 'प्रोक्तादयश्च तद्धिताः' हे दोन दोष कायम राहतातच ना ?

तर मग—

(वा.) लक्ष्य व लक्षण दोन्ही मिळून व्याकरण होतें.

लक्ष्य म्हणजे काय व लक्षण म्हणजे काय ?

लक्ष्य म्हणजे शब्द; लक्षण म्हणजे सूत्र.

तरी पण पुढील दोष येतोच.— दोहींना मिळून लागणारा व्याकरण शब्द अवयवाला म्हणजे फक्त सूत्राला किंवा फक्त शब्दाला लागूं शकणार नाहीं. नुसतीं सूत्रें पढणाऱ्याही मनुष्याला वैयाकरण म्हणून म्हणणें इष्ट असतें.

हा दोष येत नाहीं. समुदायाला उद्देशून सांगितलेले शब्द अवयवालाही लागूं शकतात. उदाहरणार्थ, "पूर्वेचा पंचाल देश, उत्तरेचा पंचाल देश, तेल खाल्लें, तूप खाल्लें, पांढरा, निळा, काळा" वगैरे शब्द. (येथें पञ्चाल देशाच्या अवयवाला पंचाल म्हटलें आहे, तसेंच तेलकट पदार्थ खाल्ला असतां, तेल खाल्लें असें म्हणतात. तसें पांढरा, निळा, काळा रंग थोडक्या प्रमाणांत असणाऱ्या वस्तूला सुद्धां पांढरा वगैरे वगैरे म्हणतात.) याच रीतीनें सूत्र व शब्द दोहींना मिळून सांगितलेला व्याकरण शब्द सूत्रालाही लागू पडेल व शब्दालाही लागू पडेल.

अथवा व्याकरण शब्दाचा केवळ सूत्र असा अर्थही घेण्यास हरकत नाहीं.

पण वरती नाहीं का सांगितलें, व्याकरण शब्दाचा सूत्र अर्थ घेतल्यास "व्याकरणाचें सूत्र" या ठिकाणीं षष्ठीचा अर्थ जमत नाहीं ?

हा दोष येत नाहीं. व्यपदेशिवद्भावानें[५८] काम साधेल. (ज्याप्रमाणें राहूहून डोकें निराळें नसतांना राहूचें डोकें असें आपण म्हणतों. त्याप्रमाणें व्याकरण व सूत्र हीं निराळीं नसतांना 'व्याकरणाचें सूत्र' असें म्हणतां येईल.) तसेंच 'व्याकरण' शब्दाचा सूत्र हा अर्थ समजल्यास 'व्याकरणानें शब्दाचें ज्ञान होतें' असें म्हणतां येणार नाहीं; कारण सूत्रावरून शब्द कळत नाहींत, तर सूत्रांच्या व्याख्यानावरून म्हणजे स्पष्टीकरणावरून

---

५७. येथें गो या शब्दानें घोडा वगैरे शब्दांचें व्याकरण झालें म्हणजे गो शब्दानें निर्दिष्ट केलेल्या प्राण्यापासून घोडा वगैरे शब्दांची निवृत्ति झाली. व्याकरणानें विपरीताची व्यावृत्ति होते.

५८. सू. १।१।२१, वा. २ पाहणें.

परिहृतमेतत्तदेव सूत्रं विगृहीतं व्याख्यानं भवतीति । ननु चोक्तं न केवलानि चर्चापदानि व्याख्यानं वृद्धिः आत् ऐजिति । किं तर्हि । उदाहरणं प्रत्युदाहरणं वाक्याध्याहार इत्येतत्समुदितं व्याख्यानं भवतीति । अविजानत एतदेवं भवति । सूत्रत एव शब्दान्प्रतिपद्यन्ते । आतश्च सूत्रत एव । यो ह्युत्सूत्रं कथयेन्नादो गृह्येत ।

अथ किमर्थो वर्णानामुपदेशः ।

**वृत्तिसमवायार्थ उपदेशः ॥१५॥**

वृत्तिसमवायार्थो वर्णानामुपदेशः कर्तव्यः॥ किमिदं वृत्तिसमवायार्थ इति। वृत्तये समवायो वृत्तिसमवायः । वृत्त्यर्थो वा समवायो वृत्तिसमवायः । वृत्तिप्रयोजनो वा समवायो वृत्तिसमवायः । का पुनर्वृत्तिः ।शास्त्रप्रवृत्तिः। अथ कः समवायः। वर्णानामानुपूर्व्येण संनिवेशः । अथ क उपदेशः । उच्चारणम् । कुत एतत् । दिशिरुच्चारणक्रियः। उच्चार्य हि वर्णानाहोपदिष्टा इमे वर्णा इति ॥

---

शब्द कळतात' असें जें म्हटलें आहे त्याला उत्तर त्याच ठिकाणीं दिलेलें आहे.—'सूत्राची फोड केली की तेंच सूत्र व्याख्यान होतें.'

पण या म्हणण्यावर तेथेंच उत्तर दिलें ना ? की "सूत्राचीं निरनिराळीं केलेलीं पदें वृद्धिः, आत्, ऐच् हीं म्हणजे व्याख्यान नव्हे, तर उदाहरण देणें, प्रत्युदाहरण देणें, कमी पडलेले शब्द पुरवणें, या सर्व गोष्टी मिळून व्याख्यान होतें" म्हणून ?

अडाणी मनुष्याला उदाहरण वगैरे सांगावें लागतें. वास्तविक पाहतां सूत्रावरूनच शब्दांचें ज्ञान होतें. यास आणखी पुरावा द्यावयाचा म्हणजे, आपणांस असें आढळतें की, जो सूत्र सोडून भलतेंच बोलतो त्याचें बोलणें हें ग्राह्य होत नाहीं.[५९]

बरें, वर्णांचा उपदेश 'अइउण्', 'ऋऌक्' वगैरे कशाकरितां केला आहे ?

(वा.) वृत्तिसमवायाकरितां वर्णांचा उपदेश करावयास पाहिजे.

वृत्तिसमवायाकरितां म्हणजे काय ?

(१) वृत्तये समवायः म्हणजे [६०]वृत्तीकरितां समवाय; अथवा (२) वृत्त्यर्थ समवाय म्हणजे वृत्ति ज्याचें फल आहे असा [६१]समवाय; अथवा (३) वृत्तिप्रयोजन समवाय म्हणजे वृत्ति ज्याचें [६२]प्रयोजन होतें असा समवाय.

पण वृत्ति म्हणजे काय ?

वृत्ति म्हणजे शास्त्राची प्रवृत्ति.

बरें, समवाय म्हणजे काय ?

वर्ण क्रमानें ठेवणें हा समवाय.

बरें, उपदेश म्हणजे काय ?

उपदेश म्हणजे उच्चार.

उपदेश याचा अर्थ 'उच्चारणें' असा कसा होतो ?

दिश् धातूचा अर्थ उच्चारणें ही क्रिया असा आहे. कारण वर्णांचें उच्चारण करून आचार्य म्हणतात, 'या वर्णांचा उपदेश केला'.

---

५९. येथें मूळ भाष्यामध्यें 'नादो गृह्येत' यांत 'न अदः' अशीं पदें घेऊन हा अर्थ केला आहे. येथें 'नादः' असें एक पदही घेतां येतें. नाद म्ह. ध्वनि (आवाज). तात्पर्य असें की जो सूत्र सोडून भलतेंच बोलतो, त्याचें तें बोलणें म्ह. नुसता ध्वनि मात्र समजलें जातें म्ह. त्यांत अर्थ कांहींच नाहीं.

६०. थोडक्यांत शास्त्राचा प्रवृत्ति व्हावी याकरितां हा महेश्वरानें वर्णांचा क्रमानें उपदेश केला आहे.

६१. महेश्वरानें क्रमानें वर्णोच्चार केला आहे त्यामुळें इग्यणः० (१।१।४५) या सूत्रामध्यें इक् आणि यण् या दोन्ही शब्दांपासून चार चार वर्णांचें क्रमानें ज्ञान होतें म्हणून तेथें यथासंख्यम् (१।३।१०) या सूत्राची प्रवृत्ति होते. तेव्हां 'अदुहितराम्' या उदाहरणामध्यें लकाराच्या स्थानीं झालेल्या इकाराला संप्रसारण संज्ञा होत नाहीं म्हणून हलः (६।४।२) या सूत्रानें दीर्घ होत नाहीं.

६२. या वर्णसमुदायामध्यें आदिरन्त्येन (१।१।७१) या सूत्रानें अच्, अण् वगैरे प्रत्याहार सिद्ध होतात. त्यामुळें इको यणचि (६-१-७७) इत्यादि शास्त्रांची प्रवृत्ति होते.

अनुबन्धकरणार्थश्च ॥१६॥

अनुबन्धकरणार्थश्च वर्णानामुपदेशः कर्तव्यः । अनुबन्धानासङ्क्ष्यामीति । न ह्यनुपदिश्य वर्णाननुबन्धाः शक्या आसङ्क्तुम् । स एष वर्णानामुपदेशो वृत्तिसमवायार्थश्चानुबन्धकरणार्थश्च । वृत्तिसमवायश्चानुबन्धकरणं च प्रत्याहारार्थम् । प्रत्याहारो वृत्त्यर्थः ।

इष्टबुद्ध्यर्थश्च । इष्टबुद्ध्यर्थश्च वर्णानामुपदेशः । इष्टान्वर्णान्भोत्स्य इति । न ह्यनुपदिश्य वर्णानिष्टा वर्णाः शक्या विज्ञातुम् ।

इष्टबुद्ध्यर्थश्चेति चेदुदात्तानुदात्तस्वरितानुनासिकदीर्घप्लुतानामप्युपदेशः ॥१७॥

इष्टबुद्ध्यर्थश्चेति चेदुदात्तानुदात्तस्वरितानुनासिकदीर्घप्लुतानामप्युपदेशः कर्तव्यः । एवंगुणा अपि वर्णा इष्यन्ते ।

आकृत्युपदेशात्सिद्धम् । आकृत्युपदेशात्सिद्धमेतत् । अवर्णाकृतिरुपदिष्टा सर्वमवर्णकुलं ग्रहीष्यति । तथेवर्णाकृतिः । तथोवर्णाकृतिः ।

आकृत्युपदेशात्सिद्धमिति चेत्संवृतादीनां प्रतिषेधः ॥१८॥

आकृत्युपदेशात्सिद्धमिति चेत्संवृतादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । के पुनः संवृतादयः । संवृतः कलो ध्मात एणीकृतोऽम्बूकृतो-

---

(वा.) अनुबंध म्हणजे इत् संज्ञा झालेले वर्ण, म्हणजे कांहीं विशिष्ट कामाकरितां खुणेदाखल जोडलेले वर्ण; ते जोडण्याकरितां म्हणजे 'मी अनुबन्ध जोडीन' या उद्देशानें वर्णांचा उपदेश केला पाहिजे. कारण वर्णांचा उपदेश केल्याशिवाय अनुबन्ध जोडणें शक्य नाहीं. तेव्हां हा वर्णांचा उपदेश करण्याचे दोन हेतु आहेत. (१) शास्त्रप्रवृत्ति सुलभ व्हावी या उद्देशानें एका विशिष्ट क्रमानें वर्ण मांडतां यावे हा, व (२) अनुबंध जोडतां यावे हा. विशिष्ट क्रमानें वर्णांची मांडणी व अनुबंध जोडणें या दोन गोष्टी प्रत्याहार सांगण्यास उपयोगीं पडतात; व प्रत्याहार शास्त्रप्रतिपादनाच्या उपयोगीं पडतात.

शिवाय वैयाकरणांना पाहिजे तसेच वर्णांचें उच्चारण करतां यावें म्हणूनही वर्णांचा उपदेश केला आहे.[६३] 'उपदेशावरून इष्ट वर्ण आम्ही म्ह. वैयाकरण जाणूं शकूं,' या उद्देशानें आचार्य महेश्वरानें वर्णांचा उपदेश केला आहे. कारण वर्णांचा उपदेश केल्याशिवाय इष्ट वर्णांचें नीट उच्चारण होणें शक्य नाहीं.

(वा.) इष्ट वर्णांचा बोध व्हावा म्हणून उपदेश केला पाहिजे असें म्हणावें तर उदात्त, अनुदात्त, स्वरित, अनुनासिक, दीर्घ व प्लुत यांचाही उपदेश करावयास पाहिजे; कारण तेही इष्ट आहेत. तेव्हां नुसत्या ऱ्हस्व वर्णांचा उपदेश करून भागावयाचें नाहीं.

आकृतीच्या म्हणजे जातीच्या दृष्टीनें उपदेश केल्यामुळें काम भागतें. सर्व अ वर्णांची (ऱ्हस्व अ, दीर्घ अ, प्लुत अ, उदात्त अ वगैरे अ वर्णांची) जात म्हणून 'अ' वर्णाचा उपदेश केला की त्यानें सर्व प्रकारच्या अकारांचें बरोबर ज्ञान होतें. त्याचप्रमाणें सर्व इ वर्णांकरितां इ वर्णाचें उच्चारण व सर्व उ वर्णांकरितां उ वर्णाचें उच्चारण.

(वा.) जातिबोधक वर्णाचा उपदेश करण्यानें काम भागतें म्हणावें तर संवृत वगैरे दोषांनीं युक्त अशा वर्णांचा प्रतिषेध केला पाहिजे. संवृत, कल वगैरे दोषांनीं युक्त अशा वर्णांचा संग्रह होणें इष्ट नाहीं.

'संवृत वगैरे' म्हणजे कोणकोणते ?

[६४]संवृत, कल, ध्मात, एणीकृत, अम्बू-

---

६३. वर्णांचा उच्चार शुद्ध करतां यावा म्हणून.

६४. ज्या वर्णाचा उच्चार करतांना जीभ ज्या स्थानाकडे वळते, तें स्थान त्या वर्णाचें समजलें जातें. त्या स्थानाकडे वळून जर जीभ त्या स्थानापासून दूर

ऽर्धको ग्रस्तो निरस्तः प्रगीत उपगीतः क्ष्विण्णो रोमश इति ॥ अपर आह । ग्रस्तं निरस्तमविलम्बितं निर्हतमम्बूकृतं ध्मातमथो विकम्पितम् । संदष्टमेणीकृतमर्धकं द्रुतं विकीर्णमेताः स्वरदोषभावना इति ॥ अतोऽन्ये व्यञ्जनदोषाः । नैष दोषः । गर्गादिबिदादिपाठात्संवृतादीनां निवृत्तिर्भविष्यति । अस्त्यन्यद्गर्गादिबिदादिपाठे प्रयोजनम् । किम् । समुदायानां साधुत्वं यथा स्यादिति । एवं तर्ह्यष्टादशधा भिन्नां निवृत्तकलादिकामवर्णस्य प्रत्यापत्तिं वक्ष्यामि । सा तर्हि वक्तव्या ।

लिङ्गार्था तु प्रत्यापत्तिः ।

लिङ्गार्था सा तर्हि भविष्यति । तत्तर्हि

---

कृत, अर्धक, ग्रस्त, निरस्त, प्रगीत, उपगीत, क्ष्विण्ण आणि रोमश. किंवा 'संवृत' वगैरे शब्दानें दुसरे वैयाकरण म्हणतात त्याप्रमाणें खालीं दिलेल्या वाक्यांत वर्णिलेलेही वर्ण घ्यावे. 'ग्रस्त, निरस्त, अविलम्बित,[६५] निर्हत, अम्बूकृत, ध्मात, विकम्पित, संदष्ट, एणीकृत, अर्धक, द्रुत आणि विकीर्ण अशा प्रकारचे स्वरांचे उच्चारणाचे दोष आहेत. याशिवाय आणखी निराळे व्यंजनांचेही दोष आहेत.

दुष्ट वर्णांचा संग्रह होईल हा दोष येथें येत नाहीं. 'गर्ग' वगैरे, 'बिद' वगैरे शब्द उच्चारतांना आचार्य पाणिनींनीं शुद्ध म्हणजे दोषरहितच उच्चारण केलें असल्यामुळें 'संवृत' वगैरे वर्णदोषांनीं रहितच शब्द सर्वदा शास्त्रांत घेतले जातील.

पण गर्ग, बिद वगैरे शब्द उच्चारण्यांत दुसरा हेतु आहे ना ? तो कोणता ?

गर्ग, बिद वगैरे शब्दांपासून तयार होणारे जे समुदाय गार्ग्य, बैद वगैरे त्यांना साधुत्व सांगणें हा तेथें हेतु आहे.

बरें, असें म्हणाल तर अठरा[६६] भेदांनीं युक्त, कल वगैरे दोषांनीं रहित, असें 'अ', 'इ' वगैरे वर्णांचें जें मूळ स्वरूप तें आदेशरूपानें 'अकार इकार' वगैरे वर्णांना सांगण्यांत येईल.

बरें, तर सांगा तसे आदेश.

(तसे आदेश सांगितले तरी कांहीं गौरव होणार नाहीं; कारण) खुणेकरितां तसे आदेश सांगणें उपयोगीं पडेल. (म्हणजे त्या त्या ठिकाणीं ङ् (वृङ्, शीङ् वगैरे), ञ्, (कृञ्, भृञ्) वगैरे जीं चिन्हें पाणि-

---

राहिली तर त्या स्थितींत उच्चारलेल्या वर्णाला विवृत म्हणतात. आणि जर त्या स्थानाच्या जवळ जीभ आली तर त्या स्थितींत उच्चारलेल्या वर्णाला संवृत म्हणतात. ए, ओ वगैरे संध्यक्षरांचें संवृत उच्चारण करणें हा दोष आहे. ज्या वर्णांचें जें स्थान नव्हे, त्या स्थानाकडे जीभ वळवून त्या वर्णाचे उच्चार करणें हा कलदोष होय. या दोषानें युक्त अशा वर्णालाही कल म्हणतात. श्वासवायूची गति प्रमाणापेक्षां अधिक करून उच्चारलेला वर्ण ध्मात होय. हा वर्ण ऱ्हस्व असला तरी दीर्घासारखा भासतो. संशयित उच्चारलेला वर्ण एणीकृत होय. या ठिकाणीं अमुकच वर्ण उच्चारला आहे असा निश्चय होत नाहीं. तोंडांतल्या तोंडांत उच्चारलेला वर्ण अंबूकृत होय. श्वासवायूची गति प्रमाणापेक्षां कमी करून उच्चारलेला वर्ण अर्धक होय. हा वर्ण दीर्घ असला तरी ऱ्हस्वासारखा भासतो. घशांत उच्चारलेला वर्ण ग्रस्त होय. निष्ठुर उच्चारलेला वर्ण निरस्त होय. गाण्याच्या सुरांत उच्चारलेला वर्ण प्रगीत होय. प्रगीत वर्णाजवळचा प्रगीतासारखा भासणारा वर्ण उपगीत होय. कांपत कांपत उच्चारलेला वर्ण क्ष्विण्ण होय. गंभीर उच्चारलेला वर्ण रोमश होय.

६५. सावकाश रीतीनें न उच्चारलेला वर्ण अविलंबित होय. रूक्ष उच्चारलेला वर्ण निर्हत होय. लांब सुरांत उच्चारलेला वर्ण संदष्ट होय. शेजारच्या वर्णांत घुसडून उच्चारलेला वर्ण विकीर्ण होय. इतर शब्दांचा अर्थ मागील टीप ६४ मध्यें पाहावा.

६६. ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत या तिघांचे प्रत्येकीं उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे तीन प्रकार, मिळून नऊ प्रकार होतात. त्यांचे प्रत्येकीं सानुनासिक आणि निरनुनासिक असे दोन प्रकार मिळून अठरा प्रकार अ इ वगैरे वर्णांचे होतात. ऌ वर्णाचे मात्र बारा प्रकार होतात. कारण त्याला दीर्घ नाहीं. तसेंच संध्यक्षरांनाही ऱ्हस्व नाहीं, म्हणून त्यांचेही प्रत्येकीं बाराच प्रकार होतात.

वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्ह्यनेकमनुबन्धशतं नोच्चार्यमित्संज्ञा च न वक्तव्या लोपश्च न वक्तव्यः। यदनुबन्धैः क्रियते तत्कलादिभिः करिष्यते । सिध्यत्येवमपाणिनीयं तु भवति ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमाकृत्युपदेशासिद्धमिति चेत्संवृतादीनां प्रतिषेध इति । परिहृतमेतद्गर्गादिबिदादिपाठात्संवृतादीनां निवृत्तिर्भविष्यति । ननु चान्यद्गर्गादिबिदादिपाठे प्रयोजनमुक्तम् । किम् । समुदायानां साधुत्वं यथा स्यादिति । एवं तर्ह्युभयमनेन क्रियते पाठश्चैव विशेष्यते कलादयश्च निवर्त्यन्ते । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । द्विगता अपि हेतवो भवन्ति । तद्यथा । आम्राश्च सिक्ताः पितरश्च प्रीणिता इति । तथा वाक्यान्यपि द्विष्ठानि भवन्ति । श्वेतो धावति । अलम्बुसानां यातेति ॥ अथवेदं

नीनें केलीं आहेत तीं न करतां त्यांच्याऐवजीं कल वगैरे दोषांचा उपयोग करतां येईल). तेव्हां अष्टाध्यायी सूत्रपाठाचे शेवटीं तसे आदेश सांगावे. आतां जरी असे आदेश सांगण्यानें गौरव होईल, तरी एकंदरींत विचार करतां लाघवच आहे. तें असें की, निरनिराळे अनेक अनुबंध करण्याची आतां जरूर नाहीं. त्यांना इत्संज्ञा सांगण्यास नको, त्यांचा लोपही सांगण्यास नको; कारण जें अनुबन्धांनीं काम करावयाचें तें कल वगैरे दोष उच्चारूनच करण्यांत येईल.

अशा रीतीनें सर्व काम भागेल; तथापि पाणिनि आचार्यांच्या इच्छेविरुद्ध तें होईल.

तर मग, जसें सर्व आहे तसेंच राहूं दे; फिरवाफिरव किंवा अधिक कांहीं सांगावयास नको.

पण वरतीच नाहीं का दोष दाखविला की, 'जातिबोधक अकारादि वर्णांचा उपदेश करण्यानें काम भागतें म्हणावें, तर संवृत वगैरे दोषांचा प्रतिषेध केलाच पाहिजे ?'

त्याला उत्तरही दिलेंच आहे कीं, 'गर्ग, बिद वगैरे शब्द उच्चारतांना आचार्य पाणिनींनीं शुद्ध म्हणजे दोषरहितच उच्चारण केलें असल्यामुळें 'संवृत' वगैरे दुष्ट स्वरांनीं रहितच शब्द सर्वदा शास्त्रांत घेतले जातील.'

पण गर्ग, बिद वगैरे शब्द उच्चारण्यांत आचार्य पाणिनींचा दुसरा हेतु आहे असें म्हटलें आहे ना ?

कोणता तो दुसरा हेतु ?

गर्ग, बिद वगैरे शब्दांपासून तयार होणारे जे गार्ग्य, बैद वगैरे समुदाय त्यांना साधुत्व सांगणें हा.

बरें तर, असें असेल तर गर्ग, बिद वगैरे शुद्ध शब्द उच्चारण्यानें दोन्ही कामें भागतील. गार्ग्य, बैद वगैरे समुदायांना साधुत्व सांगणें हें एक काम, व शुद्ध शब्द उच्चारण्यानें दोषांना जागा न देणें हें दुसरें.

पण एका यत्नानें म्हणजे गर्ग, बिद वगैरे शब्दांतील वर्ण दोषरहित उच्चारण्यानें दोन्ही कामें कशीं साधतील ?

साधण्यास हरकत नाहीं असें म्हणतां येतें.

तें कसें ?

तें असें; एखादें काम करण्यास दोन प्रकारचाही हेतु असूं शकतो.

उदाहरणार्थ, आंब्याच्या झाडाखालीं बसून तर्पण केल्यानें आंब्यालाहि पाणी घातलें जातें व पितरांचीही तृप्ति होते. तसेंच कांहीं वाक्येंही उच्चारण्यांत त्यांतील शब्दांचे दोन अर्थ होत असल्यामुळें दोन हेतु दिसतात. —'श्वेतो धावति' म्हणण्यानें कुत्रा येथून धावतो हेंही सांगण्यांत[६७] येतें व त्याचा रंग

६७. 'कोण धावतो' आणि 'कसला धावतो' या दोन प्रश्नांचें 'श्वेतो धावति' असें एकच उत्तर दिलें आहे. 'श्वा, इतः' असा पदच्छेद केला म्हणजे पहिल्या प्रश्नाचें उत्तर मिळतें, आणि 'श्वेतः' असें एक पद घेतलें म्हणजे दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर मिळतें. श्वा म्ह. कुत्रा. इतः म्ह. येथून. श्वेतः म्ह. पांढऱ्या रंगाचा.

तावदयं प्रष्टव्यः । क्वेमे संवृतादयः श्रूयेरन्निति । आगमेषु । आगमाः शुद्धाः पठ्यन्ते । विकारेषु तर्हि । विकाराः शुद्धाः पठ्यन्ते । प्रत्ययेषु तर्हि । प्रत्ययाः शुद्धाः पठ्यन्ते । धातुषु तर्हि । धातवोऽपि शुद्धाः पठ्यन्ते । प्रातिपदिकेषु तर्हि । प्रातिपदिकान्यपि शुद्धानि पठ्यन्ते । यानि तर्ह्यग्रहणानि प्रातिपदिकानि । एतेषामपि स्वरवर्णानुपूर्वीज्ञानार्थ उपदेशः कर्तव्यः । शशः । षष इति मा भूत् । पलाशः । पलाष इति मा भूत् । मञ्चकः । मञ्जक इति मा भूत् ॥

आगमाश्च विकाराश्च प्रत्ययाः सह धातुभिः ।
उच्चार्यन्ते ततस्तेषु नेमे प्राप्ताः कलादयः ॥

**इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमाध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥**

---

पांढरा आहे हेंही पण सांगण्यांत येतें. 'अलम्बुसानां याता' म्हणण्यानें 'अलम्बुस नांवाच्या देशांत जाणारा' असें सांगण्यांत येतें व 'धान्याचें भूसही पुष्कळ मिळविणारा' असेंही सांगण्यांत[६८] येतें.

अथवा, वरील पृच्छा करणाऱ्याला विचारावें की, हे संवृत वगैरे दोषांनीं युक्त वर्ण कोठें ऐकू येतील ?

वेदामध्यें.

वेदाचा पाठ शुद्ध आहे.

आदेश, आगम इत्यादि विकारांमध्यें.

विकारांचेंही शुद्ध उच्चारण केलें आहे.

बरें तर, प्रत्ययांमध्यें.

प्रत्ययांचेंही उच्चारण शुद्धच केलें आहे.

तर मग धातूंमध्यें.

धातूचाही पाठ शुद्ध असाच केला आहे.

तर मग प्रातिपदिकांमध्यें.

प्रातिपदिकेंही शुद्धच पढलीं जातात.

बरें तर, जीं प्रातिपादिकें—डित्थ, डवित्थ, देवदत्त वगैरे—प्रतिपदोक्त कोणत्याही सूत्रांत किंवा गणांत उच्चारलीं नाहींत त्यांमध्यें.

त्यांचेही स्वर व वर्णक्रम यांचें ज्ञान होण्याकरितां कुठें तरी उच्चारण करणें अवश्य आहे. कारण तसें केल्यानें शश असें लोक उच्चारतील, 'षष' असें उच्चारणार नाहींत. त्याचप्रमाणें 'पलाश' शब्द 'पलाष' कोणी बोलणार नाहीं व 'मञ्चक'—चें 'मञ्जक' कोणी करणार नाहीं.

आगम, विकार, प्रत्यय व धातु यांचें साक्षात् शुद्ध उच्चारण केलें आहे; त्यामुळें त्या उच्चारणांत हे कल वगैरे वर्णदोष मुळींच येत नाहींत.

**याप्रमाणें श्रीभगवान् पतञ्जलि यांनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें पहिलें आह्निक संपलें.**

---

६८. 'कोणत्या देशांत जाणार आहे ?' आणि 'कोणता माणूस समर्थ आहे ?' या दोन प्रश्नांचें 'अलंबुसानां याता' असें एकच उत्तर दिलें आहे. अलंबुस म्ह. अलंबुस नांवाचे देश. अलं म्ह. समर्थ. बुस म्ह. भूस.

## अ इ उण् ॥१॥
## अकारस्य विवृतोपदेश आकारग्रहणार्थः ॥१॥

अकारस्य विवृतोपदेशः कर्तव्यः । किं प्रयोजनम् । आकारग्रहणार्थः । अकारः सवर्णग्रहणेनाकारमपि यथा गृह्णीयात् । किं च कारणं न गृह्णीयात् । विवारभेदात् । किमुच्यते विवारभेदादिति न पुनः कालःभेदादपि । यथैव ह्ययं विवारभिन्न एवं कालभिन्नोऽपि । सत्यमेतत् । वक्ष्यति

---

(वा.) येथें 'अ' या अक्षराचा विवृत उपदेश करावा; म्हणजे विवृत 'अ' येथें उच्चारावा.

त्याचा काय उद्देश ?

'आ' काराचेंही ग्रहण व्हावें हा. विवृत 'अ' कार येथें उच्चारला म्हणजे 'सवर्णांचें ग्रहण होतें' (१।१।९) या नियमानुसार हा 'अ'कार आपल्या स्वतःच्या 'अ' या उच्चारणानें 'आ'कारही घेऊं शकेल.

पण विवृत उच्चारण न केल्यास तो कां घेऊं शकणार नाहीं ?

'आ'काराचा विचार हा आभ्यंतर प्रयत्न निराळा होतो म्हणून. 'अ'काराचा प्रयत्न संवार होतो व आकाराचा विवार होतो.[२]

'आ' वर्णाचा आभ्यंतर प्रयत्न जो विवार तो 'अ' वर्णाच्या 'संवार' या आभ्यंतर प्रयत्नापेक्षां निराळा होतो एवढेंच कारण काय म्हणून दाखवितां? 'आ' उच्चारण्याला व 'अ' उच्चारण्याला कमीजास्ती वेळ लागतो;[३] तेव्हां 'काल निराळा होतो' असें कारण[४] कां नाहीं दाखवीत? असें पाहा की, ज्याप्रमाणें 'आ' हा विवारप्रयत्नामुळें 'अ'काराहून निराळा होतो, त्याप्रमाणें वेळेच्या फरकामुळेंही निराळा होतो.

तुम्ही म्हणतां तें खरें आहे. 'तुल्यास्य-

---

१. प्रत्येक वर्णाचा उच्चार करतांना मुखामध्यें जिभेचा व्यापार चालू असतो. म्हणजे जीभ ही आपल्या अग्र, उपाग्र, मध्य, आणि मूल या चार भागांपैकीं कोणत्याही भागानें कंठ, नासिका, मूर्धा, टाळु, दांत, ओठ वगैरे स्थानांपैकीं कोणत्या तरी स्थानाकडे वळते. ज्या वर्णाचा उच्चार करतांना ज्या स्थानाकडे जीभ वळते, तें स्थान त्या वर्णाचें समजलें जातें. त्या त्या स्थानाकडे जीभ वळतांना 'सर्वत्र सारख्या प्रमाणांत वळते' असा कांहीं नियम नाहीं. जरी एका स्थानाचेच अनेक वर्ण असले, तरी त्यांतील कांहीं वर्ण उच्चारतांना जीभ वळून त्या स्थानाला चिकटते. त्यामुळें त्या वर्णाचे स्पृष्ट प्रयत्न समजला जातो. कांहीं वर्ण उच्चारतांना जीभ वळून त्या स्थानाला किंचित् स्पर्श करते, त्यामुळें त्या वर्णाचा ईषत्स्पृष्ट प्रयत्न समजला जातो. कांहीं वर्ण उच्चारतांना जीभ वळून त्या स्थानाच्या जवळ जाते, स्पर्श करीत नाहीं. त्यामुळें त्या वर्णांचा संवृत प्रयत्न समजला जातो व त्या प्रयत्नामुळें त्या वर्णांनाही संवृत म्हणण्याचा परिपाठ आहे. तसेंच कांहीं वर्ण उच्चारतांना जीभ फक्त त्या स्थानाकडे वळते. जवळ न जातां दूरच असते, त्यामुळें त्या वर्णाचा विवृत प्रयत्न समजला जातो, व त्या प्रयत्नामुळें त्या वर्णांनाही विवृत म्हणण्याचा परिपाठ आहे. दीर्घ आकार उच्चारतांना जिभेचा मूळ भाग कंठस्थानाकडे फक्त वळतो, जवळ जात नाहीं, म्हणून त्याचा विवृत प्रयत्न समजला जातो. ऱ्हस्व अकार उच्चारतांना मात्र तोच जिभेचा मूळ भाग कंठस्थानाच्या जवळ जातो, म्हणून त्याचा संवृत प्रयत्न समजला जातो. वेदामध्यें, लोकामध्यें यच्चयावत् सर्व ठिकाणीं संवृत अशाच ऱ्हस्व अकाराचें साहजिक उच्चारण होतें तेंच शुद्ध समजलें जातें. आतां दीर्घ आकाराप्रमाणें ऱ्हस्व आकाराचें उच्चारणही जिभेचा मूळ भाग कंठस्थानाच्या जवळ न नेतां करतां येईल व तसा उच्चारलेला ऱ्हस्व अकार विवृत ऱ्हस्व समजला जाईल; परंतु तें प्रयत्नसाध्य आहे. तशा विवृत ऱ्हस्व अकाराचा येथें उपदेश करावा. नाहीं तर ऱ्हस्व अ संवृत आणि दीर्घ आ विवृत असे प्रयत्न निराळे होत असल्यामुळें ते परस्परसवर्ण होणार नाहींत. सवर्णसंज्ञा सांगणारें सूत्र (१।१।९) पाहावें.

२. यामुळें ते एकमेकांचे सवर्ण समजले नाहींत.

३. ऱ्हस्व वर्णाचें उच्चारण करण्याला जेवढा वेळ लागतो, त्यापेक्षां दीर्घ वर्णाचें उच्चारण करण्याला दुप्पट वेळ लागतो.

४. अ आणि आ हे एकमेकांचे सवर्ण न मानण्याचें कारण.

तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम् [१-१.९] इत्यत्रास्यग्रहणस्य प्रयोजनमास्ये येषां तुल्यो देशः प्रयत्नश्च ते सवर्णसंज्ञका भवन्तीति। बाह्यश्च पुनरास्यात्कालः। तेन स्यादेव कालन्नभिन्नस्य ग्रहणं न पुनर्विवारभिन्नस्य ॥ किं पुनरिदं विवृतस्योपदिश्यमानस्य प्रयोजनमन्वाख्यायत आहोस्वित्संवृतस्योपदिश्यमानस्य विवृतोपदेशश्चोद्यते । विवृतस्योपदिश्यमानस्य प्रयोजनमन्वाख्यायते । कथं ज्ञायते । यदयम् अ अ [८.४.६८] इत्यकारस्य विवृतस्य संवृतताप्रत्यापत्तिं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । अतिखट्वः अतिमाल इत्यत्रान्तर्यतो विवृतस्य

प्रयत्नं सवर्णम्' (१।१।९) या ठिकाणीं 'आस्य' शब्द घालण्याचा उद्देश म्हणून वार्तिककार सांगणार आहेत की—या सूत्रांत आस्य शब्द घालण्याचा उद्देश 'आस्यामध्यें म्हणजे मुखामध्यें ज्यांचा देश व प्रयत्न एक आहेत ते परस्पर सवर्ण होतात असा अर्थ करावयाचा' असा आहे. काल हा आस्याच्या बाहेरचा आहे. तेव्हां काल जरी दोघांचा निराळा असला, तरी आस्यामधील देश व प्रयत्न एक असल्यामुळें ज्याचा काल निराळा आहे तो सवर्ण समजून घेतला जाईल; पण विवार हा आस्यांतीलच प्रयत्न असल्यामुळें तो निराळा असल्यास सवर्ण समजला जाणार नाहीं आणि तो घेतला जाणार नाहीं.

बरें, पण वरील वार्तिकांत काय विधान केलें म्हणून समजावयाचें ? विवृत 'अ'काराचा 'अइउण्' या सूत्रांत जो उपदेश केला आहे त्याचें प्रस्तुत वार्तिकानें प्रयोजन सांगितलें आहे; ('अ'काराचा विवृत उपदेश केला आहे;'आ'काराचें ग्रहण व्हावें म्हणून हा वार्तिकाचा अर्थ); का अइउण् या सूत्रांत नेहमींचा जो संवृत 'अ'कार त्याचेंच तेथें उच्चारण केलें आहे असें गृहीत धरून त्याचेंच त्या सूत्रांत विवृत उच्चारण करावें असें सांगितलें आहे? ('अ'काराचा येथें विवृत उपदेश करावा, 'अ'काराचें ग्रहण व्हावें म्हणून असा वार्तिकाचा अर्थ.)

विवृत 'अ'काराचा उपदेश केला आहे, त्याचा 'अ'काराचें ग्रहण व्हावें याकरितां, असा उपयोग सांगितला आहे (विवृताचा उपदेश करावा असें सांगितलें नाहीं).

असें कशावरून समजतें ?

ज्या अर्थी 'अ अ इति' (८।४।६८) या सूत्रांत विवृत अकाराला (शास्त्रांतील सर्व कार्यें होऊन गेल्यावर) संवृत होतो म्हणून आचार्य पाणिनि सांगतात त्या अर्थी 'विवृत' 'अ'काराचाच मूळ उपदेश केला आहे असें समजतें.

विवृत 'अ'काराला संवृत 'अ'कार होतो हें सूत्र वर लिहिल्याप्रमाणें ज्ञापक होत नाहीं. कारण हें सूत्र सांगणें व्यर्थ होत नाहीं; त्याचा उपयोग आहे.

तो कोणता ?

५. वर्णांचें उच्चारण होतांना त्या वर्णाच्या स्थानाकडे जीभ वळते व त्याकरितां कांहीं तरी प्रयत्न होत असतोच. त्यांत ज्या प्रयत्नानें जीभ वळली तरी दूर राहते, त्या प्रयत्नाला विवृत किंवा विवार म्हणतात; आणि ज्या प्रयत्नानें जीभ त्या स्थानाच्या जवळ जाते त्या प्रयत्नाला संवृत किंवा संवार म्हणतात. तेव्हां अर्थातच हा प्रयत्न मुखामध्येंच होणारा आहे हें सिद्ध होतें.

६. मूळ वार्तिकांत 'अकारस्य विवृतोपदेशः' या शब्दापुढें 'कर्तव्यः' असा शब्द नाहीं. त्यामुळें हा संशय उत्पन्न होतो. आतां ऱ्हस्व अकाराचा विवार हा दोष समजला जातो. वेदामध्यें व लोकामध्यें सर्व ठिकाणीं ऱ्हस्व अकार निर्दुष्ट म्हणजे संवृत (संवार प्रयत्नानें उच्चारलेला) असाच आढळतो. तेव्हां महेश्वरांनींही निर्दुष्टच उच्चारला असेल असें वाटतें. कदाचित् असेंही वाटतें की, विवृत अकार दुष्ट जरी आहे, तरी त्यानें दीर्घ अकाराचें ग्रहण व्हावें म्हणून तोच उच्चारला असेल.

७. महेश्वरानें मूळ उपदेश करतांनाच जर संवृत अकार उच्चारला असता, तर विवृत अकार हा अस्तित्वांतच नसल्यामुळें त्याला पाणिनीनें संवृत अकार आदेश म्हणून सांगितला नसता.

विवृतः प्राप्नोति संवृतः स्यादित्येवमर्था प्रत्यापत्तिः। नैतदस्ति। नैव लोके न च वेदेऽकारो विवृतोऽस्ति। कस्तर्हि। संवृतः। योऽस्ति स भविष्यति। तदेतत्प्रत्यापत्तिवचनं ज्ञापकमेव भविष्यति विवृतस्योपदिश्यमानस्य प्रयोजनमन्वाख्यायत इति॥ कः पुनरत्र विशेषो विवृतस्योपदिश्यमानस्य प्रयोजनमन्वाख्यायेत संवृतस्योपदिश्यमानस्य वा विवृतोपदेशश्चोद्येतेति। न खलु कश्चिद्विशेषः। आहोपुरुषिकामात्रं तु भवानाह संवृतस्योपदिश्यमानस्य विवृतोपदेशश्चोद्यते इति। वयं तु ब्रूमो विवृतस्योपदिश्यमानस्य प्रयोजनमन्वाख्यायत इति॥

**तस्य विवृतोपदेशादन्यत्रापि विवृतोपदेशः सवर्णग्रहणार्थः ॥२॥**

तस्यैतस्याक्षरसमाम्नायिकस्य विवृतोपदेशादन्यत्रापि विवृतोपदेशः कर्तव्यः। कान्यत्र। धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातस्थस्य। किं प्रयोजनम्। सवर्णग्रहणार्थः।

---

'अतिखट्वः', 'अतिमालः' या उदाहरणांत खट्वा व माला यांतील विवृत 'आ'-कार त्याला जवळचा म्हणून विवृतच 'अ'-कार होईल[८] त्याला संवृत व्हावा म्हणून 'अ अ इति' या सूत्राची जरूर आहे.

असें म्हणणें शक्य नाहीं. वेदामध्यें किंवा लोकामध्यें कोठेंहि सिद्ध प्रयोगांत 'अ'कार विवृत आढळत नाहीं.

मग 'अ'कार कशा प्रकारचा आढळतो?

'संवृत' आढळतो. तेव्हां अर्थातच जेथें जेथें 'अ' आदेश होईल तेथें तेथें तो संवृतच होईल[९]; विवृताचा संवृत होतो असें म्हणावयास नको. तेव्हां, ज्या अर्थी 'संवृत होतो' असें म्हटलें आहे, त्या अर्थी त्या म्हणण्यावरून असें कळून येईल की, विवृत 'अ'काराचाच 'अइउण्'या सूत्रांत उच्चार केला आहे व त्याचेंच प्रस्तुत वार्तिकांत प्रयोजन सांगितलें आहे.

'अइउण्' सूत्रांत विवृत अकाराचा उपदेश केला आहे व त्याचें प्रयोजन 'आ'काराचाही संग्रह व्हावा हें आहे असें म्हटलें काय किंवा 'अइउण्' सूत्रानें संवृत अकार उच्चारला आहे तो विवृत उच्चारावा असें म्हटलें काय, दोन्हीमध्यें फरक काय?

वास्तविक पाहतां विचार करण्यासारखा यांत कांहींच फरक दिसत नाहीं. संवृत उच्चारला आहे तो विवृत उच्चारावा असें तुमचें बोलणें तें निव्वळ अभिमानाचें होय. आम्ही तर वार्तिककारांचा अभिप्राय असाच समजतों की, विवृत अकाराचाच उपदेश केला आहे ह्याचें प्रयोजन 'आ'काराचाही संग्रह व्हावा हें सांगितलें आहे.[१०]

(वा.) तो हा जो 'अइउण्' या सूत्रामध्यें विवृत उच्चारलेला अवर्ण, त्याच्याशिवाय इतर ठिकाणच्या 'अ'वर्णाचा जो पाणिनीनें उपदेश केला आहे तोही विवृत असाच करावा.

इतर ठिकाणच्या म्हणजे कोठल्या?

धातू, प्रतिपादिकें, प्रत्यय व निपात यांमधील.

---

८. खट्वा व माला या शब्दांना येथें 'गोस्त्रियो०' (१।२।४८) या सूत्रानें ऱ्हस्व झाला आहे. विवृत अकाराचा जरी उपदेश नाहीं तरी ऱ्हस्व होतांना 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें विवृत ऱ्हस्व अकार आदेश होईल असा अभिप्राय आहे.

९. कारण जो वर्ण जशा प्रकारचा अस्तित्वांतच नाहीं, तो 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनेंही होऊं शकत नाहीं. शिवाय विवृत अकाराला ऱ्हस्व ही संज्ञादेखील या वेळीं होणार नाहीं. कारण 'अइउण्' येथें संवृत अकार उच्चारला असल्यामुळें व त्यानें विवृत अकाराचें ग्रहण न झाल्यामुळें विवृत अकाराला अच् असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां अर्थातच त्याला ऊकालोच्० (१।२।२७) या सूत्रानें ऱ्हस्व संज्ञा होणार नाहीं.

१०. 'वार्तिककारांनीं महेश्वराची चूक दुरुस्त केली' अशी कल्पना करण्यापेक्षां 'महेश्वरानें उच्चारलेल्या विवृत अकाराचा वार्तिककारांनीं उपयोग दाखविला' अशी कल्पना करणें हेंच बरें दिसतें.

**आक्षरसमाम्नायिकेनास्य ग्रहणं यथा स्यात्। किं च कारणं न स्यात्। विवारभेदादेव॥ आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्याक्षरसमाम्नायिकेन धात्वादिस्थस्य ग्रहणमिति यदयमकः सवर्णे दीर्घः [६.१.१०१] इति प्रत्याहारेऽको ग्रहणं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। न हि द्वयोराक्षरसमाम्नायिकयोर्युगपत्समवस्थानमस्ति। नैतदस्ति ज्ञापकम्। अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम्। किम्। यस्याक्षरसमाम्नायिकेन ग्रहणमस्ति तदर्थमेतत्स्यात्। खट्वाढकम् मालाढकमिति। सति प्रयोजने न ज्ञापकं भवति। तस्माद्विवृतोपदेशः कर्तव्यः॥ क एष यत्नश्चोद्यते विवृतोपदेशो नाम। विवृतो वोपदिश्येत संवृतो वा को न्वत्र विशेषः। स एष सर्व एवमर्थो यत्नो यान्येतानि प्रातिपदिकान्यग्रहणानि तेषामेतेनाभ्युपायेनोपदेशश्चोद्यते। तद्गुरु भवति। तस्माद्वक्तव्यं धात्वादिस्थश्च**

असें करण्याचा उपयोग काय?

सवर्णग्रहणाकरितां; म्हणजे अक्षरसमुदायांतील 'अ' वर्णानें धातू, प्रतिपदिकें इत्यादिकांमधील 'अ'कार घेतला[११] जावा म्हणून.

'विवार' ह्या आभ्यन्तर प्रयत्नामुळें निरालेपणा उत्पन्न होत आहे[१२] म्हणून.

बरें, पण आचार्य पाणिनींच्या लिहिण्यावरूनच दिसून येतें की, अक्षरसमूहांतील 'अ'वर्णानें धातू, प्रातिपदिकें इत्यादिकांमधील 'अ' वर्णाचें ग्रहण होतें; कारण की तो 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) या सूत्रामध्यें प्रत्याहार म्हणून 'अक्' शब्द उच्चारतो. जर धातू, प्रतिपदिकें इत्यादिकांमधील 'अ' वर्ण संवृत असल्यामुळें त्याचें ग्रहण होत नसतें, तर 'अक्' शब्द व्यर्थ आला असता;[१३] 'इक्' शब्दच उच्चारावयास पाहिजे होता.

हें ज्ञापक कसें जमतें (म्हणजे वरती जें आचार्य पाणिनींच्या लिहिण्याचें तात्पर्य दिसून येतें म्हणून म्हटलें आहे तें कसें दिसून येतें)?

कारण अक्षरसमूहांतील दोन 'अ' वर्ण एकदम आलेले कुठेंही आढळत नाहींत. (फार काय, पण अक्षरसमूहांत सांगितलेला विवृत 'अ' वर्ण एकसुद्धां आढळत नाहीं.)

हें ज्ञापक देतां येत नाहीं. 'अक्' प्रत्याहार देण्याचें प्रयोजन दुसरीकडे आढळून येतें.—अक्षरसमूहांतील 'अ' वर्णानें जो घेतला जातो.[१४] अशा वर्णाकरितां 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) येथील अक् शब्द उपयोगीं पडतो. उदाहरणार्थ,[१५] 'खट्वाढकम्' 'मालाढकम्' हे प्रयोग पाहा. उपयोग दिसून येतो तेव्हां ज्ञापक होत नाहीं तेव्हां धातू, प्रत्यय इत्यादिकांमध्यें जो 'आ'कार आहे तो विवृत उच्चारावा असें सिद्ध झालें.

'विवृत उच्चारण केलें पाहिजे' असें मुद्दाम जें वार्तिककारांनीं सांगितलें आहे, त्याचें कारण काय? धातू, प्रातिपदिकें इत्यादि शब्द उच्चारतांनाच संवृत उच्चारले काय किंवा विवृत उच्चारले काय, त्यांत कांहीं श्रमाच्या दृष्टीनें तारतम्य नाहीं. (तेव्हां उच्चारतांनाच वद् वगैरे धातू व गर्ग वगैरे प्रातिपदिकें यांमध्यें विवृतच अकार उच्चारतां येईल व काम भागेल.)

काम भागणार नाहीं. वार्तिककारांनीं जें मुद्दाम सांगितलें आहे त्याचें कारण हें आहे की, ज्या प्रातिपदिकांचा कोठेंही उच्चार नाहीं त्यांचा या वर दिलेल्या उपायानें विवृत उपदेश होईल.

११. 'अणुदित्सवर्णस्य०' (१।१।६९) या सूत्रानें.

१२. तेव्हां 'तुल्यास्य०' (१।१।९) या सूत्रानें 'अइउण्' या सूत्रांतील विवृत अकार आणि धातु वगैरे मधील संवृत अकार हे परस्पर सवर्ण होणार नाहींत.

१३. कारण धातु वगैरेमधील सर्व ठिकाणचा ऱ्हस्व अकार संवृत असल्यामुळें उदाहरणामध्यें कोठेंही दोन ऱ्हस्व अकार विवृत मिळणार नाहींत. विवृत अकार काय तो एकटा अक्षरसमाम्नायामध्येंच आहे.

१४. विवृत ऱ्हस्व अकारानें विवृत दीर्घ अकार घेतला जातो.

१५. 'खट्वा आढकम्' तसेंच 'माला आढकम्' या ठिकाणीं दोन दीर्घ आकारांच्या स्थानीं 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) या सूत्रानें दीर्घ आकार एकादेश झाला आहे.

विवृत इति ॥

**दीर्घप्लुतवचने च संवृतनिवृत्त्यर्थः ॥३॥**

दीर्घप्लुतवचने च संवृतनिवृत्त्यर्थो विवृतोपदेशः कर्तव्यः। दीर्घप्लुतौ संवृतौ मा भूतामिति। वृक्षाभ्याम् देवदत्ता ३ इति ॥ नैव लोके न च वेदे दीर्घप्लुतौ संवृतौ स्तः। कौ तर्हि। विवृतौ। यौ स्तस्तौ भविष्यतः ॥

**स्थानी प्रकल्पयेदेतावनुस्वारो यथा यणम्।**

संवृतः स्थानी संवृतौ दीर्घप्लुतौ प्रकल्पयेत्। अनुस्वारो यथा यणम्। तद्यथा। सय्ँयन्ता सव्ँवत्सरः यल्ँलोकम् तल्ँलोकम्। अनुस्वारः स्थानी यणमनुनासिकं प्रकल्पयति ॥ विषम उपन्यासः। युक्तं यत्सतस्तत्र प्रक्लृप्तिर्भवति। सन्ति हि यणः सानुनासिका निरनुनासिकाश्च। दीर्घप्लुतौ पुनर्नैव लोके न च वेदे संवृतौ स्तः। कौ तर्हि। विवृतौ। यौ स्तस्तौ भविष्यतः ॥ एवमपि कुत एतत्तुल्यस्थानौ प्रयत्नाभिन्नौ भविष्यतो न पुन-

'सर्व प्रातिपदिकांचा प्रत्यक्ष उचार करून उपदेश करणें' दीर्घ मेहनतीचें काम होतें. म्हणूनच 'धात्वादिस्थश्च विवृतः' धातु प्रातिपदिकें वगैरे शब्दांमध्यें विवृत 'अ' वर्ण उच्चारण्यांत यावा असें बोलणें भाग आहे.

(वा.)शिवाय जेथें 'अ'काराला दीर्घ व प्लुत सांगितले आहेत, तेथें 'अ'कार संवृत असल्यामुळें दीर्घ व प्लुत संवृत होतील, ते होऊं नयेत म्हणूनही 'अ'काराचा विवृत उपदेश करावा. उदाहरणार्थ[१६] 'वृक्षाभ्याम्' 'देवदत्त३' येथें दीर्घ व प्लुत संवृत होऊं नयेत म्हणूनही सर्वत्र आकाराचा विवृत उपदेश मानला पाहिजे.

पण दीर्घ व प्लुत संवृत होणार कसे? लोकांमध्येंही दीर्घ व प्लुत संवृत दृष्टीस पडत नाहींत; व वेदामध्येंही दृष्टीस पडत नाहींत. तेव्हां ते तसे नाहींतच असें ठरतें.

मग कसे दृष्टीस पडतात?

विवृत. आणि विवृत दृष्टीं पडल्यामुळें दीर्घ व प्लुत हे विवृतच होतील.

पण ज्याच्या जागीं विवृत किंवा संवृत आदेश व्हावयाचे तो स्थानी 'अ' वर्ण संवृत असल्यामुळें आपल्यासारख्या संवृत आदेशाचीच कल्पना करील. 'अनुस्वारो यथा यणम्', उदाहरणार्थ, संयन्ता, संवत्सरः, यँल्लोकं, तँल्लोकं वगैरे ठिकाणीं अनुस्वार हा आपल्या जागीं आपल्यासारखा सानुनासिक यणाचीच कल्पना करतो.[१७]

हें कारण बरोबर मांडलें गेलें नाहीं. कारण, जो वर्ण अस्तित्वांत असतो तो वर्ण स्थानीनें आपल्या जागीं आणिला जातो हें रास्त होतें. 'यण्' सानुनासिक असतात व अनुनासिकरहितही असतात; पण दीर्घ व प्लुत स्वर वेदामध्यें काय, किंवा लोकांमध्यें काय, कोठेंही संवृत अस्तित्वांतच नाहींत.

मग कसे अस्तित्वांत आहेत?

विवृत. तेव्हां अर्थातच आदेश म्हणून होतील ते विवृतच होतील.

बरें, पण असें कोणीं सांगितलें आहे की, त्याच स्थानाचे व त्याच प्रयत्नाचे दीर्घ व प्लुत आदेश मिळत नाहींत, म्हणून त्याच

१६. वृक्ष शब्दांतील ऱ्हस्व अकार जर मूळचा संवृत उच्चारला असेल, तर त्याच्या स्थानीं 'सुपि च' (७।३।१०२)या सूत्रानें होणारा दीर्घ आकार 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें स्थानीसारखा संवृत होईल. तसेंच, देवदत्त शब्दांतील शेवटच्या संवृत ऱ्हस्व अकाराला 'दूराद्धूते च' (८।२।८४) या सूत्रानें होणारा प्लुत आदेश स्थानीसारखा संवृत होईल.

१७. सम् यन्ता अशीं मूळ पदें आहेत. येथें 'मोऽनुस्वारः' (८।३।२३) या सूत्रानें मकाराला अनुस्वार झाल्यानंतर त्या अनुस्वाराला 'वा पदान्तस्य' (८।४।५९) या सूत्रानें परसवर्ण म्ह० पुढील यकार, वकार, आणि लकार यांचा सवर्ण असा यकार वगैरे आदेश होतो तो स्थानीसारखा सानुनासिक होतो.

स्तुल्यप्रयत्नौ स्थानभिन्नौ स्यातामीकार ऊकारो वेति। वक्ष्यति स्थानेऽन्तरतमः इत्यत्र स्थान इति वर्तमाने पुनः स्थानग्रहणस्य प्रयोजनं यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत एवान्तर्यं बलीयो यथा स्यात्।

## तत्रानुवृत्तिनिर्देशे सवर्णाग्रहणमनण्त्वात् ॥४॥

तत्रानुवृत्तिनिर्देशे सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति। अस्य च्वौ।[७.४.३२] यस्येति च [६.४.१४८]। किं कारणम्। अनण्त्वात्। न ह्येतेऽणो येऽनुवृत्तौ। के तर्हि। येऽक्षरसमाम्नाय उपदिश्यन्ते॥

## एकत्वादकारस्य सिद्धम् ॥५॥

एकोऽयमकारो यश्चाक्षरसमाम्नाये

---

स्थानाचे व भिन्न प्रयत्नाचे आदेश करावे? त्याच प्रयत्नाचे पण भिन्न स्थानाचे असे दीर्घ व प्लुत ई किंवा ऊ कां करूं नयेत[१८]?

याचें कारण पुढें सांगण्यांत येणार आहे तें असें—'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या सूत्रांत मागील सूत्रांतून 'स्थाने' हें पद येत असतांना पुन्हा 'स्थाने' हें पद घातलें त्याचा उद्देश 'ज्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारच्या वर्णांच्या संबंधाचें तारतम्य करण्याची वेळ येते, त्या ठिकाणीं स्थानाचा निकटपणा इतर प्रकारच्या निकटपणापेक्षां जास्त प्रबळ समजला जातो हें सांगणें' हें होय.

(वा.) बरें, जरी सर्व ठिकाणीं 'अ'काराचें विवृत उच्चारण केलें, तरी उदाहरणें साधण्याकरितां उदाहरणांतील 'अ'कार वगैरे वर्णांचे दर्शक म्हणून ज्या ठिकाणीं 'अ'कार वगैरे वर्णांचें उच्चारण केलें आहे त्या ठिकाणीं[१९] त्या वर्णांच्या सवर्णांचें (दीर्घ व प्लुत यांचें) ग्रहण होणार नाहीं. उदाहरणार्थ— 'अस्य[२०] च्वौ' (७।४।३२) 'यस्येति च' (६।४।१४८).

पण या सूत्रांत ग्रहण न होण्याचें कारण काय?

कारण ज्या 'अ' वर्णानें ग्रहण करावयाचें तो 'अण्' असत नाहीं[२१] म्हणून. जे हे 'अस्य च्वौ' वगैरे सूत्रांत अकार वगैरे वर्ण रूपें साधण्याकरितां उच्चारले आहेत ते अण् नाहींत.

मग अण् कोणते?

जे अक्षरसमाम्नायांत सांगितले आहेत ते अण्.

पण कोठेंही उच्चारला असो; 'अ'वर्ण चोहोंकडे एकच असल्यामुळें काम भागतें. अक्षरसमाम्नायांत काय, अनुवृत्ति म्हणजे

---

१८. 'वृक्षाभ्याम्' येथें कंठस्थानाचा आणि संवृतप्रयत्नाचा असा ऱ्हस्व अकार आहे. त्याला कंठस्थानाचा विवृत दीर्घ आकार आदेश होतो. आकार हा प्रयत्नानें जरी स्थानीसारखा म्ह० संवृत आकारासारखा नाहीं, तरी स्थानानें सारखा आहे. पण तसाच दीर्घ ईकार हा त्या संवृत अकाराला कां करूं नये? कारण दीर्घ ईकार हा तालुस्थानाचा असल्यामुळें स्थानानें जरी ऱ्हस्व अकारासारखा नाहीं, तरी त्या ईकाराचे संवृतप्रयत्न असल्यामुळें प्रयत्नानें स्थानीसारखा आहे. नुसत्या स्थानानें सारखेपणा पाहून दीर्घ आकार होतो, तसा नुसत्या प्रयत्नानें सारखा दीर्घ ईकारही होईल. तसाच दीर्घ ऊकारही होईल.

१९. अनुवृत्ति = अनुकरण. उदाहरणांतील अकाराचें जें 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रामध्यें 'अस्य' असें अनुकरण केलें आहे त्यांत.

२०. या सूत्रामध्यें अस्य हा ऱ्हस्व अकार उच्चारला आहे. त्यानें दीर्घ आकाराचें ग्रहण होतें म्हणून 'खट्वीकरोति' या उदाहरणामध्यें दीर्घ आकारालाही ईकार आदेश होतो. तसेंच 'यस्येति च' या सूत्रामध्यें देखील इ आणि अ हे दोन वर्ण जरी ऱ्हस्व उच्चारले आहेत, तरी त्यांनीं दीर्घांचेंही ग्रहण होतें, म्हणून 'गांगेयः नादेयः' या उदाहरणांमध्यें गंगा नदी या शब्दाहून ढक् (एय) प्रत्यय केला असतां, त्या शब्दाच्या शेवटच्या आकार आणि ईकार यांचा त्या सूत्रानें लोप होतो.

२१. आणि 'अणुदित्०' (१।१।६९) या सूत्रानें 'अणानेंच सवर्णांचें ग्रहण होतें' असें सांगितलें आहे.

यश्चानुवृत्तौ यश्च धात्वादिस्थः ॥

**अनुबन्धसंकरस्तु ॥६॥**

अनुबन्धसंकरस्तु प्राप्नोति । कर्मण्यण् [३·२·१] आतोऽनुपसर्गे कः [३·२·३] इति केऽपि णित्कृतं प्राप्नोति ।

**एकाजनेकाज्ग्रहणेषु चानुपपत्तिः ॥७॥**

एकाजनेकाज्ग्रहणेषु चानुपपत्तिर्भविष्यति । तत्र को दोषः । किरिणा गिरिणेत्येकाज्लक्षणमन्तोदात्तत्वं प्राप्नोति । इह च घटेन तरति घटिक इति द्व्यज्लक्षणष्ठन्न प्राप्नोति ॥

**द्रव्यवच्चोपचाराः ॥८॥**

द्रव्यवच्चोपचाराः प्राप्नुवन्ति । तद्यथा । द्रव्येषु नैकेन घटेनानेको युगपत्कार्यं करोति । एवमिममकारं नानेको युगपदुच्चारयेत् ॥

**विषयेण तु नानालिङ्गकरणात्सिद्धम् ॥९॥**

यदयं विषये विषये नानालिङ्गमकारं करोति कर्मण्यण् आतोऽनुपसर्गे क इति तेन ज्ञायते नानुबन्धसंकरोऽस्तीति । यदि हि स्यान्नानालिङ्गकरणमनर्थकं स्यात् । एकमेवायं सर्वगुणमुच्चारयेत् ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । इत्संज्ञाप्रक्लृप्त्यर्थमेतत्स्यात् । न

---

अनुकरणांत काय, किंवा धातु, प्रातिपदिकें इत्यादिकांत काय, 'अ' वर्ण चोहोंकडे एकच.

पण 'अ'कार चोहोंकडे एकच आहे असें म्हटल्यास अनुबंध म्हणजे इत्संज्ञक वर्णांचा घोंटाळा उडेल. उदाहरणार्थ—'कर्मण्यण्' (३।२।१) 'आतोनुपसर्गे कः' (३।२।३) हीं दोन सूत्रें घ्या; अण् व क या दोन प्रत्ययांतील अकार एकच झाल्यास इत्संज्ञक णकाराचें कार्य कप्रत्यय[२२] केला असतांही होईल.

(वा.) तसेंच एकाच्, अनेकाच् असे शब्द जेथें उच्चारले आहेत, तेथें ज्याप्रमाणें व्यवस्था व्हावयास पाहिजे त्याप्रमाणें होणार नाहीं.

दोष कोठें कोठें येतील ?

'किरिणा', 'गिरिणा' या ठिकाणीं कि आणि रि तसेंच गि आणि रि या दोन्ही अक्षरांतील इकार एकच असल्यामुळें हा एकाच् शब्द आहे असें समजून, 'सावेकाचः'(६।१।१६८) या सूत्रानें अन्तोदात्त स्वर होऊं लागेल; तसेंच घटानें उपजीविका करतो या अर्थी 'घटिक' शब्द साधावयाचा असतांना घट शब्दाहून दोन स्वर जेथें आहेत अशा शब्दाहून सांगितलेला (४।४।७) ठन् प्रत्यय होणार नाहीं.

(वा.) शिवाय, द्रव्य म्हणजे लौकिक पदार्थ याविषयीं जशा गोष्टी घडतात तशा घडून येतील. उदाहरणार्थ—एकच घागर असल्यास अनेक लोक त्या घागरीनें एकदम पाणी कधींच आणूं शकत नाहींत; त्याचप्रमाणें 'अ' वर्ण एकच असल्यामुळें तो अनेक लोक एकदम उच्चारूं शकणार नाहींत.

(वा.) ज्या अर्थी ठिकठिकाणीं निरनिराळ्या चिन्हांनीं (इत्संज्ञक वर्णांनीं) युक्त 'अ'काराचें उच्चारण केलें आहे उदा०— 'कर्मण्यण्' (३।२।१) 'आतोनुपसर्गे कः' (३।२।३) वगैरे ठिकाणीं—त्या अर्थी असें कळून येतें की, अनुबन्धांचा घोंटाळा होत नाहीं. जर अनुबन्धांचा घोंटाळा होत असता, तर निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं चिन्हें लावणें निरर्थक झालें असतें. आचार्य पाणिनींनीं क्, ण्, ञ् वगैरे सर्व इत्संज्ञक वर्ण एकदमच जोडून 'अ' प्रत्यय उच्चारला असता.[२३]

हें ज्ञापक देतां येत नाहीं. निरनिराळ्या

---

२२. गोद: हें कप्रत्ययाचें उदाहरण आहे. येथें गाईला देणारी अशी स्त्रीलिंगाची विवक्षा केली असतां क प्रत्यय हा अण् आहे म्ह० णकारेत्संज्ञक अकार आहे असें समजून टिड्ढाणञ्० (४।१।१५) या सूत्रानें ङीप् प्रत्यय होऊं लागेल.

२३. कारण निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे इत्संज्ञक वर्ण अकाराला जोडले, तरी अकार सर्व ठिकाणचा एकच असल्यामुळें सर्व ठिकाणीं सर्व इत्संज्ञकांचीं कार्यें होणारच.

द्ययमनुबन्धैः शल्यकवच्छक्य उपचेतुम् । इत्संज्ञायां हि दोषः स्यात् । आयम्य हि द्वयोरित्संज्ञा स्यात् । कयोः । आद्यन्तयोः ॥ एवं तर्हि विषयेण तु पुनर्लिङ्गकरणात्सिद्धम् । यदयं विषये विषये पुनर्लिङ्गमकारं करोति प्राग्दीव्यतोऽण् [४·१·८३] शिवादिभ्योऽण् [४·१·११२] इति तेन ज्ञायते नानुबन्धसंकरोऽस्तीति । यदि हि स्यात्पुनर्लिङ्गकरणमनर्थकं स्यात् ॥ अथवा पुनरस्तु विषयेण तु नानालिङ्गकरणात्सिद्धमित्येव । ननु चोक्तमित्संज्ञाप्रक्लृप्त्यर्थमेतत्स्यादिति । नैष दोषः । लोकत एतत्सिद्धम् । तद्यथा । लोके कश्चिद्देवदत्तमाह । इह मुण्डो भव । इह जटी भव । इह शिखी भवेति । यल्लिङ्गो यत्रोच्यते तल्लिङ्गस्तत्रोपतिष्ठते । एवमयमकारो यल्लिङ्गो यत्रोच्यते तल्लिङ्गस्तत्रोपस्थास्यते ॥ यदप्युच्यत एकाजनेकाज्ग्रहणेषु चानुपपत्तिरिति ।

**एकाजनेकाज्ग्रहणेषु चावृत्तिसंख्यानात् ॥१०॥**

---

ठिकाणीं निरनिराळे अनुबंध लावण्याचें कारण त्यांना इत्संज्ञा व्हावी व त्यांचा लोप व्हावा हें होय. सायाळाला ज्याप्रमाणें अनेक कांटे असतात, त्याप्रमाणें एका ठिकाणीं अकार वगैरे वर्णांना सगळे अनुबंध एकदम लावणें शक्य नाहीं; कारण इत्संज्ञा होण्यास अडचण पडूं लागेल. फार तर दोन वर्णांना एकदम इत्संज्ञा होऊं शकते.

कोणत्या दोन वर्णांना ?

पहिल्या व शेवटच्या.[२४]

बरें तर; 'विषयेण तु नानालिङ्गकरणात्सिद्धम्' या वार्तिकाच्या ऐवजीं 'विषयेण तु पुनर्लिङ्गकरणात्सिद्धम्' असें समजूं. ज्या अर्थी निरनिराळ्या ठिकाणीं पुन्हा पुन्हा तीच तीच खूण लावून 'अ'कार उच्चारतात—उदाहरणार्थ 'प्राग्दीव्यतोण्' (४।१।८३), 'शिवादिभ्योण्' (४।१।११२) वगैरे सूत्रांत—त्या अर्थी आचार्य सुचवितात की, अनुबंधांचा घोंटाळा होत नाहीं. जर अनुबंधांचा घोंटाळा होत असता, तर पुन्हा पुन्हा तोच तोच अनुबंध लावणें व्यर्थ झालें असतें. एका ठिकाणींच णकार अनुबंध लावून काम भागलें असतें.

अथवा, 'विषयेण तु नानालिङ्गकरणात्सिद्धम्' असेंच वार्तिक राहूं द्या.

पण तसें राहूं दिल्यास वरती दोष नाहीं का दाखवला की इत्संज्ञा होण्याकरितां तसें केलें आहे म्हणून ?

हा दोष येत नाहीं. [२५]लोकव्यवहारावरूनच ही गोष्ट सिद्ध होत आहे. उदाहरणार्थ—लोकांमध्यें एकाच देवदत्त व्यक्तीला जर कोणी निरनिराळ्या ठिकाणीं 'येथें मुंड हो', 'येथें जटावाला हो', 'येथें शेंडीवाला हो' असें म्हटलें तर तोही ज्या ठिकाणीं जसा व्हावयास सांगितला जातो तसाच तो होतो. त्याप्रमाणें अकार जरी सर्व ठिकाणीं एकच आहे तरी ज्या ठिकाणीं पाणिनीनें जसा सांगितला असेल तसाच तेथें समजला जाईल.

आतां 'एकाच् अनेकाच्' असे शब्द जेथें उच्चारले आहेत तेथें ज्याप्रमाणें व्यवस्था व्हावयास पाहिजे त्याप्रमाणें होणार नाहीं' असा जो वर दोष दिला आहे त्या संबंधानें पुढील उत्तर देतां येईल.

---

२४. 'आदिर्ञिटुडवः' (१।३।५) वगैरे सूत्रांनीं आदीला इत्संज्ञा सांगितली आहे. आणि हलन्त्यम् (१।३।३) या सूत्रानें शेवटच्या वर्णाला इत्संज्ञा सांगितली आहे. तेव्हां दोहोंपेक्षां जास्त इत्संज्ञक वर्ण जोडावयाचे असल्यास मधल्या वर्णांना इत्संज्ञा होणार नाहीं.

२५. 'विषयेण तु०' या वार्तिकाचें तात्पर्य—'निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे इत्संज्ञक वर्ण लावले आहेत ते व्यर्थ होतील म्हणून त्यांच्या सामर्थ्यास्तव इत्संज्ञकांचा घोंटाळा होत नाहीं असें समजूं नये' तर त्याचें तात्पर्य असें समजावें की, 'जरी अकार सर्व ठिकाणचा एक आहे, तरी निरनिराळे इत्संज्ञक वर्ण निरनिराळ्या ठिकाणीं लावले असल्यामुळें आपोआपच त्यांचा घोंटाळा होणार नाहीं.'

एकाजनेकाज्ग्रहणेषु चावृत्तेः संख्यानादनेकाच्त्वं भविष्यति । तद्यथा । सप्तदश सामिधेन्यो भवन्तीति त्रिः प्रथमामन्वाह त्रिरुत्तमामित्यावृत्तितः सप्तदशत्वं भवति । एवमिहाप्यावृत्तितोऽनेकाच्त्वं भविष्यति । भवेदावृत्तितः कार्यं परिहृतम् । इह तु खलु किरिणा गिरिणेत्येकाज्लक्षणमन्तोदात्तत्वं प्राप्नोत्येव । एतदपि सिद्धम् । कथम् । लोकतः । तद्यथा । लोके ऋषिसहस्रमेकां कपिलामेकैकशः सहस्रकृत्वो दत्त्वा तया सर्वे ते सहस्रदक्षिणाः संपन्नाः । एवमिहाप्यनेकाच्त्वं भविष्यति ॥ यदप्युच्यते द्रव्यवच्चोपचाराः प्राप्नुवन्तीति भवेद्यदसंभवि कार्यं तन्नानेको युगपत्कुर्याद्यत्तु खलु संभवि कार्यमनेकोऽपि तद्युगपत्करोति । तद्यथा । घटस्य दर्शनं स्पर्शनं वा । संभवि चेदं कार्यमकारस्योच्चारणं नामानेकोऽपि तद्युगपत्करिष्यति ॥

**आन्यभाव्यं तु कालशब्दव्यवायात् ॥११॥**

(वा.) एकाच् अनेकाच् असें ज्या ठिकाणीं उच्चारलें आहे, त्या ठिकाणीं आवृत्ति केल्यामुळें म्हणजे पुन्हा पुन्हा त्याच स्वराचें उच्चारण केल्यामुळें अनेक अच् आहेत असें समजतां येतें. दृष्टांत घ्यावयाचा म्हणजे विकृतियाग वर्णनांत एक वाक्य 'सतरा[२६] सामिधेनी ऋचा आहेत' असें आहे. वास्तविक पाहतां तशा ऋचा तेराच आहेत; पण पहिली ऋचा तीन वेळां व शेवटची ऋचा तीन वेळां घेऊन सतरा सामिधेनी घेतल्या जातात. त्याचप्रमाणें 'किरिणा', 'गिरिणा' या ठिकाणीं सुद्धां एकच इकार दोनदां आल्यामुळें किरि, गिरि हे शब्द अनेक अचांनीं युक्त समजले जातील.

आवृत्ति म्हणजे अनेक वेळां उच्चारण. त्याचे जोरावर दोन अच् आहेत असें गृहीत धरून घट शब्दाहून ठन् प्रत्यय करतां येत असल्यामुळें तेथील दोष दूर केला जाईल, पण एकच (म्हणजे एक जातीचा) अच् असल्यामुळें होणारें कार्य—किरिणा, गिरिणा वगैरे ठिकाणीं अन्तोदात्तत्व—प्राप्त होईलच.

येथेंही इष्ट गोष्ट साधली जाईल.

ती कशी ?

जशी लोकांत तशीच येथें. जसें लोकांत पूर्वीं हजार ऋषींनीं एकच कपिला गायीचें पुन्हा पुन्हा दान करून प्रत्येक जणानें हजार गायी दान केल्याचें पुण्य मिळवलें, त्याप्रमाणें येथेंही 'किरिणा', 'गिरिणा' वगैरे ठिकाणीं 'किरि गिरि' हे शब्द अनेक अचांनीं युक्त[२७] आहेत असें समजलें जाईल.

बरें, 'द्रव्य म्हणजे लौकिक पदार्थ, याविषयीं जशा गोष्टी घडतात तशा घडून येतील' असें जें वर म्हटलें आहे, त्या संबंधानें उत्तरादाखल एवढें सांगतां येईल की, एकाच पदार्थासंबंधानें जें कार्य पुष्कळांना एकदम करतां येण्याजोगें नसतें, तें पुष्कळ लोक एकदम करीत नाहींत; पण जें कार्य पुष्कळांनाही एकदम करतां येतें, तें पुष्कळ लोक एकदम करतातच. उदाहरणार्थ—घट पाहणें किंवा घटाला हात लावणें. 'अ'काराचें उच्चारण करणें हें कार्य पुष्कळ लोकांनीं एकदम करणें संभवनीय आहे व म्हणूनच[२८] तें अनेक लोकही एकदम करूं शकतील.

(वा.)[२९] जरी चोहोंकडचा 'अ' म्हणून सर्व ठिकाणीं सारखाच असला, तरी तो निरनिरा_

---

२६. जी ऋचा म्हणून समिधांचें आधान केलें जातें त्या ऋचेला सामिधेनी असें म्हणतात.

२७. गणनेच्या कामीं कोणती तरी एकच संख्या उपयोगीं पडते. तेव्हां ज्या ठिकाणीं दोन संख्या एकदम संभवतील त्या ठिकाणीं मागून उत्पन्न झालेली संख्या पूर्वसंख्येचा बाध करते. ती मागून उत्पन्न झालेली संख्या गौण असो मुख्य असो, तिच्या योगानेंच तेथें गणना केली जाते.

२८. तेव्हां सर्व ठिकाणचा अकार एकच आहे असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

२९. येथून वार्तिककार, सर्व ठिकाणचा अकार एक नाहीं असें सिद्ध करीत आहेत.

आन्यभाव्यं त्वकारस्य । कुतः । कालशब्दव्यवायात् । कालव्यवायाच्छब्दव्यवायाच्च । कालव्यवायात् । दण्ड अग्रम् । शब्दव्यवायात् । दण्डः । न चैकस्यात्मनो व्यवायेन भवितव्यम् । भवति चेद्भवत्यान्यभाव्यमकारस्य ॥

**युगपच्च देशपृथक्त्वदर्शनात् ॥१२॥**

युगपच्च देशपृथक्त्वदर्शनान्मन्यामह आन्यभाव्यमकारस्येति । यदयं युगपद्देशपृथक्त्वेषूपलभ्यते । अश्वः अर्कः अर्थ इति । न ह्येको देवदत्तो युगपत्स्रुघ्ने च भवति मथुरायां च ॥ यदि पुनरिमे वर्णाः शकुनिवत्स्युः । तद्यथा । शकुनय आशुगामित्वात्पुरस्तादुत्पतिताः पश्चाद्दृश्यन्ते । एवमयमकारो द इत्यत्र दृष्टो ण्ड इत्यत्र दृश्यते । नैवं शक्यम् । अनित्यत्वमेवं स्यात् । नित्याश्च शब्दाः । नित्येषु च शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवितव्यमनपायोपजनविकारिभिः । यदि चायं द इत्यत्र दृष्टो ण्ड इत्यत्र दृश्येत नायं कूटस्थः स्यात् ॥ यदि पुनरिमे वर्णा आदित्यवत्स्युः । तद्यथा । एक आदित्योऽनेकाधिकरणस्थो युगपद्देशपृथक्त्वेषूपलभ्यते । विषम उपन्यासः । नैको द्रष्टादित्यमनेकाधिकरणस्थं युगपद्देशपृथक्त्वेषूपलभतेऽकारं पुनरुपलभते । अकारमपि नोपलभते । किं कारणम् । श्रोत्रोप-

---

ळाच समजला जातो.

तें कोणत्या कारणानें ?

काल व शब्द यांच्या व्यवायामुळें म्हणजे व्यवधानामुळें. कालव्यवधानाचें उदाहरण दण्ड अग्रम्[30] येथील दण्ड यांतील शेवटचा अ व 'अग्र' यांतील आरंभींचा अ. शब्दव्यवधानाचें उदाहरण 'दण्ड' या शब्दांतील दोन्ही 'अ'कार. जर 'अ'वर्ण एकच असेल तर एकामध्येंच व्यवाय म्हणजे व्यवधान होणें शक्य नाहीं; ज्या अर्थी व्यवधान आहे असें समजलें जातें, त्या अर्थी दोन अकार निराळे आहेत असा निष्कर्ष निघतो.

(वा.) एकाच वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं दृष्टीस पडल्यामुळेंही आम्ही समजूं शकतों की, निरनिराळ्या ठिकाणचा 'अ'कार निरनिराळाच आहे. 'अश्वः', 'अर्कः', 'अर्थः' इत्यादि ठिकाणीं एकाच वेळीं 'अ'कार दृष्टीस पडतो तेव्हां तो निराळा असलाच पाहिजे; कारण एकच देवदत्त ही व्यक्ति एकदम स्रुघ्न व मथुरा या दोन्ही शहरांत दिसत नाहीं.

पण कदाचित् वर्ण हे पक्ष्यांसारखे असतील. पक्षी हे अत्यंत चपळगतीचे; पुढच्या बाजूला उड्डाण करून चटकन् मागें पण दिसतात; त्याप्रमाणेंच 'अ' वर्ण हा एक असूनही 'द' येथेंही दिसूं शकतो.

असें म्हणणें शक्य नाहीं. कारण तसें मानिल्यास शब्द अनित्य होऊं लागतील. पण वास्तविक पाहतां शब्द हे नित्यच आहेत व ते नित्य असल्यामुळें त्यांतील जे वर्ण ते सुद्धां कायम राहणारे, विनाशहीन, आणि क्षय व वृद्धि यांनीं रहित असे पाहिजेत. जर 'द' येथें दिसणाराच 'अ' वर्ण 'ण्ड' येथेंही दिसेल तर 'अ' वर्णाला कायम राहणारा असें म्हणतां येणार नाहीं.

पण जर हे वर्ण सूर्यासारखे असतील तर. उदाहरणार्थ—तोच सूर्य एकाच वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं (असलेल्या लोकांना) निरानिराळ्या ठिकाणीं असल्यासारखा दृष्टीस पडतो.

हाही दृष्टान्त येथें बरोबर लागू पडत नाहीं. कारण एकच माणूस एकाच वेळीं निरनिराळ्या ठिकाणांहून निरनिराळ्या ठिकाणीं असलेला असा सूर्य पाहूं शकत नाहीं; पण 'अ' वर्ण तशा रीतीनें पाहूं शकतो.

'अ' वर्णही पण तसा[31] पाहूं शकत नाहीं.

---

[30] दण्डशब्द उच्चारून नंतर थोड्या वेळानेंहि अग्रशब्द उच्चारतां येतो.

[31] निरनिराळ्या ठिकाणीं असलेला.

लब्धिर्बुद्धिनिर्ग्राह्यः प्रयोगेणाभिज्वलित आकाशदेशः शब्द एकं च पुनराकाशम्। आकाशदेशा अपि बहवः। यावता बहवस्तस्मादान्यभाव्यमकारस्य ॥

## आकृतिग्रहणात्सिद्धम् ॥१३॥

अवर्णाकृतिरुपदिष्टा सर्वमवर्णकुलं ग्रहीष्यति। तथेवर्णाकृतिः तथोवर्णाकृतिः ॥

## तद्वच्च तपरकरणम् ॥१४॥

एवं च कृत्वा तपराः क्रियन्ते। आकृतिग्रहणेनातिप्रसक्तमिति। ननु च सवर्णग्रहणेनातिप्रसक्तमिति कृत्वा तपराः क्रियेरन्। प्रत्याख्यायते तत्सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यमाकृतिग्रहणादनन्यत्वाच्चेति ॥

## हल्ग्रहणेषु च ॥१५॥

तो काय म्हणून?

शब्द हा कानाला भिडलेला, बुद्धीनें घेतला जाणारा, ध्वनीनें प्रकाशित होणारा आणि आकाशामध्यें असणारा असा असतो. आणि आकाश पाहिलें असतां एकच आहे.[32]

आकाशाचे प्रदेशही पुष्कळ आहेत. आणि ते प्रदेश जर पुष्कळ आहेत, तर अर्थात् 'अ'-कारही वस्तुतःच निरनिराळ्या ठिकाणीं उपलब्ध होत असल्यामुळें तो निरनिराळा आहे असें सिद्ध होतें.

(वा.)[33] 'अ' अशी जाति घेतल्यास सर्व कार्य साधतें. 'अइउण्' या सूत्रांत 'अ' हें अत्वजातीचें दर्शक असें उच्चारण केलें आहे, त्यामुळें त्या 'अ' वर्णानें सर्व 'अ' वर्णाचा संघ समजला जाईल. सदरहूप्रमाणेंच 'इ'कार जाति व 'उ'कार जाति.

(वा.) ज्या ठिकाणीं 'त'कार लावून स्वराचें उच्चारण केलें आहे, त्या ठिकाणीं तें जातिपक्ष स्वीकारूनच केलेलें आहे. जातिपक्ष घेतला तर एखादा स्वर अ, इ, उ वगैरे उच्चारला की त्याचे सर्व भेद घेतले जातील, व त्यामुळें कांहीं ठिकाणीं अतिव्याप्तिदोष येईल तो न यावा म्हणून ज्या ठिकाणीं विशिष्ट भेदच पाहिजेत, त्या ठिकाणीं पुढें तकार[34] जोडला आहे.

बरें, पण जातिपक्षच कशाला घ्यावयास पाहिजे? 'अ' असें उच्चारण केलें की 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः'(१।१।६९) या सूत्रानें 'अ' चे सर्व सवर्ण घेतले जातील व त्यामुळें अतिव्याप्ति येईल ती टाळण्याकरितां तकार जोडला आहे, असें कां म्हणूं नये? 'अणुदित्सवर्णस्य०' (१।१।६९) या सूत्रांत अण् शब्द नको म्हणून वार्तिककारांनीं (१।१।६९ वा. ८) सांगितलें आहे; तेथें म्हटलें आहे की 'सवर्णग्रहण' सांगणाऱ्या सूत्रांत अण् शब्द घालावयास नको; कारण 'अ' शब्द उच्चारतांच अत्व-जातीनें युक्त अशा सर्वांचें स्वाभाविकच ग्रहण होतें. शिवाय दीर्घ आ, प्लुत अ३ वगैरे अकार 'अ' वर्णाहून निराळे नाहींतच.[35]

(वा.) शिवाय ज्या ठिकाणीं हलांचें म्हणजे व्यंजनांचें उच्चारण केलें आहे, त्या ठिकाणीं

---

३२. तेव्हां 'अ'कार वगैरे वर्णांना एकच पुरुष सुद्धां एकदम पाहूं शकतो असें जें आपणांस वाटतें तो निव्वळ भ्रम आहे. शब्दाचा व्यंजक जो ध्वनि तो भिन्नदेशीं असल्यामुळें त्या उपाधीमुळें शब्दही भिन्नदेशी आहे असा भास होतो.

३३. 'तत्रानुवृत्तिनिर्देशे' या वार्तिकामध्यें 'अस्य च्वौ' इत्यादि ठिकाणीं सवर्णांचें ग्रहण होणार नाहीं अशी जी शंका दाखविली होती तिचें उत्तर येथून वार्तिककार देत आहेत.

३४. 'अतो भिस ऐस्' (७।१।९) या सूत्रामध्यें अतः असा 'अ'काराला तकार जोडला आहे. तेव्हां 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें फक्त ऱ्हस्व अकारानेंच ग्रहण होतें. म्हणून रमाभिः या उदाहरणामध्यें भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश होत नाहीं.

३५. तांबडी गाय पांढऱ्या गाईपेक्षां रंगानें निराळी असली तरी ती आकारानें निराळी होत नाहीं, तसेंच दीर्घ वगैरे ऱ्हस्वापेक्षां उच्चारणकालाच्या मानानें निराळे भासेल तरी अवर्ण या दृष्टीनें ते निराळे होत नाहींत.

किम् । आकृतिग्रहणात्सिद्धमित्येव । झलो झलि [८.२.२८]। अवात्ताम् अवात्तम् अवात्त। यत्रैतन्नास्त्यणसवर्णान्गृह्णातीति ।

रूपसामान्याद्वा ॥१६॥

रूपसामान्याद्वा सिद्धमेतत्। तद्यथा। तानेव शाटकानाच्छादयामो ये मथुरायाम्। तानेव शालीन्भुञ्ज्महे ये मगधेषु। तदेवेदं भवतः कार्षापणं यन्मथुरायां गृहीतम्। अन्यस्मिंश्चान्यस्मिंश्च रूपसामान्यात्तदेवेदमिति भवति। एवमिहापि रूपसामान्यात्सिद्धम् ॥

ऌलृक् ॥२॥

लृकारस्योपदेशः किमर्थः । किं विशेषेण लृकारोपदेशश्चोद्यते न पुनरन्येषामपि वर्णानामुपदेशश्चोद्येत । यदि किंचिदन्येषामपि वर्णानामुपदेशे प्रयोजनमस्त्यॢकारोपदेशस्यापि तद्भवितुमर्हति । को वा विशेषः । अयमस्ति विशेषः । अस्य ह्यॢकारस्याल्पीयांश्चैव प्रयोगविषयो यश्चापि प्रयोगविषयः सोऽपि क्लृपिस्थस्य क्लृपेश्च लत्वमसिद्धम्...

---

'जाति' घेतलीच पाहिजे.त्याशिवाय काम भागणार नाहीं. उदाहरणार्थ-'झलो झलि'(८।२।२६) सूत्र घ्या; या सूत्रानें 'अवात्ताम्', 'अवात्तम्' हीं रूपें साधतांना जातिपक्ष घेण्याचीच जरूर आहे; येथें त् हें व्यंजन 'अण्' नसल्यामुळें 'अणुदित्' (१।१।६९) या सूत्रानें एका तकारानें इतर तकारांचें ग्रहण होणार नाहीं[३६], तर 'झल्' ही जातिच घ्यावी लागते. म्हणजे पहिला तकारही झल् होऊं शिकतो व दुसराही झल्च होऊं शकतो.

(वा.) किंवा सर्व 'अ' वर्णांचें रूप सारखेंच असल्यामुळें प्रस्तुत स्थलीं 'अ' या सामान्य स्वरूपाचा उच्चार केल्यामुळें सर्व 'अ' वर्ण येतात. उदाहरणार्थ, जरी शेले निराळे असले तरी एकाच जातीचे असल्यास आपण म्हणतों— 'जे शेले मथुरेंत आम्ही पांघरत होतों, तेच येथें आम्ही पांघरतों'; 'जे मगध देशांत आम्ही तांदूळ खात होतों, तेच येथेंही खात आहों'; 'मथुरेंत तुझ्याकडून घेतलेला हा कार्षापण घे परत'. जरी या सर्व ठिकाणीं पूर्वींचे व आतांचे पदार्थ निरनिराळे असले तरी 'तेच हे' असा आपण व्यवहार करतों. त्याप्रमाणें येथेंही स्वरूप सारखेंच असल्यामुळें 'अ' शब्दानें[३७] सर्व 'अ' वर्ण घेतले जातील.

(मा. सू. २) बरें, या सूत्रांत 'ऌ'काराचा उच्चार कशाकरितां केला आहे ?

मुद्दाम ऌकाराच्याच उच्चाराविषयीं कां बरें प्रश्न करतां ? इतर वर्णांच्या उच्चारणाविषयीं कां नाहीं असा प्रश्न करीत ? जर कांहीं इतर अक्षरें उच्चारण्याचा हेतु असेल तर तोच हेतु 'ऌ'कार उच्चारण्याचाही असणें योग्य आहे. तेव्हां इतर अक्षरें व ऌकार यांत फरक काय ?

पुढें दिलेला फरक आहे.—या 'ऌ' वर्णाचें प्रदेशक्षेत्र फार लहान आहे. आणि लहान का होईना, जो कांहीं त्यामध्यें ऌकार दृष्टीस पडतो, तो 'क्लृप्' धातूचाच ऌकार होय. 'कृप् धातूमधील ऋकाराला 'कृपो रो

---

३६. त्यामुळें अनेक तकार एकदम झल् म्हणून घेतले जाणार नाहींत. 'अवात्ताम्' या उदाहरणामध्यें वस् धातूच्या पुढें लुङ् प्रत्यय, त्याला तस्, त्याला ताम् आदेश, मध्यें सिच् प्रत्यय, धातूमधील अकाराला वृद्धि, मागें अट् आगम आणि 'सः स्यार्धधातुके' (७।४।४९) या सूत्रानें धातूच्या सकाराला तकार इतकीं कार्यें झाल्यानंतर 'अवत् स् ताम्' अशी स्थिति असतांना दोन तकारांच्या मधील सकाराचा 'झलो झलि' (८।२।२६) या सूत्रानें लोप होतो. त्या लोपाला सकाराच्या मागें आणि पुढें असे दोन झल् वर्ण पाहिजेत. अक्षरसमाम्नायामध्यें झल्प्रत्याहारांत चटतव् असा तकार उच्चारला आहे खरा; परंतु व्यक्तींपेक्षां तो तकार कोणत्या तरी एका तकाराचें अनुकरण समजतां येईल, एकदम दोन तकारांचें अनुकरण म्हणतां येणार नाहीं. तेव्हां 'झलो झलि' या सूत्रानें सकाराचा लोप होणार नाहीं.

३७. 'अस्य च्वौ' (७।४।३२) इत्यादि सूत्रांतील अ शब्दानें.

सिद्धम् । तस्यासिद्धत्वादृकारस्यैवाच्कार्याणि भविष्यन्ति नार्थ ऌकारोपदेशेन ॥ अत उत्तरं पठति ।

## ऌकारोपदेशो यदृच्छाशक्तिजानुकरणप्लुत्याद्यर्थः ॥१॥

ऌकारोपदेशः क्रियते यदृच्छाशब्दार्थोऽशक्तिजानुकरणार्थः प्लुत्याद्यर्थश्च । यदृच्छाशब्दार्थस्तावत् । यदृच्छया कश्चिदॢतको नाम तस्मिन्नच्कार्याणि यथा स्युः । दध्य्ॢतकाय देहि । मध्व्ॢतकाय देहि । उदङ्ङ्ॢतकोऽगमत् । प्रत्यङ्ङ्ॢतकोऽगमत् । चतुष्टयी शब्दानां प्रवृत्तिः । जातिशब्दा गुणशब्दाः क्रियाशब्दाः यदृच्छाशब्दाश्चतुर्थाः ॥ अशक्तिजानुकरणार्थः । अशक्त्या कथंचिद्ब्राह्मण्या ऋतक इति प्रयोक्तव्य ऌतक इति प्रयुक्तम् । तस्यानुकरणं ब्राह्मण्य्ॢतक इत्याह कुमार्य्ॢतक इत्याहेति ॥ प्लुत्याद्यर्थश्च ऌकारोपदेशः कर्तव्यः । के पुनः प्लुत्यादयः । प्लुति-

लः' (८।२।१८) या सूत्रानें झालेला 'ऌ' आदेश इतर कार्यांच्या दृष्टीनें न झाल्यासारखाच आहे; तेव्हां ऌकाराला अच् समजून जीं जीं कार्यें आपणांस व्हावयास पाहिजेत, तीं ऋकारच आहे या समजुतीनें होतील. तेव्हां 'ऋऌक्' या सूत्रांत 'ऌ' वर्ण उच्चारण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

ही सर्व शंका मनांत घेऊन उत्तरादाखल वार्तिककार लिहितात—

ऌकाराचा उपदेश केला आहे. त्याचा उपयोग साहजिक रीत्या ऌकारयुक्त असे जे आपण शब्द उच्चारतों त्याकरितां आहे. ऋ उच्चारतां येत नाहीं म्हणून जो ऌ उच्चारला जातो त्याच्या आपण केलेल्या अनुकरणांत आलेल्या ऌकाराकरितां आहे व प्लुत वगैरे कार्यें होण्याकरितांही तो आहे. साहजिक रीत्या उच्चारलेल्या ऌकारयुक्त शब्दांविषयीं उपयोग दाखवावयाचा म्हणजे 'ऌतक' असें सहज एखाद्याचें नांव ठेवलें तर त्यांतील ऌवर्णाला अच् समजून कार्यें व्हावीत हा; उदाहरणार्थ—'दध्य्ॢतकाय देहि', 'मध्व्ॢतकाय देहि', 'उदङ्ङ्ॢतकोऽगमत्', 'प्रत्यङ्ङ्ॢतकोऽगमत्' या ठिकाणीं यण् संधि व ङमुडागम हीं कार्यें झालीं पाहिजेत. स्वाभाविक उच्चारलेलेही शब्द असूं शकतात. चार प्रकारचे शब्द उपयोगांत येतात—जातिवाचक शब्द, गुणवाचक शब्द, क्रियावाचक शब्द हे तीन प्रकार व स्वाभाविक रीत्या उच्चारलेले शब्द, विशेषनामें वगैरे, हा चौथा प्रकार. ऋकार उच्चारतां न आल्यामुळें उच्चारलेला जो ऌकार त्याच्या अनुकरणांत आलेल्या ऌकाराचें उदाहरण—समजा एखाद्या बोबड्या ब्राह्मण बाईनें ऋतक असा शब्द उच्चारावयाचा त्याच्या जागीं ऌतक शब्द उच्चारला, त्याचें अनुकरण करून आपण ऌकाराचा प्रयोग करून वाक्य उच्चारतों 'ब्राह्मण्य्ॢतक इत्याह', 'कुमार्य्ॢतक इत्याह'. या वाक्यांत यण् संधि व्हावा हा उपयोग होय. प्लुति वगैरे होण्याकरितांही ऌकाराचें उच्चारण प्रस्तुत माहेश्वरसूत्रांत करावयास पाहिजे.

---

१. येथें ऌतकशब्दांतील 'ऌ'कार हा अच् आहे असें समजून दधि शब्दांतील इकाराला व मधु शब्दांतील उकाराला 'इको यणचि' (६।१।७७) या सूत्रानें यकार व वकार आदेश झाले आहेत. उदङ्ङ्ॢतकः येथें ङमो ह्रस्वादचि० (८।३।३२) या सूत्रानें ङमुट् आगम झाला आहे.

२. 'वक्त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसे कल्पिलेले शब्द हे अपशब्दासारखेच होत असल्यामुळें तेथें शास्त्राची प्रवृत्तीच होणार नाहीं' अशी जी शंका येते तिचें 'यदृच्छा-शब्द हे अपशब्द नव्हेत' असें उत्तर येथें दिलें आहे. 'शब्दाचे प्रकार चार आहेत' हा पक्ष येथें गृहीत धरला आहे.

द्विर्वचनस्वरिताः । क्लृ ३ प्तशिख । क्लृप्प्तः । प्रक्लृप्तः । प्लुत्यादिषु कार्येषु क्लृपेर्लत्वं सिद्धं तस्य सिद्धत्वादच्कार्याणि न सिध्यन्ति । तस्माद्लृकारोपदेशः क्रियते ॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि ।

**न्याय्याभावात्कल्पनं संज्ञादिषु ॥२॥**

न्याय्यस्य ऋतकशब्दस्य भावात्कल्पनं संज्ञादिषु साधु मन्यन्ते । ऋतक एवासौ न लृतक इति ॥ अपर आह । न्याय्य ऋतकशब्दः शास्त्रान्वितोऽस्ति स कल्पयितव्यः साधुः संज्ञादिषु । ऋतक एवासौ न लृतकः ॥ अयं तर्हि यदृच्छाशब्दोऽपरिहार्यः । लृफिडः लृफिड्डः । एषोऽप्यृफिडः ऋफिड्डश्च । कथम् । अर्तिप्रवृत्तिश्चैव हि लोके लक्ष्यते फिडफिड्डावौणादिकौ प्रत्ययौ । त्रयी च शब्दानां प्रवृत्तिः ।

---

प्लुति वगैरे म्हणजे काय ?

प्लुति, द्वित्व आणि स्वरित. यांचीं क्रमानें उदाहरणें—'क्लृ३प्तशिखः' 'क्लृप्प्तः', 'प्रक्लृप्तः'. हींच तीन कार्यें सांगण्याचें कारण हें की, या तीन कार्यांविषयीं कृप् धातूच्या ऋकाराला झालेला लकार सिद्ध असतो, व तो सिद्ध असल्यामुळें त्याला ऋकाराच्या भावनेनें हीं तीन स्वरकार्यें होऊं शकत नाहींत. तीं होण्याकरितां लृकाराचें उच्चारण करावयास पाहिजे.

हे उपयोग देतां येत नाहींत.

योग्य 'ऋतक' शब्दच असल्यामुळें विशेषनामें वगैरेमध्यें ऋतक शब्दच योग्य म्हणून वापरला जावा; ऋतकच योग्य आहे; लृतक नाहीं.

दुसरा व्याख्याकार म्हणतो — योग्य ऋतक शब्द व्याकरणशुद्ध असल्यामुळें विशेषनामें वगैरेमध्यें तोच योग्य आहे. 'ऋतक' हाच खरा शब्द आहे, 'लृतक' हा त्याचा अपभ्रंश आहे.

बरें तर, लृफिड किंवा लृफिड्ड हा यदृच्छाशब्द म्हणजे स्वाभाविक रीत्या वापरलेला शब्द घ्या; हा निःसंशय लृयुक्त आहे; याचें दुसरें कोणतेंहि स्पष्टीकरण देतां येत नाहीं.

हाही पण ऋफिड किंवा ऋफिड्डच आहे.

तो कसा ?

'ऋ' धातूपासून साधलेले शब्द लोकांमध्यें[7] दिसतात; ऋफिड, ऋफिड्ड येथेंही हा 'ऋ' धातुच आहे; फिड व फिड्ड हे उणादि प्रत्ययांमधील प्रत्यय आहेत. लोकांमध्यें शब्द वापरले जाण्याच्या तीनच तऱ्हा आहेत. जाति-

---

३. क्लृ३प्तशिखः येथें 'गुरोरनृतो०' (८।२।८६) या सूत्रानें लकाराला प्लुत झाला आहे. क्लृप्प्तः येथें 'अनचि च' (८।४।४७) या सूत्रानें पकाराला द्वित्व झालें आहे. प्रक्लृप्तः येथें 'गतिरनन्तरः' (६।२।४९) या सूत्रानें 'प्र' या पूर्वपदांतील अकाराला प्रकृति-स्वर म्ह. उदात्त झाल्यामुळें त्याच्या पुढील लकाराला 'उदात्तादनु०' (८।४।६६) या सूत्रानें स्वरित झाला आहे. लकाराचा जर अक्षरसमाम्नायामध्यें पाठ केला नाहीं तर त्याला अच् म्हणतां येणार नाहीं आणि त्यामुळें हीं तिन्ही कार्यें होणार नाहींत.

४. व्याकरणावरून सिद्ध होणारा जो शब्द तोच नांव ठेवतांना नांव ठेवणारांनीं उपयोगांत आणिलेला असतो. ऋत् धातूहून क्वुन् प्रत्यय करून ऋतक शब्द सिद्ध होतो. लृतक शब्द सिद्ध होत नाहीं तेव्हां तो अपभ्रंशच होय.

५. एखाद्यानें लृतक असें नांव ठेविलें असें जरी आपल्याला भासतें तरी तेथें नांव ठेवणाराची चूक आहे. ऋतक असेंच त्याचें खरें नांव समजावें. एकंदरींत लृतक हा अपभ्रंश असल्यामुळें त्यांतील लकाराला अच्त्व येण्याकरतां लकाराचा ऋलृक् या सूत्रामध्यें पाठ करावयास नको.

६. जसा ऋतक हा व्याकरणशुद्ध शब्द आहे व लृतक हा त्याचा अपभ्रंश आहे तसें येथें कांहीं सांगतां येत नाहीं.

७. तेव्हां 'ऋ' धातूचा प्रयोग केवळ वेदामध्येंच होतो असें समजूं नये.

८. याप्रमाणें सर्व संज्ञांमध्यें प्रकृतिप्रत्ययाची कल्पना होत असल्यामुळें ते प्रायशः क्रियाशब्दामध्येंच गणले जातात. तेव्हां अर्थांतच शब्दांचे तीनच प्रकार आहेत हा पक्ष सिद्ध होतो.

जातिशब्दा गुणशब्दाः क्रियाशब्दा इति। न सन्ति यदृच्छाशब्दाः॥ अन्यथा कृत्वा प्रयोजनमुक्तमन्यथा कृत्वा परिहारः। सन्ति यदृच्छाशब्दा इति कृत्वा प्रयोजनमुक्तं न सन्तीति परिहारः। समाने चार्थे शास्त्रान्वितोऽशास्त्रान्वितस्य निवर्तको भवति। तद्यथा। देवदत्तशब्दो देवदिण्णशब्दं निवर्तयति न गाव्यादीन्। नैष दोषः। पक्षान्तरैरपि परिहारा भवन्ति॥

**अनुकरणं शिष्टाशिष्टाप्रतिषिद्धेषु यथा लौकिकवैदिकेषु ॥३॥**

अनुकरणं हि शिष्टस्य साधु भवति। अशिष्टाप्रतिषिद्धस्य वा नैव तद्दोषाय भवति नाभ्युदयाय। यथा लौकिकवैदिकेषु। यथा लौकिकेषु वैदिकेषु च कृतान्तेषु। लोके तावत्। य एवमसौ ददाति

---

वाचक शब्द, गुणवाचक शब्द व क्रियावाचक शब्द असे तीन प्रकारचे शब्द आहेत. यदृच्छाशब्द म्हणून कांहीं चवथ्या प्रकारचे शब्द आहेत.

एका तऱ्हेचें विधान[9] करून उपयोग सांगितला असतां दुसऱ्या तऱ्हेचें विधान[10] करून तो उपयोग संभवत नाहीं असें कसें म्हणतां येईल ? 'यदृच्छा' शब्द असूं शकतात असें विधान करून 'ऌ'कार उच्चारण्याचा उपयोग सांगितला; आणि 'यदृच्छा' शब्द नसतात असें विधान करून उपयोग नाहीं असें म्हटलें. हें करणें बरोबर[11] नाहीं. शिवाय शास्त्रीय कल्पनेनें सिद्ध होणाऱ्या शब्दानें शास्त्रीय कल्पनेनें सिद्ध न होणाऱ्या शब्दाचा जो बाध होतो तो त्या दोन्ही शब्दांचा एक अर्थ असेल तरच होतो. उदाहरणार्थ—देवदत्त शब्द शास्त्रीय रीतीनें शुद्ध म्हणून साधला गेला की तो 'देवदिण्ण' शब्द चूक आहे म्हणून ठरवतो; 'गावी' इत्यादि शब्द चूक आहेत असें तो देवदत्त शब्द ठरवूं शकत नाहीं.[12]

(वा.) एका तऱ्हेचें विधान करून केलेल्या आक्षेपाचा दुसऱ्या तऱ्हेचें विधान करूनही परिहार करतां[13] येतो.

अनुकरणाविषयीं बोलावयाचें म्हणजे शास्त्रसिद्ध शब्दांचें अनुकरण योग्य ठरतें. शास्त्रसिद्ध नसलेल्या व शास्त्रनिषिद्धही नसलेल्या शब्दाच्या अनुकरणापासून कांहीं दोषही लागत नाहीं किंवा कांहीं उत्कर्षही घडून येत[14] नाहीं. ज्याप्रमाणें लौकिक किंवा वैदिक बाबतींत असतें त्याप्रमाणेंच हें होय. लोकांमध्यें सुद्धां चांगल्या गोष्टीच्या अनुकरणापासून फायदा होतो. अशा प्रकारानें अमुक दान करतो, यजन करतो किंवा अध्ययन करतो, असें

---

९. शब्दांचे चार प्रकार आहेत असा पक्ष गृहीत धरून.

१०. शब्दांचे तीनच प्रकार आहेत असा पक्ष गृहीत धरून.

११. जो पक्ष घेऊन शंका केली असेल तोच पक्ष घेऊन तिचें निरसन केलें पाहिजे असा येथें अभिप्राय आहे. हा वार्तिकावर एक आक्षेप होय.

१२. त्याप्रमाणें 'ऌतक हा शब्द चूक आहे' असें ऋतक हा शब्द ठरवूं शकणार नाहीं. कारण ऋतक शब्दाचा अर्थ तिदक किंवा कनवाळु असा आहे. आणि ऌतक हें एका विशेष व्यक्तीचें नांव आहे. हा वार्तिकावर दुसरा आक्षेप होय.

१३. आक्षेपकानें गृहीत धरलेल्या तऱ्हेनेंच त्या आक्षेपाचें निरसन केलें पाहिजे असा कांहीं कोणीं नियम घालून दिला नाहीं. हें टीप ११ मध्यें दाखविलेल्या पहिल्या आक्षेपाचें उत्तर आहे. टीप १२ मध्यें दाखविलेल्या दुसऱ्या आक्षेपाचें उत्तर आहे की जरी 'ऌतक शब्द चुकीचा आहे' असें ऋतकशब्द ठरवूं शकत नाहीं तरी ऌतक शब्दाचा प्रयोग शिष्ट लोकांनीं केला नसल्यामुळें तो ऌतक हा शब्द साधुशब्द आहे असें म्हणतां येत नाहीं. हें उत्तर स्पष्टच आहे, म्हणून भाष्यकारांनीं त्याचा उल्लेख केला नाहीं. (उ.)

१४. तेव्हां अशा प्रकारचें अनुकरण केलें असतां तेथें 'इको यणचि' वगैरे शास्त्राची प्रवृत्ति होत नाहीं म्हणून त्याकरतां ऌकाराचा उपदेश करावयास नको.

य एवमसौ यजते य एवमसावधीत इति तस्यानुकुर्वन्दद्याच्च यजेत चाधीयीत च सोऽप्यभ्युदयेन युज्यते । वेदेऽपि । य एवं विश्वसृजः सत्त्राण्यध्यासत इति तेषामनुकुर्वंस्तद्वत्सत्त्राण्यध्यासीत सोऽप्यभ्युदयेन युज्यते ॥ अशिष्टाप्रतिषिद्धम् । य एवमसौ हिक्कति य एवमसौ हसति य एवमसौ कण्डूयतीति तस्यानुकुर्वन्हिक्केच्च हसेच्च कण्डूयेच्च नैव तद्दोषाय स्यान्नाभ्युदयाय ॥ यस्तु खल्वेवमसौ ब्राह्मणं हन्त्येवमसौ सुरां पिबतीति तस्यानुकुर्वन्ब्राह्मणं हन्यात्सुरां वा पिबेत्सोऽपि मन्ये पतितः स्यात् । विषम उपन्यासः । यश्चैवं हन्ति यश्चानुहन्त्युभौ तौ हतः । यश्च पिबति यश्चानुपिबत्युभौ तौ पिबतः । यस्तु खल्वेवमसौ ब्राह्मणं हन्त्येवमसौ सुरां वा पिबतीति तस्यानुकुर्वन्स्नातानुलिप्तो माल्यगुणकण्ठः कदलीस्तम्भं छिन्द्यात्पयो वा पिबेन्न स मन्ये पतितः स्यात् । एवमिहापि य एवमसावपशब्दं प्रयुङ्क्त इति तस्यानुकुर्वन्नपशब्दं प्रयुञ्जीत सोऽप्यपशब्दभाक्स्यात्। अयं त्वन्योऽपशब्दपदार्थकः शब्दो यदर्थ

असल्यामुळें जर दुसऱ्यानें त्याचें अनुकरण करून त्याच रीतीनें दान केलें, किंवा यजन केलें, किंवा अध्ययन केलें, तर त्याचा (दुसऱ्याचाही) फायदाच होता. वैदिक उदाहरण घ्यावयाचें म्हणजे या रीतीनें हे लोक विश्वसृज् सत्त्र करतात असें पाहून जर त्याच्यासारखें एखाद्यानें सत्त्राचें अनुकरण केलें तर त्याचाही अभ्युदय होतोच. आतां शास्त्रानें न सांगितलेल्या पण निषिद्ध नसलेल्या गोष्टींचें उदाहरण देतों. एखादा मनुष्य अशी उचकी देतो, किंवा असा हसतो किंवा असें खाजवतो, म्हणून त्याच्याप्रमाणें जर एखादा मनुष्य उचकी देईल, किंवा हसेल, किंवा खाजवील, तर त्यापासून त्याला दोषही लागावयाचा नाहीं किंवा त्याचा उत्कर्षही व्हावयाचा नाहीं. पण निषिद्ध बाबतीसंबंधानें मात्र प्रकार निराळा आहे. जर अमुक एक मनुष्य ब्राह्मणाला असें मारतो, किंवा अशा प्रकारें दारू पितो म्हणून दुसऱ्यानें त्याचें अनुकरण केलें व ब्राह्मणाला मारलें किंवा दारू प्याली, तर दुसऱ्याला दोष लागेलच व तो पतित होईलच.[१५]

बरोबर[१६] रीतीनें ही गोष्ट मांडली गेली नाहीं. कारण, जर कोणी एखादा हत्या करील व त्याचें पाहून त्याप्रमाणें दुसरा एखादा करील[१७], तर दोघेही मारण्याचा गुन्हा सारखाच करतात; त्याप्रमाणेंच जर कोणी एक दारू पितो असें पाहून त्याच्याचसारखा दुसरा पण दारू प्याला, तर दोघेही ते पिण्याचा गुन्हा सारखाच करितात; पण जर अमुक एक मनुष्य असें ब्राह्मणाला मारतो किंवा अशी दारू पितो असें पाहून केवळ त्याच्या क्रियेचें अनुकरण दुसऱ्यानें केलें व स्नान अनुलेपन करून गळ्यांत माळा घालून[१८] (स्वस्थ चित्तानें व उघड रीतीनें) केळीचा खुंट काटला किंवा दुधाचें प्राशन केलें, तर तो बहिष्कृत कधीं होणार नाहीं. त्याचप्रमाणें प्रस्तुत बाबतींतही आहे. एखादा मनुष्य अशा रीतीनें अशुद्ध शब्द उच्चारतो, म्हणून दुसऱ्यानें त्याच तऱ्हेनें तो अशुद्ध शब्दच जर प्रत्यक्ष उच्चारला, तर त्या दुसऱ्यावर अनुकरणानें जरी अपशब्द उच्चारला असला, तरी

१५. तेव्हां लतक या अपशब्दाचें अनुकरण केलें असतां जर पातक उत्पन्न होतें, तर त्याकरतां लकाराचा उपदेश करण्याचें मुळींच कारण नाहीं.

१६. येथून लकाराचा उपदेश अवश्य केला पाहिजे असें दाखवीत आहेत.

१७. अनुकरण करणाराही अनुकरण करतांना प्रत्यक्षच हत्या करील.

१८. यावरून त्याचें चित्त अस्वस्थ नाहीं व त्यामुळें तो निषिद्ध कर्म करण्यास प्रवृत्त होणारा नव्हे असें सूचित होतें.

उपदेशः कर्तव्यः । न चापशब्दपदार्थकः शब्दोऽपशब्दो भवति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । यो हि मन्यतेऽपशब्दपदार्थकः शब्दोऽपशब्दो भवतीत्यपशब्द इत्येव तस्यापशब्दः स्यात् । न चैषोऽपशब्दः ॥ अयं खल्वपि भूयोऽनुकरणशब्दोऽपरिहार्यो यदर्थ उपदेशः कर्तव्यः । साध्वॢकारमधीते । मध्वॢकारमधीत इति । कस्थस्य पुनरेतदनुकरणम् । क्लृपिस्थस्य । यदि क्लृपिस्थस्य क्लृपेश्च लत्वमसिद्धं तस्यासिद्धत्वादृकार एवाच्कार्याणि भविष्यन्ति । भवेत्तदर्थेन नार्थः स्यात् । अयं त्वन्यः क्लृपिस्थपदार्थकः शब्दो यदर्थ उपदेशः कर्तव्यः । न कर्तव्यः । इदमवश्यं वक्तव्यं प्रकृति-

---

अपशब्द उच्चारल्याची जबाबदारी पहिल्या माणसाइतकीच[19] येते; व तसा अनुकरण करून उच्चारलेला ऌतक शब्द अपशब्द असल्यामुळें त्याला कार्यें होण्याकरितां ऋऌक् सूत्रांतील ऌकाराचें उच्चारण अवश्य आहे असें नाहीं. पण प्रस्तुत 'ऌतक' शब्द हा अनुकरण करण्याकरितां उच्चारलेला 'ऌतक' शब्द नाहीं. तर 'ऌतक' हा अपशब्दच ज्याचा अर्थ आहे असा म्हणजे अपशब्दाला बोधक हा 'ऌतक' शब्द आहे[20]. व त्याला संधिकार्यें होण्याकरितां 'ऋऌक्' सूत्रांत 'ऌकार' उच्चारलाच पाहिजे. अपशब्दाला बोधक शब्द असला म्हणून तेवढ्यानें तो अपशब्द कधींच होत नाहीं. आणि ही गोष्ट मानणें अवश्यच आहे. कारण अपशब्दाला बोधक शब्द नियमानें अपशब्द होतो असें जर कोणी मानील तर त्याला 'अपशब्द' हा शब्द सुद्धां अपशब्द म्हणजे अशुद्ध शब्द आहे असें मानावें लागेल. वास्तविक पाहतां 'अपशब्द' हा अपशब्द म्हणजे अशुद्ध शब्द नाहीं. तेव्हां बोबड्या माणसानें उच्चारलेल्या 'ऌतक' शब्दाचा बोधक म्हणून उच्चारलेला जो ऌतक शब्द त्याला कार्यें होण्याकरितां 'ऋऌक्' सूत्रांत 'ऌ' घातला पाहिजे.

शिवाय पुढील उदाहरणांत दिलेला अनुकरणशब्द टाळतां येणें शक्यच नाहीं; व त्याच्याकरितां 'ऋऌक्' सूत्रांत 'ऌ' घातलाच पाहिजे. 'साध्वॢकारमधीते' 'मध्वॢकारमधीते' (हा मुलगा ऌकार छान म्हणत आहे; ऌकार गोड म्हणत आहे), हीं उदाहरणें पाहा.

पण कोठल्या ऌकाराचें हें अनुकरण आहे?

'क्लृप्' धातूमधल्या.

जर 'क्लृप्' धातूंतील ऌकाराचें हें अनुकरण असेल, तर कांहींच अडचण नाहीं. 'क्लृप्' धातूमध्यें असलेला जो ऋकाराला झालेला ऌकार तो यण् वगैरे कार्यांच्या दृष्टीनें असिद्ध म्हणजे झालेला नसल्यासारखाच असल्यामुळें तो 'ऋ'कार आहे, या दृष्टीनेंच तेथें संधिकार्यें होतील.

बरें, 'क्लृप्' धातूमधील जो ऌकार त्याला कार्यें होण्याकरितां 'ऋऌक्' सूत्रांत 'ऌ'कार नको; पण 'क्लृप्' धातूमधील जो ऌकार त्याचा वाचक असा जो ऌकार त्याचें अनुकरण म्हणून उच्चारला जाईल त्याला स्वरकार्य होण्याकरितां 'ऋऌक्' सूत्रांत 'ऌ' आवश्यक घातलाच पाहिजे.

---

१९. ऌतक हा ऋतक याचा अपभ्रंश आहे. ऋतक शब्दाचा अर्थ निंदक किंवा कनवाळू असा आहे. त्याच अर्थीं जर ऌतक शब्द वापरला तरच तो अपशब्द समजला जातो. ब्राह्मणीनें बोबडेपणामुळें ऋतक शब्दाच्या अर्थींच ऌतक शब्द उच्चारला व तिच्यासारखा त्याच अर्थीं दुसऱ्यानें ऌतक शब्द उच्चारला तर ते दोघेही अशुद्ध शब्द उच्चारणारे समजले जातात.

२०. ब्राह्मणीनें कसा शब्द उच्चारला तें दाखविण्याकरितां जर 'ब्राह्मणी ऌतक असें म्हणते' असें वाक्य दुसऱ्यानें उच्चारलें तर त्या वाक्यांतील ऌतक हा शब्द निंदक किंवा कनवाळू या अर्थाचा बोधक नाहीं, तर तो ब्राह्मणीच्या तोंडचा जो ऌतक हा अपशब्द त्याचा बोधक आहे. तेव्हां तो स्वतः अपशब्द होत नाहीं.

वदनुकरणं भवतीति । किं प्रयोजनम् । द्विः पचन्त्वित्याह । तिङतिङः [८.१.२८] इति निघातो यथा स्यात् । अग्नी इत्याह । ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम् [१.१.११] इति प्रगृह्यसंज्ञा यथा स्यात् । यदि प्रकृतिवदनुकरणं भवतीत्युच्यतेऽपशब्द एवासौ भवति कुमार्य्लृतक इत्याह ब्राह्मण्य्लृतक इत्याह । अपशब्दो ह्यस्य प्रकृतिः । न चापशब्दः प्रकृतिः । न ह्यपशब्दा उपदिश्यन्ते न चानुपदिष्टा प्रकृतिरस्ति ॥

**एकदेशविकृतस्यानन्यत्वात्प्लुत्यादयः ॥ ४ ॥**

एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति प्लुत्यादयोऽपि भविष्यन्ति । यद्येकदेशविकृतमनन्यवद्भवतीत्युच्यते राज्ञः क च [४.२.१४०] राजकीयम् अज्लोपोऽनः

---

त्याकरतां देखील घालण्यास नको; 'प्रकृति म्हणजे मूळ शब्द, त्यासारखें अनुकरण होतें, म्हणजे त्याचे धर्म अनुकरणांत[21] येतात,' हें तर अवश्य बोललेंच पाहिजे.

तें कशाकरितां ?

त्याचे उपयोग पुष्कळ आहेत. 'द्विः पचन्तु इत्याह' हें वाक्य घ्या; येथें 'द्विः पचन्तु' या अनुकरणांतील 'पचन्तु' याला तिङन्त समजून "तिङतिङः" (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्त होतो, हा एक उपयोग. 'अग्नी इत्याह' येथें अग्नी या अनुकरणांतील 'ई'-काराला द्विवचन समजून "ईदूदेद् द्विवचनं प्रगृह्यम्" ( १-१-११ ) या सूत्रानें प्रगृह्यसंज्ञा होते हा दुसरा उपयोग. येथें पचन्तु आणि अग्नी हे अनुकरण म्हणूनच उच्चारलेले शब्द आहेत; त्यांना अनुकार्यासारखीं कार्यें होण्याकरतां "प्रकृतीसारखें अनुकरण होतें," हें विधान करणें अवश्य आहे.

पण 'प्रकृतीसारखें अनुकरण होतें' हें जर विधान केलें, तर "कुमार्य्लृतक इत्याह", "ब्राह्मण्य्लृतक इत्याह" या वाक्यामध्यें 'लृतक' हा शुद्ध शब्द होणार नाहीं; तो अपशब्द होईल. कारण ज्याचें अनुकरण म्हणून तो उच्चारला आहे तो मूळचा 'लृतक' शब्द अपशब्द आहे.

हें म्हणणें बरोबर नाहीं. अपशब्द हा 'प्रकृति' म्हणजे मूळ शब्द आहे असें मानणें शक्य नाहीं. कारण अपशब्दांचा उपदेश कोणी कोठें करीत नाहीं, व उपदेश ज्याचा केला नाहीं असा शब्द 'प्रकृति' म्हणजे मूळ शब्द होत नाहीं. तेव्हां "कुमार्य्लृतक इत्याह" येथील 'लृतक' हा शुद्ध आहे; त्याला स्वरकार्यें होण्याकरितां 'ऋलृक्' सूत्रांत 'लृकार' घालणें आवश्यक आहे.

(वा.) बरें, वरतीं 'प्लुति वगैरे होण्याकरितांही लृकाराचें उच्चारण प्रस्तुत माहेश्वरसूत्रांत करावयास पाहिजे' असें जें लिहिलें आहे, त्यासंबंधानें म्हणावयाचें म्हणजे, "ज्याच्या एका भागाला विकृति झाली आहे, असा शब्द मूळ अविकृत शब्दापेक्षां निराळा समजूं नये" या साधारण[22] नियमामुळें प्लुति वगैरे कार्यें होतीलच.

जर "एका भागांत विकृत झालेला शब्द निराळा मानण्यांत येऊं नये" असें एवढेंच म्हटलें, तर "राजकीयम्" या उदाहरणांत "राज्ञः क च" (४।२।१४०) या सूत्रानें नकाराला ककार आदेश झाल्यावर राजन् शब्दापैकीं अक् हा भाग अन् आहे असें समजून 'अ'काराचा

---

२१. क्लृप् धातूमधील लृकार हा ऋकारच आहे असें समजून जर त्याच्या निमित्तानें स्वरकार्यें करतां येतात तर त्या लृकाराचें अनुकरण म्हणून उच्चारलेला जो लृकार त्याच्या निमित्तानेंही स्वरकार्यें होतीलच.

२२. या नियमामुळें क्लृ३प्तशिखः या उदाहरणामध्यें लृ हा ऋवर्णापेक्षां निराळा न समजल्यामुळें ऋ आहे असें समजून 'गुरोरनृतः०' (८।२।८६) या सूत्रानें प्लुत होईल. कारण ऋ मधील जो रेफासारखा भाग आहे तो फक्त 'कृपो रो लः' (८।२।१८) या सूत्रानें लकारासारखा झाला आहे. तेव्हां कृपो रो लः हें शास्त्र गुरोरनृतः० याच्या दृष्टीनें सिद्ध असलें तरी कांहीं येथें दोष येत नाहीं.

[६.४.१३४] इति लोपः प्राप्नोति । एकदेशविकृतमनन्यवत्षष्ठीनिर्दिष्टस्येति वक्ष्यामि । यदि षष्ठीनिर्दिष्टस्येत्युच्यते क्लृ३प्तशिख इति प्लुतो न प्राप्नोति । न ह्यत्र ऋकारः षष्ठीनिर्दिष्टः । कस्तर्हि । रेफः । ऋकारोऽप्यत्र षष्ठीनिर्दिष्टः । कथम् । अविभक्तिको निर्देशः । कृप उः रः लः कृपो रो लः [८.२.१८] इति । अथवा पुनरस्त्वविशेषेण । ननु चोक्तं राज्ञः क च राजकीयम् अल्लोपोऽन इति लोपः प्राप्नोतीति । नैष दोषः । वक्ष्यत्येतत् । श्वादीनां संप्रसारणे नकारान्तग्रहणमनकारान्तप्रतिषेधार्थमिति । तत्प्रकृतमुत्तरत्रानुवर्तिष्यते । अल्लोपोऽनो नकारान्तस्येति ॥ इह तर्हि क्लृ३प्तशिख इत्यनृत इति प्रतिषेधः प्राप्नोति ।

---

लोप "अल्लोपोऽनः" (६।४।१३४) या सूत्रानें होऊं लागेल.

तर मग "षष्ठी विभक्तींत घातलेल्या शब्दस्वरूपाविषयींच एका भागांत विकृत झालेला शब्द निराळा मानण्यांत येऊं नये" असा साधारण नियम [23] करूं.

जर "षष्ठी विभक्तींत घातलेल्या शब्दस्वरूपाविषयीं" असे शब्द जोडले तर "क्लृ३प्तशिखः" या उदाहरणांत 'ऌ' काराला प्लुत होणार नाहीं; कारण ज्या समजुतीनें प्लुत व्हावयाचा तो 'ऋ' कार षष्ठी विभक्तींत उच्चारला नाहीं म्हणून ऌकार ऋकार समजला जाणार नाहीं.

मग षष्ठी विभक्तींत कोणता शब्द तेथें उच्चारला आहे ?

रेफ उच्चारला [24] आहे.

'ऋ'काराचा सुद्धां 'षष्ठी' विभक्तींत उच्चार केला आहे.

तो कसा ?

"कृपो रो लः" (८।२।१८) या सूत्रांत 'कृप' हें विभक्तिप्रत्यय उच्चारल्याशिवाय षष्ठीचें रूप केलें आहे; व सूत्राचीं पदें 'कृप' 'उ' 'रः' 'लः' अशीं [25] आहेत.

अथवा 'षष्ठी विभक्तींत घातलेल्या' हीं पदें न लावतां "एका भागांत विकृत झालेला शब्द निराळा मानण्यांत येऊं नये" असाच साधारण नियम राहूं द्या.

पण तसें केल्यास वरतीं ना कांहीं दोष दाखविला, की "राजकीयम्" या उदाहरणांत "राज्ञः क च" (४।२।१४०) या सूत्रानें नकाराला ककार आदेश झाल्यावर "अल्लोपोऽनः" या सूत्रानें 'अ'काराचा लोप होऊं लागेल ?

हा दोष येत नाहीं; कारण "श्वयुवमघोना०" (६।४।१३३) या सूत्राचें व्याख्यान करते वेळीं वार्तिककार वार्तिक सांगणारच आहेत की, श्वन् वगैरे शब्द संप्रसारण करतांना नकार शेवटीं असलेले असेच घ्यावे; म्हणजे नकारान्त नसलेल्यांना संप्रसारण व्हावयाचें नाहीं. तें वार्तिक पुढील सूत्र 'अल्लोपोऽनः' (६।४।१३३) या सूत्रांतही दाखल होईल व नकार शेवटीं असलेल्या अशाच अन्नन्त अंगाच्या 'अन्' भागांतील अकाराचा लोप होईल.

पण, "क्लृ३प्तशिखः" या उदाहरणांत 'अनृतः'(८.२.८६)असाप्लुताचा निषेध होईल कारण त्याला अन् अशा शब्दस्वरूपाची जरूर आहे.

---

२३. 'राज्ञः क च' या सूत्रामध्यें राज्ञः ही राजन् शब्दाची षष्ठी आहे. तेव्हां 'राजक्' हा राजन् शब्द आहे, असें मानतां येईल. परंतु अनः अशी अन् शब्दाची षष्ठी तेथें नसल्यामुळें अक् हा अन् आहे असें मानतां येणार नाहीं. त्यामुळें राजकीयम् येथें 'अल्लोपोनः' यानें लोप होणार नाहीं.

२४. 'कृपो रो लः' या सूत्रामध्यें रः ही षष्ठी र् या व्यंजनाची आहे. ऋ या स्वराची नव्हे. ऋ याची षष्ठी 'उः' अशी होत असते.

२५. तेव्हां येथें 'उः' ही 'ऋची' षष्ठी उच्चारलीच आहे. तेव्हां ऌ हा ऋ समजतां येईल.

रवत्प्रतिषेधाच्च ॥५॥

रवत्प्रतिषेधाच्चैतात्सिध्यति । गुरोररवत इति वक्ष्यामि । यद्यरवत इत्युच्यते होतृ ऋकार होतृ३कार अत्र न प्राप्नोति । गुरोररवतो ह्रस्वस्येति वक्ष्यामि ॥ स एष सूत्रभेदेन ऌकारोपदेशः प्लुत्याद्यर्थः सन्प्रत्याख्यायते सैषा महतो वंशस्तम्बाल्लट्वानुकृष्यते ॥

## ए ओ ङ् ॥३॥ ऐ औ च् ॥४॥

इदं विचार्यते । इमानि संध्यक्षराणि तपराणि चोपदिश्येरन् । एत् ओत् ङ् । ऐत् औत् च् इति । अतपराणि वा यथान्यासमिति । कश्चात्र विशेषः ।

संध्यक्षरेषु तपरोपदेशश्चेत्तपरोच्चारणम्।

संध्यक्षरेषु तपरोपदेशश्चेत्तपरोच्चारणं कर्तव्यम् ॥

प्लुत्यादिष्वज्विधिः ॥२॥

प्लुत्यादिष्वजाश्रयो विधिर्न सिध्यति ।

---

व "क्लृ३प्तशिखः" हें रूप साधणार[२६] नाहीं.

(वा.) 'गुरोरनृतः०' (८।२।८६) सूत्रांत 'अनृतः'च्या जागीं 'अरवतः' असें म्हणावें असें पुढें सांगावयाचें आहे. तेव्हां 'ज्यामध्यें रेफ आहे त्याला प्लुत होत नाहीं' असा अर्थ होऊन 'क्लृ३प्तशिखः' येथें 'रेफ' नस ल्यामुळें प्लुत होईल व 'क्लृ३प्तशिखः' रूप साधेल.

पण जर 'अनृतः'च्या ऐवजीं 'अरवतः' असें केलें तर होतृ+ऋकारः याचा संधि होऊन झालेल्या 'होतॄकारः' शब्दांत प्लुत होणार नाहीं. कारण एकादेशानें झालेला जो दीर्घ ऋकार तो रेफयुक्त आहे व त्यामुळें 'अरवतः' हा निषेध होईल.

तर मग 'गुरोः अरवतः ह्रस्वस्य०' अशा तऱ्हेचें[२७] सूत्र करूं म्हणजे सर्व साधेल.

साधेल खरें, पण तसें करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण 'गुरोरनृतः०' इत्यादि सूत्राच्या ऐवजीं 'गुरोररवतो ह्रस्वस्य०' इत्यादि जास्ती मोठें सूत्र करून मग 'ऋऌक्' या माहेश्वरसूत्रांत 'प्लुत वगैरे व्हावेत' या अभिप्रायानें उच्चारलेला ऌकार जरूर नाहीं म्हणून तो काढून टाकणें म्हणजे मोठ्या वेळूच्या काठीवर चढून एखादी लट्वा (चिमणी किंवा बारीक फळ) तोडून काढण्यापैकींच प्रकार होतो.

(मा. सू. ३,४) या ठिकाणीं हें विचारण्यांत येतें की, हीं संध्यक्षरें ए, ऐ, ओ, औ या प्रत्येकाच्या पुढें त् हें व्यंजन जोडून 'एत् ओत् ङ्', 'ऐत् औत् च्' अशीं उच्चारावीं; अथवा तकार न जोडतां जशीं उच्चारलीं आहेत तशींच ठेवावीं ?

दोहींमध्यें फरक काय पडतो ?

(वा. १) संध्यक्षरांमध्यें तकार घालण्याचें[१] फल असेल तर तकार पुढें जोडून संध्यक्षरें उच्चारावयास पाहिजेत.

---

२६. ऌ हा ऋ आहे असें समजून तो अच् आहे म्हणून प्लुत करावा तर मुळींच करतां येणार नाहीं. कारण 'अनृतः' म्हणजे ऱ्हस्वऋकारभिन्न वर्णाला असें त्या सूत्रांत म्हटलें आहे. तेव्हां कृष्ण३ येथें जसा ऋकाराला कधींच प्लुत होत नाहीं तसा क्लृ३प्तशिखः येथें होणार नाहीं.

२७. म्हणजे रेफयुक्त जो ऱ्हस्व ऋकार त्यालाच फक्त प्लुताचा निषेध होईल. होतॄ३कारः येथें दीर्घ ॠकाराला प्लुताचा निषेध होणार नाहीं.

१. येथें ए, ओ वगैरे दीर्घांना तकार जोडला आहे म्हणून 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें दीर्घांचेंच ग्रहण केलें जाईल. आणि एकार वगैरे प्लुत असतील तर त्यांना अच् संज्ञा होणार नाहीं.

२. जर तकार जोडला नाहीं तर एकमात्रिक एकार, ओकार वगैरेंना अच् संज्ञा होऊन ऱ्हस्व संज्ञा होईल. आणि बिभेति, चित्रगुः या ठिकाणीं एकार व ओकार यांना 'ऱ्हस्व' (७।४।५९) व 'गोस्त्रियो०' (१।२।४८) या सूत्रांनीं ऱ्हस्व होतांना एकमात्रिक एकार, ओकार होतील. ते होऊं नयेत याकरतां येथें दीर्घांच्या पुढें तकार जोडला पाहिजे. 'फल असेल' असें म्हणण्याचें कारण हें की, हीं चारही संध्यक्षरें एकमात्रिक अशीं अस्तित्वांतच नाहींत. त्यामुळें एकार वगैरेंना ऱ्हस्व होतांना एकमात्रिक एकार वगैरे आदेश होण्याचा संभव नाहीं.

गो३त्रात नौ३त्रात इत्यत्रानचि च [८.४.४७] इत्यच उत्तरस्य यरो द्वे भवत इति द्विर्वचनं न प्राप्नोति । इह च प्रत्यङ्ङ्३तिकायन उदङ्ङ्३पगव इत्यचि [८.३.३२] इति ङमुण्न प्राप्नोति ॥

प्लुतसंज्ञा च ॥३॥

प्लुतसंज्ञा च न सिध्यति । ऐ३तिकायन औ३पगव । ऊकालोऽज्झ्रस्वदीर्घप्लुतः [१.२.२७] इति प्लुतसंज्ञा न प्राप्नोति ॥ सन्तु तर्ह्यतपराणि ।

अतपर एच इग्घ्रस्वादेशे ॥४॥

यद्यतपराण्येच इग्घ्रस्वादेशे [१.१.४८.] इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । एचो ह्रस्वादेशशासनेष्वर्ध एकारोऽर्ध ओकारो वा मा भूदिति । ननु च यस्यापि तपराणि तेनाप्येतद्वक्तव्यम् । इमावैचौ समाहारवर्णौ मात्रावर्णस्य मात्रेवर्णोवर्णयोस्तयोर्ह्रस्वादेशशासनेषु कदाचिदवर्णः स्यात्कदाचिदिवर्णोवर्णौ मा कदाचिदवर्णं भूदिति । प्रत्याख्यायत एतत् । ऐचोश्चोत्तरभूयस्त्वादिति । यदि प्रत्याख्यानपक्ष इदमपि प्रत्याख्यायते ।

---

(वा.२) दुसरें, तकार जोडून संध्यक्षरें उच्चारलीं तर ए, ओ वगैरे प्लुत स्वरांना मागून होणारीं अचांचीं कार्यें व्हावयाचीं नाहींत; 'गो३त्रात', 'नौ३त्रात' या ठिकाणीं 'अनचि च' (८।४।४७) या सूत्रानें 'ओ३' व 'औ३' हें अच् नसल्यामुळें यर् जो 'त'कार त्याला द्वित्व होणार नाहीं. त्याचप्रमाणें 'प्रत्यङ्ङै३तिकायनः', 'उदङ्ङौ३पगवः' या ठिकाणीं ऐ व औ हे अच् नसल्यामुळें अच् पुढें असतांना म्हणून सांगितलेला 'ङमुट्' आगम (८।३।३२) होणार नाहीं. फार काय,

(वा. ३) 'ऐ३तिकायन', 'ओ३पगव' या ठिकाणीं 'ऐ'कार व 'औ'कार यांना 'ऊकालोऽज्झ्रस्वदीर्घप्लुतः' (१।२।७) या सूत्रानें त्रिमात्र अचाला सांगितलेली प्लुतसंज्ञाच होणार नाहीं; कारण तीन मात्रा असलेल्या 'ऐ'काराला किंवा 'औ'काराला सूत्रांतील तकारोच्चारणामुळें अच् असें म्हणतां येणार नाहीं.

बरें, तर हे दोष येऊं नयेत म्हणून 'त'-कार पुढें जोडूं नका.

(वा.१) जर तकार जोडून उच्चार केला नाहीं, तर एच इग्घ्रस्वादेशे (१।१।४८) हें सूत्र अवश्य पढलें पाहिजे; तें गाळतां येत नाहीं.

तें कशाकरितां ?

ए, ऐ ओ व औ यांना ह्रस्व करते वेळीं अर्धा 'ए'कार व अर्धा 'ओ'कार हे होऊं नयेत याकरितां.

बरें, पण 'त'कार लावून जो उच्चारण करील त्यानेंही 'एच इग्घ्रस्वादेशे' (१।१।४८) हें सूत्र अवश्यच पढलें पाहिजे; कारण ऐ व औ हे संयुक्त वर्ण आहेत, त्यांची एक मात्रा 'अ' वर्णाची आहे आणि दुसरी मात्रा 'इ' वर्णाची किंवा 'उ' वर्णाची आहे; तेव्हां त्यांना ऱ्हस्व कर्तव्य असतांना कदाचित् अकार होईल व कदाचित् इकार किंवा उकार होईल; त्यांपैकीं 'अ'कार कधींही होऊं नये म्हणून 'एच इग्घ्रस्वादेशे' हें सूत्र अत्यंत आवश्यकच[३] आहे.

पण ऐ आणि औ यांच्याकरितां हें सूत्र आवश्यक नाहीं म्हणून सांगितलें आहे (१.१.४८ वा.४) त्याला कारण 'ऐ आणि औ यांमध्यें पुढचा वर्ण म्हणजे इकार अथवा उकार यांचा जास्ती भाग आहे' असें दिलें[४] आहे.

तुम्ही (तपर करणारांनीं) जर हा सूत्र-प्रत्या-

---

३. एत्, ओत् असा द्विमात्रिकापुढें तकार जोडण्यानें ए, ओ वगैरे एकमात्रिकांना अच् व ऱ्हस्व असें कांहींच म्हणतां येत नाहीं. त्यामुळें एकमात्रिक एकार वगैरेंची निवृत्ति होण्याकरतां जरी सूत्र करावें लागलें नाहीं तरी अकाराची विवृति होण्याकरतां सूत्र करावेंच लागतें.

४. तेव्हां ऐ आणि औ यांमध्यें अकाराचा भाग इकार उकाराच्या भागापेक्षां कमी असल्यामुळें ऐ आणि

सिद्धमेङः सस्थानत्वादिति । ननु चैङः सस्थानतरावर्ध एकारोऽर्ध ओकारश्च । न तौ स्तः । यदि हि तौ स्यातां तावेवायमुपदिशेत् । ननु च भोश्छन्दोगानां सात्यमुग्रिराणायनीया अर्धमेकारमर्धमोकारं चाधीयते । सुजाते एॅ अश्वसूनृते । अध्वर्यो औॅ अद्रिभिः सुतम् । शुक्रं ते एॅ अन्यद्यजतं ते एॅ अन्यदिति । पार्षदकृतिरेषा तत्रभवतां नैव हि लोके नान्यस्मिन्वेदेऽर्ध एकारोऽर्ध ओकारो वास्ति ॥

## एकादेशे दीर्घग्रहणम् ॥५॥

एकादेशे दीर्घग्रहणं कर्तव्यम् । आद्गुणो [६.१.८७] दीर्घः । वृद्धिरेचि [६.१.८८] दीर्घ इति । किं प्रयोजनम् ।

ख्यानाचा पक्ष घेतला तर तो 'ऐ' व 'औ' यांजपुरताच काय म्हणून ?

'ए'कार व 'ओ'कार यांकरितांही हें सूत्र आवश्यक नाहीं म्हणून सांगितलें आहे व त्याला कारण 'ए' व 'ओ' यांना ऱ्हस्व व्हावयाचा तो इकार किंवा उकारच होईल; कारण 'इ'कार व 'ए'कार यांचें एकच तालुस्थान, तसेंच 'उ'कार व 'ओ'कार यांचें एकच ओष्ठस्थान [५] आहे.

बरें, पण स्थानामुळें सान्निध्य घेऊन ऱ्हस्व ठरवावयाचा म्हटल्यास अर्धा एकार किंवा अर्धा ओकार हे स्थानानें 'इ'कार व 'उ'कार यांपेक्षांही जास्ती जवळचे [६] होतात.

पण ते शास्त्रांत नाहींत त्याचें काय करावयाचें ? ते जर शास्त्रांत असते, तर ज्याप्रमाणें 'अ'कार 'इ'कार उच्चारले आहेत, त्याप्रमाणें तेच उच्चारले [७] असते.

पण सामवेदाचें अध्ययन करणाऱ्यांपैकीं सात्यमुग्रि आणि राणायनीय शाखेचे लोक हे अर्धा एकार व अर्धा ओकार म्हणतात. उदाहरणार्थ, "सुजाते एॅ अश्व सूनृते" "अध्वर्यो ओॅ अद्रिभिः सुतम्", "शुक्रं ते एॅ अन्यत्", "यजतं ते एॅ अन्यत्" हीं वैदिक वाक्यें पाहा; येथें अर्धा 'ए'कार व अर्धा 'ओ'कार दृष्टीस पडतात.

पण हा अर्धा 'ए'कार किंवा अर्धा 'ओ'कार ही निव्वळ प्रातिशाख्यकारांची कल्पना [८] आहे. लोकांमध्यें काय किंवा इतर वेदांमध्यें काय, कोठेंही अर्धा 'ए'कार किंवा अर्धा 'ओ'कार दृष्टीस पडत नाहीं.

(वा. ५) शिवाय, या सूत्रांत ए,ऐ, ओ व औ यांच्यापुढें 'त'कार जोडला नाहीं तर एकादेश सांगणाऱ्या सूत्रांत 'दीर्घ' शब्द घालावा लागेल. उदाहरणार्थ 'आद् गुणो दीर्घः', 'वृद्धिरेचि दीर्घः' अशीं सूत्रें (६।१।८७,८८) करावीं लागतील.

तीं कशाकरितां ?

---

औ यांना अकारापेक्षां इकार उकार हेच जास्त जवळचे होतात. म्हणून त्यांना ऱ्हस्व होतांना 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें तेच होतील, अकार होणार नाहीं.

५. एकार व ओकार यांचें अकाराबरोबर स्थान जमत नाहीं म्हणून त्यांना ऱ्हस्व होतांना अकार होत नाहीं. एकाराचें कंठतालुस्थान नाहीं. त्याचें शुद्धतालुस्थान आहे. तसेंच ओकाराचें कंठोष्ठस्थान नाहीं. त्याचें शुद्ध ओष्ठस्थान आहे, असें येथें भाष्यकारांनीं गृहीत धरलें आहे.

६. एकार व इकार या दोघांचें तालुस्थान आहे खरें, पण त्यांत एकाराचें जें तालुस्थान आहे तो तालूचा भाग कंठाजवळचा आहे. एकमात्रिक एकाराचा तसाच आहे. आणि इकाराचें जें तालुस्थान आहे तो तालूचा भाग दंताजवळचा आहे. एकार वगैरे हे दीर्घ म्हणजे दोन मात्रेचे नेहमीं उच्चारले जातात. त्या मानानें अर्धा एकार म्ह. एकमात्रिक एकार होय, व अर्धा ओकार म्ह. एकमात्रिक ओकार होय.

७. कारण द्विमात्रिक ए वगैरे उच्चारण्यापेक्षां एकमात्रिक उच्चारण्यांत लाघव आहे. म्हणूनच अ, इ, उ वगैरे इतर वर्ण एकमात्रिकच उच्चारले आहेत.

८. त्या शाखेमध्यें उद्गातानामक ऋत्विज जेव्हां सामगायन करतो तेव्हां गातांना त्याच्या तोंडांतून अर्धा एकार उच्चारला जातो. गाण्याच्या लकेरीमध्यें एकाराचा अर्धवट उच्चार झाला म्हणून तेवढ्यावरून कांहीं तो स्वतंत्र वर्ण ठरत नाहीं.

आन्तर्यतास्त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा मा भूवन्निति। खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः। खट्वा उदकं खट्वोदकम्। खट्वा ईषा खट्वेषा। खट्वा ऊढा खट्वोढा। खट्वा एलका खट्वैलका। खट्वा ओदनः खट्वौदनः। खट्वा ऐतिकायनः खट्वैतिकायनः। खट्वा औपगवः खट्वौपगवः॥ तत्तर्हि दीर्घग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। उपरिष्टाद्योगविभागः करिष्यते। अकः सवर्णे एको भवति। ततो दीर्घः। दीर्घश्च स भवति यः स एकः पूर्वपरयोरित्येवं निर्दिष्ट इति। इहापि तर्हि प्राप्नोति। पशुं विद्धम् पचन्तीति। नैष दोषः। इह तावत्पशुमित्यम्येक इतीयता सिद्धम्। सोऽयमेवं सिद्धे सति यत्पूर्वग्रहणं करोति तस्यैत-

ज्या दोन वर्णांच्या जागीं होणारे आदेश व्हावयाचे ते दोन स्थानीं मिळून तीन किंवा चार मात्रा होत असल्यास त्यांच्या जागीं होणारे आदेश तीन किंवा चार मात्रांचे होतील ते होऊं नयेत.[९] उदाहरणार्थ पुढील उदाहरणें घ्या---खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः, खट्वा उदकं खट्वोदकम्, खट्वा[१०] ईषा खट्वेषा, खट्वा ऊढा खट्वोढा, खट्वा एलका खट्वैलका, खट्वा ओदनः खट्वौदनः, खट्वा एतिकायनः खट्वैतिकायनः, खट्वा औपगवः खट्वौपगवः.

तर मग त्या एकादेश सांगणाऱ्या सूत्रांत 'दीर्घ' शब्द घातला पाहिजे.

न घातला तरी चालेल. गुणवृद्धि सांगणाऱ्या सूत्रांच्या (६।१।८७,८८) पुढें दीर्घ सांगणाऱ्या सूत्रांचा (६।१।१०१) विभाग करतां येईल. 'अकः सवर्णे' हा पहिला भाग, त्याचा अर्थ 'अक्' स्वराला सवर्ण स्वर पुढें असतां दोहींना मिळून एक आदेश होतो. नंतर दुसरा भाग 'दीर्घः' हा; त्याचा अर्थ 'एकः पूर्वपरयोः' (६।१।८४) या अधिकारामध्यें जो कोणत्याही सूत्रानें एकादेश सांगितला आहे तो एकादेश दीर्घ होतो.

पण तसें केल्यास 'पशुम्',[११] 'विद्धम्', 'पचन्ति', या उदाहरणांतही जो एकादेश होतो, तोही दीर्घ होऊं लागेल.

हा दोष येणार नाहीं; 'अमि पूर्वः' (६।१।१०७) या सूत्रानें पूर्वरूप होऊन साधणारें 'पशुम्' हें उदाहरण घ्या; 'अमि पूर्वः'

९. येथें आकाराच्या दोन मात्रा आणि इकाराची एक मात्रा आहे. मिळून ह्या दोन स्थानींच्या तीन मात्रा होतात. त्या दोन वर्णांचे स्थानीं होणारा जो गुण एकार तो स्थानीसारखा तीन मात्रांचा म्ह. प्लुत होऊं लागेल. एओङ्, ऐऔच् या सूत्रांत एकार वगैरेंच्या पुढें तकार जोडला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण तेथें ए, ओ वगैरे संध्यक्षरें द्विमात्र उच्चारलीं आहेत. तपरकरण केलें आहे म्हणून 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्राच्या जोरावर त्या द्विमात्र एकार वैगरेंनीं त्रिमात्र, चतुर्मात्र अशा एकार वगैरेंचें ग्रहण होत नाहीं. तेव्हां त्या त्रिमात्र, चतुर्मात्र एकार वगैरेंना एङ् व एच् म्हणतां येत नसल्यामुळें त्यांना वृद्धिरादैच् (१।१।१) व 'अदेङ् गुणः' (१।१।२) या सूत्रांनीं वृद्धि व गुण या संज्ञाच होत नाहींत.

१०. येथें आकाराच्या दोन मात्रा आणि पुढील ईकाराच्या दोन मात्रा मिळून चार मात्रा होतात. तेव्हां त्यांचे स्थानीं होणारा गुण चार मात्रांचा एकार होईल.

११. 'पशुम्' येथें पशु शब्दाच्या पुढें अम् प्रत्यय केला असतां पशु शब्दांतील उकार आणि अम् प्रत्ययांतील अकार या दोन वर्णांचे स्थानीं 'अमि पूर्वः' (६।१।१०७) या सूत्रानें ऱ्हस्व उकार एकादेश झाला आहे. तसेंच 'विद्धम्' येथें व्यध् धातूच्या पुढें क्त प्रत्यय आणि व्यध् धातूमधील यकाराला 'ग्रहिज्या०' (६।१।१६) या सूत्रानें संप्रसारण इकार झाल्यानंतर तो इकार आणि त्याच्या पुढील अकार या दोन वर्णांचे स्थानीं 'संप्रसारणाच्च' (६।१।१०८) या सूत्रानें ऱ्हस्व इकार एकादेश झाला आहे. तसेंच 'पचन्ति' येथें पच् धातूच्या पुढें लट् प्रत्यय, त्याला झि आदेश, त्या झकाराला अन्त् आदेश आणि मध्यें शप् प्रत्यय होऊन पच्+अ+अन्ति अशी स्थिति असतांना त्यांतील दोन अकारांचे स्थानीं 'अतो गुणे' (६।१।९७) या सूत्रानें ऱ्हस्व अकार एकादेश झाला आहे.

**त्प्रयोजनं यथाजातीयकः पूर्वस्तथाजातीयक उभयोर्यथा स्यादिति। विद्धमिति पूर्व इत्येवानुवर्तते। अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानेन संप्रसारणस्य दीर्घो भवतीति यदयं हल उत्तरस्य संप्रसारणस्य दीर्घत्वं शास्ति। पचन्तीत्यतो गुणे पर इतीयता सिद्धम्। सोऽयमेवं सिद्धे सति यद्रूपग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं यथाजातीयकं परस्य रूपं तथाजातीयकमुभयोर्यथा स्यादिति॥ इह तर्हि खट्वर्श्यः मालर्श्य इति दीर्घवचनादकारो नानान्तर्यादेकारौकारौ न। तत्र को दोषः। विगृहीतस्य श्रवणं प्रसज्येत। न ब्रूमो यत्र क्रियमाणे दोषस्तत्र कर्तव्यमिति।**

---

या सूत्राच्या ऐवजीं 'अम्ये[१२] कः' असें लहान सूत्र केल्यानें भागत असतांही ज्या अर्थी आचार्य पाणिनि 'अमि पूर्वः' असें सूत्र करतात, त्या अर्थी त्यांचा हा हेतु दिसतो की, जशा प्रकारचा मागचा स्वर आहे, तशा प्रकारचाच एक आदेश दोन्ही स्वरांच्या जागीं व्हावा.[१३] 'विद्धम्' उदाहरण घ्या. येथें 'ग्रहिज्या०' (६।१।१६) सूत्रानें संप्रसारण झालें आहे व नंतर 'संप्रसारणाच्च' (६।१।१०८) या सूत्रानें पूर्वरूप झालें आहे. संप्रसारणाच्च या सूत्रांतही 'पूर्वः' हा शब्द मागील सूत्रांतून येतोच. तेव्हां वरतीं लिहिल्याप्रमाणेंच सर्व समजावयाचें; अथवा, ज्या अर्थी आचार्य पाणिनींनीं 'हलः' (६।४।२) हें सूत्र करून व्यंजनाच्या पुढें असणाऱ्या संप्रसारणाला दीर्घ सांगितला आहे त्या अर्थी 'संप्रसारणाच्च' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश करतांना दीर्घ करावयाचा नाहीं असें त्यांचें मत दिसतें. आतां राहिलेलें 'पचन्ति' उदाहरण घ्या. येथें 'अतो गुणे' (६।१।९७) या सूत्रानें पच येथील 'अ'कार व 'अन्ति' येथील अकार या दोहींना मिळून पराचें म्हणजे अन्ति येथील अकाराचें रूप होतें. 'अतो गुणे' येथें 'एङि पररूपम्' (६।१।९४) या मागील सूत्रांतून 'पररूपम्' शब्द येतो. 'पररूपम्' याच्या ऐवजीं 'परः' म्हणून चालत असतां सुद्धां ज्या अर्थी आचार्य पाणिनि 'रूप' हा शब्द जास्ती उच्चारतात त्या अर्थी त्यांचा हेतु दिसतो की, ज्या प्रकारचें म्हणजे जितक्या मात्रांचें पुढील स्वराचें रूप आहे त्याच प्रकारचें स्वरूप दोघांचें मिळून व्हावें.

बरें, जाऊं देत हीं उदाहरणें.[१४] खट्वर्श्यः, मालर्श्यः हीं उदाहरणें घ्या. येथें 'आ'कार आणि 'ऋ'कार यांच्या जागीं एकादेश (गुण) दीर्घ होतो, असें म्हटल्यानें 'आ'कार या स्थानीला जवळचा जरी 'अ'कार आहे तरी तो होणार नाहीं; व जवळचे नसल्यामुळें 'ए'कार किंवा 'ओ'कार होणार नाहींत.

मग त्यांत काय बिघडेल?

संधि न होतांच दोन्ही स्वरांचें श्रवण होईल; कारण दुसरा इलाजच नाहीं.

एकादेश कर्तव्य असतांना दीर्घ ग्रहण

---

१२. 'एक' हा शब्द 'एकः पूर्वपरयोः' (६।१।८४) या अधिकारांतील 'एक' शब्दाचा अनुवाद आहे. वास्तविक विचार केला तर 'अमि' एवढ्यानेंच काम भागणार आहे. 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' (६।१।१०२) या सूत्रांतून पूर्वसवर्णः या पदाची अनुवृत्ति होईल.

१३. तेव्हां अर्थातच या 'पूर्व' शब्दाच्या जोरावर 'एकादेश दीर्घ होतो' या सामान्य नियमाचा येथें बाध होईल.

१४. येथें खट्वा यांतील दीर्घ आकार आणि त्याच्या पुढील ऋकार या दोन वर्णांचे स्थानीं एकादेश गुण होतो. अ, ए, ओ या तीन गुणांपैकीं ऋकाराला कोणीच जवळचा नाहीं. ऋकाराचें मूर्धस्थान आहे आणि अ, ए, ओ या तिघांपैकीं मूर्धस्थान कुणाचेंच नाहीं. आकाराला मात्र कंठस्थानचा अकार हा जवळचा आहे म्हणून तोच येथें 'आद्गुणः' (६।१।८७) या सूत्रानें आदेश होतो व तो 'उरण्परः' (१।१।५१) या सूत्रानें रपर होतो म्ह. अर् असा येथें गुण होतो.

**किं तर्हि । यत्र क्रियमाणे न दोषस्तत्र कर्तव्यमिति । क्व च क्रियमाणे न दोषः । संज्ञाविधौ । वृद्धिरादैज् [१.१.१] दीर्घः अदेङ्गुणो [२] दीर्घ इति ॥ तत्तर्हि दीर्घग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । कस्मादेवान्तर्यतस्त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा न भवन्ति। तपरे गुणवृद्धी । ननु च तः परो यस्मात्सोऽयं तपरः । नेत्याह । तादपि परस्तपर इति । यदि तादपि परस्तपर ऋदोरप् [३.३.५७] इतीहैव स्यात् । यवः स्तवः । लवः पव इत्यत्र न स्यात् । नैष तकारः । कस्तर्हि । दकारः । किं दकारे प्रयोजनम् । अथ किं तकारे ।**

करावें या वार्तिकाचा अर्थ आम्ही असा म्हणत नाहीं की ज्या सूत्रामध्यें 'एकादेश दीर्घ होतो' असें सांगण्यानें दोष येतो, तेथें 'एकादेश दीर्घ होतो' असें सांगावें.

तर मग तुम्ही काय म्हणतां ?

आम्ही असें म्हणतों की ज्या ठिकाणीं 'एकादेश दीर्घ होतो' असें सांगण्यानें दोष येत नाहीं, तेथें 'एकादेश दीर्घ होतो' असें सांगावें; व तेथें 'दीर्घ' शब्द घालावा.

कोणत्या ठिकाणीं 'दीर्घ' शब्द घातला असतां दोष येत नाहीं ?

जेथें 'वृद्धि' व 'गुण' या संज्ञांचें स्वरूप सांगितलें आहे, त्या सूत्रांत. उदाहरणार्थ 'वृद्धिरादैच् दीर्घः', 'अदेङ् गुणो दीर्घः' अशीं सूत्रें करावीं.

बरें, तर घाला तेथें 'दीर्घ' शब्द आणि फिरवा सूत्रें.

दीर्घ शब्द घालण्यास नको.

तर मग, तीन मात्रा किंवा चार मात्रा असलेल्या स्थानींच्या जागीं जेव्हां 'गुण' किंवा 'वृद्धि' आदेश होतील, तेव्हां ते तीन किंवा चार मात्रांनीं युक्त असे आदेश काय म्हणून होणार नाहींत ?

गुण व वृद्धि या संज्ञा सांगणाऱ्या सूत्रांमध्यें 'तपर'[१५] उच्चारण केलें आहे म्हणून.

पण 'तपर' याचा अर्थ 'त'कार ज्याच्यापुढें आहे असाच अर्थ करावयाचा ना ?

आम्ही म्हणतों असाच अर्थ करावयाचा असें नाहीं तर तकाराच्या पुढें जो असतो तो तपर असाही अर्थ करावयाचा.

जर तकाराच्या पुढें असलेल्या वर्णालाही तपर म्हटलें, तर 'ऋदोरप्'(३।३।५७) या सूत्रानें 'अप्' प्रत्यय 'यवः', 'स्तव' याच ठिकाणीं होईल; 'लवः', पवः' या ठिकाणीं अप् प्रत्यय होणार नाहीं.[१६]

पण 'ऋदोरप्' या सूत्रांत ऋकाराच्या पुढें 'त्' हें व्यंजन घातलेलें नाहीं

तर मग कोणतें व्यंजन घातलें आहे ?

'द'कार.

दकार घालण्याचा विशेष उद्देश कांहीं आहे काय ?

तकार घालण्याचा तरी काय विशेष उद्देश आहे ? जर संशय न यावा या हेतूनें तकार घातला[१७] म्हणावें तर दकार सुद्धां त्याच कारणाकरितां घातला असें म्हणतां येईल. बरें, जर बोलतांना सुलभ[१८] पडावें म्हणून तकार

---

१५. 'वृद्धिरादैच' (१।१।१) येथें आत् या तकाराच्या पुढें ऐच् शब्द उच्चारला आहे. तसेंच 'अदेङ्गुणः' (१।१।२) येथें अत् या तकाराच्या पुढें एङ् शब्द उच्चारला आहे.

१६. ऋत् या तकाराच्या पुढें ऱ्हस्व उकार उच्चारून त्याची पंचमी ऋदोः अशी झाली आहे. तो ऱ्हस्व उकार तकाराच्या पुढें उच्चारला असल्यामुळें त्यानें दीर्घ ऊकाराचें ग्रहण होणार नाहीं. तेव्हां यु, स्तु अशा ऱ्हस्व उकारान्त धातूंहूनच अप् प्रत्यय होईल; लू, पू या दीर्घ ऊकारान्त धातूंहून अप् प्रत्यय होणार नाहीं.

१७. मध्यें तकार घातला नाहीं तर ऋ याला यण् होऊन रोरप् असें सूत्र होईल. व तसें केलें तर दीर्घ ॠ उच्चारला आहे किंवा ऱ्हस्व ऋ उच्चारला आहे असा संशय येईल, तो दूर करण्याकरतां तकार घातला आहे.

१८. मध्यें व्यंजन न घालतां ऋ उ असें उच्चारण्यांत जे कांहीं थोडे क्लेश होतात ते त्यांच्यामध्यें व्यंजन घालून उच्चारण्यांत होत नाहींत.

यद्यसंदेहार्थस्तकारो दकारोऽपि । अथ मुखसुखार्थस्तकारो दकारोऽपि ॥

इदं विचार्यते । य एते वर्णेषु वर्णैकदेशा वर्णान्तरसमानाकृतय एतेषामवयवग्रहणेन ग्रहणं स्याद्वा न वेति । कुतः पुनरियं विचारणा । इह समुदाया अप्युपदिश्यन्तेऽवयवा अपि ।अभ्यन्तरश्च समुदायेऽवयवः । तद्यथा। वृक्षः प्रचलन्सहावयवैः प्रचलति । तत्र समुदायस्थस्यावयवस्यावयवग्रहणेन ग्रहणं स्याद्वा न वेति जायते विचारणा। कश्चात्र विशेषः ।

**वर्णैकदेशा वर्णग्रहणेन चेत्संध्यक्षरे समानाक्षरविधिप्रतिषेधः ॥६॥**

वर्णैकदेशा वर्णग्रहणेन चेत्संध्यक्षरे समानाक्षराश्रयो विधिः प्राप्नोति स प्रतिषेध्यः । अग्ने इन्द्रम् । वायो उदकम् । अकः सवर्णे दीर्घः [६.१.१०१] इति दीर्घत्वं प्राप्नोति ॥

**दीर्घे ह्रस्वविधिप्रतिषेधः ॥७॥**

दीर्घे ह्रस्वाक्षराश्रयो विधिः प्राप्नोति

---

घातला म्हणावें, तर दकारही त्याचकरितां घातला आहे असें म्हणतां येईल.

बरें, येथें एक असा विचार येतो की या वर्णसमूहांतील कांहीं वर्णांचे अवयव इतर स्वतंत्र वर्णांप्रमाणेंच दिसतात, तेव्हां ते वर्णांचे अवयव स्वतंत्र वर्ण जसे समुदायाचे अवयव म्हणून घेतले जातात तसे घेतले जावे किंवा नाहीं?[१९]

हा प्रश्न काय म्हणून उपस्थित व्हावा ?

उपस्थित होण्याचें कारण एवढेंच की, या वर्णसमूहांत संपूर्ण स्वर (ए, ऐ वगैरे) वर्णसमुदायही उच्चारले आहेत व अ, इ, उ वगैरे अवयवही स्वतंत्र उच्चारले आहेत. वास्तविक पाहतां समुदायामध्यें अवयव येतोच. उदाहरण द्यावयाचें म्हणजे, झाड हलूं लागलें म्हणजे त्याचे अवयवही हलूं लागतात. तेव्हां समुदायरूपी वर्णांमध्यें त्या वर्णांबरोबर सहज उच्चारला जाणारा जो त्याचा स्वतंत्र वर्णासारखा अवयव तो स्वतंत्र रीतीनें वर्ण म्हणून घेतला जातो किंवा नाहीं हा येथें प्रश्न उपस्थित होतो.

घेतला गेला किंवा न घेतला गेला या दोहींत फरक काय ?

(वा.) जर वर्णाचा एक भाग स्वतंत्र वर्ण म्हणून घेतला गेला, तर संयुक्त अक्षरांमधील अक्षरांना त्यांच्यासारख्या अक्षरांना सांगितलेलीं कार्यें प्राप्त होतील त्यांचा निषेध करावयास पाहिजे. उदाहरणार्थ 'अग्ने इन्द्र', 'वायो उदकम्' घ्या. या ठिकाणीं ए व ओ या वर्णांमधील इकार[२०] व उकार यांचा इन्द्र व उदकम् यांमधील इकार व उकार यांजबरोबर 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) या सूत्रानें सवर्ण दीर्घ होऊं लागेल.

(वा.) तसेंच दीर्घ स्वरामधील एकमात्रिक भागालाही ऱ्हस्व स्वराला उद्देशून सांगितलेलें कार्य प्राप्त होईल, त्याचा निषेध करावयास

---

१९. कृत, हृत वगैरे शब्दांमधील ऋकारामध्यें जो मधील भाग आहे तो कर्ता वगैरेमधील रेफ व्यंजनाप्रमाणें दिसतो. तेव्हां रेफ व्यंजनासंबंधानें होणारीं कार्यें जशीं कर्ता वगैरे शब्दांमध्यें होतात तशीं कृत वगैरे शब्दांतील ऋकाराचा जो रफ व्यंजनासारखा दिसणारा मध्यभाग तो रेफ व्यंजन समजून तीं कार्यें होतात किंवा होत नाहींत असा संशय उत्पन्न होतो. तसेंच ऌ या स्वरामध्यें लकारासारखा भाग दिसतो. ए, ओ वगैरे संध्यक्षरांमध्यें अकार, इकार, उकारासारखे भाग दिसतात. दीर्घ आकारामध्यें दोन ऱ्हस्व अकार असल्यासारखे दिसतात. तसेंच दीर्घ ई, ऊ वगैरेमध्येंही समजावें.

२०. इकार म्ह.ए या संध्यक्षरांतील इकारासारखा दिसणारा पुढचा भाग. तसेंच उकार म्ह. ओ या संध्यक्षरांतील उकारासारखा दिसणारा पुढचा भाग.

स प्रतिषेध्यः। ग्रामणीः। आलूय। प्रलूय। ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति तुक्प्राप्नोति। नैष दोषः। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न दीर्घे ह्रस्वाश्रयो विधिर्भवतीति यदयं दीर्घाच्छे तुकं शास्ति। नैतदस्ति ज्ञापकम्। अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम्। किम्। पदान्ताद्वा [६.१.७६] इति विभाषां वक्ष्यामीति। यत्तर्हि योगविभागं करोति। इतरथा हि दीर्घात्पदान्ताद्वेत्येव ब्रूयात्॥ इह तर्हि खट्वाभिः मालाभिः अतो भिस ऐस् [७.१.९] इत्यैस्भावः प्राप्नोति। तपरकरणसामर्थ्यान्न भविष्यति॥ इह तर्हि याता वाता अतो लोप आर्धधातुके

पाहिजे. उदाहरणार्थ 'ग्रामणीः', 'आलूय', 'प्रलूय' या ठिकाणीं 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' (६।१।७१) या सूत्रानें पकार इत् असलेला कृत् प्रत्यय पुढें असतांना ह्रस्व स्वराला सांगितलेला तुक् आगम ईकार आणि ऊकार यांतील पुढच्या भागाला होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थीं दीर्घ स्वराला छकार पुढें असतांना तुक् आगम आचार्य पाणिनि[२१] सांगतात (६।१।७५) त्या अर्थीं त्यांच्या लिहिण्यावरून निष्पन्न होतें की, ह्रस्व स्वराला उद्देशून सांगितलेला विधि दीर्घ स्वरांतील एकमात्रिक भागाला होत नाहीं.

वरील गोष्ट निष्पन्न होत नाहीं. दीर्घ स्वराला छकार पुढें असतांना तुक् सांगण्याकरितां 'दीर्घात्' हें निराळें सूत्र सांगण्यांत आचार्यांचा हेतु आहे.

तो कोणता?

'पदाच्या शेवटीं असलेल्या दीर्घ स्वराला छकार पुढें असतांना तुक् आगम विकल्पानें होतो असें आपणांस सांगावयाचें आहे (६।१।७६), तेव्हां दीर्घ शब्द उच्चारावयास पाहिजेच. तो आपण अगोदरच्या सूत्रांत उच्चारूं' असा आचार्यांचा[२२] अभिप्राय दिसतो.

पण तसें असलें तरी 'दीर्घात्' (६।१।७५) आणि 'पदान्ताद्वा' (६।१।७६) अशीं दोन निरनिराळीं सूत्रें करण्याचें कारण काय? ज्या अर्थीं आचार्य निरनिराळीं सूत्रें करतात, त्या अर्थीं त्यांचा अभिप्राय दिसतो की, ह्रस्वाला उद्देशून सांगितलेला तुक् दीर्घ स्वराचा अवयव जो ह्रस्व स्वरासारखा भाग त्याला होत नाहीं. जर होत असता तर 'दीर्घात्पदान्ताद्वा' असें एकच सूत्र आचार्यांनीं करावयास पाहिजे होतें.

बरें तर, 'खट्वाभिः', 'मालाभिः' या उदाहरणांत आकारामधील अवयव जो ह्रस्व अकार त्याच्या निमित्तानें पुढील 'भिस्' प्रत्ययाला 'अतो भिस ऐस्' (७।१।९) या सूत्रानें ऐस् आदेश होऊं लागेल; त्याचें काय?

'अतः' येथें तकार घातला आहे त्याच्या जोरावर आकाराच्या पुढील 'भिस्' प्रत्ययाला 'ऐस्' आदेश होणार नाहीं.[२३]

बरें तर, 'याता', 'वाता' या ठिकाणीं 'अतो लोपः' (६।४।४८) या सूत्रानें आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला जो अकाराचा लोप तो 'आ'काराचा अवयव

२१. 'दीर्घात्' (६।१।७५) या सूत्रानें 'ह्रीच्छति' येथें दीर्घ ईकाराला तुक् आगम होतो. परंतु जर दीर्घांतील पुढील भाग ह्रस्व समजून कार्य होईल तर 'छे च' (६।१।७३) याच सूत्रानें तुक् आगम होईल आणि 'दीर्घात्' या सूत्राचा कांहीं उपयोग नाहीं असें होईल.

२२. 'पदान्ताद्वा' (६।१।७६) या पुढील सूत्रामध्यें दीर्घात् या पदाची अनुवृत्ति झाली पाहिजे. नाहीं तर 'दधिच्छाया' येथें ह्रस्वालाही तुक् आगम विकल्पानें होऊं लागेल. तेव्हां त्या अनुवृत्तीकरतां 'दीर्घात्' हें सूत्र केलें आहे.

२३. खट्वाभिः वगैरे उदाहरणांमध्यें दीर्घ अकाराच्या पुढील भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश होऊं नये म्हणून अतः असा ह्रस्व अकाराला तकार जोडला आहे. पण जर दीर्घांतील पुढील ह्रस्व भाग घेऊन तेथें ऐस् आदेश होईल तर तकार जोडलेला व्यर्थ होईल.

[६.४.४८] इत्यकारलोपः प्राप्नोति । ननु चात्रापि तपरकरणसामर्थ्यादेव न भविष्यति । अस्ति ह्यन्यत्तपरकरणे प्रयोजनम् । किम् । सर्वस्य लोपो मा भूदिति । अथ क्रियमाणेऽपि तपरे परस्य लोपे कृते पूर्वस्य कस्मान्न भवति । परलोपस्य स्थानिवद्भावादसिद्धत्वाच्च । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नाकारस्थस्याकारस्य लोपो भवतीति यदयमातोऽनुपसर्गे कः [३.२.३] इति ककारमनुबन्धं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । कित्करण एतत्प्रयोजनं कितीत्याकारलोपो यथा स्यादिति । यदि चाकारस्थस्याकारस्य लोपः स्यात्कित्करणमनर्थकं स्यात् । परस्याकारस्य लोपे कृते द्वयोरकारयोः पररूपे हि सिद्धं रूपं स्यात् गोदः कम्बलद इति । पश्यति त्वाचार्यो नाकारस्थस्याकारस्य लोपो भवतीत्यतः ककार-

---

जो 'अ'कार त्याचा होऊं लागेल.

पण येथेंही 'त'कार घालण्याच्या जोरावर 'आ'काराच्या अवयवभूत 'अ'काराचा लोप होणार नाहीं.

येथें 'त'कार घालण्याचा स्वतंत्र उपयोग आहे तो निरर्थक नाहीं.

तो कोणता ?

सर्वांचा म्हणजे आकाराचा लोप होऊं नये[२४] हा.

पण जरी 'त'कार घालण्यानें 'आ'कारामधील पुढील भाग जो 'अ'कार त्याचाच फक्त लोप झाला, तरी तो झाल्यावर बाकी त्या 'आ'कारामधील राहिलेला पूर्वभाग जो 'अ'कार त्याचा पुनः लोप कां होऊं[२५] नये ?

पुढील भाग अकार त्याला झालेल्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) होईल. शिवाय तो लोप असिद्धवदत्राभात् (६।४।२२) या सूत्रानें असिद्धही होईल. त्यामुळें 'अ'कार मध्यें असल्यासारखाच झाल्यामुळें पूर्वभाग जो 'अ'कार त्याचा लोप होणार नाहीं.

बरें तर, आम्ही असें म्हणूं की, ज्या अर्थी 'आतोनुपसर्गे कः' (३।२।३) या सूत्रानें सांगितलेल्या 'अ' प्रत्ययाला 'क'कार इत् जोडलेला आहे, त्या अर्थी आचार्यांच्या कृतीवरून असें अनुमान निघतें की, 'आ'-कारामधील अवयव जो 'अ'कार त्याचा 'अ'कार म्हणून लोप होत नाहीं.

हें अनुमान कसें निघतें ?

कां बरें ? 'क'कार इत् जोडण्याचा उपयोग 'कित्' प्रत्यय पुढें असतांना होणारा जो आकाराचा लोप (६।४।६४) तो मागें असलेल्या 'आ'काराचा व्हावा हा. जर 'आ'-काराचा अवयव जो 'अ'कार याचा[२६] लोप होऊं लागला तर 'क' प्रत्ययामध्यें 'क'कार इत् करण्याचें कांहीं कारणच उरणार नाहीं. 'आ'काराचा अवयव जो 'अ'कार त्याचा लोप झाल्यावर राहिलेला दुसरा अवयव जो 'अ'कार तो व प्रत्ययाचा 'अ'कार या दोहोंच्या जागीं पररूप (६।१।९७) म्हणजे अकार होऊन 'गोदः', 'कम्बलदः' इत्यादि रूपें साधतीलच. तेव्हां 'आ'काराचा अवयव जो 'अ'कार त्याचा 'अ'कार म्हणून लोप होत नाहीं असेंच आचार्य मानतात; आणि म्हणूनच ते 'क'कार इत्संज्ञक जोडतात.

---

२४. तकार न जोडतां जर अस्य लोपः असें सूत्र केलें तर त्या अकारानें सवर्ण अशा दीर्घ आकारांचेंही ग्रहण होऊन ( १।१।६९ ) सबंध आकाराचा लोप होईल तो न होतां त्यांतील फक्त पुढील भागाचाच लोप तपरकरणामुळें होईल

२५. जर पुनः लोप झाला तर तपरकरण केलें किंवा न केलें तरी रूप सारखेंच होऊन तपरकरण व्यर्थ होईल.

२६. 'अतो लोपः' ( ६।४।४८ ) या सूत्रानें सांगितलेला लोप. या लोपाचें निमित्त फक्त आर्धधातुकसंज्ञक प्रत्यय आहे. त्या प्रत्ययाला ककार इत्संज्ञक पाहिजे असा आग्रह नाहीं.

मनुबन्धं करोति । नैतदस्ति ज्ञापकम्। उत्तरार्थमेतत्स्यात् । तुन्दशोकयोः परिमृजापनुदोः [३.२.५] इति । यत्तर्हि गापोष्टक् [३.२.८] इत्यनन्यार्थं ककारमनुबन्धं करोति ॥

**एकवर्णवच्च ॥८॥**

एकवर्णवच्च दीर्घो भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । वाचा तरतीति द्व्यज्लक्षणष्ठन्मा भूदिति । इह च वाचो निमित्तं तस्य निमित्तं संयोगोत्पातौ [५.१.३८] इति द्व्यज्लक्षणो यन्मा भूदिति । अत्रापि गोनौग्रहणं ज्ञापकं दीर्घाद्व्यज्लक्षणो विधिर्न भवतीति ॥ अयं तु सर्वेषामेव परिहारः ।

**नाव्यपवृक्तस्यावयवे तद्विधिर्यथा द्रव्येषु ॥९॥**

---

वर दिलेलें ज्ञापक बरोबर नाहीं. 'क'कार इत्संज्ञक जोडण्याचा उपयोग जरी 'आतोऽनुपसर्गे कः' (३।२।३) या सूत्रांत झाला नाहीं तरी 'तुन्दशोकयोः परिमृजापनुदोः'[२७] (३।२।५) या पुढील सूत्रांत तो होत आहेच.

तर मग 'गापोष्टक्' (३।२।८) या सूत्रांत 'टक्' प्रत्ययाला जो 'क'कार इत्संज्ञक जोडला आहे त्याचा तर कांहीं 'आ'काराचा लोपाशिवाय दुसरा उपयोग नाहीं; तो व्यर्थच आहे व त्यावरून अनुमान काढतां येईलच की 'आ'काराचा अवयव जो अकार त्याचा अकार म्हणून 'अतो लोपः' (६।४।४८) वगैरे सूत्रांनीं लोप होत नाहीं.

(वा.) शिवाय दीर्घ स्वर हा जरी वर्णद्वयात्मक संयुक्त स्वर असला तरी तो एकच वर्ण समजावा असेंही बोलणें जरूर आहे.

तें कशाकरितां?

तें अशाकरितां की एकच दीर्घस्वर असलेल्या वाच् वगैरे शब्दांहून दोन स्वरांनीं युक्त शब्दाला सांगितलेले जे प्रत्यय ते होऊं नयेत. उदाहरणार्थ, 'वाचा तरति' 'वाचेनें तरून जाणारा' या अर्थीं दोन स्वर असलेला 'वाच्' शब्द आहे. म्हणून त्याहून ठन् प्रत्यय (४।४।७) होऊन 'वाचिक' शब्द उपयोगांत आणतां येऊं नये. तसेंच, 'वाचो निमित्तम्' वाणीचें निमित्त या अर्थीं 'तस्य निमित्तं संयोगोत्पातौ' (५।१।३८) या सूत्रांतील सर्व पदें ज्या सूत्रांत अनुवृत्त होतात, अशा 'गोद्व्यचोऽसंख्या०' (५।१।३९) या सूत्रानें वाच् शब्दाहून दोन स्वरांनीं युक्त असल्यामुळें यत् प्रत्यय होईल तो होऊं नये हाही संयुक्त स्वर हा एकच स्वर आहे असें समजण्याचा दुसरा उपयोग आहे.

असें स्वतंत्र सांगण्याची जरूर नाहीं; कारण 'नौद्व्यचष्ठन्' (४-४-७) आणि 'गोद्व्यचोऽसंख्या०' (५।१।३९) या सूत्रांत गो आणि नौ हे शब्द घातले आहेत, त्यावरूनही हेंच समजून येतें की, दीर्घ स्वर हा दोन स्वरांनीं युक्त स्वर समजून त्याहून दोन स्वरांनीं युक्त अशा शब्दांहून सांगितलेले प्रत्यय होत नाहींत.

वरतीं बरेच दोष दाखविले व त्या सर्वांचा निरनिराळ्या रीतींनीं परिहारही केला; पण पुढें दिलेला परिहार सर्वच दोष घालवूं शकतो.

(वा.) जो अवयव समुदायाशीं एकवटलेला म्हणजे ज्याचें स्वरूप निराळें भासत नाहीं त्या अवयवाला स्वतंत्र रीतीनें निराळ्या स्वरूपानें

---

२७. तुन्दपरिमृजः या उदाहरणामध्यें मृज् धातूच्या ऋकाराला 'मृजेर्वृद्धिः' (७।१।११४) या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते. तसेंच शोकापनुदः या उदाहरणामध्यें नुद् धातूच्या उकाराला 'पुगन्त०' (७।३।८६) या सूत्रानें गुण प्राप्त होतो. परंतु प्रत्यय कित् असल्यामुळें 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें त्या वृद्धीचा व गुणाचा निषेध होतो.

नाव्यपवृक्तस्यावयवस्यावयवाश्रयो विधिर्भवति यथा द्रव्येषु। तद्यथा द्रव्येषु। सप्तदश सामिधेन्यो भवन्तीति न सप्तदशारत्निमात्रं काष्ठमग्नावभ्याधीयते। विषम उपन्यासः। प्रत्यृचं चैव हि तत्कर्म चोद्यतेऽसंभवश्चाग्नौ वेद्यां च ॥ यथा तर्हि सप्तदश प्रादेशमात्रीराश्वत्थीः समिधोऽभ्यादधीतेति न सप्तदशप्रादेशमात्रं काष्ठमभ्याधीयते। अत्रापि प्रतिप्रणवं चैतत्कर्म चोद्यते तुल्यश्चासंभवोऽग्नौ वेद्यां च ॥ यथा तर्हि तैलं न विक्रेतव्यं मांसं न विक्रेतव्यमिति व्यपवृक्तं च न विक्रीयतेऽव्यपवृक्तं च गावश्च सर्षपाश्च विक्रीयन्ते। तथा लोमनखं स्पृष्ट्वा शौचं कर्तव्यमिति व्यपवृक्तं स्पृष्ट्वा नियोगतः कर्तव्यमव्यपवृक्ते कामचारः ॥ यत्र

---

भासणाऱ्या अवयवाला होणारें कार्य करतां येत[२८] नाहीं. यज्ञीय द्रव्याविषयीं मीमांसेंत हाच प्रकार दिसतो. उदाहरणार्थ—'सतरा[२९] सामिधेनी असतात' या वाक्याला अनुसरून समिधांचा होम करतांना सतरा अरत्नि लांब असें एकच काष्ठ अग्नींत टाकत नाहींत; तर एक एक अरत्नि लांब अशीं सतरा काष्ठें अग्नींत टाकतात.

तुम्हीं दाखल्याची मांडणूक बरोबर केली नाहीं. 'सतरा सामिधेनी असतात' या वाक्याला अनुसरून करण्याचें होमरूप कृत्य प्रत्येक ऋचेला आहुति या स्वरूपानें सांगितलें आहे. तें सतरा अरत्नि लांब एकच काष्ठ घेऊन करणें शक्य नाहीं. शिवाय सतरा अरत्नि लांब एकच काष्ठ अग्नींत मावणार नाहीं व वेदीवर मावणार नाहीं. एकंदरींत 'सप्तदश०' या वाक्याचा 'सतरा अरत्नि लांब एकच काष्ठ' हा अर्थ करतांच येत नाहीं; व त्याचा दाखलाही देतां येत नाहीं.

बरें तर, वरील वाक्यांतील 'सामिधेनी' शब्दाचा ऋचा अर्थ असल्यामुळें व सतरा ऋचा निरनिराळ्या म्हणावयाच्या असल्यामुळें वरील दाखला जमत नसेल तर 'सप्तदश प्रादेशमात्रीराश्वत्थीः समिधोभ्यादधीत' हें वाक्य दाखल्यादाखल घ्या. येथें 'पिंपळाच्या समिधा दर एक टीचभर लांब अशा अग्नींत द्याव्या' असें सांगितलें आहे. तेथें सतरा टीच लांब अशी एकच समिध् कोणीही अग्नींत टाकीत नाहीं.

येथेंही एकच समिध् न घेण्याला दुसरीं कारणें आहेतच. हें सतरा समिधा टाकण्याचें कार्य देखील प्रत्येक वेळीं प्रणव उच्चारून करावयास सांगितलें आहे; शिवाय सतरा टीच लांब समिध् अग्नींमध्यें किंवा वेदीमध्यें मावणेंही अशक्यच.

बरें, तर 'तेल विकूं नये', 'मांस विकूं नये' या निषेधाप्रमाणें वागतांना तेल म्हणून दिसणारी निराळी वस्तु किंवा मांस म्हणून दिसणारी निराळी वस्तु विकीत नाहींत; परंतु ज्या वस्तूमधून तेल किंवा मांस निराळें दाखवलें जात नाहीं असे बैल, मोहऱ्या वगैरे जिन्नस खुशाल विकतात; त्याचप्रमाणें 'केंस किंवा नखें यांचा स्पर्श झाल्यास शुद्धतेदाखल स्नान किंवा मार्जन करावें' ह्या विधीला अनुसरून देहापासून निराळे केंस किंवा नखें यांचा स्पर्श झाल्यास लोक स्नान वगैरे करतात, पण देहाशीं संलग्न केंस किंवा नखें यांचा स्पर्श झाल्यास तेथें तो विधि लागू होत नाहीं. तर तेथें लोक आपल्या इच्छेप्रमाणें वागतात. तेव्हां या दोन्ही दृष्टांतांवरून स्पष्ट होतें की, जेथें अवयव निराळा दृष्टीस पडतो, तेथेंच अवयवाला

---

२८. 'कथ' धातूमधील शेवटच्या ऱ्हस्व अकाराला होणारा लोप हें कार्य (६।४।४८) 'या' धातूपैकीं दीर्घ आकारांतील पुढील जो ऱ्हस्व अकारासारखा भाग त्याला होत नाहीं.

२९. जी ऋचा म्हणून समिधांचें आधान केलें जातें त्या ऋचेला सामिधेनी म्हणतात. सतरा अरत्नि लांबीचें एक काष्ठ घेतलें तर त्यांतील एक एक हाताचा भाग निराळा स्वतंत्र भासत नाहीं. मूठ मिटलेल्या हाताइतक्या लांबीच्या परिमाणाला अरत्नि म्हणतात.

तर्हि व्यपवर्गोऽस्ति । क्व च व्यपवर्गोऽस्ति । संध्यक्षरेषु ।

संध्यक्षरेषु विवृतत्वात् ॥१०॥

यदत्रावर्णं विवृततरं तदन्यस्मादवर्णाद्ये अपीवर्णोवर्णे विवृततरे ते अन्याभ्यामिवर्णोवर्णाभ्याम् ॥

अथवा पुनर्न गृह्यन्ते ।

अग्रहणं चेन्नुड्विधिलादेशविनामेष्वृकारग्रहणम् ॥११॥

अग्रहणं चेन्नुड्विधिलादेशविनामेष्वृकारस्य ग्रहणं कर्तव्यम् । तस्मान्नुड्द्विहलः [७.४.७१] ऋकारे चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । आनृधतुः आनृधुरिति । यस्य पुनर्गृह्यन्ते द्विहल इत्येव तस्य सिद्धम् । यस्यापि न गृह्यन्ते तस्याप्येष न दोषः । द्विहल्ग्रहणं न करिष्यते । तस्मान्नुड्भवतीत्येव । यदि न क्रियत आटतुः आटुरित्यत्रापि प्राप्नोति ।

---

स्वतंत्र काम करतां येतें; तेव्हां आकार वगैरेमधील अकाराला स्वतंत्र अकारासारखें कार्य होत नाहीं.

आतां ज्या ठिकाणीं संयुक्त अक्षराचा भाग निराळा दिसण्यासारखा असेल[३०], त्या ठिकाणची वाट काय ?

असा निराळा भाग कोणत्या ठिकाणीं दिसतो ?

संध्यक्षरें म्हणजे ऐ व औ यांचे ठिकाणीं.

(वा.) संध्यक्षरांच्या ठिकाणीं अडचण येणार नाहीं; कारण त्यांतील अकार इतर अकारांपेक्षां जास्ती विवृत आहे, तसेंच जे त्यांतील इकार किंवा उकार आहेत ते इतर इकार किंवा उकार यांपेक्षां जास्ती विवृत आहेत; तेव्हां संध्यक्षरांतील अकाराचें, इकाराचें किंवा उकाराचें इतर अकार वगैरेंनीं ग्रहण होणार नाहीं. कारण दोन्हींच्या प्रयत्नामध्यें भेद आहे.

अथवा असेंही समजलें तरी हरकत नाहीं की, वर्णामधील अवयव हे स्वतंत्र वर्णासारखे कुठेंही समजूं नयेत.

(वा.) जर ते तसे समजले नाहींत तर नुट् सांगणाऱ्या सूत्रांत, लकारादेश सांगणाऱ्या सूत्रांत आणि णत्व सांगणाऱ्या सूत्रांत 'ऋ'कार घालावयास पाहिजे. नुडाबद्दल 'तस्मान्नुड् द्विहलः' (७।४।७१) सूत्र घ्या. या सूत्रांत 'ऋकारे च' (ऋकार असतांनाही) असे शब्द घातले पाहिजेत; म्हणजे 'आनृधतुः', 'आनृधुः' हीं रूपें साधतील.[३१] मग ज्याच्या मतीं वर्णाचे अवयव हे स्वतंत्र वर्णासारखे समजले जातात त्याच्या मतानें 'ऋकारे च' हे शब्द घालण्याची जरूर नाहीं; 'द्विहलः' या शब्दानेंच भागेल. कारण ऋकाराचा अवयव रेफ शास्त्रकारांनीं मानलाच आहे.

ज्याचे मतीं वर्णांचे अवयव हे स्वतंत्र वर्णासारखे समजले जात नाहींत, त्यालाही 'आनृधतुः', 'आनृधुः' हीं रूपें साधण्यास कांहीं अडचण येत नाहीं; 'तस्मान्नुड् द्विहलः' (७।४।७१) या सूत्रांत 'द्विहलः' शब्द घालण्यांत येणार नाहीं; 'तस्मान्नुट्' येवढेंच सूत्र करतां येईल.

जर 'द्विहलः' शब्द घातला नाहीं तर

---

३०. दीर्घामध्यें ऱ्हस्व स्पष्ट भासत नाहीं. परंतु ऋकारामध्यें रेफ मात्र स्पष्ट भासतो. तसाच लकारामध्यें लकार संध्यक्षरामध्यें अकार, इकार वगैरे हेही स्पष्ट भासतात. यांपैकीं संध्यक्षरांतील अकार वगैरेसारख्या भागांना अकार वगैरेचीं कार्यें होणें इष्ट नाहीं.

३१. जर ऋकारांतील रेफ स्वतंत्र रेफासारखा हल् समजला नाहीं तर ऋध् धातूमध्यें धकार हें एकच हल् असल्यामुळें तो धातु द्विहल् होत नाहीं. तेव्हां द्विहलः एवढेंच म्हणून काम भागणार नाहीं. म्हणून ऋकार असतांना निराळा नुट् आगम सांगितला पाहिजे.

**अश्नोतिग्रहणं नियमार्थं भविष्यति । अश्नोतेरेवावर्णोपधस्य नान्यस्यावर्णोपधस्येति ॥ लादेशे च ऋकारग्रहणं कर्तव्यम् । कृपो रो लः [८.२.१८] ऋकारस्य चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । क्लृप्तः क्लृप्तवानिति । यस्य पुनर्गृह्यन्ते र इत्येव तस्य सिद्धम् । यस्यापि न गृह्यन्ते तस्याप्येष न दोषः । ऋकारोऽप्यत्र निर्दिश्यते । कथम् । अविभक्तिको निर्देशः । कृप उः रः लः कृपो रो ल इति । अथवोभयतः स्फोटमात्रं निर्दिश्यते । रश्रुतेर्लश्रुतिर्भवतीति ॥ विनाम ऋकारग्रहणं कर्तव्यम् । रषाभ्यां नो णः समानपदे [८.४.१] ऋकाराच्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । मातृणाम् पितृणामिति । यस्य पुनर्गृह्यन्ते रषाभ्यामित्येव तस्य सिद्धम् । न सिध्यति । यत्तद्रेफात्परं भक्तेस्तेन व्यवहितत्वान्न प्राप्नोति । मा**

---

'आटतुः',[३२] 'आढुः' या ठिकाणींही नुडागम होऊं लागेल.

होणार नाहीं; कारण 'अश्नोतेश्च' (७।४।७२) या सूत्रानें अश् धातूला मुद्दाम नुडागम सांगितला आहे, तो व्यर्थ येईल व त्यावरून नियम करण्यांत येईल की, उपान्त्य अक्षर ऱ्हस्व अकार ज्याचें आहे अशा धातूला जर नुडागम होईल तर 'अश्' धातूलाच होईल, तसल्या इतर कोणत्याही धातूला होणार[३२] नाहीं.

बरें, नुड् विधि जाऊं द्या; लकारादेश सांगणाऱ्या सूत्रांत 'ऋ'कार घालावा लागेल. 'कृपो रो लः' (८।२।१८) सूत्र घ्या; या सूत्रांत 'ऋकारस्य च' असे शब्द घातले पाहिजेत; म्हणजे 'क्लृप्तः', 'क्लृप्तवान्' या ठिकाणींही ऌकारादेश होईल; पण ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जातो त्याच्या मतीं ही अडचण येत नाहीं; 'रः' हा जो सूत्रांत शब्द आहे तेवढ्यानेंच त्याचें काम भागेल.

असेंच कांहीं नाहीं; ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जात नाहीं, त्याला सुद्धां कांहीं अडचण येत नाहीं. कारण 'कृपो रो लः' या सूत्रांत ऋकार घातलाच आहे.

तो कोठें ?

'कृपो रो लः' या सूत्राचीं पदें 'कृप', 'उः', 'रः', 'लः' अशीं घ्यावयाचीं; कृप हें पद विभक्तिप्रत्यय न उच्चारलेलें षष्ठ्यंत समजावयाचें, व 'उः' हें 'ऋ' शब्दाचें षष्ठीच्या एकवचनाचें रूप आहे. अथवा 'रः' व 'लः' या दोनही ठिकाणीं केवळ स्फोटरूपाचाच निर्देश केला आहे व क्लृप् धातूच्या र या आवाजाबद्दल ल हा आवाज होतो असा सूत्राचा अर्थ समजावा.

बरें, जरी नुडाविषयीं व लकारादेशाविषयीं अडचण दूर केली तरी णत्व सांगणाऱ्या सूत्रांत ऋकार घालवयास पाहिजे. 'रषाभ्यां नो णः समानपदे' (८।४।१) या सूत्रामध्यें 'ऋकाराच्च' असें बोलावयास पाहिजे; म्हणजे 'मातृणाम्', 'पितृणाम्' वगैरे ठिकाणींही नकाराला णकार होईल. ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जातो त्याच्या मतीं 'रषाभ्यां नो णः०' या सूत्रानेंच काम भागेल.

भागणार नाहीं; कारण जरी ऋकारामध्यें रेफ असला तरी त्या रेफाच्या लगेच नंतर 'न'कार असूं शकत नाहीं; ऋकारामधील रेफाच्या भोंवतीं 'अज्भक्ति' असते अशी कल्पना असल्यामुळें अज्भक्तीचें व्यवधान येईल व

---

३२. तेव्हां आटतुः आढुः या ठिकाणीं नुट् आगम होत नाहीं. कारण अट् धातूमध्यें उपान्त्य अक्षर ऱ्हस्व अकार आहे. ऋध् धातूचें उपांत्य अक्षर ऱ्हस्व अकार नसल्यामुळें तेथें 'अश्नोतेश्च (७।४।७२) या' नियमानें नुट् आगमाची व्यावृत्ति होत नाहीं.

भूदेवम् । अड्व्यवाय इत्येव सिद्धम् । न सिध्यति । वर्णैकदेशाः के वर्णग्रहणेन गृह्यन्ते । ये व्यपवृक्ता अपि वर्णा भवन्ति । यच्चापि रेफात्परं भक्तेर्न तत्कचिदपि व्यपवृक्तं दृश्यते । एवं तर्हि योगविभागः करिष्यते । रषाभ्यां नो णः समानपदे । ततो व्यवाये । व्यवाये च रषाभ्यां नो णो भवतीति । ततोऽटकुप्वाङ्नुम्भिरिति । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । एतैरेवाक्षरसमाम्नायिकैर्व्यवाये नान्यैरिति ॥ यस्यापि न गृह्यन्ते तस्याप्येष न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्यृकारान्नो णत्वमिति यदयं क्षुभ्नादिषु नृनमनशब्दं पठति । नैतदस्ति ज्ञापकम् ।

---

त्यामुळें 'रषाभ्यां०' सूत्रानें णत्व होणार नाहीं.

नाहीं झालें तरी हरकत नाहीं. अटानें व्यवधान होत असल्यामुळें[३३] 'अट्कुप्वाङ्०' (८।४।२) या सूत्रानें णत्व होईल. त्या सूत्रानें णत्व होणार नाहीं; कारण, वर्णांचे अवयव स्वतंत्र रीतीनें वर्ण म्हणून घेतले जातात खरे. पण कोणते ते? जे निराळे असे दुसरीकडे प्रयोगांत दिसतात ते. ऋकारामध्यें रेफाच्या भोंवतीं असणारी जी अज्भक्ति ती स्वतंत्र रीतीनें वर्ण म्हणून कोठेंही उपलब्ध होत नाहीं. तेव्हां अज्भक्तीचें अट् म्हणून ग्रहण होणें शक्य नाहीं व त्यामुळें 'मातॄणाम्', 'पितॄणाम्' वगैरे उदाहरणांमध्यें 'अट्कुप्वाङ्' (८।४।२) सूत्रानें णत्व होणार नाहीं.

तर मग आतां 'रषाभ्यां नो णः समानपदे' या सूत्रानंतर 'अट्कुप्वाङ्०' सूत्र दोन भाग करून पढूं: (१) 'व्यवाये' (व्यवधान असतांनाही[३४] णत्व होतें) व (२) 'अट्कुप्वाङ्नुम्भिः'.

पण 'व्यवाये' या एकाच सूत्रानें काम भागत असतांना 'अट्कुप्याङ्नुम्भिः' हें सूत्र पाहिजे कशाला?

नियम म्हणून समजण्याकरितां अक्षरसमूहामध्यें दिलेल्या वर्णांनीं व्यवधान असतांना जर णत्व होईल तर 'अट्' 'कवर्ग' 'पवर्ग' 'आङ्' आणि 'नुम्' या वर्णांनींच व्यवधान असतांना णत्व होतें. अक्षरसमूहामध्यें दिलेल्या[३५] इतर वर्णांनीं व्यवधान असतांना णत्व होत नाहीं असा 'अट्कुप्याङ्नुम्भिः' या सूत्राचा अर्थ करावयाचा.

ज्याच्या मतीं वर्णांचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जात नाहीं त्याच्या 'मतींही 'मातॄणाम् वगैरे उदाहरणांमध्यें णत्व होणार नाहीं' ही अडचण येणार नाहीं. कारण, 'ऋकारा'च्या पुढें असलेल्या नकाराला णत्व होतें' हें आचार्यांच्या प्रवृत्तीवरूनच अनुमित होतें. कारण णत्व होऊं नये याकरतां क्षुभ्नादिगणांत (८।४।३९) ते 'नृनमन' शब्द घालतात. जर ऋकाराच्या पुढील नकाराला णत्व होत नसतें तर 'नृनमन' शब्दाला णत्वाचा निषेध सांगण्याची जरूरच नव्हती.

'नृनमन' शब्द क्षुभ्नादिगणांत घातला आहे ही गोष्ट ज्ञापक म्हणून देतां येत नाहीं. 'नृनमन' शब्द क्षुभ्नादिगणांत घालण्याचा उपयोग नाहीं असें नाहीं; 'नार्नमनि' या वृद्धि होऊन तयार झालेल्या शब्दांत रेफ असल्यामुळें 'रषाभ्याम्०' (८।४।१) या सूत्रानें प्राप्त झालेलें णत्व होऊं नये म्हणून 'नृनमन' शब्द

---

३३. ऋकारांतील मधला भाग जसा रेफ समजला जातो तसाच त्याच्या सभोंवतीं असणारा जो स्वरासारखा भाग तो स्वर समजला जाईल. तेव्हां हें जें अज्भक्तीनें (म्हणजे स्वरासारख्या भागानें) व्यवधान होत आहे, तें अटानेंच होत आहे.

३४. 'अमुक वर्णांनीं व्यवधान असतांना' असें येथें कांहींच सांगितलें नसल्यामुळें अज्भक्तीनें व्यवधान असतांनाही णत्व होईल.

३५. अज्भक्ति ही अइउण् इत्यादि अक्षरसमूहांतील वर्ण नव्हे. म्हणून तेथें नियमानें णत्वाची व्यावृत्ति होत नाहीं.

वृद्ध्यर्थमेतत्स्यात् । नार्नमनिः । यत्तर्हि तृप्नोतिशब्दं पठति । यच्चापि नृनमनशब्दं पठति । ननु चोक्तं वृद्ध्यर्थमेतत्स्यादिति । बहिरङ्गा वृद्धिरन्तरङ्गं णत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ अथवोपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । ऋतो नो णो भवति । ततश्छन्दस्यवग्रहात् । ऋत इत्येव ॥

**प्लुतावैच इदुतौ ॥१२॥**

एतच्च वक्तव्यम् । यस्य पुनर्गृह्यन्ते गुरोरनृतोऽनन्त्यस्याप्येकैकस्य प्राचामिति ... गुरोष्टेरित्येव प्लुत्या तस्य सिद्धम् । यस्यापि न गृह्यन्ते तस्याप्येष न दोषः । क्रियत एतन्न्यास एव ॥

**तुल्यरूपे संयोगे द्विव्यञ्जनविधिः॥१३**

तुल्यरूपे संयोगे द्विव्यञ्जनाश्रयो विधिर्न सिध्यति । कुक्कुटः पिप्पलः पित्तमिति । यस्य पुनर्गृह्यन्ते तस्य द्वौ ककारौ द्वौ

---

क्षुभ्नादिगणांत घातला पाहिजे.

बरें तर, 'क्षुभ्नादि'गणांत 'तृप्नोति' शब्द घातला आहे त्यावरून वरील गोष्टीचें अनुमान काढूं.

आणि 'नृनमन' शब्दावरूही तेंच अनुमान काढण्यास हरकत नाहीं.

पण वरती नाहीं का सांगितलें, की जरी केवळ 'नृनमन' शब्दाचा क्षुभ्नादिगणांत घालण्याचा उपयोग नसला तरी त्याला वृद्धि होऊन त्यापासून तयार झालेल्या 'नार्नमनि' शब्दांत णत्व न व्हावें म्हणून 'नृनमन' शब्द क्षुभ्नादिगणांत घातला पाहिजे.

त्याकरतांही नको. कारण 'नार्नमनि' ह्या रूपामध्यें वृद्धि बहिरंग आहे व णत्व अंतरंग आहे; आणि अंतरंग कार्य करावयाचें असतांना बहिरंग कार्य असिद्ध होतें, या परिभाषेमुळें णत्वाच्या दृष्टीनें नृनमन असेंच दिसतें. नार्नमनि असें दिसत नाहीं.[३६]

अथवा, 'अट्कुप्वाङ्०' (८।४।२) इत्यादि सूत्रांच्या पुढें पढलेल्या 'छन्दस्यृदवग्रहात्' या सूत्राचीं दोन सूत्रें करूं—एक 'ऋतः' व दुसरें 'छन्दस्यवग्रहात्'. ऋतः सूत्राचा अर्थ ऋकारानंतरही नकाराला णकार[३७] होतो, 'छन्दस्यवग्रहात्' या सूत्रांत 'ऋतः' पदाची अनुवृत्ति करावयाचीच.

(वा.१२) शिवाय, ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जात नाहीं त्याला 'प्लुतावैच इदुतौ' (८।२।१०६) असें म्हणावें लागेल. आणि ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जातो त्याचें 'गुरारनृतौनन्त्यस्याप्येकैकस्य प्राचाम्' (८।२।८६) या सूत्रानेंच अवयवाला प्लुत होऊन काम भागेल.

पण ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जात नाहीं, त्याच्यावरही वरती दिलेला दोष येत नाहीं; कारण 'प्लुतावैच इदुतौ' (८।२।१०६) हें सूत्र सूत्रपाठांत पढलेलें आहेच.

(वा.१३) शिवाय, अवयवांचें पृथक् ग्रहण होत नाहीं असें मानल्यास ज्या ठिकाणीं एकच व्यंजन दोन वेळां येऊन संयोग होतो त्या ठिकाणीं दोन व्यंजनांना उद्देशून सांगितलेलें कार्य होणार नाहीं. उदा० कुक्कुटः, पिप्पल, पित्तम् या ठिकाणीं क्क्, प्प् व त्त् हीं दोन व्यंजनें आहेत असें समजलें जाणार[३८] नाहीं. तेव्हां त्याला संयोगसंज्ञा होत नसल्यामुळें मागील ऱ्हस्व स्वर गुरु समजण्यांत येणार नाहीं. पण ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जातो त्याच्या

---

३६. तेव्हां नृनमन शब्दाचा पाठ व्यर्थच होत असल्यामुळें 'ऋकाराच्या पुढील नकाराला णत्व होतें' या अर्थाचें तें ज्ञापक म्हणतां येतें, असें सिद्ध झालें.

३७. तेव्हां वर दिलेलें ज्ञापक घेण्याची आतां कांहीं जरूर नाहीं.

३८. क्क्, प्प्, त्त् हीं सबंध एकमात्रिक व्यंजनें आहेत. त्यांत प्रत्येकीं अर्धमात्रिक असे सारखे दोन भाग आहेत. ते भाग 'अर्धमात्रिक स्वतंत्र वर्ण आहेत' असें समजलें जाणार नाहीं, असा अभिप्राय आहे.

**पकारौ द्वौ तकारौ। यस्यापि न गृह्यन्ते तस्यापि द्वौ ककारौ द्वौ पकारौ द्वौ तकारौ। कथम्। मात्राकालोऽत्र गम्यते न च मात्रिकं व्यञ्जनमस्ति। अनुपदिष्टं सत्कथं शक्यं विज्ञातुम्। यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्रैतन्नास्त्यण्सवर्णान्गृह्णातीतीह तु कथं सय्ँय्न्ता सव्ँवत्सरः यल्ँलोकम् तल्ँलोकमिति यत्रैतदस्त्यण्सवर्णान्गृह्णातीति। अत्रापि मात्राकालो गृह्यते न च मात्रिकं व्यञ्जनमस्ति। अनुपदिष्टं सत्कथं शक्यं विज्ञातुमसच्च कथं शक्यं प्रतिपत्तुम्॥**

## ह य व रट् ॥५॥

**सर्वे वर्णाः सकृदुपदिष्टाः। अयं हकारो द्विरुपदिश्यते पूर्वश्चैव परश्च।**

---

मतीं या प्रस्तुत उदाहरणांत दोन ककार आहेत, दोन पकार आहेत व दोन तकार आहेत असें मानून काम भागतें.

ज्याच्या मतीं वर्णाचा अवयव स्वतंत्र वर्णासारखा समजला जात नाहीं त्याचेही मतीं दोन ककार आहेत, दोन पकार आहेत व दोन तकार आहेत असें मानतां येतें.

तें कसें ?

त्याचें कारण असें की क्क्, प्प् व त्त् उच्चारण्यास एका मात्रेचा वेळ लागलेला दिसतो आणि एका मात्रेचें एक व्यंजन कधींही नसतें. उपदेशांत सांगितल्याशिवाय एका मात्रेचें एक व्यंजन अस्तित्वांत येणार कसें ? आणि जी गोष्ट अस्तित्वांत नाहीं तिचें ज्ञान तरी होणार कसें ? एकंदरींत उपदेशांत एकमात्रेचें व्यंजन उच्चारलें नाहीं व व्यवहारांत त्याचें ज्ञान नाहीं. यावरून क्क्, प्प्, त्त् हीं सबंध एकमात्रेचीं व्यंजनें नाहींत[३९] हें सिद्ध होतें.

बरें, पण 'कुक्कुटः', 'पिप्पली' वगैरे प्रस्तुत उदाहरणांत जरी 'अण् आपल्या सवर्णांचेंही ग्रहण करतो' हा नियम लागू पडत नसल्यामुळें 'क्क्', 'प्प्' वगैरे संयुक्त व्यंजनांचें क्, प् वगैरे साध्या व्यंजनांनीं ग्रहण होत नाहीं असें म्हणतां येतें[४०] असें जरी घटकाभर समजलें तरी 'सय्ँय्न्ता', 'सव्ँवत्सरः', 'यल्ँलोकम्' या ठिकाणीं कसें ? येथें 'अण् आपल्या सवर्णांचें ग्रहण करतो' हा नियम लागू पडतो. तेव्हां या ठिकाणीं य् वगैरे वर्णांनीं य्य् वगैरे वर्णांचें ग्रहण होईल.[४१]

या ठिकाणींही दोन यकारांचें उच्चारण करण्यास एका मात्रेचा वेळ लागतो; आणि एका मात्रेचें एक व्यंजन कोठेंही नसतें. उपदेशांत सांगितल्याशिवाय एका मात्रेचें एक व्यंजन अस्तित्वांत येणार कसें ? आणि जी गोष्ट अस्तित्वांत नाहीं तिचें ज्ञान तरी[४२] होणार कसें ?

बाकी सर्व वर्णांचा उपदेश अक्षरसमाम्नायांत एकदाच केला आहे. ह्या हकाराचें मात्र दोनदा उच्चारण केलें आहे. एकदा सर्व व्यंजनांचे अगोदर व दुसऱ्यांदा सर्व व्यंजनांच्या शेवटीं.

---

३९. सारखीं दोन व्यंजनें जवळ आलीं असतां शीघ्र उच्चारणामुळें क्क् वगैरे हें सबंध एकच एका मात्रेचें व्यंजन आहे, असा भास होतो. वस्तुतः विचार केला असतां तो भ्रम आहे.

४०. तेव्हां क्क्, प्प्, त्त् हीं एकमात्रिक व्यंजनें अक्षरसमाम्नायामध्यें महेश्वरानें साक्षात् उच्चारलीं नाहींत. उच्चारलेल्या क्, प्, त् या अर्धमात्रिक व्यंजनांनीं त्यांचें ग्रहणही होत नाहीं. अयोगवाहामध्येंही त्यांची गणना केली नाहीं. एकंदरींत क्क् वगैरे मात्रिक व्यंजनांचें अस्तित्व मानतां येत नाहीं.

४१. तेव्हां य्य्, व्व् वगैरे एकमात्रिक व्यंजनांचें अस्तित्व कबूल करावें लागेल. आणि त्या य्य् वगैरेंतील अर्धमात्रिक भाग स्वतंत्र वर्णासारखा समजला जाणार नाहीं तेव्हां त्या भागाला द्वित्व होऊन तीन यकारांचें रूप होत असतें तें होणार नाहीं.

४२. कोणत्याही वर्णाचें अस्तित्व भाषेवरून सिद्ध होत असतें तेव्हां जसा दीर्घ ऌकार असता तर त्याचें ऋऌक् यांतील ऱ्हस्व ऌकारानें त्याचें ग्रहणही झालें असतें, तथापि भाषेंत नाहीं म्हणून त्याचें अस्तित्व मानलें जात नाहीं तसें य्य्, व्व् वगैरे एकमात्रिक व्यंजनांचें अस्तित्व मानलें जात नाहीं.

यदि पुनः पूर्व एवोपदिश्येत पर एव वा । कश्चात्र विशेषः ।

हकारस्य परोपदेशेऽड्ग्रहणेषु हग्रहणम् ॥१॥

हकारस्य परोपदेशेऽड्ग्रहणेषु हग्रहणं कर्तव्यम् । आतोऽटि नित्यम् [८.३.३] शश्छोऽटि [८.४.६३] दीर्घादटि समानपादे [८.३.९] हकारे चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । महाँ हि सः॥

उत्त्वे च ॥२॥

उत्त्वे च हकारग्रहणं कर्तव्यम् । अतो रोरप्लुतादप्लुते [६.१.११३] हशि च [११४] हकारे चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । पुरुषो हसति । ब्राह्मणो हसतीति ॥अस्तु तर्हि पूर्वोपदेशः।

पूर्वोपदेशे किंत्वक्सेड्विधयो झल्ग्रहणानि च ॥३॥

यदि पूर्वोपदेशः किंत्वं विधेयम् । स्निहित्वा स्नेहित्वा । सिस्निहिषति सिस्नेहिषति । रलो व्युपधाद्धलादेः [१.२.२६] इति किंत्वं न प्राप्नोति ॥ क्सविधिः । क्सश्च विधेयः । अधुक्षत् अलिक्षत् । शल

बरें तर, अगोदरच एकदां उच्चारल्यास काय होईल, किंवा शेवटीं एकदांच उच्चारल्यास काय होईल ? दोहींत फरक काय पडेल ?

(वा.१) हकार एकदांच शेवटीं उच्चारल्यास ज्या ठिकाणीं अट् शब्द उच्चारून अट् वर्णांना कार्य सांगितलें आहे त्या सूत्रांत हकार निराळा घालावा लागेल.[1] उदाहरणार्थ—'आतोटि नित्यम्' (८।३।३), 'शश्छोटि' (८।४।६३), 'दीर्घादटि समानपादे' (८।६।९) या तीन सूत्रांमध्यें 'हकारे च' (हकार पुढें असतांनाही) असे शब्द घालावे लागतील; म्हणजे महाँ हि सः इत्यादि ठिकाणीं अनुनासिक वगैरे होतील. त्याचप्रमाणें

(वा.२) उकार आदेश सांगणाऱ्या सूत्रांत हकार उच्चारावा लागेल. उदाहरणार्थ—'अतो रोरप्लुतादप्लुते' (६।१।११३ यानंतर सांगितलेल्या 'हशि च' (६।१।११४) या सूत्रांत 'हकारे च' असे जास्ती शब्द घालावे लागतील. म्हणजे 'पुरुषो हसति', 'ब्राह्मणो हसति' या उदाहरणांमध्यें उकारादेश होईल.

तर मग अगोदरच उच्चारण करावें.

(वा.३) जर अगोदरच एकदां उच्चारण केलें[3] तर हकारान्त धातूच्या पुढील त्क्वा आणि सन् या प्रत्ययांना किंत्व सांगण्यास निराळें सूत्र करावें लागेल. 'स्निहित्वा, स्नेहित्वा,' 'सिस्निहिषति, सिस्नेहिषति' या उदाहरणांमध्यें 'रलो व्युपधाद्धलादेः संश्च' (१।२।२६) या सूत्रानें किंत्व होऊं शकणार नाहीं; कारण हकार 'रलां'मध्यें[4] सांपडत नाहीं. त्याचप्रमाणें हकारान्त धातूच्या पुढील च्लिप्रत्ययाला 'क्स' आदेश सांगण्यासही निराळें सूत्र करावें लागेल; कारण हकार हा 'शलां'मध्यें न सांपडल्यामुळें 'शल इगुपधादनिटः क्सः' (३।१।४५) या सूत्रानें 'अधुक्षत्', 'अलिक्षत्' इत्यादि उदा-

१. कारण 'हयवरट्' या सूत्रामध्यें हकार उच्चारला जाणार नाहीं, तर अट् प्रत्याहारामध्यें हकार सांपडणार नाहीं.

२. 'हयवरट्' येथें हकार उच्चारला नाहीं तर हश् प्रत्याहारच होणार नाहीं. त्याच्या ऐवजीं यश् प्रत्याहार करून 'हशि च' ( ६।१।११४ ) याबद्दल 'यशि च' असें सूत्र करावें लागेल. आणि हकार पुढें असतांना उत्व होतें असें तेथें स्वतंत्र म्हणावें लागेल.

३. हल् या शेवटच्या सूत्रांत एक हकाराचाच उपदेश केला आहे. तो केला नाहीं तर तें हल् हें सूत्रच नको असें होतें. अल्, हल् वगैरे जे लकाराबरोबर प्रत्याहार केले आहेत ते शषसर् या सूत्रांतील रेफाबरोबरच म्ह. अर्, हर् असे करावेत.

४. रल् प्रत्याहाराच्या ऐवजीं रर् असा प्रत्याहार सूत्रांत उच्चारावा लागेल व त्या रर् प्रत्याहारामध्यें हकार सांपडत नाहीं.

इगुपधादनिटः क्सः[३.१.४५]इति क्सो न प्राप्नोति ॥ इड्विधिः । इट् च विधेयः । रुदिहि स्वपिहि । वलादिलक्षण इण्न प्राप्नोति ॥ झल्ग्रहणानि च । किम् । अहकाराणि स्युः । तत्र को दोषः । झलो झलि[८.२.२६] इतीह न स्यात् । अदाग्धाम् अदाग्धम् ॥ तस्मात्पूर्वश्चैवोपदेष्टव्यः परश्च । यदि च किंचिदन्यत्राप्युपदेशे प्रयोजनमस्ति तत्राप्युपदेशः कर्तव्यः ॥

इदं विचार्यते । अयं रेफो यकारवकाराभ्यां पूर्व एवोपदिश्येत ह र य व- डिति पर एव वा यथान्यासमिति । कश्चात्र विशेषः ।

रेफस्य परोपदेशेऽनुनासिकद्विर्वचनपरसवर्णप्रतिषेधः ॥४॥

रेफस्य परोपदेशेऽनुनासिकद्विर्वचनपरसवर्णानां प्रतिषेधो वक्तव्यः । अनुनासिकस्य । स्वर्नयति प्रातर्नयतीति यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा [८.४.४५] इत्यनुनासिकः प्राप्नोति ॥ द्विर्वचनस्य । भद्रह्रदः मद्रह्रद इति यर इति द्विर्वचनं प्राप्नोति ॥ परसवर्णस्य । कुण्डं रथेन । वनं रथेन । अनुस्वारस्य ययि [८.४.५८]

हरणांत क्स होऊं शकणार नाहीं. तसेंच 'इट्' आगमही निराळा सांगावा लागेल. कारण 'वला'मध्यें हकार न सांपडल्यामुळें 'रुदिहि', 'स्वपिहि' या ठिकाणीं 'हि' प्रत्ययाला 'इट्' आगम (७।२।७६) होणार नाहीं. त्याप्रमाणेंच ज्या सूत्रांमध्यें 'झल्' शब्द उच्चारला आहे त्यांचीही तीच स्थिति होईल.

ती काय ?

'झल्' जेथें उच्चारला आहे तेथें 'झला'-मध्यें हकार सांपडावयाचा नाहीं.

नाहीं सांपडला तर काय दोष येईल ?

'अदाग्धाम्' हें उदाहरण साधतांना 'झलो झलि' (८।२।२६) या सूत्रानें सकाराचा लोप होणार नाहीं. तेव्हां एकंदरींत सर्व उदाहरणें साधण्याकरितां अगोदरही उच्चारण करावें व नंतरही उच्चारण करावें. येवढेंच काय, पण आणखीसुद्धां मध्यें एखाद्या ठिकाणीं उच्चारण करण्याचा उपयोग[५] असेल तर त्या ठिकाणींही उच्चारण करावें.

बरें तर, दुसरें एक विचारावयाचें की हा रेफ जो येथें उच्चारला आहे तो यकार व वकार यांच्या आधीं हरयवट् सूत्र करून उच्चारावा का जसा उच्चारला आहे तसाच तो राहूं द्यावा ?

दोहींमध्यें फरक काय पडेल ?

(वा.४) रेफ जर यकार व वकार यांच्यानंतर उच्चारला तर अनुनासिक, द्वित्व व परसवर्ण हीं होत नाहींत म्हणून सांगावें लागेल. अनुनासिकाचें उदाहरण—यकारवकारांनंतर रेफ उच्चारल्यास त्याला स्वर्नयति, प्रातर्नयति या ठिकाणीं यरोनुनासिकेनुनासिको वा(८।४।४५) या सूत्रानें अनुनासिक होऊं लागेल[६]. द्वित्वाचें उदाहरण 'मद्रह्रदः', 'भद्रह्रदः' या ठिकाणीं रेफ यरांत मोडला गेल्यामुळें त्याला 'अचो रहाभ्यां द्वे' (८।४।४६) या सूत्रानें द्वित्व होऊं लागेल. परसवर्णाचें उदाहरण—'कुण्डं रथेन', 'वनं रथेन' या ठिकाणीं अनुस्वाराला 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' (८।४।५८) या सूत्रानें

---

५. कारण महेश्वरांनीं जो हा अक्षरसमाम्नाय उच्चारला तो वर्णांच्या स्वरूपाचें ज्ञान करून द्यावें ह्याच उद्देशानें उच्चारला आहे असें नाहीं, तर प्रयोजनाकरतां उच्चारला आहे. तेव्हां एकदां उच्चारून जर प्रयोजन भागत नाहीं तर दोनदां उच्चारण्यास काय हरकत आहे ? काम पडल्यास तीनदां देखील उच्चारण्यास हरकत नाहीं.

६. कारण यर् प्रत्याहारामध्यें रेफ सांपडत आहे. आतां जरी ञ, म, ङ, ण, न हे अनुनासिक पांच आहेत तरी रेफाचें मूर्धा स्थान असल्यामुळें त्याच्यासारखा मूर्धस्थानाचा णकार हा 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें होईल.

इति परसवर्णः प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि पूर्वोपदेशः ।

पूर्वोपदेशे कित्त्वप्रतिषेधोऽव्यलोपवचनं च ॥५॥

यदि पूर्वोपदेशः कित्त्वं प्रतिषेध्यम् । देवित्वा दिदेविषति । रलो व्युपधात् [१.२.२६] इति कित्त्वं प्राप्नोति । नैष दोषः । नैवं विज्ञायते रलः व्युपधादिति । किं तर्हि । रलः अव्व्युपधादिति । किमिदमव्व्युपधादिति । अवकारान्ताद्व्युपधादव्व्युपधादिति ॥ व्यलोपवचनं च । व्योश्च लोपो वक्तव्यः । गौधेरः । पचेरन् यजेरन् । जीवे रदानुक् जीरदानुः । वलीति लोपो न प्राप्नोति । नैष दोषः । रेफोऽप्यत्र निर्दिश्यते । लोपो व्योर्वलीति रेफे च वलि चेति ॥ अथवा पुनरस्तु परोपदेशः । ननु चोक्तं रेफस्य परोपदेशेऽनुनासिकद्विर्वचनपरसवर्णप्रति-

---

परसवर्ण होऊं लागेल.

बरें, असें असेल तर हरयवट् असें यकार व वकार यांच्या अगोदरच त्याचें उच्चारण करा.

पूर्वी उच्चारल्यास—

(वा.५) जर पूर्वी उच्चारण केलें तर कित्त्वाचा निषेध करावा लागेल. 'देवित्वा', 'दिदेविषति' या उदाहरणांत वकार हा रलांत मोडल्यामुळें 'रलो व्युपधाद्धलादेः संश्च' (१।२।२६) या सूत्रानें कित्त्व होऊं लागेल.

हा कित्त्व होण्याचा दोष येत नाहीं; कारण 'रलो व्युपधात्०' या सूत्रांत 'रलः', 'व्युपधात्' अशीं पदें आम्ही नाहीं पाडणार.

तर मग कशीं पदें पाडणार?

'रलः', 'अव्व्युपधात्' अशीं.

अव्व्युपधात्' पद काय अर्थाचें?

त्याचा अर्थ 'वकारान्त नसलेल्या व इकार व उकार उपधेला ज्याच्या आहेत अशा धातूहून' हा.

'व्यलोपवचना'संबंधीं (६।१।६६) बोलावयाचें म्हणजे वकार व यकार यांचा लोप रेफ पुढें असतांना निराळें सूत्र करून सांगावा लागेल. 'गौधेरः[७]', 'पचेरन्', 'यजेरन्' हीं उदाहरणें पाहा; त्याप्रमाणेंच जीव् धातूहून 'रदानुक्' प्रत्यय करून साधलेलें 'जीरदानुः' उदाहरण पाहा. या ठिकाणीं रेफ पूर्वी उच्चारल्यास तो वलांत न मोडल्यामुळें तो पुढें असतांना यकार व वकार यांचा लोप होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६) या सूत्रांत रेफाचें सुद्धां उच्चारण केलें आहे. 'व्योः' व 'र्वलि[९]' अशीं पदें येथें पाडावयाचीं म्हणजे रेफ किंवा वल् पुढें असतांना यकार व वकार यांचा लोप होतो, असा अर्थ होईल.

अथवा राहीना पुढेंच रेफ जसा उच्चारला आहे तसाच?

पण तसें झाल्यास वरतीच नाहीं का सांगितलें की अनुनासिक, परसवर्ण व द्वित्व यांचा निषेध सांगावा लागेल?

---

७. 'गोधाया ढ्रक्' (४।१।१२९) या सूत्रानें गोधा शब्दाहून ढ्रक् प्रत्यय केल्यानंतर त्या प्रत्ययांतील र या अक्षराच्या पूर्वीच्या ढकाराला 'आयने०' (७।१।२) या सूत्रानें एय् असा आदेश केला असतां त्यांतील यकाराचा 'लोपो व्यो०' (१।६।६६) या सूत्रानें रेफ हा वल् पुढें आहे म्हणून लोप होतो. पचेरन् या उदाहरणामध्यें पच् धातूहून लिङ्प्रत्यय, त्याला झ आदेश, त्याला 'झस्यरन्' (३।४।१०५) या सूत्रानें रन् आदेश, 'लिङः सीयुट' (३।४।१०२) या सूत्रानें सीयुट् आगम, त्यांतील यकाराचा 'लोपोव्यो०' (३।१।६६) या सूत्रानें लोप होतो.

८. जीवे रदानुक् (उणा. सू.) या उणादिसूत्रानें जीव् धातूहून रदानुक् प्रत्यय सांगितला आहे.

९. वलि असें येथें पद आहे. परंतु तेथें 'र्वलि' असेंही पद पाडतां येतें. 'रोरि' (८।३।१४) या सूत्रानें व्योर् यांतील रेफाचा लोप होऊन व्योर्वलि असा संधि होईल. र्वलि येथें र् आणि वल् यांचा समाहारद्वंद्व करून पुढें सप्तमीचा एकवचनप्रत्यय केला आहे.

षेध इति । अनुनासिकपरसवर्णयोस्तावत्प्रतिषेधो न वक्तव्यः । रेफोष्मणां सवर्णा न सन्ति । द्विर्वचनेऽपि नेमौ रहौ कार्यिणौ द्विर्वचनस्य । किं तर्हि । निमित्तमिमौ रहौ द्विर्वचनस्य । तद्यथा । ब्राह्मणा भोज्यन्तां माठरकौण्डिन्यौ परिवेविष्टामिति नेदानीं तौ भुञ्जाते ॥

इदं विचार्यते । इमेऽयोगवाहा न क्वचिदुपदिश्यन्ते श्रूयन्ते च तेषां कार्यार्थ उपदेशः कर्तव्यः । के पुनरयोगवाहाः । विसर्जनीयजिह्वामूलीयोपध्मानीयानुस्वारानुनासिक्ययमाः । कथं पुनरयोगवाहाः । यदयुक्ता वहन्त्यनुपदिष्टाश्च श्रूयन्ते ॥ क्व पुनरेषामुपदेशः कर्तव्यः ।

---

अनुनासिक व परसवर्ण यांचा निषेध सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण रेफ व ऊष्मवर्ण[१०] यांना कोणताही वर्ण सवर्ण नसल्यामुळें अनुनासिक व परसवर्ण होणार नाहींतच. द्वित्वासंबंधानें म्हणावयाचें म्हणजे रेफ व हकार हे द्वित्वाचे कार्यी नसतात.[११]

तर मग काय असतात ?

हे रेफ व हकार द्वित्वाचें निमित्त असतात. याला दृष्टांत द्यावयाचा म्हणजे 'ब्राह्मणांना जेवावयास घाला, माठर व कौंडिण्य यांना वाढून द्या' असें म्हटलें असतां माठर व कौंडिण्य कांहीं तेथें जेवत नाहींत.[१२]

आतां असें विचारायाचें आहे की अयोगवाह वर्णांचा कोठेंही उपदेश केला नाहीं तरी पण ते प्रयोगांत ऐकू येतात. तेव्हां त्यांचा उपदेश शास्त्रांत सांगितलेलीं कार्यें होण्याकरितां करणें आवश्यक आहे.

पण अयोगवाह म्हणजे कोणते वर्ण ?

विसर्ग,[१३] जिह्वामूलीय, उपध्मानीय, अनुस्वार आणि यम.

यांना अयोगवाह कां म्हणतात ?

कारण की अक्षरसमाम्नायांत घातले नसतांनासुद्धां ते प्रयोगाच्या उपयोगीं पडतात. म्ह. त्यांचा उपदेश आचार्यांनीं केला नसतांनासुद्धां ते ऐकूं येतात.

बरें, पण यांचा उपदेश म्हणजे उच्चारण करावयाचें झाल्यास अक्षरसमूहांत ते कोठें घालावेत ?

---

१०. श, ष, स, ह या चार वर्णांना ऊष्मवर्ण असें म्हणतात. 'यरोनुनासिके०' (८।४।४५) या सूत्रामध्यें सवर्णपदाचा संबंध करून 'यराला त्याचा सवर्ण असा त्याला अनुनासिक आदेश होतो' असा अर्थ केला म्हणजे स्वर्नयति इत्यादि उदाहरणामध्यें दोष येत नाहीं. णकार हा जरी मूर्धास्थानचा असल्यामुळें रेफाला जवळचा आहे तरी तो रेफाचा सवर्ण होत नाहीं. कारण रेफाचा आभ्यंतरप्रयत्न ईषत्स्पृष्ट आहे आणि णकाराचा स्पृष्ट प्रयत्न आहे असा प्रयत्नभेद आहे. तेव्हां यरामध्यें रेफ सांपडला तरी दोष नाहीं. तसेंच ययामध्यें रेफ सांपडला तरी 'कुंडं रथेन' येथें रेफाला सवर्ण नसल्यामुळें त्याच्या मागील अनुस्वाराला अनुस्वारस्य०' (८।४।५८) या सूत्रानें परसवर्ण होत नाहीं.

११. कार्यी म्ह. उद्देश्य. रेफ आणि हकार या दोन वर्णांना कुठेंही द्वित्व होत नाहीं. ते फक्त दुसऱ्या वर्णाला द्वित्व करतांना निमित्त होतात.

१२. त्याप्रमाणें 'अचो रहाभ्यां०'(८।४।४६) या सूत्रानें रेफ आणि हकार या वर्णांमुळें त्याच्या पुढील वर्णाला द्वित्व सांगितलें असल्यामुळें अर्थातच त्या दोन वर्णांना द्वित्व होणार नाहीं त्यांपैकीं हकार हा यरामध्यें नसल्यामुळें त्याला द्वित्वाची प्राप्तिच नाहीं. आणि रेफाला प्राप्ति आली तरी लौकिक न्यायानें त्याला द्वित्व होत नाहीं.

१३. क आणि ख या दोन वर्णांच्या मागील अर्ध्या विसर्गाला 'जिह्वामूलीय' म्हणतात. तसेंच प आणि फ या दोन वर्णांच्या मागील विसर्गाला 'उपध्मानीय' म्हणतात. हे 'कुप्वोः꣸क꣸पौच'(८।३।३७) या सूत्रानें सांगितले आहेत. ञ, म, ङ, ण, न यांपैकीं कोणाच्याही मागें झय् प्रत्याहारापैकीं वर्ण आला असतां त्या वर्णासारखा जो 'ञ' त्यापुढें दुसरा वर्ण उच्चारला जातो त्याला 'यम' म्हणतात. याची विशेष माहिती प्रातिशाख्यामध्यें दिली आहे. अनुस्वार आणि विसर्ग हे प्रसिद्धच आहेत.

**अयोगवाहानामट्सु णत्वम् ॥६॥**

अयोगवाहानामट्सूपदेशः कर्तव्यः । किं प्रयोजनम् । णत्वम् । उरःकेण उरःपेण । अड्व्यवाय इति णत्वं सिद्धं भवति ॥

**शर्षु जश्भावषत्वे ॥७॥**

शर्षूपदेशः कर्तव्यः । किं प्रयोजनम् । जश्भावषत्वे । अयमुब्जिरुपध्मानीयोपधः पठ्यते तस्य जश्त्वे कृत उब्जिता उब्जितुमित्येतद्रूपं यथा स्यात् ॥ यद्युब्जिरुपध्मानीयोपधः पठ्यत उब्जिजिषतीत्युपध्मानीयादेरेव द्विर्वचनं प्राप्नोति । दकारोपधे पुनर्न न्द्राः संयोगादयः [६.१.३] इति प्रतिषेधः सिद्धो भवति । यदि दकारोपधः पठ्यते का रूपसिद्धिः उब्जिता उब्जितुमिति । असिद्धे भ उद्जेः । इदमस्ति स्तोः श्चुना श्चुः [८.४.४०] इति । ततो वक्ष्यामि । भ उद्जेः । उद्जेः श्चुना संनिपाते भो भवतीति । तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । निपातनादेव

(वा.६) या अयोगवाहांचें अटांमध्यें उच्चारण करावें तें कशाकरितां ?

णत्वाकरितां. 'उरःकेण', 'उरᳲकेण', 'उरःपेण', 'उरᳲपेण' या ठिकाणीं अयोगवाहांचा अटांमध्यें उपदेश केल्यास 'अट्कुप्वाङ्०' (८।४।२) या सूत्रानें नकाराला णकार होऊं शकेल.

(वा.७) शरांमध्येंही यांचें उच्चारण करावें. तें कशाकरितां ?

जश् आदेश होण्याकरितां; तसेंच षत्व होण्याकरितां. उदाहरणार्थ 'उब्ज्' धातु घ्या. ह्या उब्ज् धातूचें मूळ उच्चारण करतांना उपधेला उपध्मानीय घालून उच्चारण केलें[१४] आहे. उपध्मानीयाचें शरांमध्यें उच्चारण केल्यास त्याला 'झलां जश् झशि' (८।४।५३) या सूत्रानें जश्त्व होऊन 'उब्जिता', 'उब्जितुम्' हीं रूपें साधतील.[१५]

पण जर उब्ज् धातुच उपधेला उपध्मानीय घालून पाठ केला तर उब्जिजिषति हें रूप साधतांना उपध्मानीय आरंभीं असलेला जो एकस्वरयुक्त भाग त्याला द्वित्व होईल; आणि दकार उपधेला आहे असें मानिलें तर दकाराला द्वित्वाचा निषेध 'न न्द्राः संयोगादयः' (६।१।३) या सूत्रानें होईल.

पण जर उपधेला दकार घालून उब्ज् धातूचा पाठ केला तर 'उब्जिता', 'उब्जितुम्' हीं रूपें[१६] कशीं साधावयाचीं ?

असिद्ध जें त्रिपादी प्रकरण त्यांत 'भ उद्जेः' असें सूत्र करतां येईल. 'स्तोः श्चुना श्चुः' (८।४।४०) हें सूत्र त्रिपादींत पठलेंच आहे. त्या सूत्राचे नंतर 'भ उद्जेः' हें विधान करूं व त्याचा अर्थ उद्ज् धातूच्या दकाराला चवर्गातील व्यंजनाचा योग असतांना भकारादेश होतो असा[१७] करूं.

बरें, तर मग तें विधान करावें.

निराळें विधान करण्याची जरूर नाहीं; कारण, आचार्य पाणिनींनीं निपातन केल्यामुळेंच काम भागत आहे.

---

१४. म्ह. उᳲज् असें उच्चारण केलें आहे. दकार मध्यें घालून उद्ज् असें मूळ उच्चारण केलें आहे असा येथें दुसरा पक्ष आहे.

१५. उपध्मानीयाचें ओष्ठस्थान असल्यामुळें त्याला जश्त्व होतांना जबगडद यांपैकीं बकार आदेश होतो. कारण बकाराचें ओष्ठस्थान आहे.

१६. दकाराला 'स्तोः श्चुना श्चुः' (८।४।४०) या सूत्रानें जकार आदेश होऊन दोन जकारांचें उज्जिता असें रूप होईल.

१७. भकार आदेश केल्यानंतर त्या भकाराला 'झलां जश् झशि' (८।४।५३) या सूत्रानें बकार आदेश होऊन उब्जिता वगैरे रूपें साधतील. अभ्युद्गः वगैरे ठिकाणीं उद्ज् धातूच्या जकाराला 'चजोः कु०' (७।३।५२) या सूत्रानें कुत्व होऊन गकार आदेश झाल्यानंतर दकाराला चवर्गाचा योग नसल्यामुळें 'भ उद्जेः' या नवीन केलेल्या सूत्रानें भकार आदेश होत नाहीं.

सिद्धम् । किं निपातनम् । भुजन्युब्जौ पाण्युपतापयोः [७.३.६१] इति । इहापि तर्हि प्राप्नोति । अभ्युद्गः समुद्ग इति । अकुत्वविषये तन्निपातनम् । अथवा नैतदुब्जे रूपं गमेरेतद्व्युपसर्गाड्डो विधीयते। अभ्युद्गतोऽभ्युद्गः । समुद्गतः समुद्ग इति ॥ षत्वं च प्रयोजनम् । सर्पिःषु धनुःषु । शर्व्यवाय इति षत्वं सिद्धं भवति । नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि [८.३.५८] इति विसर्जनीयग्रहणं न कर्तव्यं भवति । नुमश्चापि तर्हि ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथं सर्पींषि धनूंषि । अनुस्वारे कृते शर्व्यवाय इत्येव सिद्धम् । अवश्यं नुमो ग्रहणं कर्तव्यम् । अनुस्वारविशेषणं नुम्ग्रहणं नुमो योऽनुस्वारस्तत्र यथा स्यादिह मा भूत् । पुंस्विति ॥ अथवाविशेषेणोपदेशः कर्तव्यः । किं प्रयोजनम् ।

**अविशेषेण संयोगोपधासंज्ञालोऽन्त्यद्विर्वचनस्थानिवद्भावप्रतिषेधाः ॥८॥**

अविशेषेण संयोगसंज्ञाप्रयोजनम् ।

---

कोठें तें निपातन केलें आहे ?

'भुजन्युब्जौ[18] पाण्युपतापयोः' (७।३।६१) या सूत्रांत.

तर मग 'अभ्युद्गः', 'समुद्गः' या ठिकाणींही भकारादेश होऊं लागेल.

तसें होऊं लागल्यास आम्ही म्हणूं की भकारादेश करून जें 'उब्ज्' धातूचें निपातन घ्यावयाचें तें ज्या ठिकाणीं उद्ज् धातूला 'कुत्व', होत नसेल त्या ठिकाणीं[19] अथवा, 'अभ्युद्गः' 'समुद्गः' हीं 'उब्ज्' धातूचीं रूपें समजूं नयेत; 'अभि' व 'उत्' हे दोन उपसर्ग जोडलेल्या 'गम्' धातूचीं हीं रूपें[20] समजावीं. 'अभ्युद्गत' म्हणजे वरतीं आलेला या अर्थी 'अभ्युद्ग' शब्द; व 'समुद्गत' म्हणजे जोडून बसलेला या अर्थी 'समुद्ग' शब्द घ्यावे.

षत्वादेशाविषयीं उपयोग दाखवावयाचा म्हणजे 'सर्पिःषु', 'धनुःषु' या उदाहरणांमध्यें विसर्ग जरी मध्यें असला तरी त्या विसर्गाचा शरांमध्यें अंतर्भाव झाल्यामुळें 'नुम्विसर्जनीयशर्व्यवायेपि' (८।३।५८) या सूत्रानें शरांचेंच व्यवधान आहे व तें खपतें म्हणून सकाराला षत्व होईल; व 'नुम्विसर्ज०' सूत्रांत 'विसर्जनीय' पद घालण्याची जरूर राहणार नाहीं.

तर मग त्या सूत्रांत 'नुम्' पदही न घातलें तरी चालेल.

पण 'सर्पींषि','धनूंषि' हीं रूपें कशीं साधतील ?

नुमाला अनुस्वार केल्यावर अनुस्वार हा शरांमध्यें अंतर्भूत झाल्यामुळें 'शर्व्यवाये' या पदानेंच काम होईल.

जरी 'सर्पींषि', 'धनूंषि' येथें षत्व होण्याकरितां 'नुम्' पदाची जरूर लागली नाहीं तरी 'नुम्' पद सूत्रामध्यें अवश्य ठेवलें पाहिजे. व तें 'नुम्' पद अनुस्वाराला विशेषण म्हणून घेतलें पाहिजे. म्हणजे नुमाला झालेला जो अनुस्वार त्याचेंच व्यवधान असतांना षत्व होईल. इतर अनुस्वाराचें व्यवधान असतांना, उदाहरणार्थ 'पुंसु' येथें, षत्व होणार नाहीं.

शिवाय असेही कांहीं उपयोग आहेत की,त्याकरतां नक्की अमक्याच शिवसूत्रांत अशारीतीनें नव्हे, तर अक्षरसमाम्नायांत कुठें का होईना पण या अयोगवाहांचें पठन मात्र केलेंच पाहिजे.

तसे उपयोग कोणते ?

(वा.८)अविशेषानें म्हणजे या अक्षरसमाम्नायामध्यें कुठेंतरी उपदेश केला असतांना 'संयोग संज्ञा होणें' हा एक फायदा.—'ऊ३ब्जक' उदाहरण घ्या. हलांमध्यें कुठेंतरी उपदेश केला

---

[18] पाणिनीनें न्युब्ज असें येथें जें उच्चारण केलें आहे त्यावरून उद्ज् धातूच्या दकाराला भकार आदेश होतो असें अनुमान निघतें.

[19] कारण 'भुजन्युब्जौ०' (७।३।६१) हें सूत्र कुत्वाचा निषेध सांगणारें आहे.

[20] गम् धातूहून ड प्रत्यय करून गम् यांतील 'अम्' या टिसंज्ञक भागाचा लोप होऊन अभ्युद्गः वगैरे रूपें साधतात.

ऊ३ब्जक । हलोऽनन्तराः संयोगः [१.१.७] इति संयोगसंज्ञा संयोगे गुरु [१.४.११] इति गुरुसंज्ञा गुरोरिति प्लुतो भवति ॥ उपधासंज्ञा च प्रयोजनम् । दुष्कृतम् निष्कृतम् । निष्पीतम् दुष्पीतम् । इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य [८.३.४१] इति षत्वं सिद्धं भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । नेदुदुपधग्रहणेन विसर्जनीयो विशेष्यते । किं तर्हि । सकारो विशेष्यते । इदुदुपधस्य सकारस्य यो विसर्जनीय इति । अथवोपधाग्रहणं न करिष्यत इदुद्भ्यां तु परं विसर्जनीयं विशेषयिष्यामः । इदुद्भ्यामुत्तरस्य विसर्जनीयस्येति ॥ अलोऽन्त्यविधिः प्रयोजनम् । वृक्षस्तरति । प्लक्षस्तरति । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यलोऽन्त्यस्य सत्वं सिद्धं भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । निर्दिश्यमान-

असतां उपध्मानीय हल् समजला गेल्यामुळें 'ꣳज्' येवढ्याला[२१] 'हलोनन्तराः संयोगः (१।१।७) या सूत्रानें संयोग संज्ञा होईल, संयोग संज्ञा झाल्यामुळें उकाराला 'संयोगे गुरु' (१।४।११) या सूत्रानें गुरु संज्ञा होईल; आणि गुरु संज्ञा झाल्यावर तो उकार 'गुरोननृतः०' (८।२।८६) या सूत्रानें प्लुत होईल. 'उपधा 'संज्ञा' होणें हा दुसरा फायदा.—'दुष्कृतम्', निष्कृतम्', 'निष्पीतम्', 'दुष्पीतम्' हीं उदाहरणें घ्या; या ठिकाणीं इकार व उकार यांना उपधा संज्ञा झाल्यावर[२२] 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' (८।३।४१) या सूत्रानें विसर्गाला षत्व होईल.

उपधा संज्ञेविषयीं हा उपयोग सांगतां येणार नाहीं. 'इदुदुपध' हा शब्द विसर्गाला विशेषण म्हणून लावला जाणार नाहीं.

तर मग कशाला विशेषण लावावयाचा?

सकाराला विशेषण लावावयाचा व 'इकार किंवा उकार उपधेला असलेला जो सकार[२३] त्याला झालेला जो विसर्ग०' इत्यादि अर्थ करावयाचा. अथवा 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' (८।३।४१) या सूत्रांत उपधा शब्दच घातला जाणार नाहीं; त्या सूत्रांतील 'इदुद्' शब्द हा विसर्गाला विशेषण म्हणून लावूं व 'इकार अथवा उकार यांच्यापुढें असलेला जो विसर्ग त्याला' इत्यादि अर्थ करूं.

अलोन्त्यविधि (१।१।५२) म्हणजे शेवटच्या वर्णाला कार्य होणें हा तिसरा फायदा.—'वृक्षस्तरति', 'प्लक्षस्तरति' हीं उदाहरणें घ्या; विसर्गाला अल् संज्ञा झाली म्हणजे 'षष्ठी विभक्तींत उच्चारून एखाद्याला कार्य सांगितलें म्हणजे तें कार्य त्याच्या शेवटच्या अलाला म्हणजे वर्णाला होतें (१।१।५२)' या साधारण नियमाला अनुसरून येथें शेवटचा अल् जो विसर्ग त्याला सत्व होईल.[२४]

हाही उपयोग देतां येत नाहीं. 'अमुकाला अमुक आदेश होतो अशा रीतीनें सांगितलेला जो आदेश तो सांगणाऱ्या सूत्रांमध्यें ज्या विशिष्ट शब्दस्वरूपाचें उच्चारण केलें असतें त्याच विशिष्ट शब्दस्वरूपाला तो आदेश[२५] होतो' या साधारण नियमास अनुसरून तो आदेश, वि-

२१. उपध्मानीय आणि जकार या दोहोंना मिळून. आतां 'उपध्मानीयाला जश्त्वानें बकार झाल्यानंतर बकार आणि जकार या दोहोंना मिळून संयोगसंज्ञा होऊन काम भागेल' असें मात्र समजूं नये. कारण जश्त्व असिद्ध आहे (८।२।१).

२२. 'अलोन्त्यात्०' (१।१।६५) या सूत्रानें अन्त्य अल् असेल तर उपान्त्य वर्णाला उपधा संज्ञा सांगितली आहे. तेव्हां निः, दुः, अशी स्थिति असतांना विसर्ग हा अल् प्रत्याहारामध्यें सांपडतो म्हणून त्याच्यामागील इकार व उकार यांना उपधा संज्ञा होते.

२३. विसर्ग होण्यापूर्वी निस्, दुस्, या स्थितीमध्यें इकार व उकार यांना उपधा संज्ञा सकार अल् असल्यामुळें सहजच होत आहे.

२४. 'विसर्जनीयस्य सः' (८।३।३४) या सूत्रानें विसर्गान्त पदाला सकार आदेश सांगितला आहे तो 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें त्या विसर्गान्त पदाच्या (म्ह. वृक्षः याच्या) शेवटच्या अलाला म्ह. विसर्गाला होतो.

२५. 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' या परिभाषेचा हा अर्थ आहे.

स्यादेशा भवन्तीति विसर्जनीयस्यैव भविष्यति ॥ द्विर्वचनं प्रयोजनम् । उरःकः उरःपः । अनचि च [८.४.४७] अच उत्तरस्य यरो द्वे भवत इति द्विर्वचनं सिद्धं भवति ॥ स्थानिवद्भावप्रतिषेधश्च प्रयोजनम् । यथेह भवत्युरःकेण उरःपेणेत्यड्व्यवाय इति णत्वमेवमिहापि स्थानिवद्भावात्प्राप्नोति व्यूढोरस्केन महोरस्केनेति । तत्रानल्विधाविति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥

किं पुनरिमे वर्णा अर्थवन्त आहोस्विदनर्थकाः ।

**अर्थवन्तो वर्णा धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामेकवर्णानामर्थदर्शनात् ॥९**

धातव एकवर्णा अर्थवन्तो दृश्यन्ते । एति अध्येति अधीत इति । प्रातिपदिकान्येकवर्णान्यर्थवन्ति । आभ्याम् एभिः एषु । प्रत्यया एकवर्णा अर्थवन्तः । औपगवः कापटवः । निपाता एकवर्णा अर्थवन्तः । अ अपेहि । इ इन्द्रं पश्य । उ उत्तिष्ठ । धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामेकवर्णानामर्थदर्शनान्मन्यामहेऽर्थवन्तो वर्णा

सर्गाला जरी 'अल्' म्हणतां आलें नाहीं तरी विसर्गालाच होईल.

द्वित्व होणें हा चवथा फायदा.—'उरःकः', 'उरःपः' हीं उदाहरणें घ्या. येथें विसर्ग हा यर् समजला गेल्यास 'अच् म्हणजे स्वर, त्याच्या पुढें असलेला जो यर् वर्ण त्याला द्वित्व होतें' या अर्थाच्या 'अनचि च' (८।४।४७) या सूत्रानें विसर्गाला द्वित्व होईल.

तसेंच स्थानिवद्भावाचा निषेध हा पांचवा फायदा. ज्याप्रमाणें 'उरःकेण', 'उरःपेण' या ठिकाणीं विसर्ग हा अट् असल्यामुळें त्याचें व्यवधान असतांनाही णत्व (८।४।२) होतें, त्याप्रमाणें 'व्यूढोरस्केन', 'महोरस्केन' या ठिकाणींही स्थानिवद्भावानें (१।१।५६) सकाराला विसर्गाप्रमाणें अट् समजून त्याचें व्यवधान असतांनाही णत्व होऊं लागेल. तें न होण्याकरितां स्थानिवद्भावाचा[२६] निषेध 'अनल्विधौ' (१।१।५६) या पदानें व्हावा ही गोष्ट अयोगवाहांचें अक्षरसमाम्नायांत पठन केल्यास साधेल.

बरें, पण हे जे वर्ण सांगितले आहेत ते अर्थयुक्त आहेत का त्यांना अर्थ नाहीं ?

(वा.९) वर्ण अर्थवान् आहेत. कारण कांहीं ठिकाणीं धातु, प्रातिपदिक, प्रत्यय आणि निपात हे एकाक्षरी असूनही त्यांना अर्थ दिसतो. एकाक्षरी धातु अर्थयुक्त दिसून येतात. उदाहरणार्थ, 'एति','अध्येति', 'अधीते' वगैरे ठिकाणीं 'इ' धातु. एकाक्षरी प्रातिपदिकेंही अर्थयुक्त दिसून येतात. उदाहरणार्थ 'आभ्याम्[२७]', 'एभिः', 'एषु' या ठिकाणीं इदम् शब्दापैकीं अवशिष्ट 'अ' हें प्रातिपदिक. प्रत्ययही एकाक्षरी दिसून येतात. उदारणार्थ 'औपगवः[२८]' 'कापटवः' येथें एकाक्षरी निपातांनाही अर्थ आहे असें दिसून येतें. उदाहणार्थ 'अ[२९] अपेहि', 'इ इन्द्रं पश्य', 'उ उतिष्ठ' या ठिकाणीं अकार, इकार व उकार. तेव्हां धातु, प्रातिपदिकें, प्रत्यय व निपात हे एकवर्णयुक्त

२६. 'अलाचे स्थानीं झालेला आदेश स्थानीसारखा समजूं नये' असा त्या निषेधाचा अर्थ आहे. विसर्ग हा अल् आहे म्हणून त्याचे स्थानीं झालेल्या सकाराला (८।३।३८) अट् असें समजतां येत नाहीं.

२७. येथें मूळ इदम् शब्द आहे परंतु त्या शब्दापैकीं फक्त एक वर्ण आकार येथें उरला आहे व त्या एकाच वर्णापासून इदम् शब्दाचा अर्थ मनांत येतो.

२८. येथें 'उपगु' शब्दाच्या पुढें त्या उपगूचा मुलगा या अर्थी 'तस्यापत्यम्' (४।१।९२) या सूत्रानें अण् प्रत्यय झाला आहे. त्यांतील णकाराचा लोप (१।३।९) होऊन फक्त एक वर्ण अकार उरतो व त्या एकाच वर्णापासून अपत्य अर्थ मनांत येतो.

२९. येथें अ, इ, उ या अव्ययांचा हें या अव्ययासारखा संबोधन अर्थ आहे. अरे दूर हो, अरे इंद्राला पाहा, अरे ऊठ असा अर्थ आहे. अ, इ, उ या अव्ययांचे अधिक्षेप, जुगुप्सा, विस्मय, वितर्क वगैरे आणखीही अर्थ आहेत.

इति ॥

**वर्णव्यत्यये चार्थान्तरगमनात् ॥१०॥**

वर्णव्यत्यये चार्थान्तरगमनान्मन्यामहेऽर्थवन्तो वर्णा इति । कूपः सूपः यूप इति । कूप इति सककारेण कश्चिदर्थो गम्यते । सूप इति ककारापाये सकारोपजने चार्थान्तरं गम्यते । यूप इति ककारसकारापाये यकारोपजने चार्थान्तरं गम्यते । ते मन्यामहे यः कूपे कूपार्थः स ककारस्य यः सूपे सूपार्थः स सकारस्य यो यूपे यूपार्थः स यकारस्येति ॥

**वर्णानुपलब्धौ चानर्थगतेः ॥११॥**

वर्णानुपलब्धौ चानर्थगतेर्मन्यामहेऽर्थवन्तो वर्णा इति । वृक्षः ऋक्षः । काण्डीरः आण्डीरः । वृक्ष इति सवकारेण कश्चिदर्थो गम्यत ऋक्ष इति वकारापाये सोऽर्थो न गम्यते । काण्डीर इति सककारेण कश्चिदर्थो गम्यत आण्डीर इति ककारापाये सोऽर्थो न गम्यते । किं तर्ह्युच्यतेऽनर्थगतेरिति । न साधीयो ह्यत्रार्थस्य गतिर्भवति । एवं तर्हीदं पठितव्यं स्यात् । वर्णानुपलब्धौ चातदर्थगतेरिति । किमिदमतदर्थगतेरिति । तस्यार्थस्तदर्थः । तदर्थस्य गतिस्तदर्थगतिः । न तदर्थगतिरतदर्थगतिः । अतदर्थगतेरिति ।

असतांनाही त्यांना अर्थ असतो असें दिसत असल्यामुळें वर्ण अर्थयुक्त असतात असें आम्ही समजतों.

(वा.१०) वर्णांची उलटापालट केली असतां अर्थामध्यें फेरफार होतो. त्यामुळें आम्ही असें समजतों की वर्णांना अर्थ आहे. 'कूपः', 'सूपः', 'यूपः' हे तीन शब्द घ्या. ककारयुक्त कूप शब्द उच्चारला असतां एक अर्थ मनांत येतो; ककार काढून सकार घालून 'सूप' शब्द उच्चारला की निराळा अर्थ मनांत येतो; व ककार व सकार दोनही काढून टाकून यकार घातला की तिसराच अर्थ मनांत येतो. त्यावरून आम्ही समजतों की 'कूप' शब्दामध्यें कूप म्हणजे विहीर अर्थ आहे तो ककाराचा, जो 'सूप' शब्दामध्यें जो सूप म्हणजे वरण हा अर्थ आहे तो सकाराचा, आणि 'यूप' शब्दामध्यें जो यूप म्हणजे खांब अर्थ आहे तो यकाराचा.

(वा.११) त्याप्रमाणेंच एखादा वर्ण कमी झाला असतां पूर्वीचा अर्थ राहत नाहीं. त्या अर्थी आम्ही असें मानतों की वर्णांना अर्थ आहे. उदाहरणार्थ 'वृक्षः', 'ऋक्षः' हे शब्द घ्या; किंवा 'काण्डीर', 'आण्डीर' हे शब्द घ्या. 'वृक्ष' या वकारयुक्त शब्दानें एक अर्थ मनांत येतो, पण वकार काढून टाकून 'ऋक्ष' शब्द उच्चारला की तो अर्थ मनांत येत नाहीं. त्याप्रमाणें 'काण्डीर' या ककारयुक्त शब्दानें एक[३०] अर्थ मनांत येतो, पण ककार काढून टाकून 'आण्डीर' शब्द उच्चारला की तो अर्थ मनांत येत नाहीं.

पण या वर दिलेल्या अनुभवावरून 'अनर्थगतेः' म्हणजे 'अर्थ मनांत येत नाहीं' असें कसें म्हणतां ? असें म्हणतां येणार नाहीं. कारण वास्तविक पाहतां वर्ण कमी झाला तरी या ठिकाणीं अर्थ चांगल्या रीतीनें मनांत येत आहेच.[३१]

असें असेल तर पुढें लिहिल्याप्रमाणें फरक करून वार्तिकाचें पठन करावें:—

'वर्णानुपलब्धौ चातदर्थगतेः'

हें 'अतदर्थगतेः' पद काय अर्थाचें आहे ? तदर्थ म्हणजे त्या पूर्वीच्या पदाचा अर्थ; तदर्थगति म्हणजे त्या(पूर्वीच्या पदा)च्या अर्थाचें

३०. शर धारण करणारा.

३१. न अर्थगतिः अनर्थगतिः म्ह. अर्थबोध न होणें असा वार्तिकांतील 'अनर्थगतिः' या शब्दाचा अर्थ होतो. आणि वृक्ष यांतील वकार काढला तरी ऋक्ष यापासून अर्थबोध होत नाहीं असें मुळींच नाहीं. कारण ऋक्ष यापासून अस्वल हा अर्थ मनांत येत आहे. आतां वृक्ष शब्दापासून मनांत येणारा जो झाड हा अर्थ तो ऋक्ष यापासून मनांत येत नाहीं हें खरें पण वार्तिककारांनीं 'तो अर्थ मनांत येत नाहीं' अशा अर्थाचा 'अतदर्थगतेः' असा शब्द उच्चारला नाहीं, म्हणून ही शंका उपस्थित झाली आहे.

अथवा सोऽर्थस्तदर्थः। तदर्थस्य गतिस्तदर्थगतिः। न तदर्थगतिरतदर्थगतिः। अतदर्थगतेरिति। स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः। उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः। तद्यथा। उष्ट्रमुखमिव मुखमस्य। उष्ट्रमुखः। खरमुखमिव मुखमस्य। खरमुखः। एवमतदर्थगतेरनर्थगतेरिति॥

## संघातार्थवत्त्वाच्च ॥१२॥

संघातार्थवत्त्वाच्च मन्यामहेऽर्थवन्तो वर्णा इति। येषां संघाता अर्थवन्तोऽवयवा अपि तेषामर्थवन्तः। येषां पुनरवयवा अनर्थकाः समुदाया अपि तेषामनर्थकाः। तद्यथा। एकश्चक्षुष्मान्दर्शने समर्थस्तत्समुदायश्च शतमपि समर्थम्। एकश्च तिलस्तैलदाने समर्थस्तत्समुदायश्च खार्यपि समर्था। येषां पुनरवयवा अनर्थकाः समुदाया अपि तेषामन-

---

ज्ञान; आणि 'अतदर्थगति' म्हणजे पूर्वीच्या पदाच्या अर्थाचें ज्ञान न होणें. असा 'अतदर्थगति' पदाचा अर्थ आहे. वर्ण कमी झाला असतां 'अतदर्थगति होत असल्यामुळें वर्णांना अर्थ आहे' असा वार्तिकाचा अर्थ करावयाचा; अथवा[३२] तदर्थ म्हणजे तो पूर्वीचा अर्थ व तदर्थगति म्हणजे त्या (पूर्वीच्या) अर्थाचें ज्ञान; व अतदर्थगति म्हणजे त्या (पूर्वीच्या) अर्थाचें ज्ञान न होणें; अतदर्थगतीमुळें वर्णांना अर्थ आहे असाही वार्तिकाचा अर्थ करावा.

बरें, मग वार्तिकांत 'अनर्थगतेः' पदाच्या ऐवजीं 'अतदर्थगतेः' पद घालावयाचें कीं काय?

वार्तिकांत फरक करण्याची जरूर नाहीं. 'अनर्थगति' हा समासच असा समजावा की या ठिकाणीं 'उष्ट्रमुख', 'खरमुख' यांप्रमाणें पुढील पदाचा लोप झाला आहे. 'उष्ट्रमुख' शब्दाचा अर्थ 'उंटाच्या तोंडाप्रमाणें ज्याचें तोंड आहे असा'; 'खरमुख' शब्दाचा अर्थ 'गाढवाच्या तोंडाप्रमाणें ज्याचें तोंड आहे असा'; व त्याप्रमाणेंच[३३] 'अनर्थगतेः' या पदाचा अर्थ 'अतदर्थगतेः' म्हणजे 'तो अर्थ मनांत येत नाहीं म्हणून' असा करावयाचा.

(वा.१२) तसेंच वर्णसमूहांनां[३४] ज्या अर्थी अर्थ आहे त्या अर्थी वर्णांनासुद्धां अर्थ आहे. ज्यांच्या समूहाला अर्थ असतो त्या समूहाच्या अवयवांनाही अर्थ असतो, आणि ज्यांच्या अवयवांना अर्थ नसतो त्यांच्या समूहालाही अर्थ नसतो. याला लोकांतील दृष्टान्त द्यावयाचा म्हणजे, दृष्टि शाबूद असलेला दरएक मनुष्य पाहूं शकत असला म्हणजे तशा शंभर माणसांचा समूहही पाहूं शकतो; तसेंच एका तिळांतूनही तेल निघतें तेव्हां त्यांच्या राशींतून—खंडीभर तिळांतूनही--तेल निघूं शकतें. पण जेथें अवयवांना अर्थ नसतो तेथें समूहालाही अर्थ

---

३२. तदर्थ यांतील तद् शब्दानें वृक्ष हा शब्द घेऊन त्या तद् शब्दाचा अर्थ शब्दाबरोबर षष्ठी-तत्पुरुष करून अर्थ केला. आतां तद् शब्दानें वृक्ष शब्द न घेतां त्याचा झाड हा अर्थ घेऊन त्या तद् शब्दाचा 'अर्थ' शब्दाबरोबर कर्मधारय समास करून अर्थ दाखवीत आहेत.

३३. जसा उष्ट्रमुख शब्दामध्यें उष्ट्र शब्दापुढील एका मुख शब्दाचा लोप झाला आहे त्याप्रमाणें अनर्थगतेः या शब्दामध्यें नञाच्या पुढें तद्शब्दाचा लोप झाला आहे. येथें मूळ भाष्यामध्यें 'उत्तरपदलोपः' असें म्हटलें आहे. तेथें उत्तरपद शब्दाचा अर्थ समासांतील पुढील भाग असा घेतां येत नाहीं. उष्ट्रमुख या शब्दामध्यें ज्या मुख शब्दाचा लोप झाला आहे तो मुख शब्द तत्पुरुषसमासांतील उत्तरपद आहे तसें अनर्थगतेः या शब्दामध्यें तद् शब्दाचा लोप झाला आहे पण तो तद् शब्द तदर्थ या षष्ठी-तत्पुरुषाचें किंवा कर्मधारयाचें पूर्वपद आहे म्हणून भाष्यामधील उत्तरपद शब्दाचा पुढील पद इतकाच अर्थ येथें केला आहे. अतत् हा नञ्तत्पुरुष केला तर तद्शब्द उत्तरपद होईल. परंतु तसें केलें तर 'अतदर्थगतेः' याचा अर्थ 'त्या अर्थाशिवाय निराळ्या अर्थाचा बोध होत आहे' असा होईल. वार्तिकाचा अर्थ नञ्तत्पुरुष घेतला तरी जुळेल. भाष्यकारांनीं मात्र तसा अर्थ घेतला नाहीं.

३४. घट पट वगैरे शब्दांना.

र्थकाः । तद्यथा । एकोऽन्धो दर्शनेऽसमर्थस्तत्समुदायश्च शतमप्यसमर्थम् । एका च सिकता तैलदानेऽसमर्था तत्समुदायश्च खारीशतमप्यसमर्थम् ॥ यदि तर्हीमे वर्णा अर्थवन्तोऽर्थवत्कृतानि प्राप्नुवन्ति । कानि । अर्थवत्प्रातिपदिकम् [१·२·४५] इति प्रातिपदिकसंज्ञा प्रातिपदिकात् [४·१·१] इति स्वाद्युत्पत्तिः सुबन्तं पदम् [१.४.१४] इति पदसंज्ञा । तत्र को दोषः । पदस्येति नलोपादीनि प्राप्नुवन्ति । धनं वनमिति ।

**संघातस्यैकार्थ्यात्सुबभावो वर्णात् ॥१३**

संघातस्यैकत्वमर्थस्तेन वर्णात्सुबुत्पत्तिर्न भविष्यति ॥

**अनर्थकास्तु प्रतिवर्णमर्थानुपलब्धेः ॥१४**

अनर्थकास्तु वर्णाः । कुतः । प्रतिवर्णमर्थानुपलब्धेः । न हि प्रतिवर्णमर्था उपलभ्यन्ते । किमिदं प्रतिवर्णमिति । वर्णं वर्णं प्रति प्रतिवर्णम् ॥

**वर्णव्यत्ययापायोपजनविकारेष्वर्थदर्शनात् ॥१५**

वर्णव्यत्ययापायोपजनविकारेष्वर्थदर्शनान्मन्यामहेऽनर्थका वर्णा इति । वर्ण-

---

नसतो. याला उदाहरण, एका आंधळयाला पाहतां येत नसलें म्हणजे शंभर आंधळे जरी एकत्र केले तरी त्यांना पाहतां येत नाहींच; त्याप्रमाणेंच वाळूच्या एका कणांतून तेल निघत नसलें म्हणजे वाळूचा ढीग, शंभर खंडी जरी वाळू घेतली तरी तीपासून तेल नाहींच निघेल.[३५]

बरें, पण जर वर्ण हे अर्थयुक्त आहेत असें समजलें तर अर्थयुक्त शब्दांना जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं त्यांना होऊं लागतील.

तीं कोणतीं कार्यें ?

'अर्थवत्०प्रातिपदिकम्' (१।२।४५) या सूत्रानें सांगितलेली प्रातिपदिकसंज्ञा, प्रातिपदिकात् (४।१।१-२) या सूत्रानें सांगितल्याप्रमाणें प्रातिपदिकाला सु, औ, जस् वगैरे प्रत्यय लागणें; व 'सुबन्तं पदम्' (१।४।१४) सूत्रानें पदसंज्ञा.

बरें, झाली पदसंज्ञा तर बिघडलें काय ?

कां बरें ? 'धनम्', 'वनम्' वगैरे ठिकाणीं नकाराला पद संज्ञा झाल्यास नकाराचा लोप (८।२।७) वगैरे कार्यें होतील.

(वा.१३) वर्णांचा जो समूह त्या सर्व समूहाला मिळूनही तोच एक अर्थ असतो व त्यामुळें प्रत्येक वर्णाला सु वगैरे विभक्तिप्रत्यय लागणार नाहींत.[३६]

(वा.१४) पण[३७] वर्ण हे अर्थरहित आहेत.

ते काय म्हणून ?

कारण की प्रत्येक वर्णाला अर्थ दिसत नाहीं. एकेक वर्ण उच्चारल्याबरोबर निरनिराळा अर्थ मनांत कधींही येत नाहीं.

'प्रतिवर्णम्' हें पद वार्तिकांत कोणत्या अर्थानें उच्चारलें आहे ?

'प्रतिवर्णम्' म्हणजें दरेक वर्णाला.

(वा.१५) वर्णांची उलटापालट, लोप, मिळवणी व बदल ही झाल्यावर देखील अर्थ कायम राहत असल्यामुळें वर्ण हे अर्थरहित आहेत असें आम्ही समजतो. वर्णांच्या उलटापालटीचें

---

३५. येथपर्यंत चार कारणें दाखवून 'वर्ण अर्थवान् आहेत' हें सिद्ध केलें. आतां हा प्रत्येक वर्णाचा अर्थ कोणता असा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर असें की गो वगैरे वर्णांच्या समुदायापासून जो अर्थ मनांत येतो त्यापेक्षां निराळा असा अर्थ प्रत्येक वर्णापासून कांहींच मनांत येत नाहीं. तेव्हां समुदायाचा जो अर्थ तोच त्यांतील प्रत्येक वर्णाचाही अर्थ होत आहे असें मानावें लागतें.

३६. कारण गो शब्दाचा अर्थ जो गाय, त्या अर्थाचें एकत्व गो शब्दाहून केलेल्या सुप्रत्ययानें दाखविलें जात असल्यामुळें, तेंच एकत्व दाखविण्याकरतां पुनः त्या गो शब्दांतील गकार वगैरे प्रत्येक वर्णाहून सुप्रत्यय करतां येत नाहीं.

३७. येथून 'वर्ण अनर्थकही आहेत' हा पक्ष सिद्ध करीत आहेत. 'जेथें धातु, प्रातिपदिक प्रत्यय वगैरे एकाक्षरी असतील तेथें जरी वर्णाला अर्थ असला तरी सर्व ठिकाणीं वर्ण अर्थवान् आहेतच असा नियम नाहीं' असें या पक्षाचें तात्पर्य आहे.

व्यत्यये । कृतेस्तर्कुः । कसेः सिकताः । हिंसेः सिंहः । वर्णव्यत्ययो नार्थव्यत्ययः ॥ अपायो लोपः । घ्नन्ति घ्नन्तु अघ्नन् । वर्णापायो नार्थापायः ॥ उपजन आगमः । लविता लवितुम् । वर्णोपजनो नार्थोपजनः ॥ विकार आदेशः । घातयति घातकः । वर्णविकारो नार्थविकारः ॥ यथैव हि वर्णव्यत्ययापायोपजनविकारा भवन्ति तद्वदर्थव्यत्ययापायोपजनविकारैर्भवितव्यम् । न चेह तद्वत् । अतो मन्यामहेऽनर्थका वर्णा इति ॥ उभयमिदं वर्णेषूक्तम् । अर्थवन्तोऽनर्थका इति च । किमत्र न्याय्यम् । उभयमित्याह । कुतः । स्वभावतः । तद्यथा । समानमीहमानानामधीयानानां च केचिदर्थैर्युज्यन्तेऽपरे न । न चेदानीं कश्चिदर्थवानिति कृत्वा सर्वैरर्थवद्भिः शक्यं भवितुं कश्चिद्वानर्थक इति कृत्वा सर्वैरनर्थकैः । तत्र किमस्माभिः शक्यं कर्तुम् । यद्धातु-

उदाहरण म्हणजे 'कृत्' धातूपासून तर्कु शब्द सिद्ध[३८] होतो. त्यांत तकार आणि ककार यांची उलटापालट झाली तरी अर्थ तोच कायम राहतो; तसाच 'कस्' धातूपासून सिकता शब्द साधण्यांत येतो; व हिंस् धातूपासूत सिंह शब्द साधतो.[३९] या सर्व ठिकाणीं फक्त वर्णांचीच उलटापालट होते, अर्थाची उलटापालट होत नाहीं. अपाय म्हणजे लोप. याचीं उदाहरणें 'हतः', 'घ्नन्ति[४०]', 'घ्नन्तु', 'अघ्नन्'. या सर्व ठिकाणीं फक्त वर्णच नाहींसा झाला आहे, पण अर्थ नाहींसा झाला नाहीं. उपजन म्हणजे जास्ती मिळणें. 'लविता', 'लवितुम्' हीं उदाहरणें घ्या. येथें जरी इकार[४१] हा जास्ती वर्ण मिळाला तरी अर्थांत भर पडत नाहीं. विकार म्हणजे आदेश. त्याचीं उदाहरणें 'घातयति', 'घातकः' हीं घ्या. येथें जरी हन् धातूमधील वर्णांना आदेश[४२] झाले तरी अर्थामध्यें फरक दिसत नाहीं. वास्तविक पाहतां, या ठिकाणीं ज्याप्रमाणें वर्णांच्या उलटापालटी, लोप, भर व बदल होतात त्याप्रमाणेंच अर्थांच्याही उलटापालटी, लोप, भर व बदल व्हावयास पाहिजेत. पण तसें दृष्टीस पडत नाहीं. म्हणून आम्ही समजतों की वर्णांना अर्थ नाहीं.

वर्णांविषयीं दोन्ही तऱ्हा आपण सांगितल्या; त्यांना अर्थ आहे व त्यांना अर्थ नाहीं. या दोन्हींमध्यें योग्य तऱ्हा कोणती ?

दोन्ही तऱ्हा न्याय्य आहेत असें आम्ही म्हणतों.

तें कसें शक्य आहे ?

वर्णांच्या स्वभावावरूनच. उदाहरणार्थ— लोकामध्यें सुद्धां एकच काम साधूं इच्छिणाऱ्या किंवा एकच ग्रंथ अध्ययन करणाऱ्या माणसांत कांहींचाच कार्यभाग होतो, इतरांचा होत नाहीं. वर्णांमध्यें सुद्धां एखाद्या वर्णाला अर्थ दिसला म्हणून सर्वांनाच अर्थ असूं शकेल असें नाहीं; किंवा एखाद्या वर्णाला अर्थ नसला तरी सगळ्या वर्णांनाच अर्थ असूं शकणार नाहीं असेंही नाहीं.

बरें तर, कांहीं वर्ण अर्थयुक्त असतील, कांहीं नसतील; कोणते अर्थयुक्त किंवा कोणते अर्थरहित यांविषयीं आम्हीं काय समजावें ?

कां बरें ? धातु, प्रत्यय, प्रातिपदिकें व

---

३८. कृतेराद्यन्तविपर्ययश्च (उणादिसू० १।१६) या सूत्रानें कृत् धातूहून उण् प्रत्यय करून धातूमधील ककार आणि तकार यांची उलटापालट केली आहे. नंतर 'पुगन्त०' (७।३।८६) या सूत्रानें गुण होऊन तर्कु शब्द सिद्ध होतो.

३९. 'पृषोदरादीनि०' (६।३।१०९) या सूत्रानें हे शब्द सिद्ध होतात.

४०. हतः येथें हन् धातूच्या नकाराचा लोप (६।४।३७) झाला आहे. घ्नन्ति वगैरे उदाहरणांमध्यें हन् धातूच्या अकाराचा लोप (६।४।९८) झाला आहे.

४१. 'आर्धधातुकस्येड्वलादेः' (७।२।३५) या सूत्रानें झालेला इट् आगम.

४२. हकाराला कुत्व (७।३।५४), अकाराला वृद्धि (७।२।११६) व नकाराला तकार (७।३।३२) असे आदेश झाले आहेत.

प्रत्ययप्रातिपदिकनिपाता एकवर्णा अर्थवन्तो ऽतोऽन्येऽनर्थका इति स्वाभाविकमेतत् ॥ कथं य एष भवता वर्णानामर्थवत्तायां हेतुरुपदिष्टोऽर्थवन्तो वर्णा धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामेकवर्णानामर्थदर्शनाद्वर्णव्यत्यये चार्थान्तरगमनाद्वर्णानुपलब्धौ चानर्थगतेः संघातार्थवत्त्वाच्चेति। संघातान्तराण्येवैतान्येवंजातीयकान्यर्थान्तरेषु वर्तन्ते। कूपः सूपः यूप इति। यदि हि वर्णव्यत्ययकृतमर्थान्तरगमनं स्याद्भूयिष्ठः कूपार्थः सूपे स्यात्सूपार्थश्च कूपे कूपार्थश्च यूपे यूपार्थश्च कूपे सूपार्थश्च यूपे यूपार्थश्च सूपे। यतस्तु खलु न कश्चित्कूपस्य वा सूपे सूपस्य वा कूपे कूपस्य वा यूपे यूपस्य वा कूपे सूपस्य वा यूपे यूपस्य वा सूपेऽतो मन्यामहे संघातान्तराण्येवैतान्येवंजातीयकान्यर्थान्तरेषु वर्तन्त इति। इदं खल्वपि भवता वर्णानामर्थवत्तां ब्रुवता साधीयोऽनर्थकत्वं द्योतितम्। यो हि मन्यते यः कूपे कूपार्थः स ककारस्य यः सूपे सूपार्थः स सकारस्य यो यूपे यूपार्थः स यकारस्येत्यूपशब्दस्तस्यानर्थकः स्यात् ॥ तत्रेदमपरिहृतं संघातार्थ-

---

निपात हे ज्या ठिकाणीं एकाक्षरी असतील त्या ठिकाणीं एका वर्णाला अर्थ असतो, व इतर ठिकाणीं वर्णांना अर्थ नसतो असें म्हणावें लागतें.

हें म्हणणें स्वाभाविकही आहे.

तें कसें?

"१. एकवर्णानें युक्त धातु, प्रातिपदिकें, प्रत्यय व निपात यांना अर्थ दिसतो म्हणून; २. वर्ण निराळा दृष्टीस पडला की अर्थ बदलतो म्हणून; ३. वर्ण एखादा गाळला तर पूर्वीचा अर्थ राहत नाहीं म्हणून, व ४. वर्णसमूहाला अर्थ दिसतो म्हणून." अशा तऱ्हेचीं जीं चार कारणें आपण वर्णांना अर्थ आहे हें सिद्ध करण्याकरितां दिलीं त्यासंबंधानें असें म्हणतां येतें की ज्या ज्या ठिकाणीं अर्थ पालटतो त्या त्या ठिकाणीं तो निरनिराळा अर्थ धारण करणारे निरनिराळेच वर्णसमूह असतात. उदाहरणार्थ कूप, सूप, यूप इ०. जर वर्णांचा निराळेपणा हें अर्थ बदलण्याचें कारण असेल तर कूप व सूप या शब्दांमध्यें पुष्कळ भाग[43] सारखा असल्यामुळें कूप शब्दाच्या अर्थापैकीं बराच मोठा अर्थाचा भाग सूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल; तसेंच सूप शब्दाचा बराच अर्थ कूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल; कूप शब्दाचा बराच अर्थ यूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल, व यूप शब्दाचा बराच अर्थ कूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल; सूप शब्दाचा बराच अर्थ कूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल व यूप शब्दाचा अर्थ सूप शब्दाच्या अर्थांत सांपडेल. पण, वास्तविक पाहतां ज्या अर्थी कूपाचा थोडाही अर्थ सूपाच्या अर्थांत मिळत नाहीं, तसेंच सूपाचा कूपांत मिळत नाहीं, कूपाचा यूपांत मिळत नाहीं, किंवा यूपाच्या कूपांत मिळत नाहीं; किंवा सूपाचा यूपांत मिळत नाहीं व यूपाचा सूपांत मिळत नाहीं त्या अर्थी आम्ही असें समजतों की, निरनिराळा अर्थ दाखविणारे हे निरनिराळेच वर्ण संघांत असतात.

शिवाय, वरतीं आपण वर्ण हे अर्थयुक्त आहेत हें सिद्ध करण्याकरितां जें विधान केलें त्यानेंच उलट 'वर्ण हे अर्थरहित असतात' ही गोष्ट चांगलीच सिद्ध होत आहे. कारण जो मनुष्य 'कूप शब्दांत जो कूप म्हणजे विहीर हा अर्थ आहे तो ककाराचा, सूप शब्दांत जो सूप म्हणजे वरण अर्थ आहे तो सकाराचा व यूप शब्दांत जो यूप म्हणजे खांब अर्थ आहे तो यकाराचा' असें म्हणेल त्याच्या मतानें ककार किंवा सकार किंवा यकार यांनाच तो निर-

---

४३. ऊप एवढा भाग.

वत्त्वाच्चेति। एतस्यापि प्रातिपदिकसंज्ञायां परिहारं वक्ष्यति ॥

अइउण् ऋऌक् एओङ् एऔच्।

**प्रत्याहारेऽनुबन्धानां कथमज्ग्रहणेषु न।**

य एतेऽक्षु प्रत्याहारार्था अनुबन्धाः क्रियन्त एतेषामज्ग्रहणेषु ग्रहणं कस्मान्न भवति। किं च स्यात्। दधि णकारीयति मधु णकारीयतीतीको यणचि [६.१.७७] इति यणादेशः प्रसज्येत ॥

**आचारात्**

किमिदमाचारादिति। आचार्याणामुपचारात्। नैतेष्वाचार्या अच्कार्याणि कृतवन्तः ॥

**अप्रधानत्वात्**

अप्रधानत्वाच्च। न खल्वप्येतेषामक्षु प्राधान्येनोपदेशः क्रियते। क्व तर्हि। हल्षु। कुत एतत्। एषा ह्याचार्यस्य शैली लक्ष्यते यत्तुल्यजातीयांस्तुल्यजातीयेषूपदिशति ।

---

निराळा अर्थ असल्यामुळें 'ऊप'[४४] या भागाला कांहींच अर्थ राहत नाहीं.

बरें, एकंदरींत जरी वर्ण अर्थयुक्त आहेत हें सिद्ध करण्याकरितां दिलेल्या बाकीच्या हेतूंचा परिहार केला तरी 'संघांत अर्थयुक्त असल्यामुळें अवयव जे वर्ण अर्थयुक्त आहेत' हा चवथा हेतु कायमच राहतो. या हेतूचा सुद्धां परिहार पुढें 'प्रातिपदिक' संज्ञेचा विचार करतेवेळीं वार्तिककार ( १-२-४५, वा. ११ ) करणार आहेत.

अइउण्, ऋऌक्, एओङ्, ऐऔच्.

या वरील 'अइउण्' वगैरे चार सूत्रांत ण्, क् वगैरे जे शेवटचे वर्ण प्रत्याहार तयार करण्याकरितां घातले आहेत ते 'अच् प्रत्याहार' जेथें उच्चारला आहे तेथें त्या प्रत्याहारांमध्यें कां घेतले जाऊं नयेत ?

घेतले तर काय होईल ?

'दधि णकारीयति', 'मधु णकारीयति' या उदाहरणांमध्यें ण् हा 'अच्' प्रत्याहारांत घेतला गेल्यास 'इको यणचि' (६-१-७७) या सूत्रानें इकार व उकार यांना यण् होऊं लागेल.

आचारामुळें घेतले जाणार नाहींत.

'आचारामुळें' म्हणजे काय ?

'आचारामुळें' म्हणजे आचार्यांच्या प्रघातामुळें. हे णकार वगैरे वर्ण अच् समजून अचांचीं कार्यें आचार्यांनीं केलेलीं कधींही दिसत नाहींत.[४५]

शिवाय अइउण् वगैरे सूत्रांत शेवटीं उच्चारलेले 'ण्', 'क' वगैरे वर्ण मुख्य नसल्यामुळेंही ते अच् प्रत्याहारामध्यें घेतले जाणार नाहींत. कारण स्वरामध्यें या 'ण्', 'क्' वगैरे व्यंजनांचें मुख्यत्वानें उच्चारण केलें नाहीं.

तर मग त्यांचें कोठें मुख्यत्वानें उच्चारण केलें आहे ?

हल् म्हणजे व्यंजनें, त्यांमध्यें.[४६]

असेंच आपण कसें[४७] म्हणतां ?

कां बरें ? एका जातीचे वर्ण एकाच ठिकाणीं एकामागून एक आचार्यांनीं[४८] उच्चारले आहेत ही आचार्यांची शैली स्पष्ट दिसून येत

---

४४. तेव्हां कूप वगैरे शब्दांतील ऊकार, पकार व अकार हे वर्ण अनर्थक आहेत असें त्यावरूनच सिद्ध होतें.

४५. 'मुखनासिकावचनोऽनुनासिकः' (१।१।८) या सूत्रामध्यें पाणिनीनें नासिका शब्दांतील इकाराला पुढील ककार हा अच् समजून 'इको यणचि' (६।१।७७) या सूत्रानें यण् करून उच्चारण केलें नाहीं.

४६. 'ञमङणनम्' या सूत्रामध्यें णकाराचें मुख्यत्वानें उच्चारण केलें आहे. तसेंच 'कपय्' या सूत्रामध्यें ककाराचें मुख्यत्वानें उच्चारण केलें आहे.

४७. णकाराचें मुख्यत्वानें उच्चारण ञमङणनम् येथेंच आहे. अइउण् येथें मुख्यत्वानें नाहीं असेंच कां मानावें ? उलट कां मानूं नये ?

४८. महेश्वरांनीं.

अचोऽक्षु हलो हल्षु ॥

लोपश्च बलवत्तरः ॥

लोपः खल्वपि तावद्भवति ॥

ऊकालोऽजिति वा योगस्तत्कालानां यथा भवेत् ।
अचां ग्रहणमच्कार्यं तेनैषां न भविष्यति ॥

अथवा योगविभागः करिष्यते । ऊकालोऽच् । उ ऊ ऊ३ इत्येवंकालोऽज्भवति । ततो ह्रस्वदीर्घप्लुतः । ह्रस्वदीर्घप्लुतसंज्ञश्च भवत्यूकालोऽच् । एवमपि कुक्कुट इत्यत्रापि प्राप्नोति । तस्मात्पूर्वोक्त एव परिहारः ॥ एष एवार्थः । अपर आह ।

ह्रस्वादीनां वचनात्प्राग्यावत्तावदेव योगोऽस्तु ।
अच्कार्याणि यथा स्युस्तत्कालेष्वक्षु कार्याणि ॥

अथ किमर्थमन्तःस्थानामण्सूपदेशः क्रियते । इह सय्ँयन्ता सव्ँवत्सरः यँल्लोकम् तँल्लोकमिति परसवर्णस्यासिद्धत्वादनुस्वार-

आहे. आचार्यांनीं 'अच्' म्हणजे स्वर हे सर्व अचांमध्यें घातले आहेत; व हल् हे हलां-मध्यें घातले आहेत.

शिवाय, 'अइउण्', 'ऋऌक्' वगैरे सूत्रांत 'ण्', 'क्' वगैरे वर्णांचा प्रत्याहारसंज्ञा करण्याचे अगोदर लोप होईल; व त्यामुळें प्रत्याहारांत ते येणारच नाहींत.[४९]

अथवा 'ऊकालोज्ह्रस्वदीर्घप्लुतः'(१-२-२७) या सूत्राचे दोन तुकडे करतां येतील:—पहिला 'ऊकालोच्'; त्याचा अर्थ उ, ऊ, ऊ३ हे उच्चारण्यास जितका वेळ[५०] लागतो तितका वेळ ज्याच्या उच्चारणाला लागतो त्या वर्णाला अच् म्हणावें. दुसरा तुकडा 'ह्रस्वदीर्घप्लुतः'; त्याचा अर्थ उ, ऊ, ऊ३ उच्चारण्यास जो वेळ लागतो तितका वेळ उच्चारणाला लागणाऱ्या अचाला क्रमानें ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत म्हणावें.

पण असें जरी केलें तरी कुक्कुट या ठिकाणीं 'क्क्'ला अच् संज्ञा प्राप्त होईल.[५१] ती न होण्याकरितां पूर्वी सांगितलेलेच 'आचारात्', 'अप्रधानत्वात्' वगैरे परिहार घेतले पाहिजेत.

हीच गोष्ट वार्तिककार दुसऱ्या शब्दांनीं सांगतात:[५२]

दुसरा वैयाकरण असें लिहितो की ऊकालोच्० या सूत्रांतील ह्रस्व, दीर्घ वगैरे शब्दांपूर्वीचा जेवढा भाग आहे तेवढेंच पहिलें सूत्र असूं दे. म्हणजे अचांच्यासंबंधानें सांगितलेलीं जीं कार्यें तीं उ,ऊ,ऊ३ हे उच्चारण्यास जितका वेळ लागतो तितका वेळ लागणाऱ्या अचांनाच करण्याला योग्य होतील.

बरें, अंतस्थ वर्णांचा म्ह. य र ल व यांचा अणांमध्यें कां उपदेश केला आहे ?

कां बरें ? 'सय्ँयन्ता', 'सव्ँवत्सरः', 'यँल्लोकम्', 'तँल्लोकम्' या ठिकाणीं परसवर्ण (८-४-५८) असिद्ध असल्यामुळें प्रथम अनुस्वाराला द्वित्व (८-४-४७) होतें; द्वित्व झाल्या-

४९. 'हलन्त्यम्' (१।३।३) या सूत्रानें सूत्रांतील शेवटच्या ण्, क् वगैरे वर्णांना इत्संज्ञा केल्याबरोबर अच् वगैरे संज्ञा करण्याचे अगोदरच 'तस्य लोपः' (१।३।९) या सूत्रानें लोप प्राप्त होतो. त्यामुळें 'आदिरन्त्येन सहेता' (१।१।७१) या अच्, अण् वगैरे प्रत्याहार सिद्ध करणाऱ्या सूत्रानें 'अच् म्हणजे अक्षरसमाम्नायांतील अ-पासून च्-पर्यंत अमुक वर्ण' असें ठरवितांना त्या वर्णांमध्यें ण्, क् वगैरे वर्ण लुप्त असल्यामुळें गृहीत धरतां येत नाहींत.

५०. एक, दोन किंवा तीन मात्रांइतका. तेव्हां अर्धमात्रिक वर्णाला अच् म्हणतां येत नसल्यामुळें अइउण्, ऋऌक् वगैरे मधील ण्, क् या व्यंजनांना अच् संज्ञा होत नाहीं.

५१. कारण क्क् या दोन ककार मिळून जोडाक्षराची एक मात्रा होत आहे.

५२. कांहीं आचार्यांनीं लिहिलेल्या 'ह्रस्वादीनां वचनात्०' या पद्याचा येथें वार्तिककार अनुवाद करीत आहेत. 'ऊकालोजिति वा०' हें जें श्लोकवार्तिक आहे त्याच अर्थाचें पूर्वींच्या आचार्यांचें हें पद्य आहे.

स्यैव द्विर्वचनम्। तत्र परस्य परसवर्णे कृते तस्य यय्ग्रहणेन ग्रहणात्पूर्वस्यापि परसवर्णो यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। वक्ष्यत्येतत्। द्विर्वचने परसवर्णत्वं सिद्धं वक्तव्यमिति। यावता सिद्धत्वमुच्यते परसवर्ण एव तावद्भवति। परसवर्णे तर्हि कृते तस्य यर्ग्रहणेन ग्रहणाद्द्विर्वचनं यथा स्यात्। मा भूद्द्विर्वचनम्। ननु च भेदो भवति। सति द्विर्वचने त्रियकारमसति द्विर्वचने द्वियकारम्। नास्ति भेदः। सत्यपि द्विर्वचने द्वियकारमेव। कथम्। हलो यमां यमि लोपः [८.४.६४] इत्येवमेकस्य लोपेन भवितव्यम्। एवमपि भेदः। सति द्विर्वचने कदाचिद्द्वियकारं कदाचित्त्रियकारम्। असति द्वियकारमेव। स एष कथं भेदो न स्यात्। यदि नित्यो लोपः स्यात्। विभाषा च स लोपः। यथा भेदस्तथास्तु।

**अनुवर्तते विभाषा शरोऽचि यद्वारयत्ययं द्वित्वम्।**

यदयं शरोऽचि [८.४.४९] इति द्वि-

---

वर पुढील अनुस्वाराला परसवर्ण होतो व तो स्थानीप्रमाणें सानुनासिक होतो तो परसवर्ण यय् म्हणून घेतला[53] जाऊन (१-१-६९) पूर्वीच्या अनुस्वाराला परसवर्ण व्हावा एवढ्याकरितां अंतस्थांचें अणांमध्यें उच्चारण करणें जरूर आहे.

हा उपयोग देतां येत नाहीं. द्वित्व कर्तव्य असतांना परसवर्ण सिद्ध आहे असें बोलावें असें वार्तिककार पुढें (८-२-६, वा.१४) सांगणार आहेत. आणि सिद्ध होतो असें मानलें म्हणजे द्वित्व न होतां परसवर्णच अगोदर होतो.

मग त्यांत काय बिघडलें ? परसवर्ण जरी अगोदर झाला तरी त्या सानुनासिक यकाराचें यर् म्हणून ग्रहण होणें जरूर आहे म्हणजे परसवर्णाला द्वित्व होईल. सानुनासिक यकाराचें यर् म्हणून ग्रहण होण्याला अंतस्थांचें उच्चारण अणांमध्यें करणें जरूर आहे.

न होऊं दे दित्व; कांहीं बिघडत नाहीं.

कां बरें ? रूपामध्यें फरक पडतो; द्वित्व झाल्यास तीन यकारांनीं[54] युक्त असें रूप होतें; द्वित्व न झाल्यास दोन यकारांनीं युक्त असें रूप होतें.

हा फरक पडत नाहीं. जरी द्वित्व झालें तरी रूपामध्यें दोनच यकार असतात.

ते कसे ?

'हलो यमां यमि लोपः' (८-४-६४) या सूत्रानें एका यकाराचा लोप होणार आहे.

तरीसुद्धां फरक पडेल ? कारण द्वित्व झाल्यास दोन यकार असलेलेंही रूप मिळेल; व तसेंच तीन यकार असलेलेंही[55] रूप मिळेल; पण द्वित्व न झाल्यास दोन यकार असलेलें एकच रूप होईल. तेव्हां फरक पडत नाहीं म्हणून कसें चालेल ?

आतां जर लोप नित्य असता तर मात्र तसें म्हणतां आलें असतें.

पण लोप विकल्पानें आहे.

बरें तर, मग ज्या रीतीनें फरक पडणार नाहीं तसेंच करावें; म्हणजे 'हलो यमां यमि लोपः' (८-४-६४) येथें 'विकल्पानें' हें पद मागील सूत्रांतून आणूं नये.

पण ज्या अर्थी 'शरोचि' (८।४।४९) या सूत्रानें आचार्य पाणिनि द्वित्वाचा निषेध सांगतात त्या अर्थी आचार्य पाणिनि दर्शवितात

---

५३. 'हयवरट्' या सूत्रामध्यें यकार वगैरे निरनुनासिक उच्चारले आहेत. तेव्हां त्यांना यय्, यर् वगैरे म्हणतां येतें. परंतु ते अणांमध्यें आहेत म्हणून 'अणुदित्०' (१।१।६९) या सूत्रानें त्या अणांनीं आपल्या सवर्णांचें म्ह. सानुनासिक यकार वगैरेंचें ग्रहण केलें म्हणजे ते सानुनासिक यकार वगैरे हे यय्, यर् आहेत असें म्हणतां येतें.

५४. द्वित्वानें झालेले दोन सानुनासिक यकार आणि पुढील एक निरनुनासिक यकार असे तीन यकार होत.

५५. कारण लोप विकल्पानें सांगितला आहे.

र्वेचनप्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽनुवर्तते विभाषेति । कथं कृत्वा ज्ञापकम् ।

**नित्ये हि तस्य लोपे प्रतिषेधार्थो न कश्चित्स्यात् ॥**

यदि नित्यो लोपः स्यात्प्रतिषेधवचनमनर्थकं स्यात् । अस्त्वत्र द्विर्वचनम् । झरो झरि सवर्णे [ ८·४·६५ ] इति लोपो भविष्यति । पश्यति त्वाचार्यो विभाषा स लोप इति ततो द्विर्वचनप्रतिषेधं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । नित्येऽपि तस्य लोपे स प्रतिषेधोऽवश्यं वक्तव्यः । यदेतदचो रहाभ्याम् [ ८·४·४६ ] इति द्विर्वचनं लोपापवादः स विज्ञायते । कथम् । यर इत्युच्यत एतावन्तश्च यरो यदुत झरो वा यमो वा। यदि चात्र नित्यो लोपः स्याद् द्विर्वचनमनर्थकं स्यात् । किं तर्हि तयोर्योगयोरुदाहरणम् । यदकृते द्विर्वचने त्रिव्यञ्जनः संयोगः । प्रत्तम् अवत्तम् आदित्यः । इहेदानीं कर्त्ता हर्त्तेति द्विर्वचनसामर्थ्याल्लोपो न भवति । एवमिहापि लोपो न स्यात्क-

---

की 'हलो यमां०' (८।४।६४) व 'झरो झरि०' (८।४।६५) या सूत्रांत 'विकल्पानें' हें पद मागील सूत्रांतून येतें.

हें कसें काय ज्ञापक जमतें ?

जर लोप नित्य असेल तर निषेध सांगणें निरर्थक होईल. कारण होऊं दे येथें द्वित्व. 'झरो झरि सवर्णे' (८।४।६५) या सूत्रानें नित्य लोप होईल. तेव्हां आचार्य पाणिनि लोप वैकल्पिक आहे असेंच मानतात, आणि म्हणूनच द्वित्वाचा निषेध करतात. एरव्हीं द्वित्वाचा निषेध करण्याचें कांहीं कारण नाहीं.

हें ज्ञापक देतां येत नाहीं. कारण लोप जरी नित्य असला तरी द्वित्वाचा निषेध अवश्य सांगितलाच पाहिजे. कारण लोप नित्य असला तर अचो रहाभ्याम् (८।४।४६) या सूत्रानें सांगितलेलें जें द्वित्व तें लोपांचा अपवाद म्हणून समजण्यांत येईल.

तें कसें ?

'अचो रहाभ्याम्०' या सूत्रानें यरांना द्वित्व सांगितलें आहे. आणि यर म्हणून जे वर्ण आहेत ते झर किंवा यम् यांपैकींच असतात व एका सूत्रानें (८।४।६५) झरांचा लोप सांगितला आहे व एका सूत्रानें (८।४।६४) यमांचा सांगितला आहे तेव्हां जर द्वित्व झाल्यावर लोप नित्य होईल तर द्वित्व सांगण्याचा कांहीं उपयोग राहणार नाहीं. तेव्हां अर्थातच द्वित्व हें लोपांचा अपवाद होणार आहे. तेव्हां द्वित्व झाल्यावर लोप मुळींच होणार नाहीं.[५६]

उदाहरण नसल्यामुळें लोपांचा अपवाद द्वित्व समजतां; पण लोपांना तरी जेथें द्वित्व नाहीं असें उदाहरण कोणतें ?

ज्या ठिकाणीं द्वित्व न करतां तीन व्यंजनांचा संयोग असेल तीं उदाहरणें—[५७] प्रत्तं, अवत्तं, आदित्यः वगैरे. तेव्हां कर्ता, हर्ता वगैरे ठिकाणीं द्वित्व केल्यावर द्वित्वाच्या जोरावर लोप होत नाहीं; त्याप्रमाणेंच कर्षति, हर्षति याही ठिकाणीं द्वित्व झाल्यास लोप होणार नाहीं व दोन षकाराचीं भलतीं रूपें कर्ष्षति,

---

५६. तेव्हां चतुर्षु येथें 'अचो रहा०' (८।४।४६) यानें द्वित्व होऊन दोन षकार राहतील याकरतां 'शरोचि' (८।४।४९) हें सूत्र केलें पाहिजे. तेव्हां अर्थातच लोपाच्या विकल्पाविषयीं तें ज्ञापक आहे असें म्हणतां येत नाहीं.

५७. प्र उपसर्गपूर्वक दा धातूहून क्त प्रत्यय करून प्र दा त अशी स्थिति असतांना 'अच उपसर्गात्तः' (७।४।४७) या सूत्रानें दा धातूच्या आकाराला तकार आणि 'खरि च' (८।४।५५) या सूत्रानें दकाराला तकार आणि मूळचा प्रत्ययाचा एक तकार या तीन तकारांपैकीं मधल्या तकाराचा 'झरो झरि०' (८।४।६५) या सूत्रानें लोप होतो. तसेंच आदित्य शब्दाहून 'दित्यदित्यादित्य०' (४।१।८५) या सूत्रानें ण्य प्रत्यय व आदित्य शब्दांतील शेवटच्या अकाराचा 'यस्येति च' (६।४।१४८) या सूत्रानें लोप झाल्यानंतर एक तकार व दोन यकार या तीन वर्णांपैकीं मधल्याचा म्ह. यकाराचा 'हलो यमां०' (८।४।६४) या सूत्रानें लोप होतो.

र्षति वर्षतीति । तस्मान्नित्येऽपि लोपेऽवश्यं स प्रतिषेधो वक्तव्यः ॥ तदेतदत्यन्तं संदिग्धं वर्तत आचार्याणां विभाषानुवर्तते न वेति ॥

## लण् ॥ ६ ॥

अयं णकारो द्विरनुबध्यते पूर्वश्च परश्च । तत्राण्ग्रहणेष्विण्ग्रहणेषु च संदेहो भवति पूर्वेण वा स्युः परेण वेति । कतरस्मिंस्तावदण्ग्रहणे संदेहः । ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः [ ६.३.१११ ] इति । असंदिग्धं पूर्वेण न परेण । कुत एतत् । पराभावात् । न हि ढ्रलोपे परेऽणः सान्ति । ननु चायमास्ति । आतृढम् आवृढमिति । एवं तर्हि सामर्थ्यात्पूर्वेण न परेण । यदि हि परेण स्यादण्ग्रहणमनर्थकं स्यात् । ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽच इत्येव ब्रूयात् । अथवैतदपि न ब्रूयात् । अचो ह्येतद्भवति ह्रस्वो दीर्घः प्लुत इति ॥ अस्मिंस्तर्ह्यण्ग्रहणे संदेहः केऽणः [ ७.४.१३ ] इति । असंदिग्धं पूर्वेण न

---

हर्ष्षति वगैरे होतील. तेव्हां लोप जरी नित्य असला तरी त्याचा बाध करून द्वित्व होतें तें कर्षति, हर्षति वगैरे ठिकाणीं न व्हावें याकरितां 'शरोऽचि' (८-४-४९) हा निषेध अवश्य सांगितला पाहिजे. एकंदरींत आचार्यांच्या मतानें लोप सांगणाऱ्या सूत्रांत विकल्पाची अनुवृत्ति होते का नाहीं हें अत्यन्त संशयास्पद[५८] राहतें.

हा णकार महेश्वरांनीं दोन सूत्रांत शेवटीं जोडला आहेः एक प्रथम 'अइउण्' सूत्रांत व एक मागून 'लण्' या सूत्रांत. दोनदां णकार घातल्यामुळें 'अण्' किंवा 'इण्' म्हटलें म्हणजे संशय येतो की हा प्रत्याहार पूर्व णकाराशीं का पर णकाराशीं ?

कोणत्या ठिकाणीं बरें अण् उच्चारल्यावर असा संशय येतो ?

' ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोणः' (६-३-१११) या सूत्रांत.

निःसंशय पूर्व णकाराशींच येथें प्रत्याहार समजावयाचा, पर णकाराशीं नाहीं.

असें कसें म्हणतां येईल ?

कारण की पर णकाराशीं प्रत्याहार घेऊन जास्त समजले गेलेले अण् 'ढ्रलोपे०' या सूत्राच्या उदाहरणांत मिळत नाहींत.

कां बरें ? ऋकार मिळतो की; आतृढः, आवृढः हीं उदाहरणें पाहा.[१]

तर मग आम्ही म्हणूं की पर णकाराशीं प्रत्याहार घेतल्यास अण् उच्चारण व्यर्थ होईल. म्हणून 'अण्' पद उच्चारण्याच्या जोरावर पूर्व णकाराशीं प्रत्याहार घ्यावयाचा, पर णकाराशीं घ्यावयाचा नाहीं. पर णकाराशीं घ्यावयाचा झाल्यास 'अणः'च्या ऐवजीं लाघवानें 'अचः' पद घालून 'ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽचः' असेंच सूत्र केलें असतें. अथवा 'अचः' पदसुद्धां सूत्रांत घालण्याचें कारण नाहीं; कारण ह्रस्व, दीर्घ किंवा प्लुत हे, अच् म्हणजे स्वर जे असतात त्यांनाच होतात (१।२।२८). बरें तर, 'केऽणः' (७।४।१३) या सूत्रांत जें अण् पद उच्चारलें आहे त्याविषयीं संशय येतो. याही ठिकाणीं निःसंशय पूर्व णकाराशींच प्रत्याहार समजावयाचा; पर णकाराशीं नाहीं.

तें कां ?

पुढील णकार घेऊन जास्त समजलेला अण्

---

५८. ज्ञापक जरी जमलें नाहीं तरी विकल्पाची अनुवृत्ति होतच नाहीं असा निश्चय करण्याला कांहीं साधन नसल्यामुळें 'आचार्यांच्या मतानें संशयास्पद' असें येथें म्हटलें आहे. आतां स्वतः भाष्यकार मात्र विकल्पाची अनुवृत्ति करतात. पुढील लण् या सूत्रावर विचार करतांना हलो यमां० हा लोप वैकल्पिक आहे असें भाष्यकारांनीं स्पष्टच म्हटलें आहे.

१. आ उपसर्गपूर्वक तृह्, वृह् धातूंहून क्त प्रत्यय (३।२।१०२) करून नंतर ढत्व (८।२।३१), धत्व (८।२।४०), ष्टुत्व (८।४।४१) आणि ढकाराचा लोप (८।३।१३) होऊन हीं रूपें सिद्ध होतात. येथें ऋकार हा पुढील अण् मिळतो.

परेण । कुत एतत् । पराभावात् । न हि के परेऽणः सन्ति । ननु चायमस्ति । गोका नौकेति । एवं तर्हि सामर्थ्यात्पूर्वेण न परेण । यदि हि परेण स्यादण्ग्रहणमनर्थकं स्यात् । केऽच इत्येव ब्रूयात् । अथवैतदपि न ब्रूयात् । अचो ह्येतद्भवति ह्रस्वो दीर्घः प्लुत इति ॥ अस्मिंस्तर्ह्यण्ग्रहणे संदेहः । अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः [ ८.४.५७ ] इति । असंदिग्धं पूर्वेण न परेण । कुत एतत् । पराभावात् । न हि पदान्ताः परेऽणः सन्ति । ननु चायमस्ति । कर्तृ हर्तृ इति । एवं तर्हि सामर्थ्यात्पूर्वेण न परेण । यदि हि परेण स्यादण्ग्रहणमनर्थकं स्यात् । अचोऽप्रगृह्यस्यानुनासिक इत्येव ब्रूयात् । अथवैतदपि न ब्रूयात् । अच एव हि प्रगृह्या भवन्ति ॥ अस्मिंस्तर्ह्यण्ग्रहणे संदेहः । उरण्रपरः [ १.१.५१ ] इति । असंदिग्धं पूर्वेण न परेण । कुत एतत् । पराभावात् । न ह्युः स्थाने परेऽणः सान्ति । ननु चायमस्ति । कर्त्रर्थम् हर्त्रर्थमिति । किं च स्यात् । यद्यत्र

'केणः' या सूत्राच्या उदाहरणांत नाहीं म्हणून. 'क' प्रत्यय पुढें असतांना पुढील अण् सांपडतच नाहीं.

कां बरें ? 'गोका', 'नौका' या ठिकाणीं पुढील अण् मिळतो.

तर मग असें म्हणूं की सामर्थ्यास्तव पूर्व णकाराशीं प्रत्याहार घ्यावयाचा, पर णकाराशीं घ्यावयाचा नाहीं. जर पर णकाराशीं प्रत्याहार घेतला तर 'अण्' पद घालण्याची जरूर नाहीं; 'अच्' पद घालून 'केऽचः' असेंच सूत्र केलें असतें. अथवा 'अचः' हें पद घालण्याची सुद्धां जरूर नाहीं. ह्रस्व, दीर्घ किंवा प्लुत होतात म्हटलें म्हणजे ते अचांनाच होतात (१।२।२८) असा नियमच आहे.

बरें तर, 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' (८।४।५७) या ठिकाणच्या 'अण्' शब्दाविषयीं संशय उत्पन्न होतो.

येथेंही निःसंशय पूर्व णकाराशींच प्रत्याहार समजावयाचा, पर णकाराशीं नाहीं.

असें काय म्हणून ?

पर णकाराशीं प्रत्याहार करून जास्त मिळालेला अण् 'अणोऽप्रगृह्यस्या०' या सूत्राच्या उदाहरणांत नाहीं म्हणून. पदाच्या शेवटीं पुढचे अण् उदाहरणांत मिळत नाहींत.

असें कां ? कर्तृ, हर्तृ येथें आहे की पुढचा अण्.[2]

तर मग आम्ही म्हणूं की सामर्थ्यास्तव पूर्व णकाराशीं प्रत्याहार समजावयाचा, पर णकाराशीं समजावयाचा नाहीं. जर पुढील णकाराशीं प्रत्याहार समजावयाचा असें असेल तर 'अण्' पद घालणें व्यर्थ होईल; 'अचोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' असेंच म्हटलें असतें. अथवा 'अचः' हें पद मुळींच घालूं नये; कारण प्रगृह्य संज्ञा ही स्वभावतः 'अचा'लाच होत असते. (तेव्हां येथें प्रगृह्यभिन्न म्हणून घेतले जाणारे वर्ण अच्च[3] घेतले जातील.)

तर मग 'उरण् रपरः' (१।१।५१) या सूत्रांतील 'अण्' पदाविषयीं संशय येतो.

येथेंही निःसंशय पूर्व णकाराशींच प्रत्याहार समजावयाचा; पुढील णकाराशीं नाहीं.

असें कशावरून ?

पुढील अण् नाहीं म्हणून; उदाहरणांत कोठेंही 'ऋ'काराच्या जागीं पुढील अण् झालेला आढळत नाहीं.

आहे की 'कर्त्रर्थे', 'हर्त्रर्थे' या उदाहरणांत रेफ हा पुढील अण्.[4]

२. कर्तृ शब्दाचें नपुंसकलिंगीं प्रथमेचें एकवचन कर्तृ असें आहे.

३. अब्राह्मणाला आण असें म्हटलें असतां ब्राह्मण हा मनुष्यांपैकीं आहे म्हणून ब्राह्मणाशिवाय निराळा मनुष्यच आणला जातो, काष्ठ-पाषाण आणलें जात नाहीं. त्याप्रमाणें येथें प्रगृह्यसंज्ञक अच्च असतात म्हणून प्रगृह्यभिन्न वर्ण देखील अच्च घेतले जातील.

४. कर्तृ+अर्थम् अशी स्थिति असतांना तेथें 'इको यणचि' (६।१।७७) या सूत्रानें ऋकाराला रेफ आदेश झाला आहे आणि रेफ हा अण् आहे.

रपरत्वं स्याद्द्वयो रेफयोः श्रवणं प्रसज्येत। हलो यमां यमि लोपः [८.४.६४] इत्येवमेकस्यात्र लोपो भवति। विभाषा स लोपः। विभाषा श्रवणं प्रसज्येत। अयं तर्हि नित्यो लोपो रोरि [ ८.३.१४ ] इति। पदान्तस्येत्येवं सः। न शक्यः स पदान्तस्य विज्ञातुम्। इह हि लोपो न स्यात्। जर्गृधेर्लङ् अजर्घाः। पास्पर्धेरपास्पा इति ॥ इह तर्हि मातॄणाम् पितॄणामिति रपरत्वं प्रसज्येत। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नात्र रपरत्वं भवतीति यदयमृत इद्धातोः [७.१.१००] इति धातुग्रहणं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। धातुग्रहणस्यैतत्प्रयोजनम्। इह मा भूत्। मातॄणाम् पितॄणामिति। यदि चात्र रपरत्वं स्याद्धातुग्रहणमनर्थकं स्यात्। रपरत्वे कृतेऽनन्त्यत्वादित्त्वं न भविष्यति।

---

बरें, मग काय बिघडेल जर येथें रेफ पुढें असलेला रेफ ऋकाराचे स्थानीं झाला तर?

दोन रेफ ऐकण्यांत येतील ना?

पण 'हलो यमां यमि लोपः' (८।३।६४) या सूत्रानें एका रेफाचा लोप होईल.

पण तो लोप वैकल्पिक आहे. तेव्हां एकदां दोन रेफ ऐकू येतील असा दोष येतो.

बरें तर, 'रो रि' (८।३।१४) या सूत्रानें नित्य लोप सांगितला आहे तो होईल.

पण तो लोप पदाच्या शेवटीं असलेल्या रेफाचा सांगितला आहे.

पदाच्या शेवटीं असलेल्याच रेफाला लोप सांगितला आहे असें मानणें शक्य नाहीं; कारण तसें मानल्यास 'जर्गृध्' धातूच्या लङाच्या 'अजर्घाः' या रूपांत किंवा 'पास्पर्ध्' धातूच्या 'अपास्पाः' या रूपांत रेफाचा लोप होणार नाहीं. एकंदरींत 'कर्त्रर्थं', 'हर्त्रर्थं' वगैरे रूपांत 'रो रि' (८।३।१४) या सूत्रानें लोप होईल व दोष येणार नाहीं.

बरें तर, मातॄणां, पितॄणां हीं उदाहरणें घ्या. पुढील णकाराशीं प्रत्याहार समजल्यास येथेंही दीर्घ ॠच्या पुढें रेफ जोडावा लागेल.

या ठिकाणीं रेफ पुढें जोडावा लागेल हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी 'ॠत इद्धातोः' (७।१।१००) या सूत्रांत आचार्य 'धातोः' शब्द घालतात त्या अर्थी ते सुचवितात की येथें रेफ पुढें जोडावयाचा नाहीं.

हें कसें सुचविलें जातें?

तेथें 'धातु' शब्द घालण्याचा हाच हेतु आहे की 'मातॄणां', 'पितॄणां' येथें 'ॠत इद्धातोः' (७।१।१००) या सूत्रानें 'इकार' होऊं नये. जर 'मातॄणाम्', 'पितॄणाम्' येथें पुढें जोडूनच दीर्घ 'ॠ' केला तर 'ॠत इद्धातोः' या सूत्रांत 'धातोः' शब्द घालण्याचें कांहींच कारण उरणार नाहीं; कारण रेफ पुढें जोडल्यावर 'ॠ' शेवटीं नसल्यामुळें त्याला इकार होणारच

---

५. 'रो रि' (८।३।१४) या सूत्रामध्यें 'पदस्य' (८।१।१६) या सूत्रापासून पदस्य असा अधिकार येत आहे. कारण 'अपदान्तस्य मूर्धन्यः' (८।३।५५) या सूत्रापर्यंत पदस्य हा अधिकार चालू आहे.

६. जर्गृध् या यङ्लुगंत धातूहून लङ् प्रत्यय, त्याला सिप् आदेश, इकाराचा लोप (३।४।१००), अट् आगम (६।४।७१), सकाराचा लोप (६।१।६८), गुण (७।४।८६) होऊन अजगर्ध् अशी स्थिति असतांना जश्त्व (८।२।३९), रुत्व (८।२।७५), रेफाचा लोप (८।३।१४) आणि दीर्घ (६।३।१११) होऊन अजर्घाः रूप सिद्ध होतें. स्पर्ध् धातूहून यङ् प्रत्यय व त्याचा लुक् होऊन पास्पर्ध् हा यङ्लुगंत धातु होतो. त्याचें अपास्पाः असें रूप वरच्यासारखें समजावें.

७. अण् प्रत्याहार पूर्व णकाराशीं घेतला म्हणजे अ, इ, उ हे तीनच वर्ण अण् समजले जातात. पर णकाराशीं अण् प्रत्याहार घेतला तर ऋकारही अण् असल्यामुळें तो रपर होऊन मातॄर्णाम् असें भलतें रूप होईल.

८. धातोः हें पद घातलें तरी ऋकारान्त अंगाला इत्व होतें असा अर्थ होईल आणि मातॄर्णाम् येथें मातॄर् हें ऋकारांत अंग नसल्यामुळें इत्व होणारच नाहीं. तेव्हां धातोः हें पद व्यर्थ होईल.

पश्यति त्वाचार्यो नात्र रपरत्वं भवतीति ततो धातुग्रहणं करोति । इहापि तर्हीत्त्वं न प्राप्नोति । चिकीर्षति जिहीर्षतीति । मा भूदेवम् । उपधायाश्च [ ७.१.१०१ ] इत्येवं भविष्यति । इहापि तर्हि प्राप्नोति । मातॄणाम् पितॄणामिति । तस्मात्तत्र धातुग्रहणं कर्तव्यम् । एवं तर्ह्यण्ग्रहणसामर्थ्यात्पूर्वेण न परेण । यदि परेण स्यादण्ग्रहणमनर्थकं स्यात् । उरःपर इत्येव ब्रूयात् ॥ आस्मिंस्तर्ह्यण्ग्रहणे संदेहः । अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः [ १.१.६९ ] इति । असंदिग्धं परेण न पूर्वेण । कुत एतत् ।

सवर्णेऽण् तपरं ह्युरृत् ।

यदयमुरृत् [ ७.४.७ ] इत्यृकारं तपरं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः परेण न पूर्वेणेति ॥ इण्ग्रहणेषु तर्हि संदेहः । असंदिग्धं परेण

नाहीं; तेव्हां एकंदरींत आचार्य पाणिनींच्या मनांत असें दिसतें की पुढील जे अण् त्यांना मातॄणाम् वगैरे उदाहरणांमध्यें रेफ जोडावयाचा नाहीं, व म्हणूनच ते 'ॠत इद्धातोः' या सूत्रांत 'धातु' शब्द घालतात.

तर मग 'चिकीर्षति', 'जिहीर्षति' याही ठिकाणीं 'ॠत इद्धातोः'(७।१।१००) या सूत्रानें इत्व होणार नाहीं. कारण धातूच्या ऋकाराला झालेला दीर्घ (६।४।१६) ॠ रपर होईल व धातूच्या शेवटीं दीर्घ ॠ राहणार नाहीं.

नाहीं तर नाहीं. 'उपधायाश्च' (७।१।१०१) सूत्रानें इत्व होईल.

असें म्हणाल तर 'मातॄणाम्', 'पितॄणाम्' या ठिकाणीं 'ॠत इद्धातोः' या सूत्रामध्यें 'धातोः' पद गाळल्यास त्याच्या पुढील 'उपधायाश्च' (७।१।१०१) या सूत्रानें इत्व होऊं लागेल. तेव्हां 'ॠत इद्धातोः' या सूत्रांत 'धातोः' पद घालावयास पाहिजे.[9]

तर मग आतां आम्ही असें म्हणतों की 'उरण् रपरः' या सूत्रांत पर णकाराशीं प्रत्याहार समजला असतां 'अण्' पद व्यर्थ होईल. सबब पूर्व णकाराशींच प्रत्याहार समजावयास पाहिजे. पर णकाराशींच प्रत्याहार जर घ्यावयाचा असेल तर 'अण्'च्या ऐवजीं 'अच्' पदच घातलें असतां चालेल.

बरें तर, 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' (१।१।६९) या सूत्रांतील 'अण्' शब्दाविषयीं संशय येतो.

या ठिकाणीं निःसंशय पुढील णकाराशीं प्रत्याहार समजावयाचा; पहिल्या णकाराशीं नाहीं.

हें असें कशावरून ?

सवर्णसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रांत 'अण्' पदामध्यें पुढील णकाराशीं प्रत्याहार घ्यावयाचा. तसें घेण्यास हेतु 'उरृत्' (७।४।७) या सूत्रांत तकारासहित 'ऋकार' उच्चारणें हा. ज्या अर्थी 'उरृत्' या सूत्रांत ऋकाराच्या पुढें आचार्य पाणिनि तकार घालतात त्या अर्थी ते सुचवितात की 'अणुदित्' (१।१।६९) या सूत्रामध्यें पुढील णकाराशीं अण् प्रत्याहार समजावयाचा, पूर्वीच्या णकाराशीं[10] नाहीं.

बरें तर, जेथें 'इण्' पद उच्चारलें आहे तेथें संशय येतो.

९. धातोः पद घातलें म्हणजे त्याची अनुवृत्ति 'उपधायाश्च' (७।१।१०१) या सूत्रांत होईल आणि त्यामुळें मातॄणाम् येथें 'उपधायाश्च' या सूत्रानें इत्व होणार नाहीं. तेव्हां 'धातोः' या पदाचा उपयोग संभवत असल्यामुळें 'मातॄणाम् येथें रेफ जोडावयाचा नाहीं' असें धातुपद सुचवूं शकत नाहीं. एकंदरींत मातॄणाम् येथें रेफ जोडला जाईल हा दोष कायम राहतो.

१०. तकार न जोडतां उरृ असा ऱ्हस्व ऋकार जर उच्चारला तर 'अणुदित्०' (१।१।६९) या सूत्रामुळें त्या ऋकारानें आपल्या सवर्णांचें ग्रहण होईल आणि उरृ या सूत्रानें दीर्घाचेंही विधान होईल. तेव्हां अचीकृतत् या उदाहरणामध्यें कॄत् धातूच्या दीर्घ ॠकाराला त्याच्यासारखा दीर्घच ॠकार उरृ या सूत्रानें होईल, तो न होतां ह्रस्वच ऋकार आदेश व्हावा म्हणून तपरकरण केलें आहे. पण जर 'अणुदित्०' या सूत्रामध्यें अण् प्रत्याहार अइउण् यांतील णकाराशींच घतला तर ऋकार अण् असल्यामुळें त्यानें सवर्णांचें ग्रहणच होणार नाहीं. तेव्हां जो उच्चारला असेल तोच म्ह. ह्रस्वच आपोआप होईल आणि तपरकरण व्यर्थ होईल.

न पूर्वेणेति । कुत एतत् ।

**य्वोरन्यत्र परेणेण् स्यात् ।**

यत्वेच्छति पूर्वेण संमृद्य ग्रहणं तत्र करोति य्वोरिति । तच्च गुरु भवति । कथं कृत्वा ज्ञापकम् । तत्र विभक्तिनिर्देशे संमृद्य ग्रहणेऽर्धचतस्रो मात्राः । प्रत्याहारग्रहणे पुनस्तिस्रो मात्राः । सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे सति यद्गरीयांसं यत्नमारमते तज्ज्ञापयत्याचार्यः परेण न पूर्वेणेति ॥ किं पुनर्वर्णोत्सत्ताविव णकारो द्विरनुबध्यते । एतज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति । अणुदित्सवर्णं परिहाय पूर्वेणाण्ग्रहणं परेणेण्ग्रहणमिति व्याख्यास्यामः॥

**ञमङणनम् ॥ ७ ॥ झभञ् ॥ ८ ॥**

किमर्थमिमौ मुखनासिकावचनौ वर्णावुभावप्यनुबध्येते न ञकार एवानुबध्येत । कथं यानि मकारेण ग्रहणानि हलो यमां

---

निःसंशय 'इण्' म्हटलें असतां पुढील णकाराशींच प्रत्याहार समजावयाचा.

हें असें कशावरून ?

य्वोः असें उच्चारलें आहे म्हणून इतर सर्व ठिकाणीं इण् प्रत्याहार पर णकाराशीं आहे.

ज्या ठिकाणीं पूर्व णकाराशीं इण् प्रत्याहार घ्यावयाचा त्या ठिकाणीं 'इण्' शब्द उच्चारण्याच्या ऐवजीं इकार व उकार यांचा समास करून 'य्वोः' असा शब्द आचार्य पाणिनि उच्चारतात. वास्तविक पाहतां 'इण्' शब्दाच्या ऐवजीं 'य्वोः' शब्द घालणें ह्यांत गौरव आहे.

हें कसें काय ज्ञापक जमतें ?

कां बरें ?

इकार व उकार यांचा समास करून 'य्वोः' शब्द उच्चारला असतां साडेतीन मात्र होतात[11]; प्रत्याहार 'इण्' उच्चारला असतां 'इणः' या पदाच्या तीन मात्रा होतात.[12] तेव्हां या ठिकाणीं लहान शब्द घालून काम भागत असतांनासुद्धां ज्या अर्थी आचार्य पाणिनि मोठा शब्द उच्चारतात त्या अर्थी ते सुचवतात की इण् असा प्रत्याहारवाचक शब्द उच्चारला की तेथें 'णकार' हा पुढचा समजावयाचा, पूर्वीचा समजावयाचा नाहीं.

बरें, पण जसे कांहीं इतर सगळे वर्ण खलास झाले कीं काय अशा रीतीनें आचार्य महेश्वरांनीं दोन वेळां णकारच काय म्हणून शेवटीं [13]घातला ?

ज्या अर्थी दोनदां णकार घातला त्या अर्थी आचार्य महेश्वर साधारण नियम सुचवितात की ज्या ठिकाणीं संशय येतो त्या ठिकाणीं संशय निवारण करणारा विशिष्ट अर्थ व्याख्यानावरून समजावयाचा; केवळ संशय येतो म्हणून तेवढ्याच सबबीवर शास्त्र अनर्थक समजावयाचें नाहीं. तेव्हां सवर्णसंज्ञा सांगणारे अणुदित्सूत्र सोडून बाकी सर्व ठिकाणीं पूर्वीचा णकार घेऊनच अण् प्रत्याहार समजावयाचा, व 'इण्' प्रत्याहारांत नेहमीं पुढीलच णकार घेऊन प्रत्याहार समजावयाचा असें आम्ही व्याख्यान करूं.

हीं दोन सूत्रें निरनिराळीं करून प्रत्येकाच्या शेवट एक एक असे दोन अनुनासिक कां जोडले आहेत ? एकच सूत्र करून एकटा ञकारच कां नाहीं जोडला ?

तसें केलें असतां मकार जोडून जे प्रत्याहार केले आहेत त्यांचें कसें ? उदाहरणार्थ— 'हलो यमां यमि लोपः' (८।४।६४) या सूत्रांत

---

११. यकाराची अर्धी मात्रा, वकाराची अर्धी मात्रा, ओकाराच्या दोन मात्रा आणि विसर्गाची अर्धी मात्रा मिळून साडेतीन मात्रा होतात.

१२. इकाराची एक मात्रा, णकाराची अर्धी मात्रा, अकाराची एक मात्रा आणि विसर्गाची अर्धी मात्रा मिळून तीन मात्रा होतात.

१३. दुसरा एखादा वर्ण घातला असता तर 'अण्, इण् हे प्रत्याहार कोणत्या णकाराबरोबर घ्यावयाचे' हा संशयच मुळीं आला नसता.

१. ञमङणनझभञ् असें.

यमि लोपः [८.४.६४] इति। सन्तु ञकारेण हलो यञां यञि लोप इति। नैवं शक्यम्। झकारभकारपरयोरपि हि झकारभकारयोर्लोपः प्रसज्येत। न झकारभकारौ झकारभकारयोः स्तः॥ कथं पुमः खय्यम्परे [८.३.६] इति। एतदप्यस्तु ञकारेण पुमः खय्यञ्पर इति। नैवं शक्यम्। झकारभकारपरे हि खयि रुः प्रसज्येत। न झकारभकारपरः खयस्ति॥ कथं ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम् [८.३.३२] इति। एतदप्यस्तु ञकारेण ङञो ह्रस्वादचि ङञुण्नित्यमिति। नैवं शक्यम्। झकारभकारयोरपि हि पदान्तयोर्झकारभकारावागमौ स्याताम्। न झकारभकारौ पदान्तौ स्तः। एवमपि पञ्चागमास्त्रय आगमिनो वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति। सन्तु ताव-द्येषामागमानामागमिनः सन्ति। झकारभकारौ पदान्तौ न स्त इति कृत्वागमावपि

'यम्' प्रत्याहार घातला आहे.

या ठिकाणीं ञकार जोडून यञ् प्रत्याहार करून 'हलो यञां यञि लोपः' असें सूत्र करावें.

असें करणें शक्य नाहीं. कारण, असें केल्यास झकार किंवा भकार पुढें असलेल्या झकार किंवा भकार यांचा लोप होईल.

पण झकार किंवा भकार पुढें असलेले झकार किंवा भकार आढळूनच येत नाहींत.

बरें, 'पुमः खय्यम्परे' (८।३।६) येथील 'अम्' प्रत्याहाराविषयीं कसें ?

येथेंही ञकारांशींच प्रत्याहार होऊं दे; व 'पुमः खय्यञ्परे' असें सूत्र होऊं दे.

असें करून चालावयाचें नाहीं. असें केल्यास झकार किंवा भकार पुढें असलेला खय् पुढें असतांना पुम् याच्या मकाराला रुत्व होऊं लागेल.

पण झकार किंवा भकार पुढें असलेला खय् सांपडतच नाहीं.

बरें, 'ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम्' (८।३।३२) येथें कसें ? येथें दोष नाहीं का येणार ?

येथेंही मकाराच्या ऐवजीं ञकार जोडून 'ङञो ह्रस्वादचि ङञुण्नित्यम्' असें सूत्र करावें.

असें सूत्र करून चालावयाचें नाहीं; पदाच्या शेवटीं असणाऱ्या 'झ'कार व 'भ'कार यांनासुद्धां झकार व भकार आगम होऊं लागतील.

पण पदाच्या शेवटीं झकार व भकार सांपडतच नाहींत[2]; तेव्हां झकार-भकारांचा तंटाच मिटला.

तरी पण दोष येतोच. कारण ज्यांना आगम लावावयाचे असे आगमी तीन मिळतील व आगम पांच सांगितले आहेत[3]; दोघांची संख्या सारखी नसल्याळें क्रमानें 'याला हा', 'याला हा' अशा रीतीनें आगम होणार नाहींत; तर तीन आगमींना प्रत्येकीं पांच आगम होतील.

पण असें होणार नाहीं. कारण ज्या आगमींना योग्य आगम मिळतात त्यांना ते होऊं देत. पदान्ती झकार व भकार कधींही मिळत नसल्यामुळें ते आगमी होऊं शकत नाहींत तेव्हां झकार व भकार हे आगमही होणार नाहींत[4]. एकंदरींत जरी 'ङञो ह्रस्वादचि ङञुट् नित्यम्' असें सूत्र केलें तरी ङ, ण व न यां-

२. कारण पदाच्या शेवटीं झकार किंवा भकार यांना जश्त्व (८।२।३९) होणारच.

३. प्रत्यङ् आत्मा, सुगण् ईशः, सन् अच्युतः इत्यादि ठिकाणीं ङ्, ण्, न् हे तीन 'ङय्' प्रत्याहारांतील वर्ण पदाच्या शेवटीं सांपडतात, आणि त्यांना ङञुट् आगम म्ह. ङुट्, णुट्, नुट्, झुट् आणि भुट् असे पांच आगम सांगितले आहेत. तेव्हां उद्देश्य तीन आणि विधेय पांच अशी त्यांची संख्या सारखी नसल्यामुळें 'यथासंख्यं' (१।३।१०) ह्या सूत्राचीं येथें प्रवृत्ति होणार नाहीं.

४. तात्पर्य असें की वाक्यार्थ करतांना उद्देश्य पांच आणि विधेयही पांच उपस्थित होतात, तेव्हां 'यथासंख्यं०' या सूत्रानें क्रमानें अन्वय होणारच. सर्वांचीं उदाहरणें मिळालीं नाहींत तरी हरकत नाहीं. पदार्थ उपस्थित होतांना सारखी संख्या असली की यथासंख्यं०' या सूत्राची प्रवृत्ति होत असते.

न भविष्यतः ॥

अथ किमिदमक्षरमिति ।

**अक्षरं न क्षरं विद्यात्**

न क्षीयते न क्षरतीति वाक्षरम् ॥

**अश्नोतेर्वा सरोऽक्षरम् ।**

अश्नोतेर्वा पुनरयमौणादिकः सरन्प्रत्ययः । अश्नुत इत्यक्षरम् ॥

**वर्णं वाहुः पूर्वसूत्रे**

अथवा पूर्वसूत्रे वर्णस्याक्षरमिति संज्ञा क्रियते ।

**किमर्थमुपदिश्यते ॥**

अथ किमर्थमुपदिश्यते ॥

**वर्णज्ञानं वाग्विषयो यत्र च ब्रह्म वर्तते ।**
**तदर्थमिष्टबुध्यर्थं लघ्वर्थं चोपदिश्यते ॥**

सोऽयमक्षरसमाम्नायो वाक्समाम्नायः पुष्पितः फलितश्चन्द्रतारकवत्प्रतिमाण्डितो वेदितव्यो ब्रह्मराशिः । सर्ववेदपुण्यफलावाप्तिश्चास्य ज्ञाने भवति । मातापितरौ चास्य स्वर्गे लोके महीयेते ॥

**इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥**

---

नाच ङ, ण व न असे अनुक्रमें आगम होतील. (तेव्हां दोन सूत्रांऐवजीं एक सूत्र करून काम भागत असतां दोन सूत्रें केवळ स्पष्टपणाकरितां आचार्यांनीं केलीं.)

बरें, अक्षर[५] म्हणजे काय ?

जें कमी होत[६] नाहीं किंवा जें नाश पावत नाहीं तें अक्षर.

अथवा 'अश्' व्याप्त करणें या धातूला उणादि सरन् प्रत्यय लावून 'जें व्याप्त करतें तें' या अर्थींही अक्षर शब्द समजावा.[७]

अथवा पूर्वींच्या वैयाकरणांच्या सूत्रांत[८] वर्णाला अक्षर हें नांव दिलेलें आहे त्याला अनुसरून अक्षर शब्दाचा वर्ण अर्थ घ्यावा.

बरें, अक्षर शब्दाच्या अर्थाविषयीं विचार झाला; आतां हा अक्षरांचा उपदेश माहेश्वरसूत्रांमध्यें कशाकरितां बरें केला आहे ?

ज्या ह्या वाणीमध्यें वेदरूपी शब्दब्रह्म आहे त्या वाणीचा 'वर्णज्ञान करून देणारें शास्त्र' हा विषय आहे. त्या शास्त्राकरितां, तसेंच इष्ट म्ह. निर्दुष्ट वर्ण समजावेत याकरतां, आणि प्रत्याहाराच्या द्वारानें थोडक्यांत शास्त्र सांगतां यावें याकरतां महेश्वरांनीं हा उपदेश केला आहे. हा जो माहेश्वरसूत्रांत अक्षरसमूहरूप वाणीचा समाम्नाय सांगितला आहे तो शब्दशास्त्रज्ञानानें पुष्पित होतो आणि साधु शब्दांचा प्रयोग केल्यानें फलित होतो. तो हा चंद्रतारकांप्रमाणें अनादि कालापासून सिद्ध असलेला अक्षरसमाम्नाय सुशोभित असा ब्रह्मराशि जाणावा. त्याचें ज्ञान झालें असतां सर्व वेद म्हटल्यानें लागणारें पुण्य लागतें, व त्या ज्ञात्याचे आईबाप स्वर्गलोकामध्यें मान्य होतात.

---

५. अइउण् वगैरे सूत्रसमुदायाला अक्षरसमाम्नाय असें म्हणतात. त्याकरतां येथें अक्षर शब्दाच्या अर्थाबद्दल विचार चालू केला आहे.

६. न अव्यय उपपद असतांना नाश पावणें या अर्थीं क्षि धातूपासून किंवा क्षर् धातूपासून अक्षर हा शब्द सिद्ध होतो. तेव्हां अक्षर शब्दाचा अविनाशी असा अर्थ आहे. आपण बोलतों हा ध्वनि जरी विनाशी आहे तरी त्या ध्वनीनें सुचविला जाणारा स्फोटरूपी वर्ण नित्य म्ह. अविनाशीच आहे. तेव्हां अक्षर हा शब्द अविनाशी या अर्थानें येथें वर्णाला लाविला आहे.

७. व्यापणें या अर्थाच्या स्वादिगणांतील अश् धातूहून 'अशेः सरः' (उणा. ३।७०) या उणादिसूत्रानें सर प्रत्यय करून अक्षर हा शब्द सिद्ध झाला आहे. आद्युदात्त होण्याकरितां भाष्यकारांनीं नित् मानला आहे. हा अक्षर शब्द व्यापक या अर्थानें येथें वर्णाला लाविला आहे. स्फोटरूपी वर्ण हे व्यापक आहेत. एकदम अनेक वक्ते भाषण करीत असले तरी त्या सर्वांच्या व्यंजकध्वनीशीं स्फोटरूपी वर्णांचा व्यंग्य या नात्यानें संबंध होत आहे.

८. 'वर्णा अक्षराणि' या पूर्वसूत्रानें वर्णाला अक्षर अशी संज्ञाच केली आहे.

## वृद्धिरादैच् ॥ १ । १ । १ ॥

कुत्वं कस्मान्न भवति चोः कुः पदस्य [८.२.३०] इति । भत्वात् । कथं भसंज्ञा । अयस्मयादीनि च्छन्दसि [१.४.२०] इति । छन्दसीत्युच्यते न चेदं छन्दः । छन्दोवत्सूत्राणि भवन्ति । यदि भसंज्ञा वृद्धिरादैजदेङ्गुण इति जश्त्वमपि न प्राप्नोति । उभयसंज्ञान्यपि च्छन्दांसि दृश्यन्ते । तद्यथा । स सुष्टुभा स ऋक्वता गणेन । पदत्वात्कुत्वं भत्वाज्जश्त्वं न भवति । एवमिहापि पदत्वाज्जश्त्वं भत्वात्कुत्वं न भविष्यति ॥

किं पुनरिदं तद्भावितग्रहणं वृद्धिरित्येवं य आकारैकारौकारा भाव्यन्ते तेषां ग्रहणमाहोस्विदादैज्मात्रस्य । किं चातः । यदि तद्भावितग्रहणं शालीयः मालीय इति वृद्धलक्षणश्छो न प्राप्नोति । आम्रमयम् शालमयम् वृद्धलक्षणो मयण्न प्राप्नोति । आम्रगुप्तायनिः शालगुप्तायनिः वृद्धलक्षणः फिञ्न प्राप्नोति ॥ अथादैज्मात्रस्य

---

(सू.१।१।१) या सूत्रांत 'चोः कुः'(८।२।३०) या सूत्रानें पदाच्या शेवटीं असलेल्या चकाराला ककार कां होत नाहीं ?

ऐच् या शब्दाला येथें पदसंज्ञेच्या ऐवजीं भसंज्ञा[2] आहे म्हणून.

'भ' संज्ञा कशी येथें होते ?

'अयस्मयादीनि छन्दसि' (१।४।२०) या सूत्रानें.

पण त्या सूत्रांत 'छन्दसि' म्हणजे 'वेदामध्यें' असें म्हटलें आहे. सूत्र हा वेद नाहीं.

'सूत्रें हीं वेदाप्रमाणें असतात' असें समजण्याचा प्रघात आहे.

पण जर येथें भसंज्ञा झाली तर 'वृद्धिरादैजदेङ्गुणः' असा म्हणण्याचा जो प्रघात आहे त्यामध्यें जें 'जश्त्व' केलेलें आहे तें होणार[3] नाहीं.

ही अडचण येणार नाहीं. कारण वेदांतील शब्दांना दोन्ही संज्ञा दिसतात. उदाहरणार्थ— 'स सुष्टुभा स ऋक्वता गणेन' तै. सं. (२।३।१४।४) हें वेदवाक्य पाहा. या ठिकाणीं ज्याप्रमाणें ऋक्वता येथें पदसंज्ञेमुळें कुत्व होतें व भसंज्ञेमुळें जश्त्व होत नाहीं त्याप्रमाणें येथेंही पदसंज्ञेमुळें जश्त्व होईल व भसंज्ञेमुळें कुत्व होणार नाहीं.

बरें, प्रस्तुत सूत्रांत 'आदैच्' हें जें पद घातलें आहे त्या पदानें 'तद्भावित' म्हणजे वृद्धि या शब्दानें निष्पन्न झालेले असे जे आकार, ऐकार व औकार त्यांचेंच ग्रहण होतें; अथवा कोणत्याही आकार, ऐकार व औकार यांचें ग्रहण होतें ?

हा प्रश्न करण्याचा हेतु काय ?

जर तद्भावित आकार, ऐकार व औकार घ्यावे असें असेल तर 'शालीयः', 'मालीयः' या ठिकाणीं 'वृद्धाच्छः' (४।२।११४) या सूत्रानें सांगितलेला 'छ' प्रत्यय होणार नाहीं; तसेंच 'आम्रमयम्', 'शालमयम्' या ठिकाणीं 'नित्यं वृद्धशरादिभ्यः' (४।३।२१४) या सूत्रानें मयट् प्रत्यय होणार नाहीं; व 'आम्रगुप्तायनिः', 'शालगुप्तायनिः' या ठिकाणीं 'उदीचां वृद्धादगोत्रात्' (४।१।१५७) या सूत्रानें फिञ् प्र-

---

१. आकार, ऐकार आणि औकार या तीन वर्णांना वृद्धिसंज्ञा होते.

२. भसंज्ञेनें पदसंज्ञेचा (१।४।१४) बाध होतो म्हणून कुत्व होत नाहीं. कारण 'चोः कुः' (८।२।३०) या शास्त्राला पदसंज्ञेची जरूर आहे.

३. कारण जश्त्व सांगणाऱ्या 'झलां जशोऽन्ते' (८।२।३९) या शास्त्राला कुत्वाप्रमाणेंच पदसंज्ञेची जरूर आहे. तेव्हां जश्त्व न करतां 'वृद्धिरादैचदेङ्गुणः' असें म्हणावें लागेल.

४. कारण शाला, माला या शब्दांतील पहिला आकार हा वृद्धि म्हणून झालेला नसल्यामुळें त्या शब्दांना 'वृद्धिर्यस्याचा०' (१।१।७३) या सूत्रानें वृद्धसंज्ञा होणार नाहीं. तसेंच आम्र, शाल, आम्रगुप्त व शालगुप्त या शब्दांना ही वृद्धसंज्ञा होणार नाहीं.

ग्रहणं सर्वो भासः सर्वभास इत्युत्तरपदवृद्धौ सर्वं च [६.२.१०५] इत्येष विधिः प्राप्नोति । इह च तावती भार्यास्य तावद्भार्यः यावद्भार्यः वृद्धिनिमित्तस्य [६.३.३९] इति पुंवद्भावप्रतिषेधः प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यादैज्मात्रस्य ग्रहणम् । ननु चोक्तं सर्वो भासः सर्वभास इत्युत्तरपदवृद्धौ सर्वं चेत्येष विधिः प्राप्नोतीति । नैष दोषः । नैवं विज्ञायत उत्तरपदस्य वृद्धिरुत्तरपदवृद्धिरुत्तरपदवृद्धाविति । कथं तर्हि । उत्तरपदस्य [७.३.१०] इत्येवं प्रकृत्य या वृद्धिस्तद्वत्युत्तरपद इत्येवमेतद्विज्ञायते । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । तद्भावितग्रहणे सत्यपीह प्रसज्येत सर्वः कारकः सर्वकारक इति । यदप्युच्यत इह तावती भार्यास्य तावद्भार्यः यावद्भार्य इति च वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधः प्राप्नोतीति नैष दोषः । नैवं विज्ञायते वृद्धे-

---

त्यय होणार नाहीं. बरें, जर कोणत्याही आकार, ऐकार व औकार यांचें ग्रहण होतें असें असेल तर 'सर्वो भासः' या अर्थी केलेला जो 'सर्वभास' हा समास त्यामध्यें 'उत्तरपदवृद्धौ सर्वं च' (६।२।१०५) या सूत्रानें सर्व शब्दाला अंतोदात्त होऊं लागेल. तसेंच 'तावती भार्या यस्य' या अर्थी केलेला जो 'तावद्भार्य' हा समास त्या समासांत तावत् येथें जो पुंवद्भाव होत असतो त्याचा 'वृद्धिनिमित्तस्य च तद्धितस्यारक्तविकारे' (६।३।३९) या सूत्रानें निषेध होऊं लागेल.[६]

बरें तर, वाटेल त्या 'आकार', 'ऐकार' व 'औकारां'चें ग्रहण होऊं दे.

पण तसें झाल्यास वरतीं दाखविलेला दोष 'सर्वो भासः' या अर्थी झालेल्या 'सर्वभास' समासांत 'उत्तरपदवृद्धौ सर्वं च' (६।२।१०५) या सूत्रानें सर्व शब्दाला अंतोदात्त होऊं लागेल अशा प्रकारचा येईल असें वरतींच नाहीं का सांगितलें ?

हा दोष येत नाहीं. कारण 'उत्तरपदवृद्धि' हा समास 'उत्तरपदामधील वृद्धि' अर्थी नाहीं सोडवावयाचा.

तर मग कसा सोडवावयाचा ?

'उत्तरपदस्य असा अधिकार करून सांगितलेली जी वृद्धि' तिनें युक्त जें उत्तरपद तें पुढें असतांना अशा अर्थी सोडवावयाचा; आणि हा अर्थ प्रस्तुत उपयोगाकरितांच घेतला आहे असें नव्हे, तर एरव्हींसुद्धां हाच अर्थ समजला पाहिजे. कारण, असा अर्थ न समजल्यास जरी वृद्धि शब्दानें निष्पन्न झालेले आकार, ऐकार आणि औकार त्यांना वृद्धि संज्ञा होते असा प्रकृत सूत्राचा अर्थ घेतला तरी सुद्धां 'सर्वः कारकः' या अर्थी केलेल्या 'सर्वकारक' समासांत 'सर्व' शब्दाला अंतोदात्त होऊं लागेल. आणखीही जे 'तावती भार्या यस्य' अशा विग्रहाच्या 'तावद्भार्य' या समासांत किंवा त्याच प्रकारच्या यावद्भार्य समासांत 'वृद्धिनिमित्तस्य' (६।१।३९) या सूत्रानें पुंवद्भावाचा निषेध होईल असें जें वर म्हटलें आहे त्यासंबंधानें बोलावयाचें म्हणजे हा

---

५. कारण, भास या उत्तरपदामधील आकार वृद्धिसंज्ञक आहे. जरी तो भास् धातूमधील आकार मूळचाच असल्यामुळें वृद्धि शब्दानें झालेला नाहीं तरी त्या आकाराला 'वृद्धिरादैच्' या प्रकृतसूत्रानें वृद्धिसंज्ञा होत आहे.

६. तद् शब्दाहून 'यत्तदेतेभ्यः०' (५।२।३९) या सूत्रानें वतुप् हा तद्धित प्रत्यय केल्यानंतर 'आ सर्वनाम्नः' (६।३।९१) या सूत्रानें तद् शब्दांतील दकाराला आकार आदेश झाला आहे. हा आकार जरी वृद्धि शब्दानें झालेला नाहीं तरी त्याला 'वृद्धिरादैच्' या प्रकृतसूत्रानें वृद्धिसंज्ञा होत आहे.

७. कारण, कारक या उत्तरपदामध्यें कृ धातूहून 'ण्वुल्तृचौ' (३।१।१३३) या सूत्रानें ण्वुल्प्रत्यय झाल्यानंतर 'अचो ञ्णिति' (७।२।११५) या सूत्रानें वृद्धि झाली आहे. तेव्हां हा आकार वृद्धि शब्दानेंच झालेला आहे.

निर्मित्तं वृद्धिनिमित्तं वृद्धिनिमित्तस्येति। कथं तर्हि। वृद्धेर्निमित्तं यस्मिन्सोऽयं वृद्धिनिमित्तो वृद्धिनिमित्तस्येति। किं च वृद्धेर्निमित्तम्। योऽसौ ककारो णकारो ञकारो वा। अथवा यः कृत्स्नाया वृद्धेर्निमित्तम। कश्च कृत्स्नाया वृद्धेर्निमित्तम्। यस्त्रयाणामाकारैकारौकाराणाम् ॥

**संज्ञाधिकारः संज्ञासंप्रत्ययार्थः ॥१॥**

अथ संज्ञेति प्रकृत्य वृद्ध्यादयः शब्दाः पठितव्याः। किं प्रयोजनम्। संज्ञासंप्रत्ययार्थः। वृद्ध्यादीनां शब्दानां संज्ञेत्येष संप्रत्ययो यथा स्यात् ॥

**इतरथा ह्यसंप्रत्ययो यथा लोके ॥२॥**

अक्रियमाणे हि संज्ञाधिकारे वृद्ध्यादीनां संज्ञेत्येष संप्रत्ययो न स्यात्। इदमिदानीं बहुसूत्रमनर्थकं स्यात्। अनर्थकमित्याह। कथम्। यथा लोके। लोके ह्यर्थवन्ति चानर्थकानि च वाक्यानि दृश्यन्ते। अर्थवन्ति तावत्। देवदत्त गामभ्याज शुक्लां दण्डेन देवदत्त गामभ्याज कृष्णामिति। अनर्थकानि। दश दाडिमानि षडपूपाः कुण्डमजाजिनं पललपिण्डः अधरोरुकमेतत्कुमार्याः स्फैयकृतस्य पिता

---

दोष येत नाहीं; कारण, 'वृद्धिनिमित्त' या शब्दाचा अर्थ वृद्धीचें निमित्त असा करावयाचा नाहीं.

तर कसा करावयाचा ?

'वृद्धीचें निमित्त ज्यामध्यें आहे तो वृद्धिनिमित्त' असा करावयाचा.

वृद्धीचें निमित्त म्हणजे काय समजावयाचें ?

अर्थात् ककार किंवा ञकार किंवा णकार (७।२।११७-११८). अथवा 'वृद्धिनिमित्त' म्हणजे सर्व वृद्धीचें निमित्त असें समजावें.

सर्व वृद्धीचें निमित्त कोण ?

जो आकार, ऐकार व औकार या तिन्हींचें निमित्त तो.

(वा.१) 'अथ संज्ञा' (आतां संज्ञा सांगण्यास आरंभ करतों) असा अधिकार प्रथम सांगून वृद्धि वगैरे शब्द मागाहून सांगावे.

असें कशाकरितां ?

'संज्ञासंप्रत्ययार्थः' म्हणजे पुढें सांगितलेले जे वृद्धि वगैरे शब्द ते 'संज्ञा' शब्द म्हणून सांगितले आहेत असें कळावें म्हणून.

(वा.२) कारण, जर 'संज्ञा' हा अधिकार सांगितला नाहीं तर 'वृद्धि' वगैरे शब्द हे संज्ञा म्हणून उच्चारले आहेत असें कळणार नाहीं; व त्यामुळें 'वृद्धिरादैच्' इत्यादि पुष्कळ सूत्रें अनर्थक म्हणजे अर्थरहित होतील.

'अनर्थक होतील असें कसें म्हणतां येतें?' असें कोणीं विचारल्यास त्यास उत्तरादाखल वार्तिकांतील शब्द 'यथा लोके' म्हणजे लोकांत ज्याप्रमाणें. लोकांमध्यें अर्थयुक्त व अर्थरहित अशीं दोन्हीं प्रकारचीं वाक्यें दृष्टीस पडतात. अर्थयुक्त वाक्यांचीं उदाहरणें 'देवदत्त गामभ्याज शुक्लां दण्डेन', 'देवदत्त गामभ्याज कृष्णाम्' (देवदत्ता, त्या पांढऱ्या गाईला काठीनें इकडे हांकून आण; त्या काळ्या गाईला आण). अर्थरहित वाक्यांचीं उदाहरणें-दश दाडिमानि, षडपूपाः, कुण्डमजाजिनं, पललपिण्डः, अधरोरुकमेतत्कुमार्याः, स्फैयकृतस्य पिता प्रतिशीनः (दहा डाळिंबें, सहा अनरसे, भांडें, बोकडाचें कातडें, मूठभर कोंडा, मुलीचा हा परकर, स्फैयकृताचा बाप वाळला) वगैरे.

---

८. तावद्धार्य वगैरे शब्दांमध्यें वतुप् या तद्धित प्रत्ययाला ककार, ञकार किंवा णकार यांपैकीं एकही अनुबंध नाहीं.

९. तावद्धार्य वगैरे शब्दांमध्यें वतुप् प्रत्यय हा फक्त आकाराचाच निमित्त झालेला आहे. वतुप् प्रत्ययामुळें ऐकार व औकार कुठेंच होत नाहींत. त्यामुळें वतुप् प्रत्ययाला सर्ववृद्धीचा निमित्त असें म्हणतां येत नाहीं.

प्रतिशीन इति ॥

**संज्ञासंज्ञ्यसंदेहश्च ॥३॥**

क्रियमाणेऽपि संज्ञाधिकारे संज्ञासंज्ञिनोरसंदेहो वक्तव्यः । कुतो ह्येतद्वृद्धिशब्दः संज्ञादैचः संज्ञिन इति न पुनरादैचः संज्ञा वृद्धिशब्दः संज्ञीति ॥ यत्तावदुच्यते संज्ञाधिकारः कर्तव्यः संज्ञासंप्रत्ययार्थ इति न कर्तव्यः ।

**आचार्याचारात्संज्ञासिद्धिः**

आचार्याचारात्संज्ञासिद्धिर्भविष्यति । किमिदमाचार्याचारादिति । आचार्याणामुपचारात् ।

**यथा लौकिकवैदिकेषु ॥४॥**

तद्यथा लौकिकेषु वैदिकेषु च कृतान्तेषु । लोके तावन्मातापितरौ पुत्रस्य जातस्य संवृतेऽवकाशे नाम कुर्वाते देवदत्तो यज्ञदत्त इति । तयोरुपचारादन्येऽपि जानन्तीयमस्य संज्ञेति । वेदे याज्ञिकाः संज्ञां कुर्वन्ति स्फ्यो यूपश्चषाल इति । तत्रभवतामुपचारादन्येऽपि जानन्तीयमस्य संज्ञेति । एवमिहापि । इहैव तावत्केचिद्व्याचक्षाणा आहुः । वृद्धिशब्दः संज्ञादैचः संज्ञिन इति । अपरे पुनः सिचि वृद्धिः [७.२.१] इत्युक्त्वाकारैकारौकारानुदाहरन्ति । ते मन्यामहे यया प्रत्याय्यन्ते सा संज्ञा ये प्रतीयन्ते ते

---

(वा.३) आणखी, जरी 'संज्ञा' हा अधिकार सांगितला तरी संज्ञा व संज्ञी यांचा निर्णय सांगितला पाहिजे, म्हणजे संज्ञा कोणती व संज्ञी कोणता हेंही पण निश्चयपूर्वक सांगण्यास पाहिजे. न सांगितल्यास 'वृद्धि' हाच संज्ञाशब्द आहे व आकार, ऐकार व औकार हेच संज्ञी आहेत हें कसें समजेल ? आकार, ऐकार व औकार हे संज्ञाशब्द आहेत आणि वृद्धि शब्द संज्ञा आहे असें कां नाहीं होणार ?

वरतीं जें सांगितलें आहे की 'ह्या संज्ञा सांगितल्या आहेत असें कळण्याकरितां 'संज्ञा' हा अधिकार केला पाहिजे' त्या संबंधानें असें म्हणतां येईल की 'अथ संज्ञा' असा अधिकार करण्यास नको. कारण—

आचार्यांच्या मांडणीवरून 'अमुक संज्ञा आहे' असें निष्पन्न होईल. 'आचार्यांच्या मांडणीवरून' म्हणजे काय ?

आचार्यांच्या मांडणीवरून म्हणजे आचार्यांच्या व्यवहारावरून म्हणजे बोलण्याच्या धर्तीवरून.

(वा.४) याला दृष्टान्त द्यावयाचा म्हणजे जसें लौकिक व वैदिक बाबतीमध्यें लोकांमध्यें आपण पाहतों की मुलगा जन्मला म्हणजे त्याचे आईबाप आपल्या घरींच देवदत्त, यज्ञदत्त वगैरे नांव ठेवतात व त्या नांवानें त्याला हांका मारतात. त्या त्यांच्या व्यवहारावरून इतर लोकही समजतात की हें 'देवदत्त' 'यज्ञदत्त' वगैरे मुलाचें नांव आहे. वेदामध्येंही यज्ञ करणारे लोक यज्ञोपयोगी पदार्थांना 'स्फ्य', 'यूप', 'चषाल' वगैरे नांवें देतात. त्यांच्या व्यवहारावरून इतर लोकही या पदार्थांचीं हीं नांवें आहेत असें समजतात. हीच तऱ्हा या व्याकरणशास्त्रांत घडून येईल. कांहीं व्याख्याकार आचार्य याच सूत्राची व्याख्या पुढें लिहिल्याप्रमाणें करतात—'वृद्धि शब्द हा या सूत्रांत संज्ञा म्हणून घातला आहे व आ, ऐ आणि औ संज्ञी म्हणून घातले आहेत.' दुसरे कांहीं व्याख्याकार आचार्य वृद्धि शब्दाचा प्रदेश म्हणून 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' (७।२।१) या सूत्राचा उल्लेख करून आकार, ऐकार व औकार हे आदेश करून त्याचीं उदाहरणें देतात. तेव्हां या गोष्टीवरून आपण असें समजूं शकूं की ज्या शब्दामुळें इतरांचा बोध होतो तो संज्ञा शब्द व ज्यांचा बोध होतो ते संज्ञी.

तसेंच, वरतीं जें म्हटलें आहे की 'जरी

संज्ञिन इति ॥ यदप्युच्यते क्रियमाणेऽपि संज्ञाधिकारे संज्ञासंज्ञिनोरसंदेहो वक्तव्य इति

संज्ञासंज्ञ्यसंदेहश्च ॥५॥

संज्ञासंज्ञिनोश्चासंदेहः सिद्धः । कुतः । आचार्याचारादेव । उक्त आचार्याचारः ।

अनाकृतिः ॥६॥

अथवानाकृतिः संज्ञा । आकृतिमन्तः संज्ञिनः । लोकेऽपि ह्याकृतिमतो मांसपिण्डस्य देवदत्त इति संज्ञा क्रियते ॥

लिङ्गेन वा ॥७॥

अथवा किंचिल्लिङ्गमासज्य वक्ष्यामीत्थंलिङ्गा संज्ञेति । वृद्धिशब्दे च तल्लिङ्गं करिष्यते नादैच्छब्दे ॥ इदं तावदयुक्तं यदुच्यत आचार्याचारादिति । किमत्रायुक्तम् । तमेवोपालभ्यागमकं ते सूत्रमिति तस्यैव पुनः प्रमाणीकरणमित्येतदयुक्तम् । अपरितुष्यन्खल्वपि भवान-

---

संज्ञा हा अधिकार सांगितला तरी संज्ञा कोणती व संज्ञी कोणता यांचा निर्णय सांगितला पाहिजे' त्याबद्दल बोलावयाचें म्हणजे

(वा.५) संज्ञा व संज्ञी यांविषयींचा निर्णय झालेलाच आहे.

तो कसा ?

अर्थात् आचार्यांच्या प्रतिपादनाच्या धर्तीवरूनच; आणि आचार्यांच्या बोलण्याच्या धर्तीचें वरतीं वर्णन केलेंच आहे.

(वा.६) अथवा, ज्याला आकृति[१०] म्हणजे आकार नाहीं ती संज्ञा व आकृतिसहित म्हणजे आकारयुक्त जे पदार्थ ते संज्ञी. लोकांमध्येंही आकृतियुक्त मांसाच्या गोळ्याला देवदत्त असें नांव दिलें जातें.

(वा.७) अथवा कांहीं तरी खूण[११] करून मग सांगितां येईल की अशा अशा खुणेचा शब्द तो संज्ञा शब्द. 'वृद्धि' या शब्दांत तशी खूण केली जाईल, 'आदैच्' या शब्दाला तशी खूण केली जाणार नाहीं.

वरतीं जें कांहीं म्हटलें आहे की 'आचार्यांच्या मांडणीवरून संज्ञा आहे असें निष्पन्न होईल' तें म्हणणें योग्य नाहीं.

त्यांत काय अयोग्य आहे ?

आचार्य पाणिनींना आपलीं सूत्रें संदिग्धार्थ आहेत असा दोष ठेवणें व त्याच सूत्रांचा पुन्हा प्रमाण म्हणून उल्लेख करणें ही गोष्ट येथें अयोग्य[१२] आहे.

आणि आपणही[१३] 'संज्ञासंज्ञ्यसंदेहश्च

---

१०. येथें आकृति शब्दाचा भेद असा अर्थ कैयटानें केला आहे. अनेकांना एक संज्ञा केली जाते तेव्हां संज्ञी अनेक असल्यामुळें त्यांमध्यें भेद असतो. आणि त्या अनेकांना संज्ञा एक असल्यामुळें त्या संज्ञेमध्यें भेद नसतो. आकार हा अर्थ लोकांमध्यें जरी जुळतो तरी शास्त्रामध्यें जुळत नाहीं. कारण शास्त्रामध्यें संज्ञीदेखील संज्ञाशब्दाप्रमाणें शब्दरूपच आहेत. आणि शब्दाला आकार संभवत नाहीं.

११. संज्ञा शब्दाचें उच्चारण नीट न करतां कांहीं तरी दोषानें युक्त असें करावें. कल वगैरे दोष प्रथम आह्निकाच्या शेवटीं सांगितले आहेत, जरी दुष्ट अक्षराचें उच्चारण करणें चांगलें नाहीं तरी हरकत नाहीं. कारण वृद्धि वगैरे संज्ञाशब्द हे पाणिनीनें कल्पना केलेले आहेत. त्यांत दोष असला तरी त्या संज्ञाशब्दानें दाखविलेले जे आकार वगैरे संज्ञी त्यांमध्यें कांहीं दोष नाहीं. सिद्धप्रयोगामध्यें संज्ञीच असतात. जसा ऱ्हस्व अकार विवृत जरी दुष्ट आहे तरी धातुप्रत्यय वगैरेमध्यें पाणिनीनें तोच उच्चारला आहे. परंतु त्याला निर्दुष्ट असा संवृत ह्रस्व अकार आदेश (८।४।६८) सांगून सिद्धप्रयोगामध्यें दोष ठेविला नाहीं.

१२. जो पाणिनीचें सूत्र प्रमाण मानीत नाहीं तो तें सूत्र प्रमाण मानणाऱ्या वृत्तिकार आचार्यांनीं केलेला अर्थ प्रमाण कसा मानील? एकंदरींत हें अयोग्य आहे.

१३. वार्तिककारही. वार्तिककारालाही 'आचार्याचाराद्' हें आपणच केलेलें समाधान अयोग्य वाटलें आणि म्हणूनच दुसरें समाधान करण्यास प्रवृत्त झाला असें तात्पर्य आहे.

**नेन परिहारेणानाकृतिर्लिङ्गेन वेत्याह । तच्चापि वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यतेऽथवै- तर्हीत्संज्ञा न वक्तव्या लोपश्च न वक्तव्यः। संज्ञालिङ्गमनुबन्धेषु करिष्यते । न च सं- ज्ञाया निवृत्तिरुच्यते । स्वभावतः संज्ञाः संज्ञिनः प्रत्याय्य निवर्तन्ते । तेनानु- बन्धानामपि निवृत्तिर्भविष्यति । सिध्य- त्येवमपाणिनीयं तु भवति ॥ यथान्यास- मेवास्तु । ननु चोक्तं संज्ञाधिकारः संज्ञा- संप्रत्ययार्थ इतरथा ह्यसंप्रत्ययो यथा लोक इति । न यथा लोके तथा व्याक- रणे । प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्र- पाणिः शुचाववकाशे प्राङ्मुख उपविश्य महता यत्नेन सूत्रं प्रणयति स्म तत्रा- शक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुं किं पुन- रियता सूत्रेण । किमतो यदशक्यम् ।**

आचार्याचारात्' या शब्दांनीं शंकेचें निराक- रण करून सुद्धां त्यामुळें मनाचा संतोष झाला नाहीं म्हणूनच कीं काय 'अनाकृतिः' व 'लिङ्गेन' असें म्हणून पुन्हा निराकरण करतां.

तेव्हां आतां तसें चिन्ह कांहीं तरी जोडा- वयास पाहिजे.[१४]

जरी कांहीं चिन्ह जोडावें लागलें तरी कांहीं गौरव होणार नाहीं. कारण इत्संज्ञा सांगावयास नको, लोपही सांगावयास[१५] नको; कारण अनुबन्ध म्हणजे जीं इत्संज्ञक अक्षरें त्यांना संज्ञेची खूण जोडतां येईल. हें जें संज्ञेचें खूण म्हणून जोडलेलें अक्षर त्याचा लोप सांगावयास नको. कारण संज्ञेची निवृत्ति कोठेंही सांगितली जात नाहीं; संज्ञा ही स्वभावतःच संज्ञीचें ज्ञान करून दिल्यावर नाहींशी होते. या नियमाला अनुसरूनच अनुबन्ध हे संज्ञा म्हणून सांगितले गेल्यास संज्ञीचें ज्ञान झाल्यावर आपोआपच नाहींसे होतील म्हणजे दूर राहतील.

अशा रीतीनें काम भागेल खरें, पण तें आचार्य पाणिनींच्या कृतीस अनुसरून होत नाहीं.

तर मग खूण वगैरे कांहीं जोडूं नका; जसें आहे तसेंच सर्व राहूं द्या.

पण तसें झाल्यास वरतीं नाहीं का दोष म्हणून सांगितला की प्रस्तुत सूत्रांत किंवा त्याचे पूर्वी 'संज्ञा' हा अधिकार 'वृद्धि' वगैरे शब्द हे संज्ञा आहेत हें कळण्याकरितां सांगावा, न सांगितल्यास 'वृद्धि' वगैरे संज्ञा आहेत हें कळणार नाहीं; व लोकांमध्यें जशीं कांहीं अनर्थक वाक्यें दिसतात तसेंच हें होईल.

असें कांहीं नाहीं; लोकांतली गोष्ट जशी आहे तशी व्याकरणांतली नाहीं. सर्वांना पूज्य व प्रमाण आचार्य पाणिनि यांनीं हातांत दर्भांचे पवित्रक घालून शुद्ध जागेवर पूर्वेकडे तोंड करून मोठ्या प्रयत्नानें सूत्रें रचिलीं. तेव्हां त्या सूत्रांमध्यें एखादा वर्ण सुद्धां निरु- पयोगी सांपडणें कठिण; मग सबंध सूत्राची गोष्ट बाजूलाच राहूं दे.

पण जर सूत्राचा अर्थ लावणें अशक्य असेल तर तेथें सूत्रकाराचा मोठेपणा दाख- विला तरी त्याचा काय उपयोग होणार ?

उपयोग इतकाच होणार की तशा महात्म्या ऋषींचें सूत्र निरर्थक असणार नाहीं असें पक्कें मनांत धरून हरएक प्रयत्नानें

१४. वृद्धि वगैरे संज्ञाशब्दांचें उच्चारण कल, वगैरे दोषांपैकीं एखाद्या दोषानें युक्त असें केलें पाहिजे.

१५. वृद्धि वगैरे संज्ञाशब्द आहेत असें सम- जण्याकरितां ज्या दोषानें युक्त असें त्या शब्दाचें उच्चारण केलें जाईल त्याच दोषानें युक्त असें शीङ् वगैरे धातूंमधील ङकार वगैरे अनुबंधांचें उच्चारण करावें. त्यावरून 'ङ' ही शी धातूची संज्ञा आहे असा बोध होईल, व 'अनुदात्तङितः०' (१।३।१२) या सूत्रामध्यें 'ङितः' याच्या ऐवजीं 'ङात्' असें म्हणावें. त्या 'ङ' या संज्ञाशब्दानें शी धातूचा बोध होईल आणि त्याहून आत्मनेपद होईल. तेव्हां त्या ङकार वगैरे वर्णांना 'हलन्त्यम्' (१।३।३) यानें इत् संज्ञा करावयास नको व 'तस्य लोपः' (१।३।९) या सूत्रानें लोपही करावयास नको.

अतः संज्ञासंज्ञिनावेव ॥

कुतो नु खल्वेतत्संज्ञासंज्ञिनावेवेति न पुनः साध्वनुशासनेऽस्मिञ्शास्त्रे साधुत्वमनेन क्रियते । कृतमनयोः साधुत्वम् । कथम् । वृधिरस्मा अविशेषेणोपदिष्टः प्रकृतिपाठे तस्मात् क्तिन्प्रत्ययः । आदैचोऽप्यक्षरसमाम्नाय उपदिष्टाः ॥ प्रयोगनियमार्थं तर्हीदं स्यात् । वृद्धिशब्दात्पर आदैचः प्रयोक्तव्या इति । नेह प्रयोगनियम आरभ्यते । किं तर्हि । संस्कृत्य संस्कृत्य पदान्युत्सृज्यन्ते तेषां यथेष्टमभिसंबन्धो भवति । तद्यथा । आहर-पात्रम् पात्रमाहरेति ॥ आदेशास्तर्हीमे स्युः । वृद्धिशब्दस्यादैचः । षष्ठीनिर्दिष्टस्यादेशा उच्यन्ते न चात्र षष्ठीं पश्यामः ॥ आगमास्तर्हीमे स्युः । वृद्धिशब्दस्यादैच

संभवेल तसा त्याचा अर्थ केला पाहिजे. तेव्हां हें सूत्र संज्ञा व संज्ञी दाखविणारें आहे असें गृहीत धरावें.

बरें, पण हें सूत्र संज्ञा व संज्ञीच दाखविणारें आहे असाच निष्कर्ष काय म्हणून काढावयाचा ? शुद्ध शब्द दाखविणाऱ्या या शास्त्रांत आदैच् व वृद्धि हे शब्द शुद्ध आहेत असें या सूत्रानें सांगितलें आहे असाच निष्कर्ष कां म्हणून काढूं नये ?

असा निष्कर्ष काढतां येत नाहीं. कारण हे दोन्ही शब्द शुद्ध आहेत ही गोष्ट सिद्धच आहे.

ती कशी ?

'वृध्' हा धातु धातुपाठामध्यें इतर धातूंसारखाच सांगितला आहे. त्याहून 'क्तिन्' प्रत्यय (३।३।१४) केला म्हणजे 'वृद्धि' शब्द साधला जातोच. तेव्हां 'वृद्धि' शब्द प्रस्तुत सूत्रानें साधूं म्हणून सांगण्याची जरूर नाहीं. आकार, ऐकार व औकार हेही अक्षरसमाम्नायांत सांगितले आहेतच. तेही पुन्हा येथें सांगण्याची जरूर नाहीं. तेव्हां प्रस्तुत सूत्र कशाकरितां, तर आकार, ऐकार व औकार ह्यांना वृद्धि म्हणावें हें सांगण्याकरितां असा साहजिकच निष्कर्ष निघतो.

तरी पण असाच निष्कर्ष कां काढावा ? वृद्धि व आदैच् हे शब्द साधण्याकरितां प्रस्तुत सूत्र केलें आहे असें म्हणतां येत नसेल तर शब्द उच्चारण्याचा नियम घालून देण्याकरितां प्रस्तुत सूत्र केलें आहे असें समजा; उदाहरणार्थ, 'वृद्धि' शब्दाच्या पुढें आकार, ऐकार व औकार घालावे असा प्रयोगनियम प्रस्तुत सूत्र घालून देतें असें समजा.

हें व्याकरणशास्त्र शब्दांच्या प्रयोगाचे नियम घालून देण्याकरितां सांगितलें नाहीं.

तर मग व्याकरणशास्त्रांत काय सांगितलें आहे ?

या व्याकरणशास्त्रांत एकामागून एक अशीं कोट्यवधि पदें फक्त तयार करकरून दिलीं जातात. त्यांचा प्रयोग आपल्या इच्छेला अनुरूप होत असतो. उदाहरणार्थ, 'आहर' व 'पात्रं' अशीं पदें साधल्यावर 'आहर पात्रं' म्हणतां येतें, व 'पात्रमाहर' असेंही म्हणतां येतें.

बरें तर, मग 'आदैच्', 'अदेङ्' वगैरे शब्द आदेश म्हणून समजूं. 'वृद्धिरादैच्' सूत्राचा 'वृद्धि शब्दाला आदैच् हे आदेश होतात' असा अर्थ करूं.

तसें होणार नाहीं. आदेश ज्याला होतात तें पद सूत्रामध्यें षष्ठी विभक्तींत उच्चारलेलें असतें; येथें षष्ठी विभक्तींत पद [१६] दिसत नाहीं.

तर मग आकार व ऐच् हे आगम होतात म्हणून समजूं. 'वृद्धि शब्दाला आकार व ऐच् हे आगम होतात' असा अर्थ करूं.

पण आगमसुद्धां ज्याला होतात तें पद षष्ठी विभक्तींत उच्चारलेलें असतें. शिवाय आगमाला कांहीं तरी खूण केलेली असते. येथें षष्ठी विभक्तिही आपणांस दिसत नाहीं;

---

१६. वृद्धिः असें प्रथमान्त पद आहे, वृद्धेः असें षष्ठ्यन्त पद नाहीं.

आगमाः । आगमा अपि षष्ठीनिर्दिष्टस्यैवोच्यन्ते लिङ्गेन च न चात्र षष्ठीं न खल्वप्यागमलिङ्गं पश्यामः॥ इदं खल्वपि भूयः सामानाधिकरण्यमेकविभक्तित्वं च द्वयोश्चैतद्भवति । कयोः । विशेषणविशेष्ययोर्वा संज्ञासंज्ञिनोर्वा । तत्रैतत्स्याद्विशेषणविशेष्ये इति। तच्च न। द्वयोर्हि प्रतीतपदार्थकयोर्लोके विशेषणविशेष्यभावो भवति न चादैच्छब्दः प्रतीतपदार्थकः । तस्मात्संज्ञासञ्ज्ञिनावेव ॥ तत्र त्वेतावान्संदेहः कः संज्ञी का संज्ञेति । स चापि क संदेहः। यत्रोभे समानाक्षरे। यत्र त्वन्यतरल्लघु यल्लघु सा संज्ञा । कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्राप्ययं नावश्यं गुरुलघुतामेवोपलक्षयितुमर्हति । किं तर्हि । अनाकृतितामपि। अनाकृतिः संज्ञा। आकृतिमन्तः संज्ञिनः। लोके ह्याकृतिमतो मांसपिण्डस्य देवदत्त इति संज्ञा क्रियते ॥ अथवावर्तिन्यः संज्ञा भवन्ति । वृद्धिशब्दश्चावर्तते नादैच्छब्दः।

---

किंवा आगमाची टकार, ककार वगैरे (१।१। ४६-४७) खूणही दिसत नाहीं. आणि विशेषतः पुढील गोष्टीही येथें नजरेस पडतात. येथें वृद्धि शब्द व आदैच् शब्द यांमध्यें सामानाधिकरण्य आहे व ते दोन्ही शब्द एकाच विभक्तींत घातले आहेत. या दोन गोष्टी दोन ठिकाणीं दृष्टीस पडतात.

तीं दोन ठिकाणें कोणतीं ?

विशेषण व विशेष्य यांमध्यें, तसेंच संज्ञा व संज्ञी यांमध्यें. या दोहींपैकीं विशेषणविशेष्यभावसंबंध या ठिकाणीं असेल असें म्हणावें तर तसें होणार नाहीं; कारण लोकांमध्यें ज्यांचे अर्थ माहीत झाले आहेत अशा दोन शब्दांमध्यें विशेषणविशेष्यभावसंबंध असूं शकतो; प्रस्तुत सूत्रांत 'आदैच्' या शब्दाचा अर्थ लोकांमध्यें प्रसिद्ध असा कांहीं दिसत [१७] नाहीं. तेव्हां विशेषणविशेष्यभाव येथें असणें शक्य नसल्यामुळें 'वृद्धि' शब्द व 'आदैच्' शब्द हे अनुक्रमें संज्ञा व संज्ञीच आहेत.

इतकें जरी झालें तरी पण कोणता संज्ञी व कोणती संज्ञा हा प्रश्न येथें उरतोच.

हा प्रश्न येथें राहत नाहीं. हा प्रश्न कोठें उभा राहतो ? जेथें संज्ञा व संज्ञी यांची अक्षरसंख्या सारखीच असते तेथें. पण जेथें दोन्हींपैकीं एकाची अक्षरसंख्या कमी असते तेथें ज्याची अक्षरसंख्या कमी तो संज्ञा शब्द, व ज्याची जास्ती तो संज्ञी शब्द.

हें असें कशावरून समजतें ?

एवढ्यावरूनच की संज्ञा करावयाची असते ती कांहीं तरी लाघवाकरितां म्हणजे यत्न वांचविण्याकरितां करावयाची असते. शिवाय संज्ञा शब्द हा लाघवगौरव पाहून त्यावरूनच फक्त ओळखिला जातो असें नाहीं. तर संज्ञा शब्द हा आकृतिरहित असतो आणि संज्ञी हे आकृतियुक्त असतात. लोकांतसुद्धां कांहीं विशिष्ट आकृति असलेल्या हाडामांसाच्या गोळ्याला (संज्ञीला) देवदत्त ही संज्ञा दिली जाते.

अथवा, शब्दाची तिसरी खूण सांगावयाची म्हणजे संज्ञा शब्द हे पुन्हा पुन्हा घातलेले असतात. प्रस्तुत वृद्धि शब्दासंबंधानें म्हणावयाचें म्हणजे वृद्धि शब्द हा पुन्हा पुन्हा व्याकरणसूत्रांत येतो. [१८] 'आदैच्' शब्द तसा येत नाहीं. इतर ठिकाणीं हेंच दृष्टीस पडतें; उदाहरणार्थ, लोकांमध्यें फक्त देवदत्त शब्द पुन्हा पुन्हा उच्चारला जातो; मांसाचा बन-

---

१७. जरी व्याकरणशास्त्रांत आदैच् या पदाचा अर्थ आकार, ऐकार आणि औकार हा प्रसिद्ध आहे तरी तो वृद्धीचें विशेषण होण्याला योग्य नाहीं.

१८. उदा. 'वृद्धिर्यस्या०' (१।१।७२), इको० (१।१।३), वृद्धिरेचि (६।१।८८), वृद्धिनिमित्त० (६।३।३९), इद्वृद्धौ (६।३।२८) इत्यादि.

तद्यथा। इतरत्रापि देवदत्तशब्द आवर्तते न मांसपिण्डः॥ अथवा पूर्वोच्चारितः संज्ञी परोच्चारिता संज्ञा। कुत एतत्। सतो हि कार्यिणः कार्येण भवितव्यम्। तद्यथा। इतरत्रापि सतो मांसपिण्डस्य देवदत्त इति संज्ञा क्रियते। कथं वृद्धिरादैजिति। एतदेकमाचार्यस्य मंगलार्थं मृष्यताम्। माङ्गलिक आचार्यो महतः शास्त्रौघस्य मंगलार्थं वृद्धिशब्दमादितः प्रयुङ्क्ते मंगलादीनि हि शास्त्राणि प्रथन्ते वीरपुरुषकाणि च भवन्त्यायुष्मत्पुरुषकाणि चाध्येतारश्च वृद्धियुक्ता यथा स्युरिति। सर्वत्रैव हि व्याकरणे पूर्वोच्चारितः संज्ञी परोच्चारिता संज्ञा। अदेङ्गुणः [१.१.२] इति यथा॥ दोषवान्खल्वपि संज्ञाधिकारः। अष्टमेऽपि हि संज्ञा क्रियते तस्य परमाम्रेडितम् [८.१.२] इति। तत्रापीदमनुवर्त्यं स्यात्॥ अथवास्थानेऽयं यत्नः

लेला देवदत्त नांवाचा देह दर वेळेस हजर असतोच असें नाहीं.[१९]

अथवा, प्रथम उच्चारलेला संज्ञी असतो व मागाहून उच्चारलेला शब्द संज्ञाशब्द असतो.

असें काय म्हणून?

कारण, कार्य व्हावयाचें म्हणजे ज्याला कार्य व्हावयाचें तो कार्यी अस्तित्वांत आलेला म्हणजे सिद्ध असा गृहीत धरला असला पाहिजे. उदाहरणार्थ, एखाद्या देहाला देवदत्त नांव द्यावयाचें असल्यास ज्या देहाला उद्देशून नांव द्यावयाचें तो देह अस्तित्वांत आलेला असला पाहिजे, आणि उद्देश्याचा प्रथमतः निर्देश करणें हें साहजिकच आहे.

असें अवश्य असेल तर 'वृद्धिरादैच्' सूत्रांत वृद्धि शब्द पूर्वी घातला आहे त्याची वाट काय?

ह्या एका सूत्रामध्यें 'वृद्धि' हा संज्ञा शब्द जरी आचार्य पाणिनींनीं पूर्वी उच्चारला आहे तरी त्याबद्दल त्यांना दोष बिलकुल देऊं नये. कारण येथें 'वृद्धि' हा शब्द आरंभीं उच्चारण्यांत आचार्यांचा विशिष्ट हेतु आहे तो हा की आचार्यांनीं मंगलाकरितां येथें संज्ञा शब्द प्रथम उच्चारला आहे असें समजावें. मंगलकारक साधु शब्द तयार करण्याकरितां प्रवृत्त झालेले आचार्य आपल्याकडून रचिल्या जाणाऱ्या मोठ्या शास्त्राला मंगल म्हणून प्रथम 'वृद्धि' शब्द उच्चारतात. कारण, मंगल शब्द ज्यांमध्यें प्रथम उच्चारला आहे अशीं शास्त्रें प्रसिद्धीस पावतात, तीं रचिणाऱ्याच्या कुलांत वीर पुरुष जन्माला येतात. त्या पुरुषांना दीर्घ आयुष्य प्राप्त होतें आणि तीं अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांची भरभराट होते. तेव्हां एवढें 'वृद्धिरादैच्' सूत्र वरील कारणाकरितां संज्ञाशब्द प्रथम घालून उच्चारलें आहे; बाकी सर्व ठिकाणीं व्याकरणांत प्रथम उच्चारलेला संज्ञी शब्द व मागाहून उच्चारलेला संज्ञाशब्द. उदाहरणार्थ, 'अदेङ्गुणः' सूत्र पाहा.

शिवाय वर म्हटल्याप्रमाणें जर संज्ञा हा अधिकार येथें चालू करून 'वृद्धिरादैच्' वगैरे सूत्रें उच्चारिलीं तरी देखील कांहीं ठिकाणीं दोष राहणारच. कारण सर्व संज्ञा या प्रस्तुत एकाच ठिकाणीं सांगितल्या आहेत असें नाहीं; तर आठव्या अध्यायांत सुद्धां संज्ञा सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ, 'तस्य परमाम्रेडितम्' (८।१।२) या सूत्रांत 'आम्रेडित' संज्ञा सांगितली आहे. संज्ञा हा अधिकार घालावा असें म्हटल्यास त्या ठिकाणीं म्हणजे आठव्या अध्यायांत सुद्धां या अधिकाराची अनुवृत्ति करावी लागेल व तसें करणें जवळ जवळ अशक्य कोटींतलेंच आहे.

अथवा, प्रस्तुत प्रकरणांत संज्ञा अधिकार-

१९. देवदत्त मोठा पंडित आहे, देवदत्त गांवाला गेला आहे, देवदत्ताचें घर नवें आहे, देवदत्ताला वर्षें बावीस, अशा प्रकारच्या अनेक गोष्टी सांगतांना नुसता देवदत्त हा शब्दच उच्चारला जातो व तेवढ्यावरूनच अर्थबोध होतो.

क्रियते न हीदं लोकाद्भिद्यते। यदीदं लोकाद्भिद्येत ततो यत्नार्हं स्यात्। तद्यथा। अगोज्ञाय कश्चिद्गां सक्थनि कर्णे वा गृहीत्वोपदिशत्ययं गौरिति। न चास्मा आचष्ट इयमस्य संज्ञेति भवति चास्य संप्रत्ययः। तत्रैतत्स्यात्कृतः पूर्वैरभिसंबन्ध इति। इहापि कृतः पूर्वैरभिसंबन्धः। कैः। आचार्यैः। तत्रैतत्स्यात्। यस्मै तर्हि संप्रत्युपदिशति तस्याकृत इति। लोकेऽपि हि यस्मै संप्रत्युपदिशति तस्याकृतः। अथ तत्र कृत इहापि कृतो द्रष्टव्यः॥

**सतो वृद्ध्यादिषु संज्ञाभावात्तदाश्रय इतरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः ॥८॥**

सतः संज्ञिनः संज्ञाभावात्तदाश्रये संज्ञाश्रये संज्ञिनि वृद्ध्यादिष्वितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः। केतरेतराश्रयता। सतामादैचां संज्ञया भवितव्यं संज्ञया चादैचो भाव्यन्ते तदितरेतराश्रयं भव-

---

सूत्र घालण्याचा यत्न करणें हें अस्थानीं आहे; कारण लोकांमध्यें असल्या बाबतींत कोणी विशिष्ट यत्न करीत नाहीं. आणि ही बाबत लौकिक बाबतींतलीच आहे. जर ही बाबत लोकांतल्यापेक्षां निराळी असती तर यत्न करणें योग्य होतें. लोकांमध्यें असें दिसतें की ज्याला बैल माहीत नाहीं त्याला दुसरा एखादा मनुष्य बैलाच्या मांडीला किंवा कानाला धरून पढवतो की हा बैल आहे, पण त्याला 'बैल हें या पिंडाचें नांव आहे' असें कधीं सांगत नाहीं. तरी बैल ही संज्ञा आहे असें त्या माणसाला आपोआपच कळतें.

पण तेथें पूर्वीच्या लोकांनीं बैल या शब्दानें दाखविल्या जाणाऱ्या पिंडाचा व बैल या संज्ञेचा संबंध जोडलेला असेलच.

तर मग प्रस्तुत ठिकाणींही पूर्वीच्या लोकांनीं संबंध जोडलेलाच आहे.

पूर्वीच्या कोणत्या लोकांनीं ?

पूर्वीच्या व्याकरणाचार्यांनीं.

पण इतकें सगळें जरी झालें तरी त्यांत एवढें म्हणतां येईल की ज्याला सध्या वृद्धि वगैरे संज्ञेचा बोध करून द्यावयाचा त्याला संज्ञा व संज्ञी यांचा संबंध जोडलेला माहीत नाहीं. तेव्हां त्याच्या दृष्टीनें तो न जोडल्यासारखाच आहे.

त्यांत काय आहे ? लोकांमध्यें सुद्धां हल्लीं ज्याला संज्ञेचा बोध करून द्यावयाचा त्याला संज्ञा व संज्ञी यांचा संबंध जोडलेला माहीत नसतोच.

बरें, जर लोकांत संबंध जोडला आहे अशी कल्पना करतां येते असें म्हणावें तर येथेंही तशी कल्पना करणें शक्य आहे असें समजावें.

(वा.८) पूर्वी अस्तित्वांत आलेल्या अशा संज्ञीला संज्ञा लावावयाची असा प्रघात असल्यामुळें त्याच संज्ञाशब्दानें त्याच संज्ञीचें विधान ज्या सूत्रामध्यें केलें आहे अशा 'मृजेर्वृद्धिः' (७।२।११४) इत्यादि सूत्रामध्यें इतरेतराश्रयदोष घेऊन वृद्धि शब्दाचा अर्थ ठरवितां येत नाहीं.

इतरेतराश्रय दोष कोणत्या प्रकारचा ?

आकार व ऐच् हे अस्तित्वांत आल्यावर त्यांना 'वृद्धि' संज्ञा करावयाची, व त्या वृद्धि शब्दानें आकार व ऐच् हे अस्तित्वांत यावयाचे; तेव्हां वृद्धिसंज्ञा ही आकार व ऐच् यांजवर अवलंबून राहते आणि आकार व ऐच् हे वृद्धिसंज्ञेवर अवलंबून राहतात असें होणें हा अन्योन्याश्रय[२०] दोष होय, आणि ज्या ठिकाणीं एकमेकांवर अवलंबून राहणारीं

---

२०. मार्ष्टि इत्यादि उदाहरणामध्यें मृज् धातूच्या ऋकाराला वृद्धि झाली म्हणजे तेथें आकार अस्तित्वांत येणार आणि तो अस्तित्वांत आल्यानंतर त्याला वृद्धिसंज्ञा झाली म्हणजे 'मृजेर्वृद्धिः' (७।२।११४) या सूत्रानें वृद्धि करतां येणार. तेव्हां तेथें त्या दोहोंपैकीं कोणतेंही अगोदर करतां येत नसल्यामुळें मार्ष्टि वगैरे उदाहरणें साधणार नाहींत.

ति । इतरेतराश्रयाणि च कार्याणि न प्रकल्पन्ते । तद्यथा । नौर्नावि बद्धा नेतरेतरत्राणाय भवति । ननु च भो इतरेतराश्रयाण्यपि कार्याणि दृश्यन्ते । तद्यथा । नौः शकटं वहति शकटं च नावं वहति । अन्यदपि तत्र किंचिद्भवति जलं स्थलं वा । स्थले शकटं नावं वहति जले नौः शकटं वहति । यथा तर्हि त्रिविष्टब्धकम् । तत्राप्यन्ततः सूत्रकं भवति । इदं पुनरितरेतराश्रयमेव ॥

**सिद्धं तु नित्यशब्दत्वात् ॥९॥**

सिद्धमेतत् । कथम् । नित्यशब्दत्वात् । नित्याः शब्दाः । नित्येषु शब्देषु सतामादैचां संज्ञा क्रियते न संज्ञयादैचो भाव्यन्ते । यदि तर्हि नित्याः शब्दाः किमर्थं शास्त्रम् ।

**किमर्थं शास्त्रमिति चेन्निवर्तकत्वात्सिद्धम् ॥१०॥**

निवर्तकं शास्त्रम् । कथम् । मृजिरस्मा अविशेषेणोपदिष्टः। तस्य सर्वत्र मृजिबुद्धिः प्रसक्ता । तत्रानेन निवृत्तिः क्रियते । मृजेरक्ङित्सु प्रत्ययेषु मृजिप्रसङ्गे मार्जिः

---

कार्यें उपस्थित होतात त्या ठिकाणीं तीं करतां येणें शक्य होत नाहीं. उदाहरणार्थ, एक नाव दुसऱ्या नावेला जोडली असतां त्या दोन्ही नावा एकमेकींचें रक्षण करूं शकत[२१] नाहींत.

अहो, पण इतरेतराश्रित कार्येंही केव्हां केव्हां झालेलीं दिसतात; उदाहरणार्थ, नाव ही गाडीला वाहून नेते व गाडी ही नावेला वाहून नेते.

पण तेथें नुसती नाव व गाडीच नसतात; पाणी व जमीन या इतर गोष्टीही तेथें असतात.[२२] जागेवर गाडी नावेला वाहून नेते व नाव पाण्यामध्यें गाडीला वाहून नेते. तेव्हां तेथें इतरेतराश्रयदोष येत नाहीं.

तर मग तिकटण्याचा दृष्टांत[२३] घ्या.

पण तेथेंही इतर दुसरें कांहीं नसतें असें नाहीं; तेथें आंतल्या बाजूस दोरा असतो. प्रस्तुत बाबत मात्र इतरेतराश्रयदोषानें युक्त आहे.

(वा.९) विवक्षित गोष्ट ही येथें प्रयत्न केल्याशिवायच घडून येत आहे.

ती कशी ?

शब्द नित्य असल्यामुळें. शब्द हे नित्य आहेत. शब्द नित्य असल्यामुळें मूळपासून अस्तित्वांत असलेल्याच आकार व ऐच् यांना वृद्धिसंज्ञा केली जाते; वृद्धिसंज्ञेनें कांहीं आकार व ऐच् हे उत्पन्न केले जात नाहींत.

पण जर शब्द हे नित्य असतील तर (व्याकरण) शास्त्र कशाकरितां ?

(वा.१०) शास्त्राचा उपयोग निवृत्ति म्हणजे एखादी गोष्ट परतविणें हा.

तो कसा ?

पुढील उदाहरण घ्या. 'मृज्' धातु हा सामान्य रीतीनें धातुपाठामध्यें सांगितला आहे; तेव्हां सर्व ठिकाणीं 'मृज्' हें शब्दरूप प्रचारांत असतें अशी बुद्धि उत्पन्न होते. 'मृजेर्वृद्धिः' (७।२।११४) या सूत्रानें 'मृज्' हें शब्दरूप कांहीं ठिकाणीं परतविलें जातें. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे 'मृजेर्वृद्धिः' या सूत्राचा अर्थ 'कित् व ङित् प्रत्ययाशिवाय

---

२१. जी नाव स्वतः तरून जाण्याला अशक्य असल्यामुळें परतीरावर जाण्याकरतां दुसऱ्या नावेचा आश्रय करते, पण तेथें दुसरी नावही तशीच अशक्य असेल तर त्या दोन्ही नावा परतीराला जात नाहींत.

२२. तात्पर्य, नाव ही आपलें काम करण्याला पाण्यावर अवलंबून असते, गाडीवर अवलंबून नसते. तसेंच गाडी देखील आपलें काम करण्याला जमिनीवर अवलंबून असते, नावेवर अवलंबून नसते, तेव्हां नाव व गाडी या दोहोंना परस्परांचा आश्रय आहे असें म्हणतां येत नाहीं.

२३. तीन लांकडांचीं टोकें एके ठिकाणीं दोरीनें बांधलीं म्हणजे तेथें तीं तीन लांकडें एकमेकांच्या आश्रयानें उभीं राहिलेलीं दिसतात.

साधुर्भवतीति ॥

प्रत्येकं वृद्धिगुणसंज्ञे भवत इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । समुदाये मा भूतामिति ।

**अन्यत्र सहवचनात्समुदाये संज्ञाप्रसङ्गः ॥११॥**

अन्यत्र सहवचनात्समुदाये वृद्धिगुणसंज्ञयोरप्रसङ्गः । यत्रेच्छति सहभूतानां कार्यं करोति तत्र सहग्रहणम् । तद्यथा । सहसुपा [२.१.४]। उभे अभ्यस्तं सहेति ।

**प्रत्यवयवं च वाक्यपरिसमाप्तेः ॥१२॥**

प्रत्यवयवं च वाक्यपरिसमाप्तिर्दृश्यते। तद्यथा। देवदत्तयज्ञदत्तविष्णुमित्रा भोज्यन्तामिति। न चोच्यते प्रत्येकमिति प्रत्येकं च भुजिः परिसमाप्यते। ननु चायमप्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति। तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति । सत्येतस्मिन्दृष्टान्ते यदि तत्र सहग्रहणं क्रियत इहापि प्रत्येकमिति वक्तव्यम् । अथ तत्रान्तरेण सह-

---

इतर प्रत्यय पुढें असतांना मृज् शब्दाच्या ऐवजीं मार्ज शब्द शुद्ध असतो' असा करावयाचा असतो. एकंदरींत शब्द नवे तयार केले जात नाहींत.

'आकार', 'ऐकार' व 'औकार' यांपैकीं प्रत्येकाला वृद्धिसंज्ञा होते व अ, ए व ओ यांपैकीं प्रत्येकाला गुणसंज्ञा होते असें बोलावें.

तें कशाकरितां ?

आकार, ऐकार व औकार या तिघांना मिळून वृद्धिसंज्ञा होऊं नये म्हणून; तसेंच, अकार, एकार व ओकार या तिघांना मिळून गुणसंज्ञा होऊं नये म्हणून.

(वा.११) इतर ज्या ज्या ठिकाणीं समुदायाला संज्ञा करावयाची असते त्या त्या ठिकाणीं सह शब्द घातलेला आढळतो, तसा येथें आढळत नसल्यामुळें या वृद्धि व गुणसंज्ञा समुदायाला होण्याचा संभव नाहीं.ज्या ठिकाणीं समुदायाला कार्य व्हावें असें आचार्य पाणिनींच्या मनांत असतें त्या ठिकाणीं ते 'सह' शब्द घालतात; उदा. 'सह सुपा' (२।१।४), 'उभे अभ्यस्तं सह' (६।१।५) हीं सूत्रें पहा.

(वा.१२) शिवाय, प्रत्येक हा शब्द न उच्चारतां सुद्धां वाक्याचा मुख्य अर्थ वाक्याच्या प्रत्येक अवयवाला पूर्णपणें लागू होत असलेलाही पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, जेव्हां आपण देवदत्त, यज्ञदत्त व विष्णुमित्र हे जेवावयाला घातले जाऊं देत असें वाक्य उच्चारतों त्या वेळीं जरी 'यांपैकीं प्रत्येक' असें आपण म्हणत नसतों तरी पण भोजनक्रिया ही संपूर्णपणें प्रत्येकाला लागू पडते.

असेंच कांहीं नाहीं; कांहीं ठिकाणीं वाक्याचा मुख्य अर्थ सबंध समुदायालाही लागू पडतो. उदाहरणार्थ, 'गर्गांना शंभर होन दंड केला जाऊं दे' हें वाक्य घ्या. येथें जरी गर्ग व शंभर होन या दोन शब्दांपैकीं शंभर होन हा शब्द अर्थाच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचा आहे, कारण राजे लोकांना सोन्याच्या नाण्यांची फार जरूर असते, तरी ते प्रत्येकाला दंड करीत नाहींत, तर सगळ्या गर्गांकडून मिळून शंभर होन दंड वसूल केला जातो. तेव्हां समुदायाला कार्य होतें असें दाखविणाराही दृष्टांत मिळतो. तरी पण समुदायाला कार्य व्हावें या हेतूनें जर 'सह सुपा' (२।१।४), 'उभे अभ्यस्तं सह' (६।१।५) या ठिकाणीं 'सह' शब्द घातलेला दृष्टीस पडतो तर येथेंही प्रत्येकाला कार्य व्हावें या हेतूनें 'प्रत्येकं' शब्द उच्चारावा लागेल.

वरील दोन ठिकाणीं जर 'सह' शब्द न[२४] उच्चारतां सुद्धां समुदायाला कार्य होऊं शकेल,

---

२४. 'उभे अभ्यस्तम्' (६।१।५) या सूत्रामध्यें पाणिनींनी उच्चारला नाहीं. 'सह सुपा'

ग्रहणं सहभूतानां कार्यं भवतीहापि नार्थः प्रत्येकमिति वचनेन ॥

अथ किमर्थमाकारस्तपरः क्रियते ।

**आकारस्य तपरकरणं सवर्णार्थम्**

आकारस्य तपरकरणं क्रियते। किं प्रयोजनम् । सवर्णार्थम् । तपरस्तत्कालस्य [१.१.७०] इति तत्कालानां सवर्णानां ग्रहणं यथा स्यात्। केषाम्। उदात्तानुदात्तस्वरितानाम्। किं च कारणं न स्यात्।

**भेदकत्वात्स्वरस्य ॥१३॥**

भेदका उदात्तादयः। कथं पुनर्ज्ञायते भेदका उदात्तादय इति। एवं हि दृश्यते लोके। य उदात्ते कर्तव्येऽनुदात्तं करोति खण्डिकोपाध्यायस्तस्मै चपेटां ददात्यन्यत्त्वं करोषीति। अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति। भेदकत्वाद्गुणस्येति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। आनुनासिक्यं नाम गुणः। तद्भिन्नस्यापि यथा स्यात्। किं च कारणं

---

तर प्रस्तुत ठिकाणीं सुद्धां 'प्रत्येक' शब्द उच्चारण्याची जरूर नाहीं.

बरें, प्रस्तुत सूत्रांत 'आत्' या शब्दांत तकार पुढें घालून आकाराचें उच्चारण कशाकरितां केलें आहे ?

(वा. १३) आकाराच्या पुढें प्रस्तुत सूत्रांत तकार घातला आहे. त्याचा सवर्ण घेतले जावे हा उपयोग आहे. 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें आकार उच्चारावयास जेवढा वेळ लागतो तेवढ्याच वेळांत उच्चारले जाणारे जे आकाराचे सवर्ण ते घेतले जावे हा तकार घालण्याचा उपयोग.

असे सवर्ण कोणते ?

उदात्त आकार, अनुदात्त आकार व स्वरित आकार.

पण तकार घातल्याशिवाय हे उदात्त, अनुदात्त व स्वरित आकार काय म्हणून घेतले जाऊं नयेत ?

(वा.१३) कारण उदात्त, अनुदात्त व स्वरित हे स्वर अचांच्या भेदाला कारणीभूत होतात; म्हणजे त्या स्वरांमुळें (अचांचे) उदात्त, अनुदात्त व स्वरित असें तीन भेद होतात.[२५]

पण उदात्त वगैरे स्वर हे अचांमध्यें भेद उत्पन्न करतात हें कसें समजतें ?

कां बरें ? लोकांमध्यें असें दृष्टीस पडतें की उदात्त स्वर उच्चारावयाचा असतां त्याच्याऐवजीं जो अनुदात्त स्वर उच्चारतो त्या शिष्याला खंडिकोपाध्याय म्हणजे त्याचे गुरुजी हे 'भलता स्वर उच्चारीत आहेस' असें म्हणून चापटी मारतात.

हा उपयोग आहे खरा, पण—

पण काय ?

'स्वर हे भेद उत्पन्न करतात' म्हणण्याऐवजीं 'गुण हे भेद उत्पन्न करतात' असें म्हटलें पाहिजे !

त्याचा काय उपयोग ?

उदात्त, अनुदात्त वगैरे स्वर हे जसे गुण आहेत, तसा अनुनासिक म्हणजे 'नाकांतून उच्चारण' हाही एक अक्षरांचा गुण आहे. या गुणामुळें साध्या आकाराहून सानुनासिक आकार भिन्न होतो. तेव्हां त्याचेंही 'आत्' असें तपर उच्चारण केल्यामुळें ग्रहण व्हावें हा[२६] उपयोग. पण त्याचें ग्रहण 'त'कार न घातला तरी काय म्हणून नाहीं होणार ?

---

(२।१।४) या सूत्रामध्यें सह शब्द आहे. परंतु त्याचा उपयोग निराळा आहे. 'सह' एवढेंच निराळें सूत्र करून त्या सूत्रानें कांहीं ठिकाणीं सुबंताचा तिङंताबरोबरही समास होत असतो. उदा० पर्यभूषत्.

२५. तेव्हां 'वृद्धिरादैच्' या प्रकृत सूत्रामध्यें पाणिनीनें आकार उदात्तस्वर लावून उच्चारला असें गृहीत धरलें तर अनुदात्त आणि स्वरित आकाराला वृद्धिसंज्ञा होणार नाहीं असा दोष येतो.

२६. तेव्हां प्रकृत सूत्रामध्यें निरनुनासिक आकार पाणिनीनें उच्चारला असें गृहीत धरलें तरी सानुनासिक आकारालाही वृद्धिसंज्ञा होते.

न स्यात्। भेदकत्वाद्गुणस्य। भेदका गुणाः। कथं पुनर्ज्ञायते भेदका गुणा इति। एवं हि दृश्यते लोके। एकोऽयमात्मोदकं नाम तस्य गुणभेदादन्यत्वं भवति। अन्यदिदं शीतमन्यदिदमुष्णमिति। ननु च भो अभेदका अपि गुणा दृश्यन्ते। तद्यथा। देवदत्तो मुण्ड्यपि जट्यपि शिख्यपि स्वामाख्यां न जहाति। तथा बालो युवा वृद्धः वत्सो दम्यो बलीवर्द इति॥ उभयमिदं गुणेषूक्तं भेदका अभेदका इति। किं पुनरत्र न्याय्यम्। अभेदका गुणा इत्येव न्याय्यम्। कुत एतत्। यदयमस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः [७.१.७५] इत्युदात्तग्रहणं करोति। यदि भेदका गुणाः स्युरुदात्तमेवोच्चारयेत्। यदि तर्ह्यभेदका गुणा अनुदात्तादेरन्तोदात्ताच्च यदुच्यते तत्स्वरितादेः स्वरितान्ताश्च प्राप्नोति। नैष दोषः। आश्रीयमाणो गुणो भेदको भवति। तद्य-

---

नाहीं होणार; कारण गुण हे भेद उत्पन्न करतात व त्यामुळें सानुनासिक 'आ' निरनुनासिक 'आ'पेक्षां निराळा असल्यामुळें 'त'कारासहित 'आ'चा उच्चार न केल्यास प्रस्तुत सूत्रांत सानुनासिकाचें ग्रहण होणार नाहीं.

पण स्वराप्रमाणें इतर गुण देखील भेद उत्पन्न करतात हें समजतें कसें ?

लोकांत तसें दृष्टीस पडतें. पाणी हा एकाच स्वरूपाचा एक सामान्य पदार्थ आहे. त्याचे गुणांमुळें निरनिराळे भेद होतात, व लोक म्हणतांना दिसतात की हें गार पाणी निराळें आहे, व हें ऊन पाणी निराळें आहे.

अहो, पण गुणामुळें भेद उत्पन्न होत नाहीं असेंही दृष्टीस पडतें. याचें उदाहरण द्यावयाचें म्हणजे देवदत्तानें जरी मुंडण केलें किंवा जटा वाढवल्या किंवा शेंडी ठेवली तरी तो एकच देवदत्त असतो. त्याचें तिन्ही अवस्थांत देवदत्त हेंच नांव कायम राहतें; त्याप्रमाणेंच लहान, तरुण किंवा म्हातारा घ्या, तो निरनिराळा होत नाहीं; तसेंच खोंड घ्या किंवा गाडीस जोडलेला बैल घ्या किंवा पोळ घ्या, तिघांनाही 'बैल'च म्हणतात.

बरें, आतां गुणासंबंधानें आपण दोन्ही तऱ्हा सांगितल्या की, गुण भेद उत्पन्न करतात, व गुण भेद उत्पन्न करीत नाहींत. यांमध्यें योग्य तऱ्हा कोणती ?

गुण भेद उत्पन्न करीत नाहींत हेंच म्हणणें योग्य आहे.

काय म्हणून ?

कारण 'अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः' (७।१।७५) या सूत्रांत आचार्य पाणिनि 'उदात्त' हा शब्द घालतात. त्यावरून ते सुचवितात की गुणामुळें अचांमध्यें भेद मानूं नये. जर गुण हे भेद उत्पन्न करते तर 'उदात्तः' शब्द उच्चारून 'अनङ् उदात्त होतो' असें सांगण्याऐवजीं 'अनङ्' यांतील अकार उदात्त स्वराचाच उच्चारला असता.

पण 'गुणामुळें भेद मानूं नये' असें म्हटलें तर अनुदात्त स्वर आरंभीं असलेल्या तसेंच शेवटीं उदात्त असलेल्या अशा शब्दांना जीं कार्यें (४।२।४४; ४।३।६७) सांगितलीं आहेत तीं, ज्याच्या आरंभीं स्वरित आहे[२७] अशा, तसेंच ज्याच्या शेवटीं स्वरित आहे[२८] अशा शब्दानें होऊं लागतील.

हा दोष येणार नाहीं. कारण उदात्त वगैरे शब्दानें किंवा निपातनानें[२९] सांगितलेला गुण हा वस्तूमध्यें भेद उत्पन्न करतोच. उदा.

---

२७. किंवा ज्यांत आरंभीं उदात्त आहे अशा. (उ.)

२८. किंवा ज्यांच्या शेवटीं अनुदात्त आहे अशा (उ.)

२९. सूत्रामध्यें शब्द उच्चारतांना त्यांतील ज्या वर्णाला जो योग्य स्वर असेल तो न उच्चारतां निराळाच स्वर त्या वर्णाला पाणिनीनें लाविला असेल तर त्याला निपातन असें म्हणतात.

था। शुक्लमालभेत। कृष्णमालभेत। तत्र यः शुक्ल आलब्धव्ये कृष्णमालभते न हि तेन यथोक्तं कृतं भवति॥ असंदेहार्थस्तर्हि तकारः। ऐजित्युच्यमाने संदेहः स्यात्किमिमावैचावेवाहोस्विदाकारोऽप्यत्र निर्दिश्यत इति। संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति। त्रयाणां ग्रहणमिति व्याख्यास्यामः। अन्यत्रापि ह्ययमेवंजातीयकेषु संदेहेषु न कंचिद्यत्नं करोति। तद्यथा। औतोऽम्शसोः [६.१.९६] इति॥ इदं तर्हि प्रयोजनम्। आन्तर्यतस्त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा मा भूवन्निति। खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः। खट्वा उदकं खट्वोदकम्। खट्वा ईषा खट्वेषा।

---

'शुक्लमालभेत' हें वाक्य किंवा 'कृष्णमालभेत' हें वाक्य घ्या. येथें शुक्ल शब्दानें व कृष्ण शब्दानें गुणाचें उच्चारण केलें आहे म्हणून पांढऱ्या बैलाऐवजीं जो काळा बैल बळी देतो किंवा काळ्या बैलाऐवजीं पांढरा मारतो त्या मनुष्यानें कर्म बरोबर केलें असें होत नाहीं. एकंदरींत प्रकृत सूत्रामध्यें उदात्त वगैरे शब्द नसल्यामुळें गुणामुळें भेद मानतां येत नाहीं. तेव्हां आकारानें सर्व प्रकारच्या आकाराचें आपोआपच ग्रहण होत असल्यामुळें त्याचकरितां तकार उच्चारावयास नको असें सिद्ध झालें.

तर मग निदान संशयनिरसनार्थं तकार येथें उच्चारला आहे असें होऊं द्या. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे तकार न घालतां आ व ऐच् यांचा संधि करून 'ऐच्' पद उच्चारलें म्हणजे संशय येईल की ऐच् म्हणजे केवळ ऐच् शब्द घ्यावयाचा अथवा 'आ' व 'ऐच्' यांचा संधि करून उच्चारलेला ऐच् शब्द घ्यावयाचा व त्या शब्दांत 'आ'-कारही आहे असा अर्थ करावयाचा.

संशय येईल खरा, पण तो नांवालाच संशय येईल; कारण संशयाच्या निरसनार्थं सर्व ठिकाणीं सामान्यतः परिभाषा उपस्थित होतेच.—'संशयस्थलीं विशिष्ट अर्थ व्याख्यानानें करावयाचा, संशय येतो या सबबीवर त्या ठिकाणीं शास्त्र कुचकामाचें ठरवावयाचें नाहीं.' ऐच् या शब्दामध्यें आ व ऐच् पदें आहेत व 'आ'कार, 'ऐ'कार व 'औ'कार हे तिन्ही येथें घ्यावयाचे असें येथें व्याख्यान करूं. असें करणें कांहीं गैरवाजवी मुळींच नाहीं; कारण अशाच प्रकारच्या इतर संशयाच्या ठिकाणीं आचार्य पाणिनि संशय न राहावा म्हणून विशिष्ट यत्न कांहींही करतांना दिसत नाहींत; तेथें संशयनिराकरण व्याख्यानानेंच केलें जातें. उदा० 'औतोम्शसोः'[30] (६।१।९३) सूत्र पाहा.

बरें, तर संशयनिरास हा जर तकार उच्चारण्याचा उपयोग नसेल तर पुढें दिलेला उपयोग समजा. जर तकार घातला नाहीं तर स्थानी तीन मात्रांचे किंवा चार मात्रांचे असल्यास त्यांच्या जागीं आदेशही तीन किंवा चार मात्रांचे होऊं लागतील. ते दोनच मात्रांचे व्हावेत याकरतां तकार घालणें जरूर आहे. उदाहरणें म्हणून पुढें दिलेले शब्द व त्यांचे संधि पाहा.—खट्वा[31] इन्द्रः=खट्वेन्द्रः; खट्वा उदकम्=खट्वोदकम्; खट्वा ईषा=खट्वेषा; खट्वा ऊढा=खट्वोढा; खट्वा एलका=खट्-

---

३०. येथें आ आणि ओ यांमध्यें तकार घालून 'आदोतः' असें पाणिनीनें म्हटलें नाहीं; 'औतः' असें म्हटलें आहे. तरी तेथें एक औकार न घेतां आ आणि ओ असे दोन वर्णच घ्यावयाचे असें व्याख्यानानें ठराविलें जातें.

३१. आकाराच्या दोन मात्रा आणि इकाराची एक मिळून दोन स्थानींच्या तीन मात्रा होतात. खट्वा ईषा वगैरे उदाहरणांमध्यें दोन स्थानींच्या मिळून चार मात्रा होतात.

खट्वा ऊढा खट्वोढा । खट्वा एलका खट्वैलका । खट्वा ओदनः खट्वौदनः । खट्वा ऐतिकायनः खट्वैतिकायनः । खट्वा औपगवः खट्वौपगव इति । अथ क्रियमाणेऽपि तकारे कस्मादेव त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा न भवन्ति । तपरस्तत्कालस्येति नियमात् । ननु तः परो यस्मात्सोयं तपरः । नेत्याह । तादपि परस्तपरः । यदि तादपि परस्तपर ऋदोरप् [६.३.५७] इतीहैव स्यात् यवः स्तवः । लवः पव इत्यत्र न स्यात् । नैष तकारः । कस्तर्हि । दकारः । किं दकारे प्रयोजनम् । अथ किं तकारे । यद्यसंदेहार्थस्तकारो दकारोपि । अथ मुखसुखार्थस्तकारो दकारोऽपि ॥

## [ अदेङ् गुणः* ॥१।१।२॥]
## इको गुणवृद्धी[१] ॥१।१।३॥

वैलका; खट्वा ओदनः=खट्वौदनः; खट्वा ऐतिकायनः=खट्वैतिकायनः; खट्वा औपगवः खट्वौपगवः वगैरे वगैरे.

बरें पण, घातला येथें तकार तरी तीन व चार मात्रांच्या स्थानींच्या ठिकाणीं तीन व चार मात्रांचे आदेश काय म्हणून न होतील ?

कारण तपर वर्ण हा उच्चारणाला आपल्याइतकाच वेळ लागणाऱ्या अशाच आपल्या सवर्णांचें ग्रहण करतो असा नियम[३२] आहे (१।१।७०) म्हणून.

पण 'तपर' शब्दाचा अर्थ 'त' ज्याच्यापुढें घातला असा वर्ण ना ?[३३]

असेंच केवळ नाहीं असें आम्ही म्हणतों. तकाराच्या पुढें असलेला वर्णही 'तपर' उल्लेखिला[३४] जातो.

जर तकाराच्या पुढें असलेला वर्ण असाही 'तपर' शब्दाचा अर्थ समजला तर 'ऋदोरप्' (३।३।५७) या सूत्रानें 'यवः', 'स्तवः' इत्यादि ठिकाणींच 'अप्' प्रत्यय होईल; 'लवः', 'पवः' या ठिकाणीं 'अप्' प्रत्यय होणार[३५] नाहीं.

'ऋदोरप्' या सूत्रांत 'तकार' उच्चारलाच नाहीं.

तर मग कोणता वर्ण उच्चारला आहे ?

'दकार' उच्चारला आहे.

'दकार' उच्चारण्याचा तरी काय उपयोग ?

'तकार' उच्चारण्याचा तरी काय उपयोग ?

'तकार' उच्चारण्याचा उपयोग अर्थाविषयीं संशय[३६] उत्पन्न होऊं नये हा असेल तर दकाराचाही तोच उपयोग. बरें, उच्चारण करतांना मुखांतून सुखानें उच्चारण[३७] व्हावें हा जर तकाराचा उपयोग घेतला तर दकाराचाही तो उपयोग घेतां येईल.

३२. तेव्हां दीर्घ म्हणजे द्विमात्र ऐकाराला व औकारालाच वृद्धिसंज्ञा होते. तसेंच द्विमात्र एकाराला व ओकारालाच गुणसंज्ञा होते. त्रिमात्र किंवा चतुर्मात्र अशा एकार वगैरेंना गुणसंज्ञाच होत नाहीं. त्यामुळें गुण व वृद्धि करतांना त्रिमात्र वगैरे आदेश होत नाहींत.

३३. तेव्हां 'वृद्धिरादैच्' या प्रकृत सूत्रामध्यें ऐकाराच्या मागें तकार घातला आहे. त्या मागच्या तकारामुळें ऐकार दीर्घच घेतला जातो असें कसें म्हणतां येईल ?

३४. तपर या शब्दामध्यें नुसता बहुव्रीहि समासच आहे असें नाहीं तर तेथें पंचमीतत्पुरुष समासही आहे.

३५. ऋदोः या ठिकाणीं ऋत् या तकारापुढें ह्रस्व उकार उच्चारून त्याची ऋदोः ही पंचमी घातली आहे. त्या उकारानें दीर्घ ऊकाराचें ग्रहण न झाल्यामुळें लू, पू या दीर्घ ऊकारान्त धातूंहून अप्प्रत्यय होणार नाहीं.

३६. तकार न घालतां ऋ व उ यांचा संधि करून रोः असें उच्चारलें तर तेथें रेफच उच्चारला आहे काय असा संशय येतो.

३७. मध्यें व्यंजन न घालतां स्वरापुढें दुसरा स्वर उच्चारण्यांत थोडा तरी विशेष प्रकारचा प्रयत्न करावा लागतो. आणि मध्यें व्यंजन घातलें म्हणजे त्या शब्दाचा सुखानें उच्चार करतां येतो.

* अकार, एकार व ओकार या तीन वर्णांना गुणसंज्ञा होते.

१. गुण आणि वृद्धि सांगणाऱ्या शास्त्रामध्यें 'इकः' असें षष्ठ्यन्तपद उपस्थित होतें.

इग्ग्रहणं किमर्थम् ।

इग्ग्रहणमात्संध्यक्षरव्यञ्जननिवृत्त्यर्थम् ॥१॥

इग्ग्रहणं क्रियत आकारनिवृत्त्यर्थं संध्यक्षरनिवृत्त्यर्थं व्यञ्जननिवृत्त्यर्थं च । आकारनिवृत्त्यर्थं तावत् । याता वाता । आकारस्य गुणः प्राप्नोति । इग्ग्रहणान्न भवति ॥ संध्यक्षरनिवृत्त्यर्थम् । ग्लायति म्लायति । संध्यक्षरस्य गुणः प्राप्नोति । इग्ग्रहणान्न भवति ॥ व्यञ्जननिवृत्त्यर्थम् । उम्भिता उम्भितुम् उम्भितव्यम् । व्यञ्जनस्य गुणः प्राप्नोति । इग्ग्रहणान्न भवति ॥ आकारनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नाकारस्य गुणो भवतीति यदयमातोऽनुपसर्गे कः [३.२.३] इति ककारमनुबन्धं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । कित्करण एतत्प्रयोजनं कितीत्याकारलोपो यथा स्यात् । यदि चाकारस्य गुणः स्यात्कित्करणमनर्थकं स्यात् । गुणे कृते द्वयोरकारयोः पररूपेण सिद्धं रूपं स्यात् गोदः कम्बलद इति । पश्यति त्वाचार्यो नाकारस्य गुणो भवतीति ततः

---

या सूत्रांत 'इकः'[२] पद कशाकरितां घातलें आहे ?

(वा. १) आ ए ऐ ओ औ आणि व्यंजनें हे वर्ण गुण आणि वृद्धि या आदेशांचे स्थानी न व्हावेत एवढ्याकरितां 'इकः' पद घातलें आहे. त्यामुळें आकार वगैरे वर्णांना गुण आणि वृद्धि होत नाहींत. त्यांपैकीं आकाराला गुण न होणें हा उपयोग 'याता', 'वाता' या उदाहरणांत दृष्टीस पडतो. 'इकः' पद गाळल्यास या ठिकाणीं 'आ'काराला गुण प्राप्त होतो;[३] पण 'इकः' पदामुळें तो होत नाहीं. संध्यक्षराला गुण न होणें हा उपयोग 'ग्लायति', 'म्लायति' या उदारणांत दृष्टीस पडतो. इकः पद गाळल्यास येथें ऐकाराला गुण प्राप्त होतो; 'इकः' पद घातल्यामुळें तो होत नाहीं. व्यंजनाला गुण न होणें हा उपयोग 'उम्भिता', 'उम्भितुम्' 'उम्भितव्यम्' या उदाहरणांत दृष्टीस पडतो. इकः पद नसल्यास या ठिकाणीं व्यंजनाला गुण प्राप्त होतो; 'इकः' पद घातल्यामुळें तो होत नाहीं.

आकाराला गुणाची निवृत्ति हा उपयोग इक् पदाचा आहे असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं; कारण ज्या अर्थी आचार्य पाणिनि 'आतोनुपसर्गे कः' (३।२।३) या सूत्रांत 'अ' प्रत्ययाला ककार इत्संज्ञक जोडतात त्या अर्थी त्यांच्या सूत्रांच्या मांडणीवरून असें दिसून येतें की आकाराला गुण होत नाहीं.

हें ज्ञापक कसें घेतां येतें ?

क प्रत्ययांत ककार इत् करण्याचा उपयोग 'आतो लोप इटि च' (६।४।६४) या सूत्रानें धातूच्या आकाराचा लोप व्हावा हा आहे. पण जर 'आ'काराला गुण झाला तर 'क'कार इत् करण्याचें कांहीं एक कारण राहणार नाहीं. कारण आकाराला गुण झालेला जो अकार तो व प्रत्ययाचा अकार या दोघांना मिळून पररूप (६।१।९७) अकार होऊन 'गोदः', 'कम्बलदः' वगैरे रूपें सिद्ध होतीलच. तेव्हां आचार्य पाणिनींच्या मनांत असें दिसतें की आकाराला गुण होत नाहीं व म्हणूनच ते क प्रत्ययामध्यें ककार इत्संज्ञक जोडतात. संध्य-

---

२. हें सर्व सूत्रच कशाकरितां केलें आहे असें या प्रश्नाचें तात्पर्य आहे. तथापि गुणवृद्धि हें पद पुढील सूत्रामध्यें अनुवृत्त होत असतें. तेव्हां तें पुढील सूत्रामध्यें उच्चारावें लागणार आहे म्हणून 'इकः' या एका पदाचा येथें उल्लेख केला आहे.

३. सार्वधातुकार्धधातुकयोः (७।४।८४) या गुण सांगणाऱ्या शास्त्रामध्यें इको गुणवृद्धी या परिभाषासूत्रानें इकः असें षष्ठ्यन्तपद उपस्थित होत असल्यामुळें इगंत अंगाला गुण होतो असा त्या शास्त्राचा अर्थ होतो. तेव्हां चेता वगैरे उदाहरणांमध्यें इकार वगैरे इकांना गुण होतो. आकार हा इक् नसल्यामुळें याता वगैरे उदाहरणांमध्यें आकाराला गुण होत नाहीं.

ककारमनुबन्धं करोति ॥ संध्यक्षरनिवृत्त्यर्थेनापि नार्थः । उपदेशसामर्थ्यात्संध्यक्षरस्य गुणो न भविष्यति ॥ व्यञ्जननिवृत्त्यर्थेनापि नार्थः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न व्यञ्जनस्य गुणो भवतीति यदयं जनेर्डं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । डित्करण एतत्प्रयोजनं डितीति टिलोपो यथा स्यात् । यदि व्यञ्जनस्य गुणः स्याड्डित्करणमनर्थकं स्यात् । गुणे कृते त्रयाणामकाराणां पररूपेण सिद्धं रूपं स्यात् उपसरजः मन्दुरज इति । पश्यति त्वाचार्यो न व्यञ्जनस्य गुणो भवतीति ततो जनेर्डं शास्ति ॥ नैतानि सन्ति ज्ञापकानि । यत्तावदुच्यते कित्करणं ज्ञापकमाकारस्य गुणो न भवतीत्युत्तरार्थमेतत्स्यात् । तुन्दशोकयोः परिमृजापनुदोः [३.२.५] इति । यत्तर्हि गापोष्टक् [३.२.८] इत्यनन्यार्थं ककारमनुबन्धं

---

क्षराला गुणाची निवृत्ति होणें हा इक् पदाचा उपयोग आहे असें म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं; कारण त्याला जर गुण होऊं लागला तर त्याचें मूळ उच्चारणच व्यर्थ होईल. तेव्हां उच्चारणाच्या जोरावरच संध्यक्षराला गुण होणार नाहीं. तसेंच व्यंजनाला गुण न होणें हा इक् पदाचा उपयोग आहे असेंही म्हणण्यांत अर्थ नाहीं; कारण ज्या अर्थी जन् धातूहून 'ड' प्रत्यय सांगितला आहे (३।२।९७) त्या अर्थी आचार्य पाणिनींच्या लिहिण्याच्या मोडणीवरूनच अनुमान निघतें की व्यंजनाला गुण होत नाहीं.

हें ज्ञापक म्हणजे अनुमान कसें निघतें ?

'ड'कार इत्संज्ञक करण्याचा उपयोग हा की डकार ज्याचा इत् आहे असा प्रत्यय पुढें असतां मागील 'टि'भागाचा लोप व्हावा. जर व्यंजनाला गुण होईल तर 'ड'कार इत् करणें व्यर्थ होईल. कारण गुण केल्यावर तीन अकारांना पररूप (६।१।९७) होऊन 'उपसरजः', 'मन्दुरजः' वगैरे रूपें सिद्ध होतील. तेव्हां आचार्य पाणिनींचें मत असें दिसतें की व्यंजनाला गुण होत नाहीं, व म्हणूनच ते 'जन्' धातूहून 'ड' प्रत्यय सांगतात.

हीं अनुमानें काढतां येत नाहींत. 'क'कार इत्संज्ञक करण्यावरून अनुमान निघतें की 'आ'काराला गुण होत नाहीं असें जें म्हटलें आहे त्यासंबंधीं येवढेंच सांगतां येईल की जरी 'आतोनुपसर्गे कः' (३।२।३) या सूत्रांत 'क'कार इत्संज्ञक करण्याचें कांहीं कारण नसलें तरी 'तुन्दशोकयोः०'(३।२।५) या पुढील सूत्रांत ककार इत्संज्ञक करण्याचा उपयोग होईल.

तथापि, 'क' प्रत्ययाच्या ककाराचा उपयोग जरी दाखविण्यांत आला तरी 'गापोष्टक्' या सूत्रांतील 'टक्' प्रत्ययामधील ककार इत्संज्ञक करण्याचा दुसरा कांहीं उपयोग दाखवण्यांत येणें शक्य नाहीं.

---

४. ग्लै असा धातूमध्यें मूळ ऐकार धातुपाठामध्यें पाणिनीनें उच्चारला आहे. जर ऐकाराला गुण होऊन एकार होईल तर ग्ले असा एकारान्तच धातु उच्चारला असतां काम भागेल.

५. टेः (६।४।१४३) या सूत्रानें डित् प्रत्यय पुढें असतांना मागील टीचा लोप सांगितला आहे. उपसर उपपद असतांना जन् धातूहून ड प्रत्यय केल्यानंतर जन् धातूमधील अन् या टिभागाचा लोप होऊन उपसरज असा शब्द तयार होतो. टेः या सूत्रानें जरी भसंज्ञकाच्या टीचा लोप सांगितला आहे तरी येथें ड या प्रत्ययाला मुद्दाम टिलोपाकरितां डकार अनुबंध लावल्यामुळें उपसरज येथें भसंज्ञा नसली तरी लोप होतो.

६. नुसता अ असा प्रत्यय सांगण्यानेंच काम भागेल.

७. जन् धातूच्या नकाराला गुणानें अकार आदेश केल्यावर.

८. तुन्दपरिमृजः येथें 'मृजेर्वृद्धिः' (७।२।११४) या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते, तसेंच शोकापनुदः येथें 'पुगन्त०' (७।३।८६) या सूत्रानें गुण प्राप्त होतो. परंतु क हा प्रत्यय कित् असल्यामुळें 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें त्या वृद्धीचा आणि गुणाचा निषेध होतो.

९. गा आणि पा या फक्त दोन धातूंच्या पुढेंच

करोति ॥ यदप्युच्यत उपदेशसामर्थ्यात्संध्यक्षरस्य गुणो न भवतीति यदि यद्यत्संध्यक्षरस्य प्राप्नोति तत्तदुपदेशसामर्थ्याद्बाध्यत आयादयोऽपि तर्हि न प्राप्नुवन्ति । नैष दोषः । यं विधिं प्रत्युपदेशोऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तमेव नासौ बाध्यते । गुणं च प्रत्युपदेशोऽनर्थक आयादीनां पुनर्निमित्तमेव ॥ यदप्युच्यते जनेर्डवचनं ज्ञापकं न व्यञ्जनस्य गुणो भवतीति । सिद्धे विधिरारभ्यमाणो ज्ञापकार्थो भवति । न च जनेर्गुणेन सिध्यति । कुतो ह्येतज्जनेर्गुण उच्यमानोऽकारो भवति नरेकारो वा स्यादोकारो वेति । आन्तर्यतोऽर्धमात्रिकस्य व्यञ्जनस्य मात्रिकोऽकारो भविष्यति । एवमप्यनुनासिकः प्राप्नोति । पररूपेण शुद्धो भविष्यति । एवं तर्हि गमेरप्ययं डो वक्तव्यः । गमेश्च गुण उच्य-

---

तसेंच 'संध्यक्षरांचें उच्चारण ज्या अर्थीं केलें आहे त्या अर्थीं संध्यक्षराला गुण होत नाहीं' असें जें म्हटलें आहे त्यासंबंधीं विचार करावयाचा म्हणजे 'उच्चारणाच्या जोरावर संध्यक्षराला जीं जीं कार्यें येतील त्या त्या सर्वांचा बाध होईल. आणि ग्लै वगैरे धातूंमधील संध्यक्षरांना होणारे जे आय्, आव् आदेश तेही होणार नाहींत असा दोष येईल.'[१०]

हा दोष येत नाहीं. कारण ज्या विधीच्या बाबतींत म्हणजे जो विधि केला असतां संध्यक्षराचें उच्चारण व्यर्थ होतें तो विधि त्या उच्चारणानें बाधित होतो; पण जो विधि होण्याला ऐ, औ हीं निमित्तच आहेत त्या विधीचा संध्यक्षराच्या उच्चारणाच्या जोरावर बाध होत नाहीं. गुणाच्या बाबतींत म्हणजे संध्यक्षराला गुण केला तर संध्यक्षराचें उच्चारण व्यर्थ होतें पण संध्यक्षराला होणाऱ्या आय् वगैरे आदेशांना संध्यक्षर हें निमित्तच होतें.

तसेंच, जन् धातूहून सांगितलेल्या 'ड' प्रत्ययावरून व्यंजनाला गुण होत नाहीं असें अनुमान निघतें म्हणून जें वर सांगितलें आहे त्यासंबंधानें इतकेंच म्हणावयाचें की एखादा विधि सांगितल्याशिवाय इतर तऱ्हेनें आपोआपच काम भागलें असें असतां जर एखादा विधि सांगितला तरच तो विधि व्यर्थ होतो व तो व्यर्थ झाल्यामुळें त्यावरून आचार्यांच्या मनांतल्या एखाद्या गोष्टीविषयीं अनुमान निघतें. 'जन्' धातूहून सांगितलेल्या 'ड' प्रत्ययाची मात्र तशी गोष्ट नाहीं. कारण नकाराला येथें गुण करून आपलें काम भागत नाहीं. असें कां तर जन् धातूच्या नकाराला गुण व्हावयाचा तर तो अकारच कां व्हावा? एकार किंवा ओकार कां होऊं नये?

पण व्यंजनाची अर्धी मात्रा असल्यामुळें एक मात्रेनें युक्त जो अकार तोच त्याला जवळचा असल्यामुळें व्यंजनाला अकारच गुण होईल.

असें जरी झालें व अकारच झाला तरी तो सानुनासिक होईल ना?

कांहीं हरकत नाहीं. दोन अकारांना पररूप होऊन शेवटीं शुद्ध म्हणजे निरनुनासिकच राहील.

पण जरी 'जन्' धातूविषयीं गुणानें काम भागलें तरी 'गम्' धातूहून तोच 'ड' प्रत्यय सांगितला आहे आणि 'गम्' धातूच्या अकाराला गुण केला तर 'अ'कार न होतां

---

हा टक् प्रत्यय सांगितला आहे. तेव्हां सामगः सोमपः या ठिकाणीं धातूमधील आकाराचा लोप (६।४।६४) होणें हाच फक्त उपयोग प्रत्यय कित् करण्याचा संभवतो. गुणाचा किंवा वृद्धीचा निषेध करणें हा उपयोग गा आणि पा या धातूंचा संभवत नाहीं. तेव्हां आकाराला गुण होत नाहीं अशाविषयीं हा टक् प्रत्ययाचा ककार ज्ञापक होईल.

१०. तेव्हां ग्लायति वगैरे उदाहरणें साधणार नाहींत.

**मान आन्तर्यत ओकारः प्राप्नोति । तस्मादिग्ग्रहणं कर्तव्यम् ॥**

**यदीग्ग्रहणं क्रियते द्यौः पन्थाः सः इममित्येतेऽपीकः प्राप्नुवन्ति ।**

## संज्ञया विधाने नियमः ॥२॥

**संज्ञया ये विधीयन्ते तेषु नियमः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । गुणवृद्धिग्रहणसामर्थ्यात् । कथं पुनरन्तरेण गुणवृद्धिग्रहणमिको गुणवृद्धी स्याताम् । प्रकृतं गुणवृद्धिग्रहणमनुवर्तते । क प्रकृतम् । वृद्धिरादैजदेङ्गुण इति । यदि तदनुवर्ततेऽदेङ् गुणो वृद्धिश्चेत्यदेङां वृद्धिसंज्ञापि प्राप्नोति ।**

---

जवळचा म्हणून ओकार होऊं लागेल.[११] एकंदरींत 'इकः' पद सूत्रांत घालणें जरूर आहे.

बरें, पण इकालाच गुण व वृद्धि होतात असें असलें तर 'द्यौः', 'पन्थाः', 'सः', 'इमम्' इत्यादि उदाहरणांत जे औ, आ, अ वगैरे आदेश सांगितले आहेत तेही इकालाच होऊं लागतील. कारण औकाराला आणि आकाराला वृद्धिसंज्ञा आहे व अकाराला[१२] गुणसंज्ञा आहे.

(वा.२) वरील आदेश इकाला होऊं लागतील हा दोष येणार नाहीं; कारण ज्या ठिकाणीं गुण व वृद्धि या संज्ञा उच्चारून गुण किंवा वृद्धि हा आदेश सांगितला असेल तेथें तो आदेश इकालाच होतो असा नियम या सूत्रानें होतो.

तर मग असें सांगावयाला पाहिजे ना?

नको; तसें सांगण्याची जरूर नाहीं.

पण न सांगितल्यास कळेल कसें?

गुण व वृद्धि या पदांच्या उच्चारणाच्या जोरावर.

उच्चारण्याच्या जोरावर म्हणतां पण गुण व वृद्धि हीं पदें व्यर्थ कोठें येत आहेत की त्यांचा जोर आपणांस सांगतां येईल? या सूत्रांत गुण व वृद्धि हीं पदें जरूर घातलीं पाहिजेत. कारण तीं घातल्याशिवाय इकाला गुणवृद्धी होतात हा अर्थ व्हावा कसा?

कां बरें? पूर्वसूत्रांतील गुण व वृद्धि हीं पदें या सूत्रांत अनुवृत्त होतीलच.[१३]

पूर्वसूत्रांत हीं पदें कोठें उच्चारलेलीं आहेत?

'वृद्धिरादैच्' (१।१।१) व 'अदेङ् गुणः' (१।१।२) या सूत्रांमध्यें.

जर वृद्धिरादैच् येथील वृद्धिपद येथें (१।१।३) येतें म्हणावें तर तें 'अदेङ् गुणः' याही सूत्रांत आलें असलें पाहिजे व अकार व एङ् यांना गुणसंज्ञेसारखी वृद्धिसंज्ञाही होऊं लागेल.

तर मग 'वृद्धिरादैच्' या सूत्रांतून जें वृद्धिपद पुढें चालू झालें तें नुसतें चालू झालें नाहीं तर आदैच् या पदाशीं संबद्ध असेंच

---

११. मकाराची नकारासारखीच अर्धी मात्रा असल्यामुळें त्याला दोन मात्रांच्या ए ओ यांपेक्षां अकारच जवळचा आहे. तरी त्या मकाराला ओकार हा स्थानानें जवळचा आहे. कारण मकाराचें ओष्ठस्थान आहे. आणि स्थानानें जवळपणा हा इतरांपेक्षां प्रबल समजला जातो (१।१।५० भाष्य पाहावें). तेव्हां गम् धातूच्या मकाराला गुणानें ओकार झाला तर गुरुतल्पग वगैरे उदाहरणें साधणार नाहींत म्हणून टिलोपाकरितां डकार लावलाच पाहिजे. तेव्हां अर्थातच व्यंजनाला गुण न होण्याविषयीं ज्ञापक येत नाहीं.

१२. द्यौः येथें दिव् शब्दाच्या वकाराला दिव औत् (७।१।८४) या सूत्रानें औकार आदेश होतो तो वकाराला न होतां इकाराला होऊन द्यौः असें साधणार नाहीं. पन्थाः येथें 'पथिमथ्यृ०'(७।१।८५) या सूत्रानें सांगितलेला आकार आदेश पथिन् शब्दाच्या नकाराला न होतां इकाराला होईल. सः येथें इक् नसल्यामुळें 'त्यदादीनामः' (७।२।१०२) या सूत्रानें अकार आदेश मुळींच होणार नाहीं. इमम् येथें त्याच सूत्रानें सांगितलेला अकार आदेश इदम् शब्दाच्या मकाराला न होतां इकाराला होईल.

१३. तेव्हां तेवढ्यानेंच काम भागत असतांना पुन्हां ज्या अर्थीं येथें गुणवृद्धी असें पद घातलें आहे त्या अर्थीं त्याच्या जोरावर गुण व वृद्धि असे शब्द उच्चारून गुणाचें व वृद्धीचें विधान केलें असेल तेथेंच हा नियम लागू होतो असें मानतां येईल.

संबन्धमनुवर्तिष्यते । वृद्धिरादैच् । अदेङ्-गुणो वृद्धिरादैच् । तत इको गुणवृद्धी इति । गुणवृद्धिग्रहणमनुवर्तते । आदैजदेङ्ग्रहणं निवृत्तम् । अथवा मण्डूकगतयोऽधिकाराः । यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः ॥ अथवैकयोगः करिष्यते । वृद्धिरादैजदेङ्-गुणः । तत इको गुणवृद्धी इति । न चैकयोगेऽनुवृत्तिर्भवति ॥ अथवान्यवचनाच्चकाराकरणात्प्रकृतापवादो विज्ञायते यथोत्सर्गेण प्रसक्तस्यापवादो बाधको भवति । अन्यस्याः संज्ञाया वचनाच्चकारस्य चानुकर्षणार्थस्याकरणात्प्रकृताया वृद्धिसंज्ञाया गुणसंज्ञा बाधिका भविष्यति यथोत्सर्गेण प्रसक्तस्यापवादो बाधको भवति ॥ अथवा वक्ष्यत्येतत् । अनुवर्तन्ते च नाम विधयो न चानुवर्तनादेव भवन्ति । किं तर्हि । यत्नाद्भवन्तीति ॥ अथवाभयं

---

चालू झालें आहे असें समजावें. 'वृद्धिरादैच्' हें पहिलें सूत्र. नंतर 'अदेङ् गुणः' या सूत्रांत जें वृद्धिपद आलें तें आदैच् या पदाशीं संबंध पावलेलें असेंच आलें.[१४] (तेव्हां वृद्धिपदाचा अदेङ् या पदाशीं संबंध नसल्यामुळें दोष येत नाहीं.) नंतर 'इको गुणवृद्धी' या सूत्रामध्यें गुण व वृद्धि हीं दोन पदें नुसतींच येतील व अदेङ् आणि आदैच् पदें येण्याचीं थांबतील. अथवा 'अधिकार' म्हणून उच्चारलेलीं पदें हीं मागील सूत्रांतून पुढील सूत्रामध्यें बेडकांसारखीं जातात; म्हणजे ज्याप्रमाणें बेडकें उड्या मारीत मारीत चालतात त्याप्रमाणें 'अधिकार'पदें हीं या सूत्रापासून त्या सूत्रावर उड्या मारीत जातात; म्हणजे केव्हां केव्हां मधील सूत्रांत न शिरतां पुढें उडी मारतात. तेव्हां 'अदेङ् गुणः' या सूत्राला स्पर्श न करतां एकदम वृद्धिपद येथें येईल. अथवा 'वृद्धिरादैजदेङ् गुणः' असें एकच सूत्र करूं व नंतर 'इको गुणवृद्धी' हें दुसरें सूत्र घेऊं म्हणजे 'वृद्धिरादैजदेङ् गुणः' असें सबंध एकच सूत्र झाल्यामुळें वृद्धिशब्दाची अनुवृत्ति अदेङ् गुणः येथें होईल असें म्हणतां येत नाहीं.

अथवा—

अदेङ् गुणः या सूत्रामध्यें वृद्धिपदाची अनुवृत्ति होऊन अ, ए व ओ यांना वृद्धिसंज्ञा प्राप्त झाली तरी त्यांना 'गुण' ही निराळी संज्ञा सांगितल्याकारणानें व ती सांगणाऱ्या सूत्रांत अनुवृत्ति होण्याकरितां 'च' शब्द न घातल्यामुळें असें कळून येईल की प्रकृत 'वृद्धि'-संज्ञेचा गुणसंज्ञा बाध करील.[१५] सामान्यशास्त्रानें सांगितलेल्या कार्याचा अपवादसूत्रानें जसा बाध होतो त्याप्रमाणेंच हें होईल अथवा पुढें (५।२।४) सूत्रकार असें सुचविणार आहेत की कांहीं विधि (म्हणजे विधि सांगणारे शब्द) पुढील सूत्रांत दाखल होतात; पण केवळ दाखल होतात म्हणजे तसें घडून येतें असें नाहीं तर तसें घडून येण्याकरितां यत्न करावा लागतो.[१६] अशा प्रकारचा यत्न येथें[१७] केला नसल्यामुळें अकार व एङ् यांना वृद्धिसंज्ञा होणार नाहीं; तर गुणसंज्ञाच होईल. अथवा

---

१४. तेव्हां आ, ऐ व औ यांना जी पूर्वसूत्रानें वृद्धिसंज्ञा सांगितली आहे तिचाच या सूत्रांत अ, ए व ओ यांस गुणसंज्ञा सांगतांना अनुवाद केला असें होईल. त्यामुळें अ, ए व ओ यांना वृद्धिसंज्ञा होईल हा दोष येत नाहीं.

१५. आतां बाध झाल्यामुळें 'अदेङ् गुणः' या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून वृद्धि या पदाची जी अनुवृत्ति झाली आहे ती व्यर्थ होईल असें समजूं नये. कारण 'इको गुणवृद्धी' या सूत्रामध्यें वृद्धिपदाची अनुवृत्ति होणें हा तिचा उपयोग आहे.

१६. मंडूकप्लुतीनें जे अधिकार चालू होतात त्यांचा मध्यें मुळीं संबंधच होत नाहीं. अथवा सर्वत्र संबंध होतो. परंतु तो फक्त नांवाचा संबंध इतकेंच. त्यापासून कांहीं कार्य होत नाहीं. जेथें कांहीं विशेष यत्न केलेला दृष्टीस पडेल, तेथें मात्र त्याचा संबंध कार्यकारी होतो. मंडूकप्लुतीचीच ही एक तऱ्हा आहे असें समजावें.

१७. अदेङ् गुणः येथें. तेव्हां तेथें वृद्धिपदाचा नुसता संबंध मात्र झाला. परंतु तो कार्यकारी नसल्यामुळें अ, ए, ओ यांना वृद्धिसंज्ञा होत नाहीं.

निवृत्तं तदपेक्षिष्यामहे ॥

किं पुनरयमलोऽन्त्यशेष आहोस्विदलोऽन्त्यापवादः। कथं चायं तच्छेषः स्यात्कथं वा तदपवादः। यद्येकं वाक्यं तच्चेदं च अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति इको गुणवृद्धी अलोऽन्त्यस्येति ततोऽयं तच्छेषः। अथ नाना वाक्यम् अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति इको गुणवृद्धी अन्त्यस्य चानन्त्यस्य चेति ततोऽयं तदपवादः। कश्चात्र विशेषः।

**वृद्धिगुणावलोऽन्त्यस्येति चेन्मिदिपुगन्तलघूपधर्च्छिदृशिक्षिप्रक्षुद्रेष्विग्ग्रहणम् ॥३॥**

वृद्धिगुणावलोऽन्त्यस्येति चेन्मिदिपुगन्तलघूपधर्च्छिदृशिक्षिप्रक्षुद्रेष्विग्ग्रहणं कर्तव्यम्। मिदेर्गुणः [७.३.८२] इक इति वक्तव्यम्।अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति॥ पुगन्तलघूपधस्य गुण इक इति वक्तव्यम्। अनन्त्वाद्धि न प्राप्नोति॥ ऋच्छेर्लिटि गुण इक इति वक्तव्यम्। अनन्त्यत्वाद्धि न

---

प्रस्तुत 'इको गुणवृद्धी' सूत्रांत येण्यापूर्वीच वृद्धिशब्दही थांबतो तसाच गुणशब्दही थांबतो व दोन्ही शब्दांचा येथें म्हणजे प्रस्तुत सूत्रांत आम्ही अध्याहार करूं.

बरें पण, वाक्यार्थ करतांना प्रस्तुत सूत्र हें 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या सूत्राची पुरवणी म्हणून घ्यावें अथवा 'अलोन्त्यस्य' सूत्राचा अपवाद घ्यावें ?

'अलोन्त्यस्य' या सूत्राची पुरवणी म्हणून हें सूत्र समजावयाचें तर तें कसें समजावयाचें अथवा अपवाद म्हणून समजावयाचें असल्यास तें कसें ?

जर तें सूत्र व हें सूत्र मिळून एक वाक्य केलें व 'षष्ठी विभक्ति उच्चारून अमक्याचे जागीं अमुक होतें म्हटलें म्हणजे तें त्या शब्दाच्या शेवटच्या वर्णाला होतें; गुण व वृद्धि हे आदेश शेवटच्या इक् वर्णाला होतात' असा अर्थ केला तर प्रस्तुत सूत्र 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या सूत्राची पुरवणी होतें; पण जर दोन्ही सूत्रांचीं दोन निरनिराळीं वाक्यें केलीं व 'षष्ठी विभक्ति उच्चारून सांगितलेलें कार्य शेवटच्या वर्णाला होतें', 'गुण व वृद्धि हीं कार्यें इकाला होतात; तो इक् शेवटीं असो अथवा नसो' असा अर्थ केला तर प्रस्तुत सूत्र 'अलोन्त्यस्य' या सूत्राचा अपवाद होतें.

दोन्ही अर्थांत फरक काय दिसून येतो ?

(वा. ३) वृद्धि व गुण हे शेवटच्या इक् वर्णाला होतात म्हटलें तर[१८] मिद्, मृज्, पुगन्त धातु, ह्रस्व स्वर ज्यांच्या उपधेला आहेत असे धातु, ऋच्छ, दृश्, क्षिप्र व क्षुद्र यांचे बाबतींत म्हणजे यांना गुण किंवा वृद्धि सांगणाऱ्या सूत्रांत 'इक्' शब्द घालावा लागेल. उदा० 'मिदेर्गुणः' (७।३।८२) या सूत्रांत 'इकः' पद घालावें लागेल. कारण तें न घातल्यास इकार हा शेवटचा वर्ण नसल्यामुळें तेथें ही परिभाषा जाणार नाहीं. त्यामुळें तेथें इकाराला गुण होणार नाहीं. तसेंच 'मृजेर्वृद्धिः' (७।२।११४) या सूत्रांत इकः शब्द उच्चारावा लागेल, न उच्चारल्यास 'ऋ'कार शेवटीं नसल्यामुळें त्याला वृद्धि होणार नाहीं. त्याप्रमाणेंच 'पुगन्तलघूपधस्य च' (७।३।८६) या सूत्रामध्यें 'इकः' शब्द उच्चारावा लागेल. न उच्चारल्यास ऱ्हेपयति, सेधति इत्यादि उदाहरणांमध्यें इक् शेवटीं नसल्यामुळें त्याला गुण होणार नाहीं. त्याप्रमाणेंच 'लिट्' प्रत्यय पुढें असतांना ऋच्छ् धातूला सांगितलेला गुण (७।४।११) घ्या. तेथेंही 'इकः' पद घालावें लागेल; कारण 'इकः' न घातल्यास 'ऋ'कार शेवटीं नसल्यामुळें त्याला गुण होणार नाहीं.

---

१८. गुणवृद्धींसंबंधानें 'इको गुणवृद्धी' हें सूत्र अलोन्त्यस्य सूत्राच्या पुरवणीदाखल आहे असा पक्ष घेतला तर.

प्राप्नोति ॥ ऋदृशोऽङि गुणः [७.४.१६] इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति ॥ क्षिप्रक्षुद्रयोर्गुण इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति ॥

सर्वादेशप्रसङ्गश्चानिगन्तस्य ॥४॥

सर्वादेशश्च गुणोऽनिगन्तस्य प्राप्नोति । याता वाता । किं कारणम् । अलोऽन्त्यस्येति षष्ठी चैव ह्यन्त्यमिकमुपसंक्रान्ता । अङ्गस्येति च स्थानषष्ठी । तद्यदिदानीमनिगन्तमङ्गं तस्य गुणः सर्वादेशः प्राप्नोति । नैष दोषः । यथैव ह्यलोऽन्त्यस्येति षष्ठ्यन्त्यमिकमुपसंक्रान्तैवमङ्गस्येत्यपि स्थानषष्ठी । तद्यदिदानीमनिगन्तमङ्गं तत्र षष्ठ्येव नास्ति कुतो गुणः कुतः सर्वादेशः ॥ एवं तर्हि नायं दोषसमुच्चयः । किं तर्हि । पूर्वापेक्षोऽयं दोषः । ह्यर्थे चायं चः पठितः । मिदिपुगन्तलघूपधर्च्छिदृशिक्षिप्रक्षुद्रेष्विग्ग्रहणं सर्वादेश-

---

त्याप्रमाणेंच 'ऋदृशोङि गुणः' (७।४।१६) सूत्र घ्या. तेथेंही 'इकः' पद घालावें लागेल; कारण तेथेंही ऋकार शेवटीं नसल्यामुळें त्याला गुण होणार नाहीं. तसेंच 'क्षिप्र' व 'क्षुद्र' यांना गुण सांगणाऱ्या सूत्रांतही (६।४।१५६) 'इकः' पद घालावें लागेल. कारण तेथेंही 'इक्' शेवटीं नसल्यामुळें त्याला गुण होणार नाहीं.

(वा.४) तसेंच वृद्धि व गुण हे शेवटच्या इकाला होतात असें म्हटल्यास ज्या धातूंच्या शेवटीं इक् नसतो त्या धातूंच्या बाबतींत 'सार्वधातुकार्ध०' (७।३।८४) या सूत्रानें गुणरूप आदेश सबंध धातूला होऊं लागेल. उदाहरणार्थ 'याता', 'वाता' या ठिकाणीं 'या' व 'वा' या सर्वाला होऊं लागेल.

असें होण्याचें काय कारण ?

कारण पुढें दिल्याप्रमाणें—'अलः अन्त्यस्य' या शब्दांच्या षष्ठीचा संबंध 'इकः' शब्दाशीं होतो व 'शेवटच्या इकाला' असा अर्थ होतो. तेव्हां याता वगैरे उदाहरणांमध्यें त्या दोनही परिभाषांचा कांहीं उपयोग नाहीं. आतां अंगस्य या षष्ठीचा स्थान अर्थ आहे; या कारणानें अंगाला गुण होतो असा अर्थ झाल्यामुळें जें अंग इगन्त नाहीं त्या सर्व अंगाला गुण प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण ज्याप्रमाणें 'अलः', 'अन्त्यस्य' ही षष्ठी 'इकः' पदाकडे गेली त्याप्रमाणें अंगस्य ही स्थानषष्ठीसुद्धां त्या परिभाषांच्या जोरावर 'अन्त्यस्य इकः' या पदाकडेच जाते; व त्यामुळें जें अंग इगन्त नाहीं त्याच्या बाबतींत षष्ठीच उरत नाहीं. तेव्हां त्याला कोठला गुण आणि कोठला सर्वादेश ?

बरें तर, मिद् वगैरे धातूंना गुण सांगण्याऱ्या सूत्रांत इक् पद आणखी घालावें लागणें व अनिगन्त 'या', 'वा' वगैरे धातूंच्या बाबतींत सबंध धातूला आदेश होऊं लागणें हे दोन निरनिराळे दोष म्हणून आम्ही सांगत नाहीं.

तर मग काय तुम्ही सांगतां ?

आम्ही असें म्हणतों की 'सर्वादेशप्रसङ्ग०' हें वार्तिक पूर्ववार्तिकाचा शेष आहे. मिद् वगैरे धातूंना गुण सांगणाऱ्या सूत्रामध्यें इकः असें म्हणावें लागेल असें जें पूर्वीच्या वार्तिकांत सांगितलें आहे तेथें इकः असें म्हटलें नाहीं तर काय होईल तें या वार्तिकांत सांगितलें आहे. तेव्हां पूर्वीच्या वार्तिकांत जें सांगितलें आहे त्याचा हेतु पुढील वार्तिकांत दाखविला आहे. येथें 'च' शब्द 'हि' शब्दाच्या अर्थीं योजिला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'मिदिमृजिपुगन्तलघूपधर्च्छिदृशिक्षिप्रक्षुद्रेष्विग्ग्रहणं सर्वादेशप्रसङ्गो ह्यनिगन्तस्य' अशा तऱ्हेनें अर्थाच्या बाबतींत एकच वार्तिक समजावयाचें, व पुढें दिल्याप्रमाणें अर्थ करावयाचा—गुण व वृद्धि हे

प्रसङ्गो ह्यनिगत्यस्येति । मिदेर्गुण इक इति वचनादन्त्यस्य न । अन्त्यस्येति वचनादिको न । उच्यते च गुणः । स सर्वादेशः प्राप्नोति । एवं सर्वत्र ॥ अस्तु तर्हि तदपवादः ।

**इग्मात्रस्येति चेज्जुसिसार्वधातुकार्धधातुकह्रस्वाद्योर्गुणेष्वनन्त्यप्रतिषेधः ॥५॥**

इग्मात्रस्येति चेज्जुसिसार्वधातुकार्धधातुकह्रस्वाद्योर्गुणेष्वनन्त्यस्य प्रतिषेधो वक्तव्यः । जुसि गुणः । स यथेह भवति अजुहवुः अबिभयुरिति एवमनेनिजुः पर्यवेविषुः अत्रापि प्राप्नोति ॥ सार्वधातुकार्धधातुकयोर्गुणः । स यथेह भवति कर्ता हर्ता नयति तरति भवति एवमीहिता ईहितुमित्यत्रापि प्राप्नोति ॥ ह्रस्वस्य गुणः [७.३.१०८] । स यथेह भवति हेऽग्ने हे वायो इति एवं हेऽग्निचित् हे सोमसुदित्यत्रापि प्राप्नोति ॥ जसि गुणः । स यथेह भवति अग्नयः वायव इति एवमग्निचितः सोमसुत इत्यत्रापि प्राप्नोति ॥ ऋतो ङिसर्वनामस्थानयोर्गुणः । स यथेह भवति कर्तरि कर्तारौ कर्तार इति एवं सुकृति सुकृतौ सुकृत इत्यत्रापि प्राप्नोति ॥ घेर्ङिति [७.३.१११] गुणः । स यथेह भवति अग्नये वायवे

---

शेवटच्या इकाला करावेत असें दोन परिभाषा मिळून सांगितलें आहे. तेव्हां मिद् धातूला सांगितलेला गुण प्रकृत परिभाषेनें इकाला करावा असें सांगितल्यामुळें तो शेवटच्या व्यंजनाला होऊं शकत नाहीं; व अलोन्त्यस्य या परिभाषेनें शेवटच्या वर्णाला करावा असें सांगितलें असल्यामुळें शेवटच्या वर्णाच्या अलीकडील इकाला तो होऊं शकत नाहीं. आणि मिद् धातूंना गुण तर सांगितलाच आहे, तेव्हां सबंध धातूलाच होण्याशिवाय दुसरा मार्ग राहत नाहीं. हीच तऱ्हा बाकीच्या सर्व धातूंच्या बाबतींत समजावी. बरें तर, मग तदपवादपक्ष घ्या. म्हणजे 'इको गुणवृद्धी' हें सूत्र 'अलोन्त्यस्य' या सूत्राचा अपवाद समजा.

(वा.५) जर गुण हा इकाला होतो, तो इक् शेवटीं असो अथवा नसो असें म्हटलें तर जुस् प्रत्यय, सार्वधातुक प्रत्यय व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला गुण (७।३।८३,८४) तसाच ह्रस्वाला सांगितलेला गुण (७।३।१०८) व त्यानंतरच्या सूत्रांनीं सांगितलेला गुण या सर्व गुणांचा शेवटीं नसलेल्या इकाच्या बाबतींत प्रतिषेध सांगावा लागेल. जुस् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला गुण (७।३।८३) घ्या. तो ज्याप्रमाणें अजुहवुः, अबिभयुः या ठिकाणीं होत असतो त्याप्रमाणेंच तो अनेनिजुः,पर्यवेविषुः येथेंही शेवटीं नसलेल्या इकाला होऊं लागेल. सार्वधातुक व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला गुण (७।३।८४) घ्या. तो ज्याप्रमाणें 'कर्ता', 'हर्ता', 'नयति', 'तरति', 'भवति' इत्यादि ठिकाणीं होत असतो त्याप्रमाणेंच तो 'ईहिता', 'ईहितुम्' याहि ठिकाणीं इकाला होऊं लागेल. ह्रस्वाला सांगितलेला गुण (७।३।१०८) घ्या. तो ज्याप्रमाणें 'हे अग्ने', 'हे वायो' येथें होतो त्याप्रमाणेंच 'हे अग्निचित्', 'हे सोमसुत' याही ठिकाणीं तकाराच्या मागील इकाला होऊं लागेल. जस् प्रत्यय पुढें असतां सांगितलेला गुण (७।३।१०९) घ्या. तो ज्याप्रमाणें 'अग्नयः', 'वायवः' या ठिकाणीं होतो त्याप्रमाणेंच तो 'अग्निचितः', 'सोमसुतः' याही ठिकाणीं इकाला होऊं लागेल. ङि व सर्वनामस्थान पुढें असतांना ऋकाराला सांगितलेला गुण (७।३।११०) घ्या; तो जसा कर्तरि कर्तारौ कर्तारः या ठिकाणीं होतो त्याप्रमाणेंच सुकृति सुकृतौ सुकृतः याही ठिकाणीं ऋकाराला होऊं लागेल. तसेंच 'घि'संज्ञक शब्दाला ङित् प्रत्यय पुढें

एवमग्निचिते सोमसुत इत्यत्रापि प्राप्नोति ॥ ओर्गुणः [६.४.१४६]। स यथेह भवति बाभ्रव्यः माण्डव्य इति एवं सुश्रुत् सौश्रुत इत्यत्रापि प्राप्नोति ॥ नैष दोषः।

**पुगन्तलघूपधग्रहणमनन्त्यनियमार्थम् ॥६॥**

पुगन्तलघूपधग्रहणमनन्त्यानियमार्थं भविष्यति। पुगन्तलघूपधस्यैवानन्त्यस्य नान्यस्यानन्त्यस्येति ॥ प्रकृतस्यैष नियमः स्यात्। किं च प्रकृतम्। सार्वधातुकार्धधातुकयोरिति। तेन भवेदिह नियमान्न स्यात् ईहिता ईहितुम् ईहितव्यमिति। ह्रस्वाद्योर्गुणस्त्वनियतः सोऽनन्त्यस्यापि प्राप्नोति। अथाप्येवं नियमः स्यात्। पुगन्तलघूपधस्य सार्वधातुकार्धधातुकयोरेवेति। एवमपि सार्वधातुकार्धधातुकयोर्गुणोऽनियतः सोऽनन्त्यस्यापि प्राप्नोति। ईहिता ईहितुम् ईहितव्यमिति। अथाप्युभयतो नियमः स्यात्। पुगन्तलघूपधस्यैव सार्वधातुकार्धधातुकयोः सार्वधातुकार्धधातुकयोरे-

---

असतांना सांगितलेला गुण (७।३।१११) घ्या. तो 'अग्नये', 'वायवे' या ठिकाणीं जसा होतो त्याप्रमाणेंच 'अग्निचिते', 'सोमसुते' याही ठिकाणीं इकाला होऊं लागेल. त्याप्रमाणेंच 'ओर्गुणः' (६।४।१४६) या सूत्रानें उकाराला सांगितलेला गुण घ्या. तो जसा 'बाभ्रव्यः', 'माण्डव्यः' या ठिकाणीं होतो त्याप्रमाणेंच 'सुश्रुत्', 'सौश्रुतः' याही ठिकाणीं तो होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण—

(वा.६) शेवटीं असलेल्या किंवा नसलेल्या सर्वच इकांना गुण होऊं लागल्यास गुण सांगणाऱ्या (७।३।८६) सूत्रांत 'पुगन्त' व 'लघूपध' शब्द घालण्याचें दुसरें कांहीं प्रयोजन न उरल्यामुळें त्या शब्दांचा गुण सांगणाऱ्या सूत्रांत खालील नियम करण्याकरितां उपयोग केला जाईल. जर शेवटीं नसलेल्या वर्णाला गुण प्राप्त झाला तर तो पुगन्त किंवा लघूपध धातूंनाच होतो. इतरांना होत नाहीं.

पण हा असला नियम प्रकृत गुणासंबंधानेंच लागू होईल.

येथें कोणता गुण प्रकृत आहे ?

सार्वधातुक व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना गुण होणें हा प्रकृत आहे.

त्यानें काय होईल ? उदाहरणार्थ ईहिता, ईहितुम्, ईहितव्यम् या ठिकाणीं सार्वधातुकार्धधातुकयोः (७।३।८४) या सूत्रानें प्राप्त झालेला गुण 'पुगन्तलघूपधस्य च' हा नियम समजल्यामुळें होणार नाहीं. पण ह्रस्व स्वराला व इतरांना 'ह्रस्वस्य गुणः' (७।३।१०८) वगैरे सूत्रांनीं जो गुण सांगितला आहे त्याच्या बाबतींत नियम लागू पडत नसल्यामुळें तो शेवटच्याच्या मागील इकालासुद्धां होऊं लागेल; व त्यामुळें अनेक दोष येतील.

शिवाय[१९], 'पुगन्तलघूपधस्य च' हा नियम 'पुगन्त व लघूपध धातूंना जर गुण प्राप्त झाला तर तो सार्वधातुक व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांनाच होतो' असा केला तर सार्वधातुक व आर्धधातुक हे पुढें असतांना होणारा जो गुण तो देखील नियमित होणार नाहीं व तो शेवटच्या वर्णाच्या अगोदरच्या वर्णाला होईल. उदाहरणार्थ 'ईहिता', 'ईहितुम्', 'ईहितव्यम्' हीं रूपें पाहा.

बरें, हे दोष टाळण्याकरितां दोन्ही बाजूंनीं नियम करून 'जर सार्वधातुक व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना अनन्त्याला गुण प्राप्त झाला तर तो पुगन्त व लघूपध धातूंना होतो; व जर पुगन्त व लघूपध धातूंना गुण प्राप्त झाला तर तो सार्वधातुक व आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांनाच होतो' असा अर्थ केला

---

१९. इष्ट नियमच कां करावा, विपरीत नियम कां करूं नये, असा अभिप्राय आहे.

व पुगन्तलघूपधस्येति। एवमप्ययं जुसि गुणोऽनियतः सोऽनन्त्यस्यापि प्राप्नोति। अनेनिजुः पर्यवेविषुरिति॥ एवं तर्हि नायं तच्छेषो नापि तदपवादः। अन्यदेवेदं परिभाषान्तरमसंबद्धमनया परिभाषया। परिभाषान्तरमिति च मत्वा क्रोष्ट्रीयाः पठन्ति। नियमादिको गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेनेति। यदि चायं तच्छेषः स्यात्तेनैव तस्यायुक्तो विप्रतिषेधः। अथापि तदपवाद उत्सर्गापवादयोरप्ययुक्तो विप्रतिषेधः। तत्र नियमस्यावकाशः। राज्ञः क च [४.२.१४०] राजकीयं। इको गुणवृद्धी इत्यस्यावकाशः। चयनम् चायकः लवनम् लावक इति। इहोभयं प्राप्नोति। मेद्यति मार्ष्टीति। इको गुणवृद्धी इत्येतद्भवति विप्रतिषेधेन। नैष युक्तो विप्रतिषेधः। विप्रतिषेधे हि परमित्युच्यते पूर्वश्चायं योगः परो नियमः। इष्टवाची

---

तरी पण जुस् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला गुण (७।३।८३) नियमानें बांधिला जात नाहीं व तो शेवटच्या वर्णाच्या मागील इकाला प्राप्त होतोच. उदा० 'अनेनिजुः', 'पर्यवेविषुः' हीं रूपें पाहा.

बरें तर, प्रस्तुत 'इको गुणवृद्धी' हें सूत्र 'अलोन्त्यस्य' (१।१।५२)सूत्राची पुरवणीही घेवूं नये किंवा त्याचा अपवादही घेऊं नये; हें स्वतंत्रच परिभाषासूत्र आहे, त्याचा 'अलोन्त्यस्य' या परिभाषासूत्राशीं कांहींही संबंध नाहीं असें समजावें. या म्हणण्याला पुरावा म्हणजे हें सूत्र 'अलोन्त्यस्य' या सूत्राशीं अगदीं अलग आहे असें मानून क्रोष्ट्रीय वैयाकरणानीं म्हटलें आहे.

अलोन्त्यस्य या नियमाचा बाध करून विप्रतिषेधानें इकाला गुण व वृद्धि होतात. प्रस्तुत सूत्र जर 'अलोन्त्यस्य' सूत्राची पुरवणी असतें तर दोन्ही सूत्रें मिळून एकच सूत्र झाल्यासारखें होत असल्यामुळें स्वतःचा स्वतःशीं विप्रतिषेध म्हणजे विरोध असणें शक्य होत नाहीं; तसेंच 'अलोन्त्यस्य' या सूत्राचा अपवाद म्हणून प्रस्तुत सूत्र समजलें तर 'अलोन्त्यस्य' हें सूत्र उत्सर्ग म्हणजे साधारण सूत्र झाल्यामुळें व 'इको गुणवृद्धी' हें अपवादसूत्र झाल्यामुळें दोन्ही सारख्या बलाचीं राहत नाहींत व त्यामुळें त्यांच्यामध्यें विप्रतिषेध म्हणजे विरोध आहे असें मानणें योग्य होत नाहीं.

आतां दोन्ही सूत्रें सारख्याच बलाचीं आहेत असें दाखवावयाचें म्हणजे दोहोंनाही स्वतंत्र निरनिराळें चारितार्थ्य दाखविलें पाहिजे. तें असें—'राज्ञः क च' (४।२।१४०) या सूत्रानें साधिलेलें 'राजकीयम्' रूप घ्या. येथें[२०] 'अलोन्त्यस्य' या सूत्राला स्वतंत्र जागा मिळते. 'इको गुणवृद्धी' या सूत्राला 'चयनम्' 'चायकः', 'लवनम्' 'लावकः' या ठिकाणीं स्वतंत्र जागा मिळते[२१]. 'मेद्यति', 'मार्ष्टि' या उदाहरणांत दोन्ही सूत्रें प्राप्त होतात व त्या तुल्यबल दोन सूत्रांपैकीं विप्रतिषेधानें 'इको गुणवृद्धी' सूत्र लागू पडतें.

क्रोष्ट्रीय वैयाकरणानीं येथें विप्रतिषेध दाखविला हा योग्य विप्रतिषेध दाखविला नाहीं; कारण विप्रतिषेध असलेल्या दोन सूत्रांपैकीं पर म्हणजे पुढील सूत्र लागू पडतें असें व्याकरणशास्त्रांत (१।४।२) सांगितलें आहे. प्रस्तुत ठिकाणीं क्रोष्ट्रीय वैयाकरणानीं जें सूत्र लागू पडतें म्हटलें आहे तें 'इको गुणवृद्धी' सूत्र मागें आहे व 'अलोन्त्यस्य' सूत्र पुढें आहे.

पर म्हणजे पुढें असलेलें असा अर्थ 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या सूत्रांतील पर शब्दाचा करावयाचा नाहीं; तर पर म्हणजे जें आपणांस जरूर आहे तें असा

---

२०. येथें गुण किंवा वृद्धि सांगितलीं नसल्यामुळें 'इको गुणवृद्धी' ही प्रकृत परिभाषा उपस्थित होत नाहीं.

२१. येथें अलोन्त्यस्य या परिभाषेचा कांहीं उपयोग नसल्यामुळें त्या परिभाषेची उपस्थिति होत नाहीं.

परशब्दः। विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति। एवमप्ययुक्तो विप्रतिषेधः। द्विकार्ययोगो हि विप्रतिषेधो न चायमेको द्विकार्ययुक्तः। नावश्यं द्विकार्ययोग एव विप्रतिषेधः। किं तर्हि। असंभवोऽपि। स चास्त्यत्रासंभवः। कोऽसावसंभवः। इह तावद्वृक्षेभ्यः प्लक्षेभ्य इत्येकः स्थानी द्वावादेशौ। न चास्ति संभवो यदेकस्य स्थानिनो द्वावादेशौ स्याताम्। इहेदानीं मेद्यति मेद्यतः मेद्यन्तीति द्वौ स्थानिनावेक आदेशः। न चास्ति संभवो यद्द्वयोः स्थानिनोरेक आदेशः स्यादित्येषोऽसंभवः। सत्येतस्मिन्नसंभवे युक्तो विप्रतिषेधः। एवमप्ययुक्तो विप्रतिषेधः। द्वयोर्हि सावकाशयोः समवस्थितयोर्विप्रतिषेधो भवत्यनवकाशश्चायं योगः। ननु चेदानीमेवास्यावकाशः प्रक्लृप्तः। चयनम् चायकः लवनम् लावक इति। अत्रापि नियमः प्राप्नोति। यावता नाप्राप्ते नियमेऽयं योग आरभ्यतेऽतस्तदपवादोऽयं योगो भवति। उत्सर्गापवादयोश्चायुक्तो

अर्थ करावयाचा व असा अर्थ केला असतां 'दोन सारख्या बलाच्या कार्यांमध्यें विरोध आला असतां जें कार्य आपणांस इष्ट आहे तें कार्य होतें' असा 'विप्रतिषेधे०' या सूत्राचा अर्थ समजला जातो.

असा जरी अर्थ समजला तरी येथें विप्रतिषेध आहे असें म्हणणें योग्य होत नाहीं. कारण विप्रतिषेध म्हणजे एकाला दोन कार्यांचा योग; व या ठिकाणीं तर दोन कार्यें ज्याला होत आहेत असा एक स्थानी दृष्टीसच पडत[२२] नाहीं.

'एकाला दोन कार्यें होणें' हा एकच अर्थ विप्रतिषेध शब्दाचा आहे असें नाहीं; तर 'दोन शास्त्रें एका उदाहरणांत प्रवृत्त होऊन त्यांचा असंभव म्हणजे त्या दोहोंनीं सांगितलेल्या गोष्टींचा एकदम स्वीकार करतां न येणें' हाही विप्रतिषेध शब्दाचा अर्थ आहे. अशा तऱ्हेचा असंभव प्रस्तुत ठिकाणीं दृष्टीस पडतो.

येथें कसा तो असंभव दृष्टीस पडतो ?

कां बरें ? 'वृक्षेभ्यः', 'प्लक्षेभ्यः' या उदाहरणांत 'अ'कार हा एकच स्थानी व त्याला 'आ'कार (७।३।१०२) व 'ए'कार (७।३।१०३) हे दोन आदेश प्राप्त होतात. एकाच स्थानीला एकदम दोन्ही आदेश होणें असंभवनीय आहे. 'मेद्यति' 'मेद्यतः' 'मेद्यन्ति' या प्रस्तुत उदाहरणांमध्यें इकार व दकार या दोन स्थानींना एकदम एकच आदेश (गुण) प्राप्त होतो व दोन स्थानींना एकदम एक आदेश होणें हेंही असंभवनीयच आहे. या अशा तऱ्हेचा असंभव प्रस्तुत उदाहरणांत आहे व असंभव असल्यामुळें येथें विप्रतिषेध घेणें योग्यच आहे.

असें जरी झालें तरी सुद्धां येथें विप्रतिषेध समजणें योग्य होत नाहीं; कारण स्वतंत्र तऱ्हेनें ज्यांना उदाहरणें मिळत आहेत अशीं दोन कार्यें एकदम एखाद्या ठिकाणीं प्रवृत्त झालीं असतां विप्रतिषेध होतो. प्रस्तुत सूत्रासंबंधानें म्हणावयाचें म्हणजे त्याला स्वतंत्र उदाहरण दाखवितां येत नाहीं.

पण आतांच ना प्रस्तुत सूत्राला स्वतंत्र स्थळें 'चयनम्' 'चायकः', 'लवनम्' 'लावकः' वगैरे दाखविलीं?

याही ठिकाणीं 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या नियमसूत्राची प्राप्ति आहेच[२३]. आणि ज्या अर्थीं प्रकृत 'इको गुणवृद्धी' हें सूत्र जेथें जेथें लागू पडतें तेथें तेथें 'अलोन्त्यस्य' हें सूत्र प्राप्त होत आहेच; कुठेंही नाहीं असें नाहींच. असें असूनही हें सूत्र आचार्य पाणिनींनीं

२२. तर मेद्यति येथें गुणरूपी एका कार्याचे इकार आणि द्कार असे दोन स्थानी आहेत.

२३. त्याचा उपयोग असो किंवा नसो. अलोन्त्यस्य याची चयनम् वगैरे उदाहरणांमध्यें गुण वगैरे कर्तव्य असतांना प्राप्ति कायमची येत आहे.

विप्रतिषेधः । अथापि कथंचिदिको गुणवृद्धी इत्यस्यावकाशः स्यादेवमपि यथेह विप्रतिषेधादिको गुणो भवति मेद्यति मेद्यतः मेद्यन्ति एवमिहापि स्यात् अनोनिजुः पर्यवेविषुरिति ॥ एवं तर्हि वृद्धिर्भवति गुणो भवतीति यत्र ब्रूयादिक इत्येतत्तत्रोपस्थितं द्रष्टव्यम् । किं कृतं भवति । द्वितीया षष्ठी प्रादुर्भाव्यते । तत्र कामचारो गृह्यमाणेन वेकं विशेषयितुमिका वा गृह्यमाणम् । यावता कामचार इह तावन्मिदि पुगन्तलघूपधर्च्छिदृशिक्षिप्रक्षुद्रेषु गृह्यमाणेनेकं विशेषयिष्यामः । एतेषां य इगिति । इहेदानीं जुसिसार्वधातुकार्धधातुकह्रस्वाद्योर्गुणेष्विका गृह्यमाणं विशेषयिष्यामः । एतेषां गुणो भवतीकः । इगन्तानामिति ॥ अथवा सर्वत्रैवात्र स्थानी निर्दिश्यते । इह तावन्मिदेरित्यविभक्तिको निर्देशः । मिद एः मिदेरिति । अथवा षष्ठीसमासो भविष्यति । मिद

---

केलें आहे त्या अर्थी हें सूत्र 'अलोन्त्यस्य' सूत्राचें अपवादसूत्रच होतें आणि उत्सर्गसूत्र व अपवादसूत्र यांमध्यें विप्रतिषेध आहे असें मानणें योग्य होत नाहीं. बरें, समजा, जरी कसें तरी[२४] 'इको गुणवृद्धी' या सूत्राला स्वतंत्र उदाहरण दाखविलें तरी 'मेद्यति' 'मेद्यतः' 'मेद्यन्ति' या ठिकाणीं विप्रतिषेधानें 'इको गुणवृद्धी' सूत्र लागू पडून 'मिदेर्गुणः' (७।३।८२) या सूत्रानें इकाला गुण होतो तसाच 'अनेनिजुः', पर्यवेविषुः' याही ठिकाणीं 'जुसि च' (७।३।८३) या सूत्रानें गुण होऊं लागेल व तीं रूपें बिघडतील.

बरें तर, 'ज्या ठिकाणीं वृद्धि होते, गुण होतो असें बोललें जाईल त्या ठिकाणीं 'इकः' म्हणजे इकाला हें पद उपस्थित होतें' असा या प्रस्तुत सूत्राचा अर्थ करावा.

असा अर्थ करण्यानें काय केलें जातें ?

गुण व वृद्धि सांगणाऱ्या शास्त्रांमध्यें एक षष्ठ्यन्त शब्द मूळचा असतोच, तेथें त्याच्या जोडीला 'इकः' असा दुसरा षष्ठ्यन्त शब्द या परिभाषेच्या योगानें घेतला जातो व अर्थ करतांना इच्छेनुरूप सूत्रांत प्रत्यक्ष उच्चारलेला शब्द 'इकः' या पदाला विशेषण लाविला जातो किंवा 'इकः' हा शब्द सूत्रांत उच्चारलेल्या शब्दाला विशेषण म्हणून लाविला जातो. आणि इच्छेनुरूप दोन्ही तऱ्हांपैकीं एक तऱ्हा घ्यावयाची असल्यानें 'मद्, सृज्, पुगन्त धातु, लघूपद धातु, ऋच्छ्, दृश्, क्षिप्र व क्षुद्र यांना गुण व वृद्धि सांगणाऱ्या सूत्रांत ज्यांना गुण किंवा वृद्धि सांगितली आहे ते शब्द 'इकः' शब्दाला विशेषण लावूं व 'त्यांचा जो इक् त्याला' असा अर्थ करूं आणि जुस्, सार्वधातुक व आर्धधातुक हे प्रत्यय पुढें असतांना गुण सांगणाऱ्या (७।३।८३) व तसेंच ह्रस्व वगैरेंना गुण सांगणाऱ्या (७।३।१०८) सूत्रांत 'इकः' शब्द ज्यांना गुण सांगितला आहे त्या शब्दांना विशेषण लावूं व इक् असे म्हणजे इगन्त असे जे हे धातु व शब्द त्यांना गुण होतो असा अर्थ करूं.

अथवा दुसरा उपाय म्हणजे या वरील सर्व ठिकाणीं ज्याला गुण किंवा वृद्धि व्हावयाची तो स्थानी त्या सूत्रांतच दाखविला आहे असें समजूं; म्हणजे कोणतीच भानगड राहणार नाहीं. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे उदाहरण म्हणून 'मिदेर्गुणः' (७।३।८२) हें सूत्र घ्या. येथें मिदेः या पदांत 'मिद्' व 'एः' अशीं पदें आहेत व मिद् धातु षष्ठी विभक्ति लावल्याशिवाय उच्चारला आहे.[२५] अथवा मिदाचा जो इ तो मिदि असा षष्ठी तत्पुरुष समास घेऊन त्या 'मिदि'पदाची 'मिदेः' ही षष्ठी घेऊं.

---

२४. चयनम् येथें गुण कर्तव्य असतांना अलोन्त्यस्य या परिभाषेची प्राप्ति येते खरी पण तिचा तेथें कांहीं उपयोग होत नाहीं म्हणून ती प्राप्ति जमेस धरतां येत नाहीं असा अभिप्राय आहे.

२५. 'एः' ही इकाराची षष्ठी आहे. त्याच्याकडे मिद् याचा अन्वय करून मिद् धातूचा अवयव जो इकार त्याला असा अर्थ करतां येईल.

इः मिदिः मिदेरिति ॥ पुगन्तलघूपधस्येति नैवं विज्ञायते पुगन्तस्याङ्गस्य लघूपधस्य चेति। कथं तर्हि। पुक्यन्तः पुगन्तः। लघ्व्युपधा लघूपधा। पुगन्तश्चलघूपधा च पुगन्तलघूपधं पुगन्तलघूपधस्येति। अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्। अङ्गविशेषणे हि सतीह प्रसज्येत भिनत्ति छिनत्तीति। ऋच्छेरपि प्रश्लिष्टनिर्देशोऽयम्। ऋच्छति ऋ ॠ ऋद्‌ताम् ऋच्छत्यृताामिति ॥ दृशेरपि योगविभागः करिष्यते। उरङि गुणः। उराङि गुणो भवति। ततो दृशेः। दृशेश्चाङि गुणो भवति। उरित्येव ॥ क्षिप्रक्षुद्रयोरपि यणादिपरं गुण इतीयता सिद्धम्। सोऽयमेवं सिद्धे सति यत्पूर्वग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमिको यथा स्यादनिको मा भूदिति ॥

अथ वृद्धिग्रहणं किमर्थम्। किं विशे-

तसेंच 'पुगन्तलघूपधस्य च' (७।३।८६) सूत्र घ्या. त्याचा अर्थ पुगन्त अङ्ग व लघूपध अङ्ग यांना गुण होतो असा नाहीं करावयाचा.

तर मग कसा करावयाचा?

'पुगन्त' म्हणजे पुक् पुढें असतांना जो अंत म्हणजे मागील शेवटचा वर्ण व 'लघूपधा' म्हणजे लघु अशी जी उपधा. 'पुगन्तलघूपध' हा समाहारद्वंद्व समास घेऊन पुक् पुढें असतांना शेवटच्या वर्णाला (इग्रूप वर्णाला) तसेंच लघु उपधेला सार्वधातुक अथवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना गुण होतो असा अर्थ करावयाचा. आणि वास्तविक रीतीनें अवश्य हाच अर्थ केला पाहिजे. कारण पुगन्त व लघूपध हे शब्द अङ्गाला विशेषण लावलें तर 'भिनत्ति', 'छिनत्ति' इत्यादि ठिकाणींही गुण होऊं लागेल. तसेंच 'ऋच्छत्यृताम्' (७।४।११) या सूत्रांतही ऋकाराचा प्रश्लेष करावयाचा म्हणजे त्या सूत्रांतील पदें 'ऋच्छति, ऋ ॠ ऋताम्'[२६] अशीं समजावयाचीं. दृश् धातूला होणाऱ्या गुणासंबंधानें व्यवस्था करावयाची म्हणजे 'ऋदृशोऽङि गुणः' (७।४।१६) या एका सूत्राचीं दोन सूत्रें करूं व पहिलें सूत्र 'उरङि[२७] गुणः' करून त्याचा अर्थ ऋकारान्त धातूला अङ् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो असा करूं व नंतर 'दृशः' असें दुसरें सूत्र करूं व त्या 'दृशः' या सूत्रांत पूर्व सूत्रांतून 'उः' हें पद अनुवृत्त होईलच. तेव्हां दृश् धातूच्या ऋकाराला अङ् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो असा अर्थ होईल. 'क्षिप्र' व 'क्षुद्र' शब्दांविषयीं बोलावयाचें म्हणजे त्यांना गुण सांगणाऱ्या 'स्थूलदूर०' (६।४।१५६) या सूत्रांत 'यणादिपरं गुणः' एवढेंच शब्द उच्चारून काम भागत आहे असें असूनही आचार्य पाणिनि 'पूर्वस्य' हा शब्द जो त्या सूत्रांत घालतात त्या पूर्वस्य शब्द घालण्याचा उपयोग इकाला गुण व्हावा, इकाशिवाय दुसऱ्या कोणाला होऊं नये असा आहे.[२८]

बरें, प्रस्तुत सूत्रांत 'वृद्धि' शब्द कशाला घातला आहे?

२६. ऋच्छति या शब्दाचा पहिल्या 'ऋ' या वर्णाबरोबर षष्ठीतत्पुरुष करून त्या 'ऋच्छत्यृ' शब्दाचा ऋ आणि ऋत् याबरोबर द्वंद्व समास करावयाचा, तेव्हां ऋच्छति याचा जो ऋकार त्याला गुण होईल.

२७. उः अङि अशीं पदें आहेत. उः ही ऋ या वर्णाची षष्ठी आहे.

२८. 'स्थूलदूर' या एका सूत्राचीं दोन सूत्रें करावयाचीं. तीं अशीं 'स्थूलदूरयुवह्रस्वानां यणादिपरम्' हें एक आणि दुसरें 'क्षिप्रक्षुद्रयोः पूर्वस्य च गुणः' हें. स्थूल, दूर व युव या तीन शब्दांतील यणादिपर अशा ल, र आणि व या भागाचा लोप झाला म्हणजे मागील उकाराला 'ओर्गुणः' (६।४।१४६) या सूत्रानें गुण होईल. ह्रस्व शब्दाला गुण नकोच आहे. यणादिपर या शब्दाचा अर्थ 'यणाहून जो आदि म्हणजे मागील वर्ण त्याहून पर जो भाग' असा आहे. क्षिप्र, क्षुद्र या शब्दांतील यणाच्या म्ह. रेफाच्या मागील वर्ण पकार आणि दकार त्याच्या पुढील भागाचा म्ह. र या अक्षराचा लोप, आणि त्या पकार व दकार त्याच्या पूर्वीच्या वर्णाला गुण असें होऊन क्षेपिष्ठ व क्षोदिष्ठ हीं रूपें साधतील.

षेण वृद्धिग्रहणं चोद्यते न पुनर्गुणग्रहणमपि। यदि किंचिद्गुणग्रहणस्य प्रयोजनमस्ति वृद्धिग्रहणस्यापि तद्भवितुमर्हति। को वा विशेषः। अयमस्ति विशेषः। गुणविधौ न क्वचित्स्थानी निर्दिश्यते। तत्रावश्यं स्थानिनिर्देशार्थं गुणग्रहणं कर्तव्यम्। वृद्धिविधौ पुनः सर्वत्रैव स्थानी निर्दिश्यते ॥ अचोञ्णिति [७.२.११५]। अत उपधायाः [११६]। तद्धितेष्वचामादेः [११७] इति ॥ अत उत्तरं पठति।

**वृद्धिग्रहणमुत्तरार्थम् ॥७॥**

वृद्धिग्रहणं क्रियत उत्तरार्थम्। क्ङिति [१.१.५] इति प्रतिषेधं वक्ष्यति स वृद्धेरपि यथा स्यात्। कश्चेदानीं क्ङित्प्रत्ययेषु वृद्धेः प्रसङ्गो यावता ञ्णितीत्युच्यते। तच्च मृज्यर्थम्। मृजेर्वृद्धिरविशेषेणोच्यते सा क्ङिति माभूत्। मृष्टः मृष्टवानिति। इहार्थं चापि मृज्यर्थं वृद्धिग्रहणं कर्तव्यम्। मृजेर्वृद्धिरविशेषेणोच्यते सेको यथा स्यादनिको मा भूदिति।

**मृज्यर्थमिति चेद्योगविभागात्सिद्धम् ८**

मृज्यर्थमिति चेद्योगविभागः करि-

---

मुद्दाम 'वृद्धि' शब्दाबद्दलच कां चौकशी चालविली आहे? 'गुण' शब्दाविषयीं कां नाहीं तशीच चौकशी करीत? जर गुण शब्द घालण्याचा कांहीं विशेष उपयोग संभवत असेल तर वृद्धि शब्द घालण्याचाही तोच उपयोग होणें रास्त आहे. दोन्हीमध्यें फरक तो काय असणार?

आहे तर! पुढें दिलेला फरक आहे. गुण सांगणाऱ्या सूत्रांत कांहीं ठिकाणीं (७।३।८३, ८४) स्थानीचा उल्लेख केला नाहीं; तेव्हां ज्या सूत्रांत स्थानी सांगितला नाहीं त्या ठिकाणीं 'इक्' हा स्थानी कळण्यास 'इको गुणवृद्धी' सूत्रांतील 'इको गुणः' एवढा भाग आवश्यक आहे. म्हणजे गुण शब्द घालणें आवश्यक आहे. पण वृद्धि ज्या सूत्रांमध्यें सांगितली आहे त्या सर्व सूत्रांत, उदाहरणार्थ 'अचो ञ्णिति', 'अत उपधायाः', 'तद्धितेष्वचामादेः' (७।२।११५-११७) इत्यादि सूत्रांत अमक्याला वृद्धि होते अशा रीतीनें स्थानी सांगितला असल्यामुळें 'इको गुणवृद्धी' या सूत्रांत वृद्धि शब्दाचा उपयोग नाहीं. हें सर्व लक्षांत घेऊन उत्तरादाखल वार्तिककार वार्तिक करतात—

(वा. ७) प्रस्तुत सूत्रांत 'वृद्धि' शब्द घातला आहे. कशाकरितां? पुढील सूत्राकरितां. पुढील सूत्र 'क्ङिति च' (१।१।५) आहे. त्यामध्यें निषेध सांगावयाचा आहे तो वृद्धीचाही व्हावा याकरितां.

पण ञकार किंवा णकार ज्याचा इत् आहे असाच प्रत्यय पुढें असतांना वृद्धि सांगितली आहे (७।२।११५-११७). तेव्हां ककार किंवा ङकार ज्याचा इत् आहे असा प्रत्यय पुढें असतांना वृद्धि होणें संभवनीयच कसें की ज्याचा प्रतिषेध पुढील सूत्रांत करावा लागेल?

प्रतिषेध करण्याचा उपयोग 'मृज्' धातूकरितां आहे. मृज् धातूला जी वृद्धि सांगितली आहे (७।२।११४) ती विशिष्ट निमित्त उच्चारून सांगितली नाहीं; ती ककार किंवा ङकार ज्याचा इत् आहे असा प्रत्यय पुढें असतांनाही, उदाहरणार्थ, मृष्टः मृष्टवान् या ठिकाणींही, होऊं लागेल. ती न व्हावी याकरितां प्रस्तुत सूत्रांत 'वृद्धि' शब्द पाहिजे. आणि शिवाय पुढील सूत्राकरितां कशाला? या प्रस्तुत सूत्रांतही मृज् धातूच्याकरितां 'वृद्धि' शब्द घालणें जरूर आहे. म्हणजे मृज् धातूला विशिष्ट स्थानी दाखविल्याशिवाय वृद्धि सांगितली आहे, ती मार्ष्टि इत्यादि रूपामध्यें इकालाच झाली पाहिजे, इकाशिवाय इतराला होऊं नये.

(वा.८) मृज् धातूकरितांच प्रस्तुत सूत्रांत वृद्धि शब्द घालणें जरूर आहे. असें असेल

च्यते । मृजेर्वृद्धिरचः । ततोऽञ्णिति । ञ्णिति णिति च वृद्धिर्भवति । अच इत्येव । यद्यचो वृद्धिरुच्यते न्यमार्ट् अटोऽपि वृद्धिः प्राप्नोति ।

**अटि चोक्तम् ॥९॥**

किमुक्तम् । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति ॥

**वृद्धिप्रतिषेधानुपपत्तिस्त्विक्प्रकरणात् ॥१०॥**

वृद्धेस्तु प्रतिषेधो नोपपद्यते । किं कारणम् । इक्प्रकरणात् । इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधो न चैवं सति मृजेरिग्लक्षणा वृद्धिर्भवति । तस्मान्मृजेरिग्लक्षणा वृद्धिरेषितव्या ॥

एवं तर्हीहान्ये वैयाकरणा मृजेरजादौ संक्रमे विभाषा वृद्धिमारभन्ते । परिमृजन्ति परिमार्जन्ति । परिमृजन्तु परिमार्जन्तु । परिममृजतुः परिममार्जतु-

---

तर सूत्रांचा विभाग निराळ्या प्रकारचा केला म्हणजे काम भागेल. 'अचोञ्णिति' सूत्राचे दोन भाग करूं व त्यांतील पहिला भाग पाठीमागील सूत्रांस जोडून 'मृजेर्वृद्धिरचः' असें एक सूत्र करूं, व 'ञ्णिति' असें दुसरें सूत्र करूं. पहिल्या सूत्रानें मृज् धातूच्या अचाला म्ह. ऋकारालाच वृद्धि होईल व दुसऱ्या सूत्रानें जी ञित् किंवा णित् प्रत्यय पुढें असतांना वृद्धि सांगूं, तेथें 'अचः' हें पद मागील सूत्रांतून आणून अचालाच वृद्धि करूं.

जर मृज् धातूच्या अचाला (म्ह. स्वराला) वृद्धि सांगितली तर 'न्यमार्ट्' येथें अडागमाच्या (६।४।७१) अकारालाही ती होऊं लागेल.

(वा.९) अडागमाविषयीं म्हणजे अडागमाला वृद्धि न होण्याविषयीं उपाय सांगितलाच आहे.

कोणता उपाय सांगितला आहे ?

शेवटच्या वर्णाच्या लगतच्या आणि दूरच्या अशा दोन वर्णांना एखादें कार्य एकदम प्राप्त झालें तर शेवटच्या लगतच्यालाच तें होतें,[२९] दूरच्याला होत नाहीं. ह्या साधारण नियमाचा अवलंब करणें हा.

(वा.१०) पण 'मृज्' धातूसंबंधानें वृद्धीचा निषेध घडूं शकत नाहीं. तो काय म्हणून ?

इकाचें प्रकरण चाललें आहे म्हणून. इकाला म्हणून सांगितलेल्या गुणाचा व वृद्धीचा प्रतिषेध 'क्ङिति च' वगैरे सूत्रांत [३०] सांगितला आहे. वरतीं सांगितलेला 'अचो ञ्णिति' सूत्राचा योगविभाग करून अचाला वृद्धि सांगणें वगैरे उपाय योजिले असतां मृज् धातूला सांगितलेली वृद्धि इकाला म्हणून सांगितली अशी होत नाहीं व त्यामुळें तिचा निषेधही होऊं शकणार नाहीं. तो निषेध व्हावा म्हणून 'मृज् धातूला होणारी वृद्धि' ही 'इकाला म्हणून सांगितली आहे' अशी करा व त्याकरितां प्रस्तुत 'इको गुणवृद्धी' सूत्रांत 'वृद्धि'पद ठेवा.

बरें, पण असें असेल तर आम्ही पुढील उत्तर देऊं.—येथें दुसरे कांहीं व्याकरणकर्ते मृज् धातूला अच् ज्याच्या आरंभीं आहे असा जो संक्रम म्हणजे कित् किंवा ङित् प्रत्यय तो पुढें असतांना विकल्पानें वृद्धि करतात व 'परिमृजन्ति', 'परिमार्जन्ति', 'परिमृजन्तु', 'परिमार्जन्तु', 'परिममृजतुः', 'परिममार्जतुः' इत्यादि उदारणें साधतात; आम्हांलाही तीं

---

२९. हा नियम 'ष्यङः संप्रसारणं' (६।१।१३) येथें सांगितला आहे.

३०. असें मानिलें नाहीं तर 'लैगवायन' हा शब्द साधणार नाहीं. लिगु शब्दाच्या पुढें फक् प्रत्यय, त्यांतील फकाराला आयन् आदेश (७।१।२), उकाराला गुण (६।४।१४६), त्याला अव् आदेश (६।१।७८) व इकाराला वृद्धि (७।२।११८) होऊन लैगवायन शब्द सिद्ध होतो. तेथें गुणाचा निषेध होऊं लागेल.

रित्याद्यर्थम् । तदिहापि साध्यम् । तस्मिन्साध्ये योगविभागः करिष्यते । मृजेर्वृद्धिरचो भवति । ततोऽचि क्ङिति । अजादौ च क्ङिति मृजेर्वृद्धिर्भवति । परिमार्जन्ति परिमार्जन्तु । किमर्थमिदम् । नियमार्थम् । अजादावेव क्ङिति नान्यत्र । क्वान्यत्र माभूत् । मृष्टः मृष्टवानिति । ततो वा । वाचि क्ङिति मृजेर्वृद्धिर्भवति । परिमृजन्ति परिमार्जन्ति । परिममृजतुः परिममार्जतुरिति ॥ इहार्थमेव तर्हि सिजर्थं वृद्धिग्रहणं कर्तव्यम् । सिचि वृद्धिरविशेषेणोच्यते । सेको यथा स्यादनिको माभूदिति । कस्य पुनरनिकः प्राप्नोति । अकारस्य । अचिकीर्षीत् अजिहीर्षीत् । नैतदस्ति । लोपोऽत्र बाधको भविष्यति ॥ आकारस्य तर्हि प्राप्नोति । अयासीत् अवासीत् । नास्त्यत्र विशेषः सत्यां वृद्धावसत्यां वा ॥ संध्यक्षरस्य तर्हि प्राप्नोति । नैव संध्यक्षरमन्त्यमस्ति । ननु चेदमस्ति ढलोपे कृते उदवोढाम् उदवो-

साधलींच पाहिजेत. तीं साधण्याकरितां आम्ही पुढें योगविभाग करूं व 'मृजेर्वृद्धिरचः' असें एक सूत्र करूं; नंतर 'अचि क्ङिति' येवढेंच सूत्र करून 'अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना मृज् धातूला वृद्धि होते' असा त्याचा अर्थ करूं व 'परिमार्जन्ति' व 'परिमार्जतुः' वगैरे उदाहरणें साधूं.

हें 'अचि क्ङिति' सूत्र कशाला ? 'मृजेर्वृद्धिरचः' या सूत्रानें नाहीं का काम भागत ?

भागतें; तरी मुद्दाम तें करावयाचें व त्यामुळें नियम समजावयाचाः कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना जर वृद्धि झाली तर ती अजादि असा जो कित् किंवा ङित् प्रत्यय तो पुढें असतांना होते. इतर ठिकाणीं म्हणजे इतर कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना होत नाहीं.

इतर कोणकोणत्या ठिकाणीं व्हावयास नको ?

'मृष्टः', 'मृष्टवान्' इत्यादि ठिकाणीं व्हावयास नको.

या 'अचि क्ङिति' सूत्रानंतर 'वा' असें सूत्र करूं व अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें वृद्धि होते असा त्याचा अर्थ करूं व 'परिमृजन्ति', 'परिमार्जन्ति', 'परिममृजतुः' 'परिममार्जतुः', हीं उदाहरणें साधूं.

बरें, इतका खटाटोप करून 'मृज्' धातूच्या संबंधानें जरी दोष घालविला तरी पुढील प्रयोजनाकरितां म्हणजे सिच् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि (७।२।१) इकाला व्हावी याकरितां प्रस्तुत सूत्रांत 'वृद्धि'पद घालावयास पाहिजे; म्हणजे 'अमुक वर्णाला' असा विशेष कांहीं उल्लेख न करतां मोघमच सिच् पुढें असतांना जी वृद्धि सांगितली आहे ती इकाला होईल; इकाशिवाय इतर स्वराला होणार नाहीं.

बरें पण, कोणत्या इतर स्वराला ती प्राप्त होईल ?

अकाराला. उदाहरणार्थ [३१] 'अचिकीर्षीत्', 'अजिहीर्षीत्' रूपें पाहा.

येथें अकाराला वृद्धि होण्याची शक्यताच नाहीं; कारण अकाराचा लोप (६।४।४८) तिचा बाध करील.

बरें, अकाराला वृद्धि होऊं लागेल; उदाहरणार्थ—अयासीत्, अवासीत् रूपें पाहा.

येथें वृद्धि झाली काय किंवा न झाली काय रूपांत कांहीं फरक पडत नाहीं.

बरें, तर संध्याक्षराला वृद्धि होऊं लागेल.

शक्यच नाहीं. सिच् प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटीं संध्यक्षर असें कधीं सांपडतच नाहीं.

३१. कृ व हृ या धातूंहून सन् प्रत्यय (३।१।७) करून चिकीर्ष, जिहीर्ष असे धातु (३।१।३२) अकारान्त होतात. त्यांचीं लुङ् प्रत्ययाचीं हीं रूपें आहेत.

ढम् उदवोढेति। नैतदस्ति। असिद्धो ढलोपस्तस्यासिद्धत्वान्नैतदन्त्यं भवति॥ व्यञ्जनस्य तर्हि प्राप्नोति। अभैत्सीत् अच्छैत्सीत्। हलन्तलक्षणा वृद्धिर्बाधिका भविष्यति॥ यत्र तर्हि सा प्रतिषिध्यते। अकोषीत् अमोषीत्। सिचि वृद्धेरप्येष प्रतिषेधः। कथम्। लक्षणं हि नाम ध्वनति भ्रमति मुहूर्तमपि नावतिष्ठते। अथवा सिचि वृद्धिः परस्मैपदेष्विति सिचि वृद्धिः प्राप्नोति। तस्या हलन्तलक्षणा वृद्धिर्बाधिका। तस्या अपि नेटीति प्रतिषेधः। अस्ति पुनः क्वचिदन्यत्राप्यपवादे प्रतिषिद्ध उत्सर्गोऽपि न भवति। अस्तीत्याह। सुजाते अश्वसू.

कां बरें ? ढकारांचा लोप केल्यावर 'उदवोढम्',[३२] 'उदवोढाम्' 'उदवोढ' वगैरे उदाहरणांमध्यें ओकार हें संध्यक्षर तसें सांपडतें.

तसें नाहीं, पहिल्या ढकारांचा झालेला लोप वृद्धी-(७।२।१)च्या दृष्टीनें असिद्ध (८।२।१) आहे. तो असिद्ध असल्यामुळें 'ओ'कार शेवटीं आहे असें म्हणतां येत नाहीं.

बरें तर, व्यंजनाला वृद्धि होऊं लागेल. 'अभैत्सीत्'[३३], 'अच्छैत्सीत्' रूपें पाहा.

येथेंही व्यंजनाला वृद्धि होणार नाहीं. कारण 'वदव्रजहलन्तस्याचः' (७।२।३) ही वृद्धि तिचा बाध करील.

बरें, पण ज्या ठिकाणीं 'वदव्रज०' (७।२।३) या वृद्धीचा 'नेटि' (७।२।४) या सूत्रानें निषेध होतो असल्या ठिकाणीं म्हणजे 'अकोषीत्'[३४] 'अमोषीत्', वगैरे उदाहरणांत 'सिचि वृद्धिः०' (७।२।१) या सूत्रानें षकाराला वृद्धि होऊं लागेल.

होणार नाहीं; कारण 'नेटि' (७।२।४) सूत्रानें सांगितलेला निषेध जसा 'वदव्रज०' (७।२।३) या वृद्धीचा आहे तसाच तो 'सिचि वृद्धि०' (७।२।१) याही सूत्रानें सांगितलेल्या वृद्धीचा आहे.

तो कसा ?

तो असा की शास्त्र हें सर्वदा गुणगुणतें[३५] फिरत असतें; तें एका ठिकाणीं क्षणभरही राहत नाहीं, अथवा दुसरीही तऱ्हा घेतां येईल. —प्रथम 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' या सूत्रानें 'अकोषीत्', 'अमोषीत्' या ठिकाणीं वृद्धि प्राप्त होते, तिचा हलन्त धातूला सांगितलेली 'वदव्रज०' ही वृद्धि बाध करते व तिचाही 'नेटि' या सूत्रानें प्रतिषेध होतो. तरी पण 'सिचि वृद्धिः' या उत्सर्गशास्त्राचा 'वदव्रज०' या अपवादशास्त्रानें बाध झाला तो कायमच आहे.

बरें, पण अपवादाचा निषेध झाल्यावर उत्सर्गसूत्र पुन्हा प्रवृत्त होत नाहीं अशाविषयीं दुसरीकडे कोठें दाखला आहे काय ?

---

३२. उत् उपसर्ग आणि अवोढाम् हें क्रियापद आहे. वह् धातु, त्याहून लुङ् प्रत्यय (३।२।११०), त्याच्या स्थानीं प्रथमपुरुषीं द्विवचनाचा तस् प्रत्यय (३।४।७८), त्याला ताम् आदेश (३।४।१०१), मध्यें च्लि प्रत्यय (३।१।४३), त्याला सिच् आदेश (३।१।४४), मागें अट् आगम (६।४।७१), सिच् प्रत्ययाचा लोप (८।२।२६), हकाराला ढकार (८।२।३१), प्रत्ययाच्या तकाराला धकार (८।२।४०), त्याला ष्टुत्वानें ढकार (८।४।४१), पूर्व ढकाराचा लोप (८।३।१३), धातूमधील अकाराला ओकार (६।३।११२) होऊन अवोढाम् हें रूप सिद्ध होतें. उदवोढम् हें मध्यमपुरुष द्विवचनाचें रूप आहे व उदवोढ हें मध्यमपुरुष बहुवचनाचें रूप आहे.

३३. भिद् व छिद् या धातूंचीं लुङाचीं हीं क्रियापदें आहेत. हे धातु अनिट् असल्यामुळें येथें सिच् प्रत्ययाला इट् आगम झाला नाहीं.

३४. कुष् व मुष् धातु सेट् असल्यामुळें येथें सिच् प्रत्ययाला इट् आगम झाला आहे.

३५. जसा एखादा राक्षस ओरडत फिरतो व फिरतांना कांहीं तरी भक्ष्य शोधीत असतो. ओरडण्यांत स्पष्ट शब्द नसल्यामुळें 'याला अमुकच भक्ष्य पाहिजे' असें कांहींच समजत नाहीं. तसेंच 'नेटि' हें वृद्धिनिषेधशास्त्र वृद्धि शोधीत फिरत नुसतें गुणगुणण्यामुळें 'अमुकच वृद्धि' असें कांहींच समजत नाहीं. जी वृद्धि सांपडेल तिला तें धरणारच. एकाच वृद्धीला धरून बसणार नाहीं. फिरण्यानें दुसऱ्याही

नृते । अध्वर्यो अद्रिभिः सुतम् । शुक्रं ते अन्यदिति । पूर्वरूपत्वे प्रतिषिद्धेऽयादयोऽपि न भवन्ति ॥

उत्तरार्थमेव तर्हि सिजर्थं वृद्धिग्रहणं कर्तव्यम् । सिचि वृद्धिरविशेषेणोच्यते सा क्ङिति मा भूत् । न्यनुवीत् न्यधुवीत् । नैतदस्ति प्रयोजनम् । अन्तरङ्गत्वादत्रोवङादेशे कृतेऽनन्त्यत्वाद्वृद्धिर्न भविष्यति । यदि तर्हि सिच्यन्तरङ्गं भवति अकार्षीत् अहार्षीत् गुणे कृते तपरत्वे चानन्त्यत्वाद् वृद्धिर्न प्राप्नोति । मा भूदेवम् । हलन्त्यस्येत्येवं भविष्यति । इह तर्हि न्यस्तारीत् व्यदारीत् गुणे रपरत्वे चानन्त्यत्वाद्वृद्धिर्न प्राप्नोति हलन्तलक्षणायाश्च नेटीति प्रति-

'आहे तर', असें आम्ही म्हणूं. 'सुजाते अश्वसूनृते', 'अध्वर्यो अद्रिभिः सुतम्', 'शुक्रं ते अन्यत्' हीं उदाहरणें घ्या. येथें अय् वगैरे आदेशांचा (६।१।७८) अपवाद जें पूर्वरूप (६।१।१०९) त्याचा बाध (६।१।११५)झाल्यावर जरी अय् वगैरे आदेश प्राप्त झाले तरी ते होत नाहींत.

बरें, 'सिचि वृद्धि०:' या सूत्रानें इकाला वृद्धि होण्याकरितां जरी प्रस्तुत सूत्रांत 'वृद्धि' पद उपयोगी आहे असें म्हणतां आलें नाहीं तरी देखील त्याच 'सिचि वृद्धिः०' या सूत्रामध्यें 'इकः' असें पद उपस्थित होण्याकरितां प्रस्तुत सूत्रांत वृद्धि शब्द घालणें जरूर आहे; म्हणजे ती वृद्धि इकाला म्हणून सांगितली आहे असें होईल. आणि तसें झालें तरच 'क्ङिति' च (१।१।५) या सूत्रानें निषेध होऊन ती 'न्यनुवीत्', न्यधुवीत्'[36] वगैरे उदाहरणांत होणार नाहीं. नाहीं तर 'अमुक प्रकारचा सिच् पुढें असतांना' असें विशेष कांहीं सांगितलें नसल्यामुळें वरील उदाहरणामध्यें ती होऊं लागेल.

हा उपयोग दाखवितां येत नाहीं; कारण, या ठिकाणीं उवङ् आदेश अंतरंग[37] असल्यामुळें. तो वृद्धीचा बाध करून अगोदर होईल व तो झाल्यावर शेवटीं उकार न राहिल्यामुळें उकाराला वृद्धि होऊं शकणार नाहीं.

बरें, वास्तविक पाहतां सिच् प्रत्यय लावून तयार केलेल्या रूपासंबंधीं अंतरंगबहिरंग विचार करावयाचा नसतो, असा सर्वसाधारणनियम असूनही जर 'न्यनुवीत्', 'न्यधुवीत्' या रूपांत तो विचार केला तर 'अकार्षीत्', 'अहार्षीत्' या उदाहरणांतही तो विचार करावा लागेल व तेथें गुण (७।३।८४) केल्यावर व त्या गुणापुढें रेफ जोडल्यावर (१।१।५१) अकार शेवटीं नसल्यामुळें[38] त्याला 'सिचि वृद्धिः०' या सूत्रानें वृद्धि होणार नाहीं.

बरें, नाहीं तर नाहीं झाली; 'वदव्रज०' (७।२।३) या सूत्रानें व्यंजनान्त धातूला होणारी वृद्धि होईल.

बरें, 'अकार्षीत्', 'अहार्षीत्' हीं उदाहरणें जाऊं द्या; 'न्यस्तारीत्', 'व्यदारीत्' हीं उदाहरणें घ्या. या ठिकाणीं गुण केल्यावर, रेफ जोडल्यावर अकार शेवटीं नसल्यामुळें त्याला सिचि वृद्धिः०' या सूत्रानें वृद्धि होणार नाहीं, आणि 'वदव्रज०' या सूत्रानेंही वृद्धि होणार

वृद्धीला धरणारच. एका वृद्धीला धरण्यांत वेळ लागल्यामुळें दुसरी वृद्धि सुटून जाईल असेंही नाहीं. कारण त्याला वेळ मुळींच लागत नाहीं.

३६. नि उपसर्गपूर्वक णू आणि धू या तुदादिगणांतील धातूंचीं लुङाचीं हीं क्रियापदें आहेत. येथें सिच् हा प्रत्यय 'गाङ्कुटादिभ्यो०' (१।२।१) या सूत्रानें ङित् समजला जातो म्हणून 'क्ङिति च' (१।१।५) ह्या सूत्रानें वृद्धीचा निषेध होतो.

३७. अंतरंग व बहिरंग यांतील अंग शब्दाचा निमित्त असा अर्थ आहे. न्यनुवीत् येथें इस् हा इट् आगम झालेला सिच् प्रत्यय उवङ् आदेशाचें (६।४।७७) निमित्त असल्यामुळें उवङ् अंतरंग होय. आणि त्या सिच् प्रत्ययाच्या बाहेरचा ईट् हा परस्मैपदप्रत्यय वृद्धीचा निमित्त असल्यामुळें वृद्धि बहिरंग होय. आणि 'अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र' असिद्ध होतें अशी परिभाषा आहे.

३८. कृ व हृ या धातूंचीं हीं क्रियापदें आहेत. येथें वृद्धीपेक्षां अगोदर अंतरंग गुण केला तर कर् व

षेधः। मा भूदेवम्। ल्रान्तस्य [७.२.२] इत्येवं भविष्यति॥ इह तर्हि अलावीत् अपावीत् गुणे कृतेऽवादेशे चानन्त्यत्वाद् वृद्धिर्न प्राप्नोति हलन्तलक्षणायाश्च नेटीति प्रतिषेधः। मा भूदेवम्। ल्रान्तस्येत्येवं भविष्यति। ल्रान्तस्येत्युच्यते न चेदं र्लान्तम्। ल्रान्तस्येत्यत्र वकारोऽपि निर्दिश्यते। किं वकारो न श्रूयते। लुप्तनिर्दिष्टो वकारः॥ यद्येवं मा भवानवीत् मा भवान्मवीत् अत्रापि प्राप्नोति। अविमव्योर्नेति वक्ष्यामि। तद्वक्तव्यम्।

## णिश्विभ्यां तौ निमातव्यौ।

यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्हि णिश्व्योः प्रतिषेधो न वक्तव्यो भवति। गुणे कृतेऽयादेशे च यान्तानां नेत्येव प्रतिषेधो भविष्यति॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न सिच्य-

---

नाहीं; कारण हलन्त म्हणजे व्यंजनान्त धातूला सांगितलेल्या वृद्धीचा 'नेटि' हा येथें निषेध येतो.

नाहीं तर नाहीं झाली. 'वदव्रज०' (७।२।३) सूत्रानें येथें वृद्धिः अतो ल्रान्तस्य' (७।२।२) या सूत्रानें येथें वृद्धि होईल.

बरें तर, अलावीत्, अयावीत् हीं उदाहरणें घ्या. या ठिकाणीं वृद्धीचा बाध करून अंतरंगत्वास्तव अगोदर गुण व अव् आदेश केल्यावर स्वर शेवटीं नसल्यामुळें 'अचि वृद्धिः' या सूत्रानें वृद्धि होणार नाहीं; व्यंजनान्त धातूला 'वदव्रज०' (७।२।३) या सूत्रानें सांगितलेली वृद्धि होईल तर तिचा 'नेटि' (७।२।४) या सूत्रानें निषेध होतो.

बरें, नाहीं तर नाहीं झाली. या दोन्ही सूत्रांनीं 'वृद्धि; अतो ल्रान्तस्य' (७।२।२) या सूत्रानें येथेंही वृद्धि होईल.

पण त्या सूत्रांत 'लकारान्त व रेफान्त' असें म्हटलें आहे. येथें लकारही शेवटीं नाहीं, किंवा रेफही शेवटीं नाहीं.

'ल्रान्तस्य' या शब्दांत लकार व रेफ यांच्याबरोबर सूत्रकारांनीं वकारसुद्धां उच्चारला आहे.

उच्चारला आहे असें म्हणावें तर तो वकार ऐकूं येत नाहीं कोठें ?

वकार घातला आहे; पण त्याचा लोप (६।१।६६) झाला आहे, म्हणून तो ऐकूं येत नाहीं.

असें जर म्हणावें तर 'मा[३९] भवानवीत्, 'मा भवान् मवीत्' याही उदाहरणांमध्यें वृद्धि होऊं लागेल.

होणार नाहीं; कारण अव् धातू व मव् धातु यांना वृद्धि होत नाहीं असें आम्ही सांगूं.

तर मग अव्, मव् शब्द सूत्रांत (७।२।५) जास्ती घालून तसें उच्चारण करावें लागेल.

हरकत नाहीं: जरी ज्यास्ती शब्द घालून उच्चारण केलें तरी ते ज्यास्ती शब्द न घातल्यासारखेच आहेत; कारण 'णि' व 'श्वि' हे शब्द 'ह्म्यन्तक्षण०' (७।२।५) या सूत्रांत आवश्यक नाहींत. त्यांच्या ऐवजीं 'अव्', 'मव्' शब्द घालतां येतील. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे जरी अव्, मव् शब्द "ह्म्यन्तक्षण०" (७।२।५) सूत्रांत ज्यास्ती घातले तरी 'णि' व 'श्वि' यांचा निषेध त्या सूत्रांत करावयास नकोच; कारण 'णि' व 'श्वि' यांना गुण व अयादेश केल्यावर यकारान्त धातूंना सांगितलेला वृद्धीचा निषेध त्यांना लागू पडेलच.

बरें तर, आम्ही असें म्हणूं की ज्या अर्थीं 'अतो हलादेर्लघोः" (७।२।७) या सूत्रांत आचार्य पाणिनि 'अतः' असा 'अकार'

---

हर् असें होऊन अकार शेवटीं असत नाहीं.

[३९]. येथें माङ् हें अव्यय जोडल्यामुळें आट् आगमाचा (६।४।७२) निषेध (६।४।७४) झाला आहे. नाहीं तर आट् आगम होऊन आवीत् रूप होतें तेथें अव् धातूच्या अकाराला वृद्धि झाली किंवा न झाली यांत कांहींच फरक दिसणार नाहीं. मध्यें भवान् हा शब्द लावला नाहीं तर मावीत् असें होतें तेथेंही वृद्धि झाली किंवा न झाली यांत फरक दिसणार नाहीं. म्हणून भवान् हा शब्द लावला आहे.

न्तरङ्गं भवतीति यदयमतो हलादेर्लघोः [७.२.७] इत्यकारग्रहणं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । अकारग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् अकोषीत् अमोषीत् । यदि सिच्यन्तरङ्गं स्यादकारग्रहणमनर्थकं स्यात् । गुणे कृतेऽलघुत्वाद्वृद्धिर्न भविष्यति । पश्यति त्वाचार्यो न सिच्यन्तरङ्गं भवतीति ततोऽकारग्रहणं करोति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । यत्र गुणः प्रतिषिध्यते तदर्थमेतत्स्यात् न्यकुटीत् न्यपुटीदिति । यत्तर्हि णिश्व्योः प्रतिषेधं शास्ति तेन नेहान्तरङ्गमस्तीति दर्शयति । यच्च करोत्यकारग्रहणं लघोरिति कृतेऽपि ॥

**तस्मादिग्लक्षणा वृद्धिः ॥११॥**

**तस्मादिग्लक्षणा वृद्धिरास्थेया ॥**

---

उच्चारतात त्या अर्थी त्यांच्या मांडणीवरून असें कळून येतें की, सिच् प्रत्यय लावून केलेल्या रूपांच्या कार्यामध्यें अंतरंगबहिरंगविचार करावयाचा नाहीं.

हें कसें कळून येतें हें स्पष्ट सांगाल काय ?

'अतो हलादेर्लघोः' (७।२।७) या सूत्रांत अकार घालण्याचा उपयोग 'अकोषीत्', 'अमोषीत्' वगैरे उदाहरणांमध्यें उकाराला वृद्धि होऊं नये हा आहे. जर सिच्प्रत्ययाच्या रूपांमध्यें अंतरंगबहिरंगविचार होईल तर 'अतो हलादेर्लघोः' (७।२।७) या सूत्रामध्यें अकार घालणें व्यर्थ होईल. कारण गुण (७।३।८६) अंतरंग असल्यामुळें अकोषीत् या उदाहरणामध्यें तो अगोदर होईल व तो झाल्यावर उपधा ही ऱ्हस्व स्वर नसल्यामुळें वृद्धीची प्राप्तिच येणार नाहीं. तेव्हां आचार्य पाणिनींच्या मनांत असें दिसतें की सिचाच्या रूपाविषयीं अंतरंगबहिरंगविचार करावयाचा नसतो, व म्हणूनच ते 'अतो हलादेर्लघोः' या सूत्रांत अकार घालतात.

हें ज्ञापक देतां येत नाहीं. या सूत्रांत अकार घालण्याचा उपयोग आहे.

तो कोणता ?

ज्या ठिकाणीं गुणाचा निषेध केला आहे त्या ठिकाणीं वृद्धि होऊं नये हा उपयोग आहे. उदाहरणार्थ 'न्यकुटीत्', 'न्यपुटीत्' हीं रूपें पाहा.[४०]

बरें, हें ज्ञापक जमलें नाहीं तर न जमलें; दुसरें ज्ञापक देतां येईल. तें असें की 'ह्म्यन्तक्षण' (७।२।५) या सूत्रामध्यें ज्या अर्थी 'णि' आणि 'श्वि' यांना आचार्य पाणिनि वृद्धीचा निषेध सागतात[४१] त्या अर्थी ते सुचवतात की सिचाच्या रूपांविषयीं अंतरंगबहिरंगविचार करावयाचा नसतो. शिवाय 'लघु' शब्द घातलेला असतांही 'अतो हलादेर्लघोः' या सूत्रांत जो 'अकार' घातलेला[४२] आहे त्यावरूनही वरील गोष्ट सूचित होते.

(वा.११) तेव्हां एकंदरींत 'सिचि वृद्धिः' या वृद्धीचा 'क्ङिति च' हा निषेध होण्याकरितां ती वृद्धि इकाला म्हणून सांगितली आहे असें सिद्ध झालें पाहिजे, व तें सिद्ध होण्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें वृद्धि हा शब्द अवश्य ठेवला

---

४०. नि उपसर्गपूर्वक कुट् व पुट् या धातूंचीं लुङाचीं हीं रूपें आहेत. येथें सिच् प्रत्यय ङित् समजला गेल्यामुळें (१।२।१) गुणाचा निषेध (१।१।५) होतो.

४१. जर तेथें अंतरंगबहिरंग विचार असता तर औनयीत् (ऊन+णि) अश्वयीत् या उदाहरणांमध्यें वृद्धीपेक्षां (७।२।१) अगोदर अंतरंगगुण (७।३।८३) व त्याला अय् आदेश (६।१।७८) झाल्यानंतर यकारांत म्हणण्यानेंच वृद्धीचा निषेध झाला असता, तेव्हां अर्थातच त्या सूत्रांत (७।२।५) णि व श्वि हे शब्द व्यर्थ झाले असते.

४२. 'अतो हलादेर्लघोः' (७।२।७) या सूत्रामध्यें अतः असें न म्हणतां नुसता लघुशब्द उच्चारला तर ऱ्हस्व अकारापेक्षां भिन्न असे फक्त इ, उ व ऋ हे तीन वर्ण येतील. आणि चित्, मुष् व नृत् अशा धातूंमध्यें इकार वगैरेंना वृद्धि होईल हा दोष येतो. परंतु येथें अंतरंगगुण (७।३।८६) हा वृद्धीचा बाध करून अगोदर झाला म्हणजे दोष येत नाहीं. आतां

**[४३]षष्ठ्या स्थानेयोगत्वादिग्निवृत्तिः ॥१२॥**

षष्ठ्याः स्थाने योगत्वात्सर्वेषामिकां निवृत्तिः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । दधि मधु । पुनर्वचनमिदानीं किमर्थं स्यात् ।

**अन्यतरार्थं पुनर्वचनम् ॥१३॥**

अन्यतरार्थमेतत्स्यात् । सार्वधातुकार्धधातुकयोर्गुण एवेति ॥

**प्रसारणे च ॥१४॥**

प्रसारणे च सर्वेषां यणां निवृत्तिः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । याता वाता । पुनर्वचनमिदानीं किमर्थं स्यात्

**विषयार्थं पुनर्वचनम् ॥१५॥**

विषयार्थमेतत्स्यात् । वचिस्वपियजादीनां कित्येवेति ॥

**उरण्रपरे च ॥१६॥**

उरण्रपरे च सर्वर्काराणां निवृत्तिः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । कर्तृ हर्तृ ॥

**सिद्धं तु षष्ठ्यधिकारे वचनात् ॥१७॥**

सिद्धमेतत् । कथम् । षष्ठ्यधिकार इमे योगाः कर्तव्याः । एकस्तावत्क्रियते । तत्रैव

---

पाहिजे.

(वा.१२) प्रस्तुत सूत्रांत इकः या पदांतील षष्ठी विभक्ति स्थान याअर्थी घातली असल्यामुळें प्रस्तुत सूत्रानें सर्व ठिकाणच्या इकांचा नाश होऊन त्यांच्या जागीं गुण किंवा वृद्धि होऊं लागतील. उदाहरणार्थ ‘दधि’, ‘मधु’ वगैरे ठिकाणींही गुण किंवा वृद्धि होईल.

असें जर झालें तर ठिकठिकाणीं निरनिराळीं सूत्रें करून गुण होतो, वृद्धि होते, अशा तऱ्हेचे गुण व वृद्धि यांचे विधि आचार्य पाणिनि कां करतात ?

(वा.१३) गुण व वृद्धि या दोहोंपैकीं अमुक एकच व्हावें हें सांगण्याकरितां. उदाहरणार्थ, सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना गुणच होतो, वृद्धि होत नाहीं हें सांगण्याकरितां ‘सार्वधातुकार्धधातुकयोः (७।३।८) असें सूत्र केलें आहे.

(वा.१४) त्याप्रमाणेंच ‘इग्यणः संप्रसारणम्’ (१।१।४५) या सूत्रांतही षष्ठीचा अर्थ स्थानीं असा असल्यामुळें सर्व ठिकाणचे यण् नाहींसे होतील व त्यामुळें ‘याता’, ‘वाता’ याही ठिकाणीं यकार व वकार नाहींसे होतील; आणि त्यांच्या जागीं संप्रसारण होऊं लागेल.

असें जर होऊं लागलें तर पुन्हा निरनिराळ्या सूत्रांनीं संप्रसारण सांगितलें आहे तें कशाकरितां ?

(वा.१५) कोणकोणते संप्रसारणांचे विषय म्हणजे ठराविक जागा तें सांगण्याकरितां. उदाहरणार्थ ‘वचिस्वपियजादीनां किति’ (६।१।१५) हें सूत्र वच्, स्वप्, व यज् वगैरे धातु यांना कित् प्रत्यय पुढें असतांनाच संप्रसारण होतें असें सांगण्याकरितां.

(वा.१६) तसेंच ‘उरण् रपरः’ (१।१।५१) या सूत्रानें सर्व ऋकार नाहींसे होऊं लागतील व त्यामुळें ‘कर्तृ’, ‘हर्तृ’ इत्यादि उदाहरणांमध्येंही ऋकाराचे जागीं अर् होऊं लागेल.

(वा.१७) हें सगळें साधलें जाईल, व कांहीं अडचण राहणार नाहीं.

तें कसें ?

‘षष्ठी स्थानेयोगा’ (१।१।४९) या सूत्रापासून पुढें चाललेला जो षष्ठी अधिकार त्या अधिकारांत हीं सूत्रें घ्यावींत.[४४] तिघांपैकीं

---

न्यकुटीत् या ठिकाणीं गुणाचा निषेध होत असला तरी त्या गुणानें वृद्धीचा बाध केला तो कायमच आहे ही गोष्ट ‘सुजाते अश्वसूनृते’ इत्यादि उदाहरणें दाखवून सिद्धच केली आहे (पृ.९५ का.२ पं.११).

४३. ‘इको गुणवृद्धी’ हें प्रकृत सूत्र स्वतंत्र रीतीनें गुण व वृद्धि सांगणारें आहे असें गृहीत धरून वार्तिककार हा दोष देत आहेत.

४४. तेव्हां षष्ठी विभक्ति उच्चारून गुण किंवा वृद्धि सांगितली असेल तेथें गुण किंवा वृद्धि हे आदेश इकाला करावेत. अशा रीतीनें तेथें फक्त व्यवस्था प्रकृत सूत्रानें केली जाते, हें स्वतंत्र विधायक सूत्र नव्हे. उदाहरणार्थ ‘सार्वधातुकार्धधातुकयोः’ (७।३।८४) येथें अङ्गस्य ही षष्ठी विभक्ति उच्चारली आहे. कारण तें ‘अङ्गस्य’ या अधिकारांत पडलें

इमावपि योगौ षष्ठ्यधिकारमनुवर्तिष्येते ॥ अथवा षष्ठ्यधिकार इमौ योगावपेक्षिष्यामहे ॥ अथवेदं तावदयं प्रष्टव्यः । सार्वधातुकार्धधातुकयोर्गुणो भवतीतीह कस्मान्न भवति । याता वाता । इदं तत्रापेक्षिष्यत इको गुणवृद्धी इति । यथैव तर्हीदं तत्रापेक्षिष्यत एवमिहापि तदपेक्षिष्यामहे । सार्वधातुकार्धधातुकयोरिको गुणवृद्धी इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे तृतीयमाह्निकम् ॥

एक 'उरण् रपरः' (१।१।५१) हें मूळचें त्या अधिकारांत घातलेंच आहे. राहिलेलीं 'इको गुणवृद्धी' (१।१।३) व 'इग्यणः संप्रसारणम्' (१।१।४५) हीं दोन्हीं सूत्रें त्या अधिकारांत अनुवृत्त होतील अथवा षष्ठी या अधिकारांतच हीं दोन्हीं सूत्रें घालूं. अथवा निराळें समाधान म्हणजे पुढें दिल्याप्रमाणें वरील शंकाकारास प्रश्न करावा. सार्वधातुक अथवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना गुण होतो; 'याता', 'वाता' येथें गुण कां होत नाहीं ? 'सार्वधातुकार्धधातुकयोः' (७।३।८४) या सूत्रांत 'इको गुणवृद्धी' या सूत्राचा संबंध होतो म्हणजे इकाला गुण व वृद्धि होतात असा अर्थ घेतला जातो म्हणून. बरें तर, प्रस्तुत 'इको गुणवृद्धी' हें सूत्र जसें तेथें (सार्वधातुकार्धधातुकयोः या ठिकाणीं) घेतलें जातें तसें तें सूत्र येथेंही आम्ही घेऊं व सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांच इकाला करूं.

अशा रीतीनें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणाच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें तिसरें आह्निक समाप्त झालें.

आहे. तसेंच 'इग्यणः संप्रसारणम्' हें सूत्र स्वतंत्र विधायक नव्हे. 'वचिस्वपियजादीनां किति' (६।१।१५) येथें 'वचिस्वपियजादीनाम्' ही षष्ठी विभक्ति उच्चारली आहे तेथें वचि वगैरे धातूंमधील यणाला संप्रसारण होतें अशी व्यवस्था केली जाते. तसेंच उरण् रपरः हें देखील स्वतंत्र विधायक नव्हे. 'ऋत इद्धातोः' (७।१।१००) येथें ऋतः ही षष्ठी विभक्ति उच्चारली आहे तेथें ऋकाराला सांगितलेला इकार हा अण् रपर होतो अशी व्यवस्था केली जाते.

## न धातुलोप आर्धधातुके ॥१।१।४॥

धातुग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । लूञ् लविता लवितुम् । पूञ् पविता पवितुम् ॥ आर्धधातुक इति किमर्थम् । त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति ॥ किं पुनरिदमार्धधातुकग्रहणं लोपविशेषणम् । आर्धधातुकनिमित्ते लोपे सति ये गुणवृद्धी प्राप्नुतस्ते न भवत इति । आहोस्विद्गुणवृद्धिविशेषणमार्धधातुकग्रहणम् । धातुलोपे सत्यार्धधातुकनिमित्ते ये गुणवृद्धी

---

येथें धातु हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

लूञ् -'लविता लवितुम्', पूञ्—'पविता पवितुम्' येथें गुणाचा निषेध न व्हावा म्हणून.

'आर्धधातुके' हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति येथें गुणाचा निषेध न व्हावा म्हणून.

पण काय हो, 'आर्धधातुके' हें लोपाचें विशेषण आहे, म्हणजे 'आर्धधातुक नांवाच्या प्रत्ययांवर अवलंबून धातूच्या अवयवाचा लोप झाला असतां त्या ठिकाणीं प्राप्त झालेला गुण किंवा वृद्धि करूं नये' असा अर्थ समजावयाचा, अथवा गुण व वृद्धि यांचें विशेषण, म्हणजे—'धातूंतील अवयवाचा लोप झाला असतां आर्धधातुक नांवाच्या प्रत्ययांवर अवलंबून प्राप्त झालेला गुण किंवा वृद्धि करूं नये' असा अर्थ समजावयाचा ?

---

१. धातूंतील अवयवाच्या लोपाला कारणीभूत असा आर्धधातुक नांवाचा प्रत्यय पुढें असतां त्या आर्धधातुकाच्या निमित्तानें प्राप्त झालेला जो इकाला गुण किंवा वृद्धि ती होत नाहीं.

२. 'लूञ् छेदने' या धातूहून तृच् प्रत्यय किंवा तुमुन् प्रत्यय, लकाराच्या पुढील ऊकाराला गुण (७।३।८४), त्याच्या पुढील प्रत्ययाला इडागम (७।२।३५) आणि त्याच्या मागील ओकाराला अवादेश (६।१।७८) केल्यानें लविता लवितुम् अशीं रूपें बनतात. त्याचप्रमाणें पविता पवितुम् येथेंही समजावें. 'पूञ् पवने' हा धातु एवढा फरक. येथें प्रत्यय करण्यापूर्वी लूञ् यांतील ञकाराला इत्संज्ञा (१।३।३) व त्याचा लोप (१।३।९) करून उरलेल्या केवळ 'लू' या भागाला धातुसंज्ञा करावयाची. कारण क्रियावाचकाला धातुसंज्ञा (१।३।१) विहित आहे. आणि लुनाति वगैरे कोणत्याही लूधातूपासून बनलेल्या प्रयोगामध्यें ञकारदृष्टि पडत नसून लू एवढाच भाग दिसतो. सबब तें क्रियावाचकत्व ञकाररहित केवळ लू या भागालाच आहे असें ठरतें. तेव्हां येथें धातु हा शब्द नसेल तर 'लोप झाला असतां आर्धधातुक प्रत्ययामुळें येणारा गुण किंवा वृद्धि करूं नये' असा या सूत्राचा अर्थ झाल्यानें वरील उदाहरणामध्यें तृच् वगैरे आर्धधातुक प्रत्ययामुळें त्याच्या मागील ऊकाराला प्राप्त होणाऱ्या गुणाचा निषेध करण्याची पाळी येईल. आणि धातु शब्द घातला असतां 'लूञ्' या ञकारघटित समुदायाला धातुसंज्ञा होत नसल्यामुळें त्यांतील ञकाराचा लोप हा धातूच्या अवयवाचा लोप नव्हे, सबब गुणनिषेध प्रवृत्त होऊं शकत नाहीं. यासाठीं धातु हा शब्द घातला आहे असें समजावें.

३. 'रु शब्दे' यङ् प्रत्यय (३।१।२२), त्याचा लुक् (२।४।७४), द्वित्व (६।१।९), अभ्यासाला गुण (७।४।८२), 'रोरु' याहून लट् प्रत्यय (३।२।१२३), त्याला तिप् आदेश (३।४।७८), मध्यें शप् प्रत्यय (३।१।६८), त्याचा लुक् (२।४।७२), तिप् प्रत्ययाला ईट् आगम (७।३।९४), उत्तरखंडांतील उकाराला गुण (७।३।८४) आणि गुणानें आलेल्या ओकाराला अवादेश (६।१।७८) केल्यानें सदर उदाहरण बनलें आहे. येथें 'आर्धधातुके' हा शब्द न घातला तर यङ् प्रत्ययाचा लुक् हा धात्ववयवाचा लोप झाला असल्यामुळें सार्वधातुक नांवाच्या तिप् प्रत्ययामुळें प्राप्त होणाऱ्या गुणाचा निषेध करावा लागेल. हा दोष टाळण्यासाठीं आर्धधातुक शब्द घातला आहे असें समजावें.

४. सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दाचा त्याच सूत्रांत उच्चारलेल्याशीं अन्वय करावा, अनुच्चारिताशीं करूं नये असा नियम आहे. म्हणून लोपाचें विशेषण होय असें तात्पर्य.

५. पूर्वसूत्रामध्यें इक्पदोपस्थिति ही प्रधान आहे तरी त्या इक्पदोपस्थितीनें संस्कार कोणाला करावयाचा हें दर्शविण्याचें काम गुणवृद्धिपदानें केलें आहे. इक्पदोपस्थितीची सर्व मदार गुणवृद्धीवर अवलंबून असल्यामुळें गुणवृद्धीला प्राधान्य आहे. तेव्हां 'सर्वो हि गुणमुल्लङ्घ्य प्रधानेनैव युज्यते' या

प्राप्नुतस्ते न भवत इति । किं चातः । यदि लोपविशेषणमुपेद्धः प्रेद्धः अत्रापि प्राप्नोति । अथ गुणवृद्धिविशेषणं क्नोपयतीत्यत्रापि प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु । अस्तु लोपविशेषणम् । कथमुपेद्धः प्रेद्ध इति । बहिरङ्गो गुणोऽन्तरङ्गः प्रतिषेधः । आसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । यद्येवं नार्थो धातुग्रहणेन । इह कस्मान्न भवति । लूञ् लविता लवितुम् । आर्धधातुकनिमित्ते लोपे प्रतिषेधो न चैष आर्धधातुकनिमित्तो लोपः ॥ अथवा पुनरस्तु गुणवृद्धिविशेषणम् । ननु चोक्तं क्नोपयतीत्यत्रापि प्राप्नोतीति । नैष दोषः । निपातनात्सिद्धम् । किं निपातनम् । चेले क्नोपेः [३.४.३३] इति ॥

परिगणनं कर्तव्यम् ।

---

या दोन तऱ्हेच्या अर्थामध्यें काय फरक होत आहे ?

जर 'आर्धधातुके' हें लोपाचें विशेषण समजलें तर उपेद्धः, प्रेद्धः येथेंही गुणनिषेध प्राप्त होतो. आणि जर गुण आणि वृद्धि यांचें विशेषण समजलें तर 'क्नोपयति' येथेंही गुणनिषेध प्राप्त होतो.

तुझी इच्छा जशी असेल तसें असो. 'आर्धधातुके' हें लोपाचें विशेषण केलें तर उपेद्धः प्रेद्धः हीं उदाहरणें कशीं साधावयाचीं ?

उपेद्धः, प्रेद्धः येथें धात्वंशनकाराचा लोप प्रथमतः प्राप्त होत असल्यामुळें त्यावर अवलंबून असलेला निषेध अंतरंग आहे आणि मागून येत असल्यामुळें 'आद्गुणः' हा गुण बहिरंग आहे. तेव्हा अंतरंगनिषेधाच्या दृष्टीनें बहिरंगगुण असिद्ध आहे. म्हणून येथें निषेधाची प्रवृत्तिच होणार नाहीं आणि हीं उदाहरणें सिद्ध होतील. शिवाय धातु हा शब्द घातला आहे तो घालावयास नको असा यांत फायदा मिळत आहे.

धातुशब्द न घातला तर लूञ् लविता लवितुं येथें गुणाचा निषेध कां बरें होत नाहीं ?

आर्धधातुक नांवाच्या प्रत्ययामुळें लोप झाला असतां प्रतिषेध प्राप्त होणार आहे. आणि लूञ् येथील ञकाराचा लोप हा तर आर्धधातुकामुळें झालेला नव्हे. म्हणून वरील उदाहरणामध्यें गुणनिषेध होत नाहीं.

किंवा 'आर्धधातुके' हें गुणवृद्धीचें विशेषण मानलें तरी हरकत नाहीं.

पण क्नोपयति येथेंही गुणनिषेध प्राप्त होतो असा दोष पूर्वीं दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. निपातनावरून क्नोपयति हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

'चेले क्नोपेः' (३।४।३३) हें.

ह्या निषेधाच्या उदाहरणाचें परिगणन (मोजणी) करावें. म्हणजे अमुक अमुक धात्ववयवाचा लोप झाल्याठिकाणींच गुणवृद्धि-

---

न्यायानें 'आर्धधातुक' हें गुणवृद्धीचें विशेषण होय असें तात्पर्य.

६. उप किंवा प्र उपसर्गपूर्वक इन्धधातूहून क्त प्रत्यय (३।२।१०२), नकाराचा लोप (६।४।२), प्रत्ययाच्या तकाराला धकार (८।२।४०) व आद्गुणः (६।१।८७) यानें गुण केल्यानें वरील उदाहरणें साधिलीं आहेत. येथें 'आद्गुणः' या गुणाचा निषेध करण्याची पाळी येत आहे. आर्धधातुके हें विशेषण गुणवृद्धींचें केलें म्हणजे हा दोष येत नाहीं. कारण आद्गुणः या सूत्रानें होणारा गुण आर्धधातुक प्रत्याच्या निमित्तानें होणारा नव्हे.

७. क्नूप् धातूहून णिच् (३।१।२६) प्रत्यय पुक् आगम (७।३।३६) व यकाराचा लोप (६।१।६६) करून नंतर 'पुगन्तलघूपधस्य च' (७।३।८६) यानें गुण केल्यानें क्नोपयति हें रूप बनतें. येथें णिच्रूप आर्धधातुकाच्या निमित्तानें येणाऱ्या गुणाचा निषेध प्राप्त होत आहे. आर्धधातुक हें विशेषण लोपाचें केलें म्हणजे हा दोष येत नाही. कारण येथें यकाराचा लोप पकाराला मानून झालेला आहे. आर्धधातुक प्रत्ययाला मानून झालेला नाहीं.

८. सूत्रान्तरानें प्राप्त न होणारें कार्य करूनच उच्चारण करणें याला निपातन म्हणतात. तेव्हां ज्या अर्थीं पाणिनीनें णिच् प्रत्ययांत क्नुप् धातूचें 'क्नोपेः' उच्चारण केलें आहे त्या अर्थी तेथें गुणाचा

**यङ्यक्क्यवलोपे प्रतिषेधः ॥१॥**

यङ्यक्क्यवलोपे प्रतिषेधो वक्तव्यः । यङ् । बेभिदिता मरीमृजः । यक् । कुषुभिता मगधकः । क्य । समिधिता दृषदकः । वलोपे । जीरदानुः ॥ किं प्रयोजनम् ।

**नुम्लोपस्रिव्यनुबन्धलोपेऽप्रतिषेधार्थम् ॥२॥**

नुम्लोपे स्रिव्यनुबन्धलोपे च प्रतिषेधो मा भूदिति । नुम्लोपे । अभाजि रागः उपबर्हणम् । स्रिवेः आस्रेमाणम् । अनुबन्धलोपे । लूञ् लाविता लवितुम् ॥ यदि परिगणनं क्रियते स्यदः प्रश्रथः हिमश्रथ इत्यत्रापि प्राप्नोति । वक्ष्यत्येतत् ।

निषेध होतो असें सांगावें. तें असें की—

(वा.१) धातूचा अवयव यङ्, यक्, क्य आणि व यांचा लोप झाला असतां तेथेंच हा गुणवृद्धीचा प्रतिषेध होतो असें म्हणावें. म्हणजे याशिवाय इतर ठिकाणीं हा निषेध होणार नाहीं.

यङाचें उदा.—बेभिदिता,[९] मरीमृजः. यक्प्रत्ययाचें उदाहरण—कुषुमिता,[१०] मगधकः. क्यप्रत्ययाचें उदा.—समिधिता,[११] दृषदकः. वलोपाचें उदा.—जीरदानुः.[१२]

या परिगणनाचें काय प्रयोजन ?

(वा.२)—नकाराचा लोप, स्रिवधातूंतील वकाराचा लोप, आणि अनुबन्धा (इत्संज्ञका) चा लोप झाला असतां गुणवृद्धिप्रतिषेध न व्हावा. नुम्लोपाचें उदाहरण—अभाजि,[१३] रागः, उपबर्हणम्. स्रिवधातूंतील वकारलोपाचें उदा.—आस्रेमाणम्.[१४] अनुबन्धलोपाचें उदा.—लूञ्, लविता, लवितुं वगैरे.

जर परिगणन केलें जात आहे तर स्यदः,[१५] प्रश्रथः, हिमश्रथः येथेंही वृद्धि प्राप्त होत आहे.

'निपातनावरून'[१६] स्यदः वगैरे वरील

---

निषेध होत नाहीं असें सिद्ध होतें.

९. बेभिद्य या यङन्त धातूहून तृच्. त्याला इडागम 'यस्य हलः' यानें यकाराकारविशिष्ट य शब्दाचा लोप केला असतां प्राप्त झालेल्या लघूपध गुणाचा निषेध केला. मरीमृज्य या यङन्त धातूहून पचाद्यच् प्रत्यय. 'यङोऽचि च' यानें यङाचा लुक् केला असतां प्राप्त झालेल्या 'मृजेर्वृद्धिः' याचा प्रतिषेध केला.

१०. कण्ड्वादि यगन्त, कुषुभ्य आणि मगध्य या धातूंहून तृच्, ण्वुल् 'यस्य हलः' यानें य शब्दाचा लोप केला असतां क्रमानें लघूपध गुण व 'अत उपधायाः वृद्धि' यांचा प्रतिषेध होतो.

११. क्यच्प्रत्ययान्त समिध्य आणि दृषद्य या धातूंहून क्रमानें तृच्, ण्वुल् प्रत्यय, 'क्यस्य विभाषा' यानें यशब्दाचा लोप केला असतां प्राप्त झालेला लघूपध गुण व उपधावृद्धि यांचा प्रतिषेध केला आहे.

१२. 'जीव प्राण धारणे' या धातूच्यापुढें 'जीवे रदानुः' या वचनानें रदानु प्रत्यय. 'लोपो व्योः' यानें वकाराचा लोप केला असतां इगन्ताला प्राप्त झालेल्या गुणाचा निषेध केला आहे.

१३. 'नुम्लोप०' या वार्तिकामध्यें नुम् ही पूर्वाचार्यांची नकाराची संज्ञा समजावी. 'भन्ज्' धातूहून कर्मणि लुङ्. च्लि. चिण् 'भञ्जेश्च चिणि' यानें नकाराचा लोप. 'अत उपधायाः' यानें उपधावृद्धि वगैरे. 'रञ्ज रागे', घञ् 'घञि च भाव०' यानें नकाराचा लोप. उपधावृद्धि वगैरे. 'बृहि वृद्धौ' नुम् (७।१।६८). त्यानंतर ल्युट्. 'बृंहेरच्यनिटि' या वचनानें नकारलोप. लघूपधगुण वगैरे अशी अभाजि, रागः उपबर्हणम्. उदाहरणें बनतात. येथें उपधावृद्धि व लघूपधगुण यांचा प्रकृत सूत्रानें निषेध न व्हावा यासाठीं परिगणन करणें भाग आहे.

१४. 'स्रिवु गतिशोषणयोः' दिवादि. आङ् पूर्वः 'आतो मनिन्०' 'अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' यानें मानिन् प्रत्यय. 'लोपो व्योः' यानें वकारलोप. गुण. आस्रेमाणम्. द्वितीयैकवचन आहे. छान्दसत्वास्तव वकाराला ऊडादेश केला नाहीं.

१५. 'स्यन्द्' धातूहून भावीं घञ् प्रत्यय. 'स्यदो जवे' यानें नलोपाचें निपातन. 'श्रन्थ ग्रन्थ संदर्भे'; प्र किंवा हिमशब्द पूर्वी ठेवून भावीं घञ् प्रत्यय. 'अवोदैधौ०' यानें नकारलोप. परिगणन केलें असतां वरील तिन्ही उदाहरणांमध्यें उपधावृद्धि प्रसक्त होत आहे.

१६. 'स्यदो जवे' 'अवोदैधौद्मप्रश्रथहिमश्रथाः' हें निपातन. केवळ नकारलोपाकरितांच जर हें

निपातनात्स्यदादिष्विति ॥ तर्त्तर्हि परिगणनं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । नुम्लोपे कस्मान्न भवति ।

**इक्प्रकरणान्नुम्लोपे वृद्धिः ॥३॥**

इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधो न चैषेग्लक्षणा वृद्धिः ॥ यदीग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधः स्यदः प्रश्रथः हिमश्रथ इत्यत्र न प्राप्नोति। इह च प्राप्नोति। अवोदः एधः ओद्म इति ।

**निपातनात्स्यदादिषु ॥४॥**

निपातनात्स्यदादिषु प्रतिषेधो भविष्यति न च भविष्यति ॥ यदीग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधः स्रिव्यनुबन्धलोपे कथम् । स्रिवेः आस्रेमाणम् । लूञ् लविता ।

**प्रत्ययाश्रयत्वादन्यत्र सिद्धम् ॥५॥**

आर्धधातुकनिमित्ते लोपे प्रतिषेधो न चैष आर्धधातुकनिमित्तो लोपः ॥ यद्यार्धधातुकनिमित्ते लोपे प्रतिषेधो जीरदानुः अत्र न प्राप्नोति ।

---

उदाहरणांमध्यें वृद्धिविशेष वगैरे सिद्ध होत आहे' असें वार्तिककार पुढें सांगणार आहेत.

तर मग तें परिगणन केलें पाहिजे असें दिसतें.

परिगणन करावयास नको.

तर नकाराचा लोप झाल्यानंतर गुणवृद्धिप्रतिषेध कां बरें होत नाहीं ?

(वा.३) इक् पदोपस्थितीचें प्रकरण चालू असल्यानें जेथें इक्पदाची उपस्थिति होते तसल्या गुणवृद्धीचा निषेध आहे[१७].आणि प्रकृत उदाहरणस्थलीं प्राप्त झालेल्या वृद्धिशास्त्रामध्यें तर इक्पदाची उपस्थिति होत नाहीं. म्हणून नुमागमाचा लोप झाला त्या ठिकाणीं (अभाजि, रागः येथें ) वृद्धि होते.

जर इक्पदोपस्थितीनें युक्त अशा गुणवृद्धीचा हा प्रतिषेध असेल तर स्यदः, प्रश्रथः, हिमश्रथः या उदाहरणीं तो प्रतिषेध येऊं शकत नाहीं. व [१८]अवोदः, एधः,ओद्मः येथें तो प्रतिषेध प्रसक्त होतो.

(वा.४) 'स्यदो जवे, अवोदधौद्मप्रश्रथ०'या सूत्रांतील आचार्यांनें उच्चारिलेल्या प्रयोगावरून स्यदादिकांपैकीं स्यदः, प्रश्रथः हिमश्रथः, या ठिकाणीं प्रतिषेध सिद्ध होईल, आणि अवोदः, एधः, ओद्मः या ठिकाणीं प्रतिषेध होणार नाहीं.

जरी इक्पदोपस्थितीनें युक्त अशा गुणवृद्धींचा हा निषेध आहे असें मानलें,तरी स्रिवधातूंतील वकाराचा लोप आणि अनुबन्धाचा लोप झालेल्या ठिकाणीं गुण कसा बरें प्रवृत्त होतो ?

(वा.५) ज्या ठिकाणीं आर्धधातुक नांवाच्या प्रत्ययामुळें धातूंतील अवयवाचा लोप होतो त्या ठिकाणीं गुणवृद्धींचा निषेध केला जात आहे.[१९] आणि स्रिवधातूंतील वकाराचा लोप व अनुबंधाचा लोप हा तर आर्धधातुक प्रत्ययामुळें झालेला नव्हे; म्हणून वरील[२०] स्थळीं गुण साधत आहे.

जर आर्धधातुक नांवाच्या प्रत्ययामुळें लोप झाल्याठिकाणींच हा निषेध आहे तर जीरदानुः[२१] उदाहरणीं गुणनिषेध होऊं शकत नाहीं.

---

निपातन असेल तर नलोपाचें विधान केल्यानेंच काम भागत आहे. तेव्हां निपातनानें नलोप आणि वृद्ध्यभाव या गोष्टी सूचित होतात असें तात्पर्य.

१७. इक् पद हें 'इको गुणवृद्धी' या परिभाषेचें प्रतीकादाखल आहे. प्रकरण शब्द प्रस्ताव(आरंभ)-वाची, तेव्हां पदोपस्थापक इक्परिभाषेचा आरंभ करून निषेधप्रकरण सांगितलें जात असल्यानें जेथें 'इको गुणवृद्धी' परिभाषा येते, तसल्या गुणवृद्धींचा हा निषेध आहे असें समजतें.

१८. 'उन्दी क्लेदने', अवपूर्वः घञ्. निपातनास्तव नकारलोप. लघूपधगुण. 'एङि पररूपम्०' यानें पररूप. 'ञि इन्धी दीप्तौ'. घञ्. निपातनास्तव नलोप. गुण. 'उन्दी क्लेदने' औणादिक मन् प्रत्यय. निपातनास्तव नकारलोप. गुण.

१९. 'आर्धधातुक प्रत्ययाच्या आश्रयानें लोप झाला असला पाहिजे.' असा 'प्रत्ययाश्रयत्वात्' याचा अर्थ होय. अर्थात् 'आर्धधातुके' हें लोपाचें विशेषण असें तात्पर्य.

२०. आस्रेमाणं, लविता लवितुं येथें.

२१. जीरदानुः येथें जीवृधातूंतील वकाराचा

रकि ज्यः प्रसारणम् ॥६॥

नैतज्जीवे रूपम् । रक्ये तज्ज्यः प्रसारणम् । यावता चेदानीं रकि जीवेरपि सिद्धं भवति ॥ कथमुपबर्हणम् । बृहिः प्रकृत्यन्तरम् । कथं ज्ञायते बृहिः प्रकृत्यन्तरमिति । अचीति हि लोप उच्यते । अनजादावपि दृश्यते । निवृह्यते । अनिटीति चोच्यते । इडादावपि दृश्यते । निवर्हिता निवर्हितुमिति । अजादावपि न दृश्यते । बृंहयति बृंहकः ॥ तस्मान्नार्थः परिगणनेन ॥ यदि परिगणनं न क्रियते भेद्यते छेद्यते अत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । धातुलोप इति नैवं विज्ञायते धातोर्लोपो धातुलोपो धातु-

(वा. ६) जीरदानु हा शब्द जीव्धातूपासून बनलेला नव्हे. तर 'ज्या' धातूच्या पुढें रक् प्रत्यय करून धातूंतील यकाराला संप्रसारण, पूर्वरूप वगैरे केल्यानंतर जीर शब्दाचा दानु शब्दाबरोबर बहुव्रीहि करून साधला आहे. आणि जीरदानु हें रूप रक् प्रत्यय करूनच जर साधावयाचें आहे तर जीवधातूचेंही 'जीर' रूप साधतां[२२] येतें.

उपवर्हणं हें उदाहरण कसें ?[२३]

बृहि (बृंह) धातूपेक्षां 'बृह' असा स्वतंत्र धातु आहे त्याचें[२४] उपबर्हणं हें रूप होय.

स्वतंत्र 'बृह' धातु आहे असें कशावरून समजावें ?

इदित् अशा बृहिधातूंतील नकाराचा अजादिप्रत्यय पुढें असतां लोप सांगितला आहे. पण तो लोप निबृह्यते येथें हलादि प्रत्यय पुढें असतांही दृष्टीस पडतो. तसेंच तो अजादि प्रत्यय इडागमावर आरंभ झालेला (इडादि) नसावा असेंही म्हटलें आहे. परंतु निबर्हिता निबर्हितुं येथें इडागमावर आरंभ झालेला असा अजादि प्रत्यय पुढें असतांही नलोप दिसत आहे. आणि इडागमावर आरंभ नव्हे असा अजादि प्रत्यय पुढें असतांही बृंहयति बृंहकः येथें नकारलोप दिसत नाहीं.[२५] तेव्हां परिगणन करण्याचा कांहींही उपयोग नाहीं असें ठरतें[२६].

जर परिगणन केलें जात नाहीं. तर भेद्यते[२७]

'लोपो व्यो०' या सूत्रानें जो लोप झाला आहे तो रदानु या प्रत्ययाच्या आश्रयानें झाला नाहीं तर त्या प्रत्ययांतील र या वर्णामुळें झाला आहे(६।१।६६).

२२. जीव्धातूच्या पुढें रक् प्रत्यय. 'लोपो व्योः' यानें वलोप आणि 'क्ङिति च' यानें गुणनिषेध केल्यानें 'जीर' शब्द बनतो. सबब परिगणन-प्रत्याख्यानाचे वेळीं ज्या धातूची कल्पना करून संप्रसारण-विधान करणें निवळ क्लेश होय असें तात्पर्य. मात्र 'लोपो व्योः' येथील वकारप्रत्याख्यानाचे वेळीं संप्रसारणाचेच पाय धरले पाहिजेत.

२३. येथें 'बृंहेरच्यनिटि' या वचनानें नलोप केला आहे. परिगणन-प्रत्याख्यान केलें तर येथें गुणनिषेध प्राप्त होत आहे.

२४. बृहधातूमध्यें नलोप नसल्यानें सरळच गुण प्रवृत्त होतो.

२५. 'बृंहेरच्यनिटि' या वार्तिकानें इडागमावर आरंभ झालेला नव्हे असा अजादि प्रत्यय पुढें असतां बृंहधातूंतील नकाराचा लोप सांगितला आहे. स्वतंत्र बृहधातु न मानतां उपबर्हणम् वगैरे नकार-रहित रूपें बृंहधातूच्याच नकाराचा लोप करून साधावींत असें वार्तिककाराचें मनांत आहे. परंतु असें गृहीत धरलें तरी निवृह्यते, निबर्हिता, हे प्रयोग जुळून येणार नाहींतच. आणि ते तर दिसत आहेत. त्यापेक्षां ज्यांत मुळींच नकार नाहीं असाही एक बृह धातु आहे असें अनुमानानें सिद्ध होतें. तेव्हां उपबर्हणं इत्यादि स्थलीं नलोप होण्यासाठीं 'बृंहेरच्यनिटि' हें वचन अपूर्व स्वीकारलें आहे तें स्वीकारावयास नको. उलट तें वचन स्वीकारण्यास बृंहयति हा प्रयोग प्रतिबंधक आहे. सबब अनिदित् बृह धातु आणि इदित् बृहि धातु असे उभयतांही प्रयोगांत येतात असें गृहीत धरलें पाहिजे.

२६. एकंदरींत परिगणनाच्या सर्व उपयोगांची वाट अन्य तऱ्हेनें लागत आहे म्हणूनच.

२७. 'भिदिर विदारणे'. णिच्. तदन्ताहून कर्मणि लट्, तङ, यक्, भिद् इ य ते असें असतां लघूपध गुणापेक्षां नित्यत्वास्तव प्रथमतः णिलोप करून नंतर प्रत्ययलक्षणानें णिच् प्रत्ययाचा आश्रय करून प्राप्त होणाऱ्या लघूपध गुणाचा निषेध या सूत्रानें होईल. कारण येथें णिलोप आणि गुण हे दोन्ही विधि आर्धधातुकनिमित्तकच आहेत. तेव्हां पूर्वोक्त

लोप इति। कथं तर्हि। धातोर्लोपोऽस्मिंस्तदिदं धातुलोपं धातुलोप इति ॥ तस्मादिग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधः ॥ यदि तर्हीग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधः पापचकः पापठकः मगधकः दृषदकः अत्र न प्राप्नोति।

**अल्लोपस्य स्थानिवत्त्वात्**

अकारलोपे कृते तस्य स्थानिवत्त्वाद्गुणवृद्धी न भविष्यतः ॥

**अनारम्भो वा ॥७॥**

अनारम्भो वा पुनरस्य योगस्य न्याय्यः। कथं बेभिदिता मरीमृजकः कुषुभिता समिधितेति। अत्राप्यकारलोपे कृते तस्य स्थानिवद्भावाद्गुणवृद्धी न भविष्यतः ॥ यत्र तर्हि स्थानिवद्भावो नास्ति तदर्थमयं योगो वक्तव्यः। क्व च स्थानि-

---

छेद्यते येथेंही प्रतिषेध प्राप्त होतो असा दोष येत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'धातुलोपे' येथें धातोर्लोपः धातुलोपः तस्मिन् धातुलपे असा षष्ठीतत्पुरुष घेऊं नये, तर धातोर्लोपो यस्मिंस्तत् धातुलोपं, तस्मिन् धातुलोपे असा सप्तमीबहुव्रीहि[२८] समास घ्यावा. एकंदरींत परिगणन न घेतां इक्पदोपस्थितीनें युक्त अशाच गुणवृद्धीचा या सूत्रानें निषेध केला जात आहे असें सिद्ध झालें.

आतां जर इक्पदोपस्थितीनें युक्त अशाच गुणवृद्धीचा हा प्रतिषेध आहे तर[२९] पापचकः, पापठकः, मगधकः, दृषदकः येथें तो निषेध प्राप्त होऊं शकत[३०] नाहीं.

(वा.) पापचकः वगैरे वरील उदाहरणांमध्यें अतो लोपः यानें अकाराचा लोप केला असतां त्या अकारलोपाला 'अचः परस्मिन्' यानें स्थानिवद्भाव झाल्यानें गुणवृद्धि होणार नाहींत.

(वा.७) किंवा या प्रकृत सूत्राचा आरंभच करूं नये हेंच न्याय्य आहे.[३१]

तर बेभिदिता, मरीमृजकः कुषुभिता, समिधिता वगैरे उदाहरणांची वाट काय ?

येथेंही बेभिद्य+इता इत्यादि स्थिति असतां परत्वास्तव 'यस्य हलः' यानें यकारलोप केल्यानंतर केलेल्या अकारलोपाला 'अचः परस्मिन्' यानें स्थानिवद्भाव केल्यानें गुणवृद्धि होणार नाहींत.

---

उभयपक्षींही दोष येत आहे.

२८. धातुलोप शब्दामध्यें बहुव्रीहि समास घेऊन तें आर्धधातुके याचें विशेषण घ्यावें. तेव्हां लोप आणि गुणवृद्धी यांना निमित्त म्हणून धरलेला आर्धधातुक एक असला पाहिजे असें सिद्ध होतें. अर्थात् धातुलोपाला निमित्त म्हणून धरलेला जो आर्धधातुक त्या आर्धधातुकामुळें प्राप्त होणारा गुण किंवा वृद्धि करूं नये असा सूत्राचा अर्थ झाल्यानें भेद्यते इत्यादि स्थळीं णिलोप आणि गुण याला निमित्त म्हणून धरलेला आर्धधातुक यक् व णिच् हे भिन्न भिन्न असल्यामुळें तेथें गुणाचा निषेध होऊं शकत नाहीं.

२९. यङन्त पापच्य, पापठ्य या धातूंच्यापुढें ण्वुल्, अतो लोपः व 'यस्य हलः' यानें यकारलोप, कण्ड्वादि यगन्त मगध्य आणि क्यजन्त दृषद्य या धातूंच्यापुढें ण्वुल्, अतोलोप वगैरे प्रक्रिया पूर्वीप्रमाणेंच समजावी.

३०. जेथें गुणवृद्धींचा स्थानी प्रत्यक्ष उच्चारलेला असतो तेथें पदोपस्थापक इक्परिभाषा येऊं शकत नाहीं. विधेयसमर्पक गुणवृद्धी शब्दाकडे बघून स्थानिविशेषबोधक इक्पद उपस्थित होणार आणि मग त्याचा वाक्यार्थामध्यें अन्वय करावयाचा. परंतु इक्पदाची उपस्थिति होण्याच्या वेळींच प्रत्यक्ष उच्चारलेल्या स्थानीचा अन्वय करून वाक्यार्थ होऊन गेला. त्यामुळें गुणवृद्धीला असलेली स्थानिविशेषाची आकांक्षा शांत झाल्यानें परिभाषेची इक्पदोपस्थापकत्व शक्तिच खचली गेली. म्हणून प्रत्यक्ष स्थानी उच्चारला असेल तेथें इक्परिभाषा येऊं शकत नाहीं. उपधावृद्धीचे ठिकाणीं 'अतः' हा स्थानी प्रत्यक्ष उच्चारला असल्यानें ती इग्लक्षणवृद्धि नव्हे. म्हणून तिच्याविषयीं हा प्रतिषेध येऊं शकत नाहीं.

३१. हें निषेधसूत्र करून परिगणन मानावें लागतें. किंवा इग्लक्षणगुणवृद्धींचाच निषेध होतो असा त्याचा संकोच करावा लागतो. पापचकः इत्यादि उदाहरणामध्यें दोष येतो त्याची गति स्थानिवद्भावानें करावी लागते त्यापेक्षां हें निषेधसूत्रच नको. ह्याचीं उदाहरणें स्थानिवद्भावानें साधतां येतील असें मनांत धरून वार्तिककार हे प्रतिषेध-

**वद्भावो नास्ति । यत्र हल्चोरादेशः । लोलुवः पोपुवः मरीमृजः सरीसृप इति । अत्राप्यकारलोपे कृते तस्य स्थानिवद्भावाद्गुणवृद्धी न भविष्यतः । लुकि कृते न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । लुक्क्रियतामल्लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादल्लोपः । नित्यो लुक् । कृतेऽप्यल्लोपे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । लुगप्यनित्यः । कथम् । अन्यस्य कृतेऽल्लोपे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अनवकाशस्तर्हि लुक् । सावकाशो लुक् । कोऽवकाशः । अवशिष्टः ।**

तर जेथें स्थानिवद्भाव येऊं शकत नाहीं त्या उदाहरणाकरतां हें सूत्र केलें पाहिजे.

तो स्थानिवद्भाव कुठें येऊं शकत नाहीं ?

ज्या ठिकाणीं व्यञ्जन आणि स्वर या उभयतांना मिळून आदेश होतो त्या ठिकाणीं; जसें, लोलुवः[32] पोपुवः मरीमृजः सरीसृपः वगैरे.

वरील उदाहरणांमध्येंही यङांच्या अकाराचा लोप[33] करून त्याला स्थानिवद्भाव केल्यानें गुणवृद्धि होणार नाहींत.

प्रथमतः यङ् प्रत्ययाचा समुदिताचा लुक् केला असतां अतो लोप प्राप्त होत नाहीं.

येथें हा विचार करावा की लोलूय अशी स्थिति असतां अच्प्रत्यय निमित्त धरून प्रथमतः यङाचा लुक् करावा किंवा यङातील अकाराचा लोप करावा.

यांपैकीं काय करावें ?

पर असल्यामुळें पूर्वीं यङांतील अकाराचा लोप करावा.

पण यङांतील अकाचा लोप केला अथवा न केला तरी लुक् प्राप्त होत असल्यानें तो नित्य आहे ना ! आणि अकाराचा लोप तर अनित्य आहे.

लुक् ही अनित्य आहे.

तो कसा ?

यङांतील अकाराचा लोप केला असतां म्ह. एकाचा केवळ व्यञ्जनाचा लुक् प्राप्त होतो आणि अकारलोप केला नसतां एकाचा म्ह. 'य' या समुदायाचा लुक् प्राप्त होतो आणि 'ज्या व्यक्तीला धरून जो विधि सांगितला तो विधि त्या व्यक्तीच्या रूपान्तराचे ठिकाणीं प्राप्त होत असतां अनित्य म्हटला जातो' म्हणून.

तर 'अतो लोप नाप्राप्त असतां' यङाचा लुक् सांगितला जात असल्यानें तो[34] अनवकाश= अचरितार्थ होत आहे. तेव्हां अर्थातच तो लुक् लोपाचा बाध करून अगोदर होईल.

त्या यङाच्या लुकाला स्थळ मिळत असल्यानें तो सावकाशच आहे.[35]

तें स्थळ कोणतें ?

यङांतील अकाराचा लोप केल्यानंतर उरलेला केवळ यकार होय.

(स.)—आतां कसा तरी[36] हा लुक् अनवकाश ठरविला तरीसुद्धां दोष येत नाहीं. म्हणजे तेथें अतो लोप पूर्वीं होणारच. कारण अतो लोपाविषयीं योगविभाग (निराळी सूत्ररचना) करण्यांत येईल. तो असा—'अतो लोपः' याचें पुढें 'यस्य हलः' यांपैकीं 'यस्य'

---

सूत्राचें प्रत्याख्यान करीत आहेत.

३२. लूञ् छेदने, पूञ् पवने, मृजू शुद्धौ, सृप्लृ गतौ, यङ् द्वित्व. पहिल्या दोन ठिकाणीं अभ्यासाला गुण आणि पुढल्या दोन ठिकाणीं अभ्यासाला रीगागम. लोलूय, मरीमृज्य वगैरे यङन्त धातूंच्यापुढें 'नन्दिग्रहिपचादिभ्यो०' यानें पचादित्वास्तव अच् प्रत्यय 'यङोऽचि च' या सूत्रानें यकाराकार विशिष्ट यङाचा लुक्.

३३. यस्य हलः(६।४।४९)यांतील यस्य या विभक्तसूत्रानें अकाराचा लोप होतो असा अभिप्राय आहे.

३४. या शंककाला योगविभागाचें अज्ञान असल्यानें अनवकाशत्वास्तव अल्लोपाचा लुक् बाधक आहे असा त्याचा समज आहे.

३५. अकाराचा लोप आणि यकाराचा लुक् असा लुक् व लोप यांचा भिन्न विषय असल्यानें येननाप्राप्तिन्याय लागू होत नाहीं.

३६. 'यङोऽचि' हें, येथें यङ्पदानें दाखविलेला यकाराकार समुदाय विवक्षित असल्यानें अल्लोपोत्तर तादृश समुदायाचा संभवत नसल्यामुळें, अनवकाश लुक् असें तात्पर्य.

अथापि कथंचिदनवकाशो लुक्स्यादेवमपि न दोषः । अल्लोपे योगविभागः करिष्यते । अतो लोपः । ततो यस्य । यस्य च लोपो भवति । अत इत्येव । किमर्थमिदम् । लुकं वक्ष्यति तद्बाधनार्थम् । ततो हलः । हल उत्तरस्य च यस्य लोपो भवतीति । इहापि तर्हि परत्वाद्योगविभागाद्वा लोपो लुकं बाधेत । कृष्णो नोनाव वृषभो यदीदम् । नोनूयतेर्नोनाव । समानाश्रयो लुग्लोपेन बाध्यते । कश्च समानाश्रयः । यः प्रत्ययाश्रयः । अत्र च प्रागेव प्रत्ययोत्पत्तेर्लुग्भवति ॥ कथं स्यदः प्रश्रथः हिमश्रथः जीरदानुः निकुचित इति ।

उक्तं शेषे ॥८॥

किमुक्तम् । निपातनात्स्यदादिषु । प्रत्ययाश्रयत्वादन्यत्र सिद्धम् । रकि ज्यः प्रसारणमिति । निकुचितेऽप्युक्तं संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ॥

---

एवढेंच स्वतंत्र सूत्र मानिलें जातें. तेथें पूर्वसूत्रांतून 'अतः' या पदाची अनुवृत्ति आहेच. तेव्हां 'य शब्दांतील अकाराचा लोप होतो' असा त्याचा अर्थ. कशाकरितां हें सूत्र ? 'यङोऽचि' यानें लुक् सांगणार आहे, त्याच्या बाधाकरितां. त्याच्यापुढें 'हलः' हें सूत्र. व्यञ्जनाच्या पुढील यशब्दाचा लोप होतो असा त्याचा अर्थ.

असें आहे तर नोनूय या यङन्त धातूपासून बनविलेल्या[37] 'नोनाव' या उदाहरणामध्येंही पर असल्यामुळें किंवा योगविभागामुळें अतोलोप हा लुकाचा बाध करील.

अल्लोपानें आपल्याच निमित्ताच्या आश्रयानें येणाऱ्या लुकाचा बाध केला जातो. आपल्याच निमित्ताच्या आश्रयानें येणारा लुक् तो कोणता ? 'यङोचि च' (५।४।७४) या सूत्रानें जो अच् प्रत्ययाला निमित्त धरून विहित आहे तो. नोनाव या उदाहरणीं तर लिट् वगैरे प्रत्ययोत्पत्तीच्या पूर्वींच यङाचा लुक् होत आहे.[38]

हें निषेधसूत्र केलें नाहीं तर स्यदः, प्रश्रथः, हिमश्रथः, जीरदानुः, निकुचितः हीं उदाहरणें कशीं साधतील ?

(वा. ९) या उदाहरणांच्या संबंधानें पूर्वींच सांगितलें आहे.

काय सांगितलें आहें ? 'स्यदो जवे' 'प्रश्रथहिमश्रथाः' या निपातनावरून स्यदः प्रश्रथः हिमश्रथः येथें उपधावृद्धीचा निषेध होईल. आस्रेमाणम् येथें आर्धधातुकाच्या निमित्तानें लोप झाला नसल्यामुळें निषेध होत नाहीं. तसेंच जीरदानुः हा शब्द जीव धातूपासून बनविला नाहीं, तर ज्या धातूच्या पुढें रक् प्रत्यय करून संप्रसारण वगैरे झाल्यानें जीर शब्द बनविला आहे असें सांगितलें आहे. निकुचितः याच्याही सिद्धीदाखल सांगितलें आहे.[39] काय सांगितलें आहे ? 'दोहोंच्या संबंधावर अवलंबून प्रवृत्त झालेला विधि, दोहोंच्या संबंधाचा विघात करणाऱ्याला मदत करूं शकत नाहीं' असें सांगितलें आहे. म्हणजे निकुचितः येथें क्त प्रत्ययावरील कित्त्वाला निमित्त धरून झालेला नलोप, तो उपधास्थानीं उकार आणण्याच्या द्वारानें त्या कित्त्वाचा विघात करणाऱ्या 'उदुपधाद्भावा०' या शास्त्राला मदत करीत नाहीं. मध्यें नकार प्राप्त होतो.

---

३७. नोनूय यङन्त धातु, यङाचा लुक्, लिट्, तिप्, णल्, वृद्धि वगैरे, 'अमन्त्रे' (३।१।३५) असा निषेध असल्यामुळें आम्प्रत्ययाचा अभाव. यङ्लुकाला सावकाशत्व गृहीत धरलें तर येथें परत्वास्तव अतोलोप येतो. आणि यथाकथंचिद्रीतीनें अनवकाशत्व गृहीत धरलें तर योगविभागानें अतोलोप

३८. अनैमित्तिक लुक् अंतरंग असल्यानें पूर्वी होतो त्या वेळीं अल्लोपाची प्राप्तिच संभवत नाहीं.

३९. 'क्नम्येजन्तः' (१।१।३९) या सूत्रावर वार्तिककारांनीं 'उदुपधत्वमकित्त्वमकित्वस्य निकुचिते' असें सांगितलें आहे.

## [1]क्ङिति च ॥१.१.५॥

**क्ङिति प्रतिषेधे तन्निमित्तग्रहणम् ॥१॥**

क्ङिति प्रतिषेधे तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम् । क्ङिन्निमित्ते ये गुणवृद्धी प्राप्नुतस्ते न भवत इति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**उपधारोरवीत्यर्थम् ॥२॥**

उपधार्थं रोरवीत्यर्थं च । उपधार्थं तावत् । भिन्नः भिन्नवानिति । किं पुनः कारणं न सिध्यति । क्ङितीत्युच्यते । तेन यत्र क्ङित्यनन्तरो गुणभाव्यस्ति तत्रैव स्यात् । चितम् स्तुतम् । इह तु न स्यात् । भिन्नः भिन्नवानिति ॥ ननु च यस्य गुण उच्यते तत्क्ङित्परत्वेन विशेषयिष्यामः । पुगन्तलघूपधस्य च गुण उच्यते तच्चात्र क्ङित्परम् । पुगन्तलघूपधस्येति नैवं विज्ञायते पुगन्तस्याङ्गस्य लघूपधस्य चेति । कथं तर्हि । पुक्यन्तः पुगन्तः । लघ्व्युपधा लघूपधा । पुगन्तश्च लघूपधा च

---

असल्यानें उपधास्थानीं उकार येत नाहीं. सबब अकित्व नसल्यानें गुण होत नाहीं.

(वा. १) ककारेत्संज्ञक किंवा ङकारेत्संज्ञक प्रत्यय असतां जो निषेध सांगितला त्याविषयीं 'तन्निमित्त' असें म्हणावें, म्हणजे कित् अथवा ङित् याच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या अशाच गुणवृद्धींचा निषेध होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

(वा. २) उपधास्थानींही असलेल्या इकाविषयीं निषेध प्रवृत्त व्हावा, आणि रोरवीति या उदाहरणामध्यें निषेध प्रवृत्त न व्हावा. उपधास्थ इक्विषयींचें उदाहरण—भिन्नः भिन्नवान् वगैरे.

पण हें उदाहरण कां बरें साधत नाहीं ?

क्ङिति ककारेत्संज्ञक किंवा ङकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतां असें म्हटलें आहे. तेव्हां जेथें कित्ङित् प्रत्ययाच्या मागें अगदीं नजीक (अव्यवहित) असा गुण होण्यास लायक म्हणजे इक् असेल, तेथेंच निषेध प्रवृत्त होईल, जसें—चितं स्तुतं वगैरे; आणि भिन्नः भिन्नवान् येथें निषेध प्रवृत्त होणार नाहीं.

पण ज्याला गुण सांगितला जात आहे त्याला 'कित् ङित् प्रत्यय[2] पुढें असतां' असें विशेषण आम्ही लावीत आहोंत. शेवटीं पुगागम असलेल्या किंवा शेवटच्या वर्णाच्या अगदीं नजीक मागें लघु असलेल्या अशा अंगाला गुण सांगितला जात आहे. तें अंग तर कित्ङित्प्रत्ययाच्या मागें अगदीं नजीक असें येथें आहेच. कित्ङित्प्रत्यय पुढें असतां त्याच्या मागें अगदीं नजीक लघूपध अंग असल्यानें भिन्नः वगैरे स्थळीं गुणनिषेध साधत आहे.

पुगन्तलघूपधस्य याचा 'पुगागम' शेवटीं असलेल्या किंवा उपधास्थानीं लघु असलेल्याअंगाला असा अर्थ समजावयाचा नाहीं.[3] तर कसा समजावयाचा ? पुकि अन्तः पुगन्तः, लघ्वी उपधा लघूपधा, पुगन्तश्च लघूपधा च पुगन्तलघूपधं, तस्य पुगन्तलघूपधस्य असा; म्हणजे पुगागम पुढें असतां त्याच्या मागील

---

१. गित्, कित् आणि ङित् प्रत्ययांच्या निमित्तानें प्राप्त झालेले असें जे इग्लक्षण गुणवृद्धि ते होत नाहींत. 'इको गुणवृद्धी' (१।१।३) या परिभाषेमुळें इकाला होणारे जे गुणवृद्धि ते इग्लक्षण गुणवृद्धि होत.

२. कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना गुणवृद्धि होत नाहींत असें म्हटलें असतां कोणाला होत नाहींत अशी आकांक्षा उत्पन्न होते, त्या आकांक्षेचें निराकरण 'पुगन्त लघूपध वगैरे ज्याला ते सांगितले असतील त्याला' असें मनांत धरून करतां येतें. तेव्हां अर्थातच त्याला विशेषण लावतां येईल.

३. तसा अर्थ समजला असता तर भिन्नः या उदाहरणामध्ये भिद् हें अंग आणि त हा प्रत्यय या दोहोंमध्यें व्यवधान नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें गुणाचा निषेध झाला असता.

पुगन्तलघूपधं पुगन्तलघूपधस्येति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । अङ्गविशेषणे हि सतीह प्रसज्येत । भिनत्ति छिनत्तीति ॥ रोरवीत्यर्थं च । त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति ॥ यदि तन्निमित्तग्रहणं क्रियते श्चङन्ते दोषः । रियति पियति धियति । प्रादुद्रुवत् प्रासुस्रुवत् । अत्र प्राप्नोति ।

शचङन्तस्यान्तरङ्गलक्षणत्वात् ॥३॥

अन्तरङ्गलक्षणत्वादत्रेयङुवङोः कृतयोरनुपधात्वाद्गुणो न भविष्यति । एवं क्रियते चेदं तन्निमित्तग्रहणं न च कश्चिद्दोषो भवति ॥ इमानि च भूयस्तन्निमित्त-

---

जो शेवटचा वर्ण त्याला किंवा लघु नांवाचा जो उपधासंज्ञक वर्ण त्याला असा अर्थ समजावयाचा. असाच अर्थ जरूर मानला पाहिजे. कित्-ङित्प्रत्यय असतां हें अंगाला विशेषण लाविलें तर भिनत्ति छिनत्ति येथेंही गुण प्रसक्त होईल.[4]

रोरवीति[5] हें निषेधाप्रवृत्तीचें उदाहरण—त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति.

जर कित् किंवा ङित् प्रत्ययाला निमित्त धरून येणारा गुण किंवा वृद्धि करूं नये अशा अर्थाचें तन्निमित्तग्रहण केलें जात आहे तर शप्रत्ययान्त आणि चङ्प्रत्ययान्तस्थलीं दोष येतो. जसें—रियति[6], पियति, धियति. प्रादुद्रुवत्, प्रासुस्रुवत् या उदाहरणांमध्यें गुणनिषेध प्राप्त होत नाहीं.

(वा. ३) शचङन्तस्थलीं पूर्वोपस्थित निमित्तकस्वरूप अंतरंगत्वास्तव इयङ् उवङ् केलें असतां उपधास्थानीं इक् नसल्यामुळें गुण होणार नाहीं. एकंदरींत हें तन्निमित्त ग्रहण केले आहे तें बरें आहे. आणि तसें करण्यांत कांहीं दोषही येत नाहीं.

कित्ङित्प्रत्ययनिमित्तक गुण किंवा वृद्धि होत नाहीं असें म्हणण्याचीं हींही

---

४. या अर्थानें गुण ज्या वर्णाला सांगितला आहे तो वर्ण म्ह. भिद् यांतील इकार आणि त हा प्रत्यय या दोहोंमध्यें दकारानें व्यवधान असल्यामुळें प्रकृत सूत्रानें गुणाचा निषेध होणार नाहीं, याकरितां तन्निमित्तग्रहण केलें पाहिजे असें सिद्ध होतें.

५. रोरवीति हा प्रयोग यङ्लुगताचा आहे. रोरूय या यङन्तधातूमधील यङ्प्रत्ययाचा 'यङोचि च' (२।४।७४) या सूत्रानें लुक् झाला आहे. नंतर रोरू याला पुढील तिप् प्रत्ययाला मानून 'सार्वधातु०' (७।३।८४) या सूत्रानें गुण झाला आहे. 'प्रत्ययलोपे' (१।१।६२) या सूत्रानें प्रत्ययलक्षण केलें म्हणजे रोरू याच्यापुढें यङ् प्रत्यय आहे असें मानतां येतें, प्रकृतसूत्रानें सांगितलेला निषेध अंगाधिकारांतील नसल्यामुळें नलुमताङ्गस्य (१।१।६३) हा प्रत्ययलक्षणाचा निषेध येथें प्रवृत्त होत नाहीं असें वार्तिककारांचे मनांत आहे. तेव्हां तो यङ् प्रत्यय ङित् असल्यामुळें प्रकृतसूत्रानें गुणाचा निषेध होईल. तन्निमित्त ग्रहण केलें म्हणजे हा दोष येत नाहीं. कारण हा गुण यङ्प्रत्ययाला मानून आलेला नाहीं.

६. सहाव्या गणांतील रि या धातूहून लट्, तिप् आणि मध्यें श हा विकरण प्रत्यय होतो. त्या विकरणप्रत्ययाला मानून रि या इकाराला 'सार्वधातु०' (७।३।८४) या सूत्रानें गुण आला आहे. व रि अ हें लघूपध अंग असल्यामुळें 'पुगन्त०' (७।३।८६) या सूत्रानें गुण आला आहे. त्या दोन्ही गुणांचा प्रकृत सूत्रानें निषेध होतो. कारण 'श' हा विकरण प्रत्यय 'सार्वधातुकमपित्' (१।२।४) या सूत्रानें ङित् समजला जात आहे. नंतर इयङ् होऊन रियति असें रूप होतें. जर प्रकृतसूत्रामध्यें तन्निमित्तग्रहण केलें तर तिप् प्रत्ययाला मानून आलेल्या लघूपधगुणाचा निषेध होणार नाहीं. पियति धियति येथें असेंच समजावें. प्रादुद्रुवत् प्रासुस्रुवत् येथें द्रु व स्रु धातूंहून लुङ्, तिप् व मध्यें 'णिश्रिद्रुस्रु०' (३।१।४८) या सूत्रानें चङ् हा विकरणप्रत्यय झाला आहे. नंतर 'चङि' (६।१।११) या सूत्रानें द्वित्व व उवङ् करून प्रादुद्रुवत् वगैरे रूपें होतात. येथेंही रियति याप्रमाणेंच प्रकृतसूत्रानें दोन्ही गुणांचा निषेध होत आहे.

७. श आणि चङ् या प्रत्ययांला मानून इयङ् आणि उवङ् प्राप्त झाले आहेत म्हणून ते अंतरंग आहेत. आणि त्याच्या पुढील तिप् प्रत्ययाला मानून लघूपध गुण प्राप्त होतो म्हणून तो बहिरंग आहे. तेव्हां अंतरंगत्वास्तव इयङ् उवङ् हे गुणाचा बाध करून अगोदर होतात.

ग्रहणस्य प्रयोजनानि । हतः हथः उपोयते औयत लौयमानिः पौयमानिः नेनिक्त इति । नैतानि सन्ति प्रयोजनानि । इह तावत् हतः हथ इति प्रसक्तस्यानभिनिर्वृत्तस्य प्रतिषेधेन निवृत्तिः शक्या कर्तुमत्र च धातूपदेशावस्थायामेवाकारः ॥ इह चोपोयते औयत लौयमानिः पौयमानिरिति बहिरङ्गे गुणवृद्धी अन्तरङ्गः प्रतिषेधः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ नेनिक्त इति परेण रूपेण व्यवहितत्वान्न

---

आणखीं फळें आहेत. उदा.–हतः, हथः, उपोयते, औयत, लौयमानिः, पौयमानिः, नेनिक्ते.

तन्निमित्त ग्रहणाचीं हीं फळें होऊं शकत नाहींत. वरील उदाहरणांमध्यें हतः, हथः हें फळ नव्हे. कारण प्राप्त झालें असून लक्ष्यामध्यें प्रसक्त न झालेल्या अशाच गुणवृद्धीची निवृत्ति प्रतिषेधाकडून करणें शक्य आहे, आणि सदर उदाहरणांमध्यें तर धातु उच्चारण्याच्याच वेळीं अकार आहे.

उपोयते, औयत, लौयमानिः, पौयमानिः येथेंही तन्निमित्त ग्रहणाचें फळ नाहीं; कारण उभयपदांचा आश्रय असल्यामुळें गुण बहिरंग आहे. तसेंच कित्प्रत्ययापेक्षां बहिर्भूत लङ् व तद्धितप्रत्यय यांची अपेक्षा असल्यामुळें वृद्धि ही बहिरंग आहे आणि त्याच्या उलट प्रतिषेध हा अंतरंग आहे. तेव्हां अंतरंग कर्तव्य असतां बहिरंग असिद्ध असल्यामुळें गुणवृद्धींचा निषेध येऊं शकत नाहीं.

तसेंच नेनिक्ते हेंही फळ नव्हे. कारण उत्तरखण्डानें व्यवधान असल्यामुळें अभ्यासाला गुणनिषेध येत नाहीं. उपधास्थानीं असलेल्या इकाच्या ठिकाणीं निषेध प्रवृत्त

---

८. तन्निमित्तग्रहण केलें नाहीं तर या प्रकृत सूत्रानें कित् आणि ङित् प्रत्ययाच्या पूर्वी गुणवृद्धीचा निषेध केला असल्यामुळें अर्थातच कित् आणि ङित् प्रत्ययाच्या पूर्वी गुणवृद्धीचें उच्चारण केलें असतां तो प्रयोग असाधु होतो. तेव्हां हतः या प्रयोगामध्यें तस् या ङित् प्रत्ययाच्या पूर्वी ह्रस्व अकाराचें उच्चारण होत असल्यामुळें तो प्रयोग असाधु होईल. कारण ह्रस्व अकाराला गुणसंज्ञा आहे. तन्निमित्त ग्रहण केलें असतां हा दोष येत नाहीं. कारण हा ह्रस्व अकार तस् या ङित्प्रत्ययाच्या निमित्तानें झालेला नाहीं. तो मूळचाच आहे. उपोयते येथें वेधातु, आत्व, कर्मणि लट् , तप्रत्यय, एत्व, यक्, संप्रसारण होऊन ऊयते हें क्रियापद झालें आहे. उप हा उपसर्ग लाविला असतां संधि होऊन गुण झाला आहे. औयत हें क्रियापद वेधातु, आत्व, कर्मणिलङ, तप्रत्यय, यक्, आडागम व वृद्धि होऊन साधलें आहे. उपोयते या उदाहरणामध्यें गुण आणि औयत या उदाहरणांमध्यें वृद्धि यक् या कित् प्रत्ययाच्या पूर्वी असल्यामुळें प्रकृतसूत्रानें निषेध होईल. तन्निमित्त ग्रहण केलें असतां हा दोष येत नाहीं. कारण यक् या कित् प्रत्ययाच्या निमित्तानें गुण व वृद्धि येथें होत नाहीं. लौयमानिः या उदाहरणामध्यें लू धातूच्या पुढें कर्मणि लट्, शानच्, मध्यें यक् हा विकरणप्रत्यय व मुक् आगम झाला आहे. नंतर लूयमान या शब्दापूासून अत इञ् (४।१) या सूत्रानें इञ् हा तद्धित प्रत्यय होऊन त्या प्रत्ययामुळें लू या ऊकाराला वृद्धि होते. प्रकृत सूत्रामध्यें तन्निमित्त ग्रहण केलें नाहीं तर यक् या कित् प्रत्ययाच्या पूर्वी औ ही वृद्धि होत असल्यामुळें तिचा प्रकृत सूत्रानें निषेध होईल. तन्निमित्तग्रहण केलें असतां हा दोष येत नाहीं. कारण औ ही वृद्धि यक् या कित् प्रत्ययाला मानून होणारी नाहीं. निजधातु लट, त प्रत्यय, एत्व, शप्, श्लु, द्वित्व व णिजां त्रयाणां (७।४।७५) या सूत्रानें अभ्यासाला गुण श्लूच्या निमित्तानें होऊन नेनिक्ते हें क्रियापद साधलें आहे. हा गुण त या ङित् प्रत्ययाच्या निमित्तानें होणारा नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें त्याचा निषेध होत नाहीं.

९. तेव्हां तन्निमित्त ग्रहण केलें नाहीं तरी हा दोष येत नाहीं.

१०. वार्तिककारानें तन्निमित्तग्रहण करून त्याचा 'उपधारोरवीत्यर्थम्' असा दोन ठिकाणीं उपयोग दाखविला आहे. भाष्यकारांनीं त्या तन्निमित्तग्रहणाचा हतः हथः वगैरे बऱ्याच उदाहरणांमध्यें उपयोग होतो असें दाखवून त्या उदाहरणांची तन्निमित्तग्रहणावांचूनही सिद्धि होते असें आतांपर्यंत सांगितलें. आतां येथून वार्तिककारांनीं दाखविलेले उपयोगही बरोबर नाहींत असें भाष्यकार प्रतिपादन करीत आहेत.

भविष्यति ॥ उपधार्थेन तावन्नार्थः । धातोरिति वर्तते। धातुं क्ङिन्त्परत्वेन विशेषयिष्यामः । यदि धातुर्विशेष्यते विकरणस्य न प्राप्नोति । चिनुतः सुनुतः लुनीतः पुनीत इति। नैष दोषः। विहितविशेषणं धातुग्रहणम् । धातोर्यो विहित इति । धातोरेव तर्हि न प्राप्नोति । नैवं विज्ञायते धातोर्विहितस्य क्ङितीति । कथं तर्हि । धातोर्विहिते क्ङितीति ॥ अथवा कार्यकालं हि संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम् । पुगन्तलघूपधस्य गुणो भवतीत्युपस्थितमिदं भवति क्ङिति नेति ॥ अथवा यदेतास्मिन्योगे क्ङिद्ग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वाद्गुणवृद्धी न भविष्यतः ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्युपधालक्षणस्य गुणस्य प्रतिषेध इति

होण्यासाठीं देखील तन्निमित्त ग्रहणाचा उपयोग होत नाहीं. कारण पूर्वसूत्रांतून धातुग्रहणाची अनुवृत्ति येत आहे. त्या धातूला 'कित्ङित्-प्रत्यय पुढें असतां' असें विशेषण लागू करण्यांत [११] येत आहे.

जर 'कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतां' हें विशेषण धातूला लागू करण्यांत येत आहे तर चिनुतः सुनुतः लुनीतः पुनीतः येथें विकरणाला गुणनिषेध प्राप्त होऊं शकत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण धातु-ग्रहण हें विशेषण आहे. विहित म्ह. केलेला. धातूहून केलेला जो कोणी प्रत्यय त्याला कित् ङित् प्रत्यय पुढें असतां निषेध होतो असा अर्थ आहे.

असें म्हटलें तर धातूलाच निषेध लागू पडत नाहीं.

कित् ङित् प्रत्यय पुढें असतां त्याच्या मागील धातूहून केलेला जो प्रत्यय त्याला, असा अर्थ समजण्यांत येत नाहीं. तर कसा ? धातूहून केलेला जो कित् ङित् प्रत्यय तो पुढें असतां, असा. म्हणजे पुढें असलेला जो कित् किंवा ङित् प्रत्यय, त्या प्रत्ययाला धातु-ग्रहण हें विशेषण दिलें आहे. म्हणजे धातूहून केलेला जो कित् किंवा ङित् प्रत्यय तो ज्या कोणाच्या पुढें असेल त्याला गुणवृद्धि करूं नयेत असा सूत्रार्थं ठरतो.

अथवा संज्ञा किंवा परिभाषा यांचें कार्यानें आकर्षण केलें जात असल्यानें ज्या प्रदेशीं कार्य असेल त्या प्रदेशीं ती संज्ञा किंवा परिभाषा उपस्थित झालेली अवलोकन करावी. या न्यायाला अनुसरून 'पुगागमाच्या मागील जो शेवटचा त्याला किंवा लघुसंज्ञक उपधा-स्थानीय वर्णाला गुण होतो' असें विधान ज्या पुगन्त (७।३।८६) सूत्रामध्यें केलें आहे त्या ठिकाणीं 'क्ङिति न' हें पदद्वय उपस्थित होतें. तेव्हां व्यवधान असतांही जसा या सूत्रानें गुण प्रवृत्त होतो, तसा येथें उपस्थित झालेला निषेधही व्यवधानीं प्रवृत्त होतो. (अर्थात् गुणवृद्धिपदचिह्नित अशी 'क्ङिति च' ही परिभाषा होय.)

किंवा या प्रतिषेधाला प्रतिषेध्याची आकांक्षा असल्यानें जितक्या प्रकारचे प्रतिषेध्य गुण किंवा वृद्धि आहेत तितकीं 'क्ङिति च' हीं प्रतिषेधसूत्रें [१२] बनलीं. त्यांत पुगन्तलघूपध-गुणाचे निषेधाबद्दल जें 'क्ङिति च' हें सूत्र निराळें बनलें तें अचरितार्थ होत असल्यामुळें व्यवधान असतांही गुण किंवा वृद्धि होणार नाहीं.

अथवा ज्यापेक्षां हे पाणिनि आचार्य 'त्रसिगृधि' या सूत्रानें सांगितलेल्या क्नु प्रत्ययाला इत्संज्ञक ककार जोडीत आहेत, किंवा 'हलन्ताच्च' (१।२।१०) या सूत्रानें सन् प्रत्ययाला कित्त्वाचा अतिदेश करीत आहेत

११. तेव्हां भिन्नः या उदाहरणामध्यें त हा कित् प्रत्यय आणि इकार यांमध्यें जरी इकारानें व्यवधान आहे तरी भिद् हा धातु आणि त हा कित् प्रत्यय यांमध्यें व्यवधान नसल्यामुळें निषेध सिद्ध होतो.

१२. 'क्ङिति च' हें जरी एकच सूत्र आहे तरी त्या एकाचीं अनेक सूत्रें बनतात आणि गुण व वृद्धि सांगणाऱ्या प्रत्येक सूत्राशीं 'क्ङिति च' या एकेक सूत्राचा संबंध होतो.

यदयं त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः [३.२.१४०]इको झल्हलन्ताच्च [१.२.९;१०] इति क्नुसनौ कितौ करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। कित्करण एतत्प्रयोजनं गुणः कथं न स्यादिति। यदि चात्र गुणप्रतिषेधो न स्यात्कित्करणमनर्थकं स्यात्। पश्यति त्वाचार्यो भवत्युपधालक्षणस्य प्रतिषेध इति ततः क्नुसनौ कितौ करोति॥ रोरवीत्यर्थेनापि नार्थः। क्ङितीत्युच्यते न चात्र क्ङितं पश्यामः। प्रत्ययलक्षणेन प्राप्नोति। न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणप्रतिषेधः। अथापि न लुमताङ्गस्येत्युच्यते। एवमपि न दोषः। कथम्। न लुमता लुप्तेऽङ्गाधिकारः प्रतिनिर्दिश्यते। किं तर्हि। योऽसौ लुमता लुप्यते तस्मिन्यदङ्गं तस्य यत्कार्यं तन्न भवतीति। अथाप्यङ्गाधिकारः प्रतिनिर्दिश्यते। एवमपि न दोषः। कथम्। कार्यकालं हि संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम्। सार्वधातुकार्धधातुकयोर्गुणो भवतीत्युप-

त्यापेक्षां उपधालक्षण गुणाचाही 'क्ङिति च' हा निषेध होतो असें ते सुचवीत आहेत. कसें हें सूचित होत आहे? त्या प्रत्ययांना कित्त्व करण्याचा हा उपयोग आहे की त्यामुळें गुण बिलकूल होतां कामा नये. तेव्हां जर या क्नु आणि सन् प्रत्ययांच्या उदाहरणांमध्यें निषेध प्रवृत्त होणार नाहीं[१३] तर त्या प्रत्ययांना केलेलें कित्त्व फोल होईल. यावरून उपधालक्षण अशाही गुणाचा निषेध होतो असें आचार्य समजतात. म्हणून क्नु आणि सन् या प्रत्ययांना कित्त्व करीत आहेत.

रोरवीति या उदाहरणाकरितांही तन्निमित्तग्रहणाचा उपयोग होत नाहीं. कारण कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतां असें म्हटलें आहे आणि उदाहरणामध्यें तर कित् किंवा ङित् प्रत्यय कोणीच दिसत नाहीं. तेव्हां येथें निषेध कसा बरें येईल?

प्रत्ययलक्षणानें यङ् प्रत्यय पुढें आहे असें मानून निषेध प्राप्त[१४] होतो.

यङाचा लुक् झाला असल्यामुळें 'लुमत् शब्दानें प्रत्ययांचें अदर्शन झालें असतां त्या प्रत्ययामुळें येणारें कार्य करूं नये' अशा अर्थाच्या 'न लुमता तस्मिन्'[१५] (१।१।६३) या सूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध केला आहे. आतां जरी 'न लुमताङ्गस्य असा पाणिनिसंमत सूत्रपाठ गृहीत धरला तरीसुद्धां दोष येत नाहीं. तो कसा? 'न लुमता०' या सूत्रांतील 'अङ्गस्य' या शब्दानें अंगाधिकार हा अर्थ दर्शविला जात नाहीं. तर काय दर्शविलें जातें? 'जो हा लुमत्शब्दानें लुप्त होतो त्या प्रत्ययामुळें अंगसंज्ञा पावलेल्या शब्दस्वरूपाला त्या प्रत्ययामुळें जें कार्य प्राप्त होतें, मग तें अंगाधिकारांतील असो वा नसो, तें होत नाहीं' असें दर्शविलें जातें. आतां अंग शब्दानें अंगाधिकार दर्शविला जातो असें म्हटलें तरी सुद्धां दोष येत नाहीं. तो कसा? संज्ञा आणि परिभाषा, ही कार्यांनें आकर्षण केली जात असल्यामुळें जेथें तें कार्य पठित आहे तेथें ती आहे असें पाहावें. तेव्हां सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतां

१३. गृध्नुः वगैरे क्नुप्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें आणि मुमुक्षति वगैरे सन् प्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें धकार वगैरे व्यंजनानें कायमचें व्यवधान होत असल्यामुळें प्रकृत सूत्रानें निषेध होणार नाहीं.

१४. यान्त सूत्रावरील टीप ५ पाहा.

१५. 'न लुमताङ्गस्य' (१।१।६३) या सूत्रांतील अङ्गस्य या पदाऐवजीं तस्मिन् असें पद घालण्याबद्दल वार्तिककारांनीं त्या सूत्रावर विचार केला आहे. तेव्हां क्ङिति च हें प्रकृत निषेधसूत्र जरी अंगाधिकारांत नाहीं तरी येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध होईल.

स्थितमिदं भवति क्ङिति नेति ॥ अथवा छान्दसमेतद् दृष्टानुविधिश्च छन्दसि भवति॥अथवा बहिरङ्गो गुणोऽन्तरङ्गः प्रतिषेधः। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ अथवा पूर्वस्मिन्योगे यदार्धधातुकग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वाद् गुणो भविष्यति ॥

इह कस्मान्न भवति । लैगवायनः कामयते ।

**तद्धितकाम्योरिक्प्रकरणात् ॥४॥**

इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधो न चैते इग्लक्षणे ॥

लकारस्य ङित्वादादेशेषु स्थानिवद्भावप्रसङ्गः ॥ लकारस्य ङित्वादादेशेषु स्थानिवद्भावः प्राप्नोति । अचिनवम्

---

गुण होतो असें विधान केलें आहे त्या ठिकाणीं (७।३।८४) 'क्ङिति च' हें [१६] उपस्थित होतें.

किंवा रोरवीति हें उदाहरण छान्दस (वैदिक) आहे, व वैदिक उदाहरणामध्यें दृष्ट असलेल्या कार्याला अनुलक्षून विधान करावयाचें असतें असा नियम आहे. म्हणून वरील उदाहरणांमध्यें निषेध प्रवृत्त न झाल्यामुळें गुण होईल.

अथवा, निषेधाला कारण असलेल्या यङ्प्रत्ययापेक्षां बाहेर असलेल्या तिप् प्रत्ययामुळें गुण प्राप्त होत असल्यानें तो बहिरंग आहे. आणि निषेध अंतरंग आहे. तेव्हां परिभाषेनें अंतरंगनिषेधाच्या दृष्टीनें बहिरंग गुण दिसत नसल्यामुळें त्याचा निषेध होऊं शकत नाहीं.

किंवा 'न धातुलोपे' या पूर्वसूत्रामध्यें केलेल्या आर्धधातुक ग्रहणाचा कांहीं उपयोग नसल्यानें तें अनवकाश होत आहे. त्या जोरावर रोरवीति या ठिकाणीं 'क्ङिति च' या प्रकृत निषेधाला बाजूला सारून गुण होईल. [१७]

लैगवायनः[१८], कामयते या उदाहरणांमध्यें ककारेत्संज्ञक व ङकारेत्संज्ञक प्रत्ययामुळें क्रमानें आदिवृद्धि (७।२।११७) आणि उपधावृद्धि (७।२।११६) यांचा निषेध कां बरें होत नाहीं?

(वा.४) इक् पदोपस्थितीनें युक्त अशाच गुणवृद्धींचा प्रकृत सूत्रानें निषेध केला आहे. आणि आदिवृद्धि किंवा उपधावृद्धि ही इक्पदोपस्थितीनें युक्त नाहीं. म्हणून लैगवायनः आणि कामयते येथें प्रकृत निषेध येऊं शकत नाहीं.

---

१६. तेव्हां अर्थातच 'क्ङिति च' हा प्रकृत निषेधही विधीप्रमाणें अंगाधिकारस्थ होत असल्यामुळें प्रत्ययलक्षणाचा निषेध प्रवृत्त होतो. म्हणून क्ङित् प्रत्यय पुढें आहे असें मानतां येत नसल्यामुळें प्रकृतनिषेधाची प्रवृत्ति होत नाहीं आणि गुण होऊन रोरवीति हें उदाहरण सिद्ध होतें.

१७. पूर्वसूत्रामध्यें आर्धधातुकग्रहण केलें नाहीं तर धात्ववयवाचा लोप झाला असतां गुणवृद्धि होत नाहींत इतकाच वाक्यार्थ होईल आणि रोरवीति या उदाहरणामध्यें गुणाचा निषेध होऊं लागेल तो न व्हावा या करितां आर्धधातुकग्रहण केलें आहे. यङ्लुगंताचे प्रयोग लौकिकभाषेमध्यें होत नसल्यामुळें रोरवीति अशा प्रकारच्या वैदिक प्रयोगामध्यें च आर्धधातुकग्रहणाचा उपयोग दाखवावा लागतो. पण त्या ठिकाणीं जर प्रकृतसूत्रानें निषेध होईल तर पूर्वसूत्रामध्यें आर्धधातुकग्रहण करूनही रोरवीति हें साधत नसल्यामुळें आर्धधातुकग्रहण व्यर्थ होतें. तेव्हां त्याच्या जोरानें प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेला निषेधही सदरील उदाहरणांमध्यें बाजूला सरतो.

१८. तन्निमित्तग्रहण केलें असतां (रियाति अदुद्रुवत्) इत्यादि ठिकाणीं जो दोष येतो त्याचें वार्तिककारांनीं 'शचङन्तस्यान्तरङ्गलक्षणत्वात्' असें निराकरण केलें. त्याप्रमाणेंच लैगवायनः इत्यादि ठिकाणीं जो दोष येतो त्याचें वार्तिककार निराकरण करीत आहेत. लैगवायनः या उदाहरणांमध्यें लिगुशब्दांतील इकाराला जी आयन या कित्प्रत्ययाच्या निमित्तानें वृद्धि होते तिचा प्रकृतसूत्रानें निषेध होत नाहीं. कारण गकार उकार या वर्णांनीं व्यवधान आहे. तसेंच कामयते येथें कम् धातूहून णिङ् प्रत्यय केला असतां कम् यांतील अकाराला जी णिङ् या प्रत्ययामुळें वृद्धि होते तिचाही निषेध होत नाहीं. कारण मकारानें व्यवधान आहे. परंतु जर तन्निमित्तग्रहण केलें तर मात्र वरील उदाहरणांमध्यें निषेध होईल असा दोष येतो.

१९. पाणिनीनें इको गुणवृद्धी (१।१।३) हें प्रकरण चालू करून त्यामध्यें प्रकृत निषेधसूत्र घातलें असल्यामुळें तद्धितप्रत्ययाचें उदाहरण आणि कामि या ठिकाणीं दोष येत नाहीं.

अमुनवम् अकरवम्।

**लकारस्य ङित्त्वादादेशेषु स्थानिवद्भावप्रसङ्ग इति चेद्यासुटो ङिद्वचनात्सिद्धम् ॥५॥**

यदयं यासुटो ङिद्वचनं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न ङिदादेशा ङितो भवन्तीति। यद्येतज्ज्ञाप्यते कथं नित्यं ङितः [३.४.९९] इतश्च [१००] इति। ङितो यत्कार्यं तद्भवति ङिति यत्कार्यं तन्न भवतीति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते यासुट एव ङिद्वचनात्। अपर्याप्तश्चैव हि यासुट् समुदायस्य ङित्त्वे ङितं चैनं करोति। तस्यैतत्प्रयोजनं ङितो यत्कार्यं तद्यथा स्यात्।

---

[२०] अचिनवम्, अमुनवम्, अकरवम् या उदाहरणांमध्यें स्थानीभूत लकार ङकारेत्संज्ञक असल्यानें तें ङकारेत्संज्ञकत्व त्याच्या आदेशांच्या ठिकाणीं स्थानिवद्भावानें प्राप्त होतें. तेव्हां गुणनिषेध प्रसक्त होत आहे.

(वा.५) लकाराला इत्संज्ञक ङकार जोडला असल्यानें त्याच्या आदेशाविषयीं स्थानिवद्भाव अतिप्रसक्त होतो असें म्हणणें असेल तर ज्यापेक्षां हे आचार्य लिङाच्या आदेशाला यासुडागमाचें विधान करून त्याला ङकारेत्संज्ञकत्वाचा अतिदेश करीत आहेत (३।४ १०३) त्यापेक्षां ङकारेत्संज्ञकाचे ठिकाणीं केलेले आदेश स्थानिवद्भावानें ङित् होत नाहींत असें सुचवीत आहेत.

जर असें (ङिताचे आदेश ङित् होत नाहींत असें मोघम) सुचविलें जात आहे तर—'नित्यं ङितः' (३।४।९९) व 'इतश्च'(३।४१००) या सूत्रानें भवेम आणि भवेत् या उदाहरणांमध्यें सकार किंवा इकार यांचा लोप कसा बरें होईल?

स्थानिवद्भावानें ङित् समजला जाणाऱ्या लादेशाला ङित्त्वामुळें जें कार्य प्राप्त होतें तें त्याला होतेंच. फक्त त्या त्याच्या ङित्वामुळें त्या लादेशाच्या मागील प्रकृतीला जें कार्य प्राप्त होतें तें होत नाहीं.

पण अशा अर्थाचें अपूर्व वचन केलें पाहिजे कीं काय? नको. तर मग सांगितल्यावांचून कसा बरें (हा अर्थ) गवसेल? यासुड्विशिष्टप्रत्ययाला ङित्त्वाचा अतिदेश न करतां केवळ यासुडागमालाच ङित्त्वाचा अतिदेश केल्यावरून गवसेल.

यासुडागम हा तें आपलें ङित्त्व त्या समुदायाला देऊं शकत नाहीं आणि पाणिनि तर यासुड्विशिष्ट प्रत्ययाला ङित् न म्हणतां केवळ यासुडागमालाच ङित् करून ठेवीत आहे. तेव्हां त्याचा उपयोग असा दिसतो की ङिताला स्वतःलाच जें कार्य तें होऊं देच, ङित् पुढें असतांना मागच्याला जें कार्य तें फक्त होत[२१] नाहीं.

---

[२०]. लट्, लिट् वगैरे दहा लकारांमध्यें लङ्, लिङ्, लुङ् आणि लृङ् हे चार लकार पाणिनीनें ङित् केले आहेत. अचिनवम् येथें चिधातु, त्याहून लङ् प्रत्यय, त्याला परस्मैपद उत्तम पुरुष एकवचन मिप्, त्याला अम् आदेश, श्नु हा विकरणप्रत्यय, अडागम आणि श्नु याला गुण अवादेश झाला आहे. अकरवम् येथें विकरण उप्रत्यय आहे.

[२१]. ङितामुळें होणारें कार्य येथें दोन प्रकारचें संभवतें. जो ङित असेल त्याला स्वतःलाच होणारें एक, आणि ङित् पुढें असतांना त्याच्या मागील भागामध्यें होणारें दुसरें. यासुडागमाला ङित्त्व सांगण्यांत पाणिनीचा उद्देश 'हीं दोन्ही प्रकारचीं कार्यें त्या ङित्त्वामुळें व्हावीत' असा दिसत नाहीं. कारण ङिताला होणारें जें कार्य तें प्रत्ययाला सांगितलें आहे. आणि पाणिनीनें तर यासुड्विशिष्ट प्रत्ययाला ङित्त्व न सांगतां फक्त त्यांतील यासुडागमालाच सांगितलें आहे. तेव्हां त्या ङित्त्वाचा उपयोग यासुड्विशिष्ट प्रत्ययाला करणें अशक्य आहे. एकंदरींत 'ङितामुळें पूर्वभागीं होणारें कार्य येथें व्हावें' असा एकच उद्देश पाणिनीचा दिसतो. आतां ङित् लकारांचा आदेश स्थानिवद्भावानें ङित् समजून त्याला ङिताच्या निमित्तानें होणारें कार्य केलें तरी त्यामुळें यासुडागमाला सांगितलेलें ङित्त्व व्यर्थ होत नाहीं. कारण तें ङित्त्व तशा कार्याच्या उद्देशानें सांगितलेंच नाहीं. पण जर स्थानिवद्भावानें प्राप्त झालेल्या ङित्वाचा त्याच्या पूर्वभागीं होणाऱ्या कार्याकडे उप-

ङिति यत्कार्यं तन्माभूदिति ॥

## दीधीवेवीटाम् ॥१।१।६॥

किमर्थमिदमुच्यते । गुणवृद्धी मा भूतामिति । आदीध्यनम् आदीध्यकः । आवेव्यनम् आवेव्यक इति ॥ अयं योगः शक्योऽकर्तुम् । कथम् ।

**दीधीवेव्योश्छन्दोविषयत्वाद्दृष्टानुविधित्वाच्च च्छन्दसोऽदीधेददीधयुरिति च गुणदर्शनादप्रतिषेधः ॥१॥**

दीधीवेव्योश्छन्दोविषयत्वात् । दीधीवेव्यौ छन्दोविषयौ । दृष्टानुविधित्वाच्च च्छन्दसः । दृष्टानुविधिश्च च्छन्दसि भवति । अदीधेददीधयुरिति च गुणस्य दर्शनादप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । प्रजापतिर्वै यत्किंचन मनसादीधेत् । होत्राय वृतः कृपयन्नदीधेत् । अदीधयुर्दाशराज्ञे वृतासः ॥ भवेदिदं युक्तमुदाहरणम् अदीधेदिति । इदं त्वयुक्तम् अदीधयुरिति । अयं जुसि गुणः प्रतिषेधविषय आरभ्यते । स यथैव क्ङिति नेत्येतं प्रतिषेधं बाधत एवमिममपि बाधते । नैष दोषः । जुसि गुणः प्रतिषेधविषय आरभ्यमाणस्तुल्यजातीयं प्रतिषेधं बाधते । कश्च तुल्यजातीयः प्रति-

---

(सू.६) हें सूत्र कशासाठीं केलें आहे ?

आदीध्यनं, आदीध्यकः, आवेव्यनं, आवेव्यकः या उदाहरणांमध्यें गुण आणि वृद्धि न व्हावी म्हणून.

हें सूत्र न करणें शक्य आहे.

तें कसें ?

(वा.१) दीधीङ् आणि वेवीङ् या धातूंचा प्रयोग वेदामध्येंच होतो. आणि वेदांतील प्रयोगामध्यें तर दृष्ट असलेल्या कार्याचें विधानच फक्त करावयाचें असतें.[3] शिवाय अदीधेत् अदीधयुः या वैदिक उदाहरणांमध्यें गुण केल्याचेंही दृष्टीस पडत आहे. त्यामुळें प्रकृत प्रतिषेध हा अप्रतिषेध होत आहे. निरर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय. तीं वैदिक उदाहरणें येणेंप्रमाणें:—प्रजापतिर्वै यत्किंचन मनसादीधेत् । होत्राय वृतः कृपयन्नदीधेत् । अदीधयुर्दाशराज्ञे वृतासः ॥

प्रकृत निषेध असतांही गुण केल्याचें अदीधेत् हें उदाहरण दाखविलें तें योग्य होय, पण अदीधयुः हें मात्र अयोग्य होय. कारण 'क्ङिति च' वगैरे प्रतिषेधाचा विषय असतांनाच मुद्दाम 'जुसि च' या गुणाचा आरंभ केला आहे. तेव्हां तो जसा 'क्ङिति च' या निषेधाचा बाध करतो, तसा प्रकृत निषेधाचाही बाध करील.

हा दोष येत नाहीं. कारण प्रतिषेधाच्या विषयामध्यें आरंभिलेला 'जुसि च' गुण,

---

योग केला तर मात्र यासुडागमाला सांगितलेलें ङित्व व्यर्थ होईल. तेव्हां लकाराचें ङित्व आदेशावर स्थानिवद्भावानें घेऊन त्याचा उपयोग पूर्वभागीं होणाऱ्या कार्याकडे कोठेंही करूं नये एवढेंच पाणिनि गृहीत धरतो आणि तसलें कार्य यासुटाच्या उदाहरणांत झालें पाहिजे म्हणून तेवढ्यापुरतें यासुडागमाला ङित्व सांगतो.

१. दीधी आणि वेवी हे दोन धातु आणि इट् आगम या तिघांना गुण आणि वृद्धि होत नाहींत.

२. दीधी आणि वेवी या धातूंहून ल्युट् (३।३।११५) आणि ण्वुल् (३।१।१३३) हे प्रत्यय केले आहेत. ल्युटाला अन आदेश आणि ण्वुलाला अक आदेश (७।१।१) होतो. प्रकृत सूत्रानें गुणाचा निषेध केला म्हणून गुण न होतां यण् झाला आहे. आ हा उपसर्ग मागें लाविला आहे.

३. वैदिक प्रयोगामध्यें जीं कार्यें केलेलीं दिसत असतील तीं तेथें कशीं झालीं तें दाखवावें लागतें. परंतु जीं कार्यें केलीं नसतील तीं तेथें कां केलीं नाहींत असा प्रश्न संभवत नाहीं. कारण तें कार्य तेथें आपण केलें तर जें रूप होईल तें वैदिक रूपच नव्हे असें होतें.

४. तेव्हां प्रकृत निषेधसूत्र केलें तरी अदीधयुः या वैदिक रूपामध्यें गुण केलेला जो दृष्टीस पडतो तो बरोबरच आहे.

षेधः । यः प्रत्ययाश्रयः । प्रकृत्याश्रयश्चायम् । अथवा येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति । न चाप्राप्ते क्ङिति नेत्येतस्मिन्प्रतिषेधे जुसि गुण आरभ्यते । अस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च ॥ यदि तर्ह्ययं योगो नारभ्यते कथं दीध्यदिति ।

**दीध्यदिति श्यन्व्यत्ययेन ॥२॥**

दीध्यदिति श्यन्नेष व्यत्ययेन भविष्यति ॥

इटश्चापि ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथमकणिषम् अरणिषम् कणिता श्वः रणिता श्व इति । आर्धधातुकस्येड्वलादेः [७.२.३५] इत्यत्रेडिति वर्तमाने पुनरिड्ग्रहणस्य प्रयोजनमिडेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्माभूदिति । किं चान्यत्प्राप्नोति । गुणः । यदि नियमः क्रियते पिपठिषतेर-

आपल्यासारख्या निषेधाचाच बाध करतो. आपल्यासारखा निषेध तो कोणता ? जो निषेध प्रत्ययावर अवलंबून आहे[५] तो. आणि हा प्रकृत निषेध तर प्रकृतीवर अवलंबून आहे.[६]

अथवा ज्या अपवादाविषयीं ज्याचीं अवश्य प्राप्ति आहे त्याचाच त्या अपवादानें बाध होत असतो. 'जुसि च' (७।३।८३) हा जो गुण आरंभिला जात आहे त्याच्या सर्व उदाहरणांपैकीं एकाही उदाहरणामध्यें 'क्ङिति च' या निषेधाची प्राप्ति येत नाहीं असें नाहीं, आणि दीधीवेवीटाम् हा निषेध तर जुसि च याच्या उदाहरणांपैकीं कांहीं ठिकाणींच येतो आणि कांहीं ठिकाणीं येत नाहीं.[७] तेव्हां जुसि गुणाविषयीं प्रकृतनिषेध अवश्य प्राप्त होणारा नसल्यामुळें या निषेधाचा जुसि गुण बाध करीत नाहीं.

आतां जर हें प्रकृत सूत्र आरंभिलें नाहीं, तर दीध्यत् वेव्यत् येथें गुण कां बरें होत नाहीं ?

(वा.२) दीध्यत् वेव्यत् येथें व्यत्ययानें श्यन्‌विकरण करतां येईल.[८]

ह्या सूत्रांतील इट् शब्दाचेंही ग्रहण न करणें शक्य आहे.

तर मग अकणिषं, अरणिषं, कणिता श्वः, रणिता श्वः हीं उदाहरणें कशीं साधावींत ?

'आर्धधातुकस्य' (७।१।३५ या सूत्रामध्यें 'नेड्वशि' (७।२।८) या सूत्रांतून इट् शब्दाची अनुवृत्ति येत असतां पुनः इट् शब्द घातला त्याचा उपयोग असा आहे की तो इट् आगम स्वस्वरूपानें कायम राहावा. म्हणजे त्या इडागमाच्या स्वरूपांत बदल करणारें असें जें दुसरें कार्य प्राप्त होतें तें करूं नये.

दुसरें काय प्राप्त होत आहे ?

गुण प्राप्त होत आहे.

जर इडागम हा स्वरूपांतच राहतो असा नियम केला तर पिपठिस् या सन्नन्त धातूहून सर्वापहारी क्विप् वगैरे प्रत्यय करून अतोलोप केला असतां पिपठीः येथें 'र्वोरुपधायाः (८।२।७६) यानें दीर्घ होत असतो तो होणार नाहीं.[९]

५. क्ङिति च हा निषेध प्रवृत्त होण्याला प्रकृति अमुकच पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. प्रत्यय मात्र कित् किंवा ङित् असलाच पाहिजे म्हणून क्ङिति च हा निषेध प्रत्ययावर अवलंबून आहे असें सिद्ध होतें.

६. कारण दीधी आणि वेवी या धातूंना कोणताही प्रत्यय केला असला तरी गुण होत नाहीं असा याचा अर्थ आहे.

७. अदीधयुः येथें दीधीवेवीटाम् हा प्रकृतनिषेध येतो आणि अबिभयुः वगैरे उदाहरणांमध्यें येत नाहीं.

८. दीधी हा दुसऱ्या गणांतील धातु आहे. पुढें लेट् प्रत्यय, त्याला तिप् आदेश, मध्यें शप् विकरण प्रत्यय, त्याचा लुक्, लेटोडाटौ (३।४।९४) यानें तिप् प्रत्ययाला अट् आगम, प्रकृत सूत्रानें गुणाचा निषेध, आणि यण् करून दीध्यत् असें क्रियापद होतें. आतां प्रकृतसूत्र केलें नाहीं तर येथें विकरण प्रत्यय शप् न करतां व्यत्ययो बहुलम् (३।१।८५) यानें श्यन् प्रत्यय करून तो ङित् (१।२।४) असल्यामुळें 'क्ङिति च' या मागील सूत्रानेंच गुणाचा निषेध होतो. नंतर 'यीवर्णयो०' (७।४।५३) यानें ईकाराचा लोप करून दीध्यत् हें रूप साधतां येतें.

९. कारण पिपठिस् शब्दांतील इकार हा इडागमाचा आहे.

प्रत्ययः पिपठीः दीर्घत्वं न प्राप्नोति। नैष दोषः। आङ्गं यत्कार्यं तन्नियम्यते न चैतदाङ्गम्। अथवासिद्धं दीर्घत्वं तस्यासिद्धत्वान्नियमो न भवति ॥

## हलोऽनन्तराः संयोगः ॥१।१।७॥

अनन्तरा इति कथमिदं विज्ञायते। अविद्यमानमन्तरमेषामिति। आहोस्विद-विद्यमाना अन्तरैषामिति। किं चातः। यदि विज्ञायतेऽविद्यमानमन्तरमेषामित्य-वग्रहे संयोगसंज्ञा न प्राप्नोति। अप्स्विवत्यप् स्विति। विद्यते ह्यत्रान्तरम्। अथ विज्ञायतेऽविद्यमाना अन्तरैषामिति न दोषो भवति। यथा न दोषस्तथास्तु। अथवा पुनरस्त्वविद्यमानमन्तरमेषा-मिति। ननु चोक्तमवग्रहे संयोगसंज्ञा न प्राप्नोति अप्स्वित्यप् स्विति विद्यते ह्यत्रान्तरमिति। नैव दोषो न प्रयोजनम्॥

### संयोगसंज्ञायां सहवचनं यथान्यत्र ॥१॥

संयोगसंज्ञायां सहग्रहणं कर्तव्यम्।

---

हा दोष येत नाहीं. कारण 'अङ्गस्य (६।४।१) या अधिकारामध्यें हा नियम केला असल्यामुळें इडागमाच्या स्वरूपांत बदल करणारें जें अंगाधिकारामध्यें सांगितलेलें कार्य त्याचीच नियमानें व्यावृत्ति केली जाते. आणि 'र्वोरुपधायाः' (८।२।७६) हा दीर्घ तर अंगाधिकारामध्यें विहित नाहीं म्हणून नियमानें त्याची निवृत्ति होत नाहीं.

किंवा 'र्वोरुपधायाः' हा दीर्घ त्रैपादिक असल्यानें तो 'आर्धधातुकस्येट्' (७।२।३५) येथें केलेल्या त्या नियमाच्या दृष्टीनें असिद्ध आहे. तेव्हां त्या असिद्धत्वास्तव नियमानें त्याची व्यावृत्ति होणार नाहीं.

काय ? सूत्रांतील 'अनन्तराः' या पदाचा अविद्यमानः अन्तरं येषां='ज्यांच्यामध्यें बिलकुल अन्तर (मोकळी जागा सुद्धा) नाहीं अशीं व्यञ्जनें' असा अर्थ समजावयाचा किंवा अविद्यमाना अन्तरा येषां='ज्यांच्यामध्यें दुसरे वर्ण बिलकुल नाहींत अशीं व्यञ्जनें' असा समजावयाचा ?

या दोन तऱ्हेच्या अर्थांमध्यें काय फरक आहे ?

जर 'ज्यांच्यामध्यें बिलकुल जागा नाहीं अशीं व्यञ्जनें' हा अर्थ गृहीत धरला तर अवग्रह केला असेल तेथें संयोग संज्ञा होऊं शकत नाहीं; जसें 'अप्स्वित्यप्[2]—सु' वगैरे. येथें पकार आणि सु या शब्दांतील सकार या उभयतांमध्यें मोकळी जागा आहे. म्हणून त्या उभयतांना संयोगसंज्ञा प्राप्त होत नाहीं. आतां 'ज्यांच्यामध्यें दुसरे वर्ण बिलकुल नाहींत अशीं व्यञ्जनें' हा अर्थ गृहीत धरला तर वरील दोष येत नाहीं.

तर मग ज्या प्रकारें दोष येणार नाहीं तसेंच असूं दे.

अथवा 'ज्यांच्यामध्यें बिलकुल मोकळी जागा नाहीं अशीं व्यञ्जनें' हा अर्थ घेतला तरी चालेल.

पण तसें गृहीत धरलें तर अवग्रह केला असेल तेथें म्हणजे अप्स्वित्यप्—सु येथें पकार आणि सुशब्दांतील सकार या उभयतांमध्यें मोकळी जागा असल्यानें त्यांना संयोगसंज्ञा प्राप्त होत नाहीं असा दोष पूर्वी दिला आहे ना ?

वरील उदाहरणीं संयोगसंज्ञा झाली नाहीं म्हणून कांहीं दोष येत नाहीं. आणि झाली म्हणून कांहीं फायदा नाहीं.

(वा.१) संयोगसंज्ञेविषयीं सहशब्दाचें ग्रहण

---

१. अच् म्ह. स्वर ज्यांमध्यें नाहीं अशा अनेक हलांना म्ह. व्यंजनांना संयोगसंज्ञा होते.

२. ज्या ठिकाणीं एका पदाच्या आंत दुसरें अवांतर पद असतें, तेथें पदकालीं अवग्रह करण्याचा संप्रदाय आहे. अवग्रह म्हणजे जरा थोडा वेळ टाकून पुढील वर्णाचा उच्चार करणें. अप्सु या पदांतील अप् हें अवान्तरपद आहे. कारण 'स्वादिष्वसर्व०' (१।४।१७) यानें अप् या भागाला पदसंज्ञा झाली आहे.

हलोऽनन्तराः संयोगः सहेति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। सहभूतानां संयोगसंज्ञा यथा स्यादेकैकस्य मा भूदिति। यथान्यत्र। तद्यथान्यत्रापि यत्रेच्छति सहभूतानां कार्यं करोति तत्र सहग्रहणं। तद्यथा। सह सुपा [२.१.४]। उभे अभ्यस्तं सहेति। किं च स्याद्यद्येकैकस्य हलः संयोगसंज्ञा स्यात्। इह निर्यायात् निर्वायात् वान्यस्य संयोगादेः [६.४.६८] इत्येत्वं प्रसज्येत। इह च संह्वषीष्टेत्यृतश्च संयोगादेः [७.२.४३] इतीट् प्रसज्येत। इह च संह्वियत इति गुणोऽर्तिसंयोगाद्योः [७.४.२९] इति गुणः प्रसज्येत। इह च दृषत्करोति समित्करोतीति संयोगान्तस्य लोपः प्रसज्येत। इह च शक्ता वस्तेति स्कोः संयोगाद्योः [८.२.२९] इति लोपः प्रसज्येत। इह च निर्यातः निर्वातः संयोगादेरातो धातोर्यण्वतः [८.२.४३] इति निष्ठानत्वं प्रसज्येत॥ नैष दोषः। यत्तावदुच्यत इह तावन्निर्यायात् निर्वायात् वान्यस्य संयोगादेरित्येत्वं प्रसज्येतेति नैवं विज्ञायते संयोग आदिर्यस्य सोऽयं संयोगादिः संयोगादेरिति। कथं तर्हि। संयोगावादी यस्य सोऽयं संयोगादिः संयोगादेरिति। एवं तावत्सर्वमाङ्गं परिहृतम्॥ यदप्युच्यत इह च

करावें. म्हणजे 'हलोऽनन्तराः संयोगः सह' असा सूत्रपाठ करावा?

याचें काय फळ?

सगळ्यांना मिळून संयोगसंज्ञा व्हावी व प्रत्येकाला निरनिराळी न व्हावी. ज्याप्रमाणें इतर ठिकाणीं अनेकांना मिळून कार्य व्हावें असें आचार्य इच्छितो तेथें सहशब्दाचें ग्रहण करतो. तें जसें—'सह सुपा' (२।१।४) 'उभे अभ्यस्तं सह[३]' (६।१।५). येथें अनेक सुबन्तांना मिळून समाससंज्ञा आणि दोघांना मिळून अभ्यस्तसंज्ञा होण्यासाठीं सहशब्द व 'उभ'शब्द सूत्रामध्यें घातला आहे.

पण जर प्रत्येकाला निरनिराळीं संयोगसंज्ञा झाली तर काय वरें बिघडेल?

निर्यायात्, निर्वायात् येथें रेफाच्या सांनिध्यानें यकाराला संयोगसंज्ञा आहे म्हणून 'वाऽन्यस्य संयोगादेः' (६।४।६८) यानें एत्व प्रसक्त होईल. तसेंच संह्वषीष्ट येथें अनुस्वाराला असिद्धत्व असल्यामुळें मकाराच्या सान्निध्यानें ह्कार हा संयोग होत आहे म्हणून 'ऋतश्च संयोगादेः' (७।२।४३) यानें इडागम प्रसक्त होईल. संह्वियते येथेंही 'गुणोऽर्तिसंयोगादेः' (७।४।२९) यानें गुण प्रसक्त होईल. दृषत्करोति समित्करोति येथेंही ककारसान्निध्यानें तकार हा संयोग होत आहे म्हणून 'संयोगान्तस्य लोपः' (८।२।२३) यानें तकाराचा लोप प्रसक्त होईल. तसेंच शक्ता वस्ता येथें तकार झल् पुढें असतां मागील ककार व सकार संयोग होत असून तो आदि आहे म्हणून 'स्कोः संयोगाद्योः' (८।२।२९) यानें ककार व सकार यांचा लोप प्रसक्त होईल. आणि निर्यातः निर्वातः येथेंही 'संयोगादेरातो धातोः' (८।७।४) यानें निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकारादेश प्रसक्त होईल.

हा दोष येत नाहीं. निर्यायात् येथें 'वाऽन्यस्यसंयोगादेः' यानें एत्व प्रसक्त होईल असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर—'संयोगादेः' येथें संयोगः आदिर्यस्य (एक संयोग आहे आरंभीं ज्याच्या) असा समास सोडवावयाचा नाहीं. तर कसा सोडवावयाचा? संयोगौ आदी यस्य (दोन संयोग आहेत आरंभीं ज्याच्या तो संयोगादि) असा सोडवाववयाचा. तेव्हा दोन संयोग आकारान्त धातूच्या आरंभीं नसल्यानें वरील उदाहरणामध्यें एत्व होत नाहीं. या रीतीनें संह्वषीष्ट, संह्वियते येथें प्रसक्त झालेल्या अंगकार्यांचा म्ह. अनुक्रमें इडागम आणि

३. हा सहशब्द वार्तिककारांनीं घातला आहे.

दृषत्करोति समित्करोतीति संयोगान्तस्य लोपः प्रसज्येतेति नैवं विज्ञायते संयोगोऽन्तो यस्य तदिदं संयोगान्तं संयोगान्तस्येति । कथं तर्हि । संयोगावन्तावस्य तदिदं संयोगान्तं संयोगान्तस्येति ॥ यदप्युच्यत इह च शक्ता वस्तेति स्कोः संयोगाद्योरन्ते चेति लोपः प्रसज्येतेति नैवं विज्ञायते संयोगावादी संयोगादी संयोगाद्योरिति । कथं तर्हि । संयोगयोरादी संयोगादी संयोगाद्योरिति । यदप्युच्यत इह च निर्यातः निर्वात इति संयोगादेरातो धातोर्यण्वत इति निष्ठानत्वं प्रसज्येतेति नैवं विज्ञायते संयोग आदिर्यस्य सोऽयं संयोगादिः संयोगादेरिति । कथं तर्हि । संयोगावादी यस्य सोऽयं संयोगादिः संयोगादेरिति ॥ कथं कृत्वैकैकस्य संयोगसंज्ञा प्राप्नोति । प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति । तद्यथा । वृद्धिगुणसंज्ञे प्रत्येकं

---

गुण यांचा परिहार होईल.

आणखीही जें म्हटलें आहे की दृषत्करोति, समित्करोति येथें ककार संनिध असतां तकाराचा 'संयोगान्तस्य' (८।२।२३) यानें लोप प्रसक्त होईल, त्यावर उत्तरः— संयोगः अन्तो यस्य संयोगान्तं, तस्य (एक संयोग आहे शेवटीं ज्याच्या तें संयोगान्त पद, त्याचा) असा समास सोडवावयाचा नाहीं तर कसा सोडवावयाचा ? संयोगौ अन्तौ यस्य तत् संयोगान्तं, तस्य (दोन संयोग आहेत शेवटीं ज्याच्या तें संयोगान्त पद, त्याचा) असा सोडवावयाचा. तेव्हां दृषत् किंवा समित् या पदाच्या शेवटीं संयोग दोन नसल्यामुळें संयोगान्तलोप येऊं शकत नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे की शक्ता, वस्ता येथें 'स्कोः संयोगाद्योः' (८।२।२९) यानें ककार व सकार यांचा लोप प्रसक्त होईल त्यावर उत्तरः— संयोगाद्योः येथें संयोगौ च तौ आदी च संयोगादी, तयोः(संयोग नांव पावलेला आणि आदि असा सकार किंवा ककार, त्यांचा) असा समास सोडवावयाचा नाहीं. तर कसा ? संयोगयोः आदी संयोगादी, तयोः (दोन संयोगांपैकीं पहिला सकार किंवा ककार, त्यांचा) असा सोडवावयाचा. तेव्हां शक्ता, वस्ता येथें झल् पुढें असतां त्याच्यामागें दोन संयोग नसल्यामुळें संयोगादिलोप प्राप्त होऊं शकत नाहीं.

आणखीही जें निर्यातः निर्वातः येथें 'संयोगादेरातो धातोर्य०' (८।२।४३) यानें निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार प्रसक्त होईल असें म्हटलें आहे त्यावर उत्तरः— संयोगादेः येथें संयोगः आदिर्यस्य संयोगादिः- तस्मात् (एक संयोग आहे प्रारंभीं ज्याच्या अशा यण्वान् आकारान्त धातूहून) असा समास सोडवावयाचा नाहीं. तर मग कसा सोडवावयाचा ? संयोगौ आदी यस्य संयोगादिः, तस्मात् (दोन संयोग आहेत प्रारंभीं ज्याच्या, अशा आकारान्त यण्वान् धातूहून) असा सोडवावयाचा. तेव्हां निर्यातः निर्वातः येथें आकारान्त असून यण्वान् असलेल्या धातूच्या आरंभीं दोन संयोग नसल्यामुळें त्याच्यापुढील तकाराला नकारादेश होत नाहीं.

पण ज्यांच्यामध्यें दुसरा विजातीय वर्ण नाहीं, अशा अनेक व्यंजनांच्या समुदायाला सांगितलेली संयोग संज्ञा त्या समुदायांतील प्रत्येक व्यंजनाला कशी बरें प्राप्त होऊं शकते ?

वाक्यांतील विधेयाचा संबंध उद्देश्यांतील प्रत्येकाशीं केलेला दृष्टीस पडतो; जसें—वृद्धिसंज्ञा किंवा गुणसंज्ञा अनुक्रमें आ, ऐ, औ आणि अ, ए, ओ, यांना सांगितलेली त्या तिघांतील प्रत्येकाला होते. या दृष्टान्तानें ज्याच्यामध्यें विजातीय वर्ण नाहीं अशा अनेक व्यञ्जनांच्या समुदायाला उद्देशून सांगितलेली संयोगसंज्ञा त्या समुदायांतील प्रत्येक अवयवाला प्राप्त होते.

पण पूर्वोक्त दृष्टान्ताच्या उलट असाही हा पुढील दृष्टान्त आहेः—वाक्यांतील विधेयाचा

भवतः । ननु चायमप्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति । तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति । सत्येतस्मिन्दृष्टान्ते यदि तत्र प्रत्येकमित्युच्यत इहापि सहग्रहणं कर्तव्यम् । अथ तत्रान्तरेण प्रत्येकमिति वचनं प्रत्येकं वृद्धिगुणसंज्ञे भवत इहापि नार्थः सहग्रहणेन ॥

अथ यत्र बहूनामानन्तर्यं किं तत्र तयोर्द्वयोः संयोगसंज्ञा भवत्याहोस्विदविशेषेण । कश्चात्र विशेषः ।

**समुदाये संयोगादिलोपो मस्जेः ॥२॥**

समुदाये संयोगादिलोपो मस्जेर्न सिध्यति । मङ्क्त्वा मङ्क्तुम् ॥ इह च निर्ग्लेयात् निर्ग्लायात् निर्म्लेयात् निर्म्लायात् वान्यस्य संयोगादेरित्येत्वं न प्राप्नोति । इह च सं-

संबंध उद्देश्यांतील प्रत्येक अवयवांना न करतां सगळ्यांना मिळून केलेला दृष्टीस पडतो. तें असें:—गर्ग नांवाच्या लोकांपासून शंभर रुपये दंड घ्यावा असा हुकूम केला असतां सगळ्या गर्ग नांवाच्या लोकांकडून मिळूनच शंभर रुपये दंड घेतला जातो. जरी राजे लोक द्रव्याविषयीं अगदीं हपापलेले असतात तरीसुद्धां गर्ग नांवाच्या प्रत्येक व्यक्तीपासून निरनिराळा शंभर रुपये दंड घेत नाहींत.[४] यावरून वाक्यांतील मुख्य विधेयाचा संबंध उद्देश्यांतील घटक अवयवांना सगळ्यांना मिळूनही होऊं शकतो. तेव्हां विजातीय वर्णरहित अशा अनेक व्यंजनांच्या समुदायाला उद्देशून सांगितलेली संयोगसंज्ञा सगळ्या व्यंजनांना मिळून होईल. प्रत्येकाला होणार नाहीं. आतां हा दृष्टान्त आहे म्हणून जर गुणवृद्धिसंज्ञेचे ठिकाणीं 'प्रत्येक' हा शब्द घातला जाईल, तर प्रकृत संज्ञेचे ठिकाणींही सहशब्द घालावा लागेल. आणि जर तेथें प्रत्येक हा शब्द घातल्यावांचून गुणवृद्धिसंज्ञा प्रत्येकाला होतात तर येथेंही सहशब्द घालण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं.

आतां जेथें बहुत व्यंजनें विजातीय वर्णरहित अशीं आहेत तेथें काय दोघांदोघांला मिळून संयोगसंज्ञा होते, अथवा सगळ्यांना मिळून होते, या दोन तऱ्हांमध्यें काय विशेष आहे ?

(वा.२) संनिहित असलेल्या सगळ्या व्यंजनांना मिळून संयोगसंज्ञा होत असेल, तर मस्ज धातूंतील सकाराचा संयोगादिलोप होणार नाहीं.[५] जसें—मङ्क्त्वा मङ्क्तुम्. तसेंच निर्ग्लेयात्, निर्ग्लायात्, निर्म्लेयात्, निर्म्लायात् येथें उपसर्गांतील रेफापासून तीन व्यंजनांच्या समुदायाला संयोगसंज्ञा झाली असतां तो संयोग अंगाचा आदि होत नाहीं. कारण रेफ हा अंगाच्या बाहेरचा आहे. आणि जो गकारादि किंवा मकारादि दोन व्यंजनांचा समुदाय अंगाचा आदि आहे तो संयोग होऊं शकत नाहीं. म्हणून 'वाऽन्यस्य संयोगादेः' (६।४।६८) यानें एत्व येऊं शकत नाहीं. याचप्रमाणें

४. कारण गर्ग अनेक आहेत; म्हणून यांना अनुसरून अनेक शतांची कल्पना करणें म्ह. शतं या पदाचा शतंशतं असा वीप्सायुक्त अर्थ लक्षणेनें घेणें हे योग्य नाहीं. कारण दंडधातूचीं जीं गर्ग आणि शत हीं दोन कर्मे, त्यांमध्यें शताला मुख्यत्व आहे. राजे लोक द्रव्येच्छु असल्यामुळें 'गर्गाः शतं दण्डयन्ताम्' अशी आज्ञा करतांना ते गर्गापेक्षां शताला महत्व समजतात. तेव्हां मुख्याला अनुसरून गौणवस्तूसंबंधानें कांहीं कल्पना करणें झाल्यास तें शक्य होईल व त्यामुळें गौणाला थोडा कमीपणा आला तरी चालेल. पण गौणाला जुळण्याकरितां मुख्य वस्तूसंबंधानें मात्र तशी कांही कल्पना करणें योग्य होणार नाहीं.

५. येथें मस्ज धातूला 'मस्जिनशो०' (७।१।६०) यानें नुम् आगम झाला तो 'मिदचो०' (१।१।४७) या परिभाषेमुळें अकाराच्या पुढें झाला. त्यामुळें न्, ज्, स् या तीन व्यंजनांना मिळून संयोगसंज्ञा होईल. तेव्हां त्या संयोगाच्या प्रारंभीं नकार आहे, सकार नाहीं, म्हणून त्याचा लोप होणार नाहीं.

स्वरिषीष्टेत्यृतश्च संयोगादेरितीण्न प्राप्नोति। इह च संस्वर्यत इति गुणोऽर्तिसंयोगाद्योरिति गुणो न प्राप्नोति। इह च गोमान्करोति यवमान्करोतीति संयोगान्तस्य लोप इति लोपो न प्राप्नोति। इह च निर्ग्लानः निर्म्लान इति संयोगादेरातो धातोर्यण्वत इति निष्ठानत्वं न प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि द्वयोर्द्वयोः संयोगः।

## द्वयोर्हलोः संयोग इति चेद्द्विर्वचनम् ॥३॥

द्वयोर्हलोः संयोग इति चेद्द्विर्वचनं न सिध्यति। इन्द्रमिच्छति इन्द्रीयति। इन्द्रीयतेः सन् इन्दिद्रीयिषति। नन्द्राः संयोगादयः [६.१.३] इति दकारस्य द्विर्वचनं न प्राप्नोति ॥

## न वाज्विधेः ॥४॥

न वैष दोषः। किं कारणम्। अज्विधेः। न्द्राः संयोगादयो न द्विरुच्यन्ते। अजादेरिति वर्तते ॥ अथ यद्येव बहूनां संयोगसंज्ञाथापि द्वयोर्द्वयोः किं गतमेतदियता सूत्रेणाहोस्विदन्यतरास्मिन्पक्षे भूयः सूत्रं कर्तव्यम्। गतमित्याह। कथम्। यदा तावद्बहूनां संयोगसंज्ञा तदैवं विग्रहः करिष्यते। अविद्यमानमन्तरमेषामिति। यदा

---

संस्वरिषीष्ट, संस्वर्यते येथें अनुस्वाराला त्रैपादिकासिद्धत्व असल्यामुळें उपसर्गांतील मकाराच्या पुढील सकारादि दोन व्यञ्जनांचा समुदाय संयोग होत नसल्यानें अनुक्रमें 'ऋतश्च संयोगादेः' (७।२।४३) यानें इडागम, व 'गुणोऽर्तिसंयो०' (७।२।२९) यानें गुण प्राप्त होऊं शकत नाहीं. तसेंच गोमान् करोति, यवमान्करोति येथें पुढें ककार तिसरा असल्यामुळें नकार आणि तकार या दोन व्यञ्जनांचा समुदाय संयोगसंज्ञा पावत नसल्यामुळें संयोगान्तलोप (८।१।४३) येऊं शकत नाहीं. आणि निर्ग्लानः, निर्म्लानः येथें रेफांच्या पुढील गकारादि किंवा मकारादि दोन व्यंजनांचा समुदाय संयोग होऊं शकत नसल्यानें 'संयोगादेरातो' (८।२।४३) यानें निष्ठा-प्रत्ययांतील तकाराला नकारादेश प्राप्त होऊं शकत नाहीं.

असूं दे तर मग दोघांदोघांना संयोगसंज्ञा.

(वा.३) बहुत व्यंजनांचें आनन्तर्य असतां तेथें दोन व्यंजनांना देखील संयोगसंज्ञा होत असेल, तर इन्द्रीय या क्यजन्त धातूहून सन् प्रत्यय केला असतां इन्दिद्रीयिषति येथें नकाराच्या पुढील दकारादि दोन व्यंजनांच्या समुदायाला संयोगसंज्ञा झाल्यानें 'नन्द्राः संयोगादयः' (६।१।३) या निषेधामुळें दकारविशिष्टाला द्विर्वचन प्राप्त होऊं शकत नाहीं.

(वा.४) हा दोष येत नाहीं.

काय कारण?

अचा-(स्वरा-)वर अवलंबून द्विर्वचननिषेधविधि आहे म्हणून. 'अजादेर्द्वितीय०' (६।१।२) येथून अजादेः या पदाची येथें अनुवृत्ति आहे. आणि ती अच्च-असौ आदिश्च असा येथें कर्मधारय आहे. तेव्हां आद्यावयव-प्रथमावयवभूत अशा अचापुढील न, द, र यांना द्वित्वाचा निषेध केला जात आहे. प्रकृत उदाहरणामध्यें नकारानें व्यवहित असल्यामुळें दकार हा इ या आदि अचाच्या पुढें नाहीं यामुळें त्याला द्वित्वाचा निषेध होत नाहीं.

आतां अशा रीतीनें स्वररहित अशा बहुत व्यंजनांच्या समुदायाला संयोगसंज्ञा होवो, किंवा त्यांतील दोघांदोघांना होवो. पण काय? आहे एवढ्याच सूत्रावरून तो दोन प्रकारचा अर्थ लब्ध होत आहे किंवा एखाद्या अर्थाच्या वेळीं सूत्र मोठें करावें (वाढवावें) लागत आहे?

आहे एवढ्याच सूत्रावरून दोन्ही तऱ्हेचे अर्थ लब्ध होत आहेत असें म्हणतो. तें कसें? जेव्हां बहुत व्यंजनांच्या समुदायाला संयोगसंज्ञा करावयाची तेव्हां 'अविद्यमानं अन्तरं येषां' (ज्यांच्यामध्यें मोकळी सुद्धा जागा बिलकूल

द्वयोर्द्वयोस्तदैवं विग्रहः करिष्यते । अविद्यमाना अन्तरैषामिति । द्वयोश्चैवान्तरा काश्चिद्विद्यते वा न वा । एवमपि बहूनामेव प्राप्नोति । यान्हि भवानत्र षष्ठ्या प्रतिनिर्दिशत्येतेषामन्येन व्यवाये न भवितव्यम् । अस्तु तर्हि समुदाये संज्ञा । ननु चोक्तं समुदाये संयोगादिलोपो मस्जेरिति । नैष दोषः । वक्ष्यत्येतत् । अन्त्यात्पूर्वो मस्जेर्मिदनुषङ्गसंयोगादिलोपार्थमिति ॥ अथवाविशेषेण संयोगसंज्ञा विज्ञास्यते द्वयोरपि बहूनामपि । तत्र द्वयोर्या संयोगसंज्ञा तदाश्रयो लोपो भविष्यति । यदप्युच्यत इह च निर्ग्लेयात् निर्ग्लायात् निर्म्लेयात् निर्म्लायात् वान्यस्य संयोगादेरित्येत्वं न प्राप्नोतीत्यङ्गेन संयोगादिं विशेषयिष्यामः । अङ्गस्य संयोगादेरिति ।

---

नाहीं अशीं बहुत व्यंजनें) असा हा समास सोडविण्यांत येईल, आणि जेव्हां दोघादोघांना संयोगसंज्ञा करावयाची तेव्हां 'अविद्यमाना अन्तरा येषां' (ज्यांच्यामध्यें विजातीय वर्ण नाहीं अशीं दोन व्यञ्जनें) असा हा समास सोडविण्यांत येईल. मध्यें असणें किंवा नसणें हें दोघांवरच अवलंबून असतें.

ज्यांच्यामध्यें विजातीय वर्ण नाहीं अशीं दोन दोन व्यञ्जनें असें समजलें तरीसुद्धां बहुत व्यंजनें असतील त्या ठिकाणीं बहुत व्यंजनांच्या समुदायालाच संयोगसंज्ञा प्राप्त होत आहे. ज्या दोन दोन व्यंजनांमध्यें विजातीय वर्ण नाहीं तेथें दोन दोन शब्दानें निर्दिष्ट केलेलीं बहुत व्यंजनें विजातीय वर्णरहित होतात, त्यांमध्यें विजातीय वर्णानें व्यवधान असतां संयोगसंज्ञा न व्हावी. पण विजातीयानें व्यवधान नसतां एकाज्द्विर्वचनन्यायानें[६] बहुत व्यंजनांनाच संज्ञा प्राप्त होते तर मग बहुत व्यंजनांचें आनन्तर्य असल्या ठिकाणीं त्या व्यंजनांच्या समुदायालाच संयोगसंज्ञा असूं दे.

पण विजातीय वर्णरहित अशा बहुत व्यञ्जनांच्या समुदायालाच संयोगसंज्ञा झाली तर मङ्क्ता मङ्क्तुं येथें मस्ज धातूंतील सकाराचा संयोगादिलोप प्राप्त होऊं शकत नाहीं असा दोष पूर्वी दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'अनिदितां हल०' (६।४।२४) यानें नकाराचा लोप होण्यासाठीं मस्ज धातूंतील शेवटींच्या वर्णामागें मकारेत्संज्ञक आगम करावा असें पुढें 'मिदचोऽन्त्यात्' (१।१।४७) या सूत्रीं 'अन्त्यात्पूर्वो मस्जेः' या वार्तिकानें वार्तिककार सांगणार आहेत[७].

अथवा बहुत व्यञ्जनांचें आनन्तर्य असेल त्या ठिकाणीं समुदायालाच संयोगसंज्ञा करण्याविषयीं विशेष प्रमाण नसल्यामुळें समुदायाला आणि त्यांतील दोन दोन व्यञ्जनांनाही संज्ञा केली जाईल, त्यांत दोन व्यञ्जनांना जी संयोगसंज्ञा केली जाते तिच्यामुळें मस्ज धातूतील सकाराचा संयोगादिलोप होईल.

आणखीही जें 'निर्ग्लेयात् निर्ग्लायात् निर्म्लेयात् निर्म्लायात्' येथें 'वान्यस्य संयोगादेः' (६।४।६८) यानें एत्व प्राप्त होत नाहीं असें म्हटलें आहे त्यावर उत्तरः— संयोगरूप जो आदि=आद्यावयव त्याला 'अङ्गस्य' हें विशेष आम्ही लावीत आहोंत. अंगाचा संयोगरूपी जो आद्यावयव त्याच्या पुढील आकाराचे स्थानीं

---

६. निनेज या उदाहरणामध्यें एकाचाला द्वित्व करावयाचें तें नि, इ, निज् आणि इज् या चार एकाचांपैकीं कुणाला करावें असा संशय येतो. परंतु तेथें निज् याला द्वित्व केलें असतां कोणताही तेथील वर्ण द्वित्व केल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून निज् या समुदायालाच द्वित्व होतें. यालाच 'एकाज्द्विर्वचनन्याय' म्हणतात.

७. तेव्हां मस्ज धातूमधील सकाराच्या मागें नुम् आगम न होतां सकाराच्या पुढें होतो. तसा झाला म्हणजे स न ज असा संयोग होतो. आणि त्या संयोगाच्या आरंभीं सकार असल्यामुळें त्याचा लोप होण्याला कांहीं हरकत येत नाहीं.

एवं तावत्सर्वमाङ्गं परिहृतम् ।। यदप्युच्यत इह च गोमान्करोति यवमान्करोतीति संयोगान्तस्य लोप इति लोपो न प्राप्नोतीति पदेन संयोगान्तं विशेषयिष्यामः । पदस्य संयोगान्तस्येति ।। यदप्युच्यत इह च निर्ग्लानः निर्म्लान इति संयोगादेरातो धातोर्यण्वत इति निष्ठानत्वं नप्राप्नोतीति धातुना संयोगादिं विशेषयिष्यामः । धातोः संयोगादेरिति ।।

## स्वरानन्तर्हितवचनम् ।।५।।

स्वरैरनन्तर्हिता हलः संयोगसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । व्यव-

एत्व होतें असा अर्थ. याचा असा भावः— निर्ग्लेयात् वगैरे उदाहरणांमध्यें जरी तीन व्यञ्जनें आनन्तर्यानें व्यवस्थित आहेत, तरी संज्ञा ही कांहीं कार्य करण्याकरतांच करावयाची असा नियम असल्यानें, व संयोगरूप आद्याव-यव अंगाचाच घ्यावयाचा असल्यानें अंगाच्या बाहेरील व्यञ्जनाला धरून संयोगसंज्ञा एत्व करते वेळीं करतां येत नसल्यामुळें त्या तीन व्यञ्जनांतील उपयुक्त दोन व्यञ्जनांनाच संयो-गसंज्ञा प्रवृत्त होते. तेव्हां पूर्वोक्त उदाहरणीं एत्व होण्यास अडचण नाहीं. याच रीतीनें 'संस्वरिषीष्ट, संस्वर्यते' वगैरे स्थलीं दोषाचा परिहार होत आहे.

आणखीही जें म्हटलें आहे,—गोमान् करोति यवमान् करोति, येथें तकाराचा संयोगान्तलोप प्राप्त होत नाहीं; त्यावर उत्तरः—संयोगरूप अ-न्त्यावयवाला 'पदस्य' हें विशेषण आम्ही ला-वीत आहोंत. पदाचा जो संयोगरूप शेवटींचा अवयव त्याचा लोप होतो असा अर्थ. संयोग-रूप शेवटचा अवयव पदाचाच घ्यावयाचा असल्यानें गोमान्त् करोति येथें तीन व्यञ्जनां-च्या समुदायाला संज्ञा करून फळ मिळत नसल्यामुळें अर्थात् त्यांतील दोन व्यञ्जनांच्या-च समुदायाला संज्ञा होते. तेव्हां सदर उदाहरणीं तकाराचा संयोगान्तलोप होण्यास कांहींच अडचण नाहीं.[१०]

आणखीही जें निर्ग्लानः निर्म्लानः येथें संयोगादेरातो धातोः' (८।२।४३) यानें निष्ठा-तकाराला नकार आदेश प्राप्त होत नाहीं असें म्हटलें आहे त्यावर उत्तरः—संयोगरूप आद्यावयाला धातोः हें विशेषण आम्ही लागू करूं. तेव्हां संयोगरूप आद्यावयव धातूचाच घ्यावयाचा असल्यानें निर्ग्लानः वगैरे स्थळीं तीन व्यंजनांच्या समुदायाला संयोगसंज्ञा करण्यांत कांहींही उपयोग होत नसल्यामुळें अर्थात् त्यांतील दोन व्यंजनांनाच संज्ञा प्रवृत्त होते. तेव्हां वरील उदाहरणांमध्यें निष्ठातका-राला नत्व होण्यास कांहीं अडचण नाहीं.

(वा.५) ज्या व्यंजनांमध्यें स्वरानें व्यव-धान नाहीं अशीं व्यंजनें संयोग हें नांव पाव-तात असें वचन करावें.

काय कारण ?

---

८. तेव्हां अन्त्या (१।१।४७) पूर्वो मस्जेः हें वार्तिक करावयास नको.

९. बहुत व्यंजनांचा समुदाय असेल त्या ठिकाणीं त्या सर्व व्यंजनांना मिळूनच संयोगसंज्ञा होते, त्यांतील दोघांदोघांना होत नाहीं. या पक्षावर जे पूर्वीं दोष दाखविले आहेत त्यांचें निरसन येथून भाष्यकार करीत आहेत.

१०. भेत्ता या उदाहरणामध्यें भिद्+ता अशी स्थिति असतांना दकार आणि तकार या दोन व्यंज-नांच्या संयोगामुळें त्याच्यामागील इकाराला गुरु संज्ञा होते; लघु संज्ञा होत नाहीं. तेव्हां तेथें 'पुगन्त-लघूपध०' (७।३।८६) या सूत्रानें गुण होणार नाहीं. परंतु तेथें अंगस्य हें लघूपधा याचे विशेषण केलें म्हणजे तो दोष येत नाहीं. कारण विशेषणाच्या धोर-णानें विशेष्य ठरवावें लागतें. तेव्हां अंगस्य या विशेषणाच्या धोरणानें म्ह. अंगाच्या बाहेर दृष्टि न फेकतां लघूपधा आहे कीं नाहीं तें पाहावयाचें. त्या अंगांतील तकार नसल्यामुळें तो तकार येथें लघूपधा ठरवितांना नसल्यासारखाच समजला जातो; म्हणून दोष येत नाहीं. त्याप्रमाणें येथें संयोगाचें अंगस्य हें विशेषण केलें म्हणजे येथें संयोग कोणता तें ठर-वितांना अंगाच्या बाहेर दृष्टि टाकावयाची नाहीं. तेव्हां मागें निर् हा उपसर्ग असून संयोग पाहतांना नसल्यासारखाच होत आहे. म्हणून ग्लेयात् येथें जसें एत्व होतें तसेंच निर्ग्लेयात् येथेंही होईल. असा येथें भाष्यकारांचा अभिप्राय कांहीं लोक समजतात.

हितानां मा भूत् । पचति पनसम् ॥ ननु चानन्तरा इत्युच्यते तेन व्यवहितानां न भविष्यति ।

**दृष्टमानन्तर्यं व्यवहितेऽपि ॥६॥**

व्यवहितेऽप्यनन्तरशब्दो दृश्यते । तद्यथा । अनन्तराविमौ ग्रामावित्युच्यते तयोश्चैवान्तरा नद्यश्च पर्वताश्च भवन्ति ॥ यदि तर्हि व्यवहितेऽप्यनन्तरशब्दो भवत्यानन्तर्यवचनमिदानीं किमर्थं स्यात् ।

**आनन्तर्यवचनं किमर्थमिति चेदेकप्रतिषेधार्थम् ॥७॥**

एकस्य हलः संयोगसंज्ञा मा भूदिति । किं च स्याद्यद्येकस्य हलः संयोगसंज्ञा स्यात् । इयेष उवोष । इजादेश्च गुरुमतोऽनृच्छः [३.१.३६] इत्याम्प्रसज्येत ॥

**न वातज्जातीयव्यवायात् ॥८॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अतज्जातीयस्य व्यवायात् । अतज्जातियकं हि लोके व्यवधायकं भवति । कथं पुनर्ज्ञायतेऽतज्जातीयकं लोके व्यवधायकं भवतीति । एवं हि कंचित्कश्चित्पृच्छति । अनन्तरे एते ब्राह्मणकुले इति । स आह । नानन्तरे वृषल-

---

स्वरांनीं व्यवधान पावलेल्या व्यंजनांना संयोग हें नांव न मिळावें म्हणून. जसें—पचति. पनसम् येथें पकार वगैरे व्यंजनांच्या समुदायाला संज्ञा न व्हावी.

पण सूत्रामध्यें 'अनन्तराः' हा शब्द घातला असल्यानें स्वरांनीं व्यवहित व्यंजनांना संज्ञा येऊंच शकणार नाहीं.

(वा. ६) व्यवधान असतांही अनन्तर शब्दाचा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो. तें जसें—'अनन्तराविमौ ग्रामौ' हे दोन गांव शेजारीं शेजारीं आहेत असें म्हणतात, पण त्या दोन गांवांच्या मध्यंतरीं नदी, ओढा, पर्वत वगैरे असतातच. तेव्हां मध्यें स्वर असला तरी तीं व्यंजनें अनन्तर होत असल्यामुळें 'स्वरानन्तर्हितवचनम्' असें म्हटलें पाहिजे.

जर व्यवधान असतांही अनन्तर शब्द लागू होतो तर मग सूत्रांतील अनन्तर शब्दाचा काय बरें उपयोग ?

(वा.७) जेथें एकच व्यंजन आहे त्या व्यंजनाला संयोगसंज्ञा न व्हावी यासाठीं अनन्तर शब्द घातला आहे.

पण एका व्यञ्जनाला संयोगसंज्ञा झाली तर काय बरें बिघडेल ?

इयेष उवोख येथें धातूंतील षकार किंवा खकाराला संयोगसंज्ञा झाली असतां 'इजादेश्च गुरुमतो०' (३।१।३६) यानें आम्प्रत्यय होईल.[११]

(वा.८) पचति, पनसम् इत्यादि ठिकाणीं जो दोष दिला तो दोष येत नाहीं.

काय कारण ?

लोकामध्यें सजातीय पदार्थांमध्यें भिन्नजातीय पदार्थ आला असतां तो व्यवधायक होतो. तेव्हां दोन व्यंजनांच्या मध्यंतरीं स्वर असतां त्या दोन व्यंजनांना अन्तर शब्द लागू करतां येत नसल्यानें संयोगसंज्ञा होणार नाहीं. सबब 'स्वरानन्तर्हित' हें वचन करावयास नको.

पण सजातीय दोन पदार्थांमध्यें विजातीय पदार्थ आला असतां तो व्यवधायक होतो हें कशावरून बरें ठरविलें जातें ?

कोणी एक दुसऱ्याला असें विचारीत आहे की हीं दोन ब्राह्मणाचीं घरें शेजारीं आहेत काय ? त्यावर तो उत्तर देतो की ब्राह्मणांचीं तीं दोन घरें शेजारीं नाहींत. त्या दोन घरांच्या मध्यंतरीं शूद्राचें घर आहे. यावरून विजातीय मध्यें आलें असतां तें व्यवधायक होतें असें ठरतें.

---

११. इष् धातूमधील षकाराला संयोगसंज्ञा झाली तर 'संयोगे गुरु' (१।४।११) यानें मागील इकाराला गुरुसंज्ञा होईल, आणि तिच्यामुळें आम् प्रत्यय होईल.

कुलमनयोरन्तरेति। किं पुनः कारणं क्वचिदतज्जातीयकं व्यवधायकं भवति क्वचिन्न। सर्वत्रैव ह्यतज्जातीयकं व्यवधायकं भवभवति। कथमनन्तराविमौ ग्रामाविति। ग्रामशब्दोऽयं बह्वर्थः। अस्त्येव शालासमुदाये वर्तते। तद्यथा। ग्रामो दग्ध इति। अस्ति वाटपरिक्षेपे वर्तते। तद्यथा। ग्रामं प्रविष्ट इति। अस्ति मनुष्येषु वर्तते। तद्यथा। ग्रामो गतो ग्राम आगत इति। अस्ति सारण्यके ससीमके सस्थण्डिलके वर्तते। तद्यथा। ग्रामो लब्ध इति। तद्यः सारण्यके ससीमके सस्थण्डिलके वर्तते तमभिसमीक्ष्यैतत्प्रयुज्यते ऽनन्तराविमौ ग्रामाविति। सर्वत्रैव ह्यतज्जातीयकं व्यवधायकं भवति॥

## मुखनासिकावचनोऽनुनासिकः ॥१.१.८॥

किमिदं मुखनासिकावचन इति। मुखं

पण भिन्नजातीय पदार्थ मध्यें असतां तो क्वचित्स्थळीं व्यवधायक[१२] होतो आणि क्वचित्स्थळीं व्यवधायक होत नाहीं.[१३] याचें काय बरें कारण?

भिन्नजातीय पदार्थ मध्यें असतां तो सर्व ठिकाणीं व्यवधायक होतोच.

तर मग मध्यंतरीं नदी, डोंगर वगैरे असतांही अनन्तराविमौ ग्रामौ=(हे दोन गांव शेजारीं आहेत) असें कसें बरें म्हणतात?

ग्राम शब्द हा अनेक अर्थांचा[१४] आहे. उदा.—'अनेक घरें' या अर्थाला ग्राम शब्द दाखवितो. जसें—ग्रामो दग्धः. येथें ग्राम शब्दापासून 'अनेक घरें' हा अर्थ मनांत येतो. वाटपरिक्षेप म्ह. गांवकुसूं, खंदक, याही अर्थाला ग्राम शब्द दाखवितो. जसें—ग्रामं प्रविष्टः. येथें तटबंदीच्या आंत शिरला असा अर्थ मनांत येतो. गांवांतील माणसें या अर्थालाही दाखविणारा ग्राम शब्द आहे. जसें—ग्रायो गतः, ग्राम आगतः. गांव बाहेर पडला, गांव परत आला. येथें गांवांतील माणसें गेलीं व आलीं असा अर्थ मनांत येतो. तसेंच ज्यामध्यें झाडेंझुडपें व हद्द दर्शविणारे नदी, डोंगर वगैरे आणि चौफेर बांध असलेलीं शेतें वगैरे आहेत अशा सबंध प्रदेशालाही ग्राम शब्द दाखवितो. जसें—ग्रामो लब्धः. येथें पूर्वोक्त विशेषणांनीं युक्त असा गांव मिळाला असा अर्थ मनांत येतो. तेव्हां या शेवटच्या अर्थाचा जो ग्राम शब्द त्याला अनुलक्षून 'अनन्तराविमौ ग्रामौ' हे दोन गांव शेजारीं आहेत असें म्हटलें जातें. अशा अर्थानें वरील प्रयोग जुळून येत असल्यानें कुठेंही विजातीय पदार्थ मध्यें आला असतां तो व्यवधायक होतोच. तेव्हां दोन व्यंजनांमध्यें स्वर आला असतां तीं दोन व्यञ्जनें अनन्तर या नांवाला पात्रच नसल्यामुळें त्यांना संयोगसंज्ञा येऊंच शकत नाहीं. सबब 'स्वरानन्तर्हित' असें निराळें म्हणण्याची गरज नाहीं.

'मुखनासिकावचनः' हें शब्दस्वरूप कसें बनविलें आहे?

मुख आणि नासिका या दोन शब्दांच्या समाहारद्वंद्वानें 'मुखनासिक' हा शब्द तयार करून त्याचा वचन-(करणल्युडन्त) शब्दाशीं मुखनासिकं वचनमस्य या अर्थाच्या षष्ठीबहुव्रीहीनें 'मुखनासिकावचनः' असें रूप बनविलें

---

१२. शूद्राचें घर मध्यें असल्यामुळें ब्राह्मणांचीं घरें शेजारीं आहेत असें समजत नाहींत. तेव्हां येथें शूद्राचें घर व्यवधायक झालें.

१३. नदी, ओढा, पर्वत वगैरेमध्यें असले तरी दोन गांव शेजारीं आहेत असें समजतात. तेव्हां येथें नदी वगैरे भिन्न जातीचे पदार्थ व्यवधायक झाले नाहींत.

१४. ह्या अनेक अर्थांपैकीं शेवटचा अर्थ घेतला म्हणजे नदी, डोंगर वगैरे ग्राम शब्दाच्या अर्थापैकींच भाग असल्यामुळें दोन गांवांमध्यें त्यांनीं व्यवधान केलें आहे असें मुळींच म्हणतां येत नाहीं.

१. मुख आणि नासिका या दोघांच्या साह्यानें उच्चारलेल्या वर्णाला अनुनासिक म्हणावें.

च नासिका च मुखनासिकम्। मुखनासिकं वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः। यद्येवं मुखनासिकवचन इति प्राप्नोति। निपातनाद्दीर्घत्वं भविष्यति॥ अथवा मुखनासिकमावचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः। अथ किमिदमावचनमिति। ईषद्वचनमावचनं किंचिन्मुखवचनं किंचिन्नासिकावचनम्॥ मुखद्वितीया वा नासिका वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः। मुखोपसंहिता वा नासिका वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः॥ अथ मुखग्रहणं किमर्थम्। नासिकावचनोऽनुनासिक इतीयत्युच्यमाने यमानुस्वाराणामेव प्रसज्येत। मुखग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति॥ अथ नासिकाग्रहणं किमर्थम्। मुखवचनोऽनु-

---

आहे.

असें आहे तर मुखनासिकावचनः असें रूप न होतां 'मुखनासिकवचनः' असें रूप झालें पाहिजे.

पाणिनीनें 'मुखनासिकावचनः' असें रूप उच्चारल्यावरूनच नासिक शब्दाला दीर्घ होईल.

किंवा मागें आङ् लाविलेल्या वचन शब्दाशीं मुखनासिक शब्दाचा मुखनासिकमावचनमस्य या विग्रहाचा बहुव्रीहि समास केल्यानें मुखनासिकावचनः हें रूप बनविलें आहे असें समजावें.

पण आवचन हा शब्द काय अर्थ दाखवितो?

वचन शब्द उच्चारण्याचें साधन हा अर्थ दाखवितो. व आङ् शब्द ईषत्=किंचित् या अर्थाला दाखवितो. मिळून 'किंचिद्भाग उच्चारण्याचें साधन' या अर्थाला आवचनशब्द दाखवितो. म्हणजे मुखानें उच्चारलेला कांहीं भाग आणि कांहीं भाग नासिकेनें उच्चारिलेला असा एकंदर अर्थ होतो.

किंवा मुख शब्दाचा सहायवाचक द्वितीय शब्दाबरोबर नासिकारूप अन्य-पदार्थीं बहुव्रीहि करून मुखद्वितीया शब्दाचा नासिका-शब्दाबरोबर कर्मधारय करावयाचा. आणि 'शाकपार्थिवादीनां' या वार्तिकानें द्वितीया शब्दाचा लोप करावयाचा. त्या मुखनासिका शब्दाचा वचन शब्दाशीं बहुव्रीहि समास करून 'मुखनासिकावचनः' हें रूप बनविलें आहे.

अथवा मुखानें उपरक्त जी नासिका म्ह. नासिकेच्या जवळचा भाग तो ज्या वर्णाचा उच्चारण्याचें साधन आहे तो वर्ण मुखनासिकावचन होय.

आतां येथें जो मुख शब्द घातला आहे तो कशासाठीं?

'नासिकावचनोऽनुनासिकः' फक्त नासिकेनें उच्चारलेला तो अनुनासिक एवढेंच म्हटलें तर प्रातिशाख्यामध्यें प्रसिद्ध असलेले चार 'यम' नावाचे वर्ण किंवा अनुस्वार यांनाच संज्ञा होईल. वर्गांतील पंचम किंवा सानुनासिक स्वर वगैरेंना होणार नाहीं. मुख शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां नासिका शब्द घातला आहे तो

---

२. तेव्हां नासिका ही ज्या वर्णाच्या उच्चारण्याचें साधन मुखाच्या साहाय्यानें होतें, त्या वर्णाला मुखनासिकावचन असें म्हणतां येतें.

३. अनुनासिक वर्णाचा उच्चार करते वेळीं मुख आणि नासिका म्ह. टाळूच्या मागील नाकाच्या बाजूचें आंतील छिद्र या दोहोंमधील जो भाग त्याला जिव्हेचा स्पर्श होतो असें जें मत आहे त्या मतानें हें लिहिलें आहे.

४. कारण यम आणि अनुस्वार यांचें फक्त नासिका हें एकच स्थान आहे. कवर्ग, चवर्ग वगैरे पांचही वर्गांमधील पहिल्या चार वर्णांपैकीं कोणताहि वर्ण पूर्वी येऊन त्याच्यापुढें कोणत्याही वर्गांतील पांचवा वर्ण येईल तर तेथें त्या दोहोंमध्यें एक स्वतंत्र निराळा वर्ण केवळ नासिकेच्या सहायानें उच्चारला जातो. त्याला यम असें म्हणतात. हा यम वर्ण पूर्वीच्या वर्णासारखा असतो. म्ह. पूर्वीच्या वर्णासारखें या यमाचें आभ्यंतर बाह्य प्रयत्न असतात.

नासिक इतीयत्युच्यमाने कचटतपानामेव प्रसज्येत । नासिकाग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ मुखग्रहणं शक्यमकर्तुम् । केनेदानीमुभयवचनानां भविष्यति । प्रासादवासिन्यायेन। तद्यथा। केचित्प्रासादवासिनः केचिद्भूमिवासिनः केचिदुभयवासिनः । ये प्रासादवासिनो गृह्यन्ते ते प्रासादवासिग्रहणेन । ये भूमिवासिनो गृह्यन्ते ते भूमिवासिग्रहणेन । य उभयवासिनो गृह्यन्ते ते प्रासादवासिग्रहणेन भूमिवासिग्रहणेन च । एवमिहापि केचिन्मुखवचनाः केचिन्नासिकावचनाः केचिदुभयवचनाः । तत्र ये मुखवचना गृह्यन्ते ते मुखग्रहणेन । ये नासिकावचना गृह्यन्ते ते नासिकाग्रहणेन । य उभयवचना गृह्यन्त एव ते मुखग्रहणेन नासिकाग्रहणेन च । भवेदुभयवचनानां सिद्धं यमानुस्वाराणामपि प्राप्नोति । नैव दोषो न प्रयोजनम् । इतरेतराश्रयं तु भवति । केतरेतराश्रयता । सतोऽनुनासि-

---

कशासाठीं ?

मुखवचनोऽनुनासिकः' फक्त मुखानें उच्चारलेला तो अनुनासिक एवढेंच म्हटलें तर क च ट त प इत्यादिकांनाच संज्ञा होईल. वर्गांतील पंचम किंवा सानुनासिक स्वर यांना होणार नाहीं. नासिका शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

मुख शब्द काढून टाकला तरी चालेल.

पण तर मग आतां मुख आणि नासिका या उभतांमुळें उच्चारल्या जाणाऱ्या सानुनासिक स्वर किंवा ञ म ङ ण न वगैरे वर्णांना अनुनासिक संज्ञा कशी बरें होईल ?

प्रासादवासिन्यायानें त्यांनाही संज्ञा होईल.

तो न्याय असा.—एका वाड्यामध्यें कांहीं लोक माडीवर रहातात व कांहीं लोक तळमजल्यांत रहातात आणि कांहीं लोक माडीवर व तळमजल्यावर मिळून दोन्ही ठिकाणीं राहतात. त्यांत जे लोक माडीवर राहतात त्यांना माडीवर राहणारे याच शब्दानें ओळखतात, जे तळमजल्यांत राहतात त्यांना तळमजल्यांत राहणारे याच शब्दानें ओळखतात, आणि जे माडीवर व तळमजल्यांत दोन्ही ठिकाणीं राहतात, त्यांना माडीवर राहणारे किंवा तळमजल्यांत राहणारे अशा दोन्हीही शब्दांनीं ओळखतात. याप्रमाणें येथेंही कांहीं वर्ण मुखानें उच्चारले जातात, कांहीं वर्ण नासिकेनें उच्चारिले जातात आणि कांहीं वर्ण मुखानें व नासिकेनें असे उभयतांनीं उच्चारले जातात. त्यांत जे वर्ण मुखानें उच्चारले जातात त्यांना 'मुखानें उच्चारले जाणारे' या शब्दानें ओळखतात. जे नासिकेनें उच्चारिले जातात, त्यांना 'नासिकेनें उच्चारले जाणारे' याच शब्दानें ओळखतात आणि जे वर्ण मुखानें व नासिकेनें असे उभयतांनीं उच्चारिले जातात त्यांना 'मुखानें उच्चारले जाणारे' या शब्दानें किंवा 'नासिकेनें उच्चारले जाणारे' या शब्दानें अशा दोन्ही शब्दांनीं ओळखतात. तेव्हां मुख आणि नासिका या उभयतांनीं उच्चारिले जाणारे सानुनासिक स्वर किंवा पञ्चम वगैरेंना नासिकावचन हा शब्द प्रासादवासिन्यायानें लागू पडत असल्यामुळें मुख शब्द न घातला तरीही त्यांना संज्ञा होईल.

अशा रीतीनें मुख आणि नासिका या उभयतांनीं उच्चारलेल्या वर्णांना संज्ञा साधेल.

पण यम व अनुस्वार यांनाही संज्ञा प्राप्त होत आहे त्याची वाट काय ?

त्यांना संज्ञा झाली तरी कांहीं दोष येत नाहीं, आणि संज्ञा न करण्यांत कांहीं फायदाही होत नाहीं. पण विधिशास्त्राच्या ठिकाणीं अन्योन्याश्रय दोष येत आहे.

तेथें अन्योन्याश्रय दोष कसा येतो ?

सिद्ध असलेल्या अशा सानुनासिक वर्णाला

कस्य संज्ञया भवितव्यं संज्ञया च नामानुनासिको भाव्यते तदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च कार्याणि न प्रकल्पन्ते ।

**अनुनासिकसंज्ञायामितरेतराश्रय उक्तम् ॥१॥**

किमुक्तम् । सिद्धं तु नित्यशब्दत्वादिति । नित्याः शब्दा नित्येषु च शब्देषु सतोऽनुनासिकस्य संज्ञा क्रियते न संज्ञयानुनासिको भाव्यते । यदि तर्हि नित्याः शब्दाः किमर्थं शास्त्रम् । किमर्थं शास्त्रमितिचेन्निवर्तकत्वात्सिद्धम् । निवर्तकं शास्त्रम् । कथम् । आङस्मा अविशेषेणोपदिष्टोऽनुनासिकः । तस्य सर्वत्राननुनासिकबुद्धिः प्रसक्ता । तत्रानेन निवृत्तिः क्रियते । छन्दस्यचि परत आङोऽननुनासिकस्य प्रसङ्गेऽनुनासिकः साधुर्भवतीति ॥

## तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम् । १.१.९

तुलया संमितं तुल्यं । आस्यं च प्रयत्न-

---

संज्ञा केली जाते आणि संज्ञेनें अनुनासिक केले जातात. तेव्हां संज्ञेला अनुनासिकाच्या उत्पत्तीची गरज आहे, व अनुनासिकाच्या उत्पत्तीला संज्ञेची गरज आहे. म्हणून इतरेतराश्रय दोष होत आहे. आणि इतरेतराश्रयावर अवलंबून असलेलीं कार्यें तर अस्तित्वांत येऊं शकत नाहींत.

(वा.१) अनुनासिक संज्ञेविषयीं अन्योन्याश्रय दोष येतो खरा परंतु अन्योन्याश्रयाविषयीं पूर्वींच सांगितलें आहे.

काय सांगितलें आहे ?

सिद्धं तु नित्यशब्दत्वात् । (१.१.१, वा.९). शब्द हे नित्य आहेत. त्या नित्य शब्दांच्या ठिकाणीं सिद्ध असलेल्या अनुनासिकाला संज्ञा केली जाते. संज्ञेनें अनुनासिक उत्पन्न केला जात नाहीं.

पण जर शब्द हे नित्य आहेत, तर हें शास्त्र कशासाठीं केलें आहे ?

शास्त्र हें निवर्तक आहे (१.१.१. वा.१०). तें कसें ?

शिष्यांना उपदेश करतांना कांहीं एक विशेष न दाखवितां मोघम अनुनासिक असा आङ् उपदिष्ट केलेला[६] आहे. तेव्हां त्या अनुनासिक आङाची सर्व ठिकाणीं तशीच बुद्धि (ज्ञान) प्राप्त झाली. तेथें 'आङोऽनुनासिकश्छन्दसि' (६।१।१२६) या शास्त्रानें 'वेदामध्यें अच् (स्वर) पुढें असतां त्याच्यामागें अननुनासिक असा आङ् न उच्चारतां अनुनासिक आङ् उच्चारावा, असें सांगण्यानें अनुनासिक आङाची बुद्धि निवृत्त केली जाते.

तुल्यास्यप्रयत्नं हा समास कसा सोडवावयाचा ? तुला म्ह. तागडी. तुला शब्दाहून संमित म्ह. मोजलेले या अर्थीं 'नौवयोधर्म०' (४-४-९०) या सूत्रानें यत्प्रत्यय करून सदृश या अर्थाचा तुल्य शब्द बनविला आहे. आस्य आणि प्रयत्न या शब्दांच्या द्वंद्वसमासाला 'जातिरप्रा०' (२।४।६) यानें एकवद्भाव करून आस्यप्रयत्नं हा शब्द बनविला आहे. तुल्य आणि आस्यप्रयत्न या शब्दांचा तुल्यं आस्यप्रयत्नं यस्य असा बहुव्रीहि समास केला

---

५. आङोऽनुनासिकश्छन्दसि (६।१।१२६) या सूत्रानें 'अभ्र आँ अपः' येथें मूळ निरनुनासिक आ याला अनुनासिक म्ह. आँ असा आदेश झाला आहे. आतां येथें अनुनासिक कुणाला म्हणावें तें प्रकृत सूत्रावरून समजल्यानंतरच आङोनुना० यानें अभ्र आँ येथें अनुनासिक करतां येईल. आणि तो आँ असा आदेश झाल्यानंतरच त्याला प्रकृत सूत्रानें अनुनासिक संज्ञा करतां येते. एवंच संज्ञा झाली म्हणजे अनुनासिक होणार आणि अनुनासिक झाल्यानंतर त्याला संज्ञा होणार. तेव्हां कांहींच सिद्ध होत नाहीं असा अन्योन्याश्रयदोष येतो.

६. प्रादयः (१।४।५८) येथें प्र, परा, इत्यादि प्रादिगण सांगतांना आङ् असें पाणिनीनें गणपाठामध्यें सांगितलें आहे.

१. तालु, कंठ वगैरे मुखांतील स्थानें आणि आभ्यंतर प्रयत्न हे दोन्ही ज्या दोन वर्णांचे अगदीं सारखे जुळत असतील ते दोन वर्ण एकमेकांचे सवर्ण असे समजावेत.

आस्यप्रयत्नम्। तुल्यास्यं तुल्यप्रयत्नं च सवर्णसंज्ञं भवति॥ किं पुनरास्यम्। लौकिकमास्यमोष्ठात्प्रभृति प्राक्काकलकात्। कथं पुनरास्यम्। अस्यन्त्यनेन वर्णानित्यास्यम्। अन्नमेतदास्यन्दत इति वास्यम्॥ अथ कः प्रयत्नः। प्रयतनं प्रयत्नः। प्रपूर्वाद्यततेर्भावसाधनो नङ्प्रत्ययः॥ यदि लौकिकमास्यं किमास्योपादाने प्रयोजनं सर्वेषां हि तत्तुल्यं भवति। वक्ष्यत्येतत्। प्रयत्नविशेषणमास्योपादानमिति॥

**सवर्णसंज्ञायां भिन्नदेशेष्वतिप्रसङ्गः प्रयत्नसामान्यात् ॥१॥**

सवर्णसंज्ञायां भिन्नदेशेष्वतिप्रसङ्गो भवति। जबगडदशाम्। किं कारणम्। प्रयत्नसामान्यात्। एतेषां हि समानः प्रयत्नः॥

**सिद्धं त्वास्ये तुल्यदेशप्रयत्नं सवर्णम् ॥२॥**

सिद्धमेतत्। कथम्। आस्ये येषां तुल्यो देशः प्रयत्नश्च ते सवर्णसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम्। एवमपि किमास्योपादाने प्रयोजनम् सर्वेषां हि तत्तुल्यं।

---

आहे. तेव्हां आस्य आणि प्रयत्न हे दोन्ही ज्या दोन वर्णांचे सारखे आहेत अशा प्रकारचे दोन वर्ण परस्पर सवर्णसंज्ञक होतात.

आस्य म्हणजे काय ?

ओष्ठापासून कंठमण्यापर्यंतचा मुख म्हणून लोकप्रसिद्ध असलेला अन्तर्गत प्रदेश, तें येथें आस्य होय.

या प्रदेशाला आस्य हा शब्द कसा लागला आहे ? 'अस्यन्त्यनेन वर्णान्' म्ह. ज्याच्या योगानें वर्ण बाहेर फेकले जातात म्ह. अभिव्यक्त होतात, या व्युत्पत्तीनें त्या प्रदेशाला आस्य शब्द लागतो. किंवा 'अन्नमेतद् आस्यन्दते' अन्न हें ज्याला द्रव उत्पन्न करतें या व्युत्पत्तीनें त्या प्रदेशाला आस्य शब्द लागतो. तेव्हां मुख म्हणून प्रसिद्ध असलेलें आस्य होय.

आतां, प्रयत्न म्हणजे काय ?

प्रयत्न म्ह. प्रयतन होय. येथें प्र-उपसर्गपूर्वक 'यती प्रयत्ने' या यत धातूहून 'यजयाचयत०'(३।३।९०) या सूत्रानें भावीं (धात्वर्थी) नङ् प्रत्यय केला आहे.

जर, मुख म्हणून लोकांमध्यें प्रसिद्ध असलेली वस्तु येथें आस्य शब्दानें विवक्षित आहे, तर सूत्रामध्यें आस्य शब्द घालण्यांत काय मतलब आहे ? कारण सर्व वर्णांना त्या मुखाची सारखीच जरूरी आहे.

प्रयत्न शब्दाला विशेषण देण्यासाठीं आस्य शब्द घातला आहे, असें पुढें सांगणार आहे.

(वा.१) निरनिराळ्या स्थानीं उत्पन्न होणारे ज ब ग ड द हे वर्ण परस्परांचे सवर्ण होतील.

काय कारण ?

जकारादि वर्णांचा प्रयत्न सारखा आहे म्हणून.

(वा.२) हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

'आस्ये तुल्यदेशप्रयत्नं सवर्णम्' असें सूत्र केलें म्हणजे हा दोष येत नाहीं.

ज्या वर्णांचा मुखांतील देश म्ह. स्थान आणि प्रयत्न सारखा आहे ते परस्परांचे सवर्ण होतात असें सूत्र केलें तरी आस्य शब्द घालण्यांत काय मतलब आहे ? कारण सर्व वर्णांना आस्याची म्ह. मुखाची जरूर सारखीच आहे.

---

२. तोंडांत अन्न घातलें असतां तत्काळ तोंडाला पाझर फुटतो (लाळ उत्पन्न होते). पहिल्या व्युत्पत्तीच्या वेळीं असु क्षेपणे या दिवादि (४) गणांतील अस धातूहून करण या अर्थी ण्यत् प्रत्यय केला आहे. दुसऱ्या व्युत्पत्तीच्या वेळीं आ या उपसर्गाच्या पुढें स्यन्द धातूहून कर्मणि ड प्रत्यय केला आहे. असा दोन तऱ्हेनें आस्य शब्द साधतां येतो. स्यन्द् धातु 'द्रवीभूत करणें' या अर्थी सकर्मक आहे. अकर्मकही स्यन्द् धातु आहे, त्याचा 'द्रवीभूत होणें' हा अर्थ आहे. त्या वेळीं कर्तरि ड प्रत्यय करावा. किंवा अन्न ज्या ठिकाणीं द्रवीभूत होतें, तें आस्य असाही अर्थ होतो. त्या वेळीं अधिकरण या अर्थी ड प्रत्यय केला आहे असें समजावें.

प्रयत्नविशेषणमास्योपादानम् । सन्ति ह्याऽस्याद्बाह्याः प्रयत्नाः । ते हापिता भवन्ति । तेषु सत्स्वसत्स्वपि सवर्णसंज्ञा सिध्यति । के पुनस्ते । विवारसंवारौ । श्वासनादौ । घोषवदघोषता । अल्पप्राणता महाप्राणतेति । तत्र वर्गाणां प्रथमद्वितीया विवृतकण्ठाः श्वासानुप्रदाना अघोषाः । एकेऽल्पप्राणा अपरे महाप्राणाः । तृतीयचतुर्थाः संवृतकण्ठा नादानुप्रदाना घोषवन्तः । एकेऽल्पप्राणा अपरे महाप्राणाः । यथा तृतीयास्तथा पञ्चमा आनुनासिक्यवर्जम् । आनुनासिक्यं तेषामधिको गुणः ॥ एवमप्यवर्णस्य सवर्णसंज्ञा न प्राप्नोति । किं कारणम् । बाह्यं ह्यास्यात्स्थानमवर्णस्य । सर्वमुखस्थानमवर्णमेक इच्छन्ति । एवमपि व्यपदेशो न प्रकल्पत आस्ये येषां तुल्यो देश इति । व्यपदेशिवद्भावेन व्यपदेशो भविष्यति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथा न्यासमेवास्तु । ननु चोक्तं सवर्णसंज्ञायां भिन्नदेशेष्वतिप्रसङ्गः प्रयत्न-

प्रयत्नाला विशेषण देण्यासाठीं आस्य शब्द घातला आहे. त्यामुळें जे प्रयत्न मुखाच्या बाहेरचे आहेत ते व्यावृत्त होतात. तेव्हां ते बाह्य प्रयत्न सारखे असोत किंवा नसोत, तरी सुद्धा सवर्ण संज्ञा होते.[३] ते बाह्य प्रयत्न कोणचे ? विवार व संवार, श्वास व नाद, घोष व अघोष, आणि अल्पप्राण व महाप्राण असे होत. त्यांमध्यें प्रत्येक वर्गांतील प्रथम आणि द्वितीय वर्ण यांचे विवार, श्वास, अघोष हे प्रयत्न आहेत. त्यांपैकीं पहिल्यांचा म्ह. प्रथम वर्णांचा अल्पप्राण प्रयत्न आहे. इतरांचा म्ह. दुसऱ्या वर्णांचे महाप्राण प्रयत्न आहे. तसेंच वर्गांतील तृतीय व चतुर्थ वर्ण यांचे संवाद, नाद, घोष असे प्रयत्न आहेत. व त्यांतील पहिले म्ह. तृतीय वर्ण, हे अल्पप्राण होत. आणि इतर म्ह. चतुर्थ वर्ण, हे महाप्राण होत. आणि वर्गांतील तृतीय वर्णांचे जे बाह्य प्रयत्न तेच वर्गांतील पञ्चम वर्णांचे प्रयत्न होत. मात्र त्या पंचम वर्णांच्या ठिकाणीं आनुनासिक्य हा एक अधिक गुण आहे.

बाह्य प्रयत्नांच्या व्यावृत्तीसाठीं आस्य शब्द विशेषणादाखल घातल्यानें 'क, ख वगैरे व एका वर्गांतील वर्ण परस्पर सवर्ण होणार नाहींत' हा दोष दूर झाला, तरी अठरा प्रकारचे 'अ'वर्ण हे एकमेकांचे सवर्ण होणार नाहींत. कारण, 'अ'वर्णाचें स्थान मुखाच्या बाहेर आहे.[४]

सगळेंच मुख अवर्णाचें स्थान होय असें कोणी म्हणतात.

असें गृहीत धरलें, तरी मुखामध्यें ज्यांचा तुल्यदेश हा व्यवहार जुळत नाहीं.

व्यपदेशिवदेकस्मिन्[५] या न्यायानें वरील व्यवहार जुळेल.

त्याप्रमाणें 'आस्ये तुल्यदेशप्रयत्नं' असें सूत्र केल्यानें जरी सर्व साधत आहे, तरी पण मूळ सूत्रांत बदल होत आहे त्याची वाट काय?

तर मग मूळचें आहे, तसेंच सूत्र असूं दे.

पण निरनिराळ्या स्थानांच्या ज ब ग ड द या वर्णांच्या ठिकाणीं सवर्णसंज्ञेची अति-

३. क ख ग घ ङ यांचे बाह्य प्रयत्न सारखे नाहींत, तरी सुद्धां ते पांच वर्ण एकमेकांचे सवर्ण समजले जातात. चवर्ग, टवर्ग, तवर्ग पवर्ग, यांमध्येंही असेंच समजावें.

४. अठरा प्रकारच्या अवर्णांचें कंठ हें स्थान सारखें आहे. परंतु मुखप्रदेशाच्या बाहेरचें तें स्थान असल्यामुळें सवर्णसंज्ञेच्या उपयोगीं पडणार नाहीं. आणि मुखप्रदेशाच्या आंत तर त्याचें दुसरें एखादें सारखें स्थान नाहीं. म्हणून अठरा प्रकारचें अवर्ण परस्पर सवर्ण होणार नाहींत असा दोष येतो.

५. अ. १ पा. १ सू. २१ टीप पाहा. तेव्हां 'मुख हें आपणच आपल्यामधील आहे' असें गृहीत धरून मुख हें स्थान सर्व अवर्णांचें सारखें होत असल्यामुळें ते परस्पर सवर्ण समजले जातील.

सामान्यादिति। नैष दोषः। न हि लौकिकमास्यम्। किं तर्हि। ताद्धितान्तमास्यम्। आस्ये भवमास्यम्। शरीरावयवाद्यत् [५.१.६]। किं पुनरास्ये भवम्। स्थानं करणं च। एवमपि प्रयत्नोऽविशेषितो भवति। प्रयत्नश्च विशेषितः। कथम्। न हि प्रयतनं प्रयत्नः। किं तर्हि। प्रारम्भो यत्नस्य प्रयत्नः। यदि प्रारम्भो यत्नस्य प्रयत्न एवमप्यवर्णस्य एङोश्च सवर्णसंज्ञा प्राप्नोति। प्रश्लिष्टावर्णावेतौ। अवर्णस्य तर्ह्यैचोश्च सवर्णसंज्ञा प्राप्नोति। विवृततरावर्णावेतौ। एतयोरेव तर्हि मिथः

प्रसक्ति येते[६] असा दोष पूर्वी दिला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण, मुख म्हणून प्रसिद्ध असलेलें वस्तु, येथें आस्य शब्दानें विवक्षित नाहीं.

तर काय विवक्षित आहे?

येथील आस्य शब्द तद्धितप्रत्ययान्त आहे. अर्थात् आस्ये भवं (मुखामध्यें असलेलें) या अर्थी 'शरीरावयवाच्च' (४।३।५५) यानें यत् प्रत्यय करून आस्य शब्द बनलेला आहे.

मुखामध्यें असलेलें तें काय?

ताल्वादिक स्थान आणि वर्णोच्चारणाच्या पूर्वी होणारे जिव्हेचे स्पर्श वगैरे हे येथें आस्य शब्दानें विवक्षित आहेत.

तद्धितान्त आस्य शब्दाचें ग्रहण केलें तरी आस्य आणि प्रयत्न या दोन शब्दांचा द्वंद्वसमास केला असल्यामुळें आस्य हें प्रयत्नाला विशेषण लागू होत नाहीं.

तरी पण विशेष प्रकारचा प्रयत्न मनांत येतो.

तो कसा?

कोणत्याही तऱ्हेचा प्रयत्न या अर्थाचा येथील प्रयत्न शब्द नाहीं. तर 'प्रारम्भो यत्नस्य' या व्युत्पत्तीनें प्रयत्नांमध्यें वर्णोत्पत्ति होण्याच्या पूर्वीचा यत्न आभ्यन्तर प्रयत्न या अर्थाचा येथें प्रयत्न शब्द आहे.

यत्नांमध्यें वर्णोत्पत्ति होण्याच्या पूर्वीचा यत्न, तो प्रयत्न असें गृहीत धरलें तरी अवर्ण आणि एङ् या परस्परांमध्यें सवर्ण संज्ञा प्राप्त होत[८] आहे.

मिसळलेल्या दूधपाण्याप्रमाणें ए, ओ, हे वर्ण अकार—इकार, व अकार—उकार यांनीं मिश्रित झालेले आहेत.

तर अवर्ण आणि ऐच् या परस्परांची सवर्णसंज्ञा प्राप्त होत[१०] आहे.

ऐ आणि औ हे वर्ण विवृततर प्रयत्नाच्या अवर्णानें युक्त आहेत. तेव्हां आभ्यन्तरप्रयत्न-साम्य[११] नसल्यामुळें त्या परस्परांमध्यें सवर्णसंज्ञा होत नाहीं.

तर ऐ आणि औ हेच परस्पर सवर्ण समजले जातील[१२].

६. कारण 'मुखांतील देश म्ह. स्थान सारखें पाहिजे' ही अट मूळ सूत्र ठेवण्यांत निघत नाहीं.

७. त्यामुळें प्रयत्न शब्दानें बाह्य प्रयत्नही येतील आणि क, ख, ग हे परस्पर सवर्ण होणार नाहींत.

८. एङ् म्ह. ए आणि ओ. या वर्णांतील पूर्वभाग जो अवर्णासारखा दिसतो, त्याचें स्थान आणि त्याचा प्रयत्न अकारासारखींच असल्यामुळें अर्थातच ए आणि त्याचा ओ यांचींही स्थान आणि प्रयत्न तींच म्ह. अकासारखींच असणार. म्हणून अ आणि ए तसेच अ आणि ओ हे परस्पर सवर्ण होतील.

९. तेव्हां त्यांतील पूर्वभाग कसा आहे तें कांहींच कळत नाहीं. म्हणून दोष येत नाहीं.

१०. ऐ आणि औ यांचा उच्चार करतांना दोन भागांचा उच्चार होतो व त्यांतील पूर्वभागाचा उच्चार अकारासारखा होतो असा अनुभव येतो. तो गृहीत धरून ही शंका केली आहे.

११. अकाराचा विवृत प्रयत्न आहे. विवृततर नाहीं. म्हणून अकार आणि ऐ औ यांचे प्रयत्न सारखे नाहींत.

१२. ऐ आणि औ या दोहोंमधील पूर्वभाग सारखाच विवृततर असल्यामुळें त्या दोन वर्णांचा विवृततर हा प्रयत्न सारखाच होत आहे.

सवर्णसंज्ञा प्राप्नोति । नैतौ तुल्यस्थानौ । उदात्तादीनां तर्हि सवर्णसंज्ञा न प्राप्नोति । अभेदका उदात्तादयः॥ अथवा किं न एतेन प्रारम्भो यत्नस्य प्रयत्न इति । प्रयतनमेव प्रयत्नस्तदेव च तद्धितान्तमास्यम् । यत्समानं तदाश्रयिष्यामः । किं सति भेदे । सतीत्याह । सत्येव हि भेदे सवर्णसंज्ञया भवितव्यम् । कुत एतत् । भेदाधिष्ठाना हि सवर्णसंज्ञा । यदि हि यत्र सर्वं समानं तत्र स्यात्सवर्णसंज्ञावचनमनर्थकं स्यात् । यदि तर्हि सति भेदे किंचित्समानमिति कृत्वा सवर्णसंज्ञा भविष्यति शकारछकारयोः षकारठकारयोः सकारथकारयोः सवर्णसंज्ञा प्राप्नोति । एतेषां हि सर्वमन्यत्समानं करणवर्जम् ॥ एवं तर्हि प्रयतनमेव प्रयत्नस्तदेव च तद्धितान्तमास्यं न त्वयं द्वन्द्व आस्यं च प्रयत्नश्चास्यप्रयत्नमिति । किं तर्हि । त्रिपदोऽयं

---

ऐकार व औकार यांचीं ताल्वादिक सर्व स्थानें सारखीं[१३] नाहींत.

तर मग उदात्त, अनुदात्त वगैरेमध्यें सवर्णसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

उदात्त अनुदात्त वगैरे गुण व्यक्तीचा भेद करूं शकत नाहींत. तेव्हां उदात्त, अनुदात्त हे गुण स्वतः निरनिराळ्या प्रकारचे असतील, तरी तद्युक्तांची सवर्णसंज्ञा होईल.

किंवा यत्नांमध्यें वर्णोत्पत्तीच्या पूर्वीचा यत्न, असा प्रयत्न शब्दाचा अर्थ गृहीत धरून आम्हांला काय करावयाचें आहे? तेव्हां सामान्य यत्न हाच प्रयत्न शब्दाचा खरा अर्थ, व तद्धितान्त आस्य शब्दाचा ताल्वादि स्थान हा पूर्वीचाच अर्थ असूं दे. त्यांत जो यत्न उभयतांचा सारखा असेल तेवढा घेऊन सवर्णसंज्ञा करतां येईल[१४].

पण काय, भेद असला तरी सवर्णसंज्ञा करणार?

होय, भेद असला तरी करणार असें म्हणतों. आणि भेद असतांच खरोखर सवर्णसंज्ञा होणारी आहे.

हें कशावरून?

भेदावर अवलंबूनच सवर्णसंज्ञा आहे म्हणून. जेथें सर्वच समान आहे तेथेंच सवर्णसंज्ञा अनर्थक होईल; तर सवर्णसंज्ञा सांगण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें होईल. तेव्हां वर्गांतील बाह्य प्रयत्न भिन्न असले तरी आभ्यन्तर प्रयत्न समान असल्यामुळें सवर्णसंज्ञा होईल.

जर भेद असतांही थोडासा सारखेपणा घेऊन सवर्णसंज्ञा होईल तर शकार आणि छकार, षकार आणि ठकार, सकार आणि थकार या परस्परांची सवर्णसंज्ञा प्रसक्त होते. आभ्यन्तरप्रयत्न खेरीज करून बाकीचें सर्व (बाह्य प्रयत्न आणि स्थान) या वर्णांचें समान आहे. आभ्यन्तरप्रयत्न मात्र तेवढे निराळे[१५] आहेत.

असें आहे तर प्रयत्न शब्दाचा सामान्य यत्न (दोन्ही प्रकारचे) हा अर्थ. आणि तद्धितान्त आस्य शब्दाचा आस्यभव ताल्वादिस्थान हा अर्थ असूं देच. पण आस्यं च प्रयत्नश्च 'आस्यप्रयत्नं' असा हा द्वंद्व समास नव्हे. तर 'तुल्यः आस्ये[१६] प्रयत्नः येषाम्' असा

---

१३. ऐकाराचीं स्थानें कंठ आणि तालु अशीं आहेत व औकाराचीं स्थानें कंठ आणि ओष्ठ अशीं आहेत.

१४. तेव्हां सूत्रामध्यें प्रयत्न शब्दानें बाह्य प्रयत्न सुद्धां जरी घेतले, व ते जरी क ख ग यांचे निराळे आहेत, तरी त्यांचा स्पृष्ट हा आभ्यंतर प्रयत्न सारखा असल्यामुळें सवर्णसंज्ञा होईल.

१५. श ष स यांचा आभ्यंतर प्रयत्न विवृत आहे. आणि छ ठ थ यांचा आभ्यंतर प्रयत्न स्पृष्ट आहे, तरी पण स्थान आणि बाह्य प्रयत्न हीं सारखीं असल्यामुळें सवर्णसंज्ञा होईल.

१६. आस्य हा शब्द तद्धितप्रत्ययांत असल्यामुळें मुखांतील तालु वगैरे स्थान असा त्याचा अर्थ आहे. आस्ये हें एकवचन घेतलें असल्यामुळें 'आस्ये' याचा 'मुखांतील एका स्थानामध्यें' असा अर्थ आहे.

बहुव्रीहिः । तुल्य आस्ये प्रयत्न एषामिति ॥ अथवा पूर्वस्तत्पुरुषस्ततो बहुव्रीहिः । तुल्य आस्ये तुल्यास्यः । तुल्यास्यः प्रयत्न एषामिति ॥ अथवा परस्तत्पुरुषस्ततो बहुव्रीहिः । आस्ये प्रयत्न आस्यप्रयत्नः । तुल्य आस्यप्रयत्न एषामिति ॥

तस्य । तस्येति तु वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । यो यस्य तुल्यास्यप्रयत्नः स तस्य सवर्णसंज्ञो यथा स्यात् । अन्यस्य तुल्यास्यप्रयत्नोऽन्यस्य सवर्णसंज्ञो मा भूत् ।

**तस्यावचनं वचनप्रामाण्यात् ॥३॥**

तस्येति न वक्तव्यम् । अन्यस्य तुल्यास्यप्रयत्नोऽन्यस्य सवर्णसंज्ञः कस्मान्न भवति । वचनप्रामाण्यात् । सवर्णसंज्ञावचनसामर्थ्यात् । यदि ह्यन्यस्य तुल्यास्यप्रयत्नोऽन्यस्य सवर्णसंज्ञः स्यात्सवर्णसंज्ञावचनमनर्थकं स्यात् ॥

**संबन्धिशब्दैर्वा तुल्यम् ॥४॥**

संबन्धिशब्दैर्वा पुनस्तुल्यमेतत् । तद्यथा संबन्धिशब्दाः । मातरि वर्तितव्यं पितरि शुश्रूषितव्यमिति । न चोच्यते स्वस्यां मातरि स्वस्मिन्वा पितरीति संबन्धाच्चैतद्गम्यते या यस्य माता यश्च यस्य पितेति । एवमिहापि तुल्यास्यप्रयत्नं सवर्णमित्यत्र संबन्धिशब्दावेतौ । तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यत्प्रति यत्तुल्यास्यप्रयत्नं तत्प्रति तत्सवर्णसंज्ञं भवतीति ॥

**ऋकारऌकारयोः सवर्णविधिः ॥५॥**

ऋकारऌकारयोः सवर्णसंज्ञा विधेया । होतृ ऌकारः होतॄकारः । किं प्रयोजनम् । अकः सवर्णे दीर्घः [६.१.१०१] इति दीर्घत्वं यथा स्यात् । नैतदस्ति प्रयो-

---

'तुल्यास्यप्रयत्नं' हा त्रिपदबहुव्रीहि आहे. तेव्हां शकार आणि छकार या उभयतांचा तालुस्थानांमध्यें असलेला प्रयत्न—आभ्यन्तर, तो भिन्न आहे, व जो बाह्य प्रयत्न त्या उभयतांचा तुल्य आहे, तो तालुस्थानांमध्यें नाहीं. म्हणून शकार व छकार या परस्परांची सवर्णसंज्ञा होत नाहीं. किंवा प्रथम 'तुल्यः आस्ये तुल्यास्यः' असा तत्पुरुष करून दुसरा 'तुल्यास्यः प्रयत्नो येषां' अशा अर्थाचा बहुव्रीहि करावा. किंवा 'आस्ये प्रयत्नः आस्यप्रयत्नः' असा पुढच्या पदांचा तत्पुरुष करून नंतर 'तुल्यः आस्यप्रयत्नो येषां' अशा अर्थाचा बहुव्रीहि करावा.

'तस्य' असें वचन करावें.

काय कारण ?

ज्याचीं ज्याच्याशीं स्थान व प्रयत्न सारखीं आहेत तो त्याचाच सवर्ण व्हावा. ज्याचीं एकाशीं स्थान व प्रयत्न सारखीं आहेत तो दुसऱ्याचा सवर्ण न व्हावा.

(वा.३) 'तस्य' हें वचन करावयास नको. तर मग ज्याचीं एकाशीं स्थानप्रयत्न सारखीं आहेत तो दुसऱ्याचा सवर्ण कां बरें होत नाहीं ? सवर्णसंज्ञाविधि केल्याचे जोरावर होत नाहीं. जर एकाशीं तुल्यास्यप्रयत्न असलेला वर्ण दुसऱ्याचा सवर्ण होईल तर सवर्णसंज्ञाविधिच मुळीं निष्फळ होईल.

(वा.४) किंवा संबन्धि शब्दासारखेंच हें आहे. तें जसें: आईविषयीं पूज्य भाव ठेवावा, बापाची सेवा करावी. येथें आई व बाप हे संबन्धिशब्द आहेत. तेथें जरी आपली आई किंवा आपला बाप असें सांगितलें जात नाहीं, तथापि जी ज्याची आई किंवा जो ज्याचा बाप हें आपल्या संबंधावरून जाणलें जातें. तसें येथेंही तुल्यास्यप्रयत्नं, सवर्ण, हे दोन संबन्धिशब्द आहेत. तेथें संबन्धावरून 'जो ज्याच्याशीं तुल्यास्यप्रयत्न आहे तो त्याचाच सवर्ण होतो' असें समजावें.

(वा.५) ऋकार आणि ऌकार हे दोन वर्ण एकमेकाचे सवर्ण समजावेत. कशासाठीं ? होतृ ऌकारः होतॄकारः येथें 'अकः सवर्णे' (६।१।१०१) येथें दीर्घ होण्यासाठीं.

**जनम् । वक्ष्यत्येतत् । सवर्णदीर्घत्वऋति ऋवावचनम्लृति लृवावचनमिति। तत्सवर्णे यथा स्यात् । इह मा भूत् दध्य्लृकारः मध्वॢकार इति । यदेतत्सवर्णदधित्व ऋतीत्येतदृत इति वक्ष्यामि । तत लृति । लृकारे च वा ॢभवति । ऋत इत्येव । तन्न वक्तव्यं भवति । अवश्यं तद्वक्तव्यम् । ऊकालोऽज्ह्रस्वदीर्घप्लुत-**

---

हें प्रयोजन होत नाहीं. कारण 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) येथें 'ऋति ऋ वा वचनम्, लृति ॡ वा वचनम्' असें वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे. म्ह. अकाहून ऋकार पुढें असतां पूर्वपरांचे स्थानीं द्विमात्रिक आणि ज्यामध्यें दोन रेफ आहेत असा स्वतंत्र ऋ आदेश होतो.[१७] तसेंच लृकार पुढें असतां पूर्वपरांचे स्थानीं द्विमात्रिक आणि ज्यामध्यें दोन लकार आहेत असा स्वतंत्र ॡ आदेश होतो. म्हणजे त्या वार्तिकांनींच तेथें द्विमात्रिक ऋकार किंवा लृकार होत असल्यामुळें ऋकार व लृकार यांच्या सवर्णसंज्ञेचें विधान करण्याचें कारण नाहीं.

पण तो द्विमात्रिक स्वतंत्र ऋकार किंवा लृकार सवर्ण पुढें असतांनाच होणार ना ? सवर्ण पुढें नसतां दध्य्लृकारः मध्व्लृकारः येथें तो होत नाहीं. तेव्हां त्याकरितांच का होईना, ऋकार लृकारांच्या सवर्णसंज्ञेचें विधान केलेंच पाहिजे.

अकः सवर्णे दीर्घः (६।१।१०१) या सूत्रार्धावरील 'ऋति ऋ वा वचनम्' या प्रथम वार्तिकांत जें ऋति असें पद आहे त्या पदाच्या ऐवजीं 'ऋतः' असें पञ्चम्यन्त पद योजण्यात येईल. तेथें सवर्ण पदाची अनुवृत्ति येते. ऋकाराचा सवर्ण ऋकारच असल्यानें ऋकाराहून ऋकारच पुढें असतां हें वचन प्रवृत्त होईल. त्यामुळें धात्रंशः येथें अतिप्रसंग येत नाहीं. त्याचे पुढें 'लृति ॡ वा' हें दुसरें वार्तिक. येथें सवर्णपदाची अनुवृत्ति करूं नये. 'ऋतः' या पञ्चम्यन्ताची अनुवृत्ति केली म्हणजे भागेल. कारण ऋकाराहून लृकार पुढें असतां द्विमात्रिक ॡ आदेश विकल्पानें होतो असा अर्थ झाल्यामुळें दध्य्लृकारः वगैरे ठिकाणीं दोष येत नाहीं. म्हणून ऋकार आणि लृकार या परस्परांच्या सवर्णसंज्ञेचें विधान करावयास नको.

पण सवर्णसंज्ञाविधायक प्रकृत वार्तिक केलें असतां 'ऋति ऋ वा' हें वार्तिकद्वय करावें लागत नाहीं. या वार्तिकद्वयानें विहित ऋ, ॡ हे दोन्ही दीर्घ आहेत. तेव्हां ऋकार पुढें असतां 'अकः सवर्णे०' (६।१।१०१) यानेंच एकदां द्विमात्रिक दोन रेफांचा स्वतंत्र ऋ होईल, व एकदां विवृत ऋकार दीर्घ होईल. असेंच लृकार पुढें असतां ऋकारलृकारांची सवर्णसंज्ञा असल्यानें एकदा द्विमात्रिक दोन लकारांचा स्वतंत्र लृकार होईल व एकदां विवृत ऋकार दीर्घ होईल.

सवर्णसंज्ञा सांगणारें प्रकृत वार्तिक केलें तरी 'ऋति ऋ वा' आणि 'लृति ॡ वा' हें वार्तिकद्वय अवश्य केलेंच पाहिजे. कारण 'ऊकालोऽज्०' (१।२।२७) यानें द्विमात्रिक अचाला दीर्घ संज्ञा विहित आहे. आणि

---

१७. ह्रस्व दीर्घ प्लुत मिळून अठरा प्रकारचा जो ऋकार प्रचारांत येतो तो विवृत प्रयत्नाचा आहे आणि त्या अठरामध्येंही पोटांत एकच रेफ आहे आणि ह्या वार्तिकानें सांगितलेला जो ऋकार हा त्या अठरांपेक्षां निराळा आहे. याचा प्रयत्न ईषत्स्पृष्ट आहे, याच्या मध्यें पोटांत दोन रेफ आहेत. त्या रेफांची मिळून एक मात्रा होते. आणि त्या दोन रेफांच्या सभोंवती असलेला अचासारखा जो भाग त्याची एक मात्रा होते. एकंदर ह्या वार्तिकानें सांगितलेला स्वतंत्र ऋकार दोन मात्रांचा आहे. पुढील लृति ॡ वा या वार्तिकानें सांगितलेला लृकारही असाच समजावा.

संज्ञो भवतीत्युच्यते न च ॠ लृकारो वाजस्ति । ॠकारस्य लृकारस्य चाच्त्वं वक्ष्यामि । तच्चावश्यं वक्तव्यं प्लुतो यथा स्यात् । होतृ ऋकारः होतॄकारः होतॄ३कारः होतृ लृकारः होतॢकारः होतॢ३कारः । किं पुनरत्र ज्यायः । सवर्णसंज्ञावचनमेव ज्यायः । दीर्घत्वं चैव हि सिद्धं भवति । अपि च ऋकारग्रहणलृकारग्रहणं संनिहितं भवति । यथेह भवति । ऋत्यकः [६.१.१२८] खट्व ऋश्यः माल ऋश्यः । इदमपि संगृहीतं भवति । खट्व लृकारः माल लृकार इति । वा सुप्यापिशलेः [६.१.९२] उपर्कारीयति उपार्कारीयति । इदमपि सिद्धं भवति । उपल्कारीयति उपाल्कारीयति ॥ यदि तर्ह्यृकारग्रहण लृकारग्रहणं संनिहितं भवत्युरणरपरः [१.१.५१] लृकारस्यापि रपरत्वं प्राप्नोति । लृकारस्य लप-

द्विमात्रिक दोन रेफांचा स्वतंत्र ॠ तसाच ॡ हा तर अच्[१८] नव्हे. तेव्हां द्विमात्रिक स्वतंत्र ऋकार किंवा ऌकार यांना दीर्घ असें म्हणतां येत नसल्यामुळें सूत्रानें ते होणार नाहींत. म्हणून वार्तिकद्वय केलें पाहिजे.

पण द्विमात्रिक स्वतंत्र जो ऋकार आणि ऌकार याला अच् संज्ञा करण्यांत[१९] येईल. आणि ती अच् संज्ञा तर अवश्य[२०] केली पाहिजे. होतृ ऋकारः होतॄकारः येथें, आणि होतृ ऌकारः होतॢकारः येथें वार्तिकानें झालेला जो द्विमात्रिक ऋकार आणि ऌकार त्याला प्लुत होऊन होतॄ३कारः होतॢ३कारः अशीं रूपें झालीं पाहिजेत म्हणून. तेव्हां दीर्घ संज्ञा झाल्यानें सूत्रानेंच द्विमात्रिक ऋकार ऌकाराचें विधान होत असल्यामुळें तें वार्तिकद्वय करावयास नको.

दोन्ही[२१] तऱ्हेनें इष्ट साधत असतां त्यामध्यें कोणती तऱ्हा स्वीकारणें श्रेयस्कर आहे ?

'ऋकारऌकारयोः' हें सवर्णसंज्ञाविधायकच वचन स्वीकारणें श्रेयस्कर आहे. कारण 'ऋति ॠ वा' इत्यादि वार्तिकद्वय केल्यावांचून द्विमात्रिक स्वतंत्र ऋकार ऌकार हे सूत्रानेंच दीर्घ म्हणून करतां येतात आणि अन्यत्रही ऋकारग्रहणानें ऌकाराचें ग्रहण होतें. तेव्हां खट्व ऋष्यः माल ऋष्यः येथें जसा 'ऋत्यकः' (६।१।१२८) यानें प्रकृतिभाव होतो तसा खट्व ऌकारः माल ऌकारः येथेंही तो होतो. तसेंच उप-ऋकारीयति=उपर्कारीयति, उपार्कारीयति येथें जशी 'वा सुप्यापिशलेः' (६।१-९२) यानें विकल्पानें वृद्धि होते तशी उप-ऌकारीयति-उपल्कारीयति-उपाल्कारीयति येथेंही ती होते.

जर सर्वत्र ऋकारग्रहणानें ऌकारांचें ग्रहण होईल तर 'उरण् रपरः' (१।१।५१)[२२] यानें ऌकारालाही रपरत्व प्रसक्त होत आहे.

तेथें ऌकाराचे स्थानीं लपरत्वाचें विधान करण्यांत येईल. तें लपरत्वाचें विधान तर

---

१८. ऋऌक् या ठिकाणीं जो ऋकार उच्चारला आहे तो विवृत प्रयत्नाचा आहे. तेव्हां त्याचे सवर्ण जे अठरा प्रकारचे ह्रस्व, दीर्घ, प्लुत ऋकार ते अच् समजले जातील. परंतु ह्या वार्तिकानें सांगितलेला स्वतंत्र ईषत्स्पृष्ट प्रयत्नाचा ऋकार हा त्या अठराचा सवर्ण नाहीं. तेव्हां याला अच् म्हणतां येत नाहीं.

१९. अइउण् या सूत्रानंतर या स्वतंत्र ॠ आणि ॡ यांचा पाठ केला म्हणजे त्यांना अच् असें म्हणतां येतें.

२०. ॠ आणि ॡ यांची सवर्णसंज्ञा सांगणारें प्रकृत वार्तिक आणि स्वतंत्र ॠ आदेश सांगणारें ऋति ॠ वा हें वार्तिक दोन्ही वार्तिकें केलीं तरी या स्वतंत्र ॠ आणि ॡ यांना अच् संज्ञा होणार नाहीं, आणि ती अच् संज्ञा तर त्यांना प्लुत होण्याकरतां अवश्यच आहे.

२१. सवर्णसंज्ञा सांगणारें वार्तिक केलें तर, स्वतंत्र ॠ आदेश सांगणारें वार्तिक केलें नाहीं तरी चालेल ही एक तऱ्हा होय. आणि स्वतंत्र ॠ आदेश सांगणारें वार्तिक केलें तर सवर्णसंज्ञा सांगणारें वार्तिक नको ही दुसरी तऱ्हा होय.

२२. तेव्हां तव-ऌकारः या ठिकाणीं आद्गुणः (६।१।८७) यानें गुण होतो, तो रपर झाला तर तवर्कारः असें भलतेंच रूप होईल.

**रत्वं वक्ष्यामि । तच्चावश्यं वक्तव्यमसत्यां सवर्णसंज्ञायां विध्यर्थम् । तदेव सत्यां रेफबाधनार्थं भविष्यति ॥ इह तर्हि रषाभ्यां नो णः समानपदे [८.४.१] इत्यृकारग्रहणं चोदितं मातॄणाम् पितॄणामित्येवमर्थम् । तदिहापि प्राप्नोति । क्लृप्यमानं पश्येति । अथासत्यामपि सवर्णसंज्ञायामिह कस्मान्न भवति । प्रक्लृप्यमानं पश्येति । चुटुतुलशर्व्यवाये नेति वक्ष्यामि । अपर आह ।**

**त्रिभिश्च मध्यमैर्वर्गैर्लशसैश्च व्यवाये न ।**

**इति वक्ष्यामीति । वर्णैकदेशाश्च वर्णग्रहणेन गृह्यन्त इति योऽसाव्लृकारे लकारस्तदाश्रयः प्रतिषेधो भविष्यति । यद्येवं नार्थो रषाभ्यां णत्व ऋकारग्रहणेन । वर्णैकदेशाश्च वर्णग्रहणेन गृह्यन्त इति योऽसावृकारे रेफस्तदाश्रयं णत्वं भविष्यति ॥**

## नाज्झलौ ॥१.१.१०॥

**अज्झलोः प्रतिषेधे शकारप्रतिषेधोऽज्झल्त्वात् ॥१॥**

**अज्झलोः प्रतिषेधे शकारस्य शकारेण**

अवश्य केलेंच पाहिजे. फरक इतकाच की सवर्ण संज्ञेचें वार्तिक नसल्यावेळीं अपूर्व[२३] विधीसाठीं केलें पाहिजे. तेंच आतां सवर्णसंज्ञेचें वार्तिक असल्यावेळीं प्राप्त झालेल्या रपरत्वाच्या बाधासाठीं होईल.

तरी पण दुसरीकडे दोष येतो. 'रषाभ्यां नो णः समानपदे' (८।४।१) येथें, मातॄणां पितॄणां या ठिकाणीं णत्व होण्यासाठीं ऋकार ग्रहण करण्याबद्दल इषारा दिला आहे. तेव्हां तें णत्व 'क्लृप्यमानं[२४] पश्य' येथेंही प्रसक्त होत आहे.

पण अगोदर आम्ही असें विचारतों की सवर्ण संज्ञेचें वार्तिक नसल्यावेळींही प्रक्लृप्यमानं पश्य येथें 'कृत्यचः' (८।४।२९) यानें णत्व कां बरें होत नाहीं ?

'चवर्ग, टवर्ग, तवर्ग, लकार आणि शर् नांवाचे वर्ण यांनीं व्यवधान असतां[२५] णत्व करूं नये' असें निषेधवचन पुढें सांगणार आहे. अन्य वैयाकरण असें म्हणतात की, कवर्ग आणि पवर्ग या उभयतांमधील तीन वर्गांनीं लकार, शकार, सकार, यांनीं व्यवधान असतां णत्व करूं नये' असें वचन करण्यांत येईल. तेव्हां प्रक्लृप्यमानं या वरील उदाहरणामध्यें वर्णांच्या एकदेशाचें वर्णवाचक शब्दानें ग्रहण होत असल्यामुळें जो हा ऌकारामधें एकदेश लकार आहे त्यानें व्यवधान होतें म्हणून णत्वाचा निषेध होईल.[२६]

असें आहे तर मग 'रषाभ्यां नो णः' (८।४।१) या णत्वाविषयीं ऋकारांचें ग्रहण करण्यांतच कांहीं तात्पर्य नाहीं. वर्णांच्या एकदेशाचें वर्णवाचक शब्दानें ग्रहण केलें जात आहे म्हणून जो हा ऋकारामध्यें रेफ आहे त्याला धरून मातॄणां वगैरे उदाहरणांतील नकाराला णत्व होईल. अर्थात् आतां क्लृप्यमानं येथें णत्वाची प्राप्तिच येत नाहीं.

स्वर आणि व्यञ्जनें यांच्या सवर्णसंज्ञेचा

---

२३. ऋ आणि ऌ यांना सवर्णसंज्ञा नसेल तर 'उरण्०' (१।१।५१) हें सूत्र तव लकारः येथें येणारच नाहीं. तेव्हां तेथें 'आद्गुणः'(६।१।८७) यानें जो गुण होणार तो नुसता अ एवढाच होईल म्हणून नवीनच तेथें लपरत्व सांगितलें पाहिजे.

२४. बृंहण या शब्दामध्यें जसें ऋकाराचे णत्व झालें आहे तसेंच ऋ आणि ऌ हे सवर्ण झाल्यामुळें क्लृप्यमान या शब्दामध्यें लकारामुळेंही णत्व होईल असा दोष येतो.

२५. रेफ, षकार आणि ऋकार यांपैकीं जो कोणी एक वर्ण असेल, तो आणि नकार या दोहोंमध्यें व्यवधान असतां नला णत्व येत नाहीं.

२६. तेव्हां प्रक्लृप्यमानं येथें दोष नाहीं. परंतु क्लृप्यमानं येथें ऋ ऌ हे दोन वर्ण परस्पर सवर्ण होत असल्यामुळें जो दोष पूर्वी दिला आहे तो कसा दूर करावा असा प्रश्न शिल्लक राहतो.

१. अच् म्ह. स्वर आणि हल् म्ह. व्यंजनें हे परस्पर सवर्णसंज्ञक होत नाहींत.

सवर्णसंज्ञायाः प्रतिषेधः प्राप्नोति । किं कारणम् । अज्झल्त्वात् । अच्चैव हि शकारो हल्च । कथं तावदच्त्वम् । इकारः सवर्णग्रहणेन शकारमपि गृह्णातीत्यच्त्वम् । हल्सूपदेशाद्धल्त्वम् ॥ तत्र को दोषः ।

**तत्र सवर्णलोपे दोषः ॥२॥**

तत्र सवर्णलोपे दोषो भवति । परश्शतानि कार्याणि । झरो झरि सवर्णे [८.४.६५] इति लोपो न प्राप्नोति ॥

**सिद्धमनच्त्वात् ॥३॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनच्त्वात् । कथमनच्त्वम् । स्पृष्टं स्पर्शानां करणम् । ईषत्स्पृष्टमन्तःस्थानाम् । विवृतमूष्मणाम् ईषदित्येवानुवर्तते । स्वराणां विवृतम् ईषदिति निवृत्तम् ॥

**वाक्यापरिसमाप्तेर्वा ॥४॥**

वाक्यापरिसमाप्तेर्वा पुनः सिद्धमेतत् । किमिदं वाक्यापरिसमाप्तेरिति । वर्णाना-

---

निषेध केला तेथें शकाराची शकाराशीं जी सवर्णसंज्ञा तिचा निषेध प्राप्त होत आहे.

काय कारण ?

शकार हा स्वरांमध्येंही मोडतो आणि व्यञ्जनांमध्येंही मोडतो.

स्वरांमध्यें कसा बरें मोडतो ?

अज्झलौ येथील अच् शब्दापासून उपस्थित झालेला इकार 'अणुदित्' (१।१।३९) या सवर्णग्राहकशास्त्रानें दीर्घ ईकाराप्रमाणें आपला सवर्ण असलेल्या शकाराचेंही ग्रहण करतो म्हणून 'अइउण्' इत्यादिक सूत्रांमधें पठित नसतांही दीर्घ ईकार जसा स्वरांमध्यें मोडतो, तसा शकार स्वरांमध्यें मोडतो. आणि 'हयवरट्' इत्यादि व्यञ्जनांच्या उपदेशामध्यें त्या शकाराचा प्रत्यक्ष पाठच असल्यामुळें तो व्यञ्जनांमध्येंही मोडतो.

पण सवर्णसंज्ञेचा निषेध झाला असतां त्यांत काय दोष येत आहे ?

(वा.२) शकाराबरोबर शकाराच्या सवर्णसंज्ञेचा निषेध झाला असतां सवर्णनिमित्तक लोपाविषयीं दोष येतो. परश्शतानि कार्याणि येथें शतात्पराणि असा विग्रह दाखवून 'कर्तृकरणे कृता बहुलम्' (२।१।३२) येथील बहुल शब्दाच्या जोरावर पर शब्दाचा शत शब्दाबरोबर समास करून 'पारस्करप्रभृतीनि च' (६।१।१५७) यानें सुडागम व श्चुत्व करून त्या पहिल्या शकाराला 'अनचि च'(८।४।४७) यानें द्वित्व केलें असतां जे तीन शकार होतात त्यांतील मधल्या शकाराचा 'झरो झरि' (८।४।६५) यानें लोप होत असतो तो होणार नाहीं.

(वा.३) सवर्णसंज्ञेचा निषेध न होणें हें साधतें.

तें कसें ?

शकार हा स्वरांमधें मोडत नाहीं म्हणून.

तो स्वरामधें कां मोडत नाहीं ?

ककारापासून मकारापर्यंत स्पर्शनामक पञ्चवीस वर्णांचा स्पृष्ट नांवाचा आभ्यन्तर प्रयत्न होय. अंतःस्थ नांवाच्या य र ल व यांचा ईषत्स्पृष्ट होय. ऊष्मनामक श ष स ह या वर्णांचा ईषद्विवृत प्रयत्न आहे असें सांगून पुढें स्वरांचा विवृतनामक आभ्यन्तर प्रयत्न आहे असें शौनकप्रातिशाख्यामध्यें सांगितलें आहे. तेव्हां इकार आणि शकार या उभयतांचा आभ्यन्तर प्रयत्न निरनिराळा असल्यामुळें शकार हा इकाराचा सवर्ण नव्हे. म्हणून इकार हा शकाराचा ग्राहक होत नाहीं. सबब शकार स्वरांमध्यें मोडत नाहीं.[२]

(वा.४) अथवा वाक्यापरिसमाप्तिन्यायानें

---

२. तेव्हां दोन शकारांमध्यें परस्परसवर्णसंज्ञेचा निषेध नसल्यामुळें परश्शत हें उदाहरण सिद्ध झालें. शिवाय अशा रीतीनें स्वर आणि श ष स ह यांच्या प्रयत्नांमध्यें निराळेपणा झाल्यामुळें नाज्झलौ हें प्रकृत सूत्रच मुळीं नको असें होतें. तेव्हां सिद्धमनच्त्वात् असें म्हणणाऱ्या वार्तिककारांनीं सूत्रप्रत्याख्यानाचाच हा मार्ग येथें दाखविला आहे असें समजावें.

मुपदेशस्तावत्। उपदेशोत्तरकालेत्संज्ञा। इत्संज्ञोत्तरकाल आदिरन्त्येन सहेता [१.१.७१] इति प्रत्याहारः। प्रत्याहारोत्तरकाला सवर्णसंज्ञा। सवर्णसंज्ञोत्तरकालमणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः [१.१.६९] इति सवर्णग्रहणम्। एतेन सर्वेण समुदितेन वाक्येनान्यत्र सवर्णानां ग्रहणं भवति। न चात्रेकारः शकारं गृह्णाति॥ यथैव तर्हीकारः शकारं न गृह्णात्येवमीकारमपि न गृह्णीयात्। तत्र को दोषः। कुमारी ईहते कुमारीहते। अकः सवर्णे दीर्घत्वं न प्राप्नोति। नैष दोषः। यदेतदकः सवर्णे दीर्घ इति प्रत्याहारग्रहणं तत्रेकार ईकारं गृह्णाति शकारं न गृह्णाति॥

अपर आह। अज्झलोः प्रतिषेधे शकारप्रतिषेधोऽज्झल्त्वात्॥ अज्झलोः

---

ही गोष्ट साधत आहे.

वाक्यापरिसमाप्ति न्याय तो काय?

प्रथमतः वर्णांचा उपदेश. उपदेशोत्तरकालीं इत्संज्ञा. इत्संज्ञोत्तरकालीं 'आदिरन्त्येन' (१।१।७१) यानें प्रत्याहार. प्रत्याहारोत्तरकालीं सवर्णसंज्ञा. आणि सवर्णसंज्ञोत्तरकालीं 'अणुदित्सवर्णस्य' (१।१।६९) यानें सवर्णांचें ग्रहण. या सगळ्या पोटवाक्यांनीं समुदित (युक्त) अशा महावाक्यानें एतद्व्यतिरिक्तस्थलीं सवर्णांचें ग्रहण होतें. या महावाक्यांतील 'तुल्यास्यप्र०' (१।१।९) या पोटवाक्याच्या अर्थाचें ज्ञान निश्चित होण्यापूर्वी त्या निश्चयाकरितां 'नाज्झलौ' या वाक्याच्या अर्थाचें ज्ञान आवश्यक असल्यामुळें व त्या वेळीं सवर्णसंज्ञाविधायक पोटवाक्याच्या अर्थाचें ज्ञान निश्चित नसल्यामुळें अच् पदापासून मनांत येणाऱ्या इकारानें शकाराचें ग्रहण होत नाहीं. म्हणून स्वरामध्यें शकार मोडत नाहीं.

तर मग ज्याप्रमाणें इकार हा शकाराचा ग्राहक होत नाहीं त्याप्रमाणें तो दीर्घ ईकाराचाही ग्राहक होणार नाहीं.

तसें झालें असतां काय दोष येत आहे?

कुमारी+ईहते=कुमारीहते येथें 'अकः सवर्णे' (६।१।१०१) यानें दीर्घ प्राप्त होऊं शकत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण जो हा 'अकः सवर्णे' (६।१।१०१) येथें प्रत्याहार नांवाचा अक् शब्द आहे, त्यांतील इकार दीर्घ ईकाराचें ग्रहण करतो, शकाराचें ग्रहण करीत नाहीं.

---

३. वाक्याचा म्ह. महावाक्याचा अर्थ पूर्ण निश्चित होईतोंपर्यंत त्या वाक्यामध्यें सांगितलेल्या गोष्टीचा उपयोग करतां येत नाहीं हें या न्यायाचें स्वरूप होय. अनेक पोटवाक्यांच्या समुदायाला महावाक्य म्हणतात. त्या पोटवाक्यांमध्यें एक मुख्य म्ह. अंगी आणि दुसरें त्याचें अंग असा संबंध असतो. अणुदित्सवर्णस्य० यांतील सवर्णपदाचा अर्थ ठरविणारीं तुल्यास्य० आणि नाज्झलौ हीं दोन वाक्यें अणुदित्० या वाक्याचीं अंगें होत. तसेंच अण् या पदाचा अर्थ दाखविणारें आदिरन्त्येन० हें वाक्यही अणुदित्० याचें अंग होय. त्यांतल्या त्यांत आदिरन्त्येन हें नाज्झलौ यांतील अच् हल् या पदाचा अर्थ दाखविणारें असल्यामुळें त्याचेंही अंग आहे. आदिरन्त्येन० यांतील इत् या पदाचा अर्थ दाखविणारें हलन्त्यम् हें वाक्य आदिरन्त्येन० याचें अंग आहे. हलन्त्यम् याला उपदेशाची जरूर असल्यामुळें अइउण् इत्यादि उपदेश हा त्याचा अंग आहे. अंगवाक्याचा अर्थ केल्याशिवाय अंगीचा अर्थ करतां येत नाहीं. त्यावरून असा क्रम ठरतो–आरंभीं वर्णांचा उपदेश, नंतर इत् संज्ञा, नंतर प्रत्याहार, नंतर सवर्णसंज्ञा, नंतर सवर्णांचें ग्रहण. या क्रमाप्रमाणें सवर्णांचें ग्रहण करणें हें शेवटीं असल्यामुळें त्याचा उपयोग त्याच्या पूर्वीं होणाऱ्या नाज्झलौ या त्याच्या अंगभूत वाक्यार्थामध्यें करतां येत नाहीं. तेव्हां त्यांतील अच् पदानें मनांत आलेला जो इकार त्यानें त्याच्या सवर्णाचें म्ह. शकाराचें ग्रहण होत नाहीं. म्हणून शकाराला अच् म्हणतां येत नाहीं.

४. कारण इकाराचा शकार हा सवर्ण आहे हेंच मुळीं या वेळीं समजलेलें नाहीं.

प्रतिषेधे शकारस्य शकारेण सवर्णसंज्ञायाः प्रतिषेधः प्राप्नोति । किं कारणम् । अज्झल्त्वात् । अच्चैव हि शकारो हल्च । कथं तावदच्त्वम् । इकारः सवर्णग्रहणेन शकारमपि गृह्णातीत्येवमच्त्वम् । हल्षूपदेशाद्धल्त्वम् ॥ तत्र को दोषः । तत्र सवर्णलोपे दोषः ॥ तत्र सवर्णलोपे दोषो भवति । परश्शतानि कार्याणि । झरो झरि सवर्णे इति लोपो न प्राप्नोति ॥ सिद्धमनच्त्वात् ॥ सिद्धमेतत् । कथम् । अनच्त्वात् । कथमनच्त्वम् । वाक्यापरिसमाप्तेर्वा ॥ उक्ता वाक्यापरिसमाप्तिः ॥ अस्मिन्पक्षे वेत्येतदसमर्थितं भवति । एतच्च समर्थितम् । कथम् । अस्तु वा शकारस्य शकारेण सवर्णसंज्ञा मा वा भूत् । ननु चोक्तं परश्शतानि कार्याणि झरो झरि सवर्णे इति लोपो न प्राप्नोतीति । मा भूल्लोपः । ननु च भेदो भवति ।

अन्य[५] कोणी एक वैयाकरण म्हणतो की (वा.१) 'अज्झलोः प्रतिषेधे०'. स्वर आणि व्यंजनें यांच्या सवर्णसंज्ञेचा निषेध केला त्यांत शकाराबरोबर शकाराच्या सवर्णसंज्ञेचा निषेध प्रसक्त होतो.

काय कारण ?

शकार हा स्वरांमध्येंही मोडतो आणि व्यञ्जनांमध्येंही मोडतो, म्हणून ?

स्वरांमध्यें कसा बरें मोडतो ?

अज्झलौ येथील अच् पदापासून मनांत आलेला इकार 'अणुदित्' (१।१।६९) या सवर्णग्राहक शास्त्रानें शकाराचाही ग्राहक होतो. म्हणून शकार स्वरांमध्यें मोडतो. आणि हल् नांवाच्या वर्णांमध्यें शकराचा प्रत्यक्ष पाठ असल्यानें तो व्यजनांमध्येंही मोडतो.

तसें झालें असतां काय दोष येत आहे ?

(वा.२) तत्र सवर्ण०.तसें असतां सवर्णनिमित्तक लोपाविषयीं दोष येत आहे. परश्शतानि येथें 'अनचिच' (८।४।४७) यानें द्वित्व केलें असतां मधल्या शकाराचा 'झरो झरि' (८।४।६५) यानें लोप प्राप्त होत नाहीं.

(वा.३) सिद्धमनच्त्वात्. शकाराबरोबर शकाराची सवर्णसंज्ञा सिद्ध होत आहे.

ती कशी ?

शकार हा स्वरांमध्यें मोडत नाहीं म्हणून.

तो स्वरांमध्यें कां बरें मोडत नाहीं ?

(वा.४) 'वाक्यापरिसमाप्तेर्वा'-'नाऽऽज्झलौ' या शास्त्राच्या अर्थाच्या वेळीं 'अणुदित्' या वाक्याच्या अर्थाची परिसमाप्ति म्हणजे पूर्णता होत नाहीं म्हणून. वाक्यापरिसमाप्ति म्हणजे काय तें पूर्वीं सांगितलेंच आहे.

पण या योजनेच्या वेळीं वार्तिकांतील वा शब्द जुळून येत नाहीं. (कारण या योजनेमध्यें शकार हा स्वरांमध्यें मोडत नाहीं याविषयीं हेतु म्हणून वाक्यापरिसमाप्ति पुढें केली आहे; दुसरें उत्तर होत नाहीं.

या वेळींही वा शब्द जुळून येतो.

तो कसा ?

शकाराची शकाराबरोबर सवर्णसंज्ञा असूं दे किंवा नसूं दे (कांहीं दोष येत नाहीं), असा स्वतंत्र एक निराळा पक्ष वा या शब्दानें येथें सुचविला आहे.

पण शकार शकाराची सवर्णसंज्ञा नसेल तर परश्शतानि येथें 'अनचिच' (८।४।५७) यानें शकाराला द्वित्व केलें असतां मधल्या शकाराचा 'झरो झरि' (८।४।६५) यानें लोप होऊं शकत नाहीं असा दोष पूर्वीं दिला आहे ना ?

मधल्या शकाराचा लोप न झाला तरी हरकत नाहीं.

---

५. अज्झलोः प्रतिषेधे शकारप्रतिषेधोऽज्झल्त्वात् । तत्र सवर्णलोपे दोषः । सिद्धमनच्त्वात् । वाक्यापरिसमाप्तेर्वा । या चार वार्तिकांच्या अर्थाची योजना आतांपर्यंत एक तऱ्हेनें करून दाखविली. त्यांचीच निराळ्या तऱ्हेची योजना थोडक्या फरकानें जी कोणीं केली आहे ती येथून भाष्यकार दाखवीत आहेत.

**सति लोपे द्विशकारमसति लोपे त्रिशकारम्। नास्ति भेदः। असत्यपि लोपे द्विशकारमेव। कथम्। विभाषा द्विर्वचनम्। एवमपि भेदः। असति लोपे कदाचिद्द्विशकारं कदाचित्त्रिशकारं सति लोपे द्विशकारमेव। स एष कथं भेदो न स्यात्। यदि नित्यो लोपः स्यात्। विभाषा तु स लोपः। यथाभेदस्तथास्तु॥**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे चतुर्थमाह्निकम्॥

---

पण लोप झाला तर दोन शकारांनीं युक्त असें उदाहरण बनणार आणि लोप न झाला तर तीन शकारांनीं युक्त असें बनणार. तेव्हां लोप होणें आणि न होणें यांत भेद होत आहे.

हा भेद होत नाहीं. कारण मधल्या शकाराचा लोप न झाला तरी सुद्धां द्विशकारक रूप बनत आहेच. तें कसें? 'अनचिच' (८।४।४७) या द्विर्वचनाचा विकल्प[६] आहे म्हणून.

तरी सुद्धां लोप होणें आणि न होणें यांत भेद आहे. लोप न झाला तर द्वित्वाच्या विकल्पामुळें एकदां दोन शकारांचें रूप, आणि एकदां तीन शकारांचें रूप बनतें व लोप झाला तर नेहमीं दोन शकारांचें एकच रूप होतें. तेव्हां हा भेद कां बरें होणार नाहीं?

पण जर लोप नित्य असेल तर हा भेद होईल. आणि तो लोप तर वैकल्पिक आहे. तेव्हां येथें ज्या रीतीनें हा भेद नाहींसा होईल तसेंच असू दे. (म्हणजे द्वित्वाप्रमाणें लोपाचाही विकल्प असल्यामुळें मधल्या शकाराचा लोप नाहीं झाला तरी उदाहरणांत फरक होत नाहीं.)[७]

याप्रमाणें भगवान पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें चौथें आन्हिक समाप्त झालें.

---

६. तेव्हां द्वित्व केलेंच नाहीं म्हणजे दोन शकारांचें रूप होईलच.

७. कारण द्वित्व झालें तरी मधल्या शकाराचा लोप होणारच आहे.

**ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम्॥१।१।११।**

किमर्थमीदादीनां तपराणां प्रगृह्यसंज्ञोच्यते । तपरस्तत्कालस्य [१.१.७०] इति तत्कालानां सवर्णानां ग्रहणं यथा स्यात् । केषाम् । उदात्तानुदात्तस्वरितानाम् । अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । प्लुतानां तु प्रगृह्यसंज्ञा न प्राप्नोति । किं कारणम् । अतत्कालत्वात् । न हि प्लुतास्तत्कालाः । असिद्धः प्लुतस्तस्यासिद्धत्वात्तत्काला एव भवन्ति । सिद्धः प्लुतः स्वरसंधिषु । कथं ज्ञायते सिद्धः प्लुतः स्वरसंधिष्विति । यदयं प्लुतप्रगृह्या अचि [६.१.१२५] इति प्लुतस्य प्रकृतिभावं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । सतो हि कार्यिणः कार्येण भवि-

---

(वा.१) ईकार, ऊकार आणि एकार यांना ह्या सूत्रानें प्रगृह्यसंज्ञा सांगितली आहे ती सांगतांना ईत्, ऊत्, एत् असे तकार पुढें जोडून जें उच्चारण केलें आहे तें कशाकरतां ?

सूत्रामध्यें उच्चारलेल्या दीर्घ ईकार वगैरेंच्या उच्चारणाला जितका वेळ लागतो तितक्याच वेळांत उच्चारले जाणारे जे त्या दीर्घ ईकार वगैरेंचे सवर्ण वर्ण त्यांचें येथें ग्रहण झालें पाहिजे म्हणून तसें उच्चारण केलें आहे.

ते सवर्ण वर्ण कोणते ?

उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे दीर्घ ईकार वगैरे सर्व वर्ण त्यांचें येथें 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें ग्रहण झालें पाहिजे.

ईकार वगैरेंच्या पुढें तकार जोडण्याचा हा उपयोग आहे खरा पण—

पण काय ?

जरी सर्व प्रकारच्या दीर्घ ईकार वगैरेंचें ग्रहण झालें तरी प्लुत ई३कार वगैरेंना प्रगृह्य संज्ञा होणार नाहीं हा दोष येतो.

कां बरें ?

प्लुत वर्ण हे तत्काल नाहींत म्हणून. म्हणजे दीर्घ वर्णाच्या उच्चारणाला जितका वेळ लागतो तितकाच वेळ प्लुत वर्णाच्या उच्चारणाला लागतो असें नाहीं.

पण प्लुत असिद्ध आहे ना ? तेव्हां तो असिद्ध असल्यामुळें मूळचा दीर्घ वर्ण हा तत्कालच आहे.

प्लुत असिद्ध नाहीं. कारण स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध आहे असा ठराव आहे.

स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध आहे असा ठराव आहे हें कसें समजलें जातें ?

असें समजलें जातें की हे आचार्य पाणिनि 'प्लुतप्रगृह्या०' (६।१।१२५) ह्या सूत्रानें प्लुताला प्रकृतिभाव सांगतात. यावरूनच तसें समजलें जातें.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें कीं विद्यमानच असलेल्या उद्देश्याला कार्य होत असतें.

---

१. ज्या द्विवचनप्रत्ययाच्या शेवटीं दीर्घ ईकार, दीर्घ ऊकार आणि एकार यांपैकीं कोणताही वर्ण असेल त्या द्विवचनप्रत्ययाला प्रगृह्य अशी संज्ञा होते.

२. दीर्घाच्या दोन मात्रा आहेत आणि प्लुताच्या तीन मात्रा आहेत, त्यामुळें प्लुत वर्णाच्या उच्चारणाला दीर्घ वर्णापेक्षां दीड पटीनें जास्त वेळ लागतो. तेव्हां हरी ३ इति या ठिकाणीं प्लुत ईकाराला प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.

३. हरी ३ या ठिकाणीं दूराद्धूते च (८।२।८४) या त्रिपादींतील सूत्रानें झालेला प्लुत हा पूर्वत्रासिद्धम् (८।२।१) या सूत्रानें प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें असिद्ध होत आहे. तेव्हां तिच्या दृष्टीनें येथें दीर्घच असल्यामुळें दीर्घ आहे अशा समजुतीनेंच प्रगृह्यसंज्ञा प्लुताला होईल.

४. प्लुतप्रगृह्या०(६।१।१२५) ह्या सूत्रानें प्लुताला उद्देशून प्रकृतिभाव हें कार्य सांगितलें आहे, परंतु प्लुत हा त्या प्रकृतिभावाच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें तो विद्यमान आहे असें म्हणतां येणार नाहीं. आणि त्याला प्रकृतिभाव करतां येणार नाहीं. तेव्हां तें सूत्र व्यर्थ होईल तें न व्हावें याकरतां 'स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध आहे' असा ठराव केला पाहिजे.

तव्यम्। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। अप्लुतादप्लुत इत्येतन्न वक्तव्यं भवति ।किमतो यत्सिद्धः प्लुतः स्वरसंधिषु। संज्ञाविधावसिद्धस्तस्यासिद्धत्वात्तत्काला एव भवन्ति। संज्ञाविधौ च सिद्धः। कथम्। कार्यकालं हि संज्ञापरिभाषम्। यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यम्। प्रगृह्यः प्रकृत्येत्युपस्थितमिदं भवति ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यमिति ॥ किं पुनः प्लुतस्य प्रगृह्यसंज्ञावचने प्रयोजनम्। प्रगृह्याश्रयः प्रकृतिभावो यथा स्यात्। मा भूदेवम्। प्लुतः प्रकृत्येत्येवं भविष्यति। नैवं शक्यम्। उपस्थिते हि दोषः स्यात्। अप्लुतवदुपस्थिते [६.१.१२९] इत्यत्र पठिष्यति ह्याचार्यः। वद्वचनं प्लुतकार्य-

---

या ज्ञापकाचा उपयोग कोणता ?

हें ज्ञापक गृहीत धरलें म्हणजे 'अतो रो०' (६।१।११३) या सूत्रामध्यें अप्लुतात् आणि अप्लुते हीं दोन पदें घालावयास नकोत.

'स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध आहे' असा ठराव गृहीत धरला तरी येथें त्याचा कांहीं उपयोग होईल असें दिसत नाहीं. कारण 'प्रगृह्यसंज्ञा करणें' म्हणजे कांहीं स्वरसंधि करणें नव्हे. तेव्हां प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांना प्लुत हा असिद्धच असणार. आणि तो असिद्ध असला म्हणजे मूळचे ईकार वगैरे हे वर्ण तत्काल म्ह. दीर्घच आहेत.

प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांना देखील प्लुत हा त्याच ठरावामुळें सिद्ध समजला जाईल.

तो कसा ?

संज्ञा आणि परिभाषा यांच्याविषयीं कार्यकालपक्ष आहे. जेथें कार्य असेल तेथें त्या उपस्थित होतात. तेव्हां प्रगृह्याला प्रकृतिभाव होतो (६।१।१२५) असें संधिकार्यप्रकरणामध्यें म्हटलें आहे तेथें प्रगृह्य म्हणजे काय तें समजण्याकरतां प्रगृह्य संज्ञा सांगणारें ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम्' हें प्रकृतसूत्र उपस्थित [६] होतें.

बरें, पण इतक्या खटपटीनें जी प्लुताला प्रगृह्यसंज्ञा साधली तिचा उपयोग काय ?

प्रगृह्यसंज्ञेवर अवलंबून होणारा प्रकृतिभाव प्लुताला झाला पाहिजे हा तिचा उपयोग आहे.

तो प्रकृतिभाव झाला नाहीं तरी हरकत नाहीं. प्लुताला. सांगितलेला प्रकृतिभाव होईल आणि काम भागेल.

त्यानें काम भागणें शक्य नाहीं. कारण उँपस्थित पुढें असतांना दोष येईल. आचार्य वार्तिककार 'अप्लुतवदुपस्थिते' (६।१।१२९) या सूत्रावर विचार करतांना 'वद्वचनं प्लुतकार्य-

---

५. कारण 'एहि सुस्रोता३ अत्र' इत्यादि उदाहरणांमध्यें झालेला प्लुत सिद्ध असल्यामुळें तेथें रु हा ह्रस्व अकाराहून पर आहे असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां अर्थातच तेथें रूला उत्व होणार नाहीं.'तिष्ठतु पय अ३ ग्निदत्त' इत्यादि उदाहरणांमध्यें रूच्या पुढें प्लुत असतांना असेंच समजावें.

६. एकंदरीत हें प्रगृह्यसंज्ञा सांगणारें सूत्र जेव्हां स्वरसंधिप्रकरणांत उपस्थित होऊन उपयोगीं पडतें तेव्हां तें स्वरसंधिप्रकरणांत असल्यासारखेंच होतें. तेव्हां त्या प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुत सिद्ध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

७. मूल वेदांत इति हा शब्द नसून त्या वेदवाक्यांतील पदें दाखवितांना कल्पिलेला जो 'इति' हा शब्द त्याला 'उपस्थित' असें म्हणतात. 'अग्नी३ इति' या ठिकाणीं प्लुत जरी झाला आहे तरी तो 'अप्लुतवदुपस्थिते'(६।१।१२९) या सूत्रानें न झाल्यासारखा समजला जातो. तेव्हां तेथें प्लुताला सांगितलेला प्रकृतिभाव करतां येत नाहीं. आणि जर त्या प्लुताला प्रगृह्यसंज्ञा झाली नाहीं तर प्रगृह्यसंज्ञेवर अवलंबून होणारा प्रकृतिभावही होणार नाहीं आणि संधिकार्य होऊं लागेल असा दोष येतो.

८. 'अप्लुतवदुपस्थिते' या सूत्रानें 'उपस्थित इति शब्द पुढें असतांना प्लुत हा अप्लुतासारखा होतो' असें सांगितलें आहे. अप्लुतासारखा समजल्यामुळें प्लुतावर अवलंबून होणारा प्रकृतिभाव होत नाहीं. आणि संधिकार्य होतें. उदा० 'सुश्लोका३ इति' या ठिकाणीं संधि होऊन 'सुश्लोकेति' असें होतें. येथें अप्लुतवत् असा वत् हा प्रत्यय लावला असल्यामुळें अप्लु-

प्रतिषेधार्थं प्लुतप्रतिषेधे हि प्रगृह्यप्लुतप्रतिषेधप्रसङ्गोऽन्येन विहितत्वादिति । तस्मात्प्लुतस्य प्रगृह्यसंज्ञैषितव्या प्रगृह्याश्रयः प्रकृतिभावो यथा स्यात् ॥

यदि पुनर्दीर्घाणामतपराणां प्रगृह्यसंज्ञोच्येत । एवमप्येकार एवैकः सवर्णान्गृह्णीयादीकारोकारो न गृह्णीयाताम् । किं कारणम् । अनण्त्वात् ॥ यदि पुनर्ह्रस्वानामतपराणां प्रगृह्यसंज्ञोच्येत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । अकुर्वेहि अत्र अकुर्वह्यत्रेति ॥

तस्माद्दीर्घाणामेव तपराणां प्रगृह्यसंज्ञा वक्तव्या । दीर्घाणां चोच्यमाना प्लुतानां न प्राप्नोति ॥ एवं तर्हि किं न एतेन यत्नेन यात्सिद्धः प्लुतः स्वरसंधिष्विति । असिद्धः प्लुतस्तस्यासिद्धत्वात्तत्काला एव भवन्तीति। कथं यत्तज्ज्ञापकमुक्तं प्लुतप्रगृह्या अचीति । प्लुतभावी प्रकृत्येत्येवमेतद्विज्ञायते । कथं

---

प्रतिषेधार्थम् प्लुतप्रतिषेधे हि प्रगृह्यप्लुतप्रतिषेधप्रसङ्गः अन्येन विहितत्वात्' असें सांगणार आहेत. तेव्हां प्रगृह्यावर अवलंबून होणारा प्रकृतिभाव झाला पाहिजे म्हणून प्लुताला प्रगृह्यसंज्ञा होणें इष्ट आहे.

आतां जर याकरतां सूत्रांमध्यें तकार न जोडतां नुसते ई ऊ ए असे दीर्घ उच्चारले तरीदेखील दोष कायम राहतोच. फक्त एकार मात्र प्लुत असला तर त्याला प्रगृह्यसंज्ञा करतां येईल. कारण एकटा एकारच सवर्णांचें ग्रहण करूं शकेल; ईकार आणि ऊकार हे आपल्या सवर्णांचें ग्रहण करूं शकणार नाहींत.

कां बरें ?

दीर्घ ईकार आणि ऊकार हे अण् नव्हेत म्हणून.

बरें, आतां जर तकार न जोडतां ऱ्हस्वच इ आणि उ असे उच्चारून प्रगृह्यसंज्ञा सांगावी तर तेंही शक्य नाहीं. कारण ऱ्हस्व हे अण् असल्यामुळें त्यांनीं सवर्णांचें ग्रहण होऊन दीर्घ आणि प्लुत अशा ईकार वगैरेंना प्रगृह्यसंज्ञा साधेल खरी, पण ऱ्हस्वाला नको आहे ती होऊं लागेल आणि 'अकुर्वेहि अत्र' या ठिकाणीं संधि होऊन अकुर्वह्यत्र असें होतें तें साधणार नाहीं असा दोष येतो. एकंदरींत दीर्घांनाच तकार जोडून प्रगृह्यसंज्ञा सांगितली पाहिजे आणि तशी दीर्घांना सांगितलेली प्लुताला प्राप्त होत नाहीं हा पूर्वी दिलेला दोष कायम राहतो.

तर मग आतां आम्ही असें म्हणतों की 'स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध होतो' हें ज्ञापन करण्याचा तरी प्रयत्न कशाला पाहिजे ? (तें ज्ञापक नको.) अर्थातच (प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें) प्लुत असिद्ध असल्यामुळें त्याच्या असिद्धत्वास्तव हे प्लुत ईकार, ऊकार दीर्घच समजले जातील (तेव्हां कांहीं दोष येत नाहीं).

असेंच असेल तर 'स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध समजावा' अशाविषयीं 'प्लुतप्रगृह्या अचि नित्यम्' (६।१।१२५) हें सूत्र ज्ञापक सांगितलें होतें त्याची वाट काय ? (प्लुत असिद्ध असल्यास त्या सूत्राचा उपयोग कसा करून घेतां येईल ?)

प्लुत ज्याला होणार आहे त्याला (म्ह. प्लुताच्या स्थानीलाच) प्रकृतिभाव होतो असा त्या सूत्राचा अर्थ समजतां येईल.

---

तासारखा समजला तरी तेथें प्लुताचें जें तीन मात्रांचें स्वरूप तें नष्ट होत नाहीं. जरी सुश्लोकेति या उदाहरणामध्यें प्लुताचें स्वरूप राहिलें काय किंवा नष्ट झालें तरी काय संधिकार्य झाल्यामुळें त्यामध्यें फरक कांहींच दृष्टोत्पत्तींत येत नाहीं तरी अग्नी३इति या ठिकाणीं प्लुत हा प्रगृह्यसंज्ञक असल्यामुळें तेथें त्या प्रगृह्यावर अवलंबून प्रकृतिभाव होतो व प्रकृत सूत्रानें अप्लुतवद्भाव झाला तरी प्लुताचें स्वरूप नष्ट होत नसल्यामुळें तीन मात्रांचें उच्चारण होतें.

९. तेव्हां प्लुत जरी असिद्ध असला तरी 'याला

यत्तत्प्रयोजनमुक्तम् । क्रियते तन्न्यास एवाप्लुतादप्लुत इति ॥ एवमपि यत्सिद्धे प्रगृह्यकार्यं तत्प्लुतस्य न प्राप्नोति । अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः [८.४.५७] इति । एवं तर्हि किं न एतेन कार्यकालं संज्ञापरिभाषमिति । यथोद्देशमेव संज्ञापरिभाषम् । तत्र चासावसिद्धस्तस्यासिद्धत्वात्तत्काला एव भवन्ति॥

कथं पुनरिदं विज्ञायते । ईदादयो यद्द्विवचनमिति । आहोस्विदीदाद्यन्तं यद्द्विवचनमिति । कश्चात्र विशेषः ।

**ईदादयो द्विवचनं प्रगृह्या इति चेदन्त्यस्य विधिः ॥१॥**

ईदादयो द्विवचनं प्रगृह्या इति चेदन्त्यस्य प्रगृह्यसंज्ञा विधेया । पचेते इति । पचेथे इति । वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । खट्वे इति ।

---

आतां जें त्या ज्ञापकाचें फल पूर्वी दाखविलें आहे त्याची वाट काय ?

त्याची वाट पाणिनीनें लाविलीच आहे. ती अशी की 'अतो रो' (६।१।११३) या सूत्रामध्यें अप्लुतात्, अप्लुते असे शब्दच मानले आहेत.

याप्रमाणें प्रगृह्यसंज्ञेच्या कार्यापैकीं ज्या कार्याच्या दृष्टीनें प्लुत असिद्ध आहे तीं कार्यें दीर्घ समजून करतां आलीं तरी जें कार्य प्लुत सिद्ध असतांना सांगितलें आहे तें कार्य प्लुताला करतां येणार नाहीं. उदा० 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' (८।४।५७) या सूत्रानें सांगितलेला अनुनासिक होय. (येथें कार्यकालपक्षीं दोष[१०] येतो.)

असा जर दोष येत आहे तर मग येथें आम्हांला कार्यकालपक्ष घेण्याचा प्रयत्न तरी पाहिजे कशाला ? संज्ञेविषयीं आणि परिभाषेविषयीं यथोद्देशपक्ष घेतां येतो तोच येथें घेतां येईल. तो घेतला म्हणजे प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुत असिद्धच[११] राहील. आणि तो असिद्ध असला म्हणजे ई हा तत्कालच आहे म्ह. दीर्घच आहे अशा समजुतीनें त्याला प्रगृह्यसंज्ञा करतां येईल.

बरें, आतां येथें कसा अर्थ समजावा, ईकार वगैरे द्विवचनप्रत्यय त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते किंवा ज्या द्विवचनप्रत्ययाच्या शेवटीं ईकार वगैरे आहेत त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

(वा.१) ईकार वगैरे जे द्विवचनप्रत्यय त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते असें म्हटलें तर प्रत्ययाच्या शेवटीं असलेल्या ईकार वगैरेंना प्रगृह्यसंज्ञा स्वतंत्र सांगावी लागेल. उदा० पचेते इति, पचेथे इति.

सूत्रानें जी एकाररूपी द्विवचनाला प्रगृह्यसंज्ञा सांगितली आहे तीच येथें करतां येईल[१२]. (कारण तिचा अन्यत्र उपयोग संभवत नाहीं).

---

प्लुत होणार आहे' असें लक्ष्यसंस्कार करणाऱ्याला ज्ञान असल्यामुळें त्याच्या जोरावर प्रकृतिभाव करतां येईल.

१०. कार्यकालपक्षीं प्रगृह्यसंज्ञा सांगणारें ईदूदेत् हें सूत्र अणोऽप्रगृह्यस्य (८।४।५७) यामध्यें सामील होत असल्यामुळें त्या प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुत सिद्ध होत आहे. कारण प्लुत सांगणारीं सूत्रें पाणिनीनें आठव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादामध्यें घातलीं आहेत आणि अणोऽप्रगृह्यस्य० हें सूत्र आठव्या अध्यायाच्या चवथ्या पादामध्यें घातलें आहे. तेव्हां अग्नी३ या ठिकाणीं प्लुताला प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं आणि त्याला अनुनासिक होऊं लागेल असा दोष येतो.

११. यथोद्देशपक्षीं संज्ञा आणि परिभाषा ह्या कार्यांमध्यें सामील न होतां आपल्या मूळ ठिकाणाहूनच स्वतंत्र रीतीनें आपलें काम करतात. तेव्हां प्रगृह्यसंज्ञा सपादींतच असल्यामुळें तिच्या दृष्टीनें प्लुत असिद्ध होतो.

१२. एकाररूपी द्विवचन संभवत नसल्यामुळें तोच द्विवचनप्रत्ययाच्या शेवटच्या एकाराला होईल असें तात्पर्य आहे.

माले इति ॥ अस्तु तर्हीदाद्यन्तं यद्द्विवचनमिति ।

**ईदाद्यन्तमिति चेदेकस्य विधिः ॥२॥**

ईदाद्यन्तमिति चेदेकस्य प्रगृह्यसंज्ञा विधेया । खट्वे इति । माले इति ॥

**न वाद्यन्तवत्त्वात् ॥३॥**

न वैष दोषः । किं कारणम् । आद्यन्तवत्त्वात् । आद्यन्तवदेकस्मिन्कार्यं भवतीत्येकस्यापि भविष्यति ॥ अथवैवं वक्ष्यामि । ईदाद्यन्तं यद्द्विवचनान्तमिति ।

**ईदाद्यन्तं द्विवचनान्तमिति चेल्लुकि प्रतिषेधः ॥४॥**

ईदाद्यन्तं द्विवचनान्तमिति चेल्लुकि प्रतिषेधो वक्तव्यः । कुमार्योरगारं कुमार्यगारम् । वध्वोरगारं वध्वगारम् । एतद्धीदाद्यन्तं च श्रूयते द्विवचनान्तं च भवति प्रत्ययलक्षणेन ॥

**सप्तम्यामर्थग्रहणं ज्ञापकं प्रत्ययलक्षणप्रतिषेधस्य ॥५॥**

यदयमीदूतौ च सप्तम्यर्थे [१.१.१९] इत्यर्थग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न प्रगृह्यसंज्ञायां प्रत्ययलक्षणं भवतीति ॥

---

एकाररूपी द्विवचनाला सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा दुसरीकडे उपयोगीं पडत आहे.

कुठें ?

खट्वे इति, माले इति या उदाहरणांमध्यें.

तर मग ज्या द्विवचनप्रत्ययाच्या शेवटीं ईकार वगैरे आहेत त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते असाच सूत्राचा अर्थ असू दे.

(वा.२) ज्या द्विवचनप्रत्ययाच्या शेवटीं ईकार वगैरे आहेत त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते असें म्हटलें तर जेथें ईकार वगैरे वर्ण हे एकटेच द्विवचनप्रत्यय असतात तेथें त्या ईकार वगैरेंना प्रगृह्यसंज्ञा स्वतंत्र सांगावी लागेल; उदा० खट्वे इति, माले इति.

(वा.३) हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

आदीसारखा आणि अंतासारखा समजला जातो म्हणून. एकटा वर्ण असला तरी तो आदीसारखा किंवा अंतासारखा समजला जातो (१।१।२१) असें सांगितलें असल्यामुळें खट्वे इति या उदाहरणामध्यें एकटा एकारच द्विवचनप्रत्यय जरी असला तरी तो द्विवचनप्रत्ययाच्या अंतीं म्ह. शेवटीं आहे असें समजून त्याला प्रगृह्यसंज्ञा करतां येईल.

अथवा 'ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत आणि द्विवचनप्रत्यय ज्याच्या शेवटीं आहे अशा शब्दस्वरूपाला प्रगृह्यसंज्ञा होते' असा सूत्राचा अर्थ समजावा.[१३]

(वा.४) ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत आणि द्विवचनप्रत्यय ज्याच्या शेवटीं आहे अशा शब्दस्वरूपाला प्रगृह्यसंज्ञा होते असें म्हटलें तर (द्विवचनप्रत्ययाचा) लुक् झाला असतां तेथें प्रगृह्यसंज्ञा होत नाहीं असें म्हटलें पाहिजे; उदा० कुमार्योः अगारं कुमार्यगारम्, वध्वोः अगारं वध्वगारम्, येथें कुमारी आणि वधू या शब्दांच्या शेवटीं ईकार वगैरे प्रत्यक्षच आहेत आणि त्या शब्दांच्या शेवटीं द्विवचनप्रत्यय प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) मानतां येत आहे.

(वा.५) हा आचार्य पाणिनि 'ईदूतौ च सप्तम्यर्थे' (१।१।१९) या सूत्रामध्यें जें अर्थग्रहण करतो त्यावरून तो असें सुचवितो की प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं.

तर मग ह्याच ज्ञापकाकरतां त्या सूत्रामध्यें

---

१३. हा अर्थ घेतला असतां खट्वे आणि पचेथे ही दोन्ही प्रकारचीं उदाहरणें सिद्ध होतात. खट्वे या शब्दस्वरूपाच्या शेवटीं एकार आहे आणि ए हेंच द्विवचन त्याच्या शेवटीं आहे. पचेथे या शब्दस्वरूपाच्या शेवटीं एकार आहे. आणि 'एथे' हें द्विवचन त्याच्या शेवटीं आहे.

तत्तर्हि ज्ञापकार्थमर्थग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। ईदादिभिर्द्विवचनं विशेषयिष्याम ईदादिविशिष्टेन च द्विवचनेन तदन्तविधिर्भविष्यति। ईदाद्यन्तं यद् द्विवचनं तदन्तमीदाद्यन्तमिति॥ एवमप्यशुक्ले वस्त्रे शुक्ले समपद्येतां शुक्ल्यास्तां वस्त्रे इत्यत्र प्राप्नोति। अत्र हीदादि द्विवचनं तदन्तं च भवति प्रत्ययलक्षणेन। अत्राप्यकृते शीभावे लुग्भविष्यति। इदमिह संप्रधार्यं लुक्क्रियतां शीभाव इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाच्छीभावः। नित्यो लुक्। कृतेऽपि शीभावे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। अनित्यो लुक्। अन्यस्य कृते शीभावे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। शीभावोऽप्यनित्यो न हि कृते लुकि प्राप्नोति।

---

अर्थग्रहण (कायम) केलें पाहिजे.

तसें करावयास नको. (ज्ञापकाशिवायच कुमार्यगारम् इत्यादि उदाहरणांमध्यें आलेला दोष दूर करतां येईल. तें असें की) ईकार वगैरे हें द्विवचनाचें विशेषण करून नंतर त्या विशेषणानें युक्त म्ह. ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत असें द्विवचन हें शब्दस्वरूपाचें विशेषण करून तदंताचें ग्रहण करील. एकंदरींत असा अर्थ होतो: 'ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत असें द्विवचन ज्याच्या शेवटीं आहे अशा शब्दस्वरूपाला प्रगृह्यसंज्ञा[१४] होते.'

असा अर्थ केला तरी 'शुक्ल्यास्तां वस्त्रे' या उदाहरणामध्यें प्रगृह्यसंज्ञा होऊं लागेल. 'वस्त्रें शुक्ल नसून शुक्ल असल्यासारखीं भासतात' असा याचा अर्थ आहे. येथें ईकार वगैरे द्विवचन आहे आणि शुक्ली हें प्रत्ययलक्षणानें द्विवचनांत आहे.

येथेंही शुक्ल शब्दाचा पुढील औ या द्विवचनप्रत्ययाला शी आदेश करण्यापूर्वींच त्याचा लुक् होईल (म्हणजे दोष येणार नाहीं)[१५].

आतां येथें असा विचार करावयाचा की शुक्ल शब्दाचा पुढील औ या द्विवचनप्रत्याचा अगोदर लुक् करावा कीं अगोदर शी आदेश करावा[१६]?

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें?

परत्वास्तव शी आदेश अगोदर करावा.

पण लुक् नित्य आहेना? शी आदेश केला तरी त्याचा लुक् प्राप्त होतो आणि शी आदेश करण्याच्या पूर्वींही प्राप्त होतो.

लुक् अनित्य आहे. कारण शी आदेश करण्याच्या पूर्वी एकाचा म्ह. औ याचा प्राप्त होतो आणि शी आदेश केल्यानंर दुसऱ्याचा म्ह. ई याचा लुक् प्रात होतो. आणि अशा रीतीनें निरनिराळ्या शब्दाला प्रात होणारा जो विधि तो अनित्य समजला जातो. तेव्हां लुक् अनित्य होतो आणि शी आदेशही अनित्य आहेच. कारण लुक् केला असतां त्यानंतर शी आदेश मुळींच प्राप्त होत नाहीं. तेव्हां दोन्ही विधि अनित्य असल्यामुळें शी

---

१४. प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें ज्ञापक नसल्यामुळें कुमार्यगारम् या उदाहरणामध्यें प्रत्ययलक्षणानें जरी द्विवचन आहे असें मानलें तरी तें सकारांत आहे, ईकार वगैरे कुणीच त्याच्या शेवटीं नाहीं, त्यामुळें तेथें दोष येत नाही.

१५. प्रत्ययलक्षणानें द्विवचन आहे असें मानलें तरी तेथें औकार आहे, ईकार नाहीं, त्यामुळें दोष येत नाहीं.

१६. शुक्ल शब्द च्विप्रत्यय, त्यांतील उरलेल्या वकाराचा वेरपृक्तस्य (६।१।६७) यानें लोप, अस्य च्वौ (७।४।३२) यानें ईकार, च्विप्रत्ययामुळें शुक्ली याला अव्ययसंज्ञा झाली आहे. त्याच्यापुढील औ या प्रत्ययाचा अव्ययादाप्सुपः (२।४।८२) यानें लुक् प्राप्त झाला आणि नपुंसकाच्च (७।१।१९) यानें शी आदेश प्राप्त झाला आहे.

उभयोरनित्ययोः परत्वाच्छीभावः शीभावे कृते लुक्। अथापि कथंचिन्नित्यो लुक् स्यादेवमपि दोषः। वक्ष्यत्येतत्। पदसंज्ञायामन्त्यवचनमन्यत्र संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तविधिप्रतिषेधार्थमिति। इदं चापि प्रत्ययग्रहणमयं चापि संज्ञाविधिः। अत्रेयं खल्वस्मिन्नपि पक्ष आद्यन्तवद्भाव एषितव्यः। तस्मादस्तु स एव मध्यमः पक्षः॥

## अदसो मात् ॥१.१.१२॥

**मात्प्रगृह्यसंज्ञायां तस्यासिद्धत्वादयावेकादेशप्रतिषेधः ॥१॥**

मात्प्रगृह्यसंज्ञायां तस्य ईत्त्वस्य ऊत्त्वस्य चासिद्धत्वादयावेकादेशाः प्राप्नुवन्ति तेषां प्रतिषेधो वक्तव्यः। अमी अत्र। अमी आसते। अमू अत्र। अमू आसाते॥ ननु च प्रगृह्यसंज्ञावचनसाम-

आदेश परत्वास्तव अगोदर होतो आणि शी आदेश केल्यानंतर त्याचा लुक् होतो (तेव्हां शुक्ली या ठिकाणीं प्रत्ययलक्षणानें ईकारान्त द्विवचन मानतां येत असल्यामुळें प्रगृह्यसंज्ञा होईल असा दोष येतो).

बरें, आतां शी आदेश करण्यापूर्वी आणि त्यानंतर लुक् प्राप्त होतो; मग तो निरनिराळ्या शब्दाला का होईना. नुसती त्याची दोन्ही वेळेला प्राप्ति येत आहे एवढ्याच गोष्टीकडे नजर देऊन कसा तरी लुक् नित्य मानला व त्यामुळें शुक्ली येथील दोष गेला[१७] तरी निराळा एक दोष येत आहे. 'सुप्तिङन्तं पदम्' (१।४।१४) या सूत्रामध्यें जें अंतग्रहण केलें आहे तें 'इतर ठिकाणीं संज्ञाविधायक शास्त्रामध्यें प्रत्ययग्रहण केलें असतां त्या प्रत्ययानें तदन्ताचें ग्रहण करूं नये, असें ज्ञापन करण्याकरतां केलें आहे असें पुढें (१।४।१४) वार्तिककार सांगणार आहेत. येथें तर द्विवचन हें प्रत्ययग्रहण आहे आणि येथें प्रगृह्यसंज्ञा सांगितली असल्यामुळें हा संज्ञाविधि आहे (तेव्हां द्विवचनान्त असा अर्थ होत असल्यामुळें हा तिसरा पक्षच मुळीं संभवत नाहीं असा दोष येतो.)

शिवाय 'ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत अशा द्विवचनप्रत्ययान्त शब्दाला प्रगृह्यसंज्ञा होते' या तिसऱ्या पक्षीं देखील अग्नी इत्यादि उदाहरणांमध्यें ई या द्विवचनप्रत्ययाला ईकारान्त म्हणण्याकरतां अन्तवद्भाव मानावा लागणारच आहे. तेव्हां एकंदरींत ('ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत अशा द्विवचन-प्रत्ययाला प्रगृह्यसंज्ञा होते') असा मधला पक्षच कायम असूंदे.

(वा. १) मकाराच्या पुढील वर्णाला प्रकृत-सूत्रानें प्रगृह्यसंज्ञा सांगितली असतां तेथें त्याला ईत्त्व आणि ऊत्त्व याला असिद्धत्व असल्यामुळें अय् आदेश, आव् आदेश आणि एकादेश प्राप्त होतात त्यांचा निषेध केला पाहिजे. उदा० 'अमी अत्र' 'अमू अत्र' 'अमी आसते' 'अमू आसाते.'

'अमी-अत्र' इत्यादि उदाहरणांमध्यें जर अय् वगैरे कार्यें होतील तर प्रकृतसूत्रानें सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा व्यर्थ होईल. तेव्हां

१७. शी आदेश करण्यापूर्वी लुक् झाला तर तो औकाराचा होईल, आणि मग प्रत्ययलक्षणानें द्विवचन आहे असें मानलें तरी तेथें ईकार नाहीं, औकार आहे म्हणून दोष येत नाहीं.

१. अदस् शब्दाच्या मकाराच्या पुढील जे ईकार आणि ऊकार त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते.

२. अमी या ठिकाणीं झालेले मकार, ईकार (८।२।८१) असिद्ध असल्यामुळें अदे या मूळ स्थितींतील एकार बुद्धीनें अय् आदेश होईल. तसेंच, त्याच्यापुढें अत्र असें पद ठेवलें तर पूर्वरूप एकादेश (६।१।१०९) होईल. अमू या ठिकाणीं मकार ऊकार (८।२।८०) असिद्ध असल्यामुळें अदौ या मूळ स्थितींतील औकार बुद्धीनें आव् आदेश होईल.

र्थ्यादयादयो न भविष्यन्ति ।

वचनार्थो हि सिद्धे ॥२॥

नेदं वचनाल्लभ्यम्। अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम्। किम्। यत्सिद्धे प्रगृह्यसंज्ञाकार्यं तदर्थमेतत्स्यात् । अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः [८.४.५७] इति । नैकं प्रयोजनं योगारम्भं प्रयोजयति । यद्येतावत्प्रयोजनं स्यात्तत्रैवायं ब्रूयादणोऽप्रगृह्यस्यानुनासिकोऽदसो नेति ।

विप्रतिषेधाद्वा ॥३॥

अथवा प्रगृह्यसंज्ञा क्रियतामयादयो वा प्रगृह्यसंज्ञा भविष्यति विप्रतिषेधेन । नैष युक्तो विप्रतिषेधः । विप्रतिषेधे परमित्युच्यते पूर्वा च प्रगृह्यसंज्ञा परेऽयादयः। परा प्रगृह्यसंज्ञा करिष्यते । सूत्रविपर्यासः कृतो भवति । एवं तर्हि परैव प्रगृह्यसंज्ञा । कथम् । कार्यकालं हि संज्ञापरिभाषम् । यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यम्। प्रगृह्यः प्रकृत्येत्युपस्थितमिदं भवति अदसो मादिति ॥ एवमप्ययुक्तो विप्रति-

---

तिच्या सामर्थ्यानें अय् वगैरे कार्यें होणार नाहींत.

(वा. २) ज्या ठिकाणीं ईत्त्व, ऊत्त्व सिद्ध आहे त्या ठिकाणीं प्रकृतसूत्राचा उपयोग होत आहे, तेव्हां व्यर्थ होत नाहीं. म्हणजे प्रगृह्यसंज्ञेच्या सामर्थ्यानें वरील गोष्ट सिद्ध होणार नाहीं. कारण ह्या प्रगृह्यसंज्ञेचा उपयोग दुसरीकडे होत आहे.

तो कोणता ?

ज्या प्रगृह्यसंज्ञेच्या कार्याच्या दृष्टीनें ईत्त्व, ऊत्त्व सिद्ध आहे त्या कार्याकरतां ही प्रगृह्यसंज्ञा उपयोगीं पडेल. उदा०—'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' (८।४।५७)

पण ह्या एकाच विशेष उपयोगाकरतां सामान्य सूत्र करणें बरोबर नाहीं. जर एवढाच उपयोग असता तर हा आचार्य पाणिनि त्या ठिकाणींच 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकोऽदसो न' असें बोलला असता.

(वा. ३) अथवा अमी, अत्र वगैरे वरील उदाहरणामध्यें प्रगृह्यसंज्ञा करावी किंवा अय्, आव् आणि एकादेश हीं कार्यें करावींत अशी स्पर्धा लागली असतां त्यांमध्यें प्रगृह्यसंज्ञा विप्रतिषेधास्तव अय् वगैरे कार्यांचा बोध करून होईल.

पण हा विप्रतिषेध बरोबर नाहीं. कारण 'विप्रतिषेधे परम्' (१।४।२) असें सूत्र आहे म्ह. दोन कार्यांमध्यें विरोध उत्पन्न झाला असतां तेथें परकार्य करावें असें सांगितलें आहे आणि ही प्रगृह्यसंज्ञा तर पूर्व आहे. उलट अय् वगैरे कार्येंच सहाव्या अध्यायामध्यें सांगितलीं असल्यामुळें पर आहेत.

प्रगृह्यसंज्ञा ही त्या अय् वगैरे कार्यांच्या पुढें सांगावी म्हणजे ती पर होईल.

पण सूत्रपाठामध्यें बदल होतो त्याची वाट काय ?

तर मग सूत्रपाठांत बदल न करतां प्रगृह्यसंज्ञा पर आहे असें आम्ही म्हणतों.

तें कसें ?

संज्ञा आणि परिभाषा यांच्याविषयीं कार्यकालपक्षही घेतां येतो. म्हणजे ज्या ठिकाणीं त्यांचें कार्य असेल त्या ठिकाणीं त्या उपस्थित झाल्या आहेत असें समजावें. तेव्हां प्रगृह्याला प्रकृतिभाव होतो (६।१।१२५) असें प्रगृह्यसंज्ञेचें कार्य सहाव्या अध्यायामध्यें सांगितलें आहे त्या ठिकाणीं 'अदसो मात्'(१।१।१२) हें प्रगृह्यसंज्ञा सांगणारें प्रकृतसूत्र उपस्थित होतें.

तरी पण या ठिकाणीं मूळ विरोधच जमत

---

१. हें अनुनासिक सांगणारें सूत्र ईत्त्व, ऊत्त्व सांगणाऱ्या सूत्रांच्या (८।२।८०,८१) पुढें असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें ईकार, ऊकार सिद्ध आहेत. तेव्हां त्या ईकाराला व ऊकाराला अनुनासिक न होणें हा प्रगृह्यसंज्ञेचा उपयोग आहे.

४. तेव्हां अमी, अत्र इत्यादि उदाहरणांमध्यें

षेधः । कथम् । द्विकार्ययोगो हि विप्रतिषेधो न चात्रैको द्विकार्ययुक्तः । एचामयादयः । ईदूतोः प्रगृह्यसंज्ञा । नावश्यं द्विकार्ययोग एव विप्रतिषेधः । किं तर्हि । असंभवोऽपि । स चास्त्यत्रासंभवः । कोऽसावसंभवः । प्रगृह्यसंज्ञाभिनिर्वर्तमानायादीन्बाधते । अयादयोऽभिनिर्वर्तमानाः प्रगृह्यसंज्ञानिमित्तं विघ्नन्तीत्येषोऽसंभवः । सत्यसंभवे युक्तो विप्रतिषेधः ॥ एवमप्ययुक्तो विप्रतिषेधः । सतोर्हि विप्रतिषेधो भवति न चात्रेत्त्वोत्त्वे स्तो नापि मकारः । उभयमसिद्धम् ।

**आश्रयात्सिद्धत्वं च यथा रोरुत्त्वे ॥४॥**

आश्रयात्सिद्धत्वं भविष्यति तद्यथा रुरुत्त्व आश्रयात्सिद्धो भवति । किं पुनः कारणं रुरुत्त्व आश्रयात्सिद्धो भवति न पुनर्यत्रैव रुः सिद्धस्तत्रैवोत्त्वमप्युच्यते ।

---

नाहीं. कारण एकाला एकदम दोन कार्यांचा संबंध घडूं लागला तर त्या ठिकाणीं विरोध उत्पन्न होतो. आणि अमी, अत्र वगैरे उदाहरणांमध्यें तर एकाला दोन कार्यांचा संबंध घडत नाहीं. अय्, आव् वगैरे कार्यें हीं एचाला प्राप्त होतात आणि प्रगृह्यसंज्ञा ही ईकाराला आणि ऊकाराला प्राप्त होते.

एकाला दोन कार्यांचा संबंध घडत असेल त्या ठिकाणींच फक्त विरोध असतो अशी खात्री नाहीं. तर दोन कार्यें एकदम करतां येत नसलीं म्हणजे तेवढ्यानेंही विरोध उत्पन्न होतो. आणि तसा प्रकृत उदाहरणांमध्यें दोन कार्यांचा एकदम संभव दिसत नाहीं.

तो असंभव या ठिकाणीं कशा रीतीनें बरें समजावा ?

अशा रीतीनें समजावा की प्रगृह्यसंज्ञा येथें होऊं लागली म्हणजे ती प्रकृतिभावाच्या साह्यानें अय् वगैरे कार्यांना पीडा देते आणि अय् वगैरे कार्यें होऊं लागलीं म्हणजे तीं प्रगृह्यसंज्ञेच्या निमित्ताचाच मुळीं नाश करतात असा या ठिकाणीं असंभव समजतां येतो. आणि असंभव असतांना तेथें त्या दोन कार्यांमध्यें विरोध उत्पन्न होणें हें योग्यच आहे.

तरी पण येथें विरोध जमत नाहीं. कारण दोन कार्यें प्राप्त झालीं तर त्यांमध्यें विरोध उत्पन्न होतो. आणि येथें तर प्रगृह्यसंज्ञाच प्राप्त होत नाहीं. कारण त्या प्रगृह्यसंज्ञेचें निमित्त जे ईकार आणि ऊकार तेच येथें नाहींत आणि त्यांच्या पाठीमागें मकार पाहिजे तोही नाहीं. दोन्ही असिद्धच आहेत.

(वा.४) ईकार, ऊकार आणि मकार ह्यांवरही प्रगृह्यसंज्ञा अवलंबून असल्यामुळें ते ईकार वगैरे सिद्ध आहेत असें समजतां येईल. जसें—'अतो रो०' (६।१।११३) या सूत्रानें सांगितलेलें उत्त्व हें रूवर अवलंबून असल्यामुळें त्या उत्त्वाच्या दृष्टीनें तें रुत्व सिद्ध समजलें जातें तसेंच हें होय.

रु हा उत्त्वाचा आश्रय असल्यामुळें नाइलाजास्तव तो रु उत्त्वाच्या दृष्टीनें सिद्ध समजला जाईल हें खरें, पण पाणिनीनें तरी असें कशाकरतां केलें ? रु ज्या ठिकाणीं आपोआपच सिद्ध समजला जातो त्या ठिकाणींच अतो रो० हें उत्त्व सांगणारें सूत्र कां नाहीं

---

अय् वगैरेंचा बाध करून परत्वास्तव प्रगृह्यसंज्ञा करतां येत असल्यामुळें दोष येत नाहीं.

५. रोः सुपि (८।३।१६) या सूत्राच्या पुढें घातलें असतां दुसऱ्या पादामध्यें सांगितलेलें रुत्व आपोआपच सिद्ध समजलें जाईल. आतां पाणिनीनें जेथें घातलें आहे तेथें मानून अति (६।१।१०९) आणि प्लुत (६।१।१११) अशीं पदें अनुवृत्त होत असतात तीं आतां ह्या सूत्रामध्यें करावी लागली तरी हरकत नाहीं. कारण रोः याची अनुवृत्ति होत असल्यामुळें तें पद करावयास नको. तसेंच अप्लुतात् आणि अप्लुते हींही दोन पदें करावयास नकोत. कारण ह्याच्या मागील पदांमध्यें सांगितलेला प्लुत आपोआपच सिद्ध होत असल्यामुळें अतः आणि अति या तपरकरणानेंच त्याची व्यावृत्ति होईल.

नैवं शक्यम् ।

असिद्धे ह्युत्त्व आद्गुणाप्रसिद्धिः ॥५॥

असिद्धे ह्युत्त्व आद्गुणस्याप्रसिद्धिः स्यात् । वृक्षोऽत्र । प्लक्षोऽत्र । तस्मात्तत्राश्रयात्सिद्धत्वमेषितव्यम् । तत्र यथाश्रयात्सिद्धत्वं भवत्येवमिहापि भविष्यति ॥

अथवा प्रगृह्यसंज्ञावचनसामर्थ्यादयादयो न भविष्यन्ति ॥ अथवा योगविभागः करिष्यते । अदसः । अदस ईदादयः प्रगृह्यसंज्ञा भवन्ति । ततो मात् । माच्च पर ईदादयः प्रगृह्यसंज्ञा भवन्ति । अदस इत्येव । किमर्थो योगविभागः । एको यत्तत्सिद्धे प्रगृह्यकार्यं तदर्थः । अपरो यदसिद्धे । इहापि तर्हि प्राप्नोति । अमुया अमुयोरिति । किं च स्याद्यदि प्रगृह्यसंज्ञा स्यात् । प्रगृह्याश्रयः प्रकृतिभावः प्रसज्यते । नैष दोषः । पदान्तप्रकरणे प्रकृतिभावो न चैष पदान्तः । एवमप्यमुकेऽत्र अत्रापि प्राप्नोति । द्विवचनमितिवर्तते यदि द्विवचनमितिवर्तते अमी अत्रेति न प्राप्नोति । एवं तर्ह्येदन्तमिति

---

घातलें ?

असें करणें शक्य नाहीं.

(वा.५) तसें केलें तर तें असिद्ध होईल. आणि वृक्षोत्र प्लक्षोत्र या उदाहरणांमध्यें उत्त्व झाल्यानंतर आद्गुणः (६।१।८७) या सूत्रानें जो गुण होत असतो तो होणार नाहीं. तेव्हां तें उत्त्व सांगणारें 'अतो रो०' (६।१।११३) हें सूत्र सपादीमध्यें घातलें तेंच बरोबर आहे. तेव्हां तेथें उत्त्वाचा आश्रय असल्यामुळेंच रुत्व सिद्ध समजलें पाहिजे. आणि जसें तेथें उत्त्वाचा आश्रय असल्यामुळें रुत्व सिद्ध समजलें जातें तसें येथेंही ऊकार, ईकार आणि मकार हे प्रगृह्यसंज्ञेचा आश्रय असल्यामुळें सिद्ध समजले जातील.

अथवा, ही जी प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा सांगितली आहे तिच्या सामर्थ्यास्तव तिच्या उदाहरणामध्यें अय् वगैरे होणार नाहींत.

अथवा, ह्या एका सूत्राचा विभाग करून दोन सूत्रें करावींत. त्यांपैकीं पहिलें सूत्र— अदसः.याचा अर्थ— अदस् शब्दासंबंधीं असे पुढील जे इकार वगैरे ते प्रगृह्यसंज्ञक होतात. त्यानंतर दुसरें सूत्र— मात्. याचा अर्थ— मकाराच्या पुढील जे ईकार वगैरे ते प्रगृह्यसंज्ञक होतात. ह्या दुसऱ्या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून अदसः या पदाचा संबंध आहेच.

मग हीं दोन सूत्रें करण्यांत हेतु काय ?

हेतु असा की प्रगृह्यसंज्ञेच्या कार्यांपैकीं ज्या कार्यांच्या दृष्टीनें ईकार, ऊकार आणि मकार हे सिद्ध आहेत त्या कार्याकरतां प्रगृह्यसंज्ञा सांगणारें सूत्र एक, आणि ज्या कार्यांच्या दृष्टीनें ते असिद्ध आहेत त्या कार्याकरतां प्रगृह्यसंज्ञा सांगणारें सूत्र दुसरें.

तर मग अमुया अमुयोः या ठिकाणींही अदसः या सूत्रानें प्रत्ययाच्या मागील अदे यापैकीं एकाराला प्रगृह्यसंज्ञा होईल.

झाली तर काय होईल ?

जर ह्या ठिकाणीं प्रगृह्यसंज्ञा होईल तर त्या प्रगृह्यसंज्ञेमुळें प्रकृतिभाव होईल.

हा दोष येत नाहीं. कारण पदाच्या अन्ताला जीं कार्यें सांगितलीं आहेत त्या प्रकरणामध्यें प्रकृतिभाव सांगितला आहे. आणि अमुया अमुयोः याठिकाणीं असलेला अदे हा एकार प्रत्ययाच्या मागील असल्यामुळें पदाच्या शेवटीं नाहीं.

तरी पण अमुकेत्र या ठिकाणीं अदसः या सूत्रानें प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होते.

---

६. 'अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' (८।४।५७) ह्या सूत्रानें सांगितलेला अनुनासिक प्रगृह्याला होत नाहीं. तेव्हां तेथें 'अनुनासिकाचा निषेध' या कार्याकरतां.

७. मात् हें सूत्र.

८. प्लुतप्रगृह्या० (६।१।१२५) या सूत्रानें सांगितलेल्या प्रकृतिभावाकरतां.

९. अदसः हें सूत्र.

१०. पूर्वसूत्रांतून ईदूत् एवढ्याचीच अनुवृत्ति न

निवृत्तम् ॥ अथवाहायमदसो मादिति । न चेत्त्वोत्त्वे स्तो नापि मकारः । त एवं विज्ञास्यामः । मार्थादीदाद्यर्थानामिति ॥

**उक्तं[12] वा ॥६॥**

किमुक्तम् । अदस ईत्वोत्त्वे स्वरे बहिष्पदलक्षणे प्रगृह्यसंज्ञायां च सिद्धे वक्तव्ये इति ॥

**तत्र साकि दोषः ॥७॥**

तत्र सककारे दोषो भवति । अमुकेऽत्र ॥

**न वा ग्रहणविशेषणत्वात् ॥८॥**

न वैष दोषः । किं कारणम् । ग्रहणविशेषणत्वात् । न माद्ग्रहणेनेदाद्यन्तं विशे-

---

अदसः या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून द्विवचनम् या पदाची अनुवृत्ति केली असतां हा दोष येणार नाहीं.

जर द्विवचनपदाची अनुवृत्ति केली तर 'अमी अत्र' या ठिकाणीं अदसः या सूत्रानें प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.[11]

तर मग द्विवचनपदाची अनुवृत्ति करूं नये आणि ईदूदेत् यांपैकीं एत् याची अनुवृत्ति करूं नये म्हणजे कांहीं दोष येणार नाहीं.

अथवा, हा आचार्य पाणिनि 'अदसो मात्' असें तर म्हणतो आणि उदाहरण पाहावें तर त्यामधील ईकार, ऊकार हीं ह्या सूत्राच्या दृष्टीनें दिसत नाहींत आणि त्यांच्या पूर्वींचा मकारही दिसत नाहीं. तेव्हां त्या म्हणण्यांत त्याचा अर्थ कांहींतरी निराळा असला पाहिजे. तो आम्ही असा समजतों की—

मकाराकरतां जो वर्ण म्हणजे अर्थात् मकाराचा स्थानी त्याहून पर जे ईकार वगैरेंचे स्थानी त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते.

(वा.६) अथवा हें सांगितलेंच आहे (८।२।३).

तें काय सांगितलें आहे ?

अदस् शब्दाला सांगितलेले ईकार आणि ऊकार (८।२।८०।८१) हे पुढील पदाच्या निमित्तानें एकादेश अच् कर्तव्य असतांना सिद्ध समजावेत. तसेंच प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांनाही सिद्ध समजावेत.

(वा.७) प्रकृतसूत्रानें सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा केली असतां ककारसहित उदाहरणामध्यें दोष येतो. उदा० अमुकेत्र.[13]

(वा.८) अथवा हा दोष येत नाहीं. कारण ईकार वगैरे ज्याच्या शेवटीं आहेत अशा शब्दस्वरूपाचें मात् हें विशेषण समजूं

---

करतां एत् याचीही अनुवृत्ति येथें होत आहे असा अभिप्राय आहे.

११. कारण अमी हें बहुवचन आहे.

१२. उक्तं वा हें वार्तिक आहे किंवा भाष्योक्ति आहे याविषयीं संशय आहे. उक्तं या पदानें जें दाखविलें आहे 'अदस ईत्वोत्वे०' इत्यादि. तें आठव्या अध्यायामध्यें (८।२।३) वार्तिककारानें सांगितलें आहे खरें परंतु तें गृहीत धरून येथें त्याच्या पूर्वी वार्तिककार उक्तं असा भूतकालाचा निर्देश करणार नाहींत. प्रक्रियाकौमुदीकार रामचंद्राचार्य यांचे शिष्य रघुनाथ पंडित यांनीं महाभाष्याची टीका केली आहे तीमध्यें 'वक्ष्यमाणस्यापि बुद्ध्यारूढत्वे नातीतत्वारोपात्'म्ह. 'अदस ईत्वोत्वे०'हें जरी पुढें सांगावयाचें आहे तरी ते अगोदरपासून वार्तिककारांच्या मनांत आहेच म्हणून येथें त्यांनीं उक्तं असा भूतकालाचा निर्देश केला आहे. अशी त्या निर्देशाची गति लाविली आहे. पण त्यापेक्षां 'उक्तं वा' हें वार्तिक नसून भाष्योक्ति आहे असें मानलें म्हणजे कांहींच अडचण येत नाहीं. 'हे पूर्वी वार्तिककारांनीं सांगितलें आहे' असा भूतकालाचा निर्देश भाष्यकारांना सहजच करतां येतो.

१३. ईदूदेत् येथें तदंतविधि करून नंतर त्याला मात् हें विशेषण लाविलें म्हणजे मकाराहून पर जे ईकारांत, ऊकारांत आणि एकारांत शब्दस्वरूप त्याला प्रगृह्यसंज्ञा होते असा सूत्रार्थ होतो. तेव्हां अमुकेत्र येथें मकाराहून पर उके हें एकारांत शब्दस्वरूप आहे म्हणून या ठिकाणीं प्रगृह्यसंज्ञा होऊन प्रकृतिभाव होईल आणि संधिकार्य होणार नाहीं असा दोष येतो.

ष्यते । किं तर्हि । ईदादयो विशेष्यन्ते । मात्परे य ईदादय इति ॥

शे[1] ॥१-१-१३॥

इह कस्मान्न भवति काशे कुशे वंशे इति ।

शेऽर्थवद्ग्रहणात् ॥१॥

अर्थवतः शेशब्दस्य ग्रहणं न चायमर्थवान् । एवमपि हरिशे बभ्रुशे इत्यत्र प्राप्नोति । एवं तर्हि लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं न भविष्यति । अथवा पुनरस्त्वर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येति । कथं हरिशे बभ्रुशे इति । एकोऽत्र विभक्त्यर्थे नार्थवानपरस्त-

---

नये.

तर मग तें कुणाचें विशेषण समजावें ?

ईकार वगैरेंचेंच तें विशेषण आहे. मकाराहून पर जे ईकार वगैरे त्यांना प्रगृह्यसंज्ञा होते असा सूत्रार्थ समजावा.

[सू.१३] काशे, कुशे, वंशे या ठिकाणीं शे या प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा कां होत नाहीं.

(वा.१) अर्थवान् अशा शे या शब्दाचें प्रकृतसूत्रामध्यें ग्रहण केलें आहे. आणि काशे वगैरे वरील उदाहरणांमध्ये शे याला अर्थ कांहींच नाहीं.[2]

तरी पण हरिशे, बभ्रुशे, या ठिकाणीं प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होत आहेच.[3]

तर मग 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्य ग्रहणम्'[4] या परिभाषेनें काशे, कुशे, वंशे, हरिशे आणि बभ्रुशे या दोन्ही प्रकारच्या उदाहरणांमध्यें प्रगृह्य संज्ञा होत नाहीं. अथवा अर्थवद्ग्रहणात् असें जें वार्तिककारांनीं 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य ग्रहणम्'[5] ही परिभाषा मनांत घेऊन उत्तर दिलें आहे, त्या परिभाषेनेंच वरील सर्व उदाहरणांमध्यें प्रगृह्यसंज्ञा होत नाहीं.

हरिशे, बभ्रुशे, या ठिकाणीं ती परिभाषा कशी लागू पडते ?

अशी लागू पडते की हरिशे या उदाहरणामध्यें शे यांतील एक वर्ण जो एकार तो विभक्तिप्रत्ययाचा असल्यामुळें त्याला अर्थ आहे आणि दुसरा वर्ण जो शकार तो तद्धिता प्रत्ययाचा असल्यामुळें त्याला अर्थ आहे. पण त्या दोन वर्णांचा समुदाय जो शे हा

---

१. शे याला प्रगृह्यसंज्ञा होते. न युष्मे वाजबन्धवः (ऋ.८.६८.१९) या वैदिक वाक्यामध्यें युष्मे असें पद आहे. युष्मद् शब्दाच्या पुढील भ्यस् प्रत्ययाला 'सुपां सुलुक्०'(७।१।३९) या सूत्रानें शे आदेश झाला आहे. त्यांतील शकाराचा इत्संज्ञालोप होऊन एकार राहतो आणि युष्मद् शब्दांतील अद् याचा 'शेषे लोपः' (७।२।९०) यानें लोप होऊन युष्मे असें रूप होतें. त्यांतील एकाराला प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा झाली म्हणून त्याच्यापुढें इति शब्द लाविला असतां युष्मे इति येथें संधि होत नाहीं.

२. काशे, कुशे, वंशे हीं काश वगैरे शब्दांचीं सप्तमी एकवचनाचीं रूपें आहेत.

३. हरि, बभ्रु या शब्दांहून 'लोमादि०' (५।२।१००) यानें शप्रत्यय झाला आहे. त्याचा पुढील प्रत्ययाशीं संधि होऊन शे असें झाल्यामुळें शे याला येथें अर्थ आहे असें शंकाकाराचे मनांत आहे.

४. एखादा शब्द कांहीं ठिकाणीं साक्षात् उच्चारलेला असतो तो प्रतिपदोक्त होय. आणि जो शब्द साक्षात् उच्चारलेला नसून लक्षणानें म्ह. शास्त्रानें तयार होतो तो लाक्षणिक होय. जो एकच शब्द दोन्ही प्रकारचा संभवतो तेथें तो प्रतिपदोक्तच घ्यावा, लाक्षणिक घेऊं नये, असा या परिभाषेचा अर्थ आहे. काशे वगैरेवर दाखविलेल्या सर्व उदाहरणांमध्यें श, इ यांचा संधि होऊन शे असें होत असल्यामुळें त्या ठिकाणीं शे हें शब्दस्वरूप लाक्षणिक होय. तेव्हां त्याला लक्षणप्रति० या परिभाषेनें प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.

५. एखादें शब्दस्वरूप अर्थवान् आणि अनर्थक असें दोन्ही प्रकारचें संभवत असेल तर तेथें तें शब्दस्वरूप अर्थवाचक घ्यावें, अनर्थक घेऊं नये, असा या परिभाषेचा अर्थ आहे.

द्धितार्थेन समुदायोऽनर्थकः ॥

## निपात एकाजनाङ् ॥१.१.१४॥

निपात इति किमर्थम् । चकारात्र । जहारात्र ॥ एकाजिति किमर्थम् । प्रेदं ब्रह्म । प्रेदं क्षत्रम् । एकाजित्यप्युच्यमानेऽत्रापि प्राप्नोति । एषोऽपि ह्येकाच् । एकाजिति नायं बहुव्रीहिः । एकोऽजस्मिन्सोऽयमेकाजिति । किं तर्हि । तत्पुरुषोऽयं समानाधिकरणः । एकोऽच् एकाजिति । यदि तत्पुरुषः समानाधिकरणो नार्थ एकग्रहणेन । इह कस्मान्न भवति । प्रेदं ब्रह्म । प्रेदं क्षत्रम् । अजेव यो निपात इत्येवं विज्ञास्यते । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अज्ग्रहणसाम-

---

शब्द त्याला कांहीं अर्थ नाहींच[६].

[सू.१४] ह्या सूत्रामध्यें निपात हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

चकारात्र, जहारात्र या ठिकाणीं चकार, जहार या क्रियापदांमधील अ या प्रत्ययाला प्रगृह्यसंज्ञा होऊं लागेल ती न व्हावी याकरतां घातला आहे.

एकाच् हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

प्रेदं ब्रह्म, प्रेदं क्षत्रम् या ठिकाणीं प्र याला प्रगृह्यसंज्ञा होऊं नये म्हणून घातला आहे.

पण एकाच् हा शब्द घातला तरी ह्या ठिकाणीं प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होत आहे. कारण प्र हा निपात एकाच् आहेच.

एक आहे अच् ज्यामध्यें असा बहुव्रीहि समास केला असतां प्र या समुदायाला एकाच् असें म्हणतां येतें. परंतु एकाच् हा बहुव्रीहि समास आहे असें समजूं नये. तर हा समानाधिकरण तत्पुरुष (म्ह. कर्मधारय) समास आहे. तेव्हा येथें एक जो अच् तोच एकाच् या शब्दानें घेतां येतो.

जर एकाच् हा समानाधिकरण तत्पुरुष म्ह. कर्मधारय समास आहे तर त्यांतील 'एक' या शब्दाचा कांहींच उपयोग दिसत नाहीं.

एक शब्द घातला नाहीं तर प्रेदं ब्रह्म, प्रेदं क्षत्रम् या ठिकाणीं प्र या निपाताला प्रगृह्यसंज्ञा कां होत नाहीं[२] ?

अच्रूप असा जो निपात त्याला प्रगृह्यसंज्ञा होते असा अर्थ केला म्हणजे प्र या निपाताला प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.

असा अर्थ होण्याबद्दल स्वतंत्र वचन केलें पाहिजे कीं काय ?

तसें वचन करावयास नको.

तर मग वचनाशिवाय तसा अर्थ कसा करतां येईल ?

अच् या शब्दाच्या सामर्थ्यास्तवच तसा अर्थ करतां येईल. कारण ज्या निपातालाप्रगृह्यसंज्ञा होणार त्या निपातामध्यें जर अच्वांचून आणखी दुसरा एखादा वर्ण असेल तर अच्

---

६. अर्थवानांच्या समुदायाला अर्थ असतोच असा नियम नाहीं. जेथें त्यामध्यें अन्वय असतो तेथें अर्थ असतो; उदा० 'राजा ग्रामं गच्छति' या वाक्यांतील तिन्ही पदांना निरनिराळा अर्थ आहे. राजा आणि ग्रामं या दोहोंचा निरनिराळा क्रियापदावर अन्वय आहे. राजा आणि ग्रामं या दोहोंमध्यें मात्र कुणाचाही कुणावर अन्वय नाहीं. तेव्हां 'राजा ग्रामं' या समुदायाला कांहींच अर्थ नाहीं. 'ग्रामं गच्छति' या समुदायाला अर्थ आहे.

१. आङ् सोडून इतर जो एक अज्रूप निपात त्याला प्रगृह्यसंज्ञा होते; उदा० अ, इ, उ इत्यादि. कांहीं अव्ययांना 'निपात' अशी संज्ञा आहे. ती 'चादयोऽसत्त्वे' (१।४।५७) इत्यादि सूत्रांनीं सांगितली आहे.

२. एक शब्द नसेल तर अज्रूपी जो निपात असा अर्थ न होतां 'येन विधिस्तदन्तस्य' या (१।१।७२) या परिभाषेनें तदन्तविधि होऊन अजन्त म्ह. ज्याच्या शेवटीं अच् आहे असा निपात असा अर्थ होईल. आणि प्र या निपाताला प्रगृह्यसंज्ञा होईल.

र्थ्यात्। यदि हि यत्राच्चान्यच्च तत्र स्यादज्ग्रहणमनर्थकं स्यात्। अस्त्यन्यदज्ग्रहणस्य प्रयोजनम्। किम्। अजन्तस्य यथा स्याद्धलन्तस्य मा भूत्। नैव दोषो न प्रयोजनम्॥ एवमपि कुत एतद्द्वयोः परिभाषयोः सावकाशयोः समवस्थितयोराद्यन्तवदेकस्मिन् [१.१.२१] इति च येन विधिस्तदन्तस्य [१.१.७२]इति चेयमिह परिभाषा भविष्यत्याद्यन्तवदेकस्मिन्निितीयं न भविष्यति येन विधिस्तदन्तस्येति।आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयतीयमिह परिभाषा भवत्याद्यन्तवदेकास्मिन्निितीयं न भवति येन विधिस्तदन्तस्येति यदयमनाङिति प्रतिषेधं शास्ति॥ एवं तर्हि सिद्धे सति यदज्ग्रहणे क्रियमाण एकग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र वर्णग्रहणे जातिग्रहणं

---

हा शब्द फुकटच होणार आहे.

पण सूत्रांतील अच् या शब्दाचा उपयोग निराळाच संभवतो.

तो कोणता ?

अच् शेवटीं असलेल्याच निपाताला प्रगृह्यसंज्ञा झाली पाहिजे. हल् शेवटीं असलेल्या निपाताला प्रगृह्यसंज्ञा होऊं नये.

पण हल् शेवटीं असलेल्या निपाताला प्रगृह्यसंज्ञा झाली काय आणि न झाली काय त्यांत कांहीं दोषही नाहीं आणि उपयोगही नाहीं.

तरी पण 'आद्यन्तवदेकस्मिन्' (१।१।२१) आणि 'येन विधिस्तदन्तस्य' (१।१।७२) ह्या इतर ठिकाणीं स्वतंत्रपणानें उपयोगीं पडत असलेल्या दोन परिभाषा येथें अगदीं बरोबरीनें उपस्थित होत असतांना त्यांमध्यें आद्यन्तवदेकस्मिन् हीच परिभाषा येथें उपयोगांत आणावयाची आणि येन विधिस्तदन्तस्य ही परिभाषा येथें उपयोगांत आणावयाची नाहीं असें वैषम्य कां बरें करावें ?

ज्या अर्थीं हा आचार्य पाणिनि प्रकृतसूत्रामध्यें अनाङ् असा शब्द घालून आङ् या निपाताला प्रगृह्यसंज्ञेचा निषेध करतो त्यावरूनच तो असें सूचित करतो की येथें आद्यन्तवदेकस्मिन् हीच परिभाषा उपयोगांत आणावी आणि येन विधिस्तदन्तस्य ही परिभाषा येथें उपयोगांत आणूं नये.

अशा रीतीनें एकंदरींत या प्रकृतसूत्रामध्यें एक हा शब्द न घालतां नुसता अच् एवढाच शब्द घातल्यानें सर्व इष्ट सिद्ध होतें असें असूनही येथें आचार्य पाणिनि एक असा अधिक शब्द घालतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की दुसरीकडे कुठेंही वर्णांचें ग्रहण केलें असतां तेथें त्या जातीचें ग्रहण होतें.

---

३. जर तदन्तविधि होऊन अजन्त म्ह. अच् शेवटीं असलेल्या प्र इत्यादि निपातांना प्रगृह्यसंज्ञा होईल तर अच् हा शब्द व्यर्थच होईल. कारण अजन्त असें निपाताला विशेषण देण्यानें हलन्त म्ह. व्यंजन शेवटीं असलेल्या उत् वगैरे निपातांची व्यावृत्ति होणार हें खरें, पण हलन्त निपाताला संधिकार्य आपोआपच प्राप्त होत नसल्यामुळें प्रगृह्यसंज्ञा झाली तरी कांहीं दोष येणार नाहीं. तेव्हां अच् हें विशेषण व्यर्थ होत असल्यामुळें त्याच्या सामर्थ्यास्तव तदन्तविधि बाजूला सरून अज्रूपी निपात असा अर्थ होईल. तेव्हां प्र इत्यादि निपातांना प्रगृह्यसंज्ञा होत नाहीं असा अज्ग्रहणाचा उपयोग आहे.

४. अज्ग्रहणसामर्थ्यास्तव आद्यन्तवदेकस्मिन् या परिभाषेला बाजूला सारून मुख्य अजन्त असे जे प्र वगैरे निपात त्यांनाच प्रगृह्यसंज्ञा होईल आणि 'आद्यन्तवत्०' या परिभाषेनें मानलेले आणि म्हणूनच गौण अजन्त असे जे अ इ उ वगैरे निपात त्यांना प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं. तेव्हां अशी कल्पना केली असतांही अज्ग्रहणाचा उपयोग संभवतो. म्हणून अज्ग्रहणसामर्थ्यास्तव 'येन विधि०' हीच परिभाषा बाजूला कां सारावी, 'आद्यन्तवत्०' हीच परिभाषा बाजूला कां सारूं नये, असा शंकाकाराचा अभिप्राय आहे.

५. ज्या ठिकाणीं एक असा संख्याबोधक शब्द न उच्चारतां नुसतें वर्णांच्या निमित्तानें कांहीं कार्य सांगितलें असेल त्या ठिकाणीं त्या जातीचे अनेक

भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । दम्भेर्हल्ग्रहणस्य जातिवाचकत्वात्सिद्धमिति यदुक्तं तदुपपन्नं भवति ॥ अनाङिति किमर्थम् । आ उदकान्तात् ओदकान्तात् । इह कस्मान्न भवति । आ एवं नु मन्यसे । आ एवं किल तदिति । सानुबन्धकस्येदमाकारस्य ग्रहणमननुबन्धकश्चात्राकारः । क्व पुनरयं सानुबन्धकः क्व निरनुबन्धकः ।

ईषदर्थे क्रियायोगे मर्यादाभिविधौ च यः । एतमातं ङितं विद्याद्वाक्यस्मरणयोरङित् ॥

## ओत् ॥१.१.१५॥

---

ह्या ज्ञापनाचा काय उपयोग ?

'दम्भेर्हल्ग्रहणस्य जातिवाचकत्वात्सिद्धम्' असें 'हलन्ताच्च'(१।२।१०) या सूत्रावर वार्तिककारांनीं जें सांगितलें आहे तें ह्या ज्ञापनाच्या योगानें बरोबर जुळतें.

ह्या सूत्रामध्यें अनाङ् असें कशाकरतां म्हटलें आहे?

आ उदकान्तात् या ठिकाणीं संधि होऊन ओदकान्तात् असें रूप होतें तेथें आ याला प्रगृह्यसंज्ञा होऊं नये म्हणून अनाङ् असें म्हटलें आहे.

आ एवं नु मन्यसे, आ एवं किल तत्, या ठिकाणीं अनाङ् हा प्रगृह्यसंज्ञेचा निषेध कां बरें होत नाहीं ?

सूत्रामध्यें अनाङ् असें ङकारेत्संज्ञक आकाराचें ग्रहण केलें आहे. आणि आ एवं नु॰ इत्यदि उदाहरणांमध्यें ङकारेत्संज्ञक नाहीं. केवळ आकार आहे.

पण उदाहरणामध्यें तर ङकार कुठेंच दिसत नाहीं. तेव्हां कोणत्या प्रयोगामध्यें हा आकार मूळचा सानुबंधक म्ह. आङ् आहे आणि कोणत्या प्रयोगामध्यें मूळचा निरनुबंधक म्ह. केवळ आ आहे हें समजावें कसें ?

ईषत् म्ह. थोडें या अर्थाला दाखविणारा, क्रियायोगी म्ह. धातूच्या मागें उपसर्ग म्हणून लाविलेला, व मर्यादा किंवा अभिविधि या अर्थांचा द्योतक जो आकार तो ङित् आहे म्ह. मूळचा आङ् आहे असें समजावें. वाक्यद्योतक आणि स्मरणद्योतक जो आकार तो अङित् आहे म्ह. मूळचाच आ असा

---

वर्ण जरी एखाद्या उदाहरणांत असले तरी तें कार्य करावें असा जातीचें ग्रहण याचा अर्थ आहे.

६. आ हा निपात दोन प्रकारचा आहे. एक ङित् आ म्ह. आङ् आणि दुसरा नुसताच आ. हाच अङित् असा केवळ आकार होय.

७. ङकाराला हलन्त्यम् (१।३।३) यानें इत्संज्ञा होऊन 'तस्य लोपः'(१।३।९) यानें त्याचा लोप होतो.

८. अनुबन्ध म्ह. इत्संज्ञक. त्यानें सहित तो सानुबंधक म्ह. आङ् आणि निरनुबन्धक म्ह. इत्संज्ञकानें रहित केवल आ.

९. आ उष्णम् ओष्णमुदकम् येथें आ याचा थोडें असा अर्थ आहे. आ इहि एहि येथें आ हा क्रियायोगी उपसर्ग आहे. आ उदधेः ओदधेः येथें आ याचा मर्यादा किंवा अभिविधि असा अर्थ आहे. ओदधेः याचा समुद्रापर्यंत असा अर्थ आहे. मर्यादा अर्थ घेतला तर समुद्राच्या पूर्वींचा प्रदेश येतो आणि अभिविधि अर्थ घेतला तर समुद्रासुद्धां प्रदेश येतो. या चारही ठिकाणीं आ हा ङित् आहे म्ह. आङ् आहे. म्हणून त्याला प्रगृह्यसंज्ञा न झाल्यामुळें संधि झाला आहे. आ एवं नु मन्यसे याचा अर्थ 'असें का आतां तूं मानतोस' असा आहे. येथें पूर्वींच्या वाक्याचा उलटपणा आ यानें दाखविला आहे यालाच वाक्यद्योतक म्हणतात. आ एवं किल तत् याचा अर्थ 'अरे, असें बरें का तें' असा आहे. एखाद्या वस्तूच्या विशेष स्वरूपाचें स्मरण झाल्यानंतर हें वाक्य तोंडांतून निघालें असल्यामुळें येथें स्मरणद्योतक आकार आहे. या दोन्ही ठिकाणीं अङित् आ आहे, आङ् नाहीं. म्हणून प्रगृह्यसंज्ञेचा निषेध होत नाहीं.

१. ओकारान्त म्ह. ओकार शेवटीं असलेल्या निपाताला प्रगृह्यसंज्ञा होते.

किमुदाहरणम् । आहो इति । उताहो इति । नैतदस्ति प्रयोजनम् । निपातसमाहारोऽयम् । आह उ आहो इति । उत आह उ उताहो इति । तत्र निपात एकाजनाङ् [१.१.१४] इत्येव सिद्धम् । एवं तर्ह्यनेकनिपाता इमे ॥ अथवा प्रतिषिद्धार्थोऽयमारम्भः । ओ षु यातं मरुतः । ओ षु यातं बृहती शक्वरी च । ओ चित्सखायं सख्या ववृत्याम् ॥

## ओतश्च्विप्रतिषेधः ॥१॥

ओदन्तो निपात इत्यत्र च्व्यन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अनदः अदः अभवत् अदोऽभवत् । तिरोऽभवत् ॥ न वक्तव्यः । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं न भविष्यति ॥ एवमप्यगौर्गौः समपद्यत गोऽभवत् अत्र प्राप्नोति । एवं तर्हि गौण-

---

निपात आहे असें समजावें.

(सू.१५) या सूत्राचें उदाहरण कोणतें ?

'आहो इति उताहो इति' हें उदाहरण होय.

हें उदाहरण या सूत्राचें नव्हे. कारण आहो हा सबंध एक निपात नव्हे; तो अनेक निपातांचा समुदाय आहे. आह आणि उ या दोन निपातांचा संधि होऊन आहो असें झालें आहे. तसेंच उत, आह आणि उ या तीन निपातांचें उताहो असें झालें आहे तेव्हां त्यांतील शेवटच्या निपाताला 'निपात एकाजनाङ्' या पूर्वसूत्रानेंच प्रगृह्यसंज्ञा सिद्ध होत आहे. तर मग आहो आणि उताहो हे सबंध एकेक निराळेच निपात आहेत असें गृहीत धरून हें सूत्र केलें आहे.

किंवा 'ओ षु[२] यातं मरुतः', 'ओ षु यातं बृहती शक्वरी च', 'ओ चित्सखायं सख्या ववृत्त्याम्' (ऋ. १०।१०।१) इत्यादि उदाहरणांमध्यें अनाङ् या निषेधामुळें पूर्वसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा सिद्ध होणार नाहीं त्याकरतां हें सूत्र केलें आहे.

(वा.१) ही जी प्रकृतसूत्रानें ओकारान्त निपाताला प्रगृह्यसंज्ञा सांगितली आहे ती प्रगृह्यसंज्ञा च्विप्रत्ययान्त निपाताला होत नाहीं असें सांगावें. उदा० अनदः अदः समभवत् अदोऽभवत्[३], तिरोऽभवत्.

तसें सांगावयास नको. कारण 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' या परिभाषेनें तेथें प्रगृह्यसंज्ञा होणार[४] नाहीं.

तरी पण 'अगौः गौः समपद्यत, गोऽभवत्'[५] या ठिकाणीं प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होते आहे.

तर मग या 'गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसंप्रत्ययः'

---

२. आ आणि उ या दोन निपातांचा संधि होऊन ओ असें झालें आहे. येथें आ हा ङित् म्ह. आङ् असल्यामुळें पूर्वसूत्रानें त्याला प्रगृह्यसंज्ञा झाली नाहीं. संधि होऊन झालेला जो ओकार तो 'अन्तादिवच्च' (६।१।८५) या सूत्रानें आङ् समजला जात असल्यामुळें त्या ओ यालाही पूर्वसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं. हा उ अकारेतसंज्ञक घेतला नाहीं म्हणून पुढील उञः (१।१।१७) या सूत्रानेंही प्रगृह्यसंज्ञा होण्याचा संभव नाहीं. ती येथें ओत् या प्रकृतसूत्रानें होते. पदकालीं इति शब्द पुढें लाविला असतां 'ओ इति' या ठिकाणीं संधि होत नाहीं. हा प्रगृह्यसंज्ञेचा उपयोग होय.

३. पुढें असलेल्या पदार्थांचा अदस् या शब्दानें निर्देश होतो. जो पदार्थ वस्तुतः पुढें नसून पुढें असल्यासारखा समजला जातो त्याचा निर्देश अदस् शब्दाला च्वि प्रत्यय लावून करतां येतो. अदस् शब्दाहून 'अभूततद्भावे' (५।४।५०) या सूत्रानें च्वि प्रत्यय होऊन 'ऊर्यादिच्वि०' (१।४।६१) यानें निपातसंज्ञा झाली आहे. अदस् अभवत् येथें रुत्व, उत्व आणि गुण होऊन अदो असें होतें त्याला जर प्रकृतरूपानें प्रगृह्यसंज्ञा झाली तर पूर्वरूप होणार नाहीं.

४. अदो हें मूळचें ओकारांत नव्हे. गुण होऊन बनलेलें आहे. म्हणून हें लाक्षणिक होय. लक्षणप्रतिपदोक्त० या परिभाषेचा अर्थ मागें (१।१।१३ टीप ४) दिला आहे.

५. गो हा शब्द मूळचाच आहे, त्यांतील ओकार

मुख्ययोर्मुख्ये कार्यसंप्रत्ययः[६] इति। तद्यथा। गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति न बाहीकोऽनुबध्यते। कथं तर्हि बाहीके वृद्ध्यात्त्वे भवतः। गौस्तिष्ठति। गामानयेति। अर्थाश्रय एतदेवं भवति। यद्धि शब्दाश्रयं शब्दमात्रे तद्भवति। शब्दाश्रये च वृद्ध्यात्त्वे॥

[संबुद्धौ[१] शाकल्यस्येतावनार्षे १.१.१६]

## उञ[१] ऊँ[२] ॥१.१.१७-१८॥

इह कस्मान्न भवति। आहो इति। उताहो इति। उञ इत्युच्यते न चात्रोञं पश्यामः। उञोऽयमन्येन सहैकादेश उञ्ग्र-

---

या परिभाषेनें येथें काम भागेल. असें पाहा की लोकामध्यें बैलाचें अनुबंधन करावें, बोकड हा अग्नि आणि सोम या देवतांना द्यावा असें म्हटलें असतां तेथें बैलाच्या ऐवजीं केव्हांही बैलासारख्या अशा एखाद्या अडाणी मनुष्याचें अनुबंधन केलें जात नाहीं व एखादा बोकडासारखा रानटी माणूस त्या देवतांना बोकडाच्या ऐवजीं केव्हांही दिला जात नाहीं.

असें आहे तर मग 'बैलासारखा एखादा अडाणी मनुष्य' या अर्थानें गो शब्दाचा प्रयोग केला असतां गौस्तिष्ठति गामानय या ठिकाणीं वृद्धि आणि आत्त्व हीं कार्यें कशीं केलीं आहेत ?

अर्थावर अवलंबून सांगितलेलें कार्य कर्तव्य असतांना तेथेंही 'गौणमुख्य०' या परिभाषेनें सांगितल्याप्रमाणें व्यवस्था होते. आणि जें कार्य केवळ शब्दावरच अवलंबून सांगितलेलें असतें तें अर्थाकडे नजर न देतां केवळ तो शब्द दृष्टीस पडला की तें केलें जातें. आणि वृद्धि व आत्त्व हीं कार्यें केवळ शब्दावरच अवलंबून सांगितलेलीं आहेत.

(सू.१७.१८) आहो इति उताहो इति या ठिकाणीं 'उञ ऊँ' या प्रकृतसूत्रानें ऊँ आदेश कां होत नाहीं.

सूत्रामध्यें उञः असें म्हटलें आहे ना ! आणि आहो उताहो येथें तर उञ् मुळींच दिसत नाहीं.

---

गुणानें झालेला नाहीं म्हणून त्याला लाक्षणिक म्हणतां येत नाहीं.

६. गौण अर्थानें वापरला जाणारा शब्द गौण होय. आणि मुख्य अर्थानें वापरला जाणारा शब्द मुख्य होय. एकच कार्य गौण आणि मुख्य अशा दोन्ही प्रकारच्या शब्दाला प्राप्त होत असलें तर तें कार्य मुख्य शब्दाला करावें;गौणाला करूं नये असा या परिभाषेचा अर्थ आहे.ज्या शब्दाहून च्विप्रत्यय केलेला असेल तो शब्द गौण अर्थानेंच उपयोगांत आणलेला असल्यामुळें गौण होय.

७. तेव्हां जसें लोकामध्यें बैल व बोकड हे मुख्यच घेतले जातात तसेंच शास्त्रामध्येंही मुख्य असाच शब्द घेतला जातो.

८. जें कार्य एखाद्या विशिष्ट शब्दाला सांगितलें असेल तेथें त्या विशिष्ट शब्दापासून अर्थ उपस्थित होत असल्यामुळें मुख्य अर्थी वापरलेल्याच शब्दाला तें कार्य करावें असें म्हणतां येतें. परंतु जें कार्य केवळ वर्णांचा निर्देश करून सांगितलें असेल तेथें त्या वर्णापासून अर्थ कोणताही उपस्थित होत नाहीं. तेव्हां तेथें गौणार्थक शब्द घ्यावा किंवा मुख्यार्थक शब्द घ्यावा ह्या चर्चेलाच अवकाश मिळत नाहीं. तशा ठिकाणीं तो वर्ण अनर्थक सुद्धां चालतो. मग गौणार्थक चालेल यांत नवल नाहीं. 'ओतो णित्' (७।१।९०) आणि 'औतोम् शसोः' (६।१।९३) या ठिकाणीं ओतः असा केवल वर्णांचा निर्देश केला आहे. ओत् या प्रकृतसूत्रामध्यें ओत् हा जरी वर्णाचाच निर्देश आहे तरी येथें निपात या पदापासून विशिष्ट शब्द मनांत येतात. तेव्हां त्या विशिष्ट शब्दापासून अर्थ उपस्थित होत असल्यामुळें गौण-मुख्य० या परिभाषेची प्रवृत्ति होते.

१. ओकारान्त जें संबोधनाचें एकवचन त्याला इति शब्द पुढें असतांना प्रगृह्यसंज्ञा होते तो इति शब्द वेदामध्यें उच्चारलेला नसावा. उदा० विष्णो इति.

१. ञकारेत्संज्ञक अशा उ या निपाताला इति शब्द पुढें असतांना प्रगृह्यसंज्ञा विकल्पानें होते.

२. ञकारेत्संज्ञक अशा उ या निपाताला इति शब्द पुढें असतांना ऊँ असा आदेश विकल्पानें होतो.

हणेन गृह्यते। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नोञेकादेश उञ्ग्रहणेन गृह्यत इति यदयमोत् [१.१.१५] इत्योदन्तस्य निपातस्य प्रगृह्यसंज्ञां शास्ति। नैतदस्ति ज्ञापकम्। उक्तमेतत्। प्रतिषिद्धार्थोऽयमारम्भ इति। दोषः खल्वपि स्याद्यद्युञेकादेश उञ्ग्रहणेन न गृह्येत। जानु उ अस्य रुजति जानू अस्य रुजति जान्वस्य रुजति। मय उञो वो वा [८.३.३३] इति वत्वं न स्यात्। एवं तर्ह्यनेकनिपाता इमे॥ अथवा द्वावुकाराविमौ। एकोऽननुबन्धकः। अपरः सानुबन्धकः। तद्योऽननुबन्धकस्तस्यैष एकादेशः॥

## उञ इति योगविभागः॥१॥

उञ इति योगविभागः कर्तव्यः। उञः शाकल्यस्याचार्यस्य मतेन प्रगृह्यसंज्ञा

---

पण येथें उञ् याचा दुसऱ्याबरोबर म्ह. आहु यांतील शेवटच्या अकाराबरोबर जो हा ओकार एकादेश झाला आहे तो 'अन्तादिवच्च' (६।१।८५) या सूत्रानें उञ्च समजला जात आहे. त्याची वाट काय ?

तर मग आम्ही असें म्हणतों की ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि ओत् या सूत्रानें ओकारान्त निपाताला प्रगृह्यसंज्ञा सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की उञाला झालेला एकादेश हा 'अन्तादिवच्च' (६।१।८५) यानें उञ् समजला जात नाहीं.[3]

हें ज्ञापक संभवत नाहीं. कारण ओषु यातं इत्यादि ठिकाणीं अनाङ् हा निषेध बाजूला सारून प्रगृह्यसंज्ञा होण्याकरितां ओत् हें सूत्र केलें आहे असा त्या सूत्राचा उपयोग पूर्वी (पृ. १८६) सांगितला आहे. शिवाय त्या ज्ञापनावरून जर उञाला झालेला एकादेश उञ् असा समजला जाणार नाहीं तर कांहीं ठिकाणीं दोष देखील येतो, तो असा कीं 'जानु उ अस्य रुजति' या ठिकाणीं उञाला सवर्णदीर्घ एकादेश झाल्यानंतर तो दीर्घ ऊ हा एकादेश 'अन्तादिवच्च' या सूत्रानें उञ्च आहे असें गृहीत धरून त्याला 'मय उञो वो वा' (८।३।३३) या सूत्रानें वकार आदेश विकल्पानें होतो आणि जानू अस्य रुजति आणि जान्वस्य रुजति अशीं दोन रूपें होतात तीं होणार नाहींत. कारण उञ् न समजल्यामुळें वकार आदेश होणार नाहीं.[4]

तर मग आहो आणि उताहो हे सबंध निराळेच निपात येथें घ्यावेत म्हणजे प्रकृतसूत्रानें ऊँ आदेश तेथें होणार नाहीं किंवा आहो या ठिकाणीं ऊँ आदेश न होण्याचा आणखीही एक मार्ग आहे तो असा की उ हा निपात दोन प्रकारचा आहे : एक निरनुबंधक म्ह. ञकारेत्संज्ञक नव्हे असा केवळ उ हा, आणि दुसरा सानुबंधक म्ह. ञकारेत्संज्ञक उञ् हा. त्या दोहोंपैकीं जो निरनुबंधक आहे त्याला एकादेश गुण होऊन आहो असें झालें आहे. तेव्हां येथें उञ् नसल्यामुळें प्रकृतसूत्र लागू पडत नाहीं.

(वा.१) उञ ऊँ या प्रकृत सूत्राचा विभाग करावा म्ह. दोन सूत्रें करावींत. त्यांपैकीं पहिलें सूत्र उञः— याचा अर्थ उञ् याला इति शब्द पुढें असतांना शाकल्याचार्यांच्या मतानें प्रगृह्यसंज्ञा होते. उदा० उ इति विति.[5] त्यानंतर दुसरें सूत्र ऊँ. याचा अर्थ उञ् याला इति शब्द

---

३. ओत् या सूत्राच्या आहो वगैरे उदाहरणांतील ओकार हा जर उञ् समजला जाईल तर उञः या सूत्रानेंच तीं उदाहरणें साधत असल्यामुळें ओत् हें सूत्र व्यर्थ होईल.तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव 'अन्तादिवच्च' हें सूत्र तेथें प्रवृत्त होत नाहीं.

४. एकंदरींत ज्ञापक न संभवल्यामुळें आहो इत्यादि ठिकाणीं अन्तादिवच्च या सूत्राची प्रवृत्ति होऊन ओकार हा उञ् समजला जाईल आणि उञ ऊँ याची प्रवृत्ति होईल असा दोष येतो.

५. शाकल्याचार्यांच्या मतानें प्रगृह्यसंज्ञा झाल्यामुळें उ इति असें रूप होतें, आणि इतरांच्या मतानें प्रगृह्यसंज्ञा नसल्यामुळें विति असें रूप होतें.

भवति । उ इति विति ॥ तत ऊँ । उञ ऊँ इत्ययमादेशो भवति शाकल्यस्याचार्यस्य मतेन दीर्घोऽनुनासिकः प्रगृह्यसंज्ञकश्च ऊँ इति ॥ किमर्थो योगविभागः ।

ऊँ वा शाकल्यस्य ॥२॥

शाकल्यस्याचार्यस्य मतेन ऊँ विभाषा यथा स्यात् । ऊँ इति उ इति । अन्येषामाचार्याणां मतेन विति ॥

[1] ईदूतौ च सप्तम्यर्थे ॥१-१-१९॥

ईदूतौ सप्तमीत्येव

ईदूतौ सप्तमीत्येव सिद्धं नार्थोऽर्थग्रहणेन ।

लुप्तेऽर्थग्रहणाद्भवेत् ।

लुप्तायां सप्तम्यां प्रगृह्यसंज्ञा न प्राप्नोति । क्व । सोमो गौरी अधि श्रितः । इष्यते चात्रापि स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीमेवमर्थमर्थग्रहणम् ॥ नात्र सप्तमी लुप्यते । किं तर्हि । पूर्वसवर्णोऽत्र भवति ।

पूर्वस्य चेत्सवर्णोऽसावाडाम्भावः प्रसज्यते ॥१॥

---

पुढें असतांना शाकल्याचार्यांच्या मतानें दीर्घ, अनुनासिक आणि प्रगृह्यसंज्ञक असा ऊँ आदेश होतो. उदा० ऊँ इति.

हा सूत्राचा विभाग कशाकरतां करावा लागत आहे ?

(वा.२) शाकल्याचार्यांच्या मतानें ऊँ हा आदेश विकल्पानें झाला पाहिजे म्हणून. तेव्हां शाकल्याचार्यांच्या मतानें ऊँ इति आणि उ इति अशीं दोन रूपें होतात. आणि शाकल्याचार्यांशिवाय इतर आचार्यांच्या मतानें विति असें रूपँ होतें.

[सू.१९] ईदूतौ सप्तमी एवढेंच सूत्र केल्यानें उदाहरणें सिद्ध होतात. अर्थ या शब्दाचा कांहीं उपयोग नाहीं.

अर्थग्रहण केलें नाहीं तर सप्तमीचा लोप झाला असतां प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.

कुठें ?

'सोमो गौरी[2] अधि श्रितः' (ऋ.९।१२।३) या ठिकाणीं. आणि अशा ठिकाणींही म्ह. सप्तमीचा लोप झाला असला तरी प्रगृह्यसंज्ञा पाहिजे आहे, ती कांहींतरी त्याकरतां यत्न केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं. म्हणून सूत्रामध्यें अर्थ हा शब्द घातला आहे.[3]

ह्या ठिकाणीं गौरी शब्दापुढील सप्तमीचा लोप झालेला नाहीं.

तर मग गौरी असें रूप कसें झालें ?

ह्या ठिकाणीं 'सुपां सुलुक्' (७।१।३९) या सूत्रानें पूर्वसवर्ण झाला आहे.

जर गौरी या ठिकाणीं पूर्वसवर्ण[4] झाला असेल तर येथें 'आण्नद्याः' (७।३।११२) यानें आड् आगम आणि ङेराम्० (७।३।११६)

---

६. ऊँ या सूत्रांत अनुवृत्त झालेलें जें शाकल्यस्य हें पद त्याचा निव्वळ विकल्प असा अर्थ आहे. तेव्हां शाकल्यमतानें ऊँ इति असें एकच रूप होतें असें समजूं नये. उ इति असेंही रूप शाकल्यमतानें होतें.

७. जर सूत्राचा विभाग केला नसतां तर शाकल्यमतानें ऊँ इति आणि इतर मतानें विति अशी दोनच रूपें झालीं असतीं.

१. सप्तम्यर्थे म्ह. सप्तमी विभक्तीचा अर्थ आधारशक्ति, त्या अर्थाला मुख्यत्वानें दाखविणारें जें ईकारान्त आणि ऊकारान्त शब्दस्वरूप त्याला प्रगृह्यसंज्ञा होते.

२. गौरी शब्दापुढील सप्तमीचा 'सुपां सुलुक्०' (७।१।३९) या सूत्रानें लुक् झाला आहे. लुकालाही लोप ही संज्ञा आहे.

३. अर्थ शब्द घातला म्हणजे सप्तमीचा अर्थ असला म्हणजे प्रगृह्यसंज्ञा करतां येते. तिला सप्तमीप्रत्ययाची आवश्यकता राहत नाहीं. लोप झाला तरी त्याचा अर्थ कायमच असतो. अर्थाचा लोप कधींही होत नाहीं.

४. गौरी शब्दांतील ईकार हा पूर्व आहे; त्याचा सवर्ण म्ह. इकार सप्तमीप्रत्ययाला आदेश झाला आहे. नंतर सवर्ण दीर्घ होऊन गौरी असें रूप सिद्ध होतें, असा अभिप्राय आहे.

यदि पूर्वसवर्ण आट् आम्भावश्च प्राप्नोति ॥ एवं तर्ह्याहायमीदूतौ सप्तमीति न चास्ति सप्तमीदूतौ तत्र वचनाद्भविष्यति।

## वचनाद्यत्र दीर्घत्वम्

नेदं वचनाल्लभ्यम्। अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम्। किम्। यत्र सप्तम्या दीर्घत्वमुच्यते। दृतिं न शुष्कं सरसी शयानमिति। सति प्रयोजन इह न प्राप्नोति। सोमो गौरी अधि श्रित इति ॥

**तत्रापि सरसी यदि।**

तत्रापि सिद्धम्। कथम्। यदि सरसीशब्दस्य प्रवृत्तिरस्ति। अस्ति च लोके सरसीशब्दस्य प्रवृत्तिः। कथम्। दक्षिणापथे हि महान्ति सरांसि सरस्य इत्युच्यन्ते ॥

## ज्ञापकं स्यात्तदन्तत्वे

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो न प्रगृह्यसंज्ञायां प्रत्ययलक्षणं भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। कुमार्योरगारं कुमार्यगारम् वध्वोरगारम् वध्वगारम् प्रत्ययलक्षणेन

---

या सूत्रानें आम् आदेश हे प्राप्त होत आहेत, ते कां केले नाहींत[५] ?

तर मग येथें आचार्य पाणिनि ईदूतौ सप्तमी असें म्हणतो आणि दीर्घ ईकार किंवा ऊकार असे सप्तमीचे प्रत्यय तर कुठेंच दिसत नाहींत. तेव्हां ईदूतौ सप्तमी हें वचन व्यर्थ होईल म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव गौरी इत्यादि ठिकाणीं दीर्घ ईकारांत किंवा दीर्घ ऊकारांत शब्दस्वरूप असलें म्हणजे सप्तमीचा लोप झाला असला तरी तेथें प्रगृह्यसंज्ञा प्रकृतसूत्रानें होते अशी कल्पना करतां येईल[६].

वचनसामर्थ्यास्तव वरील कल्पना करणें शक्य नाहीं. कारण ईदूतौ सप्तमी या वचनाचा दुसरीकडे उपयोग संभवतो. तेव्हां हें वचन मुळीं व्यर्थच होत नाहीं.

तो उपयोग कोणता ?

ज्या ठिकाणीं सप्तमीला दीर्घ सांगितला आहे त्या ठिकाणीं उपयोग संभवतो. उदा० 'दृतिं न शुष्कं सरसी[७] शयानम्' (ऋ.९।१०३।२) आणि अशा रीतीनें वचनाचा दुसरीकडे उपयोग होत असल्यामुळें वरील कल्पना करण्याला कांहीं आधार नाहीं. तेव्हां 'सोमो गौरी अधि श्रितः' (ऋ.९।१२।३) या ठिकाणीं सप्तमीचा लोप झाला असतां प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

त्या ठिकाणींही सिद्ध होतें.

तें कसें ?

जर सरसी असा ईकारांत स्वतंत्र शब्द आहे तर गौरी यासारखेंच सरसी हें रूप होणार आहे. आणि लोकामध्यें बोलण्यांत सरसी शब्द येतो.

तो कुठें ?

दक्षिणभागामध्यें मोठ्या सरोवराला सरसी म्हणण्याचा प्रघात आहे.

एकंदरींत ईदूतौ सप्तमी एवढ्यानें सर्व काम भागत असल्यामुळें सूत्रामधील 'अर्थ' हा शब्द व्यर्थ होतो; त्यावरून आचार्य पाणिनि असें ज्ञापित करतो की प्रगृह्यसंज्ञा कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं[८].

या ज्ञापनाचा काय उपयोग ?

उपयोग असा की कुमार्योरगारं कुमार्यगारं, वध्वोरगारम् या उदाहरणांमध्यें प्रत्यय-

---

५. आट् आगम आणि आम् आदेश हे सवर्ण दीर्घाचा बाध करून नद्यां या उदाहरणमध्यें जसें होतात तसे येथें होतील.

६. एकंदरींत सूत्रामध्यें अर्थ हा शब्द नसला तरी गौरी येथें प्रगृह्यसंज्ञा करतां येते.

७. 'सुपां सुलुक्' (७।१।३९) या सूत्रावरील 'इयाडियाजीकाराणामुपसंख्यानम्' या वार्तिकानें सरस् शब्दापुढील इ या सप्तमीप्रत्ययाला दीर्घ ईकार आदेश झाला आहे.

८. एकंदरींत गौरी याप्रमाणेंच सरसी हें उदाहरणही सूत्रामध्यें अर्थ हा शब्द घातल्यावांचून सिद्ध करतां येतें.

प्रगृह्यसंज्ञा न भवति ॥

मा वा पूर्वपदस्य भूत् ॥२॥

अथवा पूर्वपदस्य मा भूदित्येवमर्थमर्थग्रहणम् । वाप्यामश्वो वाप्यश्वः नद्यामातिर्नद्यातिः । अथ क्रियमाणेऽप्यर्थग्रहणे कस्मादेवात्र न भवति । जहत्स्वार्था वृत्तिरिति । अथाजहत्स्वार्थायां वृत्तौ दोष एव । अजहत्स्वार्थायां च न दोषः । समुदायार्थोऽभिधीयते ॥

ईदूतौ सप्तमीत्येव लुप्तेऽर्थग्रहणाद्भवेत् । पूर्वस्य चेत्सवर्णोऽसावाडाम्भावः प्रसज्यते वचनाद्यत्र दीर्घत्वं तत्रापि सरसी यदि । ज्ञापकं स्यात्तदन्तत्वे मा वा पूर्वपदस्य भूत्

दाधा घ्वदाप् ॥१.१.२०॥

घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं शिदर्थम् ॥१॥

घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं कर्तव्यम् । दाधाप्रकृतयो घुसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । आत्त्वभूतानामियं संज्ञा

---

लक्षण करून 'ईदूदेत्०' (१।१।११) या सूत्रानें प्राप्त झालेली जी प्रगृह्यसंज्ञा ती होत नाहीं.

अथवा[१०] सप्तमीतत्पुरुष समासामधील ईकारान्त किंवा ऊकारान्त अशा पूर्वपदाला प्रकृतसूत्रानें प्रगृह्यसंज्ञा होऊं नये म्हणून सूत्रामध्यें अर्थ हा शब्द घातला आहे. उदा० वाप्यामश्वो वाप्यश्वः, नद्यामातिर्नद्य तिः.

पण अर्थ शब्द घातला तरी देखील येथें प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होत आहेच[११]. मग ती का होत नाहीं ?

वृत्तीविषयीं जहत्स्वार्थापक्ष[१२] घेतला म्हणजे येथें प्रगृह्यसंज्ञा होणार नाहीं.

पण वृत्तीविषयीं अजहत्स्वार्थापक्ष घेतला म्हणजे येथें दोष येणारच.

अजहत्स्वार्थापक्षींही येथें दोष येत नाहीं. कारण वृत्तीमध्यें समुदायाचाच अर्थ दाखविला जातो. तात्पर्य, आंतील पदांना आपआपला अर्थ दाखविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य नाहीं[१३].

(वा.१) घुसंज्ञा सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें प्रकृति असा अधिक शब्द घालावा, म्ह. दा, धा आणि त्यांच्या प्रकृति यांना घुसंज्ञा होते असें म्हणावें.

असें म्हणण्याचा उपयोग काय ?

उपयोग असा की आत्त्व केलेल्या दा आणि धा अशा शब्दस्वरूपांना ही घुसंज्ञा पाणिनीनें

---

९. 'ईदूदेत्०'(१।१।११) सूत्रावरील भाष्य (पृ. १७५) पाहा.

१०. कुमार्यगारम् इत्यादि उदाहरणांमध्यें जो ज्ञापनाचा उपयोग दाखविला तो उपयोग ईदूदेत्० या सूत्राचा जो अर्थ घेऊन संभवतो तो अर्थच मुळीं बरोबर नाहीं असें मागें (भाष्य पृ. १७५) सांगितलें आहे तें मनांत धरून येथें वार्तिककार अर्थ शब्दाचा दुसरा उपयोग दाखवीत आहे.

११. कारण वाप्यश्वः वगैरे समासांमध्यें पूर्वपदापुढोल सप्तमीप्रत्ययाचा लोप झाला असला तरी त्याचा अर्थ कायमच आहे.

१२. समास वगैरे वृत्तीमध्यें आंतील शब्दांना कांहींच अर्थ नसतो. वृत्तीच्या जोरावर त्यांचा मूळचा अर्थ टाकला जातो. उदा. वाप्यश्व या समासवृत्तीमध्यें वापी आणि अश्व या दोन्ही शब्दांना अर्थ नाहीं. वाप्यश्व या सामासिक शब्दाचा विहिरीजवळचा घोडा हा अर्थ आहे. याला जहत्स्वार्थापक्ष म्हणतात. वृत्ति केल्यानंतर सुद्धां आंतील शब्दांचा पूर्वींचा अर्थ कायमच राहतो असा दुसरा पक्ष आहे. याला अजहत्स्वार्थापक्ष म्हणतात.

१३. 'वापीचे ठिकाणीं' हा वापी याचा मूळचा अर्थ वाप्यश्व असा समास झाल्यानंतर जरी कायम असला तरी तो अर्थ, अश्व या उत्तरपदार्थाशीं संबद्ध असाच वापी या शब्दानें दाखविला जातो. वाक्यामध्यें जसें 'वापीचे ठिकाणीं' हा अर्थ दाखविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य त्याला असतें तसें समास केल्यानंतर राहत नाहीं. त्यामुळें वापी हा शब्द आधारशक्ति म्ह. वापीचे ठिकाणीं या अर्थाला मुख्यत्वानें दाखवीत नाहीं.

१. दा आणि धा यांना घु अशी संज्ञा होते. परंतु त्यांतील दा हें शब्दस्वरूप दाप् आणि दैप् या धातूंचें झालेलें नसावें.

क्रियते । सात्त्वभूतानामेव स्यादनात्त्वभूतानां न स्यात् । ननु च भूयिष्ठानि घुसंज्ञाकार्याण्यार्धधातुके तत्र चैत आत्त्वभूता दृश्यन्ते । शिदर्थम् । शिदर्थं प्रकृतिग्रहणं कर्तव्यम् । शित्यात्त्वं प्रतिषिध्यते तदर्थम् । प्रणिदयते प्रणिधयतीति ॥

भारद्वाजीयाः पठन्ति । घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं शिद्विकृतार्थम् । घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं क्रियते । किं प्रयोजनम् । शिदर्थं विकृतार्थं च । शित्युदाहृतम् । विकृतार्थं खल्वपि । प्रणिदाता प्रणिधाता । किं पुनः कारणं न सिध्यति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति प्रतिपदं य आत्त्वभूतास्तेषामेव स्याल्लक्षणेन य आत्त्वभूतास्तेषां न स्यात् ॥

अथ क्रियमाणेऽपि प्रकृतिग्रहणे कथमिदं विज्ञायते । दाधाः प्रकृतय इति आहोस्विद्दाधां प्रकृतय इति । किं चातः । यदि

---

सांगितली आहे तेव्हां ती आत्त्व केलेल्या शब्दस्वरूपांनाच होईल; आत्त्व न केलेल्या अशा त्यांच्या मूळ प्रकृतींना होणार नाहीं.

पण घुसंज्ञेचीं बरीचशीं कार्यें आर्धधातुक प्रत्यय केला असतांना होणारीं आहेत. आणि तो आर्धधातुक प्रत्यय केला असतांना तर दा आणि धा अशीं आत्त्व केलेलींच शब्दस्वरूपें दृष्टीस पडतात, तेव्हां प्रकृति हा शब्द घालण्याचा उपयोग कुठें होणार आहे, हा आक्षेप मनांत घेऊन वार्तिककारांनीं 'शिदर्थम्' असें म्हटलें आहे. शित् प्रत्ययाकरतां प्रकृति हा शब्द घातला पाहिजे, म्ह. शकारेत्संज्ञक प्रत्यय केला असतां तेथें आत्त्व होत नसतें त्याकरतां प्रकृति हा शब्द घातला पाहिजे, उदा० प्रणिदयते, प्रणिद्यति, प्रणिधयति.

ह्या वार्तिकासंबंधानें भारद्वाजीयांचें असें म्हणणें आहे की 'घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं शिद्विकृतार्थम्'. घुसंज्ञा सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें प्रकृति असा अधिक शब्द घालावा.

तो कशाकरतां ?

शित् प्रत्ययाकरतां आणि विकृत स्वरूपाकरतां. त्यांपैकीं शित्प्रत्ययासंबंधानें प्रकृतिशब्दाचा जो उपयोग होतो त्याचीं उदाहरणें प्रणिदयते वगैरे दाखविलींच आहेत. विकृत स्वरूपाकरतांही त्या प्रकृतिशब्दाची जरूर आहेच; उदा० प्रणिदाता, प्रणिधाता.

प्रकृति शब्द घातला नाहीं तर येथें कां बरें घुसंज्ञा होणार नाहीं ?

लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् अशी परिभाषा आहे. तेव्हां प्रतिपदोक्त दा, धा असे मूळचेच जे आकारान्त धातु उच्चारले आहेत त्यांनाच घुसंज्ञा होईल आणि मूळ आकारान्त नसून शास्त्रानें तयार झालेले जे दा, धा असे आकारान्त त्यांना होणार नाहीं.

आतां प्रकृति शब्द घातला तरी येथें असा एक विचार उत्पन्न होतो की येथें कसा अर्थ समजावा ? दा आणि धा ह्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते किंवा दा आणि धा यांच्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते.

---

२. खण्डन करणें या अर्थाचा दो धातु, रक्षण करणें या अर्थाचा देङ् धातु आणि पिणें या अर्थाचा धेट् धातु हे मूळचे जरी आकारान्त नाहींत तरी त्यांना आर्धधातुक प्रत्यय केला असतां 'आदेच उपदेशेऽशिति' (६।१।४५) या सूत्रानें आत्त्व होणारच. तेव्हां त्यांची दा, धा अशींच स्वरूपें होत असल्यामुळें प्रकृति हा शब्द घातल्यावांचूनच सूत्रानें घुसंज्ञा सिद्ध होते.

३. दे, दो आणि धे यांना आत्त्व होऊन दा, धा असें होत असतें. म्हणून दे, दो आणि धे यांना दा, धा यांची प्रकृति असें म्हणतात आणि दा, धा यांना दे, दो, धे यांची विकृति असें म्हणतात. येथें दे या दाच्या प्रकृतीला घुसंज्ञा झाली म्हणून 'नेर्गदनद०' (८।४।१७) यानें नि या उपसर्गाच्या नकाराला णत्व होतें.

४ मागील (१।१।१३ टीप ४) पाहा.

विज्ञायते दाधाः प्रकृतय इति स एव दोषः। आत्त्वभूतानामेव स्यादनात्त्वभूतानां न स्यात्। अथ विज्ञायते दाधां प्रकृतय इत्यनात्त्वभूतानामेव स्यादात्त्वभूतानां न स्यात्। एवं तर्हि नैवं विज्ञायते दाधाः प्रकृतय इति नापि दाधां प्रकृतय इति। कथं तर्हि। दाधा घुसंज्ञा भवन्ति प्रकृतयश्चैषामिति॥

तत्तर्हि प्रकृतिग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। इदं प्रकृतमर्थग्रहणमनुवर्तते। क्व प्रकृतम्। ईदूतौ च सप्तम्यर्थे [१.१.१९] इति। ततो वक्ष्यामि। दाधा घ्वदाप् अर्थे इति। नैवं शक्यम्। ददातिना समानार्थान्राति‍रासतिदाशतिमंहतिप्रीणातिप्रभृतीनाहुः। एतेषामपि घुसंज्ञा प्राप्नोति। तस्मान्नैवं शक्यम्। न चेदेवं प्रकृतिग्रहणं कर्तव्यमेव॥ शिदर्थेन तावन्नार्थः प्रकृतिग्रहणेन। अवश्यं तत्र मार्थं प्रकृतिग्रहणं कर्तव्यं प्रणिमयते प्रण्यमयतेत्येवमर्थम्। तत्पुरस्तादपकर्क्ष्यते। घु-

---

मग तुमचें काय म्हणणें आहे?

आमचें म्हणणें असें आहे की दा आणि धा ह्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते असा जर अर्थ घेतला तर तोच दोष येतो. म्हणजे जे आकारान्त दा, धा त्यांनाच घुसंज्ञा होईल. ज्यांना आत्त्व झालेलें नाहीं त्यांना घुसंज्ञा होणार नाहीं. आतां जर दा आणि धा यांच्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते असा अर्थ घेतला तर आत्त्व न झालेल्यांनाच, म्ह. दो दे धे यांनाच, घुसंज्ञा होईल आणि दा व धा हे जे आकारान्त धातु त्यांना होणार नाहीं.

तर मग येथें आम्ही दा, धा ह्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते असाही अर्थ घेत नाहीं आणि दा, धा ह्यांच्या ज्या प्रकृति त्यांना घुसंज्ञा होते असाही अर्थ घेत नाहीं.

कसा तर मग येथें अर्थ घ्यावयाचा?

दा व धा यांना घुसंज्ञा होते आणि त्यांच्या ज्या प्रकृति त्यांनाही घुसंज्ञा होते असा अर्थ येथें घ्यावयाचा आहे.

तर मग एकंदरींत प्रकृति हा शब्द सूत्रामध्यें घातला पाहिजे ना?

तो घालावयास नको. मागून अर्थ शब्दाची अनुवृत्ति करावी म्हणजे झालें.

मागें कोणत्या सूत्रामध्यें अर्थ शब्द आहे?

'ईदूतौ च सप्तम्यर्थे' या मागच्याच सूत्रामध्यें अर्थ शब्द आहे. तेव्हां येथें असें म्हणतां येईल की दा आणि धा यांना घुसंज्ञा होते आणि त्यांच्या अर्थाचे जे धातु त्यांनाही घुसंज्ञा होते.[५] दाप् आणि दैप् यांना मात्र होत नाहीं.

असें म्हणणें शक्य नाहीं. दा धातु देणें या अर्थाचा आहे आणि रा, रास्, दास्, मंह, प्री वगैरे धातूही त्याच अर्थाचे आहेत असें म्हणतात. तेव्हां त्यांना देखील घुसंज्ञा होऊं लागेल. याकरतां तसें म्हणणें शक्य नाहीं. आणि अशा रीतीनें अर्थ शब्दाच्या अनुवृत्तीनें जर भागत नाहीं तर सूत्रामध्यें प्रकृति हा शब्द घातलाच पाहिजे असें दिसतें.

प्रकृति हा शब्द घालावयास नको. शित् प्रत्ययाकरतां तर येथें प्रकृति शब्द घालण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण शित् प्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें घुसंज्ञेचें जें णत्वरूपी कार्य 'नेर्गदनद०' (८।४।१७) या सूत्रानें सांगितलें आहे त्या सूत्रामध्यें या धातूच्या प्रणिमयते, प्रण्यमयत या उदाहरणांकरतां प्रकृति हा शब्द अवश्य घातलाच पाहिजे. तोच प्रकृति हा शब्द त्या सूत्रामधील मा शब्दाच्या पूर्वी असलेल्या घु शब्दालाही लावतां येईल. आणि त्याचा अर्थ 'घुसंज्ञकाची प्रकृति आणि मा

---

५. दे, दो आणि धे हे जरी आकारान्त नाहींत तरी त्या आकारान्तांचा जो अर्थ तो त्यांना आहे म्हणून त्यांना घुसंज्ञा होईल.

प्रकृतौ माप्रकृतौ चेति । यदि प्रकृतिग्रहणं क्रियते प्रनिमिनोति प्रनिमीनाति अत्रापि प्राप्नोति । अथाक्रियमाणेऽपि प्रकृतिग्रहण इह कस्मान्न भवति प्रनिमाता प्रनिमातुम् प्रनिमातव्यमिति । आकारान्तस्य ङितो ग्रहणं विज्ञास्यते । यथैव तर्ह्यक्रियमाणे प्रकृतिग्रहण आकारान्तस्य ङितो ग्रहणं विज्ञायत एवं क्रियमाणेऽपि प्रकृतिग्रहण आकारान्तस्य ङितो ग्रहणं विज्ञास्यते ॥ विकृतार्थेन चापि नार्थः । दोष एवैतस्याः परिभाषाया लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति गामादाग्रहणेष्वविशेष इति ॥

## समानशब्दप्रतिषेधः ॥२॥

समानशब्दानां प्रतिषेधो वक्तव्यः । प्रनिदारयति प्रनिधारयति । दाधा घुसंज्ञा भवन्तीति घुसंज्ञा प्राप्नोति ॥

---

याची प्रकृति पुढें असतांना' असा[६] होईल.

जर 'नेर्गदनद०' या सूत्रामध्यें प्रकृति हा शब्द घातला तर प्रनिमिनोति[७] प्रनिमीनाति या ठिकाणीं त्या सूत्रानें णत्व होईल असा दोष येतो.

पण अगोदर आम्ही असें विचारतों की प्रकृति हा शब्द घातला नाहीं तरी प्रनिर्माता, प्रनिमातुं, प्रनिमातव्यं या ठिकाणीं त्या सूत्रानें णत्व प्राप्त होत आहे त्या दोषाची वाट काय ?

या सूत्रामध्यें ङकारेत्संज्ञक आकारान्त म्ह. माङ् या धातूचेंच ग्रहण करावें, म्ह. तेथें माङ् असें म्हटलें असतां तो दोष येत नाहीं.

असें आहे तर मग जसें प्रकृति हा शब्द घालण्यापूर्वी आलेला दोष जाण्याकरतां सूत्रामध्यें ङकारेत्संज्ञक आकारान्त म्ह. माङ् याच धातूचें ग्रहण केलें जातें, तसें प्रकृति हा शब्द घातल्यानंतरही ङकारेत्संज्ञक आकारान्त, म्ह. माङ् याच, धातूचें ग्रहण केलें म्हणजे कांहीं दोष येणार नाहीं[९].

विकृत स्वरूपाकरतांही सूत्रामध्यें प्रकृति शब्द घालण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' या परिभाषेवर हा दोषच येत आहे. त्या परिभाषेवर जे दोष येतात त्यांत ह्या प्रकृत दोषाची गणना केली आहे. आणि म्हणूनच 'लक्षणप्रतिपदोक्त०' या परिभाषेचा अपवाद म्हणून दुसरी एक परिभाषा 'गामादाग्रहणेष्व-विशेषः' अशी[१०] मानिली आहे.

(वा.२) दा आणि धा या शब्दांनाही घु-संज्ञा सांगितली आहे. त्यासारखेच जे इतर ठिकाणीं शब्द दृष्टीस पडतात त्यांना घुसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें. उदा० प्रनिदारयति, प्रनिधारयति. दा आणि धा यांना घुसंज्ञा होते एवढेंच येथें सांगितलें आहे म्हणून प्रनिदारयति[११] इत्यादि ठिकाणीं घुसंज्ञा प्राप्त होत आहे.

---

६. तेव्हां जसें प्रणिमयते या ठिकाणीं मा असा आकारान्त धातु नसला तरी त्याची प्रकृति मे ही पुढे असल्यामुळें णत्व होतें तसें प्रणिदयते या ठिकाणीं दे धातूला आत्व न झाल्यामुळें घुसंज्ञा झाली नाहीं तरी घुसंज्ञकाची प्रकृति दे ही पुढें असल्यामुळें णत्व होईल.

७. मि आणि मी या धातूंना 'मीनातिमिनोति-दीङां०' (६।१।५०) यानें आत्व सांगितलें असल्या-मुळें मि आणि मी ह्या माच्या प्रकृति होत आहेत.

८. मि आणि मी याच धातूंचीं हीं रूपें आहेत. येथें 'मीनातिमिनोति०' यानें आत्व झालें असल्यामुळें मा असें आकारान्त स्वरूप प्रत्यक्षच पुढें आहे.

९. कारण आतां प्रकृति घेतली तरी ती माङ् याचीच घेतली जाणार आहे.

१०. गा, मा आणि दा या स्वरूपांना उच्चारून जीं कार्यें सांगितलीं असतील तेथें तीं गा वगैरे स्वरूपें प्रतिपदोक्तच घ्यावींत, लाक्षणिक घेऊं नयेत, अशी कोण-त्याही प्रकारची चर्चा करूं नये. उदाहरणांत आका-रान्त स्वरूप दृष्टीस पडलें कीं कार्यें करावींत असा त्या परिभाषेचा अर्थ आहे.

११. दृ आणि धृ या धातूंहून णिच् प्रत्यय केला असतां 'अचोञ्णिति' (७।२।११५) यानें वृद्धि

**समानशब्दाप्रतिषेधोऽर्थवद्-ग्रहणात् ॥३॥**

समानशब्दानामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । घुसंज्ञा कस्मान्न भवति । अर्थवद्ग्रहणात् । अर्थवतोर्दाधोर्ग्रहणं न चैतावर्थवन्तौ ॥

**अनुपसर्गाद्वा ॥४॥**

अथवा यत्क्रियायुक्ताः प्रादयस्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतः । न चैतौ दाधौ प्रति क्रियायोगः ॥ यद्येवमिहापि तर्हि न प्राप्नोति । प्रणिदापयति प्रणिधापयति । अत्रापि नैतौ दाधावर्थवन्तौ नाप्येतौ दाधौ प्रति क्रियायोगः ॥

**न वार्थवतो ह्यागमस्तद्गुणीभूतस्तद्ग्रहणेन गृह्यते यथान्यत्र ॥५॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अर्थवत आगमस्तद्गुणीभूतोऽर्थवद्ग्रहणेन गृह्यते यथान्यत्र । तद्यथा । अन्यत्राप्यर्थवत आगमोऽर्थवद्ग्रहणेन गृह्यते । क्वान्यत्र । लविता चिकीर्षितेति ॥ युक्तं पुनर्यन्नित्येषु नाम शब्देष्वागमशासनं स्यान्न नित्येषु नाम शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवि-

---

(वा.३)सारख्या शब्दांना घुसंज्ञेचा अप्रतिषेध आहे. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय, म्ह. घुसंज्ञेचा निषेध सांगावयास नको.

मग प्रनिदारयति इत्यादि ठिकाणीं घुसंज्ञा कां होत नाहीं ?

अर्थवानाचें ग्रहण केलें आहे म्हणून होत नाहीं. अर्थवान् असे जे दा आणि धा त्यांचेंच येथें ग्रहण केलें आहे आणि प्रनिदारयति, प्रनिधारयति या उदाहरणांतील जे दार् आणि धार् यांतील दा आणि धा त्यांना कांहींच अर्थ नाहीं.

(वा.४)अथवा,प्रनिदारयति इत्यादि ठिकाणीं घुसंज्ञा झाली तरी णत्व होणार नाहींच. कारण प्र नि हे दा आणि धा यांचे उपसर्ग नव्हेत. प्र वगैरेंचा ज्याच्या क्रियेशीं योग असतो, त्याचेच ते गति किंवा उपसर्ग होत असतात. आणि प्रनिदारयति प्रनिधारयति यांतील जे दा आणि धा त्यांना अर्थच नसल्यामुळें 'त्यांच्या क्रियेशीं प्र नि यांचा योग आहे,' असें मुळींच म्हणतां येणार नाहीं.

असेंच जर असेल तर प्रणिदापयति, प्रणिधापयति येथेंही घुसंज्ञा होणार नाहीं. आणि णत्वही होणार नाहीं. कारण हे जे दाप् आणि धाप् यांतील दा, धा यांना अर्थ नाहीं आणि म्हणूनच त्यांच्या क्रियेशीं प्र नि यांचा योग नाहीं.

(वा.५) हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

पुक् हा आगम दा या अर्थवानाला झालेला, त्याच्या अवयवासारखा समजला जाणारा आहे म्हणून त्या शब्दानेंच तो घेतला जातो.[१२] तें असें की इतर ठिकाणीं सुद्धां ज्या अर्थवानाला आगम होतो तो आगम त्याच्या शब्दानेंच घेतला जातो.

इतर ठिकाणीं म्हणतां तें कुठें ?

लविता, चिकीर्षिता या ठिकाणीं तास् प्रत्ययाला झालेला इट् आगम तास् प्रत्ययापैकींच समजला जातो.

पण शब्द जर नित्य आहेत तर त्यांना आगम सांगणें युक्त होईल काय ? कधींही होणार नाहीं. शब्द जर नित्य आहेत तर त्यांतील वर्ण एकाच स्वरूपांत कायम राहणारे, न हालणारे आणि उत्पत्ति, विनाश वगैरे विकारांनीं रहित असेच असले पाहिजेत.

---

होऊन दार् आणि धार् असें झालें आहे. त्यांतील रेफाच्या मागील दा आणि धा या भागांना घुसंज्ञा प्राप्त होत आहे.

१२. तेव्हां दाप् हा दाच आहे असें समजून दाप् या अर्थवानालाच घुसंज्ञा करतां येते. प्रनिदारयति येथें र् हा दा याचा आगम नव्हे म्हणून तेथें दार् हा दा समजला जात नाहीं.

सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः । एकदेशविकारे हि नित्यत्वं नोपपद्यते ॥

**दीङः प्रतिषेधः स्थाघ्वोरित्त्वे ॥६॥**

दीङः प्रतिषेधः स्थाघ्वोरित्त्वे वक्तव्यः । उपादास्तास्य स्वरः शिक्षकस्येति । मीनातिमिनोति [६.१.५०] इत्यात्त्वे कृते स्थाघ्वोरिच्च [१.२.१७] इतीत्त्वं प्राप्नोति । कुतः तव्यमनपायोपजनविकारिभिः । आगमश्च नामापूर्वः शब्दोपजनः । अथ युक्तं यन्नित्येषु शब्देष्वादेशाः स्युः । बाढं युक्तम् । शब्दान्तरैरिह भवितव्यम् । तत्र शब्दान्तराच्छब्दान्तरस्य प्रतिपत्तिर्युक्ता । आदेशास्तर्हीमे भविष्यन्त्यनागमकानां सागमकाः। तत्कथम् ।

---

सगळ्याच ठिकाणीं अर्थवान् अशा शब्दांना अर्थवान् शब्द आदेश होतात असेंच दाक्षीचा पुत्र जो आचार्य पाणिनि त्याच्या मनांत असलें पाहिजे. कारण शब्दाच्या एखाद्या भागाला जर कांहीं आगम, आदेश वगैरे विकार होत असेल तर शब्दाचें नित्यत्व कधींही टिकणार नाहीं.

(वा.६) ह्या घुसंज्ञेच्या कार्यांपैकीं जें स्थाघ्वोरिच्च (१।२।१७) यानें सांगितलेलें इत्त्व हें कार्य तें कर्तव्य असतांना दीङ् धातूला घुसंज्ञा होते असें म्हणावें. उदा० उपादास्तास्य[१४] स्वरः शिक्षकस्य. उपादास्त या ठिकाणीं दीङ् धातूला 'मीनातिमिनोति०' (६।१।५०) या सूत्रानें आत्त्व केलें असतां प्रकृतसूत्रानें घुसंज्ञा झाली तर 'स्थाघ्वोरिच्च' या सूत्रानें इत्त्व होईल असा दोष येतो.

आणि आगम म्हटला म्हणजे तो एक नवीनच अवयव फुटल्यासारखा होणार तेव्हां तो नित्य शब्दामध्यें कसा बरें संभवेल ?

अगोदर आम्ही असें विचारतों की जर शब्द नित्य आहेत तर त्यांना आदेश जे होतात ते तरी योग्य आहेत काय ?

आदेश सांगणें हें खात्रीनें योग्य होईल. कारण त्या ठिकाणीं ते निराळेच शब्द असतात. तेव्हां एका शब्दाच्या ऐवजीं दुसऱ्या शब्दाचें ज्ञान होणें हें योग्यच आहे. त्याच्या योगानें शब्दाच्या नित्यत्वाची कांहींच हानि होत नाहीं.[१३]

तर मग हे आगमही आदेशच होतील म्ह. आगमरहितांना आगमसहित अशा आदेशांची कल्पना करतां येईल.

तें कसें ?

---

१३. 'जराया जरस०' (७।२।१०१) या सूत्रानें जरा शब्दाला जरस् आदेश सांगितला आहे. तेथें जरा हा एक शब्द निराळा आणि जरस् हा एक निराळा. या सूत्रानें इतकेंच सांगितलें आहे की जरा शब्द उच्चारण्याची वेळ आली असतां तेथें जरस् असा शब्द उच्चारला तरी चालेल. तेव्हां त्या ठिकाणीं जरा शब्दाचा नाशही होत नाहीं आणि जरस् शब्दाची उत्पत्तिही होत नाहीं. शंका–कांहीं एक अर्थ दाखविण्याकरतांच शब्द उच्चारण्याची वेळ येते. तेव्हां ज्या ठिकाणीं अनर्थकाला आदेश होत असेल त्या ठिकाणीं शब्दाला अनित्यत्व मानावें लागेल. उदा. 'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) यानें सकाराला षकार आदेश सांगितला आहे. तेव्हां हरिषु या उदाहरणामध्यें हरि शब्दाच्या पुढें सु प्रत्यय केला असतां त्यांतील सकाराचा नाश होऊन षकार उत्पन्न होतो असें मानावें लागतें. उत्तर–तेथें सकाराला अर्थ नसल्यामुळें त्याची उच्चारण्याची वेळ येत नाहीं तरी सु याला अर्थ असल्यामुळें सप्तम्यर्थ दाखविण्याकरतां सु याची उच्चारण्याची वेळ आली असतां तेथें षु असा शब्द उच्चारावा. किंवा हरीचे ठिकाणीं असा अर्थ दाखविण्याकरतां हरिसु असें न उच्चारतां हरिषु असें उच्चारावें असें सूत्राचें तात्पर्य मानलें म्हणजे शब्दाच्या नित्यत्वाला धक्का पोचत नाहीं.

१४. ह्या शिक्षकाचा आवाज क्षीण झाला म्ह. बसला असा या वाक्याचा अर्थ आहे. उपादास्त हें रूप दीङ् धातूचें आहे हें समजण्याकरतां येथें सबंध वाक्य घातलें आहे. कारण क्षीण होणें हा अर्थ दीङ् धातूचा आहे.

पुनरयं दोषो जायते किं प्रकृतिग्रहणादाहोस्विद् रूपग्रहणात्। रूपग्रहणादित्याह। इह खलु प्रकृतिग्रहणाद्दोषो जायते। उपदिदीषते। सनि मीमाघुरभलभ[७.४.५४]इति। नैष दोषः। दाप्रकृतिरित्युच्यते न चेयं दाप्रकृतिः। आकारान्तानामेजन्ताः प्रकृतय एजन्तानामपीकारान्ता न च प्रकृतिप्रकृतिः प्रकृतिग्रहणेन गृह्यते ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। घुसंज्ञा कस्मान्न भवति। संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येत्येवं न भविष्यति ॥

**दाप्प्रतिषेधे न दैप्यनेजन्तत्वात्॥७॥**

दाप्प्रतिषेधे दैपि प्रतिषेधो न प्राप्नोति। अवदातं मुखम्। ननु चात्त्वे कृते भवि-

---

पण हा दोष कसा बरें येथें आला ? सूत्रामध्यें प्रकृति शब्द जास्त घातल्यामुळें आला किंवा दा आणि धा या स्वरूपाला घुसंज्ञा सांगितल्यामुळें आला ?

दा आणि धा या स्वरूपाला घुसंज्ञा सांगितल्यामुळें आला असें म्हणतो. प्रकृति हा शब्द जास्त घालण्यानें जो दोष येतो तो उपदिदीषते[15] या उदाहरणामध्यें येतो. येथें 'सनि मीमाघुरभलभ०' (७।४।५४) या सूत्रानें इस् आदेश होऊं लागेल.

पण हा दोष येत नाहीं. कारण प्रकृति हा शब्द घातला तरी ती प्रकृति दा या आकारान्त शब्दाचीच घेतली आहे. आणि उपदिदीषते येथें जी दी ही प्रकृति आहे ती दा या आकारान्ताची[16] नव्हे. आकारान्ताच्या प्रकृति एजन्त असतात आणि एजन्तांच्या प्रकृति ईकारांत असतात. तेव्हां दा याच्या प्रकृतीची जी प्रकृति दी ती सूत्रांतील प्रकृति शब्दानें घेतली जाणार नाहीं.

एकंदरींत उपादास्त या ठिकाणीं आलेला दोष जाण्याकरतां दीङ् धातूला घुसंज्ञा होत नाहीं असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

तर मग उपादास्त येथें घुसंज्ञा कां होत नाहीं ?

'संनिपातलक्षणो[17] विधिरनिमित्तं तद्विघातस्य' या परिभाषेनें तेथें घुसंज्ञा होत नाहीं.

(वा.७)सूत्रामध्यें अदाप् असा जो दाप् धातूला घुसंज्ञेचा निषेध केला आहे तो निषेध दैप् धातूला होणार नाहीं. उदा० अवदातं[18] मुखम्.

पण दैप् धातूला आत्त्व केल्यानंतर दाप् असें स्वरूप होत असल्यामुळें निषेध होईल.

---

१५. उपदिदीषते हें रूप दीङ् धातूचें आहे. दीङ् धातूला 'मीनातिमिनोति०' (६।१।५०) यानें आत्त्व सांगितलें असल्यामुळें दी ही दाची प्रकृति आहे असें म्हणतां येतें. तेव्हां त्या दी याला घुसंज्ञा झाली तर 'सनि मीमा०' यानें इस् आदेश होऊं लागेल.

१६. मी वगैरे धातूंच्या एचाला आत्त्व होतें असा 'मीनातिमिनोति०' याचा अर्थ आहे. तेव्हां मी, मि व दी यांना पूर्वी गुण किंवा वृद्धि करून नंतर त्या एचाला त्या सूत्रानें आत्त्व होतें.

१७. दोघांच्या संबंधानें झालेलें जें कार्य तें त्या दोघांच्या संबंधाच्या नाशाला कारण होत नाहीं म्ह. त्या संबंधाचा नाश करणाऱ्या कार्याला मदत करीत नाहीं असा या सन्निपातपरिभाषेचा अर्थ आहे. उपादास्त येथें दीङ् धातु आणि सिच् प्रत्यय या दोघांचा संबंध झाला आहे. सिच् हा प्रत्यय मूळचा अकित् आहे; म्ह. गुणवृद्धींचा निषेध करणारा नाहीं. आणि असा तो आहे म्हणूनच 'मीनातिमिनोति०' यानें आकार झाला आहे. तो आकार घुसंज्ञेला मदत करीत नाहीं, म्हणजे आपलें स्वरूप दाखवीत नाहीं. तेव्हां घुसंज्ञा होत नाहीं. कारण घुसंज्ञेला दा या स्वरूपाची जरूर आहे. घुसंज्ञा ही त्या संबंधाची विनाशक आहे. कारण घुसंज्ञा ही 'स्थाघ्वोरिच्च' (१।२।१७) याला पुढें करून सिच् प्रत्ययाचें मूळचें अकित्त्व घालविणार. शिवाय स्थाघ्वोरिच्च यानें इत्त्व झालें असतां 'ह्रस्वादङ्गात्' (८।२।२७) यानें सिच्प्रत्ययच मुळीं नष्ट होणार आहे. याकरतां आत्त्व हें घुसंज्ञेला कारण होत नाहीं म्हणून घुसंज्ञा होत नाहीं.

१८. मुख स्वच्छ आहे असा याचा अर्थ आहे. स्वच्छ करणें हा दैप् धातूचा अर्थ आहे.

ष्यति। तद्ध्यात्त्वं न प्राप्नोति। किं कारणम्। अनेजन्तत्वात् ॥

**सिद्धमनुबन्धस्यानेकान्तत्वात् ॥८॥**

सिद्धमेतत्। कथम्। अनुबन्धस्यानेकान्तत्वात्। अनेकान्ता अनुबन्धाः ॥

**पित्प्रतिषेधाद्वा ॥९॥**

अथवा दाधा घ्वपिदिति वक्ष्यामि। तच्चावश्यं वक्तव्यम्। अदाबिति ह्युच्यमान इहापि प्रसज्येत। प्रणिदापयतीति। शक्यं तावदनेनादाबिति ब्रुवता बान्तस्य प्रतिषेधो विज्ञातुम्। सूत्रं तर्हि भिद्यते। यथान्यासमेवास्तु। ननु चोक्तं दाप्प्रतिषेधे न दैपीति। परिहृतमेतत्सिद्धमनुबन्धस्यानेकान्तत्वादिति। अथैकान्तेषु दोष एव। एकान्तेषु च न दोषः। आत्त्वे कृते भविष्यति। ननु चोक्तं तद्ध्यात्त्वं न प्राप्नोति किं कारणम् अनेजन्तत्वादिति। पकारलोपे कृते भविष्यति। न ह्ययं तदा दाब्भवति।

---

होईल खरा, पण तें आत्त्वच करतां येत नाहीं ना ?

कां बरें ?

दैप् हा धातु पकारान्त आहे, एजन्त नाहीं. म्हणून आत्त्वाची प्राप्ति येत नाहीं.[१९]

(वा.८) हें सिद्ध होत आहे, म्ह. येथें दैप् या ऐकाराला आत्त्व करतां येतें.

तें कसें ?

इत्संज्ञक जो पकार तो धातूचा अवयव नव्हे म्हणून. इत्संज्ञक जे वर्ण वगैरे ते धातु प्रत्यय वगैरेंचे अवयव समजले जात नाहींत.

(वा.९) अथवा दा धा घ्वपित् असें सूत्र करतों. म्हणजे पाणिनीनें जें अदाप् असें म्हटलें आहे त्याच्या ऐवजीं अपित् असें म्हणतों. आणि असें म्हणणें जरूरच आहे. कारण अदाप् असेंच जर कायम ठेवलें तर प्रणिदापयति या ठिकाणींही घुसंज्ञेचा निषेध होऊं लागेल[२०]. आतां अदाप् असें म्हणणाऱ्या सूत्रकारानें दाब् अशा बकारान्तालाच तो घुसंज्ञेचा निषेध केला आहे असें म्हणणें मात्र शक्य[२१] आहे. आणि तसें घेतलें असतां प्रणिदापयति येथे आलेला दोष जाईल. पण दैप् धातूला घुसंज्ञेचा निषेध होण्याकरतां अपित् असें म्हटलेंच पाहिजे असें दिसतें.

तसें म्हटल्यानें दोष जाईल खरा, पण सूत्र फिरवावें लागतें ना ?

तर मग सूत्र मूळचें आहे तसेंच असूं दे.

पण मूळचें अदाप् असें कायम ठेवलें तर दाप् धातूला सांगितलेला घुसंज्ञेचा निषेध दैप् धातूला प्राप्त होत नाहीं असें आतांच विचारलें आहे ना ?

विचारलें. आणि त्याचें उत्तरही दिलें आहे की इत्संज्ञक हे अवयव नसल्यामुळें पकार असतांनाच आत्त्व करतां येतें.

आतां इत्संज्ञक हे धातु वगैरेंचे अवयव मानले[२२] तर येथें दोष येणार असें दिसतें.

अवयव मानले तरी देखील येथें दोष येत नाहीं. कारण दैप् धातूला आत्त्व केल्यानंतर घुसंज्ञेचा निषेध होईल.

पण दैप् हा धातु एजन्त नसल्यामुळें आत्त्व करतां येत नाहीं असें आतांच म्हटलें आहे ना ?

पकाराचा लोप झाल्यानंतर आत्त्व करतां येईल.

---

१९. 'आदेच उपदेशेऽशिति' (६।१।४५) यानें एजन्त धातूला आत्त्व सांगितलें आहे.

२०. कारण येथें पुक् आगम (७।३।३६) झाल्यामुळें दाप् असें झालें आहे. अपित् असें म्हटलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण पुक् या आगमाचा पकार इत्संज्ञक नाहीं.

२१. अदाप् हा पकार बावसाने (८।४।५६) यानें झाला आहे. मूळचा तेथें बकारच उच्चारला आहे. तेव्हां दाप् या पकारान्ताला निषेधच सांगितला नाहीं. दाप् दैप् हे धातूही मूळचे दाब्, दैब् असे बकारान्तच आहेत असें समजावें.

२२. एकान्ता अनुबन्धाः म्ह. इत्संज्ञक हे अवयव आहेत अशी परिभाषा आहे, हाच सिद्धान्तपक्ष आहे.

भूतपूर्वगत्या भविष्यति । एतच्चात्र युक्तं यत्सर्वेष्वेव सानुबन्धकग्रहणेषु भूतपूर्वगतिर्विज्ञायते । अनैमित्तिको ह्यनुबन्धलोपस्तावत्येव भवति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानुबन्धकृतमनेजन्तत्वमिति यदयमुदीचां माङो व्यतीहारे [३.४.१९] इति मेङः सानुबन्धकस्यात्त्वभूतस्य ग्रहणं करोति ॥ अथवा दाबेवायं न दैबस्ति । कथमवदायतीति । श्यन्विकरणो भविष्यति ॥

## [1]आद्यन्तवदेकस्मिन् ॥१.१.२१॥

किमर्थमिदमुच्यते ।

**सत्यन्यस्मिन्नाद्यन्तवद्भावादेकस्मिन्नाद्यन्तवद्वचनम् ॥१॥**

सत्यन्यस्मिन्यस्मात्पूर्वं नास्ति परमस्ति स आदिरित्युच्यते । सत्यन्यस्मिन्यस्मात्परं नास्ति पूर्वमस्ति सोऽन्त इत्युच्यते । सत्यन्यस्मिन्नाद्यन्तवद्भावादेतस्मात्कारणादेकस्मिन्नाद्यन्तापदिष्टानि कार्याणि न सिध्यन्ति । इष्यन्ते च स्युरिति । तान्यन्तरेण

---

त्या वेळीं आत्त्व होईल खरें, पण आत्त्व झालें तरी दाप् असें स्वरूप त्या वेळीं दृष्टीस पडतें.

जरी दा असें स्वरूप दृष्टीस पडलें तरी तेथें पूर्वी असलेल्या पकाराचें स्मरण करून तेथें दाप् या स्वरूपाची कल्पना करतां येईल. शिवाय अशी कल्पना करणें हेंच येथें योग्य आहे. सर्वच ठिकाणीं सूत्रामध्यें इत्संज्ञकानें युक्त अशा स्वरूपाचें ग्रहण केलें असतां त्याच्या उदाहरणामध्यें 'पूर्वीच्या इत्संज्ञकाचें स्मरण करणें' ही कल्पना केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. कारण इत्संज्ञकाचा लोप (१।३।९) हा कोणत्याही अटीवर सांगितला नसल्यामुळें धातु वगैरे उच्चारल्याबरोबरच म्ह. इतर कार्यांच्या अगोदरच होणार आहे.[23]

अथवा हा आचार्य पाणिनि मेङ् धातूमधील एकाराला ङकार हा इत्संज्ञक कायम असतांनाच आत्त्व करून त्याचें 'उदीचां माङो व्यतीहारे' (३।४।१९) या सूत्रामध्यें माङ् असें जें उच्चारण करतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'इत्संज्ञकामुळें धातु एजन्त नाहीं असें समजू नये.' तेव्हां त्या ज्ञापनामुळें दैप् धातूमधील ऐकाराला पकार असतांच आत्त्व करतां येईल.

अथवा दैप् हा जो धातु आहे तो मूळ धातुपाठामध्यें दैप् असा न घालतां दाप् असाच घालावा.

पण तसा घातला तर त्याचें अवदायति हें क्रियापद कसें होईल ?

दाप् असा घालावा म्हणून जें सांगितलें तो दाप् पहिल्या गणांत दैप् याच्या जागीं न घालतां चवथ्या गणांत घालावा. म्हणजे 'दिवादिभ्यः श्यन्' (३।१।६९) यानें श्यन् प्रत्ययविकरण होईल आणि अवदायति हें क्रियापद साधेल.

(सू.२१) हें सूत्र कशाकरतां केलें आहे ?

(वा.१) दुसरे जवळ असतांना म्ह. ज्या वर्णाच्या पुढें कांहीं वर्ण आहेत आणि पूर्वी एकही वर्ण नाहीं त्या वर्णाला आदि असें म्हणतात. तसेंच दुसरे जवळ असतांना म्ह. ज्या वर्णाच्या पूर्वी कांहीं वर्ण आहेत पण पुढें मात्र एकही वर्ण नाहीं त्या वर्णाला अंत असें म्हणतात. अशा रीतीनें आदि आणि अंत हे शब्द दुसरे जवळ असतांना उपयोगांत येतात म्हणून आदि किंवा अंत शब्द उच्चारून सांगितलेलीं कार्यें एकच वर्ण असेल त्या ठिकाणीं होणार नाहींत आणि तीं तर झालीं पाहिजेत, तेव्हां त्याकरतां कांहीं तरी यत्न केल्याशिवाय तीं सिद्ध

---

२३. तेव्हां दाप् धातूला देखील मूळच्या पकाराचें स्मरण करूनच अदाप् हा घुसंज्ञेचा निषेध करावा लागणार आहे.

१. आदीला किंवा अन्ताला सांगितलेलें कार्य एकच असला तरी त्याला करावें.

यत्नं न सिध्यन्तीत्येकस्मिन्नाद्यन्तवद्वचनम्। एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्र व्यपदेशिवद्वचनम् ॥२॥**

तत्र व्यपदेशिवद्भावो वक्तव्यः । व्यपदेशिवदेकस्मिन्कार्यं भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**एकाचो द्वे प्रथमार्थम् ॥३॥**

वक्ष्यत्येकाचो द्वे प्रथमस्येति बहुव्रीहिनिर्देश इति । तस्मिन्क्रियमाण इहैव स्यात् पपाच पपाठ । इयाय आरेत्यत्र न स्यात् । व्यपदेशिवदेकस्मिन्कार्यं भवतीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

**षत्वे चादेशसंप्रत्ययार्थम् ॥४॥**

वक्ष्यत्यादेशप्रत्यययोरित्यवयवषष्ठ्येवेति । एतस्मिन्क्रियमाण इहैव स्यात् करिष्यति हरिष्यति । इह न स्यात् । इन्द्रो मा वक्ष्यत् । स देवान्यक्षत् । व्यपदेशिवदेकस्मिन्कार्यं भवतीत्यत्रापि सिद्धं भवति॥ स तर्हि व्यपदेशिवद्भावो वक्तव्यः।

---

होणार नाहींत म्हणून हें सूत्र केलें आहे. म्ह. एकच असला तरी तो आदीसारखा आणि अंतासारखा समजावा.

हा उपयोग आहे खरा.

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

(वा.२) हा जो सूत्रकारांनीं आद्यन्तवद्भाव सांगितला आहे त्या ठिकाणीं व्यपदेशिवद्भाव सांगावा, म्ह. फक्त आदीसारखीं आणि अंतासारखीं एवढींच कार्यें एक असला तरी करावींत असें विशेष रीतीनें न म्हणतां सामान्य रीतीनेंच म्हणावें. तें असें की मुख्यार्थ असतांना होणारीं जीं जीं कार्यें एक असल्यामुळें होत नसतील तीं सर्वच कार्यें एक असलीं तरी करावींत.

असें म्हणण्याचा उपयोग काय ?

(वा.३) 'एकाचो द्वे प्रथमस्येति बहुव्रीहिनिर्देशः' असें पुढें(६।१।१)वार्तिककार सांगणार आहेत. तेव्हां त्या ठिकाणीं एकाच् हा बहुव्रीहि समास घेतला असतां पपाच, पपाठ येथेंच द्वित्व होईल. इयाय, आर येथें होणार नाहीं. 'एक असला तरी मुख्याप्रमाणें कार्य करावें' असें म्हटलें असतां इयाय, आर येथें इ आणि ऋ हे एकटे वर्ण असले तरी ते पच् वगैरेसारखे एकाच् आहेत असें समजून द्वित्व करतां येतें.

(वा.४) 'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) ही अवयवषष्ठीच आहे असें पुढें वार्तिककार सांगणार आहेत. ती अवयवार्थी षष्ठी घेतली असतां करिष्यति, हरिष्यति या ठिकाणींच षत्व होईल आणि 'इन्द्रो मा वक्षत्' (ऋ.१।१३५।४) सदेवान्यक्षत् (ऋ.३।४।३) या ठिकाणीं होणार नाहीं. 'एक असला तरी मुख्याप्रमाणें कार्य करावें' असें म्हटलें असतां येथेंही षत्व सिद्ध होतें.

तर मग एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें आद्यन्तवत् असें न म्हणतां त्याच्या ऐवजीं व्यपदे-

---

२. एकाचो द्वे असें एकाचाला द्वित्व सांगितलें आहे. एकाच् शब्दामध्यें एक जो अच् असा कर्मधारय समास घेतला तर फक्त इ, ऋ असे जे धातु असतील त्यांनाच द्वित्व होईल. पच् वगैरे धातूंना होणार नाहीं. म्हणून एकाच् या शब्दामध्यें बहुव्रीहि समास घेऊन एक आहे अच् ज्यामध्यें असा अर्थ होतो आणि पच् पठ्, एवढ्या समुदायाला द्वित्व होतें. परंतु जसा पच् या समुदायामध्यें अ हा एक अच् आहे तसा इ, ऋ यांमध्यें कुणी नाहीं. तेव्हां इ ऋ यांना द्वित्व होणार नाहीं.

३. करिष्यति येथें 'इस्य' या प्रत्ययाचा अवयव सकार आहे म्हणून षत्व होईल. वक्षत्, यक्षत् येथें वच्, यज् धातूंहून लेट् प्रत्यय करून त्याला तिप्, त्या तिपाला अडागम (३।४।९४), मध्यें सिप् विकरणप्रत्यय (३।१।३४) झाला आहे. तेथें स् हा स्वतःच प्रत्यय असल्यामुळें त्याला प्रत्ययाचा अवयव म्हणतां येत नाहीं. म्हणून षत्व होणार नाहीं.

न वक्तव्यः ।

**अवचनाल्लोकविज्ञानात्सिद्धम् ॥५॥**

अन्तरेणैव वचनं लोकविज्ञानात्सिद्धमेतत् । तद्यथा । लोके शालासमुदायो ग्राम इत्युच्यते । भवति चैतदेकस्मिन्नप्येकशालो ग्राम इति । विषम उपन्यासः । ग्रामशब्दोऽयं बह्वर्थः । अस्त्येव शालासमुदाये वर्तते । तद्यथा । ग्रामो दग्ध इति । अस्ति वाटपरिक्षेपे वर्तते । तद्यथा । ग्रामं प्रविष्ट इति । अस्ति मनुष्येषु वर्तते । तद्यथा । ग्रामो गतो ग्राम आगत इति । अस्ति सारण्यके ससीमके सस्थण्डिलके वर्तते । तद्यथा । ग्रामो लब्ध इति । तद्यः सारण्यके ससीमके सस्थण्डिलके वर्तते तमभिसमीक्ष्यैतत्प्रयुज्यत एकशालो ग्राम इति ॥ यथा तर्हि वर्णसमुदायः पदं पदसमुदाय ऋगृक्समुदायः सूक्तमित्युच्यते । भवति चैतदेकस्मिन्नप्येकवर्णं पदमेकपदर्गेकर्चं सूक्तमिति । अत्राप्यर्थेन युक्तो व्यपदेशः । पदं नामार्थ ऋङ् नामार्थः सूक्तं

---

शिवत् असें म्हटलें पाहिजे असें दिसतें.

तसें म्हणावयास नको.

(वा.५)तसें न म्हणतांच लोकव्यवहारावरून हें सिद्ध होत आहे. असें पाहा की लोकामध्यें अनेक घरांच्या समुदायाला ग्राम म्ह. गांव म्हणतात. परंतु एकच घर असलें तरी तेथें एकशालो ग्रामः म्ह. एक घराचा गांव असें म्हटलेलें दृष्टीस पडतें.

पण हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण ग्राम हा शब्द अनेक अर्थांचा आहे. उदा० अनेक घरें या अर्थाला ग्राम शब्द दाखवितो; जसें- ग्रामो दग्धः (गाव जळाला). वाटपरिक्षेप म्ह. गांवकुसुं, खंदक हाही ग्राम शब्दाचा अर्थ आहे; जसें ग्रामं प्रविष्टः (गावांत शिरला). गांवांतील मनुष्यें हाही ग्राम शब्दाचा अर्थ आहे. जसें ग्रामो गतः, ग्राम आगतः (गांव बाहेर पडला, गांव परत आला). तसेंच गांवाजवळचें रान त्यांतील दाट झाडी, हद्दींवरचे नदी, डोंगर वगैरे व चौफेर बांध असलेलीं शेतें वगैरे या सर्व प्रदेशाला मिळून ग्राम शब्द लावलेला दृष्टीस पडतो. जसें—ग्रामो लब्धः (गांव मिळाला). तेव्हां या शेवटच्या अर्थाचा जो ग्राम शब्द तो मनांत धरून एकशालो ग्रामः हा प्रयोग चांगलाच करतां येतो.

तर मग आम्ही दुसरा दृष्टान्त देतों. तो असा की वर्णांच्या समुदायाला पद म्हणतात, पदांच्या समुदायाला ऋचा म्हणतात आणि ऋचांच्या समुदायाला सूक्त म्हणतात. परंतु एकवर्णं पदम्, एकपदा ऋक्, एकर्चं सूक्तम् असेंही म्हणतात. म्ह. एकाच वर्णाचें देखील पद होतें. एकाच पदाची देखील ऋचा होते आणि एकाच ऋचेचें देखील सूक्त होतें.

हा देखील दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण अन्यपदार्थामध्यें अर्थ घेतला म्हणजे एकवर्णं पदम् वगैरे सरळच जुळतात. पद म्हणजे नुसतें पद नव्हे तर अर्थासुद्धा. ऋचा देखील

---

४. 'एक आहे शाला म्ह. घर ज्यामध्यें असा गांव' असा एकशाल या पदाचा अर्थ आहे. परंतु तेथें गांव कोणता आणि त्यांतील घर कोणतें तें निराळें दाखवितां येत नाहीं. तरी देखील त्या एका घरालाच 'एकशालो ग्रामः' असें गौण रीतीनें म्हणण्याचा प्रघात आहे. त्याप्रमाणेंच इ या एका वर्णालाच एकाच् असें म्हणतां येईल.

५. जरी कोणत्याही घरांत शिरला नाहीं तरी गांवकुसू ओलांडल्यावर 'ग्रामं प्रविष्टः' असें म्हणतात.

६. जरी एकाच घराचा गाव आहे तरी त्या घरापेक्षां निराळा असा तो सबंध प्रदेश गांव म्हणून दाखवितां येतो. त्यामुळें एकशाल या बहुव्रीहीचा अर्थ चांगलाच जुळतो.

७. एक आहे वर्ण ज्या पदामध्यें असा येथें 'पद' हा अन्यपदार्थ आहे. त्या ठिकाणीं पद म्हणजे नुसता तो वर्णच न घेतां 'तो वर्ण आणि त्या वर्णाचा अर्थ' या दोहोंना मिळून पद असें म्हटलें म्हणजे एकवर्ण हा बहुव्रीहि समास चांगला जुळतो.

नामार्थः ॥ यथा तर्हि बहुषु पुत्रेष्वे-तदुपपन्नं भवत्ययं मे ज्येष्ठोऽयं मे मध्यमोऽयं मे कनीयानिति । भवति चैतदेकस्मिन्नप्ययमेव मे ज्येष्ठोऽयमेव मे मध्यमोऽयमेव मे कनीयानिति । तथासूतायामसोष्यमाणायां च भवति प्रथमगर्भेण हतेति । तथानेत्यानाजिगमिषुराहेदं मे प्रथममागमनमिति ॥

आद्यन्तवद्भावश्च शक्योऽवक्तुम् । कथम् ।

**अपूर्वानुत्तरलक्षणत्वादाद्यन्तयोः सिद्धमेकस्मिन् ॥६॥**

अपूर्वलक्षण आदिरनुत्तरलक्षणोऽन्तः । एतच्चैकस्मिन्नपि भवति । अपूर्वानुत्तरलक्षणत्वादेतस्मात्कारणादेकस्मिन्नप्याद्यन्तापदिष्टानि कार्याणि भविष्यन्ति नार्थ आद्यन्तवद्भावेन ॥ गोनर्दीयस्त्वाह । सत्यमेतत्सति त्वन्यस्मिन्निति ॥

---

अर्थासुद्धां. सूक्तदेखील अर्थासुद्धांच होय. तात्पर्य, पद, ऋचा व सूक्त हीं जेवढ्या शब्दांच्या भागाला म्हणतात तेवढा शब्दांचा भागच केवळ पद वगैरे नाहीं तर अर्थासकट त्या भागाला पद वगैरे म्हणतात.

तर मग आम्ही आणखी एक निराळाच दृष्टान्त देतों. असें पाहा की एखाद्याला पुष्कळ मुलगे असतील तर तेथें हा माझा थोरला मुलगा आहे, हा माझा मधला मुलगा आहे, हा माझा धाकटा मुलगा आहे हें म्हणणें बरोबर जुळतें. परंतु एकच मुलगा असला तरी देखील हाच माझा थोरला, हाच माझा मधला, हाच माझा धाकटा असें म्हणण्यांत येतें. तसाच दुसरा दृष्टान्त असा की प्रथमतःच प्रसूत होऊन मृत झालेली एखादी स्त्री, अर्थातच जी पूर्वीं प्रसवली नाहीं व पुढेंही प्रसवण्याचा संभव नाहीं, तिला उद्देशून 'पहिल्या गर्भानें मृत झाली' असें म्हणण्यांत येतें. आणखीही एक दृष्टान्त असा आहे की एखादा मनुष्य एखाद्या दूर देशामध्यें नवीनच आला म्हणजे अर्थातच तेथें तो पूर्वीं आलेला नाहीं व पुढेंही कधीं येण्याचा संभव नाहीं अशा स्थितीत 'हें माझें पहिलेंच आगमन आहे' असें त्याच्या तोंडांतून उद्गार निघतात. त्याप्रमाणें इयाय, आर इत्यादि ठिकाणीं इ ऋ या एकाच वर्णाला एकाच् असें म्हणतां येईल. तेव्हां व्यपदेशिवत् असें येथें म्हणण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

तसेंच सूत्रकारांनीं जें 'आद्यन्तवत्' असें म्हटलें आहे तें देखील म्हटलें नाहीं तरी चालेल.

तें कसें ?

(वा.६)ज्याच्यापूर्वीं कोणी नाहीं त्याला[९] आदि म्हणावें आणि ज्याच्या पुढें कोणी नाहीं त्याला[१०] अंत म्हणावें. अशा रीतीनें आदि किंवा अंत हे शब्द एका वर्णाला लावतां येतात. तात्पर्य, एखाद्या वर्णाच्या पुढें कोणी असो वा नसो, फक्त त्याच्यापूर्वीं कोणी नाहीं एवढ्यावरूनच त्याला आदि म्हणतां येतें; तसेंच एखाद्या वर्णाच्या पूर्वीं कोणी असो वा नसो, पुढें कोणी नाहीं एवढ्यावरूनच त्याला अंत म्हणतां येतें. म्हणून एकच वर्ण असला तरी आदीला आणि अंताला सांगितलेलीं कार्यें सहजच होतील. तेव्हां 'आद्यन्तवत्' या प्रकृत सूत्राचा कांहीं उपयोग नाहीं.

परंतु येथें गोनर्दी यांचें म्हणणें असें

---

८. पहिल्या दृष्टान्तांत एकाच मुलाला थोरला, मधला, धाकटा हे शब्द जसे गौण रीतीनें लावले जातात तसेंच दुसऱ्या आणि तिसऱ्या दृष्टान्तांत गर्भाला आणि आगमनाला पहिला हा शब्द जसा गौण रीतीनें लावला आहे त्याप्रमाणें.

९. त्याच्यापुढें कोणीं असलेंच पाहिजे असा आग्रह नाहीं.

१०. त्याच्यामागें कोणीं असलेंच पाहिजे असा आग्रह नाहीं.

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**आदिवत्त्वे प्रयोजनं प्रत्ययाञ्निदाद्युदात्तत्वे ॥७॥**

प्रत्ययस्यादिरुदात्तो भवतीतीहैव स्यात् कर्तव्यम् तैत्तिरीयः । औपगवः कापटव इत्यत्र न स्यात् ॥ ञ्नित्यादिर्नित्यम् [६.१.१९७] इतीहैव स्यात् अहिचुम्बकायनिः आग्निवेश्यः । गार्ग्यः कृतिरित्यत्र न स्यात् ॥

**वलादेरार्धधातुकस्येट् ॥८॥**

वलादेरार्धधातुकस्येट् प्रयोजनम् । आर्धधातुकस्येड्वलादेः [७.२.३५] इहैव स्यात् करिष्यति हरिष्यति । जोषिषत् मन्दिषदित्यत्र न स्यात् ॥

**यस्मिन्विधिस्तदादित्वे ॥९॥**

यस्मिन्विधिस्तदादित्वे प्रयोजनम् । वक्ष्यति यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहण इति । तस्मिन्क्रियमाणेऽचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ [६.४.७७] इहैव स्यात् श्रियः भ्रुवः । श्रियौ भ्रुवौ इत्यत्र न स्यात् ॥

---

आहे की ज्याच्यापूर्वी कोणी नाहीं त्याला पुढें कोणी असेल तरच आदि म्हणावें. तसेंच, ज्याच्यापुढें कोणी नाहीं त्याला पूर्वी कोणी असेल तरच अंत म्हणावें. हेच आदि आणि अंत शब्दांचे खरे अर्थ आहेत. तेव्हां सूत्रकारांनीं जें आद्यन्तवत् हें सूत्र केलें आहे तेंच बरोबर आहे.

असो. पण या सूत्राचीं उदाहरणें तरी कोणतीं ?

(वा.७) प्रत्ययाचा आदि उदात्त होतो (३।१।३) तो उदात्त कर्तव्यम्, तैत्तिरीयः इत्यादि ठिकाणींच होईल. औपगवः, कापटवः येथें होणार[11] नाहीं. तसेंच ञ्नित्यादिर्नित्यम् (६।१।१९७) यानें सांगितलेला आद्युदात्त अहिचुम्बकायनिः[12] इत्यादि ठिकाणींच होईल. आग्निवेश्यः[13], गार्ग्यः, कृतिः इत्यादि ठिकाणीं होणार नाहीं.

(वा.८) 'आर्धधातुकस्येड्वलादेः' (७।२।३५) यानें सांगितलेला इट् आगम करिष्यति, हरिष्यति इत्यादि ठिकाणींच होईल. जोषिषत्[14], मन्दिषत् येथें होणार नाहीं.

(वा.९) यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे (१।२।७२) असें पुढें वार्तिककार सांगणार आहेत तेव्हां त्या वार्तिकानें तदादिविधि घेतला असतां 'अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ' (६।४७७) यानें सांगितलेले इयङ्, उवङ् हे आदेश श्रियः,[15] भ्रुवः इत्यादि ठिकाणींच होतील श्रियौ, भ्रुवौ या ठिकाणीं होणार नाहींत.

---

११. कर्तव्यं या ठिकाणीं तव्य या प्रत्ययामध्यें दोन अच् असल्यामुळें त्यांतील आदि म्ह. पहिला जो तकाराच्या पुढील अकार त्याला उदात्त करितां येतो. परंतु औपगवः या ठिकाणीं अ हाच प्रत्यय असल्यामुळें त्या अकाराला प्रत्ययाचा आदि म्हणतां येत नाहीं. म्हणून त्याला उदात्त होणार नाहीं. तो ह्या प्रकृतसूत्रानें करतां येतो, अनेक वर्ण जरी नसले तरी त्या एकाच वर्णाला 'आपणच आपल्याला आदि' असें म्हणतां येतें.

१२. अहिचुम्बक शब्दाहून 'प्राचामवृद्धात्फिन् बहुलम् (४।१।१६०) या सूत्रानें फिन् प्रत्यय झाला आहे. फकाराला आयन् आदेश (७।१।२) होऊन आयनि एवढा प्रत्यय होतो त्यामुळें त्यांतील पहिल्या आकाराला आदि असें सहजच म्हणतां येतें.

१३. आग्निवेश्यः, गार्ग्यः येथें यञ् प्रत्यय (४।१।१०५) आणि कृतिः येथें क्तिन् प्रत्यय (३।३।९४) यांमध्यें एकच अच् असल्यामुळें त्याला आदि असें म्हणतां येत नाहीं, म्हणून प्रकृतसूत्राची तेथें जरूर लागते.

१४. जोषिषत् येथें सिब्बहुलं० (३।१।३४) यानें मध्यें विकरण सिप् प्रत्यय झाला आहे त्यांतील फक्त सकार शिल्लक राहिला आहे.

१५. श्रियः येथें अस् हा दोन वर्णांचा प्रत्यय असल्यामुळें त्याला अजादि असें सहज म्हणतां येतें. श्रियौ येथें औ हा एकच वर्णाचा प्रत्यय असल्यामुळें अजादि असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां तेथें प्रकृत सूत्र घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

## अजाद्याट्त्वे ॥१०॥

अजाद्याट्त्वे प्रयोजनम् । आडजादीनाम् [६.४.७२] इहैव स्यात् ऐहिष्ट ऐक्षिष्ट । ऐत् अध्यैष्टेत्यत्र न स्यात् ॥

अथान्तवत्त्वे कानि प्रयोजनानि ।

## अन्तवद्द्विवचनान्तप्रगृह्यत्वे ॥११॥

अन्तवद्द्विवचनान्तप्रगृह्यत्वे प्रयोजनम् । ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम् [१.१.११] इहैव स्यात् पचेते इति पचेथे इति । खट्वे इति माले इतीत्यत्र न स्यात् ॥

## [मिदचोऽन्त्यात्परः ॥१२॥]

मिदचोऽन्त्यात्परः [१.१.४७] प्रयोजनम् । इहैव स्यात् कुण्डानि वनानि । तानि यानीत्यत्र न स्यात् ॥

## अचोऽन्त्यादि टि ॥१३॥

अचोऽन्त्यादि टि [१.१.६४] प्रयोजनम् । टित आत्मनेपदानां टेरे [३.४.७९] इतीहैव स्यात् कुर्वाते कुर्वाथे । कुरुते कुर्वे इत्यत्र न स्यात् ॥

## अलोऽन्त्यस्य ॥१४॥

अलोऽन्त्यस्य [१.१.५२] प्रयोजनम् । अतो दीर्घो यञि [७.३.१०१] सुपि च [१०२] इहैव स्यात् घटाभ्याम् पटाभ्याम् । आभ्यामित्यत्र न स्यात् ॥

## येन विधिस्तदन्तत्वे ॥१५॥

येन विधिस्तदन्तत्वे प्रयोजनम् । अचो यत् [३.१.९७] इहैव स्यात् चेयम् जेयम् । एयम् अध्येयमित्यत्र न स्यात् ॥

आद्यन्तवदेकस्मिन्कार्यं भवतीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

---

(वा.१०) आडजादीनाम् (६।४७२) यानें सांगितलेला आट् आगम ऐहिष्ट, ऐक्षिष्ट इत्यादि ठिकाणींच होईल. ऐत्[१६] अध्यैष्ट या ठिकाणीं होणार नाहीं.

आतां अन्तवत् असें जें या सूत्रांत म्हटलें आहे त्याचीं उदाहरणें कोणतीं ?

(वा.११) 'ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम्' (१।१।११) यानें सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा पचेते इति, पचेथे इति इत्यादि ठिकाणींच होईल खट्वे इति, माले इति, या ठिकाणीं होणार नाहीं.

(वा.१२) 'मिदचोऽन्त्यात्परः' (१।१।४७) या परिभाषेनें मित् आगम अन्त्य अचाच्यापुढें करावयास सांगितलेला आहे त्याप्रमाणें 'नपुंसकस्य झलचः (७।१।७२) यानें सांगितलेला नुम् आगम कुण्डानि, वनानि इत्यादि ठिकाणीं होईल. तानि, यानि याठिकाणीं होणार नाहीं,

(वा.१३) 'टित आत्मनेपदानां टेरे' (३।४।७९)यानें सांगितलेलें टिला एत्व कुर्वाते, कुर्वाथे इत्यादि ठिकाणींच होईल; कुरुते[१७] कुर्वे या ठिकाणीं होणार नाहीं.

(वा.१४) [१८]अतो दीर्घो यञि (७।३।१११) याच्या पुढील सुपि च (७।३।१०२) या सूत्रानें अकारान्त अंगाला सांगितलेला दीर्घ घटाभ्यां, पटाभ्याम् इत्यादि ठिकाणींच होईल. आभ्याम् येथें होणार नाहीं.

(वा.१५)'अचो यत्'(३।१।९७)यानें सांगितलेला यत् प्रत्यय चेयम् जेयम् इत्यादि ठिकाणींच होईल. एयम्, अध्येतव्यम् या ठिकाणीं होणार नाहीं. प्रकृत सूत्रानें 'एकच वर्ण असला तरी तो आदीसारखा आणि अंतासारखा समजून तीं तीं कार्यें त्याला करावींत' असें सांगितलें म्हणजे वर दाखविलेलीं सर्व उदाहरणें सिद्ध

---

१६. येथें इङ् अध्ययने असा इ हा एकाच वर्णाचा धातु आहे.

१७. कुरुते येथें अकाराला एत्व झालें आहे. कुर्वे येथें इकाराला एत्व झालें आहे. त्या अकाराला आणि इकाराला अचोन्त्यादि टि (१।१।६४) या सूत्रानें टिसंज्ञा करताना प्रकृतसूत्राची मदत लागते.

१८. 'अतो दीर्घो०' या सूत्रांतून अतः या पदाची अनुवृत्ति उत्तरसूत्रांत होऊन आकारान्त अंग असा अर्थ होतो. ही अनुवृत्ति दाखविण्याकरतांच अतो दीर्घो० या सूत्राचा येथें उल्लेख केला आहे.

**तरप्तमपौ घः ॥१.१.२२॥**

**घसंज्ञायां नदीतरे प्रतिषेधः ॥१॥**

घसंज्ञायां नदीतरे प्रतिषेधो वक्तव्यः। नद्यास्तरो नदीतर इति ॥

**घसंज्ञायां नदीतरेऽप्रतिषेधः ॥२॥**

अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः। घसंज्ञा कस्मान्न भवति।

**तरब्ग्रहणं ह्यौपदेशिकम् ॥३॥**

औपदेशिकस्य तरपो ग्रहणं न चैष उपदेशे तरप्शब्दः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। इह हि व्याकरणे सर्वेष्वेव सानुबन्धकग्रहणेषु रूपमाश्रीयते यत्रास्यैतद्रूपमिति। रूपनिर्ग्रहश्च शब्दस्य नान्तरेण लौकिकं प्रयोगम्। तस्मिंश्च लौकिके प्रयोगे सानुबन्धकानां प्रयोगो नास्तीति कृत्वा द्वितीयः प्रयोग उपास्यते। कोऽसौ। उपदेशो नाम। न चैष उपदेशे तरप्शब्दः॥ अथ वास्त्वस्य घसंज्ञा को

---

होतात.

(वा.१) ही प्रकृतसूत्रानें सांगितलेली घसंज्ञा नदीतर या शब्दातील तर याला होत नाहीं असें म्हणावें. उदा० नद्याः तरः, नदीतरः.

(वा.२) अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय. नदीतर या शब्दांतील तर याला घसंज्ञेचा निषेध करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

तर मग नदीतर या शब्दांतील तर याला घसंज्ञा कां होत नाहीं ?

(वा.३) औपदेशिक म्ह. मूळचा जो तरप् त्याचें ह्या प्रकृतसूत्रामध्यें ग्रहण केलें आहे आणि नदीतर या शब्दांतील जो तर तो मूळचा तरप् असा शब्द नाहीं.

पण मूळचा तरप् असा पाहिजे असें येथें स्पष्ट म्हटलें पाहिजे कीं काय ?

तसें म्हणावयास नको.

मग स्पष्ट म्हटल्याशिवांय तसें कसें बरें समजलें जाईल ?

असें समजलें जाईल की ह्या व्याकरणांमध्यें सर्वच ठिकाणीं म्ह. जेथें इत्संज्ञकाला धरून पाणिनीनें उच्चारण केलें असेल अशा सर्व ठिकाणीं एक प्रकारचा स्वरूपाचा निर्देश केलेला असतो तो अशाकरतां की त्या उद्देश्याचें तें निर्दिष्ट स्वरूप जेथें असेल तेथेंच त्याला तें कार्य व्हावें. आतां धातु प्रत्यय वगैरेंचें स्वरूप अमुक ठिकाणीं अमुक प्रकारचेंच आहे असें ठरविणें तें त्यांचा लौकिक प्रयोग म्ह. लोकामध्यें कसा प्रयोग होतो तो पाहिल्याशिवाय ठरवितां येणार नाहीं. आणि त्या लौकिक प्रयोगामध्यें तर इत्संज्ञकाला धरून प्रयोग केलेला कुठेंच दिसत नाहीं. तेव्हां नाइलाजास्तव तें स्वरूप ठरविण्याकरतां लौकिकप्रयोगाशिवाय दुसऱ्याच एका प्रयोगाची कास धरावी लागते. तो दुसरा प्रयोग कोणता म्हणाल तर तो उपदेश म्ह. आद्योच्चारण होय. आणि तें आद्योच्चारण नदीतर या ठिकाणीं पाहिलें तर तरप् असें दृष्टीस पडत नाहीं.

अथवा नदीतर येथें तर याला घसंज्ञा

---

१. तरप् आणि तमप् या दोन प्रत्ययांना घसंज्ञा होते.

२. नदीसंबंधी तर म्ह. तरणें किंवा तरण्याचें साधन. तॄ धातूहून ऋदोरप् (३।३।५७) या सूत्रानें अप् प्रत्यय केला आहे तॄधातूला गुण (७।३।८४) होऊन तर हा शब्द सिद्ध झाला आहे. नंतर नदीशब्दाचा तर शब्दाशीं षष्ठी तत्पुरुष झाला आहे. अप्प्रत्ययाच्या पकाराचें स्मरण करून तर हा तरप् आहे असें समजून त्याला प्रकृतसूत्रानें घसंज्ञा होईल. घसंज्ञा झाली तर 'घरूप०' (६।३।४३) यानें ह्रस्व होईल.

३. 'द्विवचनविभज्योपपदे तरबीयसुनौ' (५।३।५७) या सूत्रामध्यें तरप् असा मूळचाच उच्चारला आहे.

४. धातूंचें आद्योच्चारण धातुपाठामध्यें पाणिनीनें केलें आहे. प्रत्ययांचें आद्योच्चारण ज्या सूत्रानें तो प्रत्यय सांगितला असेल त्यामध्यें पाहावें. आदेश व आगम यांचेंही असेंच समजावें.

दोषः। घादिषु नद्या ह्रस्वो भवतीति ह्रस्वत्वं प्रसज्येत। समानाधिकरणेषु घादिष्वित्येवं तत्। यदा तर्हि सैव नदी स एव तरस्तदा प्राप्नोति। स्त्रीलिङ्गेषु घादिष्वित्येवं तत्। अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्। समानाधिकरणेषु घादिष्वित्युच्यमान इह प्रसज्येत। महिषी रूपमिव ब्राह्मणी रूपमिवेति ॥

## बहुगणवतुडति संख्या ॥१.१.२३॥

### संख्यासंज्ञायां संख्याग्रहणम् ॥१॥

संख्यासंज्ञायां संख्याग्रहणं कर्तव्यम्। बहुगुणवतुडतयः संख्यासंज्ञा भवन्ति। संख्या च संख्यासंज्ञा भवतीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्।

### संख्यासंप्रत्ययार्थम् ॥२॥

एकादिकायाः संख्यायाः संख्याप्रदेशेषु संख्येत्येष संप्रत्ययो यथा स्यात् ॥ ननु चैकादिका संख्या लोके संख्येति प्रतीता

---

होऊं दे. कोणता दोष येणार आहे? घ वगैरे पुढें असतांना नदीसंज्ञकाला ऱ्हस्व होत असतो (६।३।४३) तो ऱ्हस्व नदी यांतील ईकाराला होईल असा दोष येतो.

नदीसंज्ञक शब्दाशीं समानाधिकरण म्ह. नदीसंज्ञक शब्द ज्या अर्थाला दाखवितो त्याच अर्थाला दाखविणारे असे घ वगैरे पुढें असतील तरच तो ऱ्हस्व होत असतो. तेव्हां नदीतर येथें दोष येणार[५] नाहीं.

तरी पण नदी हा शब्द ज्या अर्थाला दाखवितो त्याच अर्थाला जेव्हां तर हा शब्द दाखवील[६] तेव्हां तरी दोष येणारच ना?

तरी देखील दोष येणार नाहीं. कारण पुढें असणारे जे तर वगैरे ते स्त्रीलिंगी असतील तरच तो ऱ्हस्व होतो. आणि ही अट अवश्य ठेवलीच पाहिजे. नाहीं तर नुसते 'नदीसंज्ञक शब्दाशीं समानाधिकरण असे घ वगैरे पुढें असतांना' असें म्हटलें तरीं महिषी रूपमिव[७], ब्राह्मणी रूपमिव या ठिकाणीं ऱ्हस्व होईल हा दोष येणारच.

(वा.१) ही संख्यासंज्ञा ज्यांना सांगितली आहे त्यांमध्यें संख्या शब्द जास्त घालावा म्ह. बहु, गण या दोन शब्दांना आणि वतुप्रत्यान्त व डतिप्रत्ययान्त शब्दांना संख्यासंज्ञा होते आणि संख्येलाही संख्यासंज्ञा होते असें म्हणावें.

असें कशाकरतां म्हटलें पाहिजे?

(वा.२) संख्याप्रदेशामध्यें[२] म्ह. संख्या शब्दांना जीं कार्यें सांगितलीं आहेत त्या ठिकाणीं संख्याशब्दानें एक, दोन वगैरे लौकिक संख्याशब्दांचा बोध झाला पाहिजे म्हणून.

पण एक, दोन इत्यादि संख्याशब्द लोकामध्यें प्रसिद्धच आहेत. तेव्हां त्यांचें संख्या-

---

५. तर म्ह. तरणें ही क्रिया किंवा तरण्याचें साधन हें नदीपेक्षां निराळें आहे. त्यामुळें येथें नदी आणि तर हे दोन शब्द समानाधिकरण म्ह. एकाच अर्थाला दाखविणारे नाहींत.

६. तृधातूहून अप् प्रत्यय कर्मणि केला म्हणजे जिला तरून जायचें ती म्ह. नदी हाच येथें तर याचा अर्थ होतो. नंतर नदी आणि तर या दोन शब्दांचा कर्मधारय समास करावा.

७. महिषीरूपम् या समासाचें हें विग्रहवाक्य दाखविलें आहे. रूप म्ह. आकृति. इव हा शब्द महिषीकडे लावावा. तेव्हां महिषीसारखी आकृति असा याचा अर्थ होतो. याच अर्थाचें जें महिषीरूपम् हें सामासिक पद त्यामध्यें महिषी याला ऱ्हस्व होईल असा दोष येतो. येथें 'सहसुपा' (२।१।४) या सूत्रानें समास झाला आहे. समासांतील महिषी शब्दाचा महिषीसारखें असा अर्थ आहे. जें महिषीसारखें तेंच रूप म्ह. आकृति अशा रीतीनें सामानाधिकरण्य येथें आहे.

१. बहु, गण या दोन शब्दांना आणि वतु प्रत्यान्त व डति प्रत्ययान्त शब्दांना संख्या अशी संज्ञा होते.

२. ज्या सूत्रामध्यें संख्या असा शब्द उच्चारून कांहीं कार्य सांगितलें आहे त्या सूत्राला संख्याप्रदेश म्हणतात.

तेनास्याः संख्याप्रदेशेषु संख्यासंप्रत्ययो भविष्यति । एवमपि कर्तव्यम् ।

**इतरथा ह्यसंप्रत्ययोऽकृत्रिमत्वाद्यथा लोके ॥३॥**

अक्रियमाणे हि संख्याग्रहण एकादिकायाः संख्यायाः संख्येत्येष संप्रत्ययो न स्यात् । किं कारणम् । अकृत्रिमत्वात् । बह्वादीनां कृत्रिमा संज्ञा । कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययो भवति यथा लोके । तद्यथा । लोके गोपालकमानय कटजकमानयेति यस्यैषा संज्ञा भवति स आनीयते न यो गाः पालयति यो वा कटे जातः । यदि तर्हि कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे संप्रत्ययो भवति नदीपौर्णमास्याग्रहायणीभ्यः [५.४.११०] अत्रापि प्रसज्येत । पौर्णमास्याग्रहायणीग्रहणसामर्थ्यान्न भविष्यति । तद्विशेषेभ्यस्तर्हि प्राप्नोति गङ्गा यमुनेति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न तद्विशेष-

---

प्रदेशामध्यें आपोआपच ग्रहण होईल त्याकरतां प्रयत्न कशाला ?

तरी देखील येथें संख्याशब्द जास्त घातलाच पाहिजे.

कशाकरतां ?

(वा. ३)जर ह्या प्रकृतसूत्रामध्यें संख्या शब्द जास्त घातला नाहीं तर संख्याप्रदेशांमधील संख्याशब्दानें एक, दोन इत्यादि लौकिकसंख्येचा बोध होणार नाहीं.

कां बरें ?

एक, दोन इत्यादि लौकिकसंख्या अकृत्रिम म्ह. जुनी, मूळचीच आहे म्हणून. बहु, गण इत्यादिकांना जी ही पाणिनीनें संख्यासंज्ञा केली आहे ती कृत्रिम म्ह. नवीनच, मुद्दाम केलेली आहे आणि 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययः' असा न्याय आहे. म्ह. कृत्रिम आणि अकृत्रिम या दोहोंना एखादें कार्य करण्याचा प्रसंग आला तर तें कार्य कृत्रिमालाच करावें, अकृत्रिमाला करूं नये. लोकामध्यें देखील असें पाहा की गोपालाला आण, कटजाला आण असें म्हटलें असतां गोपाल किंवा कटज हीं नावें ज्या मुलांचीं ठेवलेलीं असतील तींच मुलें आणलीं जातात. जो मूळचा गोपाल म्ह. गाई राखणारा गवळी व कटज म्ह. कटामध्यें जन्माला आलेला तो स्वाभाविक गोपाल आणि कटज आणिला जात नाहीं.

आतां जर कृत्रिम आणि अकृत्रिम या दोहोंपैकीं कृत्रिमालाच कार्य करावें असा न्याय आहे तर 'नदीपौर्णमास्याग्रहायणीभ्यः' (५।४।११०) या सूत्रामध्येंही तो न्याय लागू पडेल; तेव्हां तेथें नदी हा शब्द न घेतां कृत्रिम नदीचें म्ह. 'यूस्त्र्याख्यौ नदी' (१।४।३) या सूत्रानें ज्या शब्दांना नदी अशी संज्ञा केली आहे त्यांचें नदीशब्दानें ग्रहण होईल.

पण तेथें पाणिनीनें जे पौर्णमासी आणि आग्रहायणी असे नदीसंज्ञक शब्द निराळे उच्चारले आहेत त्यांच्या सामर्थ्यास्तव त्या सूत्रांतील नदीशब्दानें नदीसंज्ञक शब्दांचें ग्रहण होणार नाहीं.

तर मग, त्याच कारणावरून 'तेथील नदी शब्दानें गंगा, यमुना वगैरे नद्यांचीं विशेषनांवेंच घ्यावींत' असें कां समजू नये ?

तसेंही समजतां येत नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि शरदादि गणांमध्यें (५।४।१०७) विपाश् या एका नदीच्या विशेषनांवाचा पाठ करतो[३] त्यावरून तो असें ज्ञापित करतो की

---

३. 'नदीपौर्ण०' या सूत्रामधील नदीशब्दानें गंगा, यमुना वगैरे विशेष नांवें घेतलीं तर विपाश् याही नांवाचें नदीशब्दानें ग्रहण होईल, आणि त्या सूत्रानेंच उपविपाशम् या अव्ययीभावाच्या उदाहरणामध्यें टच् प्रत्यय सिद्ध होईल. तेव्हां तेथें टच् प्रत्यय होण्याकरतां शरदादिगणामध्यें जो विपाश् शब्दाचा पाठ केला आहे तो व्यर्थ होईल.

भ्यो भवतीति यदयं विपाट् शब्दं शरत्प्रभृतिषु पठति ॥ इह तर्हि प्राप्नोति नदीभिश्च [२.१.२०] इति । बहुवचननिर्देशान्न भविष्यति । स्वरूपविधिस्तर्हि प्राप्नोति । बहुवचननिर्देशादेव न भविष्यति ॥ एवं न चेदमकृतं भवति कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे संप्रत्यय इति न च कश्चिद्दोषो भवति ॥

## उत्तरार्थं च ॥४॥

उत्तरार्थं च संख्याग्रहणं कर्तव्यम् । ष्णान्ता षट् [१.१.२४] षकारनकारान्तायाः संख्यायाः षट्संज्ञा यथा स्यात् । इह मा भूत् । पामानः विप्रुष इति ॥

इहार्थेन तावन्नार्थः संख्याग्रहणेन । ननु चोक्तमितरथा ह्यसंप्रत्ययोऽकृत्रिमत्वाद्यथा लोक इति । नैष दोषः । अर्था-

---

नदीपौर्णमा० या सूत्रांतील नदी शब्दानें नद्यांचीं विशेषनांवें घेतलीं जात नाहींत. एकंदरींत नदीपौर्ण० या सूत्रामध्यें कृत्रिमाकृत्रिमन्याय लागू होत नाहीं.

तर मग दुसरीकडे दोष येतो तो असा की 'नदीभिश्च'(२।१।२०) या सूत्रांतील नदी शब्दाविषयीं तो न्याय लागू पडेल.

पण तेथें पाणिनीनें नदीभिः असें बहुवचन घातलें आहे ना ? त्याच्या जोरावर नदीसंज्ञक शब्द तेथें नदी शब्दानें घेतले जाणार नाहींत.

नदीसंज्ञक शब्द राहूं देत बाजूला. पण 'नदीपौर्ण०' (५।४।११०) येथें नदी हाच एक शब्द घेतला आहे तसा येथें घ्यावा. त्याला काय हरकत आहे ?

बहुवचनाचीच त्यालाही हरकत आहे. बहुवचनाच्या जोरावरच तसेंही करतां येत नाहीं. एकंदरींत 'नदीपौर्ण०' आणि 'नदीभिश्च' या दोन ठिकाणीं वर दाखविलेल्या विशेष कारणावरूनच 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययः' हा न्याय सोडला म्हणून कांहीं 'शास्त्रामध्यें तो न्याय घ्यावयाचाच नाहीं' असें होत नाहीं. बरें, घेतला असतां क्वचित् एखाद्या ठिकाणीं दोष येतो असेंही नाहीं. तेव्हां

प्रकृतसूत्रामध्यें त्या न्यायानें आलेला दोष[५] दूर करण्यांकरता संख्याशब्द जास्त घातला पाहिजे.

पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरतांही ह्या सूत्रामध्यें संख्या शब्द जास्त घातला पाहिजे. 'ष्णान्ता षट्' या सूत्रानें सांगितलेली षट्संज्ञा षकारान्त नकारान्त अशा षष्, पञ्चन् इत्यादि संख्या शब्दांनाच झाली पाहिजे. पामानः, विप्रुष इत्यादि ठिकाणीं पामन्, विप्रुष् वगैरे इतर शब्दांना न झाली पाहिजे.

आतां आम्ही असें म्हणतों की संख्या शब्द जास्त घालण्याचा प्रकृतसूत्रामध्यें तर कांहींच उपयोग नाहीं.

पण आतांच सांगितलें आहे ना की संख्या शब्द जास्त घातला नाहीं तर संख्याप्रदेशांतील संख्याशब्दानें एक, दोन इत्यादि लौकिक जुन्या संख्येचा बोध होणार नाहीं त्याची काय वाट ?

हा दोष येत नाहीं. कारण लोकामध्यें कृत्रिम आणि अकृत्रिम या दोहोंपैकीं कृत्रिमालाच कार्य होतें हें खरें आहे. पण तसा कांहीं सर्वसाधारण नियम आहे म्हणून कृत्रिमाला कार्य होतें असें मात्र समजूं नये. सामर्थ्य किंवा प्रकरण असेल तरच कृत्रिमाला कार्य

---

४. जेथें नदीसंज्ञक शब्द पाहिजेत तेथें नदी हा शब्द एकवचनांत घातला आहे. उदा० आण्नद्याः. तेव्हां नद्या असें न म्हणतां नदीभिः असें म्हटलें त्यावरून तेथें नदीसंज्ञक शब्द पाणिनीला नको आहेत असें समजतें.

५. एक, दोन, तीन इत्यादि जी अकृत्रिम म्ह. मूळची लौकिक संख्या ती, संख्याया विधार्थे धा (५।३।४२) इत्यादि संख्याशब्दघटित सूत्रामध्यें घेतली जाणार नाहीं. आणि एकधा, द्विधा इत्यादि प्रयोग सिद्ध होणार नाहींत हा दोष येतो.

त्प्रकरणाद्वा लोके कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे संप्रत्ययो भवति । अर्थो वास्यैवंसंज्ञकेन भवति प्रकृतं वा तत्र भवतीदमेवंसंज्ञकेन कर्तव्यमिति । आतश्चार्थात्प्रकरणाद्वा । अङ्ग हि भवान्ग्राम्यं पांसुरपादमप्रकरणज्ञमागतं ब्रवीतु गोपालकमानय कटजकमानयेति । उभयगतिस्तस्य भवति साधीयो वा यष्टिहस्तं गमिष्यति ॥ यथैव तर्ह्यर्थात्प्रकरणाद्वा लोके कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे संप्रत्ययो भवत्येवमिहापि प्राप्नोति । जानाति ह्यसौ बह्वादीनामियं संज्ञा कृतेति ॥ न यथा लोके तथा व्याकरणे । उभयगतिः पुनरिह भवति । अन्यत्रापि नावश्यमिहैव । तद्यथा । कर्तुरीप्सिततमं कर्म [१.४.४९] इति कृत्रिमा कर्मसंज्ञा । कर्मप्रदेशेषु चोभयगतिर्भवति । कर्मणि द्वितीया [२.३.२] इति कृत्रिमस्य ग्रहणं कर्तरि कर्मव्यति-

---

केलें जातें. म्हणजे तें कार्य त्या नांवाच्या मनुष्याच्या हातूनच होण्यासारखें आहे असें ज्ञान असेल किंवा अमुक नांवाच्या मनुष्यानेंच हें कार्य करावें असें समजण्यासारखें स्पष्ट प्रकरणच चालू असेल तेथेंच कृत्रिमाचा म्ह. त्या नांवाच्या मनुष्याचा बोध होतो. शिवाय सामर्थ्य किंवा प्रकरण असेल तरच कृत्रिमाचा बोध होतो असें मानण्याचें दुसरें एक कारण असें दिसतें की एखादा गांवढळ मनुष्य म्ह. अमुक कार्य करण्याचें सामर्थ्य आहे कीं नाहीं हा विचारच मुळीं ज्याच्या मनामध्यें उत्पन्न होत नाहीं असा अडाणी माणूस आणखी ज्याच्या पायाचा धुरळाही निघाला नाहीं म्ह. नुकताच परगांवाहून आलेला, अर्थातच 'अमक्याचें गोपाळा असें नांव आहे आणि त्याच्याच संबंधानें गोष्ट चालू आहे' असें पूर्वीचें प्रकरण ज्याला कांहीं माहीत नाहीं अशा मनुष्याला 'गोपाळाला आण, कटजाला आण' असें तुम्हीच सांगा आणि पाहा बरें त्याच्या मनांत काय येतें तें ? दोघांविषयीं जी कल्पना त्याच्या मनांत येईल ती अशी की 'यांच्या घरांत एखाद्या मुलाचें गोपाळा असें नांव आहे त्याला आणावयाचा किंवा एखादा बाहेरचा गोपाळ म्ह. हातांत काठी घेतलेला गुराखी त्याला आणावयाचा? मला तर असें वाटतें की खरोखर त्याची बुद्धि हातांत काठी घेतलेल्या गुराख्याकडेच वळेल[६].

तर मग आतां तुमच्याच म्हणण्याप्रमाणें का होईना, जसें सामर्थ्य किंवा प्रकरण असल्यास लोकांमध्यें कृत्रिम आणि अकृत्रिम या दोहोंपैकीं कृत्रिमालाच कार्य होतें तसेंच शास्त्रामध्यें कृत्रिमालाच कार्य प्राप्त होतें. कारण येथें प्रकरण स्पष्टच आहे. वैयाकरणाला 'पाणिनीनें बहु, गण वगैरेंना संख्यासंज्ञा केली आहे' असें ज्ञान आहेच. तेव्हां अकृत्रिम म्ह. मूळची जी एक संख्या तिच्याकरतां प्रकृतसूत्रामध्यें संख्याशब्द जास्त घातला पाहिजे.

पण जसें लोकामध्यें, तसेंच थेट या व्याकरणशास्त्रामध्यें असलें पाहिजे असा नियम नाहीं. त्यांत ह्या संख्येविषयीं तर कृत्रिम आणि अकृत्रिम अशा नव्या जुन्या दोन्ही प्रकारच्या संख्येचें ज्ञान होतें. ह्या संख्येविषयींच दोन्ही प्रकार मनांत येतात असें नाहीं. इतर ठिकाणीं देखील दोन प्रकार मनांत येतात. असें पाहा की 'कर्तुरीप्सिततमं कर्म' (१।४।४९) यानें कृत्रिम म्ह. नवीनच कर्मसंज्ञा सांगितली आहे. परंतु कर्मप्रदेशामध्यें पाहावें तर कुठें कांहीं, कुठें कांहीं, मिळून दोन्ही प्रकारचे कर्म घेतलें आहे. 'कर्मणि द्वितीया' (२।३।२) येथें कृत्रिमच कर्म घेतलें आहे आणि 'कर्तरि कर्मव्यतिहारे'

---

६. तात्पर्य, कृत्रिमाकृत्रिमन्याय सर्वसाधारण नसल्यामुळें शास्त्रामध्यें तो न्याय वेऊन जो दोष दाखविला तो बरोबर नाहीं.

हारे [१.३.१४] इत्यकृत्रिमस्य । तथा साधकतमं करणम् [१.४.४२] इति कृत्रिमा करणसंज्ञा । करणप्रदेशेषु चोभयगतिर्भवति । कर्तृकरणयोस्तृतीया [२.३.१८] इति कृत्रिमस्य ग्रहणं शब्दवैरकलहाभ्रकण्वमेघेभ्यः करणे [३.१.१७] इत्यत्राकृत्रिमस्य । तथाधारोऽधिकरणम् [१.४.४५] इति कृत्रिमाधिकरणसंज्ञा । अधिकरणप्रदेशेषु चोभयगतिर्भवति । सप्तम्यधिकरणे च [२.३.३६] इति कृत्रिमस्य ग्रहणं विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि [२.४.१३] इत्यकृत्रिमस्य ॥ अथवा नेदं संज्ञाकरणं तद्वदतिदेशोऽयम् । बहुगुणवतुडतयः संख्यावद्भवन्तीति । स तर्हि वतिनिर्देशः कर्तव्यो न ह्यन्तरेण वतिमतिदेशो गम्यते । अन्तरेणापि वतिमतिदेशो गम्यते । तद्यथा । एष ब्रह्मदत्तः । अब्रह्मदत्तं ब्रह्मदत्त इत्याह ते मन्यामहे ब्रह्मदत्तवदयं भवतीति । एवमिहाप्यसंख्यां संख्येत्याह संख्यावदिति गम्यते ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येकादिकायाः संख्यायाः संख्याप्रदेशेषु संख्या-

---

(१।३।१४) येथें कर्म शब्दानें अकृत्रिम म्ह. क्रियाच घेतली आहे. तसेंच 'साधकतमं करणम्' (१।४।४२) यानें कृत्रिम म्ह. नवीनच करणसंज्ञा सांगितली आहे. परंतु करणप्रदेशांमध्यें पाहावें तर कुठें तें, कुठें तें, मिळून दोन्ही प्रकारचें करण घेतलें आहे. 'कर्तृकरणयोस्तृतीया' (२।३।१८) येथें कृत्रिमच करण घेतलें आहे आणि 'शब्दवैरकलहाभ्रकण्वमेघेभ्यः करणे' (३।१।१७) येथें करण शब्दानें अकृत्रिम म्ह. क्रियाच घेतली आहे. तसेंच 'आधारोधिकरणम्' (१।४।४५) यानें कृत्रिम म्ह. नवीनच अधिकरणसंज्ञा सांगितली आहे. परंतु अधिकरणप्रदेशामध्यें पाहावें तर कुठें तें, कुठें तें, मिळून दोन्ही प्रकारचें अधिकरण घेतलें आहे. 'सप्तम्यधिकरणे च' (२।३।३६) येथें कृत्रिमच अधिकरण घेतलें आहे आणि 'विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि' (२।४।१३) येथें अधिकरण शब्दानें अकृत्रिम म्ह. द्रव्य घेतलें आहे. त्याप्रमाणें एक, दोन ही अकृत्रिम म्ह. मूळची जुनी संख्या ही संख्याप्रदेशामध्यें संख्याशब्दानें घेतां येईल; त्याकरतां प्रकृतसूत्रामध्यें संख्या शब्द जास्त घालावयास नको.

अथवा हें संज्ञासूत्रच नव्हे, तर त्यासारखें असा येथें अतिदेश केला आहे. म्ह. बहु, गण, वतुप्रत्ययान्त आणि डतिप्रत्ययान्त हे शब्द संख्याशब्दांसारखे समजावेत.

तर मग सूत्रामध्यें संख्यावत् असा संख्या याला वति प्रत्यय जोडला पाहिजे.

तसा जोडावयास नको.

पण तसा वति प्रत्यय जोडला नाहीं तर हा अतिदेश आहे असें समजणार नाहीं.

वति प्रत्यय जोडला नाहीं तरी हा अतिदेश आहे असें समजतें. असें पाहा की 'हा ब्रह्मदत्त आहे' असें एखाद्यानें म्हटलें असतां तेथें ब्रह्मदत्त नसलेल्यालाच ब्रह्मदत्त असें जर हा म्हणत आहे तर हा ब्रह्मदत्तासारखा आहे असाच त्याचा अभिप्राय आम्ही समजतों, त्याप्रमाणें येथेंही आचार्य पाणिनि संख्या नसलेल्या बहु, गण वगैरेंना संख्या असें जर म्हणत आहे तर बहु, गण वगैरे शब्द संख्येसारखे आहेत असाच त्याचा अभिप्राय समजला पाहिजे.

अथवा हा आचार्य पाणिनि 'संख्याया अतिशदन्तायाः कन्' (५।१।२२) सूत्रानें

---

७. तेव्हां कृत्रिम संख्याच नसल्यामुळें कृत्रिमाकृत्रिमन्याय येथें येत नाहीं. म्हणून संख्याप्रदेशामध्यें संख्या शब्दानें एक, दोन इत्यादि लौकिक शब्दच मनांत येतील, आणि ह्या अतिदेशानें बहुगण इत्यादिकहि शब्द येतील.

**संप्रत्यय इति यदयं संख्याया अतिशदन्तायाः कन् [५.१.२२] इति तिशदन्तायाः प्रतिषेधं शास्ति। कथं कृत्वा ज्ञापकम्। न हि कृत्रिमा त्यन्ता शदन्ता वा संख्यास्ति। ननु चेयमस्ति डतिः। यत्तर्हि शदन्तायाः प्रतिषेधं शास्ति। यच्चापि त्यन्तायाः प्रतिषेधं शास्ति। ननु चोक्तं डत्यर्थमेतत्स्यादिति। अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्यर्थवतस्तिशब्दस्य ग्रहणं न च डतेस्तिशब्दोऽर्थवान्॥ अथवा महतीयं संज्ञा क्रियते संज्ञा च नाम यतो न लघीयः। कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम्। तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत। संख्यायतेऽनया संख्येति। एकादिकया चापि संख्यायते॥**

---

संख्यासंज्ञक शब्दाहून कन् प्रत्यय करावा असें सांगून त्यन्त आणि शदन्त म्ह. ति किंवा शत् असें ज्यांच्या शेवटीं आहे असे शब्द त्या संख्याशब्दांतून वगळतो, या त्याच्या कृतीवरून तो असें ज्ञापित करतो की ह्या शास्त्रांतील संख्याप्रदेशामध्यें एक, दोन इत्यादि लौकिक संख्येचा बोध होतो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की कृत्रिम जी संख्या म्ह. बहु, गण इत्यादिक जे पाणिनीनें नवीन बनविलेले संख्याशब्द त्यांमध्यें त्यन्त किंवा शदन्त कुणीच नाहीं. तेव्हां 'ते वगळावेत' असें सांगण्याचें कारणच दिसत नाहीं.

पण बहु, गण इत्यादि कृत्रिम संख्याशब्दांमध्यें डति हा त्यन्त शब्द आहे ना ?

तो असला तरी शदन्त तर त्यांत कोणी नाहींच. तेव्हां तेवढेंच ज्ञापक घेतां येईल.

शिवाय त्यन्त शब्द वगळावेत असें जें आचार्यानें सांगितलें आहे तें देखील ज्ञापक घेतां येईल.

पण आतांच सांगितलें आहे की डति हा त्यन्त शब्द बहु, गण इत्यादिकांत आहे म्हणून. तेव्हां त्याची काय वाट लावावयाची ?

त्याची वाट अशी लागते की जरी डति यामध्यें ति शब्द आहे तरी त्याला कांहीं अर्थ नाहीं. आणि अर्थवानाचें ग्रहण संभवत असतां अनर्थकाचें ग्रहण करावयाचें नाहीं अशी तर परिभाषा आहे. तेव्हां ति हा शब्द अर्थवानच येथें घ्यावयाचा आहे. डति यांतील ति शब्दाला तर कांहींच अर्थ नाहीं.

अथवा येथें संख्या ही मोठी संज्ञा पाणिनीनें केलेली दिसते. आणि संज्ञा म्हणजे काय की जिच्यापेक्षां अधिक लघुभूत असा दुसरा मार्ग नाहीं. 'कशावरून' असें म्हणाल तर संज्ञा ही लाघवाकरतांच केलेली असते यावरून. असें असून सुद्धां ज्या अर्थी संख्या ही मोठी संज्ञा केली आहे त्या अर्थी तशी मोठी संज्ञा करण्यांत पाणिनीच्या मनांतील असा उद्देश दिसतो की संख्या ही संज्ञा अन्वर्थ समजली जावी. ती अशीः जिच्या योगानें संख्यान म्ह. मोजणें होतें ती संख्या. आणि एक, दोन इत्यादि लौकिकसंख्येच्या योगानेंही पदार्थ मोजले जातातच. तेव्हां अन्वर्थसंज्ञेच्या जोरावरच येथें एक, दोन इत्यादि लौकिकसंख्येचें ग्रहण होईल त्याकरतां सूत्रामध्यें जास्त संख्याशब्द घालावयास नको.

पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरतां

---

८. विंशति हा त्यंत शब्द आणि त्रिंशत् हा शदंत शब्द याहून कन् प्रत्यय होऊ नये म्हणून सूत्रामध्यें अतिशदंतायाः असें पद घालून ते त्यंत, शदंत शब्द वगळले आहेत. जर येथें कृत्रिमाकृत्रिम न्याय घेतला तर एक, द्वि वगैरे सर्वच लौकिक शब्द वगळले जाणार तेव्हां अतिशदन्तायाः हे पद व्यर्थ होतें; तेव्हां त्यावरून असें ज्ञान होईल की लौकिक संख्याहि येथें घ्यावी. कृत्रिमाकृत्रिमन्याय येथें घेऊं नये.

उत्तरार्थेन चापि नार्थः संख्याग्रहणेन। इदं प्रकृतमुत्तरत्रानुवर्तिष्यते॥ इदं वै संज्ञार्थमुत्तरत्र च संज्ञिविशेषणेनार्थः। न चान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवति। न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनादन्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवति॥ यत्तावदुच्यते न चान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवतीत्यन्यार्थमपि प्रकृतमन्यार्थं भवति। तद्यथा। शाल्यर्थं कुल्याः प्रणीयन्ते ताभ्यश्च पानीयं पीयत उपस्पृश्यते च शालयश्च भाव्यन्ते। यदप्युच्यते न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनादन्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवतीति भवेद् द्रव्येष्वेतदेवं स्यात्। शब्दस्तु खलु येन येन विशेषणाभिसंबध्यते तस्य तस्य विशेषको भवति॥ अथवा सापेक्षोऽयं निर्देशः क्रियते न चान्यत्किंचिदपेक्ष्यमस्ति ते संख्यामेवापेक्षिष्यामहे॥

**अध्यर्धग्रहणं च समासकन्विध्यर्थम् ॥५॥**

---

ह्या सूत्रामध्यें जास्त संख्याशब्द घातला पाहिजे असें जें म्हटलें आहे त्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण येथें जास्त संख्याशब्द जरी घातला नाहीं तरी एक संख्याशब्द मूळ पाणिनीनें घातलेला आहेच. त्याचीच अनुवृत्ति पुढें करतां येईल.

पण ह्या सूत्रामध्यें पाणिनीनें जो संख्याशब्द मूळचा घातला आहे तो विधेयार्थ दाखविणारा म्ह. संज्ञा कोणती तें दाखविणारा अशा स्वरूपाचा आहे. आणि पुढील सूत्रामध्यें जो संख्या शब्द पाहिजे आहे तो उद्देश्यार्थ दाखविणारा म्ह. संज्ञा कोणाला करावी तें दाखविणारा अशा स्वरूपाचा पाहिजे. तेव्हां एकाकरतां घातलेला संख्याशब्द दुसऱ्याकरतां कसा उपयोगीं पडेल ? ज्या स्वरूपाचा जेथें जो शब्द घातलेला असतो त्या शब्दाची पुढें अनुवृत्ति केली म्हणून कांहीं तेवढ्यानें त्याचें रूपांतर होत नाहीं. घोरपड पुढें सरकली म्हणून कांहीं तेवढ्या सरकण्यानें तिचा साप होत नाहीं.

याचें उत्तर–'एकाकरतां घातलेला संख्याशब्द दुसऱ्याकरतां कसा उपयोगीं पडेल' असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. एका उद्देशानें एखादा पदार्थ केला असला तरी तो दुसऱ्याकरतां उपयोगीं पडतो. उदा० भाताच्या शेताला पाणी पाहिजे म्हणून कालवा खणून तयार केला असतां त्यांत लोक पाणी पितातच, आचमनहि केलें जातें, आणि शेतालाही पाणी दिलें जातें. तसेंच 'ज्या स्वरूपाचा जेथें जो शब्द घातलेला असतो त्या शब्दाची पुढें अनुवृत्ति केली म्हणून तेवढ्यानें कांहीं त्याचें रूपांतर होत नाहीं. घोरपड पुढें सरकली म्हणून कांहीं तेवढ्या सरकण्यानें तिचा साप होत नाहीं' असें जें पुढें म्हटलें आहे तें म्हणणें द्रव्याविषयीं जुळेल. सर्वसाधारण तसें जुळणार नाहीं. शब्द तर खरोखर असा आहे की त्याचा ज्या ज्या विशेष वस्तूशीं संबंध होतो त्या त्या वस्तूचा कांहीं विशेष तो शब्द दाखवीत असतो. तेव्हां प्रकृतसूत्रामध्यें जरी तो संख्याशब्द विधेयवस्तु दाखवीत असला तरी तो पुढील सूत्रामध्यें उद्देश्याशीं संबद्ध होऊन उद्देश्याचा कांहीं विशेष दाखवील.

अथवा पुढील सूत्रामध्यें 'ष्णान्ता' असा जो स्त्रीलिंगी निर्देश केलेला दिसतो तो दुसरा एखादा स्त्रीलिंगी पदार्थ मनांत धरून त्याच्या धोरणानें केलेला असला पाहिजे. आणि तो दुसरा स्त्रीलिंगी पदार्थ 'संख्या' यापेक्षां निराळा कोणीच दिसत नाहीं. तेव्हां ष्णान्ता या स्त्रीलिंगी निर्देशाच्या जोरावर प्रकृतसूत्रांतील संख्या या शब्दाचा संबंध तेथें होईल.

(वा.५) ह्या सूत्रामध्यें अध्यर्ध असा शब्द जास्त घातला पाहिजे, म्हणजे त्याला संख्या संज्ञा होईल.

अध्यर्धग्रहणं च कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । समासकन्विध्यर्थम् । समासविध्यर्थं कन्विध्यर्थं च । समासविध्यर्थं तावत् । अध्यर्धशूर्पम् । कन्विध्यर्थम् । अध्यर्धकम् ॥

## लुकि चाग्रहणम् ॥६॥

लुकि चाध्यर्धग्रहणं न कर्तव्यं भवति । अध्यर्धपूर्वद्विगोर्लुगसंज्ञायाम् [५.१.२८] इति । द्विगोरित्येव सिद्धम् ॥

## अर्धपूर्वपदश्च पूरणप्रत्ययान्तः ॥७॥

अर्धपूर्वपदश्च पूरणप्रत्ययान्तः संख्यासंज्ञो भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । समासकन्विध्यर्थमेव । समासविध्यर्थं कन्विध्यर्थं च । समासविध्यर्थं तावत् । अर्धपञ्चमशूर्पम् । कन्विध्यर्थम् । अर्धपञ्चमकम् ॥

## अधिकग्रहणं चालुकि समासोत्तरपदवृद्ध्यर्थम् ॥८॥

अधिकग्रहणं चालुकि कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । समासोत्तरपदवृद्ध्यर्थम् । समासविध्यर्थमुत्तरपदवृद्ध्यर्थं च। समासविध्यर्थं तावत्। अधिकषाष्टिकः अधिक-

---

त्याचा काय उपयोग ?

समासकन्विध्यर्थम् म्ह. समास होण्याकरतां आणि कन् प्रत्यय होण्याकरतां. त्यांपैकीं समासाचें उदाहरण—अध्यर्धशूर्पम्.[९] कन् प्रत्ययाचें उदाहरण—अध्यर्धकम्.[१०]

(वा.६) ह्या संख्यासंज्ञा सांगणाऱ्या प्रकृतसूत्रामध्यें अध्यर्ध शब्द जास्त घातला असतां 'अध्यर्धपूर्वाद् द्विगोर्लुगसंज्ञायाम्' (५।१।२८) या लुक् सांगणाऱ्या सूत्रामध्यें अध्यर्ध शब्द घालावयास नको. 'द्विगोः' असें तेथें म्हटलें आहेच. तेव्हां त्यानेंच तेथें लुक् होईल.[११]

(वा.७) अर्ध हा शब्द पूर्वपद आणि पूरणप्रत्ययान्त[१२] शब्द उत्तरपद या दोहोंचा समास होऊन जो सामासिक शब्द तयार होईल त्याला संख्यासंज्ञा होते असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

समासकन्विध्यर्थम् म्ह. समास होण्याकरतां आणि कन् प्रत्यय होण्याकरतां असा पूर्वीप्रमाणेंच येथें उपयोग आहे. त्यांपैकीं समासाचें उदाहरण—अर्धपञ्चमशूर्पम्. कन् प्रत्ययाचें उदाहरण—अर्धपञ्चमकम्.

(वा.८) लुकाशिवाय इतर कार्य कर्तव्य असतांना अधिक-शब्दाला संख्यासंज्ञा होते असें म्हणावें.

याचा काय ठपयोग ?

समासोत्तरपदवृद्ध्यर्थम् म्ह. समास होण्याकरतां आणि उत्तरपदवृद्धि होण्याकरतां. त्यांपैकीं समासाचें उदाहरण—अधिकषाष्टिकः,[१३] अधिकसाप्ततिकः. उत्तरपदवृद्धीचें उदाहरण—

---

९. अध्यर्ध म्हणजे अर्धानें अधिक. अर्धानें अधिक अशा शूर्पानें म्ह. दीड शूर्पानें विकत घेतलेल्या वस्तूला अध्यर्ध शूर्प असें म्हणतात. येथें अध्यर्ध शब्दाला संख्यासंज्ञा झाली म्हणून 'तद्धितार्थोत्तरपदे समाहारे च' (२।१।५१) यानें त्या अध्यर्ध शब्दाचा शूर्प शब्दाबरोबर समास झाला आहे. त्या अध्यर्धशूर्प या सामासिक शब्दाहून शूर्पादन्यतरस्याम् (५।१।२६) यानें 'त्यानें विकत घेतलेले' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. त्याचा 'अध्यर्धपूर्व०' (५।१।२८) यानें लुक् होतो.

१०. अध्यर्ध शब्दाला संख्यासंज्ञा झाली म्हणून त्या अध्यर्ध शब्दाहून 'संख्याया अतिशदन्तायाः कन्' (५।१।२२) या सूत्रानें कन् प्रत्यय येथें झाला आहे.

११. कारण अध्यर्ध शब्दाला संख्यासंज्ञा झाल्यामुळें संख्यापूर्वो द्विगुः (२।१।५२) यानें अध्यर्ध शब्द पूर्वी असलेल्या समासाला द्विगुसंज्ञा होणारच आहे.

१२. तस्य पूरणे डट् (५।२।४८) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय करून जे शब्द तयार केले जातात त्यांना पूरणप्रत्ययान्त शब्द असें म्हणतात. उदा० द्वितीय, तृतीय, चतुर्थ, पंचम, इत्यादि.

१३. पूर्वीच्या संख्येपेक्षां साठ रुपये अधिक देऊन विकत घेतलेला पदार्थ असा अधिकषाष्टिक या

साप्ततिकः । उत्तरपदवृद्ध्यर्थम् । अधिकषाष्टिकः अधिक साप्ततिकः । अलुकीति किमर्थम् अधिकषाष्टिकः अधिकसाप्ततिकः ॥

## बहुव्रीहौ चाग्रहणम् ॥९॥

बहुव्रीहौ चाधिकशब्दस्य ग्रहणं न कर्तव्यं भवति । संख्ययाव्ययासन्नादूराधिकसंख्याः संख्येये [२.२.२५] इति । संख्येत्येव सिद्धम् ॥

## बह्वादीनामग्रहणम् ॥१०॥

बह्वादीनां ग्रहणं शक्यमकर्तुम् । केनेदानीं संख्याप्रदेशेषु संख्यासंप्रत्ययो भविष्यति । ज्ञापकात्सिद्धम् । किं ज्ञापकम् । यदयं वतोरिड्वा [५.१.२३] इति संख्याया विहितस्य कनो वत्वन्तादिटं शास्ति । वतोरेव तज्ज्ञापकं स्यात् । ने-

---

अधिकषाष्टिकः, अधिकसाप्ततिकः.

'लुकाशिवाय' असें येथें कशाकरतां म्हटलें आहे ?

अधिकषाष्टिकः, अधिकसाप्ततिकः येथें लुक् होऊं नये याकरतां.

(वा.९) ह्या संख्यासंज्ञा सांगणाऱ्या प्रकृतसूत्रामध्यें अधिक हा शब्द जास्त घातला असतां 'संख्ययाव्ययासन्नादूराधिकसंख्याः संख्येये' (२।२।२५) या बहुव्रीहि समास सांगणाऱ्या सूत्रामध्यें अधिक हा शब्द घालावयास नको. संख्या हा शब्द त्या सूत्रामध्यें घातलेला आहेच. तेव्हां त्यानेंच काम भागेल.

(वा.१०) ह्या प्रकृतसूत्रानें बहु, गण वगैरे शब्दांना जी संख्यासंज्ञा सांगितली आहे ती सांगितली नाहीं तरी चालेल.

तर मग संख्याप्रदेशामध्यें संख्या शब्दानें बहु, गण वगैरे शब्दांचा बोध कसा होईल ?

ज्ञापकावरून होईल.

तें ज्ञापक कोणतें ?

ज्या अर्थीं हा आचार्य पाणिनि संख्यासंज्ञक शब्दाहून सांगितलेला कन् प्रत्यय वतुप्रत्ययान्त शब्दाहून केला असतां त्या ठिकाणीं त्या कन् प्रत्ययाला 'वतोरिड्वा' (५।१।२३) या सूत्रानें इट् आगम करावा असें सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की वतुप्रत्ययान्त शब्दांना संख्यासंज्ञा आहे.[१४]

हें ज्ञापक वतुप्प्रत्ययान्त शब्दांपुरतें झालें. पण बहु, गण वगैरे बाकीच्या शब्दांची वाटकाय

बहु, गण वगैरे बाकीच्या शब्दांनाही संख्यासंज्ञा आहे असें इतर सूत्रांवरून[१५] ज्ञापित होत

---

शब्दाचा अर्थ आहे. अधिक-शब्दाला संख्यासंज्ञा केली म्हणून 'तद्धितार्थो०' (२।१।५१) यानें त्या अधिक शब्दाचा षष्टिशब्दाबरोबर समास झाला. आणि त्या संख्यासंज्ञेचा येथेंच दुसरा उपयोग असा-की त्या अधिक-शब्दाच्या पुढें असलेल्या षष्टिशब्दांतील म्ह. उत्तरपदांतील पहिल्या अकाराला 'संख्यायाः संवत्सरसंख्यस्य च' (७।३।१५) यानें वृद्धि झाली आहे. आतां या अधिक-शब्दाला संख्यासंज्ञा आहे म्हणून संख्यापूर्वो द्विगुः (२।१।५२) यानें अधिकषष्टि याला द्विगुसंज्ञा झाली तर 'अध्यर्धपूर्वाद् द्विगो०' (५।१।२८) यानें पुढील प्रत्ययाचा लुक् होईल; परंतु वार्तिकामध्यें अलुकि म्ह. लुकाशिवाय असें म्हटलें असल्यामुळें त्या संख्यासंज्ञेचा लुकाकडे उपयोग करतां येत नाहीं म्हणून लुक् होत नाहीं.

१४. जर वतुप्रत्यान्त शब्दांना संख्यासंज्ञा नसेल तर तावतिकः या उदाहरणामध्यें 'संख्याया०' (५।१।२२) यानें तावत् या वतुप्रत्ययान्त शब्दाहून कन् प्रत्ययच होणार नाहीं तेव्हां अर्थातच वतोरिड्वा हें सूत्र व्यर्थ होईल.

१५. षट्कतिकतिपयचतुरां थुक् (५।२।५१), बहुपूगगणसंघस्य तिथुक् (५।२।५२), हीं इतर सूत्रें होत. जर डतिप्रत्ययान्त शब्दांना संख्यासंज्ञा नसेल तर कति या डतिप्रत्ययान्त शब्दाहून तस्य पूरणे डट् (५।२।४८) यानें डट् प्रत्ययच होणार नाहीं. तेव्हां अर्थांतच तो डट् प्रत्यय पुढें असतांना 'षट्कति०' यानें सांगितलेला थुक् आगम व्यर्थ होईल. तसेंच बहु,गण यांना जर संख्यासंज्ञा नसेल तर त्यांहून डट् प्रत्ययच होणार नाहीं; तेव्हां अर्थांतच तो डट् प्रत्यय पुढें असतांना 'बहुपूगगण०' यानें सांगितलेला तिथुक् आगम व्यर्थ होईल. तेव्हां ते व्यर्थ होऊं नयेत म्हणून बहु, गण आणि डतिप्रत्ययान्त शब्द यांना संख्यासंज्ञा होते असें गृहीत धरावें लागतें. हेंच ज्ञापक होय.

त्याह । योगापेक्षं ज्ञापकम् ॥

## ष्णान्ता षट् ॥१.१.२४॥

### षट्संज्ञायामुपदेशवचनम् ॥१॥

षट्संज्ञायामुपदेशग्रहणं कर्तव्यम् । उपदेशे षकारनकारान्ता संख्या षट्संज्ञा भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

### शताद्यष्टनोर्नुम्नुडर्थम् ॥२॥

शतानि सहस्राणि । नुमे कृते ष्णान्ता षडिति षट्संज्ञा प्राप्नोति । 'उपदेशग्रहणान्न भवति ॥ अष्टानामित्यत्रात्वे कृते षट्संज्ञा न प्राप्नोति । उपदेशग्रहणाद्भवति ॥

### उक्तं वा ॥३॥

किमुक्तम् । इह तावच्छतानि सहस्राणीति संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति । अष्टनोऽप्युक्तम् । किमुक्तम् । अष्टनो दीर्घग्रहणं षट्संज्ञाज्ञापकमाकारान्तस्य नुडर्थमिति ॥

अथवाकारोऽप्यत्र निर्दिश्यते । षकारान्ता नकारान्ताकारान्ता च संख्या षट्संज्ञा

---

आहेच. तीं सूत्रें मनांत धरूनच फक्त वतोरिड्वा हें एक ज्ञापक मार्ग दाखविण्याकरतां पुढें केलें आहे असें समजावें.

(वा.१) षट्संज्ञा सांगणाऱ्या ह्या प्रकृत सूत्रामध्यें उपदेशे असें म्हणावें.उपदेशीं म्ह. आद्योच्चारणाचे वेळीं जे षकारान्त किंवा नकारान्त संख्याशब्द त्यांना षट्संज्ञा होते असें म्हणावें.

त्यांचा काय उपयोग ?

(वा.२) उपयोग असा की शतानि,सहस्राणि या उदाहरणामध्यें नुम् आगम केल्यानंतर ष्णान्ता षट् या प्रकृतसूत्रानें षट्संज्ञा प्राप्त होते.[1] ती उपदेशे असें म्हटल्यामुळें होत नाहीं.[2] तसेंच अष्टानाम् या उदाहरणामध्यें नकाराला आत्व (७।२।८४) केल्यानंतर षट्संज्ञा प्राप्त होत नाहीं. ती उपदेशे असें म्हटल्यामुळें होते.[3]

(वा.३) अथवा हें वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

शतानि, सहस्राणि या उदाहरणांमध्यें 'संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य'[4] या परिभाषेनें दोष येत नाहीं असें सांगितलें आहे.[5] अष्टन् शब्दासंबंधानेंही सांगितलेंच आहे. 'अष्टनो दीर्घग्रहणं षट्संज्ञाज्ञापकमाकारान्तस्य नुडर्थम्' असें 'अष्टनो दीर्घात्' (६।१।१७२) या सूत्रावर वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे. 'अष्टनो दीर्घात्' या सूत्रामध्यें दीर्घात् असें जें म्हटलें आहे त्यावरून आकारान्ताला षट्संज्ञा होते असें ज्ञापित होतें. तेव्हां अष्टानाम् येथें नुट् आगम (७।१।५५) होण्याला कांहींच अडचण नाहीं.

अथवा, ह्या प्रकृतसूत्रामध्यें षकार, णकार यांच्यापुढें आकारही सूत्रकारांनीं उच्चारला आहे असें समजावें. म्ह. षकारान्त, नकारान्त आणि आकारान्त असे जे संख्याशब्द त्यांना

---

१. षकारान्त किंवा नकारान्त म्ह. षकार किंवा नकार शेवटीं असलेल्या संख्याशब्दांना षट्संज्ञा होते.

२. कारण शत हा शब्द उपदेशीं म्ह. मूळचा अकारान्त आहे. तकारान्त नाहीं. जर येथें नुम् आगम झाल्यानंतर शतन् याला षट्संज्ञा झाली तर त्याच्या पुढील प्रत्ययाचा षड्भ्यो लुक् (७।१।२२) यानें लुक् होऊं लागेल.

३. कारण आतां जरी हा अष्टा असा आकारान्त आहे तरी मूळचा अष्टन् असा नकारान्तच होता. तेव्हां अष्टा याला षट्संज्ञा करतां येतें आणि ती षट्संज्ञा झाल्यामुळें पुढील आम् प्रत्ययाला षट् चतुर्भ्यश्च (७।१।५५) यानें नुट् आगम होतो.

४. परिभाषेचा अर्थ पूर्वी दिला आहे ?(१।१।२० टीप १७)

५. शतानि येथें सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्ययाला मानून झालेला नुम् आगम हा षट्संज्ञेला मदत करीत नाहीं. कारण षट्संज्ञा ही षड्भ्यो लुक् या शास्त्राच्या द्वारानें त्या सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्ययाचा नाश करणारी आहे. नुम् आगम मदत करीत नाहीं म्ह. तो आपलें स्वरूप षट्संज्ञेला दाखवीत नाहीं, तेव्हां नकारान्तच संख्या नसल्यामुळें षट्संज्ञा होत नाहीं.

भवतीति । इहापि तर्हि प्राप्नोति । सधमादो द्युम्न एकास्ता एका इति । नैष दोषः । एकशब्दोऽयं बह्वर्थः । अस्त्येव संख्यापदम् । तद्यथा । एको द्वौ बहव इति । अस्त्यसहायवाची । तद्यथा । एकाग्नयः एकहलानि एकाकिभिः क्षुद्रकैर्जितमिति । असहायैरित्यर्थः । अस्त्यन्यार्थे वर्तते । तद्यथा । प्रजामेका रक्षत्यूर्जमेकेति । अन्येत्यर्थः । सधमादो द्युम्न एकास्ताः । अन्या इत्यर्थः । तद्योऽन्यार्थे वर्तते तस्यैष प्रयोगः ॥ इह तर्हि प्राप्नोति । द्वाभ्यामिष्टये विंशत्या चेति ॥ एवं तर्हि सप्तमे योगविभागः करिष्यते । अष्टाभ्य औश् । ततः षड्भ्यः । षड्भ्यश्च यदुक्तमष्टाभ्योऽपि तद्भवति । ततो लुक् । लुक् च भवति षड्भ्य इति ॥ अथवोपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । अष्टन आ विभक्तौ । ततो रायः । रायश्च विभक्तौ वाकारादेशो भवति । हलीत्युभयोः शेषः ॥ यद्येवं प्रियाष्टौ प्रियाष्टा इति न सिध्यति प्रिया-

---

षट्संज्ञा होते. तेव्हां अष्टानाम् येथें आत्व झाल्यानंतर अष्टा या आकारान्ताला षट्संज्ञा होईल.

तर मग 'सधमादो द्युम्न एकास्ताः' या वाक्यामधील एकाः येथें एका या आकारान्ताला षट्संज्ञा होईल.

हा दोष येत नाहीं. कारण, एक या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. संख्याबोधक एक शब्द आहेच; उदा. एकः द्वौ बहवः. असहाय हाही एक शब्दाचा अर्थ आहे; उदा. एकाग्नयः, एकहलानि, एकाकिभिः क्षुद्रकैर्जितम्. असहाय असा येथें अर्थ आहे. 'अन्य' असाही एक शब्दाचा अर्थ आहे. उदा. प्रजामेका रक्षत्यूर्जमेका. एका म्ह. अन्य असा येथें अर्थ आहे. 'सधमादो द्युम्न एकास्ताः' या उदाहरणामध्यें अन्या म्ह. निराळ्या असा अर्थ आहे. तेव्हां अन्य या अर्थी येथें एका असें म्हटलें आहे. ह्या एक-शब्दानें संख्या दाखविली जात नाहीं म्हणून येथें षट्संज्ञा होत नाहीं.

या ठिकाणीं दोष आला नाहीं. तरी 'द्वाभ्यामिष्टये विंशत्या च' येथें द्वा याला षट्संज्ञा होईल हा दोष येत आहे.

तर मग सातव्या अध्यायामध्यें एका सूत्राचा विभाग करूं. तो असा की 'अष्टाभ्य औश्' (७।१।२१) या सूत्राच्या पुढें 'षड्भ्यः' एवढेंच विभक्त सूत्र समजावें. त्याचा अर्थ—षट्संज्ञकाच्या पुढील प्रत्ययाला जें कार्य सांगितलें आहे तें 'अष्टा' याच्या पुढील प्रत्ययालाही करावें. त्यानंतर दुसरें सूत्र—'लुक्'. याचा अर्थ—षट्संज्ञक शब्दाच्यापुढें असलेल्या जस् आणि शस् या प्रत्ययांचा लुक् होतो.

अथवा त्याच्याही पुढें एका सूत्राचा विभाग करतां येईल. तो असा की 'अष्टन आ विभक्तौ' (७।२।८४) या सूत्राच्या पुढें 'रायः' एवढेंच विभक्त सूत्र समजावें. त्याचा अर्थ—रैशब्दाला विभक्ति पुढें असतांना आकार आदेश होतो. त्यानंतर दुसरें सूत्र—'हलि'. हें सूत्र मागील दोन सूत्रांचा शेष आहे. म्हणजे 'अष्टन आ विभक्तौ' आणि 'रायः' या दोन सूत्रांनीं जें विभक्ति पुढें असतांना आत्व सांगितलें आहे तें ती विभक्ति हलादि असेल तरच करावें.

असें असेल तर प्रियाष्टौ, प्रियाष्टाः हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत. कारण त्या ठिकाणीं हलादि विभक्ति नसल्यामुळें आत्व होणार नाहीं. प्रियाष्टानौ, प्रियाष्टानः अशीं तेथें रूपें होतील.

होतील तर होतील. ज्या रूपांचा कुठें प्रयोग आढळत नाहीं तीं रूपें शास्त्रानें जरीं

---

६. षट्चतुर्भ्यश्च (७।१।५५) यानें सांगितलेला नुट् आगम.

७. तेव्हां अष्टानाम येथें नुट् आगम करण्यापूर्वीं आत्व करतांच येत नाहीं.

ष्टानौ प्रियाष्टान इति च प्राप्नोति । यथालक्षणमप्रयुक्ते ॥

## ड्‌‌ति च ॥१.१.२५॥

इदं डतिग्रहणं द्विः क्रियते संख्यासंज्ञायां षट्‌संज्ञायां च । एकं शक्यमकर्तुम् । कथम् । यदि तावत्संख्यासंज्ञायां क्रियते षट्‌संज्ञायां न करिष्यते । कथम् । ष्णान्ता षडित्यत्र डतीत्यनुवर्तिष्यते । अथ षट्‌संज्ञायां क्रियते संख्यासंज्ञायां न करिष्यते । डति चेत्यत्र संख्यासंज्ञाप्यनुवर्तिष्यते ॥

## क्तक्तवतू निष्ठा ॥१.१.२६॥

**निष्ठासंज्ञायां समानशब्दप्रतिषेधः ॥१॥**

निष्ठासंज्ञायां समानशब्दानां प्रतिषेधो वक्तव्यः । लोतः गर्त इति ॥

**निष्ठासंज्ञायां समानशब्दाप्रतिषेधः ॥२॥**

निष्ठासंज्ञायां समानशब्दानामप्रतिषेधः ॥ अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । निष्ठासंज्ञा कस्मान्न भवति । अनुबन्धोऽन्यत्वकरः ।

---

साधतील तरींच तीं होतात असें समजलें पाहिजे[८].

(सू. २५) डति हा शब्द दोनदां उच्चारला आहे. एक ‘बहुगणवतुडतिसंख्या’ या संख्यासंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें आणि दुसरा षट्‌संज्ञा सांगणाऱ्या ‘डति च’ या प्रकृतसूत्रामध्यें. त्या दोहोंपैकीं एक ठिकाणचा काढला तरी चालेल.

कसा ?

संख्यासंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें ठेवला तर या षट्‌संज्ञा सांगणाऱ्या प्रकृत सूत्रामध्यें ठेवावयास नको.

तो ठेवला नाहीं तर डतिप्रत्ययान्त शब्दांना षट्‌संज्ञा कशी होईल ?

ष्णान्ता षट् या षट् संज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें त्याच्या मागील सूत्रांतून डति या शब्दाची अनुवृत्ति करावी म्हणजे झालें. बरें, आतां या षट्‌संज्ञा सांगणाऱ्या प्रकृतसूत्रामध्यें डति हा शब्द ठेवला तर संख्यासंज्ञा सांगणाऱ्या ‘बहुगण०’ या सूत्रामध्यें ठेवावयास नको. कारण ‘डति च’ या षट्‌संज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें संख्यासंज्ञेची अनुवृत्ति केली म्हणजे काम भागेल.

(वा. १) उदाहरणामध्यें त आणि तवत् यांना जी ही निष्ठासंज्ञा करण्यांत येते ती त्या सारखेच जे इतर ठिकाणीं शब्द दृष्टीस पडतात त्यांना होत नाहीं असें म्हणावें. उदा० लोतः गर्तः[२]

(वा. २) सारख्या शब्दांना निष्ठासंज्ञेचा अप्रतिषेध आहे. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय. म्हणजे त्यांना निष्ठासंज्ञेचा निषेध सांगावयास नको.

मग लोतः, गर्तः या ठिकाणीं निष्ठासंज्ञा कां

---

८. येथें मूळ भाष्यांत ‘यथा लक्षणप्रप्रयुक्ते’ असें वाक्य आहे त्याचा दुसराही अर्थ संभवतो. तो असा की ‘ज्या रूपांचा कुठें प्रयोग आढळत नाहीं तीं रूपें साधण्याला शास्त्रच प्रवृत्त होत नाहीं.

१. डतिप्रत्ययान्त शब्दांना षट्‌संज्ञा होते.

१. क्त आणि क्तवतु या दोन प्रत्ययांना निष्ठा अशी संज्ञा होते.

२. लू आणि गॄ या धातूहून हसिमृग्रिण्०(उणादि सू. ३७३) या उणादि सूत्रानें तन् प्रत्यय केला आहे. धातूला गुण (७।३।८४) होऊन लोत गर्त असें शब्द होतात. तन् प्रत्ययाच्या नकाराला इत्संज्ञा लोप होऊन त एवढाच भाग शिल्लक राहतो. याच लू आणि गॄ धातूहून निष्ठा (३।२।१०२) यानें क्त प्रत्यय केला म्हणजे त्याला प्रकृत सूत्रानें निष्ठा संज्ञा होऊन प्रत्ययाच्या तकाराला नत्व (८।२।४२, ४४) झालें म्हणजे लून गीर्ण असें शब्द होतात. क्त प्रत्ययाच्याही ककाराला इत्संज्ञा (१।३।८) आणि लोप होऊन त एवढाच भाग शिल्लक राहतो. तेव्हां दोन्हीकडे त हा भाग सारखाच दिसत असल्यामुळें लून गीर्ण येथेंच निष्ठा संज्ञा होते आणि लोत गर्त या ठिकाणीं होत नाहीं याचें कारण काय असा अभिप्राय आहे. जर लोत गर्त येथें निष्ठा संज्ञा झाली तर प्रत्ययाच्या तकाराला नत्व होईल असा दोष येतो.

अनुबन्धः क्रियते सोऽन्यत्वं करिष्यति ॥

**अनुबन्धोऽन्यत्वकर इति चेन्न लोपात् ॥३॥**

अनुबन्धोऽन्यत्वकर इति चेत्तन्न । किं कारणम् । लोपात् । लुप्यतेऽत्रानुबन्धः । लुप्तेऽत्रानुबन्धे नान्यत्वं भविष्यति । तद्यथा । कतरद्देवदत्तस्य गृहम् । अदो यत्रासौ काक इति । उत्पतिते काके नष्टं तद्गृहं भवति । एवमिहापि लुप्तेऽनुबन्धे नष्टः प्रत्ययो भवति ॥ यद्यपि लुप्यते जानाति त्वसौ सानुबन्धकस्येयं संज्ञा कृतेति । तद्यथा । इतरत्रापि कतरद्देवदत्तस्य गृहम् । अदो यत्रासौ काक इति । उत्पतिते काके यद्यपि नष्टं तद्गृहं भवत्यन्ततस्तमुद्देशं जानाति ॥

**सिद्धविपर्यासश्च ॥४॥**

सिद्धश्च विपर्यासः । यद्यपि जानाति संदेहस्तस्य भवत्ययं स तशब्दो लोतः गर्त इत्ययं स तशब्दो लूनः गीर्ण इति । तद्यथा । इतरत्रापि कतरद्देवदत्तस्य गृहम् । अदो यत्रासौ काक इति । उत्पतिते काके यद्यपि तमुद्देशं जानाति संदेहस्तु तस्य भवतीदं तद्गृहमिदं तद्गृहमिति ॥ एवं तर्हि

**कारक कालविशेषात्सिद्धम् ॥५॥**

कारककालविशेषावुपादेयौ । भूते

---

होत नाहीं ?

क्त आणि क्तवतु असा ककार इत्संज्ञक जोडला आहे तो त्या दोहोंमध्यें निराळेपणा दाखवील.

(वा.३) 'इत्संज्ञक ककार जोडला आहे तो निराळेपणा दाखवील' हें म्हणणें बरोबर नाहीं. कां बरें ?

लोप झाला म्हणून. लून, गीर्ण या ठिकाणीं इत्संज्ञक ककाराचा लोप झाला आहे. आणि तो ककार लोप होऊन दिसेनासा झाला म्हणजे तो लून, गीर्ण येथें ककार जाऊन शिल्लक राहिलेला त हा शब्द लोत, गर्त यांतील त शब्दापेक्षा निराळा आहे असें कसें ओळखलें जाईल ? त्यांत निराळेपणा कांहींच दिसत नाहीं. जसें—लोकामध्यें 'देवदत्ताचें घर कोणतें' या प्रश्नाचें उत्तर 'ज्यावर हा कावळा बसलेला दिसत आहे हें घर' असें दिलें. परंतु तो कावळा तेथून उडून गेल्यानंतर 'कावळा बसला आहे' अशा स्वरूपाचें घर नाहींसेंच होतें, त्याप्रमाणें येथें इत्संज्ञक ककाराचा लोप झाल्यानंतर 'क्त' अशा स्वरूपाचा प्रत्यय नाहींसाच होत आहे.

पण, जरी ककाराचा लोप झाला तरी इत्संज्ञक ककार ज्या त प्रत्ययाचा आहे त्याला ही निष्ठासंज्ञा केली आहे असें माहीत झालेलें आहेच. जसें—लोकामध्यें देखील 'देवदत्ताचें घर कोणतें' या प्रश्नाचें उत्तर 'ज्यावर हा कावळा बसलेला दिसत आहे हें घर' असें दिलें असतां तो कावळा तेथून उडून गेल्यानंतर 'कावळा बसला आहे' अशा स्वरूपाचें घर जरी नाहींसें होतें तरी पण मनामध्यें त्या घराची जाणीव त्याला होते.

(वा.४) आणखी तशा अवस्थेमध्यें त्याला संशय होणार, म्हणजे इत्संज्ञक ककार ज्याला जोडलेला होता त्याला निष्ठासंज्ञा केली आहे असें जरी जाणतो तरी त्याला संशय येतोच. तो असा की लोतः, गर्तः यांतील त हा शब्द मूळ इत्संज्ञक ककार जोडलेला किंवा लूनः, गीर्णः यांतील त हा शब्द इत्संज्ञक ककार जोडलेला समजावा. जसें लोकामध्यें देखील 'देवदत्ताचें घर कोणतें' या प्रश्नाचें उत्तर 'ज्यावर हा कावळा बसलेला दिसत आहे हें घर' असें उत्तर दिलें असतां कावळा उडून गेल्यानंतर जरी त्याला देवत्ताच्या घराची जाणीव असते तरी पण त्याला 'हेंच तें घर' किंवा 'त्याच्या जवळचें दुसरें हेंच तें घर' असा संशय येतो.

तर मग

(वा. ५) मूळ इत्संज्ञक ककार, लूनः गीर्णः यांतील त शब्दाला जोडलेला होता हें ओळखण्याकरतां एक विशेष प्रकारच्या

यस्तशब्दः कर्तरि कर्मणि भावे चेति। तद्यथा। इतरत्रापि य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति सोऽध्रुवेण निमित्तेन ध्रुवं निमित्तमुपादत्ते वेदिकां पुण्डरीकं वा॥ एवमपि प्राकीर्ष्टेत्यत्र प्राप्नोति।

लुङि सिजादिदर्शनात् ॥६॥

लुङि सिजादिदर्शनान्न भविष्यति। यत्र तर्हि सिजादयो न दृश्यन्ते प्राभित्तेति। दृश्यन्तेऽत्रापि सिजादयः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। यैथवायमनुपदिष्टान्कारककालविशेषानवगच्छत्येवमेतदप्यवगन्तुमर्हति यत्र सिजादयो नेति॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे पञ्चममाह्निकम्॥

---

कारकाची व विशेष प्रकारच्या कालाची खूण धरावी. ती अशीः— हा त शब्द भूतकालाला दाखविणारा आहे. यालाच पूर्वी इत्संज्ञक ककार जोडलेला होता. तसेंच हा तशब्द कर्ता या अर्थाला दाखविणारा, किंवा कर्म या अर्थाला दाखविणारा, किंवा नुसत्या क्रियेला दाखविणारा आहे? यालाच पूर्वी इत्संज्ञक ककार जोडलेला होता अशी कांहींतरी खूण धरली म्हणजे काम भागेल. जसें लोकामध्यें देखील जो एखादा चाणाक्ष मनुष्य असतो तो कावळा ही खूण कायम टिकणारी नव्हे असें समजून त्याच वेळीं त्या क्षणिक खुणेवरून एखादी कायम टिकणारी त्या घराची खूण एक प्रकारची देवडी किंवा वाघ (चित्र) वगैरे कांहीं तरी मनांत धरून ठेवतो आणि खुणेवरून कावळा उडून गेल्यानंतर सुद्धां तो नेमकें देवदत्ताचें घर ओळखून काढतो. त्याप्रमाणेंच हें होय.

तरी पण प्राकीर्ष्ट या क्रियापदांतील त या प्रत्ययालाही निष्ठासंज्ञा प्राप्त होत आहे.

प्राकीर्ष्ट या लुङ् प्रत्ययाच्या क्रियापदामध्यें सिच् वगैरे निराळेंच कोणी तरी दृष्टीस पडतात त्यामुळें तेथें निष्ठासंज्ञा होणार नाहीं.

(वा.६) तर मग ज्या लुङ् प्रत्ययाच्या क्रियापदामध्यें सिच् वगैरे निराळे कोणीच दृष्टीस पडत नाहींत अशा प्राभित्त वगैरे उदाहरणांमध्यें त याला निष्ठासंज्ञा होईल हा दोष येतोच. पण येथेंही उदाहरण साधतांना सिच् वगैरेमध्यें दृष्टीस पडत आहेतच.

तर मग काय येथें सिच् वगैरे होतें असें सांगत बसलें पाहिजे?

तसें सांगत बसायचें कारण नाहीं.

मग सांगितल्याशिवाय कसें समजावें?

सांगितल्याशिवाय भूतकाल, कर्ता, कर्म वगैरे अर्थ जसे समजण्यांत येतात तसे सिच् वगैरे कोणी नाहींत हेंही समजण्यांत येईल.

पांचवें आन्हिक समाप्त.

---

३. प्रकृतः कटं सः येथें कर्तरि (३।४।७१) क्त प्रत्यय केला आहे. म्ह. कर्ता या अर्थाला दाखविणारा आहे. कृतः कटः येथें कर्म या अर्थाला दाखविणारा आहे. हसितं, शयितं इत्यादि ठिकाणीं हसणें निजणें असें नुसत्या क्रियेलाच त शब्द दाखवितो.

४. प्रकृतः कटं सः आणि प्राकीर्ष्ट कटं सः या दोन्ही वाक्यांमध्यें प्रकृतः आणि प्राकीर्ष्ट या दोन्ही ठिकाणचा त हा प्रत्यय भूतकाल आणि कर्ता या अर्थाला दाखविणारा आहे.

५. देवदत्ताच्या घराच्या कायम टिकणाऱ्या खुणा देवडी, वाघ वगैरे जेव्हां एखादा चाणाक्ष मनुष्य लक्षांत ठेवतो तेव्हां 'त्याला सज्जा नाहीं' ही खूण लक्षांत ठेवितोच असें नाहीं. परंतु त्याच्यासारखेंच देवडी, वाघ वगैरे खुणा असलेलें जर एखादें सज्जा असलेलें दुसरें घर त्याच्या दृष्टीस पडलें तर हें देवदत्ताचें नव्हे असें तो खात्रीनें सांगतो. त्याप्रमाणेंच येथें समजावें.

६. प्राभित्त या क्रियापदामध्यें सिच् प्रत्यय झाला आहे. परंतु झलो झलि (८।२।२६) यानें त्याचा लोप झाला आहे त्यामुळें तो दिसत नाहीं.

७. कारण प्राभित्त या तयार झालेल्या रूपामध्यें सिच् दिसत नाहीं म्हणून.

८. मध्यें सिच् वगैरे प्रत्यय केलें होते किंवा नाहीं ते वैयाकरण मनुष्याला सहज समजण्यासारखें आहे.

## सर्वादीनि सर्वनामानि ।१.१.२७।

सर्वादीनीति कोऽयं समासः । बहुव्रीहिरित्याह । कोऽस्य विग्रहः । सर्वशब्द आदिर्येषां तानीमानीति । यद्येवं सर्वशब्दस्य सर्वनामसंज्ञा न प्राप्नोति, किं कारणम् । अन्यपदार्थत्वाद्बहुव्रीहेः । बहुव्रीहिरयमन्यपदार्थे वर्तते । तेन यदन्यत्सर्वशब्दात्तस्य सर्वनामसंज्ञा प्राप्नोति । तद्यथा । चित्रगुरानीयतामित्युक्ते यस्य ता गावो भवन्ति स आनीयते न गावः । नैष दोषः । भवति बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि । तद्यथा । चित्रवाससमानय । लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्ति । तद्गुण आनीयते तद्गुणाश्च प्रचरन्ति ॥

इह सर्वनामानीति पूर्वपदात्संज्ञायामगः [८.४.३] इति णत्वं प्राप्नोति । तस्य प्रतिषेधो वक्तव्यः ।

### सर्वनामसंज्ञायां निपातनाण्णत्वाभावः ॥१॥

सर्वनामसंज्ञायां निपातनाण्णत्वं न भविष्यति । किमेतन्निपातनं नाम । अथ कः प्रतिषेधो नाम । अविशेषेण किंचिदुक्त्वा विशेषेण नेत्युच्यते । तत्र व्यक्त-

---

(सू. २७) 'सर्वादीनि' हा समास कोणता ?

हा बहुव्रीहि समास असें म्हणतों.

याचा विग्रह कसा करावयाचा ?

सर्वशब्द आदिर्येषां तानि, इमानि म्ह. सर्व हा शब्द ज्यांचा आदि आहे असा. जर असा विग्रह केला तर सर्व या शब्दाला सर्वनामसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

अन्यपदार्थत्वाद्बहुव्रीहेः म्ह. बहुव्रीहि हा त्यांतील पदार्थापेक्षां निराळ्या अशा अन्य पदार्थाला दाखवितो. त्यामुळें सर्व शब्दाहून अन्य असे जे शब्द त्यांना सर्वनामसंज्ञा प्राप्त होते. जसें—चित्रगुरानीयताम्, ज्याच्या गायी अनेक प्रकारच्या आहेत त्याला घेऊन या, असें सांगितलें असतां ज्याच्या त्या गायी आहेत तोच फक्त आणला जातो. गायी आणल्या जात नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण बहुव्रीहीमध्यें तद्गुणसंविज्ञानही होतें, म्ह. बहुव्रीहीमधील पदांनीं दाखविलेल्या विशेषणांचा अन्यपदार्थाच्या बरोबर कार्यामध्यें अन्वयही होतो; जसें- 'चित्रवाससमानय' 'लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्ति' असें म्हटलें असतां चित्रवस्त्र पांघरलेला आणला जातो, आणि तांबडें पागोटें घातलेले ऋत्विज संचार करतात.

आतां 'सर्वनामानि' या शब्दामध्यें 'पूर्वपदात्संज्ञायामगः' (८।४।३) यानें नकाराला णत्व प्राप्त होतें, त्याचा प्रतिषेध सांगितला पाहिजे.

(वा. १) सर्वनाम या संज्ञाशब्दामध्यें निपातनास्तव णत्व होणार नाहीं. निपातन म्हणजे काय ?

प्रतिषेध म्हणजे तरी काय ?

सामान्यतः कांहीं एक गोष्ट सांगून विशेष ठिकाणीं ती गोष्ट करूं नये असें सांगणें याला प्रतिषेध म्हणतात. तेथें 'अमुक एक होत नाहीं' असा आचार्यांचा अभिप्राय स्पष्टपणें जाणला जातो.

---

१. सर्वादिगणांतील जे सर्व वगैरे शब्द त्यांना सर्वनाम संज्ञा होते.

२. ज्याचें वस्त्र चित्रविचित्र आहे अशा मनुष्याला घेऊन या, आणि ज्यांचें शिरोवेष्टन तांबडें आहे असें ऋत्विजलोक संचार करतात. असे या दोन वाक्यांचे अर्थ आहेत.

३. तेव्हां येथें सर्वादि हा आदिशब्द अवयववाचक असल्यामुळें सर्वशब्दासहित अन्यपदार्थ घ्यावयाचा आहे. तेव्हां त्यांतील इतर शब्दाप्रमाणें सर्वशब्दाकाही सर्वनामसंज्ञा होते.

माचार्यस्याभिप्रायो गम्यत इदं न भवतीति । निपातनमप्येवंजातीकयमेव । अविशेषेण णत्वमुक्त्वा विशेषेण निपातनं क्रियते । तत्र व्यक्तमाचार्यस्याभिप्रायो गम्यत इदं न भवतीति ॥ ननु च निपातनाच्चाणत्वं स्याद्यथाप्राप्तं च णत्वम् । किमन्येप्येवं विधयो भवन्ति । इहेको यणचि [६.१.७७] इति वचनाच्च यण्स्याद्यथाप्राप्तश्चेक्श्रूयेत । नैष दोषः । अस्त्यत्र विशेषः । षष्ठ्यात्र निर्देशः क्रियते षष्ठी च पुनः स्थानिनं निवर्तयति ॥ इह तर्हि कर्तरि शप् [३.१.६८] दिवादिभ्यः श्यन् [६९] इति वचनाच्च श्यन्स्याद्यथाप्राप्तश्च शप्श्रूयेत । नैष दोषः । शबादेशः श्यन्नादयः करिष्यन्ते । तत्तर्हि शपो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । कर्तरि शबिति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । दिवादिभ्य इत्येषा पञ्चमी शबिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥ इह

---

तर मग निपातनही या जातीचेंच आहे. सामान्यतः णत्वाचें विधान करून विशेषतः 'सर्वनाम' असें त्याच्या उलट उच्चारण करणें हें निपातन होय. त्यावरून आचार्याचा स्पष्ट अभिप्राय असा समजला जातो की, हें (णत्व) येथें (सर्वनाम शब्दामध्यें) होत नाहीं.

या निपातनावरून णत्व न करतां सर्वनाम या शब्दाला साधुत्व माना, पण 'पूर्वपदात्०' (८।४।३) या सूत्रावरून णत्व हा एकदां होईल.

इतर विधि असे करतां येतात काय ? जर करतां येतील तर 'इको यणचि' (६।१।७७) या वचनावरून दृष्टि अत्र येथें यण् होईल. आणि मूळचा इकारही एकदां राहील.

हा दोष येत नाहीं. कारण येथें थोडा विशेष आहे. षष्ठी विभक्ति लावून येथें इकाचा उल्लेख केला आहे. आणि षष्ठीविभक्ति ही तर स्थानीची निवृत्ति करावी असें दाखविते.

तर 'कर्तरि शप्' (३।१।६८) याच्या पुढील 'दिवादिभ्यः श्यन्' (३।१।६९) या सूत्रांवरून दिवादिधातूहून श्यन् प्रत्यय होईल. आणि 'कर्तरि शप्' यानें सांगितलेला शप् प्रत्ययही एकदां होईल.

हा दोष येत नाहीं. कारण, श्यन् वगैरे प्रत्यय हे शप्प्रत्ययाचे स्थानीं आदेश करण्यांत येतील.

तर मग श्यन् वगैरे प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांमध्यें 'शपः' असा षष्ठ्यन्त शब्द घातला पाहिजे.

त्यामध्यें षष्ठ्यन्त शप् शब्द घालावयास नको. मागील सूत्रामध्यें घातलेला येथें अनुवृत्त येईल.

मागील कोणत्या सूत्रामध्यें शप् शब्द घातला आहे ?

'कर्तरि शप्' येथें.

पण तो शप् शब्द प्रथमाविभक्ति लावून उच्चारला आहे. आणि येथें तर षष्ठी लावून उच्चारलेला पाहिजे आहे.

'दिवादिभ्यः श्यन्' येथील दिवादिभ्यः ही पञ्चमी विभक्ति 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) या परिभाषेच्या मदतीनें शप्शब्दापुढील प्रथमेला षष्ठी बनवील.

पण 'दिवादिभ्यः श्यन्' वगैरे प्रत्ययविधि आहेत. आणि प्रत्ययविधींतील पञ्चमी विभक्ति तर षष्ठी बनवूं शकत नाहीं.

हा प्रत्ययविधि नव्हे. प्रत्यय कर्तरि शप् यानें पूर्वीच सांगितला आहे. तो प्रत्यय फक्त

तर्ह्यव्ययसर्वनाम्नामकच्प्राक्टेः [५.१.७१] इति वचनाच्चाकच्स्याद्यथाप्राप्तश्च कः श्रूयेते । नैष दोषः । नाप्राप्ते हि केऽकजारभ्यते स बाधको भविष्यति । निपातनमप्येवंजातीयकमेव । नाप्राप्ते णत्वे निपातनमारभ्यते तद्बाधकं भविष्यति ॥ यदि तर्हि निपातनान्यप्येवंजातीयकानि भवन्ति समस्तते दोषो भवति । इहान्ये वैयाकरणाः समस्तते विभाषा लोपमारभन्ते समो हिततयोर्वेति । सततम् संततम् सहितम् संहितमिति । इह पुनर्भवान्निपातनाच्च मलोपमिच्छत्यपरस्पराः क्रियासातत्ये [६.१.१४४] इति यथाप्राप्तं चालोपं संततमित्येतन्न सिध्यति । कर्तव्योऽत्र यत्नः ॥ बाधकान्येव हि निपातनानि भवन्ति ॥

**संज्ञोपसर्जनप्रतिषेधः ॥२॥**

संज्ञोपसर्जनीभूतानां सर्वादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । सर्वो नाम कश्चित्तस्मै सर्वाय देहि । अतिसर्वाय देहि ॥ स कथं कर्तव्यः ।

**पाठात्पर्युदासः पठितानां संज्ञा-**

---

येथें अनुवृत्त होत आहे.

तर मग 'अव्ययसर्वनाम्नां' (५।३।७२) या वचनावरून सर्व, विश्व वगैरे शब्दांना अकच् होईल; आणि प्राप्त असलेला क प्रत्ययही (५।३।७३) एकदां होईल.

हा दोष येत नाहीं. कारण क प्रत्यय नाप्राप्त असतां अकच् प्रत्ययाचें विधान केलें जात आहे. तेव्हां तो अकच् कप्रत्ययाचा बाध करील.

निपातनही याच जातीचें आहे. तेव्हां णत्व नाप्राप्त असतां णत्वाभावाचें निपातन केलें जात आहे तें णत्वाचें बाधक होईल.

जर निपातनेंसुद्धां या जातीचीं म्ह. बाधक होतील तर सम्‌शब्दाचे पुढें तत शब्द असतां दोष येतो. या ठिकाणीं कांहीं वैयाकरण 'समो वा हिततयोः' असें वचन करून सम्‌शब्दाचे पुढें हित आणि तत हे शब्द आले असतां तेथें मकाराचा लोप विकल्पानें सांगतात. सततम्, संततम्, सहितम् संहितम् आणि तुम्ही तर ह्या व्याकरणामध्यें 'अपरस्पराः क्रियासातत्ये'[४] (६।१।१४४) या निपातनावरून लोप, व मुळांत प्राप्त असलेला अलोप म्ह. लोपाचा अभाव इच्छितां, तें आतां साधणार नाहीं.

संततं आणि सततं अशीं दोन रूपें होण्याबद्दल[५] निराळा कांहीं यत्न करावा, पण निपातनें हीं बाधकच होत असतात.

(वा. २) संज्ञाभूत किंवा उपसर्जनीभूत अशा सर्वादि शब्दांना सर्वनाम संज्ञेचा निषेध करावा. जसें— सर्वो नाम कश्चित्तस्मै सर्वाय देहि. येथें सर्व शब्द हा एका व्यक्तीचें नांव असल्यामुळें त्याला सर्वनामसंज्ञा नाहीं, म्हणून स्मै आदेश (७।१।१४) केला नाहीं. तसेंच 'सर्वमतिक्रान्तोऽतिसर्वस्तस्मै अतिसर्वाय देहि' येथें सर्व शब्द हा अतिक्रान्त या अर्थाचें विशेषण असल्यामुळें सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो, म्हणून स्मै आदेश केला नाहीं.

तो सर्वनामसंज्ञेचा निषेध कोणच्या प्रकारानें करावा ?

---

४. सततस्य भावः सातत्यम् । तन्धातूहून क्त प्रत्यय करून धातूच्या नकाराचा लोप (६।४।३७) केला म्हणजे तत शब्द सिद्ध होतो. मागे सम् उपसर्ग आहे त्याच्या मकाराचा लोप केला म्हणजे सतत असा शब्द होतो. हा मकाराचा लोप पाणिनीनें कुठें सांगितला नाहीं. परंतु येथें मकाराचा लोप करून सातत्य असें जें उच्चारण करतो हेंच निपातन होय. ह्या निपातनामुळेंच ह्या शब्दामध्यें मकाराचा लोप झाला आहे.

५. पृषोदरादिगणामध्यें (६।३।१०९) सतत आणि संतत या दोन्ही शब्दांची कल्पना करावी. म्हणजे मकाराचा लोप विकल्पानें होईल.

करणम् ॥३॥

पाठादेव पर्युदासः कर्तव्यः। शुद्धानां पठितानां संज्ञा कर्तव्या। सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि भवन्ति। संज्ञोपसर्जनीभूतानि न सर्वादीनि। किमाविशेषेण। नेत्याह। विशेषेण च। किं प्रयोजनम्।

सर्वाद्यानन्तर्यकार्यार्थम् ॥४॥

सर्वादीनामानन्तर्येण यदुच्यते कार्यं तदपि संज्ञोपसर्जनीभूतानां मा भूदिति। किं प्रयोजनम्।

प्रयोजनं डतरादीनामद्ड्भावे ॥५॥

डतरादीनामद्ड्भावे प्रयोजनम्। अतिक्रान्तमिदं ब्राह्मणकुलं कतरत् अतिकतरं ब्राह्मणकुलमिति ॥

त्यदादिविधौ च ॥६॥

त्यदादिविधौ च प्रयोजनम्। अतिक्रान्तोऽयं ब्राह्मणस्तम् अतितद्ब्राह्मणमिति ॥

संज्ञाप्रतिषेधस्तावन्न वक्तव्यः। उपरिष्टाद्योगविभागः करिष्यते। पूर्वपरावरदक्षिणोत्तरापराधराणि व्यवस्थायाम्। ततोऽसंज्ञायामिति। सर्वादीनीत्येवं यान्यनुक्रान्तान्यसंज्ञायां तानि द्रष्टव्यानि ॥ उपसर्जनप्रतिषेधश्च न कर्तव्यः। अनु-

---

(वा.३) संज्ञाभूत आणि उपसर्जनीभूत असे सर्वादि शब्द गणपाठांतूनच बाहेर काढून टाकावेत. आणि त्यांशिवाय शुद्ध अशा सर्वादि शब्दांना सर्वनामसंज्ञा करावी.

संज्ञा किंवा उपसर्जन अशा शब्दांना सामान्यतः सर्वनामसंज्ञा न व्हावी एवढ्याचसाठीं त्यांना गणपाठांतून बाहेर काढावयाचें कीं काय ?

तेवढ्याचसाठीं नाहीं असें म्हणतों. तर विशेष कार्य म्ह. अंतर्गणाला उद्देशून सांगितलेलें जें कार्य तेंही संज्ञा आणि उपसर्जन यांना न व्हावें यासाठीही त्यांना गणपाठांतून बाहेर काढावयाचें आहे.

संज्ञा किंवा उपसर्जनभूत सर्वादि शब्दांना तशा कार्याकरितां गणपाठांतून बाहेर काढण्याचा उपयोग काय ?

(वा.४) सर्वादि गणांतील अन्तर्गण (पोटगण) म्हणून गृहीत धरलेल्या त्यदादि शब्दांना किंवा डतरादि शब्दांना जें कार्य सांगण्यांत येतें तेंही संज्ञा किंवा उपसर्जन यांना न व्हावें.

त्याचें उदाहरण कोणतें ?

(वा.५) डतरादि शब्दांसंबंधानें सांगितलेल्या 'अद्ड् आदेशा' (७।१।२५) विषयीं तशा शब्दांना गणांतून बाहेर काढल्याचा उपयोग येतो. जसें—कतरत् अतिक्रान्तं ब्राह्मणकुलम्. अतिकतरम् येथें कतर शब्दाचा अर्थ अतिक्रान्त या अर्थाचा उपसर्जन असल्यामुळें त्याचा डतरादि गणामध्यें शिरकाव नाहीं. सबब अद्ड् आदेश होत नाहीं.

(वा.६) त्यदादिशब्दांना सांगितलेल्या अकारा (७।२।१०२) विषयींही तशा शब्दांना गणांतून बाहेर काढल्याचा उपयोग येतो. जसें—तं अतिक्रान्तो ब्राह्मणः. 'अतितद्' ब्राह्मणः येथें तद् शब्दाचा अर्थ अतिक्रांत ह्या अर्थाचा उपसर्जन असल्यामुळें त्याचा त्यदादि गणामध्यें शिरकाव नाहीं. सबब अकार आदेश होत नाहीं.

संज्ञाभूत अशा सर्वादि शब्दांना गणपाठांतून बाहेर काढण्यानें त्यांना जो हा सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे तो करावयास नको. कारण पुढील सूत्रामध्यें[६] योगविभाग करण्यांत येईल. तो असा—'पूर्वपरावरदक्षिणोत्तरापराधराणि व्यवस्थायाम्' असें एक सूत्र होय आणि त्याचें पुढें 'असंज्ञायाम्' असें दुसरें सूत्र होय. सर्वनामसंज्ञेचें उद्देश्य म्हणून जीं हीं सर्व वगैरे पस्तीस शब्दस्वरूपें अनुक्रमानें निर्दिष्ट केलीं आहेत तीं संज्ञाशब्दभिन्न आहेत असें समजावें.

---

६. 'पूर्वपरा०' या गणसूत्रामध्यें (उद्योत).

पसर्जनात् [४.१.१४] इत्येष योगः प्रत्याख्यायते तमेवमभिसंभन्त्स्यामः। अनुपसर्जन अ अदिति। किमिदम अदिति। अकारात्कारौ शिष्यमाणावनुपसर्जनस्य द्रष्टव्यौ। यद्येवमतियुष्मत् अत्यस्मदिति न सिध्यति। प्रश्लिष्टनिर्देशोऽयम्। अनुपसर्जन अ अ अदिति। अकारान्तादकारात्कारौ शिष्यमाणावनुपसर्जनस्य द्रष्टव्यौ॥ अथवाङ्गाधिकारे यदुच्यते गृह्यमाणविभक्तेस्तद्भवति। यद्येवं परमपञ्च परमसप्त षड्भ्यो लुक् [७.१.२२] इति लुग्न प्राप्नोति। नैष दोषः। षट्प्रधान एष समासः॥ इह तर्हि प्रियसक्थ्ना ब्राह्मणेनानङ् न प्राप्नोति। सप्तमीनिर्दिष्टे यदुच्यते प्रकृतविभक्तौ तद्भवति। यद्येवमतितत् अतितदौ अतितद इत्यत्वं प्राप्नोति। तच्चापि वक्तव्यम् न वक्तव्यम्। इह तावदद्-

---

तसेंच उपसर्जनीभूत अशा सर्वादि शब्दांना जो सर्वनामसंज्ञेचा प्रतिषेध केला आहे तोही करावयास नको. कारण 'अनुपसर्जनात्' (४।१।१४) या सूत्राचें प्रत्याख्यान केलें जाणार आहे. तेव्हां त्या सूत्रामध्यें 'अनुपसर्जन अ अत्' अशीं पदें घेऊन 'उपसर्जनाला वरील कार्यें न होतील' असें व्याख्यान करूं.

अ अत् ह्याचा काय अर्थ ?

अ आणि अत् हे आदेश अनुपसर्जनाला होतात.

असें आहे तर अतियुष्मत्=अत्यस्मत् येथें 'पञ्चम्या अत्' (७।१।३१) यानें अत् आदेश होणार नाहीं.

'अनुपसर्जनात्' हा प्रश्लिष्ट म्ह. आणखी एका अकाराचा संधि करून निर्देश केला आहे. तेव्हां अनुपसर्जन, अ, अ, अत् असा पदच्छेद करावयाचा. त्यांत 'अनुपसर्जन' हें लुप्त षष्ठ्यन्त पद आहे त्यापुढील 'अ' हें लुप्तपञ्चम्यन्त पद आहे. अकाराहून पुढें केले जाणारे अकार किंवा अत्कार हे अनुपसर्जनाला करावेत अथवा अंगाधिकारामध्ये जें कार्य सांगितलें आहे तें गृह्यमाण म्ह. सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दालाच ज्या ठिकाणीं विभक्तिप्रत्यय लावला असेल तेथेंच होतें. अतितत् ब्राह्मणः येथील विभक्ति अतितत् या शब्दाला लागली आहे. सूत्रामध्यें उच्चारलेल्या म्ह. तद् या शब्दाला लागली नसल्यामुळें तेथें अकार आदेश होत नाहीं.

असें आहे तर परमपञ्च परमसप्त येथें 'षड्भ्यो लुक्' (७।१।२२) यानें लुक् प्राप्त होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण परमपञ्च किंवा परमसप्त या समासामध्यें षट्संज्ञक शब्दच प्रधान आहे. तेव्हां त्या मुख्य अर्थाला धरून झालेली विभक्ति पञ्चन् इत्यादि षट्संज्ञक शब्दाला लागली आहे असें म्हणतां येतें, म्हणून तेथें विभक्तीचा लुक् होतो.

तर मग प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन येथें 'अस्थिदधि०' (७।१।७५) यानें अनङादेश प्राप्त होऊं शकत नाहीं.

सूत्रामध्यें सप्तम्यन्ताचा निर्देश करून जें कार्य सांगितलें जातें तें अंगाहून केलेली विभक्ति पुढें असतांना होतें. प्रियसक्थ्ना येथील तृतीया विभक्ति ही प्रियसक्थि या अंगाहून केली असल्यामुळें तेथें अनङादेश होतो.

असें आहे तर अतितद् अतितदौ अतितदः येथें अंगाला लागलेली विभक्ति पुढें असल्यामुळें 'त्यदादीनामः' (७।२।१०२) यानें अकार आदेश प्राप्त होत आहे.

मग आतां सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दालाच ज्या ठिकाणीं विभक्तिप्रत्यय लावला असेल तेथेंच त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य

---

७. पञ्चम्या अत् यानें जो अत् आदेश सांगितला आहे तो अकाराहून पुढील पञ्चमीला होतो असें सांगितलें नसल्यामुळें अतियुष्मत् अत्यस्मत् येथें दोष येत नाहीं.

डतरादिभ्यः पञ्चभ्यः [७.१.२५] इति पञ्चम्यङ्गस्येति षष्ठी तत्राशक्यं विविभक्तित्वाड्डतरादिभ्य इति पञ्चम्याङ्गं विशेषयितुम्। तत्र किमन्यच्छक्यं विशेषयितुमन्यदतो विहितात्प्रत्ययात्। डतरादिभ्यो यो विहित इति। इहेदानीमस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्त इति त्यदादीनामो भवतीत्यस्थ्यादीनामित्येषा षष्ठ्यङ्गस्येत्यपि त्यदादीनामित्यपि षष्ठ्यङ्गस्येत्यपि। तत्र कामचारो गृह्यमाणेन वा विभक्तिं विशेषीयतुमङ्गेन वा। यावता कामचार इह तावदस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्त इत्यङ्गेन विभक्तिं विशेषयिष्यामोऽस्थ्यादिभिरनङम्। अङ्गस्य विभक्तावनङ् भवत्यस्थ्यादीनामिति। इहेदानीं त्यदादीनामो भवतीति गृह्यमाणेन विभक्तिं विशेषयिष्यामोऽङ्गेनाकारम्। त्यदादीनां विभक्तावो भवत्यङ्गस्येति॥ यद्येवमतिसः अत्वं न प्राप्नोति। नैष दोषः। त्यदादिप्रधान एष समासः॥ अथवा नेदं संज्ञाकरणं

होतें हेंही सांगितलें पाहिजे.

तें सांगावयास नको. असें पाहा की 'अद्ड्डतरादिभ्यः पञ्चभ्यः' (७।१।२५) त्या सूत्रामध्यें डतरादिभ्यः ही पञ्चमी आहे. आणि 'अङ्गस्य' ही षष्ठी आहे. तेव्हां विभक्ति भिन्न असल्यामुळें 'डतरादिभ्यः' या पञ्चमीचें अङ्ग हें विशेष्य करणें शक्य आहे. अर्थात् 'डतरादींकडून जो विहित' असें त्या पञ्चमीचें विहितप्रत्यय विशेष्य करण्याखेरीज दुसरें काय बरें विशेष्य करणें शक्य आहे? कांहींच दिसत नाहीं. तेव्हां डतरादिकांहून केलेला जो सुप्रत्यय किंवा अम् प्रत्यय त्याचे स्थानीं अद्ड् आदेश होतो असा 'अद्ड्डतरादिभ्यः०' या सूत्राचा अर्थ ठरल्यामुळें अतिकतरं ब्राम्हणकुलम् येथें अतिकतर या शब्दाहून केलेल्या सु प्रत्ययाला अद्ड् आदेश होत नाहीं. सबब सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दालाच विभक्तिप्रत्यय लागलेला पाहिजे वगैरे कांहीं निराळें सांगावयास नको. आतां 'अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः' (७।१।७५) येथें 'अस्थिदधिसक्थ्यक्ष्णाम्' हीही षष्ठी आहे आणि 'अङ्गस्य' हीही षष्ठी आहे. तसेंच 'त्यदादीनामः' (७।२।१०२) येथें 'त्यदादीनाम्' हीही षष्ठी आहे व 'अङ्गस्य' हीही षष्ठी आहे. तेथें सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दाचा विभक्तीकडे संबंध जोडणें किंवा अंगाचा विभक्तीकडे संबंध जोडणें हें व्याख्यात्याच्या मर्जीवर अवलंबून आहे. आणि जर व्याख्यात्याच्या मर्जीवर ही गोष्ट अवलंबून आहे तर आम्ही 'अस्थिदधिसक्थ्य०' येथें विभक्तीकडे अंगाचा संबंध करतों आणि अस्थि वगैरे शब्दांचा अनङाकडे संबंध करतों. तेव्हां अंगाहून केलेली विभक्ति पुढें असतांना अस्थि वगैरे शब्दांना अनङ् होतो असा 'अस्थिदधि०' या सूत्राचा अर्थ ठरतो. तसेंच 'त्यदादीनामः' (७।२।१०२) येथें सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दांचा विभक्तीकडे संबंध करतों व अंगाचा अकार आदेशाकडे संबंध करतों. तेव्हां त्यद् वगैरे शब्दांची विभक्ति पुढें असतांना अंगाला अकार आदेश होतो असा 'त्यदादीनामः' या सूत्राचा अर्थ ठरतो म्हणून कांहीं दोष नाहीं.

त्यदादिकांच्या अर्थावरील संख्येला दाखविणारी विभक्ति पुढें असतां अत्व होतें असें म्हटलें तर अतिसः येथें तशी विभक्ति नसल्यामुळें अकार आदेश होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण अतिसः या समासामध्यें त्यदादि शब्दच प्रधान आहे. म्हणजे शोभनः सः असा हा समास सोडवावयाचा. तेव्हां तद् शब्दाच्या अर्थाला जरी दुसरें विशेषण लागलें तरी त्याच अर्थाच्या

८. तेव्हां प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन येथें अंगाचा अर्थ जो ब्राह्मण त्याच्या संख्येला दाखविणारी विभक्ति पुढें आहे म्हणून तेथें अनङ् होतो. आणि अतितत् येथें तद् शब्दाच्या अर्थाच्या संख्येला दाखविणारी विभक्ति नसल्यामुळें अकार आदेश होत नाहीं.

**पाठविशेषणमिदम्। सर्वेषां यानि नामानि तानि सर्वादीनि। संज्ञोपसर्जने च विशेषेऽवतिष्ठेते। यद्येवं संज्ञाश्रयं यत्कार्यं तन्न सिध्यति, सर्वनाम्नः स्मै [७.१.१४] आमि सर्वनाम्नः सुट् [७.१.५२] इति। अन्वर्थग्रहणं तत्र विज्ञास्यते। सर्वेषां यन्नाम तत्सर्वनाम सर्वनाम्न उत्तरस्य ङेः स्मै भवति सर्वनाम्न उत्तरस्यामः सुड् भवति। यद्येवं सकलं कृत्स्नं जगदित्यत्रापि प्राप्नोति। एतेषां चापि शब्दानामेकैकस्य स स विषयस्तस्मिंस्तस्मिन्विषये यो यः शब्दो वर्तते तस्य तस्य तस्मिंस्तस्मिन्वर्तमानस्य सर्वनामकार्यं प्राप्नोति॥ एवं तर्ह्युभयमनेन क्रियते**

संख्येला दाखविणारी विभक्ति पुढें असल्यामुळें अकार आदेश होण्यास अडचण नाहीं.

अथवा 'सर्वादीनि' हें सूत्र संज्ञा सांगणारें नव्हेच. तर फक्त गणपाठाचें संशोधन करणारें आहे. सर्वपदार्थांना लागणारीं जीं नामें म्ह. शब्दस्वरूपें, तीं या सर्वादिगणांमध्यें पठित आहेत असा त्याचा अर्थ होय. संज्ञा किंवा वृत्तीमध्यें विशेषण झालेलीं जीं सर्व वगैरे शब्दस्वरूपें तीं सर्वअर्थाला दाखवीत नसून विशेषअर्थाला दाखवीत असतात. म्हणून तसले सर्वादिशब्द सर्वादिगणामध्यें प्रविष्ट होऊं शकत नाहींत.

जर 'सर्वादीनि' हें सूत्र संज्ञा आणि उपसर्जन अशा सर्ववगैरे शब्दांना सर्वादिगणांतून बाहेर काढणें एवढेंच काम करीत आहे तर सर्वनामसंज्ञेवर अवलंबून असलेलें कार्य 'सर्वनाम्नः स्मै' (७।१।१४) 'आमि सर्वनाम्नः सुट्' (७।१।५२) वगैरे सर्वादिशब्दांना होऊं शकत नाहीं.

'सर्वनाम्नः स्मै', 'आमि सर्वनाम्नः' या सूत्रांमधील सर्वनाम शब्द अन्वर्थ समजण्यांत येईल. सर्वअर्थाचें जें नाम म्ह. वाचकशब्दस्वरूप तें सर्वनाम, या व्युत्पत्तीनें सर्वादि शब्दांना सर्वनाम हा शब्द लागू करावयाचा. तसल्या सर्वनाम नांवाच्या शब्दापुढील ङे प्रत्ययाचे स्थानीं 'स्मै' आदेश होतो. आणि तसल्या सर्वनाम नांवाच्या शब्दापुढील आम् प्रत्ययाला सुडागम होतो.

जर सर्वनाम शब्द अन्वर्थ समजण्यांत येत आहे तर सकल, कृत्स्न, जगत् या शब्दांचे ठिकाणींही सर्वनाम शब्द लागू करण्याची पाळी येईल. शिवाय ह्या सर्व, विश्व इत्यादि शब्दांपैकीं प्रत्येक शब्द वाक्यामध्यें त्या त्या विषयाला म्ह. त्या त्या विशेष पदार्थाला दाखवीत असतो. तेव्हां वाक्यामध्यें सर्ववगैरे शब्दांच्या बरोबर त्यात्या विशेष पदार्थाला दाखविणारा घट, पट वगैरे जो जो शब्द उच्चारला असेल तो तो शब्द त्या त्या ठिकाणीं आपल्या-

---

९. राज्ञः पुरुषः हें वाक्य आणि राजपुरुषः ही वृत्ति या दोन्ही ठिकाणीं राजा हा पुरुषाचें विशेषण आहे. फरक इतकाच की जसें वाक्यामध्यें राजन् शब्दाला आपला अर्थ दाखविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आहे तसें वृत्तीमध्यें नाहीं. वृत्तींमध्यें राजन् शब्द पुरुष या विशेष्याशीं संबद्ध अशाच आपल्या अर्थाला दाखवितो. तसें निष्क्रान्तः सर्वस्मात् हें वाक्य आणि निःसर्व ही वृत्ति या दोन्ही ठिकाणीं निष्क्रान्त या अर्थाचें सर्व विशेषण आहे. परंतु निःसर्व या वृत्तीमध्यें सर्व शब्द हा निष्क्रान्त या अर्थाशीं संबद्ध अशाच आपल्या अर्थाला दाखवीत असल्यामुळें एक प्रकाराचा विशेष अर्थ दाखविण्याकडेच त्याचें सामर्थ्य खर्ची पडतें. तेव्हां 'निःसर्व' यांतील सर्व शब्द या सर्वादिगणाच्या बाहेर पडतो. म्हणून जसें सर्वशब्द अंतीं असलेल्या परमसर्व याला सर्वनामकार्य होऊन परमसर्वस्मै वगैरे रूपें होतात, तशीं 'निःसर्वस्मै' इत्यादि होत नाहींत.

१०. कारण सर्वनामसंज्ञा कोणाला होते तें समजण्याला आतां कांहीं मार्ग नाहीं.

११. सर्वेषां घटानाम् या वाक्यामध्यें सर्व याचा घटावर अन्वय असल्यामुळें 'सर्व' हा शब्द 'सगळे घट' एवढ्या अर्थाला दाखवितो. घट शब्ददेखील त्या वाक्यामध्यें 'सगळे घट' याच अर्थाला दाखवितो.

पाठश्चैव विशेष्यते संज्ञा च । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् । सर्वादीनि च सर्वादीनि च सर्वादीनि । सर्वनामानि च सर्वनामानि च सर्वनामानि । सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि भवन्ति सर्वेषां यानि च नामानि तानि सर्वादीनि । संज्ञोपसर्जने च विशेषेऽवतिष्ठेते ॥ अथवा महतीयं संज्ञा क्रियते संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत । सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि भवन्ति सर्वेषां नामानीति चातः सर्वनामानि । संज्ञोपसर्जने च विशेषेऽवतिष्ठेते ॥

अथोभस्य सर्वनामत्वे कोऽर्थः ।

**उभस्य सर्वनामत्वेऽकजर्थः ॥७॥**

उभस्य सर्वनामत्वेऽकजर्थः पाठः क्रियते। उभकौ । किमुच्यतेऽकजर्थ इति न पुनरन्यान्यपि सर्वनामकार्याणि ।

**अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात् ॥८॥**

अन्येषां सर्वनामकार्याणामभावः । किं

---

जवळ असलेल्या सर्व वगैरे शब्दांसारखाच त्या त्या अर्थाला दाखविणारा होत असल्यामुळें त्या घट, पट वगैरे शब्दांना सर्वनामाला सांगितलेलें कार्य होऊं लागेल.

असें आहे तर 'सर्वादीनि' या प्रकृतसूत्रानें संज्ञा आणि उपसर्जन अशा सर्व वगैरे शब्दांना गणपाठांतून बाहेर काढणें आणि त्या सर्वादि शब्दांना सर्वनामसंज्ञा करणें दोन्ही गोष्टी केल्या जात आहेत.

पण एका सूत्रानें या दोन गोष्टी कशा बरें साध्य होतील ?

साध्य होतील असें म्हणतों.

त्या कशा ?

एकशेषनिर्देशात् म्ह.'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्राचा एकशेष करून उल्लेख केला आहे. तो असा-- सर्वादीनि च सर्वादीनि च सर्वादीनि; सर्वनामानि च सर्वनामानि च सर्वनामानि. अर्थात् मुळांत दोन सूत्रें असून एक उच्चारलें असें समजावें. तेव्हां सर्वादि शब्दस्वरूपें सर्वनामसंज्ञक होतात. आणि सर्व अर्थांचीं दर्शक जीं शब्दस्वरूपें तीं सर्वादिगणामध्यें प्रविष्ट होतात. या दोन्ही गोष्टी साधतात. आतां संज्ञा आणि वृत्तीमध्यें विशेषण झालेले सर्व वगैरे शब्द हे सर्व अर्थांचे दर्शक नसून विशेष अर्थांचेच दर्शक असतात. तेव्हां अर्थातच ते या गणांतून बाहेर पडतात.

अथवा, येथें सर्वनाम अशी मोठी संज्ञा केली आहे आणि संज्ञा म्हणून जी केली असते ती तर लहानांत लहान अशीच असावी लागते.

हें कशावरून ?

पुष्कळसे अर्थ एका अगदीं लहानशा शब्दाखालीं सांपडावेत या हेतूनें संज्ञा करावयाची असते. तेव्हां येथें महासंज्ञा करण्याचा कांहीं तरी उद्देश असला पाहिजे. तो असा की ती अन्वर्थ (आपल्या अर्थाला अनुसरलेली) संज्ञा समजली जावी. म्हणजे सर्वादि शब्दस्वरूपें सर्वनामसंज्ञक होतात. पण ज्या अर्थी तीं सर्वादि शब्दस्वरूपें सर्वांचीं वाचक आहेत त्या अर्थीं तीं सर्वनामसंज्ञा पावतात. आणि संज्ञा आणि वृत्तीमध्यें विशेषण झालेले सर्व वगैरे शब्द हे तर विशेष अर्थांचेच दर्शक असतात.

आतां 'उभ' या शब्दाला सर्वनामसंज्ञा करण्यांत काय फायदा ?

(वा.७) 'उभकौ' येथें उभ शब्दाला अकच् प्रत्यय (५।३।७१) व्हावा म्हणून सर्वनामसंज्ञेच्या गणामध्यें त्याचा पाठ केला आहे.

अकच् प्रत्यय व्हावा असें कां म्हटलें ? 'स्मै' वगैरे इतर सर्वनामकार्यांचा उल्लेख कां केला नाहीं ?

कारणम्। द्विवचनटाब्विषयत्वात्। उभशब्दोऽयं द्विवचनटाब्विषयोऽन्यानि च सर्वनामकार्याण्येकवचनबहुवचनेषूच्यन्ते॥ यदा पुनरयमुभशब्दो द्विवचनटाब्विषयः क इदानीमस्यान्यत्र भवति।

उभयोऽन्यत्र ॥९॥

उभयशब्दोऽस्यान्यत्र भवति। उभये देवमनुष्याः। उभयो मणिरिति॥ किं च स्याद्यद्यत्राकज्न स्यात्। कः प्रसज्येत। कश्चेदानीं काकचोर्विशेषः। उभशब्दोऽयं द्विवचनटाब्विषय इत्युक्तम्। तत्राकचि सत्यकचस्तन्मध्यपतितत्वाच्छक्यत एतद्वक्तुं द्विवचनपरोऽयामिति। के पुनः सति नायं द्विवचनपरः स्यात्। तत्र द्विवचनपरता वक्तव्या। यथैव तर्हि के सति नायं द्विवचनपर एवमाप्यपि सति नायं द्विवचनपरः स्यात्। तत्रापि द्विवचनपरता वक्तव्या। अवचनादापि तत्परविज्ञानम्। अन्तरेणापि वचनमापि द्विवचनपरोऽयं भविष्यति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। एकादेशे कृते द्विवचनपरोऽयमन्तादिवद्भावेन।

---

(वा. ८) अकचापेक्षां अन्य सर्वनामकार्यांचा उभशब्दाला अभाव आहे.

काय कारण?

उभशब्दाहून केवळ द्विवचन प्रत्यय होत आहे व स्त्रीलिंगामध्यें टाप् प्रत्यय होत आहे. आणि अकचाहून इतर 'स्मै' वगैरे सर्वनामकार्यें एकवचन किंवा बहुवचन पुढें असतांनाच सांगितलीं आहेत.

जर ह्या उभ शब्दाहून फक्त द्विवचन किंवा टाप् हेच प्रत्यय होतात तर ते प्रत्यय उभशब्दाहून केलेले ज्या ठिकाणीं दिसत नाहींत त्या ठिकाणीं या उभशब्दाचें काय होतें?

(वा. ९) त्या ठिकाणीं उभशब्दापासून उभय हा शब्द बनतो. जसें—उभये देवमनुष्याः, उभयो मणिः.

बरें आतां जर या उभशब्दाला अकच् प्रत्यय (५।३।७१) न होईल तर काय बिघडेल?

क प्रत्यय होईल.

पण कप्रत्यय झाला काय आणि अकच् प्रत्यय झाला काय त्यांत काय फरक आहे?

उभ शब्दाहून फक्त द्विवचन किंवा टाप् हेच प्रत्यय होतात. हे नसतील तेथें उभ शब्दाच्याऐवजीं उभय शब्द येतो असें सांगितलें. तेव्हां अकच् झाला असतां तन्मध्यपतितन्यायानें उभशब्दाच्या पुढें द्विवचन आहे असें म्हणणें शक्य होतें. आणि कप्रत्यय झाला तर उभशब्दाच्या पुढें द्विवचनप्रत्यय आहे असें म्हणतां येत नाहीं.[१२] तेव्हां तेथें द्विवचनप्रत्यय पुढें आहे असें समजण्याकरितां स्वतंत्र वचन करावें लागेल (नाहीं तर तेथें क प्रत्ययाच्या मागें उभय शब्द घालावा लागेल).

तर मग क प्रत्यय झाला असतां जसें या उभशब्दाच्या पुढें द्विवचनप्रत्यय आहे असें म्हणतां येत नाहीं तसें टाप् प्रत्यय झाला असतांही द्विवचनप्रत्यय पुढें आहे असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां तेथेंही द्विवचनप्रत्यय पुढें आहे असें समजण्याकरतां स्वतंत्र वचन करावें लागेल. नाहीं तर तेथेंही उभय शब्द घालावा लागेल.

टाप् प्रत्यय केला असतां स्वतंत्र वचनाखेरीजही उभशब्दाच्या पुढें द्विवचनप्रत्यय आहे असें म्हणतां येईल.

हें काय हो तुम्ही म्हणतां? असें म्हणू नका. मग सांगितल्यावांचून कसें बरें हें समजेल?

टाप् प्रत्यय करून एकादेश (६।१।१०१) केला असतां पूर्वान्तवद्भावानें उभा हा उभ शब्दच आहे असें समजण्यांत येत असल्यामुळें

---

१२. उभकौ असा जरी पुढें द्विवचनप्रत्यय आहे, तरी तो प्रत्यय उभशब्दाच्यापुढें आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण मध्यें कप्रत्ययानें व्यवधान येत आहे.

**अवचनादपि तत्परविज्ञानमिति चेत्केऽपि तुल्यम् ॥१०॥**

अवचनादपि तत्परविज्ञानमिति चेत्केऽप्यन्तरेण वचनं द्विवचनपरो भविष्यति। कथम्। स्वार्थिकाः प्रत्ययाः प्रकृतितोऽविशिष्टा भवन्तीति प्रकृतिग्रहणेन स्वार्थिकानामपि ग्रहणं भवति॥

अथ भवतः सर्वनामत्वे कानि प्रयोजनानि।

**भवतोऽकच्छेषात्वानि ॥११॥**

भवतोऽकच्छेषात्वानि प्रयोजनानि। अकच्। भवकान्। शेषः। स च भवांश्च भवन्तौ। आत्वम्। भवादृगिति॥ किं पुनरिदं परिगणनमाहोस्विदुदाहरणमात्रम्। उदाहरणमात्रमित्याह। तृतीयादयोऽपि हीष्यन्ते। सर्वनाम्नस्तृतीया च [२.३.२७] भवता हेतुना। भवतो हेतोरिति॥

**[1]विभाषा दिक्समासे बहुव्रीहौ ॥१.१.२८॥**

दिग्ग्रहणं किमर्थम्। न बहुव्रीहौ [१.१.२९] इति प्रतिषेधं वक्ष्यति। तत्र न ज्ञायते क्व विभाषा क्व प्रतिषेध इति। दिग्ग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति। दिगुपदिष्टे विभाषान्यत्र प्रतिषेधः॥ अथ समासग्रहणं

---

उभशब्दाच्यापुढें द्विवचनप्रत्यय आहे असें म्हणतां येतें.

(वा. १०) टाप् प्रत्यय केला असतां स्वतंत्र वचनाखेरीजही उभशब्दाच्या पुढें द्विवचनप्रत्यय आहे असें समजण्यांत येतें तर क प्रत्यय केला असतांही वचनाखेरीजच उभशब्दाच्या पुढें द्विवचनप्रत्यय आहे असें समजण्यांत येईल.

तें कसें?

स्वार्थी झालेले प्रत्यय आपल्या प्रकृतीच्या अर्थापेक्षां निराळ्या अर्थाला दाखवीत नाहींत (म्ह. प्रकृतीच्या अर्थालाच दाखवितात), म्हणून प्रकृतिबोधक शब्दानें स्वार्थी कप्रत्ययाचेंही ग्रहण[13] होतें.

आतां भवत् या शब्दाला सर्वनामसंज्ञा केल्याचीं फलें कोणतीं?

(वा. ११) भवत् शब्दाला अकच्, एकशेष, आणि आत्व होणें, ही सर्वनामसंज्ञा सांगितल्याचीं फळें होत. जसें—भवकान्. येथें अकच् (५।३।७१) झाल्यामुळें हें रूप साधतें. एकशेषाचें उदाहरण स च भवांश्च भवन्तौ. येथें 'त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' (१।२।७२) यानें भवच्छब्दाचा एकशेष झाला आहे. आत्वाचें उदाहरण—भवादृक्. येथें 'आसर्वनाम्नः (६।३।९१) यानें आत्व झालें आहे.

पण काय हें परिगणन आहे? म्हणजे मोजकीं तीनच कार्यें होतात, किंवा उदाहरणाची दिशा दाखविली आहे?

उदाहरणाची दिशा दाखविली आहे असें म्हणतों. कारण सर्वनाम्नस्तृतीया च' (२।३।२७) यानें तृतीया वगैरे विभक्ति झाल्याचेंही दृष्टीस पडतें; जसें—भवता हेतुना, भवतो हेतोः वगैरे.

(सू. २८) येथें जो दिक् शब्द घातला आहे तो कशासाठीं?

'न बहुव्रीहौ' या पुढील सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध सांगणार आहे. तेव्हां हा विकल्प कुठें आणि तो निषेध कुठें या विषयाची विभागणी समजत नाहीं. आणि दिक्शब्द घातला तर हा दोष येत नाहीं. दिक्-

---

१३. द्विवचनशब्दानें दोन या संख्येला दाखविणारा प्रत्ययच घ्यावयाचा असें नाहीं, तर त्या संख्येला दाखविणारा शब्दही घ्यावयाचा. तेव्हां कप्रत्ययाची प्रकृति जो उभशब्द त्याला द्विवचन असें म्हणतां येतें; तेव्हां त्याच्याच अर्थी झालेल्या कप्रत्ययालाही द्विवचन असें म्हणतां येतें. म्हणून 'तेथें उभयशब्द घालावा लागेल' हा दोष येत नाहीं. तेव्हां क प्रत्यय झाला तरी दोष येत नाहीं, म्हणून उभयशब्दाचा या सर्वनामगणामध्यें पाठ केला नाहीं तरी हरकत नाहीं असें सिद्ध झालें.

१. 'दिङ्नामा०' (२।२।२६) या सूत्रानें दिशावाचक शब्दांचा बहुव्रीहि समास केला असतां तेथें सर्वनामसंज्ञा विकल्पानें होते.

**किमर्थम् । समास एव यो बहुव्रीहिस्तत्र यथा स्याद्बहुव्रीहिवद्भावेन यो बहुव्रीहिस्तत्र मा भूदिति । दक्षिणदक्षिणस्यै देहीति ॥ अथ बहुव्रीहिग्रहणं किमर्थम् । द्वन्द्वे मा भूत् । दक्षिणोत्तरपूर्वाणामिति । नैतदस्ति प्रयोजनम् । द्वन्द्वे च [१.१.३१] इति प्रतिषेधो भविष्यति । नाप्राप्ते प्रतिषेध इयं विभाषारभ्यते सा यथैव न बहुव्रीहावित्येतं प्रतिषेधं बाधत एवं द्वन्द्वे चेत्येतमपि बाधेत । न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति । न चाप्राप्ते न बहुव्रीहावित्येतस्मिन्प्रतिषेध इयं विभाषारभ्यते द्वन्द्वे चेत्येतस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च ॥ अथवा पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमियं विभाषा न बहुव्रीहावित्येतं प्रतिषेधं बाधिष्यते द्वन्द्वे चेत्येतं प्रतिषेधं न बाधिष्यते ॥ अथवेदं तावदयं प्रष्टव्यः । इह कस्मान्न भवति । या पूर्वा सोत्तरास्यो-**

---

शब्द उच्चारून सांगितलेल्या बहुव्रीहीचे ठिकाणीं विकल्प, आणि इतर बहुव्रीहींमध्यें निषेध, हें स्पष्ट कळतें.

आतां समासे हा जो शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

खऱ्या बहुव्रीहिसमासामध्यें सर्वनामसंज्ञेचा विकल्प व्हावा आणि अतिदेशानें बहुव्रीहीसारखा समजला जाणारा जो गौण बहुव्रीहि तेथें न व्हावा. जसें—दक्षिणदक्षिणस्यै येथें 'आबाधे च' (८।१।१०) यानें द्वित्व केलें आहे, आणि बहुव्रीहीसारखें समजलें जात आहे.

आतां बहुव्रीहौ हा जो शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' या द्वंदसमासामध्यें हा सर्वनामसंज्ञेचा विकल्प न व्हावा म्हणून घातला आहे.

बहुव्रीहौ हा शब्द घालण्याचा उपयोग येत नाहीं. कारण येथें 'द्वन्द्वे च' (१।१।३१) यानें सर्वनामसंज्ञेचा निषेध होईल.

सर्वनामसंज्ञेचा निषेध अवश्यप्राप्त झाला आहे म्हणून तेथें मुद्दाम हा विकल्प आरंभिला आहे. तेव्हां तो जसा 'न बहुव्रीहौ' (१।१।२९) या निषेधाचा बाध करतो, तसा 'द्वन्द्वे च' (१।१।३१) हा निषेधाचा बाध करील.

पण 'द्वन्द्वे च'या निषेधाचा बाध करणार नाहीं.

काय कारण ?

ज्या शास्त्राची सर्वत्र प्राप्ति असते त्याचाच बाध होतो. बहुव्रीहीमध्यें 'न बहुव्रीहौ' या निषेधाची प्राप्ति नसतां तेथें हा विकल्प प्राप्त होतो, असें उदाहरण एकही नाहीं. आणि द्वंद्वामध्यें हा विकल्प ज्या उदाहरणांत होणार त्यांपैकीं कांहीं ठिकाणीं 'द्वन्द्वे च'[२] याची प्राप्ति येते आणि कहीं ठिकाणीं येत नाहीं[३]. म्हणून हा विकल्प 'द्वन्द्वे च' याचा बाधक होत नाहीं. उलट 'द्वन्द्वे च' यानेंच परत्वास्तव या विकल्पाचा बाध केला जातो.

अथवा 'पूर्वी पठित असलेले अपवाद कोणाचा तरी बाध करणें झाल्यास आपल्या शेजारीं असलेल्या विधींचाच बाध करतात, आणि त्याच्या पलीकडील विधींचा बाध करीत नाहींत' या परिभाषेनें हा विकल्प (१।१।२८) 'न बहुव्रीहौ' (१।१।३०) या निषेधाचाच बाध करील, आणि 'द्वन्द्वे च'[३] (१।१३२) या निषेधाचा बाध करणार नाहीं.

अथवा, यैला असा प्रश्न विचारावा की— 'जी पूर्वदिशा (तीच आहे उत्तर दिशा) ज्या

---

२. जस् प्रत्यय केला असतां तेथें 'द्वंद्वे च' याची प्राप्ति येत नाहीं. कारण तेथें विभाषा जसि (१।१।३२) यानें द्वंद्वे च याचा बाध होत आहे.

३. एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें 'बहुव्रीहौ' असें म्हणावयास नको असें सिद्ध झालें.

४. प्रकृतसूत्रामध्यें 'बहुव्रीहौ' असें म्हटलें पाहिजे असें म्हणणाऱ्याला.

न्मुग्धस्य सोऽयं पूर्वोत्तर उन्मुग्धः । तस्मै पूर्वोत्तराय देहीति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति । यद्येवं नार्थो बहुव्रीहिग्रहणेन । द्वन्द्वे कस्मान्न भवति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ उत्तरार्थं तर्हि बहुव्रीहिग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते तत्रैव न बहुव्रीहाविति । द्वितीयं कर्तव्यम् । बहुव्रीहिरेव यो बहुव्रीहिस्तत्र यथा स्याद्बहुव्रीहिवद्भावेन यो बहुव्रीहिस्तत्र मा भूत् । एकैकस्मै देहि । एतदपि नास्ति प्रयोजनम् । समास इति वर्तते तेन बहुव्रीहिं विशेषयिष्यामः । समासो यो बहुव्रीहिरिति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अवयवभूतस्यापि बहुव्रीहेः प्रतिषेधो यथा स्यात् । इह मा भूत् । वस्त्रमन्तरमेषां त इमे वस्त्रान्तराः । वसनमन्तरमेषां त इमे वसनान्तराः । वस्त्रान्तराश्च वसनान्तराश्च वस्त्रान्तरवसनान्तराः

---

मूर्खांची' अशा अर्थाच्या पूर्वोत्तर शब्दाहून चतुर्थीचें एकवचन केलें असतां पूर्वोत्तराय देहि येथें हा विकल्प कां बरें होत नाहीं ? 'लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या उभयतांचें ग्रहण संभवत असतां तेथें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें' या परिभाषेनें दिक् शब्द उच्चारून सांगितलेल्याच बहुव्रीहिसमासामध्यें हा विकल्प होतो. वरील उदाहरणांत 'अनेकमन्य०' (२।२।२४) यानें बहुव्रीहि समास केला आहे. त्यामध्यें दिक्शब्दाचा उल्लेख नाहीं. म्हणून तेथें हा विकल्प प्रवृत्त होत नाहीं.

असें आहे तर प्रकृतसूत्रामध्यें 'बहुव्रीहौ' हा शब्द घालण्यांत कांहींच फायदा दिसत नाहीं. कारण द्वंद्वसमासामध्यें हा विकल्प कां होत नाहीं असें कोणीं विचारलें तर 'लक्षणप्रतिपदोक्त०' या परिभाषेनें प्रतिपदोक्तच दिक्समास घ्यावयाचा, म्हणून होत नाहीं, असें सांगतां येईल.

तर मग उत्तरसूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरतां बहुव्रीहि शब्द घातला पाहिजे.

त्याकरितांहि नको. कारण उत्तरसूत्रामध्यें म्हणजे 'न बहुव्रीहौ' येथें बहुव्रीहौ असें म्हटलेंच आहे.

पण 'न बहुव्रीहौ' येथें आणखी एक दुसरा बहुव्रीहि शब्द पाहिजे आहे त्यासाठीं येथें बहुव्रीहौ असें म्हटलें पाहिजे; कारण मुख्य जो बहुव्रीहि तेथेंच तो निषेध व्हावा आणि बहुव्रीहीसारखा समजला जाणारा जो गौण बहुव्रीहि तेथें न व्हावा. जसें—एकैकस्मै देहि. येथें 'एकं बहुव्रीहिवत्' (८।१।९) यानें द्वित्व केलें आहे आणि तें बहुव्रीहीसारखें समजलें जात आहे.

हेंहीं प्रयोजन नाहीं. कारण येथून 'समासे' या पदाची तेथें अनुवृत्ति करावी आणि 'समासे' हें बहुव्रीहीला विशेषण करावें म्हणजे मुख्य समास असा जो बहुव्रीहि तेथेंच तो निषेध होईल.

तर मग तेथें दुसऱ्या बहुव्रीहिशब्दाचा असा उपयोग समजावा की अवयवभूत अशाही बहुव्रीहीला सर्वनामसंज्ञेचा त्या सूत्रानें निषेध व्हावा. म्हणजे वस्त्रं अन्तरं येषां ते वस्त्रान्तराः, वसनं अन्तरं येषां ते वसनान्तराः वस्त्रान्तराश्च वसनान्तराश्च वस्त्रान्तरवसनान्तराः. येथें द्वंद्व समासामध्यें प्रविष्ट झालेल्या बहुव्रीहीला सर्वनामसंज्ञा पाहिजे. नाहीं तर प्रधानाप्रधानन्यायानें अवयवभूत बहुव्रीहीला सर्वनामसंज्ञेचा निषेध होणार नाहीं. दुसऱ्या बहुव्रीहिशब्दाच्या अनुवृत्तीच्या जोरावर अप्रधान

---

५. मागें पहा (पृ १८२ टीप ४ पहा).

६. दुसऱ्या समासांत प्रविष्ट झालेला.

७. प्रधान आणि अप्रधान या दोहोंना एखादें कार्य प्राप्त झालें तर तें प्रधानालाच करावें अप्रधानाला करूं नये. वस्त्रान्तरवसनान्तराः या द्वंद्वसमासामध्यें बहुव्रीहि प्रविष्ट झाल्यामुळें बहुव्रीहिसमास होऊन सिद्ध झालेल्या वस्त्रान्तर आणि वसनान्तर या शब्दांना आपला अर्थ दाखविण्याचें पूर्ण स्वातन्त्र्य राहिलें नाहीं. (१।१।२७ टीप ९ पाहा.) तेव्हां त्याला 'न बहुव्रीहौ यानें सर्वनामसंज्ञेचा निषेध होणार नाहीं.

## न बहुव्रीहौ ॥१.१.२९॥

किमुदाहरणम् । प्रियविश्वाय । नैतदस्ति प्रयोजनम् । सर्वाद्यन्तस्य बहुव्रीहेः प्रतिषेधेन भवितव्यम् । वक्ष्यति चैतत् । बहुव्रीहौ सर्वनामसंख्ययोरुपसंख्यानमिति । तत्र विश्वप्रियायेति भवितव्यम् ॥ इदं तर्हि । द्व्यन्याय त्र्यन्याय । ननु चात्रापि सर्वनाम्न एव पूर्वनिपातेन भवितव्यम् । नैष दोषः । वक्ष्यत्येतत् । संख्यासर्वनाम्नोर्यो बहुव्रीहिः परत्वात्तत्र संख्यायाः पूर्वनिपातो भवतीति ॥ इदं चाप्युदाहरणम् । प्रियविश्वाय । ननु चोक्तं विश्वप्रियायेति भवितव्यमिति । वक्ष्यत्येतत् । वा प्रियस्येति ॥ न खल्वप्यवश्यं सर्वाद्यन्तस्यैव बहुव्रीहेः प्रतिषेधेन भवितव्यम् । किं तर्हि । असर्वाद्यन्तस्यापि भवितव्यम् । किं प्रयोजनम् । अकज्मा भूदिति । किं च स्याद्यद्यत्राकच्स्यात् । को न स्यात् । कश्चेदानीं काकचोर्विशेषः । व्यञ्जनान्तेषु विशेषः । अहकं पितास्य मकत्पितृकः त्वकं पितास्य त्वकत्पितृक इति

---

अशाही बहुव्रीहीचें तेथें ग्रहण होतें.

(सू. २९) याचें उदाहरण काय ?

प्रियविश्वाय हें उदाहरण होय. (येथें सर्वनामसंज्ञेचा निषेध झाल्यामुळें स्मै आदेश (७।१।१४) झाला नाहीं.)

हें उदाहरण बरोबर दिसत नाहीं. कारण सर्व वगैरे शब्द शेवटीं असलेला असा बहुव्रीहिच होत नाहीं. वार्तिककारानीं पुढें असें सांगितलें आहे कीं 'बहुव्रीहिसमासामध्यें सर्वनामसंज्ञक आणि संख्यावाचक यांना पूर्वनिपात करावा' (२।२।३५ वार्ति. १). तेव्हां विश्वप्रियाय असा बहुव्रीहिसमास व्हावा.

तर मग प्रकृतसूत्राचें द्व्यन्याय, त्र्यन्याय हें उदाहरण समजावें.

पण, द्व्यन्याय, त्र्यन्याय, येथेंही 'अन्य' या सर्वनामशब्दालाच पूर्वनिपात झाला पाहिजे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'संख्यावाचकशब्द आणि सर्वनामसंज्ञक शब्द यांच्या बहुव्रीहिसमासामध्यें परत्वास्तव संख्याशब्दास पूर्वनिपात होतो' असें तेथेंच पुढें सांगावयाचें आहे.

पूर्वीं दिलेलें 'प्रियविश्वाय' हेंही उदाहरण बरोबरच आहे.

पण, विश्वप्रियाय असें रूप व्हावें असें म्हटलें आहे ना ?

बहुव्रीहीमध्यें 'प्रियशब्दाला पूर्वनिपात विकल्पानें होतो असें पुढें (२।२।३५वार्ति.२) सांगावयाचें आहे.

शिवाय, प्रकृतसूत्रानें सर्व वगैरे शब्द शेवटीं असलेल्या अशाच केवळ बहुव्रीहीमध्यें सर्वनामसंज्ञेचा निषेध व्हावा असें नाहीं, तर सर्व वगैरे शब्द शेवटीं नसले तरीही त्यांना बहुव्रीहीमध्यें सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो.

त्याचा काय उपयोग ?

अकच् प्रत्यय न व्हावा हा त्याचा उपयोग होय.

तेथें अकच् झाला तर काय बिघडेल ?

क प्रत्यय होणार नाहीं.

तेथें क प्रत्यय झाला काय आणि अकच् प्रत्यय झाला काय त्यांत काय फरक होणार आहे ?

व्यञ्जनान्त अशा शब्दामध्यें फरक होतो. जसें—बहुव्रीहीमध्यें युष्मद्, अस्मद् या शब्दांना अकच् झाला तर त्वकं पिता यस्य त्वकत्पितृकः, अहकं पिता यस्य मकत्पितृकः असें प्राप्त होतें. आणि त्वत्कपितृकः, मत्कपितृकः असें तर इष्ट आहे.

त्वत्कपितृकः वगैरे उदाहरणांमध्यें तुला

---

१. ज्या शब्दांचा बहुव्रीहि समास कर्तव्य असेल त्यांना पूर्वींपासूनच सर्वनामसंज्ञा होत नाहीं.

प्राप्नोति । मत्कपितृकः त्वत्कपितृक इति चेष्यते । कथं पुनरिच्छतापि भवता बहिरङ्गेण प्रतिषेधेनान्तरङ्गो विधिः शक्यो बाधितुम् । अन्तरङ्गानपि विधीन्बहिरङ्गो विधिर्बाधते गोमत्प्रिय इति यथा । क्रियते तत्र यत्नः प्रत्ययोत्तरपदयोश्च [७.२.९८] इति । ननु चेहापि क्रियते न बहुव्रीहाविति । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । प्रियविश्वाय । उपसर्जनप्रतिषेधेनाप्येतत्सिद्धम् ॥ अयं खल्वपि बहुव्रीहिरस्त्येव प्राथमकल्पिको यस्मिन्नैकपद्यमैकस्वर्यमेकविभक्तिकत्वं च । अस्ति तादर्थ्यात्ताच्छब्द्यं बहुव्रीह्यर्थानि पदानि बहुव्रीहिरिति । तद्यत्तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तस्येदं ग्रहणम् ॥ गो-

---

सर्वनामसंज्ञेचा निषेध पाहिजे आहे खरा, पण बहुव्रीहिसमासाच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या ह्या बहिरंगनिषेधानें अंतरंगसंज्ञेचा बाध करणें हें कसें बरें शक्य होईल ?

अंतरंग अशाही विधींचा बहिरंगविधि बाधक होतो. जसें—गोमत्प्रियः येथें अंतरंग हल्ङ्याब्भ्यादिलोपाचा (६।१।६८) बहिरंग लुकानें (२।४।७१) बाध केला आहे. तसें येथेंही बहिरंगनिषेधानें अंतरंगसंज्ञेचा बाध होईल.

गोमत्प्रियः येथें बहिरंगानें अंतरंगाचाही बाध होण्याविषयीं 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' (७।२।९८) येथें उत्तरपद हा शब्द घालून यत्न करून ठेवला आहे.

तसा येथेंही बहिरंगनिषेधानें अंतरंगसंज्ञेचा बाध होण्याकरितांच 'न बहुव्रीहौ' असा यत्न केला आहे.

पण 'न बहुव्रीहौ' हें वचन करण्याचें दुसरें प्रयोजन आहे ना?

तें कोणतें ?

'प्रियविश्वाय' हें.

'संज्ञोपसर्जनप्रतिषेधः' (१।१।२७ वार्ति.२) या उपसर्जननिषेधानेंही वरील उदाहरणांचा निर्वाह होत आहे.

शिवाय बहुव्रीहि म्हटल्याबरोबर ज्याची प्रथमतः कल्पना मनांत येते तो बहुव्रीहि आहेच की ज्यामध्यें अनेक पदांचें मिळून एक सामासिक पद तयार होतें, त्याला एकच स्वर होतो आणि विभक्तिप्रत्ययही त्याहून एकच होतो. हा लोकप्रसिद्ध मुख्य बहुव्रीहि होय. आतां एखादी वस्तु तयार करण्याकरतां जी एक विशेष प्रकारची अवस्था मांडण्यांत येते त्या अवस्थेलाही त्या वस्तूला दाखविणारा शब्द लावण्याची लोकामध्यें वहिवाट आहे. त्या न्यायानें बहुव्रीहीकरतां घेतलेलीं जीं प्रत्येकाला विभक्तिप्रत्यय लावलेलीं अनेक पदें त्यांना बहुव्रीहि असें म्हणतां येतें. तेव्हां असा जो बहुव्रीहीकरतां कल्पिलेल्या वाक्याला लागणारा बहुव्रीहिशब्द तो ह्या प्रकृतसूत्रांमध्यें सूत्रकारांनीं घातला आहे.

(तेव्हां 'बहुव्रीहिसमास बनविण्यासाठीं गृहीत धरलेल्या अलौकिकप्रक्रियावाक्यामध्यें सर्व-वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं' असा प्रकृतसूत्राचा अर्थ ठरतो.)

गोर्नदीय तर असें म्हणतात की 'अकच्' आणि 'स्वाङ्गशिटाम्' (फिट्. सू. २९) ह्यानें

---

२. बहुव्रीहिसमास केल्यानंतर 'न बहुव्रीहौ' या निषेधाची प्राप्ति येत असल्यामुळें हा निषेध बहिरंग आहे, आणि सर्वनामसंज्ञा ही बहुव्रीहि समास करण्याच्या पूर्वींच प्राप्त होत असल्यामुळें ती अंतरंग आहे.

३. हें ज्ञापक 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' (७।२।९८) या सूत्रावर भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे.

४. आतां 'न बहुव्रीहौ' हा निषेध बहिरंग नाहीं, कारण बहुव्रीहिसमास करण्याच्या पूर्वीं जेव्हां सर्वनामसंज्ञा प्राप्त होते त्याच वेळीं हा निषेधही प्राप्त होतो, हें येथून भाष्यकार सिद्ध करीत आहेत.

५. या अनेक पदांनाच 'अलौकिक-प्रक्रिया-वाक्य' असें म्हणतात.

६. 'भाष्यकार पतंजलि हें गोनर्ददेशामध्यें एका ऋषीच्या अजलींतून संध्या करतांना प्रकट होऊन

नर्दीय आह ।

अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ ।

त्वकत्पितृकः मकत्पितृक इत्येव भवितव्यमिति ॥

**प्रतिषेधे भूतपूर्वस्योपसंख्यानम् ॥१॥**

प्रतिषेधे भूतपूर्वस्योपसंख्यानं कर्तव्यम् । आढ्यो भूतपूर्व आढ्यपूर्वः । आढ्यपूर्वाय देहीति ॥

**प्रतिषेधे भूतपूर्वस्योपसंख्यानानर्थक्यं पूर्वादीनां व्यवस्थायामिति वचनात् ॥२॥**

प्रतिषेधे भूतपूर्वस्योपसंख्यानमनर्थकम् । किं कारणम् । पूर्वादीनां व्यवस्थायामिति वचनात् । पूर्वादीनां व्यवस्थायां सर्वनामसंज्ञोच्यते न चात्र व्यवस्था गम्यते ॥

**तृतीयासमासे ॥१.१.३०॥**

समास इति वर्तमाने पुनः समासग्रहणं किमर्थम् । अयं तृतीयासमासोऽस्त्येव प्राथमकल्पिको यस्मिन्नैकपद्यमैकस्वर्यमेकविभक्तिकत्वं च । अस्ति तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तृतीयासमासार्थानि पदानि

---

सर्वनाम शब्दाला सांगितलेला स्वर, हे उभयता, समासांमध्यें कोणत्याहि भागांत असलेल्या सर्व वगैरे शब्दांना निःसंशय करावेत. तेव्हां त्वकत्पितृकः, मकत्पितृकः अशींच उदाहरणें इष्ट आहेत. अर्थात हें सूत्र करण्याची मुळींच जरूर नाहीं.

(वा.१) ह्या सर्वनामसंज्ञेच्या प्रतिषेधप्रकरणामध्यें भूतपूर्व म्ह. पूर्वी असलेला या अर्थाचा जो पूर्व शब्द त्याला सर्वनामसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें. जसें—आढ्यो भूतपूर्व आढ्यपूर्वः, तस्मै आढ्यपूर्वाय देहि.

(वा.२) ह्या सर्वनामसंज्ञेच्या प्रतिषेध प्रकरणामध्यें भूतपूर्व या अर्थाच्या पूर्व शब्दाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं असें वचन करणें निरर्थक आहे.

काय कारण ?

व्यवस्था असतांना पूर्व वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा सांगितली आहे. आणि प्रकृत उदाहरणामध्यें तर व्यवस्था प्रतीत होत नाहीं.

(सू. ३०) येथें पूर्वसूत्रांतून (१।१।२८) समास शब्दाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें 'समासे' हा शब्द जो घातला आहे तो कशासाठीं ?

हा तृतीयासमास असाच एक आहे की तृतीयासमास असें म्हटल्याबरोबर प्रथमतः ज्याची कल्पना मनांत येते आणि ज्यामध्यें अनेकपदांचें मिळून एक सामासिक पद तयार होतें. त्याला एकच स्वर होतो आणि विभक्तिप्रत्ययही एकच लागतो. तो लोकप्रसिद्ध मुख्य तृतीयासमास होय. आतां एखाद्या वस्तूकरतां जी एक विशेष प्रकारची अवस्था मांडण्यांत येते त्या अवस्थेलाही त्या वस्तूला दाख-

---

खाली पडलें' असें ऐतिह्य आहे .अंजलेः पतितः अशा, अर्थानें 'पतंजलिः' हें नांव त्यांचें अन्वर्थच आहे. गोनर्ददेशामध्यें प्रकट झाल्यामुळें त्यांना गोनर्दीय असें म्हणतात. भाष्यकार हे स्वतःच्या आपल्या मताचा उल्लेख गोनर्दीयशब्दानें करतात.

७. आढ्यपूर्व शब्दामध्यें पूर्व हे आढ्य याचें विशेषण आहे. हें विशेषण वृत्तीमधील विशेष्याचें असल्यामुळें पूर्वशब्दामध्यें आपला अर्थ दाखविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य नाहीं. येथें पूर्व हा शब्द विशेष्याशीं संबद्ध अशाच आपल्या अर्थाला दाखवील (१।१।२७ टीप ९ पहा.) तेव्हां जसा परावलंबी मनुष्य आपल्या अपेक्षा नियमानें दूर करूं शकत नाहीं तशीच वृत्तीमधील विशेषणाची गति आहे. तेव्हां इतर ठिकाणीं त्या अर्थाला नियमानें अवधीची अपेक्षा आहे तरी तो अर्थ स्वतः वृत्तीमधील शब्दापासून उपस्थित होऊन त्याच वृत्तीमधील विशेष्याचें विशेषण झाल्यास अवधीच्या अपेक्षेचा नियम राहत नाहीं.

१. तृतीयासमासामध्यें सर्व वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं.

तृतीयासमास इति । तद्यत्तादर्थ्यात्ता-च्छब्द्यं तस्येदं ग्रहणम् ॥ अथवा समास इति वर्तमाने पुनः समासग्रहणस्यैतत्प्रयोजनं योगाङ्गं यथोपजायेत । सति योगाङ्गे योगविभागः करिष्यते । तृतीया । तृतीयासमासे सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि न भवन्ति । मासपूर्वाय देहि । संवत्सरपूर्वाय देहि । ततोऽसमासे । असमासे च तृतीयायाः सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि न भवन्ति । मासेन पूर्वाय देहि ॥

[द्वन्द्वे[†] च ॥१.१.३१॥ ]

विभाषा[१] जसि ॥१.१.३२॥

जसः कार्यं प्रति विभाषाकज्झि न भवति ॥

*[प्रथमचरमतयाल्पार्धकतिपयनेमाश्च ॥१.१.३३॥]

पूर्वपरावरदक्षिणोत्तरापराधराणि व्यवस्थायामसंज्ञायाम् ॥१.१.३४॥

अवरादीनां च पुनः सूत्रपाठे ग्रहणा-

---

विणारा शब्द लावण्याची लोकामध्यें वहिवाट आहे त्या न्यायानें तृतीयासमास सोडविण्याकरतां जीं वाक्यामध्यें अनेक पदें निरनिराळी दाखतिलीं जातात त्या वाक्यालाही तृतीयासमास असें म्हणतां येतें. तेव्हां असा जो तृतीयासमास सोडविण्याकरतां कल्पिलेल्या वाक्याला लागणारा तृतीयासमास हा शब्द त्याचेंही येथें ग्रहण व्हावें हा समासशब्द घालण्याचा उपयोग होय.

त्यामुळें मासेन पूर्वाय येथेंही सर्वनामसंज्ञेचा निषेध सिद्ध होतो.

अथवा समासे या शब्दाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें 'समासे' हा शब्द घातला त्याचा उपयोग हा आहे की येथें समास हा सूत्राचा अवयव समजला जावा. आणि असा अवयव समजला म्हणजे योगविभाग करण्यांत येईल तो असा—'तृतीया' एवढेंच एक सूत्र होय. तेथें समासग्रहणाची अनुवृत्ति आहे. तेव्हां तृतीयासमासामध्यें सर्व वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं असा त्याचा अर्थ होय. उदा० मासपूर्वाय, संवत्सरपूर्वाय देहि. त्याचें पुढें 'असमासे' असें दुसरें सूत्र होय. तृतीयासमासभिन्न ठिकाणीं, अर्थात् तृतीयासमासासारख्या वाक्यामध्यें, सर्व वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं, असा त्याचा अर्थ होय. उदा० मासेन पूर्वाय, संवत्सरेण पूर्वाय देहि.

(सू. ३२) जस् प्रत्ययाचे स्थानीं शी आदेश (७।१।१७) करण्यापुरतीच ही एकदां सर्वनामसंज्ञा सांगितली आहे. इतर कार्य कर्तव्य असतांना 'द्वंद्वे च' हा निषेध कायम असतो. कारण द्वंद्वामध्यें मुळींच अकच् प्रत्यय (५।३।७१) होत नसतो.

(सू. ३४) ह्या पूर्वपर वगैरे शब्दांचा आदि

---

२. जसें 'अब्राह्मणाला आणावा' असें म्हटलें असतां 'ब्राह्मणमित्राला आणावा' इतकाच त्याचा अर्थ होतो. पण तेथें ब्राह्मणमित्र असा ब्राह्मणासारखा दुसरा कुणीतरी मनुष्यच आणिला जातो तसें येथें 'तृतीयासमासभिन्नस्थलीं' या म्हणण्यानें तृतीयासमासासारखें त्याचा अर्थ दाखविणारें वाक्यच घेतलें जातें.

† द्वंद्वसमासामध्यें सर्व वगैरे शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं.

१ द्वंद्वसमासामध्यें सर्व वगैरे शब्दांना जस् प्रत्यय असतांना सर्वनामसंज्ञा विकल्पानें होते.

* प्रथम, चरम, तयप्रत्ययान्त, अल्प, अर्ध, कतिपय आणि नेम ह्या शब्दांना जस् प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें सर्वनामसंज्ञा होते.

१. ज्या अर्थाला नियमाने अवधीची अपेक्षा लागते अशा अर्थीं उपयोगांत आणलेले आणि जे कोणाचीही संज्ञा नव्हेत अशा पूर्व, पर, अवर, उत्तर, अपर, आणि अधर या शब्दांना जस् प्रत्यय पुढें असतांना सर्वनामसंज्ञा विकल्पानें होते.

नर्थक्यं गणे पठितत्वात् ॥१॥

अवरादीनां च पुनः सूत्रपाठे ग्रहणमनर्थकम्। किं कारणम्। गणे पठितत्वात्। गणे ह्येतानि पठ्यन्ते। कथं पुनर्ज्ञायते स पूर्वः पाठोऽयं पुनः पाठ इति। तानि हि पूर्वादीनीमान्यवरादीनि। इमान्यपि पूर्वादीनि। एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति स पूर्वः पाठोऽयं पुनःपाठ इति यदयं पूर्वादिभ्यो नवभ्यो वा [७.१.१६] इति नवग्रहणं करोति। नवैव हि पूर्वादीनि॥ इदं तर्हि प्रयोजनं व्यवस्थायामसंज्ञायामिति वक्ष्यामीति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। एवंविशिष्टान्येवैतानि गणे पठ्यन्ते॥ इदं तर्हि

---

म्ह. प्राथमिक शब्द हा अवर म्ह. पूर्वकल्पित आहे. अशा ह्या शब्दांचा पुनः सूत्रामध्यें येथें जो पाठ केला तो निरर्थक केला आहे असें दिसतें.

काय कारण ?

सर्वादिगणामध्यें या शब्दांचा अशाच क्रमानें पाठ केला आहे म्हणून[2].

पण, गणपाठ हा पूर्वींचा आणि सूत्रपाठ मागूनचा, हें कशावरून समजलें जात आहे.

सर्व वगैरे शब्दांचा गणपाठांत पूर्वी उपक्रम केला आहे आणि सूत्रपाठांत अलीकडे म्ह. त्याच्या मागून उपक्रम केला आहे[3]. सूत्रपाठांत देखील त्या शब्दांचा उपक्रम गणपाठापेक्षां पूर्वी केला आहे असें म्हणतां येतें[4].

असें आहे तर गणपाठ हा पूर्वींचा, अष्टाध्यायीपाठ मागूनचा, असें आचार्यांचा व्यवहारच सुचवितो. ज्यापेक्षां हा आचार्य 'पूर्वादिभ्यो नवभ्यो वा' (७।१।१६) येथें अधिकांचे व्यावृत्तीकरतां 'नवभ्यः' हा शब्द घालीत आहे. पूर्व वगैरे शब्द अष्टाध्यायीमध्यें नऊच आहेत. तेव्हां ज्यांपेक्षां 'नवभ्यः' हा शब्द घालतो त्यापेक्षा सर्वादिगणपाठ पूर्वींचा आहे असें अनुमान निघतें, म्हणूनच अधिकव्यावृत्तीसाठीं घातलेला नवभ्यः हा शब्द सुसंगतवार जुळून येतो.

तर पूर्वादिक नऊ शब्दांचा पुनः येथें पाठ केल्याचें प्रयोजन हें समजावें कीं 'व्यवस्थायामसंज्ञायाम्' हें विशेषण पूर्वादि सात शब्दांनाच लागू व्हावें. 'अज्ञातिधनाख्यायां' हें स्वशब्दालाच विशेषण. आणि 'बहिर्योगोपसंव्यानयोः' हें विशेषण अन्तरशब्दालाच लागू व्हावें.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण गणामध्यें तशीं विशेषणें लावूनच पाठ केला आहे.

तर मग पूर्वादि नऊ शब्दांच्या येथें

---

२. 'हें प्रकृतसूत्र जस्प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें सर्वनामसंज्ञा सांगणारें आहे' असें गृहीत न धरतां फक्त सर्वनामसंज्ञा सांगणारेंच हें सूत्र आहे असें गृहीत धरून ही शंका केली आहे.

३. जर पाणिनीनें गणपाठ पूर्वीं केला नसता तर 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रामध्यें 'सर्वादीनि' असें पद त्याला घालतां आलें नसतें. कारण सर्व हा शब्द आरंभीं कुठें आहे तें कांहींच त्यावेळीं सांगतां येणार नाहीं.

४. 'सर्वादीनि०' या सूत्रामध्यें 'आदि' हा शब्द 'पहिला' या अर्थाचा न घेतां 'प्रकार' या अर्थाचा घेतला म्हणजे 'सर्व-शब्दासारखे जे शब्द त्यांना सर्वनामसंज्ञा होते' असा त्याचा अर्थ घेऊन सर्वनामसंज्ञा करतां येते, आतां सर्वनामसंज्ञा ज्यांना करावयाची ते सर्व-शब्दासारखे शब्द कोणते तें समजण्याकरतां मागून गणपाठाची रचना पाणिनीनें केली असें म्हणतां येतें. तेव्हां 'सूत्रपाठापूर्वींच गणपाठ केला आहे' अशी कल्पना निश्चित करण्याला कांहीं तो आधार घेतां येत नाहीं.

५. सर्वादिगणामध्यें पूर्व वगैरे नऊ शब्दांच्या पुढें त्यद्, तद् वगैरे शब्द आहेत त्यांचा संग्रह 'पूर्वादिभ्यः' (७।१।१६) या पदानें न व्हावा म्हणून त्याला 'नवभ्यः' असें विशेषण दिलें आहे. एकंदरींत 'सूत्रपाठापेक्षां गणपाठ पूर्वींचा आहे' असें ठरत असल्यामुळें ह्या प्रकृतसूत्रामध्यें 'पूर्वपरावर०' असे प्रत्यक्ष शब्द न उच्चारतां 'पूर्वादीनि' असें म्हणण्यानें काम भागतें असें सिद्ध होतें.

प्रयोजनं व्यादिपर्युदासेन पर्युदासो मा भूदिति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नैषां व्यादिपर्युदासेन पर्युदासो भवतीति यदयं पूर्वत्रासिद्धम् [८.२.१] इति निपातनं करोति। वार्तिककारश्च पठति जश्भावादिति चेदुत्तरत्राभावादपवादप्रसङ्ग इति॥ इदं तर्हि प्रयोजनं जसि विभाषां वक्ष्यामीति॥

## स्वमज्ञातिधनाख्यायाम्॥१.१.३५॥

आख्याग्रहणं किमर्थम्। ज्ञातिधनपर्यायवाची यः स्वशब्दस्तस्य यथा स्यादिह मा भूत्। स्वे पुत्राः स्वाः पुत्राः। स्वे गावः स्वा गावः॥

## अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः॥१.१.३६॥

उपसंव्यानग्रहणमनर्थकं बहिर्यो-

---

पाठाचें फल हें समजावें की 'किंसर्वनाम बहुभ्योऽद्यादिभ्यः' (५।३।२) येथील द्यादिकांच्या प्रतिषेधानें पूर्वादिकांचा प्रतिषेध न व्हावा.

हेंही प्रयोजन येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा 'पूर्वत्रासिद्धम्' (८।२।१) येथें पूर्वत्र हा शब्द वापरतों त्यापेक्षां द्यादिकांच्या प्रतिषेधानें पूर्वादि नऊ शब्दांना तसिलादिकांचा प्रतिषेध होत नाहीं असें आचार्यांचा व्यवहार सुचवीत आहे. शिवाय 'ढो ढे लोपः' (८।३।१३) या सूत्रावरील 'जश्भावादिति चेदुत्तरत्राभावादपवादप्रसङ्गः' या वार्तिकामध्यें 'उत्तरत्र' असा शब्द वार्तिककारही वापरीत आहे. या सूत्रवार्तिकप्रयोगावरून त्यदादिकांचे पूर्वी पूर्वादिकांचा पाठ आहे असें सूचित होतें.

तर मग पूर्व वगैरे शब्दांना जस् प्रत्यय पुढें असतांना सर्वनामसंज्ञेचा विकल्प करावा म्हणून त्यांचा येथें पुनः पाठ केला आहे.

(सू. ३५) येथें आख्या हा जो शब्द घातला आहे तो कशासाठीं?

ज्ञाति आणि धन या शब्दांचा पर्याय असा जो स्वशब्द त्यालाच सर्वनामसंज्ञेचा निषेध झाला पाहिजे. स्वे पुत्राः, स्वाः पुत्राः, स्वे गावः, स्वा गावः, येथें सर्वनामसंज्ञेचा निषेध न झाला पाहिजे.

---

६. सर्वादिगणाचा पाठक्रम दोन प्रकारचा आहे. प्रथमतः सर्व, विश्व वगैरे १४ शब्द, नंतर पूर्व, पर वगैरे ९ शब्द आणि त्यानंतर त्यद्, तद् वगैरे १२ शब्द; असा एक क्रम आहे. आणि दुसरा पाठक्रम असा आहे की प्रथमतः सर्व विश्व वगैरे १४ शब्द, नंतर त्यद्, तद् वगैरे १२ शब्द आणि त्यानंतर पूर्व, पर वगैरे ९ शब्द. हा दुसरा पाठक्रम घेतला म्हणजे पूर्व, पर वगैरे ९ शब्द हे द्यादिकांत येतात. द्वि हा शब्द त्यद्, तद् वगैरे १२ पैकीं आठवा शब्द आहे. त्याला आरंभ करून पुढील सर्व शब्दांचा द्यादिकांमध्यें संग्रह होतो. त्राल्, सिल् वगैरे प्रत्यय सर्वनामाहून सांगितले आहेत परंतु त्यांत द्यादिक शब्द वगळले आहेत. अद्यादिभ्यः (५।३।२) असा तेथें निषेध केला आहे. तो निषेध बाजूला सारून त्रल्, तसिल् हे प्रत्यय पूर्व, पर इत्यादि शब्दांहून झाले पाहिजेत म्हणून मुद्दाम हें प्रकृतसूत्र केलें आहे.

१. जस् प्रत्यय पुढें असतांना स्वशब्दाला सर्वनामसंज्ञा विकल्पानें होते, परंतु त्या स्वशब्दाचा अर्थ ज्ञाति किंवा धन हा नसला पाहिजे.

२. येथें स्व शब्द आत्मीय या अर्थानें घातला आहे. आतां तो आत्मीय पदार्थ पुत्र वगैरे ज्ञाति असला किंवा गो वगैरे धन असला तरी येथें सर्वनामसंज्ञेचा निषेध होत नाहीं, कारण हा स्व शब्द ज्ञाति किंवा धन याची आख्या म्ह. नांव होत नाहीं.

१. बहिर्योग आणि उपसंव्यान ह्या अर्थाला दाखविणारा जो अंतरशब्द त्याला जस् प्रत्यय पुढें असतांना सर्वनामसंज्ञा विकल्पानें होते. बहिर्योग याचे दोन अर्थ होतात. गांवाची हद्द दाखवण्याकरतां जो तट वगैरे घातलेला असतो त्या हद्दीच्या बाहेरील मोकळ्या प्रदेशाला बहिः असें म्हणतात. आणि त्या मोकळ्या प्रदेशांत असलेल्या पदार्थालाही बहिः असें म्हणतात, या अर्थांपैकीं कोणत्याही एकाचा योग म्ह. संबंध दाखविणाऱ्या अंतरशब्दाला सर्वनामसंज्ञा होते. अन्तरे अन्तराः गृहाः याचे दोन अर्थ होतात. हद्दीच्या बाहेरचीं घरें असा एक अर्थ आणि हद्दीच्या आंतील जीं घरें हद्दीला लागून अस-

**गेण कृतत्वात् ॥१॥**

उपसंव्यानग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । बहिर्योगेण कृतत्वात् । बहिर्योग इत्येव सिद्धम् ॥

**न वा शाटकयुगाद्यर्थम् ॥२॥**

न वानर्थकम् । किं कारणम् । शाटकयुगाद्यर्थम् । शाटकयुगाद्यर्थं तर्हीदं वक्तव्यं यत्रैतन्न ज्ञायते किमन्तरीयं किमुत्तरीयमिति ॥ अत्रापि य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति निर्ज्ञातं तस्य भवतीदमन्तरीयमिदमुत्तरीयमिति ॥

अपुरीति वक्तव्यम् ॥ इह माभूत अन्तरायां पुरी वसतीति ।

**वाप्रकरणे तीयस्य ङित्सूपसंख्यानम्**

वाप्रकरणे तीयस्य ङित्सूपसंख्यानं

---

(वा.१) सूत्रामध्यें उपसंव्यान हा जो शब्द घातला आहे तो निरर्थक आहे.

काय कारण ?

बहिर्योग या अर्थानेंच त्याचें काम भागत आहे.

(वा. २) उपसव्यान हा शब्द निरर्थक होत नाहीं.

काय कारण ?

जेथें घडी न मोडलेली अशीं एकसारखीं दिसणारीं दोन वस्त्रें आहेत तेथें अन्तरीय म्ह. नेसावयाचें वस्त्र कोणतें, आणि उत्तरीय म्ह. पांघरावयाचें वस्त्र कोणतें हें समजत नसल्यामुळें अर्थात् तेथें बहियोंग दाखवितां येत नाहीं. तेव्हां नुसत्या बहिर्योग-शब्दानें काम भागत नाहीं. म्हणून उपसंव्यान शब्द घातला आहे.

येथेंही जो मनुष्य चाणाक्ष असेल तो 'अमुक एक वस्त्र अन्तरीय आहे, व अमुक एक वस्त्र उत्तरीय आहे.' हें बरोबर ओळखतो, त्याबरोबर बहिर्योगही ठरत असल्यामुळें बहिर्योग या अर्थानेंच अन्तरीय किंवा उत्तरीय वस्त्र या अर्थाला दाखविणाऱ्या अन्तर-शब्दाला सर्वनामसंज्ञा होईल. तेव्हां उपसंव्यान शब्द सूत्रामध्यें घालावयास नको.

'अन्तरं बहिर्योगो.' या गणसूत्रामध्यें 'अपुरि' हा शब्द घालण्यांत यावा. पुर् याचें म्ह. नगराचें अंतर हें जर असेल तर अन्तर-शब्दाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें. कारण 'अन्तरायां पुरि' येथें अन्तरा-शब्दाला सर्वनामसंज्ञा न झाली पाहिजे.

(वा. ३) सर्वनामसंज्ञाविकल्पाचे प्रकरणामध्यें ङकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतां तीयप्रत्ययान्ताचें ग्रहण करावें. म्हणजे ङित्प्रत्ययाच्या मागील तीयप्रत्ययान्तशब्दाला विकल्पानें

---

तात तीं घरें असा दुसरा अर्थ कारण हद्दीला लागून असलेल्या आंतील घरांचा बाहेर मोकळ्या प्रदेशांत असलेल्या पदार्थाशीं संबंध हा तेथें अंतर शब्दापासून प्रतीत होतो. उपसंव्यान शब्दाचेही अर्थ दोन आहेत. उप, सम्, या दोन उपसर्गांच्या पुढें व्ये धातूहून ल्युट् प्रत्यय व त्याला अन आदेश (७।१।१) करून उपसंव्यान शब्द साधला आहे. येथें आच्छादन करणें हा धातूचा अर्थ आहे. पुढील प्रत्ययाचा त्या क्रियेचें कर्म आणि करण असा दोन्ही प्रकारचा अर्थ संभवतो. तेव्हां झाकलें जाणारें जें अंतरीय म्ह. नेसावयाचें वस्त्र, आणि ज्याच्या योगानें झाकलें जातें तें उत्तरीय म्ह. पांघरण्याचें वस्त्र, या दोन्ही वस्त्रांना उपसंव्यान म्हणतात. तेव्हां या दोन्ही अर्थी अंतर शब्दाला सर्वनामसंज्ञा होते.

२. कारण पांघरण्याचे वस्त्राचा बाहेरच्या मोकळ्या प्रदेशाशीं संबंध असतो हें प्रसिद्धच आहे. तसेंच त्या बाहेरच्या मोकळ्या प्रदेशांत असलेल्या पदार्थाशीं म्ह. पांघरण्याचे वस्त्राशीं नेसावयाच्या वस्त्राचा संबंध असतो. तेव्हां दोन वस्त्रापैकीं कोणत्याही वस्त्राला दाखविणारा अंतर शब्द असेल तरी त्याला बहिर्योग याच्या दोन अर्थांपैकीं कोणता तरी एक अर्थ घेऊन सर्वनामसंज्ञा करतां येते.

कर्तव्यम्। द्वितीयायै द्वितीयस्यै। तृतीयायै तृतीयस्यै। विभाषा द्वितीयातृतीयाभ्याम् [७.३.११५] इत्येतन्न वक्तव्यं भवति। किं पुनरत्र ज्यायः। उपसंख्यानमेवात्र ज्यायः। इदमपि सिद्धं भवति। द्वितीयाय द्वितीयस्मै। तृतीयाय तृतीयस्मै-

## स्वरादिनिपातमव्ययम्॥ १.१.३७

किमर्थं पृथग्ग्रहणं स्वरादीनां क्रियते न चादिष्वेव पठ्येरन्। चादीनां वा असत्त्ववचनानां निपातसंज्ञा स्वरादीनां पुनः सत्त्ववचनानामसत्त्ववचनानां च॥ अथ किमर्थमुभे संज्ञे क्रियेते न निपातसंज्ञैव स्यात्। नैवं शक्यम्। निपात एकाजनाङ् [१.१.१४] इति प्रगृह्यसंज्ञोक्ता सा स्वरादीनामप्येकाचां प्रसज्येत॥ एवं तर्ह्यव्ययसंज्ञैवास्तु। तच्चाशक्यम्। वक्ष्य-

---

सर्वनामसंज्ञेचें विधान करावें. जसें—द्वितीयायै-द्वितीयस्यै, तृतीयायै-तृतीयस्यै हें वार्तिक केलें म्हणजे 'विभाषा द्वितीयातृतीयाभ्याम्' (७।३।११५) हें सूत्र करावयास नको.

आतां वार्तिक आणि सूत्र या उभयतांमध्यें कोणतें ठेवणें चांगलें?

वार्तिकच ठेवावें हें चांगलें. कारण त्यांत द्वितीयाय-द्वितीयस्मै, तृतीयाय-तृतीयस्मै, हींही उदाहरणें साधत आहेत.

(सू. ३७) निपातापेक्षां निराळें स्वरादिकांचें ग्रहण कशासाठीं बरें केलें आहे? तसें करावयास नको. तर चादिगणामध्येंच स्वरादिगण घालावा.

अद्रव्यार्थक[3] अशा चादिगणांतील शब्दांना निपातसंज्ञा सांगितली आहे आणि द्रव्यार्थक किंवा अद्रव्यार्थक अशा दोन्ही प्रकारच्या स्वरादिगणांतील स्वर वगैरे शब्दांना अव्यय संज्ञा इष्ट आहे.

आतां, निपात आणि अव्यय अशा दोन संज्ञा कां बरें केल्या आहेत. त्या दोन संज्ञा करूं नयेत. एक निपातसंज्ञाच करावी. (म्हणजे 'प्राग्रीश्वरान्निपाताः' (१।४।५६) याचे पुढें 'स्वरादीनि०' वगैरे सूत्रें करून स्वरादिकांना निपातसंज्ञाच सांगावी. अव्ययसंज्ञा मुळींच नको.)

असें करणें शक्य नाहीं. कारण 'निपात एकाजनाङ्' (१।१।१४) यानें सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा ती एकाच् अशा स्वरादिकांनाही प्रसक्त होईल. जसें—क्व इव क्वेव.

असें आहे तर एक अव्ययसंज्ञाच असूं दे. (म्हणजे 'प्राग्रीश्वरादव्ययम्' (१।४।५६) असें सूत्र करून त्याच्यापुढें 'स्वरादीनि' वगैरे सूत्रें घालून पुढें 'चादयो' वगैरे सूत्रें घालावींत.)

तसें करणें अशक्य आहे. कारण 'तत्पुरुषे तुल्यार्थ०'(६।२।२) या सूत्रानें सांगितलेला पूर्वपदप्रकृतिस्वर 'स्नात्वाकालकः' वगैरे

---

१. स्वर वगैरे शब्द आणि निपातसंज्ञक (१।४।५७-९७) शब्द यांना अव्ययसंज्ञा होते.

२. चादिगणांतील च वगैरे शब्दांना निपातसंज्ञा सांगितली आहे (१।४।५७). त्या चादिगणामध्यें स्वरादिगण घातला म्हणजे त्यानेंच स्वर वगैरेंना निपातसंज्ञा होईल, आणि प्रकृतसूत्रानें स्वर वगैरेंना निपात या दृष्टीनें अव्ययसंज्ञा होईल. तेव्हां येथें 'स्वरादि' असें म्ह. निराळें म्हणावयास नको.

३. लिंग आणि संख्या यांचा संबंध ज्या अर्थाला भासतो त्या अर्थाला द्रव्य म्हणतात; उदा० घट, पट वगैरे शब्दांचे अर्थ होत. ज्या अर्थाला लिंग आणि संख्या यांचा संबंध भासत नाहीं त्या अर्थाला अद्रव्य म्हणतात; जसें च, वा वगैरे शब्दांपासून प्रतीत होणारे समुच्चय, विकल्प वगैरे अर्थ. हेच अर्थ ज्या ठिकाणीं समुच्चय, विकल्प अशा शब्दांपासून भासतात त्या ठिकाणीं त्यांना द्रव्य असें म्हणतां येतें.

४. क्व येथें किम् शब्दाहून अत् प्रत्यय (५।३।१२) केला आहे. त्या अ या तद्धितप्रत्ययाला आतां अव्ययसंज्ञेच्या ऐवजीं निपातसंज्ञाच होणार (१।१।३८) असल्यामुळें त्याला प्रगृह्यसंज्ञा होऊन प्रकृतिभाव (६।१।१२५) होईल आणि गुण (६।१।८७) होणार नाहीं.

स्यैतत्। अव्यये नञ्कुनिपातानामिति। तद्गरीयसा न्यासेन परिगणनं कर्तव्यं स्यात्॥ तस्मात्पृथग्ग्रहणं कर्तव्यम्। उभे च संज्ञे कर्तव्ये॥

**तद्धितश्चासर्वविभक्तिः॥ १.१.३८॥**

**असर्वविभक्तावविभक्तिनिमित्तस्योपसंख्यानम् ॥१॥**

असर्वविभक्तावविभक्तिनिमित्तस्योपसंख्यानं कर्तव्यम्। नाना विना। किं पुनः कारणं न सिध्यति।

**सर्वविभक्तिर्ह्यविशेषात् ॥२॥**

सर्वं विभक्तिर्ह्येष भवति। किं कारणम्। अविशेषेण विहितत्वात्॥

**त्रलादीनां चोपसंख्यानम् ॥३॥**

त्रलादीनां चोपसंख्यानं कर्तव्यम्। तत्र यत्र। ततः यतः। ननु च विशेषेणैते विधीयन्ते। पञ्चम्यास्तसिल् [५.३.७] सप्तम्यास्त्रल् [१०] इति। वक्ष्यत्येतत्। इतराभ्योऽपि दृश्यन्ते [१४] इति॥ यदि पुनरविभक्तिः शब्दोऽव्यय-

---

उदाहरणांमध्यें न व्हावा यासाठीं 'अव्यये नञ्कुनिपातानाम्' असें तेथें परिगणन करावयाचें आहे. तें पुष्कळ शब्द घालून मोठें करावें लागेल. (म्हणजे आतां निपातसंज्ञा मुळींच नसल्यानें परिगणनांतील निपातशब्दांचे ऐवजीं सर्व चादिकशब्द घालावे लागतील.) एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें स्वरादि आणि निपात असे दोन्ही शब्द निराळे घातले पाहिजेत आणि निपात व अव्यय अशा संज्ञाही दोन निरनिराळ्या केल्या पाहिजेत.

(वा.१) असर्वविभक्तिः असें जें म्हटलें आहे तेथें आणखी अविभक्तिनिमित्त असें म्हटलें पाहिजे; उदा. विना, नाना.

पण, विना आणि नाना येथें प्रकृतसूत्रानें कां बरें अव्ययसंज्ञा साधत नाहीं ?

(वा.२) हा ना आणि नाञ् तद्धित प्रत्यय सर्व विभक्त्यन्त अशा वि आणि नञ् शब्दांहून करतां येतो.

काय कारण ?

विशेष एखादीच विभक्ति कारण म्हणून त्या सूत्रांत धरिली नाहीं.

(वा.३) शिवाय त्रल् वगैरे तद्धित प्रत्यय केले असतां तेथें त्या तद्धितप्रत्ययान्तशब्दाला अव्ययसंज्ञा होते असें म्हणावें. उदा० तत्र, यत्र, ततः, यतः.

पण त्रल् तसिल् वगैरे तद्धितप्रत्यय विशेष विभक्तिनिमित्त म्हणून धरूनच सांगितले आहेत; जसें—'पञ्चम्यास्तसिल्' (५।३।७), 'सप्तम्यास्त्रल्' (५।३।१०). तेव्हां वरील उदाहरणांमध्यें प्रकृतसूत्रानेंच अव्ययसंज्ञा साधत आहे.

तरी पण दुसरीकडे दोष येतोच. 'इतराभ्योऽपि दृश्यन्ते' (५।३।१४) या सूत्रानें पञ्चमी, सप्तमी, यांहून अन्य ज्या विभक्ति तदन्ताहूनही त्रल्तसिलादिक होतात असें सांगितलें आहे; तेव्हां भवत् वगैरे शब्दांचा योग असतां सर्व विभक्त्यन्ताहून सांगितलेले त्रल् वगैरे प्रत्यय

---

१. ज्या शब्दाहून सर्व प्रकारची विभक्ति उत्पन्न होत नाहीं अशा तद्धितप्रत्ययान्त शब्दाला अव्ययसंज्ञा होते.

२. असर्वविभक्तिः या पदाचा अर्थ 'ज्या तद्धितप्रत्ययान्त शब्दाहून सर्व प्रकारची विभक्ति उत्पन्न होत नाहीं' असा आहे. परंतु तसा अर्थ न घेतां 'ज्या तद्धितप्रत्ययाची उत्पत्ति होते वेळीं त्याच्या प्रकृतीला सर्व विभक्ति लावतां येत नाहींत' असा अर्थ मनांत घेऊन वार्तिककारांनीं हें वार्तिक केलें आहे. विना, नाना येथें वि याहून ना प्रत्यय आणि न याहून नाञ् प्रत्यय (५।२।२७) झाला आहे. त्या प्रत्ययाच्या उत्पत्तीचे वेळीं त्याच्या प्रकृतीहून म्ह. वि आणि नञ् यांहून अमुक विभक्ति केलेली पाहिजे असें विशेष कांहींच तेथें सांगितलेलें नाहीं. म्हणून तेथें कोणतीही विभक्ति केली तरी चालते. 'अविभक्तिनिमित्त' याचा अर्थ 'ज्या तद्धितप्रत्ययाच्या उत्पत्तीचे वेळीं त्याच्या प्रकृतीहून कोणतीच विशेष विभक्ति कारण म्हणून धरलेली नाहीं' असा आहे. ना आणि नाञ् हे प्रत्यय तसे आहेत.

संज्ञो भवतीत्युच्यते ।

**अविभक्तावितरेतराश्रयत्वाद्-प्रसिद्धिः ॥४॥**

अविभक्तावितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः संज्ञायाः । केतरेतराश्रयता । सत्यविभक्तित्वे संज्ञया भवितव्यं संज्ञया चाविभक्तित्वं भाव्यते तदितरेतरातराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च कार्याणि न प्रकल्पन्ते॥

**अलिङ्गमसंख्यमिति वा ॥५॥**

अथवालिङ्गमसंख्यमव्ययसंज्ञं भवतीति वक्तव्यम् । एवमपीतरेतराश्रयमेव भवति । केतरेतराश्रयता । सत्यलिङ्गासंख्यत्वे संज्ञया भवितव्यं संज्ञया चालिङ्गासंख्यत्वं भाव्यते तदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च कार्याणि न प्रकल्पन्ते ॥ नेदं वाचनिकमलिङ्गतासंख्यता च । किं तर्हि । स्वाभाविकमेतत् । तद्यथा । समानमीहमानानां चाधीयानानां च केचिदर्थैर्युज्यन्तेऽपरे न । तत्र किमस्माभिः कर्तुं शक्यम् । स्वाभाविकमेतत् ॥ तत्तर्हि वक्तव्यमलिङ्गमसंख्यमिति । न वक्तव्यम् ।

**सिद्धं तु पाठात् ॥६॥**

पाठाद्वा सिद्धमेतत् । कथं पाठः कर्तव्यः । तसिलादयः प्राक्पाशपः ।

---

केले म्हणजे तेथें अव्ययसंज्ञा होणार नाहीं.

आतां, जर 'तद्धितश्चासर्वविभक्तिः' याचे ऐवजीं 'अविभक्तिः शब्दः' असें सूत्र करून प्रयोगामध्यें ज्या शब्दाच्या पुढेंही विभक्ति दिसत नाहीं त्या शब्दाला अव्ययसंज्ञा होते असें म्हटलें तर विना, नाना, तत्र, ततः वगैरे ठिकाणीं दोष येत नाहीं. परंतु—

(वा.४) अविभक्ति असें म्हटलें तर अन्योन्याश्रयदोष येत असल्यामुळें कांहींच सिद्ध होणार नाहीं.

तो अन्योन्याश्रयदोष कसा येतो ?

तो शब्द प्रथमतः विभक्तिरहित होईल तर त्याला अव्ययसंज्ञा होणार, आणि प्रथमतः संज्ञा होईल तर तो शब्द विभक्तिरहित आहे असें ठरणार, असा दोष येतो. आणि एकमेकांवर अवलंबून असलेलीं कार्यें तर मुळींच अस्तित्वांत येऊं शकत नाहींत.

(वा. ५) अथवा 'लिङ्गसंख्यारहित तें अव्ययसंज्ञक होतें' असें वचन करावें.

तरीही अन्योन्याश्रयदोष येतोच.

तो अन्योन्याश्रयदोष कसा येतो ?

लिङ्गसंख्यारहित असा शब्द दृष्टीस पडेल तर तेथें अव्ययसंज्ञा होणार, आणि अव्ययसंज्ञा झाली म्हणजे तो शब्द लिङ्गसंख्यारहित असा बनणार, असा अन्योन्याश्रयदोष येतो आणि एकमेकांवर अवलंबून असलेलीं कार्यें तर मुळींच अस्तित्वांत येऊं शकत नाहींत.

पण लिङ्ग आणि संख्या न लागणें हें कांहीं वचनानें निष्पन्न होणारें नव्हे, तर स्वाभाविक आहे; जसें—एकाच प्रकारची इच्छा करणाऱ्या व अगदीं तुल्य उद्योग करणाऱ्या अशा अनेक लोकांमध्यें कृतार्थ असे कांहींच बनतात, व कांहीं कृतार्थ बनत नाहींत, तेथें आम्हीं काय करावें ? कारण तसें होणें हें स्वाभाविकच आहे. तेव्हां लिंग आणि संख्या न लागणें हा अर्थ दुसऱ्यावर अवलंबून नसल्यामुळें अन्योन्याश्रय होत नाहीं.

तर मग 'अलिङ्गमसंख्यमव्ययम्' हें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

(वा.६) अथवा स्वरादिगणामध्यें प्रत्यक्ष पाठ केल्यानें हें साधत आहे.

पण तो पाठ कसा करावा ?

'पञ्चम्यास्तसिल्' (५।३।७) या सूत्रानें सांगितलेल्या तसिल् प्रत्ययाला आरंभ करून 'याप्ये पाशप्' (५।३।४७) या सूत्रानें सांगितलेल्या पाशप् प्रत्ययापर्यंतचे प्रत्यय; 'बहल्पा-

शस्प्रभृतयः प्राक्समासान्तेभ्यः । मान्तः । कृत्वोऽर्थः । तसिवती । नानाञाविति ॥ अथवा पुनरस्त्वविभक्तिः शब्दोऽव्ययसंज्ञो भवतीत्येव । ननु चोक्तमविभक्तावितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिरिति । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । यद्यपि तावद्वैयाकरणा विभक्तिलोपमारभमाणा अविभक्तिकाञ्शब्दान्प्रयुञ्जते ये त्वेते वैयाकरणेभ्योऽन्ये मनुष्याः कथं तेऽविभक्तिकाञ्शब्दान्प्रयुञ्जत इति।अभिज्ञाश्च पुनर्लौकिका एकत्वादीनामर्थानाम् । आतश्चाभिज्ञा अन्येन हि वस्त्रेनैकं गां क्रीणन्त्यन्येन द्वावन्येन त्रीन् । अभिज्ञाश्च न च प्रयुञ्जते । तदेतदेवं संदृश्यतामर्थ-

---

र्थाच्छस्कारा०' (५।४।४३) या सूत्रानें सांगितलेल्या शस् प्रत्ययाला आरंभ करून 'समासान्ताः' (५।४।६८) या सूत्रापर्यंतचे प्रत्यय अमुचच्छंदसि' (५।४।१२) या सूत्रानें सांगितलेला अम् प्रत्यय; किमेत्तिङव्यय' (५।४।११) या सूत्रानें सांगितलेला आम् प्रत्यय; 'तेनैकदिक्०' 'तसिश्च' (४।३।११२।११४) या सूत्रानें सांगितलेला तस् प्रत्यय; 'तेन तुल्यं', 'तत्र तस्यैव' (५।१।११५।११६) इत्यादिक सूत्रांनीं सांगितलेला वत् प्रत्यय; 'संख्यायाः क्रियाभ्या०' (५।४।१७), द्वित्रिचतुर्भ्यः सुच्' (५।४।१८) विभाषा बहोर्धा०(५।४।२०) या सूत्रांनीं सांगितलेले कृत्वसुच्, सुच् आणि धा हे प्रत्यय; 'विनञ्भ्यां०' (५।२।२७)या सूत्रानें सांगितलेले ना आणि नाञ् हे प्रत्यय. या प्रत्ययांचा पाठ केल्यानें 'स्वरादिनिपात०' (१।१।३७) यानेंच अव्ययसंज्ञा होते. तेव्हां असर्वविभक्तीविषयींचा अन्योन्याश्रयदोष येत नाहीं.

किंवा 'असर्वविभक्तिः' याचे ऐवजीं 'अविभक्तिः' असें सूत्रामध्यें पद घालून विभक्तिरहित शब्द अव्ययसंज्ञक होतो असें जें म्हटलें तेंच असूं दे.

पण 'अन्योन्याश्रय दोष येत असल्यामुळें अविभक्तिशब्दाचे ठिकाणीं अव्ययसंज्ञा साधत नाहीं' असा दोष पूर्वीं दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. येथें अन्योन्याश्रयदोष देणाऱ्याला अगोदर असें विचारावें की जे व्याकरणशास्त्राभिज्ञ आहेत त्यांना अमुक सूत्रानें विभक्तीचा लोप सांगितला आहे हें माहीत असल्यामुळें ते विभक्तिरहित शब्दांचा प्रयोग करतात हें बरोबर आहे. पण जे व्याकरणाभिज्ञ नव्हेत ते सुद्धां विभक्तिरहित शब्दांचा प्रयोग करतात तें कसें ? जरी ते व्याकरणानभिज्ञ आहेत तरी त्यांना एखाद्या संख्येचें ज्ञान शब्दापासून होतें असें मानलेंच पाहिजे. नाहीं तर घटः घटौ इत्यादि ठिकाणीं एक घट कळवावयाचा असतां एकवचन घालतात व दोन घट कळवावयाचे असतां द्विवचन घालतात. जर त्यांना शब्दापासून एकत्वादि संख्येचें ज्ञान होत नसेल तर दोन घट कळवावयाचे असतां एकवचन आणि एक घट कळवावयाचा असतां द्विवचन सुद्धां घालतील किंवा मुळींच वचन घालणार नाहींत. (पण ते तसें करीत नाहींत. यावरून व्याकरणानभिज्ञही लोकांना शब्दापासून एकत्वादि संख्येचें ज्ञान असतें असें ठरतें.) शिवाय पुढील व्यवहारावरूनही हेंच सिद्ध होत आहे. एक बैल खरेदी करावयाचा असतां ठराविक एका किंमतीनें खरेदी करतात. ठराविकाच्या दुप्पट किंमतीनें दोन, आणि ठराविकाच्या तिप्पट किंमतीनें तीन बैल खरेदी करतात. जर त्यांना संख्येचें ज्ञान नाहीं तर दोन-तीन बैलांकरितां दुप्पट-तिप्पट किंमत कां देतात ? तेव्हां एकत्वादि संख्येचें ज्ञान असूनही तद्वाचक विभक्ति मात्र अव्ययाचे ठिकाणीं योजीत नाहींत. यावरून असें समजावें की अव्ययरूपी अर्थाचें स्वरूपच अशा स्वभावाचें आहे की त्यामुळें तेथें विभक्ति लागत नाहीं.

रूपमेवैतदेवंजातीयकं येनात्र विभक्तिर्न भवतीति । तच्चाप्येतदेवमनुगम्यमानं दृश्यताम् । किंचिदव्ययं विभक्त्यर्थ-प्रधानं किंचित्क्रियाप्रधानम् । उच्चैर्नीचै-रिति विभक्त्यर्थप्रधानं हिरुक्पृथगिति क्रियाप्रधानम् । तद्धितश्चापि कश्चिद्वि-भक्त्यर्थप्रधानः कश्चित्क्रियाप्रधानः । तत्र यत्रेति विभक्त्यर्थप्रधानो नाना विनेति क्रियाप्रधानः । न चैतयोरर्थयोर्लिङ्ग-संख्याभ्यां योगोऽस्ति ॥

अथाप्यसर्वविभक्तिरित्युच्यत एवमपि न दोषः । कथम् । इदं चाप्यद्यत्वेऽतिबहु क्रियत एकस्मिन्नेकवचनं द्वयोर्द्विवचनं बहुषु बहुवचनमिति । कथं तर्हि । एकवचन-मुत्सर्गः करिष्यते तस्य द्विबह्वोरर्थयोर्द्वि-वचनबहुवचने बाधके भविष्यतः ॥ न चाप्येवं विग्रहः करिष्यते । न सर्वा अ-सर्वाः । असर्वा विभक्तयोऽस्मादिति । कथं

---

अव्ययाला लिङ्ग, संख्या लागत नाहींत ही गोष्ट पुढील प्रकारानें संगतवार जुळून येते. असें पाहा की कांहीं अव्ययें, विभक्त्यर्थप्रधान असतात म्ह. त्यांच्या अर्थामध्यें विभक्त्यर्थाला मुख्यत्व असतें; व कांहीं अव्ययें क्रियाप्रधान असतात म्ह. त्यांच्या अर्थामध्यें क्रियेला मुख्यत्व असतें; जसें—उच्चैः, नीचैः, यांपासून उंच ठिकाणीं, खालच्या ठिकाणीं, असा अर्थ मनांत येत असल्यामुळें अव्ययांच्या अर्थामध्यें विभक्त्यर्थाला मुख्यत्व दिसतें. तसेंच हिरुक्, पृथक् यांपासून वर्जन करणें व निराळें असणें ह्या क्रिया मनांत येत असल्यामुळें त्यांच्या अर्थामध्यें क्रियेला मुख्यत्व दिसतें.

तसेंच तद्धितप्रत्ययही केला असतां तेथेंही कांहीं ठिकाणीं त्याच्या अर्थामध्यें विभक्त्य-र्थाला मुख्यत्व दिसतें, आणि कांहीं ठिकाणीं क्रियेला मुख्यत्व दिसतें, जसें-यत्र, तत्र, यांपासून ज्या ठिकाणीं, त्या ठिकाणीं असा अर्थ मनांत येत असल्यामुळें तो प्रत्यय मुख्य-त्वानें विभक्त्यर्थाला दाखवितो, व विना, नाना, यांपासून वगळणें ही क्रिया मनांत येत असल्यामुळें हा तद्धितप्रत्यय मुख्यत्वानें क्रियेला दाखवितो. आणि विभक्त्यर्थ आणि क्रिया यांवर लिंग आणि संख्या यांचा अन्वय होण्याची योग्यता तर मुळींच नाहीं. यावरून अव्ययाचें लिंगसंख्याराहित्य युक्ति-सिद्ध अर्थात् स्वाभाविक ठरतें.

आतां, 'तद्धितश्चासर्वविभक्तिः' असें मूळचें सूत्र जसें आहे तसेंच ठेवलें तरीही दोष येत नाहीं.

तो कसा ?

तो असा की अगोदर एकत्व दाखवाव-याचें असतां एकवचन करावें, द्वित्व दाख-वावयाचें असतां द्विवचन करावें. आणि बहुत्व दाखवावयाचें असतां बहुवचन करावें (१।४।२१,२२), असें जें म्हटलें आहे, तें अधिक केल्यासारखें दिसतें.

तर मग तें थोडक्यांत कसें बरें सांगावें ?

'एकत्व दाखवावयाचें असतां' हा शब्द काढून टाकून मोघम 'एक वचन करावें' असें सांगण्यांत यावें. या मोघम वचनानें सर्वत्र प्राप्त झालेल्या एकवचनाचें द्वित्व किंवा बहुत्व दाखवावयाचें असतां अनुक्रमें सांगितलेलें द्विवचन, व बहुवचन बाधक होईल. (अर्थात् अव्ययाहून फक्त एकवचनच होईल. सर्व विभक्ति होणार नाहींत. तेव्हां ना आणि नाञ् या तद्धितांची उत्पत्ति होतांना वि आणि न या-हून सर्व विभक्ति गृहीत धरतां येत नसल्यामुळें विना, नाना येथें अव्ययसंज्ञा होईल.

शिवाय 'असर्वविभक्तिः' हा समास आम्ही 'न सर्वाः असर्वाः, असर्वाः विभक्तयो यस्मात्', (सात प्रकारच्या विभक्ति ज्या तद्धिताच्या पुढें करतां येत नाहींत तो तद्धित) असा सोडवीत नाहीं. तर मग कसा सोडवावयचा ?

तर्हि । न सर्वासर्वा । असर्वा विभक्ति-रस्मादिति । त्रिकं पुनर्विभक्तिसंज्ञम् ॥

**एवं गते कृत्यपि तुल्यमेतन्मान्तस्य कार्यं ग्रहणं न तत्र ।**
**ततः परे चाभिमता न कार्यास्त्रयः कृदर्था ग्रहणेन योगाः ॥**
**कृत्तद्धितानां ग्रहणं तु कार्यं संख्याविशेषं ह्यभिनिश्रिता ये ।**

तेषां प्रतिषेधो भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । एको द्वौ बहव इति ।

**तस्मात्स्वरादिग्रहणं च कार्यं कृत्तद्धितानां ग्रहणं च पाठे ॥**

पाठेनेयमव्ययसंज्ञा क्रियते सेह न प्राप्नोति ।परमोच्चैः परमनीचैरिति । तदन्तविधिना भविष्यति । इहापि तर्हि प्राप्नोति । अत्युच्चैः अत्युच्चैसौ अत्युच्चैस इति । उपसर्जनस्य नेति प्रतिषेधो भविष्यति । स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

---

'न सर्वा असर्वा, असर्वा विभक्तिर्यस्मात्' (ज्या तद्धिताच्या पुढें सर्व=यच्चयावत् तिन्हीही विभक्तिप्रत्यय उत्पन्न करतां येत नाहींत, तो तद्धित) असा सोडवावयाचा. विभक्ति हें नांव तर एकवचन, द्विवचन, आणि बहुवचन, या तिघांच्या समुदायाला आहे. (तेव्हां विना, नाना या अव्ययाचें पुढें सात प्रकारच्या विभक्तींचें एकवचन झालें, तरी सुद्धां, द्विवचन व बहुवचन होत नसल्यामुळें विना आणि नाना येथील तद्धित असर्वविभक्तिच आहे. तेव्हां मूळ सूत्रानेंच तेथें अव्ययसंज्ञा होत आहे.

('असर्वा विभक्तिर्यस्मात्' असा समास सोडविण्याच्या वेळीं एकवचन, द्विवचन, आणि बहुवचन, या त्रिकाला विभक्ति, हें नांव असल्यामुळें दरएक विभक्तीचें एकवचन उत्पन्न झालें तरीं द्विवचन आणि बहुवचन यांची उत्पत्ति होत नसल्यामुळें असर्वविभक्तित्व आहेच,) असें गृहीत धरलें असतां, ('असर्वविभक्त्यव्ययम्' एवढेंच तद्धितशब्दरहित सूत्र असू दे. 'कृन्मेजन्तः' या पुढील सूत्रानें ज्या ठिकाणीं अव्ययसंज्ञा इष्ट आहे त्या) कृत्प्रत्ययाचें ठिकाणींही तें पूर्वोक्त असर्वविभक्तित्व संभवतें. म्हणून तेथें अव्ययसंज्ञा सांगणारें 'कृन्मेजन्तः' हें सूत्र करावयास नको; आणि त्याच्या पुढील अव्ययसंज्ञा म्हणून इष्ट, आणि प्रतिपदोक्त उच्चारलेले असे, तीन कृत्संज्ञक प्रत्यय, म्हणजे 'क्त्वातोसुन्कसुनः' हें सूत्र करावयास नको. (एवढेंच नव्हे तर स्वरादिनिपात०' (१।१।३७) या सूत्राला आरंभून 'अव्ययीभावश्च' (१।१।४१) या सूत्रासकट एकंदर पांच) सूत्रें करावयांस नकोत.

एकवचन उत्पन्न झालें तरी द्विवचनादिक उत्पन्न न झाल्यामुळें येणारे असर्वविभक्तित्व हें, एखादेंच विशेषवचन होणाऱ्या एक, द्वि, बहु या शब्दांचे ठिकाणींही असल्यानें त्यांना प्राप्त होणारी अव्ययसंज्ञा न व्हावी, म्हणून, तद्धितशब्द तेथें घातला पाहिजे. म्हणजे मुळांत आहे, तसेंच सूत्र केलें पाहिजे. मूळचें सूत्र कायम केलें असतां 'कृन्मेजन्तः' वगैरे पूर्वोक्त पांच सूत्रेंही करावयास पाहिजेत. (शिवाय उभय या तद्धितान्तशब्दाला अव्ययसंज्ञा न व्हावी यासाठीं ज्या तद्धितांना अव्ययसंज्ञा इष्ट आहे त्या तद्धितप्रत्ययांचा प्रतिपदोक्त पाठ करावा.)

ज्यांचा प्रत्यक्ष पाठ केला आहे अशा स्वरादिकांना अव्ययसंज्ञा होते असें म्हटलें तर ती परमोच्चैः परमनीचैः या ठिकाणीं प्राप्त होत नाहीं.

पण, शब्दस्वरूपाचा अध्याहार करून तदन्तविधि केल्यानें वरील उदाहरणांचे ठिकाणीं अव्ययसंज्ञा होईल.

तर मग, अत्युच्चैः, अत्युच्चैसौ, अत्युच्चैसः येथेंही अव्ययसंज्ञा प्रसक्त होत आहे.

समासामध्यें विशेषण झालेल्या स्वरादिकांना अव्ययसंज्ञा होत नाहीं, या वचनानें प्रतिषेध होईल.

तर मग येथें तसा प्रतिषेध करावयास

सर्वनामसंज्ञायां प्रकृतः प्रतिषेध इहानुवर्तिष्यते। स वै तत्र प्रत्याख्यायते। यथा स तत्र प्रत्याख्यायत इहापि तथा शक्यः प्रत्याख्यातुम्। कथं स तत्र प्रत्याख्यायते। महतीयं संज्ञा क्रियत इति। इयमपि च महती संज्ञा क्रियते। संज्ञा च नाम यतो न लघीयः। कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम्। तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत। न व्येतीत्यव्ययमिति। क्व पुनर्न व्येति। स्त्रीपुंनपुंसकानि सत्त्वगुणा एकत्वद्वित्वबहुत्वानि च। एतानर्थान्केचिद्वियन्ति केचिन्न वियन्ति। ये न वियन्ति तदव्ययम्॥

सदृशं त्रिषु लिङ्गेषु सर्वासु च विभक्तिषु।
वचनेषु च सर्वेषु यन्न व्येति तदव्ययम्॥

## कृन्मेजन्तः ॥१.१.३९॥

कथमिदं विज्ञायते। कृद्यो मान्त इति। आहोस्वित्कृदन्तं यन्मान्तमिति। किं चातः। यदि विज्ञायते कृद्यो मान्त इति कारयां-

---

पाहिजे.

करावयास नको. सर्वनामसंज्ञेचे ठिकाणीं उपसर्जनप्रतिषेध केला आहे. त्याची येथें अनुवृत्ति करतां येईल.

पण त्या ठिकाणीं त्या प्रतिषेधाचें प्रत्याख्यान केलें आहेना ?

जसें तेथें प्रत्याख्यान केलें आहे तसें येथेंही त्या उपसर्जनप्रतिषेधाचें प्रत्याख्यान करणें शक्य आहे.

कसें बरें त्या उपसर्जनप्रतिषेधाचें तेथें प्रत्याख्यान केलें आहे ?

सर्वनाम ही महासंज्ञा केली असल्यामुळें तिच्या जोरावर तेथें उपसर्जनप्रतिषेधाचें प्रत्याख्यान केलें आहे.

असेंच असेल तर येथेंही अव्यय, ही महासंज्ञा केली आहे. आतां संज्ञा म्हणून जी असते, ती अशी असावी की, जिच्यापेक्षां लहान शब्द जगांत नसावा.

हें कशावरून ? पुष्कळसे अर्थ, एका लहानशा शब्दाखालीं यावेत म्हणून संज्ञा केली जाते. तेव्हां तेथें महासंज्ञा करण्याचा उद्देश हा समजावा की, आपल्या अर्थाला अनुसरलेली ही संज्ञा आहे; म्हणजे न 'व्येति विविधं विकारं गच्छति' या व्युत्पत्तीनें 'ज्याचें स्वरूप बदलत नाहीं तें शब्दस्वरूप' असा अव्ययशब्दाचा अर्थ आहे. तो अर्थ ज्या शब्दाला जुळतो त्या शब्दाला अव्यय हें नांव द्यावयाचें.

कुठें बरें शब्दाचें स्वरूप बदलत असतें ? पदार्थाचे धर्म जे स्त्रीत्व, पुंस्त्व, व नपुंसकत्व हीं लिंगें, तसेंच एकत्व, द्वित्व, बहुत्व, ह्या संख्या, यांना कांहीं पदार्थ थारा देतात, आणि कांहीं पदार्थ थारा देत नाहींत. त्यांत जे पदार्थ थारा देत नाहींत त्या पदार्थांचें प्रतिपादन करणाऱ्या शब्दांना अव्यय असें म्हणतात. तिन्हीं लिंगामध्यें, सर्व विभक्तींमध्यें आणि सर्व वचनांमध्यें ज्यांचें स्वरूप बदलत नाहीं, म्हणजे एकाच आकारांत असतें, तें अव्यय होय.

(सू.३९) येथें 'कृत् जो मकारान्त' असा अर्थ समजावयाचा. (म्हणजे कृत्प्रत्ययावर मेजन्त हें विशेषण द्यावयाचें.) किंवा 'कृदन्त जें मकारान्त' असा अर्थ समजावयाचा. (म्हणजे प्रथमतः तदन्तविधि करून त्या कृदन्तावर मेजन्त हें विशेषण द्यावयाचें.)

या दोन प्रकारच्या अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

जर, कृत् जो मकारान्त, असा अर्थ केला तर 'कारयांचकार, हारयांचकार' येथें कारयाम्, हारयाम्, यांचे पुढील कृत् नांवाचा लिट्

---

१. मकार किंवा एच् अंतीं असलेला जो कृत् प्रत्यय तदन्तशब्दाला अव्ययसंज्ञा होते.

चकार हारयांचकारेत्यत्र न प्राप्नोति । अथ विज्ञायते कृदन्तं यन्मान्तमिति प्रतामौ प्रतामः अत्रापि प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावत्कृद्यो मान्त इति । कथं कारयांचकार हारयांचकारेति । किं पुनरत्राव्ययसंज्ञया प्रार्थ्यते । अव्ययात् [२.४.८२] इति लुग्यथा स्यात् । मा भूदेवम् । आमः [२.४.८१] इत्येवं भविष्यति । न सिध्यति । लिग्रहणं तत्रानुवर्तते । लिग्रहणं निवर्तिष्यते । यदि निवर्तते प्रत्ययमात्रस्य लुक्प्राप्नोति । इष्यते च प्रत्ययमात्रस्य । आतश्चेष्यत एवं ह्याह कृञ्चानुप्रयुज्यते लिटि [३.१.४०] इति । यदि च प्रत्ययमात्रस्य लुग्भवति तत एतदुपपन्नं भवति ॥ अथवा पुनरस्तु कृदन्तं यन्मान्तमिति । कथं प्रतामौ प्रताम इति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययलक्षणेनाव्ययसंज्ञा भवतीति यदयं प्रशान्शब्दं स्वरादिषु पठति ॥

**कृन्मेजन्तश्चानिकारोकारप्रकृतिः॥ १॥**

कृन्मेजन्तश्चानिकारोकारप्रकृतिरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । आधये आधेः ।

---

प्रत्यय, तो मकारान्त नसल्यामुळें, तेथें अव्ययसंज्ञा होणार नाहीं. आतां, 'कृदन्त जें मकारान्त' असा अर्थ केला तर, प्रतामौ, प्रतामः येथें प्रताम् हें लुप्त झालेल्या क्विप् प्रत्ययामुळें कृदन्त आहे आणि मकारान्त स्वतःसिद्ध आहे, म्हणून अव्ययसंज्ञा होऊं लागेल असा फरक दिसतो.

तर मग तुझ्या मर्जीप्रमाणें कोणचीही तऱ्हा असो. असूं दे की, 'कृत् जो मकारान्त ' हा अर्थ.

पण तसा अर्थ गृहीत धरला तर कारयांचकार, हारयांचकार, येथें कशी अव्ययसंज्ञा होईल?

पण येथें अव्ययसंज्ञा करून काय मिळवावयाचें आहे?

'अव्ययादाप्सुपः' (२।४।८२) यानें कारयाम् या आमन्तापुढील सुप् प्रत्ययाचा लुक् करावयाचा आहे. तो लुक् त्या सूत्रानें झाला नाहीं, तरी 'आमः' (२।४।८१) यानें होईल.

त्यानें होणार नाहीं. कारण तेथें 'मन्त्रे घसह्व०' (२।४।८०) या सूत्रापासून 'लेः' या पदाची अनुवृत्ति येत आहे.[२]

'लेः' या पदाची 'आमः' येथें निवृत्ति करण्यात येईल.

जर 'लेः' या पदाची अनुवृत्ति 'आमः' येथें बंद केली तर त्यानें आमन्तापुढें कोणताच प्रत्यय दिसणार नाहीं.

पण आमन्तापुढें कोणताही प्रत्यय न दिसणें हें इष्टच आहेना. शिवाय आमन्तापुढें कोणताही प्रत्यय न दिसणें हें इष्ट आहे, याचें कारण असें की, लिट् प्रत्यय पुढें असलेल्या अशा कृ, भू, आणि अस् या आमन्तांपुढें अव्यवहित अनुप्रयोग करावा असें सांगितलें आहे. (३।१।४०) जर आमन्तापुढील कोणताही प्रत्यय न दिसेल तरच आमन्तांच्या पुढें अव्यवहित अनुप्रयोग सांगणें जुळून येतें.

अथवा 'कृदन्त जें मकारान्त' हा अर्थ घेतला तरी हरकत नाहीं.

पण मग 'प्रतामौ प्रतामः' येथें अव्ययसंज्ञा कां बरें होत नाहीं?

ज्यापेक्षां हा आचार्य अव्ययसंज्ञा होण्यासाठीं क्विबन्त प्रशान्-शब्दाचा स्वरादिगणामध्यें पाठ करीत आहे, त्यापेक्षां प्रत्ययलक्षणानें अव्ययसंज्ञा होत नाहीं असें सुचवीत आहे.

(वा.१)कृन्मेजन्तः येथें जो एच् घ्यावयाचा तो इकार किंवा उकार यांचे स्थानीं आदेश झालेला नसावा, असें म्हणावे. नाहीं तर आधये आधेः येथें 'उपसर्गे घोः किः' (३।३।९२) यानें केलेल्या किप्रत्ययाला 'घेर्ङिति' (७।३।१११)

---

२. तेव्हां आमः या सूत्रानें लिट् प्रत्ययाचाच फक्त लुक् होईल. सुप् प्रत्ययाचा होणार नाहीं.

चिकीर्षवे चिकीर्षोरिति ॥

**अनन्यप्रकृतिरिति वा ॥२॥**

अथवानन्यप्रकृतिः कृदव्ययसंज्ञो भवतीति वक्तव्यम् ॥ किं पुनरत्र ज्यायः । अनन्यप्रकृतिवचनमेव ज्यायः । इदमपि सिद्धं भवति । कुम्भकारेभ्यः नगरकारेभ्य इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

**न वा संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य ॥३॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कः पुनरत्र विशेष एषा वा परिभाषा क्रियेतानन्यप्रकृतिरिति वोच्येत । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । कानि पुनस्तानि ।

**प्रयोजनं ह्रस्वत्वं तुग्विधेर्ग्रामणिकुलम् ॥४॥**

ग्रामणिकुलम् सेनानिकुलमित्यत्र ह्रस्वत्वे कृते ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति

---

यानें गुण केला असतां तो एकार स्वतः एच् आहे आणि स्थानिवद्भावानें कृत् आहे. तसेंच चिकीर्षवे चिकीर्षोः येथें सन्नन्ताहून 'सनाशंसभिक्ष उः (३।२।१६८) यानें केलेल्या उप्रत्ययाला गुण केला असतां तो ओकार स्वतः एच् आणि स्थानिवद्भावानें कृत् आहे म्हणून त्याठिकाणीं अव्ययसंज्ञा होऊं लागेल.

(वा. २) किंवा दुसऱ्या कोणत्याही वर्णाला आदेश झालेला असा जो एच् तदन्तप्रत्ययाला अव्ययसंज्ञा होते असें वचन करावें.

इकार, किंवा उकार यांचे स्थानीं न झालेला एच् असें म्हणणें बरें किंवा मोघम कोणत्याही वर्णाचे स्थानीं न झालेला एच् म्हणणें बरें.

मोघम कोणत्याही वर्णाला आदेश न झालेला एच् हें म्हणणेंच श्रेष्ठ आहे. कारण मोघम म्हणण्यांत कुम्भकारेभ्यः नगरकारेभ्यः हेंही साधतें. म्हणजे येथील एच् अकाराचे स्थानीं झालेला (७।३।१०३) असल्यामुळें तेथें अव्ययसंज्ञा होत नाहीं.

तर मग तसें तेथें वचन केलें पाहिजे.

(वा. ३) तसें वचन करावयास नको.

काय कारण ?

उभयतांच्या संबंधावर अवलंबून प्रवृत्त झालेला जो विधि, तो उभयतांच्या संबंधाचा साक्षात् किंवा परंपरेनें विघात करणाऱ्याला मदत करीत नाहीं' अशी परिभाषा करावी.

पण, संनिपातपरिभाषा केली काय, किंवा कोणालाही आदेश न झालेला एच् येथें पाहिजे असें म्हटलें काय, यांत काय फरक आहे ?

संनिपातपरिभाषा ही अवश्य केलीच पाहिजे. कारण या परिभाषेचे उपयोग बहुत आहेत.

कोणते बरें ते उपयोग ?

(वा. ४) ग्रामणिकुलम्, सेनानिकुलम् येथें 'इको ह्रस्वो०' (६।३।६१) यानें उत्तरपदनिमित्तक पूर्वपदाला ह्रस्व केला असतां 'ह्रस्वस्य पिति०' (६।१।७१) यानें तुगागम प्राप्त होतो. पूर्वपद आणि उत्तरपद या उभयतांच्या संबंधामुळें झालेला ह्रस्व तुगागम

---

१. ह्रस्व अकारान्त अङ्ग आणि झलादि बहुवचन सुप् या उभयताच्या पौर्वापर्यसंबंधावर अवलंबून प्रवृत्त झालेला विधि एकार तो पौर्वापर्यसंबंधाचा विघात करणाऱ्या 'अव्ययादाप्सुपः' या सुब्लुकाला मदत करीत नाहीं म्हणजे त्या सुब्लुकाला मदत करणारी जी 'कृन्मेजन्तः' यानें सांगितलेली अव्ययसंज्ञा, त्या संज्ञेला मदत करीत नाहीं. अर्थात् एजन्त नसल्यामुळें अव्ययसंज्ञा होत नाहीं. त्यामुळें त्या अव्ययसंज्ञेवर अवलंबून असलेला सुब्लुकही होत नाहीं.

तुक्प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । बहिरङ्गं ह्रस्वत्वमन्तरङ्गस्तुक् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

## न लोपो वृत्रहभिः ॥५॥

वृत्रहभिः भ्रूणहभिरित्यत्र न लोपे कृते ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति तुक् प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमितं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । असिद्धो नलोपः । तस्यासिद्धत्वान्न भविष्यति ॥

## उदुपधत्वमकित्त्वस्य निकुचिते ॥६॥

उदुपधत्वमकित्त्वस्यानीमित्तम् । क । निकुचिते । निकुचित इत्यत्र नलोपे कृत उदुपधाद्भावादिकर्मणोरन्यतरस्याम् [१.२.२१] इत्यकित्त्वं प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अस्त्वत्राकित्त्वम् । न धातुलोप आर्धधातुके [१.१.४] इति प्रतिषेधो भविष्यति ॥

---

विधीला मदत करीत नाहीं म्हणून दोष येत नाहीं, हा या संनिपातपरिभाषेचा उपयोग होय.

हा या परिभाषेचा उपयोग होत नाहीं. कारण पूर्वपद आणि उत्तरपद या उभयतांवर अवलंबून असल्यामुळें ह्रस्व हा बहिरंग आहे, व तुगागम हा फक्त ग्रामणि एवढ्यावरच अवलंबून असल्यामुळें अंतरंग आहे. तेव्हां अन्तरंग असा तुगागम कर्तव्य असतांना बहिरंग ह्रस्व हा असिद्ध असल्यामुळें तुगागम होणार नाहीं.

(वा.५) वृत्रहभिः, भ्रूणहभिः येथें 'नलोपः प्रातिपदि०' (८।२।७) यानें नकाराचा लोप केला असतां 'ह्रस्वस्यपिति' यानें तुगागम प्राप्त होतो. पदसंज्ञेच्या द्वारानें भिस् आणि त्याची प्रकृति या उभयतांच्या संबंधामुळें झालेला नकाराचा लोप तुक्विधीला निमित्त होत नाहीं म्हणून दोष येत नाहीं हा संनिपातपरिभाषेचा उपयोग होय.

हाही उपयोग होत नाहीं. कारण नलोप असिद्ध आहे. त्यामुळें तुगागम होणार नाहीं.

(वा. ६) उपधेला ह्रस्व उकार असणें हें कित्त्वाच्या निषेधाला निमित्त होत नाहीं.

कुठें ?

निकुचितम् या उदाहरणामध्यें.

नि उपसर्गपूर्वक कुञ्च धातूच्या पुढें क्त प्रत्यय करून 'अनिदितां'० (६।४।२४) यानें नकाराचा लोप केला असतां 'उदुपधाद्भावादि०' (१।२।२१) यानें क्त प्रत्ययाच्या कित्त्वाचा निषेध प्राप्त होतो. तेव्हां लघूपधगुण (७।३।८६) होईल असा दोष येतो. परंतु संनिपातपरिभाषेनें हा दोष येत नाहीं असा त्या परिभाषेचा उपयोग आहे.

हाही संनिपातपरिभाषेचा उपयोग होत नाहीं कारण निकुचितम् येथें क्त प्रत्ययाच्या कित्त्वाचा 'उदुपधात्०' (१।२।२१) यानें निषेध होऊं दे. 'न धातुलोप आर्धधातुके' (१।१।४) यानें

---

४. कारण पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमध्यें तुक्आगम होईल. आणि त्यामुळें त्या दोघांचें सांनिध्य नष्ट होत असल्यामुळें त्यांच्या संबंधाचा तुक् आगमानें नाश होणार आहे.

५. भिस् प्रत्ययाच्या निमित्तानें झालेली जी वृत्रहत् याला पदसंज्ञा (१।४।१७) तिच्यावर अवलंबून होणारा नकाराचा लोप बहिरंग आहे. तुक् आगमाला भिस् प्रत्ययाची जरूर नसल्यामुळें तो अंतरंग आहे.

६. कारण कित्वाचा निषेध झाल्यामुळें गुणाचा निषेध (१।१।५) येत नाहीं.

७. क्त प्रत्ययाच्या कित्त्वामुळें नकाराचा लोप (६।४।२४) होऊन ह्रस्व उकार धातूच्या उपधेला आला आहे. तेव्हां अर्थातच तो उपधेला आलेला ह्रस्व उकार हा क्त प्रत्ययाच्या कित्त्वाचा निषेध करणाऱ्या 'उदुपधात्०' (१।२।२१) याला मदत करणार नाहीं.

**नाभावो यञि दीर्घत्वस्यामुना ॥७॥**

नाभावो यञि दीर्घत्वस्यानिमित्तम् । क । अमुना । नाभावे कृतेऽतो दीर्घो यञि सुपि च [७.३.१०१;१०२] इति दीर्घत्वं प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतत् । न मु टादेश इति ॥

**आत्त्वं कित्त्वस्योपादास्त ॥८॥**

आत्त्वं कित्त्वस्यानिमित्तम् । क । उपादास्तास्य स्वरः शिक्षकस्येति । आत्त्वे कृते स्थाघ्वोरिच्च [१.२.१७] इतीत्त्वं प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । उक्तमेतत् । दीङः प्रतिषेधः स्थाघ्वोरित्त्व इति ॥

**तिसृचतसृत्वं ङीब्विधेः ॥९॥**

तिसृचतसृत्वं ङीब्विधेरनिमित्तम् । क ।

---

गुणाचा प्रतिषेध होईल.

(वा.७) 'आङो नाऽस्त्रियाम्' (७।३।१२०) यानें केलेला ना आदेश, हा यञावर अवलंबून येणाऱ्या दीर्घाला निमित्त होत नाहीं.

कुठें ?

'अमुना' येथें ना आदेश केल्यानंतर 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१) याच्यापुढील 'सुपिच' या सूत्रानें दीर्घ प्राप्त होतो तो संनिपातपरिभाषेनें होत नाहीं.

हाही उपयोग येत नाहीं. कारण 'न मु ने' याच्या ऐवजीं 'न मु टादेशे' असें सूत्र करणार आहे. त्यानेंच हें सिद्ध होईल.

(वा.८) आत्त्व हें कित्त्वाला निमित्त होत नाहीं.

कुठें ?

उपादास्तास्य स्वरः शिक्षकस्य येथें दीङ् धातूला आत्व (६।१।५०) केल्यानंतर इत्व (१।२।१७) प्राप्त होतें. परंतु संनिपातपरिभाषेनें होत नाहीं.

हाही उपयोग येत नाहीं. कारण—'स्थाघ्वोरिच्च' (१।२।१७) यानें सांगितलेलें कार्य कर्तव्य असतां दीङ् धातूला घुसंज्ञा होत नाहीं असें पूर्वीं (१।१।२० वा.६)सांगितलेंच आहे.

(वा.९) तिसृ आणि चतसृ आदेश ङीप्.

---

८. अदस् शब्दाहून तृतीयैकवचन टा प्रत्यय, 'त्यदाद्यत्व' (७।२।१०२) आणि पररूप (६।१।९७) करून अद-आ अशी स्थिति असतांना टाला इन् आदेश (७।१।१२) प्राप्त होतो. परंतु त्याच्या दृष्टीनें मु आदेश (८।२।८०) असिद्ध नसल्यामुळें (८।२।३) द शब्दाला 'मु' आदेश करून 'आङोना०' (७।३।१२०) यानें तृतीयैकवचनाच्या स्थानीं ना आदेश केला असतां 'सुपि च' (७।३।१०२) या शास्त्राच्या दृष्टीनें मु आदेश असिद्ध असल्यामुळें त्यानें दीर्घ प्राप्त होतो. परंतु ह्रस्व उकारान्ताला झालेल्या घिसंज्ञेच्या (१।४।७) आश्रयानें झालेला ना आदेश, त्या उकारान्ताचा विघात करणाऱ्या 'सुपि च' या दीर्घाला निमित्त होत नाहीं म्हणून दोष येत नाहीं. हा या परिभाषेचा उपयोग आहे.

९. 'टादेश' याचे दोन अर्थ—एक तृतीयैकवचन टा प्रत्ययाचे स्थानीं आदेश असा, व टा प्रत्यय पुढें असतांना पूर्वभागीं प्राप्त झालेला आदेश असा दुसरा. हे दोन्ही प्रकारचे आदेश कर्तव्य असतां, मु आदेश असिद्ध होत नाहीं. त्या दुसऱ्या अर्थामुळें 'सुपिच' याच्या दृष्टीनें मु आदेश असिद्ध नसल्यानें अकारान्त अंग नाहीं म्हणून दीर्घ होणार नाहीं.

१०. 'उप'उपसर्गपूर्वक दीङ् धातूहून लुङ्, त, च्लि, सिच्, अडागम केल्यावर अ दी स् त असें असतां 'मीनातिमिनोतिदीङां०' (६।१।५०) यानें एजुत्पादक सिच् प्रत्यय पुढें असल्यामुळें दीङ् धातूच्या ईकाराचे स्थानीं आकार केला असतां 'दाधाघ्वदाप्' (१।१।२०) याने घुसंज्ञा असल्यामुळें 'स्थाघ्वोरिच्च' (१।२।१५) यानें इकारादेश प्राप्त होतो. परंतु सिच्प्रत्ययामध्यें असलेली जी एच् (गुण) उत्पन्न करणारी शक्ति तिच्यावर अवलंबून झालेला आकार तो, त्या शक्तीचा विघात करणाऱ्या 'स्थाघ्वो०' त्यानें सांगितलेल्या कित्त्वाला निमित्त होत नाहीं. अर्थात् त्यानेंच सांगितलेलें इत्त्वही होत नाहीं. म्हणून दोष येत नाहीं. हा संनिपातपरिभाषेचा उपयोग होय.

तिस्रस्तिष्ठन्ति । चतस्रस्तिष्ठन्ति । तिसृचतसृभावे कृत ऋन्नेभ्यो ङीप् [४.१.५] इति ङीप्प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न तिसृचतसृभावे कृते ङीब्भवतीति यदयं न तिसृचतसृ [६.४.४] इति नामि दीर्घत्वप्रतिषेधं शास्ति ॥

इमानि तर्हि प्रयोजनानि । शतानि सहस्राणि । नुमि कृते ष्णान्ता षट् [१.१.२४] इति षट्संज्ञा प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ शकटौ पद्धतौ । अत्त्वे कृतेऽतः [४.१.४] इति टाप्प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥ इयेष उवोष । गुणे कृत इजादेश्च गुरुमतोऽनृच्छः [३.१.३६] इत्याम्प्राप्नोति । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति न दोषो भवति ॥

---

प्रत्ययाला निमित्त होत नाहींत.

कुठें ?

तिस्रस्तिष्ठन्ति चतस्रस्तिष्ठन्ति येथें. स्त्रीलिंगी त्रि या शब्दाहून जस् प्रत्यय केला असतां 'त्रिचतुरोः०' (७।२।९९) यानें त्रि-शब्दाचे स्थानीं तिसृ असा आदेश केला असतां 'ऋन्नेभ्यो ङीप्' (४।१।५) यानें ङीप् प्रत्यय प्राप्त होतो. परंतु त्रि शब्द आणि विभक्ति या उभयतांच्या पौर्वापर्यसंबंधामुळें झालेला तिसृ आदेश हा त्या संबंधाचा विघात करणाऱ्या ङीपाला निमित्त होत नाहीं. म्हणून दोष येत नाहीं. हा या परिभाषेचा उपयोग आहे.

हाही उपयोग होत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य नाम् पुढें असतां तिसृ किंवा चतसृ या शब्दाला 'नामि' (६।४।३) यानें प्राप्त झालेल्या दीर्घाचा 'न तिसृचतसृ' (६।४।४) यानें निषेध करीत आहे त्यापेक्षां तिसृ किंवा चतसृ आदेश केल्यानंतर ङीप् प्रत्यय होत नाहीं[११], असें सुचवीत आहे.

तर मग या संनिपातपरिभाषेचे पुढील उपयोग समजावेत. शतानि, सहस्राणि येथें शत किंवा सहस्र शब्दाहून जस् प्रत्यय, त्याचे स्थानीं शि आदेश केल्यानंतर नुमागम (७।१।७२) केला असतां 'ष्णान्ता षट्' (१।१।२४) यानें शतन्, सहस्रन् याला षट्संज्ञा प्राप्त होते. तेव्हां त्यांच्या पुढील जस् प्रत्याचा लुक् (७।१।२२) होईल असा दोष येतो. परंतु पुढील सर्वनामस्थानप्रत्ययामुळें झालेला नुमागम त्या प्रत्ययाचा विघात करणाऱ्या षट्संज्ञेला निमित्त होत नाहीं, म्हणून दोष येत नाहीं. तसेंच शकटौ, पद्धतौ येथें शकटि आणि पद्धति या शब्दांच्या पुढें सप्तम्येकवचनाचा ङिप्रत्यय करून 'अच्च घेः' (७।३।११९) यानें घिसंज्ञकाला अकारान्तादेश केला असतां 'अजाद्यतष्टाप्' (४।१।४) यानें टाप् प्रत्यय प्राप्त होतो. परंतु घिसंज्ञक आणि ङिप्रत्यय या उभयतांच्या सामीप्यसंबन्धावर अवलंबून झालेला अकारान्तादेश, त्या संबंधाचा विघात करणाऱ्या टाप्प्रत्ययाला निमित्त होत नाहीं. म्हणून दोष येत नाहीं.

तसेंच इयेष, उवोष येथें इष् आणि उष् धातूंहून लिट्, तिप्, णल्, द्वित्व, हलादिशेष, उत्तरखंडीं लघूपधगुण, हीं कार्यें केलीं असतां 'इजादेश्च गुरुमतो०' (३।१।३६) यानें आम् प्रत्यय प्राप्त होतो. परंतु पुढील लिट्-प्रत्याला मानून झालेला गुण हा त्या प्रत्ययाचा परंपरेनें[१२] विघात करणाऱ्या आम् प्रत्ययाला

---

११. जर तिसृणाम् येथें मध्यें ङीप् प्रत्यय झाला असता तर ऋकाराला दीर्घाची प्राप्तिच येत नसल्यामुळें निषेधाला वैयर्थ्य आलें असतें.

१२. आमः (२।४।८१) यानें सांगितलेला लुक् त्या लिट्-प्रत्ययाचा साक्षात् निघात करणारा आहे. त्याला उपयोगीं पडणारा आम् प्रत्यय हा परंपरेनें त्या प्रत्ययाचा विघात करणारा आहे.

**तस्य दोषो वर्णाश्रयः प्रत्ययो वर्णविचालस्य ॥१०॥**

तस्यैतस्य लक्षणस्य दोषो वर्णाश्रयः प्रत्ययो वर्णविचालस्यानिमित्तं स्यात् । क । अत इञ् [४.१.९५] । दाक्षिः प्लाक्षिः । न प्रत्ययः संनिपातलक्षणः । अङ्गसंज्ञा तद्वि- निमित्तं स्यात् ॥

**आत्त्वं पुग्विधेः क्रापयति ॥११॥**

आत्त्वं पुग्विधेरानिमित्तं स्यात् । क । क्रापयतीति ॥

**पुग्ध्रस्वत्वस्यादीदपत् ॥१२॥**

पुग्ध्रस्वत्वस्यानिमित्तं स्यात् । क । अदीदपदिति ॥

**त्यदाद्यकारष्टाब्विधेः ॥१३॥**

त्यदाद्यकारष्टाब्विधेरनिमित्तं स्यात् । क । या सा ॥

**इड्विधिराकारलोपस्य पपिवान् ।१४।**

इड्विधिराकारलोपस्यानिमित्तं स्यात् ।

---

निमित्त होत नाहीं. म्हणून दोष येत नाहीं.

(वा. १०) आतां ही संनिपातपरिभाषा घेतली असतां जे दोष येतात ते दाखवितों. वर्णावर अवलंबून झालेला प्रत्यय त्या वर्णाच्या नाशाला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

दाक्षिः, प्लाक्षिः येथें. दक्ष, प्लक्ष या शब्दां- तील शेवटच्या अकाराला मानून 'अत इञ्' (४।१।९५) यानें झालेला इञ् प्रत्यय हा त्या अकाराचा नाश करणाऱ्या 'यस्येति०' (६।४।१४८) यानें होणाऱ्या लोपाला निमित्त होणार नाहीं.

पण ह्या इञ् प्रत्ययाला त्या दक्ष, प्लक्ष यांतील शेवटच्या अकाराचा त्याच्यापुढील कोणत्याही अक्षराशींही असलेला संबंध निमित्त नाहीं तेव्हां तो वर्णाच्या नाशाला निमित्त होणार नाहीं असें कसें होईल ?

असें आहे तर अकारान्त प्रकृति आणि इञ् प्रत्यय या उभयताच्या पौर्वापर्यसंबंधामुळें झालेली अंगसंज्ञा त्या वर्णाच्या नाशाला निमित्त होणार नाहीं असा दोष समजावा.

(वा. ११) तसेंच आत्त्व हें पुगागमाला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

क्रापयति[१३] येथें.

(वा. १२) पुगागम हा ह्रस्वाला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

अदीदपत् येथें.[१४]

(वा. १३) त्यदादिकाला सांगितलेला अकार हा टाप्विधीला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

या, सा[१५] येथें.

(वा. १४) इडागम हा आकाराच्या लोपाला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

---

१३. क्री धातूहून णिच् प्रत्यय करून वृद्धि (७।२।११४) केली असतां 'क्रीङ्जीनां णौ' (६।१।४८) यानें क्री धातूंतील ऐकाराच्या स्थानीं आकार होतो तो क्री ही प्रकृति आणि णिच् प्रत्यय या उभ- यतांच्या पौर्वापर्यसंबन्धावर अवलंबून झालेला आहे तो त्या संबंधाचा विघात करणाऱ्या पुगागमाला निमित्त होणार नाहीं.

१४. दा धातूहून णिच् प्रत्यय 'अर्तिह्री०' (७।३।३६) यानें आकाराला पुक् आगम पुढें लुङ्, तिप् 'इतश्च' (३।४।१००) यानें इकारलोप आणि च्लि, चङ्, इतकीं कार्यें करून दाप्, इ, अत् असे असतां येथें आकाराला मानून झालेला पुक् आगम त्या संनिपातस्थ आकाराचा विघात करणाऱ्या 'णौ चङ्यु०'(७।४।१) या ह्रस्वाला निमित्त होणार नाहीं.

१५. यद् आणि तद् शब्दांच्या पुढें प्रथमैक- वचन सुप्रत्यय, 'त्यदादीनामः' (७।२।१०२) यानें अत्व, व पररूप केलें असतां, प्रकृति आणि प्रत्यय या उभयतांच्या आनन्तर्यामुळें झालेला अकार, त्या आनन्तर्याचा विघात करणाऱ्या टाब्विधीला निमित्त होणार नाहीं.

क। पपिवान् तस्थिवानिति ॥

**मतुब्विभक्त्युदात्तत्वं पूर्वनिघातस्य ॥१५॥**

मतुब्विभक्त्युदात्तत्वं पूर्वनिघातस्यानिमित्तं स्यात्। क। अग्निमान् वायुमान्। परमवाचा परमवाचे ॥

**नदीह्रस्वत्वं संबुद्धिलोपस्य ॥१६॥**

नदीह्रस्वत्वं संबुद्धिलोपस्यानिमित्तं स्यात्। क। नदि कुमारि किशोरि ब्राह्मणि ब्रह्मबन्धु। ह्रस्वत्वे कृत एङ्ह्रस्वात्संबुद्धेरिति लोपो न प्राप्नोति। मा भूदेवम्। ङ्यन्तादित्येवं भविष्यति। न सिध्यति। दीर्घादित्युच्यते ह्रस्वान्ताच्च न प्राप्नोति। इदमिह संप्रधार्यम्। ह्रस्वत्वं क्रियतां संबुद्धिलोप इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाद्ध्रस्वत्वम्। नित्यः संबुद्धिलोपः। कृतेऽपि ह्रस्वत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि। अनित्यः संबुद्धिलोपः। न हि कृते ह्रस्वत्वे प्राप्नोति।

पपिवान्[१६], तस्थिवान् येथें.

(वा.१५) मतुप् आणि विभक्ति यांना सांगितलेला उदात्त स्वर हा पूर्वनिघाताला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

अग्निमान्[१७], वायुमान्, परमवाचा, परमवाचे, येथें.

(वा.१६) नदीसंज्ञक शब्दाला सांगितलेला जो ह्रस्व तो संबुद्धिलोपाला निमित्त होणार नाहीं.

कुठें ?

नदि, कुमारि, किशोरि, ब्राह्मणि, ब्रह्मबन्धु, येथें. नदी वगैरे शब्दांच्या पुढें संबोधनैकवचन सुप्रत्यय करून 'अम्बार्थनद्योः०' (७।३।१०७) यानें ह्रस्व केला असतां संबुद्धिप्रत्ययाला मानून झालेला ह्रस्व, त्या संबुद्धिप्रत्ययाचा विघात करणाऱ्या 'एङ्ह्रस्वात्०' (६।१।६९) या लोपाला निमित्त होणार नाहीं. म्हणून येथें संबुद्धिलोप प्राप्त होत नाहीं.

नदीसंज्ञक शब्दांना ह्रस्व केल्यानंतर संनिपातपरिभाषेमुळें 'एङ्ह्रस्वात्' यानें लोप न होवो. पण 'हल्ङ्याभ्यो०' (६।१।६८) यानें लोप होईल.

'हल्ङ्याभ्यो०' यानें लोप होणार नाहीं. कारण तेथें ङ्याप् याला 'दीर्घात्' असें विशेषण दिलें असल्यामुळें ह्रस्वान्ताच्या पुढील सुप्रत्ययाचा लोप होऊं शकत नाहीं.

पण अगोदर येथें असा विचार उत्पन्न होतो की नदी-स् असें असतां प्रथमतः ह्रस्व करावा, किंवा 'हल्ङ्याभ्यो०' यानें संबुद्धिलोप करावा.

मग येथें काय करावें बरें ?

पर असल्यामुळें प्रथमतः ह्रस्व करावा.

पण संबुद्धिलोप हा नित्य आहे ना ? कारण ह्रस्व केला अथवा न केला तरीही संबुद्धिलोप प्रात होत आहे.

संबुद्धिलोप नित्य नाहीं. कारण ह्रस्व केल्या-

१६. पा आणि स्था धातूंच्यापुढें लिट्-प्रत्ययाचे स्थानीं क्वसु आदेश झाल्यानंतर क्वसु-प्रत्ययाला 'वस्वेकाजा०' (७।२।६७) यानें आकाराला मानून झालेला इडागम, त्या आकाराचा विघात करणाऱ्या 'आतो लोप इटि०' (६।४।६४) या लोपाला निमित्त होणार नाहीं.

१७. अग्नि आणि वायु शब्दाहून मतुप् प्रत्यय करून त्या मतुप्-प्रत्ययाला, 'ज्याचा शेवटला स्वर उदात्त आहे अशा ह्रस्वान्त शब्दापुढील मतुपाला उदात्त होतो. अशा अर्थाच्या 'ह्रस्वनुड्भ्यां०, (६।१।१७६) यानें उदात्त स्वर केला असतां अन्तोदात्त शब्द व मतुप् या उभयतांच्या संनिपातामुळें झालेला मतुप् प्रत्ययाचा उदात्त, हा त्या अंतोदात्ताचा विघात करणाऱ्या 'अनुदात्तं पदमेक० (६।१।१५८) या पूर्वनिपाताला निमित्त होणार नाहीं. तसेंच परमवाच् या समासाच्यापुढें तृतीया किंवा चतुर्थी विभक्तीचें एकवचन करून त्या विभक्तीला, 'एकाच्क असून अन्तोदात्त अशा उत्तरपदापुढील तृतीयाविभक्तीला उदात्त होतो', अशा अर्थाच्या अन्तोदात्त शब्दाला मानून झालेला विभक्त्युदात्त स्वर.हा त्या अन्तोदात्ताचा विघात करणाऱ्या 'अनुदात्तं पद० (६।१।१५८) या पूर्वनिघाताला निमित्त होणार नाहीं.

किं कारणम् । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ॥

एते दोषाः समा भूयांसो वा तस्मान्नार्थोऽनया परिभाषया । न हि दोषाः सन्तीति परिभाषा न कर्तव्या लक्षणं वा न प्रणेयम् । न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रीयन्ते न च मृगाः सन्तीति यवा नोप्यन्ते । दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिताः प्रयोजनानामुदाहरणमात्रम् । कुत एतत् । न हि दोषाणां लक्षणमस्ति । तस्माद्यान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या प्रतिविधेयं दोषेषु ॥

[क्त्वातोसुन्कसुनः॥१.१.४०॥]

अव्ययीभावश्च ॥१.१.४१॥

[अव्ययीभावस्याव्ययत्वे प्रयोजनं लुग्मुखस्वरोपचाराः ॥१॥

अव्ययीभावस्याव्ययत्वे प्रयोजनं किम् । लुग्मुखस्वरोपचाराः ॥ लुक् । उपाग्नि प्रत्यग्नि । अव्ययात् [२.४.८२] इति लुक्सिद्धो

नंतर संबुद्धिलोप प्राप्त होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

पुढील प्रत्ययामुळें झालेला ह्रस्व त्या प्रत्ययाचा विघात करणाऱ्या 'एङ्ह्रस्वात्' या संबुद्धिलोपाला निमित्त होत नाहीं म्हणून.

एकंदरींत संनिपातपरिभाषेचे जितके उपयोग आहेत तितकेच हे दोष असतील किंवा उपयोगापेक्षां दोषच किंचित् अधिकही असण्याचा संभव आहे. तेव्हां संनिपातपरिभाषा करण्यामध्यें कांहीं तथ्य दिसत नाहीं.

पण दोष येतात म्हणून परिभाषा करावयास नको, किंवा एखादें सूत्र करावयास नको, असें म्हणणें हें उचित नाहीं. कारण भिक्षेकरी अथवा मधुकरी भिक्षा मागावयास येतात म्हणून कोणी आपले स्वयंपाकघरांत चुलीवर थाळी चढविण्याचें बंद केलें आहे काय ? किंवा रानडुकरें, पक्षी वगैरे धान्य खातात म्हणून कोणीं शेतें पेरण्याचें बंद केलें आहे काय ?

(शिवाय, वास्तविक विचार केला असतां संनिपातपरिभाषेचे जितके उपयोग तितके दोष, किंवा त्यापेक्षां अधिक दोष आहेत असें जें म्हटलें तेंही बरोबर नाहीं. कारण) दोष म्हणून जेवढे आहेत ते सर्व मोजून त्यांची संख्या निश्चित केली आहे आणि उपयोग म्हणून जीं उदाहरणें दाखविलीं आहेत तीं उपयोग शोधून काढण्याची एक दिशा दाखवून ठेवली आहे. म्हणजे उपयोगच पुष्कळ आहेत. हें कशावरून ? दोषांची संख्या निश्चित असल्यामुळें एक त्यांची दिशा दाखविली असें म्हणण्यास मार्ग नाहीं म्हणून. तेव्हां जे या संनिपातपरिभाषेचे उपयोग म्हणून दाखविले आहेत त्यासाठीं ही परिभाषा अवश्य केलीच पाहिजे. दोष येईल त्या ठिकाणीं ज्ञापकादिकें करून संनिपातपरिभाषेला अनित्यत्व ठरवून त्या दोषांचें निरसन करावें.

(वा.१) अव्ययीभाव समासाला अव्ययसंज्ञा सांगण्याचें फळ सांगतों.

तें कोणतें ?

लुक्, मुखस्वर आणि उपचार हीं फळें होत. जसें–उपाग्नि, प्रत्यग्नि. येथें अव्ययीभाव समासाला[2] अव्ययसंज्ञा केल्यामुळें 'अव्ययादाप्सुपः' (२।४।८३) यानें अव्ययीभावसमासापुढील विभक्तीचा लुक् होतो. उपाग्निमुखः, प्रत्यग्निमुखः येथें उपाग्नि व प्रत्यग्नि या अव्ययांचा मुखशब्दाबरोबर बहुव्रीहि समास

१. क्त्वा, तोसुन् आणि कसुन् हे प्रत्यय अंतीं असलेल्या शब्दांना अव्ययसंज्ञा होते.

१. अव्ययीभाव समास केल्यानंतर त्या सामासिक शब्दाका अव्ययसंज्ञा होते.

२. उपाग्नि येथें 'अव्ययविभक्ति०' (२।१।६) यानें अव्ययीभाव समास झाला आहे. प्रत्यग्नि येथें 'लक्षणेनाभि०' (२।१।१४) यानें अव्ययीभाव समास झाला आहे.

भवति ॥ मुखस्वरः। उपाग्निमुखः प्रत्यग्निमुखः नाव्ययादिक्शब्दगोमहत्स्थूलमुष्टिपृथुवत्सेभ्यः [६.२.१६८] इति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥ उपचारः। उपपयःकारः उपपयःकाम इति। अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य [८.३.४६] इति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥ किं पुनरिदं परिगणनमाहोस्विदुदाहरणमात्रम्। परिगणनमित्याह ॥

अपि खल्वप्याहुः। यदन्यदव्ययीभावस्याव्ययकृतं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्य इति। किं पुनस्तत्। पराङ्गवद्भावः। पराङ्गवद्भावेऽव्ययप्रतिषेधश्चोदित उच्चैरधीयान नीचैरधीयानेत्येवमर्थम्। स इहापि प्राप्नोति। उपाग्न्यधीयान प्रत्यग्न्यधीयान ॥ अकच्यव्ययग्रहणं क्रियत उच्चकैः नीचकैरित्येवमर्थम्। तदिहापि प्राप्नोति। उपाग्निकम् प्रत्यग्निकमिति॥ मुम्यव्ययप्रतिषेध उच्यते दोषामन्यमहः दिवामन्या रात्रिरित्येव-

---

केला असतां 'मुखं स्वाङ्गम्' (६।२।१६७) या सूत्रानें मुख या उत्तरपदाला प्राप्त झालेल्या अन्तोदात्ताचा 'नाव्ययदिक्शब्दगोमहत्०' (६।२।१६८) यानें निषेध होतो. तसेंच उपपयःकारः, उपपयःकामः येथें 'अतः कृकमिकंसकुम्भ०'(८।३।४६) यानें विसर्गाचे स्थानीं प्राप्त झालेल्या सकाराचा त्याच सूत्रामध्यें अनव्ययस्य असें म्हटलें असल्यामुळें प्रतिषेध होतो.

पण येथें वार्तिककाराचे मनांत काय बरें असावें की हें परिगणन म्ह. मोजके तीनच अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा सांगण्याचे उपयोग होत, किंवा उदाहरणांमध्यें एक दिशा दाखविली म्हणजे इतर ठिकाणींही त्या अव्ययसंज्ञेचा उपयोग करावयाचा ?

हें परिगणन आहे असें म्हणतों, कारण लुक्, मुखशब्दाला स्वर आणि विसर्गाला सकार यांहून निराळें कार्य कर्तव्य असतांना अव्ययीभावसमासाला अव्ययसंज्ञेचा निषेध करावा असें कांहीं वैयाकरणांनीं म्हटलें आहे. तेव्हां त्याला अनुसरून हें परिगणन मानणेंच योग्य दिसतें.

लुक् वगैरे तिघांपेक्षां निराळें कार्य तें कोणतें ?

पराङ्गवद्भाव हें होय. 'सुबामन्त्रिते पराङ्गवस्वरे' (२।१।२) यानें आमन्त्रितसंज्ञक शब्दाच्या मागील सुबन्त हें, आपल्यापुढील आमन्त्रिताच्या अवयवासारखें समजावें, असा सुबन्ताला पराङ्गवद्भाव सांगून 'अव्ययानां न' (वा.७) या वार्तिकानें अव्ययाला पराङ्गवद्भावाचा निषेध सांगितला आहे. जसें उच्चैर धीयान, नीचैरधीयान येथें उच्चैः नीचैः हीं अव्ययें आपल्यापुढील अधीयान या आमन्त्रिताच्या अवयवासारखीं समजलीं जात नाहींत, तसेंच उपाग्न्यधीयान प्रत्यग्न्यधीयान येथेंही उपाग्नि, प्रत्यग्नि या अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा झाल्यास त्याला पराङ्गवद्भावाचा निषेध प्राप्त होतो; परंतु परिगणनानें त्या ठिकाणीं अव्ययीभावाला अव्ययसंज्ञेची निवृत्ति केल्यामुळें पराङ्गवद्भावाचा निषेध येऊं शकत नाहीं. तसेंच 'अव्ययसर्वनाम्नां०' (५।३।७१) या सूत्रामध्यें अव्ययग्रहण केलें आहे. त्यामुळें जसा उच्चकैः, नीचकैः,येथें अकच् प्रत्यय होतो, तसा उपाग्निकं, प्रत्यग्निकं, येथेंही प्राप्त होतो. परंतु परिगणनामुळें त्या ठिकाणी अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा नाहीं म्हणून अकच् होत नाहीं, तर क प्रत्ययच होतो. तसेंच 'अरुर्द्विषदजन्तस्य मुम्' (६।३।६७) यानें सांगितलेला मुम् आगम अव्ययाला होत नाहीं असा तेथें निषेध केला आहे. म्हणजे मुमागमाचे उद्देश्यांतून अव्यय काढून टाकलें आहे. त्यामुळें जसा दोषामन्यमहः, दिवामन्या रात्रिः येथें मन्य हें खित्प्रत्यान्त उत्तरपद पुढें असतां दोषा किंवा दिवा या अव्ययसंज्ञक अजन्त पूर्वपदाला मुम् होत

मर्थम् । स इहापि प्राप्नोति । उपकुम्भंमन्यः उपमणिकंमन्यः ॥ अस्य च्वावव्ययप्रतिषेध उच्यते दोषाभूतमहः दिवाभूता रात्रिरित्येवमर्थम्। स इहापि प्राप्नोति। उपकुम्भीभूतम् उपमणिकीभूतम् ॥

यदि परिगणनं क्रियते नार्थोऽव्ययीभावस्याव्ययसंज्ञया । कथं यान्यव्ययीभावस्याव्ययत्वे प्रयोजनानि । नैतानि सन्ति । यत्तावदुच्यते लुगित्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्यव्ययीभावाल्लुगिति यदयं नाव्ययीभावादतः [२.४.८३] इति प्रतिषेधं शास्ति । उपचारः । अनुत्तरपदस्थस्येति वर्तते।तत्र मुखस्वर एकः प्रयोजयति न चैकं प्रयोजनं योगारम्भं प्रयोजयति । यद्येतावत्प्रयोजनं स्यात्तत्रैवायं ब्रूयान्नाव्ययादव्ययीभावाच्चेति ॥

## [1]शि सर्वनामस्थानम् ॥१.१.४२॥

## [1]सुडनपुंसकस्य ॥१.१.४३॥

शि सर्वनामस्थानं सुडनपुंसकस्येति चेज्जसि शिप्रतिषेधः ॥१॥

---

नाहीं, तसा उपकुम्भंमन्यः, उपमणिकंमन्यः, येथेंही उपकुम्भ, उपमणिक, या पूर्वपदाला मुमागम होणार नाहीं. परंतु परिगणनामुळें त्या ठिकाणीं अव्ययीभावाला अव्ययसंज्ञेची निवृत्ति झाल्यामुळें तो प्रतिषेध येथें लागू पडत नाहीं, म्हणून मुमागम होतो. तसेंच, दोषाभूतमहः, दिवाभूता रात्रिः, येथें च्विनिमित्तक ईत्व (७।४।३२) न व्हावें यासाठीं 'अव्ययस्य च्वावीत्वं न' यानें अव्ययाला ईत्वाचा निषेध सांगितला आहे. तो उपकुम्भीभूतम् उपमणिकीभूतम् येथेंही प्राप्त होतो. परंतु परिगणनामुळें त्या ठिकाणीं अव्ययीभावाला अव्ययसंज्ञेची निवृत्ति झाल्यामुळें तो निषेध अव्ययीभावाला लागू होत नाहीं, म्हणून ईत्व होतें.

जर परिगणन केलें तर अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा करण्यांत कांहींच फायदा दिसत नाहीं.

तो कसा ?

अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा करण्याचीं जीं फळें दाखविलीं तीं त्या संज्ञेचीं फळें होऊं शकत नाहींत. अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा असल्यामुळें उपाग्नि, प्रत्यग्नि याच्या पुढील सुपाचा 'अव्ययादाप्' (२।४।८२) यानें लुक् होतो असें म्हटलें आहे,त्यावर उत्तर—ज्यापेक्षां हा आचार्य 'नाव्ययीभावादतो०'(२।४।८३)या सूत्रानें ह्रस्व अकारान्त अव्ययीभावापुढील सुपाच्या लुकाचा प्रतिषेध करीत आहे, त्यापेक्षां अव्ययसंज्ञा नसतांही अव्ययीभावापुढील सुपाचा लुक् होतो, असें सुचवीत आहे. तसेंच उपपयःकारः, उपपयःकामः, येथें अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा असल्यामुळें 'अतः कृकमिकंस०' सूत्रानें सांगितलेल्या सकाराचा प्रतिषेध सिद्ध होतो, असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तरः— 'नित्यं समासे०' (८।३।४५) या पूर्वसूत्रांतून 'अनुत्तरपदस्थस्य' या पदाची अनुवृत्ति 'अतः कृकमि०' या सूत्रामध्यें येत आहे. तेव्हां उपपयः येथील उत्तर पदांतील विसर्गाला सकाराचा प्रतिषेध होईल. अशा रीतीनें दोन उदाहरणांची वाट लागली. आतां फक्त एकट्या मुखस्वराच्या प्रतिषेधाबद्दलच अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा करावी लागत आहे. पण त्या एका उदाहरणासाठीं सामान्य सूत्र करणें बरें दिसत नाहीं. तेव्हां जर एवढाच एक उपयोग असेल तर 'नाव्ययदिक्शब्द०' (६।२।१६८) या सूत्रामध्येंच अव्ययशब्दाच्या पुढें अव्ययीभाव हा शब्द घालावा म्हणजे झालें.

---

१. जस् आणि शस् यांचे स्थानीं होणाऱ्या शि आदेशाला (७।१।२०) सर्वनामस्थान अशी संज्ञा होते.

१. सुट् म्हणजे सु, औ, जस्, अम्, आणि औट् या पांच प्रत्ययांना सर्वनामस्थान अशी संज्ञा होते. परंतु तेथें पूर्वींचा शब्द नपुंसकलिंगी नसला पाहिजे.

शि सर्वनामस्थानं सुडनपुंसकस्येति चेज्जसि शेः प्रतिषेधः प्राप्नोति। कुण्डानि तिष्ठन्ति । वनानि तिष्ठन्ति ॥

असमर्थसमासश्चायं द्रष्टव्योऽनपुंसकस्येति। न हि नञो नपुंसकेन सामर्थ्यम्। केन तर्हि । भवतिना । न भवति नपुंसकस्येति ॥

यत्तावदुच्यते शि सर्वनामस्थानं सुडनपुंसकस्येति चेज्जसि शिप्रतिषेध इति। नाप्रतिषेधात् ॥ नायं प्रसज्यप्रतिषेधो नपुंसकस्य नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यन्नपुंसकादिति। नपुंसकेऽव्यापारः। यदि केनचित्प्राप्नोति तेन भविष्यति । पूर्वेण च प्राप्नोति ॥

अप्राप्तेर्वा ॥ अथवानन्तरा या प्राप्तिः सा प्रतिषिध्यते । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । पूर्वा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया भविष्यति ।

---

(वा.१) 'शि सर्वनामस्थानम्' या सूत्रानें मोघम 'शि' या आदेशाला सर्वनामस्थानसंज्ञा सांगून पुढें 'सुडनपुंसकस्य' या सूत्रानें सुट् प्रत्याहारांतील पांच प्रत्ययांना तीच संज्ञा सांगून नंतर नपुंसकलिंगी शब्दापुढील त्या पांच प्रत्ययांना सर्वनामस्थानसंज्ञेचा निषेध केला आहे, तर जसाचे स्थानीं केलेल्या शि आदेशाला सर्वनामस्थानसंज्ञेचा प्रतिषेध प्राप्त होत आहे. तेव्हां कुण्डानि, वनानि, तिष्ठन्ति येथें नुमागम वगैरे येऊं शकत नाहीं.

आणि अनपुंसकस्य, हा नञ्तत्पुरुष असमर्थसमास म्ह. अनन्वित पदांचा समास होत आहे. कारण, नञाचा नपुंसकशब्दावर अन्वय नाहीं.

तर कोणावर नञाचा अन्वय आहे ?

नपुंसकलिंगामध्यें त्या पांच प्रत्ययांना सर्वनामस्थानसंज्ञा होत नाहीं असा भवति क्रियेवर नञाचा अन्वय आहे.

नपुंसकशब्दाच्या पुढील सु, औ वगैरे पांच प्रत्ययांना सर्वनामस्थानसंज्ञेचा प्रतिषेध केला जात आहे तर जसाचे स्थानीं केलेल्या शि आदेशाला सर्वनामस्थानसंज्ञेचा प्रतिषेध प्राप्त होता, असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः—

'अनपुंसकस्य' हा 'नपुंसकालिंगामध्यें समेनामस्थानसंज्ञा होत नाहीं' अशा अर्थाचा प्रसज्यप्रतिषेध[२] नव्हे तर काय ? 'नपुंसकात् अन्यत्' अशा अर्थाचा पर्युदास आहे. नपुंसकभिन्न शब्दाच्या पुढील स्वादि पांच वचनांना सर्वनामस्थानसंज्ञा होते, असा अर्थ होय. तेव्हां नपुंसकामध्यें या सूत्राचा व्यापार नाहीं. सबब नपुंसकामध्यें जर एखाद्या सूत्रानें संज्ञा प्राप्त होत असेल तर त्यानें ती संज्ञा होईल आणि नपुंसकामध्येंही पूर्वसूत्रानें संज्ञा प्राप्त होत आहेच.

किंवा अनपुंसकस्य हा प्रसज्यप्रतिषेध घेतला तरी त्या प्रसज्यप्रतिषेधानें जवळ असलेल्या म्ह. सुट् यानें प्राप्त झालेल्या संज्ञेचाच निषेध केला जातो.

हें कशावरून ?

'विधि किंवा निषेध करावयाचा तो जवळच्याचाच करावा' असा न्याय आहे. तेव्हां पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या सर्वनामस्थानसंज्ञेचा निषेध नाहीं. सबब पूर्वसूत्रानें नपुंसकामध्यें देखील सर्वनामस्थानसंज्ञा होण्याला हरकत नाहीं.

पण पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या संज्ञेचा

---

२. सु, औ वगैरे पांच प्रत्ययांना सर्वनामस्थानसंज्ञा होते अशी मोघमसंज्ञा सांगितली म्हणजे तिची प्राप्ति नपुंसकलिंगामध्येंही येते. त्यानंतर तिचा निषेध करणें हा प्रसज्यप्रतिषेध होय. आणि संज्ञा सांगतांना आरंभींच नपुंसकलिंगाशिवाय इतर लिंगांमध्यें सु, औ वगैरे पांच प्रत्ययांस संज्ञा सांगितली म्हणजे नपुसंकलिंगामध्यें त्या संज्ञेची मुळीं प्राप्तिच येत नाहीं. याला पर्युदास म्हणतात.

ननु चेयं प्राप्तिः पूर्वां प्राप्तिं बाधते ।
नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥

यदप्युच्यतेऽसमर्थसमासश्चायं द्रष्टव्य इति यद्यपि वक्तव्योऽथवैतर्हि बहूनि प्रयोजनानि । कानि । असूर्यंपश्यानि मुखानि । अपुनर्गेयाः श्लोकाः । अश्राद्धभोजी ब्राम्हण इति ॥

## न वेति विभाषा ॥१.१.४४॥

### न वेति विभाषायामर्थसंज्ञाकरणम् ॥१॥

न वेतिविभाषायामर्थस्य संज्ञा कर्तव्या । नवाशब्दस्य योऽर्थस्तस्य संज्ञा भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ॥

### शब्दसंज्ञायां ह्यर्थासंप्रत्ययो यथान्यत्र ॥२॥

शब्दसंज्ञायां हि सत्यामर्थस्यासंप्रत्ययः स्याद्यथान्यत्र । अन्यत्रापि शब्दसंज्ञायां शब्दस्य संप्रत्ययो भवति नार्थस्य । क्वान्यत्र । दाधा घ्वदाप् [१.१.२०] तरप्तमपौ घः [२२] इति घुग्रहणेषु घग्रह-

---

ह्या सूत्रानें प्राप्त झालेली संज्ञा बाध करते ना[३] ?

'सुट्' यानें प्राप्त झालेल्या संज्ञेचा निषेधानें बाध केल्यामुळें परावृत्त झालेली ती संज्ञा पूर्व संज्ञेचा बाध करण्याला धजत नाहीं. तेव्हां पूर्वसूत्रानें जसाचे स्थानीं झालेल्या शि आदेशाला निर्बाध सर्वनामस्थानसंज्ञा होते.

आणखीही जें 'नञाचा नपुंसकशब्दाशीं अन्वय नसल्यामुळें 'अनपुंसकस्य' हा अनन्वितपदांचा समास समजावा लागेल' असें दूषण दिलें आहे त्यावर उत्तरः—'असमर्थसमासश्च' या वार्तिकाचा, प्रसज्यप्रतिषेधपक्षीं नञाचा नपुंसकाशीं अन्वय नसल्यामुळें असमर्थपदांचा नञ्समास होतो, असें अपूर्व विधान केलें पाहिजे. तेव्हां असमर्थसमासाचें अपूर्व विधान करणें हा दोष येतो. तथापि असमर्थ नञ्समासाचें विधान केलेंच पाहिजे. कारण असमर्थ नञ्समासाचीं बहुत उदाहरणें आहेत. जसें असूर्यंपश्यानि[४] मुखानि, अपुनर्गेयाः श्लोकाः, अश्राद्धभोजी ब्राह्मणः.

(वा.१) न, वा हे शब्द उच्चारून जी विभाषासंज्ञा केली आहे तेथें त्यांच्या अर्थाला ती संज्ञा करण्यांत यावी. म्हणजे न, वा या दोन शब्दांचा जो अर्थ[१] त्याला विभाषा ही संज्ञा होते, असें वचन करावें.

असें वचन करण्याचा उपयोग काय ?

(वा.२) न, वा या शब्दांना संज्ञा केली असतां विभाषाशब्दापासून न, वा या शब्दांच्या अर्थांचा बोध होणार नाहीं. यथान्यत्र म्ह. जसें अन्य ठिकाणीं शब्दाला संज्ञा केली असतां त्या संज्ञाशब्दापासून ज्याला संज्ञा केली त्या शब्दाचाच बोध होतो, त्याच्या अर्थाचा बोध होत नाहीं.

अन्य ठिकाणीं म्हणजे कुठें ?

'दाधाघ्वदाप्' (१।१।२०), तरप्तमपौ घः' (१।१।२२) येथें 'घुमास्था०'(६।४।६६) 'घकालतनेषु०'(६।३।१७) इत्यादि ठिकाणीं घु आणि

---

३. शि या आदेशाला 'शिसर्वनामस्थानम्'या पूर्वसूत्रानेंही सर्वनामस्थानसंज्ञा प्राप्त होते. आणि 'सुडनपुंसकस्य' या सूत्रांतील सुट् यानेंही सर्वनामस्थानसंज्ञा प्राप्त होते. त्यांत सुट् यानें प्राप्त झालेली संज्ञा परत्वास्तव पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या संज्ञेचा बाध करते. आणि 'सुट्' यानें प्राप्त झालेल्या संज्ञेचा 'अनपुंसकस्य' हा निषेध बाध करतो. तेव्हां जसाचे स्थानीं केलेल्या शि आदेशाला संज्ञा मुळींच येऊं शकत नाहीं, असा दोष येत आहेच.

४. असूर्यंपश्यानि, याचा सूर्याला न पाहणारीं मुखें, असा अर्थ मनांत येतो. तेव्हां नञाचा सूर्याशीं अन्वय नसल्यामुळें 'असूर्य' हा असमर्थ नञ्समास होय. असेंच पुढील दोन उदाहरणांमध्येंही समजावें. तेव्हां प्रसज्यप्रतिषेधपक्षीं असमर्थ नञ्समासाचें अपूर्व विधान करणें हा येथें दोष म्हणून निर्दिष्ट करतां येत नाहीं.

१. न वा या दोन अव्ययांचा मिळून जो अर्थ म्ह. 'होत नाहीं आणि एकदां होतें' असा जो अर्थ त्याला विभाषा अशी संज्ञा होते.

णेषु च शब्दस्य संप्रत्ययो भवति नार्थस्य ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**इतिकरणोऽर्थनिर्देशार्थः ॥३॥**

इतिकरणः क्रियते सोऽर्थनिर्देशार्थो भविष्यति । किं गतमेतदितिनाहोस्विच्छब्दाधिक्यादर्थाधिक्यम् । गतमित्याह । कुतः । लोकतः । तद्यथा । लोके गौरित्ययमाहेति गोशब्दादितिकरणः परः प्रयुज्यमानो गोशब्दं स्वस्मात्पदार्थात्प्रच्यावयति । सोऽसौ स्वस्मात्पदार्थात्प्रच्युतो यासावर्थपदार्थकता तस्याः शब्दपदार्थकः संपद्यते । एवमिहापि नवाशब्दादितिकरणः परः प्रयुज्यमानो नवाशब्दं स्वस्मात्पदार्थात्प्रच्यावयति । सोऽसौ स्वस्मात्पदार्थात्प्रच्युतो यासौ शब्दपदार्थकता तस्या लौकिकमर्थं संप्रत्याययति । न वेति यद्गम्यते न वेति यत्प्रतीयत इति ॥

**समानशब्दप्रतिषेधः ॥४॥**

समानशब्दानां प्रतिषेधो वक्तव्यः ।

---

ध या शब्दांपासून दा, धा आणि तरप्, तमप् या शब्दांचाच बोध होतो, त्या शब्दांच्या अर्थांचा बोध होत नाहीं.

तर मग 'न वा शब्दांच्या अर्थाला विभाषा संज्ञा होते असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

(वा.३) 'न वेति विभाषा' या सूत्रामध्यें जो इति शब्द घातला आहे तो न,वा शब्दांच्या अर्थांचा दर्शक होईल.

पण काय, न, वा शब्दांचा अर्थ मनांत आणून देण्याचें काम इति शब्दामुळें जें होत आहे तें काय तसें घडवून आणण्याची स्वाभाविकच शक्ति इति शब्दांत आहे किंवा शब्द अधिक घातला त्या जोरावर कांहीं तरी अधिक अर्थ गृहीत धरावयाचा ?

नवाशब्दाचा अर्थ मनांत आणून देण्याचें काम इति शब्दानें आपल्या स्वाभाविक शक्तीनेंच केलें आहे असें म्हणतो.

हें कशावरून ?

लोकावरून.

जसें लोकामध्यें 'गौरित्ययमाह' (हा गाय असें म्हणतो) या वाक्यांतील गो शब्दाच्या पुढें योजलेला इति शब्द, गो शब्दाला आपल्या अर्थापासून भ्रष्ट करतो. तो हा आपल्या मूळ अर्थापासून परावृत्त झालेला म्ह. एक प्रकारचा पशु हा अर्थ दाखविण्याची शक्ति ज्याची नष्ट झाली आहे असा गो शब्द स्वतःच्या स्वरूपाला दाखविणारा असा बनतो. याप्रमाणें शास्त्रांमध्येंही 'न वेति विभाषा' या सूत्रांतील न वा शब्दांच्या पुढें योजलेला इति शब्द हा, न वा शब्दांना शब्दस्वरूप हा मूळ अर्थ दाखविण्यापासून पराङ्मुख करवितो. तो हा न वा शब्द आपल्या मूळ अर्थापासून परावृत्त झालेला आपल्या निषेधविकल्प या अर्थाला दाखविणारा असा बनतो. म्हणजे न वा या शब्दांपासून जें मनांत येतें म्हणजे जें प्रतीत होतें त्याला विभाषा अशी संज्ञा होते, असा 'न वेति' याचा अर्थ होतो.

(वा.४) नवा या शब्दाचा जो दुसरा अर्थ त्याही अर्थाला विभाषासंज्ञा प्राप्त होते. तिचा

---

२. इति हा शब्द ज्या शब्दापुढें योजलेला असेल त्याच्या स्वाभाविक शक्तींत बदल करतो. लोकामध्यें शब्दापासून स्वभावतः अर्थ मनांत येत असतां तेथें इतिशब्दामुळें त्याच्याजवळच्या शब्दापासून शब्दच मनांत येतो. शास्त्रामध्यें उलट आहे. कारण शास्त्रामध्यें 'स्वं रूपं०' (१।१।६८) या सूत्रावरून प्रायः सर्वच शब्दांपासून स्वभावतः त्याचें स्वरूप मनांत येत असतें. तेथें इति ह्या शब्दामुळें त्याजवळच्या शब्दापासून लोकांतल्यासारखा अर्थ मनांत येतो.

नवा कुण्डिका । नवा घटिकेति । किं च स्याद्यद्येतेषामपि विभाषासंज्ञा स्यात् । विभाषा दिक्समासे बहुव्रीहौ[१.१.२८]। दक्षिणपूर्वस्यां शालायाम् । अचिरकृतायां संप्रत्ययः स्यात् ॥

## न वा विधिपूर्वकत्वात्प्रतिषेध-संप्रत्ययो यथा लोके ॥५॥

न वैष दोषः । किं कारणम् । विधिपूर्वकत्वात् । विधाय किंचिन्न वेत्युच्यते । तेन प्रतिषेधवाचिनः संप्रत्ययो भवति । तद्यथा लोके । ग्रामो भवता गन्तव्यो न वा । नेति गम्यते ॥ अस्ति कारणं येन लोके प्रतिषेधवाचिनः संप्रत्ययो भवति । किं कारणम् । विलिङ्गं हि भवाँल्लोके निर्देशं करोति । अङ्ग हि समानलिङ्गो निर्देशः क्रियतां प्रत्यग्रवाचिनः संप्रत्ययो भविष्यति । तद्यथा । ग्रामो भवता गन्तव्यो नवः । प्रत्यग्र इति गम्यते ॥ एतच्चैव न जानीमः क्वचिद्व्याकरणे समानलिङ्गो निर्देशः क्रियत इति । अपि च

---

प्रतिषेध केला पाहिजे. जसें—नवा कुण्डिका, नवा घटिका. येथें नवा शब्दाचा नवीन असा अर्थ आहे.

मग त्या अर्थाला विभाषासंज्ञा झाली तर काय बिघडेल ?

'विभाषा दिक्समासे बहुव्रीहौ' (१।१।२८) येथील विभाषा शब्दापासून नवीन हा अर्थ मनांत येईल. तेव्हां नवीन हा अर्थ गम्यमान असतांना दिक्समासाला सर्वनामसंज्ञा होते असा अर्थ होईल. आणि दक्षिणपूर्वस्यां शालायां येथें नवीन झाला असा अर्थ मनांत येईल.

(वा. ५) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

विधिपूर्वकत्वात्, म्ह. कांहीं तरी विधान करून पुढें पाणिनीनें 'नवा' या अर्थाचा विभाषा शब्द उच्चारलेला दिसतो. त्यामुळें विभाषा याच्या अर्थामध्यें निषेध असावा असेंच चटदिशीं मनांत येते.[3]

जसें लोकामध्यें 'ग्रामो भवता गन्तव्यः' असें सांगून पुढें 'नवा' असें म्हटलें असतां त्या नवा शब्दापासून निषेध हा अर्थ मनांत येतो. तसें कांहीं एक विधान करून पुढें उच्चारलेल्या विभाषा-शब्दापासून निषेध अर्थ मनांत येतो.

पण लोकामध्यें 'नवा' शब्दापासून निषेध हा अर्थ जो मनांत येतो त्याचें कारण निराळें आहे.

तें काय ?

लोकामधील लिंगरहित जें उदाहरण तुम्हीं दाखविलें त्या ठिकाणीं अशा नवा-शब्दाचा निर्देश केला आहे म्हणून त्यापासून निषेध अर्थ मनांत येतो. आतां लिंगसहित अशा नवा-शब्दाचा प्रयोग करून पाहावा म्हणजे त्यापासून नवीन हा अर्थ खात्रीनें प्रतीत होईल. जसें—'ग्रामो भवता गन्तव्यो नवः' असें म्हटलें असतां तेथें नव शब्दापासून नवीन असा अर्थ प्रतीत होतो.[4]

असें जरी आहे तरी व्याकरणशास्त्रामध्यें कुठेंही लिंगसहित अशा विभाषा-शब्दाचा निर्देश केला आहे असें आम्हांला वाटत नाहीं. शिवाय, शब्दांचा एकमेकांशीं संबंध करण्याचें प्रयोक्त्याच्या मर्जीवर अवलंबून

---

३. 'विभाषा श्वेः' (६।१।३०) इत्यादि विभाषा-संज्ञोप्रदेशाचे ठिकाणीं उच्चारलेला विभाषाशब्द, श्वि-धातूला संप्रसारणाचें विधान करून नंतर उच्चारला असल्यामुळें तो प्रतिषेध या अर्थाला मनांत आणून देतो, अशी स्थिति आहे. यावरून असें ठरवितां येते की ज्यापेक्षां संज्ञाप्रदेशांतील विभाषाशब्द निषेधार्थाला दाखवितो त्यापेक्षां 'नवेति' या सूत्रामधील नवाशब्द निषेधार्थक गृहीत धरला आहे.

४. तसें शास्त्रामध्येंही विभाषाशब्द नवीन या अर्थाला दाखवील. तेव्हां संज्ञाप्रदेशांतील विभाषा-शब्दाच्या अर्थावरून प्रकृतसूत्रांतील नवा शब्दाचा अर्थ निश्चित ठरवितां येत नाहीं.

कामचारः प्रयोक्तुः शब्दानामभिसंबन्धे। तद्यथा। यवागूर्भवता भोक्तव्या नवा। यदा यवागूशब्दो भुजिनाभिसंबध्यते भुजिर्नवाशब्देन तदा प्रतिषेधवाचिनः संप्रत्ययो भवति। यवागूर्भवता भोक्तव्या नवा। नेति गम्यते। यदा यवागूशब्दो नवाशब्देनाभिसंबध्यते न भुजिना तदा प्रत्यग्रवाचिनः संप्रत्ययो भवति। यवागूर्नवा भवता भोक्तव्या। प्रत्यग्रेति गम्यते। न चेह वयं विभाषाग्रहणेन सर्वादीन्यभिसंबध्नीमः। दिक्समासे बहुव्रीहौ सर्वादीनि विभाषा भवन्तीति॥ किं तर्हि। भवतिरभिसंबध्यते। दिक्समासे बहुव्रीहौ सर्वादीनि भवन्ति विभाषेति॥

**विध्यनित्यत्वमनुपपन्नं प्रतिषेधसंज्ञाकरणात्॥६॥**

विधेरनित्यत्वं नोपपद्यते। शुशाव शुशुवतुः शुशुवुः। शिश्वाय शिश्वियतुः शिश्वियुः। किं कारणम्। प्रतिषेधसंज्ञाकरणात्। प्रतिषेधस्येयं संज्ञा क्रियते। तेन विभाषाप्रदेशेषु प्रतिषेधस्यैव संप्रत्ययः स्यात्॥

**सिद्धं तु प्रसज्यप्रतिषेधात्॥७॥**

सिद्धमेतत्। कथम्। प्रसज्यप्रतिषेधात्। प्रसज्य किंचिन्न वेत्युच्यते। तेनोभयं भविष्यति॥

**विप्रतिषिद्धं तु॥८॥**

विप्रतिषिद्धं तु भवति। अत्र न ज्ञायते केनाभिप्रायेण प्रसजति केन निवृत्तिं करोतीति॥

---

आहे. जसें—'यवागूर्भवता भोक्तव्या न वा' या वाक्यामध्यें जेव्हां यवागू शब्दाचा भोजनाशीं संबंध असतो, आणि भोजनाचा न वा शब्दाशीं संबंध असतो, तेव्हां न वा शब्दापासून निषेध अर्थ मनांत येतो. आतां जेव्हां न वा शब्द यवागू शब्दाशीं संबंध पावतो, व भोजनाशीं संबंध पावत नाहीं, तेव्हां नवा शब्दापासून नवीन म्ह. ताजी अशा अर्थाची प्रतीति होते. जसें—'यवागूर्नवा भवता भोक्तव्या' या वाक्यामध्यें वा शब्दाचा यवागू शब्दाशीं संबंध असल्यामुळें तेथें नवा शब्दापासून ताजी असा अर्थ मनांत येतो. तेव्हां 'विभाषा दिक्स०' या सूत्रामध्यें विभाषा शब्दाचा विभाषासर्वादिक शब्द असर्वादिकाशीं आम्ही संबंध करीत नाहीं.

तर काय?

सर्वनामें विभाषा होतात असा विभाषा शब्दाचा भवतिक्रियेशीं संबंध करतों.

(वा.६) विभाषाशब्दानें विधीचा विकल्प होणें जुळून येत नाहीं. त्यामुळें शुशाव, शुशुवतुः, शुशुवुः अशीं संप्रसारण (६।१।३०) केलेलीं रूपें आणि शिश्वाय, शिश्वियतुः, शिश्वियुः अशीं संप्रसारण न केलेलीं रूपें साधत नाहींत. कारण प्रतिषेध या अर्थाला विभाषासंज्ञा केली आहे. तेव्हां प्रदेशाचे ठिकाणीं प्रतिषेध या अर्थाचीच प्रतीति होईल.

(वा.७) विभाषा शब्दापासून विकल्प या अर्थाची प्रतीति होणें हें साधत आहे.

तें कसें?

अगोदर विधि करून मग त्याचा निषेध केला जातो. तेव्हां विधि आणि निषेध या उभयतांचे विधानाचे जोरावर या दोन्ही गोष्टी होतील. म्हणजे विकल्प होईल.

(वा.८) येथें काय अभिप्रायानें विधि करावयाचा व काय अभिप्रायानें त्याचा निषेध करावयाचा तें समजत नाहीं. तेव्हां विधि करून

---

५. व्याकरणशास्त्रामध्यें कुठेंही विभाषाशब्दाचा लिंगसहित असा निर्देश नसल्यामुळें तो विभाषाशब्द नवीन अर्थाला दाखवूं शकत नाहीं. तर कांहीं एकाचें विधान करून नंतर विभाषाशब्द उच्चारला असल्यामुळें तो निषेध या अर्थाचा बोधक आहे असें ठरतें.

**न वा प्रसङ्गसामर्थ्यादन्यत्र प्रतिषेधविषयात् ॥९॥**

न वैष दोषः । किं कारणम् । प्रसङ्गसामर्थ्यात् । प्रसङ्गसामर्थ्याच्चिच विधिर्भविष्यत्यन्यत्र प्रतिषेधविषयात् । प्रतिषेधसामर्थ्याच्च प्रतिषेधो भविष्यत्यन्यत्र विधिविषयात् ॥ तदेतत्क सिद्धं भवति । याप्राप्ते विभाषा । या हि प्राप्ते कृतसामर्थ्यस्तत्र पूर्वेण विधिरिति कृत्वा प्रतिषेधस्यैव संप्रत्ययः स्यात् । एतदपि सिद्धम् । कथम् । विभाषेति महती संज्ञा क्रियते । संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमुभयोः संज्ञा यथा विज्ञायेत नेति च वेति च । तत्र या तावदप्राप्ते विभाषा तत्र प्रतिषेध्यं नास्तीति कृत्वा वेत्यनेन विकल्पो भविष्यति । या हि प्राप्ते विभाषा तत्रोभयमुपस्थितं भवति नेति च वेति च । तत्र नेत्यनेन प्रतिषिद्धे वेत्यनेन विकल्पो

---

त्याची निवृत्ति करणें हें विरुद्ध दिसतें.

(वा.९) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

विधीच्या जोरावर प्रतिषेधाची वेळ सोडून विधि होईल. आणि निषेधाच्या जोरावर विधीची वेळ सोडून निषेधही होईल.

निषेध केल्याचे जोरावर विधीची कल्पना करावयाची आणि विधि व निषेध या उभतांचें विधान केल्याचे जोरावर पाळीपाळीनें उभयतांचीही प्रवृत्ति झाल्यामुळें अर्थात् विकल्प फलित होतो, हें म्हणणें तरी कुठें बरें जुळेल? जी अप्राप्तविभाषा आहे तेथें.[६]

पण जी प्राप्तविभाषा आहे तेथें स्वतंत्र पूर्वशास्त्रानें विधि सांगितला असल्यामुळें आणि त्याचा इतर ठिकाणीं म्ह. विकल्पाची प्राप्ति ज्या ठिकाणीं येत नाहीं त्या ठिकाणीं उपयोग होत असल्यामुळें तेथें विभाषापदापासून निषेधाचीच प्रतीति होईल. तेव्हां विकल्प साधत नाहीं.

तशा ठिकाणींही विभाषापदापासून विकल्पाची प्रतीति होईल.

ती कशी ?

विभाषा अशी मोठी संज्ञा केली आहे. संज्ञा म्हणून जी असते ती इतकी लहान असावी की तिच्यापेक्षां दुसरा लहान शब्द नसावा.

हें कशावरून ?

एका अगदीं लहान शब्दाखाली बहुत अर्थांचा संग्रह व्हावा या हेतूनेंच संज्ञा करावयाची असते म्हणून. तेव्हां तेथें विभाषा ही महासंज्ञा करण्याचें असें फल समजावें की न आणि वा या दोन शब्दांपासून प्रतीत होणाऱ्या दोन अर्थांची मिळून ही विभाषासंज्ञा समजावी. म्हणजे इति शब्दाचा न आणि वा या प्रत्येकापुढें संबंध करून न शब्दाचा अर्थ निषेध आणि वा शब्दाचा अर्थ विकल्प या दोन अर्थांना मिळून विभाषासंज्ञा होते. तेव्हां जी अप्राप्तविभाषा आहे तेथें निषेध ज्याचा करतां येईल असें पूर्वीं कांहीं सांगितलें नसल्यामुळें वा शब्दाच्या अर्थानें विकल्प होईल. आतां जी प्राप्तविभाषा (किंवा उभयत्र विभाषा) तेथें नेति म्ह. निषेध आणि वेति म्ह. विकल्प या उभयतांही अर्थांची उपस्थिति होते. त्यांत प्रथमतः निषेधांशानें प्राप्तविधीचा निषेध केला असतां मागून विकल्पांशानें विकल्प होईल.

---

६. नवाशब्दाच्या अर्थाला म्ह. निषेधाला विभाषासंज्ञा केली असल्यामुळें संज्ञाप्रदेशाचे ठिकाणीं विभाषापदापासून निषेधच मनांत येतो. परंतु अप्राप्तविभाषास्थलीं अन्य शास्त्रानें विधि केला नसल्यामुळें त्याचा निषेध सांगणें जुळत नाहीं. सबब तेथें निषेधाचे जोरावर विधीची कल्पना करावयाची. तेव्हां विधि आणि निषेध या उभयतांचें विधान केल्यामुळें उभयतांलाही सार्थक्य येण्यासाठीं पाळीपाळीनें दोघांची प्रवृत्ति होऊन विकल्प फलित होतो. उदा० 'जराया०' (७।२।१०१).

भविष्यति ॥ एवमपि

**विधिप्रतिषेधयोर्युगपद्वचनानुपपत्तिः ॥१०॥**

विधिप्रतिषेधयोर्युगपद्वचनं नोपपद्यते । शुशाव शुशुवतुः शुशुवुः । शिश्वाय शिश्वियतुः शिश्वियुः । किं कारणम् ।

**भवतीति चेन्न प्रतिषेधः ॥११॥**

भवतीति चेत्प्रतिषेधो न प्राप्नोति ॥

**नेति चेन्न विधिः॥१२॥**

नेति चेद्विधिर्न सिध्यति ॥

**सिद्धं तु पूर्वस्योत्तरेण बाधितत्वात् ॥१३॥**

सिद्धमेतत् । कथम् । पूर्वविधिमुत्तरो विधिर्बाधते । इतिकरणोऽर्थनिर्देशार्थ इत्युक्तम् ॥

**साध्वनुशासनेऽस्मिन्यस्य विभाषा तस्य साधुत्वम् ॥१४॥**

साध्वनुशासनेऽस्मिञ्शास्त्रे यस्य विभाषा क्रियते स विभाषा साधुः स्यात् । समासश्चैव हि विभाषा तेन समासस्यैव विभाषा साधुत्वं स्यात् । अस्तु । यः साधुः स प्रयोक्ष्यतेऽसाधुर्न प्रयोक्ष्यते । न चैव हि कदाचिद्राजपुरुष इत्यस्यामवस्थाया-मसाधुत्वमिष्यते । अपि च ।

---

निषेध आणि विकल्प या दोन्ही अर्थांना मिळून विभाषासंज्ञा केली तरीही—

(वा.१०) एकाच वेळीं विधि आणि निषेध या दोन्ही गोष्टी जुळत नाहींत. तेव्हां शुशाव, शिश्वाय अशीं दोन प्रकारचीं रूपें होणार नाहींत.

काय कारण ?

(वा.११) एखादें कार्य होतें असें म्हटलें तर त्याच वेळीं तें होत नाहीं असें म्हणतां येत नाहीं.

(वा.१२) बरें, होत नाहीं असें म्हटलें तर त्याच वेळीं होतें असें म्हणतां येणार नाहीं.

(वा.१३) विधि आणि निषेध हे दोन्ही एका ठिकाणीं जुळतात.

तें कसें ?

पूर्वविधीचा पुढील विधि बाध करतो आणि इति शब्दाच्या जोरावर येथें न आणि वा या दोन्ही शब्दांचे अर्थच घ्यावयाचे असे पूर्वीं सांगितलेंच आहे.

(वा.१४) शब्दांच्या साधुत्वाचें अनुशासन करणाऱ्या म्ह. अमुक शब्द साधु आहेत असें सांगणाऱ्या या शास्त्रामध्यें ज्या कार्याच्या संबंधानें विकल्प सांगण्यांत येतो त्या कार्याचा विकल्प न होतां तें कार्य केलेल्या शब्दाचें साधुत्व विकल्पानें होईल. समासच विकल्पानें सांगितला आहे. तेव्हां त्या समासाचा विकल्प न होतां त्या सामासिक शब्दाचें साधुत्व विकल्पानें समजला जाईल. म्हणजे एकदां असाधुत्वही येईल.

साधुत्वाचा विकल्प झाला तर होऊं दे. ज्या शब्दाला साधुत्व असेल त्याचा प्रयोग केला जाईल. आणि असाधुशब्दाचा प्रयोग करण्यांत येणार नाहीं.

पण समास केला असतां म्ह. 'राजपुरुषः'

---

७. त्या दोन अर्थांमध्यें विरोध असल्यामुळें एकानें दुसऱ्याचा बाध करणें जरूरच आहे. त्यांत न हा शब्द पूर्वीं घातला असल्यामुळें त्याच क्रमानें त्याचा अर्थही पूर्वीं मनांत येतो. नंतर त्याचा वा शब्दापासून मनांत आलेल्या पाक्षिक विधीनें एकदां बाध होतो. तेव्हां विभाषास्थलीं प्रथमतः न या निषेध अंशाची प्रवृत्ति होते. तेव्हां 'विभाषाश्वेः' (६।१।३०) इत्यादि ठिकाणीं कित् प्रत्यय पुढें असतांना प्राप्त झालेल्या संप्रसारणाचा निषेध केल्या-नंतर सर्वच ठिकाणीं एकदां संप्रसारण होतें असा विधिमुखानें विकल्प प्रवृत्त होतो त्यामुळें शुशाव, शिश्वाय इत्यादि दोन्ही प्रकारचीं रूपें साधतात.

८. व्याकरणशास्त्रानें शब्द सिद्ध केले जात नाहींत. कारण शब्द हे नित्य असल्यामुळें ते सिद्धच आहेत. तेव्हां व्याकरणशास्त्राचा उपयोग इतकाच की अमुक शब्द साधु आहे हें समजावें. 'शब्द अनित्य आहेत' असा नैयायिकांचा पक्ष आहे. त्या पक्षीं 'शब्द सिद्ध करणें' हें व्याकरणशास्त्राचें काम आहे असें म्हणतां येतें.

## द्वैधाप्रतिपत्तिः ॥१५॥

द्वैधं शब्दानामप्रतिपत्तिः । इच्छामश्च पुनर्विभाषाप्रदेशेषु द्वैधं शब्दानां प्रतिपत्तिः स्यादिति तच्च न सिध्यति ॥ यस्य पुनः कार्याः शब्दा विभाषासौ समासं निर्वर्तयति। यस्यापि नित्याः शब्दास्तस्याप्येष न दोषः । कथम् । न विभाषाग्रहणेन साधुत्वमभिसंबध्यते । किं तर्हि। समाससंज्ञाभिसंबध्यते । समास इत्येषा संज्ञा विभाषा भवतीति । तद्यथा । मेध्यः पशुर्विभाषितः । मेध्योऽनड्वान्विभाषित इति । नैतद्विचार्यतेऽनड्वान्नानड्वानिति । किं तर्हि । आलब्धव्यो नालब्धव्य इति ॥

## कार्ये युगपदन्वाचये यौगपद्यम्॥१६॥

कार्येषु शब्देषु युगपदन्वाचयेन च यदुच्यते तस्य युगपद्वचनता प्राप्नोति । तव्यत्तव्यानीयरः [३.१.९६] ढक् च मण्डूकात् [४.१.११९] इति ॥ यस्य पुनर्नित्याः शब्दाः प्रयुक्तानामसौ साधुत्वमन्वाचष्टे । ननु च यस्यापि कार्या-

---

या समासिक शब्दाला केव्हांही असाधुत्व इष्ट नाहीं. तें आतां मानावें लागेल ना ?

(वा.१५) शिवाय, साधुत्वाचा विकल्प झाला असतां, दोन प्रकारचे शब्द निष्पन्न होत असतात ते होणार नाहींत. आणि आम्ही तर जेथें विकल्प सांगितला असेल तेथे दोन्ही प्रकारचे शब्द प्रयोगांत यावेत असें इच्छीत आहोंत. तें साधत नाहीं.

आतां ज्याच्या मतीं शब्द हे अनित्य आहेत तो विकल्पानें समास करतो. तेव्हां राज्ञः पुरुषः आणि राजपुरुषः असे दोन प्रकारचे शब्द साधु समजून उपयोगांत आणता येतात.

पण ज्याच्या मतीं शब्द हे नित्य आहेत त्याच्याही मतीं 'द्वेधाऽप्रतिपत्तिः' हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

विभाषेचा साधुत्वाशीं संबंध करूं नये[९] म्हणजे झालें.

तर कोणाशीं तिचा संबंध करावयाचा ?

समाससंज्ञेशीं विभाषेचा संबंध करावयाचा म्हणजे समास ही जी संज्ञा, ती विकल्पानें होते. तें जसें—'यज्ञिय पशु विभाषित आहे' किंवा 'यज्ञिय बैल विभाषित आहे' असें सांगितलें असतां तेथें तो पशु आहे किंवा नाहीं व बैल आहे किंवा नाहीं असा विभाषेचा पशूशीं किंवा बैलाशीं संबंध होत नाहीं.[१०]

तर तेथें कोणाचा विकल्प समजण्यांत येतो ?

याज्ञिक पशूचें आलंभन करणें, म्ह. हिंसा करणें या क्रियेचा विकल्प समजण्यांत येतो.[११]

(वा.१६) अनित्य शब्दांचे ठिकाणीं, यौगपद्यानें किंवा समुच्चयानें ज्यांचें विधान केलें आहे असें म्हणजे अनुक्रमें तव्यत्, तव्य, अनीयर् हे प्रत्यय (३।१।९६) आणि 'ढक्च मण्डूकात्' (४।१।११) यानें सांगितलेले ढक्, अण् हे प्रत्यय यांचा एका कालीं प्रयोग प्राप्त होत आहे. कार्यशब्दवादी फक्त सूत्रावर दृष्टि ठेवून शब्द बनविणार. तेव्हां त्या सूत्रानें तव्यत् ,तव्य, इत्यादि प्रत्ययांचे युगपत्

---

९. कारण शब्दाला साधुत्व देणें किंवा न देणें हें व्याकणरशास्त्रकाराला करतां येत नाहीं. फक्त साधु शब्द कोणते व ते कसे ओळखावेत एवढेंच त्यांना दाखवितां येतें.

१०. कारण सूत्रकारांनासुद्धां पशूचा पशूपणा व बैलाचा बैलपणा एकदां देखील नाहींसा करतां येत नाहीं.

११. क्रिया करणें किंवा न करणें हें मनुष्याच्या स्वाधीन असल्यामुळें क्रियेचा विकल्प सूत्रकारांना सांगतां येतो. तेव्हां शब्द नित्य मानले असतांही त्याच्या साधुत्वाचा विकल्प करणें हें शास्त्रकारांच्या स्वाधीन नसल्यामुळें समाससंज्ञेचा विकल्प मानतां येईल, म्हणून कांहीं दोष येत नाहीं.

स्तस्याप्येष न दोषः। कथम्। प्रत्ययः परो भवतीत्युच्यते न चैकस्याः प्रकृतेरनेकस्य प्रत्ययस्य युगपत्परत्वेन संभवोऽस्ति। नापि ब्रूमः प्रत्ययमाला प्राप्नोतीति। किं तर्हि। कर्तव्यमिति प्रयोक्तव्ये युगपद्द्वितीयस्य तृतीयस्य च प्रयोगः प्राप्नोतीति। नैष दोषः। अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः। अर्थं संप्रत्याययिष्यामीति शब्दः प्रयुज्यते। तत्रैकेनोक्तत्वात्तस्यार्थस्य द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यमुक्तार्थानामप्रयोग इति॥

## आचार्यदेशशीलने च तद्विषयता॥१७॥

आचार्यदेशशीलनेन यदुच्यते तस्य तद्विषयता प्राप्नोति। इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य [६.३.६१] प्राचामवृद्धात्फिन्बहुलम् [४.१.१६०] इति गालवा एव ह्रस्वान्प्रयुञ्जीरन्प्राक्षु चैव हि फिन्स्यात्। तद्यथा। जमदग्निर्वा एतत्पञ्चममवदानमवाद्यत्तस्मान्नाजामदग्न्यः पञ्चावत्तं जुहोति॥ यस्य पुनर्नित्याः शब्दा गालवग्रहणं तस्य पूजार्थं देशग्रहणं च कीर्त्य-

---

विधान केलें आहे. म्हणून तिन्ही प्रत्यय एका कालीं करण्याची पाळी येते. आतां ज्याच्या मतीं शब्द हे नित्य आहेत तो प्रयोगावर दृष्टि ठेवून शब्द तयार करणार. त्या प्रयोगामध्यें तव्यदादिक प्रत्ययांची एका कालीं उत्पत्ति दिसून येत नसल्यानें पर्यायानें तव्यदादि तीन प्रत्ययांचा प्रयोग करणार. तेव्हां त्याच्या मतीं 'तव्यदादिकाचा युगपत् प्रयोग होईल' असा दोष येत नाहीं.

ज्याच्या मतानें शब्द हे अनित्य होत त्याच्याही मतीं हा दोष येत नाहीं.

तो कसा?

प्रत्यय पुढें होतो असें 'परश्च' (३।१।२) सूत्रानें सांगितलें आहे. तेव्हां एका प्रकृतीच्या पुढें अनेक प्रत्ययांचा युगपत्प्रयोग संभवत नाहीं.

एका प्रकृतीच्या पुढें अनेक प्रत्ययांचा युगपत्प्रयोग करणें प्रसक्त होतें, असें आम्ही म्हणत नाहीं.

तर आपलें काय म्हणणें आहे?

कर्तव्य या शब्दाचा तव्यत् प्रत्यय करून प्रयोग करण्याची इच्छा असतां त्याच्याबरोबरच पुनः तव्य हा दुसरा प्रत्यय करून कर्तव्यशब्दाचा आणि तिसरा अनीयर प्रत्यय करून करणीय या शब्दाचाही प्रयोग प्रसक्त होतो, असें आमचें म्हणणें आहे.

हा दोष येत नाहीं. कारण, दुसऱ्याला कांहीं एक अर्थ कळवावा या उद्देशानें वक्ता शब्दप्रयोग करीत असतो. तेथें तो एका शब्दानें अर्थ कळविला गेल्यामुळें त्याच अर्थाचा दुसरा किंवा तिसरा शब्द प्रयोगांत आणण्याचें कारण नाहीं. जो अर्थ एका शब्दानें कळविला तोच अर्थ कळविण्यासाठीं पुनः शब्दप्रयोग करूं नये, असा न्याय आहे म्हणून.

(वा. १७) आचार्यांचा किंवा देशाचा उल्लेख करून जें सांगितलें आहे तादृश कार्यघटित शब्दाचा त्या आचार्यांच्या वंशांतील किंवा त्या देशांतील लोकांनाच प्रयोग करण्याचा अधिकार पोचतो. जसें—'इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य' (६।३।६१) येथें गालवनामक ऋषीचा उल्लेख करून ह्रस्व सांगितला आहे. तसेंच 'प्राचामवृद्धात्फिन्०' (४।१।१६०) येथें प्राग्देशाचा उल्लेख करून फिन् प्रत्यय सांगितला आहे. म्हणून गालववंशांतीलच ह्रस्वघटित प्रयोग करतील; आणि प्राग्देशामध्येंच फिन् प्रत्ययाचा प्रयोग होईल. जसें—'जमदग्निर्वा पञ्चममवदानमवाद्यत् तस्मान्नाजामदग्न्यः पञ्चावत्तं जुहोति' ज्यापेक्षां पांचवें अवदान जमदग्निनामक ऋषि ग्रहण करता झाला त्यापेक्षां जामग्न्यव्यतिरिक्त मनुष्यानें पञ्चावत्त हवन करूं नये, असें सूत्रांत सांगितलें आहे तसें. आतां ज्याच्या मतीं शब्द नित्य आहेत त्याच्या मतीं गालवाचार्यांचा

र्थम् । ननु च यस्यापि कार्यास्तस्यापि पूजार्थं गालवग्रहणं स्याद्देशग्रहणं च कीर्त्यर्थम् ॥

**तत्कीर्तने च द्वैधाप्रतिपत्तिः ॥१८॥**

तत्कीर्तने च द्वैधं शब्दानामप्रतिपत्तिः स्यात् । इच्छामश्च पुनराचार्यग्रहणेषु देशग्रहणेषु च द्वैधं शब्दानां प्रतिपत्तिः स्यादिति तच्च न सिध्यति ॥

**अशिष्यो वा विदितत्वात् ॥१९॥**

अशिष्यो वा पुनरयं योगः । किं कारणम् । विदितत्वात् । यदनेन योगेन प्रार्थ्यते तस्यार्थस्य विदितत्वात् । येऽपि ह्येतां संज्ञां नारभन्ते तेऽपि विभाषेत्युक्ते ऽनित्यत्वमवगच्छन्ति । याज्ञिकाः खल्वपि संज्ञामनारभमाणा विभाषेत्युक्ते ऽनित्यत्वमवगच्छन्ति । तद्यथा । मेध्यः पशुर्विभाषितः । मेध्योऽनड्वान्विभाषित इति । आलब्धव्यो नालब्धव्य इति गम्यते ॥ आचार्यः खल्वपि संज्ञामारभमाणो भूयिष्ठमन्यैरपि शब्दैरेतमर्थं संप्रत्याययति । बहुलम् अन्यतरस्याम् उभयथा वा एकेषामिति ॥

**अप्राप्ते त्रिसंशयाः ॥ २० ॥**

इत उत्तरं या विभाषा अनुक्रमिष्यामोऽप्राप्ते ता द्रष्टव्याः । त्रिसंशयास्तु भवन्ति प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति ॥

---

उल्लेख त्याची पूज्यता दाखविण्यासाठीं आहे आणि देशाचा निर्देश त्या देशांतील लोकांची कीर्ति होण्याकरतां केला आहे असें समजतां येते.

अहो, पण ज्याच्या मतीं शब्द हे कार्य (निष्पाद्य) होत, त्याच्याही मतीं गालवाचार्यांचा उल्लेख त्याची पूज्यता दाखविण्यासाठीं होईल आणि देशाचा उल्लेख त्या देशांतील लोकांची कीर्ति होण्याकरितां होईल. 'ज्यापेक्षां गालवाचार्यांनें ह्रस्वाचा प्रयोग केला आहे, तूंही ह्रस्वाचा प्रयोग कर,' असा विधि करण्यांत उघड उघड गालवाचार्यांची स्तुति होत आहे.

(वा.१८) आचार्यांचा किंवा देशाचा उल्लेख केला असेल तेथें शब्दांचीं दोन प्रकारचीं रूपें समजणार नाहींत. आम्ही तर आचार्यांचा किंवा देशाचा निर्देश केला असेल तेथें विकल्पाप्रमाणें शब्दांची दोन प्रकारचीं रूपें इच्छितों; तीं साधत नाहींत.

(वा.१९) 'नवेति विभाषा' हें सूत्र करावयास नको.

काय कारण ?

या सूत्रानें जो अर्थ कथन केला आहे तो अर्थ लोकप्रसिद्धच आहे. ज्या लोकांनीं ही विभाषासंज्ञा केली नाहीं तेही लोक विभाषा असें म्हटलें असतां अनित्य असा त्याचा अर्थ समजतात. याज्ञिक लोकही विभाषासंज्ञा सांगितल्यावांचून विभाषा असें म्हटलें असतां अनित्य हा त्याचा अर्थ समजतात. तें असें–मेध्यः पशुर्विभाषितो मेध्योऽनड्वान् विभाषितः असें सांगितलें असतां आलब्धव्य आहे किंवा आलब्धव्य नाहीं असें समजलें जातें. पाणिनि आचार्यही विभाषासंज्ञा सांगून बहुत ठिकाणीं बहुलम्, अन्यतरस्याम्, उभयथा, वा, एकेषाम् इत्यादि अन्य शब्दांनींही विभाषाशब्दाचा अर्थ कळवीत आहे. तेव्हां 'ह्रक्रोरन्यतरस्याम्' इत्यादिक प्राप्ताप्राप्तविभाषेचे ठिकाणीं अन्यतरस्याम् या शब्दापासून जशी निषेधपूर्वक विकल्पात्मक अर्थाची प्रतीति होते तशी विभाषा या शब्दापासूनही होईल म्हणून 'नवेति' हें संज्ञासूत्र करावयास नको.

(वा.२०) येथून पुढें आम्ही ज्या विभाषा विचारांत घेणार आहोंत त्या अप्राप्तविभाषा होत असें समजावें. त्या विभाषांविषयीं तीन्ही विभाषांचा संशय येतो. म्हणजे ही काय प्राप्त विभाषा समजावी, अथवा अप्राप्तविभाषा समजावी, किंवा उभयविभाषा समजावी, अशा

**द्वन्द्वे च विभाषा जसि [२०.१]॥**

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वा प्राप्ते कथं वोभयत्र। उभयशब्दः सर्वादिषु पठ्यते तयपश्चायजादेशः क्रियते तेन वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वा प्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते। अयच्प्रत्ययान्तरम्। यदि प्रत्ययान्तरमुभयीतीकारो न प्राप्नोति। मा भूदेवम्। मात्रच इत्येवं भविष्यति। कथम्। मात्रजिति नेदं प्रत्ययग्रहणम्। किं तर्हि। प्रत्याहारग्रहणम्। क संनिविष्टानां प्रत्या-

---

तीन प्रकारच्या संशयाला पात्र होत आहेत.

(पा. १.१.३१,३२) 'द्वंद्वे च' व 'विभाषा जसि' या प्रकरणामध्यें जी विभाषा सांगितली आहे (१।१।३३) ती काय प्राप्तविभाषा आहे, अथवा अप्राप्तविभाषा, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.[१२]

ही विभाषा प्राप्तविभाषा कशी बरें होऊं शकते? किंवा अप्राप्तविभाषा कशी बरें संभवते? आणि उभयत्रविभाषा कशी बरें होते? उभयशब्दाचा सर्वादिगणामध्यें पाठ केला आहे. आणि तयप्प्रत्ययाचे स्थानीं अयजादेशाचें विधान केलें आहे (५।२।४४). तेव्हां उभयशब्दाला सर्वनामसंज्ञा नित्य प्राप्त झाली असतां तेथेंच ह्यानें विकल्प करावयाचा, किंवा द्वितय वगैरे शब्दांचाच सर्वनामसंज्ञा मुळींच प्राप्त नसतांना तेथेंच विकल्प करावयाचा किंवा दोन्ही ठिकाणीं विकल्प करावयाचा असा संशय येतो.

तयप्प्रत्ययान्तासंबंधी विभाषा, ती अप्राप्तविभाषा समजावी. कारण 'उभादुदात्तो०' यानें तयप्प्रत्ययाचे स्थानीं अयजादेश करून उभय शब्द बनवावयाचा नाहीं, तर उभशब्दाच्यापुढें तयप्प्रत्ययाचा बाधक असा स्वतंत्र अयच् प्रत्यय करून बनवावयाचा.

जर उभशब्दाच्यापुढें स्वतंत्र अयच्प्रत्यय केला जात आहे तर उभयी येथें 'टिड्ढाणञ्' (४।१।१५) यानें तयप्प्रत्ययन्ताहून सांगितलेला ङीप् प्राप्त होऊं शकत नाहीं.

तयबन्ताहून सांगितलेला ङीप् न झाला तरी त्याच सूत्रानें मात्र अजन्ताहून सांगितलेला ङीप् होईल.

तो कसा?

'टिड्ढा०' या सूत्रामध्यें मात्रच् हा जो शब्द घातला आहे तो प्रत्यय नव्हे.

तर कोण आहे?

तो प्रत्याहार आहे.

कुठें निर्दिष्ट केलेल्यांचा हा प्रत्याहार केला आहे?

'प्रमाणे द्वयसज्०' (५।२।३७) या सूत्रांतील मात्र शब्दाला आरंभ करून 'द्वित्रिभ्यां तयस्या-

---

१२. 'प्रथमचरम०' या सूत्रामध्यें सर्वादीनि या पदाची अनुवृत्ति आणून तें तयप्रत्ययान्ताला विशेषण लाविलें तर सर्वादिगणपठित अशा तयप्रत्ययान्ताला विकल्पानें सर्वनामसंज्ञा होते असा 'प्रथमचरम' सूत्रांतील तयपदाचा वाक्यार्थ ठरतो. तेव्हां उभयशब्दाच्या पुढें जस् प्रत्यय केला असतां उभयशब्दाला सर्वादिगणपाठामुळें प्राप्त झालेल्या संज्ञेचा तयग्रहणानें जस् पुढें असतां विकल्प सांगितल्यामुळें तयप्रत्ययान्ताला सांगितलेली विभाषा, ही प्राप्तविभाषा होऊं शकते. आतां सर्वादीनि याची निवृत्ति केली आणि पूर्वविप्रतिषेध गृहीत धरला तर ही अप्राप्तविभाषा होते. म्हणजे गणपाठनिबन्धनसंज्ञा जस्व्यतिरिक्तस्थलीं सावकाश आहे. व तयप्रत्ययान्ताला सांगितलेली विभाषा द्वितय इत्यादि शब्दस्थलीं सावकाश आहे. आणि उभयशब्दाच्या पुढें जस् प्रत्यय केला असतां नित्य व विकल्प अशा दोन्ही संज्ञा प्राप्त असतां पूर्वविप्रतिषेधानें नित्यसंज्ञा करावयाची तेव्हां द्वितय शब्दाचे ठिकाणीं संज्ञेची प्राप्ति नसतां तयग्रहणानें विकल्प केल्यानें अप्राप्तविभाषा होऊं शकते, आणि परविप्रतिषेध गृहीत धरला तर उभयशब्दस्थलीं गणपाठास्तव प्राप्त असलेल्या संज्ञेचा विकल्प आणि द्वितयशब्दस्थलीं अप्राप्तसंज्ञेचा विकल्प केल्यानें उभयत्रविभाषा होते.

हारः । मात्रशब्दात्प्रभृत्यायचश्चकारात् । यदि प्रत्याहारग्रहणं कति तिष्ठन्ति अत्रापि प्राप्नोति । अत इति वर्तते । एवमपि तैलमात्रा घृतमात्रा अत्रापि प्राप्नोति । सदृशस्याप्यसंनिविष्टस्य न भविष्यति प्रत्याहारेण ग्रहणम् ॥

**ऊर्णोर्विभाषा [२०.२]**

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । असंयोगाल्लिट् कित् [१.२.५] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते ॥ अन्यद्धि कित्त्वमन्यन्ङित्त्वम् ।

**एकं चेन्ङित्कितौ ॥**

यद्येकं ङित्कितौ ततोऽस्ति संदेहः । अथ हि नाना नास्ति संदेहः ।

---

यज्वा' (५।२।४३) या सूत्रांतील अयच् प्रत्ययाच्या चकारापर्यंत सूत्रसमुदायामध्यें सांपडलेल्या प्रत्ययांचा हा प्रत्याहार आहे.

जर मात्रच् शब्द प्रत्याहार आहे तर 'कति तिष्ठन्ति' येथेंही कति शब्दाहून ङीप् प्राप्त होत आहे.[13]

'टिड्ढा०' या सूत्रामध्यें 'अजाद्यतः' (४।१।४) या सूत्रांतून 'अतः' या पदाची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां टिदाद्यवयव जो अकार तदन्ताहून ङीप् होतो, असा 'टिड्ढा०' याचा अर्थ होतो. कतिशब्द टिदाद्यन्त आहे तरी अकारान्त नसल्यानें ङीप् होत नाहीं.

तरीही तैलमात्रा,[14] घृतमात्रा येथें ङीप् प्राप्त होतो.

प्रत्याहारामध्यें सांपडलेल्या मात्रशब्दासारखा वरील उदाहरणांतील मात्रशब्द आहे; तरी प्रत्याहारामध्यें मात्र हा प्रत्यय आहे, तसा हा प्रत्यय नसल्यामुळें या मात्रशब्दाचें त्या प्रत्याहारामध्यें ग्रहण होणार नाहीं.

(पा. १.२.३) ऊर्णु धातूच्या पुढील इडादि प्रत्ययाला जो ङित्वाचा विकल्प केला आहे ती काय प्राप्तविभाषा किंवा अप्राप्तविभाषा अथवा उभयत्रविभाषा असा संशय येतो.

वरील विभाषा ही, प्राप्तविभाषा कशी बरें होऊं शकते ? किंवा अप्राप्तविभाषा कशी संभवते ? अथवा उभयत्रविभाषा कशी बरें होईल ?

'असंयोगाल्लिट् कित्' (१।२।५) यानें नित्य प्राप्त झालें असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर[15] ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच[16] ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं[17] विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

ही अप्राप्तविभाषाच समजावी. कारण, कित्त्व निराळें आणि ङित्व निराळें.

ङित् आणि कित् हे एकच समजले जातील तर येथें संशय येण्याला जागा आहे, आणि जर ङित् आणि कित् हे वस्तुतः निराळेच आहेत तर येथें संशयच मुळीं येतच नाहीं.

ङित् आणि कित् हे निराळे आहेत तरी

---

१३. कारण डति हा प्रत्यय (५।२।४१) मात्रच्-प्रत्याहारामध्यें सांपडत आहे.

१४. प्रमाण या अर्थाच्या मात्रशब्दाबरोबर तैलशब्दाचा तत्पुरुष समास (२।१।७२) येथें झाला आहे. मात्रच् प्रत्याहारामध्यें जो मात्रशब्द दिसतो त्यासारखाच हा आहे म्हणून हाही प्रत्याहारामध्यें आहे असें गृहीत धरून ही शंका केली आहे.

१५. कित्वाचा उपयोग ऊर्णुधातुस्थलीं गुणाचा निर्बंध (१।१।५) हा होय. आणि तेथें ङित्वाचाही उपयोग तोच आहे म्हणून कित्त्व काय व ङित्त्व काय एकच असें समजून हा विचार केला आहे. असंयोगाल्लिट् कित् येथें विभाषोर्णोः हे सूत्र उपस्थित करून त्यामध्यें अपित् व लिट् या पदांचा संबंध करून स्वतंत्र वाक्यार्थ केला म्हणजे ती प्राप्तविभाषा होते.

१६. विभाषोर्णोः याचा स्वदेशींच स्वतंत्र वाक्यार्थ करावयाचा. लिटामध्यें त्याचा असंयोगात् यानें परत्वास्तव बाध केला म्हणजे लिटाशिवाय इतर ठिकाणींच उदाहरणें 'विभाषोर्णोः' याला मिळतात.

१७. लिटामध्येंही विभाषोर्णोः यानें असंयोगात्० याचा पूर्वविप्रतिषेधानें बाध होतो.

यद्यपि नानैवमपि संदेहः । कथम् । प्रौर्णुवीति । सार्वधातुकमपित् [१.२.४] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते ॥

## विभाषोपयमने [२०.३] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । गन्धने [१.२.१५] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते । गन्धन इति निवृत्तम् ॥

## अनुपसर्गाद्वा [२०.४]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । वृत्तिसर्गतायनेषु क्रमः [१.३.३८] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते । वृत्यादिष्विति निवृत्तम् ॥

---

देखील येथें संशय येतो.

तो कसा ?

प्रौर्णुवि[१८] येथें 'सार्वधातुकमपित्' या पुढील सूत्रानें नित्य प्राप्त झालें असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी.[१९]

(पा.१.२.१६)ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, व अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

गन्धन अर्थ गम्यमान असतांना पूर्वसूत्रानें कित्त्व नित्य प्राप्त होतें तेथेंच ह्यानें विकल्प केलीं[२०] तर प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच[२१] ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला[२२] तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण, येथें गन्धने याची अनुवृत्ति नाहीं.

(पा.१.३.४३) ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, व अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

वृत्तिसर्गतायनेषुक्रमः (१।३।३८) यानें नित्य आत्मनेपद प्राप्त झालें असतां तेथेंच[२३] ह्यानें विकल्प केला तर प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच[२४] ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं[२५] विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण, येथें 'वृत्तिसर्गतायनेषु' या पदाची अनुवृत्ति नाहीं.

---

१८. प्र उपसर्गपूर्वक ऊर्णु धातूहून लङ् प्रत्यय, त्याचे स्थानीं आत्मनेपद उत्तमपुरुष एकवचन इट् प्रत्यय केला आहे. विभाषोर्णोः या सूत्रामध्यें मागून अनुवृत्त आलेल्या इट् या शब्दानें प्रत्ययच घेतला तर प्राप्तविभाषा होते आगमच घेतला तर अप्राप्तविभाषा होते आणि प्रत्यय व आगम या दोघाचेंही ग्रहण केलें तर उभयत्रविभाषा होते.

१९. कारण पूर्वसूत्रामध्यें इट् या शब्दानें आगमाचेंच ग्रहण केलें असल्यामुळें येथें तोच अर्थ घेतला पाहिजे.

२०. कारण येथें गन्धने याची अनुवृत्ति आहे.

२१. गन्धन हा अर्थ नसेल त्या ठिकाणीं. येथें गन्धनें याची अनुवृत्ति नाहीं आणि गन्धन अर्थ असतांना पूर्वविप्रतिषेधानें नित्य कित्वच होतें.

२२. गन्धने याची अनुवृत्ति नाहीं. आणि पूर्वविप्रतिषेधही नाहीं.

२३. येथें वृत्तिसर्गतायनेषु या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे तेथेंच हा विकल्प होतो.

२४. वृत्ति, सर्ग, तायन हे अर्थ नसतील त्या ठिकाणीं. येथें वृत्तिसर्गतायनेषु याची अनुवृत्ति नाहीं. आणि वृत्ति वगैरे अर्थ असतांना पूर्वविप्रतिषेधानें नित्य आत्मनेपदच होतें.

२५. वृत्तिसर्गतायनेषु याची अनुवृत्ति नाहीं, आणि पूर्वविप्रतिषेधही नाहीं.

## विभाषा वृक्षमृगादीनाम् [२०.५]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। जातिरप्राणिनाम् [२.४.६] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते। जातिरप्राणिनामिति निवृत्तम् ॥

## उषविदजागृभ्योऽन्यतरस्याम्[२०.६]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। प्रत्ययान्तात् (३.१.३५) इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते। प्रत्ययान्ता धात्वन्तराणि ॥

## दीपादीनां विभाषा [२०.७]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। भावकर्मणोः [३.१.६६] इति वा नित्ये

---

(पा.२.४.१२) ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

जातिरप्राणिनाम् (२।४।६) यानें नित्य एकवद्भाव प्राप्त झाला असतां तेथेंच ह्यानें विकल्प[२६] केला तर प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं[२७] विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण, 'जातिरप्राणिनाम्' याची अनुवृत्ति येथें नाहीं[२८].

(पा.३.१.३८)ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

प्रत्ययान्त हे धातु असतील तेथें प्रत्ययान्त म्हणून नित्य आम्प्रत्यय (३।१।३५)[२९] प्राप्त झाला असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला[३०] तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण उष्, विद्, जागृ या साध्या धातूंपेक्षां त्याच धातूहून प्रत्यय करून झालेले धातु हे अगदीं निराळेच आहेत.

(पा.३.१.६१)ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, अणि उभयत्रविभाषा कशी ?

'भावकर्मणोः'(३।१।६६)यानें नित्य चिण्प्रत्यय प्राप्त झाला असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते[३१], इतर

---

२६. कारण येथें जातिरप्राणिनाम् याची अनुवृत्ति आहे. वृक्ष, मृग वगैरे शब्दानीं त्यांच्या प्रतिकृति घेतल्या म्हणजे त्या अप्राणि अशा संभवतात.

२७. वृक्ष, मृग वगैरे हे मुख्य आणि त्यांच्या प्रतिकृति या दोन्ही ठिकाणीं. येथें जातिरप्राणिनाम् याची अनुवृत्ति नाहीं.

२८. आणि वृक्ष, मृग यांच्या प्रतिकृति घेण्याला प्रमाण नाहीं.

२९. येथेंही प्रत्ययात् या पदाचा संबंध आहे असें गृहीत धरलें तर.

३० येथें प्रत्ययात् याचा संबंध नाहीं. आणि उष, विद वगैरे धातु आणि तेच प्रत्ययान्त धातु हे एकच आहेत असें गृहीत धरलें आहे.

३१. चिण्भावकर्मणोः येथें दीपजन० हें सूत्र उपस्थित करून तेथें भावकर्मणोः याचा संबंध करून स्वतंत्र वाक्यार्थ केला म्हणजे ती प्राप्तविभाषा होते आणि स्वदेशींच वाक्यार्थ केला आणि त्यामध्यें भावकर्मणोः याचा व कर्तरि याचा संबंध केला नाहीं म्हणजे ती उभयत्रविभाषा होते.

प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते। कर्तरीति हि वर्तते । एवमपि संदेहो न्याय्ये वा कर्तरि कर्मकर्तरि वेति। नास्ति संदेहः। सकर्मकस्य कर्ता कर्मवद्भवत्यकर्मकाश्च दीपादयः। अकर्मका अपि वै सोपसर्गाः सकर्मका भवन्ति । कर्मोपदिष्टा विधयः कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां वा भवन्ति कर्तृस्थभावकाश्च दीपादयः ॥

### विभाषाग्रेप्रथमपूर्वेषु [२०.८]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्न वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। आभीक्ष्ण्ये [३.४.२२] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते। आभीक्ष्ण्य इति निवृत्तम् ॥

### तृनादीनां विभाषा [२०.९]

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। आक्रोशे [६.२.१५८] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्न वाप्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते। आक्रोश इति निवृत्तम्॥

---

ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण 'दीपजन०' ह्या सूत्रामध्यें कर्तरि याची अनुवृत्ति आहे.

तरी देखील संशय उत्पन्न होतो की तो कर्ता योग्य कर्ताच पाहिजे किंवा कसा[32] तरी का होईना, कर्ता असला म्हणजे झालें.

येथें हा संशय उत्पन्न होत नाहीं. कारण, सकर्मक धातूंच्याच कर्त्याला कर्मवद्भाव होत असतो. आणि हे दीप्, जन् वगैरे धातु तर अकर्मकच आहेत.

मूळचे अकर्मक असले तरी पण उपसर्ग लाविला म्हणजे सकर्मक होतात[33] ना ?

कर्मवद्भावानें होणारीं यक्, चिण् वगैरे कार्यें कर्मस्थभावक[34] किंवा कर्मस्थक्रियक धातु असेल तरच होतात, आणि दीप्, जन् वगैरे धातु तर कर्तृस्थभावकच आहेत.

(पा.३.४.२४)ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा, आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

आभीक्ष्ण्य अर्थ असतांना णमुल् प्रत्यय नित्य प्राप्त होतो, तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा[35] संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला[36] तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला[37] तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण आभीक्ष्ण्ये या.पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.

(पा.६.२.१६१)ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे, असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

आक्रोश अर्थ असतांना उत्तरपदाला अन्त उदात्त नित्य प्राप्त होतो (६।२।१५८) तेथेंच ह्यानें विकल्प केला[38] तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं

---

३२. कर्म, कारण वगैरेंना कर्तृत्वविवक्षा केली असतां जो कर्ता होतो तो कसा तरी कर्ता होय.

३३. तसाच बुध् हा धातु मूळचाच सकर्मक आहे ना ?

३४. पुढें (३।१।८७ वा ३) पहा.

३५. विभाषाग्रे० येथें आभीक्ष्ण्ये याचा संबंध केला म्हणजे ही प्राप्तविभाषा होते.

३६. आणि येथें आभीक्ष्ण्ये याचा संबंध न करतां आभीक्ष्ण्य अर्थ असतांना पूर्वविप्रतिषेधानें नित्यच णमुल्प्रत्यय होतो असे मानलें तर.

३७. आणि पूर्वविप्रतिषेध घेतला नाहीं तर.

३८. कारण येथें आक्रोशे याचा संबंध गृहीत धरला आहे.

## एकहलादौ पूरयितव्येऽन्यतरस्याम् [२०.१०] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । उदकस्योदः संज्ञायाम् [६.३.५७] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्न वेति । अप्राप्ते । संज्ञायामिति निवृत्तम् ॥

## श्वादेरिञि पदान्तस्यान्यतरस्याम् [२०.११] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । इञीति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते । इञीति निवृत्तम् ॥

## सपूर्वायाः प्रथमाया विभाषा [२०.१२] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्न । चादिभिर्योग इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र

---

विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण आक्रोशे या पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.[39]

(पा.६.३.५९) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्र-विभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

'उदकस्योदः संज्ञायाम्' (६।३।५७) ह्यानें नित्य उद आदेश प्राप्त होतो. त्याच ठिकाणीं ह्यानें विकल्प केलाँ तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण संज्ञायाम् या पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.

(पा.७-३.८,९) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्र-विभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

इञि या पदाची अनुवृत्ति येथें आणली म्हणजे इञ् पुढेंअसतांना ऐच् आगमनित्य प्राप्त होतो, तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्त-विभाषा संभवते. अनुवृत्ति न आणतां इतर ठिकाणींच विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते; आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.[41]

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण इञि या पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.

(पा.८.१.२६) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्र-विभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

च वा इत्यादिकांचा योग असतांना सांगि-तलेला (८.१.२४) वाम्, नौ इत्यादि आदे-शांचा निषेध नित्य प्राप्त होतो व तेथेंच ह्यानें

---

३९. आणि आक्रोशे च (६।२।१५८) येथें पूर्व सूत्रांतून 'अच्कौ' या पदाची अनुवृत्ति आहे. त्या मुळें नित्यविधि आणि विकल्पविधि या दोघांची एका ठिकाणीं प्राप्तिच येत नाहीं.

४०. संज्ञायाम् या पदाची येथें अनुवृत्ति गृहीत धरिली आहे. आतां संज्ञायाम् याची अनुवृत्ति येथें केली नाहीं; आणि संज्ञा असतांना पूर्वविप्रतिषे-धानें नित्यच उद आदेश होतो असें गृहीत धरलें तर ही अप्राप्तविभाषा होते आणि पूर्वविप्रतिषेध घेतला नाहीं तर उभयत्रविभाषा होते.

४१. आणि इञ् प्रत्यय केला असतां पूर्वविप्रति-षेधानें नित्यच निषेध होतो असें मानलें तर या-प्रमाणें पुढेंही नित्यविधीचें जें निमित्त त्याची अनु-वृत्ति विकल्पविधीमध्यें केली असतां प्राप्तविभाषा संभवते, त्याची अनुवृत्ति न करतां आणि नित्य-विधीनें पूर्वविप्रतिषेधामुळें विकल्पविधीचा बाध होतो, अशी कल्पना केलीं असतां अप्राप्तविभाषा संभवते आणि पूर्वविप्रतिषेध घेतला नाहीं तर उभयत्रविभाषा संभवतो असें जाणावें.

वाप्राप्त उभयत्र वेति । अप्राप्ते । चादिभिर्योग इति निवृत्तम् ॥

## ग्रो यङ्यचि विभाषा [२०.१३]॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । यङीति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। अप्राप्ते ।यङीति निवृत्तम्॥

## प्राप्ते च ॥ २१ ॥

इत उत्तरं या विभाषा अनुक्रमिष्यामः प्राप्ते ता द्रष्टव्याः । त्रिसंशयास्तु भवन्ति प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति ॥

## विभाषा विप्रलापे [२१.१] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । व्यक्तवाचाम् [१.३.४८] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । प्राप्ते । व्यक्तवाचामिति हि वर्तते ॥

## विभाषोपपदेन प्रतीयमाने [२१.२]॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । स्वरितञितः [१.३.७२] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। प्राप्ते।

---

विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा होते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी, कारण 'चवाहाहैवयुक्ते' या पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.[४२]

(पा.८.२.२०,२१) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

यङि ह्याची अनुवृत्ति आणून पूर्वसूत्रानें नित्य लत्व प्राप्त झालेल्या ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते.[४३] इतर ठिकाणींच विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें अप्राप्तविभाषाच समजावी. कारण यङि या पदाची अनुवृत्ति येथें नाहीं.[४४]

(वा.२१) येथून पुढें आम्ही ज्या विभाषा विचारांत घेणार आहोंत, त्या प्राप्तविभाषा होत असें समजावें. पण तेथें प्राप्तविभाषा किंवा अप्राप्तविभाषा किंवा उभयत्रविभाषा या तिन्ही प्रकारच्या विभाषांबद्दल संशय मात्र येतो.

(पा.१.३.५०) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, उभयत्रविभाषा कशी ?

'व्यक्तवाचाम्०' (१।३।४८) यानें नित्य आत्मनेपद प्राप्त झालें असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें प्राप्तविभाषाच समजावी. कारण 'व्यक्तवाचाम्' या पदाची अनुवृत्ति येथें आहे.

(पा.१.३.७७) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

'स्वरितञितः०' (१।३।७२) यानें नित्य आत्मनेपद प्राप्त झालें असतां, तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच विकल्प केला तर अप्राप्त-

---

४२. आणि च वा वगैरेंचा योग असतांना पूर्वविप्रतिषेधानें नित्यच निषेध होतो.

४३. निजेगिलः येथें प्रत्ययलक्षणाने यङ्पुढें आहे आणि पुढें अच्ही आहे.

४४. निजेगिलः येथें न लुमताङ्गस्य (१।१।६३) या निषेधामुळें प्रत्ययलक्षण होत नाहीं.

स्वरितञित इति हि वर्तते ॥

## तिरोऽन्तर्धौ विभाषा कृञि [२१.३]॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। अन्तर्धाविति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। प्राप्ते। अन्तर्धाविति हि वर्तते॥

## अधिरीश्वरे विभाषा कृञि [२१.४.]॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। ईश्वर इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। प्राप्ते। ईश्वर इति हि वर्तते॥

## दिवस्तदर्थस्य विभाषोपसर्गे [२१.५]॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः। कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र। तदर्थस्येति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति। प्राप्ते। तदर्थस्येति हि वर्तते॥

## उभयतश्च ॥ २२ ॥

इत उत्तरं या विभाषा अनुक्रमिष्याम उभयत्र ता द्रष्टव्याः। त्रिसंशयास्तु भवन्ति प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति ॥

---

विभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विपाक केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें प्राप्तविभाषाच समजावी. कारण स्वरितञितः० या सर्व सूत्राची अनुवृत्ति येथें आहे.

(पा. १.४.७१,७२) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

अन्तर्धि अर्थ गम्यमान असतांना पूर्व-सूत्रानें गतिसंज्ञा नित्य प्राप्त होते तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच विकल्प केला तर ही अप्राप्त-विभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें प्राप्तविभाषाच समजावी. कारण अन्तर्धौ या पदाची अनुवृत्ति येथें आहे.

(पा.१.४.९७,९८) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

ईश्वर हा अर्थ असतांना पूर्व सूत्रानें कर्म-प्रवचनीय संज्ञा नित्य प्राप्त होते, तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच विकल्प केला तर ही अप्राप्त-विभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें प्राप्तविभाषाच समजावी. कारण ईश्वरे या पदाची अनुवृत्ति येथें आहे.

(पा.२.३.५८,५९) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

'दिवस्तदर्थस्य' या पूर्व सूत्रानें षष्ठी नित्य-प्राप्त झाली असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते, इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें प्राप्तविभाषाच समजावी. कारण 'दिवस्तदर्थस्य' याची अनुवृत्ति येथें आहे.

(वा.२२) येथून पुढें आम्ही ज्या विभाषा विचारांत घेणार आहोंत, त्या उभयत्रविभाषा आहेत असें समजावें. पण तेथें प्राप्तविभाषा किंवा अप्राप्तविभाषा किंवा उभयत्रविभाषा

## हृक्रोरन्यतरस्याम् [२२.१] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणाम् [१.४.५२] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । उभयत्र । प्राप्ते तावत् । अभ्यवहारयति सैन्धवान् अभ्यवहारयति सैन्धवैः । विकारयति सैन्धवान् विकारयति सैन्धवैः । अप्राप्ते । हरति भारं देवदत्तः हारयति भारं देवदत्तं हारयति भारं देवदत्तेन । करोति कटं देवदत्तः कारयति कटं देवदत्तम् कारयति कटं देवदत्तेन ॥

## न यदि विभाषा साकाङ्क्षे [२२.२] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । यदीति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । उभयत्र । प्राप्ते तावत् । अभिजानासि देवदत्त यत्कश्मीरेषु वत्स्यामः । यत्कश्मीरेष्ववसाम । यत्तत्रौदनान्भोक्ष्यामहे । यत्तत्रौदनानभुञ्ज्महि ।

---

या तिन्ही प्रकारच्या विभाषांबद्दल संशय मात्र येतो.

(पा.१.४.५३) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्र विभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

'गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मणाम्'० या पूर्व सूत्रानें कर्मसंज्ञा नित्य प्राप्त झाली असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला म्हणजे ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला म्हणजे ही अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला म्हणजे उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें उभयत्रविभाषाच समजावी. त्यापैकीं कर्मसंज्ञा प्राप्त असून प्रकृत सूत्रानें तिचा विकल्प झाल्याचें उदाहरण—अभ्यवहारयति[45] सैन्धवान् माषान् अश्वसादी, अभ्यवहारयति सैन्धवैर्माषान् अश्वसादी. विकारयति[46] सैन्धवान् अश्वसादी, विकारयति सैन्धवैरश्वसादी. आतां कर्मसंज्ञा अप्राप्त असतां प्रकृत सूत्रानें तिचा विकल्प झाल्याचें उदाहरण— हरति भारं देवदत्तः ही अण्यन्त अवस्था होय. हारयति भारं देवदत्तं यज्ञदत्तः, हारयति भारं देवदत्तेन यज्ञदत्तः. तसेंच करोति कटं देवदत्तः ही अण्यन्त अवस्था होय. कारयति कटं देवदत्तं यज्ञदत्तः, कारयति कटं देवदत्तेन यज्ञदत्तः

(पा. ३.२.११३,११४) ही काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

'न यदि' या पूर्व सूत्रानें लृट् प्रत्ययाचा निषेध नित्य प्राप्त झाला असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा होते, इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्त विभाषा होते. आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा होते.

परंतु येथें उभयत्रविभाषाच समजावी. त्यापैकीं लृट् प्रत्ययाचा निषेध प्राप्त असून विकल्प झाल्याचें उदाहरण—अभिजानासि देवदत्त यत्कश्मीरेषु वत्स्यामः यत्कश्मीरेष्ववसाम. यत्तत्रौदनान् भोक्ष्यामहे. आतां लृट् प्रत्ययाचा निषेध अप्राप्त असतां तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण—अभि-

---

४५. येथें हृ धातूचा प्रत्यवसान (भक्षण) हा अर्थ असल्यामुळें गतिबुद्धि० (१।४।५२) या सूत्रानें सैन्धवांना नित्य कर्मसंज्ञा प्राप्त होत आहे,

४६. येथें कृधातु खेकाळणें या अर्थाचा अकर्मक आहे म्हणून गति बुद्धि० या सूत्रानें सैन्धवांना नित्य कर्मसंज्ञा प्राप्त होत आहे.

अप्राप्ते । अभिजानासि देवदत्त कश्मीरान्गमिष्यामः । कश्मीरानगच्छाम । तत्रौदनान्भोक्ष्यामहे । तत्रौदनानभुञ्ज्महि ॥

## विभाषा श्वेः [२२.३] ॥

प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । कितीति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । उभयत्र । प्राप्ते तावत् । शुशुवतुः शुशुवुः । शिश्वियतुः शिश्वियुः । अप्राप्ते । शुशाव शुशविथ । शिश्वाय शिश्वयिथ ॥

## विभाषा संघुषस्वनाम् [२२.४] ॥

संपूर्वाद्घुषेः प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । घुषिरविशब्दने [७.२.२३] इति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । उभयत्र प्राप्ते तावत् । संघुष्टा रज्जुः संघुषिता रज्जुः । अप्राप्ते । संघुष्टं वाक्यं संघुषितं वाक्यम् ॥ आङ्पूर्वात्स्वनेः प्राप्तेऽप्राप्त उभयत्र वेति संदेहः । कथं च प्राप्ते

---

जानासि देवदत्त कश्मीरान् गमिष्यामः कश्मीरान् अगच्छाम तत्रौदनान् भोक्ष्यामहे तत्रौदन अभुञ्ज्महि.

(पा. ६.१.३०) ही काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे, किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा कशी, आणि उभयत्रविभाषा कशी ?

कित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेलें संप्रसारण (६।१।१५) नित्यप्राप्त होतें. तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें उभयत्रविभाषाच समजावी. त्यांपैकी संप्रसारण नित्यप्राप्त झालें असतां तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण— शुशुवतुः शुशुवुः शिश्वियतुः शिश्वियुः आतां संप्रसारण अप्राप्त असता तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण—शुशाव शुशविथ शिश्वाय शिश्वयिथ.

(पा.७.२.२८) 'रुष्यमत्वर०' या सूत्रामध्यें सम् उपसर्गपूर्वक घुष् धातूच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इट् आगमाचा निषेध विकल्पानें सांगितला आहे. ती काय प्राप्तविभाषा आहे, किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे असा संशय येतो.

पण प्राप्तविभाषा कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

घुषिरविशब्दने (७।२।२३) या सूत्रानें इट् आगमाचा निषेध नित्यप्राप्त झाला असतां तेथेंच ह्यानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणींच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं विकल्प केला तर उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें उभयत्रविभाषाच समजावी. त्यापैकीं इट् आगमाचा निषेध नित्य प्राप्त झाला असतां तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण—संघुष्टा रज्जुः, संघुषिता रज्जुः. आतां इट् आगमाचा निषेध अप्राप्त असतां तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण—संघुष्टं वाक्यम्, संघुषितं वाक्यम्.

तसेंच याच सूत्रामध्यें आ-उपसर्गपूर्वक स्वन् धातूच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इट्-आगमाचा निषेध विकल्पानें सांगितला आहे, ती काय प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे किंवा उभयत्रविभाषा आहे.

पण प्राप्तविभाषा कशी, अप्राप्तविभाषा

कथं वाप्राप्ते कथं वोभयत्र । मनसीति वा नित्ये प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्त उभयत्र वेति । उभयत्र । प्राप्ते तावत् । आस्वान्तं मनः आस्वनितं मनः । अप्राप्ते । आस्वान्तो देवदत्तः आस्वनितो देवदत्तः इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे षष्ठमाह्निकम् ।

---

कशी आणि उभयत्रविभाषा कशी ?

मन अर्थ असतांना क्षुब्धस्वान्त० (७।२।१८) या सूत्रानें इट्-आगमाचा निषेध-नित्यप्राप्त झाला असतां तेथेंच प्रकृत सूत्रानें विकल्प केला तर ही प्राप्तविभाषा संभवते. इतर ठिकाणीच ह्यानें विकल्प केला तर ही अप्राप्तविभाषा संभवते, आणि दोन्ही ठिकाणीं ह्यानें विकल्प केला तर ही उभयत्रविभाषा संभवते.

परंतु येथें उभयत्रविभाषाच समजावी. त्यापैकीं इट्-आगमाचा निषेध नित्यप्राप्त झाला असतां तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण---आस्वान्तं मनः आस्वनितं मनः. आतां इट्-आगमाचा निषेध अप्राप्त असतांना तेथें प्रकृत सूत्रानें विकल्प झाल्याचें उदाहरण-आस्वान्तो देवदत्तः, आस्वनितो देवदत्तः.

याप्रमाणें भगवान पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील सहावें आन्हिक समाप्त झालें.

## इग्यणः संप्रसारणम् ॥१.१.४५॥

किमियं वाक्यस्य संप्रसारणसंज्ञा क्रियते । इग्यण इत्येतद्वाक्यं संप्रसारणसंज्ञं भवतीति । आहोस्विद्वर्णस्य । इग्यो यणः स्थाने वर्णः स संप्रसारणसंज्ञो भवतीति । कश्चात्र विशेषः ।

**संप्रसारणसंज्ञायां वाक्यसंज्ञा चेद्वर्णविधिः ॥ १ ॥**

संप्रसारणसंज्ञायां वाक्यसंज्ञा चेद्वर्णविधिर्न सिध्यति । संप्रसारणात्परः पूर्वो भवति संप्रसारणस्य दीर्घो भवतीति । न हि वाक्यस्य संप्रसारणसंज्ञायां सत्यामेष निर्देश उपपद्यते नाप्येतयोः कार्ययोः संभवोऽस्ति ॥ अस्तु तर्हि वर्णस्य ॥

**वर्णसंज्ञा चेन्निर्वृत्तिः ॥ २ ॥**

वर्णसंज्ञा चेन्निर्वृत्तिर्न सिध्यति ष्यङः संप्रसारणम् [६.१.१३] इति । स एव हि तावदिग्दुर्लभो यस्य संज्ञा क्रियते । अथापि कथंचिल्लभ्येत केनासौ यणः स्थाने स्यात् । अनेनैव ह्यसौ व्यवस्थाप्यते । तदेतदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च कार्याणि न प्रकल्पन्ते ॥

**विभक्तिविशेषनिर्देशस्तु ज्ञापक उभयसंज्ञात्वस्य ॥ ३ ॥**

यदयं विभक्तिविशेषैर्निर्देशं करोति संप्रसारणात्परः पूर्वो भवति संप्रसारणस्य

---

'यणाचे स्थानीं इक् होतो या वाक्याला संप्रसारणसंज्ञा होते' अशा अर्थानें ह्या सूत्रानें सांगितलेली संप्रसारणसंज्ञा वाक्याला करावयाची, किंवा 'यणाचे स्थानीं झालेला जो इक् त्याला संप्रसारणसंज्ञा होते' अशा अर्थानें वर्णाला करावयाची ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

(वा.१) 'ही संप्रसारणसंज्ञा वाक्याला होते' असें गृहीत धरलें तर 'वर्णच संप्रसारण असतो' असें गृहीत धरून त्याला सांगितलेला जो विधि तो सिद्ध होणार नाहीं. उदा० संप्रसारणाहून अच् पुढें असतांना पूर्वपराचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो (६।१।१०८), संप्रसारणाला उत्तरपद पुढें असतांना दीर्घ होतो (६।३।१३९, ६।४।२). वाक्याला संप्रसारणसंज्ञा असेल तर हें म्हणणें मुळींच जुळत नाहीं. शिवाय पूर्वरूप आणि दीर्घ हीं कार्यें वाक्याला करतांही येत नाहींत.

तर मग वर्णालाच संप्रसारणसंज्ञा असूं दे.

(वा.२) 'वर्णाला संप्रसारणसंज्ञा होते' असें गृहीत धरलें तर 'संप्रसारणाचें विधान केल्यामुळें जी वर्णाची उत्पत्ति होत असते ती सिद्ध होणार नाहीं. उदा० ष्यङ्-प्रत्ययांत पूर्वपदाला संप्रसारण होतें (६।१।१३) ह्या सूत्राच्या कारीषगंधीपुत्रः इत्यादि उदाहरणांमध्यें ज्या वर्णाला संप्रसारणसंज्ञा करावयाची तो इक् नांवाचा वर्णच मुळीं अगोदर दिसत नाहीं. आतां शब्द नित्य असल्यामुळें वरील उदाहरणांतील इक् नांवाचा वर्ण मूळचा आहेच असें कदाचित् गृहीत धरावें तर तो इक् यणाचें स्थानीं झालेला आहे असें कसें म्हणतां येईल. कारण ज्या इक् नांवाच्या वर्णाला संप्रसारण संज्ञा करावयाची असते तो इक् यणाचे स्थानीं होतो ही व्यवस्था ह्या संप्रसारण संज्ञा सांगणाऱ्या प्रकृत सूत्रानेंच करावयाची आहे. तेव्हां 'यणाचे स्थानीं झालेल्या इकाला संप्रसारणसंज्ञा करणें' आणि 'पूर्वीच संप्रसारण म्हणून तो इक् यणाचे स्थानीं करणें' या दोन गोष्टी एकमेकांवर अवलंबून असल्यामुळें येथें अन्योन्याश्रयदोष येतो. आणि जेथें असा अन्योन्याश्रयदोष येतो तेथें त्या दोहोंपैकीं कोणतेंच कार्य सिद्धीला जात नाहीं.

(वा.३) ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'संप्रसारणाच्च' (६।१।१०८) या पूर्वरूप सांगणाऱ्या सूत्रामध्यें संप्रसारण हा शब्द

---

१. यणाचे स्थानीं केलेला जो इक् त्याला संप्रसारणसंज्ञा होते.

दीर्घो भवति ष्यङः संप्रसारणमिति तेन ज्ञायत उभयोः संज्ञा भवतीति । यत्तावदाह संप्रसारणात्परः पूर्वो भवति संप्रसारणस्य दीर्घो भवतीति तेन ज्ञायते वर्णस्य भवतीति । यदप्याह ष्यङः संप्रसारणमिति तेन ज्ञायते वाक्यस्यापि संज्ञा भवतीति ॥

अथवा पुनरस्तु वाक्यस्यैव । ननु चोक्तं संप्रसारणसंज्ञायां वाक्यसंज्ञा चेद्वर्णविधिरिति । नैष दोषः । यथा काकाज्जातः काकः श्येनाज्जातः श्येन एवं संप्रसारणाज्जातं संप्रसारणम् । यत्तत्संप्रसारणाज्जातं संप्रसारणं तस्मात्परः पूर्वो भवति तस्य दीर्घो भवतीति ॥ अथवा दृश्यन्ते हि वाक्येषु वाक्यैकदेशान्प्रयुञ्जानाः पदेषु च पदैकदेशान् । वाक्येषु तावद्वाक्यैकदेशान् । प्रविश तर्पणम् । पदेषु पदैकदेशान् । देवदत्तो दत्तः सत्यभामा भामेति । एवमिहापि संप्रसारणनिर्वृत्तात्संप्रसारणनिर्वृत्तस्येत्येतस्य वाक्यस्यार्थे संप्रसारणात्संप्रसारणस्ये-

---

पंचमीविभक्ति लावून उच्चारतो, तसेंच 'संप्रसारणस्य' (६।३।१३९) या दीर्घ सांगणाऱ्या सूत्रामध्यें संप्रसारण हा शब्द षष्ठीविभक्ति लावून उच्चारतो आणि 'ष्यङः संप्रसारणं०' (६।१।१३) या संप्रसारणाचें विधान करणाऱ्या सूत्रामध्यें संप्रसारण हा शब्द प्रथमाविभक्ति लावून उच्चारतो, या निरनिराळ्या विभक्ति लावण्यावरून तो असें ज्ञापित करतो की वर्ण आणि वाक्य या दोहोंनाही संप्रसारणसंज्ञा होते. त्यांत 'संप्रसारणाहून अच् पुढें असतांना पूर्वपराचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो' व 'संप्रसारणाला दीर्घ होतो' असें जें म्हटलें आहे त्यावरून वर्णाला संज्ञा आहे' असें सुचवितो आणि 'ष्यङ्प्रत्ययान्त पूर्वपदाला संप्रसारण होतें' असें जें म्हटलें आहे त्यावरून 'वाक्याला संज्ञा आहे' असें सुचवितो.

अथवा असूं दे की वाक्यालाच एकट्याला संप्रसारणसंज्ञा. वर्णाला नकोच.

पण वाक्यालाच फक्त संप्रसारणसंज्ञा असेल तर वर्णाला सांगितलेलें पूर्वरूप, दीर्घ, हे विधि सिद्ध होणार नाहींत असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. जसें लोकामध्यें कावळ्यापासून झालेल्याला कावळाच म्हणतात, श्येनापासून झालेल्याला श्येनच म्हणतात, तसें येथें संप्रसारणसंज्ञा जरी सूत्रानें वाक्यालाच झाली तरी त्या संप्रसारणापासून झालेल्या वर्णाला संप्रसारण असें म्हणतां येईल. तेव्हां त्या संप्रसारणसंज्ञक वाक्यापासून झालेला जो वर्ण तो संप्रसारणच आहे असें गृहीत धरून त्याच्यापुढें अच् आला असतां पूर्वरूप करतां येईल व तशा वर्णाला दीर्घही करतां येईल.

अथवा लोकामध्यें वाक्याच्या ऐवजीं वाक्याचा एखादा भागच फक्त उच्चारला जातो, तसेंच पदाच्या ऐवजी पदांचा एक भागच फक्त उच्चारला जातो, असें दृष्टीस पडते. त्यांपैकीं वाक्याच्या ऐवजीं त्यांतील एक भाग उच्चारल्याचें उदाहरण—प्रविश, पिण्डीम्[२]; प्रविश, तर्पणम्. पदाच्या ऐवजीं पदांतील एक भाग उच्चारल्याचें उदाहरण देवदत्तः असें पद उच्चारावयाचें तें त्यांतील दत्तः एवढेंच उच्चारतात, सत्यभामा असें पद उच्चारावयाचें तें भामा एवढेंच उच्चारतात. त्याप्रमाणेंच या शास्त्रामध्यें आचार्यपाणिनीनेंही 'संप्रसारणापासून उत्पन्न झालेल्या वर्णाच्या पुढें' व 'संप्रसारणापासून उत्पन्न झालेल्या वर्णाला' अशीं वाक्यें उच्चारावयाचीं तीं न उच्चारतां

---

२. गृहं प्रविश, पिण्डीं भक्षय या दोन वाक्यांच्या ऐवजीं क्रमानें प्रविश, पिण्डीम् इतकेंच उच्चारलें जातें. लोकामध्यें परस्थ एखादा ओळखीचा मनुष्य उन्हाचे वेळीं भेटला तर 'घरीं चला, खजूर खा' असें त्याला म्हणतात. एखादे वेळीं नुसतेच घाईनें चला, थोडा खजूर' इतकेंच म्हटलें जातें. तसेंच 'तीर्थे प्रविश, तर्पणं कुरु' या दोन वाक्यांच्या ऐवजीं क्रमानें 'प्रविश, तर्पणम्' असें म्हटलें जातें.

त्येष वाक्यैकदेशः प्रयुज्यते । तेन निर्वृत्तस्य विधिं विज्ञास्यामः । संप्रसारणनिर्वृत्तात्संप्रसारणनिर्वृत्तस्येति ॥ अथवाहायं संप्रसारणात्परः पूर्वो भवति संप्रसारणस्य दीर्घो भवतीति न च वाक्यस्य संप्रसारणसंज्ञायां सत्यामेष निर्देश उपपन्नो नाप्येतयोः कार्ययोः संभवोऽस्ति तत्र वचनाद्भविष्यति ॥

अथवा पुनरस्तु वर्णस्य । ननु चोक्तं वर्णसंज्ञा चेन्निर्वृत्तिरिति । नैष दोषः । इतरेतराश्रयमात्रमेतच्चोदितम् । सर्वाणि चेतरेतराश्रयाण्येकत्वेन परिहृतानि सिद्धं तु नित्यशब्दत्वादिति । नेदं तुल्यमन्यैरितरेतराश्रयैः । न हि तत्र किंचिदुच्यतेऽस्य स्थाने य आकारैकारौकारा भाव्यन्ते ते वृद्धिसंज्ञा भवन्तीति । इह पुनरुच्यत इग्यो यणः स्थाने वर्णः स संप्रसारणसंज्ञो भवतीति ॥ एवं तर्हि भाविनीयं संज्ञा विज्ञास्यते । तद्यथा । कश्चित्कंचित्तन्तुवायमाह । अस्य सूत्रस्य शाटकं वयेति । स पश्यति

---

त्या वाक्यांच्या ऐवजीं तोच अर्थ मनांत धरून 'संप्रसारणाच्या पुढें' (६।१।१०८) व 'संप्रसारणाला' (६।३।१३९) अशा त्या वाक्यांतील एक भाग उच्चारला आहे. तेव्हां त्या भागाचा 'संप्रसारणापासून उत्पन्न झालेल्याच्या पुढें' व 'संप्रसारणापासून उत्पन्न झालेल्या' असा अर्थ घेऊन पूर्वरूप आणि दीर्घ हे विधि करतां येतील.

अथवा हा आचार्य पाणिनि संप्रसारणाहून अच् पुढें असतांना पूर्वपराचे स्थानीं पूर्वरूप होतें आणि संप्रसारणाला दीर्घ होतो असें पुढें कांही ठिकाणीं म्हणतो आणि तें म्हणणें तर येथें जी वाक्याला केलेली संप्रसारणसंज्ञा तिला अनुसरून मुळींच जुळत नाहीं. आणि पूर्वरूप व दीर्घ या कार्यांचा वाक्याला संभवही नाहीं. अर्थातच त्या वचनाच्या जोरावर 'लाक्षणिक अर्थानें तसें म्हटलें आहे' अशी कल्पना होईल आणि संप्रसारणसंज्ञक वाक्यापासून झालेल्या वर्णाला पूर्वरूप व दीर्घ हीं कार्यें करतां येतील.

किंवा वाक्याला संप्रसारणसंज्ञा मुळीं नकोच. वर्णालाच फक्त असूं दे.

पण वर्णालाच संप्रसारणसंज्ञा असेल तर संप्रसारणाचें विधान केल्यावरून जी वर्णाची उत्पत्ति होत असते तेथें अन्योन्याश्रयदोष येत असल्यामुळें ती उत्पत्ति होणार नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना?

हा दोष येत नाहीं. हा अन्योन्याश्रयदोष मात्र येथें तुम्ही दाखवीत आहांत, पण सर्वच ठिकाणच्या ह्या दोषांचें निरसन एक तऱ्हेनें पूर्वी 'सिद्धं तु नित्यशब्दत्वात्' (१।१।१ वार्तिक ९) असें केलेंच आहे.

निरसन केलें आहे खरें, पण इतर ठिकाणच्या अन्योन्याश्रयांसारखा येथील अन्योन्याश्रय नाहीं. कारण असें पाहा की त्या वृद्धिसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'अमुक वर्णांचे स्थानीं होणारे जे आकार, ऐकार आणि औकार यांना वृद्धिसंज्ञा होते' असें विशेष कांहीं सांगितलें नाहीं, ('आकार, ऐकार आणि औकार यांना वृद्धिसंज्ञा होतें' इतकेंच फक्त सांगितलें आहे) आणि येथें तर 'यणाचे स्थानीं झालेला जो इक् नांवाचा वर्ण त्याला संप्रसारण संज्ञा होते' असें विशेष सांगितलेलें दिसत आहे (त्यामुळें येथें अन्योन्याश्रयदोष कायमचा येत आहे).

तर मग येथेंही पाणिनीनें भाविसंज्ञा केली आहे असें समजावें (म्हणजे दोष येणार नाहीं). जसें लोकामध्यें कोणी मनुष्य एखाद्या कोष्टयाला सहजच म्हणतो की 'ह्या सुतांचा शेला वीण'. कोष्टी जर असा मनांत

---

३. 'शब्द अनित्य आहेत' असें मंदबुद्धीच्या लोकाकरतां गृहीत धरून हें उत्तर आरंभीं भाष्यकार देत आहेत.

यदि शाटको न वातव्योऽथ वातव्यो न शाटकः शाटको वातव्यश्चेति विप्रतिषिद्धम् । भाविनी खल्वस्य संज्ञाभिप्रेता स मन्ये वातव्यो यस्मिन्नुते शाटक इत्येतद्भवतीति । एवमिहापि स यणः स्थाने भवति यस्याभिनिर्वृत्तस्य संप्रसारणमित्येषा संज्ञा भविष्यति॥ अथवेजादियजादिप्रवृत्तिश्चैव हि लोके लक्ष्यते यजाद्युपदेशात्त्विजादिनिवृत्तिः प्रसक्ता । प्रयुञ्जते च पुनर्लोका इष्टम् उप्तमिति । ते मन्यामहेऽस्य यणः स्थान इमामिकं प्रयुञ्जत इति । तत्र तस्यासाध्वभिमतस्य शास्त्रेण साधुत्वमवस्थाप्यते किति साधुर्भवति ङिति साधुर्भवतीति ॥

## आद्यन्तौ टकितौ ॥१.१.४६॥

समासनिर्देशोऽयं तत्र न ज्ञायते क आदिः कोऽन्त इति । तद्यथा । अजाविधनौ देवदत्तयज्ञदत्तावित्युक्ते तत्र न ज्ञायते कस्याजा धनं कस्यावय इति । यद्यपि तावल्लोक एष दृष्टान्तो दृष्टान्तस्यापि पुरुषा-

विचार करील की हा मनुष्य शेला असें जर म्हणतच आहे तर मग विणावयाचें तें काय? बरें, सुतें विणावयाचीं आहेत तर शेला असें कसें हा म्हणतो. 'शेला आणि तो विणावयाचा' हें बोलणें अगदींच विरुद्ध दिसतें. पण हें विरुद्ध आहे असें लोकामध्यें समजलें जात नाहीं. कोणीही असे समजतो की शेला ही भाविसंज्ञा ह्या मनुष्याच्या मनांत आहे म्हणजे तसें तेथें कांहीं विणावयाचें आहे की जें विणलें असतां त्याला शेला असें म्हणतां येईल. तसें येथेंही तो वर्ण यणाचे स्थानीं होतो की जो झाला असतां त्याला संप्रसारण ही संज्ञा होईल. (अशी भाविसंज्ञा येथें घेतली म्हणजे अन्योन्याश्रयदोष येत नाहीं).

अथवा 'सिद्धं तु नित्यशब्दत्वात्' हें जें पूर्वी सांगितलें आहे तेंही येथें उत्तर जमतें. तें असें की कांहीं धातूंचीं स्वरूपें लोकांमध्यें यज्, वप् अशीं व इज्,उप् अशीं दोन प्रकारचीं आढळतात. परंतु धातुपाठामध्यें पाणिनीनें यज्, यप् असा उपदेश केला असल्यामुळें 'इज्, उप्' अशा स्वरूपांचे प्रयोग बरोबर नाहींत' असें वाटूं लागतें. आणि लोकामध्यें तर 'इष्टम्' 'उप्तम्' असे प्रयोग दृष्टीस पडतात, त्यावरून असें मनांत येतें की ह्या प्रयोगांमध्यें यणांच्या ऐवजीं इक् उच्चारले आहेत. तेव्हां तसे इक् ज्या प्रयोगांमध्यें उच्चारले जात आहेत ते प्रयोग असाधु समजले जातील. तसे न समजले जावे म्हणून पाणिनीनें 'कित्प्रत्यय पुढें असतांना इकाचा प्रयोग साधु आहे(६।१।१५), ङित्प्रत्यय पुढें असतांना इकाचा प्रयोग साधु आहे (६।१।१६)' असें सांगून त्या प्रयोगांचें साधुत्व सांगितलें आहे[४].

(सू. १.४.४५) टकितौ हें येथें समस्तपद उच्चारलें आहे. त्यामुळें आदि कोण होतो आणि अंत कोण होतो हें कांहींच समजत नाहीं. जसें लोकामध्यें 'अजाविधनौ देवदत्तयज्ञदत्तौ' म्ह. 'देवदत्त यज्ञदत्त यांची शेळ्या मेंढ्या ही संपत्ति आहे' असें म्हटलें असतां शेळ्या ही संपत्ति कोणाची आणि मेंढ्या ही संपत्ति कोणाची हे विशेष कांहींच समजत नाहीं. (दोघांचीही दोन्ही प्रकारची संपत्ति आहे असा अर्थ मनांत येतो.)

जरी हा दृष्टान्त लोकामध्यें आहे तरी पण जर त्या दृष्टान्ताच्या विरुद्ध मनुष्यानें मुद्दाम कांही सांगितलें असेल तर तेथें तो दृष्टान्त लागू होत नाहीं.

४. एकंदरींत यणाचें स्थानीं इक् झाला नसल्यामुळें अन्योन्याश्रय दोष येत नाहीं.

१. येथें ट आणि क या दोन वर्णांचा द्वंद्व करून त्याचा इत् या पदाशीं बहुव्रीहि समास केला आहे. ज्याला इत्संज्ञक टकार जोडला आहे तो ज्याला सांगितला असेल त्याचा आद्यावयव होतो, तसाच ज्याला इत्संज्ञक ककार जोडला आहे तो ज्याला सांगितला असेल त्याचा अंत्यावयव होतो.

रम्भो निवर्तको भवति । अस्ति चेह कश्चित्पुरुषारम्भः । अस्तीत्याह । कः । संख्यातानुदेशो नाम ॥

कौ पुनष्टकितावाद्यन्तौ भवतः । आगमावित्याह । युक्तं पुनर्यन्नित्येषु नाम शब्देष्वागमशासनं स्यान्न नित्येषु नाम शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवितव्यमनपायोपजनविकारिभिः । आगमश्च नामापूर्वः शब्दोपजनः । अथ युक्तं यन्नित्येषु शब्देष्वादेशाः स्युः । बाढं युक्तम् । शब्दान्तरैरिह भवितव्यम् । तत्र शब्दान्तराच्छब्दान्तरस्य प्रतिपत्तिर्युक्ता । आदेशास्तर्हीमे भविष्यन्त्यनागमकानां सागमकाः । तत्कथम् । संज्ञाधिकारोऽयम् । आद्यन्तौ चेह संकीर्त्येते टकारककारावितावुदाह्रियेते । तत्राद्यन्तयोष्टकारककारावितौ संज्ञे भविष्यतः । तत्रार्धधातुकस्येड्वलादेः [७.२.३५] इत्युपस्थितमिदं भवत्यादिरिति । तेनेकारादिरादेशो भविष्यति । एतावदिह सूत्रमिडिति । कथं पुनरियता सूत्रेणेकारा-

---

मग तसें कांही येथें आचार्य पाणिनीनें सांगितलें आहे काय ?

होय. आहे.

तें काय हो ?

अहो, यथासंख्यसूत्र (१।३।१०) ज्याला म्हणतात तेंच तें.

असो. पण हे जे येथें टकारेत्संज्ञक आदि आणि ककारेत्संज्ञक आदि व अंत असे होतात म्हणून सांगितले ते कोण समजावयाचे ?

आगम असे ते समजावेत, असें आम्ही म्हणतों.

पण शब्द जर नित्य आहेत तर त्यांना आगम सांगणें युक्त होईल काय ? कधींही होणार नाहीं. शब्द जर नित्य आहेत तर त्यांतील वर्ण एकाच स्वरूपांत कायम राहणारे, न हालणारे आणि उत्पत्ति, विनाश वगैरे विकारांनीं रहित असेच असले पाहिजेत. आणि आगम म्हटला म्हणजे तो एक नवीनच अवयव फुटल्यासारखा होणार. तेव्हां तो नित्य शब्दामध्यें कसा बरें संभवेल ?

अगोदर आम्ही असें विचारतों की जर शब्द नित्य आहेत तर त्यांना आदेश जे होतात ते तरी योग्य आहेत काय ?

आदेश सांगणें हें खात्रीनें योग्य होईल. कारण त्या ठिकाणीं ते निराळेच शब्द असतात. तेव्हां एका शब्दाच्या ऐवजीं दुसऱ्या शब्दाचें ज्ञान होणें हे योग्यच आहे. त्याच्या योगानें शब्दाच्या नित्यत्वाची कांहींच हानि होत नाहीं.

तर मग हे आगमही आदेशच होतील म्ह. आगमरहितांना आगमसहित अशा आदेशाची कल्पना करतां येईल.

तें कसें ?

हें संज्ञेचें प्रकरण चालू आहे. आणि ह्या सूत्रामध्यें तर आदि आणि अंत यांचा उल्लेख केला आहे आणि त्यांच्यापुढें इत्संज्ञक टकार व इत्संज्ञक टकार उच्चारले आहेत. तेव्हां अर्थातच इत्संज्ञक ककार ही आदीची संज्ञा आणि इत्संज्ञक ककार ही अंताची संज्ञा आहे असें समजतें. तेव्हां 'आर्धधातुकस्येड्वलादेः' (७।२।३५) या सूत्रामध्यें इट् यांतील टकार हा संज्ञाशब्द दृष्टीस पडत असल्यामुळें त्याचा अर्थ आदि असा मनांत येतो; म्हणून वलादिप्रत्ययाला इकारादि असा आदेश करतां येईल.

पण सूत्रांत त्या अर्थाचें 'इट्' एवढेंच फक्त पद दिसत आहे आणि त्यापासून इकारादि असा आदेश होतो इतका अर्थ कसा निघतो ?

'इट्' एवढ्यांतूनच तितका अर्थ निघतो

---

२, अ. १, पा. सू. २०, टीप १३ पाहा.

दिरादेशो लभ्यः । लभ्य इत्याह । कथम् । बहुव्रीहिनिर्देशात् । बहुव्रीहिनिर्देशोऽयम् । इकार आदिरस्येति । यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुमिह कथं लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः [६.४.७१] इति यत्राशक्यमुदात्तग्रहणेनाकारो विशेषयितुम् । तत्र को दोषः । अङ्गस्योदात्तत्वं प्रसज्येत । नैष दोषः । त्रिपदोऽयं बहुव्रीहिः । तत्र वाक्य एवोदात्तग्रहणेनाकारो विशेष्यते । अकार उदात्त आदिरस्येति । यत्र तर्ह्यनुवृत्त्यैतद्भवत्याडजादीनाम् [६.४.७२] इति । वक्ष्यत्येतत् । अजादीनामटा सिद्धमिति ॥ अथवा यत्तावदयं सामान्येन शक्नोत्युपदेष्टुं तत्तावदुपदिशति प्रकृतिं ततो वलाद्यार्धधातुकं ततः पश्चादिकारम् । तेनायं विशेषेण शब्दान्तरं समुदायं प्रतिपद्यते । तद्यथा । खदिर-

---

असें आम्ही म्हणतों.

तो कसा ?

बहुव्रीहिनिर्देशावरून. येथें इ आणि ट् या दोन वर्णांचा बहुव्रीहि समास करून इट् असें उच्चारलें आहे. त्या टकाराचा आदि असा अर्थ असल्यामुळें 'इकार आहे आदि ज्याचा असा आदेश होतो' असा अर्थ होईल.[३]

जरी 'आर्धधातुकस्येड्वलादेः' (७।२।३५) या ठिकाणीं असें बोलतां आलें तरी 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः' (६।४।७१) या ठिकाणीं तसें कसें बोलतां येईल ? कारण येथें उदात्तपदाचा संबंध अट् यांतील अकारावर झाला पाहिजे. परंतु अट् हा अ आणि ट् यांचा बहुव्रीहि समास असल्यामुळें त्यांतील अ या पूर्वपदावर उदात्तपदाचा संबंध होणें कठीण आहे.

उदात्तपदाचा संबंध अकाराशीं झाला नाहीं तर दोष काय येईल ?

दोष असा की अट् यांतील अकाराला उदात्त न होतां अंगाला होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. 'अडुदात्तः' एवढें सामासिक एक पद घ्यावें, अ, ट् आणि उदात्त या तीन पदांचा बहुव्रीहिसमास करावा आणि त्या बहुव्रीहीच्या वाक्यामध्यें उदात्त हा शब्द अकाराला लावावा म्हणजे उदात्त अकार हा ज्याचा आदि आहे असा आदेश करतां येईल.

'लुङ्लङ्०' (६।४।७१) या सूत्राची अशी वाट लाविली तरी त्यांतील उदात्तपदाची अनुवृत्ति 'आडजादीनाम्' (६।४।७२) या पुढील सूत्रामध्यें होऊन आडो यांतील आकार उदात्त होत असतो त्याची वाट काय ?

तें सूत्रच मुळीं नको आहे. तेव्हां त्याकडे पाहण्याचें कारण नाहीं. 'अजादीनामटा सिद्धम्' असें लागणारच आहे (६।४।७४ भा. वा).

अथवात्प्रकृतसूत्र हें संज्ञासूत्र न घेतां परिभाषासूत्रच असू दे. (टित्, कित् हे आगम मानले तरी शब्दाच्या नित्यत्वाची कांहीं हानि होत नाहीं). कारण आचार्य पाणिनीची पद्धत अशी आहे की जी गोष्ट सामान्य रूपानें उपदेश करण्यासारखी असतें तेथें त्या सामान्य स्वरूपाचा मूल पद्धति अशा रूपानें उपदेश करतो. नंतर तव्य वगैरे वलादि आर्धधातुक प्रत्ययांचा उपदेश करतो, नंतर त्या प्रत्ययाच्या आरंभीं कांहीं ठिकाणीं इकार आहे असें सांगतो त्यावरून ती मूळ प्रकृति वलादि आर्धधातुकप्रत्यय आणि इकार यांचा समुदाय मिळून भवितव्य इत्यादिक मूळचे

---

३. वलादि प्रत्यय जे तव्य, स्य वगैरे त्यांना इकारादि आदेश करावयाचे ते भलते न करतां ज्याचे तेच 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें होतात. म्ह. भवितव्य या उदाहरणामध्यें तव्य याला इतव्य होतो. भविष्यति या उदाहरणामध्यें स्य याला इस्य होतो.

बुर्बुरयोः खदिरबुर्बुरौ गौरकाण्डौ सूक्ष्मपर्णौ । ततः पश्चादाह कण्टकवान्खदिर इति । तेनासौ विशेषेण द्रव्यान्तरं समुदायं प्रतिपद्यते ॥ अथवैतयानुपूर्व्यायं शब्दान्तरमुपदिशति प्रकृतिं ततो वलाद्यार्धधातुकं ततः पश्चादिकारं यस्मिंस्तस्यागमबुद्धिर्भवति ॥

**टकितोराद्यन्तविधाने प्रत्ययप्रतिषेधः ॥१॥**

टकितोराद्यन्तविधाने प्रत्ययस्य प्रतिषेधो वक्तव्यः । प्रत्यय आदिरन्तो वा मा भूत् । चरेष्टः [३.२.१६] आतोऽनुपसर्गे कः [३] इति ॥ परवचनात्सिद्धम् । परवचनात्प्रत्यय आदिरन्तो वा न भविष्यति ।

**परवचनात्सिद्धमिति चेन्नापवादत्वात् ॥२॥**

परवचनात्सिद्धमिति चेत्तन्न । किं कारणम् । अपवादत्वात् । अपवादोऽयं योगः ।

---

निराळेच स्वतंत्र शब्द आहेत असें समजतें. जसें लोकामध्यें खदिर आणि बुर्बुर यांच्या संबंधानें आरंभीं साधारणच उपदेश केला जातो तो असा की खदिर आणि बुर्बुर या दोन्ही झाडांचीं कांडीं गोरीं असतात, दोघांचींही पानें लहान असतात. त्यानंतर विशेष सांगितला जातो की खदिराच्या झाडाला वरची साल जाड शुष्क असते. या विशेष उपदेशावरून तशा विशेष स्वरूपाचे बुर्बुरापेक्षां मूळपासूनच निराळे असें खदिराचें झाड आहे असें समजतें. शुष्क झाड असतें या विशेष सांगण्यावरून 'मूळच्या बुर्बुराचीच साल शुष्क होऊन बुर्बुराचा खदिर बनतो' असें कोणीही समजत नाहींत. त्याप्रमाणेंच येथें समजावें.

अथवा हा पाणिनि आरंभीं मूळ प्रकृति सांगतो, नंतर त्याच्यापुढें वलादि आर्धधातुक प्रत्यय सांगतो, नंतर त्याला इकार लावावा असें सांगतो, ज्या इकाराविषयी श्रोत्याला 'हा आगम आहे' अशी बुद्धि होते हें जें क्रमाक्रमानें सांगितलें आहे तें मूळचा नित्य शब्द अमुक स्वरूपाचा आहे हें समजण्याकरतां सांगितलें आहे (हें सर्व पाणिनीचें कल्पितच आहे; ह्या कल्पनामय सृष्टींतूनच शब्दाच्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटवावी असा पाणिनीचा उद्देश आहे. तेव्हां केवळ कल्पनांच्या योगानें वस्तुस्थितींत बदल होत नसल्यामुळें शब्दाच्या नित्यत्वाला बिलकूल धक्का पोचत नाहीं.)

(वा. १) ज्याला इत्संज्ञक टकार जोडला आहे तो ज्याला सांगितला असेल त्याचा आद्यावयव होतो, तसाच ज्याला इत्संज्ञक ककार जोडला आहे तो ज्याला सांगितला असेल त्याचा अंत्यावयव होतो, असें जें प्रकृतसूत्रानें सांगितलें आहे तेथें प्रत्ययाचा निषेध सांगावा म्हणजे प्रत्ययाला जरी टकार जोडला असला तरी तो आद्यावयव होणार नाहीं. तसाच त्याला ककार जरी जोडला असला तरी तो अंत्यावयव होणार नाहीं. उदा॰ 'चरेष्टः' (३।२।१६), आतोऽनुपसर्गे कः (३।२।३) यांनीं सांगितलेले ट क हे प्रत्यय.

प्रत्यय हा पर करावा (३।१।२) असें सांगितलें आहे तेव्हां त्या वचनानें प्रकृतसूत्राचा परत्वास्तव बाध (१।४।२) होत असल्यामुळें तो आद्यावयव किंवा अंतावयव होणार नाहीं.

(वा. २) प्रत्यय हा पर करावा असें सांगितलें असल्यामुळें सिद्ध होईल असें म्हणतां येत नाहीं.

कां बरें ?

अपवाद आहे म्हणून. 'आद्यन्तौ॰' हें प्रकृत सूत्र परश्च (३।१।२) याचा अपवाद आहे. जसें 'मिदचोऽन्त्यात्परः' (१।१।४७) हें

---

४. येथें मूळामध्यें कङ्कट शब्दाऐवजीं कण्टक असा कांहीं पुस्तकांमध्यें पाठ आहे.

तद्यथा । मिदचोऽन्त्यात्परः [१.१.४७] इत्येष योगः स्थानेयोगत्वस्य प्रत्ययपरत्वस्य चापवादः । विषम उपन्यासः । युक्तं तत्र यदनवकाशं मित्करणं स्थानेयोगत्वं प्रत्ययपरत्वं च बाधत इह पुनरुभयं सावकाशम् । कोऽवकाशः । टित्करणस्यावकाशः । टित इतीकारो यथा स्यात् । कित्करणस्यावकाशः । कितीत्याकारलोपो यथा स्यात् । प्रयोजनं नाम तद्वक्तव्यं यन्नियोगतः स्यात् । यदि चायं नियोगतः परः स्यात्तत एतत्प्रयोजनं स्यात् कुतो नु खल्वेतट्टित्करणादयं परो भविष्यति न पुनरादिरिति कित्करणाच्च परो भविष्यति न पुनरन्त इति । टितः खल्वप्येष परिहारो यत्र नास्ति संभवो यत्परश्च स्यादादिश्च । कितस्त्वपरिहारः । अस्ति हि संभवो यत्परश्च स्याद-

---

सूत्र 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) याचें आणि 'प्रत्ययः परश्च' (३।१।२) याचें अपवाद आहे, त्याप्रमाणेंच हें होय.

हा दृष्टान्त येथें लागू पडत नाहीं. कारण श्नम् वगैरे प्रत्ययांना जो इत्संज्ञक मकार जोडला आहे त्याचा कुठेंही अन्यत्र उपयोग होत नसल्यामुळें त्याच्या जोरावर 'मिदचोन्त्यात्परः' यानें 'षष्ठी स्थानेयोगा' याचा आणि 'परश्च' याचा बाध केला हें योग्यच आहे. पण येथें मात्र तसें नाहीं. येथें इत्संज्ञक टकार आणि ककार या दोघांचाही अन्यत्र उपयोग होत आहे.

कुठें तो उपयोग होत आहे ?

सांगतों. 'चरेष्टः' (३।२।१६) यानें सांगितलेल्या ट प्रत्ययाला जो इत्संज्ञक टकार जोडला आहे त्याचा उपयोग कुरूचरी या त्याच्या उदाहरणामध्यें 'टिड्ढाणञ्०' (४।१।१५) यानें स्त्रीप्रत्यय ईकार झाला आहे. तसाच 'आतोऽनुपसर्गे कः' (३।२।३) यानें सांगितलेल्या कप्रत्ययाला जो इत्संज्ञक ककार जोडला आहे त्याचा उपयोग गोदः या त्याच्या उदाहरणामध्यें कित्प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला आकाराचा लोप (६।४।६४) होतो.

पण उपयोग दाखवावयाचा तो नुसतें कांहीं तरी गृहीत धरून दाखवावयाचा नसतो, तर तो विधीला अनुसरूनच दाखवावयाचा असतो. आतां जर कुरुचरी येथें ट हा प्रत्यय आणि गोदः येथें क हा प्रत्यय जो पर केला आहे तो परश्च (३।१।२) या विधीला अनुसरूनच पर केला असेल तर इत्संज्ञक टकाराचा 'स्त्रीप्रत्यय ईकार होणें' हा उपयोग आणि इत्संज्ञक ककाराचा 'अकाराचा लोप होणें' हा उपयोग बरोबर आहे असें म्हणतां येईल. पण येथें असा निश्चय कशावरून केला की 'इत्संज्ञक टकाराचा स्त्रीप्रत्यय ईकार होणें' हा उपयोग व्हावा म्हणून कुरुचरी येथें ट हा प्रत्यय परच होईल, प्रकृतसूत्रानें आद्यावयव होणार नाही. तसेंच, 'इत्संज्ञक ककाराचा आकाराचा लोप होणें हा उपयोग व्हावा म्हणून गोदः येथें क हा प्रत्यय परच होईल, प्रकृतसूत्रानें अंत्यावयव होणार नाहीं. (एकंदरींत इत्संज्ञक टकार आणि ककार यांचा योग्य उपयोग अन्यत्र होत नसल्यामुळें त्यांच्या जोरावर प्रकृतसूत्र हें 'परश्च' याचा अपवाद होईल, तेव्हां 'परवचनात्सिद्धम्' म्ह. 'परश्च यानें प्रकृतसूत्राचा परत्वास्तव बाध करणें' हा परिहार बरोबर नाहीं असें सिद्ध झालें.)

शिवाय हा परिहार इत्संज्ञक टकारासंबंधानें पुढें करणें असेल तर करा, की ज्या ठिकाणीं ट हा प्रत्यय 'परही करतां येईल आणि आद्यावयवही करता येईल' या दोन गोष्टी एकदम संभवत नसल्यामुळें विरोध तरी त्यांमध्यें दिसत आहे. पण इत्संज्ञक णकारासंबंधानें त्या परिहाराचें नांवच काढावयास नको. कारण गोदः येथें क हा प्रत्यय 'पर करणें, आणि अंत्यावयव करणें' या दोन्ही

न्तश्च । तत्र को दोषः । उपसर्गे घोः किः [३.३.९२] आध्योः प्रध्योः । नोङ्धात्वोः [६.१.१७५] इति प्रतिषेधः प्रसज्येत । टितश्चाप्यपरिहारः । स्यादेव ह्ययं टित्करणादादिर्न पुनः परः । क तर्हीदानीमिदं स्याट्टित ईकारो भवतीति । य उभयवान् । गापोष्टक् [३.२.८] इति ॥

**सिद्धं तु षष्ठ्यधिकारे वचनात् ॥३॥**

सिद्धमेतत् । कथम् । षष्ठ्यधिकारेऽयं योगः कर्तव्यः । आद्यन्तौ टकितौ षष्ठीनिर्दिष्टस्येति ।

**आद्यन्तयोर्वा षष्ठ्यर्थत्वात्तदभावेऽसंप्रत्ययः ॥४॥**

आद्यन्तयोर्वा षष्ठ्यर्थत्वात्तदभावे षष्ठ्या अभावेऽसंप्रत्ययः स्यात् । आदिरन्तो वा न भविष्यति ॥ युक्तं पुनर्यच्छब्दनिमित्तको

---

गोष्टींचा एकदम संभव असल्यामुळें विरोधच मुळीं दिसत नाहीं. (तेव्हां तेथें परत्वास्तव बाध कसा होईल ?)

मग बाध झाला नाहीं तर दोष कोणता ?

दोष असा की आध्योः, प्रध्योः या उदाहरणांमध्यें 'उपसर्गे घोः किः' (३।३।९२) यानें केलेला कि हा प्रत्यय धातूचा अंत्यावयव समजला तर त्यांतील ओस् प्रत्ययाला होणाऱ्या उदात्तस्वराचा 'नोङ् धात्वोः' (६।१।१७५) यानें निषेध होऊं लागेल.

आतां, इत्संज्ञक टकारासंबंधानें विरोध येत असला तरी तेथेंही 'परत्वास्तव बाध करणें' हा परिहार बरोबर नाहींच. ट हा प्रत्यय इत्संज्ञक टकाराच्या जोरावर कुरुचरी येथें धातूचा आद्यावयव होणारच, पर कधींही होणार नाहीं. म्हणजे प्रकृतसूत्र हें परश्च याचा अपवादच होणार आहे.

मग इत्संज्ञक टकाराचा 'स्त्रीप्रत्यय ईकार होणें' हा जो उपयोग 'टिड्ढाणञ्०' (४।१।१५) यानें सांगितला आहे त्याला उदाहरण कोणतें बरें मिळेल ?

ज्या प्रत्ययाला इत्संज्ञक टकार आणि ककार हे दोन्ही आहेत असा टक् हा प्रत्यय 'गापोष्टक्' (३।२।८) यानें सामगी, सोमपी येथें केला आहे तेथें त्याला उदाहरण मिळेल ?

(वा. ३) हें सिद्ध होत आहे (म्ह. टित् आणि कित्प्रत्यय परच होतील. आद्यावयव किंवा अंत्यावयव होणार नाहींत.)

तें कसें ?

षष्ठीच्या प्रकरणामध्यें हें प्रकृत सूत्र घालावें म्ह. षष्ठी विभक्ति उच्चारून जर टित् किंवा कित् सांगितले असतील तरच ते आद्यावयव किंवा अंत्यावयव होतील. (प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें पंचमी विभक्ति उच्चारलेली असते. षष्ठी नाहीं.)

(वा. ४) आद्यावयव आणि अंत्यावयव हे षष्ठीप्रत्ययाचे अर्थ असल्यामुळें ज्या ठिकाणीं त्या षष्ठीप्रत्ययाचा अभाव आहे त्या ठिकाणीं त्या अर्थाचा बोध होत नाहीं म्हणून प्रकृतपरिभाषेनें तेथें आद्यावयव किंवा अंत्यावयव होणार[६] नाहीं.

पण 'शब्दप्रयोग हा अर्थाचें कारण आहे'

---

५. टक् या प्रत्ययाला टकार जोडला आहे म्हणून सामगः येथें तो प्रत्यय गा धातूचा आद्यावयव करावा किंवा ककार जोडला आहे म्हणून गा धातूचा अंतावयव करावा असा विरोध आला असतां तेथें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या परिभाषेमुळें अंत्यावयवानें आद्यावयवाचा परत्वास्तव बाध होतो. प्रकृतसूत्रामध्यें आदि या शब्दाच्यापुढें अंत हा शब्द सूत्रकारांनीं घातला आहे.

६. परिभाषासूत्र हें फक्त व्यवस्था करणारें असतें. विधिसूत्राप्रमाणें नवीन कांहीं करण्याचें सामर्थ्य त्याला नाहीं. 'आर्धधातु०' (७।२।३५) यानें भवितव्य या उदाहरणामध्यें तव्य प्रत्ययाला इट् करावयाचा आहे. तेथें 'आद्यन्तौ' हें प्रकृत परिभाषासूत्र प्रवृत्त झालें नसतें तरी भवितव्य हें उदाहरण साधलें असतें. कारण आर्धधातुकस्य या षष्ठीप्रत्ययाचा अवयव हा अर्थ कदाचित् घेतां आला असता,

नामार्थः स्यान्नार्थनिमित्तकेन नामशब्देन भवितव्यम् । अर्थनिमित्तक एव शब्दः । तत्कथम् । आद्यन्तौ षष्ठ्यर्थौ । न चात्र षष्ठीं पश्यामः । ते मन्यामह आद्यन्तावेवात्र न स्तस्तयोरभावे षष्ठ्यपि न भवतीति ॥

**मिदचोऽन्त्यात्परः ॥१.१.४७॥**

किमर्थमिदमुच्यते ।

**मिदचोऽन्त्यात्पर इति स्थानपरप्रत्ययापवादः ॥१॥**

मिदचोऽन्त्यात्पर इत्युच्यते स्थानेयोगत्वस्य प्रत्ययपरत्वस्य चापवादः । स्थानेयोगत्वस्य तावत् । कुण्डानि वनानि । पयांसि यशांसि । प्रत्ययपरत्वस्य । भिनत्ति

---

हें तुमचें म्हणणें योग्य आहे काय ?

नाहीं. अर्थामुळें शब्दाचा प्रयोग होत असतो. तेव्हां जर अर्थ ह्याच शब्दप्रयोगाचें कारण आहे तर मग येथें 'षष्ठीप्रत्ययाचा अभाव आहे म्हणून त्यांच्या अर्थाचा बोध नाहीं' असें कसें म्हणता ?

वार्तिककारांचा अभिप्राय असा आहे की आद्यावयव आणि अंत्यावयव हे तर षष्ठीप्रत्ययाचे अर्थ आहेत. आणि ह्या प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें तर षष्ठीप्रत्यय दिसत नाहीं. त्यावरून आम्ही असें म्हणतों की शब्दप्रयोगाला कारणीभूत जे त्याच्या मुळाशीं असलेले आद्यावयव आणि अंत्यावयव हे अर्थ तेच तेथें अगोदर पाणिनीच्या मनांत नाहींत म्हणूनच म्ह. ते अर्थ मनांत नसल्यामुळें षष्ठीप्रत्यय देखील त्यानें तेथें घातला नाहीं.

(सू.१.१.४७) हें सूत्र कशाकरतां केलें आहे?

(वा.१) 'मिदचोन्त्यात्परः हे जें प्रकृतसूत्र केलें आहे तें 'स्थानीच्या जागीं आदेश होतो' (१।१।४९) आणि 'प्रत्यय पर होतो' (३।१।२) या दोघांचा अपवाद म्हणून केलें आहे. त्यांपैकीं 'स्थानीच्या जागीं आदेश होतो' याच्या अपवादाचीं उदाहरणें कुण्डानि, वनानि, पयांसि यशांसि. 'प्रत्यय पर होतो' याच्या अपवादाचें

---

व तो अवयव आदि, मध्य, आणि अंत असा कुठें तरीं जोडावयाचा तो कदाचित् आद्यावयवही झाला असता. अशा रीतीनें भवितव्य हें उदाहरण जरी साधलें तरी कदाचित् तो मध्यावयव किंवा अंतावयव होऊन अनिष्ट रूपही झालें असतें. तसेंच षष्ठीप्रत्ययाचा अर्थ स्थानीं असा घेऊन कदाचित् तव्य याला इट् असा आदेशही झाला असता. आतां हें प्रकृत परिभाषासूत्र प्रवृत्त झालें म्हणजे ही सर्व अव्यवस्था मोडून भवितव्य असें एकच रूप कायम केलें जातें. 'चरेष्टः' यानें जेथें ट प्रत्यय होतो तेथें म्ह. कुरुचर या उदाहरणामध्यें जर ह्या प्रकृतपरिभाषासूत्राची प्रवृत्ति झाली नाहीं तर तो ट प्रत्यय चर धातूचा आद्यावयव कधींही झाला नसता. कारण तेथें अवयव या अर्थाला दाखविणारा षष्ठीप्रत्ययच नाहीं. चरेः ही पंचमी आहे. जेव्हां तेथें आद्यावयव करणें म्हणजे तें विधिसूत्राप्रमाणें नवीनच करावें लागणार आहे. आणि तितकें सामर्थ्य परिभाषासूत्रामध्यें मानणें म्हणजे विनाकारण जास्त भार त्याच्यावर लादल्यासारखा होतो. एकंदरींत षष्ठीप्रत्यय नसेल तेथें हें परिभाषासूत्र प्रवृत्त होत नाहीं असें सिद्ध होतें.

७. शब्दप्रयोग हा अर्थाचें उत्पादक कारण नसून ज्ञापक कारण आहे असा सिद्धान्त आहे. त्यावरून पाणिनीच्या मनांतील गोष्ट येथें अनुमानित होते असें समजावें.

१. इत्संज्ञक मकार ज्याला जोडला असेल तो आगम ज्याला सांगितला असेल त्याचाच अवयव समजून त्यांतील अचांपैकीं अंत्य अचापुढें करावा.

२. 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) यानें सांगितलेला नुम् 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) या परिभाषेनें आदेश झाला असतां तो 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) याच्या मदतीनें शेवटच्या वर्णाला म्ह. कुण्ड, वन यांतील शेवटच्या अकाराचे जागीं आणि पयस्, यशस् यांतील शेवटच्या सकाराचें जागीं झाला असता. परंतु या प्रकृत परिभाषेनें 'षष्ठीस्थाने०'

छिनत्ति । भवेदिदं युक्तमुदाहरणं कुण्डानि वनानि यत्र नास्ति संभवो यदयमचोऽन्त्यात्परश्च स्यात्स्थाने चेति । इदं त्वयुक्तं पयांसि यशांसीति । अस्ति हि संभवो यदचोऽन्त्यात्परश्च स्यात्स्थाने च । एतदपि युक्तम् । कथम् । नैवेश्वर आज्ञापयति नापि धर्मसूत्रकाराः पठन्त्यपवादैरुत्सर्गा बाध्यन्तामिति । किं तर्हि । लौकिकोऽयं दृष्टान्तः । लोके हि सत्यपि संभवे बाधनं भवति । तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवेऽचामन्त्यात्परत्वं षष्ठीस्थानेयोगत्वं बाधिष्यते ॥

---

उदाहरण भिनत्ति[३], छिनत्ति.

हीं जीं अपवादाचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांपैकीं कुण्डानि, वनानि हीं उदाहरणें बरोबर आहेत कारण त्या ठिकाणीं 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) या सूत्रानें सागितलेला नुम् 'प्रकृत सूत्रानें कुण्ड, वन यांतील शेवटच्या अचाच्या पुढें म्ह. अकाराच्या पुढेंही करतां येईल आणि 'षष्ठी स्थानेयोगा' ( १।१।४९ ) या सूत्रानें शेवटच्या वर्णाच्या म्ह. त्या अकाराच्या जागींही करतां येईल' असा एकदम संभव नसल्यामुळें बाध केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. तेव्हां तेथें अपवाद घेतला हें ठीक झालें. पण पयांसि, यशांसि हीं मात्र अपवादाचीं उदाहरणें बरोबर नाहींत. कारण या ठिकाणीं तोच नुम् हा 'प्रकृतसूत्रानें पयस्, यशस् यांतील शेवटच्या अचाच्या पुढें म्ह. अकाराच्या पुढेंही करतां येईल' आणि 'षष्ठी स्थाने०' या सूत्रानें शेवटच्या वर्णाच्या म्ह.सकाराच्या जागींही करतां येईल' असा एकदम संभव आहे. तेव्हां तेथें विनाकारण बाध करणें योग्य नाहीं.

पयांसि, यशांसि हींही अपवादाचीं उदाहरणें योग्यच आहेत.

तीं कशीं ?

तीं अशीं की अगोदर 'अपवादांनीं उत्सर्गांचा म्ह. सामान्य शास्त्राचा बाध करावा' ही गोष्ट निघाली कोठून त्याचा विचार केला पाहिजे. ईश्वरानें म्ह. वेदानें कांहीं तशी आज्ञा केली नाहीं आणि धर्मसूत्रकारांनींही तसें वचन घातलें नाहीं. तर मग वरील गोष्टींच्या मुळाशीं काय आहे असें पाहिलें तर लोकामधील दृष्टान्त त्याच्या मुळाशीं आहे असें दिसतें. आणि लोकामध्यें तर उत्सर्ग आणि अपवाद या दोघांचा एका ठिकाणीं संभव असला तरी तेथें अपवादानें उत्सर्गाचा बाध केलेला दिसतो. जसें, 'ब्राह्मणांना दहीं द्या आणि कौंडिन्याला ताक द्या' असें म्हटलें असतां तेथें जरी कौंडिन्याला ताक आणि दहीं हे दोन्ही पदार्थ देतां येतील तरी तेथें त्याला फक्त ताकच दिलें जातें, दहीं दिलें जात नाहीं, तेव्हां जसा तेथें तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो तसा पयांसि, यशांसि येथेंही जरी 'अंत्यवर्णाच्या जागीं नुम् करणें' आणि 'शेवटच्या अचाच्या पुढें करणें' या दोन गोष्टींचा संभव आहे तरी 'शेवटच्या अचाच्या पुढें मित् करावा' असें सांगणाऱ्या प्रकृतसूत्रानें 'अंत्यवर्णाचे स्थानीं आदेश म्हणून करावा' असें सांगणाऱ्या 'षष्ठी स्थाने०' या सूत्राचा बाध होईल.

---

या परिभाषेचा बाध केल्यामुळें तो नुम् कोणत्याही वर्णाचे जागीं न होतां शेवटच्या अकाराच्यापुढें आगम अशा स्वरूपानें होतो. आतां त्याला आदेश म्हणतां येत नाहीं.

३. 'रुधादिभ्यः श्नम्' (३।१।७८) यानें सांगितलेला श्नम् हा प्रत्यय 'परश्च' (३।१।२) यानें रुध् याच्यापुढें झाला असता. परंतु या प्रकृत परिभाषेनें 'परश्च' याचा बाध केल्यामुळें श्नम् प्रत्यय रुध् धातूच्यापुढें न होतां शेवटच्या अचाच्यापुढें म्ह. रुध् धातूमधील उकाराच्यापुढें प्रत्यय असूनच आगम अशा स्वरूपानें होतो.

**अन्त्यात्पूर्वो मस्जेरनुषङ्गसंयोगादिलोपार्थम् ॥२॥**

अन्त्यात्पूर्वो मस्जेर्मिद्वक्तव्यः । किं प्रयोजनम् । अनुषङ्गसंयोगादिलोपार्थम् । अनुषङ्गलोपार्थं संयोगादिलोपार्थं च । अनुषङ्गलोपार्थं तावत् । मग्नः मग्नवान् । संयोगादिलोपार्थम् । मङ्क्ता मङ्क्तुम् मङ्क्तव्यम् ॥

**भर्जिमर्च्योश्च ॥३॥**

भर्जिमर्च्योश्चान्त्यात्पूर्वो मिद्वक्तव्यः । भरूजा मरीचय इति ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । निपातनात्सिद्धम् । किं निपातनम् । भरूजाशब्दोऽङ्गुल्यादिषु पठ्यते मरीचिशब्दो बाह्वादिषु ॥

---

(वा.२) मस्ज् धातूला जो मित् म्ह. नुम् आगम 'मस्जिनशोर्झलि' (७।१।६०) या सूत्रानें सांगितला आहे तो शेवटच्या अचाच्या पुढें न होतां शेवटच्या वर्णाच्या पूर्वी होतो असें सांगावें.

याचा काय उपयोग ?

अनुषङ्गसंयोगादिलोपार्थम् म्ह. अनुषङ्गलोप (६।४।२४) होण्याकरतां आणि संयोगादिलोप (८।२।२९) होण्याकरतां. उपधेला जो नकार असतो त्याला अनुषङ्ग असें म्हणतात. त्याच्या लोपाचीं उदाहरणें, मग्नः मग्नवान्. संयोगादिलोपाचीं उदाहरणें मङ्क्ता, मङ्क्तुम्, मङ्क्तव्यम्.

(वा.३) भर्जि, मर्चि यांनाही जो मित् आगम होतो तो शेवटच्या वर्णाच्या पूर्वी होतो असें म्हणावें. उदा० भरूजा, मरीचयः.

तर मग तसें म्हटलेंच पाहिजे ना ?

तसें म्हणावयास नको. निपातनावरूनच तें सिद्ध होईल. निपातन म्ह. प्रत्यक्ष तसा शब्द उच्चारणें.

तें निपातन कोणतें ?

अङ्गुल्यादिगणामध्यें (५।३।१०७) भरूजा असा शब्द पाणिनीनें उच्चारला आहे. तसाच मरीचि हा शब्द बाह्वादिगणामध्यें (४।१।९६) उच्चारला आहे.

काय पण हा मित् पूर्वीचा अंत्यावयव

---

४. मस्ज् धातूहून निष्ठा (३।२।१०२) यानें यक्त प्रत्यकेल्यानंतर 'मस्जिनशो०' (७।१।६०) यानें नुम् आगम होतो तो जर शेवटच्या अचाच्या पुढें म्ह. अकाराच्यापुढें झाला तर मन्स्ज् असें होत असल्यामुळें धातूची उपधा (१।१।६५) सकार होतो, नकार होत नाहीं, म्हणून 'अनिदितां०' (६।४।२४) यानें नकाराचा लोप होणार नाहीं. आतां या प्रकृत वार्तिकानें शेवटच्या वर्णाच्या म्ह. जकाराच्या पूर्वी केला म्हणजे मस्नज् असें होतें आणि, धातूच्या उपधेला नकार येत असल्यामुळें त्याचा लोप होतो.

५. मस्ज् धातूहून 'ण्वुल्तृचौ' (३।१।१३३) यानें तृच् प्रत्यय केल्यानंतर नुम् हा आगम अकाराच्यापुढें झाला तर न्स्ज् असा संयोग होतो. तेव्हां संयोगाचा आदि सकार नसल्यामुळें 'स्कोः संयो०' (८।२।२९) यानें सकाराचा लोप होणार नाहीं. आतां प्रकृत वार्तिकानें जकाराच्या पूर्वी नुन् केला म्हणजे स्न्ज् असा संयोग होतो आणि संयोगाचा आदि सकार असल्यामुळें त्याचा लोप होतो. 'तीन किंवा अधिक व्यंजनें जवळ असतील तर त्यांतील दोन व्यंजनांना संयोगसंज्ञा होत नाहीं' या मताला अनुसरून हा उपयोग दाखविला आहे. 'समुदाये संयोगादिलोपो मस्जेः' (१।१।७ वार्तिं०२) पहा.

६. भर्ज् धातूहून अच् प्रत्यय केल्यानंतर धातूला जो रुम् हा आगम होतो तो अकाराच्यापुढें न होतां शेवटच्या वर्णाच्या म्ह. जकाराच्या पूर्वी होतो त्यामुळें भरूज असा शब्द होतो. पुढें स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय होऊन भरूजा असें होतें. तसेंच दहाव्या गणांतील मर्च धातूहून णिच् प्रत्यय करून त्याच्यापुढें 'अच् इः' (उणा०४।१४१) यानें इ प्रत्यय झाला आहे. तेथें जो धातूला इम् आगम होतो तो शेवटच्या वर्णाच्या म्ह. चकाराच्या पूर्वी होतो त्यामुळें मरीचि असा शब्द सिद्ध होतो.

७. शिवाय 'मृकणिभ्यामीचिः' (उणा०४।६९) यानें मृ धातूहून ईचि प्रत्यय करूनही मरीचि हा शब्द सिद्ध होत आहे.

किं पुनरयं पूर्वान्त आहोस्वित्परादिराहोस्विदभक्तः । कथं चायं पूर्वान्तः स्यात्कथं वापरादिः कथं वाभक्तः । यद्यन्त इति वर्तते ततः पूर्वान्तः । अथादिरिति वर्तते ततः परादिः । अथोभयं निवृत्तं ततोऽभक्तः । कश्चात्र विशेषः ।

**अभक्ते दीर्घनलोपस्वरणत्वानुस्वारशीभावाः ॥४॥**

यद्यभक्तो दीर्घत्वं न प्राप्नोति । कुण्डानि वनानि । नोपधायाः [६.४.७] सर्वनामस्थाने चासंबुद्धौ [८] इति दीर्घत्वं न प्राप्नोति । दीर्घ ॥ नलोप । नलोपश्च न सिध्यति । अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था । ता ता पिण्डानाम् । नलोपः प्रातिपदिकान्तस्य [८.२.७] इति नलोपो न प्राप्नोति । नलोप ॥ स्वर । स्वरश्च न सिध्यति । सर्वाणि ज्योतींषि । सर्वस्य सुपि [६.१.१९१] इत्याद्युदात्तत्वं न प्राप्नोति । स्वर ॥ णत्व । णत्वं च न सिध्यति । माषवापाणि व्रीहिवापाणि । पूर्वान्ते प्रातिपदिकान्तन-

---

होतो किंवा पराचा आद्यावयव होतो अथवा दोघांचाही अवयव न होतां मध्यें अलगच राहतो.

(हा प्रश्न कसा संभवतो?) 'पूर्वाचा अंत्यावयव' कसा होईल, 'पराचा आद्यावयव' कसा होईल तसा 'अलगच मध्यें राहतो' असें पण कसें म्हणतां येईल?

जर ह्या प्रकृतसूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून अंतशब्दाची अनुवृत्ति आली तर मित् 'हा पूर्वाचा अंत्यावयव होतो' असें म्हणतां येईल. तसेंच आदिशब्दाची अनुवृत्ति केली तर 'पराचा आद्यावयव होतो' असें म्हणतां येईल आणि दोन्ही शब्दांची अनुवृत्ति केली नाहीं म्हणजे 'मध्यें अलग राहतो' असे म्हणतां येईल.

मग ह्या तीन पक्षांमध्यें फरक काय होतो?

(वा.४) जर मित् हा कोणाचाच अवयव न होतां अलगच राहील तर दीर्घ होणार नाहीं. कुण्डानि, वनानि या उदाहरणांमध्यें 'नोपधायाः' (६।४।७) याच्या पुढील 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' (६।४।८) यानें उपघेला सांगितलेला दीर्घ होणार नाहीं. तसाच नलोपही होणार नाहीं. 'अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था', 'ता ता पिण्डानाम्' या वाक्यांमधील त्री आणि ता या रूपांमध्यें नलोपः प्रातिपदिकान्तस्य (८।२।७) यानें जो नकाराचा लोप होत असतो तो होणार नाहीं. तसाच स्वरही सिद्ध होणार नाहीं. 'सर्वाणि ज्योतींषि' या वाक्यामधील सर्वाणि या रूपामध्यें 'सर्वस्य सुपि' (६।१।१९१) यानें जो आदि उदात्त होत असतो तो होणार नाहीं. तसेंच माषवापाणि, व्रीहिवापाणि या उदाहरणांमध्यें णत्व सिद्ध होणार नाहीं. येथें 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) यानें झालेला नुम् हा जर पूर्वाचा अंत्यावयव मानला तर 'प्रातिपदिकान्त०' (८।४।११) यानें प्रतिपादिकाचा अंत्यावयव समजून त्या नुमाच्या नकाराला

---

८. कुण्ड शब्दापुढील जस् प्रत्ययाला शि आदेश (७।१।२०) केल्यानंतर 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) यानें झालेला नुम् जर या अंगाचा अवयव न होतां नुसता पुढें झाला तर अंग नकारान्त नसल्यामुळें दीर्घ होणार नाहीं.

९. त्रीणि, तानि अशीं जीं त्रि आणि तद् या शब्दांचीं नपुंसकलिंगीं प्रथमा बहुवचनें होतात त्यांतील इ प्रत्ययाचा 'सुपां सुलुक०' (७।१।३९) यानें वेदामध्यें लुक् होऊन त्याच्यामागील नुमागमाचा नकार प्रातिपदिकाचा अंत्यावयव आहे म्हणून त्याचा लोप होत असतो.

१०. कारण सर्व शब्दाच्यापुढें सुप् प्रत्यय नाहीं. मध्यें नकारानें व्यवधान होत आहे.

कारस्येति सिद्धम् । परादौ विभक्तिनकारस्येति । अभक्ते नुमो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च [८.४.११] इति । णत्व ॥ अनुस्वार । अनुस्वारश्च न सिध्यति । द्विषंतपः परंतपः । मोऽनुस्वारो हलीत्यनुस्वारो न प्राप्नोति । मा भूदेवम् । नश्चापदान्तस्य झलि [८.३.२४] इत्येवं भविष्यति । यस्तर्हि न झल्परः । वहंलिहो गौः । अभ्रंलिहो वायुः । अनुस्वार ॥ शीभाव । शीभावश्च न सिध्यति । त्रपुणी जतुनी तुम्बुरुणी । नपुंसकादुत्तरस्यौङः शीभावो भवतीति शीभावो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि परादिः करिष्यते ।

**परादौ गुणवृद्ध्यौत्त्वदीर्घनलोपानुस्वारशीभावेनकारप्रतिषेधः ॥५॥**

यदि परादिर्गुणः प्रतिषेध्यः । त्रपुणे जतुने तुम्बुरुणे । घेर्ङिति [७.३.१११]

---

णत्व होईल. जर तो नुम् पराचा आद्यावयव मानला तर 'तो नकार विभक्तिप्रत्ययांपैकीं आहे' असें समजून त्याच सूत्रानें णत्व होईल. आणि जो नुम् 'कोणाचाच अवयव नाहीं' असें मानलें तर त्या णत्व सांगणाऱ्या सूत्रामध्यें नुमाच्या नकाराला णत्व होण्याकरतां 'नुम्' असा निराळा शब्द घातला पाहिजे.

पण तो नवीन शब्द घालावयास नको.कारण पाणिनीनें 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च (८।४।११) असा सूत्रामध्यें नुम् हा शब्द अगोदर घातलेलाच आहे.[११]

तसेंच मित् हा कोणाचाच अवयव मानला नाहीं तर अनुस्वारही सिद्ध होणार नाहीं. 'मोनुस्वारः' (८।३।२३) यानें जो हल् पुढें असतांना पदाच्या शेवटीं असलेल्या मकाराला अनुस्वार सांगितला आहे तो द्विषंतपः, परंतपः या उदाहरणांमध्यें होणार[१२] नाहीं.

पण त्या सूत्रानें अनुस्वार झाला नाहीं तरी कांहीं हरकत नाहीं. 'नश्चापदान्तस्य झलि' (८।३।२४) यानें तेथें अनुस्वार होईल.

तर मग ज्याठिकाणीं झल् पुढें नसेल तेथें काय वाट लावाल ? उदा० वहंलिहो गौः, अभ्रंलिहो वायुः. तेव्हां मित् हा जर कोणाचाच अवयव मानला नाहीं तर 'अनुस्वार होणार नाहीं' हा दोष कायम राहणारच. तसाच शी आदेश सिद्ध होणार नाहीं. 'नपुंसकाच्च' (७।१।१९) या सूत्रानें जो नपुंसकलिंगी शब्दाच्यापुढील प्रथमेच्या आणि द्वितीयेच्या द्विवचनप्रत्ययाला शी आदेश सांगितला आहे तो त्रपुणी,[१३] जतुनी, तुम्बुरुणी या उदाहरणांमध्यें होणार नाहीं.

हे दोष येतात तर मित् हा पराचा आद्यावयवच करतां येईल.

(वा.५) जर मित् हा पराचा आद्यावयव केला तर त्रपुणे, जतुने, तुम्बुरुणे या उदाहरणांमध्यें 'घेर्ङिति' (७।३।१११) यानें जो गुण[१४]

---

११. एकंदरींत 'मित् कोणाचाच अवयव नाहीं' या पक्षावर 'णत्व होणार नाहीं' हा दोष येत नाहीं.

१२. कारण 'अरुर्द्विष०' (७।३।६७) यानें जो द्विषत् आणि पर या शब्दांना नुम् आगम झाला तो पूर्वाचा अवयव नसल्यामुळें त्या नुमागमाचा मकार 'पदाच्या शेवटीं आहे' असें म्हणतां येत नाहीं.

१३. त्रपु शब्दाहून औ प्रत्यय केल्यानंतर 'नपुंसकाच्च' (७।१।१९) यानें त्या औप्रत्ययाला शीआदेश प्राप्त झाला. परंतु 'इकोचि०' (७।१।७३) यानें प्राप्त झालेला नुम् हा शीआदेशापेक्षां पर आणि नित्य असल्यामुळें शी आदेशाच्या अगोदर होईल. नंतर त्या नुमागमाच्या नकारानें व्यवधान येत असल्यामुळें शीआदेश होणार नाहीं.

१४. त्रपु वगैरे शब्दांहून चतुर्थीचें एकवचन ङे प्रत्यय केल्यानंतर 'इकोचि०' (७।१।७३) यानें जो नुम् आगम झाला तो त्रपु याचा अवयव नसल्यामुळें त्रपु ह्या उकारान्ताला घिसंज्ञा (१।४।७) कायम आहे.आणि तो नुम् आगम पुढील प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें मध्यें व्यवधान होत नाहीं त्यामुळें गुण प्राप्त होत आहे.

इति गुणः प्राप्नोति । गुण ॥ वृद्धि । वृद्धिः प्रतिषेध्या । अतिसखीनि ब्राह्मणकुलानि । सख्युरसंबुद्धौ [७.१.९२] इति णित्त्वेऽचो ञ्णिति [७.२.११५] इति वृद्धिः प्राप्नोति । वृद्धि ॥ औत्त्व । औत्त्वं च प्रतिषेध्यम् । त्रपुणि जतुनि तुम्बुरुणि । इदुद्भ्यामौदच्च घेः [७.३.११७-११९] इत्यौत्वं प्राप्नोति । औत्त्व ॥ दीर्घ । दीर्घत्वं च न सिध्यति । कुण्डानि वनानि । नोपधायाः सर्वनामस्थान इति दीर्घत्वं न प्राप्नोति । मा भूदेवम् । अतो दीर्घो यञि सुपि च [७.३.१०१-१०२] इत्येवं भविष्यति । इह तर्हि । अस्थीनि दधीनि प्रियसखीनि ब्राह्मणकुलानि । दीर्घ ॥ नलोप । नलोपश्च न सिध्यति । अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था । ता ता पिण्डानाम् । नलोपः प्रातिपदिकान्तस्येति नलोपो न प्राप्नोति । नलोप ॥ अनुस्वार । अनुस्वारश्च न सिध्यति । द्विषंतपः परंतपः । मोऽनुस्वारो हलीत्यनुस्वारो न प्राप्नोति । मा भूदेवम् । नश्चापदान्तस्य झलीत्येवं भविष्यति । यस्तर्हि न झलपरः । वहंलिहो गौः । अभ्रंलिहो वायुः । अनुस्वार ॥ शीभावेनकारप्रतिषेधः । शीभावे

---

प्राप्त होतो त्याचा निषेध केला पाहिजे. तसेंच अतिसखीनि ब्राह्मणकुलानि येथें अतिसखिशब्दाच्या पुढील शि प्रत्यय 'सख्युरसंबुद्धौ' (७।१।९२) यानें णित् असा समजला जात असल्यामुळें 'अचो ञ्णिति' (७।२।११५) यानें जी वृद्धि प्राप्त होते तिचा निषेध केला पाहिजे. तसेंच, त्रपुणि, जतुनि, तुम्बुरुणि या उदाहरणांमध्यें 'इदुद्भ्यामौदच्च घेः' यांतील 'अच्च घेः' (७।३।११९) या विभक्त सूत्रानें सप्तमीप्रत्ययाला जो औकार आदेश प्राप्त होतो त्याचा निषेध केला पाहिजे. तसेंच मित् हा पराचा आद्यावयव मानला तर दीर्घ होणार नाहीं. कुण्डानि, वनानि या उदाहरणांमध्यें 'नोपधायाः' (६।४।७) याच्यापुढील 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' (६।४।८) यानें उपधेला सांगितलेला दीर्घ होणार नाहीं.

त्या सूत्रानें दीर्घ झाला नाहीं तरी कांहीं हरकत नाहीं. 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१) याच्यापुढील 'सुपि च' (७।३।१०२) या सूत्रानें तेथें दीर्घ करतां[१५] येईल.

तर मग अस्थीनि, दधीनि, प्रियसखीनि ब्राह्मणकुलानि, या उदाहरणांमध्यें 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' (६।४।८) यानें जो दीर्घ होत असतो तो होणार नाहीं. (हा दोष येतोच. कारण तेथें इकाराला दीर्घ करावयाचा आहे. आणि 'सुपि च' यानें तर फक्त अकारालाच दीर्घ सांगितला आहे.) तसाच नलोपही होणार नाहीं. अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था, ता ता पिण्डानाम्, या वाक्यांमधील त्री आणि ता या रूपांमध्यें 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य' (८।२।७) यानें जो नकाराचा लोप होत असतो तो होणार नाहीं. तसेंच अनुस्वारही सिद्ध होणार नाहीं. म्ह. द्विषंतपः, परंतपः, या उदाहरणांमध्यें 'मोनुस्वारः' (८।३।२३) यानें जो हल् पुढें असतांना अनुस्वार होत असतो तो होणार नाहीं.

पण त्या सूत्रानें अनुस्वार झाला नाहीं तरी कांहीं हरकत नाहीं. 'नश्चापदान्तस्य झलि' (८।३।२४) यानें तेथें अनुस्वार होईल.

तर मग ज्या ठिकाणीं झल् पुढें नाहीं तेथें काय वाट लावाल ? उदा० वहंलिहो गौः, अभ्रं लिहो वायुः. तसाच 'शी आदेश

---

१५. कारण नुम् हा आगम पराचा आद्यावयव होतो' हा पक्ष घेतला असल्यामुळें नि हा यञादि सुप् प्रत्यय होत आहे.

नकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः । त्रपुणी जतुनी तुम्बुरुणी । सनुम्कस्य शीभावः प्राप्नोति । नैष दोषः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य न प्राप्नोति । कस्मात् । नुमा व्यवहितत्वात् ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

**पूर्वान्ते नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं द्विगुस्वरश्च ॥ ६ ॥**

यदि पूर्वान्तः क्रियते नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं द्विगुस्वरश्च न सिध्यति । नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वम् । आराशस्त्रिणी धानाशष्कुलिनी । निष्कौशाम्बिनी निर्वाराणसिनी । द्विगुस्वरः । पञ्चारत्निनी दशारत्निनी । नुमि कृतेऽनन्त्यत्वादेते विधयो न प्राप्नुवन्ति ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ७ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । बहिर-

---

कर्तव्य असतांना त्याच्या स्थानीमध्यें नकार घेऊं नये' असा निषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर त्रपुणी, जतुनी, तुम्बुरुणी या उदाहरणांमध्यें नुम् हा पुढील औप्रत्ययाचा आद्यावयव होत असल्यामुळें त्या नुमागमासकट औप्रत्ययाला 'नपुंसकाच्च' (७।१।१९) यानें शी आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' म्ह. सूत्रामध्यें जो प्रत्यक्ष उच्चारला असेल तेवढ्यालाच आदेश होतात या परिभाषेनें नुमागमासकट औप्रत्ययाला शी आदेश होणार नाहीं.

तर मग त्या परिभाषेनें नकार वगळला तर त्याच्या पुढील औ यालाही शी आदेश करतां येणार नाहीं. कारण मध्यें त्याच नकारानें व्यवधान येत असल्यामुळें तो औ प्रत्यय नपुंसकलिंगी अंगाच्या पुढें पडत नाहीं.

तर मग असे जर दोष येतात तर मित् हा पूर्वाचा अंत्यावयव करतां येईल.

(वा.६) मित् हा जर पूर्वाचा अंत्यावयव केला तर नपुंसकह्रस्व (१।२।४७) उपसर्जनह्रस्व (१।२।४८) आणि द्विगुस्वर (६।२।२९) हे सिद्ध होणार नाहींत. नपुंसकत्व आणि उपसर्जनह्रस्वत्व यांचीं उदाहरणें[१६]-आराशस्त्रिणी धानाशष्कुलिनी, निष्कौशाम्बिनी, निर्वाराणसिनी. द्विगुस्वराचीं उदाहरणें—पञ्चारत्निनी, दशारत्निनी. या उदाहरणांमध्यें 'इकोचि विभक्तौ' (७।१।७३) यानें नुम् आगम केल्यानंतर तो नुम् पूर्वाचा अंत्यावयव झाला तर पूर्वीचा शब्द अजन्त नसल्यामुळें ह्रस्व आणि स्वर[१७] हे विधि होणार नाहींत.

अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

बहिरङ्गलक्षणत्वात् म्ह. नुम् हा बहिरङ्ग

---

१६. आराशस्त्री, धानाशष्कुली हे समाहारद्वंद्व आहेत. तसले समाहार दोनदां दाखवावयाचे असल्यामुळें समाहारद्वंद्वाहून द्विवचन येथें केलें आहे. या ठिकाणीं शेवटच्या ईकाराला 'ह्रस्वो नपुंसके०' (११२।४७) यानें ह्रस्व प्राप्त झाला आहे. निष्कौशाम्बी, निर्वाराणसी हे 'निरादयः क्रान्ताद्यर्थे पञ्चम्या' (२।२।१८ सौनाग०) यानें पञ्चमी तत्पुरुष होऊन सामासिक शब्द बनले आहेत. या ठिकाणीं शेवटच्या ईकाराला 'ह्रस्वो नपुंसके'० (१।२।४७) आणि 'गोस्त्रियो' (१।२।४८) या दोन्हीं सूत्रांनीं ह्रस्व प्राप्त झाला आहे. परंतु त्या ह्रस्वाच्या अगोदर नित्यत्वास्तव नुम् आगम होईल. तसेंच पञ्चारत्नि, दशारत्नि, हे सामासिक शब्द 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' (२।१।५१) 'संख्यापूर्वो द्विगुः' (२।१।५२) यांनीं द्विगुसमास होऊन बनले आहेत. येथें 'इगन्तकाल०' (६।२।२९) या सूत्रानें अरत्नि हे इगन्त उत्तरपद पुढें आहे म्हणून पञ्चन् या पूर्वपदाला प्रकृतिस्वर म्ह. आदि उदात्त प्राप्त झाला आहे. परंतु त्या स्वराच्या अगोदर नित्यत्वास्तव नुम् आगम होईल.

१७. नुम् आगम पूर्वाचा अंत्यावयव झाल्यामुळें 'अरत्निन्' एवढें उत्तरपद समजलें जाईल. आणि तें इगन्त नसल्यामुळें स्वर होणार नाहीं.

ङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गो नुमन्तरङ्गा एते विधयः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ द्विगुस्वरे भूयान्परिहारः। संघातभक्तोऽसौ नोत्सहतेऽवयवस्येगन्ततां विहन्तुमिति कृत्वा द्विगुस्वरो भविष्यति ॥

## एच इग्घ्रस्वादेशे ॥१.१.४८॥

किमर्थमिदमुच्यते ।

**एच इक्सवर्णाकारनिवृत्त्यर्थम् ॥१॥**

एच इग्भवतीत्युच्यते सवर्णनिवृत्त्यर्थमकारनिवृत्त्यर्थं च । सवर्णनिवृत्त्यर्थं तावत् । एङो ह्रस्वशासनेष्वर्ध एकारोऽर्ध ओकारो वा मा भूदिति ॥ अकारनिवृत्त्यर्थं च । इमावैचौ समाहारवर्णौ । मात्रावर्णस्य मात्रेवर्णोवर्णयोः । तयोर्ह्रस्वशासनेषु कदाचिदवर्णः स्यात्कदाचिदिवर्णोवर्णौ । मा कदाचिदवर्णं भूदित्येव-

आहे व ह्रस्व आणि स्वर हे विधि अन्तरंग आहेत. आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' म्ह. 'अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध समजावें' अशी तर परिभाषाच आहे (तेव्हां त्या परिभाषेमुळें या दोषांचा परिहार[18] होईल). द्विगु स्वरासंबंधानें तर याच्यापेक्षां चांगला निराळाच एक परिहार आहे. तो असा की जो आगम समुदायाचा अवयव म्हणून होतो तो सहजगत्या त्या समुदायांतील एखाद्या अवयवाच्या पुढें आला म्हणून तेवढ्यानें कांहीं त्या अवयवाच्या स्वरूपांत बदल करूं शकत नाहीं. तेव्हां पञ्चारत्नि या सामासिक शब्दांतील अवयव जें अरत्नि हें उत्तरपद त्याच्या इगंतत्वाचा नुमागमानें विघात होत नसल्यामुळें[19] तेथें द्विगुस्वर होण्याला कांहींच अडचण नाहीं.

(सू. ४८) हें सूत्र कशाकरतां केलें आहे ?

(वा.१) एचाला इक् होतो असें जें येथें म्हटलें आहे तें सवर्णाच्या निवृत्तीकरतां आणि अकाराच्या निवृत्तीकरतां म्हटलें आहे. त्यांपैकीं सवर्णाच्या निवृत्तीचा उपयोग असा— एङाला ज्या ठिकाणीं ह्रस्व सांगितला असेल त्या ठिकाणीं त्या एकार व ओकार यांचें स्थानीं त्यांचा सवर्ण अर्धा एकार म्ह. एकमात्रेचा ह्रस्व एकार आणि अर्धा ओकार म्ह. एकमात्रेचा ऱ्हस्व ओकार आदेश होईल, तो होऊं नये. अकाराच्या निवृत्तीचा उपयोग असा— ऐ आणि औ हे दोन वर्ण वर्णसमुदायस्वरूप आहेत. ऐ हा वर्ण उच्चारला म्हणजे त्यांत 'आ इ' या दोन वर्णांचा भास होतो, तसेंच औ हा वर्ण उच्चारला म्हणजे त्यांत 'आ उ' या दोन वर्णांचा भास होतो. ऐ आणि औ यांच्या प्रत्येकीं दोन मात्रा आहेत. त्यांपैकीं एक मात्रा पहिल्या आ या भागाची आहे आणि दुसरी एक मात्रा ई किंवा ऊ या पुढील भागाची आहे. तेव्हां अर्थातच त्या ऐ आणि औ यांना ह्रस्व कर्तव्य असेल तेथें कदाचित् अवर्ण आदेश होईल, कदाचित् इवर्ण व उवर्ण हेही आदेश होतील. त्यांत अवर्ण हा केव्हांही ह्रस्व म्हणूनच झाला पाहिजे. याकरतां हें सूत्र केलें आहे.

---

१८. नुम् आगमाला पुढील सुप्प्रत्ययाची जरूर असल्यामुळें तो बहिरंग होतो. आणि ऱ्हस्व व स्वर यांना पुढील सुप्प्रत्ययाची जरूर नसल्यामुळें ते अंतरंग होतात. तेव्हां त्या अंतरंगांच्या दृष्टीनें बहिरंग नुम् आगम असिद्ध असल्यामुळें त्याच्या अगोदरच ऱ्हस्व व स्वर होतील. अशा रीतीनें तेथें कांहीं दोष येत नाहीं.

१९. पंचारत्नि या सबंध शब्दाचा नुम् अवयव झाल्यामुळें त्या सबंध सामासिक शब्दाचें पंचारत्निन् याचें इगंतत्व जाईल. पण उत्तरपद अरत्नि एवढेंच असल्यामुळें त्याचें इगंतत्व कायमच आहे.

१. एच् म्ह. ए, ओ, ऐ, औ या चार वर्णांना जेव्हां कोठेंही ऱ्हस्वत्व प्राप्त होईल तेव्हां तो ऱ्हस्व इक् च म्ह. इ, उ, ऋ, ऌ यांपैकींच कोणीतरी जमेल तो करावा. यांशिवाय इतर मात्र केव्हांही करूं नयेत.

मर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । दीर्घप्रसङ्गः । दीर्घास्त्विकः प्राप्नुवन्ति । किं कारणम् । स्थानेऽन्तरतमो भवतीति । ननु च ह्रस्वादेश इत्युच्यते तेन दीर्घा न भविष्यन्ति । विषयार्थमेतत्स्यात् । एचो ह्रस्वप्रसङ्ग इग्भवतीति ।

**दीर्घाप्रसङ्गस्तु निवर्तकत्वात् ॥ २ ॥**

दीर्घाणां त्विकामप्रसङ्गः । किं कारणम् । निवर्तकत्वात् । नानेनेको निवर्त्यन्ते । किं तर्हि । अनिको निवर्त्यन्ते । सिद्धा ह्यत्र ह्रस्वा इकश्चानिकश्च तत्रानेनानिको निवर्त्यन्ते ॥

सवर्णनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः ।

**सिद्धमेङः सस्थानत्वात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । एङः सस्थानत्वादिकारोकारौ भविष्यतोऽर्ध एकारोऽर्ध ओकारो वा न भविष्यति । ननु चैङः सस्थानतरावर्धैकारार्धौकारौ । न तौ स्तः ।

---

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा पण—

पण तें काय ? काय पुढें तुमचें म्हणणें आहे ?

म्हणणें इतकेंच की ह्या सूत्रानें 'इक् आदेश करावेत' इतकेंच सांगितलें असल्यामुळें तें इक् आदेश होतांनाच दीर्घ होऊं लागतील.

कां बरें ?

'स्थानेऽन्तरतमः'(१।१।५०)अशी परिभाषा असल्यामुळें द्विमात्र एचांचे स्थानीं होणारे इक् द्विमात्र म्ह. दीर्घच होतील.

पण ह्या सूत्रामध्यें 'ह्रस्व कर्तव्य असतांना' असें म्हटलें आहे ना ? तेव्हां दीर्घ इक् होणार नाहींतच.

अहो, तें जें म्हटलें आहे तो केवळ स्थलनिर्देश आहे, म्ह. एचांना ह्रस्व कर्तव्य असतांना तेथेंच त्यांना इक् आदेश करावेत. म्हणजे त्यावरून जेथें ह्रस्व कर्तव्य नसेल तेथें हें सूत्र प्रवृत्त होणार नाहीं. पण जेथें ह्रस्व कर्तव्य असल्यामुळें हें सूत्र प्रवृत्त होईल तेथें दीर्घ इक् आदेश कां करूं नयेत तें समजत नाहीं.

(वा.२) दीर्घ इक् आदेश होणार नाहींत.

कां म्हणून ?

हें परिभाषासूत्र केवळ निवर्तकच आहे[२] म्हणून. म्हणजे ह्या सूत्रानें जे इक् आदेश करावेत असें जें सांगितलें आहे ते इक् आदेश कांहीं ह्या सूत्रानें नवीनच केले जात नाहींत. तर ते त्या त्या ह्रस्व सांगणाऱ्या सूत्रानेंच केले जातात. पण त्याच ऱ्हस्व सांगणाऱ्या सूत्रांमध्यें 'ऱ्हस्व होतो' इतकेंच फक्त सांगितलें असल्यामुळें ते ह्रस्व इक् आणि त्याहून निराळे अनिक् असे दोन्ही प्रकारचे प्राप्त होतात. त्यांत त्या सूत्रानीं इकाशिवाय जे दुसरे ह्रस्व आदेश येतात. त्यांची ह्या प्रकृतसूत्रानें फक्त निवृत्ति होते. (एकंदरींत ह्या सूत्रानें पूर्वी दाखविलेले दोन तऱ्हेचे उपयोग आहेत असें सिद्ध झालें.)

आतां सवर्णाच्या निवृत्तीकरतां तर हे सूत्र करावयास नकोच.

(वा.३) ए आणि ओ यांना ह्रस्व कर्तव्य असताना त्यांचे सवर्ण ऱ्हस्व ए, ओ हे न होतां इक्च ह्रस्व होतील हें आपोआपच सिद्ध होत आहे.

तें कसें ?

एङ् आणि इकार, उकार हे स्थानांनीं सारखे असल्यामुळें एङाला ऱ्हस्व कर्तव्य असतांना ते इकार आणि उकार हेच होतील. अर्धा एकार किंवा अर्धा ओकार हे होणार नाहींत.

पण अर्धा एकार आणि अर्धा ओकार हे इकार व उकार यांच्यापेक्षां स्थानांनीं जास्तच[३]

---

२. अ. १ पा. १ सू. ४६ टी. ६ पाहा.

३. ए याचीं कंठ आणि तालु अशीं दोन स्थानें आहेत. तशींच तीं दोन्ही स्थानें अर्ध्या एकाराचीं आहेत. आणि इकाराचें फक्त तालुस्थान आहे.

यदि हि तौ स्यातां तामेवायमुपदिशेत् । ननु च भोश्छन्दोगानां सात्यमुग्रिराणायनीया अर्धमेकारमर्धमोकारं चाधीयते । सुजाते ऍ अश्वसूनृते । अध्वर्यो ओॅ अद्रिभिः सुतम् । शुक्रं ते ऍ अन्यद्यजतं ते ऍ अन्यदिति । पार्षदकृतिरेषा तत्रभवतां नैव लोके नान्यस्मिन्वेदेऽर्ध एकारोऽर्ध ओकारो वास्ति ॥ अकारनिवृत्त्यर्थेनापि नार्थः ।

ऐचोश्चोत्तरभूयस्त्वात् ॥ ४ ॥

ऐचोश्चोत्तरभूयस्त्वादवर्णो न भविष्यति । भूयसी मात्रेवर्णोवर्णयोरल्पीयस्यवर्णस्य । भूयस एव ग्रहणानि भविष्यति । तद्यथा । ब्राह्मणग्राम आनीयतामित्युच्यते तत्र चावरतः पञ्चकारुकी भवति ॥

## षष्ठी स्थानेयोगा ।१।१।४९॥

---

एङसारखे आहेत ना?मग ते कां होणार नाहींत?

तसले एकार आणि ओकार हे भाषेमध्यें मुळीं अस्तित्वांतच नाहींत. जर ते अस्तित्वांत असते तर महेश्वरानें एओङ् या सूत्रामध्यें जें दीर्घ एकार आणि ओकार उच्चारले आहेत ते न उच्चारतां त्यांच्या जागीं अइउण् याप्रमाणे तसले एकमात्रेचेच एकार आणि ओकार उच्चारले असते.

पण सात्यमुग्रि आणि राणायनीय शाखेचे सामवेदी लोक 'सुजाते ए अश्वसूनृते, अध्वर्यो ओ अद्रिभिः सुतम्, शुक्रं ते ए अन्यद्यजतं ते ए अन्यत्, या वैदिक वाक्यांमध्यें जे एकार आणि ओकार यांच्यापुढें दुसरे एकार आणि ओकार उच्चारतात ते तसले म्ह. अर्धे एकमात्रेचे ऱ्हस्व उच्चारतात त्याची वाट काय ?

तो त्यांच्या सभेंतील खासगी ठराव आहे. तो सर्वत्र लागू होत नाहीं. असें पाहा की लोकामध्यें किंवा वेदामध्यें दुसरीकडे कोठेंही तसला अर्धा ओकार दृष्टीस पडत नाहीं. (एकंदरींत तसले एकार आणि ओकार न होण्याकरतां हें सूत्र करावयास नको.)

तसेंच अकाराच्या निवृत्तीकरतांही हें सूत्र नको.

(वा.४) ऐ आणि औ यांमध्यें पुढील जो इवर्णासारखा व उवर्णासारखा भाग आहे तो अवर्णासारख्या पूर्वभागापेक्षा मोठा आहे, त्यामुळें 'त्यांना ऱ्हस्व करावयाचा' असें म्हटलें की चटदिशीं तो पुढील भाग जसा मनांत येतो तसा पूर्वभाग मनांत येत नाहीं; म्हणून त्यांना अवर्ण ऱ्हस्व होणार नाहीं. ऐ आणि औ यांमध्यें इ व उ या पुढील भागाची मात्रा पूर्वभागापेक्षां जास्त आहे, म्ह. दीडमात्रा आहे आणि अ हा जो पूर्वभाग त्याची त्या उत्तरभागापेक्षां मात्रा कमी आहे, म्ह. अर्धी आहे, आणि ज्यामध्यें ज्याचा पुष्कळ भाग आहे त्याच्याच नांवानें तो मोडला जातो. जसें 'ब्राह्मणांच्या गांवामध्यें आणा' असें म्हटलें असतां ज्या गांवामध्यें पुष्कळ ब्राह्मण राहतात तें गांव 'ब्राह्मणांचें गांव' म्हणून मनांत येतें. पण सगळेच कांहीं त्यांत ब्राह्मण राहतात असें नाहीं. गांव म्हटला म्हणजे त्यांत कमींत कमी सुतार, सोनार वगैरे पांच प्रकारचे कारागीर असणारच.

(सू. ४९) 'स्थानेयोगा' हें काय आहे ?

---

तसेंच ओ याचीं कंठ आणि ओष्ठ अशीं दोन स्थानें आहेत. तशींच तीं दोन्ही स्थानें अर्ध्या अर्ध्या ओकाराचीं आहेत. आणि उकाराचें एकच ओष्ठस्थान आहे. तेव्हां एका स्थानानें जो सारखा असतो त्यापेक्षां दोन स्थानांनीं जो सारखा असतो तो जास्त सारखा असतो हें प्रसिद्धच आहे.

१. ज्या ठिकाणीं षष्ठीप्रत्ययाचा अर्थ अमुकच संबंध घ्यावा असा निश्चय होत नसेल त्या ठिकाणीं स्थानाशीं जो संबंध असतो तो त्या षष्ठीप्रत्ययाचा अर्थ घ्यावा.

किमिदं स्थानेयोगेति। स्थाने योगोऽस्याः सेयं स्थानेयोगा। सप्तम्यलोपो निपातनात्॥ तृतीयाया वैत्वम्। स्थानेन योगोऽस्याः सेयं स्थानेयोगा॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**षष्ठ्याः स्थानेयोगवचनं नियमार्थम् ॥१॥**

नियमार्थोऽयमारम्भः। एकशतं षष्ठ्यर्था यावन्तो वा ते सर्वे षष्ठ्यामुच्चारितायां प्राप्नुवन्ति। इष्यते च व्याकरणे या षष्ठी सा स्थानेयोगैव स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति षष्ठ्याः स्थानेयोगवचनं नियमार्थम्। एवमर्थमिदमुच्यते॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

**अवयवषष्ठ्यादिष्वतिप्रसङ्गः शासो गोह इति ॥२॥**

अवयवषष्ठ्यादयस्तु न सिध्यन्ति। तत्र को दोषः। शास इदङ्हलोः [६.४.३४] इति शासेश्चान्त्यस्य स्यादुपधामात्रस्य च। ऊदुपधाया गोहः [६.४.८९] इति गोहेश्चान्त्यस्य स्यादुपधामात्रस्य च॥

**अवयवषष्ठ्यादीनां चाप्राप्तिर्योगस्या-**

---

'स्थानाचें ठिकाणीं आहे योग म्ह. संबंध ज्या षष्ठीचा' अशा अर्थाचा बहुव्रीहि समास करून 'स्थानेयोगा' हें सामासिक पद उच्चारलें आहे. समास जरी आहे तरी पाणिनीनें 'स्थानेयोगा' असें उच्चारलेंच आहे म्हणून समासामधील सप्तमीप्रत्ययाचा लोप झाला नाहीं. अथवा 'स्थानाशीं आहे योग म्ह. संबंध ज्या षष्ठीचा' अशा अर्थाचा स्थानेयोगा हा बहुव्रीहि समास करावा आणि पाणिनीनें स्थानेयोगा असें उच्चारलेंच आहे म्हणून समासामधील तृतीयाप्रत्ययाला एकार आदेश झाला आहे अशी कल्पना करावी.

पण हें सूत्रच मुळीं कशाकरतां बरें केलें आहे?

(वा.१) षष्ठीच्या अर्थासंबंधानें नियम करण्याकरतां हें सूत्र केलें आहे; षष्ठीचें एकशें एक अर्थ आहेत. तेव्हां षष्ठीप्रत्यय दिसला की तितके अर्थ मनांत येतात किंवा त्यांपैकीं शब्दाला जुळतील तितके तरी निदान मनांत येणारच. आणि आम्हांला इष्ट तर असें आहे की व्याकरणामध्यें षष्ठी म्हणून जेवढी दिसते तिचा फक्त स्थानाशीं जो संबंध तोच अर्थ झाला पाहिजे. आणि ही गोष्ट तर त्याकरतां मुद्दाम कांहींतरी यत्न केल्याशिवाय सिद्धीला जाणार नाहीं म्हणून षष्ठीच्या अर्थासंबंधानें कांहींतरी नियम झाला पाहिजे अशाकरता हें सूत्र केलें आहे.

हा उपयोग आहे खरा.

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे?

(वा.२) आमचें म्हणणें इतकेंच की हा नियम केला तर ज्या ठिकाणीं षष्ठीप्रत्ययाचे अवयव वगैरे अर्थ पाहिजेत तेथें ते घेतां येणार नाहींत.

तसें झालें तर दोष कुठें येतो?

'शास इदङ्हलोः' (६।४।३४) या सूत्रामधील शासः या षष्ठीचा अवयव हा अर्थ घेतां येणार नाहीं. वरील नियमाला अनुसरून तेथील उपधायाः या षष्ठीप्रमाणें शासः या षष्ठीचाही स्थानाशीं संबंध होईल. आणि त्यानें सांगितलेला इकार आदेश शास् धातूला म्ह. त्याच्या अंत्यवर्णाला आणि इतर कोणत्याही धातूच्या उपधेला करावा लागेल. तसेंच 'ऊदुपधाया गोहः' (६।४।८९) येथेंही उपधायाः या षष्ठीप्रमाणें गोहः या षष्ठीचाही स्थानाशीं संबंध होईल. आणि त्यानें सांगितलेला ऊकार आदेश गोह याला म्ह. त्याच्या अंत्यवर्णाला आणि इतर कोणत्याही धातूच्या उपधेला करावा लागेल.

## संदिग्धत्वात् ॥ ३ ॥

अवयवषष्ठ्यादीनां च नियमस्याप्राप्तिः। किं कारणम्। योगस्यासंदिग्धत्वात्। संदेहे नियमो न चावयवषष्ठ्यादिषु संदेहः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। लौकिकोऽयं दृष्टान्तः। तद्यथा। लोके कंचित्कश्चित्पृच्छति ग्रामान्तरं गमिष्यामि पन्थानं मे भवानुपदिशत्विति। स तस्मा आचष्टे। अमुष्मिन्नवकाशे हस्तदक्षिणो ग्रहीतव्योऽमुष्मिन्नवकाशे हस्तवाम इति। यस्तत्र तिर्यक्पथो भवति न तस्मिन्संदेह इति कृत्वा नासावुपदिश्यते। एवमिहापि संदेहे नियमो न चावयवषष्ठ्यादिषु संदेहः॥

अथवा स्थानेऽयोगा स्थानेयोगा। किमिदमयोगेति। अव्यक्तयोगायोगा॥ अथवा योगवती योगा। का पुनर्योगवती।

---

(वा. ३) अवयव वगैरे संबंध हे अर्थ षष्ठीचे ज्या ठिकाणीं आहेत त्या ठिकाणीं हा प्रकृतसूत्रानें केलेला नियम लागू होत नाहीं.

कां म्हणून ?

ह्या योगाविषयीं संदेह नाहीं म्हणून. नियम ही संशयाच्या पुढील पायरी आहे. आणि येथें तर षष्ठीचा अर्थ जो संबंध तो कोणता घ्यावा असा संशयच मुळीं येत नाहीं.

मग 'संशय असेल तरच तेथें नियम घ्यावा' असें वचन केलें पाहिजे कीं काय ?

तसें कांहीं मुद्दाम वचन करावयास नको.

वचन केल्याशिवाय तसें कसें गृहीत धरतां येईल.

लौकिक दृष्टान्तावरूनच तसें गृहीत धरतां येईल. जसें लोकामध्यें कोणी एक नवीनच गांवाला निघालेला मनुष्य दुसऱ्या एका माहितगार मनुष्याला विचारतो की अमुक गांवाला मला जावयाचें आहे त्याची वाट मला सांग. त्यानंतर तो त्याला सांगतो की तूं येथून समोरच्या वाटेनें एक कोसभर गेलास म्हणजे उजव्या हाताला वळ आणि पुढें अर्धा कोस गेलास म्हणजे डाव्या हाताला वळ. त्यानंतर तो निघालेला मनुष्य एक कोस होतांच वाट सोडून उजव्या हाताला वळत नाहीं, इतकेंच नव्हे तर वेळेनुसार त्या ठिकाणीं ती वाट डावीकडे वळली असेल व 'वाट वळली तरी ती वाट सोडूं नको' असें सांगणारानें सांगितलें नसलें तरी देखील ती सोडीत नाहीं. त्याच सुमारास जेथें दोन वाटा फुटतील तेथेंच तो उजव्या हाताकडे वळतो; याप्रमाणें या शास्त्रामध्येंही संशय येत असेल तेथेंच नियम प्रवृत्त होतो. आणि शासः, गोहः इत्यादि ठिकाणीं अवयव वगैरेशीं जुळणारे षष्ठीचें अर्थ निश्चित होत असल्यामुळें संशयच येत नाहीं. म्हणून प्रकृतसूत्रानें केलेला नियम तेथें लागू होत नाहीं.

अथवा स्थानेयोगा हें एक पद न घेतां स्थाने आणि अयोगा अशीं दोन पदें घ्यावीत.

अयोगा या पदाचा अर्थ काय ?

अव्यक्तयोगा अयोगा (न आणि व्यक्त या दोन शब्दांचा नञ्तत्पुरुष करून नंतर त्या अव्यक्तशब्दाचा योगशब्दाबरोबर बहुव्रीहि समास करावा. म्हणजे 'जिचा संबंध अमुक असा स्पष्ट झालेला नसेल त्या षष्ठीचा स्थानाशीं संबंध जोडावा' असा अर्थ होतो.

अथवा अयोगा असें पद न घेतां योगा असेंच घ्यावें. योगा म्ह. योगवती ('योग आहे जिला' ह्या अर्थी योगशब्दाहून मतुप्-

---

२. उपधायाः असा संबंधी शब्द तेथें आहे. उपधा हें नांव एका विशिष्ट अवयवाचें म्ह. उपांत्य वर्णाचें आहे. तेव्हां त्या अवयववाचक सबंधी शब्दामुळें अवयवाबरोबर जो अवयवीचा संबंध असतो तोच तेथें शासः या षष्ठीप्रत्ययाचा अर्थ ठरतो.

यस्या बह्वो योगाः। कुत एतत्। भूम्नि हि मतुब्भवति ॥

**विशिष्टा वा षष्ठी स्थानेयोगा ॥ ४ ॥**

अथवा किंचिल्लिङ्गमासज्य वक्ष्यामीत्थंलिङ्गा षष्ठी स्थानेयोगा भवतीति। न च तल्लिङ्गमवयवषष्ठ्यादिषु करिष्यते ॥ यद्येवं शास इदङ्हलोः शा हौ [६.४.३५] शासि ग्रहणं कर्तव्यं स्थानेयोगार्थं लिङ्गमासङ्क्ष्यामीति। न कर्तव्यम्। यदेवादः पुरस्तादवयवषष्ठ्यर्थं प्रकृतमेत्तदुत्तरत्रानुवृत्तं सत्स्थानेयोगार्थं भविष्यति। कथम्। अधिकारो नाम त्रिप्रकारः। कश्चिदेकदेशस्थः सर्वं शास्त्रमभिज्वलयति यथा प्रदीपः सुप्रज्वलितः सर्वं वेश्माभिज्वलयति। अपरोऽधिकारो यथा रज्ज्वायसा वा बद्धं काष्ठमनुकृष्यते तद्वदनुकृष्यते चकारेण। अपरोऽधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते। तद्यदैष पक्षोऽधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति तदा हि य-

---

प्रत्ययाच्या अर्थी अच्प्रत्यय (५।२।१२७) करून पुढें स्त्रीलिंगी टाप् (४।१।४) प्रत्यय होऊन 'योगा' हा शब्द सिद्ध झाला आहे.)

योगवती षष्ठी ती कोणती ?

ज्या षष्ठीचे संबंध बहुत संभवतात ती.[3]

'योगा' या पदाचा असा अर्थ कसा होतो ?

योगशब्दाच्या पुढें जो मतुप्प्रत्ययाच्या अर्थी अच्प्रत्यय केला आहे त्यावरून बहुत[4] हा अर्थ येथें प्रतीत होतो.

(वा.४) अथवा त्या त्या ठिकाणीं षष्ठीप्रत्ययाला विशेष प्रकारचें कांहीं तरी एखादें चिन्ह[5] करावें. आणि 'तशा चिन्हाची जी षष्ठी असेल तिचा स्थानाशीं संबंध जोडावा' असें येथें म्हणावें. आणि ज्या ठिकाणीं षष्ठीचे अवयव वगैरे अर्थ पाहिजे असतील तशा ठिकाणीं म्ह. शासः, गोहः इत्यादि ठिकाणीं षष्ठीप्रत्ययाला तें चिन्ह लावूं नये म्हणजे झालें.

आतां 'शास इदङ्हलोः' (६।४।३४) या सूत्रामध्यें शासः या षष्ठीप्रत्ययाला तें चिन्ह लावलें नाहीं तर त्याच्यापुढील शा हौ (६।४।३५) या सूत्रामध्यें शासः असें पद पुन्हा निराळें घातलें पाहिजे. कारण त्या ठिकाणीं षष्ठीचा स्थानाशीं संबंध पाहिजे असल्यामुळें तेथें त्या चिन्हाची जरूर आहे.

'शा हौ' या सूत्रामध्यें पुन्हा निराळें शासः हें पद घालावयास नको. जें पूर्वसूत्रामध्यें अवयवाशीं संबंध दाखवणारे शासः हे पद घातलें आहे तेंच 'शा हौ' या पुढील सूत्रामध्यें अनुवृत्त झालें असतां स्थानाशीं संबंध दाखविण्याकरितां उपयोगीं पडेल.

असें कसें करतां येतें ?

असें करतां येतें की ह्या शास्त्रामध्यें अधिकार तीन प्रकारचा आहे. पहिला प्रकार असा की तो अधिकार स्वतः एकाच जागीं असून सर्व शास्त्राला प्रकाशित करतो.[6] ज्याप्रमाणें चांगला पेटविलेला दिवा एकाच ठिकाणीं ठेवलेला असतो परंतु सर्व घरांत उजेड देतो त्याप्रमाणेंच हा होय. उत्तरसूत्रांतील च या शब्दाच्या जोरावर पूर्वसूत्रांतील जें पद ओढलें जातें तो दुसऱ्या प्रकारचा अधिकार होय. ज्याप्रमाणें दोरीनें किंवा लोखंडाच्या तारेनें बांधून एखादें लाकूड ओढलें जातें त्या-

---

३. म्हणजे षष्ठीच्या अर्थांचा निश्चय ज्या ठिकाणीं होत नाहीं त्या ठिकाणची.

४. 'तदस्या०' (५।२।९४) या सूत्रावरील भाष्यामध्यें भूमनिन्दा० हें वचन पहा.

५. पस्पशान्हिकाच्या शेवटीं कल वगैरे चिन्हें सांगितलीं आहेत त्यांपैकीं एखादें.

६. 'तस्मिन्निति०' (१।१।६६) इत्यादि परिभाषा ह्या एकाच ठिकाणीं असतात. पण त्यांचा उपयोग मात्र सर्व शास्त्रामध्यें होतो.

देवादः पुरस्तादवयवषष्ठ्यर्थमेतदुत्तरत्रानुवृत्तं सत्स्थानेयोगार्थं भविष्यति। संप्रत्ययमात्रमेतद्भवति। न ह्यनुच्चार्य शब्दं लिङ्गं शक्यमासङ्क्तुम्। एवं तर्ह्यादेशे तल्लिङ्गं करिष्यते तत्प्रकृतिमास्कन्त्स्यति ॥

यदि नियमः क्रियते यत्रैका षष्ठ्यनेकं च विशेष्यं तत्र न सिध्यति। अङ्गस्य हलः अणः संप्रसारणस्येति। हलपि विशेष्योऽणपि विशेष्यः संप्रसारणमपि विशेष्यम्। असति पुनर्नियमे कामचार एकया षष्ठ्यानेकं विशेषयितुम्। तद्यथा। देवदत्तस्य पुत्रः पाणिः कम्बलः इति। तस्मान्नार्थो नियमेन। ननु चोक्तमेकशतं षष्ठ्यर्था यावन्तो वा ते सर्वे षष्ठ्यामुच्चारितायां प्राप्नुवन्ती-

---

प्रमाणेंच हें होय. तिसऱ्या प्रकारचा अधिकार असा की जो एखादा शब्द अनेक सूत्रामध्यें उपयोगीं पडतो परंतु तो प्रत्येक सूत्रांत न घालतां आरंभीं एकाच सूत्रामध्यें घातलेला असतो, आणि तेथून पुढें प्रत्येक सूत्रांत उच्चारल्याशिवायच घेतां येतो. या तीन प्रकारांपैकीं हा जो तिसरा प्रकार की 'आरंभीं एका सूत्रांत एखादा शब्द घालून पुढें प्रत्येक सूत्रांत उच्चारल्याशिवाय तो शब्द घेणें' तो प्रकार 'शासः' या अधिकारासंबंधानें घेतला म्हणजे जें पूर्वसूत्रामध्यें 'शासः' हें पद अवयवाशीं संबंध दाखविणारें घातलें आहे तेंच पुढील 'शा हौ' या सूत्रामध्यें अनुवृत्त झालें असतां स्थानाशीं संबंध दाखविण्याकरितां उपयोगीं पडेल.

त्या तिसऱ्या प्रकारानें 'शा हौ' या सूत्रामध्यें शासः या फक्त शब्दाचें ज्ञान मात्र होईल, म्ह. पूर्वसूत्रांतील अवयवाशीं संबंध हा षष्ठीचा अर्थ सोडून नुसतें शासः हें पद येथें घेतां येईल; परंतु तें घेतलें तरी तेथें त्या पदाचें उच्चारण केलें नसल्यामुळें स्थानाशीं जोडण्याचें चिन्ह कसें लावतां येईल ?

तर मग 'शा हौ' या सूत्रामध्यें उच्चारलेला जो शा हा आदेश त्यालाच तें चिन्ह लावावें. आदेशाला त्या चिन्हाचा कांहीं उपयोग नसल्यामुळें तो आदेश तें चिन्ह आपल्या प्रकृतीला म्ह. शासः या अनुवृत्तपदाला देईल.

जर षष्ठीचा फक्त स्थानाशींच संबंध होतो असा नियम घेतला तर 'षष्ठी एकाच प्रकारची आणि विशेष्यें अनेक असल्यामुळें तीं अनेक प्रकारांनीं जुळवावीं लागणार' अशी जेथें स्थिति प्राप्त होते तेथें इच्छित अर्थ सिद्ध होणार नाहीं. उदा० अङ्गस्य (६।४।१) याच्यापुढील हलः (६।४।२) हें सूत्र. येथें अणः आणि संप्रसारणस्य हीं दोन पदें अनुवृत्त होतात. येथें अंगस्य या षष्ठीचा स्थानाशीं संबंध करून त्याचें दीर्घ विशेष्य होत आहेच, पण त्याशिवाय त्या षष्ठीचा अवयव हा अर्थ घेऊन त्याचें हल् हेंही विशेष्य करावयाचें आहे, अण् हेंही विशेष्य करावयाचें आहे, आणि संप्रसारण हेंही विशेष्य करावयाचें आहे. 'षष्ठीचा स्थानाशींच संबंध जोडावा' हा नियम नसला तर आपल्याला आपल्या इच्छेप्रमाणें एकाच षष्ठीप्रत्ययाचे अनेक अर्थ घेऊन अनेकांचें तें विशेषण करतां येतें; जसें 'देवदत्तस्य पुत्रः पाणिः कम्बलः' येथें देवदत्तस्य हें त्यांतील षष्ठीप्रत्ययाचा 'जन्य' हा अर्थ घेऊन पुत्राचें, 'अवयव' हा अर्थ घेऊन पाणीचें म्ह. हाताचे, आणि 'मालकीचा' असा अर्थ घेऊन कंबलाचें विशेषण होतें, त्याप्रमाणेंच हें होय. एकंदरींत 'षष्ठीप्रत्ययाचा स्थानाशींच संबंध होतो' असा नियम करण्यांत कांहीं फायदा दिसत नाहीं.

पण आतांच सांगितलें आहे ना की 'षष्ठीप्रत्ययाचे एकशें एक अर्थ आहेत ? तेव्हां षष्ठी-

ति । नैष दोषः । यद्यपि लोके बह्वोऽभिसंबन्धा आर्था यौना मौखाः स्रौवाश्च शब्दस्य तु शब्देन कोऽन्योऽभिसंबन्धो भवितुमर्हत्यन्यदतः स्थानात् । शब्दस्यापि शब्देनानन्तरादयोऽभिसंबन्धाः। अस्तेर्भूर्भवतीति संदेहः स्थानेऽनन्तरे समीप इति । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति । स्थान इति व्याख्यास्यामः ॥ न तर्हीदानीमयं योगो वक्तव्यः । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् । षष्ठ्यन्तं स्थानेन यथा युज्येत यतः षष्ठ्युच्चारिता । किं कृतं भवति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येषा परि-

---

प्रत्यय दिसला की तितके अर्थ मनांत येतात किंवा त्यांपैकी शब्दाला जुळतील तितके तरी निदान मनांत येणारच.' मग हा नियम नसला तर 'षष्ठीप्रत्ययाचा अमुकच अर्थ घ्यावा' असें कसें ठरवितां येईल ?

हा दोष येत नाहीं. लोकामध्यें षष्ठीप्रत्ययापासून बहुत संबंध मनांत येतात. कांहीं ठिकाणीं मालक आणि त्याच्या मालकीचा पदार्थ यांमधील संबंध मनांत येतो, कांहीं ठिकाणीं बाप, लेक यांमधील संबंध मनांत येतो, कांहीं ठिकाणीं गुरुशिष्य यांमधील संबंध मनांत येतो व कांहीं ठिकाणीं यजमान व ऋत्विज् यांमधील संबंध मनांत येतो; असे जरी लोकांमध्यें बहुत संबंध संभवतात तरी या व्याकरणशास्त्रामध्यें शब्दाचा शब्दाशीं स्थानाशिवाय दुसरा कोणता बरें संबंध संभवणार आहे ?

पण शब्दांचेही दुसऱ्या शब्दाबरोबर अनंतर वगैरे अनेक प्रकारचे संबंध संभवतात. उदा० अस्तेर्भूः (२।४।५२) येथें भू हा अस् धातूचे स्थानीं होतो किंवा अस् धातूला अनंतर म्ह. संयुक्त असा होतो किंवा अस् धातूच्या जवळपास कुठें तरी असा होतो असा संशय येतोच.

हा नुसता नांवाला संशय आहे इतकेंच. सर्वच ठिकाणीं संशय आल्याबरोबर 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणम्' हीं परिभाषा लगेंच मनांत येते, म्ह. संशय आल्याबरोबर तेथें अमुकच असा निश्चय व्याख्यानावरून करावा. कारण संशय आला या सबबीवर तें शास्त्र निरुपयोगी आहे असें केव्हांही समजूं नये. तेव्हां अस्तेर्भूः येथें बभूव इत्यादि प्रयोगावरून अस् धातूचे स्थानीं भू आदेश होतो असा अर्थ ठरवितां येईल.

तर मग आतां हें प्रकृत सूत्र करावयास नको असें दिसतें.

तसें मात्र नाहीं. प्रकृत सूत्र हें केलेंच पाहिजे.

मग त्याचा उपयोग काय ?

उपयोग असा की 'आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें ज्या शब्दाच्या पुढें षष्ठीप्रत्यय लावला असेल त्याचाच फक्त उदाहरणामध्यें स्थानाशीं संबंध होतो. त्याच्या नांवावर त्याच्यापेक्षां अधिकाचा स्थानाशीं संबंध होत नाहीं' असा या प्रकृतसूत्राचा अर्थ करावा.

असा अर्थ करून काय साधतें ?

'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति'ही परिभाषा निराळी करावयास नको हें साधतें म्ह. तो

---

७. निर्दिश्यमान म्ह. उच्चारलेला. आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें षष्ठीप्रत्यय लावून उच्चारलेला जो शब्द त्यालाच आदेश करावेत. उदा० सुपदः. पादः पत् (६।४।१३०) हें सूत्र अंगस्य (६।४।१) या अधिकारांतील असल्यामुळें पाद् हा शब्द शेवटीं असलेल्या अंगाला पद् आदेश होतो असा जरी त्या सूत्राचा अर्थ झाला तरी सूत्रामध्यें पाद् एवढाच शब्द उच्चारला असल्यामुळें सुपाद् शब्दांतील सु सोडून पुढील पाद् या भागालाच पद् आदेश होतो.

भाषा न कर्तव्या भवति ॥

## स्थानेऽन्तरतमः ॥१.१.५०॥

किमुदाहरणम् । इको यणचि [६.१.७७] । दध्यत्र । मध्वत्र । तालुस्थानस्य तालुस्थान ओष्ठस्थानस्यौष्ठस्थानो यथा स्यात् । नैतदस्ति । संख्यातानुदेशेनाप्येतत्सिद्धम् ॥ इदं तर्हि । तस्थस्थमिपां तांतंतामः [३.४.१०१] इत्येकार्थस्यैकार्थो द्व्यर्थस्य द्व्यर्थो बह्वर्थस्य बह्वर्थो यथा स्यात् । ननु चैतदपि संख्यातानुदेशेनैव सिद्धम् ॥ इदं तर्हि । अकः सवर्णे दीर्घः [६.१.१०१] इति दण्डाग्रम् क्षुपाग्रम् दधीन्द्रः मधूष्ट्र इति कण्ठस्थानयोः कण्ठस्थानतालुस्थानयोस्तालुस्थान ओष्ठस्थानयोरोष्ठस्थानो यथा स्यादिति ॥ अथ स्थान इति वर्तमाने पुनः स्थानग्रहणं किमर्थम् । यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत एवान्तर्यं बलीयो यथा स्यात् ।

---

अर्थ या सूत्रापासूनच निघतो.

(सू.५०) या सूत्राचें उदाहरण कोणतें ?

दध्यत्र, मध्वत्र, हीं ह्या सूत्राचीं उदाहरणें आहेत. दध्यत्र ह्या ठिकाणीं 'इको यणचि' (६।१।७७) या सूत्रानें सांगितलेला यण् आदेश तालुस्थानाच्या इकाराला तालुस्थानाचा यकारच होतो, तसाच मध्वत्र या ठिकाणीं ओष्ठस्थानाच्या उकाराला ओष्ठस्थानाचा वकारच होतो.

हीं ह्या प्रकृत सूत्राचीं उदाहरणें आहेत असें म्हणतां येत नाहीं. कारण 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' (१।३।१०) या सूत्रानेंच हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत.

तर मग तस्थस्थमिपां तांतंतामः (३।४।१०१) हें सूत्र घ्या. येथें एक या संख्येचा बोधक अशा मिप् या स्थानीला एक या संख्येचा बोधक असा अम् हाच आदेश झाला पाहिजे. तसाच दोन या संख्येचा बोधक अशा तस् व थस् यांना ताम् व तम् हेच आदेश झाले पाहिजेत. बहुत या संख्येचा बोधक अशा थ या प्रत्ययाला बहुत या संख्येचा बोधक असा त हाच आदेश झाला पाहिजे.

हीं देखील उदाहरणें 'यथासंख्य०' या सूत्रानेंच सिद्ध होत आहेत.

तर मग 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) हें सूत्र घ्या. ह्यानें सांगितलेला दीर्घ आदेश दण्डाग्रम्, क्षुपाग्रम्, येथें कंठस्थानाच्या दोन अकारांना कंठस्थानाचा आकारच झाला पाहिजे. तसेंच दधीन्द्रः येथें तालुस्थानाच्या दोन इकारांना तालुस्थानाचा ईकारच एकादेश झाला पाहिजे. तसेंच मधूष्ट्रः येथें ओष्ठस्थानाच्या दोन उकारांना ओष्ठस्थानाचा ऊकारच एकादेश झाला पाहिजे.

आतां पूर्वसूत्रांतून 'स्थाने' या शब्दाची अनुवृत्ति येत असतांना पुनः या सूत्रामध्यें 'स्थाने' हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

(पूर्वसूत्रांतून जो स्थानशब्द अनुवृत्त होत आहे त्याचा अर्थ 'जागा' म्ह. शब्द उच्चारण्याची वेळ, आणि येथें जो निराळा स्थानशब्द घातला आहे त्याचा अर्थ तालु, कंठ वगैरे स्थानें हा आहे. त्याचा उपयोग असा की) ज्या ठिकाणीं एका स्थानीचें सादृश्य अनेक आदेशांना अनेक प्रकारांनीं संभवेल त्या ठिकाणीं तालु, कंठ, वगैरे स्थानांनीं जें सादृश्य तें प्रबल समजलें जावें (म्हणजे स्थानीचें सादृश्य तालु कंठ वगैरे स्थानांनीं ज्या आदेशाशीं संभवेल तोच आदेश तेथें होतो).

कोणतें बरें असें उदाहरण ?

---

१. एका स्थानीला एकदम अनेक आदेश प्राप्त झाले तर त्या स्थानीला त्या आदेशांपैकीं जो आदेश त्यांतल्या त्यांत जास्त सदृश असेल तोच करावा

किं पुनस्तत्। चेता स्तोता। प्रमाणतोऽकारो गुणः प्राप्नोति। स्थानत एकारौकारौ। पुनः स्थानग्रहणादेकारौकारौ भवतः॥ अथ तमब्ग्रहणं किमर्थम्। झयो होऽन्यतरस्याम् [८.४.६२] इत्यत्र सोष्मणः सोष्माण इति द्वितीयाः प्रसक्ता नादवतो नादवन्त इति तृतीयाः। तमब्ग्रहणाद्ये सोष्माणो नादवन्तश्च ते भवन्ति चतुर्थाः। वाग्घसति त्रिष्टुब्भसतीति॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**स्थानिन एकत्वनिर्देशादनेकादेशनिर्देशाच्चसर्वप्रसङ्गस्तस्मात्स्थानेऽन्तरतमवचनम्॥ १॥**

स्थान्येकत्वेन निर्दिश्यते। अक इति। अनेकश्च पुनरादेशः प्रतिनिर्दिश्यते। दीर्घ इति। स्थानिन एकत्वनिर्देशादनेकादेशनिर्देशाच्च सर्वप्रसङ्गः। सर्वे सर्वत्र प्राप्नुवन्ति। इष्यते चान्तरतमा एव स्युरिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यति तस्मात्स्थानेऽन्तरतम इति वचनं नियमार्थम्। एवमर्थमिदमुच्यते॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

---

चेता, स्तोता, हीं तशीं उदाहरणें आहेत. येथें ऱ्हस्व इकार आणि ऱ्हस्व उकार यांना गुण (७।३।८४) कर्तव्य आहे. ह्रस्वाची मात्रा एक आहे. तेव्हां तशा एकमात्रेच्या स्थानीशीं प्रमाणानें सारखा ऱ्हस्व अकार हा गुण प्राप्त होत आहे आणि स्थानांनीं सारखे असे एकार आणि ओकार हे प्राप्त होतात. परंतु तालु वगैरे स्थानांनीं जमणारें सादृश्य प्रबल असल्यामुळें चेता येथें तालुस्थानाच्या इकाराला तालुस्थानाचा एकार हाच गुण होतो; तसाच स्तोता येथें ओष्ठस्थानाच्या उकाराला ओष्ठस्थानाचा ओकार हाच गुण होतो.

आतां या सूत्रामध्यें तम हा प्रत्यय कशाकरतां उच्चारला आहे.?

'झयो होन्यतरस्याम्' (८।४।६२) या सूत्रानें हकाराला पूर्वसवर्णआदेश सांगितला आहे. हकाराच्या पूर्वींचा वर्ण ज्या वर्गांतील असेल त्या वर्गांतील पांचही वर्ण त्याचे सवर्ण होतात. हकार ऊष्मा आहे. वर्गांतील दुसरा वर्ण ऊष्मा आहे. तसेंच हकार नादप्रयत्नाचा आहे. वर्गांतील तिसरा वर्ण नादप्रयत्नाचा आहे. तेव्हां एक एक प्रकारानें दुसरा आणि तिसरा हे वर्ण हकाराशीं सारखे आहेत. म्हणून ते प्राप्त होत आहेत. पण त्यापेक्षां जास्त सारखा चवथा वर्ण आहे. कारण तो ऊष्माही आहे आणि नादप्रयत्नाचाही आहे. म्हणून चवथाच होतो. वाग्घरिः येथें हरिः याच्या हकाराला घकार होतो. त्रिष्टुब्भसति येथें हसति याच्या हकाराला भकार होतो. (तेव्हां जास्त सारखा जो आदेश असेल तोच होण्याकरितां 'तम' हा अतिशय या अर्थाचा प्रत्यय 'अन्तर' शब्दाला जोडला आहे.)

पण हें सूत्रच मुळीं कशाकरतां बरें केलें आहे?

(वा.१) (वर दाखविलेल्या दण्डाग्रम् वगैरे उदाहरणांमध्यें 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) यानें दीर्घ कर्तव्य आहे. त्याठिकाणीं) 'अकः' असा प्रत्येक उदाहरणांतील एकेकच स्थानी धरला आहे. आणि त्याला सांगितलेले आदेश 'दीर्घ' या शब्दानें अनेक घेतले जातात. अशा रीतीनें स्थानीचा एकत्वानें निर्देश आहे आणि आणि आदेशांचा अनेकत्वानें निर्देश असल्यामुळें सर्वप्रसङ्गः म्ह. सर्व ठिकाणीं सर्व दीर्घ आदेश होतील. आणि आपल्याला इष्ट तर असें आहे की जो जास्त सदृश असेल तो एकच झाला पाहिजे. तेव्हां ही गोष्ट कांहीं तरी त्याकरतां विशेष प्रयत्न केल्याशिवाय सिद्धीला जाणार नाहीं. म्हणून 'स्थानेन्तरतमः' हें प्रकृतसूत्र नियम करण्याकरतां आहे. अशाकरतां हें केलें आहे.

यथा पुनरियमन्तरतमनिर्वृत्तिः सा किं प्रकृतितो भवति । स्थानिन्यन्तरतमे षष्ठीति । आहोस्विदादेशतः । स्थाने प्राप्यमाणानामन्तरतम आदेशो भवतीति । कुतः पुनरियं विचारणा । उभयथापि तुल्या संहिता । स्थानेऽन्तरतम उरण्-पर इति ॥ किं चातः यदि प्रकृतित इको यणचि [६.१.७७] यणां येऽन्तरतमा इकस्तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीतीहैव स्यात् । दध्यत्र मध्वत्र । कुमार्यत्र ब्रह्मबन्ध्वर्थमित्यत्र न स्यात् । आदेशतः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां सर्वत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीति सर्वत्र सिद्धं भवति ॥ तथेको गुणवृद्धी [१.१.

हा उपयोग असूं दे.

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

आमचें म्हणणें असें की येथें जास्त सारखेपणा पाहून आदेश केला जातो; पण ही निवड स्थानीकडे होते, म्ह. ज्या आदेशाला जो अनेक स्थानींपैकीं जास्त सारखा स्थानी जमेल त्यालाच ती विधिसूत्रांतील षष्ठी लावावयाची आणि ज्याला ती षष्ठी लागेल त्याच स्थानीला तो आदेश होतो[२]; किंवा ही निवड आदेशाकडे होते, म्ह. ज्या स्थानीला जो अनेक आदेशांपैकीं जास्त सारखा आदेश असेल तोच आदेश त्या स्थानीला होतो.

पण येथें हा विचार का बरें उत्पन्न होतो ?

(असा उत्पन्न होतो की ह्या सूत्रामध्यें 'अन्तरतमे' असें सप्तम्यन्त पद काढलें तर 'जास्त सारखा स्थानी असेल त्याचेच ठिकाणीं आदेश होतो' असा सूत्राचा अर्थ होतो आणि स्थानींपैकीं निवड करावी लागते. तसेंच 'अन्तरतमः' असें प्रथमान्त पद काढलें तर स्थानीला जो जास्त सारखा आदेश असेल तोच होतो' असा सूत्राचा अर्थ होतो आणि आदेशापैकीं निवड करावी लागते.) आणि दोन्हीं प्रकारचीं पदें काढतां येतील अशी येथें संहिता आहे म्ह. 'स्थानेन्तरतम उरण्रपरः' असा दोन सूत्रांमध्यें संधि होऊन सूत्रपाठ आहे.

मग या दोहोंमध्यें काय फरक होतो ?

जर स्थानींपैकीं निवड करावयाची असेल तर 'इको यणचि' (६।१।७७) यानें सांगितलेल्या यण् आदेशांना जे जास्त सारखे इक् असतील तेच इक् या शब्दानें घेतले जाऊन तेवढ्यांनाच इकः ही षष्ठी लागेल; आणि जेवढ्यांना षष्ठी लागेल तेवढ्यांनाच उदाहरणांमध्यें यण् आदेश होईल; तेव्हां दध्यत्र, मध्वत्र येथें ऱ्हस्व इकांनाच यण्[३] होईल. कुमार्यर्थम्, ब्रह्मबन्ध्वर्थम्, येथें दीर्घ इकांना यण् होणार नाहीं. आदेशांपैकीं निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तो करावयाचा असें घेतलें म्हणजे इक् या स्थानीची निवड नसल्यामुळें सर्व इकांना षष्ठी लागते, आणि ज्यांना षष्ठी लागते त्यांना आदेश होतातच. म्हणून ऱ्हस्व, दीर्घ वगैरे सर्व इकांना यण् सिद्ध होतो.

तसेंच 'इको गुणवृद्धी' (१।१।३) यानें सांगितलेल्या गुण व वृद्धि या आदेशांना जे ज्याला जास्त सारखे[४] इक् असतील तेच तेथें इक् या शब्दानें घेतले जाऊन तेवढ्यां-

२. इको यणचि यानें यण् म्ह. य,व,र,ल हे आदेश सांगितले आहेत. त्यांपैकीं प्रत्येक आदेशाला जो त्याच्याशीं जास्त सारखा असेल असा एकेक स्थानी निवडला म्हणजे ते निवडलेले स्थानीच इकः या शब्दानें घ्यावयाचे. तेव्हां अर्थातच इकः या षष्ठीचा त्याच स्थानीशीं संबंध होतो, त्यामुळें उदाहरणामध्यें त्याच स्थानींना यण् आदेश होतो. ज्या उदाहरणांत निवडलेला स्थानी नसेल त्या उदाहरणांत यण् आदेश मुळीं होणारच नाहीं.

३. यणांची अर्धी मात्रा आहे. तेव्हां त्यांना दोन मात्रांच्या दीर्घ इकापेक्षां एक मात्रेचे ऱ्हस्व इक् हे जास्त जवळ आहेत.

४. ए व ओ हे गुणसंज्ञक वर्ण आणि आ, ऐ, औ हे वृद्धिसंज्ञक वर्ण प्रत्येकीं दोन मात्रांचे असल्यामुळें

३] गुणवृद्ध्योर्येऽन्तरतमा इकस्तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीतीहैव स्यात् । नेता लविता नायकः लावकः । चेता स्तोता चायकः स्तावकः इत्यत्र न स्यात् । आदेशतः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां सर्वत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीति सर्वत्र सिद्धं भवति ॥ तथा ऋवर्णस्य गुणवृद्धिप्रसङ्गे गुणवृद्ध्योर्यदन्तरतममृवर्णं तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीतीहैव स्यात् । कर्ता हर्ता आस्तारकः निपारकः । आस्तारिता निपरिता कारकः हारक इत्यत्र न स्यात् । आदेशतः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां सर्वत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीति सर्वत्र सिद्धं भवति ॥ अथादेशतोऽन्तरतमनिर्वृत्तौ सत्यामयं दोषः । वान्तो यिप्रत्यये [ ६.१.७९ ] । स्थानिनिर्देशः कर्तव्यः । ओकारौकारयोरिति वक्तव्यम् । एकारैकारयोर्मा भूदिति । प्रकृतितः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां वा-

---

नाच तेथें इकः ही षष्ठी लागेल. आणि जेवढ्यांना षष्ठी लागेल तेवढ्यांनाच उदाहरणांमध्यें गुण व वृद्धि हे आदेश होतील (म्ह. दीर्घालाच गुण व वृद्धि होतील, ऱ्हस्वाला होणार नाहींत). तेव्हां नेता, लविता या ठिकाणीं दीर्घ ईकार व ऊकार यांना ए व ओ हे गुण होतील. चेता, स्तोता या ठिकाणीं ऱ्हस्व इकार व उकार यांना ए व ओ हे गुण होणार नाहींत. तसेंच नायकः, लावकः या ठिकाणीं दीर्घ ईकार व ऊकार यांना वृद्धि म्ह. ऐ व औ हे होतील. चायकः, स्तावकः या ठिकाणीं ऱ्हस्व इकार व उकार यांना वृद्धि होणार नाहीं. आदेशांपैकीं निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तो करावयाचा असें घेतलें म्हणजे इक् या स्थानीची निवड नसल्यामुळें सर्व इकांना षष्ठी लागते आणि ज्यांना षष्ठी लागते त्यांना आदेश होतातच, म्हणून ऱ्हस्व दीर्घ वगैरे सर्व इकांना गुण व वृद्धि सिद्ध होतात. तसेंच ऋकाराला गुण म्ह. ऱ्हस्व अकार कर्तव्य असतांना व वृद्धि म्ह. दीर्घ आकार कर्तव्य असतांना त्या गुणाला जास्त सारखा स्थानी जो ह्रस्व ऋकार आणि त्या वृद्धीला जास्त सारखा स्थानी जो दीर्घ ॠकार त्यालाच ती षष्ठी लागेल आणि ज्यांना षष्ठी लागेल त्यांनाच ते गुण व वृद्धि होतील, म्ह. कर्ता, हर्ता, येथें ह्रस्व ऋकार असल्यामुळें तेथेंच गुण होईल व आस्तारकः, निपारकः, येथें दीर्घ ॠकार असल्यामुळें तेथेंच वृद्धि होईल. आणि आस्तरिता, निपरिता, येथें दीर्घ ॠकाराला गुण होणार नाहीं व कारकः, हारकः, येथें ह्रस्व ऋकाराला वृद्धि होणार नाहीं. आतां आदेशांपैकीं निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तो करावयाचा असें घेतलें म्हणजे स्थानीची म्ह. ऋकाराची निवड नसल्यामुळें सर्व ऋकारांना षष्ठी लागते आणि ज्यांना षष्ठी लागते त्यांना आदेश होतातच, म्हणून ऱ्हस्व, दीर्घ सर्व ऋकारांना गुण व वृद्धि सिद्ध होतात.

आतां 'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला असतां 'वान्तो यि प्रत्यये' (६।१।७९) या ठिकाणीं दोष येतो. त्या ठिकाणीं 'ओकार व औकार यांनाच वान्त आदेश होतात' असा स्थानींचा निर्देश केला पाहिजे. कारण एकार व ऐकार यांना वान्त आदेश न झाले पाहिजेत. आणि 'स्थानींपैकीं निवड करून त्यांत जो जास्त सारखा असेल त्यालाच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला म्हणजे वकारान्त आदेशाला स्थानींपैकीं म्ह. एचापैकीं जो जास्त सारखा स्थानी असेल त्यालाच ती

---

त्यांना, दोन मात्रांचे म्ह. दीर्घ ई आणि ऊ हे इक् ऱ्हस्वापेक्षां जास्त सारखे आहेत.

न्तादेशस्यैक्षु यान्तरतमाप्रक्रातिस्तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीत्यन्तरेण स्थानिनिर्देशं सिद्धं भवति। आदेशतोऽप्यन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां न दोषः। कथम्। वान्तग्रहणं न करिष्यते। यि प्रत्यय एचोऽयादयो भवन्तीत्येव। यदि न क्रियते चेयम् जेयमित्यत्रापि प्राप्नोति। क्षय्यजय्यौ शक्यार्थे [६.१.८१] इत्येतन्नियमार्थं भविष्यति। क्षिज्योरेवैच इति। तयोस्तर्हि शक्यार्थादन्यत्रापि प्राप्नोति। क्षेयं पापं जेयो वृषल इति। उभयतो नियमो विज्ञास्यते। क्षिज्योरेवैचः। अनयोश्च शक्यार्थ एवेति। इहापि तर्हि नियमान्न प्राप्नोति। लव्यम् पव्यम्। अवश्यलाव्यम् अवश्यपाव्यमिति। तुल्यजातीयस्य नियमः। कश्च तुल्यजातीयः। यथाजातीयकः क्षिज्योरेच्। कथंजातीयकः क्षिज्योरेच्। ए-

---

षष्ठी लागेल आणि ज्याला षष्ठी लागेल त्यालाच आदेश होईल. त्यामुळें स्थानीचा निर्देश केल्यावांचूनच सिद्ध होईल.

पण 'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला तरी देखील येथें दोष येत नाहीं.

तो कसा ?

असा की सूत्रामधील 'वान्तः' हें पद ठेवीत नाहीं. नुसतें 'यि प्रत्यये' एवढेंच सूत्र असूं दे. त्याचा अर्थ—'यकारादि प्रत्यय पुढें असतांना एचाला अय् वगैरे आदेश होतात' (तेव्हां पूर्वसूत्राप्रमाणें या सूत्रानेंही वान्त आदेश ओकार व औकार यांनाच होतील).

पण 'वान्तः' हा शब्द काढला तर पूर्वसूत्राप्रमाणें यकारान्त आदेशही या सूत्रानें यकारादि प्रत्यय पुढें असतांना होतील. तेव्हां चेयम्, जेयम् येथें एकाराला अय् आदेश होईल.

असें असेल तर क्षय्य आणि जय्य येथें अय् आदेश 'यि प्रत्यये' या सूत्रानेंच सिद्ध होत असल्यामुळें 'क्षय्यजय्यौ शक्यार्थे' (६।१ ८१) हें सूत्र व्यर्थ होतें, तेव्हां तें नियमार्थ होईल. तो नियम असा की 'यकारादिप्रत्यय पुढें असतांना 'यि प्रत्यये' या सूत्रानें जर आदेश होईल तर क्षि व जि या दोन धातूंच्याच एचाला होईल.' तेव्हां चेयम् येथें होत नाहीं.

तर मग क्षि व जि या दोन धातूंच्या एचाला शक्यार्थ नसला तरी अय् आदेश होऊं लागेलः उदा० क्षेयं पापम्, जेयो वृषलः (पाप हें वाईट असल्यामुळें क्षय करण्यास योग्य आहे पण शक्य नाहीं. तसाच वृषल हा जिंकण्याला योग्य आहे पण शक्य नाहीं.)

(हा दोष येत नाहीं. कारण) दोन प्रकारचा नियम घेता येईल. एक असा कीं 'यिप्रत्यये यानें आदेश करावयाचा झाला तर तो क्षि व जि या दोन धातूंच्याच एचाला करावा'. दुसरा असा की 'क्षि व जि या धातूंच्या एचाला जर आदेश करावयाचा झाला तर तो शक्यार्थ असेल तरच करावा'.

आतां जर नियम घेतला तर लव्यम्, पव्यम्, अवश्यलाव्यम्, अवश्यपाव्यम्, या उदाहरणांमध्यें ओकार व औकार यांनाही 'यि प्रत्यये' या सूत्रानें आदेश होणार नाहींत.

(हा दोष येत नाहीं. कारण) नियम हा सजातीय एचासंबंधानेंच आहे.

सजातीय एच् तो कोणता ?

क्षि व जि या धातूंचा एच् ज्या जातीचा आहे त्या जातीचा जो एच् तो सजातीय एच् होय.

---

५. अव् आणि आव् या वकारान्त आदेशांमध्यें ओष्ठस्थानाचा वकार आहे आणि एचांपैकीं ओ व औ यांचें ओष्ठस्थान आहे. तेव्हां वकारान्त आदेशांना ओ व औ हे स्थानी जास्त सारखे असल्यामुळें त्यांनाच ते आदेश होतील.

कारः । एवमपि रायमिच्छति रैयति अत्रापि प्राप्नोति । रायिश्छान्दसो दृष्टानुविधिश्छन्दसि भवति ॥ ऊदुपधाया गोहः [६.४.८९] । आदेशतोऽन्तरतमनिर्वृत्तौ सत्यामुपधाग्रहणं कर्तव्यम् । प्रकृतितः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यामूकारस्य गोहो यान्तरतमा प्रकृतिस्तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रादेशा भवन्तीत्यन्तरेणोपधाग्रहणं सिद्धं भवति । आदेशतोऽप्यन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां न दोषः । क्रियत एतन्न्यास एव ॥ रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः [८.२.४२] । आदेशतोऽन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां तकारग्रहणं कर्तव्यम् । प्रकृतितः पुनरन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां नकारस्य निष्ठायां यान्तरतमा प्रकृतिस्तत्र षष्ठी यत्र षष्ठी तत्रा-

---

क्षि व जि या धातूंचा एच् कसला आहे ?

एकार आहे. ( तेव्हां ओकार व औकार या एचांसंबंधानें नियम नसल्यामुळें लव्यम् वगैरे उदाहरणांमध्यें 'यि प्रत्यये' या सूत्रानें आदेश होण्यास कांहीं हरकत नाहीं.)

तर मग ऐकारासंबंधानें नियम नसल्यामुळें रायमिच्छति रैयति येथें 'यिप्रत्यये' या सूत्रानें ऐकाराला आय् आदेश होऊं लागेल.

(हा दोष येत नाहीं. कारण) रैशब्दाहून क्यच् (३।१।८) प्रत्यय फक्त वैदिक प्रयोगामध्येंच होतो. आणि वैदिक प्रयोगामध्यें तर जेवढीं कार्यें केलेलीं दृष्टीस पडतील तेवढींच करावयाचीं असतात.

'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला असतां 'ऊदुपधाया गोहः' (६।४।८९) या ठिकाणीं ओकारालाच आदेश होण्याकरतां 'उपधायाः' असें म्हणावें लागेल. आणि 'स्थानींपैकीं निवड करून त्यांत जो जास्त सारखा असेल त्यालाच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला असतां ऊकाराला 'गोह' यांपैकीं जो वर्ण जास्त सारखा असेल त्याच स्थानीला म्ह. ओकाराला षष्ठी लागेल, आणि ज्याला षष्ठी लागेल त्यालाच आदेश होतो, तेव्हां उपधेलाच होत असल्यामुळें सूत्रांत 'उपधायाः' हा शब्द घातल्यावांचूनच सिद्ध होईल.

'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला तरी येथें दोष येत नाहीं. कारण पाणिनीनें मूळ सूत्रामध्यें 'उपधायाः' हा शब्द घालून ठेवला आहेच.

'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला असतां 'रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः' (८।२।४२) या ठिकाणीं तकारालाच नकार आदेश होण्याकरता 'तः' म्ह. तकाराला असें म्हणावें लागेल. आणि 'स्थानींपैकीं निवड करून त्यांत जो जास्त सारखा असेल त्यालाच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला असतां आदेशाला म्ह. नकाराला निष्ठाप्रत्ययांपैकीं जो वर्ण जास्त सारखा असेल त्याच स्थानीला म्ह. तकाराला षष्ठी लागेल आणि ज्याला षष्ठी लागेल

---

६. रैशब्दाहून 'सुप आत्मनः क्यच्' (३।१।८) या सूत्रानें क्यच् प्रत्यय करून 'रैय्' याला धातुसंज्ञा (३।१।३२) करून पुढें लट्प्रत्यय करून रैयति हें क्रियापद झालें आहे.

७. ऊकार आणि ओकार यांचें ओष्ठस्थान सारखें आहे. म्हणून ऊकार या आदेशाला गकार व हकार या दोन वर्णांपेक्षां गोह यांतील ओकार जास्त सारखा आहे.

८. नकार आणि तकार हे दोन्ही वर्ण दंतस्थानाचे आहेत, त्यामुळें नकार या आदेशाला निष्ठाप्रत्ययांतील इतर अकार वगैरेंपेक्षां तकारच जास्त सारखा आहे.

देशा भवन्तीत्यन्तरेण तकारग्रहणं सिद्धं भवति । आदेशतोऽप्यन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां न दोषः। क्रियत एतन्न्यास एव ॥

किं पुनरिदं निर्वर्तकम् । अन्तरतमा अनेन निर्वर्त्यन्ते । आहोस्वित्प्रतिपादकम्। अन्येन निर्वृत्तानामनेन प्रतिपत्तिः। कश्चात्र विशेषः ।

**स्थानेऽन्तरतमनिर्वर्तके स्थानिनिवृत्तिः ॥२॥**

स्थानेऽन्तरतमनिर्वर्तके सर्वस्थानिनां निवृत्तिः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । दधि मधु। अस्तु। न कश्चिदन्य आदेशः प्रतिनिर्दिश्यते तत्रान्तर्यतो दधिशब्दस्य दधिशब्द एव मधुशब्दस्य मधुशब्द एवादेशो भविष्यति। यदि चैवं क्वचिद्वैरूप्यं तत्र दोषः स्यात् । बिसं बिसम् मुसलं मुसलमिति । इण्कोरिति षत्वं प्राप्नोति ॥ अपि चेष्टा व्यवस्था न प्रकल्पेत । तद्यथा तप्ते भ्राष्ट्रे तिलाः क्षिप्ता मुहूर्तमपि नावतिष्ठन्त एवमिमे वर्णा मुहूर्तमपि नावतिष्ठेरन् ॥ अस्तु तर्हि प्रतिपादकम् ।

---

त्यालाच आदेश होतो. तेव्हां तकारालाच नकार आदेश होत असल्यामुळें सूत्रांत 'तः' असा शब्द घातल्यावांचूनच सिद्ध होईल.

'आदेशांतील निवड करून त्यांत जास्त सारखा असेल तोच आदेश करावयाचा' असा पक्ष घेतला तरी येथें दोष येत नाहीं. कारण पाणिनीनें मूळ सूत्रामध्यें 'तः' असा घालून ठेवला आहेच.

काय, पण हें सूत्र निर्वर्तक आहे, म्ह. जास्त सारखे जे आदेश असतील ते ह्या सूत्रानें नवीनच केले जातात, किंवा प्रतिपादक आहे, म्ह. इतर सूत्रांनीं केलें जाणारे जे जास्त सारखे आदेश त्यांना फक्त हें सूत्र संमति देतें ?

ह्या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा.२) शब्दस्वरूपाच्या उच्चारण्याचा प्रसंग आला असतां तें शब्दस्वरूप न उच्चारतां त्याचे जागीं त्याच्याशीं जास्त सारखा असा नवीन आदेश करावा असें म्हटलें तर सर्वच शब्दांचा उच्चारण्याचा प्रसंग असल्यामुळें त्यांची निवृत्ति होऊं लागेल; उदा० दधि,मधु. याही शब्दांची प्रकृतसूत्रानें निवृत्ति होईल.

होऊं दे झाली तर. आदेश कांहीं त्यांना भलता कोणी होणार नाहीं. जास्त सारखा म्हणजे दधिशब्दाला दधिशब्दच आणि मधुशब्दाला मधुशब्दच आदेश होईल. (व त्यांतील प्रत्येक वर्णाला होतो तो वर्ण आदेश होईल.)

अशा रीतीनें शब्दस्वरूप सारखेंच राहिलें तरी पण जर एखादे ठिकाणीं कांहीं धर्मामध्यें फरक झाला तर तेथें दोष येणारच. उदा० बिसम्, मुसलम्. येथें बिस शब्दाला बिसशब्दच आदेश झाला व त्यांतील वर्णांना ते ते वर्ण आदेश झाले तरी त्यांतील सकार हा आदेश होत असल्यामुळें त्याला इण्कोः (८।३।५७) या अधिकारांतील 'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) यानें षत्व होऊं लागेल. शिवाय इष्ट व्यवस्था कांहींच सिद्धीला जाणार नाहीं. जसें तापलेल्या परळामध्यें तिळ टाकले असतां ते क्षणभरसुद्धां तेथें स्थिर राहत नाहींत तसे हे वर्ण क्षणभरसुद्धां कोठेंही स्थिर राहणार नाहींत.

तर मग हें सूत्र केवळ संमति देणारेंच

---

९. कारण ज्याचा तोच वर्ण आदेश झाला तरी त्या आदेशाचा पुनः उच्चारणाचा प्रसंग असल्यामुळें त्या आदेशाचीही निवृत्ति होऊन पुनः तोच वर्ण आदेश होईल. त्यालाही पुनः आदेश होणार अशी अनवस्था येते. तेव्हां जो वर्ण आदेश म्हणून करावा तो पुन्हा निवृत्त होण्याच्या योग्यतेचा असल्यामुळें साधुशब्दाचें स्वरूप सांगतां येणार नाहीं.

अन्येन निर्वृत्तानामनेन प्रतिपत्तिः ।

**निर्वृत्तप्रतिपत्तौ निर्वृत्तिः ॥३॥**

निर्वृत्तप्रतिपत्तौ निर्वृत्तिर्न सिध्यति । सर्वे सर्वत्र प्राप्नुवन्ति । किं तर्ह्युच्यते निर्वृत्तिर्न सिध्यतीति । न साधीयो निर्वृत्तिः सिद्धा भवति । न ब्रूमो निर्वृत्तिर्न सिध्यतीति । किं तर्हि । इष्टा व्यवस्था न प्रकल्पेत । न सर्वे सर्वत्रेष्यन्ते ॥ इदमिदानीं किमर्थं स्यात् ।

**अनर्थकं च ॥ ४ ॥**

अनर्थकमेतत्स्यात् । यो हि भुक्तवन्तं ब्रूयान्मा भुक्था इति किं तेन कृतं स्यात् ॥

**उक्तं वा ॥ ५ ॥**

किमुक्तम् । सिद्धं तु षष्ठ्यधिकारे वचनादिति । षष्ठ्यधिकारेऽयं योगः कर्तव्यः । स्थानेऽन्तरतमः षष्ठीनिर्दिष्टस्येति ॥

**प्रत्यात्मवचनं च ॥ ६ ॥**

प्रत्यात्ममिति च वक्तव्यम् । किं प्रयो-

---

असू दे म्ह. ह्यानें नवीन कांहीं आदेश करावयाचे नाहीत. फक्त इतर सूत्रांनीं केलेले जे आदेश त्यांपैकीं जास्त सारखे जे आदेश असतील त्यांना या प्रकृतसूत्रानें मान्यता द्यावयाची (आणि इतर आदेश केले असले तरी ते केले नाहींत असें समजावयाचें).

(वा.३) 'इतरांनीं केलेल्या आदेशांना ह्या प्रकृतसूत्रानें मान्यता द्यावयाची' असें असेल तर आदेश होणार नाहींत. त्या त्या सूत्रांनीं सांगितलेलें सर्वच आदेश सर्व ठिकाणीं होतील.

जर सर्व आदेश सर्व ठिकाणीं होतील तर 'आदेश होणार नाहींत' हें काय म्हणतां?

'योग्यच आदेश झाले पाहिजे ही गोष्ट सिद्धीला जाणार नाहीं' असा आमचा अभिप्राय आहे. 'आदेश मुळीं होणारच नाहींत' असें आम्ही म्हणत नाहीं. तर इष्ट जी व्यवस्था ती होणार नाहीं. कारण सर्वच आदेश सर्व ठिकाणीं इष्ट नाहींत.

मग त्या आदेशांतील जास्त सारख्या आदेशांना ह्यानें मान्यता देण्याचा काय उपयोग ?

(वा.४) हें प्रकृतसूत्र निरुपयोगीच होणार आहे. कारण जेवलेल्या मनुष्याला कोणी जर 'तूं जेवला नाहींस' असें म्हणेल तर त्याचा काय बरें उपयोग[10] होईल. ?

(वा.५) अथवा हें पूर्वीं (१।१।३) सांगितलेंच आहे ?

तें काय सांगितलें आहे ?

'सिद्धं तु षष्ठ्यधिकारे वचनात्' (१।१।३ वा१७) असें पूर्वीं सांगितलेंच आहे. षष्ठीच्या अधिकारामध्यें हें सूत्र समजावें. म्हणजे जेथें षष्ठीप्रत्ययाचा निर्देश केला असेल तेथें 'स्थानेन्तरतमः' हें प्रकृतसूत्र उपस्थित[11] होतें.

(वा.६) प्रत्यात्मम्[12] असें येथें म्हटलें पाहिजे.

---

१०. दधि अत्र या ठिकाणीं इकाराला य व र ल हे चारही आदेश 'इको यणचि' (६।१।७७) यानें होतील. त्यांतील यकार हा इकाराला जास्त सारखा आहे. त्याशिवाय बाकीच्या व, र, ल या तीन आदेशांना प्रकृतसूत्रानें मान्यता दिली नाहीं तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. कारण 'इको यणचि' या सूत्रावरून जी गोष्ट होऊन गेली तिचा मागून अमान्यता दाखवून निषेध करण्यांत कांहींच अर्थ नसतो.

११. तेव्हां 'इको यणचि' येथें हें सूत्र उपस्थित झाल्यामुळें 'इकाचे स्थानीं अन्तरतम म्ह. जास्त सारखा असा यण् आदेश होतो' असा अर्थ होतो. तेव्हां दधि अत्र येथें आदेश होतांनाच एक य तेवढा होईल. व, र, ल हे होणारच नाहींत.

१२. प्रत्यात्मम् म्हणजे त्याचा त्याला.

जनम्। यो यस्यान्तरतमः स तस्य स्थाने यथा स्यादन्यस्यान्तरतमोऽन्यस्य स्थाने मा भूदिति ॥

## प्रत्यात्मवचनमशिष्यं स्वभावसिद्धत्वात् ॥ ७ ॥

प्रत्यात्मवचनमशिष्यम्। किं कारणम्। स्वभावसिद्धत्वात्। स्वभावत एतत्सिद्धम्। तद्यथा। समाजेषु समाशेषु समवायेषु चास्यतामित्युक्ते न चोच्यते प्रत्यात्ममिति प्रत्यात्मं चासते ॥

## अन्तरतमवचनं च ॥ ८ ॥

अन्तरतमवचनं चाशिष्यम्। योगश्चाप्ययमशिष्यः। कुतः। स्वभावसिद्धत्वादेव। तद्यथा। समाजेषु समाशेषु समवायेषु चास्यतामित्युक्ते नैव कृशाः कृशैः सहासते न पाण्डवः पाण्डुभिः। येषामेव किंचिदर्थकृतमान्तर्यं तैरेव सहासते। तथा गावो दिवसं चरितवत्यो यो यस्याः प्रसवो भवति तेन सह शेरते। तथा यान्येतानि गोयुक्तकानि संघुष्टकानि

---

याचा काय उपयोग ?

जो आदेश ज्या स्थानीला जास्त सारखा जमेल तो आदेश त्याच स्थानीला झाला पाहिजे. एका स्थानीला जास्त सारखा जो आदेश तो दुसऱ्या स्थानीला होऊं नये.

(वा.७) प्रत्यात्मम् असें येथें म्हणावयास नको.

कां बरें ?

स्वभावसिद्धत्वात् म्ह. ही गोष्ट सहजच सिद्ध होत आहे म्हणून. असें पाहा की एखाद्या उत्सवामध्यें मंडळी जमूं लागली म्हणजे त्यांना 'समाजामध्यें[13], समाशामध्यें, समवायामध्यें जाऊन बसावें' असें सांगितलें असतां जो जेथें बसण्याला योग्य असतो तो तेथेंच जाऊन बसतो. तेथें प्रत्यात्मम् असें म्हणवें लागत नाहीं.

(वा.८) अन्तरतमवचनही करावयास नको. म्ह. स्थानीला जास्त सारखा जो आदेश असेल तो करावा असें सांगणारें हें प्रकृतसूत्रही करावयास नको.

कां बरें ?

हें देखील सहजच सिद्ध होत आहे म्हणूनच करावयास नको. असें पाहा की एखाद्या उत्सवामध्यें, मंडळी जमूं लागली म्हणजे त्यांना 'समाजामध्यें समाशामध्यें, समवायामध्यें जाऊन बसावें' असें सांगितलें असतां त्यांतील जे शरीरानें कृश असतील ते आपल्यासारख्या कृश मनुष्यांच्याच जवळ जाऊन बसतील असा नियम नाहीं. तसेंच जे गोरे असतील ते आपल्यासारख्या गौरवर्णाच्या मनुष्यांजवळच जाऊन बसतील असा नियम नाहीं. तर त्या उत्सव वगैरेंमध्यें केलीं जाणारीं जीं अनेक कृत्यें त्यांपैकीं कोणतें तरी एखादें कृत्य करण्यांत ज्यांचा एकमेकांना उपयोग होण्याचा संभव असेल तेच एकमेकांजवळ जाऊन बसतात[14]. तसेंच दिवसभर रानामध्यें इतस्ततः संचार करणाऱ्या गाईपैकीं जिचा जो पाडा असेल त्यालाच ती जवळ घेऊन रात्रीं निजते. तसेंच बैलांच्या जोडया लावून जीं संघुष्टकें[15] केलीं जातात त्यांतील एक दुसरा

---

१३. समाज म्ह. कांहीं एक विचार करणारी सभा. समाश म्ह. सहभोजन. समवाय म्ह. कांहीं एक काम करण्याकरतां जमलेली मंडळी. जे सभासद असतात ते समाजाकडे जातात, जे निमंत्रित असतात ते भोजकाकडे जातात. आणि जे काम करण्याकरतां आलेले असतात ते समवायाकडे जातात.

१४. तेव्हां स्थानीचा जो अर्थ असेल तो ज्या आदेशाला दाखवितां येईल तोच त्याला आदेश होईल.

१५. मोट ओढतांना किंवा नांगरतांना जें दोन बैलाच्या गळ्यांत लाकडाचें कडें अडकवितात त्याला संघुष्टक म्हणतात.

भवन्ति तान्यन्योन्यं पश्यन्ति शब्दं कुर्वन्ति ॥ एवं तावच्चेतनावत्सु । अचेतनेष्वपि । तद्यथा । लोष्टः क्षिप्तो बाहुवेगं गत्वा नैव तिर्यग्गच्छति नोर्ध्वमारोहति पृथिवीविकारः पृथिवीमेव गच्छत्यान्तर्यतः । तथा या एता आन्तरिक्ष्यः सूक्ष्मा आपस्तासां विकारो धूमः स आकाशदेशे निवाते नैव तिर्यग्गच्छति नावागवरोहत्यब्विकारोऽप एव गच्छत्यान्तर्यतः । तथा ज्योतिषो विकारोऽर्चिराकाशदेशे निवाते सुप्रज्वलितो नैव तिर्यग्गच्छति नावागवरोहति ज्योतिषो विकारो ज्योतिरेव गच्छत्यान्तर्यतः ॥

## व्यञ्जनस्वरव्यतिक्रमे च तत्कालप्रसङ्गः ॥९॥

व्यञ्जनव्यतिक्रमे स्वरव्यातिक्रमे च तत्कालता प्राप्नोति । व्यञ्जनव्यातिक्रमे । इष्टम् उप्तम् । आन्तर्यतोऽर्धमात्रिकस्य व्यञ्जनस्यार्धमात्रिक इक्प्राप्नोति ॥ नैव लोके न च वेदेऽर्धमात्रिक इगस्ति । कस्तर्हि । मात्रिकः । योऽस्ति स भविष्यति ॥ स्वरव्यतिक्रमे । दध्यत्र मध्वत्र कुमार्यत्र ब्रह्मबन्ध्वर्थमिति । आन्तर्यतो मात्रिकस्य द्विमात्रिकस्यैको मात्रिको द्विमात्रिको वा यण्प्रा_

---

दृष्टीस पडला नाहीं कीं लगेंच शब्द करूं लागतो. हा व्यवहार चेतनासंबंधानें झाला. पण अचेतन वस्तु देखील आपल्यासारख्या वस्तूकडेसच धांव घेतात असें दृष्टीस पडतें. जसें मातीचें ढेकूळ जोरानें फेकलें असतां लांब जाईल, पण शेवटीं आकाशामध्यें बाजूला न जातां व वरचे बाजूस न जातां जमिनीवरच जाऊन पडतें. कारण पृथिवीचाच ढेकूळ हा विकार असल्यामुळें पृथिवीशीं त्याचें सादृश्य आहे. तसेंच जलाचा विकार धूर हा वाऱ्याच्या गतीनें इकडे तिकडे जाईल परंतु वारा नसल्यास तो आकाशामध्यें इकडे तिकडे जात नाहीं, खालींही उतरत नाहीं, तर स्वाभाविक गतीनें आपल्यासारख्या आकाशांतील सूक्ष्म जलामध्येंच जातो. तसेंच तेजाचा विकार. चांगली पेटविलेली ज्वाळा ही वारा नसल्यास आकाशामध्यें आडवी तिडवी जात नाहीं, खालींही उतरत नाहीं. तर स्वाभाविक गतीनें आपल्यासारख्या आकाशामधील सूक्ष्म तेजामध्येंच जाते. (याप्रमाणें शास्त्रामध्यें स्थानी हा आपल्यासारख्याच आदेशाकडे धांव घेईल. एकंदरींत प्रकृत सूत्र करावयास नको असें सिद्ध झालें.)

(वा.९) व्यंजनाचा व्यतिक्रम म्ह. व्यंजनाला स्वर आदेश, आणि स्वरव्यतिक्रम म्ह. स्वराला व्यंजन आदेश, हे झाले असतां तेथें स्थानीच्या कालाइतकाच काल ज्याच्या उच्चारणाला लागतो असा आदेश होऊं लागेल. व्यंजनाच्या व्यतिक्रमाचें उदाहरण—इष्टम्, उप्तम्. येथें जो यज् धातूच्या यकाराला इकार होतो (६।१।१५) आणि वप्धातूच्या वकाराला उकार होतो तो व्यंजन हें अर्धमात्रिक असल्यामुळें त्याचे स्थानीं प्रकृतसूत्रानें त्याच्यासारखा अर्धमात्रिकच इकार व उकार होऊं लागेल.

पण लोकामध्यें व वेदामध्यें कोठेंही अर्धमात्रिक इक् नाहींच.

मग कमींत कमी किती मात्रेचा आहे?

सर्वांत कमी इक् म्ह. ऱ्हस्व इक्. तो एक मात्रेचा आहे.

मग जो आहे तोच होईल.

स्वराच्या व्यतिक्रमाचें उदाहरण—दध्यत्र, मध्वत्र, कुमार्यर्थम्, ब्रह्मबन्ध्वर्थम्. 'स्थानीला जास्त सारखा आदेश असेल तो करावा' असें प्रकृतसूत्रानें सांगितलें असल्यामुळें दध्यत्र, मध्वत्र या ठिकाणीं एक मात्रेच्या ऱ्हस्व इकाराला आणि उकाराला होणारा यण् आदेश (६।१।७७) एक मात्रेचा होऊं लागेल. तसेंच कुमार्यर्थम्, ब्रह्मबन्ध्वर्थम् या ठिकाणीं दोन

प्रोति ॥ नैव लोके न च वेदे मात्रिको द्विमात्रिको वा यणस्ति । कस्तर्हि । अर्धमात्रिकः । योऽस्ति स भविष्यति ॥

## अक्षु चानेकवर्णादेशेषु ॥१०॥

अक्षु चानेकवर्णादेशेषु तत्कालता प्राप्नोति । इदम इश् [५.३.३] । आन्तर्यतोऽर्धतृतीयमात्रस्येदमः स्थानेऽर्धतृतीयमात्रमिवर्णं प्राप्नोति ॥ नैष दोषः । भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेत्येवं न भविष्यति ॥

## गुणवृद्ध्येज्भावेषु च ॥११॥

गुणवृद्ध्येज्भावेषु च तत्कालता प्राप्नोति। खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः । खट्वा उदकं खट्वोदकम् । खट्वा ईषा खट्वेषा । खट्वा ऊढा खट्वोढा । खट्वा एलका खट्वैलका । खट्वा ओदनः खट्वौदनः । खट्वा ऐतिकायनः खट्वैतिकायनः । खट्वा औपगवः खट्वौपगव इति । आन्तर्यतस्त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशाः प्राप्नुवन्ति ॥ नैष दोषः । तपरे गुणवृद्धी ।

---

मात्रांच्या दीर्घ ईकाराला आणि ऊकाराला होणारा यण् आदेश दोन मात्रांचा होऊं लागेल.

पण लोकामध्यें व वेदामध्यें कोठेंही एक मात्रेचा व दोन मात्रांचा यण् नाहींच.

मग यण् किती मात्रांचा आहे ?

अर्धमात्रेचा आहे.

मग जो आहे तोच होईल.

(वा.१०) अनेक वर्णांना एक अच् आदेश ज्या ठिकाणीं होत असेल त्या ठिकाणीं त्या अनेक वर्णांच्या उच्चारणाला सर्वांचा मिळून जेवढा काल लागत असेल तेवढ्या कालामध्यें उच्चारला जाणारा म्ह. तितक्या मात्रांचा तो अच् आदेश प्रकृत सूत्रामुळें होऊ लागेल; उदा० इदम इश् (५।३।३). इतः या उदाहरणामध्यें इदम् शब्दाहून तसिल् प्रत्यय (५।३।७), अत्व (७।२।१०२) आणि पररूप (६।१।९७) हे केल्यानंतर इद, तस् येथें 'इद' याला इश् आदेश होतो. तो आदेश प्रकृतसूत्रानें अडीच मात्रांचा होईल. इद या स्थानींतील इकार, दकार, अकार मिळून त्याच्या अडीच मात्रा होतात.

हा दोष येत नाहीं. कारण 'भाव्यमानेन[१६] सवर्णानां ग्रहणं न' ही परिभाषा असल्यामुळें सूत्रामध्यें जो इश् असा ऱ्हस्व इकार उच्चारला आहे त्यानें त्याच्या सवर्णांचें ग्रहणच होत नाहीं. तेव्हां जो ऱ्हस्व इकार उच्चारला आहे तोच होतो.

(वा.११.) गुण व वृद्धि कर्तव्य असतांना आणि एच् आदेश कर्तव्य असतांना स्थानीच्या जितक्या मात्रा असतील तितक्या मात्रांचा आदेश होऊं लागेल. गुणवृद्धीचीं उदा०— खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः, खट्वा उदकम् खट्वोदकम्, खट्वा ईषा खट्वैषा, खट्वा उढा खट्वोढा, खट्वा एलका खट्वैलका, खट्वा ओदनः खट्वौदनः, खट्वा ऐतिकायनः, खट्वैतिकायनः, खट्वा औपगवः खट्वौपगवः. या उदाहरणांपैकीं पहिल्या चार उदाहरणांमध्यें दोन वर्णांना मिळून एक आदेश गुण (६।१।८७) झाला आहे. दुसऱ्या चार उदाहरणांमध्यें दोन वर्णांना मिळून एक आदेश वृद्धि (६।१।८८) झाला आहे. तसेंच या आठ उदाहरणांपैकीं पहिल्या दोन उदाहरणांमध्यें स्थानी दोन वर्ण मिळून तीन मात्रा होतात तेव्हां तेथें होणारा गुण तीन मात्रांचा होऊं लागेल व पुढील सहा उदाहरणामध्यें स्थानी दोन वर्ण मिळून चार मात्रा होतात. तेव्हा तेथें होणारे गुण व वृद्धि हे आदेश चार मात्रांचे होतील.

हा दोष येत नाहीं. वृद्धिरादैच् येथें आत्

---

१६. सूत्रानें ज्याचें विधान केलें असेल तो सूत्रामध्यें जसा उच्चारला असेल तसाच करावा. तेथें त्याच्या सवर्णांचें ग्रहण (१।१।६९) करूं नये असा या परिभाषेचा अर्थ आहे.

ननु च तः परो यस्मात्सोऽयं तपरः। नेत्याह। तादपि परस्तपरः। यदि तादपि परस्तपर ऋदोरप् [३.३.५७] इहैव स्यात्। यवः स्तवः। लवः पव इत्यत्र न स्यात्। नैष तकारः। कस्तर्हि। दकारः। किं दकारे प्रयोजनम्। अथ किं तकारे। यद्यसंदेहार्थस्तकारो दकारोऽपि। अथ मुखसुखार्थस्तकारो दकारोऽपि॥ एज्भावे। कुर्वाते कुर्वाथे। आन्तर्यतोऽर्धतृतीयमात्रस्य टिसंज्ञकस्यार्धतृतीयमात्र एः प्राप्नोति॥ नैव लोके न च वेदेऽर्धतृतीयमात्र एरस्ति॥

**ऋवर्णस्य गुणवृद्धिप्रसङ्गे सर्वप्रसङ्गोऽविशेषात् ॥१२॥**

ऋवर्णस्य गुणवृद्धिप्रसङ्गे सर्वप्रसङ्गः। सर्वे गुणवृद्धिसंज्ञका ऋवर्णस्य स्थाने प्राप्नुवन्ति। किं कारणम्। अविशेषात्। न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयको गुणवृद्धिसंज्ञक ऋवर्णस्य स्थाने भवतीति। अनुपादीयमाने विशेषे सर्वप्रसङ्गः॥

**न वा ऋवर्णस्य स्थाने रपरप्रसङ्गादवर्णस्यान्तर्यम् ॥१३॥**

न वैष दोषः। किं कारणम्। ऋवर्ण-

---

या तकाराच्या पुढें ऐच् शब्द उच्चारला आहे. तसेंच अदेङ्गुणः येथें अत् या तकाराच्या पुढें एङ् शब्द उच्चारला आहे. तेव्हां तपरस्तत्कालस्य (१।१।७०) या सूत्रावरून दीर्घांनाच म्ह. दोन मात्रांच्याच ए, ओ यांना गुणसंज्ञा आहे आणि दोन मात्रांच्याच ऐ, औ यांना वृद्धिसंज्ञा आहे[17].

पण 'तपर' शब्दाचा अर्थ 'त' ज्याच्यापुढें मानला आहे असा वर्ण ना?

असेंच केवळ नाहीं असें आम्ही म्हणतों. तकाराच्या पुढें असलेला वर्णही 'तपर' म्हणून उल्लेखिला जातो.

जर तकाराच्या पुढें असलेला वर्णही 'तपर' शब्दाचा अर्थ समजला तर 'ऋदोरप्' (३।३।५७) या सूत्रानें यवः, स्तवः इत्यादि ठिकाणींच अप् प्रत्यय होईल. लवः, पवः इत्यादि ठिकाणीं अप् प्रत्यय होणार नाहीं.

ऋदोरप् या सूत्रांत तकार उच्चारलाच नाहीं.

तर मग कोणता वर्ण उच्चारला आहे?

दकार उच्चारला आहे.

दकार उच्चारण्याचा कोणता उपयोग?

तकार उच्चारण्याचा तरी काय उपयोग?

तकार उच्चारण्याचा उपयोग अर्थाविषयीं संशय उत्पन्न होऊं नये हा असेल. तर दकाराचाही तोच उपयोग; बरें, उच्चारण करतांना मुखांतून सुखानें उच्चारण व्हावें हा जर तकाराचा उपयोग घेतला तर दकाराचाही तोच घेतां येईल.

एच् आदेशाचें उदा०—कुर्वाते, कुर्वाथे. येथें 'टित आत्म०' (३।४।७९) यानें जो एकार आदेश झाला आहे तो, त्याचा स्थानीं प्रत्ययांतील टिसंज्ञक 'आम्' हा भाग अडीच मात्रांचा असल्यामुळें, त्याच्यासारखा अडीच मात्रांचाच होऊं लागेल.

पण लोकामध्यें व वेदामध्यें कोठेंही अडीच मात्रांचा एच् नाहीं. (तेव्हां अर्थात् जो आहे तोच होईल.)

(वा.१२) ऋकाराला गुण व वृद्धि कर्तव्य असतांना सर्वप्रसंग येतो म्ह. सर्व गुण व सर्व वृद्धि होतील. गुणसंज्ञक अ, ए व ओ आणि वृद्धिसंज्ञक आ, ऐ व औ हे सगळेच ऋकाराला होऊं लागतील.

कां बरें?

त्यांत कांहीं विशेष दिसत नाहीं म्हणून. 'ऋकाराच्या स्थानीं अशा प्रकारचाच गुण करावा व अशा प्रकारचीच वृद्धि करावी' असा कांहींच विशेष सांगितला नाहीं. आणि विशेष जर सांगितला नाहीं तर अर्थात् सगळे होणारच.

(वा.१३) अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें?

---

१७. अ. १ पा. १ सू. १ पृ. १०७ पाहा.

स्य स्थाने रपरप्रसङ्गात्। उः स्थानेऽण् प्रसज्यमान एव रपरो भवतीत्युच्यते तत्र ऋवर्णस्यान्तर्यतो रेफवतो रेफवानकार एवान्तरतमो भवति ॥

**सर्वादेशप्रसङ्गस्त्वनेकाल्त्वात्॥१४॥**

सर्वादेशस्तु गुणवृद्धिसंज्ञक ऋवर्णस्य प्राप्नोति। किं कारणम्। अनेकाल्त्वात्। अनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इति ॥

**न वानेकाल्त्वस्य तदाश्रयत्वा-दृवर्णादेशस्याविघातः ॥१५॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अनेकाल्त्वस्य तदाश्रयत्वात्। यदायमुः स्थाने तदानेकाल्। अनेकाल्त्वस्य तदाश्रयत्वादृवर्णादेशस्य विघातो न भविष्यति ॥ अथवानान्तर्यमेवैतयोरान्तर्यम्। एकस्याप्यन्तरतमा प्रकृतिर्नास्त्यपरस्याप्यन्तरतम आदेशो नास्ति। एतदेवैतयोरान्तर्यम् ॥

**संप्रयोगो वा नष्टाश्वदग्धरथवत्॥१६॥**

अथवा नष्टाश्वदग्धरथवत्संप्रयोगो भवति। तद्यथा। तवाश्वो नष्टो ममापि रथो दग्ध उभौ संप्रयुज्यावहा इति। एवमिहापि तवाप्यन्तरतमा प्रकृतिर्नास्ति ममा-

---

ऋवर्णस्य स्थाने रपरप्रसङ्गात् म्ह. ऋकाराचे स्थानीं होणारा जो अण् आदेश तो होतांनाच रपर असा होतो असें पुढील सूत्रानें सांगितलें आहे. तेव्हां अ हा गुण करावयाचा झाल्यास तो रपर होऊन 'अर्' असा होणार आणि वृद्धि 'आर्' अशी होणार. त्या अर् व आर् यांमध्यें रेफ आहे आणि ऋकाराच्या पोटांतही रेफ आहे. सारखेपणामुळें ऋकाराला अर् आणि आर् हेंच गुण वृद्धि होतात.

(वा.१४) पण गुण व वृद्धि म्हणून अर् व आर् हे ऋकाराला आदेश करावयाचे ते केवळ ऋकाराला न होता सर्वाला म्ह. ऋकारान्ताला होतील.

अर् व आर् या आदेशांमध्यें अनेक अल् असल्यामुळें 'अनेकाल् शित्सर्वस्य' (१।१।५५) ही परिभाषा तेथें प्रवृत्त होणार आहे.

(वा.१५) अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

अनेकाल्त्वस्य तदाश्रयत्वात् म्ह. अ व आ हा आदेश जेव्हां ऋकाराचे स्थानीं होईल तेव्हांच त्याला रेफ पुढें जोडला जाऊन तो आदेश अनेकाल् होणार अशा रीतीनें 'आदेश अनेकाल् बनणें' ही गोष्ट 'तो आदेश ऋकाराचे स्थानीं होणें' यावर अवलंबून झाली असल्यामुळें मागून त्या स्थानीमध्यें बदल करतां येत नाहीं.[१८] अथवा स्थानी ऋकार आणि आदेश अकार यांचें 'अनान्तर्य' म्ह. 'आपल्यासारखा न मिळणें' हेंच एक प्रकारचें सादृश्य आहे. तें असें की आदेश जे गुण व वृद्धि त्यांपैकीं अ आणि आ यांना आपल्यासारखा कंठस्थानाचा स्थानी इकांपैकीं कोणीही मिळत नाहीं. तसेंच स्थानीपैकीं ऋकाराला आपल्यासारखा मूर्धस्थानाचा आदेश गुणवृद्धींपैकीं कोणीही मिळत नाहीं. तेव्हां 'अनान्तर्य' हेंच सादृश्य असल्यामुळें अकाराला गुण अकारच होईल आणि वृद्धि आकारच होईल.

(वा.१६) अथवा नष्टाश्व आणि दग्धरथ याप्रमाणें येथें ऋकार आणि अकार यांचा संबंध घडून येईल. जसें लोकामध्यें एक दुसऱ्याला म्हणतो की 'तुझा घोडा नष्ट झाला व माझा रथ जळून गेला, आतां आपण आपला एकमेकांशीं संबंध घडवून आणूं, म्ह. तुझ्या रथाला माझा घोडा जोडून आपण काम भागवूं', त्याप्रमाणेंच येथेंही ऋकार हा

---

१८. एक प्रकारचा पाया भरून त्यावर इमारत बांधल्यानंतर त्या पायाच्या स्वरूपांत बदल करतां येत नाहीं.

प्यन्तरतम आदेशो नास्त्यस्तु नौ संप्रयोग इति । विषम उपन्यासः । चेतनावत्स्वर्थात्प्रकरणाद्वा लोके संप्रयोगो भवति वर्णाश्च पुनरचेतनास्तत्र किंकृतः संप्रयोगः । यद्यपि वर्णा अचेतना यस्त्वसौ प्रयुङ्क्ते स चेतनावान् ॥

**एजवर्णयोरादेशेऽवर्णं स्थानिनोऽवर्णप्रधानत्वात् ॥१७॥**

एजवर्णयोरादेशेऽवर्णं प्राप्नोति । खट्वैलका मालौपगवः । किं कारणम् । स्थानिनोऽवर्णप्रधानत्वात् । स्थानी ह्यत्रावर्णप्रधानः ॥

**सिद्धं तूभयान्तर्यात् ॥१८॥**

सिद्धमेतत् । कथम् । उभयोर्योऽन्तरतमस्तेन भवितव्यं न चावर्णमुभयोरन्तरतमम् ॥

**उरण्रपरः ॥१.१.५१॥**

किमिदमुरण्रपरवचनमन्यनिवृत्त्यर्थम् । उः स्थानेऽणेव भवति रपरश्चेति । आहोस्विद्रपरत्वमनेन विधीयते । उः स्थानेऽण्चा-

---

अकाराला म्हणतो की 'तुला तुझ्यासारखा स्थानी नाहीं व मला माझ्यासारखा आदेश नाहीं, तेव्हां आपण आपला एकमेकांशीं संबंध घडवून आणूं.'

पण हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण लोकामध्यें सचेतन प्राण्यांना विचार करण्याची शक्ति असल्यामुळें ते आपलें सामर्थ्य पाहून किंवा प्रकरणावरून वर दाखविल्याप्रमाणें संबंध घडवून आणूं शकतील. ऋकार वगैरे वर्ण पाहावे तर ते अचेतन. तेव्हां त्यांचा संबंध कसा घडावा ?

जरी वर्ण अचेतन आहेत तरी शब्दांचा प्रयोग करणारा मनुष्य सचेतन आहे ना ? तो त्या वर्णांचा संबंध घडवूं शकेल.

(वा.१७) अवर्ण आणि एच् या दोघांचे स्थानीं होणारा जो वृद्धिरूप एकादेश (६।१।८८) तो आकार होऊं लागेल. उदा०— खट्वैलका, मालौपगवः.

कां बरें ?

स्थानिनोऽवर्णप्रधानत्वात् म्ह. 'आ, ऐ' किंवा 'आ, औ' या स्थानींमध्यें अवर्णाचें बाहुल्य आहे.[१९]

(वा.१८) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

उभयान्तर्यात् म्ह. अवर्ण आणि एच् या दोहोंशीं जो जास्त सारखा आदेश जमेल तोच आदेश प्रकृतसूत्रानें होणारा आहे. आणि अवर्ण हा दोन स्थानींपैकीं एका स्थानीशीं सदृश असला तरी तेवढ्यानें कांहीं तो दोन स्थानींशीं सदृश होत नाहीं.[२०]

(सू. ५१) ऋकाराचे स्थानीं अण् रपर होतो असें जें प्रकृतसूत्रानें सांगितलें आहे तें अणाशिवाय दुसरा आदेश होऊं नये अशाकरतां सांगितलें आहे; म्हणजे 'ऋकाराचे स्थानीं आदेश करावयाचा झाल्यास तो अण्च आदेश करावा आणि तो रपर करावा' असा या सूत्राचा अर्थ समजावयाचा, किंवा फक्त 'रपर होतो' एवढेंच यानें नवीन सांगितलें, म्हणजे 'ऋकाराचे स्थानीं आदेश अण् होवोत किंवा अणाशिवाय दुसरेही होवोत पण त्यांत अण् जेव्हां आदेश होईल तेव्हां तो मात्र रपर करावा' असा या सूत्राचा अर्थ

---

१९. दोन स्थानींपैकीं पहिला स्थानी अवर्ण आहे आणि दुसरा स्थानी जो पुढील एच् तो संध्यक्षर असल्यामुळें त्यामध्येंही अवर्ण आहे. यामुळें स्थानींमध्यें अवर्णाचें बाहुल्य आहे.

२०. तेव्हां दोन्ही स्थानींशीं सदृश जे ऐकार आणि औकार तेच आदेश होतात.

१. ऋकाराचे स्थानीं अण् आदेश करावयाचा असेल तर अगोदर त्या आदेशाच्या पुढें रेफ जोडून नंतर त्या रेफासहित असा तो आदेश ऋकाराचे स्थानीं करावा. व लकाराचे स्थानीं अण् आदेश करावयाचा असेल तर तसाच अगोदर त्याला लकार जोडावा.

नण्च अण्तु रपर इति । कश्चात्र विशेषः ।

**उरण्रपरवचनमन्यनिवृत्त्यर्थं चेदुदात्तादिषु दोषः ॥१॥**

उरण्रपरवचनमन्यनिवृत्त्यर्थं चेदुदात्तादिषु दोषो भवति । के पुनरुदात्तादयः । उदात्तानुदात्तस्वरितानुनासिकाः । कृतिः हृतिः । कृतम् हृतम् । प्रकृतम् प्रहृतम् । नॄँः पाहि । अस्तु तर्ह्युः स्थानेऽण्चानण्च अण्तु रपर इति ।

**य उः स्थाने स रपर इति चेद्गुणवृद्ध्योरवर्णाप्रतिपत्तिः ॥२॥**

य उः स्थाने स रपर इति चेद्गुणवृद्ध्योरवर्णस्याप्रतिपत्तिः । कर्ता हर्ता वार्षगण्यः । किं हि साधीय ऋवर्णस्यासवर्णे यदवर्णं स्यान्न पुनरेङैचौ । पूर्वस्मिन्नपि पक्ष एष दोषः । किं हि साधीयस्तत्राप्यृवर्णस्यासवर्णे यदवर्णं स्यान्न पुनरिवर्णोवर्णौ । अथमेतदुः स्थानेऽणश्चानणश्च प्रसङ्गेऽणेव

समजावयाचा?

या दोन अर्थांमध्यें फरक काय?

(वा.१) ऋकाराला अणाशिवाय दुसरा आदेश होऊं नये अशाकरतां जर 'उरण्रपरः' हें प्रकृतसूत्र केलें असेल तर उदात्त वगैरेंचे ठिकाणीं दोष येतो.

उदात्त वगैरे जे म्हणतां ते कोणते?

उदात्त, अनुदात्त, स्वरित आणि अनुनासिक हे उदात्त वगैरे होत. उदा० कृतिः[२], हृतिः, कृतं, प्रहृतं, प्रकृतं, प्रहृतं, नॄँः, पाहि.

तर मग 'ऋकाराचे स्थानीं आदेश अण् होवोत किंवा अणाशिवाय दुसरेही होवोत, पण त्यांत अण् जेव्हां आदेश होईल तेव्हां तो मात्र रपर करावा', असाच या सूत्राचा अर्थ असूं दे.

(वा.२) 'ऋकाराचे स्थानीं अण् जो आदेश तो रपर करावा' असा या सूत्राचा अर्थ घेतला तर कर्ता, हर्ता येथें ऋकाराला गुण अकारच होतो आणि वार्षगण्यः येथें ऋकाराला वृद्धि आकारच होते ती होणार नाहीं. अ, ए, ओ हे तीन गुणसंज्ञक वर्ण आणि आ, ऐ, औ हे तीन वृद्धिसंज्ञक वर्ण ह्यांपैकीं कुणीच ऋकाराला सवर्ण नाहींत. मग त्यांत ऋकाराला गुण अकारच होतो, ए व ओ हे होत नाहींत. तसेंच त्याला वृद्धि आकारच होते, ऐ व औ होत नाहींत याचें बरोबर कारण काय बरें दाखवितां येईल?

पण हा दोष पूर्वीच्या पक्षावरही येत आहे. त्या पक्षींही ऋकाराला गुणांपैकीं व वृद्धींपैकीं सवर्ण कोणीच नाहींत, मग त्यांत 'अण्च आदेश करावा' या म्हणण्यानें एच् आदेश न होऊं देत. परंतु अकारच कां करावा व इकार उकार हे अण् असूनही कां करूं नयेत याचें बरोबर कारण काय बरें दाखवितां येईल?

आतां असें जर मत घेतलें की 'ऋकाराचे स्थानीं अण् किंवा त्याशिवाय दुसरे जे प्राप्त होतील त्यांपैकीं अण्च करावयाचा आणि तो रपर करावयाचा' तर इकार व उकार हे अण् असले तरी गुणवृद्धि सांगणाऱ्या सूत्रा-

२. कृतिः येथें कृधातूहून क्तिन् (३।३।९४) प्रत्यय केल्यानंतर ञ्नित्यादिर्नित्यम् (६।१।१९७) यानें ऋकाराला उदात्त आदेश होतो तो 'स्थानेन्तरतमः' या सूत्रामुळें ऋकारच होतो. परंतु आतां या सूत्रानें अण्च होतो असा नियम केल्यामुळें उदात्त असा अण्च होईल म्ह. अ, इ, उ यांपैकीं कोणी तरी होईल; ऋ होणार नाहीं. कृतम् येथें क्तप्रत्ययाला उदात्त (३।१।३) केल्यानंतर 'अनुदात्तं पद०' (६।१।१५८) यानें ऋकाराला अनुदात्त आदेश ऋकारच होत असतो तो अकार वगैरे कोणी तरी होईल. 'प्रकृतम्' 'गतिरनन्तरः' (६।२।४९) यानें प्र यांतील अकाराचा उदात्त कायम केल्यानंतर 'उदात्तादनु०' (८।४।६६) यानें ऋकाराला स्वरित आदेश ऋकारच होत असतो तेथेंही अकार वगैरे होतील. नॄन् यांतील नकाराला 'नॄन्पे' (८।३।१०) यानें रुत्व केल्यानंतर 'अत्रानुनासिकः०' (८।३।२) यानें ऋकाराला अनुनासिक आदेश होतो तो ॠँ हाच होतो तेथेंही प्रकृतसूत्रानें अण्च म्ह. अकार वगैरे कोणीतरी होईल.

भवति रपरश्चेति सिद्धा पूर्वस्मिन्पक्षेऽवर्णस्य प्रतिपत्तिः। यत्तु तदुक्तमुदात्तादिषु दोषो भवतीतीह स दोषो जायते। न जायते। जायते स दोषः। कथम्। उदात्त इत्यनेनाणोऽपि प्रतिनिर्दिश्यन्तेऽनणोऽपि। यद्यपि प्रतिनिर्दिश्यन्ते न तु प्राप्नुवन्ति। किं कारणम्। स्थानेऽन्तरतमो भवतीति। कुतो नु खल्वेतद्द्वयोः परिभाषयोः सावकाशयोः समवस्थितयोः स्थानेऽन्तरतम इत्युरण्रपर इति च स्थानेऽन्तरतम इत्यनया परिभाषया व्यवस्था भविष्यति न पुनरुरण्रपर इति। अतः किम्। अत एष दोषो जायत उदात्तादिषु दोष इति॥ ये चाप्येत ऋवर्णस्य स्थाने प्रतिपदमादेशा उच्यन्ते तेषु रपरत्वं न प्राप्नोति। ऋत इद्धातोः [७.१.१००] उदोष्ठ्यपूर्वस्य [१०२] इति॥

## सिद्धं तु प्रसङ्गे रपरत्वात्॥३॥

सिद्धमेतत्। कथम्। प्रसङ्गे रपरत्वात्। उः स्थानेऽण्प्रसज्यमान एव रपरो भव-

---

वरून ते प्राप्त झालेलें नसल्यामुळें ते न होतां अकारच होईल (तेव्हां दुसऱ्या पक्षावर दिलेला दोष पहिल्या पक्षावर येत नाहीं); पण पहिल्या पक्षावर उदात्त वगैरे स्वरांविषयीं जो दोष दिला आहे तो दोष या दुसऱ्या पक्षावर येतो कीं नाहीं (हा विचार केला पाहिजे).

दुसऱ्या पक्षावरही तो दोष येणार असें दिसतें.

तें कसें?

उदात्त या शब्दानें कांहीं नुसता ऋकारच घेतला जातो असें नाहीं, तर अ, इ, उ हे अण् व त्यांशिवाय दुसरे ऋ वगैरे हे सर्वच अच् उदात्तशब्दानें घेतले जातात.

पण जरी उदात्तशब्दानें अ, इ, उ या अणांचाही संग्रह होतो तरी कृतं वगैरे उदाहरणांमध्यें ते प्राप्त होत नाहींत (मग दोष येणार कसा)?

ते न प्राप्त होण्याचें कारण काय?

'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) ही परिभाषा आहे ना? (तेव्हां कृतं वगैरे ठिकाणीं ऋकाराला ऋकारच उदात्त प्राप्त होणार आहे. म्हणून कृतं वगैरे ठिकाणीं दोष येणार नाहीं.

तरी पण 'स्थानेन्तरतमः' आणि 'उरण्रपरः' ह्या इतर ठिकाणीं स्वतंत्रपणानें उपयोगीं पडत असलेल्या दोन परिभाषा कृतं वगैरे उदाहरणांमध्यें अगदीं बरोबरीनें उपस्थित होत असतांना त्यांमध्यें 'स्थानेन्तरतमः' याच परिभाषेनें येथें व्यवस्था करावयाची, आणि 'उरण्रपरः' या परिभाषेनें येथें व्यवस्था करावयाची नाहीं असें वैषम्य कां बरें करावें?

मग त्यांत काय झालें?

इतकेंच झालें की 'उरण्रपरः' ही परिभाषा कृतं वगैरे ठिकाणीं घेतली म्हणजे 'उदात्त आदेश अण् होतील' हा दोष दुसऱ्या पक्षावरही येतो.

शिवाय 'ऋत इद्धातोः' (७।१।१००) 'उदोष्ठ्यपूर्वस्य' (७।१।१०२) या सूत्रांनीं जे इत्, उत् असे ते ते वर्ण उच्चारून ऋकाराला आदेश सांगितले आहेत ते रपर होणार नाहींत (असा दोष येतो. कारण त्या ठिकाणीं अण् आणि इतर यांची प्राप्ति येत नाहीं).

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें?

प्रसङ्गे रपरत्वात् म्ह. ऋकाराचे स्थानीं अण् आदेश करण्याचा प्रसंग आला की त्याच वेळीं तो रपर होऊन नंतर त्या रेफासहित आदेश होतो म्हणून[३].

मग काय प्रसंग आला असतां असें

---

३. तेव्हां कर्ता या ठिकाणीं ऋकाराला गुण कर्तव्य असतांना 'अ, ए व ओ' हे तीन गुण प्राप्त झाले. असें न म्हणतां 'अर्, ए व ओ' हे तीन प्राप्त झाले असें समजलें पाहिजे. त्या अर् यांतील रेफाचें मूर्धस्थान

तीति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। स्थान इति वर्तते स्थानशब्दश्च प्रसङ्गवाची। यद्येवमादेशोऽविशेषितो भवति। आदेशश्च विशेषितः। कथम्। द्वितीयं स्थानग्रहणं प्रकृतमनुवर्तते तत्रैवमभिसंबन्धः करिष्यते। उः स्थानेऽण्स्थान इति। उः प्रसङ्गेऽण्प्रसज्यमान एव रपरो भवति॥

अथाण्ग्रहणं किमर्थं न ऊ रपर इत्येवोच्येत। ऊ रपर इतीयत्युच्यमाने क इदानीं रपरः स्यात्। य उः स्थाने भवति। कश्चोः स्थाने भवति। आदेशः।

## आदेशो रपर इति चेद्रीरिविधिषु रपरप्रतिषेधः ॥४॥

आदेशो रपर इति चेद्रीरिविधिषु रपरत्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः। के पुना रीरिविधयः। अकङ्लोपानङनङ्रीङ्रिङादेशाः। अकङ्। सौधातकिः। लोपः। पैतृष्वसेयः। आनङ्। होतापोतारौ। अनङ्। कर्ता हर्ता। रीङ्। मात्रीयति पित्रीयति।

---

मुद्दाम येथें सूत्रामध्यें घातलें पाहिजे ?

तसें घालावयास नको.

सूत्रांत तसें पद घातल्याशिवाय तसा अर्थ कसा होईल ?

स्थाने असें पद मागून अनुवृत्त येत आहे. आणि स्थानशब्दाचा प्रसंग असा अर्थ आहेच.

अशा रीतीनें रपर करण्याची वेळ दाखविण्याकडे स्थानशब्दाचा उपयोग झाला तर 'ऋकाराचे स्थानीं जो आदेश' असा आदेशाकडे जो स्थानशब्द लागतो तो लागणार नाहीं.

तसा आदेशाकडेही लावतां येईल.

तो कसा ?

मागें दुसरा एक स्थानशब्द आहे त्याची अनुवृत्ति केली म्हणजे झालें. तेव्हां दोन स्थाने शब्द घेऊन 'उः स्थाने अण् स्थाने' असा संबंध करतां येईल, म्ह. ऋकाराचा उच्चारण्याचा प्रसंग आला असतां त्याच्या ऐवजीं उच्चारला जाणारा जो अण् तो प्रसंगावस्थेमध्येंच रपर होतो असा अर्थ होईल.

आतां या सूत्रामध्यें अण् हा शब्द कशाकरतां घातला आहे? तो घालावयास नको. 'ऊ रपरः ऋकाराचे स्थानीं रपर होतो' एवढेंच सूत्र पुरे आहे.

पण 'ऋकाराचे स्थानीं रपर होतो' एवढेंच म्हटलें तर कोण बरें रपर होईल ?

जो ऋकाराचे स्थानीं कोणीही होत असेल तो रपर होईल.

ऋकाराचे स्थानी कोण होतो ?

आदेश होतो.

(वा.४) कोणताही आदेश रपर होतो असें म्हटलें तर रीरिविधि हे रपर होतील. तेथें 'ते रपर होत नाहींत' असा निषेध सांगितला पाहिजे.

रीरिविधि ते कोणते ?

अकङ्, लोप, आनङ्, अनङ् रीङ् आणि रिङ् हे आदेश 'रीरिविधि' होत. सौधातकिः येथें सुधातृशब्दाच्या ऋकाराला अकङ् आदेश (४।१।९७) झाला आहे. पैतृष्वसेयः येथें पितृष्वसृशब्दांतील शेवटच्या ऋकाराचा लोप(४।१।१३३) झाला आहे; होतापोतारौ येथें होतशब्दाच्या ऋकाराला आनङ् आदेश (६।३।२५) झाला आहे; कर्ता, हर्ता येथें कर्तृ व हर्तृ या शब्दांतील ऋकाराला अनङ् आदेश (७।१।९४) झाला आहे. मात्रीयति, पित्रीयति येथें मातृ व पितृ या शब्दांतील ऋकाराला रीङ् आदेश (७।४।२७) झाला आहे. क्रियते, ह्रियते येथें कृ व हृ या धातूंमधील ऋकाराला रिङ् आदेश (७।४।२८) झाला आहे.

---

असल्यामुळें मूर्धस्थानाच्या ऋकाराला अर् हाच गुण स्थानेऽन्तरतमः या परिभाषेनें होतो म्हणून दोष येत नाहीं.

रिङ् । क्रियते ह्रियते ॥

## उदात्तादिषु च ॥५॥

किम् । रपरत्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः । कृतिः हृतिः । कृतम् हृतम् । प्रकृतम् प्रहृतम् । नॄः पाहि ॥ तस्मादण्ग्रहणं कर्तव्यम् ॥

## एकादेशस्योपसंख्यानम् ॥६॥

एकादेशस्योपसंख्यानं कर्तव्यम् । खट्वर्श्यः मालर्श्यः । किं पुनः कारणं न सिध्यति । उःस्थानेऽण्प्रसज्यमान एव रपरो भवतीत्युच्यते न चायमुरेव स्थानेऽण्शिष्यते । किं तर्हि । उश्चान्यस्य च ॥ अवयवग्रहणात्सिद्धम् । यदत्र ऋवर्णं तदाश्रयं रपरत्वं भविष्यति । तद्यथा । माषा न भोक्तव्या इत्युक्ते मिश्रा अपि न भुज्यन्ते ।

## अवयवग्रहणात्सिद्धमिति चेदादेशे रान्तप्रतिषेधः ॥७॥

अवयवग्रहणात्सिद्धमिति चेदादेशे रान्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । होतापोतारौ । यथैवोश्चान्यस्य च स्थानेऽण्रपरो भवत्येवं य उः स्थानेऽण्चानण्च सोऽपि रपरः स्यात् ॥ यदि पुनरृवर्णान्तस्य स्थानिनो रपरत्वमुच्येत । खट्वर्श्यः मालर्श्यः । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । कर्ता हर्ता । किरति

---

(वा.५) उदात्त वगैरे ठिकाणीं काय ?

उदात्त वगैरे जे आदेश होतात ते रपर होत नाहींत असा निषेध सांगितला पाहिजे. उदा० कृतिः, हृतिः, कृतम्, हृतम्, प्रकृतम्, प्रहृतम्, नॄः पाहि. एकंदरींत या सूत्रामध्यें अण् हा शब्द घातला पाहिजे.

(वा.६) ऋकार आणि दुसरा वर्ण या दोघांचे स्थानीं होणारा जो एक आदेश तो रपर होतो असें म्हणावें; उदा० खट्वा ऋश्यः खट्वर्श्यः, माला ऋश्यः मालर्श्यः.

पण येथें रपर न होण्याचें कारण काय ?

कारण असें की ऋकाराचे स्थानीं होणारा अण् आदेश रपर होतो असें सूत्रानें सांगितलें आहे आणि खट्वर्श्यः वगैरे ठिकाणीं झालेला जो एक आदेश अण् हा एका अकाराचे स्थानींच झालेला नाहीं, तर हा ऋकार आणि दुसरा खट्वाशब्दांतील आकार या दोन वर्णांचे स्थानीं झाला आहे.

अवयवग्रहणात्सिद्धम् म्ह. 'आ ऋ' या स्थानींमधील ऋकार असल्यामुळें आदेश रपर होण्याला कांहीं हरकत दिसत नाहीं. जसें 'उडीद खाऊं नयेत' असें म्हटलें असतां उडीद व मूग मिसळून केलेले लाडू वगैरे पदार्थही त्यांत उडीद आहेत म्हणून खात नाहींत.

(वा.७) 'आ ऋ' या स्थानीपैकीं एक भाग ऋकार असल्यामुळें त्या स्थानीला होणारा आदेश रपर होतो असें म्हटलें तर ज्या आदेशापैकीं एक भाग अण् आहे तो आदेशही रपर होऊं लागेल; त्याचा निषेध सांगितला पाहिजे; उदा० होतापोतारौ. जसा खट्वर्श्यः येथें ऋकार आणि दुसरा वर्ण खट्वा यांतील आकार या दोघांचे स्थानीं मिळून होणारा असा अण् आदेश रपर होतो तसाच होतापोतारौ येथें होतृ यांतील ऋकाराचे स्थानीं होणारा जो अण् आणि दुसरा वर्ण नकार मिळून होणारा आन् हा आदेश (६।३।२५) तोही रपर होऊं लागेल.

आतां जर ऋकारान्ताचे स्थानीं होणारा जो अण् आदेश तो रपर होतो असा सूत्राचा अर्थ करून खट्वर्श्यः, मालर्श्यः हीं उदारणें साधावीं तर तें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ केला तर कर्ता, हर्ता, किरति, गिरति इत्यादि ठिकाणीं नुसत्या एकट्या ऋकाराला आदेश

---

४. खट्वा ऋश्यः येथें 'आ व ऋ' हा दोन वर्णांचा समुदाय ऋकारांत असल्यामुळें तेथें त्या दोहोंच्या स्थानीं होणारा एकादेश गुण (६।१।८७) अ हा रपर होईल.

गिरति । ऋवर्णान्तस्येत्युच्यते न चैतदृवर्णान्तम् । ननु चैतदपि व्यपदेशिवद्भावेन ऋवर्णान्तम् । अर्थवता व्यपदेशिवद्भावो न चैषोऽर्थवान् । तस्मान्नैवं शक्यम् ॥ न चेदेवमुपसंख्यानं कर्तव्यम् । इह च रपरत्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः । मातुः पितुरिति ॥ उभयं न वक्तव्यम् । कथम् । इह यो द्वयोः षष्ठीनिर्दिष्टयोः प्रसङ्गे भवति लभतेऽसावन्यतरतो व्यपदेशम् । तद्यथा । देवदत्तस्य पुत्रः देवदत्तायाः पुत्र इति ॥ कथं मातुः पितुरिति । अस्त्वत्र रपरत्वम् । का रूपसिद्धिः । रात्सस्य [८.२.२४] इति सकारस्य लोपो रेफस्य विसर्जनीयः । नैवं शक्यम् । इह हि मातुः करोति पितुः करोतीत्यप्रत्ययविसर्जनीयस्येति षत्वं प्रसज्येत । अप्रत्ययविसर्जनीयस्येत्युच्यते

---

होत असल्यामुळें तेथें रपर होणार नाहीं. कारण ऋकारान्ताचे स्थानीं होणारा आदेश रपर होतो असें म्हटलें आहे. येथें तर नुसत्या ऋकारालाच आदेश होत नाहे. ऋ ह्या एका वर्णाला कांहीं ऋकारान्त असें म्हणतां येत नाहीं.

पण व्यपदेशिवद्भाव[५] घेतला म्हणजे एकट्या ऋकाराला ऋकारान्त असें म्हणतां येईल.(तसें म्हणतां येणार नाहीं कारण) व्यपदेशिवद्भाव अर्थवान् अशा शब्दस्वरूपासंबंधानें घेतां येतो. आणि कर्ता, हर्ता, वगैरे उदाहरणांमध्यें कृ, हृ, यांतील ऋकाराला कांहींच अर्थ नाहीं. एकंदरींत 'ऋकारान्ताला होणार अण् रपर होतो' असा अर्थ करणें शक्य नाहीं; आणि तसा अर्थ केला नाहीं तर खट्वर्श्यः वगैरे उदाहरणांमध्यें आदेश रपर होण्याकरितां 'स्थानीपैकीं एक भाग ऋ असला तरी येथें आदेश रपर करावा' असें वचन केलें पाहिजे. आणि मातुः, पितुः येथें 'ऋत उत्' (६।१।१११) यानें होणारा उकार एकादेश 'ऋ अ' या स्थानीपैकीं एक भाग ऋकार आहे म्हणून रपर होऊं लागेल त्याचा निषेधही केला पाहिजे.

हे दोन्ही करावयास नकोत.

तर मग खट्वर्श्यः येथें आदेश रपर कसा होईल ?

असा होईल की ज्या सूत्रामध्यें दोन स्थानींचा प्रत्येकीं निरनिराळीं षष्ठीप्रत्यय लावून पृथक् निर्देश करून त्या दोहोंना मिळून एक आदेश सांगितला असतो तेथें त्या दोन स्थानींपैकीं कोणत्याही स्थानीचा तो आदेश आहे असें म्हणतां येतें. जसें लोकामध्यें देवदत्त बाप आणि देवदत्ता आई या दोघांचा जो मुलगा त्याला 'देवदत्ताचा मुलगा' असेंही म्हणतात आणि 'देवदत्तेचा मुलगा' असेंही म्हणतात. (त्याप्रमाणें खट्वर्श्यः येथें आद्गुणः (६।१।८७) यानें होणारा अ हा आदेश ऋकाराचे स्थानीं होणारा आहे असें सहजच म्हणतां येतें. तेव्हां रपर होण्याला कांहींच अडचण नाहीं.)

तर मग मातुः, पितुः येथेंही 'ऋत उत्' (६।१।१११) यानें होणारा उकार एकादेश रपर होऊं लागेल.

रपर झाला तरी होऊं दे. कांहीं हरकत नाहीं.

मग मातुः, पितुः हीं रूपें कशीं साधतील ?

रपर झाला तरी त्या रेफाच्या पुढील सकारांचा 'रात्सस्य' (८।२।२४) यानें लोप होईल आणि त्या रेफाला विसर्ग (८।३।१५) केला म्हणजे तीं रूपें साधतील.

अशा तऱ्हेनें रूपें साधणें शक्य नाहीं. तशीं साधलीं तर मातुः करोति, पितुः करोति येथें त्या विसर्गाला 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' (८।३।४१) यानें षत्व होऊं लागेल.

पण त्या सूत्रामध्यें 'प्रत्ययाचा विसर्ग नसावा' असें म्हटलें आहे नां ? आणि हा विसर्ग

---

५. व्यपदेशिवद्भाव याचा अर्थ मागें पाहा (१।१ २१). पृ. पं.

प्रत्ययविसर्जनीयश्चायम्। लुप्यतेऽत्र प्रत्ययो रात्सस्येति। एवं तर्हि भ्रातुष्पुत्रग्रहणं ज्ञापकमेकादेशनिमित्तात्षत्वप्रतिषेधस्य। यदयं कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्यो नैकादेशनिमित्तात्षत्वं भवतीति ॥

किं पुनरयं पूर्वान्त आहोस्वित्परादिराहोस्विदभक्तः। कथं चायं पूर्वान्तः स्यात्कथं वा परादिः कथं वाभक्तः। यद्यन्त इति वर्तते ततः पूर्वान्तः। अथादिरिति वर्तते ततः परादिः। अथोभयं निवृत्तं ततोऽभक्तः। कश्चात्र विशेषः।

**अभक्ते दीर्घलत्वयगभ्यस्तस्वरहलादिशेषविसर्जनीयप्रतिषेधः प्रत्ययाव्यवस्था च ॥८॥**

यद्यभक्तो दीर्घत्वं न प्राप्नोति। गीः पूः। रेफवकारान्तस्य धातोरिति दीर्घत्वं न प्राप्नोति। किं पुनः कारणं रेफवकाराभ्यां धातुर्विशेष्यते न पुनः पदं विशेष्यते रेफवकारान्तस्य पदस्येति। नैवं शक्यम्।

---

तर प्रत्ययाचा आहे.

ज्या सकाराला रुत्व व विसर्ग होऊन प्रत्ययाचा विसर्ग होणार त्या सकाराचाच मुळीं उकारादेश रपर झाल्यामुळें 'रात्सस्य' (८।२।२४) यानें लोप झाला आहे.

तर मग 'एकादेश सांगणाऱ्या शास्त्रानें केलेला जो वर्ण त्याच्यापुढील विसर्गाला षत्व होत नाहीं' अशाविषयीं भ्रातुष्पुत्रशब्द ज्ञापक घ्यावा म्हणजे तो दोष येणार नाहीं. तें असें की ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि कस्कादि गणामध्यें (८।३।४८) भ्रातुष्पुत्रशब्दाचा पाठ षत्वाकरतां करतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'एकादेश सांगणाऱ्या शास्त्रानें केलेला जो वर्ण त्याच्यापुढील विसर्गाला षत्व होत नाहीं'.

काय पण हा जो प्रकृतसूत्रानें अण् आदेशाच्यापुढें लावला जाणारा रेफ तो पूर्वाचा अंत्यावयव होतो किंवा पराचा आद्यावयव होतो अथवा दोघांचाही अवयव न होतां मध्यें अलगच राहतो?

(हा प्रश्न कसा संभवतो?) पूर्वाचा अंत्यावयव कसा होईल? पराचा आद्यावयव कसा होईल? 'तसा अलगच मध्यें राहतो' असें कसें म्हणतां येईल?

जर ह्या प्रकृतसूत्रामध्यें 'आद्यन्तौ०' या सूत्रांतून अंतशब्दाची अनुवृत्ति आली तर हा रेफ पूर्वाचा अंत्यावयव होतो असें म्हणतां येईल. तसेंच आदिशब्दाची अनुवृत्ति आली तर हा रेफ पराचा आद्यावयव होतो असें म्हणतां येईल. आणि दोन्ही शब्दांची अनुवृत्ति आली नाहीं म्हणजे 'मध्यें अलग राहतो' असें म्हणतां येईल.

मग ह्या तीन पक्षांमध्यें फरक काय होतो?

(वा.८) जर हा रेफ कोणाचाच अवयव न होतां अलगच राहिला तर दीर्घ होणार नाहीं. रेफान्त आणि वकारान्त धातूंमधील उपधासंज्ञक इकाला सांगितलेला जो दीर्घ (८।२।७२) तो गीः[६], पूः येथें होणार नाहीं.

पण त्या सूत्रामध्यें रेफान्त आणि वकारान्त हें धातूचेंच विशेषण काय म्हणून करावें? 'रेफान्त आणि वकारान्त जें पद' असें पदाचें विशेषण कां करीत नाहीं? (पदाचें विशेषण केलें म्हणजे गीः, पूः येथें दोष येणार नाहीं.)

पदाचें विशेषण करणें शक्य नाहीं. तसें

---

६. गॄधातूहून क्विप् प्रत्यय केल्यानंतर त्या ऋकाराला 'ऋत इद्धातोः' (७।१।१००) यानें ह्रस्व इकार आदेश होतो तो प्रकृतसूत्रानें रपर होऊन गिर् रेफान्त धातु होतो, म्हणून त्याला दीर्घ होत असतो. रेफ अलग राहिला तर धातु 'गि' असा इकारान्तच होईल आणि दीर्घ होणार नाहीं. पॄ धातूहून क्विप् प्रत्यय केल्यानंतर 'उदोष्ठय०' (७।१।१०२) यानें ऋकाराला ऱ्हस्व उकार आदेश होतो तो रपर होऊन पुर् असा रेफान्त धातु होतो, तेथेंही तसेंच समजावें.

इहापि प्रसज्येत । अग्निर्वायुरिति । एवं तर्हि रेफवकाराभ्यां पदं विशेषयिष्यामो धातुनेकम् रेफवकारान्तस्य पदस्येको धातोरिति । एवमपि प्रियं ग्रामणि कुलमस्य प्रियग्रामाणिः प्रियसेनानिः अत्रापि प्राप्नोति। तस्माद्धातुरेव विशेष्यते धातौ च विशेष्यमाण इह दीर्घत्वं न प्राप्नोति । गीः पूः । दीर्घ ॥ लत्व । लत्वं च न सिध्यति । निजेगिल्यते । ग्रो यङि [८.२.२०] इति लत्वं न प्राप्नोति ॥ नैष दोषः । ग्र इत्यनन्तरयोगैषा षष्ठी।एवमपि स्वर्जेगिल्यत इत्यत्रापि प्राप्नोति । एवं तर्हि यङानन्तर्यं विशेषयिष्यामः। अथवा ग्र इति पञ्चमी। लत्व ॥ यक्स्वर । यक्स्वरश्च न सिध्यति । गीर्यते स्वयमेव । पूर्यते स्वयमेव । अचः कर्तृयकि [६.१.१९५] इत्येष स्वरो न प्राप्नोति रेफेण व्यवहितत्वात् ॥ नैष दोषः । स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमा-

केलें तर अग्निः[७], वायुः, येथेंही इकाला दीर्घ होऊं लागेल.

तर मग रेफान्त आणि वकारान्त हें पदाचें विशेषण असूं दे. धातु हें इकाचें विशेषण करून धातूचा अवयव जो इक् त्याला दीर्घ होतो असें म्हटलें म्हणजे अग्निः, वायुः, येथें दीर्घ होणार नाहीं.

अग्निः, वायुः, येथें दोष आला नाहीं तरी प्रिय आहे ग्रामणि म्ह. गांवाला नेणारें कुळ ज्याला तो प्रियग्रामणिः येथें, तसेंच प्रियसेनानिः येथें दीर्घ होऊं लागेल असा दोष येतोच. (कारण येथें इकार हा नीधातूचा अवयव आहे.) तेव्हां रेफान्त आणि वकारान्त हें विशेषण धातूचेंच केलें पाहिजे. आणि तसें तें धातूचें विशेषण केलें म्हणजे गीः, पूः, येथें दीर्घ होणार नाहीं, हा दोष कायमच राहतो. तसेंच प्रकृतसूत्रानें अणाला जोडलेला रेफ अलग राहिला तर लत्व सिद्ध होणार नाहीं. निजेगिल्यते येथें 'ग्रो यङि' (८।२।२०) यानें त्या रेफाला लत्व होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'ग्रः' ही षष्ठी अनंतर म्ह. जवळचा या अर्थाकडे लागणारी आहे. तेव्हां गॄधातूचा अवयव जो रेफ असा अर्थ न होतां 'गॄधातूच्या जवळ असलेला जो रेफ त्याला लत्व होतें' असा अर्थ होईल.

तसा अर्थ केला तरी दुसरीकडे दोष येतो. स्वर्जेगिल्यते येथें गॄधातूच्या जवळ असलेला जो स्वर् या अव्ययांतील रेफ त्यालाही लत्व होऊं लागेल.

तर मग गॄधातूच्या जवळचा जो रेफ त्याला यङि हें विशेषण देतो. (स्वर्जेगिल्यते येथें स्वर् या अव्ययांतील रेफाला यङ् पुढें नसल्यामुळें लत्व होणार नाहीं.) अथवा 'ग्रो यङि' या सूत्रामध्यें ग्रः ही षष्ठी न घेतां पंचमी घ्यावी. (म्हणजे 'गॄधातूहून पर जो रेफ त्याला यङ् पुढें असतांना लत्व होतें' असा अर्थ केला म्हणजे कोठेंच दोष येत नाहीं.) तसेंच प्रकृतसूत्रानें अणाला जोडला जाणारा रेफ अलग राहिला तर यक्स्वर सिद्ध होणार नाहीं. गीर्यते स्वयमेव, पूर्यते स्वयमेव या उदाहरणांमध्यें 'अचः कर्तृयकि' (६।१।१९५) या सूत्रानें यक् पुढें असतांना धातूला सांगितलेला उदात्त स्वर होणार नाहीं. कारण धातु आणि यक् प्रत्यय यांमध्यें रेफानें व्यवधान होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत्' म्हणजे स्वरविधि कर्तव्य असतांना व्यंजन हें नसल्यासारखें समजावें, या परिभाषेनें तेथें 'रेफानें व्यवधान

७. अग्निशब्दाहून प्रथमा एकवचन सुप्रत्यय करून त्याला रुत्व (८।२।६६) केल्यानंतर 'अग्निर्' या रेफान्त पदांतील इकाला दीर्घ होऊन नंतर विसर्ग होईल आणि अग्नीः असें भलतेंच रूप होईल.

८. गॄधातूहून यङ् प्रत्यय करून ॠकाराला इकार आदेश (७।१।१००) होतो तो रपर होऊन गिर् असें झालें. हा रेफ अलग असल्यामुळें गॄधातूचा अवयव नव्हे म्हणून त्या रेफाला लत्व (८।२।२०) होणार नाहीं.

नवदिति नास्ति व्यवधानम् । यक्स्वर ॥ अभ्यस्तस्वर । अभ्यस्तस्वरश्च न सिध्यति। मा हि स्म ते पिपरुः । मा हि स्म ते बिभरुः । अभ्यस्तानामादिरुदात्तो भवत्यजादौ लसार्वधातुक इत्येष स्वरो न प्राप्नोति रेफेण व्यवहितत्वात् ॥ नैष दोषः । स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवदिति नास्ति व्यवधानम् । अभ्यस्तस्वर ॥ हलादिशेष । हलादिशेषश्च न सिध्यति । वव्रृते वव्रृधे । अभ्यासस्येति हलादिशेषो न प्राप्नोति । हलादिशेष ॥ विसर्जनीय । विसर्जनीयस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । नार्कुटः नार्पत्यः । खरवसानयोर्विसर्जनीयः [८.३.१५] इति विसर्जनीयः प्राप्नोति । विसर्जनीय ॥ प्रत्ययाव्यवस्था च । प्रत्यये व्यवस्था न प्रकल्पते । किरतः गिरतः । रेफोऽप्यभक्तः प्रत्ययोऽपि तत्र व्यवस्था न प्रकल्पते ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

पूर्वान्ते वेवधारणं विसर्जनीय-

---

नाहीं' असें समजतां येईल. तसेंच प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ अलग राहिला तर अभ्यस्तस्वर सिद्ध होणार नाहीं. 'अजादि लसार्वधातुक पुढें असतांना अभ्यस्तांचा आदि उदात्त होतो' (६।२।८९) असा जो स्वर सांगितला आहे तो 'मा हि स्म ते पिपरुः'[९] 'मा हि स्म ते बिभरुः' येथें होणार नाहीं. कारण अभ्यस्त आणि पुढील अजादि लसार्वधातुक उस् हा प्रत्यय यांमध्यें रेफानें व्यवधान होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत्' या परिभाषेनें तेथें 'रेफानें व्यवधान नाहीं' असें समजतां येईल. तसेंच प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ अलग राहिला तर त्यासंबंधानें 'हलादिः शेषः' (७।४।६०) याची प्रवृत्ति होणार नाहीं. 'अभ्यासांतील फक्त आदि हल् तेवढा राहतो आणि इतर हलांचा लोप होतो' असा जो त्या सूत्रानें वव्रृते, वव्रृधे, येथें प्रकृतसूत्रानें जोडलेल्या रेफाला लोप होत असतो तो होणार नाहीं.[१०] तसेंच प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ अलग राहिला तर विसर्गाचा निषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर नार्कुटः,[११] नार्पत्यः, येथें त्या 'रेफाला खरवसानयोर्विसर्जनीयः' (८।३।१५) या सूत्रानें विसर्ग होऊं लागेल. तसेंच प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ अलग राहिला तर 'प्रत्ययव्यवस्था च' म्ह. विकरणप्रत्ययाची व्यवस्था लागणार नाहीं. किरतः, गिरतः, येथें प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ हाही अलगच राहणार, आणि मध्यें होणारा श हा विकरणप्रत्यय(३।१।७७)ही अलगच राहणार. तेव्हां त्या दोहोंमध्यें धातूच्या जवळ कोण आणि त्याच्या पलीकडे कोण ही व्यवस्था निश्चित होणार नाहीं. कारण दोघेही सारखेच पर करावयाचे आहेत.

असे जर दोष येतात तर मग प्रकृत सूत्रानें जोडला जाणारा रेफ पूर्वाचा अंत्यावयव आहे असें समजूं.

---

९. पृ धातूहून लङ्, प्रथमपुरुष एकवचन, झिप्रत्यय, त्याला जुस् आदेश (३।४।१०८), शप्, श्लु, द्वित्व, अभ्यासाला इत्व (७।४।७७) व जुसि च (७।३।८३) यानें गुण, हीं कार्यें येथें झालीं आहेत. मा याचा योग असल्यामुळें अट् आगम झाला नाहीं (६।४।७४). येथें पिपर् याला अभ्यस्तसंज्ञा (६।१।५) झाली आहे. रेफ जर अलग राहील तर 'पिप' हें अभ्यस्त समजलें जाईल. याप्रमाणेंच बिभरुः येथें समजावें.

१० कारण तो रेफ अलग राहिला असल्यामुळें 'तो अभ्यासांतील रेफ आहे' असें म्हणतां येत नाहीं.

११ नृशब्दाचा कुटीशब्दाशीं षष्ठीतत्पुरुष करून पुढें 'तत्र भवः' (४।३।५३) यानें अण् प्रत्यय झाला आहे. नृपतिशब्दाहून ण्य प्रत्यय (४।१।८५) झाला आहे. नृ शब्दाच्या पुढील षष्ठीप्रत्यय समासामुळें लुप्त झाला आहे, त्याला प्रत्ययलक्षण (१।१।६२) करून 'सुप्तिङन्तं०' (१।४।१४) यानें पदसंज्ञा नार् याला होते. रेफ जरी अलग आहे तरी सुप् प्रत्यय ज्याहून केला तदादिसमुदायाला ती सांगितली आहे.

प्रतिषेधो यक्स्वरश्च ॥९॥

यदि पूर्वान्तो रोरवधारणं कर्तव्यम् । रोः सुपि [८.३.१६] । रोरेव सुपि नान्यस्य रेफस्य । सर्पिष्षु धनुष्षु । इह मा भूत् । गीर्षु पूर्षु ॥ परादावपि सत्यवधारणं कर्तव्यं चतुर्ष्वित्येवमर्थम् ॥ विसर्जनीयप्रतिषेधः । विसर्जनीयस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । नार्कुटः नार्पत्यः । खरवसानयोर्विसर्जनीयः[८.३.१५]इति विसर्जनीयः प्राप्नोति ॥ परादावपि विसर्जनीयस्य प्रतिषेधो वक्तव्यो नार्कल्पिरित्येवमर्थम् । कल्पिपदसंघातभक्तोऽसौ नोत्सहतेऽवयवस्य पदान्ततां विहन्तुमिति कृत्वा विसर्जनीयः प्राप्नोति ॥ यक्स्वरः । यक्स्वरश्च न सिध्यति । गीर्यते स्वयमेव । पूर्यते स्वयमेव । अचः कर्तृयकि [६.१.१९५] इत्येष स्वरो न प्राप्नोति ॥ नैष दोषः । उपदेश इति वर्तते ॥ अथवा

---

(वा.९) जर प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ पूर्वाचा अंत्यावयव होतो असें मानलें तर गीर्षु, पूर्षु येथें त्या रेफाला विसर्ग (८।३।१५) होऊं लागेल तो होऊं नये म्हणून 'रोः सुपि' (८।३।१६) यानें रूच्या संबंधानें विसर्गाचा नियम केला पाहिजे. तो असा की सप्तमी बहुवचन सुप्प्रत्यय पुढें असतांना जर मागील रेफाला विसर्ग प्राप्त झाला तर रूचा जो रेफ असेल त्यालाच करावा; उदा० सर्पिःषु, धनुःषु; म्हणजे गीर्षु येथें होणार नाहीं.

पण प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ पराचा आद्यावयव होतो असें घेतलें तरीही हा नियम केलाच पाहिजे. कारण त्या पक्षीं गीर्षु येथें दोष आला नाहीं तरी चतुर्षु येथें रेफाला विसर्ग होऊं लागेल, असा दोष येतोच. (एकंदरींत 'पूर्वाचा अंत्यावयव होतो' या पक्षावर गीर्षु हा दोष दाखविणें बरोबर नाहीं.) विसर्जनीयप्रतिषेधः, प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ पूर्वाचा अंत्यावयव होतो असें मानलें तर विसर्गाचा निषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर नार्कुटः, नार्पत्यः, येथें त्या रेफाला खरवसानयोर्विसर्जनीयः' (८।३।१५) या सूत्रानें विसर्ग होऊं लागेल.

पण प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ पराचा आद्यावयव होतो असा पक्ष घेतला तरी हा विसर्गाचा निषेध सांगितलाच पाहिजे. कारण, त्या पक्षीं नार्कुटः येथें दोष आला नाहीं तरी नार्कल्पिः येथें रेफाला विसर्ग होऊं लागेल असा दोष येतोच. कारण पराचा म्ह. 'कल्पि' या शब्दस्वरूपाचा आद्यावयव जरी रेफ झाला तरी तो त्यांतील कल्पप्रत्ययाचा अवयव नसल्यामुळें कल्पप्रत्ययाच्या निमित्तानें जो मागील भाग पद असा समजला जातो (१।४।१७) त्या पदाचा तो रेफ अंत्यावयव नव्हे असें म्हणतां येणार नाहीं. (एकंदरींत 'पूर्वाचा अंत्यावयव होतो' या पक्षावर नार्कुटः येथेंही दोष दाखविणें बरोबर नाहीं.)

यक्स्वरः. 'प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ पूर्वाचा अंत्यावयव होतो' असें मानिलें तर यक् स्वर सिद्ध होणार नाहीं. गीर्यते स्वयमेव, पूर्यते स्वयमेव या उदाहरणांमध्यें 'अचः कर्तृयकि' (६।१।१९५) या सूत्रानें अजन्त धातूला सांगितलेला उदात्त स्वर होणार नाहीं. (कारण गीर् हा रेफ पूर्वाचा अंत्यावयव असल्यामुळें धातूच्या शेवटीं अच् नाहीं.)

हा दोष येत नाहीं. कारण 'अचः कर्तृयकि' (६।१।१९५) या सूत्रामध्यें 'तास्यनुदात्तेन्' (६।१।१८६) या सूत्रांतून उपदेशे या पदाची अनुवृत्ति येत आहे (तेव्हा गीर् येथें धातूच्या शेवटीं अच् नसला तरी मूळ उपदेशामध्यें गॄ असा धातूच्या शेवटीं अच् असल्यामुळें स्वर होण्याला कांहीं अडचण नाहीं. एकंदरींत 'रेफ हा पूर्वाचा अंत्यावयव होतो' हा पक्ष निर्दुष्ट आहे असें दिसतें.)

पुनरस्तु परादिः ।

**परादावकारलोपौत्वपुक्प्रतिषेधश्नुङ्युपधाह्रस्वत्वमिटोऽव्यवस्थाभ्यासलोपोऽभ्यस्ततादिस्वरो दीर्घत्वं च ॥१०॥**

यदि परादिरकारलोपः प्रतिषेध्यः । कर्ता हर्ता । अतो लोप आर्धधातुक इत्यकारलोपः प्राप्नोति ॥ नैष दोषः । उपदेश इति वर्तते । यद्युपदेश इति वर्तते धिनुतः कृणुतः अत्र लोपो न प्राप्नोति । नोपदेशग्रहणेन प्रकृतिरभिसंबध्यते । किं तर्हि । आर्धधातुकमभिसंबध्यते । आर्धधातुकोपदेशे यदकारान्तमिति । अकारलोप ॥ औत्व । औत्वं च प्रतिषेध्यम् । चकार जहार । आत औ णलः [७.१.३४] इत्यौत्वं न प्राप्नोति ॥ नैष दोषः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य कस्मान्न भवति । रेफेण व्यवहितत्वात् । औत्व ॥ पुक्प्रतिषेधः । पुक् च प्रतिषेध्यः । कारयति हारयति । आतां पुगिति पुक्प्राप्नोति । पुक्प्रतिषेधः ॥

---

अथवा 'हा रेफ पराचा आद्यावयव होतो' हा पक्ष घेऊं.

(वा.१०) प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ जर पराचा आद्यावयव मानला तर अकाराच्या लोपाचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर कर्ता, हर्ता, येथें रेफ हा पुढील आर्धधातुक प्रत्ययाचा अवयव झाल्यामुळें तो आर्धधातुक प्रत्यय पुढें आहे, म्हणून क व ह यांतील ऱ्हस्व अकाराचा 'अतो लोपः' (६।४।४८) यानें लोप होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण त्या सूत्रामध्यें 'अनुदात्तोपदेश०' (६।४।३७) या सूत्रांतून उपदेशे या पदाची अनुवृत्ति येत आहे (तेव्हां कृ व हृ या धातूंना गुणानें (७।३।८४) झालेला अकार मूळ उपदेशांत नसल्यामुळें त्याचा लोप होणार नाहीं).

पण जर तेथें उपदेशे या पदाची अनुवृत्ति केली तर धिनुतः, कृणुतः, येथें 'धिन्विकृण्व्योर च' (३।१।८०) यानें झालेल्या अकाराचा लोप होणार नाहीं.

उपदेशे याचा धातूशीं संबंध करूं नये, तर आर्धधातुके याच्याशीं करावा. म्हणजे 'आर्धधातुकप्रत्ययाच्या उपदेशीं जें ऱ्हस्व अकारान्त' असा अर्थ होईल. ('धिन्विकृण्व्यो०' यानें धातूला अकार आदेश आणि उ प्रत्यय सांगितला असल्यामुळें उ हा आर्धधातुकप्रत्यय करतांना 'धिन' असें अकारान्त आहेच. तेव्हां तेथें लोप होईल.) तसेंच रेफ हा पराचा आद्यावयव मानला तर औकार आदेशाचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर चकार, जहार, येथें रेफ हा णल् प्रत्ययाचा अवयव झाला असल्यामुळें त्या र या प्रत्ययाला 'आत औ णलः' (७।१।३४) यानें औकार आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. 'निर्दिश्यमानस्यादेशा[12] भवन्ति' या परिभाषेनें र याला औकार आदेश होणार नाहीं. (कारण सूत्रामध्यें णलः असा निर्देश केला आहे. रेफासकट केला नाहीं.)

तर मग सूत्रामध्यें ज्याचा निर्देश केला आहे त्याला, म्ह. रेफाच्या पुढील अकाराला, कां होत नाहीं ?

आकारान्त धातु आणि तो अ हा प्रत्यय यांमध्यें रेफानें व्यवधान होत आहे म्हणून त्याला औकार आदेश होत नाहीं. तसेंच रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर पुगागमाचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर कारयति, हारयति, येथें का व हा या आकारान्त धातूला 'अर्तिह्री०' (७।३।३६) यानें पुक् आगम होऊं लागेल. तसेंच श्नुङ्युपधाह्रस्वत्वम् म्ह.

---

१२. या परिभाषेचा अर्थ मागें पाहा (१।१।४९ टीप ७).

चङ्युपधाह्रस्वत्वम्। चङ्युपधाह्रस्वत्वं च न सिध्यति। अचीकरत् अजीहरत्। णौ चङ्युपधाया ह्रस्वः [७.४.१] इति ह्रस्वत्वं न प्राप्नोति। चङ्युपधाह्रस्वत्वम्॥ इटोऽव्यवस्था। इटश्च व्यवस्था न प्रकल्पते। आस्तरिता निपरिता। इडपि परादी रेफोऽपि। तत्र व्यवस्था न प्रकल्पते। इटोऽव्यवस्था॥ अभ्यासलोपः। अभ्यासलोपश्च वक्तव्यः। ववृते ववृधे। अभ्यासस्येति हलादिशेषो न प्राप्नोति। अभ्यासलोपः॥ अभ्यस्तस्वर। अभ्यस्तस्वरश्च न सिध्यति। मा हि स्म ते पिपरुः। मा हि स्म ते बिभरुः। अभ्यस्तानामादिरुदात्तो भवत्यजादौ लसार्वधातुक इत्येष स्वरो न प्राप्नोति। अभ्यस्तस्वर॥ तादिस्वरः। तादिस्वरश्च न सिध्यति। प्रकर्ता प्रकर्तुम्। प्रहर्ता प्रहर्तुम्। तादौ च निति कृत्यतौ [६.२.५०] इत्येष स्वरो न प्राप्नोति॥ नैष दोषः। उक्तमेतत्। कृदुपदेशे वा ताद्यर्थमिडर्थमिति। तादिस्वरः॥ दीर्घत्वम्। दीर्घत्वं च न सिध्यति। गीः पूः। रेफवका-

---

रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर चङ् प्रत्यय पुढें असतांना उपधेला ऱ्हस्व होणार नाहीं; उदा० अचीकरत्, अजीहरत्, येथें 'णौ चङ्युपधाया ऱ्हस्वः' (७।४।१) यानें जो कार्, हार्, यांच्या उपधेला म्ह. आकाराला ऱ्हस्व होत असतो तो होणार नाहीं. इटोऽव्यवस्था. रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर इट् या आगमाची व्यवस्था लागणार नाहीं. आस्तरिता, निपरिता येथें प्रकृतसूत्रानें जोडला जाणारा रेफ हाही पुढील प्रत्ययाचा आद्यावयव होणार आणि इट् आगम (७।२।३५) हाही पुढील प्रत्ययाचा आद्यावयव होणार. तेव्हां त्या दोहोंमध्यें प्रत्ययाच्या जवळ कोण आणि त्याच्या अलीकडे कोण होणार ही व्यवस्था निश्चित होणार नाहीं. कारण दोघेही सारखेच पराचे आद्यावयव करावयाचे आहेत. अभ्यासलोपः. रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर अभ्यासांतील त्या रेफाचा लोप होतो असें सांगितलें पाहिजे. कारण ववृते, ववृधे, येथें पराचा आद्यावयव म्हणून झालेल्या रेफाची अभ्यासामध्यें गणना होत नसल्यामुळें 'हलादिः शेषः' (७।४।६०) यानें त्या रेफाचा लोप होणार नाहीं. अभ्यस्त स्वर. रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर अभ्यस्त स्वर सिद्ध होणार नाहीं. अजादि लसार्वधातुक पुढें असतांना अभ्यस्तांचा आदि उदात्त होतो (६।१।८९) असा जो अभ्यस्ताला स्वर सांगितला आहे तो 'मा हि स्म ते पिपरुः' 'मा हि स्म ते बिभरुः' येथें होणार नाहीं. (कारण रेफ हा पराचा आद्यावयव झाल्यामुळें रुस् एवढा प्रत्यय होतो आणि तो तर अजादि नाहीं.) तादि स्वर. रेफ पराचा आद्यावयव झाला तर तादि स्वर सिद्ध होणार नाहीं. प्रकर्ता, प्रकर्तुम्, येथें 'तादौ च निति कृत्यतौ' (६।२।५०) यानें तकारादि कृत्प्रत्यय पुढें केला असतां प्र वगैरे गतिसंज्ञकाला सांगितलेला प्रकृतिस्वर होणार नाहीं. (कारण कृत्प्रत्यय रेफादि होत आहे.)

हा दोष येत नाहीं. कारण वार्तिककारांनीं 'तादौच०' (६।२।५०) या सूत्रावर 'कृदुपदेशे वा ताद्यर्थमिडर्थम्' असें सांगितलेंच आहे. (तेव्हां रेफ पराचा आद्यावयव झाल्यामुळें जरी प्रत्यय रेफादि झाला तरी तो मूळ उपदेशांत तकारादि असल्यामुळें स्वर होईल.) दीर्घ रेफ हा पराचा आद्यावयव झाला तर दीर्घ होणार नाहीं. रेफान्त आणि वकारान्त धातूंमधील उपधासंज्ञक इकाला सांगितलेला जो दीर्घ (८।२।७६) तो गीः, पूः, येथें होणार

---

१३. कारण रेफ हा पुढील णिच्प्रत्ययाचा आद्यावयव झाला असल्यामुळें मागील धातूच्या शेवटीं आकार आहे; धातूच्या उपधेला नाहीं.

रान्तस्य धातोरिति दीर्घत्वं न प्राप्नोति ॥

## अलोऽन्त्यस्य ॥ १.१.५२ ॥

किमिदमल्ग्रहणमन्त्यविशेषणमाहोस्विदादेशविशेषणम् । किं चातः । यद्यन्तविशेषणमादेशोऽविशेषितो भवति । तत्र को दोषः । अनेकाल्प्यादेशोऽन्त्यस्य प्रसज्येत ॥ यदि पुनरलन्त्यस्येत्युच्येत । तत्रायमप्यर्थोऽनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इत्येतन्न वक्तव्यं भवति । इदं नियमार्थं भविष्यति । अलेवान्तस्य भवति नान्य इति । एवमप्यन्त्योऽविशेषितो भवति । तत्र को दोषः । वाक्यस्यापि पदस्याप्यन्त्यस्य प्रसज्येत ॥ यदि खल्वप्येषोऽभिप्रायस्तन्न क्रियेतेत्यन्त्यविशेषणेऽपि सति तन्न करिष्यते । कथम् । ङिच्चालोऽन्त्यस्येत्येतन्नियमार्थं भविष्यति । ङिदेवानेकालन्त्यस्य भवति नान्य इति ॥ किमर्थं पुनरिदमुच्यते ।

---

नाहीं. (कारण धातु रेफान्त नाहीं.)

(सू.५२) या सूत्रामध्यें 'अलः' असें जें म्हटलें आहे तें षष्ठीचें एकवचन घेऊन अंत्यस्य याचें विशेषण करावयाचें किंवा प्रथमेचें बहुवचन घेऊन आदेशाला विशेषण करावयाचें ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

जर अंत्यस्य याचें विशेषण केलें तर आदेशाचें तें विशेषण नाहीं असें होईल.

मग तसें झालें तर दोष कोणता ?

दोष असा की आदेश[1] जरी अनेकाल् असला तरी तो अंत्य अलाला[2] होईल. (तो न होण्याकरतां 'अनेकाल् शित्सर्वस्य' (१।१।५५) या सूत्रामध्यें 'अनेकाल्' हा शब्द ठेवावा लागेल.) पण येथें अलः हें आदेशाचें विशेषण करून अल्‌रूपी जो आदेश तो अंत्याला होतो असें म्हटलें म्हणजे 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्रामध्यें 'अनेकाल्' शब्द ठेवावयास नको हीही गोष्ट सिद्ध होते. कारण येथें अल् हें आदेशाचें विशेषण असल्यामुळें 'अल्‌रूपी जो आदेश तोच अंत्याला होतो, त्याशिवाय दुसरा म्ह. अनेकाल् जो आदेश तो अंत्याला होणार नाहीं' असा नियम अर्थातच सिद्ध होतो.

असें होईल खरें पण अंत्याला 'अल्' हें विशेषण नाहींसें होईल त्याची वाट काय ?

अलः हें अंत्याचें विशेषण झालें नाहीं तर दोष कोणता ?

शेवटच्या वाक्याला किंवा शेवटच्या पदाला[3] ही आदेश होऊं लागेल (तेव्हां 'अलः' हें अंत्याचें विशेषण केलेंच पाहिजे). शिवाय अलः हें आदेशाचें विशेषण करण्यांत जो कांहीं फायदा वाटत असेल की 'अनेकाल् शित्सर्वस्य' या सूत्रामध्यें अनेकाल् हा शब्द ठेवावयास नको' तो फायदा 'अलः' हें अंत्याचें विशेषण केलें तरी मिळवतां येतो.

तो कसा ?

आदेशाला अलः हें विशेषण नसल्यामुळें जर प्रकृतसूत्रानें अनेकाल् आदेश सुद्धां स्थानीच्या अंत्य अलाला होईल तर अनङ् (७।१।९३) वगैरे अनेकाल् आदेश स्थानीच्या अंत्य अलाला होण्याकरतां जें 'ङिच्च' (१।१।५३) हें पुढें सूत्र केलें आहे तें व्यर्थ होऊन नियमार्थ होईल. तो नियम असा की 'अनेकाल् आदेश जर स्थानीच्या अंत्य अलाला करावयाचा झाला तर त्यांपैकीं ङित् जो

---

१. षष्ठीप्रत्ययाचा निर्देश करून जो आदेश सांगितला असेल तो ज्याला सांगितला असेल त्या सर्वांचे स्थानीं न करतां फक्त त्यांतील शेवटच्या वर्णाला करावा.

२. रामैः येथें भिस्प्रत्ययाला जो ऐस् आदेश होतो (७।१।९) तो भिस् यांतील अंत्य अलाला म्ह. शेवटच्या सकारालाच होईल. आणि रामैः हें रूप साधणार नाहीं.

३. स्वनडुद्भ्याम् येथें स्वनडुह्शब्दांतील शेवटच्या अलाला म्ह. हकाराला दकार आदेश (८।२।७२) होतो तो स्वनडुह्शब्दांतील शेवटच्या पदाला म्ह. अनडुह् याला होऊं लागेल.

**अलोऽन्त्यस्येति स्थाने विज्ञात-स्यानुसंहारः ॥१॥**

अलोऽन्त्यस्येत्युच्यते स्थाने विज्ञात-स्यानुसंहारः क्रियते स्थाने प्रसक्तस्य ॥

**इतरथा ह्यनिष्टप्रसङ्गः ॥२॥**

इतरथा ह्यनिष्टं प्रसज्येत । टित्कि-न्मितोऽप्यन्त्यस्य स्युः ॥ यदि पुनरयं योगशेषो विज्ञायेत ।

**योगशेषे च ॥३॥**

किम्। अनिष्टं प्रसज्येत। टित्किन्मि-तोऽप्यन्त्यस्य स्युः ॥ तस्मात्सुष्ठूच्यते-ऽलोऽन्त्यस्येति स्थाने विज्ञातस्यानुसंहार इतरथा ह्यनिष्टप्रसङ्ग इति ॥

**ङिच्च ॥१.१.५३॥**

तातङन्त्यस्य स्थाने कस्मान्न भवति। ङिच्चालोऽन्त्यस्येति प्राप्नोति ।

---

आदेश असेल तोच करावा, इतर अने-काल् आदेश अंत्य अलाला करूं नयेत'. तेव्हां ङिताशिवाय इतर अनेकाल् आदेश अर्थातच ज्याला सांगितले असतील त्याला म्ह. सर्वस्थानीला होतील. म्हणून 'अनेकाल् शित्सर्वस्य' या सूत्रामध्यें अनेकाल् हा शब्द ठेवावयास नको.

आतां हें सूत्र कोणत्या कार्यांकरतां केलें आहे ?

(वा.१) अंत्य अलाला करावा असें जें येथें म्हटलें आहे तें 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) या परिभाषेनें षष्ठीचा स्थानाशीं संबंध जोड-ल्यामुळें जो एखाद्या शब्दाच्या स्थानीं आदेश प्रसक्त होतो त्याचाच अनुसंहार आहे, म्ह. तो आदेश त्या शब्दाच्या शेवटच्या अलाचे स्थानीं करावा.

(वा.२) 'स्थानाशीं संबंध जोडलेल्या षष्ठीचे ठिकाणींच हें सूत्र प्रवृत्त होतें' असें मानलें नाहीं तर अनिष्ट प्राप्त होईल; म्ह. टित्, कित् आणि मित् जे आगम ते देखील ज्याला सांगितले असतील त्याच्या अंत्य अलाला होतील.

तसेंच हें प्रकृतसूत्र 'षष्ठी स्थानेयोगा' या सूत्राचें परिशिष्ट आहे असें मानलें तर—

(वा.३) तर काय ?

अनिष्ट प्राप्त होईल म्ह. टित्, कित् आणि मित् जे आगम ते देखील ज्याला सांगितलें असतील त्याच्या अंत्य अलाला होतील. तेव्हां 'अलोन्त्यस्येति स्थाने विज्ञातस्यानुसंहारः इत-रथा ह्यनिष्टप्रसङ्गः' असें जें वार्तिककारांनीं सांगितलें आहे तें बरोबर आहे.

(सू.५३) तु आणि हि यांना सांगितलेला जो तातङ् आदेश (७।१।३५) तो त्यांच्या

---

४. अभूत् इत्यादि ठिकाणीं धातूला सांगितलेला अट् आगम (६।४।७१) भू याचा आद्यावयव न होतां भू यांतील अंत्य अलाचा म्ह. ऊकाराचा आद्यावयव होऊं लागेल.

५. 'षष्ठी स्थानेयोगा' येथें षष्ठीच्या संबंधानें दोन गोष्टी सांगावयाच्या. एक 'षष्ठीचा स्थानांशीं संबंध जोडणें' आणि दुसरी 'अंत्य अलाकडे षष्ठीचा उप-योग करणें.' त्यांपैकी पहिली तेथें सांगितली. दुसरी सांगावयाची राहिली ती येथें सांगितली. हा परि-शेषपक्ष होय. अनुसंहारपक्ष म्हणजे 'षष्ठीच्या संबंधानें एकच गोष्ट सांगावयाची ती पूर्वी सांगितली, त्या ठिकाणीं सांगितलेला जो स्थानाशीं संबंध त्याच्यासंबंधानें 'त्या संबंधाचा अंत्य अलाकडे उप-योग करावा' ही गोष्ट येथें सांगितली' हा होय. अनुसंहारपक्षीं दोहोंच्यासंबंधानें दोन गोष्टी सांगि-तल्या जातात त्यापेक्षां 'एकाच्याच संबंधानें दोन गोष्टी सांगणें' या परिशेषपक्षांत लाघव आहे. असें जरी लाघव आहे तरी त्या पक्षीं दोष येतो. कारण एकाच्या संबंधानें ज्या दोन गोष्टी सांगितल्या त्या-पैकीं एखाद्या ठिकाणीं एखादी घेतली नाहीं तरी तेथें दुसरी घेण्याला हरकत नसते. त्यामुळें टित् वगैरे आगम हे अंत्य अलाला होऊं लागतील. अनुसंहार-पक्षीं हा दोष येत नाहीं. कारण आगम सांगितले आहेत त्या ठिकाणीं षष्ठीचा स्थानाशीं संबंध जोडला नाहीं. म्हणजे अर्थातच 'त्या संबंधाचा अंत्य अला-कडे उपयोग करणें' ही गोष्ट घेतां येत नाहीं.

१. षष्ठीप्रत्ययाचा निर्देश करून जो ङित् आदेश सांगितला असेल तो ज्याला सांगितला असेल त्या सर्वांचें स्थानीं न करतां फक्त त्यांतील शेवटच्या वर्णाला करावा.

**तातङि ङित्करणस्य सावकाशत्वाद्विप्रतिषेधात्सर्वादेशः ॥१॥**

तातङि ङित्करणं सावकाशम् । कोऽवकाशः । गुणवृद्धिप्रतिषेधार्थो ङकारः। तातङि ङित्करणस्य सावकाशत्वाद्विप्रतिषेधात्सर्वादेशो भविष्यति ॥ प्रयोजनं नाम तद्वक्तव्यं यन्नियोगतः स्यात् । यदि चायं नियोगतः सर्वादेशः स्यात्तत एतत्प्रयोजनं स्यात् । कुतो नु खल्वेतन्ङित्करणादयं चायं सर्वादेशो भविष्यति न पुनरन्त्यस्य स्यादिति ॥ एवं तर्ह्येतदेव ज्ञापयति न तातङन्त्यस्य स्थाने भवतीति यदेतं ङितं करोति । इतरथा हि लोट एरुप्रकरण एव ब्रूयात्तिह्योस्तादाशिष्यन्य-

अंत्य वर्णाचे स्थानीं कां होत नाहीं? तातङ् हा ङित् असल्यामुळें प्रकृतसूत्रानें अंत्य वर्णाला प्राप्त होतो.

(वा.१) तातङ् हा जो ङित् केला आहे त्याचा दुसरीकडे उपयोग होत आहे.

तो उपयोग कोणता ?

गुणाचा आणि वृद्धीचा निषेध (१।१।५) होण्याकरतां तातङ् या आदेशाला ङकार लावला आहे.[२] अशा रीतीनें तातङ् याच्या ङकाराचा उपयोग होत असल्यामुळें 'ङिच्च' या प्रकृत परिभाषेशीं 'अनेकाल् शित्सर्वस्य' (१।१।५५) ही परिभाषा बरोबरीनें[३] विरोध करूं लागून परत्वास्तव (१।४।२) प्रकृत परिभाषेचा बाध करते म्हणून तातङ् हा सर्वांचे स्थानीं होतो अंत्य वर्णाला होत नाहीं.

पण उपयोग दाखवावयाचा तो नुसतें कांहीं तरी गृहीत धरून दाखवावयाचा नसतो. तर तो विधीला अनुसरूनच दाखवावयाचा असतो. आतां जर कुरुतात्, मृष्टात्, या ठिकाणीं तातङ् हा आदेश जो तु व हि या सर्वांचे स्थानीं केला आहे तो 'अनेकाल्शित्सर्वस्य' या परिभाषेला अनुसरूनच सर्वांचें स्थानीं केला असेल तर त्या तातङ् याच्या ङकाराचा 'गुणाचा व वृद्धीचा निषेध होणें' हा उपयोग बरोबर आहे असें म्हणतां येईल. पण अगोदर येथें असा निश्चय कशावरून केला की 'गुणाचा व वृद्धीचा निषेध' हा उपयोग व्हावा म्हणून कुरुतात्, मृष्टात्, येथें तातङ् हा सर्वादेशच होईल, प्रकृतपरिभाषेनें अंत्य अलाला होणार नाहीं?' एकंदरींत तातङाच्या ङकाराचा योग्य उपयोग अन्यत्र होत नसल्यामुळें प्रकृतसूत्र हें तातङाचे ठिकाणीं सुद्धां 'अनेकाल्शित्सर्वस्य' या परिभाषेचा अपवादच होईल. (तेव्हां 'तातङ् सर्वादेश होतो' याचें कारण निराळें कांहीं तरी सांगितलें पाहिजे).

तर मग तें कारण असें सांगतां येईल की ज्या अर्थी आचार्यपाणिनीनें तातङ् या आदेशाला ङकार जोडला त्यावरूनच तो ज्ञापित करतो की तातङ् हा अंत्यवर्णाला होत नाहीं, तो सर्वादेशच होतो. नाहीं तर, म्ह. 'तातङ् आदेशाला ङकार लाविल्यामुळें तो अंत्यवर्णालाच झाला पाहिजे' असें पाणिनीच्या मनांत असतें तर, ङकार मुळीं न लावतांच तें काम भागवितां आलें असतें. तें असें की लोट्प्रत्ययाच्या इकाराला उकार आदेश सांगणारें जें 'एरुः' (३।४।८६) हें सूत्र त्याच प्रकरणांत त्याच्यापुढेंच 'तिह्योस्तादाशिष्यन्यतरस्याम्' असें सूत्र करावें. (तेथें एः या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे इकारालाच तात् आदेश होईल.)

२. कुरुतात् येथें गुणाचा (७।३।८४) निषेध (१।१।५) झाला आहे आणि मृष्टात् येथें वृद्धीचा (७।२।११४) निषेध झाला आहे.

३. जरी 'ङिच्च' ही परिभाषा 'अनेकाल् शित्सर्वस्य' या परिभाषेची अपवाद आहे आणि म्हणूनच अनङ् (७।१।९३), आनङ् (६।३।२५), इत्यादि आदेश अनेकाल् असूनही सर्वांला होत नाहींत, तरी येथें तातङाच्या ङकाराचा 'गुणाचा व वृद्धीचा निषेध' हा उपयोग होत असल्यामुळें त्या ङकाराच्या जोरावर उभी राहणारी 'ङिच्च' ही प्रकृतपरिभाषा कमजोराची होते. म्हणून येथें दोन्हींची बरोबरी होते.

तरस्यामिति ॥

## आदेः परस्य ॥१.१.५४॥

**अलोऽन्त्यस्यादेः परस्यानेकाल्शित्सर्वस्येत्यपवादविप्रतिषेधात्सर्वादेशः ॥१॥**

अलोऽन्त्यस्येत्युत्सर्गः । तस्यादेः परस्यानेकाल्शित्सर्वस्येत्यपवादौ । अपवादविप्रतिषेधात्तु सर्वादेशो भविष्यति । आदेः परस्येत्यस्यावकाशः । द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् [६.३.९७] द्वीपम् अन्तरीपम् । अनेकाल्शित्सर्वस्येत्यस्यावकाशः । अस्तेर्भूः [२.४.५२] भविता भवितुम् । इहोभयं प्राप्नोति । अतो भिस ऐस् [७.१.९] । अनेकाल्शित्सर्वस्येत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ शित्सर्वस्येत्यस्यावकाशः । इदम इश् [५.३.३] इतः इह । आदेः परस्येत्यस्यावकाशः । स एव । इहोभयं प्राप्नोति । अष्टाभ्य औश् [७.१.२१] । शित्सर्वस्येत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

## अनेकाल्शित्सर्वस्य ॥१.१.५५॥

शित्सर्वस्येति किमुदाहरणम् । इदम

(सू.५४) 'अलोन्त्यस्य' हा सामान्य नियम आहे. त्याचे 'आदेः परस्य' आणि 'अनेकाल् शित्सर्वस्य' हे दोन अपवाद आहेत. त्या दोन अपवादांमध्यें परस्परविरोध ज्या ठिकाणीं उत्पन्न होईल त्या ठिकाणीं परत्वास्तव सर्वादेशच होतो. 'आदेः परस्य' या परिभाषेला द्वीपम्, अन्तरीपम् येथें स्वतंत्र अवकाश मिळतो. येथें 'द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत्' (६।३।९७) या सूत्रानें द्वि, अन्तर् आणि उपसर्ग यांच्यापुढील अप्शब्दाला सांगितलेला ईकार आदेश 'आदेः परस्य' या परिभाषेमुळें अप्शब्दाच्या आदीला म्ह. अकाराला होतो. 'अनेकाल् शित्सर्वस्य' या परिभाषेला भविता, भवितुम् येथें स्वतंत्र अवकाश मिळतो. येथें 'अस्तेर्भूः' (२।४।५२) या सूत्रानें अस्धातूला सांगितलेला भू आदेश 'अस्' या सर्वाला होतो. रामैः वगैरे उदाहरणांमध्यें 'अतो भिस ऐस्' (७।१।९) या सूत्रानें भिस्प्रत्ययाला ऐस् आदेश कर्तव्य असतांना त्या दोन्ही परिभाषा उपस्थित होतात. त्यांमध्यें 'आदेः परस्य' याचा 'अनेकाल्शित्सर्वस्य' ही परिभाषा परत्वास्तव (१।४।२) बाध करते. तसेंच 'शित् आदेश सर्वाला होतो' असें जें 'अनेकाल्शित्सर्वस्य या परिभाषेनें सांगितलें आहे त्याला 'इतः, इह' या ठिकाणीं स्वतंत्र अवकाश मिळतो. येथें 'इदम इश्' (५।३।३) या सूत्रानें इदम् शब्दाला सांगितलेला इश् आदेश 'इदम्' या सर्वाला होतो. 'आदेः परस्य' या परिभाषेला द्वीपम्, अन्तरीपम् या ठिकाणीं स्वतंत्र अवकाश मिळतो हें आतां दाखविलेंच आहे. अष्टौ या उदाहरणामध्यें 'अष्टाभ्य औश्' (७।१।२१) या सूत्रानें जस्प्रत्ययाला 'औश्' आदेश कर्तव्य असतांना या दोन्ही परिभाषा उपस्थित होतात. त्यांमध्यें 'आदेः परस्य' याचा 'शित्सर्वस्य' ही परिभाषा परत्वास्तव बाध करते.

(सू.५५) शित् म्ह. इत्संज्ञक शकार ज्याला जोडला आहे असा आदेश सर्वाचे स्थानीं होतो असें जें येथें सांगितलें आहे त्याचें उदाहरण कोणतें ?

'इदम इश्' (५।३।३) या सूत्रानें इदम् शब्दाला सांगितलेला 'इश्' आदेश शित् असल्यामुळें इतः, इह या उदाहरणांमध्यें 'इदम्' एवढ्या सर्वाचे स्थानीं होतो.

हें शिताचें उदाहरण बरोबर नाहीं. कारण

१. पंचमीचा निर्देश करून त्याहून पराला जो आदेश सांगितला असेल तो त्याच्या आदीला म्ह. पहिल्या वर्णाला करावा.

१. ज्या आदेशामध्यें अल् म्ह. वर्ण अनेक आहेत आणि ज्या आदेशाला इत्संज्ञक शकार लाविला आहे तो आदेश ज्याला सांगितला असेल तेवढ्या सर्वाला करावा.

२. इदम् शब्दाहून तस् प्रत्यय (५।३।७) आणि ह प्रत्यय (५।३।१२) केले असतां इदम् या सर्व शब्दाला इश् आदेश होऊन 'इतः', 'इह' हीं अव्ययें

इश् [५.३.३.] इतः इह । नैतदस्ति प्रयोजनम् । शित्करणादेवात्र सर्वादेशो भविष्यति । इदं तर्हि । अष्टाभ्य औश् [७.१.२१]। ननु चात्रापि शित्करणादेव सर्वादेशो भविष्यति । इदं तर्हि । जसः शी [७.१.१७]। जश्शसोः शिः [२०]। ननु चात्रापि शित्करणादेव सर्वादेशो भविष्यति । अस्त्यन्यच्छित्करणे प्रयोजनम् । किम् । विशेषणार्थः । क विशेषणार्थेनार्थः । शि सर्वनामस्थानम् [१.१.४२] विभाषा ङिश्योः [६.४.१३६] इति ॥ शित्सर्वस्येति शक्यमकर्तुम् । क-

---

येथें जो इश् या आदेशाला इत्संज्ञक शकार जोडला आहे त्यामुळें हा आदेश अनेकाल् समजूनच सर्वादेश होईल.

तर मग हें उदाहरण घ्या. 'अष्टाभ्य औश्' (७।१।२१) या सूत्रानें अष्टन् शब्दाच्या पुढील जस् व शस् या प्रत्ययांना सांगितलेला औश् आदेश शित् असल्यामुळें या उदाहरणामध्यें जस्, शस् या सर्वांचे स्थानीं होतो.

पण येथें देखील औश् आदेश पूर्वीप्रमाणें अनेकाल् समजूनच सर्वादेश होईल.

तर मग हीं उदाहरणें घ्या. 'जसः शी' (७।१।१७) या सूत्रानें जस् प्रत्ययाला सांगितलेला शी आदेश शित् असल्यामुळें 'सर्वे' या उदाहरणामध्यें जस् या सर्वांचें स्थानी होतो. तसेंच 'जश्शसोः शिः' (७।१।२०) या सूत्रानें जस् व शस् या प्रत्ययांना सांगितलेला शि आदेश शित् असल्यामुळें 'ज्ञानानि' या उदाहरणामध्यें जस् आणि शस् या सर्वांचे स्थानीं होतो.

पण येथें देखील शी व शि हे आदेश पूर्वीप्रमाणें अनेकाल् समजून सर्वादेश होतील.

शी व शि या आदेशांच्या शकाराचा दुसरीकडे उपयोग होत असल्यामुळें 'त्या शकारामुळें हे आदेश अनेकाल् आहेत' असें गृहीत धरतां येणार नाहीं.

तो उपयोग कोणता ?

विशेषणाकरतां तो सकार अन्यत्र उपयोगीं पडत आहे.

कोणत्या ठिकाणीं विशेषणाकरतां त्याचा उपयोग होत आहे ?

'शि सर्वनामस्थानम्' (१।१।४२।१), 'विभाषा ङिश्योः' (६।४।१३६) या ठिकाणीं.

तरी पण ह्या सूत्रामध्यें 'शित् आदेश सर्वांचे स्थानीं होतो' हे निराळें सांगावयास नको.

तें कसें ?

हें असें की शी व शि हे उदाहरणामध्यें आदेश करतांना खरेच अनेकाल् असल्यामुळें

---

तयार होतात.

३. इत्संज्ञक शकाराचा लोप (१।३।९) झाल्यामुळें आदेश करतांना एक इकारच होणार आहे. तेव्हां जरी त्याला अनेकाल् म्हणतां येत नाहीं तरी त्या शकाराचा दुसरीकडे कोणताही उपयोग होत नसल्यामुळें तो व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव पूर्वी शकार होता त्याचें स्मरण करून आदेश, अनेकाल् आहे' असें समजतां येतें.

४. तेव्हां शी आणि शि यांच्या शकाराला वैयर्थ्य येत नसल्यामुळें पूर्वीच्या शकाराचें स्मरण करून आदेश अनेकाल् धरतां येणार नाहीं.

५. येथें 'शि' असा इत्संज्ञक शकारासहित निर्देश केला असल्यामुळें 'इत्संज्ञक शकार ज्याला लावला आहे असा' हें इकाराला विशेषण लावल्यासारखें होतें. जर 'जश्शसोः शिः' येथें आदेशाला शकार लावला नाहीं तर 'शि सर्वनामस्थानम्' येथेंही शकार उच्चारतां येणार नाहीं. आणि वाटेल त्या इकाराला सर्वनामस्थानसंज्ञा होऊं लागेल असा दोष येतो. 'जसः शी' यानें सांगितलेल्या शी आदेशाविषयींही असेंच समजावें.

६. इश् आदेश किंवा औश् आदेश यांच्या शकाराला इत्संज्ञा आणि लोप झाल्यानंतर तो आदेश अनेकाल् नाहीं तरी तेथें शकार व्यर्थ होतो, म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव पूर्वी असलेल्या शकाराचें स्मरण करून तो आदेश जसा अनेकाल् समजला जातो तसा शी हा नव्हे, हा खराच अनेकाल् आहे.

थम् । अन्त्यस्यायं स्थाने भवन्न प्रत्ययः स्यात् । असत्यां प्रत्ययसंज्ञायामित्संज्ञा न स्यात् । असत्यामित्संज्ञायां लोपो न स्यात् । असति लोपेऽनेकाल् । यदानेकालतदा सर्वादेशः । यदा सर्वादेशस्तदा प्रत्ययः । यदा प्रत्ययस्तदेत्संज्ञा । यदेत्संज्ञा तदा लोपः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यच्छित्सर्वस्येत्याह तज्ज्ञापयत्याचार्योऽस्त्येषा परिभाषा नानुबन्धकृतमनेकाल्त्वं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधेषु पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वादित्युक्तं तन्न वक्तव्यं भवतीति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरण-महाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे सप्तमआह्निकम् ।

---

ते सहजच सर्वादेश होतील. कारण असें पहा की जर हा सर्वादेश न होतां अंत्याला होईल तर त्याला प्रत्ययच मुळीं म्हणतां येत नाहीं. आणि प्रत्ययसंज्ञा नसली तर शकाराला इत्-संज्ञा (१।३।८) होणार नाहीं. इत्संज्ञा नसली तर त्याचा लोप होणार नाहीं आणि लोप नसल्यामुळें आदेश करतांना खराच अनेकाल् असणार. तेव्हां असा जर हा अनेकाल् आहे तर तो सर्वादेश होणारच. सर्वादेश झाल्यामुळें स्थानिवद्भावानें (१।१।५६) त्याला प्रत्ययसंज्ञा होणार, प्रत्ययसंज्ञा झाल्यामुळें शकाराला इत्-संज्ञा होणार, आणि इत्संज्ञा झाल्यामुळें लोप होणार (तेव्हां अशा रीतीनें 'सर्वे', 'ज्ञानानि' इत्यादि उदाहरणें प्रकृतसूत्रामध्यें 'शित्' या शब्दावांचूनही सिद्ध होत असल्यामुळें शित् हा शब्द व्यर्थ येतो.)

तर मग अशा रीतीनें सिद्धि होत असूनही ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि प्रकृतसूत्रामध्यें 'शित् आदेश सर्वांचे स्थानीं होतो' असें मुद्दाम सांगतो त्यावरून तो 'नानुबन्धकृतमनेकाल्त्वं भवति' अशी परिभाषा ज्ञापित करतो, म्ह. 'कोणत्याही ठिकाणीं प्रत्यय, आदेश, धातु वगैरेंचें स्वरूप अनेक वर्णांचें संभवत असेल तर तें ठरविण्याचे कामीं इत्संज्ञक वर्णाची मदत मुळींच घेऊं नये,' हें मनांत धरूनच शी वगैरे अनेकाल् होत नसल्यामुळें सर्वादेश होणार नाहींत. म्हणून मुद्दाम या प्रकृतसूत्रामध्यें 'शित् आदेश सर्वांचे स्थानीं होतो' असें स्वतंत्र पाणिनीनें येथें सांगितलें आहे.

ह्या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा की 'तस्य लोपः' या सूत्रावर वार्तिककारांनीं जें 'तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वात्' (१।३।९ वा.१०) असें सांगितलें आहे तें सांगावयास नको. (ह्या ज्ञापकानेंच तें सिद्ध होत आहे).

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील सातवें आन्हिक समाप्त झालें.

---

कारण येथें सर्वादेश करण्यापूर्वी शकाराला इत्संज्ञा व लोप यांची प्राप्तिच येत नाहीं.

७. जस् यांतील सकाराला शी आदेश झाला तर स्थानिवद्भावानें शी याला प्रत्यय म्हणतां येणार नाहीं. कारण स्थानी जो सकार तो प्रत्ययाचा अवयव असला तरी प्रत्यय नव्हे.

## स्थानिवदादेशोऽनल्विधौ ॥१.१.५६॥

वत्करणं किमर्थम् । स्थान्यादेशोऽनल्विधावितीयत्युच्यमाने संज्ञाधिकारोऽयं तत्र स्थान्यादेशस्य संज्ञा स्यात् । तत्र को दोषः । आङो यमहन आत्मनेपदं भवतीति वधेरेव स्याद्धन्तेर्न स्यात् । वत्करणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । स्थानिकार्यमादेशेऽतिदिश्यते गुरुवद्गुरुपुत्र इति यथा ॥ अथादेशग्रहणं किमर्थम् । स्थानिवदनल्विधावितीयत्युच्यमाने क इदानीं स्थानिवत्स्यात् । यः स्थाने भवति । कश्च स्थाने भवति । आदेशः । इदं तर्हि प्रयोजनमादेशमात्रं स्थानिवद्यथा स्यात् । एकदेशविकृतस्योपसंख्यानं चोदयिष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥ अथ विधिग्रहणं किमर्थम् । सर्वविभक्त्यन्तः समासो यथा विज्ञा-

---

(सू. ५६) ह्या सूत्रामध्यें 'वत्' हा शब्द कशाकरितां घातला आहे?

'स्थान्यादेशोऽनल्विधौ' एवढेंच सूत्र केलें तर हा संज्ञेचा अधिकार चालू असल्यामुळें 'आदेशाची स्थानी संज्ञा होते' असा अर्थ होईल.

तसा अर्थ झाला असतां दोष कोणता?

दोष असा की 'आङो यमहनः' (१।३।२४) ह्या सूत्रानें सांगितलेलें आत्मनेपद वध ह्या आदेशालाच होईल, हन् ह्या स्थानीला होणार नाहीं.[2] आतां ह्या सूत्रामध्यें वत् असा शब्द घातला तर मात्र हा दोष येत नाहीं. कारण स्थानीचें[3] कार्य आदेशाचे ठिकाणीं करावें असा फक्त अतिदेश ह्या सूत्रानें केला आहे. जसें लोकांमध्यें गुरुपुत्राचे ठिकाणीं गुरूसारखें वर्तन करावें असा अतिदेश केला जातो त्याप्रमाणेंच येथें समजावें.

आतां ह्या सूत्रामध्यें आदेश हा शब्द कशाकरतां घातला आहे?

आदेश हा शब्द न घालतां 'स्थानिवदनल्विधौ' एवढेंच सूत्र केलें तर स्थानीसारखा कोण होईल असें आम्हीं समजावें?

जो स्थानीचे ठिकाणीं होत असेल तोच स्थानीसारखा समजला जाईल.

स्थानीचे ठिकाणीं कोण होत असतो?

आदेश होत असतो.

तर मग आदेश ह्या शब्दाचा उपयोग असा समजावा की आदेश म्हणून जेवढा आहे मग तो प्रत्यक्ष असो अथवा आनुमानिक असो त्या सर्वांना स्थानिवद्भाव झाला पाहिजे. तसें झालें म्हणजे 'एकदेशविकृतस्योपसंख्यानम्' (१।१।५६ वा. ९) असें पुढें जें वार्तिककारांनीं सांगितलें आहे तें सांगावयास नको.

आतां ह्या सूत्रामध्यें विधि हा शब्द कशाकरतां घातला आहे?

विधि शब्द घातला म्हणून ह्या ठिकाणीं अल्विधि हा समास सर्व विभक्तींशीं घेतां येतो. तो असा:—अलाहून पुढें असलेल्याला

---

१. आदेश हा स्थानीसारखा समजावा. स्थानीपैकीं एका वर्णाच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य कर्तव्य असेल तर मात्र आदेश हा स्थानीसारखा समजूं नये.

२. हन् या स्थानीला वध हा आदेश (२।४।४२) सांगितला आहे. आतां जर प्रकृतसूत्रानें 'वध' याची 'हन्' ही संज्ञा झाली तर आहते या ठिकाणीं वध नसल्यामुळें आत्मनेपद होणार नाहीं. जसें 'घु' हा संज्ञा शब्द (१।१।२०) उच्चारून सांगितलेलें कार्य (६।४।६६) दा व धा यांनाच होतें; घु या धातूला होत नाहीं; त्याप्रमाणेंच हें होय.

३. 'स्थानीचें कार्य प्रत्यक्ष स्थानीला करूं नये' असा अर्थ अतिदेशांत निघत नाहीं. गुरूचें कार्य गुरूलाही होतें आणि गुरुपुत्रालाही होतें.

४. पचतु येथें इकाराला उकार हा आदेश प्रत्यक्ष सांगितला (३।४।८६) आहे व त्यावरून 'ति' याला 'तु' हा आदेश कल्पित होतो. यालाच काल्पनिक किंवा आनुमानिक आदेश म्हणतात. ह्या आनुमानिक आदेशाला स्थानिवद्भावानें तिङ् समजतात आणि त्यामुळें पचतु याला पदसंज्ञा (१।४।१४) होते

येत । अलः परस्य विधिरल्विधिः । अलो विधिरल्विधिः । अलि विधिरल्विधिः । अला विधिरल्विधिरिति । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रातिपदिकनिर्देशोऽयम् । प्रातिपदिकनिर्देशाश्चार्थतन्त्रा भवन्ति न कांचित्प्राधान्येन विभक्तिमाश्रयन्ति । तत्र प्रातिपदिकार्थे निर्दिष्टे यां यां विभक्तिमाश्रयितुं बुद्धिरुपजायते सा साश्रयितव्या ॥ इदं तर्हि प्रयोजनमुत्तरपदलोपो यथा विज्ञायेत । अलमाश्रयतेऽलाश्रयः । अलाश्रयो विधिरल्विधिरिति । यत्र प्राधान्येनालाश्रीयते तत्रैव प्रतिषेधः स्यात् । यत्र विशेषणत्वेनालाश्रीयते यत्र प्रतिषेधो न स्यात् । किं प्रयोजनम् । प्रदीव्य प्रसीव्येति वलादिलक्षण इण्मा भूदिति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**स्थान्यादेशपृथक्त्वादादेशे स्थानिवदनुदेशो गुरुवद्गुरुपुत्र इति यथा ॥१॥**

अन्यः स्थान्यन्य आदेशः । स्थान्यादेशपृथक्त्वादेतस्मात्कारणात्स्थानिकार्यमादेशे न प्राप्नोति । तत्र को दोषः । आङो

---

होणारा जो विधि तो अल्विधि, तसेंच अलाचे स्थानीं होणारा जो विधि तोही अल्विधिच होय. तसेंच अल् पुढें असतांना होणारा जो विधि तोही अल्विधिच होय. तसेंच अलाच्या योगानें होणारा जो विधि तोही अल्विधिच होय.

हा जो विधिशब्दाचा उपयोग दाखविला तो बरोबर नाहीं. कारण अल् ह्या प्रातिपदिकाचाच केवळ येथें आम्ही निर्देश करीत आहोंत. त्याला विशेष विभक्ति लावीत नाहीं. आणि अशा तऱ्हेचे जे केवळ प्रातिपदिकाचेच निर्देश केलेले असतात ते अर्थ तंत्र असतात म्हणजे त्या प्रातिपदिकाच्या अर्थालाच तेथें मुख्यत्व असतें. कोणत्याही विभक्त्यर्थाला तेथें मुख्यत्व नसतें. अशा रीतीनें केवळ प्रातिपदिकाचा अर्थ मनांत आला असतांना पुढें तेथें त्याच्यासंबंधानें जो जो विभक्त्यर्थ घेण्याविषयीं बुद्धि उत्पन्न होईल तो तो विभक्त्यर्थ तेथें घेतला जाईल.

तर मग विधिशब्दाचा दुसरा उपयोग आम्ही दाखवितों. तो असा की उत्तरपदाचा लोप होऊन अल्विधि हा शब्द येथें तयार झाला आहे. हें विधिशब्द घातल्यावरून समजतें. तें असें:—अलाचा आश्रय करणारा तो अलाश्रय आणि अलाश्रय असा जो विधि तो अल्विधि. असा समास केला म्हणून अलाचें आश्रयण कोणत्याही तऱ्हेचें असलें तरी त्याला अल्विधि म्हणतां येतें. आणि त्या ठिकाणींही अनल्विधौ हा स्थानिवद्भावाचा निषेध करतां येतो. नाहीं तर ज्या ठिकाणीं मुख्यत्वानें अलाचें आश्रयण असेल त्या ठिकाणींच तो निषेध होईल. आणि ज्या ठिकाणीं गौणत्वानें अलाचें आश्रयण केलें असेल तेथें तो निषेध होणार नाहीं.

ज्या ठिकाणीं गौणत्वानें अलाचें आश्रयण असेल त्या ठिकाणीं अनल्विधौ हा निषेध होतो असें म्हणण्याचा उपयोग काय ?

प्रदीव्य, प्रसीव्य ह्या उदाहरणांमध्यें वलादिप्रत्ययाला सांगितलेला इडागम (७।२।३५) होऊं नये हा त्याचा उपयोग होय.

पण अगोदर हें सूत्रच मुळीं कशाकरतां बरें केलें आहे ?

(वा. १) अशाकरतां केलें आहे की स्थानी निराळा आणि आदेश निराळा अशा रीतीनें स्थानी आणि आदेश ह्या दोहोंमध्यें भेद आहे, ह्या कारणास्तव आदेशाचे ठिकाणीं स्थानीचें

५. प्रदीव्य येथें 'त्वा' याला 'ल्यप्' आदेश (७।१।३७) झाला आहे. येथें 'त्वा' हा स्थानी अल् नाहीं. म्हणून य आदेश स्थानीसारखा वलादि समजला जाईल. परंतु स्थानिवद्भावानें वलादि आहे असें समजलें जातें. त्यांत वल् हें विशेषण आहे तेवढ्यानेंच इट् या आगमाला अल्विधि असें म्हटलें जातें. म्हणून स्थानिवद्भाव होत नाहीं आणि इट् आगम होत नाहीं.

यमहन आत्मनेपदं भवतीति हन्तेरेव स्याद्वधेर्न स्यात् । इष्यते च वधेरपि स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यति । तस्मात्स्थानिवदनुदेशः । एवमर्थमिद-मुच्यते । गुरुवद्गुरुपुत्र इति यथा तद्यथा । गुरुवदस्मिन्गुरुपुत्रे वर्तितव्य-मिति गुरौ यत्कार्यं तद्गुरुपुत्रेऽतिदिश्यते। एवमिहापि स्थानिकार्यमादेशेऽतिदि-श्यते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । लोकत एतत्सिद्धम् । तद्यथा । लोके यो यस्य प्रसङ्गे भवति लभतेऽसौ तत्कार्याणि । तद्यथा । उपाध्यायस्य शिष्यो याज्य-कुलानि गत्वाग्रासनादीनि लभते। यद्यपि तावल्लोक एष दृष्टान्तो दृष्टान्तस्यापि तु पुरुषारम्भो निवर्तको भवति । अस्ति चेह कश्चित्पुरुषारम्भः । अस्तीत्याह । कः । स्वरूपविधिर्नाम । हन्तेरात्मनेपदमुच्य-मानं हन्तेरेव स्याद्वधेर्न स्यात् ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति स्थानिवदादेशो भवतीति यदयं युष्मदस्मदोरनादेशे [७. २.८६] इत्यादेशप्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । युष्मदस्मदोर्विभक्तौ

---

कार्य प्राप्त होत नाहीं.

मग तसें प्राप्त झालें नाहीं तर कोणता दोष येतो ?

असा दोष येतो की 'आङो यमहनः' (१।३। २८) ह्या सूत्रानें सांगितलेलें आत्मनेपद हन् धातूलाच होईल, हन् धातूचा आदेश जो वध त्याला होणार नाहीं आणि त्या वधालाही पाहिजे असें इष्ट आहे. तेव्हां त्याकरतां कांहीं तरी विशेष प्रयत्न केल्याशिवाय तें सिद्ध होणार नाहीं म्हणून येथें आदेश हा स्थानी-सारखा होतो असा अतिदेश केला आहे अशाकरितांच हें सूत्र केलें आहे.

जसें लोकांमध्यें गुरूचा पुत्र आला असतां त्याच्याशीं गुरूसारखें वर्तन ठेवावें असें म्हटलें असतां गुरूचे ठिकाणीं जें कार्य केलें जातें तें गुरुपुत्राचे ठिकाणीं केलें जातें, त्याप्रमाणें ह्या शास्त्रामध्यें देखील आदेशाचे ठिकाणीं स्थानीचें कार्य केलें जातें.

पण हा ह्या सूत्राचा उपयोग बरोबर आहे असें वाटत नाहीं; कारण ही गोष्ट लोकांवरू-नच सिद्ध होत आहे; जसें लोकांमध्यें जो ज्याच्याऐवजीं जातो त्याला त्याचे फायदे मिळतात. जसें उपाध्यायाच्या ऐवजीं त्याचा शिष्य यज्ञशाळेमध्यें गेला असतां त्याला उपाध्यायाप्रमाणें अग्रासन दिलें जातें.

जरी लोकांमध्यें हा दृष्टान्त आहे तरी त्या दृष्टान्ताच्या विरुद्ध मनुष्यानें एखादी गोष्ट मुद्दाम सांगितली असेल तर त्या ठिकाणीं तो दृष्टान्त लागू होत नाहीं.

मग तशी कांहीं गोष्ट येथें मुद्दाम सांगि-तली आहे कीं काय ?

आहे असें आम्ही खात्रीनें सांगतों.

ती कोणती ?

'स्वरूपविधि (१।१।६८) म्हणून शास्त्रा-मध्यें प्रसिद्धच आहे, तीच ती गोष्ट होय. तेव्हां हन्धातूला सांगितलेलें आत्मनेपद हन धातूलाच होईल, त्याचा आदेश जो वध त्याला होणार नाहीं. ह्याकरितां स्थानिवत् हें प्रकृतसूत्र केलें आहे

तरी पण हें सूत्र करावयास नको. कारण हा आचार्य पाणिनि 'युष्मदस्मदोरनादेशे' (७।२।८६) ह्या सूत्रानें विभक्ति पुढें असतांना सांगितलेल्या आत्वाचा विभक्तीला आदेश केला असतां निषेध सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की आदेश हा स्थानी-सारखा समजला जातो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की युष्मद्, अस्मद् ह्या शब्दांना विभक्ति पुढें असतांना सांगितलेलें आत्व हें जें कार्य तें त्या विभक्तीला आदेश

कार्यमुच्यमानं कः प्रसङ्गो यदादेशे स्यात् । पश्यति त्वाचार्यः स्थानिवदादेशो भवतीत्यत आदेशे प्रतिषेधं शास्ति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अनल्विधाविति प्रतिषेधं वक्ष्यामीति । इह मा भूत् । द्यौः पन्थाः स इति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यल्विधौ स्थानिवद्भावो न भवतीति यदयमदो जग्धिर्ल्यप्ति किति [२.४.३६] इति तिकितीत्येव सिद्धे ल्यब्ग्रहणं करोति ॥ तस्मान्नार्थोऽनेन योगेन ॥

आरभ्यमाणेऽप्येतस्मिन्योगे

**अल्विधौ प्रतिषेधेऽविशेषणेऽप्राप्तिस्तस्यादर्शनात् ॥ २ ॥**

अल्विधौ प्रतिषेधेऽसत्यपि विशेषणे समाश्रीयमाणेऽसति तस्मिन्विशेषणेऽप्राप्तिर्विधेः। प्रदीव्य प्रसीव्य। किं कारणम् । तस्यादर्शनात् । वलादेरित्युच्यते न चात्र वलादिं पश्यामः ॥ ननु चैवमर्थ एवायं यत्नः क्रियतेऽन्यस्य कार्यमुच्य-

---

झाला असतांनाही होईल असें कसें संभवेल? तेव्हां ह्यावरून आचार्य पाणिनीच्या मनांत असें दिसतें की आदेश हा स्थानीसारखा होतो; आणि असें गृहीत धरूनच आदेश केला असतांही आत्व होईल म्हणून त्याचा निषेध सांगतो. एकंदरींत ज्ञापकानें सिद्ध होत असल्यामुळें त्याकरितां हें प्रत्यक्ष सूत्र करावयास नको.

तर मग त्याचा उपयोग दुसऱ्या तऱ्हेनें आम्ही दाखवितों. तो असा की अनल्विधौ हा अल्विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध सांगावयाचा आहे. कारण द्यौः[६] पन्थाः सः ह्या ठिकाणीं स्थानिवद्भाव न झाला पाहिजे, तेव्हां तो निषेध कोणाचा तें समजण्याकरितां स्थानिवदादेशः असें येथें म्हटलें पाहिजे.

हा देखील उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि 'अदो जग्धिर्ल्यप्ति' (२।४।३६) ह्या सूत्रामध्यें तकारादि कित् प्रत्यय पुढें असतांना असें जें म्हटलें आहे त्यानेंच ल्यप आदेश केला असतांना काम भागत असूनहि पुनः मुद्दाम ल्यपि असें म्हणतो, त्यावरून तो असें ज्ञापित करतो की अल्विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं. एकंदरींत अनल्विधौ हा निषेध कोणाचा तें समजण्याकरतां देखील ह्या सूत्राचा कांहीं उपयोग नाहीं असें दिसतें. शिवाय ज्ञापकानें सिद्धि होत असूनही स्पष्ट कळण्याकरितां हें सूत्र केलें आहे असें गृहीत धरलें तरी अनल्विधौ ह्या निषेधाची जरूर दिसत नाहीं.

(वा.२) 'अल्विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं,' हा निषेध केला नाहीं तरी इडागम सांगणाऱ्या शास्त्रामध्यें वलादि हें जें विशेषण आर्धधातुक प्रत्ययाला लाविलें आहे तें प्रदीव्य, प्रसीव्य ह्या उदाहरणांमध्यें नसल्यामुळें इडागमाची प्राप्ति येत नाहीं.

कां बरें?

तें विशेषण दिसत नाहीं म्हणून. वलादेः असें विशेषण तेथें दिलें आहे, आणि प्रदीव्य, प्रसीव्य ह्या ठिकाणीं तर वलादि प्रत्यय दिसत नाहीं.

पण ह्याकरितांच हें स्थानिवत् सूत्र केलें

---

६. दिव् शब्दाहून सु प्रत्यय केल्यानंतर दिव् शब्दाच्या वकाराला झालेला जो औकार आदेश (७।१।८४) तो स्थानिवद्भावानें वकारासारखा हल् समजला तर पुढील सुप्रत्ययाचा लोप (६।१।६८) होईल. तसेंच 'पन्थाः' येथें पथिन् शब्दाच्या नकाराला झालेला जो आकार आदेश (७।१।८५) तो नकारासारखा हल् समजला तर तोच दोष येईल. 'राः' येथेंही तद् शब्दाच्या दकाराला झालेला जो अकार आदेश (७।२।१०२) तो स्थानीसारखा हल् समजला तर तोच दोष येईल.

७. कारण 'त्वा' या स्थानीला झालेला जो 'य' हा आदेश (७।१।३७) तो स्थानीसारखा 'तकारादि कित्' समजला जात आहे.

मानमन्यस्य यथा स्यादिति । सत्यमेव-मर्थो न तु प्राप्नोति । किं कारणम् ।

**सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः॥३॥**

सामान्ये ह्यतिदिश्यमाने विशेषो नातिदिष्टो भवति । तद्यथा । ब्राह्मणवदस्मिन्क्षत्रिये वर्तितव्यमिति सामान्यं यद्ब्राह्मणकार्यं तत्क्षत्रियेऽतिदिश्यते यद्विशिष्टं माठरे कौण्डिन्ये वा न तदतिदिश्यते । एवमिहापि सामान्यं यत्प्रत्ययकार्यं तदतिदिश्यते यद्विशिष्टं वलादेरिति न तदतिदिश्यते ॥ यद्येवमग्रहीत् इट ईटि [८.२.२८] इति सिचो लोपो न प्राप्नोति । अनल्विधाविति पुनरुच्यमान इहापि प्रतिषेधो भविष्यति । प्रदीव्य प्रसीव्येति । विशिष्टं ह्येषोऽलमाश्रयते वलं नाम । इह च प्रतिषेधो न भविष्यति । अग्रहीदिति । विशिष्टं ह्येषोऽनलमाश्रयत इटं नाम ॥ यदि तर्हि सामान्यमप्यतिदिश्यते विशेषश्च ।

**सत्याश्रये विधिरिष्टः ॥ ४ ॥**

सति च वलादित्व इटा भवितव्यम् । अरुदिताम् अरुदितम् अरुदित । किमतो यत्सति भवितव्यम् ।

**प्रतिषेधस्तु प्राप्नोत्यल्विधित्वात् ॥५॥**

---

आहे ना की ज्यामुळें एकाला कार्य सांगितलेलें दुसऱ्याला म्हणजे त्याच्या आदेशाला करतां यावें ?

अशाकरितां हा प्रयत्न केला आहे हें खरें, परंतु प्रदीव्य, प्रसीव्य ह्या ठिकाणीं मात्र त्याचा उपयोग होत नाहीं.

कां बरें ?

(वा.३) सामान्य गोष्टीचा अतिदेश केला असतां विशेष गोष्टीचा अतिदेश होत नाहीं; जसें लोकांमध्यें 'ह्या क्षत्रियाचे ठिकाणीं ब्राह्मणासारखें वर्तन करावें' असें म्हटलें असतां सामान्य जें ब्राह्मणाचें कार्य त्याचा क्षत्रियाचे ठिकाणीं अतिदेश होतो, परंतु जें विशेष म्हणजे माठर नांवाच्या, कौंडिण्य नांवाच्या ब्राह्मणाचें कार्य त्याचा अतिदेश होत नाहीं, त्याप्रमाणें ह्या शास्त्रामध्यें देखील ल्यप् आदेश केल्यानंतर सामान्य जें क्त्वाप्रत्ययाचें कार्य त्याचा अतिदेश होईल, परंतु जें वलादि असें विशेष कार्य त्याचा अतिदेश होणार नाहीं.

असें आहे तर मग अग्रहीत् ह्या उदाहरणामध्यें 'इट ईटि' (८।२।२८) ह्या सूत्रानें सिचाचा लोप होणार नाहीं.[८] आतां शास्त्रामध्यें विशेष कार्याचाही अतिदेश होतो असें गृहीत धरून अनल्विधौ हा निषेध येथें केला आहे असें म्हटलें म्हणजे मात्र प्रदीव्य, प्रसीव्य, ह्या उदाहरणांमध्यें निषेध होईल. कारण इडागम सांगणाऱ्या शास्त्रामध्यें वल् असें विशेषतः अलाचें आश्रयण केलें आहे. आणि अग्रहीत् ह्या ठिकाणीं अनल्विधौ हा निषेध होणार नाहीं. कारण इट, ईटि, ह्या शास्त्रामध्यें इट् असें अनलाचें म्हणजे अल्समुदायाचें आश्रयण केलें आहे.

एकंदरींत सामान्याचाही अतिदेश होतो व विशेषाचाही अतिदेश होतो, असें सिद्ध होतें तरी पण

(वा.४) अरुदिताम्, अरुदितम् ह्या उदाहरणांमध्यें वलादि प्रत्यय असेल तरच इडागम होणार ना ?

होय. वलादिप्रत्यय असेल तरच इडागम होणार. मग पुढें काय ?

---

८. अग्रहीत् येथें इट् ह्या आगमाला दीर्घ (७।२।१७) केल्यानंतर तो दीर्घ ईकार स्थानिवद्भावानें इट् समजून सिच् प्रत्ययाचा लोप (८।२।२८) होत असतो. जर विशेष कार्याचा अतिदेश होत नाहीं तर तो दीर्घ ईकार इट् समजला जाणार नाहीं.

९. अनादेशे (८।२।८६) आणि ल्यब्ग्रहण (२।४।३६) या ज्ञापकांवरून स्थानिवद्भाव व त्याचा निषेध सिद्ध होत असतां जें हें प्रकृतसूत्र मुद्दाम पुनः त्या अर्थाचें केलें आहे त्यावरून ह्या शास्त्रामध्यें विशेष कार्याचाही अतिदेश होतो असें गृहीत धरतां येतें.

प्रतिषेधस्तु प्राप्नोति । किं कारणम् । अल्विधित्वात् । अल्विधिरयं भवति तत्रानल्विधाविति प्रतिषेधः प्राप्नोति ॥

**न वानुदेशिकस्य प्रतिषेधादितरेण भावः ॥६॥**

न वैष दोषः । किं कारणम् । आनुदेशिकस्य प्रतिषेधात् । अस्त्वत्रानुदेशिकस्य वलादित्वस्य प्रतिषेधः स्वाश्रयमत्र वलादित्वं भविष्यति ॥ नैतद्विवदामहे वलादिर्न वलादिरिति । किं तर्हि । स्थानिवद्भावात्सार्वधातुकत्वमेषितव्यं तत्रानल्विधाविति प्रतिषेधः प्राप्नोति ॥

किं पुनरादेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेधो भवत्याहोस्विदविशेषेणादेश आदेशिनि च । कश्चात्र विशेषः ।

**आदेश्यल्विधिप्रतिषेधे कुरुवधपिबां गुणवृद्धिप्रतिषेधः ॥७॥**

आदेश्यल्विधिप्रतिषेधे कुरुवधपिबां गुणवृद्ध्योः प्रतिषेधो वक्तव्यः । कुर्वित्यत्र स्थानिवद्भावादङ्गसंज्ञा स्वाश्रयं च लघूपधत्वं तत्र लघूपधगुणः प्राप्नोति । वधकमित्यत्र स्थानिवद्भावादङ्गसंज्ञा स्वाश्रयं चादुपधत्वं तत्र वृद्धिः प्राप्नोति । पिबेत्यत्र स्थानिवद्भावादङ्गसंज्ञा स्वाश्रयं

---

(वा.५) पुढें असें की अनल्विधौ हा निषेध येत आहे.

कां बरें ?

अल्विधि आहे म्हणून इडागम हा वलादि प्रत्ययाला सांगितला असल्यामुळें अल्विधि होत आहे. तेव्हां अनल्विधौ हा निषेध तेथें प्राप्त होत आहे.

(वा.६) हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

आतिदेशिकाचा निषेध आहे म्हणून.

ह्या ठिकाणीं ताम्, तम् वगैरे आदेशावर अतिदेशानें प्राप्त होणारें जें वलादित्व त्याचा निषेध होऊं दे; आदेशांचें स्वतःचें जें वलादित्व तें घेऊन इडागम होईल.

येथें प्रत्यय वलादि आहे किंवा नाहीं अशाविषयीं आमचा वाद नाहीं. फक्त स्थानिवद्भावानें येथें जो सार्वधातुकत्व हा धर्म आणावयाचा आहे तो आणतांना अनल्विधौ असा निषेध होऊं लागेल.

पण काय, त्या ठिकाणीं स्थानीमधीलच अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तरच तेथें अनल्विधौ हा निषेध होतो. अथवा तसें विशेष कांहीं न मानतां स्थानीमधील अथवा आदेशामधील अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तर तेथें स्थानिवद्भावाचा निषेध होतो.

ह्या दोहोंमध्यें फरक काय ?

(वा.७) स्थानीमधील अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तरच तेथें स्थानिवद्भावाचा निषेध होतो असें मानलें तर कुरु, वध्, पिब्, ह्या ठिकाणीं गुण आणि वृद्धि होत नाहींत असें म्हणावें लागेल.

तें असें की कुरु ह्या उदाहरणामध्यें कुर् ह्या आदेशाला स्थानिवद्भावानें अंगसंज्ञा होईल आणि तो आदेश स्वतःच लघूपध आहे तेव्हां तेथें लघूपधगुण (७।३।८६) होऊं लागेल. तसेंच वधकः ह्या उदाहरणामध्यें वध् ह्या आदेशाला स्थानिवद्भावानें अंगसंज्ञा आहे आणि तो आदेश स्वतःच अदुपध आहे म्हणजे त्याच्या उपधेला ऱ्हस्व अकार आहे तेव्हां तेथें 'अत उपधायाः' (७।२।११६) ह्या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते. तसेंच पिबति ह्या ठिकाणीं पिब् ह्या आदेशाला स्थानिवद्भावानें अंगसंज्ञा आहे आणि तो आदेश स्वतःच लघूपध आहे तेव्हां तेथें लघूपधगुण (७।३।८६) प्राप्त होऊं लागेल.[१०]

---

१०. उपधेला लघु पाहिजे किंवा उपधेला ऱ्हस्व अकार पाहिजे असें जरी गुण आणि वृद्धि या विधीमध्यें अकाचें आश्रयण आहे तरी तो अल् येथें आदेशांतच मिळत असल्यामुळें स्थानिवद्भावाचा निषेध होणार नाहीं.

च लघूपधत्वं तत्र गुणः प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यविशेषेणादेश आदेशिनि च ।

**आदेश्यादेश इति चेत्सुप्तिङ्कृदतिदिष्टेषूपसंख्यानम् ॥८॥**

आदेश्यादेश इति चेत्सुप्तिङ्कृदतिदिष्टेषूपसंख्यानं कर्तव्यम् । सुप् । वृक्षाय प्लक्षाय । स्थानिवद्भावात्सुप्संज्ञा स्वाश्रयं च यञादित्वं तत्र प्रतिषेधः प्राप्नोति । सुप् ॥ तिङ् । अरुदिताम् अरुदितम् अरुदित । स्थानिवद्भावात्सार्वधातुकसंज्ञा स्वाश्रयं च वलादित्वं तत्र प्रतिषेधः प्राप्नोति । तिङ् ॥ कृदतिदिष्टम् । भुवनम् । सुवनम् धुवनम् । स्थानिवद्भावात्प्रत्ययसंज्ञा स्वाश्रयं चाजादित्वं तत्र प्रतिषेधः प्राप्नोति ॥ किं पुनरत्र ज्यायः । आदेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेध इत्येतदेव ज्यायः । कुत एतत् । तथा ह्ययं विशिष्टं स्थानिकार्यमादेशेऽतिदिशति गुरुवद्गुरुपुत्र इति यथा । तद्यथा । गुरुवदस्मिन्गुरुपुत्रे वर्तितव्यमन्यत्रोच्छिष्टभोजनात्पादोपसंग्रहणाच्चेति । यदि च गुरुपुत्रोऽपि गुरुर्भवति तदपि कर्तव्यं भवति ॥ अस्तु तर्ह्यादेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेधः । ननु चोक्तमादेश्यल्विधिप्रतिषेधे कुरुव-

---

असे जर दोष येतात तर मग अल् हा आदेशामधील असो अथवा स्थानीमधील असो, दोन्ही ठिकाणीं अनल्विधौ हा निषेध येऊं दे.

(वा.८) अल् हा स्थानीमधील असो अथवा आदेशामधील असो, दोन्ही ठिकाणीं अनल्विधौ हा स्थानिवद्भावाचा निषेध होतो असें मानलें तर सुप्, तिङ् आणि कृदतिदिष्ट ह्या ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो असें म्हणावें लागेल. ह्यापैकीं सुपाचें उदाहरण वृक्षाय, प्लक्षाय; ह्या ठिकाणीं स्थानिवद्भावानें य हा आदेश सुप् समजला जात आहे आणि तो आदेश स्वतः यञादि असल्यामुळें तेथें 'सुपि च' (७।३।१०२) हा दीर्घ होतो. तो कर्तव्य असतांना अनल्विधौ हा निषेध होऊं लागेल. तिङाचें उदाहरणः—अरुदिताम्, अरुदितम्, अरुदित. ह्या उदाहरणांमध्यें ताम्, तम्,त ह्या आदेशांना स्थानिवद्भावानें सार्वधातुक संज्ञा आहे आणि ते स्वतः वलादि आहेत. त्यामुळें तेथें 'रुदादिभ्यः सार्व०' (७।२।७६) ह्या सूत्रानें इडागम होतो. तो कर्तव्य असतांना अनल्विधौ हा निषेध होऊं लागेल. कृदतिदिष्टाचें उदाहरण भुवनम्, सुवनम्, धुवनम्. ह्या ठिकाणीं कृत् प्रत्ययाच्या अन् ह्या आदेशाला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा आहे आणि तो आदेश स्वतःच अजादि आहे त्यामुळें तेथें 'अचि श्नुधातु०' ६।४।७७) ह्या सूत्रानें उवङ् होतो. तो कर्तव्य असतांना अनल्विधौ हा निषेध होऊं लागेल.

पण ह्या दोन पक्षांमध्यें बरा पक्ष कोणता?

स्थानीमधीलच अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तरच तेथें अनल्विधौ हा निषेध येतो. हाच पक्ष बरा.

असें कशावरून?

अशावरून की जसें लोकामध्यें गुरुपुत्राचे ठिकाणीं गुरूसारखें वर्तन ठेवावें, फक्त त्याचें उष्टें खाऊं नये, पाय रगडूं नये, असें म्हटलें असतांही जर तो गुरुपुत्र स्वतः गुरूच होईल तर उष्टें खाणें, पाय रगडणें, हेंही तेथें केलें जातेंच. तसेंच हें आहे.

तर मग स्थानीमधीलच अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तर त्या ठिकाणींच अनल्विधौ हा स्थानिवद्भावाचा निषेध होतो असेंच असूं दे.

पण असें गृहीत धरलें तर कुरु, वधू, पिब् ह्यांना गुण आणि वृद्धि होत नाहीं असें म्हणावें लागेल असें आतांच सांगितलें आहे ना?

हा दोष येत नाहीं. कुरु ह्या ठिकाणीं

धपिबां गुणवृद्धिप्रतिषेध इति। नैष दोषः। करोतौ तपरकरणनिर्देशात्सिद्धम्। पिबिरदन्तः। वधकमिति नायं ण्वुल् अन्योऽयमकशब्दः किदौणादिको रुचक इति यथा ॥

## एकदेशविकृतस्योपसंख्यानम् ॥९॥

एकदेशविकृतस्योपसंख्यानं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। पचतु पचन्तु। तिङ्ग्रहणेन ग्रहणं यथा स्यात् ॥

## एकदेशविकृतस्यानन्यत्वात्सिद्धम् ॥१०॥

एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति तिङ्ग्रहणेन ग्रहणं भविष्यति। तद्यथा। श्वा कर्णे वा पुच्छे वा छिन्ने श्वैव भवति नाश्वो न गर्दभ इति ॥

## अनित्यविज्ञानं तु तस्मादुपसंख्यानम् ॥११॥

अनित्यविज्ञानं तु भवति। नित्याः शब्दाः। नित्येषु नाम शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवितव्यमनपायोपजनविकारिभिः। तत्र स एवायं विकृतश्चेत्येतन्नित्येषु नोपपद्यते। तस्मादुपसंख्यानं कर्तव्यम् ॥

भारद्वाजीयाः पठन्ति ॥ एकदेशवि-

---

'अत उत्' (६।४।११०) ह्या सूत्रामध्यें उत् असें तपरकरण केलें आहे त्यामुळें तेथें गुण होणार नाहीं.[११] पिबति या ठिकाणीं पिब् हा मूळचा पिब असा अकारान्त आहे त्यामुळें तेथेंही गुण होणार नाहीं.[१२] वधकः ह्या ठिकाणीं ण्वुल् प्रत्यय केला आहे असें समजूं नये. तर निराळाच येथें औणादिक अक असा कित् प्रत्यय केला आहे. रुचकः ह्या उदाहरणामध्यें जसा केला आहे तसाच येथेंही केला आहे. तेव्हां तेथें वृद्धि होणार नाहीं.

(वा. ९) एकदेशाला विकार झाला असतांना तो विकृत शब्द मूळ प्रकृतीसारखाच समजावा असें म्हटलें पाहिजे.

ह्याचा काय उपयोग ?

पचतु, पचन्तु ह्या ठिकाणीं तु आणि अन्तु ह्या विकृत शब्दस्वरूपांचें मूळ प्रकृतीप्रमाणें तिङ् ह्या शब्दानें ग्रहण झालें पाहिजे.[१३]

(वा. १०) एकदेशाला विकार झाला असतां तें विकृत स्वरूप मूळ प्रकृतीपेक्षां निराळ्यासारखें समजलें जात नाहींच. तेव्हां अर्थातच तिङ् ह्या शब्दानें त्यांचें ग्रहण होईल. जसें लोकामध्यें कुत्र्याचा कान किंवा शेंपूट तुटलें असतें तेथें तो निराळा म्हणजे घोडा किंवा गाढव समजला जात नाहीं, कुत्राच समजला जातो.

(वा. ११) अशा रीतीनें सिद्ध होईल खरें परंतु शब्द अनित्य आहेत असें मात्र ह्यांत होत आहे. आणि शब्द तर नित्य आहेत. ह्या नित्य शब्दांमधील जे वर्ण ते एकाच स्वरूपांत नेहमीं राहणारे व न हालणारे असेच असले पाहिजेत. त्यांना नाश किंवा उत्पत्ति हे विकार बिलकूल होतां कामा नयेत, तेव्हां तोच हा शब्द आहे आणि विकृतही आहे ही गोष्ट नित्य शब्दाच्या संबंधानें बरोबर जुळत नाहीं, म्हणून तसें येथें स्वतंत्र वचन केलें पाहिजे.

येथें भारद्वाजीय असें म्हणतात-एकदेशाला विकार झाला असतांना तो विकृत शब्द मूळ प्रकृतीसारखाच समजावा असें म्हटलें

---

११. 'अतः' असा ऱ्हस्व स्थानी असल्यामुळें तेथें त्याला त्याच्यासारखा (१।१।५०) ऱ्हस्वच उकार आदेश होईल. तेव्हां त्या कामीं उत् ह्या तपरकरणाचा उपयोग होत नाहीं, म्हणून त्या तपरकरणाच्या सामर्थ्यास्तव त्या उकार आदेशाला मागून प्राप्त होणारा गुण होत नाहीं अशी कल्पना होते.

१२. पिब यांतील अकाराला पुढील शप्प्रत्याच्या अकाराबरोबर झालेला जो पररूप (६।१।९७) आदेश त्याला पुढील सूत्रानें (१।१।५७) स्थानिवद्भाव झाल्यामुळें गुण होत नाहीं.

१३. नाहीं तर पदसंज्ञा (१।४।१४) होणार नाहीं. येथें इकाराला जो उकार आदेश (३।४।८६) झाला आहे तो विकार होय.

कृतेषूपसंख्यानम् ॥ एकदेशविकृतेषूपसंख्यानं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । पचतु पचन्तु । तिङ्ग्रहणेन ग्रहणं यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् ॥ अनादेशत्वात् ॥ आदेशः स्थानिवदित्युच्यते न चेम आदेशाः ॥ रूपान्यत्वाच्च ॥ अन्यत्खल्वपि रूपं पचतीत्यन्यत्पचात्विति । इमेप्यादेशाः । कथम् । आदिश्यते यः स आदेश इमे चाप्यादिश्यन्ते ॥ आदेशः स्थानिवदिति चेन्नानाश्रितत्वात् ॥ आदेशः स्थानिवदिति चेत्तन्न । किं कारणम् । अनाश्रितत्वात् । योऽत्रादेशो नासावाश्रीयते यश्चाश्रीयते नासावादेशः । नैतन्मन्तव्यं समुदाय आश्रीयमाणेऽवयवो नाश्रीयत इति ॥ अभ्यन्तरो हि समुदायस्यावयवः । तद्यथा । वृक्षः प्रचलन्सहावयवैः प्रचलति ॥ आश्रय इति चेदल्विधिप्रसङ्गः ॥ आश्रय इति चेदल्विधिरयं भवति तत्रानल्विधाविति प्रतिषेधः प्राप्नोति । नैष दोषः । नैवं सति कश्चिदप्यनल्विधिः स्यात् । उच्यते चेदमनल्विधाविति तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते

---

पाहिजे.

ह्याचा काय उपयोग ?

पचतु, पचन्तु, ह्या ठिकाणीं तु आणि अन्तु ह्या विकृत शब्दस्वरूपांचें मूळ प्रकृतीप्रमाणें तिङ् ह्या शब्दानें ग्रहण झालें पाहिजे.

मग कां बरें त्यांचें तिङ् ह्या शब्दानें ग्रहण होणार नाहीं ?

ते आदेश नव्हेत म्हणून. आदेशाला स्थानिवद्भाव होतो असें येथें म्हटलें आहे आणि तु, अन्तु हे तर आदेश[१४] नव्हेत.

आणि उकार आदेश झाल्यामुळें त्यांचें स्वरूप तर निराळें दिसत आहे. पचति येथें ति असें तिङाचें स्वरूप निराळें दिसतें तसें पचतु येथें तु हें दिसत नाहीं. त्यामुळेंही तु, अन्तु ह्यांचें तिङ् ह्या शब्दानें ग्रहण होणार नाहीं.

पण पचतु, पचन्तु ह्या ठिकाणींही आदेशच झाले आहेत ना ?

ते कसे ?

नवीन जो सांगितला जातो त्यालाच आदेश म्हणतात आणि पचतु पचन्तु ह्या ठिकाणीं असलेले उकार हे नवीनच केलेले आहेत.

तेव्हां ह्या आदेशांना स्थानिवद्भावानें तिङ् म्हणतां येईल असें म्हणाल तर तसें नाहीं.

कां बरें ?

त्याचें आश्रयण केलें नाहीं म्हणून; म्हणजे पचतु, पचन्तु ह्या ठिकाणीं आदेश जो उकार त्याचें 'सुप्तिङन्तं पदं' (१।४।१४) ह्या सूत्रामध्यें आश्रयण केलेलें नाहीं. आणि त्या सूत्रामध्यें ज्यांचें म्हणजे तु ह्या समुदायाचें तिङ् अशा स्वरूपानें आश्रयण केलेलें आहे तो आदेश होत नाहीं.

पण असें समजूं नये की ज्या ठिकाणीं समुदायाचें आश्रयण केलेलें असेल त्या ठिकाणीं त्या समुदायांतील अवयवांचें आश्रयण केलें जात नाहीं. कारण अवयव हा समुदायाच्या पोटांतच असतो; जसें लोकांमध्यें झाड हालूं लागलें म्हणजे त्यांतील फांद्याही हालतातच.

अशा रीतीनें तु ह्यांतील आदेश जो उकार त्याचें 'सुप्तिङन्तं पदम्' येथें आश्रयण केलें आहे असें म्हणाल तर 'सुप्तिङन्तम्' हा विधि अल्विधि होईल. आणि अनल्विधौ हा स्थानिवद्भावाचा निषेध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण अशा रीतीनें कोणताही विधि अनल्विधि होणारच नाहीं. आणि पाणिनीनें तर येथें अनल्विधौ असें

---

१४. कारण 'एरुः' (३।४।८६) या सूत्रानें इकाराला उकार आदेश सांगितला आहे. 'ति' याला 'तु' आदेश सांगितला नाहीं.

साधीयो योऽल्विधिरिति । कश्च साधीयः । यत्र प्राधान्येनालाश्रीयते । यत्र नान्तरीयकोऽलाश्रीयते नासावल्विधिरिति ॥ अथवोक्तमादेशग्रहणस्य प्रयोजनमादेशमात्रं स्थानिवद्यथा स्यादिति ॥

**अनुपपन्नं स्थान्यादेशत्वं नित्यत्वात् ॥ १२ ॥**

स्थान्यादेश इत्येतन्नित्येषु शब्देषु नोपपद्यते । किं कारणम् । नित्यत्वात् । स्थानी हि नाम यो भूत्वा न भवति । आदेशो हि नाम योऽभूत्वा भवति । एतच्च नित्येषु शब्देषु नोपपद्यते यत्सतो नाम विनाशः स्यादसतो वा प्रादुर्भाव इति ॥

**सिद्धं तु यथा लौकिकवैदिकेष्वभूतपूर्वेऽपि स्थानशब्दप्रयोगात् ॥ १३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यथा लौकिकेषु वैदिकेषु च कृतान्तेष्वभूतपूर्वेऽपि स्थानशब्दो वर्तते । लोके तावदुपाध्यायस्य स्थाने शिष्य इत्युच्यते न च तत्रोपाध्यायो भूतपूर्वो भवति । वेदेऽपि सोमस्य स्थाने पूतीकतृणान्यभिषुणुयादित्युच्यते न च तत्र सोमो भूतपूर्वो भवति ॥

**कार्यविपरिणामाद्वा सिद्धम् ॥१४॥**

अथवा कार्यविपरिणामात्सिद्धमेतत् । किमिदं कार्यविपरिणामादिति । कार्या

---

म्हटलें आहे. तेव्हां अर्थातच अल्विधि ह्या शब्दाच्या अर्थामध्यें कांहीं विशेष आहे असें म्हणावें लागतें.

जो चांगला अल्विधि तोच अल्विधि होय.

चांगला अल्विधि तो कसा समजावा ?

ज्या विधीमध्यें अलाचें प्रत्यक्ष आश्रयण केलें जातें तोच चांगला अल्विधि होय आणि ज्या विधीमध्यें मुख्यत्वानें समुदायाचें आश्रयण करावयाचें असल्यामुळें नाइलाजास्तव त्यांतील अलांचें आश्रयण केलें जातें तो चांगला अल्विधि नव्हे. शिवाय ह्या सूत्रांतील आदेश ह्या शब्दाचा उपयोग सांगितलाच (पृष्ठ ३३२) आहे की प्रत्यक्ष असो, आनुमानिक असो, आदेश म्हणून जेवढा असेल तेवढ्याला स्थानिवद्भाव होतो.

(वा.१२) शब्द जर नित्य आहेत तर मुळीं हा स्थानी आणि हा आदेश हें म्हणणेंच जुळत नाहीं.

कां बरें ?

शब्द नित्य आहेत म्हणून. जो पूर्वी असून मागून नाहींसा होतो त्याला स्थानी असें म्हणतात. आणि जो पूर्वी नसून मागाहून उत्पन्न होतो त्याला आदेश म्हणतात. शब्द जर नित्य आहेत तर असलेल्याचा नाश होतो आणि नसलेल्याची उत्पत्ति होते हें कसें बरें म्हणतां येईल ?

(वा.१३) शब्द नित्य असले तरी हा स्थानी व हा आदेश हें म्हणणें जुळतें.

तें कसें ?

जसें लोकांमध्यें व वेदांमध्यें एखादी वस्तु पूर्वी तेथें नसूनही तिच्यासंबंधानें स्थान ह्या शब्दाचा प्रयोग झालेला दृष्टीस पडतो. लोकांमध्यें असें पहा की उपाध्यायाच्या स्थानीं शिष्य आला असें म्हणतात. पण तेथें उपाध्याय हा पूर्वी आलेला असतोच असें नाहीं. वेदांमध्यें देखील सोमाच्या स्थानीं पूतीक नांवाच्या तृणाचें कंडण करावें असें म्हटलें आहे, पण तेथें पूतीक नांवाच्या तृणाचें कंडण करण्यापूर्वी सोम आणलेला असतोच असें नाहीं.

(वा.१४) अथवा कार्यविपरिणामामुळें हें सिद्ध होतें म्हणजे 'शब्द अनित्य होतील' असा दोष नाहीं.

'कार्यविपरिणामात्' ह्यानें काय समजावयाचें ?

कार्या म्हणजे बुद्धि. तिचा विपरिणाम होतो म्हणजे फक्त एक प्रकारची बुद्धि जाऊन

बुद्धिः सा विपरिणंस्यते। ननु च कार्याविपरिणामादिति भवितव्यम्। सन्ति चैव ह्यौत्तरपदिकानि ह्रस्वत्वानि। अपि च बुद्धिः संप्रत्यय इत्यनर्थान्तरम्। कार्या बुद्धिः कार्यः संप्रत्ययः कार्यस्य संप्रत्ययस्य विपरिणामः कार्यविपरिणामः कार्यविपरिणामादिति॥ परिहारान्तरमेवेदं मत्वा पठितं कथं चेदं परिहारान्तरं स्यात्। यदि भूतपूर्वे स्थानशब्दो वर्तते। भूतपूर्वे चापि स्थानशब्दो वर्तते। कथम्। बुद्ध्या। तद्यथा। कश्चित्कस्मैचिदुपदिशति प्राचीनं ग्रामादाम्रा इति। तस्य सर्वत्राम्रबुद्धिः प्रसक्ता। ततः पश्चादाह ये क्षीरिणोऽवरोहवन्तः पृथुपर्णास्ते न्यग्रोधा इति। स तत्राम्रबुद्ध्या न्यग्रोधबुद्धिं प्रतिपद्यते। स ततः पश्यति बुद्ध्याम्रांश्चापकृष्यमाणान्न्यग्रोधांश्चाधीयमानान्। नित्या एव च स्वस्मिन्विषय आम्रा नित्याश्च न्यग्रोधा बुद्धिस्त्वस्य विपरिणंस्यते। एवमिहाप्यस्तिरस्मा अविशेषेणोपदिष्टः। तस्य सर्वत्रा-

---

दुसऱ्या प्रकारची बुद्धि उत्पन्न होते. तेथें कोणताही शब्द जात नाहीं व कोणताही येत नाहीं.

पण अशा अर्थाचा शब्द कार्याविपरिणामात् असा असला पाहिजे.

उत्तरपदामुळें पूर्वपदाला ऱ्हस्व सांगणारीं शास्त्रें आहेतच ना? म्हणजे कार्या ह्यांतील शेवटल्या आकाराला 'ङ्यापोः०' (६।३।६३) ह्या सूत्रांतील बहुलग्रहणानें ऱ्हस्व झाला आहे.

शिवाय बुद्धि, संप्रत्यय, हे पर्यायशब्द आहेत; तेव्हां बुद्धिशब्दाला विशेषण दिलें म्हणजे कार्या असें म्हणावें लागतें व संप्रत्यय शब्दाला विशेषण दिलें म्हणजे कार्यः असें म्हणतां येतें.

त्या कार्याचा म्हणजे संप्रत्ययाचा जो विपरिणाम तो कार्यविपरिणाम होय.

शब्दाला अनित्यत्व येईल ह्या आक्षेपाचें एक उत्तर म्हणजे 'वस्तु पूर्वीं नसूनही तिच्यासंबंधानें स्थानशब्द उपयोगांत येतो' असें देऊन दुसरें ह्या आक्षेपाचें उत्तर 'कार्यविपरिणामाद्वा' हें दिलें आहे असें दिसतें. पण हें उत्तर दुसरें कसें होणार[१५]? आतां जर पूर्वीं असलेल्या वस्तूसंबंधानें स्थानशब्द उपयोगांत येत असेल तर मात्र हें दुसरें उत्तर जमेल.

असें आहे तर मग पूर्वीं असलेल्या वस्तूसंबंधानें देखील स्थानशब्द उपयोगांत येतो.

तो कसा?

बुद्धीच्या संबंधानें जसें लोकांमध्यें कोणी एक दुसऱ्याला असें सांगतो की ह्या गांवाच्या पूर्वबाजूला जेवढीं झाडें आहेत तेवढीं आंब्याचीं आहेत त्यावरून सर्वच झाडांविषयीं हीं आंब्याचीं झाडें आहेत अशी बुद्धि होते. त्यानंतर तो मागून असें सांगतो की ज्या झाडांना चीक आहे व ज्या झाडांना खालीं पारंब्या फुटतात आणि ज्यांचीं पानें मोठीं आहेत तीं मात्र वडाचीं झाडें समजावींत. ह्या वाक्यावरून अशा प्रकारच्या झाडांविषयीं पूर्वीं झालेली आम्रबुद्धि जाऊन तिच्या जागीं हा वड आहे अशी बुद्धि होते. त्यावरून असें मनांत येतें की आम्रवृक्ष दूर होऊन त्यांच्या जागीं वटवृक्ष स्थापित केले. वास्तविक पाहिलें तर आपआपल्या जागीं आंब्याचीं झाडें आणि वडाचीं झाडें कायमचींच आहेत. फक्त ह्याच्या बुद्धीमध्यें उलटापालट होते. ह्याप्रमाणें शास्त्रामध्येंही 'आहे' अशा अर्थीं 'अस्' हा धातु साधारण सांगितला. त्यावरून त्या अर्थाच्या सर्व क्रियापदांमध्यें अस् धातूची बुद्धि प्रसक्त होते. त्या-

---

१५. कारण तशा ठिकाणीं पूर्वीं 'अस्' असा शब्द आलेला असतो असें जें आपल्याला वाटतें तो भ्रम आहे. तेथें 'अस्' असा शब्द न येतां फक्त 'अस्' अशी बुद्धि आली आहे. व ती बुद्धि जाऊन 'भू' अशी बुद्धि येते.

स्तिबुद्धिः प्रसक्ता । सोऽस्तेर्भूर्भवतीत्यस्तिबुद्ध्या भवतिबुद्धिं प्रतिपद्यते । स ततः पश्यति बुद्ध्यास्तिं चापकृष्यमाणं भवतिं चाधीयमानम् । नित्य एव च स्वस्मिन्विषयेऽस्तिर्नित्यो भवतिर्बुद्धिस्त्वस्य विपरिणम्यते ॥

**अपवादप्रसङ्गस्तु स्थानिवत्त्वात् ॥१५**

अपवाद उत्सर्गकृतं च प्राप्नोति । कर्मण्यण् [३.२.१] आतोऽनुपसर्गे कः [३] इति केऽप्यणि कृतं प्राप्नोति । किं कारणम् । स्थानिवत्त्वात् ॥

**उक्तं वा ॥ १६ ॥**

किमुक्तम् । विषयेण तु नानालिङ्गकरणात्सिद्धमिति ॥ अथवा

**सिद्धं तु षष्ठीनिर्दिष्टस्य स्थानिवद्वचनात् ॥ १७ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । षष्ठीनिर्दिष्टस्यादेशः स्थानिवदिति वक्तव्यम् । तत्तर्हि षष्ठीनिर्दिष्टग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । षष्ठी स्थानेयोगा [१.१.४९] इति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नापवाद उत्सर्गकृतं भवतीति यदयं श्यनादीनां कांश्चिच्छितः करोति । श्यन् श्नम् श्ना शः श्नुरिति ॥

---

नंतर 'अस्तेर्भूः' (२।४।५२) ह्या शास्त्रावरून पूर्वी झालेली अस् बुद्धि जाऊन तिच्या जागीं हा भू आहे अशी बुद्धि होते. त्यावरून असें मनांत येतें की अस् धातु दूर होऊन त्याच्या जागीं भू धातु आला. वास्तविक पाहिलें तर आपआपल्या जागीं अस् धातु आणि भू धातु कायमचेच आहेत. फक्त ह्याच्या बुद्धीमध्यें उलटापालट होते.

(वा.१५) फक्त बुद्धीमध्यें उलटापालट झाल्यानें तो आदेश समजला तर अपवादही आदेशच आहे असें समजून त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भावानें उत्सर्गाचें कार्य प्राप्त होतें; उदा० 'कर्मण्यण्' (३।२।१) ह्या सूत्रानें सांगितलेला अण् हा उत्सर्ग आहे. 'आतोनुपसर्गेकः' (३।२।३) ह्यानें सांगितलेला क हा प्रत्यय त्याचा अपवाद आहे. तो क प्रत्यय केला असेल त्या ठिकाणींही अण्प्रत्ययाचें कार्य प्राप्त[१६] होतें.

कां बरें ?

होत आहे म्हणून.

(वा.१६) अथवा हें पूर्वी सांगिलेंच आहे.

तें सांगितलेंच आहे ?

'विषयेण तु नानालिंगकरणात् सिद्धम्' असें पूर्वी आहे. सू. १ वा. ९ पृ. ३९ सांगितलेंच आहे.

अथवा

(वा.१७) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

षष्ठी विभक्ति उच्चारून सांगितलेला जो आदेश त्यालाच स्थानिवद्भाव होतो असें म्हणावें म्हणजे अपवादाला स्थानिवद्भावानें उत्सर्गाचें कार्य होणार नाहीं.

तर मग 'षष्ठी विभक्ती उच्चारून सांगितलेला' असें आदेशाला विशेषण देण्याकरतां तसें सूत्रांत म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको, कारण मागून षष्ठी ह्या शब्दाची अनुवृत्ति येथें येत आहे.

मागें षष्ठी हें पद कोणत्या सूत्रांत आहे ?

'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) ह्या सूत्रांत आहे.

अथवा हा आचार्य पाणिनि शप् ह्या शकारेत्संज्ञक प्रत्ययाचे अपवाद असे जे श्यन्, श्नम्, श्ना, श, श्नु हे प्रत्यय त्यांना शकार इत्संज्ञक जोडतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की अपवादाचे ठिकाणीं उत्सर्गाचें कार्य स्थानिवद्भावानें होत नाहीं.

---

१६. 'गां ददातीति गोदः' येथें दा धातूच्या पुढें प्रथमतः अण्प्रत्ययाची बुद्धि होऊन नंतर कप्रत्ययाची बुद्धि झाली आहे. तेव्हां येथें क हा प्रत्यय स्थानिवद्भावानें अण् प्रत्यय समजला तर स्त्रीलिंगी ङीप्प्रत्यय (४।१।१५) होऊं लागेल.

## तस्य दोषस्तयादेश उभयप्रतिषेधः ॥ १८ ॥

तस्यैतस्य लक्षणस्य दोषः। तयादेश उभयप्रतिषेधो वक्तव्यः। उभये देवमनुष्याः। तयपो ग्रहणेन ग्रहणाज्जसि विभाषा प्राप्नोति ॥ नैष दोषः। अयच्प्रत्ययान्तरम्। यदि प्रत्ययान्तरमुभयीतीकारो न प्राप्नोति। मा भूदेवम्। मात्रजित्येवं भविष्यति। कथम्। मात्रजिति नेदं प्रत्ययग्रहणम्। किं तर्हि। प्रत्याहारग्रहणम्। क संनिविष्टानां प्रत्याहारः। मात्रशब्दात्प्रभृत्यायचश्चकारात्। यदि प्रत्याहारग्रहणं कति तिष्ठन्ति अत्रापि प्राप्नोति। अत इति वर्तते। एवमपि तैलमात्रा घृतमात्रा अत्रापि प्राप्नोति। सदृशस्याप्यसंनिविष्टस्य न भवति प्रत्याहारग्रहणेन ग्रहणम् ॥

## जात्याख्यायां वचनातिदेशे स्थानिवद्भावप्रतिषेधः ॥१९॥

जात्याख्यायां वचनातिदेशे स्थानिवद्भावस्य प्रतिषेधो वक्तव्यः। व्रीहिभ्य आगत

(वा.१८) ह्या स्थानिवद्भाव घेतला असतां दोष येतो म्हणून उभयशब्दामध्यें तयप्प्रत्ययाचे स्थानीं झालेला जो अयच्आदेश त्याला स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें; उदा० 'उभये देवमनुष्याः' येथें तयप्प्रत्ययाचे स्थानीं झालेला जो अयच् आदेश (५।२।४४) त्याला स्थानिवद्भाव झाला तर तो तयप्प्रत्यय आहे असें समजलें जाईल. आणि पुढें जस्प्रत्यय केला असतां 'प्रथमचरम०' (१।१।३३) ह्या सूत्रानें सर्वनामसंज्ञा विकल्पानें होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. 'उभादुदात्तो नित्यम्' (५।२।४४) ह्या सूत्रानें उभशब्दाहून केलेल्या तयप्प्रत्ययाचे स्थानीं जो अयच् सांगितला आहे तो अयच् तयपाचे स्थानीं न करतां स्वतंत्रच प्रत्यय करावा म्हणजे झालें.

जर हा स्वतंत्र प्रत्यय मानला तर उभयी ह्या उदाहरणामध्यें मूळ तयप्प्रत्यय केला नसल्यामुळें 'टिड्ढाणञ्' (४।१।१५) ह्या सूत्रानें स्त्रीप्रत्यय ईकार होणार नाहीं.

उभयी ह्या ठिकाणीं तयप्प्रत्यय नाहीं म्हणून स्त्रीप्रत्यय ईकार झाला नाहीं तरी हरकत नाहीं. तेथें मात्रच् असल्यामुळें त्याच सूत्रानें ईकार करतां येईल.

तो कसा ?

'टिड्ढाणञ्' ह्या सूत्रामध्यें मात्रच् असें जें म्हटलें आहे तें मात्रच् ह्या प्रत्ययाचें उच्चारण केलें आहे असें समजूं नये तर मात्रच् हें प्रत्याहाराचें उच्चारण केलेलें आहे.

मात्रच् हा प्रत्याहार कोठपासून कोठपर्यंत समजावयाचा ?

मात्र (५।२।३७) शब्दापासून अयच् (५।२।४३) प्रत्ययाच्या चकारापर्यंत जर मात्रच् हा प्रत्याहार घेतला तर कति तिष्ठन्ति ह्या उदाहरणामध्येंही स्त्रीप्रत्यय ईकार प्राप्त होतो.

पण त्या सूत्रामध्यें अतः अशी अनुवृत्ति आहे[१७] त्यामुळें कति ह्या ठिकाणीं दोष नाहीं.

तरी पण तैलमात्रा, घृतमात्रा ह्या ठिकाणीं मात्र शब्द असल्यामुळें टिड्ढाणञ् ह्या सूत्रानें ईकार होऊं लागेल[१८].

तैलमात्रा ह्या उदाहरणांतील मात्र हा शब्द स्वरूपानें थेट मात्र असा असला तरी तो ह्या प्रत्याहारामध्यें सांपडत नाहीं ह्यामुळें दोष येत नाहीं.

(वा.१९) 'जात्याख्या०' (१।२।५८) ह्या सूत्रानें जातीची आख्या असतांना जो एकवचनाला बहुवचन आदेश सांगितला आहे त्याला स्थानिवद्भाव होत नाहीं असा निषेध केला पाहिजे. नाहीं तर व्रीहिभ्यः आगतः

१७. त्यामुळें अकारान्त शब्दाहूनच ङीप् प्रत्यय त्या सूत्रानें होतो.

१८. जरी 'टिड्ढाणञ्' (४।१।१५) या सूत्रामध्यें मात्रच् असें उच्चारलें आहे तरी तो चकार अयच् प्रत्ययाच्या प्रत्याहाराकरतां सूत्रामध्यें उच्चारका असल्यामुळें चकार इत्संज्ञक नसला तरीही मात्रशब्दापुढें ङीप् प्रत्यय होईल.

इत्यत्र घेर्ङिति [७.३.१११] इति गुणः प्राप्नोति ॥ नैष दोषः। उक्तमेतत्। अर्थातिदेशात्सिद्धमिति ॥

## ङ्याब्ग्रहणेऽदीर्घः ॥२०॥

ङ्याब्ग्रहणेऽदीर्घ आदेशो न स्थानिवदिति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। निष्कौशाम्बिः अतिखट्वः। ङ्याब्ग्रहणेन ग्रहणात्सुलोपो मा भूदिति। ननु च दीर्घादित्युच्यते। तन्न वक्तव्यं भवति। किं पुनरत्र ज्यायः। स्थानिवत्प्रतिषेध एव ज्यायान्। इदमपि सिद्धं भवति। अतिखट्वाय अतिमालाय। याडापः [७.३.११३] इति याण्न भवति। अथेदानीमसत्यपि स्थानिवद्भावे दीर्घत्वे कृते पिच्चासौ भूतपूर्व इति कृत्वा याडाप इति याट् कस्मान्न भवति। लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति। ननु चेदानीं सत्यपि स्थानिवद्भाव एतया परिभाषया शक्यमिहोपस्थातुम्। नेत्याह। न हीदानीं क्वचिदपि स्थानिवद्भावः स्यात् ॥ तत्तर्हि वक्तव्यम्।

---

ह्या ठिकाणीं व्रीहिशब्दाच्या पुढील ङसि ह्या पंचमीच्या एकवचनप्रत्ययाला जो बहुवचन भ्यस् असा आदेश झाला आहे तो स्थानिवद्भावानें ङित् आहे असें समजून मागील इकाराला 'घेर्ङिति' (७।३।१११) ह्या सूत्रानें गुण होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं, कारण 'अर्थातिदेशात् सिद्धम्' असें मागें (१।२।५८ वा.३) सांगितलें आहे.[19]

(वा.२०) ङी आणि आप् ह्यांना उच्चारून सांगितलेलें कार्य कर्तव्य असतांना ङी आप् ह्यांचे स्थानीं झालेला जो दीर्घ भिन्न म्ह. ऱ्हस्व आदेश त्याला स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें.

ह्याचा काय उपयोग ?

उपयोग असा की निष्कौशाम्बिः, अतिखट्वः, ह्या उदाहरणांमध्यें ङी आप् ह्यांचे स्थानींझालेला ऱ्हस्व आदेश (१।२।४८) तो स्थानिवद्भावानें ङी व आप् आहे असें समजून 'हल्ङ्याप्०' (६।१।६८) ह्या सूत्रानें पुढील सुप्रत्ययाचा लोप होऊं लागेल तो होऊं नये.

पण त्या सूत्रांत दीर्घात् असें म्हटलें आहे ना ?

स्थानिवद्भावाचा निषेध केला म्हणजे दीर्घात् हें म्हणावयास नको.

मग आतां येथें स्थानिवद्भावाचा निषेध करावा किंवा त्या सूत्रांत दीर्घात् असें म्हणावें, ह्या दोहोंपैकीं बरें कोणतें ?

येथें स्थानिवद्भावाचा निषेध करणें हेंच बरें. कारण त्याचा दुसरीकडेही उपयोग होत आहे. तो असा की अतिखट्वाय, अतिमालाय, ह्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भावाचा निषेध झाल्यामुळें 'याडापः' (७।३।११३) ह्या सूत्रानें याट् आगम होत नाहीं.

पण आतां ह्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भाव झाला नाहीं तरी 'सुपि च' (७।३।१०२) हा दीर्घ केल्यानंतर आतां तो आकार प्रत्यक्ष असून पूर्वीचा इत्संज्ञक पकार आहे म्हणून तो आप् आहे असें गृहीत धरून याट् आगम प्राप्त झाला तो कां होत नाहीं ?

लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्[20] ह्या परिभाषेनें होत नाहीं.

मग आतां येथें स्थानिवद्भाव झाला तरी काय हरकत आहे ?

स्थानिवद्भावाचा निषेध करावयास नको. कारण 'लक्षणप्र०' ही परिभाषा येथें येतच आहे, तेव्हां तिनेंच काम भागेल.

त्या परिभाषेनें काम भागणार नाहीं असें आम्ही म्हणतों. कारण स्थानिवद्भाव करून जें जें कार्य करावयाचें त्या त्या सर्व ठिकाणीं जर 'लक्षणप्र०' ही परिभाषा येईल तर स्थानि-

---

१९. तेव्हां तेथें ङसि प्रत्यय करून त्याचे स्थानीं भ्यस् आदेश करावयाचा असें मुळींच समजूं नये. तर व्रीहिशब्दाहून आरंभींच भ्यस् प्रत्यय केला आहे.

२०. या परिभाषेचा अर्थ मागें (१।१।१३ टीप ४) पाहा.

न वक्तव्यम् । प्रश्लिष्टनिर्देशात्सिद्धम् । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । ङी ई ईकारान्तात् आ आप् आकारान्तादिति ॥

आहिभुवोरीट्प्रतिषेधः ॥२१॥

आहिभुवोरीटः प्रतिषेधो वक्तव्यः । आत्थ अभूत् । अस्तिब्रूग्रहणेन ग्रहणादीट् प्राप्नोति ॥ आहेस्तावन्न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नाहेरीड् भवतीति यदयमाहस्थ [८.२.३५] इति झलादिप्रकरणे थत्वं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । भूतपूर्वगतिर्यथा विज्ञायेत । झलादिर्यो भूतपूर्व इति । यद्येवं थवचनमनर्थकं स्यात् । आथिमेवायमुच्चारयेत् । ब्रुवः पञ्चानामादित आथो ब्रुव इति । भवतेश्चापि न वक्तव्यः । अस्तिसिचोऽपृक्ते [७.३.९६] इति द्विसकारको निर्देशः । अस्तेः सकारान्तादिति ॥

---

वद्भावाचा कोठेंच उपयोग नाहीं असें होईल[२१].

तर मग एकंदरींत 'ङ्याप्ग्रहणेऽदीर्घः' हें वचन केलें पाहिजे असें दिसतें

तसें वचन करावयास नको. प्रश्लिष्टनिर्देशामुळें सिद्ध होतें. ङी ई आ आप् असा हा प्रश्लेषानें निर्देश केलेला आहे. त्यामुळें ईकारान्त जो ङीप्रत्यय आणि आकारान्त जो आप्प्रत्यय असा अर्थ होत असल्यामुळें निष्कौशाम्बिः वगैरे उदाहरणांमध्यें दोष येत नाहीं.

(वा.२१) ब्रू आणि अस् ह्या धातूंना क्रमानें आह (३।४।८४) आणि भू (२।४।५२) हे आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें जो ईट् आगम प्राप्त होतो तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें; नाहीं तर आत्थ ह्या उदाहरणामध्यें आह् हा आदेश स्थानिवद्भावानें ब्रू आहे असें समजून 'ब्रुव ईट्' (७।३।९३) ह्या सूत्रानें ईट् आगम होऊं लागेल. तसेंच अभूत् ह्या उदाहरणामध्यें भू हा आदेश स्थानिवद्भावानें अस् धातु आहे असें समजून 'अस्ति सिचोऽपृक्ते' (७।३।९६) ह्या सूत्रानें ईट् आगम होऊं लागेल.

आह् आदेशाच्या संबंधानें स्थानिवद्भावाचा निषेध करावयास नको. कारण हा आचार्य पाणिनि 'आहस्थः' (८।२।३५) ह्या सूत्रानें आह् ह्या आदेशाच्या हकाराला झलादि प्रत्यय पुढें असतांना थकार आदेश सांगतो, त्यावरून तो असें ज्ञापित करतो की आह् आदेश केल्यानंतर 'ब्रुव ईट्' ह्या सूत्रानें ईट् आगम होत नाहीं.

पण हें ज्ञापक जुळत नाहीं. कारण ईट् आगम झाला तरी 'आहस्थः' ह्या सूत्राचा उपयोग दुसऱ्या तऱ्हेनें संभवतो.

तो कसा ?

तो असा की भूतपूर्वगति येथें घेतली जाईल. म्हणजे जो प्रत्यय पूर्वी झलादि होता तो आतां झलादि नसला तरि 'आहस्थः' ह्यानें थकार आदेश करतां येईल.

असेंच जर असेल तर 'आहस्थः' हें सूत्रच मुळीं फुकट होईल. कारण भूतपूर्वगतीनें सर्वच ठिकाणीं थकार आदेश प्राप्त होत असल्यानें[२२] 'ब्रुवः पञ्चानामादित आथो ब्रुवः' (३।४।८४) असा आथ् आदेशच सांगितला असता.

भू धातूच्या संबंधानेंही स्थानिवद्भावाचा निषेध सांगावयास नको. कारण 'अस्तिसिचोऽपृक्ते' (७।३।९६) ह्या सूत्रामध्यें दोन सकारांचें उच्चारण केलें आहे. त्यामुळें सकारान्त जो अस् धातु असा अर्थ होत असल्यामुळें अभूत् ह्या ठिकाणीं ईट् आगम होणार नाहीं[२३].

(वा.२२) हन् धातूला वध् आदेश केल्या-

---

२१. तेव्हां स्थानिवद्भावाच्या सामर्थ्यास्तव त्या ठिकाणीं 'लक्षणप्रति०' ही परिभाषा येत नाहीं.

२२. णल्, अतुस्, उस्, थल् आणि अथुस् हे पांचही प्रत्यय मूळचे तिप्, तस्, झि, सिप् आणि थस् असे झलादि असल्यामुळें त्या सर्व ठिकाणीं थकारआदेशाची प्राप्ति येत आहे.

२३. भू हा आदेश स्थानिवद्भावानें अस् धातु आहे असें मानतां येईल. पण सकारान्त आहे असें

**वध्यादेशे वृद्धितत्वप्रतिषेधः ॥२२॥**

वध्यादेशे वृद्धितत्वयोः प्रतिषेधो वक्तव्यः । वधकं पुष्करमिति । स्थानिवद्भावाद्वृद्धितत्वे प्राप्नुतः ॥ नैष दोषः । उक्तमेतत् । नायं ण्वुल् अन्योऽयमकशब्दः किदौणादिको रुचक इति यथा ॥

**इड्विधिश्च ॥२३॥**

इड्विधेयः । आवधिषीष्ट । एकाच उपदेशेऽनुदात्तात् [७.२.१०] इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । आद्युदात्तनिपातनं करिष्यते । स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति । एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । यथैव हि निपातनस्वरः प्रकृतिस्वरं बाधत एवं प्रत्ययस्वरमपि बाधेत । आवधिषीष्टेति । नैष दोषः । आर्धधातुकीयाः सामान्येन भवन्त्यनवस्थितेषु प्रत्ययेषु । तत्रार्धधातुकसामान्ये वधिभावे कृते सति शिष्टत्वात्प्रत्ययस्वरो भविष्यति ॥

**आकारान्तान्नुक्षुक्प्रतिषेधः ॥२४॥**

आकारान्तान्नुक्षुकोः प्रतिषेधो वक्तव्यः । विलापयति भापयते । लीभीग्रहणेन ग्रहणान्नुक्षुकौ प्राप्नुतः ॥ लीभियोः प्रश्लिष्टनि-

---

नंतर स्थानिवद्भावानें वृद्धि व तकारादेश हे प्राप्त होतात त्यांचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर वधकम्, पुष्करम्, ह्या उदाहरणांमध्यें हन् धातूला वध् आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें वध् हें अंग आहे आणि हन् धातु आहे असें समजून 'अत उपधायाः' (७।२।११६) ह्या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते व 'हनस्तो चिण्णलोः' (७।३।३२) ह्या सूत्रानें तकारादेश प्राप्त होतो तो होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण वधक ह्या शब्दांतील अक हा जो प्रत्यय आहे तो ण्वुल् प्रत्यय नव्हे, तर रुचक शब्दाप्रमाणें हा निराळाच अक असा कित् प्रत्यय औणादिक आहे असें पूर्वी (पृ.३३९) सांगितलेंच आहे.

(वा.२३) इडागमाचें विधान केलें पाहिजे. नाहीं तर आवधिषीष्ट ह्या उदाहरणामध्यें हन् धातूला वध् आदेश केल्यानंतर वध् हें स्थानिवद्भावानें अंग आहे असें समजून 'एकाच उपदेशेनुदात्तात्' (७।२।१०) ह्या सूत्रानें इडागमाचा निषेध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण वध् आदेश हा आद्युदात्त स्वराचा उच्चारला म्हणजे झालें. तो मुद्दाम उच्चारलेला आद्युदात्त स्वर हा हन् ह्या मूळ प्रकृतीच्या अनुदात्त स्वराचा बाधक[२४] होईल.

असें आद्युदात्त स्वराचें निपातन केलें तरी हा वध् आदेश मूळ उपदेशांतच होतो असें मुद्दाम सांगितलें पाहिजे. नाहीं तर आवधिषीष्ट ह्या उदाहरणामध्यें तो वध् ह्याचा आद्युदात्त स्वर जसा हन् ह्याच्या अनुदात्त स्वराचा बाध करतो तसा पुढील प्रत्ययाच्या उदात्त स्वराचाही बाध करील.

हा दोष येत नाहीं. कारण 'आर्धधातुके' २।४।३५) ह्या अधिकारामध्यें सांगितलेले जे आदेश ते सामान्यतः पुढें प्रत्यय करण्याच्या पूर्वींच होतात. तेव्हां कोणता तरी आर्धधातुक प्रत्यय पुढें करावयाचा आहे इतकेंच मोघम मनांत धरून आरंभींच हन् धातूला वध् आदेश केल्यानंतर पाठीमागून झालेला प्रत्ययाचा स्वर शेवटचा आहे म्हणून कायम राहील.

(वा.२४) आकारान्ताला नुक् व षुक् हे आगम होत नाहींत असा प्रतिषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर विलापयति, भापयते ह्या उदाहरणांमध्यें ली आणि भी ह्या धातूंना आत्व (६।१।५१ व ६।१।५६) केल्यानंतर स्थानिवद्भावानें ते ली आणि भी धातु आहेत असें समजून नुक् (६।३।३९) आणि षुक् (६।३।

---

मात्र स्थानिवद्भावानें मानतां येणार नाहीं. कारण अनल्विधौ हा स्थानिवद्भावाचा निषेध आहे.

२४. तेव्हां वध आदेश हा हन् या स्थानी-सारखा अनुदात्त न झाल्यामुळें 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' यानें इडागमाचा निषेध होत नाहीं.

र्देशात्सिद्धम् । लीभियोः प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । ली ई ईकारान्तस्य । भी ई ईकारान्तस्य चेति ॥

## लोडादेशे शाभावजभावधित्वहिलोपैत्त्वप्रतिषेधः ॥२५॥

लोडादेश एषां प्रतिषेधो वक्तव्यः । शिष्टात् हतात् भिन्तात् कुरुतात् स्तात् ॥ लोडादेशे कृते शाभावो जभावो धित्वं हिलोप एत्त्वमित्येते विधयः प्राप्नुवन्ति ॥ नैष दोषः । इदमिह संप्रधार्यम् । लोडादेशः क्रियतामेते विधय इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोडादेशः । अथेदानीं लोडादेशे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानात्कस्मादेते विधयो न भवन्ति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति कृत्वा ॥

## त्रयादेशे स्रन्तप्रतिषेधः ॥२६॥

त्रयादेशे स्रन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । तिसृणाम् । तिसृभावे कृते त्रेस्त्रयः [७.१.५३] इति त्रयादेशः प्राप्नोति ॥ नैष दोषः । इदमिह संप्रधार्यम् । तिसृभावः क्रियतां त्रयादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्तिसृभावः । अथेदानीं तिसृभावे कृते पुनः-

---

४०) हे आगम होऊं लागतील.

नुक्, षुक् सांगणाऱ्या सूत्रामध्यें ली आणि भी ह्यांच्यापुढें प्रश्लेषानें ईकार जास्ती उच्चारला आहे. ली, ई व भी, ई. तेव्हां ईकारान्त जो ली धातु त्याला नुक् आगम होतो आणि ईकारान्त जो भी धातु त्याला षुक् आगम होतो, असा अर्थ होत असल्यामुळें कांहीं दोष येत नाहीं.

(वा.२५) लोटाला तातङ् आदेश केल्यानंतर जे हे शा वगैरे आदेश प्राप्त होतात त्यांचा निषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर शिष्टात्, हतात्, भिन्तात्, कुरुतात् आणि स्तात् ह्या उदाहरणांमध्यें लोटाचे स्थानीं झालेला जो हि आदेश त्याला तातङ् आदेश केल्यानंतर तो तातङ् आदेश स्थानिवद्भावानें हि आहे असें समजून शा आदेश (६।४।३५), ण आदेश (६।४।३६), धि आदेश (६।४।१०१), हि प्रत्ययाचा लोप (६।४।१०६) आणि एकार आदेश (६।४।११९), हे विधि होऊं लागतील.

हा दोष येत नाहीं. अगोदर असा येथें विचार उत्पन्न होतो की हा तातङ् आदेश अगोदर करावा किंवा शा आदेश वगैरे विधि अगोदर करावेत.

मग आतां तुमचें काय म्हणणें आहे ?

आमचें म्हणणें असें की शा आदेश वगैरें पेक्षां परत्वास्तव, तातङ् आदेश अगोदर करावा.

मग आतां तो तातङ् आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें शा वगैरे आदेशांची पुनः प्राप्ति येत असल्यामुळें ते विधि कां होत नाहींत ?

सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव म्हणजे 'दोन कार्यांची एके ठिकाणीं एकदम प्राप्ति येऊन त्या दोहोंमध्यें बरोबरीच्या नात्यानें विरोध उत्पन्न झाला असतां परत्वामुळें 'जो बाध होतो तो कायमचाच बाध समजला जातो, म्हणजे पुनः प्राप्ति आली असतांही तें कार्य होत नाहीं' ह्या परिभाषेनें शा वगैरे आदेश पुनः प्राप्त झाले तरी होणार नाहींत.

(वा.२६) सृ अंतीं असलेल्या तिसृ ह्याला त्रय आदेश कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. नाहीं तर तिसृणाम् ह्या उदाहरणामध्यें तिसृ आदेश (७।२।९९) केल्यानंतर तो स्थानिवद्भावानें त्रि शब्द आहे असें समजून 'त्रेस्त्रयः' (७।१।५३) ह्या सूत्रानें त्रय आदेश प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. असा येथें विचार उत्पन्न होतो की हा त्रि शब्दाला तिसृ आदेश अगोदर करावा किंवा त्रय आदेश अगोदर करावा.

मग आतां तुमचें काय म्हणणें आहे ?

आमचें म्हणणें असें की त्रयादेशापेक्षां

प्रसङ्गविज्ञानात्त्रयादेशः कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

## आम्विधौ च ॥२७॥

आम्विधौ च स्रन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । चतस्रस्तिष्ठन्ति । चतसृभावे कृते चतुरनडुहोरामुदात्तः [७.१.९८] इत्याम्प्राप्नोति ॥ नैष दोषः । इदमिह संप्रधार्यम् । चतसृभावः क्रियतां चतुरनडुहोरामुदात्त इत्यामिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाच्चतसृभावः । अथेदानीं चतसृभवो कृते पुनःप्रसङ्गविज्ञानादाम्कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

## स्वरे वस्वादेशे ॥२८॥

स्वरे वस्वादेशे प्रतिषेधो वक्तव्यः । विदुषः पश्य । शतुरनुमो नद्यजादी अन्तोदात्तादित्येष स्वरः प्राप्नोति ॥ नैष दोषः । अनुम इति प्रतिषेधो भविष्यति । अनुम इत्युच्यते न चात्र नुमं पश्यामः । अनुम इति नेदमागमग्रहणम् । किं तर्हि । प्रत्याहारग्रहणम् । क संनिविष्टानां प्रत्याहारः ।

---

तिसृ आदेश परत्वास्तव अगोदर करावा.

मग आतां तो तिसृ आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें त्रयादेशाची पुनः प्राप्ति येत असल्यामुळें तो आदेश कां होत नाहीं ?

'सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव' ह्या परिभाषेनें होत नाहीं.

(वा.२७) स्र अंतीं असलेल्या चतसृ ह्याला आम् आगम कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. नाहीं तर चतस्रस्तिष्ठन्ति ह्या उदाहरणामध्यें चतुर् शब्दाला चतसृ आदेश (७।२।९९) केल्यानंतर तो स्थानिवद्भावानें चतुर् शब्द आहे असें समजून 'चतुरनडुहोराम् उदात्तः' (७।१।९८) ह्या सूत्रानें आम् आगम प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. अगोदर असा येथें विचार उत्पन्न होतो की हा चतुर् शब्दाला चतसृ आदेश पूर्वी करावा किंवा 'चतुरनडुहोराम् उदात्तः' ह्या सूत्रानें आम् आगम पूर्वी करावा.

मग आतां तुमचें काय म्हणणें आहे ?

आमचें म्हणणें असें आहे की आम् ह्या आगमापेक्षां परत्वास्तव चतसृ आदेश पूर्वी करावा.

मग आतां तो चतसृ आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें आम् ह्या आगमाची पुनः प्राप्ति येत असल्यामुळें तो आगम कां होत नाहीं ?

'सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव' ह्या परिभाषेनें होत नाहीं.

(वा.२८) शतृप्रत्ययाला वसु आदेश (७।१।३६) केल्यानंतर स्वर कर्तव्य असतांना त्याला स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. नाहीं तर विदुषः पश्य ह्या उदाहरणांमध्यें वसु हा आदेश स्थानिवद्भावानें शतृ प्रत्यय आहे असें समजून 'शतुरनुमो नद्यजादी' (६।१।१७३) ह्या सूत्रानें विद्वस् या अंतोदात्त शब्दाच्या पुढील शस् प्रत्ययाला उदात्त स्वर प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण अनुमः असा त्याचा निषेध होईल.

पण अनुमः म्हणजे नुम् नसावा असें तेथें म्हटलें आहे. आणि विदुषः येथें तर नुम् आगम झालेला कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. तेव्हां तो निषेध कसा होईल ?

अनुमः ह्यांत नुम् आगमाचें ग्रहण केलें आहे असें समजूं नये. तर तेथें उम् ह्या प्रत्याहाराचें ग्रहण केलें आहे.[२५]

हा उम् प्रत्याहार कोठपासून कोठपर्यंत समजावा ?

---

२५. सूत्रामध्यें जें अनुमः असें म्हटलें आहे तेथें तो नञाचा तत्पुरुषसमास नुम्शब्दाशीं केला नाहीं, तर उम्शब्दाशीं केला आहे.

उकारात्प्रभृत्या नुमो मकारात् । यदि प्रत्याहारग्रहणं लुनता पुनता अत्रापि प्राप्नोति । अनुम्ग्रहणेन न शत्रन्तं विशेष्यते । किं तर्हि । शत्रैव विशेष्यते शता योऽनुम्क इति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । आगमग्रहणे हि सतीह प्रसज्येत । मुञ्चता मुञ्चत इति ॥

## गोः पूर्वणित्त्वात्वस्वरेषु ॥२९॥

गोः पूर्वणित्त्वात्वस्वरेषु प्रतिषेधो वक्तव्यः । चित्रग्वग्रम् शबलग्वग्रम् । सर्वत्र विभाषा गोः [६.१.१२२] इति विभाषा पूर्वत्वं प्राप्नोति ॥ नैष दोषः । एङ इति वर्तते तत्रानल्विधाविति प्रतिषेधो भविष्यति । एवमपि हे चित्रगो अग्रम् अत्र प्राप्नोति ॥ णित्त्वम् । चित्रगुः चित्रगू चित्रगवः । गोतो णित् [७.१.९०] इति णित्त्वं प्राप्नोति ॥ आत्वम् । चित्रगुं पश्य । शबलगुं पश्य । आ ओत इत्यात्वं प्राप्नोति ॥ नैष दोषः । तपरकरणात्सिद्धम् । तपरकरणसामर्थ्याण्णित्त्वात्वे न भविष्यतः ।

'तनादिकृञ्भ्य उः' (३।१।७९) ह्या सूत्रांतील उकारापासून 'इदितो नुम् धातोः' (७।१।५८) ह्या सूत्रांतील नुम् ह्या आगमाच्या मकारापर्यंत उम् प्रत्याहार[२६] आहे.

असा जर उम् प्रत्याहार तेथें घेतला तर लुनता, पुनता, ह्या ठिकाणींही अनुमः हा निषेध होईल. कारण उम् प्रत्याहारांतील श्ना (३।१।८१) प्रत्यय तेथें झाला आहे.

अनुमः हें शतृप्रत्ययान्त अंगाचें विशेषण आहे असें समजूं नये, तर शतृप्रत्ययाचेंच विशेषण आहे. म्हणजे उम्प्रत्याहारापैकीं कोणीही शतृप्रत्ययामध्यें नसावा. शतृप्रत्ययाच्या मागें अंगांत असला तरी चालेल. आणि असें अवश्य मानलेंच पाहिजे. नाहीं तर अनुमः ह्यांत नुम् आगमाचें ग्रहण केलें तरी मुञ्चता, मुञ्चते, ह्या ठिकाणीं अनुमः हा निषेध होऊं लागेल.

(वा.२९) गो शब्दाला सांगितलेले जें पूर्वरूप णित्त्व, आत्व आणि स्वर हे विधि ते कर्तव्य असतांना गोशब्दाचे स्थानीं झालेल्या आदेशांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें; उदाहरण—चित्रग्वग्रम्, शबलग्वग्रम्. येथें चित्रगु, शबलगु असा गोशब्दाला ऱ्हस्व (१।२।४८) केल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव करून हा गो शब्द आहे असें समजून 'सर्वत्र विभाषा गोः' (६।१।१२२) ह्या सूत्रानें विकल्पानें पूर्वरूप प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ह्या पूर्वरूप सांगणाऱ्या सूत्रामध्यें एङः ह्या पदाची अनुवृत्ति आहे आणि स्थानिवद्भावानें एङंत गो शब्द असें समजतां येत नाहीं. कारण अनल्विधौ असा स्थानिवद्भावाचा निषेध आहे.

तरी पण हे चित्रगो अग्रम् ह्या ठिकाणीं स्थानिवद्भावानें पूर्वरूप होईल हा दोष येतोच[२७]. तसेंच चित्रगुः, चित्रगू, चित्रगवः, ह्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भावानें गो शब्द आहे असें समजून 'गोतो णित्' (७।१।९०) ह्या सूत्रानें णित्त्व प्राप्त होतें. तसेंच चित्रगुं पश्य, शबलगुं पश्य, ह्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भावानें गो शब्द आहे असें समजून (आगोतोम्शसोः ६।१।९३) ह्यानें आत्व प्राप्त होत आहे.

हे दोन्ही दोष येत नाहींत. तपरकरणामुळें सिद्ध होतें. गोतः असें तपरकरण केलें असल्यामुळें गोशब्दाला ऱ्हस्व केल्यानंतर णित्त्व आणि आत्व हे विधि होणार नाहींत[२८].

बहुगुमान् ह्या उदाहरणामध्यें गोशब्दाला समजण्याचें कारण नाहीं, म्हणून अनल्विधौ हा निषेध येत नाहीं.

२६. त्या उम्प्रत्याहारामध्यें वसु आदेश (७।१।३६) सांपडत असल्यामुळें अनुमः हा निषेध येतो म्हणून प्रत्ययाला उदात्त स्वर होत नाहीं.

२७. कारण तेथें गुण (७।३।१०८) झाल्यानंतर एङंत स्वराच असल्यामुळें स्थानिवद्भावानें एङंत

२८. तपरकरण केलें असल्यामुळें ओकार कायम असेल तेथेंच णित्त्व आणि आत्व होतील.

स्वर । बहुगुमान् । न गोश्वन्साववर्ण [६ १.१८२] इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥

**करोतिपिब्योः प्रतिषेधः ॥३०॥**

करोतिपिब्योः प्रतिषेधो वक्तव्यः । कुरु पिबेति । स्थानिवद्भावाल्लघूपधगुणः प्राप्नोति ॥

**उक्तं वा ॥३१॥**

किमुक्तम् । करोतौ तपरकरणनिर्देशात्सिद्धं पिबिरदन्त इति ॥

**अचः परस्मिन्पूर्वविधौ ॥१.१.५७**

अच इति किमर्थम् । प्रश्नः । द्यूत्वा । आक्राष्टाम् । आगत्य ॥ प्रश्नः विश्न इत्यत्र छकारस्य शकारः परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावाच्छे च [६.१.७३] इति तुक्प्राप्नोति । अच इति वचनान्न भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियमाणेऽपि वा अज्ग्रहणेऽवश्यमत्र तुगभावे यत्नः कर्तव्यः । अन्तरङ्गत्वाद्धि तुक्प्राप्नोति ॥ इदं तर्हि । द्यूत्वा स्यूत्वा । वकारस्य ऊठ् परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावादचीति यणादेशो न प्राप्नोति । अच इति वचनाद्भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्वाश्रयमत्राच्त्वं

---

ऱ्हस्व केल्यानंतर स्थानिवद्भावानें तो गोशब्द आहे असें समजून 'न गोश्वन्साववर्ण०' (६।१।१८२) ह्या सूत्रानें मतुप् प्रत्ययाच्या[२९] उदात्त स्वराचा निषेध प्राप्त होत आहे.

(वा. ३०) करोति आणि पिबति ह्या ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. नाहीं तर कुरु ह्या ठिकाणीं उत्व केल्यानंतर आणि पिबति ह्या ठिकाणीं पिब् आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें अंग आहे असें समजून लघूपधगुण (७।३।८६) होऊं लागेल.

(वा. ३१) अथवा ह्याच्या संबंधानें पूर्वी सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

करोतौ तपरकरणनिर्देशात् सिद्धम् पिबिरदन्तः (पृष्ठ ३३९).

(सू. ५७) ह्या सूत्रामध्यें अचः हें पद कशाकरितां घातलें आहे ?

प्रश्नः, विश्नः, द्यूत्वा, स्यूत्वा, आक्राष्टाम्, आगत्य, हीं उदाहरणें साधण्याकरितां घातलें आहे. प्रश्नः, विश्नः, ह्या उदाहरणांमध्यें छकाराला जो श आदेश (६।४।१९) झाला आहे तो पुढील प्रत्ययाच्या निमित्तानें झाला आहे. तो शकार स्थानिवद्भावानें छकार आहे असें समजून 'छे च' (६।१।७३) ह्या सूत्रानें तुक् आगम प्राप्त होतो. प्रकृतसूत्रामध्यें अचः असें म्हटलें म्हणजे येथें स्थानिवद्भाव होत नाहीं. कारण हा शकार आदेश अचाचे स्थानीं झालेला नाहीं.

अचः ह्या पदाचा उपयोग बरोबर नाहीं. कारण अचः हा शब्द येथें घातला तरी येथें तुक् आगम न होण्याकरितां कांहीं तरी यत्न अवश्य केलाच पाहिजे. नाहीं तर शकार आदेश करण्याच्या पूर्वीच अंतरंगत्वास्तव तुक् आगम होऊं लागेल.

तर मग अचः ह्या शब्दाचा दुसरा उपयोग द्यूत्वा, स्यूत्वा, हा घ्या. ह्या ठिकाणीं पराच्या निमित्तानें झालेला वकाराला ऊठ् आदेश (६।४।१९) स्थानिवद्भावानें वकार आहे असें समजलें तर अच् पुढें असतांना सांगितलेला यण् आदेश होणार नाहीं. आतां ह्या सूत्रामध्यें अचः असें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव होत नसल्यामुळें यण् होईल.

हाही अचः ह्याचा उपयोग नाहीं. कारण ऊ हा आदेश स्थानिवद्भावानें वकार समजला गेला तरी स्वतः अच् असल्यामुळें यण् करतां येईल. अथवा ह्या ठिकाणीं आदेश जो ऊठ्

---

२९. तेव्हां अर्थातच तेथें स्थानिवद्भाव होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे.

१. पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश त्याच्या स्थानी अच् असतांना त्याच्यापूर्वी असलेला जो वर्ण त्याला कार्य कर्तव्य असेल तर स्थानिवद्भाव होतो.

भविष्यति। अथवा योऽत्रादेशो नासावाश्रीयते यश्चाश्रीयते नासावादेशः ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। आक्राष्टाम्। सिचो लोपः परनिमित्तकः। तस्य स्थानिवद्भावात्षढोः कः सि [८.२.४१] इति कत्वं प्राप्नोति। अच इति वचनान्न भवति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। वक्ष्यत्येतत्। पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। आगत्य अभिगत्य। अनुनासिकलोपः परनिमित्तकः। तस्य स्थानिवद्भावाद्ह्रस्वस्येति तुग्न प्राप्नोति। अच इति वचनाद्भवति ॥

अथ परस्मिन्निति किमर्थम्। युवजानिः। द्विपदिका। वैयाघ्रपद्यः। आदीध्ये॥ युवजानिः वधूजानिरिति जायाया निङ् [५.४.१३४] न परनिमित्तकः। तस्य स्थानिवद्भावाद्वलीति यलोपो न प्राप्नोति। परस्मिन्निति वचनाद्भवति। नैतदस्ति प्रयोजनम्। स्वाश्रयमत्र वल्त्वं भविष्यति। अथवा योऽत्रादेशो नासावाश्रीयते यश्चाश्रीयते नासावादेशः॥ इदं तर्हि प्रयोजनम्। द्विपदिका त्रिपदिका। पादस्य लोपो न परनिमित्तकः। तस्य स्थानिवद्भावात्पद्भावो न

---

तो यणाला निमित्त म्हणून धरलेला नाहीं. आणि जो त्यांतील ऊकार अच् म्हणून यणाला निमित्त धरला जातो तो आदेशच नव्हे.

तर मग अचः ह्याचा उपयोग आक्राष्टाम् हा घ्या. ह्या ठिकाणीं पराच्या निमित्तानें झालेला सिचाचा लोप (८।२।२६) स्थानिवद्भावानें सकार आहे असें समजून त्याच्या मागील षकाराला 'षढोः कः सि' (८।२।४१) ह्या सूत्रानें ककार आदेश होऊं लागेल. अचः असें ह्या सूत्रामध्यें म्हटलें म्हणजे येथें स्थानिवद्भाव होत नाहीं.

हाही उपयोग अचः ह्याचा नाहीं. कारण 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' (१।१।५८ वा.३) असें वार्तिककार पुढें सांगणार आहेत.

तर मग आगत्य, अभिगत्य, हीं उदाहरणें घ्या. ह्या ठिकाणीं पराचे निमित्तानें झालेला अनुनासिकाचा म्हणजे मकाराचा लोप (६।४।३७) त्याला स्थानिवद्भाव झाला तर मध्यें मकार आहे असें समजून 'ह्रस्वस्य०' (६।१।७२) ह्या सूत्रानें तुक् आगम होणार नाहीं. अचः असें येथें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव होत नसल्यामुळें तुक् आगम करितां येतो.

आतां ह्या सूत्रामध्यें परस्मिन् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

युवजानिः, वधूजानिः, द्विपदिका, वैयाघ्रपद्यः, आदीध्ये, हीं उदाहरणें साधण्याकरितां म्हटलें आहे. ह्यांपैकीं युवजानिः, वधूजानिः. ह्या उदाहरणांमध्यें 'जायाया निङ्'(५।४।१३४) ह्या सूत्रानें झालेला निङ् आदेश पराच्या निमित्तानें झालेला नाहीं, जर त्याला स्थानिवद्भाव होईल तर वल् पुढें असतांना सांगितलेला यकाराचा लोप (६।१।६६) होणार नाहीं. परस्मिन् असें येथें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव न झाल्यामुळें यकाराचा लोप करितां येतो.

हा परस्मिन् ह्याचा उपयोग संभवत नाहीं. कारण स्थानिवद्भाव झाला असतांही निङ् ह्या आदेशांतील नकार स्वतः वल् असल्यामुळें त्याच्या निमित्तानें यकाराचा लोप करितां येईल. अथवा, ह्या ठिकाणीं आदेश जो निङ् तो यलोपाला निमित्त म्हणून धरलेला नाहीं. आणि जो त्यांतील नकार वल् म्हणून यलोपाला निमित्त धरला जातो तो आदेशच नव्हे;

तर मग, द्विपदिका, त्रिपदिका हा परस्मिन् ह्याचा उपयोग घ्या. येथें पाद ह्याच्या अकाराचा जो लोप (५।४।१) झालेला आहे तो पराच्या निमित्तानें झालेला नाहीं. जर त्याला स्थानिवद्भाव होईल तर हें पाद् असें दकारान्त नाहीं असें समजून पत् आदेश (६।४।१३०) होणार नाहीं. परस्मिन् असें येथें म्हटलें

प्राप्नोति । परस्मिन्निति वचनाद्भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । पुनर्लोपवचनसामर्थ्यात्स्थानिवद्भावो न भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । वैयाघ्रपद्यः । ननु चात्रापि पुनर्वचनसामर्थ्यादेव भविष्यति । अस्ति ह्यन्यत्पुनर्लोपवचने प्रयोजनम् । किम् । यत्र भसंज्ञा न । व्याघ्रपात् श्येनपादिति ॥ इदं चाप्युदाहरणम् । आदीध्ये आवेव्ये । इकारस्यैकारो न परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावाद्यीवर्णयोर्दीधीवेव्योः [७.४.५३] इति लोपः प्राप्नोति । परस्मिन्निति वचनान्न भवति ॥

अथ पूर्वविधाविति किमर्थम् । हे गौः । बाभ्रवीयाः । नैधेयः ॥ हे गौरित्यौकारः परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावादेङ्ह्रस्वात्संबुद्धेः [६.१.६९] इति लोपः प्राप्नोति । पूर्वविधाविति वचनान्न भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न संबुद्धिलोपे स्थानिवद्भावो भवतीति यदयमेङ्ह्रस्वात्संबुद्धेरित्येङ्ग्रहणं करोति । नैतदस्ति ज्ञापकम् । गोऽर्थमेतत्स्यात् । यत्तर्हि प्रत्याहारग्रहणं करोति ।

म्हणजे स्थानिवद्भाव न झाल्यामुळें पत् आदेश करितां येतो.

हा देखील परस्मिन् ह्याचा उपयोग संभवत नाहीं. कारण 'यस्येति च' (६।४।१४८) ह्यानें लोप होत असूनही ज्या अर्थी 'पादशतस्य०' (५।४।१) ह्यानें पुनः लोप सांगितला आहे; त्या अर्थी त्याच्या सामर्थ्यामुळें स्थानिवद्भाव होणार नाहीं.

तर मग परस्मिन् ह्याचा वैयाघ्रपद्यः हा उपयोग घ्या.

पण येथेंही 'यस्येति च' ह्यानें लोप होत असूनही ज्या अर्थी 'पादस्य लोपो'(५।४।१३८) ह्यानें लोप सांगितला आहे त्या अर्थी त्याच्या सामर्थ्यामुळें स्थानिवद्भाव होणार नाहीं.

हा जो पुनः लोप सांगितला आहे त्याचा दुसरीकडे उपयोग होत आहे.

तो कोणता ?

ज्या ठिकाणीं भ संज्ञा नसल्यामुळें 'यस्येति च' ह्यानें लोप होत नाहीं त्या ठिकाणीं म्हणजे व्याघ्रपात्, श्येनपात्, येथें लोप झाला पाहिजे.

आदीध्ये, आवेव्ये हीं देखील परस्मिन् ह्याचीं प्रत्युदाहरणें आहेत. ह्या ठिकाणीं इकाराला जो एकार (३।४७९) झाला आहे तो पराच्या निमित्तानें झालेला नाहीं. जर त्याला स्थानिवद्भाव होईल तर तो इकार आहे असें समजून 'यीवर्णयोर्दीधीवेव्योः' (७।४।५३) ह्या सूत्रानें धातूच्या ईकाराचा लोप होऊं लागेल. येथें परस्मिन् असें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव न झाल्यामुळें तो लोप होत नाहीं.

आतां ह्या सूत्रामध्यें पूर्वविधौ असें कशाकरितां म्हटलें आहे ?

हे गौः, बाभ्रवीयाः, नैधेयः, हीं उदाहरणें सिद्ध होण्याकरितां म्हटलें आहे. हे गौः ह्या ठिकाणीं गोशब्दांतील ओकाराला जो वृद्धीनें औकार आदेश झालेला आहे (७।२।११५) तो पराच्या निमित्तानें झालेला आहे,त्याला स्थानिवद्भाव झाला तर तो एङ् आहे असें समजून 'एङ्ह्रस्वात् संबुद्धेः' (६।१।६९) ह्या सूत्रानें पुढील संबुद्धिप्रत्ययाचा लोप होऊं लागेल. पूर्वविधौ असें येथें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव होत नाहीं आणि लोपही होत नाहीं.

पूर्वविधौ ह्याचा हा उपयोग आहे असें दिसत नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि 'एङ्ह्रस्वात् संबुद्धेः' ह्या सूत्रामध्यें एङ् असा शब्द घालतो. त्यावरून तो असें ज्ञापित करतो की संबुद्धिप्रत्ययाचा लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं.

हें ज्ञापक जुळत नाहीं. कारण गोशब्दा-

२. हे हरे, हे विष्णो, येथें पुढील संबुद्धिप्रत्ययाचा लोप होण्याकरतां एङ्ग्रहण केलें आहे, परंतु जर गुणाला (७।३।१०८) स्थानिवद्भाव झाला तर एङ् नसल्यामुळें लोप होणार नाहीं, म्हणून एङ्ग्रहण व्यर्थ होतें.

इतरथा ह्योड्ह्स्वादित्येव ब्रूयात्॥ इदं तर्हि प्रयोजनम् । बाभ्रवीयाः माधवीयाः । वान्तादेशः परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावाद्धलस्तद्धितस्य [६.४.१५०] इति यलोपो न प्राप्नोति । पूर्वविधाविति वचनाद्भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्वाश्रयमत्र हल्त्वं भविष्यति । अथवा योऽवादेशो नासावाश्रीयते यश्चाश्रीयते नासावादेशः ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । नैधेयः । आकारलोपः परनिमित्तकः । तस्य स्थानिवद्भावाद्व्यज्लक्षणो ढग्न प्राप्नोति । पूर्वविधाविति वचनाद्भवति ॥

अथ विधिग्रहणं किमर्थम् । सर्वविभक्त्यन्तः समासो यथा विज्ञायेत । पूर्वस्य विधिः पूर्वविधिः । पूर्वस्माद्विधिः पूर्वविधिरिति । कानि पुनः पूर्वस्माद्विधौ स्थानिवद्भावस्य प्रयोजनानि । बेभिदिता । माथितिकः । अपीपचन् ॥ बेभिदिता चेच्छिदिते त्य-

---

करितां त्या सूत्रामध्यें एङ् हा शब्द पाहिजे आहे असेंही म्हणतां येईल.

तर मग 'ओर्ह्स्वात्' असें म्हणावयाचें तें न म्हणतां जो एङ् हा प्रत्याहारशब्द उच्चारला आहे त्यावरून 'संबुद्धीचा लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं' ही गोष्ट ज्ञापित होईल.

तर मग पूर्वविधौ ह्या शब्दाचा उपयोग बाभ्रवीयाः[३], माधवीयाः हा घ्या. ह्या ठिकाणीं अव् हा वकारान्त आदेश (६।१।७९) पराच्या निमित्तानें झालेला आहे. त्याला स्थानिवद्भाव झाला तर तो ओकार आहे असें समजून 'हलस्तद्धितस्य' (६।४।१५०) ह्या सूत्रानें अपत्यप्रत्ययाच्या यकाराचा लोप होणार नाहीं. पूर्वविधौ असें येथें म्हटलें म्हणजे स्थानिवद्भाव न झाल्यामुळें यकाराचा लोप करितां येतो.

हा देखील पूर्वविधौ ह्याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. स्थानिवद्भाव झाला असतांही अव् ह्या आदेशांतील वकार हा स्वतः हल् असल्यामुळें त्याच्या निमित्तानें यकाराचा लोप करितां येईल; अथवा, ह्या ठिकाणीं आदेश जो अव् तो यलोपाला निमित्त म्हणून धरलेला नाहीं आणि जो त्यांतील वकार हल् म्हणून यलोपाला निमित्त धरला जातो तो आदेशच नव्हे.

तर मग पूर्वविधौ ह्याचा उपयोग नैधेयः हा घ्या. ह्या ठिकाणीं निधिशब्दांतील धा-धातूच्या आकाराचा लोप (६।४।६४) हा पुढील किप्रत्ययाच्या (३।३।९२) निमित्तानें झालेला आहे. त्याला स्थानिवद्भाव झाला तर निधि हा शब्द द्व्यच्क होत नसल्यामुळें द्व्यचाला मानून सांगितलेला ढक् प्रत्यय (४।१।१२२) होणार नाहीं. पूर्वविधौ असें येथें म्हटलें म्हणजे येथें स्थानिवद्भाव न झाल्यामुळें ढक् प्रत्यय करितां येतो.

आतां ह्या सूत्रामध्यें विधि हा शब्द कशाकरितां घातला आहे?

सर्वविभक्तीशीं समास झाला पाहिजे म्हणून विधिशब्द घातला आहे. तो असा की पूर्वाला होणारा जो विधि तोही पूर्वविधि आणि पूर्वाहून पुढच्याला होणारा जो विधि तोही पूर्वविधि, असे पूर्वविधि ह्या शब्दाचे दोन्ही अर्थ घेतां आले पाहिजेत.

पण पूर्वाहून पुढच्याला होणारा जो विधि तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो ह्या अर्थाचीं उदाहरणें कोणतीं?

बेभिदिता[४], चेच्छिदिता, माथितिकः, अपीपचन्, हीं त्या अर्थाचीं उदाहरणें होत. बेभिदिता, चेच्छिदिता ह्या ठिकाणीं यङाच्या

---

३. बाभ्रव्य, माधव्य, या यञ् (४।१।१०६) प्रत्ययान्त शब्दांच्यापुढें छप्रत्यय (४।२।११४) झालेला आहे.

४. बेभिद्य, चेच्छिद्य, या यङ्प्रत्ययान्त धातूहून तृच्प्रत्यय (३।१।१३३) केला आहे.

कारलोपे कृते एकाज्लक्षण इट्प्रतिषेधः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तात्क इति कादेशः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ अपीपचन्नित्येकादेशे कृतेऽभ्यस्ताज्झेर्जुस्भवतीति जुस्भावः प्राप्नोति। स्थानिवद्भावान्न भवति ॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि। कुतः। प्रातिपदिकनिर्देशोऽयं प्रातिपदिकनिर्देशाश्चार्थतन्त्रा भवन्ति न कांचित्प्राधान्येन विभक्तिमाश्रयन्ति । तत्र प्रातिपदिकार्थे निर्दिष्टे यां यां विभक्तिमाश्रयितुं बुद्धिरुपजायते सा साश्रयितव्या ॥ इदं तर्हि प्रयोजनं विधिमात्रे स्थानिवद्यथा स्यादनाश्रीयमाणायामपि प्रकृतौ। वाय्वोः अध्वर्य्वोः लोपो व्योर्वलि [६.१.६६] इति यलोपो मा भूदिति ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

अकाराचा लोप झाल्यानंतर बेभिद्, चेच्छिद्, हा मागील भाग उपदेशीं एकाच् असल्यामुळें इडागमाचा निषेध (७।२।१०) होऊं लागेल. अकाराच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भाव झाला म्हणजे अकारानें व्यवधान होत असल्यामुळें इडागमाचा निषेध होत नाहीं. माथितिकः ह्या ठिकाणीं मथितशब्दाहून ठक् प्रत्यय (४।४।५०) करून मथितशब्दांतील अकाराचा लोप (६।४।१४८) झाल्यानंतर तकारांताच्या पुढें ठक्प्रत्यय असल्यामुळें त्याला क आदेश (७।३।५१) होऊं लागेल. अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव केला म्हणजे तकारांत अंग नाहीं म्हणून क आदेश होत नाहीं. अपीपचन् ह्या ठिकाणीं अपीपच्+अ+अन् ह्या स्थितीमध्यें दोन अकारांना पररूप एकादेश (६।१।९७) केल्यानंतर 'अभ्यस्ताहून पर झिप्रत्ययाला जुस आदेश होतो' (३।४।१०९) असा सांगितलेला जुस् आदेश होऊं लागेल. पररूपाला स्थानिवद्भाव झाला म्हणजे मध्यें चङ्प्रत्ययानें व्यवधान येत असल्यामुळें जुस् आदेश होत नाहीं.

हा जो विधिशब्दाचा उपयोग दाखविला तो बरोबर नाहीं. कारण पूर्व ह्या प्रातिपदिकाचाच केवळ येथें आम्ही निर्देश करीत आहोंत. त्याला विशेष विभक्ति मुद्दाम अशी कोणतीच लावीत नाहीं. आणि अशा तऱ्हेचे जे केवळ प्रातिपदिकाचेच निर्देश केलेले असतात ते अर्थतंत्र असतात, म्हणजे ह्या प्रातिपदिकाच्या अर्थालाच तेथें मुख्यत्व असतें. कोणत्याही विभक्त्यर्थाला तेथें महत्त्व नसतें. अशा रीतीनें केवळ प्रातिपदिकाचा अर्थ मनांत आला असतांना पुढें तेथें त्याच्यासंबंधानें जो जो विभक्त्यर्थ घेण्याविषयीं बुद्धि उत्पन्न होईल तो तो विभक्त्यर्थ तेथें घेतला जाईल.

तर मग विधिशब्दाचा दुसरा उपयोग आम्ही दाखवितों. तो असा की कोणत्याही प्रकारचा विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव झाला पाहिजे. मग त्या विधीमध्यें स्थानीचें आश्रयण केलें नसलें तरी हरकत नाहीं;उदा०- वाय्वोः, अध्वर्य्वोः,ह्या ठिकाणीं 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६) ह्या सूत्रानें यकाराचा लोप होऊं नये म्हणून यणाला स्थानिवद्भाव होण्याची जरूर आहे. आणि लोप सांगणाऱ्या विधीमध्यें तर यणाच्या स्थानीचें म्हणजे उकाराचें आश्रयण केलेलें नाहीं.

हा उपयोग असूं द्या.

मग आतां तुमचें काय म्हणणें आहे ?

५. पच्धातूहून णिच्प्रत्यय, पुढें लुङ्प्रत्यय, त्याला झि आदेश, अन्त् आदेश (७।१।३), मध्यें चङ् प्रत्यय (३।१।४८), द्वित्व (६।१।११), सन्वद्भाव (७।४।९३), अभ्यासाला इत्व (७।४।७९) आणि दीर्घ (७।४।९४), अशीं कार्यें येथें झालीं आहेत.

६. तेव्हां विधिशब्द नसला तरी पूर्वीच्याहून पुढच्याला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होऊन वरील उदाहरणें साधतील.

अपरविधाविति तु वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्वविधावपि स्थानिवद्भावो यथा स्यात् । कानि पुनः स्वविधौ स्थानिवद्भावस्य प्रयोजनानि । आयन् आसन् । धिन्वन्ति कृण्वन्ति । दध्यत्र मध्वत्र । चक्रतुः चक्रुः ॥ इह तावदायन् आसन्नितीणस्त्योर्यण्लोपयोः कृतयोरनजादित्वादाडजादीनाम् [६.४.७२] इत्याण्न प्राप्नोति । स्थानिवद्भावाद्भवति ॥ धिन्वन्ति कृण्वन्तीति यणादेशे कृते वलादिलक्षण इट् प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ दध्यत्र मध्वत्रेति यणादेशे कृते संयोगान्तलोपः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ चक्रतुः चक्रुरित्यत्र यणादेशे कृतेऽनच्त्वाद्द्विर्वचनं न प्राप्नोति । स्थानिवद्भावाद्भवति ॥ यदि तर्हि स्वविधावपि स्थानिवद्भावो भवति द्वाभ्याम् देयम् लवनम् अत्रापि प्राप्नोति । द्वाभ्यामित्यत्रात्वस्य स्थानिवद्भावाद्दीर्घत्वं न प्राप्नोति । देयमितीत्वस्य स्थानिवद्भावाद्गुणो न प्राप्नोति । लवनमिति गुणस्य स्थानिवद्भावादवादेशो न प्राप्नोति ॥ नैष

आमचें म्हणणें असें की पूर्वविधौ ह्या शब्दाच्या ऐवजीं अपरविधौ असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणण्याचा काय उपयोग ?

आदेशाला स्वतःला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव झाला पाहिजे हा त्याचा उपयोग आहे.

पण आदेशाला स्वतःला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव झाला पाहिजे ह्याचीं उदाहरणें कोणतीं ?

आयन्, आसन्, धिन्वन्ति, कृण्वन्ति, दध्यत्र, मध्वत्र, चक्रतुः, चक्रुः. आयन् ह्या ठिँकाणीं इण् धातूला यण् (६।४।८१) केला असतांना आणि आसन् ह्या ठिकाणीं अस् धातूच्या अकाराचा लोप (६।४।१११) केला असतां धातु अजादि नाहीं म्हणून 'आडजादीनाम्' (६।४।७२) ह्या सूत्रानें आट् आगम होणार नाहीं. तो यण् आणि लोप ह्यांना स्थानिवद्भाव केला असतां करितां येतो. धिन्वन्ति, कृण्वन्ति, ह्या ठिँकाणीं उप्रत्ययाला यण् आदेश (६।१।७७) केला असतां तो वलादि प्रत्यय होत असल्यामुळें त्याला इट् आगम (७।२।३५) होऊं लागेल. तो यणाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होत नाहीं. दध्यत्र, मध्वत्र ह्या ठिकाणीं यण् आदेश (६।१।७७) केल्यानंतर 'संयोगान्तस्य लोपः' (८।२।२३) ह्या सूत्रानें त्या यणाचा लोप प्राप्त होतो तो यणाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होत नाहीं. चक्रतुः, चक्रुः ह्या ठिकाणीं ऋकाराला यण् आदेश केल्यानंतर धातूमध्यें अच् नाहीं म्हणून धातूला द्वित्व (६।१।८) होणार नाहीं. तें यणाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होतें.

पण जर अशा रीतीनें आदेशाला स्वतःला कार्य कर्तव्य असतांनाही स्थानिवद्भाव होईल तर द्वाभ्याम्, देयम्, लवनम्, ह्या ठिकाणींही स्थानिवद्भाव होऊं लागेल. द्वाभ्याम् ह्या ठिकाणीं इकाराला झालेला जो अकार आदेश (७।२।१०२) त्याला स्थानिवद्भाव झाला तर त्याला दीर्घ (७।३।१०२) होणार नाहीं. देयम् ह्या ठिकाणीं आकाराला झालेला जो ईकार आदेश (६।४।६५) त्याला स्थानिवद्भाव झाला तर त्याला गुण (७।३।८४) होणार नाहीं. लवनम् ह्या ठिकाणीं धातूच्या ऊकाराला झालेला जो गुण (७।३।८४) त्याला स्थानिवद्भाव झाला तर त्याला अव् आदेश (६।१।७८) होणार नाहीं.

७. येथें इण् आणि अस् या धातूंहून लङ् प्रत्यय, त्याला झि आदेश, अन्त् आदेश (७।१।३), शप् प्रत्ययाचा लुक् (२।४।७२) केल्यानंतर.

८. धिन्व्, कृण्व्, या धातूंहून लट् प्रत्यय, त्याला झि आदेश, अन्त् आदेश, मध्यें विकरण उ प्रत्यय व धातूच्या वकाराला अकार आदेश (३।१।८०) आणि अकाराचा लोप (६।४।४८) केल्यानंतर.

दोषः । स्वाश्रया अत्रैते विधयो भविष्यन्ति ॥ तत्तर्हि वक्तव्यमपरविधाविति। न वक्तव्यम् । पूर्वविधावित्येव सिद्धम् । कथम् । न पूर्वग्रहणेनादेशोऽभिसंबध्यते। अजादेशः परनिमित्तकः पूर्वस्य विधिं प्रति स्थानिवद्भवति । कुतः पूर्वस्य । आदेशादिति । किं तर्हि । निमित्तमभिसंबध्यते । अजादेशः परनिमित्तकः पूर्वस्य विधिं प्रति स्थानिवद्भवति। कुतः पूर्वस्य । निमित्तादिति । अथ निमित्तेऽभिसंबध्यमाने यत्तदस्य योगस्य मूर्धाभिषिक्तमुदाहरणं तदपि संगृहीतं भवति। किं पुनस्तत् । पट्व्या मृद्व्येति । बाढं संगृहीतम् । ननु चेकारयणा व्यवहितत्वान्नासौ निमित्तात्पूर्वो भवति । व्यवहितेऽपि पूर्वशब्दो वर्तते । तद्यथा । पूर्वं मथुरायाः पाटलिपुत्रमिति ॥ अथवा पुनरस्त्वादेश एवाभिसंबध्यते। कथं यानि स्वविधौ स्थानिवद्भावस्य प्रयोजनानि । नैतानि सन्ति । इह तावदायन् आसन्

हे दोष येत नाहींत. जरी ह्या ठिकाणीं स्थानिवद्भावानें आदेश हा स्थानीसारखा समजला गेला तरी त्या आदेशाच्या स्वतः-च्या स्वरूपावर अवलंबून हीं कार्यें होतील.[९]

तर मग अपरविधौ असें येथें म्हटलें पाहिजे असें दिसतें.

तसें म्हणावयास नको. कारण पूर्वविधौ ह्या म्हणण्यानेंच तें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें की पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचें स्थानीं आदेश त्याला, पूर्वाला विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो, तो पूर्व कोणापेक्षां तर आदेशापेक्षां, असा पूर्व ह्या शब्दाशीं आदेशाचा संबंध आम्ही लावीत नाहीं.

तर मग पूर्व ह्या शब्दाशीं कोणाचा संबंध लावतां ?

पराच्या निमित्तानें झालेला अचाचें स्थानीं आदेश त्याला पूर्वाला विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो, तो पूर्व कोणापेक्षां तर निमित्तापेक्षां, असा पूर्व ह्या शब्दाशीं निमित्ताचा संबंध लावतों.[१०]

आतां अशा रीतीनें पूर्व ह्या शब्दाशीं निमित्ताचा संबंध केला असतां जें ह्या सूत्राचें मुख्य उदाहरण त्याचाही संग्रह होत आहे.

तें कोणतें बरें उदाहरण ?

पट्व्या,[११] मृद्व्या, हें तें उदाहरण होय.

ह्याचा संग्रह होत आहे खरा; पण ईकाराचे स्थानीं झालेला जो यण् त्यानें व्यवधान येत असल्यामुळें पटु हा उकार निमित्तापेक्षां पूर्व आहे असें म्हणतां येत नाहीं.

हा आक्षेप बरोबर नाहीं. कारण व्यवधान असलें तरी पूर्वशब्दाचा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो; उदा० पाटलिपुत्र शहर मथुरेच्या पूर्वी आहे असें म्हणतात.

अथवा पूर्वशब्दाशीं आदेशाचाच संबंध असूं दे.

पण आदेशाचा पूर्वशब्दाशीं संबंध केला तर आदेशाला स्वतःला विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो ह्याचीं जीं उदाहरणें दाखविलीं त्यांची वाट काय ?

उदाहरणें साधण्याकरतां तसा अर्थ ध्याव-

---

९. 'आदेशाला स्वतःला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो' असें घेतलें असतां द्वाभ्याम् वगैरे जे दोष दाखविले ते येत नाहींत आणि आयन् वगैरे त्या अर्थाचे उपयोग आहेत म्हणून.

१०. तेव्हां आदेशाला स्वतःला कार्य कर्तव्य असतांना ह्या प्रकृतसूत्रानें स्थानिवद्भाव सहजच होईल, कारण आदेश हा निमित्तापेक्षां पूर्व आहे.

११. पटु शब्दाहून ङीष् प्रत्यय (४।१।४४) करून पुढें तृतीया एकवचनाचा टा प्रत्यय केला आहे. तेथें टाप्रत्ययाच्या निमित्तानें झालेला जो ईकाराला यण् आदेश (६।१।७७) त्याला स्थानिवद्भाव झाल्यामुळें तो अच् पुढें आहे असें समजून मागील उकाराला यण् होतो.

धिन्वन्ति कृण्वन्तीति। अयं विधिशब्दोऽस्त्येव कर्मसाधनो विधीयते विधिरिति। अस्ति भावसाधनो विधानं विधिरिति। तत्र कर्मसाधनस्य विधिशब्दस्योपादाने न सर्वमिष्टं संगृहीतमिति कृत्वा भावसाधनस्य विधिशब्दस्योपादानं विज्ञास्यते। पूर्वस्य विधानं प्रति पूर्वस्य भावं प्रति पूर्वः स्यादिति स्थानिवद्भवतीत्येवमाड् भविष्यतीट् च न भविष्यति॥ दध्यत्र मध्वत्र चक्रतुः चक्रुरिति परिहारं वक्ष्यति॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि।

**स्तोष्याम्यहं पादिकमौदवाहिं ततः श्वोभूते शातनीं पातनीं च।**

**नेतारावागच्छतं धारणिं रावणिं च ततः पश्चात्स्रंस्यते ध्वंस्यते च॥**

इह तावत्पादिकम् औदवाहिम् शातनीम् पातनीम् धारणिम् रावणिमित्यकारलोपे कृते पद्भाव ऊठ्ल्लोपष्टिलोप

यास नको. त्यांपैकीं आयन्, आसन्, धिन्वन्ति, कृण्वन्ति, हीं उदाहरणें दुसऱ्या तऱ्हेनें सिद्ध होत आहेत. तीं अशी की विधि हा शब्द धा धातूला कर्म ह्या अर्थी किप्रत्यय (३।३।९२) लागून सिद्ध झालेला आहे. ज्याचें विधान केलें जातें त्याला विधि म्हणतात; तसाच तो किप्रत्यय त्याच सूत्रानें भाव ह्या अर्थी करूनही विधि शब्द साधतां येतो. म्हणजे विधानालाच विधि म्हणतां येतें. ह्यांत कर्म ह्या अर्थी किप्रत्यय करून साधलेला विधिशब्द येथें घेतला असतां सर्व इष्ट उदाहरणें साधलीं जात नाहींत, म्हणून भाव ह्या अर्थी किप्रत्यय करून साधलेला विधिशब्द येथें घेतला आहे असें समजतें. पूर्वाचें विधान कर्तव्य असतांना म्हणजे पूर्वाचें अस्तित्व ठेवावयाचें असतांना म्हणजे जो केला असतांना आदेशापेक्षां पूर्व होईल तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो असा अर्थ झाला म्हणजे आयन्, आसन् ह्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भावानें आट् आगम करतां येईल. तसेंच धिन्वन्ति, कृण्वन्ति ह्या उदाहरणांमध्यें इट् आगम स्थानिवद्भावानें होणार नाहीं. दध्यत्र, मध्वत्र, चक्रतुः, चक्रुः, हीं उदाहरणें साधण्याचा उपाय पुढें सांगण्यांत येईल.[१२]

आणखीं कोणतीं बरें ह्या सूत्राचीं उदाहरणें आहेत ?

सांगतों, ऐका. पादिकम्, औदवाहिम्, हीं उदाहरणें आहेत. हे श्वोभूते, शातनीम्, पातनीम्, हींहि उदाहरणें आहेत. शिष्यहो या, धारणिम्, रावणिम्, तशींच स्रंस्यते ध्वंस्यते हींहि ह्या सूत्राचीं उदाहरणें होत. तीं अशीं की पादिकम्[१३], औदवाहिम्, शातनीम्, पातनीम्, धारणिम्, रावणिम्, ह्या ठिकाणीं पाद, उदवाह, शातन, पातन, धारण, रावण, ह्या प्रातिपदिकांच्या शेवटच्या अकाराचा लोप (६।४।१४८) केल्यानंतर पद् आदेश (६।४।१३०), ऊठ् आदेश (६।४।१३२), ऱ्हस्व अकाराचा लोप (६।४।१३४) आणि टीचा लोप (६।४।१४४), हे

१२. दध्यत्र इत्यादि ठिकाणीं 'यणः प्रतिषेधः' ह्या वार्तिकानें संयोगान्तलोप होत नाहीं. चक्रतुः इत्यादि उदाहरणें 'द्विर्वचनेचि' (१।१।५९) या सूत्रानें साधतील.

१३. पादिकशब्दामध्यें पादशब्दाहून ठन् (५।२।११५) किंवा ठक् (४।४।२) प्रत्यय केला आहे. उदकशब्दपूर्वक वह्धातूहून अण् प्रत्यय (३।२।१), वृद्धि (७।२।११६) आणि उदकशब्दाला 'उद' आदेश (६।३।५७) होऊन उदवाह शब्द सिद्ध होतो. उदवाह, धारण आणि रावण या शब्दांहून इञ् प्रत्यय (४।१।९५) केला आहे. धृ आणि रू या धातूंहून णिच् (३।१।२६) करून त्या धारि आणि रावि या णिच् प्रत्ययांत धातूंहून ल्युट् प्रत्यय, णिचाचा लोप (६।४।५१) आणि णत्व (८।४।२) होऊन धारण व रावण हे शब्द सिद्ध होतात. शातन आणि पातन या शब्दांहून ङीष् (४।१।४१) प्रत्यय केला आहे. या दोन ठिकाणीं अन् याच्या अकाराचा लोप प्राप्त होतो. धारणि आणि रावणि येथें णत्व असिद्ध (८।२।१) असल्यामुळें नकारांत आहे असें समजून टीचा लोप प्राप्त होतो.

इत्येते विधयः प्राप्नुवन्ति । स्थानिवद्भावान्न भवन्ति । स्रंस्यते ध्वंस्यते । णिलोपे कृतेऽनिदितां हल उपधायाः क्ङिति[६.४.२४]इति नलोपः प्राप्नोति। स्थानिवद्भावान्न भवति ॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि । असिद्धवदत्रा भात् [६.४.२२] इत्यनेनाप्येतानि सिद्धानि ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । याज्यते वाप्यते । णिलोपे कृते यजादीनां किति [६.१.१५] इति संप्रसारणं प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । यजादिभिरत्र कितं विशेषयिष्यामो यजादीनां यः किदिति । कश्च यजादीनां कित् । यजादिभ्यो यो विहित इति । न चायं यजादिभ्यो विहितः ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । पट्व्या मृद्व्येति । परस्य यणादेशे कृते पूर्वस्य न प्राप्नोतीकारयणा व्यवहितत्वात् । स्थानिवद्भावाद्भवति किं पुनः कारणं परस्य तावद्भवति न पुनः पूर्वस्य । नित्यत्वात् । नित्यः पर-

विधि प्राप्त होतात. परंतु अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होऊन व्यवधान येत असल्यामुळें हे विधि होत नाहींत. तसेंच 'स्रंस्यते' ध्वंस्यते' ह्या ठिकाणीं णिच् प्रत्ययाचा लोप (६।४।५१) केल्यानंतर 'अनिदितां हल उपधायाः क्ङिति' (६।४।२४) ह्या सूत्रानें नकाराचा लोप प्राप्त होतो, परंतु णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव होऊन व्यवधान येत असल्यामुळें तो होत नाहीं.

हीं ह्या सूत्राचीं उदाहरणें बरोबर नाहींत. कारण 'असिद्धवदत्रा भात्' (६।४।२२) ह्यानें देखील हीं सिद्ध होत आहेत.

तर मग ह्या प्रकृतसूत्राचीं उदाहरणें याज्यते[14], वाप्यते,हीं घ्या. ह्या ठिकाणीं णिच्-प्रत्ययाचा लोप केल्यानंतर 'वचिस्वपियजादीनां किति' (६।१।१५) ह्या सूत्रानें संप्रसारण प्राप्त होत आहे. परंतु णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव होऊन व्यवधान येत असल्यामुळें तें होत नाहीं.

हींही प्रकृतसूत्राचीं उदाहरणें बरोबर नाहींत. कारण 'वचिस्वपि०' ह्या सूत्रामध्यें यजादि हें किताचें विशेषण करावें म्हणजे यज् वगैरे धातूंचा जो कित् प्रत्यय तो पुढें असतांना संप्रसारण होतें असा अर्थ होईल.

यज् वगैरे धातूंचा कित् प्रत्यय आहे असें कसें समजावें ?

जो कित् प्रत्यय यज् वगैरे धातूंहून केलेला असेल तो यज् वगैरे धातूंचा आहे असें समजावें. याज्यते, वाप्यते, ह्या उदाहरणांमध्यें यक् हा कित् प्रत्यय, याजि आणि वापि ह्या णिच् प्रत्ययान्त धातूंहून केला असल्यामुळें, यज् वगैरे धातूंहून केलेला नाहीं; तेव्हां तेथें संप्रसारण होणारच नाहीं.

तर मग ह्या सूत्राचीं पट्व्यां[15], मृद्व्या, हीं उदाहरणें घ्या. पट्व्या ह्या उदाहरणामध्यें पटु, ई, आ अशी स्थिति असतांना पुढच्या ईकाराला 'इको यणचि' (६।१।७७) ह्यानें यण् आदेश केल्यानंतर मागच्या उकाराला त्यानें यण् होणार नाहीं. कारण ईकाराला झालेल्या यणादेशानें व्यवधान येत आहे. परंतु त्या ईकाराला केलेल्या यणादेशाला स्थानिवद्भाव केल्यामुळें तोच अच् पुढें आहे असें समजून मागच्या उकाराला यण् करतां येतो.

पण येथें प्रथम पुढील ईकारालाच यण् होतो आणि मागील उकाराला प्रथम होत नाहीं याचें काय बरें कारण ?

पुढील ईकाचे स्थानीं होणारा यण् नित्य आहे म्हणून तो पूर्वी होतो. परयणादेश हा

---

१४. यज् आणि वप् या धातूंहून णिच् प्रत्यय करून पुढें कर्मणि लट् प्रत्यय व मध्यें यक् प्रत्यय (३।१।६७) विकरण झाला आहे.

१५. पटु आणि मृदु या शब्दांहून ङीष् (४।१।४४) प्रत्यय व पुढें तृतीया एकवचन टा प्रत्यय केला आहे.

यणादेशः कृतेऽपि पूर्वयणादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । नित्यत्वात्परयणादेशे कृते पूर्वस्य न प्राप्नोति । स्थानिवद्भावाद्भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इत्यसिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्य परयणादेशस्यान्तरङ्गलक्षणः पूर्वयणादेशो भविष्यति । अवश्यं चैषा परिभाषाश्रयितव्या स्वरार्थम् । कर्त्र्यां हर्त्र्यामित्युदात्तयणो हल्पूर्वात् [६.१.१७४] इत्येष स्वरो यथा स्यात् । अनेनापि सिद्धः स्वरः । कथम् ।

**आरभ्यमाणे नित्योऽसौ**

आरभ्यमाणे त्वस्मिन्योगे नित्यः पूर्वयणादेशः । कृतेऽपि परयणादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि ॥ परयणादेशोऽपि नित्यः । कृतेऽपि पूर्वयणादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि ।

**परश्चासौ व्यवस्थया ।**

व्यवस्थया चासौ परः ॥

**युगपत्संभवो नास्ति**

न चास्ति यौगपद्येन संभवः ॥ कथं च सिध्यति ।

**बहिरङ्गेण सिध्यति ॥**

असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण

---

पूर्वयणादेश केल्यानंतरही प्राप्त होतो व पूर्वयणादेशही करण्याचे पूर्वींही प्राप्त होतो म्हणून परयणादेश नित्य आहे. तेव्हां नित्य असल्यामुळें तो परयणादेश प्रथम केल्यानंतर पूर्वीच्या उकाराला यण् प्राप्त होत नाहीं. परंतु परयणादेशाला स्थानिवद्भाव केला म्हणजे पूर्वयणादेश करितां येतो.

हें देखील स्थानिवद्भावाचें उदाहरण बरोबर दिसत नाहीं. कारण 'अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें' ह्या परिभाषेनें बहिरंग जो परयणादेश तो असिद्ध असल्यामुळें अंतरंग जो पूर्वयणादेश तोच प्रथमतः होईल आणि ही परिभाषा तर केलीच पाहिजे कारण कर्त्र्यां, हर्त्र्यां, ह्या ठिकाणीं स्वर होण्याकरितां तिची जरूर आहे. ह्या ठिकाणीं 'उदात्तयणो हल्पूर्वात्' (६।१।१७४) ह्या सूत्रानें सांगितलेला स्वर झाला[१६] पाहिजे.

पण ही परिभाषा घेतली नाहीं तरी स्थानिवद्भावानें देखील तो स्वर साधतां येतो.

तो कसा ?

तो असा की (आरभ्यमाणे नित्योऽसौ) स्थानिवद्भाव घेतला म्हणजे पूर्वयणादेश नित्य होत आहे. कारण परयणादेश प्रथम केला तरी स्थानिवद्भावानें पूर्वयणादेश प्राप्त होत आहे आणि परयणादेश करण्याच्या पूर्वींही प्राप्त होत आहे[१७].

परयणादेश देखील नित्य आहे कारण तो देखील पूर्वयणादेश केल्यानंतरहि प्राप्त होतो. आणि पूर्वयणादेश करण्याच्या पूर्वींही प्राप्त होतो. शिवाय (परश्चासौ व्यवस्थया) उदाहरणांत क्रम पाहिला असतां तो परही आहे[१८]; आणि (युगपत्संभवो नास्ति) दोन्ही यणादेश एकदम तर करितां येत नाहींत. मग पट्व्या वगैरे उदाहरणें कशीं सिद्ध होणार? (बहिरङ्गेण सिध्यति) 'अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें' ह्या परिभाषेनेंच हीं उदाहरणें सिद्ध होतात.

तर मग कर्त्र्यां ह्या ठिकाणीं उदात्तऋका-

---

१६. कर्तृ शब्दाहून ङीप् प्रत्यय (४।१।५) व पुढें तृतीया एकवचन टा प्रत्यय केला आहे. ङीप् प्रत्यय अनुदात्त (३।१।४) आहे. प्रथमतः उदात्त ऋकाराला यण् आदेश केला म्हणजे त्या उदात्तयणाच्या पुढील अनुदात्त ङीप्-प्रत्ययाला उदात्त (६। ३।१७४) होतो. आणि नंतर त्या उदात्त ईकाराला यण् आदेश झाला म्हणजे त्या उदात्तयणाच्या पुढील अनुदात्त (३।१।४) टा-प्रत्ययाला पुनः त्याच सूत्रानें उदात्त होतो.

१७. तेव्हां पूर्वयणादेश पूर्वी केला म्हणजे अंतरंगपरिभाषेवांचूनही हें उदाहरण साधेल असा अभिप्राय आहे.

१८. तेव्हां अंतरंगपरिभाषेवांचून दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें पूर्वयणादेश प्रथमतः करतां येत नाहीं.

इत्यनेन सिध्यति ॥ एवं तर्हि योऽत्रोदात्तयणतदाश्रयः स्वरो भविष्यति । ईकारयणा व्यवहितत्वान्न प्राप्नोति । स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीति नास्ति व्यवधानम् । सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या। ननु चेयमपि कर्तव्यासिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति । बहुप्रयोजनैषा परिभाषा । अवश्यमेषा कर्तव्या । सा चाप्येषा लोकतः सिद्धा । कथम् । प्रत्यङ्गवर्ती लोको लक्ष्यते । तद्यथा । पुरुषोऽयं प्रातरुत्थाय यान्यस्य प्रति शरीरं कार्याणि तानि तावत्करोति ततः सुहृदां ततः संबन्धिनाम् । प्रातिपदिकं चाप्युपदिष्टं सामान्यभूतेऽर्थे वर्तते । सामान्ये वर्तमानस्य व्यक्तिरुपजायते । व्यक्तस्य सतो लिङ्गसंख्याभ्यामन्वितस्य बाह्येनार्थेन योगो भवति । यथैव चानुपूर्व्यार्थानां प्रादुर्भावस्तथैव शब्दानामपि तद्वत्कार्यैरपि भवितव्यम् ॥ इमानि तर्हि प्रयोजनानि । पटयति अवधीत् बहुखट्वकः ॥ पटयति लघयतीति टिलोपे

राचे स्थानीं यण् झालेला आहे त्याच्या निमित्तानेंच पुढील विभक्तिप्रत्ययाला स्वर करितां येईल.[१९]

तसा स्वर करितां येणार नाहीं. कारण मध्यें ईकाराला झालेला जो यण् त्यानें व्यवधान येत आहे.

पण 'स्वरविधि कर्तव्य असतांना व्यंजन हें नसल्यासारखें समजावें' ही परिभाषा असल्यामुळें कर्त्र्यां ह्या ठिकाणीं यकारानें व्यवधान आहे असें म्हणतां येणार नाहीं.

तर मग 'स्वरविधि कर्तव्य असतांना व्यंजन हें नसल्यासारखें आहे' ही परिभाषा[२०] केली पाहिजे.

'अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें' ही परिभाषा तुम्हाला केली पाहिजे ना ?[२१]

अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें ह्या परिभाषेचे उपयोग फार आहेत. त्याकरितां ती अवश्य केलीच पाहिजे. शिवाय ती परिभाषा लोकव्यवहारावरूनही सिद्ध होत आहे.

ती कशी ?

जवळच्याकडे अगोदर पाहाण्याची लोकांची पद्धत दिसते; जसें, मनुष्य हा सकाळीं उठल्यानंतर जीं स्वतःच्या शरीराचीं कार्यें तीं सर्वांच्या अगोदर करतो, नंतर मित्रांचीं कार्यें करतो, आणि त्यानंतर मग इतर संबंधी लोकांचीं कार्यें करितो. तसेंच बोलतांनाही प्रातिपदिक ऐकल्याबरोबर प्रथम त्यापासून सामान्य अर्थ मनांत येतो. तसा सामान्य अर्थ मनांत आल्यानंतर त्या सामान्य अर्थानें युक्त अशी व्यक्ति मनांत येते. त्यानंतर त्या व्यक्तीचा लिंग आणि संख्या ह्यांच्याशीं असलेला संबंध मनांत येतो. आणि नंतर त्या व्यक्तीचा दुसऱ्या पदार्थाशीं असलेला संबंध मनांत येतो. आणि नंतर ज्या क्रमानें हे अर्थ मनांत येतात त्याच क्रमानें त्या त्या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दाशीं संबंध होत असतो. आणि कार्येंही त्याच क्रमानें होत असतात.

तर मग ह्या सूत्राचीं हीं उदाहरणें घ्या. —पटयति, लघयति, अवधीत्, बहुखट्वकः. पटयति, लघयति ह्या उदाहरणांमध्यें पटु, लघु, ह्या शब्दांहून णिच् प्रत्यय करून टिलोप (६।४।१५५) केल्यानंतर 'अत उपधायाः' (७।२।

---

१९ अंतरंगपरिभाषा जरी घेतली नाहीं व पूर्वयणादेश प्रथम झाला नाहीं, परयणादेश झाल्यानंतरच पूर्वयणादेश झाला, तरी तो रेफ उदात्त यण् असल्यामुळें त्याच्या निमित्तानेंच एकदम टा प्रत्ययाला उदात्त होईल असा अभिप्राय आहे.

२०. तेव्हां अंतरंगपरिभाषा घेतली नाहीं तर ही परिभाषा घ्यावी लागली. ह्यांत कांहींच फायदा दिसत नाहीं असा अभिप्राय आहे.

२१. 'एतावता तुम्ही आम्ही सारखेच आहोंत, मग अंतरंगपरिभाषा घेण्याविषयीं तुमचा इतका आग्रह कां असावा ?' असा अभिप्राय आहे.

कृतेऽत उपधायाः [७.२.११६] इति वृद्धिः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ अवधीदित्यकारलोपे कृतेऽतो हलादेर्लघोः [७.२.७] इति विभाषा वृद्धिः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति ॥ बहुखट्वक इत्यापोऽन्यतरस्याम् [७.४.१५] इति ह्रस्वत्वे कृते ह्रस्वान्तेऽन्त्यात्पूर्वम् [६.२.१७४] इत्येष स्वरः प्राप्नोति, स्थानिवद्भावान्न भवति ॥

इह वैयाकरणः सौवश्व इति य्वोः स्थानिवद्भावादायावौ प्राप्नुतस्तयोः प्रतिषेधो वक्तव्यः ।

**अचः पूर्वविज्ञानादैचोः सिद्धम् ॥१॥**

योऽनादिष्टादचः पूर्वस्तस्य विधिं प्रति स्थानिवद्भाव आदिष्टाच्चैषोऽचः पूर्वः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अच इति पञ्चमी । अचः पूर्वस्य । यद्येवमादेशोऽविशेषितो भवति । आदेशश्च विशेषितः । कथम् । न ब्रूमो यत्षष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणं तत्पञ्चमीनिर्दिष्टं

---

११६) ह्या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते. परंतु प्रकृतसूत्रानें टिलोपाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होत नाहीं. तसेंच अवधीत् ह्या उदाहरणामध्यें वध ह्यांतील अकाराचा लोप (६।४।४८) केल्यानंतर 'अतो हलादेर्लघोः' (७।२।७) ह्या सूत्रानें विकल्पानें वृद्धि प्राप्त होते. परंतु अकारलोपाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होत नाहीं. बहुखट्वकः ह्या उदाहरणांमध्यें खट्वा शब्दांतील आकाराला 'आपोन्यतरस्याम्' (७।४।१५) ह्या सूत्रानें ऱ्हस्व केल्यानंतर 'ऱ्हस्वान्तेऽन्त्यात्पूर्वम्' (६।२।१७४) ह्या सूत्रानें उदात्त स्वर प्राप्त होतो, परंतु प्रकृतसूत्रानें ऱ्हस्वाला स्थानिवद्भाव केल्यामुळें होत नाहीं.

आतां वैयाकरणः[22], सौवश्वः, ह्या उदाहरणांमध्यें 'इको यणचि' (६।१।७७) ह्या सूत्रानें यण् आदेश केल्यानंतर त्या यकारवकारांना स्थानिवद्भावानें अच् पुढें आहे असें समजून आय् व आव् (६।१।७८) हे आदेश प्राप्त होतात त्यांचा निषेध सांगितला पाहिजे.

(वा.१) जो स्थानिभूत अचाहून पूर्व असेल त्याला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो असें घेतलें ह्मणजे ऐ व औ ह्यांना आय् व आव् हे आदेश न होतां रूपें सिद्ध होतील. कारण हे ऐकार व औकार स्थानिभूत अचाहून पूर्व नाहींत[23]. आदेशापेक्षां पूर्व आहेत.

पण असें मुद्दाम सांगितलें पाहिजे काय ?

तसें मुद्दाम सांगावयास नको.

मग तसें सांगितलें नाहीं तर कसें समजेल ?

अचः ही पंचमी घेऊन म्हणजे अचाहून पूर्व असा अर्थ होईल.

पण जर अचः ही पंचमी घेऊन त्याचा अन्वय पूर्वाकडे केला तर आदेशाकडे त्याचा अन्वय नाहीं असें होईल.

आदेशाकडेही त्याचा अन्वय करितां येईल.

तो कसा ?

तो असा की अचः हें पद जें षष्ठीप्रत्यय लावून उच्चारलें आहे तें पंचमीप्रत्यय लावून उच्चारावें असें आम्ही म्हणत नाहीं.

तर मग पंचमीप्रत्यय लावून अचः असें दुसरें पद उच्चारावें असें तुमचें म्हणणें आहे काय ?

---

२२. वि आ उपसर्गपूर्वक कृधातूहून ल्युट्प्रत्यय (३।३।११३), अन आदेश (७।१।१), ऋकाराला गुण (७।३।८४) आणि वि यांतील इकाराला यकार आदेश (६।१।७७) होऊन व्याकरण शब्द सिद्ध होतो. त्याहून अण् प्रत्यय (४।२।५९) होऊन यकाराच्या मागें ऐ आगम (७।३।३) झाला आहे. सु अश्व येथें उकाराला वकार आदेश (६।१।७७) होऊन स्वश्व शब्द सिद्ध झाला आहे. त्याहून अण् प्रत्यय (४।३।१२०) होऊन वकाराच्या मागें औ आगम झाला आहे.

२३. कारण यणाचे जे वि यांतील इकार आणि सु यांतील उकार त्याना यण् करण्याचे पूर्वी हे ऐकार व ओकार आगम झालेले नव्हते.

कर्तव्यमिति । किं तर्ह्यन्यत्कर्तव्यम् । अन्यच्च न कर्तव्यम् । यदेवादः षष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणं तस्य दिक्शब्दैर्योगे पञ्चमी भवति । अजादेशः परनिमित्तकः पूर्वस्य विधिं प्रति स्थानिवद्भवति । कुतः पूर्वस्य । अच इति । तद्यथा । आदेशः प्रथमानिर्दिष्टः । तस्य दिक्शब्दैर्योगे पञ्चमी भवति । अजादेशः परनिमित्तकः पूर्वस्य विधिं प्रति स्थानिवद्भवति । कुतः पूर्वस्य । आदेशादिति ॥

**तत्रादेशलक्षणप्रतिषेधः ॥२॥**

तत्रादेशलक्षणं कार्यं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । वाय्वोः अध्वर्य्वोः । लोपो व्योर्वलि [६.१.६६] इति यलोपः प्राप्नोति ॥ असिद्धवचनात्सिद्धम् । अजादेशः परनिमित्तकः पूर्वस्य विधिं प्रत्यसिद्धो भवतीति वक्तव्यम् ।

**असिद्धवचनात्सिद्धमिति चेदुत्सर्गलक्षणानामनुदेशः ॥३॥**

असिद्धवचनात्सिद्धमिति चेदुत्सर्गलक्षणानामनुदेशः कर्तव्यः पट्व्या मृद्व्येति ॥ ननु चैतदप्यसिद्धवचनात्सिद्धम् ।

**असिद्धवचनात्सिद्धमिति चेन्नान्यस्यासिद्धवचनादन्यस्य भावः ॥४॥**

---

तसेंही दुसरें उच्चारावयाचें नाहीं. जें सूत्रामध्यें षष्ठीप्रत्यय लावून उच्चारलें आहे व ज्याचा आदेशाशीं संबंध झालेला आहे त्यालाच पूर्व ह्या दिक्शब्दाला अवधीची आकांक्षा आली असतां पंचमी लावून पूर्वशब्दाशीं संबंध करितां येईल. तो असा की पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश त्याला स्थानिवद्भाव होतो, पूर्वाला विधि कर्तव्य असतांना तो पूर्व कोणापेक्षां अशी आकांक्षा आली असतां स्थानिभूत अचापेक्षां पूर्व असें अर्थातच गृहीत धरितां येतें; ज्याप्रमाणें आदेश हें पद प्रथमाविभक्तीमध्यें उच्चारलें असूनही पूर्व ह्या दिक्शब्दाला अवधीची आकांक्षा आली असतां त्या आदेशाला पंचमी लावून पूर्व ह्याच्याशीं संबंध आतांच तुम्हीं दाखविला होता तो असा की पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश त्याला स्थानिवद्भाव होतो, पूर्वाला विधि कर्तव्य असतांना. तो पूर्व कोणापेक्षां अशी आकांक्षा आली असतां आदेशापेक्षां पूर्व असें अर्थात् गृहीत धरलें[24] होतें त्याप्रमाणेंच हें होय.

(वा. २) असा स्थानिवद्भाव झाला तरी आदेशाच्या निमित्तानें जें कार्य प्राप्त होतें त्याचा निषेध सांगितला पाहिजे; उदा० वाय्वोः, अध्वर्य्वोः, येथें आदेश जो वकार त्याच्या निमित्तानें 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६)[25] ह्या सूत्रानें यकाराचा लोप होऊं लागेल.

पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश तो पूर्वाला विधि कर्तव्य असतांना असिद्ध होतो असें म्हणावें.

(वा.३) पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश तो पूर्वाला विधि कर्तव्य असतांना असिद्ध होतो असें केल्यानें वाय्वोः, अध्वर्य्वोः हीं उदाहरणें सिद्ध होतात असें म्हटलें तर स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारीं जीं कार्यें त्यांचा अतिदेश करावा लागेल उदा० पट्व्या, मृद्व्या.

पण आदेश असिद्ध होतो असें म्हटल्यानें पट्व्या मृद्व्या, हीं देखील उदारणें सिद्ध होतील.

(वा.४) आदेश असिद्ध होतो असें म्हटल्यानें पट्व्या, मृद्व्या, हीं उदाहरणें सिद्ध होतील

---

२४. 'वैयाकरणः, सौवश्वः, येथें स्थानिवद्भावानें आय्, आव् आदेश होतील' अशी शंका करतांना ते ऐकार व औकार हे यकार व वकार याआदेशांपेक्षा पूर्वीं आहेत असें शंकाकारानें गृहीत धरलें होतें.

२५. कारण आदेशाला स्थानिवद्भाव केला तरी 'त्या आदेशाच्या स्वतःच्या स्वरूपावर अवलंबून प्राप्त होणारें कार्य होत नाहीं' असा अर्थ निष्पन्न होत नाहीं.

असिद्धवचनात्सिद्धमिति चेत्तन्न। किं कारणम्। नान्यस्यासिद्धवचनादन्यस्य भावः। न ह्यन्यस्यासिद्धत्वादन्यस्य प्रादुर्भावो भवति। न हि देवदत्तस्य हन्तरि हते देवदत्तस्य प्रादुर्भावो भवति॥

**तस्मात्स्थानिवद्वचनमसिद्धत्वं च ॥५**

तस्मात्स्थानिवद्भावो वक्तव्योऽसिद्धत्वं च। पट्व्या मृद्व्येत्यत्र स्थानिवद्भावः। वाय्वोः अध्वर्य्वोरित्यसिद्धत्वम्॥

**उक्तं वा ॥६॥**

किमुक्तम्। स्थानिवद्वचनानर्थक्यं शास्त्रासिद्धत्वादिति। विषम उपन्यासः। युक्तं तत्र यदेकादेशशास्त्रं तुक्शास्त्रेऽसिद्धं स्यात्। अन्यदन्यस्मिन्। इह पुनरयुक्तम्। कथं हि तदेव नाम तस्मिन्नसिद्धं स्यात्। तदेव चापि तस्मिन्नसिद्धं भवति। वक्ष्यति ह्याचार्यः। चिणो लुकि तग्रहणानर्थक्यं संघातस्याप्रत्ययत्वात्तलोपस्य चासिद्धत्वादिति। चिणो लुक् चिणो लुक्येवासिद्धो भवति॥

**काममतिदिश्यतां वा सच्चासच्चापि नेह भारोऽस्ति।**

असें म्हणतां येत नाहीं.

कां बरें?

कारण एकाला असिद्ध म्हटल्यानें दुसऱ्याची उत्पत्ति होत नसतें; जसें लोकांमध्यें देवदत्ताच्या मारणाऱ्याला मारलें असतां देवदत्त जिवंत होत नसतो.[२६]

(वा.५) एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें आदेशाला स्थानिवद्भाव होतो असेंही म्हटलें पाहिजे आणि आदेश असिद्ध होतो असेंही म्हटलें पाहिजे. पट्व्या, मृद्व्या, ह्यांकरितां स्थानिवद्भाव सांगितला पाहिजे व वाय्वोः, अध्वर्य्वोः, ह्यांकरितां असिद्धत्व सांगितलें पाहिजे.

(वा.६) अथवा हें वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे?

स्थानिवद्वचनानर्थक्यं शास्त्रासिद्धत्वात् (६।१।८६ वा.५), म्ह. स्थानिवत् असें म्हणावयास नको. कार्य असिद्ध होतें असा अर्थ न घेतां शास्त्र असिद्ध होतें असा अर्थ घेतल्यानें सर्व उदाहरणें साधतात.[२७]

पट्व्या येथें हा दृष्टान्त बरोबर लागू होत नाहीं. कारण एका आदेशशास्त्राला दुसऱ्या तुक्शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध म्हणणें हें तेथें योग्यच आहे. परंतु येथें मात्र तसें म्हणणें बरोबर होणार नाहीं. पट्व्या, मृद्व्या, ह्या ठिकाणीं यण्शास्त्राच्या दृष्टीनें तेंच यण् शास्त्र कसें बरें असिद्ध होईल?[२८]

त्याच शास्त्राच्या दृष्टीनें तेंच शास्त्र देखील असिद्ध होत असतें. कारण आचार्य वार्तिककार असें पुढें सांगणार आहेत—चिणो लुकि तग्रहणानर्थक्यम् संघातस्याप्रत्ययत्वात् तलोपस्य चासिद्धत्वात् (६।४।१०४ वा.१). तेथें चिणो लुक् हें शास्त्र त्याच चिणोलुक्शास्त्राच्या दृष्टीनें असिद्धच होत असतें.[२९]

अथवा येथें सत्, असत्, वाटेल तसा अतिदेश करा. येथें आमचा कांहीं भार नाहीं. वाक्य हें वक्त्याच्या अधीन असतें; तेथें वाक्यशेष वाटेल तसा आपल्या इच्छेप्रमाणें करतां येतो.

२६. तेव्हां पट्व्या येथें ईकाराला घालवून त्याच्या जागीं झालेला आदेश जो यकार तो प्रकृतसूत्रानें असिद्ध समजला तरी त्यानें घालविलेला जो ईकार त्याची उठावणी होत नाहीं. तेव्हां अर्थातच त्या ईकाराच्या निमित्तानें मागील उकाराला यण् आदेश करतां येणार नाहीं.

२७. शास्त्र असिद्ध समजलें म्हणजे तेथें 'स्थानी गेला नाहीं आणि आदेश आला नाहीं' अशी भावना होत असल्यामुळें 'स्थानीच्या निमित्तानें कार्य करणें, आणि आदेशाच्या निमित्तानें आलेलें कार्य न करणें' ह्या दोन्ही गोष्टी सहजच सिद्ध होतात.

२८. कारण आपणच आपल्याला असिद्ध होतें असें समजतां येत नाहीं.

२९. 'पटु ई आ येथें उकाराला वकार करणारें इको यणचि हें शास्त्र निराळें आणि तेथेंच ईकाराला यकार करणारें इको यणचि हें शास्त्र निराळें' अशी

**कल्प्यो हि वाक्यशेषो वाक्यं वक्त्रधीनं हि ॥**

अथवा वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम्। तद्यथा। उशीनरवन्मद्रेषु यवाः। सन्ति न सन्तीति। मातृवदस्याः कलाः। सन्ति न सन्तीति। एवमिहापि स्थानिवद्भवति स्थानिवन्न भवतीति वाक्यशेषं समर्थयिष्यामहे। इह तावत्पट्व्या मृद्व्येति यथा स्थानिनि यणादेशो भवत्येवमादेशेऽपि भवति। इहेदानीं वाय्वोः अध्वर्य्वोरिति यथा स्थानिनि यलोपो न भवत्येवमादेशेऽपि न भवति ॥

किं पुनरनन्तरस्य विधिं प्रति स्थानिवद्भाव आहोस्वित्पूर्वमात्रस्य। कश्चात्र विशेषः।

**अनन्तरस्य चेदेकाननुदात्तद्विगुस्वरगतिनिघातेषूपसंख्यानम् ॥७॥**

अनन्तरस्येति चेदेकाननुदात्तद्विगुस्वरगतिनिघातेषूपसंख्यानं कर्तव्यम् ॥ एकाननुदात्त। लुनीह्यत्र पुनीह्यत्र। अनुदात्तं पदमेकवर्जम् [६.१.१५८] इत्येष स्वरो

अथवा येथें स्थानिवत् असा स्थानि-शब्दापुढें वति प्रत्यय लावलेला आहे. आणि असा वति प्रत्यय ज्या ठिकाणीं लावलेला असतो त्या ठिकाणीं त्यासारखें जें घ्यावयाचें तें आपल्या इच्छेप्रमाणें घेतां येतें. जसें उशीनरदेशाप्रमाणेंच मद्रदेशांतील यव समजावेत, असें म्हटलें असतां उशीनरदेशामध्यें जर यव असले तर मद्रदेशामध्येंही आहेत असें समजतें आणि उशीनरदेशामध्यें जर यव नसतील तर मद्रदेशामध्येंही नाहींत असें त्याच वाक्यावरून समजतें. तसेंच ह्या मुलीच्या अंगीं आईसारखेंच कलाकौशल्य आहे असें म्हटलें असतां जर आईच्या अंगीं कलाकौशल्य असेल तर मुलीच्या अंगींही आहे असें समजतें आणि आईच्या अंगीं जर कलाकौशल्य नसेल तर मुलीच्या अंगींही नाहीं असें त्याच वाक्यावरून समजतें. तसेंच, प्रकृतसूत्रामध्येंही आदेश स्थानीसारखा होतो असें म्हटलें असतां स्थानी जर एखाद्या कार्याला कारण होत असेल तर आदेशही त्या कार्याला कारण होतो असें समजतें आणि स्थानी जर एखाद्या कार्याला कारण होत नसेल तर त्या कार्याला आदेश देखील कारण होत नाहीं असें समजतें. तेव्हां पट्व्या, मृद्व्या, ह्या ठिकाणीं ईकार हा स्थानी असतांना जसा त्याच्या निमित्तानें यण् आदेश होतो तसा त्या ईकाराला झालेला यकार आदेश तो देखील यण् आदेशाला कारणीभूत होतो आणि वाय्वोः, अध्वर्य्वोः ह्या ठिकाणीं स्थानी उकार हा जसा यकाराच्या लोपाला कारण होत नाहीं तसा त्या उकाराला झालेला वकार आदेश देखील यकाराच्या लोपाला कारणीभूत होत नाहीं.

पण काय, 'स्थानिभूत अचापेक्षां पूर्वाला विधि कर्तव्य असतांना' असें जें येथें म्हटलें आहे त्या ठिकाणीं पूर्व हा अगदीं जवळचाच घ्यावयाचा किंवा दूर असला तरी चालेल?

ह्या दोहोंमध्यें फरक काय?

(वा.७) अगदीं जवळच्यालाच कार्य कर्तव्य असतांना असें म्हटलें तर एकाननुदात्त, द्विगुस्वर आणि गतिनिघात हे होणार नाहींत, म्हणून ते होतात असें म्हटलें पाहिजे. लुनीह्यत्र, पुनीह्यत्र ह्या ठिकाणींही प्रत्ययांतील उदात्त इकाराला यण् आदेश झाल्यानंतर स्थानिवद्भावानें उदात्त इकार आहे असें समजून पूर्वीच्या वर्णांना शेषनिघात (६।१।१५८) होत असतो तो होणार नाहीं.

कल्पना केली म्हणजे 'इको यणचि' याच्या दृष्टीनें 'इको यणचि' हें शास्त्र असिद्ध आहे असें म्हणतां येतें. एकंदरींत असिद्ध म्हणण्यानें 'स्थानीचें कार्य होणें आणि आदेशाचें कार्य न होणें' या दोन्ही गोष्टी साधतात असें ठरतें.

३०. 'स्थानीचें कार्य होणें आणि आदेशाचें कार्य न होणें' या दोन्ही गोष्टी स्थानिवत् असें म्हणण्यानेंही साधतात असें येथून भाष्यकार प्रति-

न प्राप्नोति ॥ द्विगुस्वर । पञ्चारत्न्यः दशारत्न्यः । इगन्तकाल [६.२.२९] इत्येष स्वरो न प्राप्नोति ॥ गतिनिघात । यत्प्रलुनीह्यत्र यत्प्रपुनीह्यत्र । तिङि चोदात्तवति [८.१.७१] इत्येष स्वरो न प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि पूर्वमात्रस्य ।

**पूर्वमात्रस्य चेदुपधाह्रस्वत्वम् ॥८॥**

पूर्वमात्रस्येति चेदुपधाह्रस्वत्वं वक्तव्यम् । वादितवन्तं प्रयोजितवान् अवीवदद्वीणां परिवादकेन । किं पुनः कारणं न सिध्यति । योऽसौ णौ णिर्लुप्यते तस्य स्थानिवद्भावाद्ध्रस्वत्वं न प्राप्नोति ॥

**गुरुसंज्ञा च ॥९॥**

गुरुसंज्ञा च न सिध्यति । श्लेष्म३घ्न पित्त३घ्न द३ध्यश्व म३ध्वश्व । हलोऽनन्तराः संयोगः [१.१.७] इति संयोगसंज्ञा संयोगे गुरु [१.४.११] इति गुरुसंज्ञा गुरोरिति प्लुतो न प्राप्नोति । ननु च यस्याप्यनन्तरस्य विधिं प्रति स्थानिवद्भावस्तस्याप्यनन्तरलक्षणो विधिः संयोगसंज्ञा विधेया ॥

**न वा संयोगस्यापूर्वविधित्वात् ॥१०**

---

तसेंच पंचारत्न्यः, दशारत्न्यः, ह्या ठिकाणीं अरत्निशब्दांतील इकाराला यण् आदेश झाल्यानंतर स्थानिवद्भावानें अरत्नि असें इगन्त उत्तरपद आहे असें समजून पूर्वपदाला जो प्रकृतिस्वर (६।२।२९) होत असतो तो होणार नाहीं. तसेंच यत् प्रलुनीह्यत्र, यत् प्रपुनीह्यत्र ह्या ठिकाणींही प्रत्ययांतील उदात्त इकाराला यण् आदेश झाल्यानंतर स्थानिवद्भावानें उदात्तयुक्त तिङन्त आहे असें समजून प्र ह्याला जो अनुदात्त (८।१।७१) होत असतो तो होणार नाहीं.

तर मग पूर्व अगदीं जवळचा नसला तरी चालेल असें असूं दे.

(वा.८) पण जवळचा नसला तरी चालेल असें म्हटलें तर उपधान्हस्वाचें विधान करावें लागेल; उदा० वादितवन्तं प्रयोजितवान् अवीवदत् वीणां परिवादकेन ह्या ठिकाणीं अवीवदत् येथें वाजविणें ह्या अर्थाच्या णिजन्त वदधातूहून पुनः दुसरा णिच् प्रत्यय केला आहे.

पण येथें उपधेला न्हस्व (७।४।१) कां बरें होणार नाहीं ?

जो हा दुसरा णिच् पुढें असतांना पहिल्या णिचाचा लोप झाला आहे त्याला स्थानिवद्भाव झाला[३१] तर त्यानें व्यवधान येत असल्यामुळें न्हस्व होणार नाहीं.

(वा.९) तेसेंच पूर्व हा अगदीं जवळचा नसला तरी चालेल असें म्हटलें तर गुरुसंज्ञाही होणार नाहीं; उदा० श्लेष्म३ घ्न, पित्त३ घ्न, द३ध्यश्व, म३ध्वश्व, ह्या ठिकाणीं 'हलोनंतराः संयोगः' (१।१।७) ह्या सूत्रानें संयोगसंज्ञा होऊन मागील अकाराला 'संयोगे गुरु' (१।४।११) ह्या सूत्रानें गुरुसंज्ञा होऊन त्याला 'गुरोरनृतो०' (८।२।८६) ह्यानें प्लुत होत असतो. तो पहिल्या दोन उदाहरणांमध्यें हन्धातूंतील अकाराच्या लोपाला (६।४।९८) आणि पुढील दोन उदाहरणांतील यणाला स्थानिवद्भाव झाला तर संयोग पुढें नसल्यामुळें गुरुसंज्ञा नसल्यानें होणार नाहीं.

पण अगदीं जवळच्यालाच कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो असा ज्याचा पक्ष आहे त्याच्या मतींही संयोगसंज्ञा ही अगदीं जवळच्यालाच होणार असल्यामुळें स्थानिवद्भावानें ती होणार नाहीं. तेव्हां ती संयोगसंज्ञा होते असें सांगावें लागणारच आहे.

---

पादन करीत आहेत.

३१. वाद यांतील आकार हा स्थानिभूत अचापेक्षां म्ह. पहिल्या णिचापेक्षा अगदीं जवळचा नाहीं. कारण दकारानें व्यवधान आहे. परंतु अगदीं जवळ नसला तरी चालेल, फक्त पूर्वी असला म्हणजे झालें, असें म्हटलें म्हणजे येथें स्थानिवद्भाव होणार.

न वैष दोषः। किं कारणम्। संयोगस्यापूर्वविधित्वात्। न पूर्वविधिः संयोगः। किं तर्हि। पूर्वपरविधिः संयोगः॥

**एकादेशस्योपसंख्यानम्॥११॥**

एकादेशस्योपसंख्यानं कर्तव्यम्। श्रायसौ गोमतौ चातुरौ आनडुहौ पादे उदवाहे। एकादेशे कृते नुमामौ पद्भाव ऊडित्येते विधयः प्राप्नुवन्ति॥ किं पुनः कारणं न सिध्यति।

**उभयनिमित्तत्वात्॥१२॥**

अजादेशः परनिमित्तक इत्युच्यत उभयनिमित्तश्चायम्॥

**उभयादेशत्वाच्च॥१३॥**

अच आदेश इत्युच्यतेऽचोश्चायमादेशः॥ नैष दोषः। यत्तावदुच्यत उभयनिमित्तत्वादिति। इह यस्य ग्रामे नगरे वानेकं कार्यं भवति शक्नोत्यसौ ततोऽन्यतरद्व्यपदेष्टुम्। तद्यथा। गुरुनिमित्तं वसामः। अध्ययननिमित्तं वसाम इति॥ यदप्युच्यत उभयादेश-

(वा.१०) हा दोष येत नाहीं.

कां बरें?

संयोगस्यापूर्वविधित्वात् म्हणजे संयोगसंज्ञा ही पूर्वीच्या वर्णाला होणारा विधि नव्हे.

तर मग संयोगसंज्ञा ही कोणाला येणारी आहे?

पूर्व आणि पर ह्या दोघांना मिळून होणारी आहे. आणि येथें पूर्वाला विधि म्हणजे फक्त पूर्वालाच जो विधि तो घेतला जातो.

(वा.११) दोघांच्या स्थानीं होणाऱ्या एकादेशाला स्थानिवद्भाव होतो असें म्हणावें; उदाहरण श्रायसौ[३२], गौमतौ, चातुरौ, आनडुहौ, पादे, उदवाहे. श्रायसौ, गौमतौ, येथें वृद्धिरूप एकादेश (६।१।८८) केल्यानंतर नुम् आगम (७।१।७०) प्राप्त होतो. चातुरौ, आनडुहौ, येथें वृद्धिरूप एकादेश केल्यानंतर आम् आगम (७।१।९८) प्राप्त होतो. पादे येथें गुण एकादेश (६।१।८७) केल्यानंतर पद् आदेश (६।१।१३०) प्राप्त होतो. उदवाहे येथें गुण एकादेश केल्यानंतर ऊठ् आदेश (६।४।१३२) प्राप्त होतो. एकादेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें नुम् वगैरे विधि होत नाहींत.

पण येथें 'अचः परस्मिन्०' ह्या प्रकृतसूत्रानें कां बरें स्थानिवद्भाव होणार नाहीं?

(वा.१२) पराच्या निमित्तानें झालेला जो अचाचे स्थानीं आदेश त्याला स्थानिवद्भाव होतो असें प्रकृतसूत्रानें सांगितलें आहे. आणि एकादेश हा पूर्व आणि पर ह्या दोहोंच्या निमित्तानें झालेला असतो.

(वा.१३) अचाच्या स्थानीं झालेल्या आदेशाला स्थानिवद्भाव होतो असें प्रकृतसूत्रानें सांगितलें आहे. आणि एकादेश हा तर दोन अचांच्या स्थानीं झालेला आदेश आहे.

हा दोष येत नाहीं. कारण एकादेश हा पूर्व आणि पर ह्या दोहोंच्या निमित्तानें झालेला आहे असें जें म्हटलें आहे तें खरें. तरी पण त्याला त्यांतील एकाच्या निमित्तानें झालेला असें म्हणतां येतें. असें पाहा की एखादा मनुष्य एखाद्या गांवामध्यें किंवा शहरामध्यें अनेक कार्यें करण्याकरितां गेला असेल तर तो त्या अनेक कार्यांकरितां आलों असें सर्वत्र सांगत बसत नाहीं. कोठें कांहीं सांगतो, कोठें कांहीं सांगतो. कोठें म्हणतो की मी गुरूकरितां येथें राहिलों आहे. कोठें म्हणतो मी अध्ययनाकरितां राहिलों आहे.

तसेंच दोन अचांचा हा आदेश आहे असें जें म्हटलें आहे तेंही खरेंच. पण त्यांतील एकाच स्थानीचा निर्देश करण्यास कांहीं

३२. श्रेयस्शब्दाहून अण् प्रत्यय (४।३।५३) होऊन एकाराला आकार आदेश (७।३।१) होऊन श्रायस शब्द सिद्ध होतो. गोमत्, चतुर् आणि अनडुह् या शब्दांहून अण् प्रत्यय (४।३।१२०) होऊन त्या शब्दांतील पहिल्या अचाला वृद्धि (७।२।११७) होऊन गौमत, चातुर आणि आनडुह हे शब्द सिद्ध होतात.

त्वाच्चेति । इह यो द्वयोः षष्ठीनिर्दिष्टयोः प्रसङ्गे भवति लभतेऽसावन्यतरतो व्यपदेशम् । तद्यथा । देवदत्तस्य पुत्रः । देवदत्तायाः पुत्र इति ॥

अथ हलचोरादेशः स्थानिवद्भवत्युताहो न । कश्चात्र विशेषः ।

**हलचोरादेशः स्थानिवदिति चेद्विंशतेस्तिलोप एकादेशः ॥ १४ ॥**

हलचोरादेशः स्थानिवदिति चेद्विंशतेस्तिलोप एकादेशो वक्तव्यः । विंशकः विंशं शतम् विंशः ॥

**स्थूलादीनां यणादिलोपेऽवादेशः॥१५**

स्थूलादीनां यणादिलोपे कृतेऽवादेशो वक्तव्यः । स्थवीयान् दवीयान् ॥

**केकयमित्रय्वोरियादेश एत्वम् ॥ १६**

केकयमित्रय्वोरियादेश एत्वं न सिध्यति । कैकेयः मैत्रेयः । अचीत्येत्वं न सिध्यति ॥

**उत्तरपदलोपे च ॥ १७ ॥**

उत्तरपदलोपे च दोषो भवति । दध्युपसिक्ताः सक्तवो दधिसक्तवः । अचीति यणादेशः प्राप्नोति ॥

**यङ्लोपे यणियङुवङः ॥ १८ ॥**

यङ्लोपे यणियङुवङो न सिध्यन्ति । चेच्यः नेन्यः चेक्षियः चेक्रियः लोलुवः पोपुवः । अचीति यणियङुवङो न सि-

---

हरकत नाहीं. कारण षष्ठीप्रत्यय लावून दोन स्थानींचा निर्देश करून त्यांच्या स्थानीं जो एक आदेश सांगितलेला असतो त्याला त्या दोन स्थानींपैकीं कोणाच्याही स्थानीं झालेला असें म्हणतां येतें; जसें देवदत्ता आणि देवदत्त ह्या आईबापांच्या मुलाला देवदत्ताचा पुत्र असेंही म्हणतात व देवदत्तेचा पुत्र असेंही म्हणतात.

आतां हल् आणि अच् ह्या दोहोंच्या स्थानीं झालेला जो आदेश त्याला प्रकृतसूत्रानें स्थानिवद्भाव होतो किंवा नाहीं ?

ह्या दोहोंमध्यें फरक काय ?

(वा.१४) हल् आणि अच् ह्या दोघांच्या स्थानीं झालेला जो आदेश त्याला स्थानिवद्भाव होतो असें म्हटलें तर विंशकः, विंशम्, शतम्, विंशः इत्यादि उदाहरणांमध्यें विंशति शब्दांतील ति ह्याचा लोप (६।४।१४२) झाल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव होऊन पररूप हा एकादेश होणार नाहीं तो होतो असें म्हणावें लागेल.

स्थवीयान्, दवीयान्, ह्या उदाहरणांमध्यें स्थूल, दूर, ह्या शब्दांतील यणाला आरंभ करून पुढील भागाचा लोप झाल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव झाल्यामुळें मागील ओकाराला अव् आदेश होणार नाहीं तो होतो असें म्हणावें लागेल.

(वा.१६) कैकेयः, मैत्रेयः, ह्या उदाहरणांमध्यें केकय, मित्रयु, ह्या शब्दांतील यकारादि भागाला इय् आदेश केल्यानंतर तो अच् पुढें असल्यामुळें 'आद्गुणः' (६।१।८७) ह्यानें जो एकादेश एकार होत असतो तो इय्-आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होणार नाहीं.

(वा.१७) उत्तरपदाचा लोप झाला असेल तेथेंही दोष येतो; उदा० दध्युपसिक्ताः सक्तवः दधिसक्तवः, येथें उपसिक्त ह्या उत्तरपदाचा लोप झाल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव झाल्यामुळें उकार अच् पुढें आहे असें समजून अच् पुढें असतांना सांगितलेला यण् आदेश होऊं लागेल.

(वा.१८) यङाचा लोप (२।४।७) झाल्यानंतर यण् (६।४।७७), इयङ्, उवङ् (६।४।७७) होणार नाहींत. उदा० चेच्यः[33], नेन्यः, चेक्षियः, चेक्रियः, लोलुवः, पोपुवः, ह्या उदा-

---

३३. चि, नी, क्षि, क्री, लू आणि पू या धातूंहून यङ् प्रत्यय (३।१।२२) करून पुढें अच् प्रत्यय (३।१।१३४) केला आहे.

ध्यन्ति ॥ अस्तु तर्हि न स्थानिवत् ॥

**अस्थानिवत्त्वे यङ्लोपे गुणवृद्धिप्रतिषेधः ॥ १९ ॥**

अस्थानिवत्त्वे यङ्लोपे गुणवृद्ध्योः प्रतिषेधो वक्तव्यः । लोलुवः पोपुवः सरीसृपः मरीमृज इति ॥ नैष दोषः । न धातुलोप आर्धधातुके [१.१.४] इति प्रतिषेधो भविष्यति ॥

किं पुनराश्रीयमाणायां प्रकृतौ स्थानिवद्भवत्याहोस्विदविशेषेण । कश्चात्र विशेषः ।

**अविशेषेण स्थानिवदिति चेल्लोपयणादेशे गुरुविधिः ॥ २० ॥**

अविशेषेण स्थानिवदिति चेल्लोपयणादेशयोर्गुरुविधिर्न सिध्यति । श्लेष्म३घ्न पित्त३घ्न द३ध्यश्व म३ध्वश्व । हलोऽनन्तराः संयोगः [१.१.७] इति संयोगसंज्ञा संयोगे गुरु [१.४.११] इति गुरुसंज्ञा गुरोरिति प्लुतो न प्राप्नोति ॥

**द्विर्वचनादयश्च प्रतिषेधे ॥ २१ ॥**

द्विर्वचनादयश्च प्रतिषेधे वक्तव्याः । द्विर्वचनवरेयलोपेति ॥

**क्सलोपे लुग्वचनम् ॥ २२ ॥**

---

हरणांमध्यें यङाच्या लोपाला स्थानिवद्भाव झाला तर अच् पुढें असतांना सांगितलेले यण्, इयङ् आणि उवङ् हे आदेश होणार नाहींत.

तर मग हल् आणि अच् ह्या दोघांच्या स्थानीं झालेल्या आदेशाला स्थानिवद्भाव होत नाहीं असाच पक्ष असूं दे.

(वा.१९) हल् व अच् ह्या दोघांच्या स्थानीं झालेल्या आदेशाला स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हटलें तर लोलुवः, पोपुवः, सरीसृपः, मरीमृजः ह्या उदाहरणांमध्यें यङाचा लोप झाल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें पुढील अच् प्रत्ययाला मानून गुण (७।३।८४), वृद्धि (७।२।११४), होऊं लागतील त्यांचा निषेध सांगावा लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'न धातुलोप आर्धधातुके' (१।१।४) ह्या सूत्रानेंच तेथें गुण आणि वृद्धि ह्यांचा निषेध होईल.

पण काय, येथें जो पूर्वाला विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव करावयाचा तो विधि स्थानीच्या निमित्तानेंच प्राप्त होणारा असला पाहिजे किंवा तसा नसला तरी चालेल?

ह्या दोहोंमध्यें फरक काय?

(वा.२०) कसाही विधि असला तरी स्थानिवद्भाव होतो असें म्हटलें तर श्लेष्म३घ्न, पित्त३घ्न, ह्या ठिकाणीं हन् धातूच्या अकाराचा लोप (६।४।९८) केल्यानंतर द३ध्यश्व, म३ध्वश्व ह्या ठिकाणीं यण् आदेश (६।१।७७) केल्यानंतर मागील अकाराला गुरु समजून जो प्लुत होत असतो तो होणार नाहीं. ह्या उदाहरणांमध्यें त्या अकाराच्या पुढील दोन व्यंजनांना 'हलोऽनंतराः संयोगः' (१।१।७) ह्या सूत्रानें संयोगसंज्ञा होते. नंतर त्याच्या मागील अकाराला 'संयोगे गुरु' (१।४।११) ह्या सूत्रानें गुरुसंज्ञा होते. आणि 'गुरोरनृतो०' (८।२।८६) ह्या सूत्रानें प्लुत होत असतो तो होणार नाहीं.

(वा.२१) शिवाय ह्या स्थानिवद्भावाचा निषेध सांगणाऱ्या पुढील सूत्रामध्यें द्विर्वचन वगैरे म्हणजे द्विर्वचन, वरे आणि यलोप हे शब्द घातले पाहिजेत[३४].

(वा.२२)'लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये' (७।३।७३) ह्या सूत्रामध्यें मागून लोपपदाची अनुवृत्ति आणून सच्या अकाराचा[३५]

---

३४. पूर्वाला विधि स्थानीच्या निमित्तानेंच प्राप्त होणारा असला पाहिजे असें म्हटलें म्हणजे द्विर्वचन वगैरे विधि हे स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारे नसल्यामुळें स्थानिवद्भाव होणारच नाहीं. तेव्हां तेथें निराळा निषेध सांगावयास नको.

३५. सचा लोप सांगितला तरी अलोन्त्यस्य (१।१।५२) या परिभाषेनें अंत्याचा म्ह. अकाराचाच होणार आहे. लुक् सांगितला म्हणजे मात्र त्याविषयीं अलोन्त्यस्य ही परिभाषा येत नसते. आणि सबंध सचा लुक् होतो.

क्सलोपे लुग्वक्तव्यः । अदुग्ध अदुग्धाः । लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये [७.३.७३] इति ॥

हन्तेर्घत्वम् ॥ २३ ॥

हन्तेश्च घत्वं वक्तव्यम् । घ्नन्ति घ्नन्तु अघ्नन् ॥ अस्तु तर्ह्याश्रीयमाणायां प्रकृताविति ।

ग्रहणेषु स्थानिवदिति चेज्जग्ध्यादिष्वादेशप्रतिषेधः ॥ २४ ॥

ग्रहणेषु स्थानिवदिति चेज्जग्ध्यादिष्वादेशस्य प्रतिषेधो वक्तव्यः । निराद्य समाद्य । अदो जग्धिर्ल्यप्ति किति [२.४.३६] इति जग्धिभावः प्राप्नोति ॥

यणादेशे युलोपेत्वानुनासिकात्त्वप्रतिषेधः ॥ २५ ॥

यणादेशे युलोपेत्वानुनासिकात्त्वानां प्रतिषेधो वक्तव्यः ॥ यलोप । वाय्वोः अध्वर्य्वोः । लोपो व्योर्वलि [६.१.६६] इति यलोपः प्राप्नोति ॥ उलोप । अकुर्वि आशाम् अकुर्व्याशाम् । नित्यं करोतेर्ये च [६.४.१०८,१०९] इत्युकारलोपः प्राप्नोति ॥ ईत्व । अलुनि आशाम् अलुन्याशाम् । ई हल्यघोः [६.४.११३] इतीत्वं प्राप्नोति ॥ अनुनासिकात्त्व । अजज्ञि

---

लोप केला तर अदुग्ध, अदुग्धाः, ह्या उदाहरणांमध्यें त्या अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें सकाराचा लोप (८।२।२६) होणार नाहीं. ह्याकरितां 'लुग्वा दुहदिह०' ह्या सूत्रामध्यें लुक् हा शब्द ठेवावा लागेल.

(वा. २३) घ्नन्ति, घ्नन्तु, अघ्नन्, ह्या ठिकाणीं हन् धातूच्या अकाराचा लोप (६।४।९८) झाल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव झाला असतां मागील हकाराला घकार आदेश (७।३) होणार नाहीं तो होण्याकरितां वचन करावें लागेल.

तर मग स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारा विधि कर्तव्य असेल तरच स्थानिवद्भाव होतो असा पक्ष असूं दे.

(वा. २४) स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारा विधि कर्तव्य असतांनाच स्थानिवद्भाव होतो असें म्हणाल तर जग्धि वगैरे आदेशांचा निषेध सांगितला पाहिजे. निराद्य, समाद्य, ह्या उदाहरणांमध्यें णिचाच्या लोपाला (६।४।५२) स्थानिवद्भाव झाल्यामुळें 'अदो जग्धिर्ल्यप्ति किति' (२।४।३६) ह्या सूत्रानें सांगितलेला जग्धि आदेश होत नाहीं परंतु आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें[३६] जग्धि आदेश होऊं लागेल.

(वा. २५) त्याच प्रमाणें आणखी यण् आदेश केल्यानंतर यकाराचा लोप, उकाराचा लोप, ईकार आदेश आणि अनुनासिकाला सांगितलेला आकार आदेश ह्या कार्यांचा निषेध सांगितला पाहिजे. यलोपाचें उदाहरण-वाय्वोः, अध्वर्य्वोः. येथें 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६) ह्यानें प्राप्त झालेला यकाराचा लोप यण्-आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल. उकारलोपाचें उदाहरण— अकुर्वि आशाम् अकुर्व्याशाम्. येथें 'नित्यं करोतेः' (६।४।१०८) ह्या सूत्रापुढील 'ये च' (६।४।१०९) ह्या सूत्रानें सांगितलेला उकाराचा लोप यण्-आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल. ईकार आदेशाचें उदाहरण-अलुनि आशाम् अलुन्याशाम्. येथें 'ई हल्यघोः' (६।४।११३) ह्या सूत्रानें सांगितलेला ईकार आदेश यण् आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल. अनुनासिकाला सांगितलेल्या आकार आदेशाचें उदाहरण-अजज्ञि आशाम् अज-

---

३६. कारण स्थानी जो णिच् त्या निमित्तानें प्राप्त होणारा जग्धि आदेश नव्हे.

आशाम् अजज्याशाम् । ये विभाषा [६.४.४३] इत्यनुनासिकात्त्वं प्राप्नोति ॥

## रायात्वप्रतिषेधश्च ॥ २६ ॥

राय आत्वस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । रायि आशाम् राय्याशाम् । रायो हलि [७.२.८५] इत्यात्वं प्राप्नोति ॥

## दीर्घे यलोपप्रतिषेधः ॥ २७ ॥

दीर्घे यलोपस्य प्रतिषेधो वक्तव्यः । सौर्ये नाम हिमवतः शृङ्गे तद्वान्सौर्यी हिमवानिति साविनाश्रये दीर्घत्वे कृत इति यलोपः प्राप्नोति ॥

## अतो दीर्घे यलोपवचनम् ॥ २८ ॥

अतो दीर्घे यलोपो वक्तव्यः । गार्गीभ्याम् वात्साभ्याम् । दीर्घे कृत आपत्यस्य च तद्धितेऽनाति [६.४.१५१] इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । आश्रीयते तत्र प्रकृतिस्तद्धित इति ॥ सर्वेषामेष परिहारः । उक्तं विधिग्रहणस्य प्रयोजनं विधिमात्रे स्थानिवद्यथा स्यादनाश्रीयमाणायामपि प्रकृताविति ॥ अथवा पुनरस्त्व-

---

इयाशाम्. ह्या ठिकाणीं 'ये विभाषा' (६।४।४३) ह्या सूत्रानें नकाराच्या स्थानीं सांगितलेला आकार आदेश यण्आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल.

(वा.२६) तसेंच रैशब्दाला सांगितलेल्या आत्वाचाही निषेध सांगितला पाहिजे. रायि आशाम् राय्याशाम् येथें 'रायो हलि' (७।२।८५) ह्या सूत्रानें सांगितलेला आकार आदेश यण् आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल.

(वा.२७) तसेंच दीर्घ केल्यानंतर यकाराच्या लोपाचा प्रतिषेध सांगितला पाहिजे. सौर्य नांवाचीं हिमवान् पर्वताचीं दोन शिखरें आहेत. त्या शिखरांनीं युक्त अशा त्या पर्वताला सौर्यी[३७] असें म्हणतात. सौर्यिन् येथें सुप्रत्यय पुढें असतांना 'इन्हन्०' (६।४।१२) ह्या सूत्रानें इकाराला दीर्घ केल्यानंतर 'सूर्यतिष्य०' (६।४।१४९) ह्या सूत्रानें सांगितलेला यकाराचा लोप दीर्घाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें होत नसतो, तो आतां स्थानिवद्भाव न झाल्यामुळें होऊं लागेल.

(वा.२८) अकाराला दीर्घ आदेश केल्यानंतर यकाराचा लोप होतो असें म्हणावें. गार्गीभ्याम्, वात्साभ्याम्, ह्या उदाहरणांमध्यें गार्ग्य आणि वात्स्य ह्या यञ् प्रत्ययान्त (४।१।१०५) शब्दांहून केलेल्या अण्प्रत्ययाला (४।३।१२७) 'सुपि च'(७।३।१०२) ह्या सूत्रानें दीर्घही होतो. येथें 'आपत्यस्य च तद्धितेऽनाति' (६।४।१५१) ह्या सूत्रानें यकाराचा लोप होत असतो. दीर्घाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें 'अनाति' हा यलोपाचा निषेध होत नाहीं. परंतु आतां दीर्घाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें अनाति हा निषेध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण यलोप (६।४।१५१) हा तद्धित पुढें असतांना सांगितलेला असल्यामुळें स्थानीच्या निमित्तानेंच प्राप्त होणारा आहे. तेव्हां स्थानिवद्भाव होण्यास कांहींच हरकत नाहीं.

आतांपर्यंत दिलेल्या सर्व दोषांचा असा परिहार आहे तो हा की विधि हा स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारा जरी नसला तरीही स्थानिवद्भाव झाला पाहिजे असा विधिग्रहणाचा उपयोग पूर्वी सांगितलाच आहे (पृ.३५५).

अथवा इतकाही प्रयत्न करण्याचें कारण नाहीं. स्थानीच्या निमित्तानें प्राप्त होणारा विधि असो अथवा नसो, तेथें स्थानिवद्भाव होतो

---

३७. सूर्यशब्दाहून अण् प्रत्यय (४।३।११२) होऊन अकाराचा लोप (६।४।१४८) आणि ऊकाराला वृद्धीनें औकार (७।२।११७) होऊन सौर्य शब्द साधला आहे. त्याहून इन् प्रत्यय (५।२।११२) केला म्हणजे सौर्यिन् असा शब्द सिद्ध होतो.

विशेषेण स्थानिवदिति । ननु चोक्तमविशेषेण स्थानिवदिति चेल्लोपयणादेशे गुरुविधिर्द्विर्वचनादयश्च क्सलोपे लुग्वचनं हन्तेर्घत्वमिति । नैष दोषः । यत्तावदुच्यतेऽविशेषेण स्थानिवदिति चेल्लोपयणादेशे गुरुविधिरिति । उक्तमेतत् । न वा संयोगस्यापूर्वविधित्वादिति ॥ यदप्युच्यते द्विर्वचनादयश्च प्रतिषेधे वक्तव्या इति । उच्यन्ते न्यास एव ॥ क्सलोपे लुग्वचनमिति । क्रियते न्यास एव ॥ हन्तेर्घत्वमिति । सप्तमे परिहारं वक्ष्यति ॥

न पदान्तद्विर्वचनवरेयलोपस्वरसवर्णानुस्वारदीर्घजश्चर्विधिषु ॥ १.१.५८॥

पदान्तविधिं प्रति न स्थानिवदित्युच्यते तत्र वेतस्वानिति रुः प्राप्नोति । नैष दोषः । भसंज्ञात्र बाधिका भविष्यति तसौ मत्वर्थे [१.४.१९] इति । अकारान्तमेतद्भसंज्ञां प्रति । पदसंज्ञां प्रति सकारान्तम् । ननु चैवं विज्ञायते यः संप्रति-

असा सूत्रार्थच केला म्हणजे झालें.

पण ह्या पक्षावर 'अविशेषेण स्थानिवदि चेल्लोपयणादेशे गुरुविधिः', 'द्विर्वचनादयश्च', 'सलोपे लुग्वचनम्','हन्तेर्घत्वम्'(वा.२०-२३), असे दोष दाखविले आहेत ना ?

हे दोष येत नाहींत. अविशेषेण स्थानिवदिति चेल्लोपयणादेशे गुरुविधिः' हा जो दोष दिला आहे त्याचा परिहारही 'न वा संयोगस्यापूर्वविधित्वात्' (वा.१०) असा सांगितला आहे. तसेंच 'द्विर्वचनादयश्च प्रतिषेधे' असा जो दोष दिला आहे तोही दोष येत नाहीं. कारण स्थानिवद्भावाचा निषेध सांगणाऱ्या 'न पदांत' ह्यापुढील सूत्रामध्यें द्विर्वचन वगैरे शब्द पाणिनीनेंच घातले आहेत. तसेंच 'सलोपे लुग्वचनम्' असा जो दोष दिला आहे तोही बरोबर नाही. कारण तेथें देखील 'लुग्वादुह०' (६।३।७३) ह्या सूत्रामध्यें लुक् असा शब्द पाणिनीनें घातलाच आहे. आतां 'हन्तेर्घत्वम्' असा जो शेवटीं दोष दिला आहे त्याचा परिहार सातव्या अध्यायामध्यें (७।३।५४) सांगणार आहे.

(सू.५८) पदान्तविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें येथें म्हटलें आहे. तेव्हां वेतस्वान् येथें 'स्वादिष्वसर्व०' (१।४।१७) ह्यानें सांगितलेली पदसंज्ञा हा पदान्तविधि कर्तव्य असतांना वेतस् ह्यांतील अकाराच्या लोपाला स्थानिवद्भावाचा निषेध झाल्यामुळें वेतस् या सकारान्ताला पदसंज्ञा होऊन रुत्व (८।२।६६) होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'तसौ मत्वर्थे' (१।४।१९) ह्यानें सांगितलेली भसंज्ञा पदसंज्ञेचा बाध करील.

हा बाध होणार नाहीं. कारण भसंज्ञा कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध नसल्यामुळें भसंज्ञा ही 'वेतस' ह्या अकारान्त शब्दाला होणारी आहे. आणि पदसंज्ञा ही 'वेतस्' ह्या सकारान्ताला होणारी आहे.

पण जो विधि आतां पदान्ताला होणारा आहे तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे ना ? तेव्हां पदसंज्ञा

१. पदाचा अंत्यावयव कर्तव्य असतांना, द्वित्व कर्तव्य असतांना, वरे प्रत्यय पुढें असतांना आणि यलोप, स्वर, सवर्ण, अनुस्वार, दीर्घ, जश्, चर् हे विधि कर्तव्य असतांना पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला स्थानिवद्भाव होत नाहीं.

२. पदसंज्ञा झाल्यानें अमुक वर्ण पदाचा अंत्यावयव आहे असें समजतें. तो वर्ण जरी पूर्वीपासूनच अस्तित्वांत आलेला आहे तरी त्याला 'पदाचा अंत' असें पदसंज्ञा झाल्यानेंच म्हणता येतें, तेव्हां पदसंज्ञेनें पदान्ताचें विधान होत असल्यामुळें पदसंज्ञेला 'पदान्तविधि' असें म्हणतां येतें. वेतस शब्दाहून ड्मतुप् प्रत्यय (४।२।८७) होऊन अकाराचा लोप (६।४।४३) झाला आहे.

३. प्रकृतसूत्रांतील विधिशब्दामध्यें भाव या अर्थी किप्रत्यय न करतां कर्म या अर्थी केला म्हणजे 'विधि' शब्दाचा 'विधान' इतकाच अर्थ न

पदान्त इति । कर्मसाधनस्य विधिशब्दस्योपादान एतदेवं स्यात् । अयं च विधिशब्दोऽस्त्येव कर्मसाधनो विधीयते विधिरिति । अस्ति भावसाधनो विधानं विधिरिति । तत्र भावसाधनस्य विधिशब्दस्योपादान एष दोषो भवति । इह च ब्रह्मबन्ध्वा ब्रह्मबन्ध्वै धकारस्य जश्त्वं प्राप्नोति॥ अस्ति पुनः किंचिद्भावसाधनस्य विधिशब्दस्योपादाने सतीष्टं संगृहीतमाहोस्विद्दोषान्तमेव । अस्तीत्याह । इह कानि सन्ति यानि सन्ति कौ स्तः यौ स्त इति योऽसौ पदान्तो यकारो वकारो वा श्रूयेत स न

---

हा पदान्त विधि नसल्यामुळें स्थानिवद्भाव होऊन पदसंज्ञा देखील भसंज्ञेसारखी 'वेतस' ह्या अकारान्तालाच होणारी आहे.

हा सूत्रांतील विधिशब्द कर्मणि किप्रत्यय (३।३।९२) करून साधला आहे असें गृहीत धरलें तर हें तुमचें म्हणणें जुळेल. कारण हा विधिशब्द विधीयते इति विधिः असा कर्मणि किप्रत्यय करून साधितां येतो. तसाच विधानं विधिः असा भावीं किप्रत्यय करूनही साधितां येतो. एकंदरींत सांगितलेलें जें कार्य त्याला विधि म्हणतां येतें व त्या कार्याच्या विधानालाही विधि म्हणतां येतें. तेव्हां भावीं किप्रत्यय करून विधान ह्या अर्थाचा विधिशब्द येथें घेतला असतां पदसंज्ञा हा पदान्त विधि असल्यामुळें वेतस्वान् येथें दोष येणारच. तसेंच ब्रह्मबन्ध्वा, ब्रह्मबन्ध्वै येथें पदसंज्ञा हा पदान्त विधि कर्तव्य आहे म्हणून यणाला स्थानिवद्भावाचा निषेध झाल्यामुळें धकारान्त भागाला पदसंज्ञा होऊन जश्त्व (८।२।३९) होऊं लागेल.

पण असा भावी किप्रत्यय करून साधलेला विधिशब्द येथें घेण्यांत कांहीं एखादें इष्ट साधत आहे काय ? का दोष देण्यापुरताच तसा विधिशब्द घेतला आहांत ?

इष्ट साधत आहे असें आम्ही म्हणतों. असें पाहा की 'कानि सन्ति, यानि सन्ति, कौ स्तः, यौ स्तः, हीं जीं मूळचीं उदाहरणें आहेत त्या ठिकाणीं यण् आणि आव् आदेश होऊन पदान्त जो यकार किंवा वकार ऐकण्यांत येणार तो ऐकूं येत नाहीं. कारण यकार आणि वकार ह्या पदान्ताचें विधान कर्तव्य असल्यामुळें अकाराच्या लोपाला (६।४।१११) स्थानिवद्भावाचा निषेध होत आहे. अशा तऱ्हेनें मूळचीं

---

होतां 'ज्याचें विधान पाणिनीनें केलें आहे तो' म्ह. यण्, गुण, पदसंज्ञा वगैरे अर्थ होतो. तो पदान्ताला होत असेल तर प्रकृतसूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध होईल. पदसंज्ञेनें पदान्ताचें विधान जरी होतें तरी 'पदान्ताला पदसंज्ञा होते' असें मुळींच म्हणतां येत नाहीं. तेव्हां पदसंज्ञा कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध होत नाहीं.

४. ब्रह्मबन्धु शब्दाहून ऊङ् प्रत्यय (४।१।६६) होऊन सवर्ण एकादेश (६।१।१०१) होऊन ब्रम्हबन्धु शब्द साधला आहे. पुढें तृतीयेचें एकवचन आणि चतुर्थीचें एकवचन करून हीं रूपें साधलीं आहेत. ऊकाराला यण् (६।१।७०) झालेला आहे. त्या यणाला आणि एकादेशाला पदसंज्ञा (१।४।१७) कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव न झाल्यामुळें धकारान्त भागाला पदसंज्ञा होईल. भसंज्ञा ही धकारान्त भागाला येत नाहीं म्हणून तिनें पदसंज्ञेचा बाध होत नाहीं. कारण भसंज्ञा कर्तव्य असतांना यणाला आणि एकादेशाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें तिच्या दृष्टीनें एकादेशाच्या पूर्वीची स्थिति असल्यामुळें ब्रह्मबन्धु असें उकारांत समजून ती प्राप्त होणार आहे.

५. कर्म या अर्थी कि प्रत्यय घेऊन साधणारी. येथें सन्ति आणि स्तः या क्रियापदांतील अस्धातूच्या अकाराचा जो लोप (६।४।१११) झाला आहे तो स्थानिनिवद्भाव झाला तर मागील इकाराला यण् (६।४।६।१।७७) आणि औकाराला आव् (६।१।७८) आदेश होईल. परंतु पदान्त अशा इकार आणि औकार याना यण् व आव् आदेश हे विधि कर्तव्य असल्यामुळें स्थानिवद्भाव होत नाहीं.

६. तेव्हां विधि शब्दामध्यें किप्रत्यय भाव या अर्थी घेतला तरीही कानि सन्ति, कौ स्तः, हीं उदाहरणें साधत आहेत.

श्रूयते । षडिकश्चापि सिद्धो भवति । वाचिकस्तु न सिध्यति । अस्तु तर्हि कर्मसाधनः । यदि कर्मसाधनः षडिको न सिध्यति । अस्तु तर्हि भावसाधनः । वाचिको न सिध्यति । वाचिकषडिकौ न संवदेते । कर्तव्योऽत्र यत्नः ॥ कथं ब्रह्मबन्ध्वा ब्रह्मबन्ध्वै । उभयत आश्रये नान्तादिवदिति ॥ कथं वेतस्वान् । नैवं विज्ञायते पदस्यान्तः पदान्तः पदान्तविधिं प्रतीति । कथं तर्हि । पदेऽन्तः पदान्तः

---

उदाहरणें साधून षडिकः हेंही उदाहरण सिद्ध होत आहे.

पण भावीं क्तिप्रत्यय करून साधलेला विधिशब्द घेतला तर वाचिकः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तर मग वाचिकः हें उदाहरण साधण्याकरितां कर्मणि क्तिप्रत्यय करून साधलेलाच विधिशब्द येथें असूं दे.

पण कर्मणि क्तिप्रत्यय करून साधलेला विधिशब्द येथें घेतला तर षडिकः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तर मग षडिकः हें उदाहरण साधण्याकरितां भावीं क्तिप्रत्यय करून साधलेलाच विधिशब्द येथें असूं दे.

पण तसा घेतला तर वाचिकः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

वाचिक व षडिक ह्या दोन उदाहरणांचा परस्परांमध्यें उत्पन्न झालेला विरोध ज्या रीतीनें नाहींसा होईल असा येथें यत्न करावा. तो यत्न म्हणजे भावसाधन विधिशब्द घेऊन षडिकः उदाहरण साधावें व वाचिकः ह्या उदाहरणामध्यें आशीर्दत्तः ह्या उत्तरपदाचा लोप केला म्हणजे स्थानिवद्भावाची प्राप्तिच येत नाहीं.

भावसाधन विधिशब्द घेतला तर ब्रह्मबन्ध्वा, ब्रह्मबन्ध्वै हीं उदाहरणें कशीं साधावीत?

'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' म्हणजे एकच विधि कर्तव्य असतांना पूर्वान्तवद्भाव आणि परादिवद्भाव (६।१।८५) हे दोन्ही एकदम होत नाहींत अशी परिभाषा आहे. म्हणून ब्रह्मबन्धु येथें सवर्ण दीर्घ एकादेश झाल्यानंतर परादिवद्भावानें स्वादिप्रत्यय आणि पूर्वान्तवद्भावानें स्वादिप्रत्यय ज्याहून केला तो प्रकृतिभाग ह्या दोन्ही गोष्टी एकदम घेतां येत नसल्यामुळें पदसंज्ञा (१।४।१७) होत नाहीं.

भावसाधन विधिशब्द घेतला तर वेतस्वान् हें उदाहरण कसें साधेल?

पदाचा जो अंत तो पदान्त. पदान्ताचा जो विधि तो पदान्तविधि. तो पदान्तविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा अर्थ पदान्तविधि ह्याचा समजूं नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावयाचा?

पद पुढें असतांना जो अंत तो पदान्त.

---

७. षडङ्गुलिदत्त आणि वागाशीर्दत्त हे दोन्ही सामासिक शब्द मनुष्यविशेषाचीं नावें आहेत. षष् या पूर्वपदांतील शेवटच्या षकाराला जश्त्वानें डकार (८।२।३९) झाला आहे. तसेंच वाच् यातील चकाराला कुत्वानें (८।२।३०) ककार होऊन जश्त्वानें (८।२।३९) गकार झाला आहे. षडङ्गुलिदत्त आणि वागाशीर्दत्त याहून ठच् प्रत्यय (५।३।७८), त्याला इक आदेश (७।३।५०), शब्दांतील दुसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप (५।३।८३), नंतर दुसऱ्या अचाचा लोप (६।४।१४८), होऊन षडिक आणि वाचिक हे शब्द होतात. षडिक येथें भसंज्ञा कर्तव्य असतांना अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें भसंज्ञा 'षष' या अकारान्ताला प्राप्त होते म्हणून तिनें पदसंज्ञेचा बाध होत नाहीं. कारण विधिशब्दामध्ये भाव या अर्थी क्तिप्रत्यय घेतल्यामुळें पदसंज्ञा कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध होतो, म्हणून पदसंज्ञा षष या अकारांताला न येता षष् या षकारांताला प्राप्त होते. त्या पदसंज्ञेमुळें जश्त्व होऊन षडिक हें उदाहरण सिद्ध होतें.

८. एकाक्षरपूर्वपदानामुत्तरपदलोपो वक्तव्यः (५।३।८४ वा. ४) ह्या वार्तिकानें उत्तरपदाचा लोप सांगितला आहे.

पदान्तविधिं प्रतीति । अथवा यथैवान्यान्यपि पदकार्याण्युपप्लवन्ते रुत्वं जश्त्वं चैवमिदमपि पदकार्यमुपप्लोष्यते । किम् । भसंज्ञा नाम ॥

वरे यलोपविधिं प्रति न स्थानिवद्भवतीत्युच्यते तत्र ते अप्सु यायावरः प्रवपेत पिण्डान् अवर्णलोपविधिं प्रति स्थानिवत्स्यात् । नैष दोषः । नैवं विज्ञायते वरे यलोपविधिं प्रति न स्थानिवद्भवतीति । कथं तर्हि । वरेऽयलोपविधिं प्रतीति । किमिदमयलोपविधिं प्रतीति ॥ अवर्णलोपविधिं प्रति यलोपविधिं च प्रतीति ॥ अथवा योगविभागः करिष्यते । वरे लुप्तं न स्थानिवत् । ततो यलोपविधिं च प्रति न स्थानिवदिति ॥ यलोपे किमुदाहरणम् । कण्डूयतेरप्रत्ययः कण्डूरिति । नैतदस्ति । क्वौ लुप्तं न स्थानि-

पदान्ताचा जो विधि तो पदान्तविधि. तो पदान्तविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा त्याचा अर्थ समजावा.

अथवा पदान्तविधि म्हटल्याबरोबर रुत्व, जश्त्व, इत्यादि पदकार्यें जशीं मनांत येतात तसेंच हेंही पदकार्य म्हणूनच मनांत येईल.

तें कोणतें ?

भसंज्ञा हें तें पदकार्य होय. तेव्हां भसंज्ञा कर्तव्य असतांनाही स्थानिवद्भावाचा निषेध होत असल्यामुळें वेतस्वान् वगैरे ठिकाणीं दोष येत नाहीं.

वरप्रत्ययाच्या निमित्तानें यकाराचा लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें येथें म्हटलें आहे. तेव्हां 'अप्सु यायावरः प्रवपेत पिण्डान्' येथें यायाय ह्या यङन्त या धातूहून वरप्रत्यय (३।२।१७६) केला असतां अकाराचा लोप (६।४।४८) आणि यकाराचा लोप (६।१।६६) झाल्यानंतर आकाराचा लोप (६।४।६४) कर्तव्य असतांना अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होईल आणि त्यामुळें आकाराचा लोप होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. वरप्रत्ययाच्या निमित्तानें यलोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा अर्थ येथें समजूं नये.

तर मग कसा अर्थ समजावयाचा ?

वरप्रत्यय पुढें असतांना जो अयलोपविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा अर्थ समजावयाचा.

अयलोपविधि म्हणजे काय ?

अकाराचा लोप कर्तव्य असतांना आणि यकाराचा लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा त्याचा अर्थ आहे.

अथवा, येथें वरे आणि यलोप अशीं दोन स्थानिवद्भावाच्या निषेधाचीं निरनिराळीं निमित्तें समजावीत, म्हणजे वरप्रत्यय पुढें असतांना झालेल्या लोपाला कोणतेंही कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं आणि यकाराचा लोप कर्तव्य असतांना कोठेंही स्थानिवद्भाव होत नाहीं.

यकाराचा लोपाचें उदाहरण कोणतें ?

कण्डूः हें त्याचें उदाहरण होय. येथें कण्डूय ह्या यक्–(३।१।२७) प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे. येथें अकाराच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें यकाराचा लोप (६।१।६६) होतो.

हें उदाहरण बरोबर नाहीं; कारण 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' म्हणजे क्वि पुढें असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें क्विलुगुपधात्व-

९. तेव्हां वेतस्वान् येथें पुढील प्रत्ययभाग हा पद नसल्यामुळें पदसंज्ञा कर्तव्य असतांनाही स्थानिवद्भावाचा निषेध होत नाहीं. तेव्हां वेतस् याला पदसंज्ञा होत नाहीं.

१०. भसंज्ञा ही फक्त पदकार्याचा प्रतिबंध करण्याकरतां होते. तेव्हां भसंज्ञा हेंही एकप्रकारचें पदकार्य होतें. तेव्हां कानि सन्ति येथें अस्-धातूच्या अकाराच्या लोपाला स्थानिवद्भावाचा निषेध करून यणाचा म्ह. पदान्तविधीचा प्रतिबंध होतो तसा वेतस्वान्, ब्रह्मबन्ध्वा, येथें स्थानिवद्भावाचा निषेध करून सकारांताला भसंज्ञा करून रुत्व वगैरे पदान्तविधीचा प्रतिबंध होतो असें समजावें.

वत् ॥ इदं तर्हि । सौरी बलाका । नैतदस्ति । उपधात्वविधिं प्रति न स्थानिवत् ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । आदित्यः । नैतदस्ति । पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत् ॥ इदं इर्हि । कण्डूतिः । वल्गूतिः । नैतदस्ति प्रयोजनम् । कण्डूया वल्गूयेति भवितव्यम् ॥ इदं तर्हि । कण्डूयतेः क्तिच् । ब्राह्मणकण्डूतिः क्षत्रियकण्डूतिः ॥

## प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपेषु लोपाजादेशो न स्थानिवत् ॥ १ ॥

प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपविधिषु लोपाजादेशो न स्थानिवद्भवतीति वक्तव्यम् ॥ स्वर । आकर्षिकः चिकीर्षकः जिहीर्षकः । यो ह्यन्य आदेशः स्थानिव-

---

(वा.२) ह्या वचनानेंच हें सिद्ध आहे.

तर मग यकाराच्या लोपाचें उदाहरण सौरी,बलाका, हें घ्या. येथें सूर्यशब्दाहून अण् प्रत्यय (४।३।११२) करून पुढें ङीप् (४।१।१५) प्रत्यय केला आहे. येथें सूर्यशब्दांतील अकार आणि अण् प्रत्ययाचा अकार या दोन्ही अकारांच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भावाचा निषेध झाल्यानंतर पुढील आकाराचा लोप असिद्ध (६।४।१४८) असल्यामुळें उपधा यकाराचा लोप (६।४।१४९) होतो.

हेंही उदाहरण बरोबर नाहीं. कारण उपधासंज्ञेमुळें होणारा विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं (वा.२) ह्या वचनानेंच हें सिद्ध होत आहे.

तर मग आदित्यः हें उदाहरण घ्या. अदितिशब्दाहून देवता ह्या अर्थी ण्य प्रत्यय (४।१।८५) करून नंतर पुनः भव ह्या अर्थी ण्य प्रत्यय (४।१।८५) केला आहे. येथें पहिल्या ण्यप्रत्ययांतील अकाराच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें मागील यकाराचा 'हलो यमां०' (८।४।६४) ह्यानें लोप झाला आहे.

हें देखील उदाहरण बरोबर नाहीं. कारण त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं (वा.३) ह्या वचनानेंच हें सिद्ध होत आहे.

तर मग कण्डूतिः, वल्गूतिः, हीं उदाहरणें घ्या. येथें कण्डूय ह्या यक्प्रत्ययान्त धातूहून क्तिन् प्रत्यय (३।३।९४) केला आहे. येथें अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें यकाराचा लोप होतो.

हें देखील उदाहरण बरोबर नाहीं. कारण येथें क्तिन्प्रत्ययाचा बाध करून अप्रत्यय (३।३।१०२) होऊन कण्डूया, वल्गूया अशींच उदाहरणें होणार आहेत.

तर मग कण्डूय ह्या यक्प्रत्ययान्त धातूहून क्तिच् प्रत्यय (३।३।१७४) करून साधलेलीं ब्राह्मणकण्डूतिः, क्षत्रियकण्डूतिः, हीं उदाहरणें यलोपाचीं घ्यावींत.

(वा.१) स्थानिवद्भावाचा निषेध सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें स्वर, दीर्घ आणि यलोप हे कर्तव्य असतांना अजादेशाला स्थानिवद्भाव होत नाहीं असें जें म्हटलें आहे तो अजादेश लोप असेल तरच स्थानिवद्भावाचा निषेध होतो असें म्हणावें. स्वराचें उदाहरण—आकर्षिकः[११], चिकीर्षकः, जिहीर्षकः. ह्या उदाहरणांमध्यें लित् स्वर (६।१।१९३) कर्तव्य असतांना मध्यें झालेल्या आकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होत नाहीं.

ज्या ठिकाणीं लोपाशिवाय निराळा म्हणजे भावरूप आदेश असेल तेथें स्वर कर्तव्य असतांना त्याला स्थानिवद्भाव होणारच.

---

११. आकर्षशब्दाहून ष्ठल् प्रत्यय (४।४।९), त्याला इक आदेश (७।३।६०), आणि मागील अकाराचा लोप (६।४।१४८) झाला आहे. चिकीर्ष या सन्प्रत्ययान्त कृ धातूहून आणि जिहीर्ष या सन्प्रत्ययान्त हृधातूहून ण्वुल् प्रत्यय(३।१।१३३),त्याला अक आदेश (७।१।१), आणि मागील अकाराचा लोप (६।४।४८) झाला आहे.

देवासौ भवति। पञ्चारत्न्यः। दशारत्न्यः। स्वर ॥ दीर्घ। प्रतिदीव्ना प्रतिदीव्ने। यो ह्यन्य आदेशः स्थानिवद्देवासौ भवति। किर्योः गिर्योः। दीर्घ ॥ यलोप। ब्राह्मणकण्डूतिः क्षत्रियकण्डूतिः। यो ह्यन्य आदेशः स्थानिवद्देवासौ भवति। वाय्वोः अध्वर्य्वोरिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। इह हि लोपोऽपि प्रकृत आदेशोऽपि विधिग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते दीर्घादयोऽपि निर्दिश्यन्ते। केवलं तत्राभिसंबन्धमात्रं कर्तव्यम्। स्वरदीर्घयलोपविधिषु लोपाजादेशो न स्थानिवदिति। आनुपूर्व्येण संनिविष्टानां यथेष्टमभिसंबन्धः शक्यते कर्तुं नचैतान्यानुपूर्व्येण संनिविष्टानि। अनानुपूर्व्येणापि संनिविष्टानां यथेष्टमभिसंबन्धो भवति। तद्यथा। अनड्वाहमुदहारि या त्वं हरसि शिरसा कुम्भं भगिनि साचीनमभिधावन्तमद्राक्षीरिति।

---

उदाहरणः पंचारत्न्यः[१२], दशारत्न्यः. ह्या ठिकाणीं यण् आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें इगन्त उत्तरपद आहे म्हणून पूर्वपदाला प्रकृतिस्वर (६।२।२९) होतो. दीर्घाचें उदाहरणः प्रतिदीव्ना, प्रतिदीव्ने. येथें अकाराच्या लोपाला (६।४।१३४) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें हल् पुढें आहे म्हणून दिव्धातूच्या उपधेला दीर्घ (८।२।७७) होतो. ज्या ठिकाणीं लोपाशिवाय निराळा म्हणजे भावरूप आदेश असेल तेथें त्याला दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होणारच. उदाहरणः [१४]किर्योः, गिर्योः. येथें यण्आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें हल् पुढें नाहीं म्हणून दीर्घ (८।२।७७) होत नाहीं. यलोपाचें उदाहरण. ब्राह्मणकण्डूतिः, क्षत्रियकण्डूतिः. ज्या ठिकाणीं लोपाशिवाय निराळा म्हणजे भावरूप आदेश असेल तेथें त्याला यलोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होणारच. उदाहरणः [१५]वाय्वोः, अध्वर्य्वोः.

तर मग स्वर, दीर्घ आणि यलोप ह्यांच्याविषयीं तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण ह्या प्रकृतसूत्रामध्यें लोपशब्द आहेच व आदेशशब्दाची अनुवृत्ति येत आहे व विधिशब्दाचीही अनुवृत्ति येत आहे. स्वर, दीर्घ, यलोप, हे तर प्रकृतसूत्रामध्यें उच्चारलेच आहेत. फक्त त्यांचा संबंध करावयाचा तो स्वर, दीर्घ, यलोप, हे कर्तव्य असतांना लोपरूप अजादेशालाच स्थानिवद्भाव होत नाहीं असा केला म्हणजे झालें.

पण एक प्रकारच्या विशेष क्रमानें उच्चारलेल्या पदांचा आपल्या इच्छेप्रमाणें संबंध करितां येणें शक्य आहे. आणि हीं पदें तर येथें तशा क्रमानें उच्चारलेलीं दिसत नाहींत.

तशा विशेष प्रकारच्या क्रमानें पदें उच्चारलीं नसलीं तरी त्यांचा आपल्या इच्छेप्रमाणें संबंध करितां येतो. जसें बैलाला, पाणी आणणारी, जी, तूं, आणल्येस, मस्तकानें, घागर,

---

१२. पञ्चारत्नि या द्विगुसमासाहून पुढें प्रथमाबहुवचनाचा जस् प्रत्यय केला आहे. 'जसादिषु०' (७।३।१०९ वार्तिं० १) यानें गुणाचा विकल्प केला आहे.

१३. प्रतिउपसर्गपूर्वक दिव्धातूहून कनिन् प्रत्यय (औणादिक १।१५४) करून प्रतिदिवन् शब्द साधला आहे. त्याच्यापुढें तृतीयाएकवचनाचा टा प्रत्यय आणि चतुर्थीएकवचनाचा ङे प्रत्यय केला आहे.

१४. कॄ आणि गॄ धातूंहून इप्रत्यय (उणा० ।४।१४२) आणि धातूमधील ऋकाराला इत्व (७।१।१००) होऊन किरि आणि गिरि हे शब्द साधले आहेत. त्यांच्यापुढें षष्ठीद्विवचनाचा ओस् प्रत्यय केला आहे.

१५. वायु आणि अध्वर्यु या शब्दाहून ओस् प्रत्यय आणि उकाराला यण् वकार (६।१।७७) झाला आहे. त्या यणाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें वल् पुढें नाहीं असें समजून यकाराचा लोप (६।१।६६) होत नाहीं.

तस्य यथेष्टमभिसंबन्धो भवति । उदाहारि भगिनि या त्वं कुम्भं हरसि शिरसानड्वाहं साचीनमभिधावन्तमद्राक्षीरिति ॥

**क्विलुगुपधात्वचङ्परनिर्ह्रासकुत्वेषूपसंख्यानम् ॥ २ ॥**

क्विलुगुपधात्वचङ्परनिर्ह्रासकुत्वेषूपसंख्यानं कर्तव्यम् ॥ क्वौ किमुदाहरणम् । कण्डूयतेरप्रत्ययः कण्डूरिति । नैतदस्ति । यलोपविधिं प्रति न स्थानिवत् ॥ इदं तर्हि । पिपठिषतेरप्रत्ययः पिपठीः । नैतदस्ति । दीर्घविधिं प्रति न स्थानिवत् ॥ इदं तर्हि । लावयतेर्लौः पावयतेः पौः । नैतदस्ति । अकृत्वा वृद्ध्यावादेशौ णिलोपः । प्रत्ययलक्षणेन वृद्धिर्भविष्यति ॥ इदं तर्हि । लवमाचष्टे लवयति । लवयतेरप्रत्ययो लौः पौः । स्थानिवद्भावाण्णेरूण्न प्राप्नोति । क्वौ

---

भगिनी, वेडावांकडा धावणाऱ्या, पहाती झालीस, अशीं जरी पदें उच्चारलीं आहेत तरी त्यांचा आपल्या इच्छेप्रमाणें संबंध करितां येतो तो असा : हे पाणी आणणाऱ्या भगिनी, जी तूं मस्तकानें घागर आणत्येस, ती तूं वेडावांकडा धावणाऱ्या बैलाला पहाती झालीस.

(वा.२) क्विप् प्रत्यय केला असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं. लुकाला स्थानिवद्भाव होत नाहीं आणि उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य, चङ्पर णि पुढें असतांना होणारा ऱ्हस्व. व कुत्व हे विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं.

क्विप्रत्यय पुढें असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ह्याचें उदाहरण कोणतें ?

कण्डूय ह्या यगन्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असतांना कण्डूः असें रूप होतें; येथें अकाराच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें यकाराचा लोप (६।१।६६) होतो.

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण 'यकाराचा लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं' असें ह्या सूत्रांतच म्हटलें आहे. त्यानेंच हें सिद्ध होत आहे.

तर मग पिपठीः हें उदाहरण घ्या. येथें पिपठिष् ह्या सन् प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे. येथें अकाराच्या लोपाला (६।४।४८) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें दीर्घ (८।२।७६) होतो.

हेंही उदाहरण बरोबर नाहीं. कारण दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें ह्या प्रकृतसूत्रांतच म्हटलें आहे, त्यानेंच हें सिद्ध होत आहे.

तर मग लौः[१६], पौः, हीं उदाहरणें घ्या. येथें लू आणि पू ह्या णिच्प्रत्ययान्त धातूंहून क्विप् प्रत्यय केला आहे. येथें णिचाच्या लोपाला (६।४।५१) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें ऊठ् (६।४।१९) झाला आहे.

हींही उदाहरणें बरोबर नाहींत. कारण लू, पू, ह्या धातूंना वृद्धि, आवादेश करण्याच्या पूर्वींच णिच्प्रत्ययाचा लोप होतो. त्यानंतर प्रत्ययलक्षणानें वृद्धि (७।२।११५) केली म्हणजे हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत.

तर मग लौः हेंच उदाहरण दुसऱ्या तऱ्हेचें घ्या. ह्या ठिकाणीं लवशब्दाहून णिच् प्रत्यय करून पुढें क्विप्रत्यय केला आहे. येथें अकाराच्या लोपाला (६।४।१५५) व णिचाच्या (६।४।५१) लोपाला स्थानिवद्भाव झाला तर ऊठ् आदेश होणार नाहीं. परंतु क्विप् प्रत्यय पुढें असतांना झालेल्या लोपाला स्थानिवद्भाव होत नाहीं, ह्या निषेधानें स्थानिवद्भाव न झाल्यामुळें ऊठ् आदेश होतो.

---

१६. लू आणि पू या धातूंना वृद्धि (७।२।११५) आणि आव् (६।१।७८) आदेश झाल्यानंतर त्या वकाराला क्विप् प्रत्यय पुढें असल्यामुळें ऊठ् आदेश होऊन वृद्धि आणि एकादेश (६।१।८९) होऊन लौ, पौ, असे शब्द सिद्ध होतात. णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव झाला असता तर मध्यें व्यवधान येत असल्यामुळें ऊठ् आदेश झाला नसता.

लुप्तं न स्थानिवदिति भवति ॥ एवमपि न सिध्यति । कथम् । कौ णिलोपो णावकारलोपस्तस्य स्थानिवद्भावादूण्न प्राप्नोति । नैष दोषः । नैवं विज्ञायते कौ लुप्तं न स्थानिवदिति । कथं तर्हि । कौ विधिं प्रति न स्थानिवदिति ॥ लुकि किमुदाहरणम् । बिम्बम् बदरम् । नैतदस्ति। पुंवद्भावेनाप्येतत्सिद्धम् ॥ इदं तर्हि । आमलकम् । एतदपि नास्ति । वक्ष्यत्येतत् । फले लुग्वचनानर्थक्यं प्रकृत्यन्तरत्वादिति ॥ इदं तर्हि । पञ्चभिः पट्वीभिः क्रीतः पञ्चपटुः दशपटुरिति । ननु चैतदपि पुंवद्भावेनैव सिद्धम् । कथं पुंवद्भावः । भस्याढे तद्धिते पुंवद्भवतीति । भस्येत्युच्यते यजादौ च भं भवति न चात्र यजादिं पश्यामः ।

---

तरी पण हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तें कां ?

येथें क्विप् प्रत्यय पुढें असतांना णिचाचा लोप झाला आहे आणि णिच् पुढें असतांना अकाराचा लोप झाला आहे. त्या अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होणारच आणि त्यामुळें ऊठ् होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'क्विप्प्रत्ययाच्या निमित्तानें झालेल्या लोपाला स्थानिवद्भाव होत नाहीं, असा ह्या वार्तिकांतील कि ह्याचा अर्थ समजूं नये. तर 'क्विप् प्रत्याच्या निमित्तानें होणारा जो विधि तो कर्तव्य असतांना कोणत्याही लोपाला स्थानिवद्भाव होत नाहीं' असा अर्थ समजावा.

लुकाला स्थानिवद्भाव होत नाहीं ह्याचें उदाहरण कोणतें ?

बिम्बम्[17], बदरम्, हीं त्याचीं उदाहरणें होत. येथें बिम्ब+ई, बदर+ई, ह्या ङीष्प्रत्ययान्त शब्दांहून पुढें केलेल्या अञ्-(४।३।१४०)प्रत्ययाचा लुक् (४।३।१६३) झाल्यानंतर ङीष्प्रत्ययाचाही लुक् (१।२।४९) झाला आहे. त्या लुकाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें मागील अकाराचा लोप (६।४।१४८) होत नाहीं.

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण 'भस्याढे तद्धिते' (६।३।३५ वा. ११) ह्या वार्तिकानें पुंवद्भाव केल्यानेंही हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत.

तर मग आमलकम् हें उदाहरण घ्या. (येथें आमलक+ई ह्या ङीष्प्रत्ययान्त शब्दाहून पुढें केलेल्या मयट् (४।३।१४४) प्रत्ययाचा लुक् (४।३।१६३) झाल्यानंतर ङीष्प्रत्ययाचाही लुक् झाला आहे. त्या लुकाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें मागील अकाराचा लोप होत नाहीं. भसंज्ञा नसल्यामुळें पुंवद्भावानें हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.)

हेंही उदाहरण बरोबर नाहीं. कारण 'फले लुग्वचनानर्थक्यं प्रकृत्यन्तरत्वात्' असें तेथें (४।३।१६३ वा.१) वार्तिककार सांगणार आहेतच.

तर मग पञ्चभिः पट्वीभिः क्रीतः पञ्चपटुः, दशपटुः, हीं उदाहरणें घ्या. पञ्चपटु+ई ह्या ङीष्–(४।१।४४)प्रत्ययान्त शब्दाहून केलेल्या ठक्–(५।१।१९)प्रत्ययाचा लुक् (५।१।२८) झाल्यानंतर ङीष्प्रत्ययाचाही लुक् झाला आहे. त्या लुकाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें उकाराला यण् होत नाहीं.

पण हें उदाहरण देखील पुंवद्भावानें सिद्ध होत आहे.

येथें पुंवद्भाव कसा होईल ? कारण 'ढप्रत्ययाखेरीज तद्धित प्रत्यय पुढें असतांना भसंज्ञकाला पुंवद्भाव होतो' असा तेथें (६।३।३५ वा.११) भसंज्ञकाला पुंवद्भाव सांगितला आहे. भसंज्ञा (१।४।१८) ही यजादिप्रत्यय पुढें असतांना होत असते. आणि येथें तर यजादिप्रत्यय कोणीच दिसत नाहीं.

पण प्रत्ययलक्षणानें यजादिप्रत्यय पुढें

---

[17] बिम्बीच्या फळाला बिम्ब म्हणतात. आणि बदरीच्या फळाला बदर म्हणतात. बिम्बी म्ह. तोंडली. बदरी म्ह. बोर.

प्रत्ययलक्षणेन यजादिः । वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् । एवं तर्हि ठक्छसोश्चेत्येवं भविष्यति । ठक्छसोश्चेत्युच्यते न चात्र ठक्छसौ पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः ॥ न खल्वप्यवश्यं ठगेव क्रीतप्रत्ययः क्रीताद्यर्था एव तद्धिताः । किं तर्हि । अन्येऽपि तद्धिता ये लुकं प्रयोजयन्ति । पञ्चेन्द्राण्यो देवता अस्येति पञ्चेन्द्रः दशेन्द्रः पञ्चाग्निः दशाग्निः । उपधात्वे किमुदाहरणम् । पिपठिषतेरप्रत्ययः पिपठीरिति । नैतदस्ति । दीर्घविधिं प्रति न स्थानिवत् ॥ इदं तर्हि । सौरी बलाका । नैतदस्ति । यलोपविधिं प्रति न स्थानिवत् ॥ इदं तर्हि । पारिखीयः । चङ्परनिर्ह्रासे चोपसंख्यानं कर्तव्यम् ।

---

आहे असें म्हणतां येईल.[18]

'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' (पृ.१६१ पं.१३) म्हणजे वर्णाच्या निमित्तानें कार्य कर्तव्य असतांना प्रत्यय लक्षण होत नाहीं.

तर मग 'ठक्छसोश्च' (६।३।३५ वा.१२) ह्या वार्तिकानें तेथें पुंवद्भाव होईल.

पण त्या ठिकाणीं ठक् किंवा छस् पुढें असतांना तो पुंवद्भाव सांगितला आहे. आणि येथें तर ठक् किंवा छस् ह्या प्रत्ययांपैकी कोणीच दिसत नाहीं.

प्रत्ययलक्षणानें ठक्प्रत्यय पुढें आहे असें म्हणतां येईल.

'न लुमता तस्मिन्'[19] (१।१।६३ वा.१५) ह्या सूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होत आहे.

शिवाय खरोखर क्रीत ह्या अर्थीं एक ठक्च प्रत्यय आहे असें नाहीं. तसेंच सर्वच तद्धितप्रत्यय क्रीत ह्या अर्थींच आहेत असेंही नाहीं. तर दुसरे असेही तद्धितप्रत्यय आहेत की जे लुकाला कारण होतात व त्या ठिकाणीं पुंवद्भावाचें नांवही काढतां येत नाही. उदाहरण—पञ्चेन्द्राण्यो देवता अस्य पञ्चेन्द्रः, दशेन्द्रः, पञ्चाग्निः, दशाग्निः, पञ्च+इन्द्र+आन्+ई ह्या ङीषन्त शब्दाहून केलेल्या अण्–(४।२।२४) प्रत्ययाचा लुक् (४।१।८८) झाल्यानंतर ङीष्प्रत्ययाचाही लुक् झाला आहे. त्यामुळें त्या ङीष्प्रत्ययाबरोबर सांगितलेला आनुगागमही तेथें राहत नाहीं. लुकाला स्थानिवद्भाव झाला तर तो आनुक् आगम राहूं लागेल. तसाच पञ्चाग्निः, दशाग्निः, ह्या ठिकाणीं ऐकार आदेश (४।१।३७) राहूं लागेल.

'उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं' ह्याचें उदाहरण कोणतें ?

पिपठीः हें त्याचें उदाहरण होय. येथें पिपठिष् ह्या सन्प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे.

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें ह्या प्रकृतसूत्रांतच म्हटलें आहे. त्यानेंच हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तर मग पारिखीयः हें उदाहरण घ्या. परिखाशब्दाहून चातुरर्थिक अण् (४।२।६७) प्रत्यय करून त्याच्यापुढें पारिखे भवः या अर्थीं छ प्रत्यय (४।२।१४१) केला आहे. येथें परिखा शब्दांतील आकाराच्या लोपाला

---

१८. ठक् प्रत्ययाला इक आदेश झाल्यानंतर त्याचा लुक् झाला आहे तेव्हां प्रत्ययलक्षणानें अजादिप्रत्यय पुढें आहे असें समजतां येईल.

१९. न लुमताङ्गस्य या सूत्रामध्यें 'अङ्गस्य' असें म्हटलें असल्यामुळें अङ्गस्य या अधिकारांतील कार्य कर्तव्य असतांनाच प्रत्ययलक्षणाचा निषेध होईल म्हणून अङ्गस्य याच्या ऐवजीं तस्मिन् असें पद सूत्रामध्यें घालावें अशी वार्तिककारांची सूचना आहे. तेव्हां येथें पुंवद्भाव जरी अङ्गस्य या अधिकारांत नाहीं तरी येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध होतो. एकंदरींत येथें पुंवद्भावानें सिद्धि होत नसल्यामुळे लुकाला स्थानिवद्भाव होत नाहीं यानेंच हें उदाहरण साधलें पाहिजे असें ठरतें.

वादितवन्तं प्रयोजितवान् अवीवदद्वीणां परिवादकेन। किं पुनः कारणं न सिध्यति। योऽसौ णौ णिर्लुप्यते तस्य स्थानिवद्भावाद्ध्रस्वत्वं न प्राप्नोति। ननु चैतदप्युपधात्वविधिं प्रति न स्थानिवदित्येव सिद्धम्। विशेष एतद्वक्तव्यम्। क। प्रत्ययविधाविति। इह मा भूत्। पटयति लघयतीति॥ कुत्वे चोपसंख्यानं कर्तव्यम्। अर्चयतेरर्कः मर्चयतेर्मर्कः। नैतद्घञन्तम्। औणादिक एष कशब्दस्तस्मिन्नाष्टमिकं कुत्वम्। एतदपि णिचा व्यवहितत्वान्न प्राप्नोति॥

पूर्वत्रासिद्धे च॥३॥

पूर्वत्रासिद्धे च न स्थानिवदिति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्।

प्रयोजनं क्सलोपः सलोपे॥४॥

क्सलोपः सलोपे प्रयोजनम्। अदुग्ध अदुग्धाः। लुग्वा दुहदिहलिहगुहामात्म-

---

(६।४।१४८) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें पारिख यांतील खकाराला उपधासंज्ञा करतां आली म्हणून छ प्रत्यय करितां आला.

चङ्पर णि पुढें असतांना होणारा ऱ्हस्व कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. उदाहरण—वादितवन्तं प्रयोजितवान्, अवीवदत् वीणां परिवादकेन. ह्या ठिकाणीं अवीवदत् येथें वाजविणें ह्या अर्थाच्या णिजन्त वदधातूहून पुनः दुसरा णिच् प्रत्यय केला आहे.

पण हें उदाहरण सिद्ध न होण्याचें काय बरें कारण ?

कारण जो हा दुसरा णिच् पुढें असतांना पहिल्याला णिचाचा लोप (६।४।५१) झाला आहे त्याला स्थानिवद्भाव झाला तर त्यानें व्यवधान येत असल्यामुळें ऱ्हस्व (७।४।१) होणार नाहीं.

पण उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ह्या म्हणण्यानेंच हें सिद्ध होत आहे.

तसें सिद्ध होणार नाहीं; कारण उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें विशेष प्रकारचें कार्य कर्तव्य असतांनाच स्थानिवद्भाव होत नाहीं, असें तेथें म्हटलें पाहिजे.

विशेष कार्य कर्तव्य असतांना म्हणजे कोठें ?

प्रत्ययाचें विधान न कर्तव्य असतांना. कारण पटयति, लघयति, ह्या ठिकाणीं उपधासंज्ञेच्या निमित्तानें वृद्धि (७।२।११६) कर्तव्य असतांना टिलोपाला स्थानिवद्भावाचा निषेध न झाला पाहिजे.

तसेंच कुत्व कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. उदाहरण अर्कः, मर्कः. येथें अर्चि आणि मर्चि ह्या णिच्प्रत्ययान्त धातूंहून घञ् प्रत्यय (३।३।१८) केला आहे. येथें णिचाच्या लोपाला (६।४।५१) स्थानिवद्भाव न झाल्यामुळें कुत्व (७।३।५२) होत आहे.

पण ह्या ठिकाणीं घञ् प्रत्ययच केलेला नाहीं. तर औणादिक कप्रत्ययच येथें केला आहे. आणि तो प्रत्यय केल्यानंतर आठव्या अध्यायांतील कुत्व (८।२।३०) झालें आहे.

पण स्थानिवद्भाव झाला तर णिच्प्रत्ययानें व्यवधान येत असल्यामुळें तें देखील कुत्व होणार नाहीं.

(वा.३) त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें.

ह्याचें उदाहरण कोणतें ?

(वा.४) सकाराचा लोप (८।२।२६) कर्तव्य असतां क्स प्रत्ययांतील अकाराच्या लोपाला (७।३।७३) स्थानिवद्भाव होत नाहीं हा त्याचा उपयोग आहे. उदा० अदुग्ध, अदुग्धाः.

---

२०. पटु, लघु, या शब्दांहून 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे०' या गणसूत्रानें णिच् प्रत्यय झाला आहे आणि उकाराचा 'टेः' (६।४।५४) यानें लोप झाला आहे.

नेपदे दन्त्ये [७.३.७३] इति लुग्ग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

## दध आकारलोप आदिचतुर्थत्वे ॥ ५

दध आकारलोप आदिचतुर्थत्वे प्रयोजनम्। धत्से धद्ध्वे धद्ध्वमिति। दधस्तथोश्च [८.२.३८] इति चकारो न कर्तव्यो भवति ॥

## हलो यमां यमि लोपे ॥ ६ ॥

हलो यमां यमि लोपे प्रयोजनम्। आदित्यः। हलो यमां यमि लोपः सिद्धो भवति ॥

## अल्लोपणिलोपौ संयोगान्तलोपप्रभृतिषु ॥ ७ ॥

अल्लोपणिलोपौ संयोगान्तलोपप्रभृतिषु प्रयोजनम्। पापच्यतेः पापक्तिः। यायज्यतेर्यायष्टिः। पाचयतेः पाक्तिः। याजयतेर्याष्टिः ॥

## द्विर्वचनादीनि च ॥ ८ ॥

द्विर्वचनादीनि च न पठितव्यानि भवन्ति। पूर्वत्रासिद्धेनैव सिद्धानि भवन्ति ॥ किमविशेषेण। नेत्याह।

## वरेयलोपस्वरवर्जम् ॥ ९ ॥

वरेयलोपं स्वरं च वर्जयित्वा ॥

## तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु ॥ १० ॥

तस्यैतस्य लक्षणस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु ॥ संयोगादिलोप।

---

'लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये' (७।३।७३) ह्या सूत्रामध्यें लुक् हा शब्द घालावयास नको. मागून येणाऱ्या लोपाच्या अनुवृत्तीनेंच काम भागेल.अंत्याचा म्ह. अकाराचा लोप झाला तरी सकाराचा लोप होणार नाहीं.

दुसरें प्रयोजन असें कीं 'दधा' ह्यांतील आकाराच्या लोपानंतर पहिल्या दकाराला चौथा म्हणजे धकार (८।२।३७) कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं; उदा० धत्से, धद्ध्वे,धद्ध्वम्. ह्या ठिकाणीं चौथा वर्ण आदेश होण्याकरितां 'दधस्तथोश्च' (८।२।३८) ह्या सूत्रामध्यें सकार आणि ध्व शब्द ह्यांच्या अनुवृत्तीकरितां केलेलाच शब्द आतां करावयास नको.[२१]

(वा.६) आणखी प्रयोजन असें की 'हलो यमां०' (८।४।६४) ह्यानें लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं; उदा० आदित्यः. येथें अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें हलो यमां० ह्या सूत्रानें लोप होतो.[२२]

(वा.७) आणखी प्रयोजन असें की संयोगान्त लोप वगैरे कार्यें कर्तव्य असतांना अकाराच्या लोपाला व णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव होत नाहीं, उदा० पापक्तिः, यायष्टिः, पाक्तिः, याष्टिः. पहिल्या दोन उदाहरणांमध्यें पापच्य आणि यायज्य ह्या यङ्प्रत्ययान्त धातूंहून क्तिच् प्रत्यय (३।३।१७४) केला आहे. पुढील दोन उदाहरणांमध्यें पाचि आणि याजि ह्या णिच्प्रत्ययान्त धातूंहून क्तिच् प्रत्यय केला आहे. येथें यङ्प्रत्ययांतील अकाराच्या लोपाला व णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव न झाल्यामुळें कुत्व (८।२।३०) आणि (८।२।३६) षत्व हीं होतात.

(वा.८) आणखी उपयोग असा की ह्या प्रकृतसूत्रामध्यें द्विर्वचन वगैरे शब्द घालावयास नकोत. कारण तीं द्विर्वचन वगैरेंचीं उदाहरणें ह्या प्रकृत वार्तिकानेंच सिद्ध होत आहेत.

पण काय, द्विर्वचन वगैरे सर्वच शब्द घालावयास नकोत कीं काय ?

तसें नाहीं असें आम्ही म्हणतों.

(वा.९) वरे, यलोप आणि स्वर ह्या तीन शब्दांखेरीज बाकीचे शब्द घालावयास नकोत.

(वा.१०) त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं. ह्याला संयोगादि-

---

२१. कारण 'एकाचो०' (८।२।३७) ह्या पूर्वसूत्रानें चवथा म्ह. धकार आदेश सिद्ध होत आहे.

२२. याच सूत्रावरील मागील भाष्य पृष्ठ ३७६.

काक्यर्थम् । वास्यर्थम् । स्कोः संयोगाद्योरन्ते च [८.२.२९] इति लोपः प्राप्नोति ॥ लत्वम् । निगार्यते निगाल्यते । अचि विभाषा [८.२.२१] इति लत्वं न प्राप्नोति ॥ णत्वम् । माषवपनी व्रीहिवपनी । प्रातिपदिकान्तस्येति णत्वं प्राप्नोति ॥

## [१]द्विर्वचनेऽचि ॥ १.१.५९ ॥

आदेशे स्थानिवदनुदेशात्तद्वतो द्विर्वचनम् ॥ १ ॥

आदेशे स्थानिवदनुदेशात्तद्वतः । किंवतः । आदेशवतो । द्विर्वचनं प्राप्नोति ॥ तत्र को दोषः ।

तत्राभ्यासरूपम् ॥ २ ॥

तत्राभ्यासरूपं न सिध्यति । चक्रतुः चक्रुरिति ॥

अज्ग्रहणं तु ज्ञापकं रूपस्थानिवद्भावस्य ॥ ३ ॥

---

लोप, लत्व व णत्व कर्तव्य असतांना दोष येतो; म्हणून हीं तीन कार्यें कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो असें म्हटलें पाहिजे. त्यापैकीं संयोगादिलोपाचें उदाहरण—काक्यर्थम्, वास्यर्थम्. येथें काकी आणि वासी ह्यांतील ईकाराला यण् केल्यानंतर 'स्कोः संयोगाद्योः०' (८।२।२९) ह्या सूत्रानें ककार आणि सकार ह्यांचा लोप प्राप्त होतो. परंतु यणाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें तो लोप होत नाहीं. निगार्यते[२३], निगाल्यते, हें उदाहरण लत्वाचें होय. येथें णिचाचा लोप झाल्यानंतर अच् पुढें नसल्यामुळें 'अचि विभाषा' (८।२।२१) ह्या सूत्रानें लत्व होणार नाहीं. परंतु णिचाच्या लोपाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें लत्व होतें. माषवपनी[२४], व्रीहिवपनी, हीं उदाहरणें णत्वाचीं होत. येथें वपन ह्यांतील अकाराचा लोप (६।४।१४८) केल्यानंतर 'प्रातिपदिकान्त०' (८।४।११) ह्या सूत्रानें 'नकार हा प्रातिपदिकाच्या अंतीं आहे' असें समजून त्याला णत्व प्राप्त होतें. परंतु अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें तें णत्व होत नाहीं.

(सू.५९) (वा.१) 'आदेश हा स्थानीसारखा समजावा' असा या सूत्रानें अतिदेश केला आहे. तेव्हां त्यानें युक्त अशा भागाला.

त्यानें म्हणजे कशानें युक्त ?

आदेशानें युक्त अशा भागाला द्वित्व होऊं लागेल.

मग तसें झालें तर दोष कोणता ?

(वा.२) तसें झालें तर चक्रतुः, चक्रुः, येथें अभ्यासाचें 'च' हें स्वरूप सिद्ध होणार नाहीं.

(वा.३) हा आचार्य पाणिनि प्रकृतसूत्रामध्यें जें 'अचि' असें म्हणतो त्यावरून तो

---

२३. नि उपसर्गपूर्वक गॄ धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें कर्मणि लट् प्रत्यय केला आहे. मध्यें यक् प्रत्यय (३।१।६७) आणि णिचाचा लोप (६।४।५१) झाला आहे.

२४. वप् धातूहून ल्युट् प्रत्यय (३।३।११७), त्याला अन आदेश (७।१।१), पुढें ङीप् प्रत्यय (४।१।१५), आणि अकाराचा लोप (६।४।१४८) झाला आहे.

१. द्वित्वाला कारणीभूत असा अच् पुढें असतांना त्या अचाच्या निमित्तानें झालेला जो अजादेश त्याला द्वित्व कर्तव्य असतांना स्थानीचें रूप प्राप्त होतें. या सूत्राचा दुसरा अर्थ 'द्वित्वाला कारणीभूत असा अच् पुढें असतांना त्या अचाच्या निमित्तानें प्राप्त झालेला जो अजादेश तो द्वित्व करीपर्यंत होत नाहीं,' असा होतो.

२. कारण आदेश जरी स्थानीसारखा समजला तरी त्याला कांहीं प्रत्यक्ष स्थानीचें रूप प्राप्त झालेलें नाहीं.

३. कृ-धातूच्या ऋकाराला रेफ हा यण् आदेश केल्यानंतर धातूमध्यें फक्त क् आणि र् अशीं दोन व्यंजनें राहिलीं. तेव्हां एकाच् भागाला सांगितलेलें द्वित्व होणार नाहीं. आतां प्रकृतसूत्रानें आदेश स्थानीसारखा समजला तर तो एकाच भाग आहे अशा भावनेनें द्वित्व होईल. परंतु होईल तें क्र् यालाच होईल. तेव्हां अभ्यासांत अकार येणार नाहीं.

यद्यमज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो रूपं स्थानिवद्भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । अज्ग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् । जेघ्रीयते देध्मीयत इति । यदि रूपं स्थानिवद्भवति ततोऽज्ग्रहणमर्थवद्भवति । अथ हि कार्यं नार्थोऽज्ग्रहणेन । भवत्येवात्र द्विर्वचनम् ॥

**तत्र गाङ्प्रतिषेधः ॥ ४ ॥**

तत्र गाङः प्रतिषेधो वक्तव्यः । अधिजगे । इवर्णाभ्यासता प्राप्नोति ॥ न वक्तव्यः । गाङ् लिटि [२.४.४९] इति द्विलकारको निर्देशः । लिटि लकारादाविति ॥

**कृत्येजन्तदिवादिनामधातुष्वभ्यासरूपम् ॥ ५ ॥**

कृत्येजन्तदिवादिनामधातुष्वभ्यासरूपं न सिध्यति ॥ कृति । अचिकीर्तत् । कृति ॥ एजन्त । जग्ले मम्ले । एजन्त ॥

---

असें ज्ञापित करतो की 'येथें आदेश हा नुसता स्थानीसारखा समजावयाचा नाहीं, तर त्या आदेशाला स्थानीसारखें स्वरूप प्राप्त होतें'.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की जेघ्रीयते, देध्मीयते, या ठिकाणीं यङ् पुढें असतांना घ्रा, ध्मा धातूंच्या आकाराला झालेला जो ईकार आदेश (७।४।३१) त्याला प्रकृतसूत्रानें स्थानिवद्भाव होऊं नये म्हणून 'अचि' असें येथें म्हटलें आहे. पण जर प्रकृतसूत्रानें आदेशाला स्थानीचें म्ह. आकाराचें रूप प्राप्त झालें तरच, घ्रा, ध्मा यांना द्वित्व होऊन रूप बिघडेल. तें न बिघडण्याकरतां अचि असें म्हटलें पाहिजे, असा त्याचा उपयोग दाखवितां येतो. जर स्थानीचें रूप प्राप्त न होतां फक्त कार्यांचा अतिदेश केला तर येथें फक्त स्थानीच्या भावनेनें द्वित्व हें कार्य होईल पण होईल तें आदेशानें म्ह. ईकारानें युक्त अशा घ्री, ध्मी यालाच होत असल्यामुळें अचि हें पद व्यर्थ होईल.

(वा.४) इङ् धातूला जो गाङ् आदेश (२।४।४९) होतो त्याला प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त होत नाहीं असें म्हणावें. नाहीं तर अधिजगे येथें इ याला द्वित्व होऊन अभ्यासामध्यें इकार होऊं लागेल.

हा निषेध सांगावयास नको. कारण 'गाङ् लिटि' या सूत्रामध्यें दोन लकार पाणिनीनें उच्चारले आहेत. (म्ह. लिटि याच्या मागें आणखी एक लकार उच्चारला आहे.) तेव्हां लकारादि लिट् प्रत्यय पुढें असतांना गाङ् आदेश होतो असा त्याचा अर्थ होतो.[४] म्हणून अचि या म्हणण्यानेंच तेथें प्रकृतसूत्र प्रवृत्त होत नाहीं.

(वा.५) कृति म्ह. णिच् प्रत्ययान्त कृत् धातु, एजंत धातु, दिव् वगैरे धातु आणि नामधातु या ठिकाणीं द्वित्व कर्तव्य असतांना प्रकृतसूत्रानें आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होत असल्यामुळें अभ्यासाचें इष्ट रूप सिद्ध होत नाहीं. कृति धातूचें उदाहरण—अचिकीर्तत्. एजंताचीं उदाहरणें—जग्ले, मम्ले. दिव् वगैरे धातूंचीं उदाहरणें—दुद्यूषति, सुस्यूषति.

---

४. तेव्हां लिटाला तिङ् आदेशकरण्यापूर्वीच गाङ् आदेश होतो. हा लकारावस्थेंतच होत असल्यामुळें 'हा आदेश अच् पुढें असतांना झाला' असें म्हणतां येत नाहीं.

५. प्रकृतसूत्रामध्यें 'द्विर्वचने' हें 'द्वित्व कर्तव्य असतांना' अशा अर्थाचें आहे. 'द्वित्वाला निमित्त' अशा अर्थानें अचाचें विशेषण नाहीं. तेव्हां णिच् प्रत्यय जरी द्वित्वाला निमित्त नसला तरी तो अच् पुढें असतांना अजादेशाला प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त होईल. तेव्हां कृत्धातूच्या ऋकाराला झालेला जो इकार आदेश (७।१।१०) त्याला पुन्हां ऋ असें रूप आलें तर त्याला द्वित्व होऊन अभ्यासामध्यें इकार येणार नाहीं.

६. ग्लै, म्लै, या धातूंच्या ऐकाराला जो आकार आदेश (६।१।४५) त्याला प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त झालें तर ग्लै, म्लै, यांना द्वित्व होऊन अभ्यासामध्यें इकार येईल.

७. दिव्धातूहून सन् प्रत्यय करून धातूच्या वकाराला ऊठ् आदेश (६।४।१९) केल्यानंतर तो ऊकार अच् पुढें असतांना मागें इकाराला झालेला

दिवादि। दुद्यूषति सुस्यूषति। दिवादि॥ नामधातु। भवनमिच्छति भवनीयति भवनीयतेः सन् बिभवनीयिषति॥ एवं तर्हि प्रत्यय इति वक्ष्यामि।

**प्रत्यय इति चेत्कृत्येजन्तनामधातुष्वभ्यासरूपम्॥६॥**

प्रत्यय इति चेत्कृत्येजन्तनामधातुष्वभ्यासरूपं न सिध्यति। दिवाद्य एके परिहृताः॥ एवं तर्हि द्विर्वचननिमित्तेऽच्यजादेशः स्थानिवदिति वक्ष्यामि। स तर्हि निमित्तशब्द उपादेयो न ह्यन्तरेण निमित्तशब्दं निमित्तार्थो गम्यते। अन्तरेणापि निमित्तशब्दं निमित्तार्थो गम्यते। तद्यथा। दधित्रपुसं प्रत्यक्षो ज्वरः। ज्वरनिमित्तमिति गम्यते। नड्वलोदकं पादरोगः। पादरोगनिमित्तमिति गम्यते। आयुर्घृतम्। आयुषो निमित्तमिति गम्यते॥ अथवाकारो मत्वर्थीयः। द्विर्वचनमस्मिन्नस्ति सोऽयं द्विर्वचनो द्विर्वचन इति॥ एव-

---

नामधातूचें उदाहरण—बिभवनीयिषति. येथें भवनाची इच्छा करतो ह्या अर्थी भवन शब्दाहून क्यच् प्रत्यय (३।१।८) करून नंतर त्या 'भवनीय' या नामधातूहून सन् प्रत्यय (३।१।७) केला आहे.

तर मग प्रकृतसूत्रामध्यें 'प्रत्यय पुढें असतांना' असें म्हणतो.

(वा.६) प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें तर कृति धातु, एजंत धातु आणि नामधातु या ठिकाणीं अभ्यासाचें इष्ट रूप सिद्ध होत नाहीं हा दोष राहतोच. फक्त एकट्या दिव् वगैरे धातूंच्या ठिकाणीं आलेल्या दोषाचा परिहार झाला.

तर मग 'द्वित्वाला निमित्त असा अच् पुढें असतांना अचाचे स्थानीं झालेल्या आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें असा प्रकृतसूत्राचा अर्थ करितो.[10]

तर मग तसा अर्थ करण्याकरितां प्रकृतसूत्रामध्यें निमित्त असा शब्द उच्चारला पाहिजे. कारण निमित्तशब्दावांचून निमित्त असा अर्थ होणार नाहीं.

निमित्तशब्द नसला तरी निमित्त असा अर्थ मनांत येतो; जसें 'दधित्रपुस[11] हा प्रत्यक्ष ज्वर आहे' असें म्हटलें असतां तेथें 'दधित्रपुस हें ज्वराचें निमित्त आहे' असें मनांत येतें. तसेंच 'नड्वलोदक[12] हा पादरोग आहे' असें म्हटलें असतां तेथें 'तें नड्वलोदक पादरोगाचें निमित्त आहे' असें मनांत येतें. तसेंच 'घृत हें आयुष्य आहे' असें म्हटलें असतां तेथें 'घृत हें आयुष्याचें निमित्त आहे' असें मनांत येतें. अथवा प्रकृतसूत्रामध्यें पाणिनीनें द्विर्वचन हा जो शब्द उच्चारला आहे तो साधा न उच्चारतां द्विर्वचनशब्दाहून मत्वर्थी अकारप्रत्यय (५।२।१२७) करून

---

जो यकार आदेश त्याला स्थानीचें रूप प्राप्त झालें तर अभ्यासामध्यें इकार येऊं लागेल.

८. भू धातूहून ल्युट्(३।३।११४)प्रत्यय व त्याला अन आदेश (७।१।१) करून मागें धातूच्या ऊकाराला गुण (७।३।८४) आणि अव् आदेश (६।१।७८) झाला आहे. त्याला प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त झालें तर अभ्यासामध्यें उकार येऊं लागेल.

९. कारण तेथें ऊठ् हा प्रत्यय नाहीं.

१०. सूत्रांतील 'द्विर्वचने' हें पद 'द्वित्व कर्तव्य असतांना' अशा अर्थानें न लावतां 'द्वित्वाला निमित्त' अशा अर्थानें अचाचें विशेषण करतो. तेव्हां अचिकीर्तत् येथें णिच्प्रत्यय, दुद्यूषति येथें ऊठ् आणि बिभवनीयिषति येथें ल्युट् प्रत्यय हें द्वित्वाला निमित नसल्यामुळें प्रकृतसूत्राची प्रवृत्ति होत नाहीं. आतां जग्ले येथें जो दोष उरतो त्याचें समाधान भाष्यामध्यें पुढें आहे.

११. दधित्रपुस म्ह. नासलेलें दहीं. अथवा दधि आणि त्रपुस (शिताफळ) असा अर्थ घ्यावा.

१२. नड्वल म्ह. एक प्रकारच्या गवतानें युक्त प्रदेश. त्यांत सांठलेलें जें पाणी तें नड्वलोदक होय. पादरोग म्ह. पायांतील रोग (नारू).

मपि न ज्ञायते कियन्तमसौ कालं स्थानिवद्भवतीति । यः पुनराह द्विर्वचने कर्तव्य इति कृते तस्य द्विर्वचने स्थानिवन्न भविष्यति ॥ एवं तर्हि प्रतिषेधः प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते । क्व प्रकृतः । न पदान्तद्विर्वचन [१.१.५८] इति । द्विर्वचननिमित्तेऽच्यजादेशो न भवतीति । एवमपि न ज्ञायते कियन्तमसौ कालमादेशो न भवतीति । यः पुनराह द्विर्वचने कर्तव्य इति कृते तस्य द्विर्वचनेऽजादेशो भविष्यति ॥ एवं तर्ह्युभयमनेन क्रियते प्रत्ययश्च विशेष्यते द्विर्वचनं च । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् । द्विर्वचनं च द्विर्वचनं च द्विर्वचनम् । द्विर्वचने च कर्तव्ये द्विर्वचनेऽचि प्रत्यय इति द्विर्वचननिमित्तेऽचि स्थानिवद्भवति ॥

**द्विर्वचननिमित्तेऽचि स्थानिवदिति चेण्णौ स्थानिवद्वचनम् ॥७॥**

---

उच्चारला आहे. तेव्हां जो पुढें असतांना द्विर्वचन होतें तो येथील द्विर्वचनशब्दाचा अर्थ होतो. तेव्हां तसला द्विर्वचनाला निमित्त होणारा अच् पुढें असतांना असा स्पष्टच अर्थ होतो.

असा अर्थ केला तरी पण आतां प्रकृतसूत्रानें जें आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें तें किती वेळपर्यंत कायम राहतें, म्हणजे पुनः त्या स्थानीला आदेश करण्याला मोकळीक केव्हां, तें कांहींच समजत नाहीं. जो मनुष्य 'द्विर्वचनाचें निमित्त' अशा अर्थानें द्विर्वचन हा शब्द अचाकडे न लावतां साध्या अर्थानेंच 'द्वित्व कर्तव्य असतांना आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें' असा अर्थ घेऊन कालाची मर्यादा दाखविण्याकडे 'द्विर्वचने' या शब्दाचा उपयोग करतो त्याला द्वित्व केल्यानंतर स्थानीचें रूप ठेवण्याचा नियम राहत नाहीं; म्हणून मागून पुनः आदेश करण्याला मोकळीक मिळते.

तर मग, येथें 'स्थानिवत्' याची अनुवृत्ति न करतां पूर्वींच्या निषेधाचीच अनुवृत्ति करावी म्हणजे झालें.

पूर्वीं निषेध कोठें आहे ?

'न पदान्तद्विर्वचन०' या सूत्रामध्यें 'न' हें पद आहे. तेव्हां त्याची अनुवृत्ति येथें केली म्हणजे 'द्वित्वाला निमित्त अच् पुढें असतांना मागील अचाला आदेश होत नाहीं' असा अर्थ होईल.

तरी पण, किती वेळपर्यंत तो अचाला आदेश होत नाहीं ती कालाची मर्यादा दाखविली जात नाहींच. जो मनुष्य 'द्वित्व कर्तव्य असतांना अचाला आदेश होत नाहीं' असा अर्थ घेऊन कालाची मर्यादा दाखविण्याकडे 'द्विर्वचने' याचा उपयोग करतो त्याला द्वित्व केल्यानंतर अचाला आदेश करण्याला मोकळीक मिळते.

तर मग ह्या द्विर्वचनशब्दानें दोन्ही गोष्टी केल्या जातात. 'द्वित्वाचा निमित्त' अशा अर्थानें अचाचें विशेषणही होतें आणि 'द्वित्व कर्तव्य असतांना' अशी कालाची मर्यादाही दाखविली जाते.

पण एका यत्नानें म्ह. द्विर्वचन हा शब्द एकदां उच्चारल्यानें ह्या दोन्ही गोष्टी कशा बरें साधतील ?

साधतील असें म्हणतो.

तें कसें ?

एकशेषनिर्देशात् म्ह. पाणिनीनें हा जो सूत्रामध्यें द्विर्वचनशब्द उच्चारला आहे तो 'द्विर्वचनं च द्विर्वचनं च द्विर्वचनम्' असा दोन द्विर्वचनशब्दांचा एकशेष करून उच्चारला आहे. तेव्हां 'द्वित्व कर्तव्य असतांना' असाही अर्थ होईल आणि 'द्वित्वाला निमित्त अजादि प्रत्यय पुढें असतांना' असाही अर्थ होईल.

द्विर्वचननिमित्तेऽचि स्थानिवदिति चेण्णौ स्थानिवद्भावो वक्तव्यः। अवनुनावयिषति अवचुक्षावयिषति ॥ न वक्तव्यः।

**ओः पुयण्जिषु वचनं ज्ञापकं णौ स्थानिवद्भावस्य ॥८॥**

यदयमोः पुयण्ज्यपरे [७.४.८०] इत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो भवति णौ स्थानिवदिति। यद्येतज्ज्ञाप्यते अचिकीर्तत् अत्रापि प्राप्नोति। तुल्यजातीयस्य ज्ञापकम्। कश्च तुल्यजातीयः। यथाजातीयकाः पुयण्जयः। कथंजातीयकाश्चैते। अवर्णपराः॥ कथं जग्ले मम्ले। अनैमित्तिकमात्त्वं शिति तु प्रतिषेधः॥

---

(वा.७) 'द्वित्वाला निमित्त असा अच् पुढें असतांना अजादेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें' असें म्हटलें तर 'णिप्रत्यय पुढें असतांना अजादेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें' असें स्वतंत्र वचन केलें पाहिजे. उदा० अवनुनावयिषति[13], अवचुक्षावयिषति.

तसें स्वतंत्र वचन करावयास नको.

(वा.८) ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'ओः पुयण्ज्यपरे' (७।४।८०) या सूत्रानें सन् प्रत्यय पुढें असतांना कांहीं धातूंच्या अभ्यासांतील उकाराला इकार आदेश सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'द्वित्व कर्तव्य असतांना णिप्रत्ययाच्या मागील अजादेशाला स्थानीचें रूप प्राप्त[14] होतें.'

जर हें ज्ञापक घेतलें तर अचिकीर्तत् येथेंही ऋकाराचे स्थानीं झालेल्या इकार (७।१।१०१) आदेशाला द्वित्व कर्तव्य असतांना स्थानीचें रूप प्राप्त होईल.

'ओः पुयण्ज्यपरे' हें जें ज्ञापक घेतलें आहे तें त्याच्या उदाहरणासारख्याच उदाहरणांमध्यें लागू होतें. (तेव्हां अचिकीर्तत् येथें आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होत नाहीं.)

त्याच्या उदाहरणासारखीं उदाहरणें कशीं ओळखावींत ?

त्याच्या उदाहरणामध्यें उत्तरखंडांत पवर्ग, यण् आणि जकार जसे असतात तसे वर्ण ज्या उदाहरणांमध्यें असतील तीं उदाहरणें त्याच्या उदाहरणासारखीं समजावींत.

त्याच्या उदाहरणामध्यें पवर्ग, यण् आणि जकार हे कसे असतात ?

ज्या उदाहरणामध्यें पवर्ग वगैरेंच्या पुढें अकार असतो (तेव्हां अचिकीर्तत् येथें उत्तरखंडांतील ककारापुढें अकार नसल्यामुळें तेथें तें ज्ञापक लागू पडत नाहीं). एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें 'द्वित्वाला निमित्त' असें अचाला विशेषण दिलें असतां कांहीं हरकत नाहीं असें सिद्ध झालें).

तरी पण जग्ले, मम्ले, या उदाहरणांमध्यें द्वित्व कर्तव्य असतांना आकार आदेशाला (६।१।४५) प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप कां प्राप्त होत नाहीं ?

(जग्ले, मम्ले, येथें आकार आदेश हा पुढील अजादिप्रत्ययाच्या निमित्तानें झालेला नसल्यामुळें तेथें प्रकृतसूत्राची प्रवृत्ति होत नाहीं. कारण) अशिति हें 'शित्‌भिन्न प्रत्यय पुढें असतांना' अशा अर्थानें आकार आदेशाचें निमित्त धरलें आहे असें समजूं नये. तर 'शित् प्रत्यय पुढें असतांना आकार-

---

१३. नु, क्षु, या धातूंहून णिच् प्रत्यय करून पुढें सन् प्रत्यय केला आहे. येथें धातूंच्या उकाराला वृद्धि (७।२।११५) आणि आव् (६।१।७८) आदेश जो झाला आहे त्याला प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त होणार नाहीं. कारण णिच् प्रत्यय हा द्वित्वाचा निमित्त नव्हे. तेव्हां नाव् याला द्वित्व होईल आणि अभ्यासामध्यें उकार येणार नाहीं.

१४. नाहीं तर बिभावयिषति इत्यादि उदाहरणांमध्यें नुनावयिषति या वरील उदाहरणाप्रमाणें भाव् याला द्वित्व होऊन अभ्यासांतील अकाराला सन्यतः (७।४।७९) यानें इकार होऊन आपोआपच रूप साधत असल्यामुळें 'ओः पुयण्ज्यपरे' हें सूत्र व्यर्थ होणार आहे.

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि। पपतुः पपुः तस्थतुः तस्थुः। जग्मतुः जग्मुः। आटिटत् आशिशत्। चक्रतुः चक्रुरिति। आल्लोपोपधालोपणिलोपयणादेशेषु कृतेष्वनच्कत्वाद्द्विर्वचनं न प्राप्नोति। स्थानिवद्भावाद्भवति॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि। पूर्वविप्रतिषेधेनाप्येतानि सिद्धानि। कथम्। वक्ष्यति ह्याचार्यः। द्विर्वचनं यणयवायावादेशाल्लोपोपधालोपणिलोपकिकिनोरुत्त्वेभ्य इति। स पूर्वविप्रतिषेधो न पठितव्यो भवति॥ किं पुनरत्र ज्यायः। स्थानिवद्भाव एव ज्यायान्। पूर्वविप्रतिषेधे हि सतीदं वक्तव्यं स्यात्। ओदौदादेशस्योद्भवति चुटुतुशरादेरभ्यासस्येति। ननु च त्वयापीत्वं वक्तव्यम्। परार्थं मम भविष्यति सन्यत

---

आदेश होत नाहीं' असा त्याचा अर्थ आहे.

पण ह्या प्रकृतसूत्राचीं उदाहरणें तरी कोणतीं ?

पपतुः पपुः, तस्थतुः तस्थुः, जग्मतुः जग्मुः, आटिटत्, आशिशत्, चक्रतुः चक्रुः, हीं प्रकृतसूत्राचीं उदाहरणें होत. येथें पा, स्था, धातूंमधील आकाराचा लोप (६।१।४५), गम् धातूमधील उपधेचा लोप (६।४।९८) आणि कृधातूमधील ऋकाराला यण् (६।१।७७) हे विधि केल्यानंतर धातूंमध्यें अच् नसल्यामुळें द्वित्व (६।१।८) होणार नाहीं. तसेंच आटि, आशि, या णिजन्त धातूंमधील णिच्प्रत्ययाचा लोप (६।४।५१) झाल्यानंतर टि आणि शि या दुसऱ्या एकाच् भागांत अच् नसल्यामुळें त्याला द्वित्व (६।१।११) होणार नाहीं. परंतु आकाराचा लोप वगैरे त्या आदेशांना प्रकृतसूत्रानें स्थानीचें रूप प्राप्त झालें म्हणजे द्वित्व होतें.

हीं प्रकृतसूत्राचीं उदाहरणें बरोबर दिसत नाहींत. पूर्वविप्रतिषेधानेंही हीं उदाहरणें सिद्ध होतात. (तेव्हां आकाराचा लोप वगैरे विधींपेक्षां अगोदरच द्वित्व होतें.)

तीं कशीं ?

आचार्य वार्तिककार 'द्विर्वचनं यणयवायावादेशाल्लोपोपधालोपणिलोपकिकिनोरुत्त्वेभ्य (६।१।१२ वार्ति०) असें पुढें सांगणारच आहेत. (त्यानेंच हीं उदाहरणें सिद्ध होतात.)

पण हें प्रकृतसूत्र केलें म्हणजे तें वार्तिक करावयास नको.

आतां या दोहोंमध्यें बरें कोणतें ? प्रकृतसूत्रानें सांगितलेला स्थानिवद्भाव घ्यावा किंवा त्या वार्तिकानें सांगितलेला पूर्वप्रतिषेध घ्यावा.

स्थानिवद्भाव घेणें हेंच चांगलें. कारण पूर्वविप्रतिषेध घेतला तर त्या पूर्वविप्रतिषेधाची प्रवृत्ति ज्या ठिकाणीं होत नाहीं त्या ठिकाणीं म्ह. चुक्षावयिषति[15] वगैरे उदाहरणांमध्यें प्राप्त झालेल्या इकार आदेशाचा (७।४।७९) बाध करून उकार आदेश होण्याकरतां एक स्वतंत्र वचन करावें लागेल. तें असें—'ओकार किंवा औकार यांचे स्थानीं आदेश ज्या अंगामध्यें झाले आहेत अशा अंगामध्यें चवर्ग, टवर्ग, तवर्ग आणि शर् हे वर्ण आदि असलेल्या अभ्यासांतील अकाराला सन् प्रत्यय पुढें असतांना उकार आदेश होतो'.

पण प्रकृतसूत्र[16] घेतलें तरी तुम्हांला इकार आदेश सांगणारें सूत्र करावें लागणारच ना !

---

१५. द्वित्व आणि यण्, अय्, वगैरे आदेश हे एकाच निमित्तानें ज्या ठिकाणीं प्रवृत्त होतात तेथेंच म्ह. चक्रतुः वगैरे उदाहरणामध्येंच पूर्वविप्रतिषेधाची प्रवृत्ति होते. कारण तेथें द्वित्वापेक्षां यण् वगैरे अंतरंग होत नसल्यामुळें द्वित्व आणि यण् वगैरे तुल्यबल होतात. बिभवनीयिषति येथें सन् प्रत्यय द्वित्वाचें निमित्त आहे आणि अव्आदेशाचें निमित्त पूर्वीचा अन प्रत्यय आहे. तेव्हां तेथें अंतरंग अवादेश अगोदरच होतो. जर तेथें प्रकृतवार्तिकानें अवादेशाचा बाध करून द्वित्व अगोदरच झालें असतें तर अभ्यासामध्यें उकार येऊन रूप बिघडलें असतें.

१६. 'द्विर्वचनेचि' हें प्रकृतसूत्र घेतलें तरी तेथें अचाला द्वित्व निमित्त असें विशेषण दिलें असल्या-

इन्द्भवतीति । ममापि तर्ह्युत्त्वं परार्थं भविष्यत्युत्परस्यातस्ति च [७.४.८८,८९] इति । इत्त्वमपि त्वया वक्तव्यं यत्समानाश्रयं तदर्थम् । उत्पिपविषते संयियविषतीत्येवमर्थम् ॥ तस्मात्स्थानिवदित्येष एव पक्षो ज्यायान् ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादेऽष्टममाह्निकम् ।

जरी मला इकार आदेश सांगणारें सूत्र करावें लागलें तरी तें दुसऱ्याकरतां उपयोगीं पडेल. म्हणजे सन्यतः (७।४।७९) असें इकार आदेश सांगणारें दुसरें सूत्र सर्वांनाच आपणांला केलें पाहिजे. त्याच्याजवळ फक्त 'ओः पुयण्ज्यपरे' एवढेंच सूत्र केलें म्हणजे काम भागेल.

मग मला देखील उकार आदेश सांगणारें वचन करावें लागलें तरी तें दुसऱ्याकरतां उपयोगीं पडेल. म्हणजे उत्परस्यात: तिच (७।४।८८,८९) अशीं दुसरीं सूत्रें सर्वांनाच आपणाला केलीं पाहिजेत. त्यांच्याजवळ फक्त 'ओदौदादेशस्य चुड्डुशरादेः' एवढेंच वचन केलें म्हणजे काम भागेल.

पण तेवढ्यानें देखील तुझें काम भागणार नाहीं. तसा उकार आदेश सांगितलास तरी उत्पिपविषते, संयियविषति ह्या समानाश्रय उदाहरणांकरतां इकार आदेशही पण तुला निराळा सांगावा लागणारच आहे.[१८] एकंदरींत स्थानिवद्भाव सांगणारें प्रकृतसूत्र ठेवावें हेंच चांगलें. (५९)

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील आठवें आह्निक समाप्त झालें.

---

मुळें नुनावयिषति इत्यादि उदाहरणांमध्यें आव् आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होणार नाहीं आणि अभ्यासामध्यें इकार येऊं लागेल, म्हणून 'णिप्रत्यय पुढें असतांना अजादेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें' हें ज्ञापन करण्याकरतां 'ओः पुयण्०' हें इकार आदेश सांगणारें सूत्र करावें लागणार आहे.

१७. पूधातूच्या पुढील सन्प्रत्ययाला 'स्मिपूङ्०' (७।२।७४) यानें इट् आगम झाला आहे. तसेंच यूधातूच्या पुढील सन्प्रत्ययाला 'सनीव०'(७।२।४९) यानें इट् आगम झाला आहे. येथें द्वित्व (६।१।९) आणि अव् आदेश (६।१।७८) या दोघांचा आश्रय समान आहे म्ह. सन् हें दोघांचें निमित्त एकच आहे. तेव्हा अव् आदेश अंतरंग होत नसल्यामुळें 'द्विर्वचनं यण०' या तुमच्या वार्तिकाची प्रवृत्ति होऊन पूर्वविप्रतिषेधानें अव्आदेशापेक्षां द्वित्व अगोदर होईल. तेव्हां अभ्यासामध्यें उकार येईल त्याला इकार आदेश सांगण्याकरितां निदान 'ओः पययोः' एवढें तरी सूत्र केलेंच पाहिजे.

१८. प्रकृतसूत्र ठेवलें म्हणजे त्याशिवाय दुसरें 'ओः पुयण्ज्यपरे' एवढें केलें म्हणजे सर्व काम भागतें. आणि प्रकृतसूत्र न ठेवतां वार्तिक ठेवलें तर त्याशिवाय 'ओदौदादेशस्य चुड्डुशरादेः' हें उकार आदेश सांगणारें आणि 'ओः पययोः' हें इकार आदेश सांगणारें अशीं दोन वचनें निराळीं करावीं लागणार आहेत. तेव्हां प्रकृतसूत्र ठेवणें यांतच लाघव आहे.

## अदर्शनं लोपः ॥१.१.६०॥

अर्थस्य संज्ञा कर्तव्या शब्दस्य मा भूदिति । इतरेतराश्रयं च भवति । केतरेतराश्रयता । सतोऽदर्शनस्य संज्ञया भवितव्यं संज्ञया चादर्शनं भाव्यते तदेतदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ।

**लोपसंज्ञायामर्थसतोरुक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । अर्थस्य तावदुक्तम् । इतिकरणोऽर्थनिर्देशार्थ इति । सतोऽप्युक्तम् । सिद्धं तु नित्यशब्दत्वादिति । नित्याः शब्दाः । नित्येषु च शब्देषु सतोऽदर्शनस्य संज्ञा क्रियते न संज्ञयादर्शनं भाव्यते ॥

**सर्वप्रसङ्गस्तु सर्वस्यान्यत्रादृष्टत्वात् ॥ २ ॥**

सर्वप्रसङ्गस्तु भवति । सर्वस्यादर्शनस्य लोपसंज्ञा प्राप्नोति । किं कारणम् । सर्वस्यान्यत्रादृष्टत्वात् । सर्वो हि शब्दो यो यस्य प्रयोगविषयः स ततोऽन्यत्र न दृ-

---

ही लोपसंज्ञा 'अदर्शन' या शब्दाच्या अर्थाला होते असें म्हणावें. कारण 'अदर्शन' या शब्दाला न झाली पाहिजे. शिवाय येथें 'इतररेतराश्रय'दोषही येत आहे.

'इतरेतराश्रय'दोष कोणत्या प्रकारचा ?

अनुच्चारण केल्यानंतर त्याला लोपसंज्ञा करावयाची; व त्या लोपसंज्ञेनें वर्णाचें अनुच्चारण करायाचें. तेव्हां लोप ही संज्ञा अनुच्चारणावर अवलंबून राहते, आणि अनुच्चारण हें लोपसंज्ञेवर अवलंबून राहतें, असें होणें हा अन्योन्याश्रयदोष होय. आणि ज्या ठिकाणीं एक मेकांवर अवलंबून राहणारीं कार्यें उपस्थित होतात त्या ठिकाणीं ती करतां येणें शक्य होत नाहीं.

(वा.१) ही लोपसंज्ञा अर्थाला करावयाची आणि अनुच्चारण केल्यानंतर त्याला करावयाची या दोन गोष्टींच्या संबंधानें पूर्वीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'अर्थाला संज्ञा करावयाची' यासंबंधानें तर 'इतिकरणोऽर्थनिर्देशार्थः' असें पूर्वीं (१।१।४४ वा.३) सांगितलेंच आहे. तसेंच 'अनुच्चारण केल्यानंतर त्याला करावयाची' यासंबंधानेंही 'सिद्धं तु नित्यशब्दत्वात्' (१।१।३ वा.९) असें पूर्वीं सांगितलें आहे. म्ह. शब्द हे नित्य आहेत. शब्द नित्य असल्यामुळें पूर्वीच सिद्ध असलेल्या अनुच्चारणाला लोप ही संज्ञा केली जाते. लोपसंज्ञेनें कांहीं मूळ उच्चारलेल्या शब्दाचें अनुच्चारण केलें जात नाहीं.

(वा.२) सर्वप्रसंग येतो म्ह. सर्वांच्याच अदर्शनाला लोपसंज्ञा होऊं लागेल.

कां बरें ?

सर्वस्यान्यत्रादृष्टत्वात् म्ह. सर्वच शब्दांची अशी स्थिति आहे की ज्या शब्दाचा प्रयोग करण्याचें जें स्थल असेल त्या स्थलाशिवाय इतर ठिकाणीं कोठेंही तो शब्द दृष्टीस पडत

---

१. वर्ण किंवा वर्णसमुदाय यांच्या उच्चारणाचा प्रसंग आला असतांही जें त्यांचें अदर्शन म्ह. उच्चारण न करणें त्याला लोप ही संज्ञा होते.

२. येथें अदर्शनशब्दांत दृश् धातूचें उच्चारण करणें हा अर्थ आहे. तेव्हां अदर्शनशब्दाचा अनुच्चारण असा अर्थ होतो. अनुच्चारण म्ह. 'उच्चारण न करणें' या अर्थाला लोप ही संज्ञा झाली पाहिजे.

३. हे राम येथें रामशब्दाच्यापुढें संबुद्धि सुप्रत्यय करून 'राम स्' असें झाल्यानंतर त्याचा 'एङ्ह्रस्वात् संबुद्धेः' (६।१।६९) यानें लोप करावयाचा. तेथें त्या सुप्रत्ययाचें अनुच्चारण केल्यानंतर त्या अनुच्चारणाला 'लोप' ही संज्ञा होणार आणि लोप ही संज्ञा झाल्यानंतर लोप करणें म्ह. काय करावयाचें तें समजल्यानंतर त्या केलेल्या प्रत्ययाचें अनुच्चारण केलें जाणार. तेव्हां कांहींच करतां येत नाहीं असा अन्योन्याश्रयदोष होय.

४. नवेति विभाषा (१।१।४४) या सूत्रांतून इति शब्दाची अनुवृत्ति येथें करून अदर्शनम् याच्याशीं त्या इतिशब्दाचा संबंध करावा म्हणजे अदर्शनम् इति लोपः असें वाक्य होऊन अदर्शनशब्दाच्या अर्थाला लोपसंज्ञा होते.

इयते । त्रपुजत्वित्यत्राणोऽदर्शनं तत्रादर्शनं लोप इति लोपसंज्ञा प्राप्नोति । तत्र को दोषः ।

**तत्र प्रत्ययलक्षणप्रतिषेधः ॥ ३ ॥**

तत्र प्रत्ययलक्षणं कार्यं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अचो ञ्णिति [७.२.११५] इति वृद्धिः प्राप्नोति ॥ नैष दोषः । ञ्णित्यङ्गस्याचो वृद्धिरुच्यते । यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गं भवति । यस्माच्चात्र प्रत्ययविधिर्न तत्प्रत्यये परतः । यच्च प्रत्यये परतो न तस्मात्प्रत्ययविधिः ॥ क्विपस्तर्ह्यदर्शनं तत्रादर्शनं लोप इति लोपसंज्ञा प्राप्नोति । तत्र को दोषः । तत्र प्रत्ययलक्षणप्रतिषेधः । तत्र प्रत्ययलक्षणं कार्यं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति तुक्प्राप्नोति ॥

**सिद्धं तु प्रसक्तादर्शनस्य लोपसंज्ञित्वात् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रसक्तादर्शनं लोपसंज्ञं भवतीति वक्तव्यम् । यदि प्रसक्तादर्शनं लोपसंज्ञं भवतीत्युच्यते ग्रामणी-

---

नाहीं; उदा० त्रपु, जतु, येथें अण् प्रत्यय दिसत नाहीं. तेव्हां तेथें त्या अण्प्रत्ययाच्या अदर्शनाला म्ह. अनुच्चारणाला लोपसंज्ञा होऊं लागेल.

मग तेथें अण्प्रत्ययाचा लोप आहे असें गृहीत धरलें तर काय दोष येणार आहे ?

(वा.३) तेथें त्या अण्प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य प्राप्त होतें त्याचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) 'अचोञ्णिति' (७।२।११५) यानें त्रपु, जतु, येथें उकाराला वृद्धि होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ञित् किंवा णित् प्रत्यय पुढें असतांना त्याच्यामागें अंगातील अचाला त्या सूत्रानें वृद्धि सांगितली आहे. आणि अंगसंज्ञा तर ज्याहून प्रत्यय केला असेल तदादि शब्दस्वरूपाला तो प्रत्यय पुढें असतांना होत असते (१।४।१३). (जरी येथें प्रत्ययलक्षणानें अण् प्रत्यय पुढें आहे असें गृहीत धरलें तरी) तो अण् प्रत्यय ज्या शब्दस्वरूपाहून म्ह. कर्म उपपद असतांना धातूहून (३।२।१) केला जातो तें शब्दस्वरूप येथें तो प्रत्यय पुढें असतांना नाहीं. येथें तो प्रत्ययलक्षणानें मानलेला अण् प्रत्यय पुढें असतांना जें त्रपु, जतु, हें शब्दस्वरूप आहे त्याहून तो अण् प्रत्यय केलेला नाहीं. (एकंदरींत त्रपु, जतु यांना अण् या णित् प्रत्ययामुळें अंगसंज्ञा नसल्यामुळें वृद्धि होणार नाहीं म्हणून कांहीं दोष येत नाहीं.)

तर मग त्रपु, जतु, येथें क्विप् प्रत्यय दिसत नाहीं. तेव्हां त्या क्विप् प्रत्ययाच्या अदर्शनाला 'अदर्शनं लोपः' या प्रकृतसूत्रानें लोपसंज्ञा होऊं लागेल.

मग तेथें क्विप् प्रत्ययाचा लोप झाला आहे असें गृहीत धरलें तर काय दोष येणार आहे ?

तत्र प्रत्ययलक्षणप्रतिषेधः म्ह. तेथें त्या क्विप्प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य प्राप्त होतें त्याचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' (६।१।७१) यानें त्रपु, जतु, येथें तुक् आगम होऊं लागेल.

(वा.४) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ज्या प्रत्यय वगैरेंच्या उच्चारणाचा प्रसंग ज्या ठिकाणीं येत असेल त्या ठिकाणींच त्या प्रत्यय वगैरेंच्या अदर्शनाला लोपसंज्ञा होते असें म्हणावें.

उच्चारणाचा प्रसंग आलेल्याच्याच अदर्शनाला लोपसंज्ञा होते असें म्हटलें तरी ग्रामणीः, सेनानीः, येथें उच्चारणाचा प्रसंग

सेनानीः अत्र वृद्धिः प्राप्नोति । प्रसक्तादर्शनं लोपसंज्ञं भवति षष्ठीनिर्दिष्टस्य । यदि षष्ठीनिर्दिष्टस्येत्युच्यते चाहलोप एवेत्यवधारणे[८.१.६२] चादिलोपे विभाषा[६३] इत्यत्र लोपसंज्ञा न प्राप्नोति । अथ प्रसक्तादर्शनं लोपसंज्ञं भवतीत्युच्यमाने कथमिवैतत्सिध्यति । को हि शब्दस्य प्रसङ्गः । यत्र गम्यते चार्थो न च प्रयुज्यते । अस्तु तर्हि प्रसक्तादर्शनं लोपसंज्ञं भवतीत्येव । कथं ग्रामणीः सेनानीः । योऽन्राणः प्रसङ्गः क्विपासौ बाध्यते ॥

## प्रत्ययस्य लुक्श्लुलुपः ॥१.१.६१॥

प्रत्ययग्रहणं किमर्थम् ।

**लुमति प्रत्ययग्रहणमप्रत्ययसंज्ञाप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

लुमति प्रत्ययग्रहणं क्रियतेऽप्रत्ययस्यैताः संज्ञा मा भूवन्निति ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं तद्धितलुकि कंसीयपरशव्ययोर्लुकि च गोप्रकृतिनिवृत्त्यर्थम् ॥ २ ॥**

आलेल्या अशा अण् प्रत्ययाचा (३।२।१) बाध करून क्विप् प्रत्यय केला असल्यामुळें अण्प्रत्ययाच्या अदर्शनाला लोपसंज्ञा होईल आणि प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) वृद्धि (७।२।११५) होईल असा दोष येतोच.

उच्चारणाचा प्रसंग आलेल्याच्याच अदर्शनाला लोपसंज्ञा होते खरी, पण तो उच्चारणाचा प्रसंग आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें ज्याचा षष्ठीप्रत्यय लावून निर्देश केलेला असतो त्याचाच असला पाहिजे.

जर षष्ठीप्रत्यय लावून निर्देश केलेल्याचाच उच्चारणाचा प्रसंग घ्यावयाचा असेल तर 'चाहलोप एवेत्यवधारणम्' (८।१।६२), 'चादिलोपे विभाषा' (८।१।६३) या सूत्रांच्या उदाहरणांमध्यें च वगैरेंच्या अदर्शनाला लोपसंज्ञा होणार नाहीं.

पण 'उच्चारणाचा प्रसंग आलेल्याच्याच अदर्शनाला लोपसंज्ञा होते' एवढें तर तुम्हांलाही कबूल आहे ना ? मग तुमच्या मतीं तरी च वगैरेंच्या आदर्शनाला लोपसंज्ञा कशी बरें सिद्ध होते ? कारण तेथें च वगैरे शब्दांच्या उच्चारणाचा कसा प्रसंग येतो ?

'उच्चारणाचा प्रसंग' असा ओळखावा की ज्या वाक्यापासून एखादा अर्थ मनांत येतो, पण त्या अर्थाच्या शब्दाचा प्रयोग तर तेथें दृष्टीस पडत नाहीं त्या ठिकाणीं त्या शब्दाच्या उच्चारणाचा प्रसंग आहे असें समजावें.

तर मग षष्ठीप्रत्ययानें निर्देश केलेल्याचाच प्रसंग पाहिजे असा आग्रह धरीत नाहीं. फक्त 'ज्याच्या उच्चारणाचा प्रसंग आला असेल तेथें त्याच्याच अदर्शनाला लोपसंज्ञा होते' इतकाच ह्या प्रकृतसूत्राचा अर्थ असूं दे.

इतकाच अर्थ घेतला तर ग्रामणीः, सेनानीः, येथें अण्प्रत्ययाच्या अदर्शनाला लोपसंज्ञा होऊं लागेल त्याची वाट काय ?

वाट अशी की ग्रामणीः, सेनानीः, येथें अण्प्रत्ययाचा प्रसंग आहे असें तुम्हांला वाटतें, पण तो प्रसंग तेथें टिकत नाहीं. कारण क्विप्प्रत्ययानें त्या अण्प्रत्ययाच्या प्रसंगाचा बाध केला जातो.

(सू.६१) ह्या सूत्रामध्यें 'प्रत्ययस्य' हा शब्द कशाकरतां उच्चारला आहे ?

(वा.१) 'लु' हें अक्षर ज्यामध्यें आहे अशा लुक् वगैरे संज्ञा सांगणाऱ्या ह्या प्रकृतसूत्रामध्यें 'प्रत्ययस्य' हा जो शब्द उच्चारला आहे त्याचा उपयोग असा की प्रत्ययाशिवाय इतराच्या अदर्शनाला लुक्, श्लु, लुप् ह्या संज्ञा होऊं नयेत.

त्याचा काय उपयोग ?

(वा.२) 'प्रत्ययस्य' या शब्दाचा उपयोग

१. लुक्, श्लु व लुप् या शब्दांनीं जेथें प्रत्ययाचें अदर्शन सांगितलें असेल तेथें त्या अदर्शनाला क्रमानें लुक्, श्लु व लुप् या संज्ञा होतात.

तद्धितलुकि गोनिवृत्त्यर्थं कंसीयपरशव्ययोश्च लुकि प्रकृतिनिवृत्त्यर्थम्। लुक्तद्धितलुकि [१.२ ४९] इति गोरपि लुक्प्राप्नोति। प्रत्ययग्रहणान्न भवति। कंसीयपरशव्योर्यञञौ लुक्च [४.३.१६८] इति प्रकृतेरपि लुक्प्राप्नोति। प्रत्ययग्रहणान्न भवति॥ गोनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः।

## योगविभागात्सिद्धम्॥ ३॥

योगविभागः करिष्यते। गोरुपसर्जनस्य। गोऽन्तस्य प्रातिपदिकस्योपसर्जनस्य ह्रस्वो भवति। ततः स्त्रियाः। स्त्रीप्रत्ययान्तस्य प्रातिपदिकस्योपसर्जनस्य ह्रस्वो भवति। ततो लुक्तद्धितलुकीति स्त्रिया इति वर्तते गोरिति निवृत्तम्॥

## कंसीयपरशव्ययोर्विशिष्टनिर्देशात्सिद्धम्॥ ४॥

कंसीयपरशव्ययोरपि विशिष्टनिर्देशः कर्तव्यः। कंसीयपरशव्ययोर्यञञौ भवतश्छयतोश्च लुग्भवतीति। स चावश्यं विशिष्टनिर्देशः कर्तव्यः क्रियमाणेऽपि वै प्रत्यय-

---

असा की तद्धिताचा लुक् झाला असतां तेथें गोशब्दाचा लुक् होऊं नये, तसेंच कंसीय व परशव्य यांतील प्रत्ययाचा लुक् होतो तो सबंध प्रकृतीचा होऊं नये. 'लुक्तद्धितलुकि' (१।२। ४९) या सूत्रामध्यें 'गोस्त्रियोः०' (१।२।४८) या सूत्रांतून 'गोस्त्रियोः' याची अनुवृत्ति येते. तेव्हां त्यानें तद्धितप्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर जसा स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो तसा गोशब्दाचाही होऊं लागेल. तो 'प्रत्ययस्य' असें येथें म्हटलें असल्यामुळें होत[२] नाहीं. तसेंच 'कंसीय[३]परशव्ययोर्यञञौ लुक्च' (४।३।१६८) या सूत्रानें कंसीय व परशव्य या सबंध प्रकृतीचा लुक् होऊं लागेल तो 'प्रत्ययस्य' असें येथें म्हटलें असल्यामुळें होत नाहीं. (फक्त त्यांतील प्रत्ययाचा भाग जेवढा आहे तेवढ्याचाच होतो.)

गोशब्दाचा लुक् होऊं नये याकरतां 'प्रत्ययस्य' असें येथें म्हणावयास नको.

(वा.३) कारण 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्राचा विभाग केल्यानेंच तें सिद्ध होत आहे. तो सूत्राचा विभाग असाः—'गोरुपसर्जनस्य' हें एक सूत्र होय. 'उपसर्जन जो गोशब्द तो अंतीं असलेल्या प्रातिपदिकाला ऱ्हस्व होतो,' असा त्याचा अर्थ आहे. नंतर 'स्त्रियाः' हें दुसरें सूत्र होय. 'उपसर्जन स्त्रीप्रत्ययान्त जें प्रातिपदिक त्याला ऱ्हस्व होतो,' असा त्याचा अर्थ आहे. त्याच्यापुढें 'लुक्तद्धितलुकि' हें सूत्र आहे. तेव्हां मागील 'स्त्रियाः' या सूत्रांत गोशब्द नसल्यामुळें त्याची अनुवृत्ति येथें होणार नाहीं. फक्त स्त्रियाः याचीच होईल.

(वा.४) कंसीय आणि परशव्य यांपैकीं ज्या भागाचा लुक् इष्ट आहे त्याचा विशेषरूपानें निर्देश करावा, म्ह. कंसीय व परशव्य या शब्दांहून 'त्याचा विकार' या अर्थी क्रमानें यञ् व अञ् प्रत्यय होतात आणि कंसीय व परशव्य या शब्दांतील छ व यत् या प्रत्ययांचा लुक् होतो असें म्हणावें. आणि असा विशेषरूपानें निर्देश अवश्य केलाच पाहिजे. जरी प्रकृतसूत्रामध्यें 'प्रत्ययस्य' हा शब्द ठेवला तरी देखील 'छ व यत् यांचा

---

२. कारण गो हा शब्द आहे, प्रत्यय नव्हे. तेव्हां पञ्चभिर्गोभिः क्रीतः पञ्चगुः येथें लुक्तद्धितलुकि यानें गोशब्दाचा लुक् होत नाहीं. तात्पर्य, लुक्तद्धितलुकि येथें गोस्त्रियोः० या मागील सूत्रांतून फक्त स्त्रीशब्दाचीच अनुवृत्ति होते, गोशब्दाची अनुवृत्ति होत नाहीं, कारण अनुवृत्ति आणली तरी कांहीं उपयोग होत नाहीं.

३. या सूत्रानें कंसीयशब्दाहून विकार या अर्थी यञ् प्रत्यय होतो आणि कंसीयशब्दांतील 'ईय' याचा लुक् होतो. कंसीयस्य विकारः कांस्यम्. तसेंच परशव्यस्य विकारः पारशवः. येथें परशव्यशब्दाहून अञ् प्रत्यय होतो आणि परशव्य शब्दांतील 'य' या भागाचा लुक् होतो.

ग्रहण उकारसशब्दयोर्मा भूदिति । कमेः सः कंसः । परान्शृणातीति परशुरिति । नैष दोषः । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । स एषोऽनन्यार्थो विशिष्टनिर्देशः कर्तव्यः प्रत्ययग्रहणं वा कर्तव्यम् ॥

**उक्तं वा ॥ ५ ॥**

किमुक्तम् । ङ्याप्प्रातिपदिकग्रहणमङ्गभपदसंज्ञार्थं यच्छयोश्च लुगर्थमिति ॥

**षष्ठीनिर्देशार्थं तु ॥ ६ ॥**

षष्ठीनिर्देशार्थं तर्हि प्रत्ययग्रहणं कर्तव्यम् । षष्ठीनिर्देशो यथा प्रकल्पेत ॥

**अनिर्देशे हि षष्ठ्यर्थाप्रसिद्धिः ॥ ७ ॥**

अक्रियमाणे हि प्रत्ययग्रहणे षष्ठ्यर्थस्याप्रसिद्धिः स्यात् । कस्य । स्थाने योगत्वस्य ॥ क्व पुनरिह षष्ठीनिर्देशार्थेनार्थः प्रत्ययग्रहणेन यावता सर्वत्रैव षष्ठ्युच्चार्यतेऽणिञोस्तद्राजस्य यञञोः शप इति । इह न काचित्षष्ठी जनपदे लुप् [४.२.८१] इति । अत्रापि प्रकृतं प्रत्ययग्रहण-

---

कुल् होतो' असें म्हटलेंच पाहिजे. कारण कंसीय व परशव्य यांतील छ व यत् याच प्रत्ययांचा लुक् झाला पाहिजे. उकार आणि सकार या प्रत्ययांचा न झाला पाहिजे.

कम्धातूहून स प्रत्यय (उणा. ३।६२) होऊन कंसशब्द सिद्ध झाला आहे. तसेंच परान् शृणाति इति परशुः येथें पर हें उपपद असून शृधातूहून 'आङ्परयोः खनिशृभ्यां डिच्च' (उणादिसू.१।३५) यानें उ प्रत्यय होऊन परशुशब्द सिद्ध झाला आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि' म्ह. शाकटायनानें उण् वगैरे प्रत्यय लावून सिद्ध केलेलीं जीं प्रातिपदिकें तीं पाणिनीच्या मतीं अव्युत्पन्न अशीं समजलीं जातात.' तेव्हां कम् धातु, स प्रत्यय, वगैरे प्रकृतिप्रत्ययांची कल्पना त्यांमध्यें कांहीं करावयाची नाहीं. एकंदरींत 'छ व यत् यांचा लुक् होतो' ह्या विशेषनिर्देशाचा उपयोग दुसरा कांहींच संभवत नाहीं. फक्त 'कंसीय व परशव्य या सबंध प्रकृतीचा लुक् होऊं नये' हाच एक उपयोग आहे. तेव्हां त्याकरतां तसा विशेष निर्देश करावा. किंवा त्याकरतां प्रकृतसूत्रामध्यें प्रत्ययस्य असा शब्द ठेवावा. कांहीं केलें तरी चालेल.

(वा.५) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

ङ्याप्प्रातिपदिकग्रहणमङ्गभपदसंज्ञार्थं यच्छयोश्च लुगर्थम्' (४।१।१ वा.१।२) असें सांगितलें आहे.

(वा.६) तर मग षष्ठीनिर्देशार्थं म्ह. षष्ठी प्रत्यय लावण्याकरितां प्रत्ययशब्द येथें घातला पाहिजे. कारण कोणता तरी शब्द उच्चारल्याशिवाय नुसता षष्ठीप्रत्यय उच्चारतां येत नाहीं.

(वा.७) प्रत्ययशब्द उच्चारला नाहीं तर लुक् वगैरे सांगणाऱ्या सूत्रामध्यें षष्ठीप्रत्ययाचा अर्थ घेतां येणार नाहीं.

कोणता षष्ठीप्रत्ययाचा अर्थ घेतां येणार नाहीं ?

'स्थानाशीं संबंध' हा अर्थ घेतां येणार नाहीं.

'पण षष्ठीप्रत्यय लावण्याकरितां येथें प्रत्ययशब्द उच्चारला पाहिजे' असें जें म्हणतां त्याचा उपयोग तरी कोणत्या लुक् वगैरे सांगणाऱ्या शास्त्रामध्यें होणार आहे बरें ? पहावें तर लुक् वगैरे सांगणाऱ्या सर्वच सूत्रामध्यें तो तो विशेष शब्द उच्चारून त्याला षष्ठीप्रत्यय लावलेला दिसत आहे; उदा० 'अणिञोः' (२।४।५८), तद्राजस्य' (२।५।६२), 'यञञोः' (२।४।६४), 'शपः' (५।४।७२).

पण ज्या ठिकाणीं कोणताच शब्द षष्ठीप्रत्यय लावून उच्चारला नसेल तेथें कसा अर्थ घेतां येईल ? उदा० 'जनपदे लुप् (४।२।८१).

तेथें मागून प्रत्ययशब्दाची अनुवृत्ति येत आहे.

मनुवर्तते । क्व प्रकृतम् । प्रत्ययः परश्च [३.१.१,२] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । ङ्याप्प्रातिपदिकात् [४.१.१] इत्येषा पञ्चमी प्रत्यय इति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥

## सर्वादेशार्थं वा वचनप्रामाण्यात् ॥ ८

सर्वादेशार्थं तर्हि प्रत्ययग्रहणं कर्तव्यम् । लुक्श्लुलुपः सर्वादेशा यथा स्युः । अथ क्रियमाणेऽपि प्रत्ययग्रहणे कथमिव लुक्श्लुलुपः सर्वादेशा लभ्याः । वचनप्रामाण्यात् । प्रत्ययग्रहणसामर्थ्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति लुक्श्लुलुपः सर्वादेशा भवन्तीति यदयं लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये [७.३.७३] इति लोपे प्रकृते लुकं शास्ति ॥

## उत्तरार्थं तु ॥ ९ ॥

उत्तरार्थं तर्हि प्रत्ययग्रहणं कर्तव्यम् ।

---

मागें प्रत्ययशब्द कोठेंसा आहे ?

प्रत्ययः । परश्च (३।१।१,२) असा प्रत्ययशब्द आहे.

पण तो प्रत्ययशब्द, प्रथमाविभक्तीचा प्रत्यय लावून उच्चारलेला आहे. आणि येथें तर षष्ठीप्रत्यय लावलेल्या शब्दाची जरूर आहे.

ङ्याप्प्रातिपदिकात् (४।१।१) या पंचम्यन्त पदाची अनुवृत्ति येथें येत आहे. तेव्हां 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) या परिभाषेमुळें त्या पंचमीप्रत्ययाच्या जोरावर प्रत्ययः या प्रथमाप्रत्ययाच्या ऐवजीं षष्ठीप्रत्ययाची कल्पना करतां येईल.

पण येथें प्रत्ययाचें विधान केलें आहे ना ? आणि प्रत्ययाचें विधान ज्या ठिकाणीं केलें असेल त्या ठिकाणीं तर पंचमीप्रत्ययाच्या जोरावर षष्ठीप्रत्ययाची कल्पना होत नसते.

'जनपदे लुप्' या सूत्रानें प्रत्ययाचें विधान केलें नाहीं. मागील सूत्रांनींच प्रत्ययाचें विधान केलें आहे. त्याची फक्त अनुवृत्ति येथें येत आहे.

(वा.८) तर मग सर्वादेश होण्याकरतां म्ह. लुक्, श्लु व लुप् हे आदेश सबंध प्रत्ययाला झाले पाहिजेत म्हणून येथें 'प्रत्ययस्य' असें म्हटलें पाहिजे.

पण 'प्रत्ययस्य' असें येथें म्हटलें तरी लुक्, श्लु व लुप् हे सबंध प्रत्ययाला कसे बरें होतील ? (अलोन्त्यस्य (१।१।५२) यानें प्रत्ययाच्या अंत्य वर्णाला किंवा कांहीं ठिकाणीं आदेः परस्य (१।१।५४) यानें प्रत्ययाच्या आदिवर्णाला कां होऊं नयेत ?)

वचनप्रामाण्यात् म्ह. येथें प्रत्ययस्य असें जें म्हटलें आहे त्याच्या सामर्थ्यास्तव लुक् वगैरे सर्व प्रत्ययाला होतील.

'प्रत्ययस्य' या शब्दाचा हा देखील उपयोग बरोबर नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि 'लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये' (७।३।७३) या सूत्रामध्यें 'घोर्लोपो लेटि वा' (७।३।७०) या सूत्रांतून लोपशब्दाची अनुवृत्ति येत असूनही पुनः लुक् असें पद ज्या अर्थी घालतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'लुक्, श्लु व लुप् हे आदेश सबंध प्रत्ययाला होतात.' (लुक् सांगूनही जर तो प्रत्ययाच्या अंत्य वर्णाचा होईल तर लोपशब्दाच्या अनुवृत्तीनेंच तें काम भागेल आणि लुक् हें पद व्यर्थ होईल.)

(वा.९) तर मग पुढच्या सूत्रामध्यें 'प्रत्ययस्य' याची अनुवृत्ति झाली पाहिजे म्हणून येथें 'प्रत्ययस्य' असें म्हटलें पाहिजे.

पण 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या पुढील सूत्रामध्यें 'प्रत्ययलोपे' असा प्रत्यय-

४. 'प्रत्ययस्य' अशी कल्पना.

न कर्तव्यम्। क्रियते तत्रैव प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् [१.१.६२] इति। द्वितीयं कर्तव्यम्। कृत्स्नप्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणं यथा स्यात्। एकदेशलोपे मा भूदिति। आघ्नीत। सं रायस्पोषेण ग्मीयेति॥

## प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् ॥१.१.६२॥

प्रत्ययग्रहणं किमर्थम्। लोपे प्रत्ययलक्षणमितीयत्युच्यमाने सौरथी वैहतीति गुरूपोत्तमलक्षणः ष्यङ् प्रसज्येत। नैष दोषः। नैवं विज्ञायते लोपे प्रत्ययलक्षणं भवति प्रत्ययस्य प्रादुर्भाव इति। कथं तर्हि। प्रत्ययो लक्षणं यस्य कार्यस्य तल्लुप्तेऽपि भवतीति॥ इदं तर्हि प्रयोजनम्। सति प्रत्यये यत्प्राप्नोति तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात्। लोपोत्तरकालं यत्प्राप्नोति तत्प्रत्ययलक्षणेन मा भूदिति। किं प्रयोजनम्। ग्रामणिकुलम् सेनानिकुलम्।

---

शब्द घातलाच आहे ना?

तो जरी घातला आहे तरी आणखी दुसऱ्या प्रत्ययशब्दाची तेथें जरूर आहे. प्रत्ययच जो प्रत्यय म्ह. सबंध प्रत्यय त्याचा लोप झाला असेल तरच त्या प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य पुढील सूत्रानें झालें पाहिजे. प्रत्ययांतील एखाद्या भागाचा लोप झाला असेल तर त्याच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य न झालें पाहिजे; उदा० आघ्नीत, सं रायस्पोषेण ग्मीय.[5]

(सू.६२) या सूत्रामध्यें प्रत्यय हा शब्द कशाकरतां घातला आहे?

प्रत्ययशब्द काढून 'लोपे[2] प्रत्ययलक्षणम्' एवढेंच सूत्र केलें तर सौरथी, वैहती, येथें प्रत्ययलक्षण होईल, म्ह. उपोत्तम वर्ण गुरु असल्यामुळें ष्यङ् प्रत्यय (४।१।७८) होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. प्रत्ययलक्षण होतें म्ह. प्रत्ययाची उत्पत्ति होते असा 'प्रत्ययक्षणण' शब्दाचा अर्थ समजूं नये, तर प्रत्यय हा ज्या कार्याचें निमित्त आहे असें कार्य लोप झाला असतांही करावें असा या सूत्राचा अर्थ आहे.

तर मग प्रत्ययशब्दाचा असा उपयोग समजावा की प्रत्यय विद्यमान असतांना जें प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य तेंच कार्य प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें होतें. आणि जें प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य खरें, पण प्रत्ययाचा लोप झाल्यानंतरच तें प्राप्त होतें तसलें कार्य प्रत्ययलक्षणानें होऊं नये.

याचा काय उपयोग?

उपयोग असा की ग्रामणिकुलम्, सेनानिकुलम्, या सामासिक शब्दांमध्यें उत्तरप-

---

५. आघ्नीत या क्रियापदामध्यें आङ् उपसर्ग, हन धातु, विधिलिङ् व त्याला आत्मनेपद (१।३।२८) केलें आहे. येथें जो प्रत्ययांतील सकाराचा लोप (७।२।७९) झाला आहे त्याला प्रत्ययलक्षण झालें तर झलादि प्रत्यय पुढें आहे असें समजून 'अनुदात्तोपदेश०' (६।४।३७) यानें नकाराचा लोप होऊं लागेल. संग्मीय हें गम धातूचें क्रियापद आहे. येथेंही तशाच प्रकाराचा लोप होऊं लागेल.

१. प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें जें कार्य तें प्रत्ययाचा लोप झाला असतांही करावें.

२. 'कोणाचाही लोप झाला असतां त्यामुळें जर एखादें कार्य होत नसेल तर तें कार्य लोप झाला असतांही करावें' असा सूत्राचा अर्थ घेऊन सौरथी, वैहती, येथें दोष दिला आहे. सुउपसर्गपूर्वक रम् धातूहून क्थन् (उणा० २।२) प्रत्यय करून रम् धातूच्या मकाराचा लोप (६।४।३७) होऊन सुरथशब्द सिद्ध झाला आहे. तसेंच विउपसर्गपूर्वक हन् धातूहून क्तप्रत्यय करून हन् धातूच्या नकाराचा लोप होऊन विहतशब्द सिद्ध झाला आहे. सुरथाची नात सौरथी. विहताची नात वैहती. सुरथ व विहत या शब्दांहून इञ्प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. येथें मकार आणि नकार यांचा लोप झाल्यामुळें मागील अकाराला गुरुसंज्ञा (१।४।११) होत नाहीं म्हणून 'अणिञोः' (४।१।७८) यानें ष्यङ् प्रत्यय होत नाहीं. परंतु प्रकृत सूत्रानें तेथें ष्यङ् प्रत्यय होईल असा दोष येतो.

औत्तरपदिके ह्रस्वत्वे कृते ह्रस्वस्य पिति कृति तुक् [६.१.७१] इति तुक् प्राप्नोति स मा भूदिति । यदि तर्हि यत्सति प्रत्यये प्राप्नोति तत्प्रत्ययलक्षणेन भवति लोपोत्तरकालं यत्प्राप्नोति तन्न भवति जगत् जनगदित्यत्र तुग्न प्राप्नोति । लोपोत्तरकालो ह्यत्र तुगागमः । तस्मान्नार्थ एवमर्थेन प्रत्ययग्रहणेन । कस्मान्न भवति ग्रामणिकुलम् सेनानिकुलम् । बहिरङ्गं ह्रस्वत्वम् । अन्तरङ्गस्तुक् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । कृत्स्नप्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणं यथा स्यादेकदेशलोपे मा भूदिति । आघ्नीत । सं रायस्पोषेण ग्मीय । पूर्वस्मिन्नपि योगे प्रत्ययग्रहणस्यैतत्प्रयोजनमुक्तम् । अन्यतरच्छक्यमकर्तुम् ॥ अथ द्वितीयं प्रत्ययग्रहणं किमर्थम् । प्रत्ययलक्षणं यथा स्याद्वर्णलक्षणं मा भूदिति । गवे हितं गोहितम् । रायः कुलं रैकुलमिति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

दाच्या निमित्तानें ग्रामणी आणि सेनानी या पूर्वपदाला ऱ्हस्व (६।३।६१) केल्यानंतर प्रकृतसूत्रानें प्रत्ययलक्षण झाल्यामुळें क्विप्-प्रत्यय पुढें आहे असें समजूं नये. 'ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्' (६।१।७१) यानें सांगितलेला तुक् आगम होऊं लागेल तो न झाला पाहिजे.

पण जर 'प्रत्यय विद्यमान असतांना जें कार्य प्राप्त होतें तेंच कार्य प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर प्रत्ययलक्षणानें होतें, प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर जें कार्य प्राप्त होतें तें कार्य प्रत्ययलक्षणानें होत नाहीं,' असें असेल तर जगत्, जनगत्, येथें प्रत्ययलक्षणानें जो तुक् आगम (६।१।७१) होत असतो तो होणार नाहीं. कारण क्विप्प्रत्ययाचा लोप झाल्यानंतरच येथें तुक् आगम प्राप्त होत आहे. तेव्हां 'प्रत्यय विद्यमान असतांना प्राप्त होणारेंच प्रत्ययलक्षणानें होतें' असा आग्रह धरतां येत नाहीं व त्याकरतां प्रकृतसूत्रामध्यें प्रत्यय हा शब्द घालावयास नको.

तर मग ग्रामणिकुलम्, सेनानिकुलम्, येथें तुक् आगम कां होत नाहीं ?

उत्तरपदाच्या निमित्तानें झालेला ऱ्हस्व बहिरंग आहे व तुक् आगम अंतरंग आहे. आणि 'असिद्धं बहिरंगमंतरंगे' म्ह. अंतरंग तुक् आगम कर्तव्य असतांना बहिरंग ऱ्हस्व असिद्ध आहे, म्हणून तुक् आगम होत नाहीं.

तर मग येथील प्रत्ययशब्दाचा उपयोग असा समजावा की सबंध प्रत्ययाचा लोप झाला असला तरच त्या प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य प्रत्ययलक्षणानें झालें पाहिजे; प्रत्ययांतील एखाद्या भागाचा लोप झाला असेल तर त्याच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य न झालें पाहिजे; उदा० आघ्नीत, सं रायस्पोषेण ग्मीय.

पण पूर्वीच्या सूत्रांत जो 'प्रत्ययस्य' असा शब्द घातला आहे त्याचाही उपयोग हाच तेथें दाखविला आहे ना ?

असें आहे तर मग दोहोंपैकीं कोणता तरी एक प्रत्ययशब्द घातला नाहीं तरी चालेल.

आतां, याच सूत्रामध्यें प्रत्ययलक्षणम् असा जो दुसरा आणखी एक प्रत्ययशब्द घातला आहे त्याचा काय बरें उपयोग ?

उपयोग असा की प्रत्ययाच्या लोप झाला असतां प्रत्ययाच्या निमित्तानें कार्य प्राप्त होत असेल तेंच प्रत्ययलक्षणानें झालें पाहिजे. तेथें वर्णाच्या निमित्तानें जें कार्य प्राप्त होत असेल तें प्रत्ययलक्षणानें न झालें पाहिजे; उदा० गवे हितं गोहितम्[३], रायः कुलं रैकुलम्.

३. गोहितम् या समासामध्यें गोशब्दाच्या पुढील ङेप्रत्ययाचा लुक् (२।४।७१) झाला आहे. परंतु प्रत्ययलक्षणानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजलें तर अव्आदेश (६।१।७८) होऊं लागेल. तसेंच रैकुलम् येथें आय् आदेश होऊं लागेल. ह्या अव् किंवा आय् या आदेशांना पुढें प्रत्ययच पाहिजे असें नाहीं. कसलाही अच् पुढें असला म्हणजे झालें.

**प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणवचनं सदन्वाख्यानाच्छास्त्रस्य ॥ १ ॥**

प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणमित्युच्यते सदन्वाख्यानाच्छास्त्रस्य । सच्छास्त्रेणान्वाख्यायते सतो वा शास्त्रमन्वाख्यायकं भवति सदन्वाख्यानाच्छास्त्रस्य । उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः [७.१.७०] इतीहैव स्यात् । गोमन्तौ यवमन्तौ । गोमान् यवमानित्यत्र न स्यात् । इष्यते च स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यति । अतः प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणवचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**लुक्युपसंख्यानम् ॥ २ ॥**

लुक्युपसंख्यानं कर्तव्यम् । पञ्च सप्त ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

**लोपे हि विधानम् ॥ ३ ॥**

लोपे हि प्रत्ययलक्षणं विधीयते तेन लुकि न प्राप्नोति ॥

**न वादर्शनस्य लोपसंज्ञित्वात् ॥ ४ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । अदर्शनस्य लोपसंज्ञित्वात् । अदर्शनं लोपसंज्ञं भवतीत्युच्यते लुमत्संज्ञाश्चाप्यदर्शनस्य क्रियन्ते । तेन लुक्यपि भवि-

---

पण हें सूत्रच मुळीं कशाकरतां बरें केलें आहे ?

(वा.१) 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' असें जें येथें म्हटलें आहे तें अशाकरतां की 'सदन्वाख्यानाच्छास्त्रस्य' म्ह. ह्या व्याकरणशास्त्रामध्यें आचार्य पाणिनि हा इको यणचि इत्यादि शास्त्र पुढें करून त्याच्या द्वारानें विद्यमान वस्तु निमित्त धरून तीं तीं कार्यें सांगत आहे. अथवा 'शास्त्र हेंच विद्यमान वस्तु निमित्त धरून तीं तीं कार्यें करावयास सांगत आहे' असाही 'सदन्वाख्याच्छास्त्रस्य' याचा अर्थ घ्यावा. एकंदरींत ज्या कार्याला जें निमित्त असेल तें विद्यमान असेल तरच तें कार्य होणार आहे. तेव्हां 'उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः' (७।१।७०) यानें सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेला नुम् आगम गोमन्तौ, यवमन्तौ, येथें 'औ' हा सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्यय विद्यमान असल्यामुळें करतां येईल. गोमान्, यवमान्, येथें सु ह्या सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाला असल्यामुळें नुम् आगम करतां येणार नाहीं. आणि इष्ट तर असें आहे की तेथेंही नुम् आगम झाला पाहिजे. तेव्हां ती इष्ट गोष्ट कांहीं तरी विशेष यत्न केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं म्हणून 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र केलें आहे असा या सूत्राचा उपयोग आहे.

हा उपयोग आहे खरा—

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

प्रत्ययाचा लुक् झाला असतां तेथेंही प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य करावें असें येथें म्हटलें पाहिजे. उदा० पञ्च, सप्त.

पण हीं पञ्च वगैरे उदाहरणें प्रकृतसूत्रानेंच कां बरें सिद्ध होत नाहींत ?

(वा.३) 'प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययनिमित्तक कार्य करावें' असें प्रकृतसूत्रानें सांगितलें आहे. तेव्हां प्रत्ययाचा जेथें लुक् होईल तेथें प्रकृतसूत्राची प्रवृत्ति होणार नाहीं.

(वा.४) 'प्रत्ययाचा लुक् झाला असतां तेथें प्रत्ययनिमित्तक कार्य करावें,' असें निराळें सांगावयास नको.

कां बरें ?

अदर्शनस्य लोपसंज्ञित्वात् म्ह. लोप ही संज्ञा अदर्शनाला सांगितली आहे आणि लुक्, श्लु व लुप् ह्या संज्ञादेखील अदर्शनालाच सांगितल्या आहेत. तेव्हां पञ्च वगैरे ठिकाणीं प्रत्ययाचा लुक् (७।१।२२) झाला असला तरी तेथें लोप ही संज्ञा कायमच असल्यामुळें प्रकृतसूत्रानेंच काम भागेल.

पण जर असें असेल तर

ष्यति ॥ यद्येवम्

**प्रत्ययादर्शनं तु लुमत्संज्ञम् ॥ ५ ॥**

प्रत्ययादर्शनं तु लुमत्संज्ञमपि प्राप्नोति । तत्र को दोषः ।

**तत्र लुकि श्लुविधिप्रतिषेधः ॥ ६ ॥**

तत्र लुकि श्लुविधिरपि प्राप्नोति स प्रतिषेध्यः । अत्ति हन्ति । श्लौ [६.१.१०] इति द्विर्वचनं प्राप्नोति ॥

**न वा पृथक्संज्ञाकरणात् ॥ ७ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । पृथक्संज्ञाकरणात् । पृथक्संज्ञाकरणसामर्थ्याल्लुकि श्लुविधिर्न भविष्यति ॥ तस्माददर्शनसामान्याल्लोपसंज्ञा लुमत्संज्ञा अवगाहते । यथैव तर्ह्यदर्शनसामान्याल्लोपसंज्ञा लुमत्संज्ञा अवगाहत एवं लुमत्संज्ञा अपि लोपसंज्ञामवगाहेरन् । तत्र को दोषः । अगोमती गोमती संपन्ना गोमतीभूता । लुक्तद्धितलुकि [१.१.४९] इति ङीपो लुक्प्रसज्येत । ननु चात्रापि न वा पृथक्संज्ञाकरणादित्येव सिद्धम् । यथैव तर्हि पृथक्संज्ञाकरणसामर्थ्याल्लुमत्संज्ञा लोपसंज्ञां नावगाहन्त एवं लोपसंज्ञापि लुमत्संज्ञा नावगाहेत । तत्र स एव दोषो लुक्युपसंख्यानमिति । अस्त्यन्यल्लोप-

---

(वा.५) प्रत्ययाच्या अदर्शनाला सर्व ठिकाणीं लुक्, श्लु व लुप् या तीनही संज्ञा होतील.

मग झाल्या तर दोष कोणता?

(वा.६) तसें झालें तर श्लूच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य लुक् झाला असला तरी तेथें होऊं लागेल त्याचा निषेध केला पाहिजे; उदा० अत्ति, हन्ति. येथें शप्प्रत्ययाचा लुक् (२।४।७२) झाला आहे. येथें श्लुसंज्ञा झाली तर 'श्लौ (६।१।१०) यानें द्वित्व होऊं लागेल.

(वा.७) अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

पृथक्संज्ञाकरणात् म्ह. लुक्, श्लु व लुप् ह्या निरनिराळ्या तीन संज्ञा ज्या केल्या आहेत त्यांच्या सामर्थ्यास्तव एकीच्या जागेंत दुसरी शिरत नाहीं. म्हणून लुक् झाला असतां तेथें श्लूच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य होणार नाहीं. एकंदरींत अदर्शन हें निमित्त लोपसंज्ञेचें आणि लुक्, श्लु व लुप् या संज्ञांचें सारखेंच असल्यामुळें लुक्, श्लु व लुप् या संज्ञा जेथें होतील तेथें लोप ही संज्ञा शिरणारच. (तेव्हां 'लुक्युपसंख्यानम्' हें वचन करावयास नको.)

पण जर अदर्शन हें निमित्त सारखेंच असल्यामुळें लुक्, श्लु व लुप् ह्या संज्ञा जेथें होतील तेथें लोपसंज्ञा शिरणार, तशा जेथें प्रत्ययाच्या अदर्शनाला लोपसंज्ञा होत असेल तेथें लुक्, श्लु व लुप् ह्या संज्ञा शिरतील.

मग तसें झालें असतां दोष कोणता ?

दोष असा कीं अगोमती गोमती संपन्ना म्ह. वस्तुतः गोमती नसून गोमती अशी समजली जाणारी जी स्त्री तिला 'गोमतीभूता' असें म्हणतात. येथें गोमतीशब्दाहून च्विप्रत्यय (५।४।५०) झाला आहे व त्याचा लोप (६।१।६७) झाला आहे. येथें च्विप्रत्ययाच्या अदर्शनाला जर लुक् वगैरे संज्ञा होतील तर 'लुक्तद्धितलुकि' (१।२।४९) यानें गोमती यांतील ङीप्प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.

पण 'निरनिराळ्या संज्ञा केल्यामुळें एकीच्या जागेंत दुसरी शिरत नाहीं' असें आतांच सांगितलें आहे, तेव्हां गोमतीभूता हें त्यानेंच सिद्ध होईल.

तर मग जसें निरनिराळ्या संज्ञा केल्यामुळें गोमतीभूता येथें लोपसंज्ञेच्या जागेंत लुक्, श्लु व लुप् या संज्ञा शिरत नाहींत तसें लुक्, श्लु व लुप् या संज्ञांच्या जागेंत लोपसंज्ञाही शिरणार नाहीं. आणि ती शिरली नाहीं म्हणजे पूर्वींचाच दोष पुन्हा येणार; तो असा की 'प्रत्ययाचा लुक् झाला असतांही प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य करावें' असें स्वतंत्र वचन पञ्च, सप्त, या उदाहरणांकरतां करावयास पाहिजे.

संज्ञायाः पृथक्संज्ञाकरणे प्रयोजनम् । किम् । लुमत्संज्ञासु यदुच्यते तल्लोपमात्रे मा भूदिति ॥

**लुमति प्रतिषेधाद्वा ॥ ८ ॥**

अथवा यदयं न लुमताङ्गस्य [१.१.६३] इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवति लुकि प्रत्ययलक्षणमिति ॥

**सतो निमित्ताभावात्पदसंज्ञाभावः ॥९**

सन्प्रत्ययो येषां कार्याणामनिमित्तं राज्ञः पुरुष इति स लुप्तोऽप्यनिमित्तं स्यात् राजपुरुष इति । अस्तु तस्या अनिमित्तं या स्वादौ पदमिति पदसंज्ञा या तु सुबन्तं पदमिति पदसंज्ञा सा भविष्यति ।सत्येतत्प्रत्यय आसीदनया भविष्यत्यनया न

---

पण 'निरनिराळ्या संज्ञा केल्यामुळें एकीच्या जागेंत दुसरी शिरत नाहीं' ही गोष्ट लुक्, श्लु व लुप् या तीन संज्ञांविषयींच आहे. लोपसंज्ञेविषयीं नाहीं. लोपसंज्ञेला सर्वत्र शिरण्याची मोकळीक आहे. कारण ती नुसत्या अदर्शनाला निराळी सांगितली आहे व तिचा दुसरा स्वतंत्र उपयोग आहे.

तो कोणता ?

लुक्, श्लु व लुप् या संज्ञांच्या निमित्तानें जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं एकटी लोपसंज्ञा जेथें झाली असेल तेथें होऊं नयेत म्हणून ती लोपसंज्ञा नुसत्या अदर्शनाला सांगितली आहे; तें अदर्शन प्रत्ययाचें असो वा नसो.

(वा.८) अथवा हा आचार्य पाणिनि 'लुक्, श्लु व लुप् झाले असतां तेथें प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य कर्तव्य असेल तर प्रत्ययलक्षण होत नाहीं' असा ज्या अर्थी पुढील सूत्रानें निषेध सांगतं आहे त्यावरून तो असें ज्ञापित करतो की लुक् झाला असतां तेथें प्रकृतसूत्रानें प्रत्ययलक्षण होतें.

( वा.९ ) प्रत्यय विद्यमान असूनही ज्या कार्याला निमित्त होत नाहीं, उदा० राज्ञः पुरुषः येथें षष्ठीप्रत्यय विद्यमान असूनही त्याच्या निमित्तानें 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' (१।४।१७) यानें राजन्शब्दाला पदसंज्ञा झाली नाहीं, तो प्रत्यय लुप्त झाला असल्यास प्रत्ययलक्षणानेंसुद्धां त्या कार्याला निमित्त होणार नाहीं. तेव्हां 'राजपुरुषः' या समासामध्यें राजन्शब्दाला पदसंज्ञा होणार नाहीं. त्यामुळें नकाराचा लोप (८।२।७) होणार नाहीं.

पण सु वगैरे प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली जी पदसंज्ञा (१।४।१७) तिला तो लुप्त षष्ठीप्रत्यय निमित्त न होऊं दे. सुप्प्रत्ययान्त शब्दस्वरूपाला सांगितलेली जी पदसंज्ञा (१।४।१४) ती होईलच.

प्रत्यय विद्यमान असेल त्या ठिकाणीं अमुक सूत्रानें पदसंज्ञा होईल आणि अमुक सूत्रानें पदसंज्ञा होणार नाहीं हें म्हणतां येतें. (जसें राज्ञः येथें प्रत्ययाच्या मागील राजन् याला भसंज्ञा ( १।४।१८ ) प्राप्त होत आहे, तिनें राजन् याला आलेल्या पदसंज्ञेचा (१।४।१७) बाध झाल्यामुळें ती होत नाहीं आणि राज्ञः या सुबंताला भसंज्ञेची प्राप्ति नसल्यामुळें त्याला पदसंज्ञा (१।४।१४) होतेच.) पण हा फरक राजपुरुषः या समासामध्यें षष्ठीप्रत्ययाचा लोप झाल्यानंतर दाखवितां येत नाहीं. कारण

---

४. लुक्, श्लु व लुप् या तिन्ही संज्ञांचें उद्देश्य 'प्रत्ययाचें अदर्शन' हें एकच आहे. त्यामुळें ह्या तीन संज्ञा एकमेकींच्या विषयांत येत नाहीं. जर प्रत्येक ठिकाणीं तिन्ही संज्ञा होतील तर एकाच संज्ञेनें तिन्ही संज्ञांचें काम भागणार आहे. तेव्हां तीन संज्ञा करणेंच व्यर्थ होईल. लोपसंज्ञेचें उद्देश्य मात्र त्यांच्या उद्देश्यापेक्षां निराळें आहे म्ह. फक्त अदर्शन हें आहे. तेव्हां अदर्शनाला सर्व ठिकाणीं होणारच.

५. जर लुक्, श्लु व लुप् यांच्या विषयांत लोपसंज्ञा न होईल तर तेथें 'प्रत्ययाचा लोप झाला' असें म्हणतां येत नसल्यामुळें प्रत्ययलक्षणाची प्राप्तिच येत नाहीं, तेव्हां अर्थातच प्रत्ययलक्षणाचा निषेध सांगणें व्यर्थ होईल.

६. राज्ञः येथें षष्ठीप्रत्यय विद्यमान असतां भसंज्ञेनें पदसंज्ञेचा बाध होत आहे; म्हणून पदसंज्ञा होत नाहीं.

भविष्यतीति । लुप्त इदानीं प्रत्यये यावत एवावधेः स्वादौ पदमिति पदसंज्ञा तावत एवावधेः सुबन्तं पदमिति । अस्ति च प्रत्ययलक्षणेन यजादिपरतेति कृत्वा भसंज्ञा प्राप्नोति ॥

**तुग्दीर्घत्वयोश्च विप्रतिषेधानुपपत्तिरेकयोगलक्षणत्वात्परिवीरिति ॥१०॥**

तुग्दीर्घत्वयोश्च विप्रतिषेधो नोपपद्यते । क्व । परिवीरिति । किं कारणम् । एकयोगलक्षणत्वात् । एकयोगलक्षणे तुग्दीर्घत्वे । इह लुप्ते प्रत्यये सर्वाणि प्रत्ययाश्रयाणि कार्याणि पर्यवपन्नानि भवन्ति । तान्येतेन प्रत्युत्थाप्यन्ते । अनेनैव तुगनेनैव च दीर्घत्वमिति । तदेकयोगलक्षणं भवति । एकयोगलक्षणानि च न प्रकल्पन्ते ॥

**सिद्धं तु स्थानिसंज्ञानुदेशादान्यभाव्यस्य ॥११॥**

सिद्धमेतत् । कथम् । स्थानिसंज्ञान्यभूतस्य भवतीति वक्तव्यम् । किं कृतं भवति । सत्तामात्रमनेन क्रियते । यथाप्राप्ते तुग्दीर्घत्वे भविष्यतः ॥ तद्वक्तव्यं भवति । यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्हि स्थानिवद्भावो नारभ्यते । स्थानिसंज्ञान्यभू-

---

'स्वादिष्व०' (१।४।१७) यानें जेवढ्या भागाला पदसंज्ञा प्राप्त होते तेवढ्याच भागाला सुबंत समजून 'सुप्तिङन्तं०' (१।४।१४) यानें पदसंज्ञा प्राप्त होते. तेव्हां अर्थातच दोन्ही पदसंज्ञांचा भसंज्ञेनें बाध होणार. प्रत्ययलक्षणानें यजादिप्रत्यय पुढें आहे असें समजून भसंज्ञेची (१।४।१८) प्राप्ति कायमच आहे.

(वा. १०) तुक् आगम आणि दीर्घ या दोहोंमध्यें विरोध उत्पन्न झाला असतां तेथें परत्वास्तव (१।४।२) दीर्घ होत असतो तो होणार नाहीं. (कारण दीर्घाला 'पर' म्हणतां येत नाहीं.)

कोणत्या बरें उदाहरणामध्यें अशी स्थिति प्राप्त होत आहे?

'परिवीः' या उदाहरणामध्यें.

असें होण्याचें कारण काय?

एकयोगलक्षणत्वात् म्ह. एकाच शास्त्रानें दोन्ही कार्यें प्राप्त होत आहेत म्हणून. तुक् आगम आणि दीर्घ हीं दोन्ही कार्यें एकाच शास्त्रानें प्राप्त आहेत. असें पाहा की प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर प्रत्ययावर अवलंबून होणारीं सर्वच कार्यें परावृत्त होतात म्ह. नष्टप्राय होतात. त्या सर्व कार्यांची उठावणी या एका प्रत्ययलक्षणसूत्रानें केली जाते. तेव्हां अर्थातच परिवीः येथें क्विप्प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर या प्रकृतसूत्रानेंच तुक् आगम होणार आणि दीर्घही पण यानेंच होणार. तेव्हां प्रकृतसूत्र हें एकच शास्त्र दोन्ही कार्यांचें निमित्त झालें. अशीं एकच शास्त्रानें दोन्ही कार्यें प्राप्त होत असल्यामुळें 'तुक्आगमाचा (६।१।७१) दीर्घानें (६।४।२) जो परत्वास्तव बाध होत असतो' तो होणार नाहीं.

(वा. ११) हें सिद्ध होत आहे.

तें कसें?

'स्वरूप बदललें असतां तेथें स्थानीच्या संज्ञांचा अतिदेश होतो' असें प्रकृतसूत्राच्या ऐवजीं म्हणावें.

असें म्हणण्यानें काय होतें?

असें होतें की तुक्, दीर्घ, वगैरे कार्यें जीं प्रकृतसूत्रानें होत होतीं तीं आतां न होतां त्या कार्यांचीं जीं निमित्तें त्यांचें अस्तित्व रूपांतर झालें तरी गृहीत धरावें एवढेंच फक्त यानें सांगितलें जातें. तुक्, दीर्घ, वगैरे जशीं पूर्वीं प्राप्त झालीं असतील तशीं त्या त्या शास्त्रांनींच केलीं जातात. (तेव्हां परिवीः येथें परत्वास्तव तुक् आगमाचा बाध करून दीर्घ करतां येईल.)

तर मग असें हें प्रकृतसूत्र बदलून निराळें केलें पाहिजे.

जरी निराळें केलें तरी कांहीं गौरव होईल असें समजूं नये. स्थानिवद्भाव निराळा न

तस्यानल्विधाविति वक्ष्यामि। यद्येवमाङो यमहन आत्मनेपदं भवतीति हन्तेरेव स्याद्वधेर्न स्यात्। न हि काचिद्धन्तेः संज्ञास्ति या वधेरतिदिश्येत। हन्तेरपि संज्ञास्ति। का। हन्तिरेव। कथम्। स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा [१.१.६८] इति वचनात्स्वं रूपं शब्दस्य संज्ञा भवतीति हन्तेरपि हन्तिः संज्ञा भविष्यतीति॥

## भसंज्ञाङीप्ष्फगोरात्वेषु च सिद्धम् ॥१२॥

भसंज्ञाङीप्ष्फगोरात्वेषु च सिद्धं भवति॥ भसंज्ञा। राज्ञः पुरुषो राजपुरुषः। प्रत्ययलक्षणेन यचि भम् [१.४.१८] इति भसंज्ञा प्राप्नोति। स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न भवति॥ ङीप्। चित्रायां जाता चित्रा। प्रत्ययलक्षणेनाणन्तादितीकारः प्राप्नोति। स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न भविष्यति॥ ष्फ॥ वतण्डी। प्रत्ययलक्षणेन यञन्तादिति ष्फः प्राप्नोति। स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न भवति॥ गोरात्वम्। गामिच्छति

---

सांगतां तेथेंच 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' (१।१।५६) असें म्हणतां येईल.

पण असें केलें तर आङो यमहनः (१।३।२८) या सूत्रानें सांगितलेलें आत्मनेपद हन्धातूलाच होईल. हन्धातूला वध आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें जें आत्मनेपद होत असतें तें होणार नाहीं. कारण आत्मनेपदाला कारणीभूत अशी हन्धातूला कोणतीच संज्ञा दिसत नाहीं की जिचा ह्या नवीन केलेल्या 'स्थानिसंज्ञा०' या सूत्रानें वध यावर अतिदेश करतां येईल.

हन्धातूला देखील तशी संज्ञा आहे.

ती कोणती ?

हन् हीच हन्धातूची संज्ञा आहे.

हन् हें हन्धातूचें स्वरूप आहे. त्याला त्याचीच संज्ञा असें कसें म्हणावें ?

'स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा' (१।१।६८) या सूत्रानें शब्दाचें जें स्वतःचें स्वरूप असेल तें त्याचीच संज्ञा होते असें सांगितलें असल्यामुळें हन् हीच हन् याची संज्ञा होईल.

(वा.१२) (स्थानिवद्भाव आणि प्रत्ययलक्षण सांगणारीं निरनिराळीं दोन सूत्रें होतीं तेव्हां 'अनल्विधौ' हा निषेध फक्त स्थानिवद्भावाचाच झाला असता; प्रत्ययलक्षणाचा झाला नसता. आतां एक सूत्र केल्यामुळें अनल्विधौ हा निषेध सर्वत्र म्ह. प्रत्ययलोपाचे ठिकाणींही लागू पडतो म्हणून) भसंज्ञा, ङीप्प्रत्यय, ष्फप्रत्यय आणि गोशब्दाला आत्व हे होत नाहींत आणि उदाहरणें सिद्ध होतात. भसंज्ञेचें उदाहरण— राज्ञः पुरुषः राजपुरुषः या समासामध्यें प्रत्ययलक्षणानें यजादिप्रत्यय पुढें आहे असें समजून भसंज्ञा (१।४।१८) प्राप्त होते. परंतु 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होत नाहीं. ङीप्प्रत्ययाचें उदाहरण— चित्रायां जाता चित्रा येथें चित्र ह्याच्या शेवटीं प्रत्ययलक्षणानें अकारान्त अण्प्रत्यय आहे असें समजून ईकार हा स्त्रीप्रत्यय (४।१।१५) प्राप्त होतो. परंतु 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होत नाहीं. ष्फप्रत्ययाचें उदाहरण— वतण्डस्य गोत्रापत्यं स्त्री वतण्डी येथें प्रत्ययलक्षणानें वतण्ड याच्या शेवटीं अकारान्त यञ्प्रत्यय आहे असें समजून ष्फ हा स्त्रीप्रत्यय (४।१।१७) प्राप्त होतो. परंतु 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होत नाहीं. गोशब्दाला आत्वाचें उदाहरण— गाम् इच्छति गव्यति येथें प्रत्ययलक्षणानें अजादि अम्प्रत्यय गोशब्दाच्या पुढें आहे असें समजून 'औतोऽम्शसोः' (६।१।९३)

गव्यति । प्रत्ययलक्षणेनाम्यौतोऽम्शसोः [६.१.९३] इत्यात्वं प्राप्नोति । स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न भवति ॥

तस्य दोषो ङौनकारलोपेत्त्वेम्विधयः ॥१३॥

तस्यैतस्य लक्षणस्य दोषो ङौ नकारलोपः । आर्द्रे चर्मन् लोहिते चर्मन् । प्रत्ययलक्षणेन यचि भम् [१.४.१८] इति भसंज्ञा सिद्धा भवति । स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न प्राप्नोति ॥ इत्त्वम् । आशीः । प्रत्ययलक्षणेन हलीतीत्त्वं सिद्धं भवति । स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न प्राप्नोति ॥ इम् । अतृणेट् । प्रत्ययलक्षणेन हलीतीम्सिद्धो भवति । स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधाविति वचनान्न प्राप्नोति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं सतो निमित्ताभावात्पदसंज्ञाभावस्तुग्दीर्घत्वयोश्च विप्रतिषेधानुपपत्तिरेकयोगलक्षणत्वात्परिवीरिति । नैष दोषः । वक्ष्यत्यत्र परिहारम् । इहापि परिवीरिति शास्त्रपरविप्रतिषेधेन परत्वाद्दीर्घत्वं भविष्यति ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

प्रयोजनमपृक्तशिलोपे नुममामौ गुणवृद्धिदीर्घत्वेमडाट्श्चम्विधयः ॥१४॥

अपृक्तलोपे शिलोपे च कृते नुममामौ

---

यानें आकार एकादेश प्राप्त होतो. परंतु 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होत नाहीं.

(वा.१३) याप्रमाणें हीं उदाहरणें जरी साधतात तरी तसें एक सूत्र केलें असतां ङौ नकारलोप, इत्त्व आणि इम्विधि यांच्यासंबंधानें दोष येतो. ङौ नकारलोपाचें उदाहरण— आर्द्रे चर्मन्, लोहिते चर्मन् येथें प्रत्ययलक्षणानें सप्तमीएकवचन ङि हा यजादिप्रत्यय पुढें आहे असें समजून चर्मन् याला भसंज्ञा (१।४।१८) होते, ती 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होणार नाहीं. (कारण अनल्विधौ हा निषेध येतो.) इत्त्वाचें उदाहरण— आशीः येथें प्रत्ययलक्षणानें क्विप् हा हलादिप्रत्यय पुढें आहे असें समजून शास्धातूच्या उपधेला इत्त्व (६।४।३४) होतें तें 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होणार नाहीं. इम्विधीचें उदाहरण— अतृणेट् येथें प्रत्ययलक्षणानें तिप् हा हलादि पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें आहे असें समजून तृणह् याला इम् आगम (७।३।९२) होतो तो 'स्थानिसंज्ञान्यभूतस्यानल्विधौ' असें म्हटलें म्हणजे होणार नाहीं. (हे दोष येतात) शिवाय पाणिनीनें केलेलें सूत्र फिरवावें लागणार आहेच.

तर मग मूळ पाणिनीनें जशीं सूत्रें केलीं आहेत तशींच तीं असूं देत.

पण तशीं सूत्रें असलीं तर त्यांवर 'सतो निमित्ताभावात्पदसंज्ञाऽभाव, तुग्दीर्घत्वयोश्च विप्रतिषेधानुपपत्तिरेकयोगलक्षणत्वात्परिवीरिति' असे पूर्वी (वा.९,१०) दोष दाखविले आहेत त्यांची वाट काय ?

हे दोष येत नाहींत. 'प्रत्ययलक्षणानें भसंज्ञा होत नाहीं' असा राजपुरुषः येथें परिहार पुढें(वा.१५) सांगणार आहें. परिवीः येथें सुद्धां जरी एकाच प्रत्ययलक्षणसूत्रानें तुक्आगम आणि दीर्घ ह्या दोन्ही कार्यांची उठावणी केली असली तरी तीं कार्यें मूळ ज्या सूत्रांनीं सांगितलीं आहेत त्या सूत्रांमध्यें पर कोण आहे तें पाहून परत्वास्तव दीर्घ होईल.

पण या सूत्राचीं उदाहरणें तरी कोणतीं ?

(वा.१४) अपृक्तप्रत्ययाचा लोप आणि शिप्रत्ययाचा लोप झाल्यानंतर नुम्, अम्, आम्, गुण, वृद्धि, दीर्घ, इम्, अट्, आट्,

गुणवृद्धी दीर्घत्वमिमडाटौ श्नम्विधिरिति प्रयोजनानि ॥ नुम् । अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था । ता ता पिण्डानाम् । नुम् ॥ अमामौ । हेऽनड्वन् अनड्वान्॥ गुणः । अधोक् अलेट् ॥ वृद्धिः । न्यमार्ट् ॥ दीर्घत्वम् । अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था । ता ता पिण्डानाम् ॥ इम् । अतृणेट् ॥ अडाटौ । अधोक् अलेट् । ऐयः औनः ॥ श्नम्विधिः । अभिनोऽत्र अच्छिनोऽत्र ॥ अपृक्तशिलोपयोः कृतयोरेते विधयो न प्राप्नुवन्ति । प्रत्ययलक्षणेन भवन्ति ॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि । स्थानिवद्भावेनाप्येतानि सिद्धानि । न सिध्यन्ति । आदेशः स्थानिवदित्युच्यते न च लोप आदेशः । लोपोऽप्यादेशः । कथम् । आदिश्यते यः स आदेशः । लोपोऽप्यादिश्यते । दोषः खल्वपि स्याद्यदि लोपो नादेशः स्यात् । इहाचः

आणि श्नम् हीं कार्यें प्रकृतसूत्रानें प्रत्यय पुढें आहे असें समजून करतां येतात. तीं अशीं- 'अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था,' 'ता ता पिण्डानाम्' या वाक्यांमध्यें त्री व ता यांतील शिप्रत्ययाचा लोप (६।१।७०) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून नुम्आगम (७।१।७२) होतो. हे अनड्वन् येथें अपृक्त जो संबुद्धि सुप्रत्यय त्याचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून अम् आगम (७।१।९९) होतो. अनड्वान् येथें अपृक्त जो प्रथमेचा एकवचनीं सुप्रत्यय त्याचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून आम् आगम (७।१।९८) होतो. अधोक्, अलेट्, या क्रियापदांमध्यें तिप् या अपृक्तप्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून गुण (७।३।८६) होतो. न्यमार्ट् या क्रियापदामध्यें तशीच वृद्धि (७।२।११४) होते. अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था, ता ता पिण्डानाम्, येथें नुम् आगम होतो तसाच दीर्घ (६।४।८) होतो. अतृणेट् या क्रियापदामध्यें तिप् या अपृक्तप्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून इम् आगम (३।३।९२) होतो. अधोक्, अलेट्, येथें जसा गुण होतो तसाच अट् आगम (६।४।७१) होतो. ऐयः[७], औनः, या क्रियापदांमध्यें तिप् या अपृक्तप्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रकृतसूत्रानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून आट् आगम (६।४।७२) होतो. अभिनोऽत्र, अच्छिनोऽत्र, येथें तसाच प्रकृतसूत्रानें प्रत्यय पुढें आहे असें समजून श्नम् हा विकरणप्रत्यय (३।१।७८) होतो. याप्रमाणें वरील उदाहरणांमध्यें अपृक्तप्रत्ययाचा आणि शिप्रत्ययाचा लोप झाल्यानंतर प्रत्यय पुढें नसल्यामुळें हे नुम् वगैरे विधि प्राप्त होत नाहींत. परंतु प्रकृतसूत्राच्या जोरावर प्रत्ययलक्षणानें होतात.

पण हीं प्रकृतसूत्राचीं उदाहरणें बरोबर नाहींत. कारण स्थानिवद्भावानें देखील हीं सर्व उदाहरणें सिद्ध होण्यासारखीं आहेत.

स्थानिवद्भावानें सिद्ध होणारीं हीं उदाहरणें नव्हेत. कारण आदेशाला स्थानिवद्भाव सांगितला आहे. आणि लोप म्ह. नुसतें अदर्शन. त्याला आदेश कसें म्हणतां येईल ?

लोपालाही आदेश असें म्हणतां येतें.

तें कसें ?

स्थानीच्या जागीं जो सांगितला जातो त्याला आदेश म्हणतात. आणि लोपदेखील स्थानीच्या जागींच सांगितला जातो. (कारण तेथें देखील षष्ठी स्थानेयोगा (१।१।४९) या परिभाषेनेंच षष्ठीप्रत्ययाचा स्थानाशीं संबंध जोडला जात आहे. तेव्हां लोपाला आदेश म्हणणें योग्यच आहे.) शिवाय लोपाला आदेश म्हटलें नाहीं तर उलट खरोखरच

७. ऐयः हें क्रियापद जुहोत्यादिगणांतील ऋधातूचें आहे, लङ्चा प्रथमपुरुषीं एकवचनीं तिप् प्रत्यय केला आहे. तसेंच औनः हें रुधादिगणांतील उन्द् धातूचें आहे.

परस्मिन्पूर्वविधौ [१.१.५७] इत्येतस्य भूयिष्ठानि लोप उदाहरणानि तानि न स्युः ॥ यत्र तर्हि स्थानिवद्भावो नास्ति तदर्थमयं योगो वक्तव्यः । क्व च स्थानिवद्भावो नास्ति । योऽल्विधिः । किं प्रयोजनम् । प्रयोजनं ङौनकारलोपेत्त्वेम्विधयः ॥

**भसंज्ञाङीप्ष्फगोरात्त्वेषु च दोषः ॥१५**

भसंज्ञाङीप्ष्फगोरात्त्वेषु दोषो भवति ॥ भसंज्ञायां तावन्न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययलक्षणेन भसंज्ञा भवतीति यदयं न ङिसंबुद्धयोः [८.२.८]। इति ङौ प्रतिषेधं शास्ति ॥ ङीप्यपि नैवं विज्ञायतेऽणन्तादकारान्तादिति । कथं तर्हि । अण्योऽकार इति ॥ ष्फेऽपि नैवं विज्ञायते यञन्तादकारान्तादिति । कथं तर्हि । यञ्योऽकार इति ॥ गोरात्त्वेऽपि नैवं विज्ञायतेऽम्यचीति । कथं तर्हि । अच्यमीति ॥ प्रयोजनान्यपि तर्हि तानि न सन्ति । यत्तावदुच्यते ङौ नका-

---

दोष येणार आहेत. कारण लोप आदेश झाला आहे अशीं 'अचः परस्मिन्पूर्वविधौ' (१।१।५७) या सूत्राचीं किती तरी उदाहरणें पूर्वी दाखविलीं आहेत तीं सर्व उदाहरणें त्याचीं नव्हेत असें म्हणण्याची पाळी येईल, आणि तीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत.

जरी हीं उदाहरणें स्थानिवद्भावानें सिद्ध झालीं तरी ज्या उदाहरणांमध्यें स्थानिवद्भावाची प्राप्ति येत नाहीं त्यांकरतां तरी हें प्रकृतसूत्र केलेंच पाहिजे.

कोणता विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाची प्राप्ति येत नाहीं ?

अलाच्या निमित्तानें सांगितलेला जो विधि तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं.

असें उदाहरण कोणतें ?

ङौनकारलोप, इत्त्व आणि इम्विधि हे प्रकृतसूत्रानेंच सिद्ध होतात. (स्थानिवद्भावानें सिद्ध होत नाहींत असें आतांच सांगितलें आहे.)

(वा.१५) पण ङौनकारलोप वगैरेंकरितां म्ह. अल्विधीकरतां प्रकृतसूत्र मुद्दाम केलें तर भसंज्ञा, ङीप्प्रत्यय, ष्फप्रत्यय आणि गोशब्दाला आत्व कर्तव्य असतांना दोष येतो त्याची वाट काय ?

भसंज्ञेविषयीं म्ह. राजपुरुषः येथें प्रत्ययलक्षणानें भसंज्ञा होईल तर हा दोष येत नाहींच. कारण ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'न ङिसंबुद्धयोः' (८।२।८) या सूत्रानें ङिप्रत्यय पुढें असतांना नलोपाचा निषेध सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की प्रत्ययलक्षणानें भसंज्ञा होत नाहीं. चित्रा येथें प्रत्ययलक्षणानें ङीप् होईल हाही दोष येत नाहीं. ङीप् सांगणाऱ्या शास्त्रामध्यें (४।१।५) 'अकारान्त जो अण् तदंत' असा अर्थ घेऊं नये, तर अण् हें अकाराचें विशेषण करून 'अण् जो अकार तदंत' असा अर्थ घ्यावा. (तेव्हां ङीप् प्रत्ययाला मुख्यत्वानें निमित्त वर्ण होतो, अण् प्रत्यय होत नाहीं, म्हणून प्रकृतसूत्र तेथें प्रवृत्त होत नाहीं. वतण्डी येथेंही 'प्रत्ययलक्षणानें ष्फप्रत्यय होईल' हा दोष येत नाहीं. तेथेंही (१।४।१७) 'अकारान्त जो यञ् तदंत' असा अर्थ घेऊं नये तर यञः हें अकाराचें विशेषण करून 'यञ्प्रत्ययांतील जो अकार तदंत' असा अर्थ घ्यावा. 'गव्यति येथें प्रत्ययलक्षणानें गोशब्दाला आत्व होईल' हाही दोष येत नाहीं. तेथेंही (६।१।९३) 'अजादि अम्प्रत्यय' असा अर्थ घेऊं नये तर अम् हें अचाचें विशेषण करून 'अम्प्रत्ययांतील जो अच्' असा अर्थ घ्यावा. (एकंदरींत स्थानिवद्भावापेक्षां प्रकृतसूत्र निराळें करण्यांत जे दोष दाखविले ते बरोबर नाहींत असें सिद्ध झालें.)

तर मग प्रकृतसूत्र निराळें करण्याचा उपयोग म्हणून जीं उदाहरणें दाखविलीं तीं देखील बरोबर नाहींत. त्यांपैकीं ङौनकारलोपाचें चर्मन् हें उदाहरण दिलें आहे तेथें प्रत्ययलक्षणानें

रलोप इति क्रियत एतन्न्यास एव न ङिसंबुद्ध्योरिति ॥ इत्त्वमपि । वक्ष्यत्येतत् । शास इत्त्वं आशासः क्वाविति ॥ इम्विधिरपि । हलीति निवृत्तम् । यदि हलीति निवृत्तं तृणहानि अत्रापि प्राप्नोति । एवं तर्ह्यचि नेत्यप्यनुवर्तिष्यते ॥ न तर्हीदानीमयं योगो वक्तव्यः । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् । प्रत्ययं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात् । शब्दं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन मा भूदिति । किं प्रयोजनम् । शोभना दृषदोऽस्य सुदृषद्ब्राह्मणः । सोमनसी अलोमोषसी [६.२.११७] इत्येष स्वरो मा भूदिति ॥

## न लुमताङ्गस्य ॥१।१।६३॥

**लुमति प्रतिषेध एकपदस्वरस्योपसंख्यानम् ॥ १ ॥**

लुमति प्रतिषेध एकपदस्वरस्योपसंख्यानं कर्तव्यम् । एकपदस्वरे च लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति वक्तव्यम् ॥

---

भसंज्ञा झाल्यामुळें नकाराचा लोप होत नाहीं. परंतु हें स्वतंत्र सूत्र नसलें तरी अनल्विधौ या निषेधामुळें स्थानिवद्भावानें भसंज्ञा करतां आली नाहीं तरी 'नलोप होईल' हा दोष येत नाहीं. कारण पाणिनीनें त्याकरतां 'न ङिसंबुद्ध्योः' (८।२।८) या सूत्रामध्यें ङि हा शब्द नलोपाच्या निषेधाकरतां घातलाच आहे. तसेंच 'आशीः' येथें शास इदङ्हलोः' (६।४।३४) यानें इत्त्व झालें नाहीं तरी हरकत नाहीं. कारण तेथें इत्त्व होण्याकरतां वार्तिककारांनीं 'शास इत्त्वे आशासः क्वौ' (६।४।३४ वार्ति०१) असें वार्तिक केलेंच आहे. अतृणेट् येथें स्थानिवद्भावानेंच 'पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें आहे' असें समजून तृणह इम् (७।३।९२) यानें इम् आगम होईल. 'तृणह इम्' येथें मागून (७।३।८९) हलि या पदाची अनुवृत्ति आणूं नये म्हणजे स्थानिवद्भावाचा अनल्विधौ हा निषेध होणार नाहीं.

पण जर हलि याची अनुवृत्ति आणली नाहीं तर तृणहानि येथें इम् आगम होऊं लागेल.

तर मग तृणह इम् (७।३।९२) येथें मागून (७।३।८७) 'अचि न' या दोन पदांची अनुवृत्ति आणली म्हणजे अजादिप्रत्यय पुढें असतांना इम् आगम होणार नाहीं.

एकंदरींत हें प्रकृतसूत्र करावयास नको कीं काय ?

प्रकृतसूत्र तर केलेंच पाहिजे.

तें कशाकरतां ?

'प्रत्ययाला धरून सांगितलेलें जें कार्य तेंच प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें झालें पाहिजे, एखाद्या शब्दाला धरून सांगितलेलें जें कार्य तें प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें होऊं नये,' हा नियम करण्याकरतां प्रकृतसूत्र केलें पाहिजे.

ह्या नियमाचा उपयोग काय ?

'शोभनाः दृषदः अस्य ब्राह्मणस्य सुदृषद् ब्राह्मणः'. येथें सुदृषद् या बहुव्रीहि समासामध्यें दृषद् या उत्तरपदाहून केलेल्या जस्प्रत्ययाचा जो लुक् (२।४।७१) झाला आहे त्याला प्रत्ययलक्षण होऊन असंत उत्तरपद आहे असें समजलें तर 'सोमनसी अलोमोषसी' (६।२।११७) यानें उत्तरपदाला आदिउदात्त होऊं लागेल तो होऊं नये असा ह्या नियमाचा उपयोग आहे.

[सू.६३] (वा.१) लुक्, श्लु व लुप् हे झाले असतां हा जो प्रकृतसूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध केला आहे त्यामध्येंच एकपदस्वराचें

---

१. लुक्, श्लु, व लुप् या शब्दांनीं जेथें प्रत्ययाचें अदर्शन झालें असेल तेथें त्या प्रत्ययाच्या निमित्तानें ज्याला अंगसंज्ञा झाली असेल त्याला जर एखादें कार्य 'प्रत्ययलक्षणानें तो प्रत्यय पुढें आहे' असें समजून प्राप्त होईल तर तें करूं नये.

किमविशेषेण । नेत्याह ।

**सर्वामन्त्रितसिज्लुक्स्वरवर्जम् ॥ २ ॥**

सर्वस्वरमामन्त्रितस्वरं सिज्लुक्स्वरं च वर्जयित्वा ॥ सर्वस्वर । सर्वस्तोमः सर्वपृष्ठः । सर्वस्य सुपि [६.१.१९१] इत्याद्युदात्तत्वं यथा स्यात् ॥ आमन्त्रितस्वर । सर्पिरागच्छ । सप्तागच्छत । आमन्त्रितस्य च [६.१.१९८] इत्याद्युदात्तत्वं यथा स्यात् ॥ सिज्लुक्स्वर ॥ मा हि दाताम् । मा हि धाताम् । आदिः सिचोऽन्यतरस्याम् [६.१.१८७] इत्येष स्वरो यथा स्यात् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं ञिनिकिल्लुकि स्वराः ॥ ३**

ञिनिकित्स्वरा लुकि प्रयोजयन्ति । गर्गाः वत्साः । बिदाः उर्वाः । उष्ट्रग्रीवाः वामरज्जुः । ञ्नितीत्याद्युदात्तत्वं मा भू-

---

उपसंख्यान करावें म्हणजे लुक्, श्लु व लुप् हे झाले असतां एकपदावर अवलंबून होणारा स्वर कर्तव्य असेल तर प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हणावें.

मग तशा प्रकारचा कोणत्याही सूत्रानें स्वर प्राप्त झाला असतां तेथें प्रत्ययलक्षण होत नाहीं कीं काय ?

तसा सर्वसाधारण निषेध नाहीं असें वार्तिककारच म्हणतात.

(वा.२) सर्वशब्दाला सांगितलेला स्वर, आमंत्रिताला सांगितलेला स्वर आणि सिच्प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर प्राप्त होणारा स्वर हे तीन स्वर एकपदावर अवलंबून होणाऱ्या स्वरामध्यें वगळावेत. (म्हणजे अर्थात् हे तीन स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होतें.) त्यांपैकीं सर्वशब्दाच्या स्वराचें उदाहरण— सर्वस्तोमः, सर्वपृष्ठः; येथें समासामधील सुप्प्रत्ययाचा लुक् (२।४।७१) झाल्यानंतर त्याला प्रत्ययलक्षण करून 'सर्वस्य सुपि' (६।१।१९१) या सूत्रानें आदि उदात्त झाला पाहिजे. आमंत्रिताच्या स्वराचें उदादरण— सर्पिरागच्छ, सप्तागच्छत येथें सर्पिस् व सप्तन् या शब्दांपुढील संबोधनप्रत्ययाचा लुक् (७।१२३, ७।१।२२) झाल्यानंतर त्याला प्रत्ययलक्षण करून 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९८) या सूत्रानें आदि-उदात्त झाला पाहिजे. सिज्लुक्स्वराचें उदाहरण— मा हि दाताम्, मा हि धाताम्, येथें सिच्प्रत्ययाचा लुक् (२।४।७७) झाल्यानंतर त्याला प्रत्ययलक्षण करून 'आदिः सिचोऽन्यतरस्याम्' (६।१।१८७) या सूत्रानें आदि-उदात्त झाला पाहिजे.

याकरितां हे तीन स्वर वगळले पाहिजेत तर वगळा, पण त्याशिवाय एकपदावर अवलंबून होणारे स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें जें म्हणलें आहे त्याचा उपयोग काय ?

(वा.३) ञित्, नित् आणि कित् या प्रत्ययांच्या निमित्तानें सांगितलेले जे स्वर ते त्या प्रत्ययांचा लुक् झाला तरी प्रत्ययलक्षणानें होऊं लागतील, ते तेथें न झाले पाहिजेत. तेव्हां ते स्वर तेथें प्रत्ययलक्षणाच्या निषेधाला कारणीभूत होतात, उदा० गर्गाः[३], वत्साः, बिदाः-उर्वाः, उष्ट्रग्रीवाः, वामरज्जुः. या ठिकाणीं प्रत्यय, लक्षणानें ञित्, नित्, प्रत्यय आहे असें समजून 'ञ्निति०' (६।१।१९७) यानें आदिउदात्त

---

२. 'न मताङ्गस्य' या प्रकृतसूत्रामध्यें 'अङ्गस्य' असें म्हटलें लु असल्यामुळें अङ्गस्य या अधिकारांतील कार्य कर्तव्य असतांनाच हा निषेध येतो' असें वार्तिककारांनीं गृहीत धरलें आहे. स्वर सांगणारीं शास्त्रें हीं अङ्गस्य या अधिकारांत नाहींत म्हणून स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षणाचा हा निषेध होणार नाहीं म्हणून मुद्दाम त्याकरतां वार्तिककारांनीं हें निराळें वचन केलें आहे.

३. गर्गाः, वत्साः, येथें यञ् (४।१।१०५) या ञित्प्रत्ययाचा आणि बिदाः, उर्वाः, येथें अञ् (४।१, १०४) या ञित्प्रत्ययाचा लुक् (२।४।६४) झाला आहे. उष्ट्रग्रीवा, वामरज्जुः, येथें कन् (५।३।९६) या नित्प्रत्ययाचा लुप् (५।३।१००) झाला आहे.

दिति । इह च अत्रयः कितः [६.१.१६५] इत्यन्तोदात्तत्वं मा भूदिति ॥

**पथिमथोः सर्वनामस्थाने ॥ ४ ॥**

पथिमथोः सर्वनामस्थाने लुकि प्रयोजनम् । पथिप्रियः मथिप्रियः । पथिमथोः सर्वनामस्थाने [६.१.१९९] इत्येष स्वरो मा भूदिति ॥

**अह्नो रविधौ ॥ ५ ॥**

अह्नो रविधाने लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति वक्तव्यम् । अहर्ददाति । अहर्भुङ्क्ते । रोऽसुपि [८.२.६९] इति प्रत्ययलक्षणेन प्रतिषेधो मा भूदिति ॥

**उत्तरपदत्वे चापदादिविधौ ॥ ६ ॥**

उत्तरपदत्वे चापदादिविधौ लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति वक्तव्यम् । परमवाचा परमवाचे । परमगोदुहा परमगोदुहे । परमश्वलिहा परमश्वलिहे । पदस्य [८.१.१६] इति प्रत्ययलक्षणेन कुत्वादीनि मा भूवन्निति ॥ अपदादिविधाविति किमर्थम् । दधिसेचौ दधिसेचः । सात्पदाद्योः [८.३.१११] इति प्रतिषेधो यथा स्यात् ॥ यद्यपदादिविधावित्यु-

---

होऊं लागेल तो न झाला पाहिजे. तसाच अत्रयः येथें प्रत्ययलक्षणानें कित्प्रत्यय आहे असें समजून 'कितः' (६।१।१६५) यानें अंत्यउदात्त होऊं लागेल तो न झाला पाहिजे. असा प्रत्ययलक्षणाच्या निषेधाचा उपयोग आहे.

(वा.४) तसाच पथिन् आणि मथिन् शब्दांच्या पुढील सर्वनामस्थानप्रत्ययाचा लुक् झाला असतां तेथेंही प्रत्ययलक्षणाच्या निषेधाचा उपयोग आहे. म्ह. पथिन्, मथिन्, शब्दांच्या पुढील सर्वनामस्थानप्रत्ययाचें लुक् वगैरेंनीं अदर्शन झालें असतां तेथें प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हणावें; उदा० पथिप्रियः, मथिप्रियः. येथें बहुव्रीहि समासामध्यें पथिन्, मथिन् शब्दांच्या पुढील सर्वनामस्थानप्रत्ययाचा लुक् (२।४।७१) झाला तरी प्रत्ययलक्षणानें तो प्रत्यय पुढें आहे असें समजून 'पथिमथोः सर्वनामस्थाने' (६।१।१९९) यानें आदिउदात्त स्वर होऊं लागेल तो न झाला पाहिजे.

(वा.५) अहन्‌शब्दाला रेफ आदेश कर्तव्य असतांना सुप्‌प्रत्ययाचें लुक् वगैरेंनीं अदर्शन झालें असेल तर येथें प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हणावें; उदा० अहर्ददाति, अहर्भुङ्क्ते. येथें अहन् शब्दाच्या पुढील सुप्‌प्रत्ययाचा लुक् (७।१।२३) झाला तरी प्रत्ययलक्षणानें सुप् प्रत्यय पुढें आहे असें समजून 'असुपि' (८।२।६९) हा रेफआदेशाचा निषेध होऊं लागेल तो न झाला पाहिजे.

(वा.६) पदाच्या आदीला सांगितलेलें जें कार्य त्याशिवाय कोणतेंही पदसंज्ञेच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य उत्तरपदाला कर्तव्य असतांना जें लुक् वगैरेंनीं प्रत्ययाचें अदर्शन झालें असेल तेथें प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हणावें; उदा० परमवाचा, परमवाचे, परम गोदुहा, परमगोदुहे, परमलिहा, परमलिहे. या वाच्, गोदुह् आणि लिह् या उत्तरपदांपुढील सुप्‌प्रत्ययाचा जो लुक् (२।४।७१) झाला आहे त्याला प्रत्ययलक्षण करून पदसंज्ञा (१।४।१४) झाली तर कुत्व (८।२।३२) ढत्व, (८।२।३१) हीं कार्यें होऊं लागतील तीं न झालीं पाहिजेत.

प्रत्ययलक्षणाच्या या निषेधामध्यें पदाच्या आदीला सांगितलेलें कार्य कशाकरतां वगळलें ?

दधिसेचौ, दधिसेचः, येथें सेच् या उत्तरपदाच्या प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होऊन त्याच्या आदिसकाराला 'सात्पदाद्योः' (८।३।१११). यानें षत्वाचा निषेध झाला पाहिजे म्हणून

पण जर पदादिविधि वगळून इतर कोणताही पदाला सांगितलेला विधि उत्तरपदाला कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत

---

४. अत्रयः येथें ढक् (४।१।१२२) या कित्प्रत्ययाचा लुक् (२।४।६५) झाला आहे.

५. 'असुपि' हा निषेध अंगस्य या अधिकारांतील नसल्यामुळें 'न लुमताङ्गस्य' यानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होणार नाहीं म्हणून वार्तिककारांनीं हें वार्तिक केलें आहे

च्यत उत्तरपदाधिकारो न प्रकल्पेत। तत्र को दोषः। कर्णो वर्णलक्षणात् [६.२.११२] इत्येवमादिविधिर्न सिध्यति॥ यदि पुनर्नलोपादिविधौ प्लुत्यन्ते लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीत्युच्येत। नैवं शक्यम्। इह हि राजकुमार्यौ राजकुमार्य इति शाकलं प्रसज्येत। नैष दोषः। यदेतत्सिति शाकलं नेत्येतत्प्रत्यये शाकलं नेति वक्ष्यामि। यदि प्रत्यये शाकलं नेत्युच्यते दधि अधुना मधु अधुना अत्रापि न प्रसज्येत। प्रत्यये शाकलं न भवति। कस्मिन्। यस्माद्यः प्रत्ययो विहित इति॥ इह तर्हि परमदिवा परमदिवे दिव उत् [६.१.१३१] इत्युत्वं प्राप्नोतीति॥ अस्तु तर्ह्यविशेषेण। ननु चोक्तमुत्तरपदाधिकारो न प्रकल्पेते-

कोणताही पदाला सांगितलेला विधि उत्तरपदाला कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हटलें तर उत्तरपदाधिकाराचें नांवच काढता येणार नाहीं. (कारण प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञाच जर मुळीं उत्तरपदाला होणार नाहीं तर त्याला 'उत्तरपद' असें तरी कसें बरें म्हणतां येईल ?)

मग तसें झालें तर दोष काय ?

दोष काय विचारतां ? त्या अधिकारांतील 'कर्णो वर्णलक्षणात्' (६।२।११२) वगैरे सर्वच विधि सिद्ध होणार नाहींत.

बरें, आतां उत्तरपदाच्या पुढील सुप्प्रत्ययाचें लुक् वगैरे शब्दांनीं अदर्शन झालें असतां तेथें प्रत्ययलक्षण होत नाहींत हा निषेध कोणताही पदाला सांगितलेला विधि कर्तव्य असतांना येतो असें न म्हणतां ते विधि नलोपा—(८।२।७)पासून प्लुत—(८।२।८२)अखेरपर्यंतचेच घ्यावेत, तर तसें शक्य नाहीं. कारण राजकुमार्यौ, राजकुमार्यः, येथें प्रत्ययलक्षणानें कुमारी हें पद समजून 'इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च' (६।१।१२७) यानें प्रकृतिभाव व ऱ्हस्व होईल हा दोष येतो.

हा दोष येत नाहीं. कारण त्या प्रकृतिभावाचा जो वार्तिककारांनीं सित्प्रत्यय पुढें असतांना निषेध केला आहे तो तसा विशेष प्रत्ययाला धरून न करतां मोघम कोणताही प्रत्यय पुढें असतांना करतां येईल.

पण जर कोणताही प्रत्यय पुढें असतांना तो प्रकृतिभाव होत नाहीं असें म्हटलें तर दधि[६] अधुना, मधु अधुना येथेंही तो प्रकृतिभाव होणार नाहीं.

त्या प्रकृतिभावाच्या निषेधाला कोणताही प्रत्यय पुढें असला तरी चालेल. पण तो कसा म्हणाल तर (ज्याचा त्याला चालेल भलत्याला भलत्याचा चालणार नाहीं, म्ह.) ज्याहून जो प्रत्यय केला असेल त्यालाच तो प्रत्यय पुढें असतांना प्रकृतिभाव होत नाहीं.

(अशा रीतीनें नलोपापासून प्लुतापर्यंत विधि कर्तव्य असतांनाच प्रकृतिभाव होत नाहीं असें घेतलें असतां राजकुमार्यौ येथील दोष जरी गेला) तरी परमदिवा, परमदिवे येथें प्रत्ययलक्षणानें दिव् हें पद समजून 'दिव उत्' (६।१।१३१) यानें उत्व होईल हा दोष येतो.

तर मग अमुकच विधि कर्तव्य असतांना असें न म्हणतां मोघमच म्ह. कोणताही पदाला सांगितलेला विधि कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असेंच असूं दे.

पण तसें म्हटलें असतां 'उत्तरपदाधिकाराचें नांवच काढतां येणार नाहीं' असें आतांच सांगितलें आहे त्याची वाट काय ?

---

६. दधि आणि अधुना हीं दोन निराळीं पदें आहेत. अधुना हा प्रत्यय आहे तो दधि शब्दाहून केलेला नाहीं, इदम्शब्दाहून केला आहे (५।३।१७), नंतर इदम्शब्दाला इश् आदेश (५।३।३) होऊन त्याचा लोप (६।४।१४८) झाला आहे. त्यामुळें नुसता प्रत्ययच त्या पदामध्यें शिल्लक राहिला आहे.

ति। वचनादुत्तरपदाधिकारो भविष्यति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अनुवृत्तिः करिष्यते । इदमस्ति यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम् [१.४.१३]। सुप्तिङन्तं पदम् [१४]। यस्मात्सुप्तिङ्विधिस्तदादि सुबन्तं च । नः क्ये [१५]। नान्तं क्ये पदसंज्ञं भवति यस्मात्क्यविधिस्तदादि सुबन्तं च । सिति च [१६] । सिति च पूर्वं पदसंज्ञं भवति यस्मात्सिद्विधिस्तदादि सुबन्तं च । स्वादिष्वसर्वनामस्थाने [१७] । स्वादिष्वसर्वनामस्थाने पूर्वं पदसंज्ञं भवति यस्मात्स्वादिविधिस्तदादि सुबन्तं च । यचि भम् [१८] । यजादिप्रत्यये पूर्वं भं भवति यस्माद्यजादिविधिस्तदादि सुबन्तं च ॥ इह तर्हि परमवाक् असर्वनामस्थान इति प्रतिषेधः प्राप्नोति । अस्तु तस्याः प्रतिषेधो या स्वादौ पदमिति पदसंज्ञा या तु सुबन्तं पदमिति पदसंज्ञा सा भविष्यति । सत्येतत्प्रत्यय आसीदनया भविष्यत्यनया न भविष्यतीति । लुप्त इदानीं प्रत्यये यावत एवावधेः

---

ज्या अर्थी पाणिनीनें उत्तरपदाधिकार केलाच आहे त्या अर्थी त्याच्या सामर्थ्यानें तेवढ्यापुरता प्रत्ययलक्षणाचा निषेध होणार नाहीं किंवा समासामधील पुढील भागाला पदसंज्ञा नसली तरी उत्तरपद म्हणतां येईल.

एकंदरींत, परमवाचा वगैरे उदाहरणें साधण्याकरतां 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हा प्रत्ययलक्षणाचा निषेध सांगितला पाहिजे.

तो सांगावयास नको. अनुवृत्ति केल्यानें काम भागेल. तें असें– यस्मात्प्रत्ययविधिस्तदादिप्रत्ययेऽङ्गम्' (१।४।१३) असें सूत्र आहे त्यांतून 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि' या पदांची अनुवृत्ति पुढें 'यचि भम्' (१।४।१८) या सूत्रापर्यंत करावी. तेव्हां त्याचा अर्थ असा होतो. पुढील सूत्र— 'सुप्तिङन्तं पदम्'. सुप् किंवा तिङ् हे प्रत्यय ज्याहून केले तदादि जें सुबंत किंवा तिङंत शब्दस्वरूप त्याला पदसंज्ञा होते. त्याच्या पुढील सूत्र—'नः क्ये.' क्यच् किंवा क्यङ् प्रत्यय पुढें असतांना नकारान्ताला पदसंज्ञा होते आणि तो क्यच् किंवा क्यङ्प्रत्यय ज्याहून केला तदादि जें सुबंत त्यालाही पदसंज्ञा होते. त्याच्या पुढील सूत्र 'सिति च'. सित्प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा होते आणि तो सित्प्रत्यय ज्याहून केला तदादि जे सुबंत त्यालाही पदसंज्ञा होते. त्याच्या पुढील सूत्र– 'स्वादिष्वसर्वनामस्थाने'. सर्वनामस्थानाशिवाय सु वगैरे प्रत्ययांपैकीं कोणताही प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा होते. आणि तो प्रत्यय ज्याहून केला तदादि जें सुबंत व त्याच्या आंत आणखी एखादें सुबंत असल्यास त्यालाही पदसंज्ञा होते, सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना मात्र पदसंज्ञा होत नाहीं. त्याच्या पुढील सूत्र– 'यचि भम्.' यजादिप्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला भसंज्ञा होते आणि तो यजादिप्रत्यय ज्याहून केला तदादि जें सुबंत त्याला व त्याच्या आंत एखादें सुबंत असल्यास त्यालाही भसंज्ञा होते; सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना होत नाहीं.

तर मग, परमवाक् येथें 'सर्वनामस्थान पुढें असतांना पदसंज्ञा होत नाहीं' हा निषेध येईल (आणि कुत्व (८।२।३०) होणार नाहीं.)

'स्वादिष्वसर्वनामस्थाने' (१।४।१७) यानें सांगितलेली जी पदसंज्ञा तिचा तो निषेध होऊं दे, पण 'सुप्तिङन्तं पदम्' (१।४।१४) यानें सांगितलेली जी पदसंज्ञा ती होईलच.

प्रत्यय विद्यमान असेल तेव्हां अमुक सूत्रानें पदसंज्ञा होईल आणि अमुक सूत्रानें पदसंज्ञा होणार नाहीं हें म्हणतां येतें. पण हा फरक परमवाक् येथें पुढील सुप्रत्ययाचा

---

७, अ.१ पा.१ सू.६२(वा.९) 'सतो निमित्ता०' ह्या वार्तिकावरील भाष्य पाहणें.

स्वादौ पदमिति पदसंज्ञा तावत एवावधेः सुबन्तं पदमिति । अस्ति च प्रत्ययलक्षणेन सर्वनामस्थानपरतेति कृत्वा प्रतिषेधाश्च बलीयांसो भवन्तीति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नाप्रतिषेधात् । नायं प्रसज्यप्रतिषेधः सर्वनामस्थाने नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यत्सर्वनामस्थानादिति । सर्वनामस्थानेऽव्यापारः । यदि केनचित्प्राप्नोति तेन भविष्यति । पूर्वेण च प्राप्नोति ॥ अप्राप्तेर्वा । अथवानन्तरा या प्राप्तिः सा प्रतिषिध्यते । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । पूर्वा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया भविष्यति । ननु चेयं प्राप्तिः पूर्वां प्राप्तिं बाधते । नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥ यद्येवं परमवाचौ परमवाच इति सुप्तिङन्तं पदमिति पदसंज्ञा प्राप्नोति । एवं तर्हि योगविभागः करिष्यते । स्वा-

---

लोप (६।१।६८) झाल्यानंतर दाखवितां येत नाहीं. कारण 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' यानें जेवढ्या भागाला पदसंज्ञा प्राप्त होते तेवढ्याच भागाला प्रत्ययलक्षणानें सुबंत समजून 'सुप्तिङन्तं पदम्' यानें पदसंज्ञा प्राप्त होते. तेव्हां अर्थातच त्या दोन्ही संज्ञांचा 'असर्वनामस्थाने' हा निषेध प्राप्त होत आहे. कारण प्रत्ययलक्षणानें सर्वनामस्थान प्रत्यय पुढें आहे असें समजतां येतें. आणि निषेध तर इतर सर्वांपेक्षां बलवत्तर असतात.

नाप्रतिषेधात् । 'सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना प्राप्त झालेली पदसंज्ञा करूं नये' असा 'असर्वनामस्थाने' याचा अर्थ समजूं नये तर 'असर्वनामस्थाने' हा पर्युदास आहे. म्ह. 'सर्वनामस्थानप्रत्ययाखेरीज इतर स्वादिकप्रत्यय पुढें असतांना पदसंज्ञा होते' असा 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' (१।४।१७) या सूत्राचा अर्थ आहे. तेव्हां अर्थातच सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असेल तेथें 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' हें सूत्र कांहीं एक करीत नाहीं. म्हणजे तेथें त्या सूत्रानें पदसंज्ञा येतही नाहीं आणि जातही नाहीं. आतां तेथें जर दुसऱ्या एखाद्या सूत्रानें पदसंज्ञा प्राप्त होत असेल तर ती तेथें होणारच. तेव्हां परमवाक् येथें 'सुप्तिङन्तं पदम्' (१।४।१४) ह्या पूर्वसूत्रानें पदसंज्ञा होईल. अप्राप्तेर्वा । अथवा 'असर्वनामस्थाने' याचा 'सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना पदसंज्ञा होत नाहीं' असा जरी अर्थ घेतला तरी त्याच्या योगानें 'स्वादिषु' यानें जी पदसंज्ञेची प्राप्ति येत आहे तिचाच निषेध केला जातो.

असें कशावरून ?

'अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वा' म्ह. विधि किंवा प्रतिषेध हे जवळच्याचेच होतात असा न्याय आहे म्हणून. तेव्हां 'सुप्तिङन्तं पदम्' या पूर्वसूत्रानें आलेली जी पदसंज्ञेची प्राप्ति तिचा निषेध नसल्यामुळें तिच्या योगानें परमवाक् येथें पदसंज्ञा होऊन कुत्व होईल.

पण 'सुप्तिङन्तं पदम्' या पूर्वसूत्रानें आलेल्या पदसंज्ञेचा जरी 'असर्वनामस्थाने' हा निषेध झाला नाहीं तरी त्या संज्ञेचा 'स्वादिषु' यानें सांगितलेल्या पदसंज्ञेनेंच बाध होईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण जी ही पदसंज्ञा स्वतः निषेधाच्या तडाख्यांत सापडल्यामुळें पराङ्मुख झाली आहे ती दुसऱ्याचा बाध करण्याला कधींही धजणार नाहीं.

पण असेंच जर असेल तर परमवाचौ, परमवाचः, येथें वाच् याला प्रत्ययलक्षणानें सुबंत समजून 'सुप्तिङन्तं पदम्' यानें पदसंज्ञा होऊं लागेल.

तर मग अशा ठिकाणीं पदसंज्ञा न होण्याकरतां योगविभाग करतों. 'स्वादिष्वसर्वनामस्थाने', 'यचि भम्' (१।४।१७,१८) अशीं मूळचीं दोन सूत्रें आहेत तीं तीन सूत्रें करावीत. तीं अशीं—'स्वादिषु' हें एक सूत्र होय. सु वगैरे प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा होते. 'सर्वनामस्थानेऽयचि' हें दुसरें सूत्र होय. सर्वनामस्थानप्रत्यय पुढें

दिषु पूर्वं पदसंज्ञं भवति । ततः सर्वनामस्थानेऽयचि । पूर्वं पदसंज्ञं भवति । ततो भम् । भसंज्ञं भवति यजादावसर्वनामस्थान इति ॥ यदि तर्हि सावपि पदं भवत्येचः प्लुतविकारे पदान्तग्रहणं चोदयिष्यति इह मा भूत भद्रं करोषि गौरिति तस्मिन्क्रियमाणेऽपि प्राप्नोति । वाक्यपदयोरन्त्यस्येत्येवं तत् ॥ इह तर्हि दधिसेचौ दधिसेचः सात्पदाद्योरिति पदादिलक्षणः षत्वप्रतिषेधो न प्राप्नोति । मा भूदेवं पदस्यादिः पदादिः पदादेर्नेति । कथं तर्हि । पदादादिः पदादिः पदादेर्नेत्येवं भविष्यति । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । ऋक्षु वाक्षु त्वक्षु कुमारीषु किशोरीष्विति । सात्प्रतिषेधो ज्ञापकः स्वादिषु पदत्वेन येषां पदसंज्ञा न तेभ्यः प्रतिषेधो भवतीति ॥ इह तर्हि बहुसेचौ बहुसेचः ।

---

असतांना जर पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा करावयाची झाली[८] तर यजादिभिन्न सर्वनामस्थान पुढें असतांनाच करावी म्हणजे अर्थात् यजादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा होत नाहीं. 'भम्' हें तिसरें सूत्र होय. सर्वनामस्थानभिन्न यजादि प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला भसंज्ञा होते.

तर मग सु पुढें असतांनाही पूर्वीच्या शब्दाला पदसंज्ञा होणार, आणि जर ती झाली तर 'भद्रं करोषि गौः३' येथें दोष येतो. 'एचोऽप्रगृह्य०' (८।२।१०७) यानें जो प्लुताला विकार सांगितला आहे तो गौः येथें सुप्रत्याच्या मागील औकाराला होऊं नये म्हणून तेथें 'पदान्तीं एच् पाहिजे' असा शब्द निघाला आहे. पण आतां सु पुढें असतांना मागील औकार पदान्तीं असल्यामुळें तेथें पदान्त शब्द घातला तरी दोष येणारच.

वाक्याच्या आणि पदाच्या अंतीं जो प्लुत असेल त्याला तो विकार होत असतो. (हा औकार पदाच्या अंतीं असला तरी वाक्याच्या अंतीं नाहींच. तेव्हां दोष येणार नाहीं.)

तर मग 'दधिसेचः' येथें 'असर्वनामस्थानेऽयचि' यानें पदसंज्ञेचा निषेध झाल्यामुळें जसें कुत्व होत नाहीं तसा त्यामुळेंच 'सात्पदाद्योः' (८।३।१११) यानें षत्वाचा निषेधही होणार नाहीं.

'पदाचा जो आदि तो पदादि. त्या पदादिसकाराला षत्व होत नाहीं' अशा अर्थानें तो निषेध झाला नाहीं तरी न होऊं दे.

तर मग येथें कोणत्या अर्थानें निषेध करणार ?

'पदाहून पर जो आदि तो पदादि. त्या पदादिसकाराला षत्व होत नाहीं' अशा अर्थानें दधि या पदाहून पर सकार असल्यामुळें षत्वाचा निषेध होईल.

पण तसा अर्थ घेतला तर ऋक्षु, वाक्षु, कुमारीषु, किशोरीषु इत्यादि उदाहरणांमध्यें ऋच् वगैरे पदाहून (१।४।१७) पुढें सकार असल्यामुळें त्या सकाराला षत्वाचा निषेध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण अग्निसात् वगैरे उदाहरणांमध्यें सात्-प्रत्ययाच्या (५।४।५२) सकाराला षत्व न होण्याकरतां 'सात्पदाद्योः' (८।३।१११) या सूत्रामध्यें सात् असा जो शब्द उच्चारला आहे त्यावरून असें ज्ञापित होतें की 'स्वादिषु' (१।४।१७) यानें ज्याला पदसंज्ञा झाली आहे त्या पदाहून पुढच्या सकाराला पदादि समजून षत्वाचा निषेध होत नाहीं.

तर मग बहुसेचौ, बहुसेचः, येथें सेच् याला 'असर्वनामस्थानेऽयचि' यानें पदसंज्ञेचा निषेध

---

८. 'स्वादिषु' किंवा 'सुप्तिङन्तं पदम्' या दोन सूत्रांपैकीं कोणत्याही सूत्रानें करावयाची झाली. जर 'स्वादिषु' या एकाच सूत्राचा हा नियम असता तर योगविभाग केलेला व्यर्थ होईल.

बहुजयं प्रत्ययः । अत्र पदादादिः पदादिः पदादेर्नेत्युच्यमानेऽपि न सिध्यति । एवं तर्ह्युत्तरपदत्वे च पदादिविधौ लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं भवतीति वक्ष्यामि । तन्नियमार्थं भविष्यति पदादिविधावेव न पदान्तविधाविति ॥ कथं बहुसेचौ बहुसेचः । बहुच्पूर्वस्य च पदादिविधानेव न पदान्तविधाविति ॥

द्वन्द्वेऽन्त्यस्य ॥ ७ ॥

द्वन्द्वेऽन्त्यस्य लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति वक्तव्यम् । वाक्त्वक्त्वचम् ॥

इह अभूवन्निति प्रत्ययलक्षणेन जुस्भावः प्राप्नोति ।

सिच उसोऽप्रसङ्ग आकारप्रकरणात् ॥ ८ ॥

सिच उसोऽप्रसङ्गः । किं कारणम् । आकारप्रकरणात् । आतः [३.४.११०] इत्येतान्नियमार्थं भविष्यति । आत एव च सिज्लुगन्तान्नान्यस्मात्सिज्लुगन्तादिति ॥ इह इति युष्मत्पुत्रो ददाति इत्यस्मत्पुत्रो ददातीत्यत्र प्रत्ययलक्षणेन युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयो-

---

झाल्यामुळें 'सात्पदाद्योः' यानें षत्वाचा निषेध होणार नाहीं. 'पदाहून पर जो आदि तो पदादि, तशा पदादि सकाराला षत्व होत नाहीं', अशा अर्थानेंही येथें निषेध सिद्ध होत नाहीं. कारण बहुच् हा प्रत्यय (५।३।६८) आहे; पद नव्हे. (एकंदरीत 'स्वादिषु' इत्यादि योगविभाग केला तरी सर्वत्र सिद्धि होत नाहीं.)

तर मग येथें असें वचन करावें की 'उत्तरपदाच्या पुढील सुप्प्रत्ययाचें लुक् वगैरेंनीं अदर्शन झालें असतां तेथें पदाच्या आदीला विधि कर्तव्य असेल तर प्रत्ययलक्षण होतें' हें वचन नियमादाखल होईल. तो नियम असा— 'पदाच्या आदीला विधि कर्तव्य असेल तर तेवढ्यापुरतेंच प्रत्ययलक्षण होतें. पदाच्या अंताला विधि कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं'. (तेव्हां दधिसेचौ इत्यादि उदाहरणांमध्यें दोष येत नाहीं.)

तरी पण बहुसेचौ, बहुसेचः, हीं उदाहरणें कशीं साधतील ? (बहुच् हा तद्धितप्रत्यय आहे तेव्हां सेच् हें उत्तरपद नसल्यामुळें 'उत्तरपदाच्या०' हें वचन प्रवृत्त होणार नाहीं.)

तेथेंही निराळें वचन करावें—'ज्या शब्दाच्या पूर्वी बहुच् प्रत्यय लागला असेल त्या शब्दालाही पदादिविधीपुरतेंच प्रत्ययलक्षणानें पद म्हणावें'. तेव्हां पदान्तविधीकडे त्या प्रत्ययलक्षणाचा उपयोग होत नाहीं.

(वा.७) द्वंद्वसमासामध्यें शेवटच्या शब्दाच्या पुढील सुप्प्रत्ययाचें लुक् वगैरेंनीं अदर्शन झालें असतां प्रत्ययलक्षण होत नाहीं; उदा० वाक्त्वक्त्वचम्. (येथें त्वच् याला पदसंज्ञा नसल्यामुळें कुत्व (८।२।३०) होत नाहीं.)

अभूवन् येथें सिच् प्रत्ययाचा लुक् (२।४।७७) झाल्यानंतर त्याला प्रत्ययलक्षण करून पुढील झिप्रत्ययाला जुस् आदेश (३।४।१०९) होऊं लागेल असा दोष येतो.

(वा.८) सिच्प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर त्याच्या निमित्तानें जुस् आदेश होत नाहीं.

जुस् न होण्याचें कारण काय ?

कारण असें की आकारप्रकरणात् 'आतः' (३।४।११०) असें सूत्र आहे तें नियमादाखल समजलें जाईल. नियम असा की 'सिच्प्रत्ययाचा लुक् झाला असतां जर मागें आकारान्त धातु असेल तरच पुढील झिप्रत्ययाला जुस् आदेश होतो. आकारान्ताशिवाय इतर धातु असेल तर तेथें सिच्प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर जुस् आदेश होत नाहीं.

'इति युष्मत्पुत्रो ददाति' 'इत्यस्मत्पुत्रो ददाति' इत्यादि वाक्यांमध्यें इतिशब्दाच्या पुढील युष्मद्, अस्मद्, या शब्दांना 'युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वाम्नावौ' (८।१।२०) इत्यादि सूत्रांनीं वाम्नौ वगैरे आदेश होऊं

वाम्नावौ [८.१.२०] इतिवाम्नावादयः प्राप्नुवन्ति ।

**युष्मदस्मदोः स्थग्रहणात् ॥ ९ ॥**

स्थग्रहणं तत्र क्रियते तच्छ्रूयमाणविभक्तिविशेषणं विज्ञास्यते । अस्त्यन्यत्स्थग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । सविभक्तिकस्य वाम्नावादयो यथा स्युरिति । नैतदस्ति प्रयोजनम् । पदस्य [१६] इति वर्तते विभक्त्यन्तं च पदं तत्रान्तरेणापि स्थग्रहणं सविभक्तिकस्यैव भविष्यति । भवेत्सिद्धं यत्र विभक्त्यन्तं पदं यत्र तु खलु विभक्तौ पदं तत्र न सिध्यति । ग्रामो वां दीयते। ग्रामो नौ दीयते । जनपदो वां दीयते । जनपदो नौ दीयते । सर्वग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते तेन सविभाक्तिकस्यैव भविष्यति ॥ इह चक्षुष्कामं याजयांचकारेति तिङ्ङतिङः [८.१.२८] इति तस्य च निघातस्तस्माच्चानिघातः प्राप्नोति ।

**आमि लिलोपात्तस्य चानिघातस्तस्माच्च निघातः ॥ १० ॥**

आमि लिलोपात्तस्य चानिघातस्तस्माच्चनिघातः सिद्धो भविष्यति ॥

---

लागतील. कारण युष्मद्, अस्मद्, या शब्दांच्या पुढील षष्ठी वगैरे प्रत्ययांचा लुक् (२।४।७१) झाला असला तरी प्रत्ययलक्षणानें 'ते प्रत्यय आहेत' असें समजतां येतें.

(वा.९) 'युष्मदस्मदोः०' या सूत्रामध्यें 'स्थ' असा शब्द घातला आहे. तो 'श्रूयमाण' या अर्थानें षष्ठी वगैरे विभक्तींचें विशेषण आहे असें समजावें. (म्हणजे उदाहरणामध्यें षष्ठी वगैरे प्रत्यय प्रत्यक्ष विद्यमान असले पाहिजेत; नुसते प्रत्ययलक्षणानें मानीव उपयोगाचे नाहींत.)

पण त्या स्थ शब्दाचा उपयोग दुसरा आहे.

तो कोणता ?

तो असा कीं वाम्नौ वगैरे आदेश हे षष्ठी वगैरे प्रत्ययांसकट युष्मद्, अस्मद्, या शब्दांना झाले पाहिजेत. (ते प्रत्यय पुढें असतांना नुसत्या त्या शब्दांना होऊं नयेत.)

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण 'पदस्य' (८।१।१६) असें येथें मागून अनुवृत्त होत आहे. आणि पद ही संज्ञा (१।४।१४) तर विभक्तीसकटच शब्दाला असते. तेव्हां 'स्थ' हा शब्द नसला तरी देखील विभक्तिप्रत्ययांसकटच युष्मद्, अस्मद्, या शब्दांना ते आदेश होतील.

ज्या ठिकाणीं विभक्तिप्रत्ययासकटच शब्दांना पदसंज्ञा असते तेथें 'पदाला' असें म्हणण्यानें सिद्ध होईल. पण जेथें विभक्तिप्रत्यय पुढें असतांना मागील भागालाही पदसंज्ञा (१।४।१७) होते तेथें सिद्ध होणार नाहीं; उदा० ग्रामो वां दीयते, ग्रामो नौ दीयते. (युष्मद् व अस्मद् या शब्दांचीं चतुर्थीद्विवचनाचीं जीं युवाभ्याम् व आवाभ्याम् अशीं रूपें होतात त्यांना वाम् व नौ हे आदेश येथें झाले आहेत.)

'सर्वस्य' असेंही मागून (८।१।१) येथें अनुवृत्त होत आहे. त्याच्या जोरावर पुढील प्रत्ययासकटच युष्मद्, अस्मद्, शब्दांना ते आदेश होतील.

'चक्षुष्कामं याजयां चकार' या वाक्यामध्यें 'याजयाम्' ह्या तिङंतभिन्न पदाच्या पुढील 'चकार' ह्या तिङंतपदाला 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) यानें अनुदात्त होत असतो. परंतु 'याजयाम्' हें प्रत्ययलक्षणानें तिङंत[१] आहे असें समजलें जात असल्यामुळें त्या सूत्रानें 'याजयाम्' या पदाला अनुदात्त होईल आणि 'चकार'

---

९. याजयाम् याच्या पुढील लिट्प्रत्ययाला तिङ्-आदेश करून नंतर त्याचा 'आमः' (२।४।८१) यानें लोप झाला आहे असें गृहीत धरून 'प्रत्ययलक्षणानें याजयाम् हें तिङंत आहे' असें येथें म्हटलें आहे.

**अङ्गाधिकार इटो विधिप्रतिषेधौ ॥११**

अङ्गाधिकार इटो विधिप्रतिषेधौ न सिध्यतः । जिगमिष संविवृत्स । अङ्गस्येतीटो विधिप्रतिषेधौ न प्राप्नुतः ॥

**क्रमेर्दीर्घत्वं च ॥ १२ ॥**

किं च । इटश्च विधिप्रतिषेधौ । नेत्याह । अदेशेऽयं चः पाठितः । क्रमेश्च दीर्घत्वम् । उत्क्राम संक्रामेति ॥

इह किंचिदङ्गाधिकारे लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणेन भवति किंचिच्चान्यत्र न भवति । यदि पुनर्न लुमता तस्मिन्नित्युच्येत । अथ न लुमता तस्मिन्नित्युच्यमाने किं सिद्धमेतद्भवतीटो विधिप्रतिषेधौ क्रमेर्दीर्घत्वं च । बाढं सिद्धम् । नेटो विधि-

---

याला होणार नाहीं.

(वा.१०) याजयाम् येथें 'याजि' या णिच् प्रत्ययान्त धातूहून अम्प्रत्यय (६।१।३५) केल्यानंतर त्याच्या पुढील लिट् प्रत्ययाचा, त्याला तिङ् आदेश (३।४।७८) करण्यापूर्वीच 'आमः' (२।४।८१) यानें लोप झाल्यामुळें या याजयाम् याला अनुदात्त होत नाहीं. आणि त्याच्या पुढील 'चकार' याला अनुदात्त होतो (कारण प्रत्ययलक्षण झालें तरी 'याजयाम्' हें लिट्प्रत्ययान्त समजलें जाईल, तिङंत समजलें जाणार नाहीं.)

(वा.११)'अङ्गस्य' (६।४।१) या अधिकारामध्यें जो इट्आगमाचा विधि आणि त्याचा निषेध सांगितला आहे तो सिद्ध होणार नाहीं. जिगमिष, संविवृत्स येथें सन्प्रत्ययान्त धातूच्या पुढील हि या परस्मैपदप्रत्ययाचा 'अतो हेः' (६।४।१०५) यानें लुक् झाला आहे. येथें प्रत्ययलक्षणानें 'परस्मैपदप्रत्यय पुढें आहे' असें समजून 'जिगमिष' येथें सन्प्रत्ययाला इट् आगम (७।२।५८) होतो आणि 'संविवृत्स' येथें इट् आगमाचा निषेध (७।२।५८) होतो. परंतु हा इट् आगम आणि त्याचा निषेध सांगणारीं शास्त्रें 'अङ्गस्य' या अधिकारांतील असल्यामुळें प्रकृतसूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होईल असा दोष येतो याकरतां तसें वचन केलें पाहिजे.

(वा.१२) या वार्तिकांतील च या शब्दानें कोणत्या कार्याचा संग्रह करावयाचा ?

पूर्वी सांगितलेल्या इट्आगमाचा आणि त्याच्या निषेधाचा.

पण तसा संग्रह येथें येत नाहीं असें आम्ही म्हणतों. (कारण प्रत्ययलक्षणानें इट् आगम झाल्याचें आणि त्याचा निषेध झाल्याचें उदाहरण क्रमधातूचें संभवत नाहीं.) तेव्हां या वार्तिकामध्यें 'च' हा शब्द भलत्याच ठिकाणीं पडला आहे तो 'क्रमेः' याच्या पुढें घ्यावा, म्ह. पूर्वीच्या वार्तिकापुढें 'क्रमेश्च दीर्घत्वम्' असें वार्तिक समजावें. एकंदर अर्थ असा — अंगस्य या अधिकारांतील कार्य कर्तव्य असतांना प्रकृतसूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होत असल्यामुळें जिगमिष येथें इट् आगम होणार नाहीं. संविवृत्स येथें इट्आगमाचा निषेध होणार नाहीं आणि उत्क्राम, संक्राम, येथें दीर्घ (७।३।७६) होणार नाहीं.

प्रत्ययलक्षणाचा निषेध सांगणाऱ्या त्या प्रकृतसूत्रामध्यें पाणिनीनें अङ्गस्य असें म्हटलें आहे. परंतु वस्तुस्थिति अशी दृष्टीस पडते की लुक् वगैरेंनीं प्रत्ययाचें अदर्शन झालें असतां अङ्गस्य या अधिकारांतील सुद्धां कांहीं कार्य प्रत्ययलक्षणानें होतें आणि कांहीं कार्य अङ्गस्य या अधिकाराच्या बाहेरचेंही प्रत्ययलक्षणानें होत नाहीं.

बरें, आतां 'न लुमता तस्मिन्' म्ह. लुक् वगैरेंनीं प्रत्ययाचें अदर्शन झालें असेल तेथें तो प्रत्यय पुढें असतांना सांगितलेलें कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें म्हटलें तर—

'न लुमता तस्मिन्' असें म्हटलें तर इट् आगम, त्याचा निषेध, क्रमधातूला दीर्घ, हे सर्व सिद्ध होतात काय ?

होय. खात्रीनें सिद्ध होतात. कारण 'गमेरिट्' यानें सांगितलेला इट् आगम, आणि 'न

प्रतिषेधौ परस्मैपदेष्वित्युच्यते । कथं तर्हि । सकारादाविति तद्विशेषणं परस्मैपदग्रहणम् । न खल्वपि क्रमेर्दीर्घत्वं परस्मैपदेष्वित्युच्यते । कथं तर्हि । शितीति तद्विशेषणं परस्मैपदग्रहणम् ॥

**न लुमता तस्मिन्निति चेद्धनिणिङादेशास्तल्लोपे ॥ १३ ॥**

न लुमता तस्मिन्निति चेद्धनिणिङादेशास्तल्लोपे न सिध्यन्ति । अवधि भवता दस्युः । अगायि भवता ग्रामः । अध्यगायि भवतानुवाकः । तलोपे कृते लुङीति हनिणिङादेशा न प्राप्नुवन्ति ॥ नैष दोषः। न लुङीति हनिणिङादेशा उच्यन्ते । किं तर्हि । आर्धधातुक इति तद्विशेषणं लुङ्ग्रहणम् ॥ इह च सर्वस्तोमः सर्वपृष्ठः सर्वस्य सुपीत्याद्युदात्तत्वं न प्राप्नोति । तच्चापि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । न लुमताङ्गस्येत्येव सिद्धम् । कथम् । न लुमता लुप्तेऽङ्गाधिकारः प्रतिनिर्दिश्यते । किं तर्हि । योऽसौ लुमता लुप्यते तस्मिन्यदङ्गं तस्य यत्कार्यं तन्न भवति । एवमपि सर्वस्वरो न सिध्यति । कर्तव्योऽत्र यत्नः॥

---

वृद्ध्यः०' यानें सांगितलेला इट्आगमाचा निषेध हे कांहीं परस्मैपदप्रत्यय पुढें असतांना सांगितले नाहींत, तर ते सकारादि प्रत्यय पुढें असतांना सांगितले आहेत आणि परस्मैपदेषु हे त्या सकारादि प्रत्ययाचें विशेषण आहे. तसेच क्रमूधातूला सांगितलेला दीर्घ देखील परस्मैपदप्रत्यय पुढें असतांना सांगितला नाहीं, तर तो शित्प्रत्यय पुढें असतांना सांगितला आहे. आणि परस्मैपदेषु हें त्या शित्प्रत्ययाचें विशेषण आहे.

(वा.१३) 'न लुमता तस्मिन्' असें सूत्र केलें तर हन्, इण् आणि इङ् या धातूंना सांगितलेले जे आदेश ते 'त' या प्रत्ययाचा लोप झाला असतां सिद्ध होणार नाहींत; उदा० अवधि भवता दस्युः, अगायि भवता ग्रामः, अध्यगायि भवतानुवाकः. अवधि, अगायि, अध्यगायि, या क्रियापदांमध्यें तप्रत्ययाचा लोप (६।४।१०४) झाल्यानंतर तेथें लुङि च (२।४।४३), इणो गा लुङि (२।४।४५), विभाषा लुङ्लृङोः (२।४।५०), या सूत्रांनीं लुङ्प्रत्यय पुढें असतांना हन्, इण् व इङ् या धातूंना सांगितलेले जे वध, गा आणि गाङ् आदेश ते लुङ्प्रत्ययाला प्रत्ययलक्षण न झाल्यामुळें होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण हे हन्, इण् व इङ् यांचे आदेश लुङ्प्रत्यय पुढें असतांना सांगितलेच नाहींत, तर आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना सांगितले आहेत; आणि 'लुङि' हें त्या आर्धधातुके याचें विशेषण आहे.

तरी पण, 'न लुमता तस्मिन्' असें सूत्र केलें तर सर्वस्तोमः, सर्वपृष्ठः, येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध झाल्यामुळें 'सुप् पुढें आहे' असें समजतां येत नाहीं.× ह्मणून 'सर्वस्य सुपि' (६।१।१९१) यानें आदि उदात्त होणार नाहीं हा दोष येतोच. शिवाय 'न लुमता' असें म्हटलें पाहिजे. म्हणून सूत्र फिरवावें लागेल.

तसें म्हणावयास नको. 'न लुमताङ्गस्य' असेंच असूं दे. त्यानेंच सर्व सिद्ध होईल.

तें कसें ?

तें असें की प्रकृतसूत्रामध्यें 'अङ्गस्य' हें पद अङ्गस्य या अधिकाराचें दर्शक आहे असें समजूं नये.

तर मग या सूत्राचा अर्थ कसा ?

'लुक् वगैरेंनीं ज्या प्रत्ययाचें अदर्शन झालें असेल तो प्रत्यय पुढें असतांना जें अंग त्या अंगाला कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं' असा या सूत्राचा अर्थ आहे.

तरी पण सर्वस्तोमः येथें 'सर्वस्य सुपि' यानें आदि उदात्त होणार नाहीं हा दोष आहेच.

त्याकरितां यत्न केलाच पाहिजे. (म्ह.

## [ अचोऽन्त्यादि टि ॥ १.१.६४ ]

## अलोऽन्त्यात्पूर्व उपधा ॥१.१.६५

किमिदमल्ग्रहणमन्त्यविशेषणम् । एवं भवितुमर्हति ।

**उपधासंज्ञायामल्ग्रहणमन्त्यनिर्देशश्चेत्संघातप्रतिषेधः ॥ १ ॥**

उपधासंज्ञायामल्ग्रहणमन्त्यनिर्देशश्चेत्संघातस्य प्रतिषेधो वक्तव्यः। संघातस्योपधासंज्ञा प्राप्नोति । तत्र को दोषः । शास इदङ्हलोः [ ६.४.३४] शिष्टा शिष्टः । संघातस्येत्त्वं प्राप्नोति ॥ यदि पुनरलन्त्यादित्युच्येत । एवमप्यन्त्योऽविशेषितो भवति । तत्र को दोषः । संघातादपि पूर्वस्योपधासंज्ञा प्रसज्येत । तत्र को दोषः । शास इदङ्हलोः शिष्टः शिष्टवान् । शकारस्येत्त्वं प्रसज्येत । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमुपधासंज्ञायामल्ग्रहणमन्त्यनिर्देशश्चेत्संघातप्रतिषेध

---

वार्तिक केलें पाहिजे.)

(सू.६५) ह्या सूत्रामध्यें अलः हें अंत्याचें विशेषण समजावयाचें काय ?

होय. तें अंत्याचें विशेषण होण्याला योग्य आहे.

(वा.१) ह्या उपधासंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें अलः हें अंत्याचें विशेषण असेल तर त्या अंत्य अलाच्या पूर्वीच्या वर्णसमुदायाला उपधासंज्ञा होत नाही असें म्हटलें पाहिजे. (नाहीं तर अंत्य अलाच्या पूर्वीच्या एकाच अलाला उपधासंज्ञा होते असा नियम राहणार नाहीं). आणि अलांच्या समुदायाला देखील उपधासंज्ञा होऊं लागेल.

तशी समुदायाला उपधासंज्ञा झाली तर दोष कोणता ?

दोष असा की 'शास इदङ्हलोः' (६।४।३४) या सूत्रानें शास् धातूच्या उपधेला सांगितलेला इकार आदेश शिष्टात्, शिष्टाम्, या उदाहरणांमध्यें आकारालाच होईल असा नियम राहणार नाहीं. शा या समुदायालाही होऊं लागेल.

बरें, आतां जर अल् असें प्रथमेचें एकवचन उच्चारून 'अलन्त्यात्०' असें सूत्र केलें तर अंत्याच्या पूर्वीच्या अलालाच उपधासंज्ञा होईल पण अंत्याचें अलः हें विशेषण नाहींसें होईल.

मग तसें झालें तर दोष कोणता ?

दोष असा की अलच अंत्य घ्यावा असा नियम राहणार नाहीं आणि अलांचा समुदायही अंत्य समजून त्या समुदायाच्या पूर्वीच्या अलाला उपधासंज्ञा होईल.

तशी समुदायाच्या पूर्वीच्या अलाला उपधासंज्ञा झाली तर दोष कोणता ?

दोष असा की 'शास इदङ्हलोः' या सूत्रानें शास्धातूच्या उपधेला सांगितलेला इकार आदेश शिष्टः, शिष्टवान्, येथें 'आस्' या समुदायाच्या पूर्वीच्या शकाराला होऊं लागेल. शिवाय 'सूत्र फिरवावें लागतें' हा दोष आहेच.

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण 'ह्या उपधासंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें अलः हें अंत्याचें विशेषण असेल तर अंत्य अलाच्या पूर्वीच्या वर्णसमुदायाला उपधासंज्ञा होत नाहीं असें म्हणावें लागेल' असें आतांच सांगितलें आहे ना ?

तो दोष येत नाहीं. कारण हें सिद्ध होत

---

१. कोणत्याही शब्दस्वरूपाच्या अचांमध्यें जो अंत्य अच् तो ज्या समुदायाचा आदि असेल त्याला 'टि' अशा संज्ञा होते. त्या अंत्य अचाच्या पुढें एकही वर्ण नसेल तर त्या एकट्या अंत्य अचालाच 'टि' अशी संज्ञा होते. ही टि त्याच शब्दस्वरूपाची आहे असें समजावें.

१. कोणत्याही शब्दस्वरूपाच्या शेवटच्या वर्णाच्या पूर्वीचा जो वर्ण त्याला उपधा अशी संज्ञा होते. ही उपधा त्याच शब्दस्वरूपाची आहे असें समजावें.

इति । नैष दोषः । अन्त्यविज्ञानात्सिद्धम् । सिद्धमेतत् । कथम् । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य भविष्यति ।

**अन्त्यविज्ञानात्सिद्धमिति चेन्नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरनभ्यासविकारे ॥२॥**

अन्त्यविज्ञानात्सिद्धमिति चेत्तन्न । किं कारणम् । नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरनभ्यासविकारे । अनर्थकेऽलोऽन्त्यविधिर्नेत्येषा परिभाषा कर्तव्या । किमविशेषेण । नेत्याह । अनभ्यासविकारे । अभ्यासविकारान्वर्जयित्वा । भृञामित् [ ७.४.७६ ] अर्तिपिपर्त्योश्च [ ७७ ] इति ॥ कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनमव्यक्तानुकरणस्यात इतौ ॥ ३ ॥**

अन्त्यस्य प्राप्नोति । अनर्थके ऽलोन्त्यविधिर्न भवतीति न दोषो भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नान्त्यस्य पररूपं भवतीति यदयं नाम्रेडितस्यान्त्यस्य तु वा [ ६.१.९९ ] इत्याह ॥

**ध्वसोरेद्धावभ्यासलोपश्च ॥ ४ ॥**

ध्वसोरेद्धावभ्यासलोपश्च [६.४.११९]

---

आहे. तें कसें म्हणाल तर सांगतों. 'शा या' समुदायाला जरी उपधासंज्ञा झाली तरी 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) म्ह. अंत्य अलाला कार्यें करावींत' अशी परिभाषा असल्यामुळें 'शा' यांतील आकारालाच इकार आदेश होईल.

(वा.२) 'अंत्य अलाला कार्यें करावींत' या परिभाषेनें सिद्ध होईल असें म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं.

कां बरें ?

'अंत्य 'अलाला कार्यें करावींत ही गोष्ट अनर्थकाला लागू करूं नये' अशी परिभाषा केली पाहिजे म्हणून.

काय पण, सरसकट सर्व अनर्थकांविषयीं 'अंत्य अलाला कार्यें करावींत' ही गोष्ट लागू करावयाची नाहीं कीं काय ?

तसें आम्ही म्हणत नाहीं. तर 'अनभ्यासविकारे' म्ह. अभ्यासाला जे विकार सांगितले आहेत ते वगळून; उदा० भृञामित् (७।४।७६), अर्तिपिपर्त्योश्च (७।४।७७) या सूत्रांनीं अभ्यासाला सांगितलेला इकार आदेश बिभर्ति, पिपर्ति, येथें भृ,पृ,या सबंध अभ्यासाला न होतां, त्यांतील अंत्य अलाला म्ह. ऋकारालाच होतो.

'नानर्थके०' ही परिभाषा केली पाहिजे म्हणून म्हणतां, तिचे उपयोग तरी कोणते ?

(वा.३) 'अव्यक्तानुकरणस्यात इतौ' (६।१।९८) या सूत्रानें 'अत्' या भागाला सांगितलेलें पररूप 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें अंत्याला म्ह. तकाराला प्राप्त होतें. परंतु 'नानर्थके०' म्ह. 'अनर्थकाविषयीं अलोन्त्यस्य ही परिभाषा येत नाहीं' असें म्हटल्यामुळें दोष येत नाहीं.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि 'नाम्रेडितस्यान्त्यस्य तु वा' (६।१।९९) या सूत्रानें 'आम्रेडितस्थलीं अत् या भागाला पररूप न करतां फक्त त्यांतील शेवटच्या तकाराला विकल्पानें करावें' असें सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की पूर्वसूत्रानें अंत्याला पररूप होत नाहीं. (जर पूर्वसूत्रानें अंत्यालाच पररूप होत असेल तर आम्रेडितस्थलीं फक्त विकल्प सांगण्या पुरतें 'आम्रेडितस्य वा' एवढेंच सूत्र केलें असतें.)

(वा.४) 'ध्वसोरेद्धावभ्यासलोपश्च' (६।४।११९) या सूत्रानें सांगितलेला अभ्यासाचा लोप देहि येथें दा याचा होतो, तो 'अलोन्त्यस्य

---

२. पटत् इति येथें अत् आणि इ यांना पररूप म्ह. इकार एकादेश होऊन पटिति असें होतें. तकाराला पररूप झालें तर मागील अकाराबरोबर गुण होऊन पटेति असें भलतेंच रूप होईल. याकरतां 'नानर्थके०' ही परिभाषा पाहिजे.

इत्यन्त्यस्य प्राप्नोति । अनर्थकेऽलोऽन्त्यविधिर्नेति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । पुनर्लोपवचनसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति ॥ अथवा शिल्लोपः करिष्यते स शित्सर्वस्येति सर्वादेशो भविष्यति । स तर्हि शकारः कर्तव्यः । न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । द्विशकारको निर्देशः । घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्चेति ॥

## आपि लोपोऽकोऽनचि ॥ ५ ॥

तिष्ठति सूत्रम् । अन्यथा व्याख्यायते । आपि हलि लोप इत्यन्त्यस्य प्राप्नोति । अनर्थकेऽलोऽन्त्यविधिर्नेति न दोषो भवति॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अन एव लोपं वक्ष्यामि । तदनो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । अनाप्यकः [ ७.२.११२ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । हलीत्येषा सप्तम्यन्निति प्रथमायाः षष्ठीं

---

या परिभाषेनें त्यांतील अंत्याचा म्ह. फक्त आकाराचा प्राप्त होतो. परंतु 'अनर्थकाविषयीं अलोन्त्यस्य ही परिभाषा येत नाहीं, असें म्हटल्यामुळें दोष येत नाहीं[3].

हा देखील उपयोग बरोबर नाहीं. कारण 'लोपो यि' (६।४।११८) या मागील सूत्रांतून लोपशब्दाची अनुवृत्ति येत असतांना पुन: जो या सूत्रामध्यें लोपशब्द उच्चारला आहे तो सर्व अभ्यासाचा लोप होण्याकरतांच उच्चारला आहे. तेव्हां तो लोप अंत्याचा होणार नाहीं. अथवा या लोपादेशाला इत्संज्ञक शकार जोडला म्हणजे तो 'शित्सर्वस्य' (१।१।५५) या परिभाषेनें सर्व अभ्यासाचा होईल.

तर मग सूत्रामध्यें लोपादेशाच्या पुढें शकार उच्चारला पाहिजे.

मुद्दाम निराळा उच्चारावयास नको. पाणिनीनें तसेंच सूत्र केलें आहे, म्ह. 'घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च' असे दोन शकार उच्चारले आहेत असें समजावें.

(वा.५) 'हलि लोपः' (७।२।११३) हें सूत्र आहे तसेंच आहे. येथें फक्त त्याचा एकप्रकारचा अर्थ वार्तिककारांनीं दाखविला आहे. तृतीयेपासून पुढील हलादि प्रत्यय पुढें असतांना जो इदम् शब्दांतील इद् या भागाचा आभ्याम् इत्यादि उदाहरणांमध्यें लोप होत असतो तो 'अलोन्त्यस्य' या परिभाषेनें त्यांतील अंत्याचा म्ह. फक्त दकाराचा प्राप्त होतो. परंतु 'अनर्थकाविषयीं अलोन्त्यस्य ही परिभाषा येत नाहीं' असें म्हटल्यामुळें दोष येत नाहीं.

हा देखील उपयोग बरोबर नाहीं. कारण त्या इद् याला अन् आदेश (७।२।११२) केल्यानंतर त्या अन् याचाच 'हलि लोपः' यानें लोप करतां येईल.

तर मग त्या 'हलि लोपः' या सूत्रामध्यें 'अनः' असें म्हटलें पाहिजे.

तसें निराळें म्हणावयास नको. कारण मागून अनुवृत्ति येत आहे.

मागून म्ह. कोणत्या सूत्रांतून ?

'अनाप्यकः' (७।२।११२) येथून.

पण तेथें अन् असें पद प्रथमाविभक्ति लावून उच्चारलें आहे. आणि येथें तर षष्ठीविभक्ति लावून उच्चारलेल्या 'अनः' अशा पदाची जरूर आहे.

'हलि लोपः' या सूत्रामध्यें 'हलि' असें सप्तम्यंत पद उच्चारलें आहे. तेव्हां 'तस्मिन्निति

---

३. कारण नुसत्या अभ्यासाला कांहींच अर्थ नाही.

४. 'नानर्थके०' या परिभाषेचे उपयोग दाखवितांना वार्तिककारांनीं 'अव्यक्तानुकरणस्यात इतौ,' 'घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च' या सूत्रांचा जसा उल्लेख केला तसा येथें 'हलि लोपः' या सूत्राचा उल्लेख न करतां त्याच्या ऐवजीं 'आपि लोपोऽकोऽनचि' असा उल्लेख केला आहे. त्यावरून 'हलि लोपः' याचें प्रत्याख्यान करून त्याच्या ऐवजीं 'आपि लोपोऽकोऽनचि' असें करावें' असा वार्तिककारांचा अभिप्राय कोणी समजतील म्हणून भाष्यकारांनीं हा खुलासा केला आहे.

प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १.१.६६ ] इति ॥

## अत्र लोपोऽभ्यासस्य ॥६॥

अत्र लोपो ऽभ्यासस्य [ ७.४.५८ ] इत्यन्त्यस्य प्राप्नोति । नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरिति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अत्रग्रहणसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति ॥ अस्त्यन्यदत्रग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । सन्नधिकारोऽपेक्ष्यते । इह मा भूत् । दधौ ददौ । अन्तरेणाप्यत्रग्रहणं सन्नधिकारमपेक्षिष्यामहे ॥ संस्तर्हि सकारादिरपेक्ष्यते सनि सकारादाविति । इह मा भूत् । जिज्ञापयिषति । अन्तरेणाप्यत्रग्रहणं सनं सकारादिमपेक्षिष्यामहे ॥ प्रकृतयस्तर्ह्यपेक्ष्यन्ते । एतासां प्रकृतीनां लोपो यथा स्यात् । इह मा भूत् । पिपक्षति यियक्षति । अन्तरेणाप्यत्रग्रहणमेताः प्रकृतीरपेक्षिष्यामहे ॥ विषयस्तर्ह्यपेक्ष्यते । मुचोऽकर्मकस्य गुणो वा [७.४.५७] इति । इह मा भूत् । मुमुक्षति गामिति । अन्तरेणाप्यत्रग्रहणमेतं विषयमपेक्षिष्यामहे ।

---

निर्दिष्टे पूर्वस्य' (१।१।६६) या परिभाषेमुळें 'हलि' या सप्तमीप्रत्ययाच्या जोरावर 'अन्' या प्रथमाप्रत्ययाच्या ऐवजीं 'अनः' अशी षष्ठीप्रत्ययाची कल्पना करतां येईल.

(वा.६) 'अत्र लोपोऽभ्यासस्य' (७।४।५८) या सूत्रानें दित्सति इत्यादि उदाहरणांमध्यें जो दा वगैरे अभ्यासांचा लोप होत असतो तो 'अलोन्त्यस्य' या परिभाषेनें त्यांतील अंत्यांचा म्ह. फक्त आकार वगैरेंचा प्राप्त होतो. परंतु 'अनर्थकाविषयीं अलोन्त्यस्य ही परिभाषा येत नाहीं' असें म्हटल्यामुळें दोष येत नाहीं.

हा देखील उपयोग बरोबर नाहीं. कारण 'अत्र' असा जो त्या सूत्रामध्यें मुद्दाम जास्त शब्द घातला आहे त्याच्या जोरावर तेथें सर्व अभ्यासांचा लोप होईल.

पण तेथें 'अत्र' या शब्दाचा उपयोग निराळाच आहे.

तो कोणता ?

'अत्र' या शब्दानें 'सनि मीमा०' (७।४।५४) यांतील सन्प्रत्ययाचा परामर्श होत आहे. ददौ, दधौ, इत्यादि ठिकाणीं अभ्यासाचा लोप न झाला पाहिजे म्हणून त्याची जरूर आहे.

पण त्याकरतां अत्र हा शब्द घालवयास नको. त्यावांचूनच सनि या पदाची अनुवृत्ति येथें करतां येईल.

तर मग तो सन् प्रत्यय सकारादि पाहिजे म्ह. सकारादि सन्प्रत्यय पुढें असतांनाच अभ्यासाचा लोप होतो त्यामुळें जिज्ञापयिषति येथें अभ्यासाचा लोप होत नाहीं. तेव्हां 'सः स्यार्ध०'(७।४।४९) यांतील 'सि' या पदाचा परामर्श होण्याकरतां 'अत्र' असा शब्द येथें घातला पाहिजे.

पण त्याकरितां अत्र हा शब्द येथें घातला नाहीं तरी तेथून 'सि' या पदाची अनुवृत्ति येथें करतां येईल.

तर मग 'सनि मीमा०' वगैरे सूत्रांमध्यें जे धातु उच्चारले आहेत त्यांचा परामर्श येथें 'अत्र' या शब्दानें केला जातो. मी, मा वगैरे धातूंच्याच अभ्यासाचा लोप झाला पाहिजे. पिपक्षति, यियक्षति, इत्यादि ठिकाणीं अभ्यासाचा लोप न झाला पाहिजे.

पण अत्र या शब्दावांचूनही मी, मा वगैरे धातूंची अनुवृत्ति येथें करतां येईल.

तर मग 'सनि मीमा०' वगैरे सूत्रांनीं जीं कार्यें सांगितलीं आहेत त्यांचा परामर्श होण्याकरतां अत्र हा शब्द येथें घातला पाहिजे. कारण 'मुचोऽकर्मकस्य गुणो वा' (७।४।५७) यानें सांगितलेला गुण 'मुमुक्षति गाम्' येथें होत नसतो. तेथें हा अभ्यासाचा लोप न झाला पाहिजे.

पण अत्र हा शब्द घातला नाहीं तरी त्या

कथम् । अकर्मकस्येत्युच्यते तेन यत्रैवायं मुचिरकर्मकस्तत्रैव भविष्यति ॥ तस्मान्नार्थोऽनया परिभाषया नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरिति ॥

**अलोऽन्त्यात्पूर्वोऽलुपधेति वा ॥७॥**

अथवा व्यक्तमेव पठितव्यमलोऽन्त्यात्पूर्वोऽलुपधासंज्ञो भवतीति ॥ तर्त्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**अवचनाल्लोकविज्ञानात्सिद्धम् ॥८॥**

अन्तरेणापि वचनं लोकाविज्ञानात्सिद्धमेतत् । तद्यथा । लोकेऽमीषां ब्राह्मणानामन्त्यात्पूर्व आनीयतामित्युक्ते यथाजातीयकोऽन्त्यस्तथाजातीयकोऽन्त्यात्पूर्व आनीयते ॥

## तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ॥ १.१.६६ ॥

## तस्मादित्युत्तरस्य ॥ १.१.६७ ॥

किमुदाहरणम् । इह तावत्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्येति । इको यणचि [ ६.१.७७ ] दध्यत्र मध्वत्र । इह तस्मादित्युत्तरस्येति । द्वयन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् [ ६.३.९७ ] द्वीपम् अन्तरीपम् समी-

---

कार्यांचा परामर्श होईल.

तो कसा ?

तो असा की 'मुचोऽकर्मकस्य०' या सूत्रामध्यें 'अकर्मकस्य' असें मुच्धातूला विशेषण लाविलें आहे. तेव्हां तशाच मुच्धातूची येथें अनुवृत्ति केली म्हणजे ज्या प्रयोगामध्यें मुच् धातु अकर्मक असेल तेथेंच यानें अभ्यासाचा लोप होईल.

एकंदरीत 'नानर्थकेऽलोन्त्यविधिः' म्ह. अनर्थकाविषयीं 'अलोन्त्यस्य' हें सूत्र घेऊं नये, ह्या परिभाषेचा कांहीं उपयोग नाहीं असें दिसतें.

(वा.७) अथवा अंत्य अलाच्या पूर्वीचा जो अल् त्याला उपधासंज्ञा होते असें स्पष्टच म्हणावें. (म्हणजे शा या समुदायाला उपधासंज्ञाच होणार नाहीं. फक्त आकारालाच होईल.)

तर मग स्पष्ट कळण्याकरतां अल् असा जास्त शब्द घालून तसें सूत्र केलें पाहिजे की काय ?

तसें करावयास नको.

(वा.८) 'अल्' असा प्रथमान्त शब्द घातल्यावांचूनही हें सिद्ध होत आहे. जसें लोकांमध्यें 'ह्या ब्राह्मणांपैकीं शेवटच्यापेक्षां पूर्वीच्याला आणा' असें म्हटलें असतां तेथें 'शेवटचा' या शब्दानें जो जसा घेतला जाईल तसाच त्याच्या पूर्वीचा आणला जातो (त्याप्रमाणें येथें अंत्य अलापेक्षां पूर्वीच्याला उपधासंज्ञा होते एवढें म्हटलें तरी तो अंत्य अलाच्या पूर्वीचा अल्च घेतला जाईल.

(सू.६६-६७) ह्या परिभाषांची उदाहरणें कोणतीं ?

'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या परिभाषेचें उदाहरण 'इको यणचि' हें घ्या. दध्यत्र, मध्वत्र येथें इको यणचि (६।१।७७)यानें सांगितलेला यण् आदेश तस्मिन्निति या परिभाषेनें अचाच्या मागील आणि अव्यवहित अशाच इकाला होतो. तसेंच 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेचें उदाहरण द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत्'

---

५. तेव्हां 'नानर्थके०' ही परिभाषा नसल्यामुळें 'शा' या समुदायाला उपधासंज्ञा झाली तरी 'अलोन्त्यस्य' यानें अंत्याला म्ह. आकारालाच इकार आदेश होऊन इष्टसिद्धि होईल. म्हणून अलालाच उपधासंज्ञा होते असें म्हटलें नाहीं तरी चालेल

१. अचि (६।१।७७) इत्यादिक सप्तम्यंत पदें उच्चारून इक् वगैरेंना सांगितलेले जे यण् वगैरे आदेश ते इक् वगैरे स्थानीं त्या अच् वगैरेंच्या पूर्वी असतील तरच आणि अव्यवहित म्ह. अच् वगैरेंच्या अगदीं जवळ असतील तरच करावेत.

२. अतः (६।१।११३) इत्यादिक पंचम्यंत पदें उच्चारून रु वगैरेंना सांगितलेले जे उकार वगैरे आदेश ते रु वगैरे स्थानीं त्या ऱ्हस्व अकार वगैरेंच्या पुढें असतील तरच आणि अव्यवहित म्ह. त्या ऱ्हस्व अकार वगैरेंच्या अगदीं जवळ असतील तरच करावेत.

पम् ॥ अन्यथाजातीयकेन शब्देन निर्देशः क्रियतेऽन्यथाजातीयक उदाह्रियते । किं तर्ह्युदाहरणम् । इह तावत्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्येति तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ [ ४.३.२ ] इति । तस्मादित्युत्तरस्येति तस्माच्छसो नः पुंसि [ ६.१.१०३ ] इति ॥ इदं चाप्युदाहरणमिको यणचि द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईदिति । कथम् । सर्वनाम्नायं निर्देशः क्रियते सर्वनाम च सामान्यवाचि । तत्र सामान्ये निर्दिष्टे विशेषा अप्युदाहरणानि भवन्ति ॥ किं पुनः सामान्यं को वा विशेषः । गौः सामान्यं कृष्णो विशेषः । न तर्हीदानीं कृष्णः सामान्यं भवति गौर्विशेषो भवति। भवति च। यदि तर्हि सामान्यमपि विशेषो विशेषोऽपि सामान्यं सामान्यविशेषौ न प्रकल्पेते । प्रकल्पेते च । कथम् । विवक्षातः । यदास्य गौः सामान्येन विवक्षितो भवति कृष्णो विशेषत्वेन तदा गौः सामान्यं कृष्णो विशेषः । यदा कृष्णः सामान्येन विवक्षितो भवति गौर्विशेषत्वेन विवक्षितस्तदा कृष्णः सामान्यं

---

(६।३।९७) हें घ्या. द्वीपम्, अन्तरीपम्, समीपम्, येथें 'द्व्यन्तरुप०' यानें सांगितलेला ईकार आदेश 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेनें द्वि वगैरेंच्या पुढील आणि अव्यवहित अशाच अप्शब्दाच्या अकाराला होतो.

पण काय हो, ह्या परिभाषांमध्यें तर तस्मिन्, तस्मात्, असें निराळ्या तऱ्हेचेंच उच्चारण केलेलें दिसतें आणि उदाहरण म्हणून जीं सूत्रें दाखविलीं तीं निराळ्या तऱ्हेचींच दिसतात. (म्ह. त्या सूत्रांमध्यें तस्मिन्, तस्मात्, असें कांहींच दिसत नाहीं.)

तर मग ह्या परिभाषांचीं उदाहरणें कोणतीं बरें द्यावींत ?

'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या परिभाषेचें उदाहरण 'तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ' (४।३।२) हें घ्यावें आणि 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेचें उदाहरण 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१।१०३) हें घ्यावें.

हीं उदाहरणें असू द्या, पण आम्ही इको यणचि, द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत्, हीं जीं उदाहरणें दाखविलीं तीं देखील ह्या परिभाषांचीं आहेतच.

तीं कशीं ?

ह्या सूत्रांमध्यें तस्मिन्, तस्मात्, हा सर्वनामशब्दानें निर्देश केला आहे. सर्वनामशब्द तर सामान्य अर्थाला दाखविणारा असतो. तेव्हां त्या सर्वनामशब्दापासून सामान्यरूपानें सप्तम्यंत शब्दाचा बोध झाला असतां अचि, हलि, तस्मिन् वगैरे सगळेच सप्तम्यंत विशेष शब्द या परिभाषेचीं उदाहरणें होतात.

पण अगोदर सामान्य कोणते आणि विशेष कोणता तें सांगा बरें ?

बैल हा सामान्य आहे आणि काळा हा त्यांतील विशेष आहे.

तर मग आतां काळा हा सामान्य आणि बैल हा विशेष असें नाहींच का होणार ?

तसेंही होईल[१].

तर मग आतां सामान्यही विशेष होतो, विशेषही सामान्य होतें, अशीच जर स्थिति आहे तर अमुक सामान्य आणि अमुक विशेष असें म्हणण्यांत तरी काय अर्थ आहे ?

अर्थ आहे तर.

तो कसा ?

विवक्षेवरून, म्हणजे पाहणाऱ्याची जशी नजर असेल तसें तो बोलत असतो. जेव्हां मनुष्याला दुरून बैल असें आरंभीं सामान्यज्ञान झालें, नंतर त्यांतील काळा हा विशेष समजण्यांत आला, तेव्हां बैल हा सामान्य आणि काळा हा विशेष समजला जातो. आणि जेव्हां काळसर कांहीं तरी पदार्थ आहे असें

---

१. काळ्या रंगाचा कोणताही पशु घेतला म्हणजे 'काळा' ह्याला सामान्य म्हणतां येतें.

गौर्विशेषः ॥ अपर आह । प्रकल्पेते च । कथम् । पितापुत्रवत् । तद्यथा । स एव कंचित्प्रति पिता भवति कंचित्प्रति पुत्रो भवति । एवमिहापि स एव कंचित्प्रति सामान्यं कंचित्प्रति विशेषः ॥ एते खल्वपि नैर्देशिकानां वार्त्ततरका भवन्ति ये सर्वनाम्ना निर्देशाः क्रियन्ते । एतैर्हि बहुतरकं व्याप्यते ॥ अथ किमर्थमुपसर्गेण निर्देशः क्रियते । शब्दे सप्तम्या निर्दिष्टे पूर्वस्य कार्यं यथा स्यादर्थे मा भूत् । जनपदे अतिशायन इति । किं गतमेतदुपसर्गेणाहोस्विच्छब्दाधिक्याद-र्थाधिक्यम् । गतमित्याह । कथम् । निरयं बहिर्भावे वर्तते । तद्यथा । निष्क्रान्तो देशान्निर्देशः । बहिर्देश इति गम्यते । शब्दश्च शब्दाद्बहिर्भूतोऽर्थोऽबहिर्भूतः ॥ अथ निर्दिष्टग्रहणं किमर्थम् ।

## निर्दिष्टग्रहणमानन्तर्यार्थम् ॥१॥

आरंभीं सामान्य ज्ञान झालें, नंतर तो बैल असा विशेष समजण्यांत आला, तेव्हां काळा हा सामान्य होय आणि बैल हा त्यांतील विशेष समजला जातो. (तेव्हां तस्मिन् हा सप्तम्यंत शब्दाचा सामान्यरूपानें निर्देश केला आहे हें म्हणणें योग्यच आहे.)

येथें दुसरा कोणी निराळ्या तऱ्हेनें उत्तर देत आहे—

अमुक सामान्य आणि अमुक विशेष असें म्हणण्यांत अर्थ आहे.

तो कसा ?

पितापुत्राप्रमाणें. जसें लोकामध्यें एकच मनुष्य कोणाचा तरी पिता असतो व तोच कोणाचा तरी पुत्रही असतो, त्याप्रमाणें येथेंही तो एकच पदार्थ कोणाचा तरी सामान्य असतो आणि कोणाचा तरी विशेष असतो (तेव्हां तस्मिन् हा सर्व सप्तम्यंत शब्दांचा सामान्यरूपानें निर्देश केला आहे असें म्हणतां येतें). शिवाय खरोखरच हे जे सर्वनामशब्दांनीं निर्देश केले असतात ते इतर निर्देशापेक्षां फारच उपयुक्त असतात. कारण सर्वनामशब्दांच्या अर्थाची व्याप्ति फार मोठी असते.

आतां या सूत्रामध्यें निर् उपसर्ग लावून दिष्टशब्दाचा जो निर्देश केला आहे तो कशाकरतां ?

अशाकरतां की ज्या ठिकाणीं सप्तम्यंत पदानें शब्द[४] दाखविला असेल त्या ठिकाणींच त्या शब्दापेक्षां पूर्वीच्याला कार्य झालें पाहिजे. जर एखादी वस्तु सप्तम्यंतपदानें दाखविली असेल, उदा० जनपदे (४।२।८१), अतिशायने (५।३।५५), तर तेथें त्या वस्तूच्या पूर्वीच्याला कार्य करावें असें सांगणारी प्रकृत परिभाषा न आली पाहिजे.

पण काय हो, ही इष्टगोष्ट निर् या उपसर्गापासून बरोबर निघते काय ? किंवा निर् हा शब्द जास्त झाला एवढ्यावरून कांहीं तरी अर्थ जास्त घ्यावयाचा ?

निर् या उपसर्गापासून ही इष्ट गोष्ट बरोबर निघते असें आम्ही म्हणतों.

तें कसें ?

तें असें की निर् या उपसर्गाचा अर्थ 'बाहेर जाणें' असा आहे; जसें, देशांतून निघालेल्याला 'निर्देश' असें म्हणतात, म्हणजे तो त्या देशाच्या बाहेर गेला असें समजतें. आणि या शब्दशास्त्रामध्यें यण्, गुण, वगैरे कार्यांचा उद्देश्य शब्दच आहे. सप्तम्यंतपदानें जो दाखविला असेल त्याला त्या शब्दरूप उद्देश्यांतून बाहेर काढणें हें शब्दालाच संभवतें. कारण हा नेहमीं शब्दाच्या बाहेर असत नाहीं, शब्दाला धरूनच असतो.

४. 'अचि' या सप्तम्यंत पदाचे अ,इ,उ, हे शब्द दाखविले आहेत. वर्णाला किंवा वर्णांच्या समुदायाला येथें शब्द असें म्हटलें आहे.

५. अच् असतांना इकाला यण् होतो असें म्हटलें असतां इक् आणि अच् मिळून 'इअ' एवढ्याला यण् करावयाचा कीं काय अशी जी शंका मनांत येते ती निर् यानें दूर होते. अच् या निमित्ताला उद्देश्याच्या बाहेर काढलें म्हणजे फक्त इकालाच यण् होतो.

निर्दिष्टग्रहणं क्रियत आनन्तर्यार्थम्। आनन्तर्यमात्रे कार्यं यथा स्यात्। इको यणचि। दध्यत्र मध्वत्र। इह मा भूत्। समिधौ समिधः। दृषदौ दृषदः॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**तस्मिंस्तस्मादिति पूर्वोत्तरयोर्योगयोरविशेषान्नियमार्थं वचनं दध्युदकं पचत्योदनम् ॥२॥**

तस्मिंस्तस्मादिति पूर्वोत्तरयोर्योगयोरविशेषान्नियमार्थोऽयमारम्भः। ग्रामे देवदत्तः। पूर्वः पर इति संदेहः। ग्रामाद्देवदत्तः। पूर्वः पर इति संदेहः। एवमिहापीको यणचि। दध्युदकं पचत्योदनम्। उभाविकावुभावचौ। अचि पूर्वस्याचि परस्येति संदेहः। तिङ्ङतिङः [८.१.२८]इत्यतिङः पूर्वस्यातिङः परस्येति संदेहः। इष्यते चात्राचि पूर्वस्य स्यादतिङः परस्येति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति नियमार्थं वचनम्। एवमर्थमिदमुच्यते॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति। अथ यत्रोभयं निर्दिश्यते किं तत्र पूर्वस्य कार्यं भवत्याहोस्वित्परस्येति॥

---

तरी पण निर्दिष्टे हें कशाकरतां म्हटलें आहे ?

(वा.१) ह्या सूत्रामध्यें निर्दिष्टे असा जो शब्द घातला आहे तो आनन्तर्य या अर्थाचा आहे म्ह अंतर नसेल तेथेंच कार्य झालें पाहिजे. इको यणचि (६।१।७७) ह्यानें सांगितलेला यण् आदेश, अच् व इक् या दोहोंमध्यें अंतर नसेल तेथेंच, म्ह. दध्यत्र, मध्वत्र अशा ठिकाणींच झाला पाहिजे. समिधौ, समिधः, येथें इकाराला दृषदौ, दृषदः येथें ऋकाराला न झाला पाहिजे.

पण हें सूत्र करण्यांत आचार्यांचा मूळ उद्देश काय बरें असावा ?

(वा.२) सप्तम्यंतपदानें आणि पंचम्यंतपदानें दाखविलेल्या निमित्ताचा जो सप्तमीप्रत्ययानें व पंचमीप्रत्ययानें उद्देश्याशीं संबंध दाखविला जातो त्या संबंधांत उद्देश्य पूर्वी आणि निमित्त पर, तसेंच उद्देश्य पर आणि निमित्त पूर्वी, या दोन्ही ठिकाणीं कांहींच फरक दिसत नाहीं. तेव्हां त्या संबंधामुळें होणारीं कार्यें दोन्ही ठिकाणीं होऊं लागतील; म्हणून नियमाकरतां दोन परिभाषा केल्या आहेत; जसें 'ग्रामे देवदत्तः' असें म्हटलें असतां पूर्व किंवा पर असा संशय येतो, तसेंच 'ग्रामाद्देवदत्तः' असें म्हटलें असतांही पूर्व किंवा पर असा संशय येतो, तसें शास्त्रामध्येंही अचाशीं संबंध पावलेल्या इकाला यण् होतो असें (६।१।७७) म्हटलें आहे.तेव्हां दध्युदकम्,पचत्योदनम्,येथें दोन्ही इक् आहेत आणि दोन्ही अच् आहेत. त्यांतील अचापेक्षां पूर्वीच्या इकाला यण् करावा, किंवा अचापेक्षां पर असलेल्या इकाला यण् करावा, असा संशय येतो. तसेंच तिङंतभिन्नपदाशीं संबंध पावलेल्या तिङंतपदाला अनुदात्त होतो (८।१।२८) असें म्हटलें आहे. तेथें तिङंत भिन्नपदापेक्षां पूर्वीच्या तिङंतपदाला अनुदात्त करावा, किंवा तिङंतभिन्नपदापेक्षां पर असलेल्या तिङंतपदाला अनुदात्त करावा, असा संशय येतो. आणि इष्ट तर असें आहे की 'अचि' असा सप्तम्यंतपदानें निमित्ताचा निर्देश केला असल्यास त्या अचापेक्षां पूर्वीच्याच इकाला यण् झाला पाहिजे. तसेंच 'अतिङः' असा पंचम्यंतपदानें निमित्ताचा निर्देश केला असल्यास त्या अतिङंतपदाला पर असलेल्याच तिङंतपदाला अनुदात्त झाला पाहिजे. आणि ही इष्ट गोष्ट तर त्याकरतां कांहीं तरी विशेष वचन केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं; म्हणून तसा नियम होण्याकरतां वचन केलें पाहिजे; अशा उद्देशानें ह्या दोन परिभाषा केल्या आहेत.

हा उपयोग आहे खरा, पण—

पण काय ? तुमचें म्हणणें तरी पुढें काय आहे ?

## उभयनिर्देशे विप्रतिषेधात्पञ्चमीनिर्देशः ॥३॥

उभयनिर्देशे विप्रतिषेधात्पञ्चमीनिर्देशो भविष्यति ॥ किं प्रयोजनम् ।

## प्रयोजनमतो लसार्वधातुकानुदात्तत्वे ॥४॥

वक्ष्यति तास्यादिभ्योऽनुदात्तत्वे सप्तमीनिर्देशोऽभ्यस्तसिजर्थ इति । तस्मिन्क्रियमाणे तास्यादिभ्यः परस्य लसार्वधातुकस्य लसार्वधातुके परतस्तास्यादीनामिति संदेहः । तास्यादिभ्यः परस्य लसार्वधातुकस्य ॥

## बहोरिष्ठादीनामादिलोपे ॥५॥

बहोरुत्तरेषामिष्ठेमेयसामिष्ठेमेयस्सु परतो बहोरितिसंदेहः । बहोरुत्तरेषामिष्ठेमेयसाम् ॥

## गोतो णित् ॥६॥

गोतः परस्य सर्वनामस्थानस्य सर्वनामस्थाने परतो गोत इति संदेहः । गोतः परस्य सर्वनामस्थानस्य ।

## रुदादिभ्यः सार्वधातुके ॥७॥

रुदादिभ्यः परस्य सार्वधातुकस्य

---

म्हणणें इतकेंच की ज्या एकाच सूत्रामध्यें पंचम्यंत आणि सप्तम्यंत अशीं दोन्ही प्रकारचीं पदें दृष्टीस पडतात तेथें सप्तम्यंत निमित्त समजून पंचम्यंतपदानें दाखविलेल्या वर्णाला किंवा वर्णसमुदायाला कार्य करावें, अथवा पंचम्यंत निमित्त समजून सप्तम्यंतपदानें दाखविलेल्या वर्णाला किंवा वर्णसमुदायाला कार्य करावें.

(वा.३) पंचमी आणि सप्तमी अशा दोन्ही प्रकारच्या प्रत्ययांनीं निमित्तांचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें विप्रतिषेधास्तव (१।४।२) पंचमीनिर्देश प्रबल समजावा.

याचा उपयोग कोणता ?

(वा. ४) 'तास्यनुदात्तेत्०' (६।१।१८६) या सूत्रावर वार्तिककार 'तास्यादिभ्योऽनुदात्तत्वे सप्तमीनिर्देशोऽभ्यस्तसिजर्थः' (वा.१) असें सांगणार आहेत. त्याप्रमाणें त्या सूत्रामध्यें 'लसार्वधातुकम्' असें जें प्रथमांतपद आहे त्याच्या ऐवजीं 'लसार्वधातुके' असें सप्तम्यंतपद उच्चारलें असतां 'तासि वगैरेंहून पर जें लसार्वधातुक त्याला अनुदात्त होतो' असा अर्थ करावा, किंवा 'लसार्वधातुक पुढें असतांना तासि वगैरेंना अनुदात्त होतो' असा अर्थ करावा, असा संशय उत्पन्न होतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'तासि वगैरेंहून पर जें लसार्वधातुक त्याला अनुदात्त होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.५) 'बहोर्लोपो०' (६।४।१५८) ह्या सूत्रामध्यें बहोः हें सप्तम्यंत पद आहे. 'इष्ठेमेयस्सु' हें सप्तम्यंतपद मागून (६।४।१५४) अनुवृत्त होत आहे. तेव्हां 'बहुशब्दाहून पर जे इष्ठन्, इमनिच् आणि ईयसुन् प्रत्यय त्यांचा लोप होतो' असा अर्थ करावा, किंवा 'इष्ठन्, इमनिच् आणि ईयसुन् प्रत्यय पुढें असतांना बहुशब्दाचा लोप होतो' असा अर्थ करावा, असा संशय उत्पन्न होतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'बहुशब्दाहून पर जें इष्ठन्, इमनिच् आणि ईयसुन् प्रत्यय त्यांचा लोप होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.६) 'गोतो णित्' (७।१।९०) ह्या सूत्रामध्यें 'गोतः' हें पंचम्यंतपद आहे. 'सर्वनामस्थाने' हें सप्तम्यंतपद मागून (७।१।८६) अनुवृत्त होत आहे. तेव्हां 'गोशब्दाहून पर जो सर्वनामस्थानप्रत्यय त्याला णिद्वद्भाव होतो' असा अर्थ करावा, किंवा 'सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना गोशब्दाला णिद्वद्भाव होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'गोशब्दाहून पर जो सर्वनामस्थानप्रत्यय त्याला णिद्वद्भाव होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.७) 'रुदादिभ्यः' (७।२।७६) येथें 'रुद् वगैरे धातूंहून पर जो सार्वधातुक प्रत्यय त्याला

सार्वधातुके परतो रुदादीनामिति संदेहः। रुदादिभ्यः परस्य सार्वधातुकस्य ॥

**आने मुगीदासः ॥८॥**

आस उत्तरस्यानस्याने परत आस इति संदेहः। आस उत्तरस्यानस्य ॥

**आमि सर्वनाम्नः सुट् ॥९॥**

सर्वनाम्न उत्तरस्याम आमि परतः सर्वनाम्न इति संदेहः। सर्वनाम्न उत्तरस्यामः ॥

**घेर्ङित्याण्नद्याः ॥१०॥**

नद्या उत्तरेषां ङितां ङित्सु परतो नद्या इति संदेहः। नद्या उत्तरेषां ङिताम् ॥

**याडापः ॥११॥**

आप उत्तरस्य ङितो ङिति परत आप इति संदेहः। आप उत्तरस्य ङितः॥

**ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम् ॥१२॥**

ङम उत्तरस्याचोऽचि परतो ङम इति संदेहः। ङम उत्तरस्याचः ॥

**विभक्तिविशेषनिर्देशावनवकाश-**

---

इट् आगम होतो' असा अर्थ करावा, किंवा 'सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना रुद् वगैरे धातूंना इट् आगम होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'रुद् वगैरे धातूंहून पर जो सार्वधातुक प्रत्यय त्याला इट् आगम होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.८) 'ईदासः' (७।२।८३) येथें 'आसः' हें पंचम्यंतपद आहे. 'आने मुक्' (७।३।८२) येथून 'आने' असें सप्तम्यंतपद अनुवृत्त होत आहे. तेव्हां 'आस् धातूहून पर जो अणप्रत्यय त्याला ईकार आदेश होतो' असा अर्थ करावा, किंवा 'आनप्रत्यय पुढें असतांना आस् धातूला ईकार आदेश होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'आस्धातूहून पर जो आनप्रत्यय त्याला ईकार आदेश होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.९) 'आमि सर्वनाम्नः' (७।१।७२) येथें 'शब्दाहून पर जो आम् प्रत्यय त्याला सुट् आगम होतो' असा अर्थ करावा किंवा 'आम्प्रत्यय पुढें असतां सर्वनामशब्दाला सुट् आगम होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'सर्वनामशब्दाहून पर जो आम्प्रत्यय त्याला सुट्आगम होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.१०) 'आण्नद्याः' (७।३।११२) येथें 'नद्याः' हें पंचम्यंतपद आहे. 'घेर्ङिति' (७।३।१११) या सूत्रांतून 'ङिति' हें सप्तम्यंतपद अनुवृत्त होत आहे. तेव्हां 'नदीसंज्ञक शब्दाहून पर जो ङित् प्रत्यय त्याला आट्आगम होतो' असा अर्थ करावा, किंवा 'ङित् प्रत्यय पुढें असतांना नदीसंज्ञक शब्दाला आट् आगम होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल समजल्यामुळें 'नदीसंज्ञक शब्दाहून पर जो ङित् प्रत्यय त्याला आट् आगम होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.११) 'याडापः' (७।३।११३) येथें 'आप् प्रत्ययान्त शब्दाहून पर जो ङित्प्रत्यय त्याला याट् आगम होतो' असा अर्थ करावा, किंवा 'ङित् प्रत्यय पुढें असतांना आप् प्रत्ययान्त शब्दाला याट् आगम होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल असल्यामुळें 'आप्प्रत्ययान्त शब्दाहून पर जो ङित्प्रत्यय त्याला याट् आगम होतो' असाच अर्थ निश्चित होतो.

(वा.१२) 'ङमो ह्रस्वादचि०' (८।३।३२) येथें 'ङमाहून पर जो अच् त्याला ङमुट् आगम होतो' असा अर्थ करावा, किंवा 'अच् पुढें असतांना ङमाला ङमुट् आगम होतो' असा अर्थ करावा, असा संशय येतो. परंतु पंचमीनिर्देश प्रबल असल्यामुळें 'ङमाहून पर जो अच् त्याला ङमुट् आगम होतो' असा-

त्वादविप्रतिषेधः ॥१३॥

विभक्तिविशेषनिर्देशस्यानवकाशत्वादयुक्तोऽयं विप्रतिषेधः । सर्वत्रैवात्र कृतसामर्थ्या सप्तम्यकृतसामर्थ्या पञ्चमीति कृत्वा पञ्चमीनिर्देशो भविष्यति ॥

यथार्थं वा षष्ठीनिर्देशः ॥१४॥

यथार्थं वा षष्ठीनिर्देशः कर्तव्यः । यत्र पूर्वस्य कार्यमिष्यते तत्र पूर्वस्य षष्ठी कर्तव्या । यत्र परस्य कार्यमिष्यते तत्र परस्य षष्ठी कर्तव्या ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । अनेनैव प्रक्लृप्तिर्भविष्यति। तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य षष्ठी । तस्मादित्युत्तरस्य षष्ठी ॥ तत्तर्हि षष्ठीग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । षष्ठी स्थानेयोगा [१.१.४९] इति ॥

---

च अर्थ निश्चित होतो.

(वा.१३) विशेषप्रकारचा विभक्तिप्रत्यय म्ह. पंचमीप्रत्यय त्याच्या उच्चारणाचा उपयोग होत नसल्यामुळें विप्रतिषेध मानणें बरोबर नाहीं. ह्या वर दाखविलेल्या सर्वच सूत्रांमध्यें सप्तम्यन्तपद हें सप्तमी प्रत्ययाच्या अर्थानें त्या सूत्राशिवाय अन्यत्र उपयोगीं पडत आहे, पण तसें पंचम्यंतपद मात्र पंचमीच्या अर्थानें उपयोगीं पडलेलें नाहीं, म्हणून पंचमीनिर्देशच प्रबल धरतां येईल.

(वा.१४) अथवा ज्याला कार्य पाहिजे असेल त्या शब्दापुढें तशा अर्थाचा प्रत्यक्ष षष्ठीप्रत्ययच उच्चारावा. ज्या ठिकाणीं पूर्वाला कार्य पाहिजे असेल तेथें सूत्रामध्यें त्या पूर्वाला दाखविणारा शब्द षष्ठीप्रत्यय लावून उच्चारावा आणि ज्या ठिकाणीं पराला कार्य पाहिजे असेल तेथें सूत्रामध्यें त्या पराला दाखविणारा शब्द षष्ठीप्रत्यय लावून उच्चारावा (म्हणजे संशयच मुळीं येणार नाहीं.)

तर मग सूत्रामध्यें त्या त्या ठिकाणीं षष्ठीप्रत्यय लावला पाहिजे ?

तसा लावावयास नको. (मूळ पाणिनीनें जो पंचमीचा किंवा सप्तमीचा प्रत्यय उच्चारला असेल तोच कायम असूं दे.) फक्त त्या प्रत्यांच्या ऐवजीं षष्ठीप्रत्ययाची कल्पना प्रकृतसूत्राच्या योगानें करतां येईल. म्ह. या सूत्रांचा अर्थ असाः– सप्तम्यंतपदाचा निर्देश केला असेल तेथें पूर्वीच्या शब्दामध्यें षष्ठीप्रत्ययाची कल्पना करावी; तसेंच पंचम्यंत पदाचा निर्देश केला असेल तेथें पुढील शब्दामध्यें षष्ठीप्रत्ययाची कल्पना करावी.

तर मग तसा अर्थ होण्याकरतां सूत्रामध्यें 'षष्ठी' असा शब्द घातला पाहिजे ?

षष्ठी असा शब्द घालावयास नको. मागून 'षष्ठी' या शब्दाची अनुवृत्ति करतां येईल.

मागें कोणत्या सूत्रामध्यें 'षष्ठी' असा शब्द आहे ?

षष्ठी स्थानेयोगा (१।१।४९) या सूत्रामध्यें 'षष्ठी' असा शब्द आहे.

(वा.१५)' षष्ठीप्रत्ययाची कल्पना कर-

---

६. 'ल सार्वधातुके' या सप्तमीनिर्देशाचा सप्तमीच्या अर्थानें पुढें 'आदिः सिचो०' (६।१।१८७) येथें उपयोग होत आहे. तसाच 'इष्टेमेयःसु' या सप्तमीनिर्देशाचा मागें 'तुरिष्ठेमेयःसु' (६।४।१५४) येथें उपयोग होत आहे. 'सर्वनामस्थाने' या सप्तमीनिर्देशाचा मागें 'इतोत्सर्वनामस्थाने' (७।१।८६) येथें उपयोग होत आहे. 'सार्वधातुके' या सप्तमीनिर्देशाचा पुढें 'लिङः सलोपोनन्त्यस्य' (७।२।७९) येथें उपयोग होत आहे. 'आने' या सप्तमीनिर्देशाचा 'आने मुक्' (७।२।८२) येथें उपयोग होत आहे. 'आपि' या सप्तमीनिर्देशाचा 'त्रेस्त्रयः' (७।१।७३) येथें उपयोग होत आहे. 'ङिति' या सप्तमीनिर्देशाचा मागें 'घेर्ङिति (७।३।१११) येथें उपयोग होत आहे. 'अचि' या सप्तमीनिर्देशाचा पुढें 'मय उञो०' (८।३।३३) येथें उपयोग होत आहे. ह्या सर्व ठिकाणीं पंचमीनिर्देशाचा उपयोग मात्र पंचमीच्या अर्थानें मागें किंवा पुढें कोठेंही संभवत नाहीं. तेव्हां वरील उदाहरणांमध्यें दोघांची बरोबरी नसल्यामुळें परत्वास्तव बाध होणार नाहीं, अनवकाशत्वास्तव बाध होईल.

**प्रकल्पकमिति चेन्नियमाभावः ॥१५॥**

प्रकल्पकमिति चेन्नियमस्याभावः। उक्तं चैतन्नियमार्थोऽयमारम्भ इति ॥ प्रत्ययविधौ खल्वपि पञ्चम्यः प्रकल्पिकाः स्युः। तत्र को दोषः। गुप्तिज्किद्भ्यः सन् [३.१.५]। गुप्तिज्किद्भ्य इत्येषा पञ्चमी सन्निति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मादित्युत्तरस्येति। अस्तु। न कश्चिदन्य आदेशः प्रतिनिर्दिश्यते तत्रान्तर्यतः सनः सन्नेव भविष्यति। नैवं शक्यम्। इत्संज्ञा न प्रकल्पेत। उपदेश इतीत्संज्ञोच्यते ॥

**प्रकृतिविकाराव्यवस्था च ॥१६॥**

प्रकृतिविकारयोश्च व्यवस्था न प्रकल्पते। इको यणचि। अचीत्येषा सप्तमी यणिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्येति ॥

**सप्तमीपञ्चम्योश्च भावादुभयत्र षष्ठीप्रक्लृप्तिस्तत्रोभयकार्यप्रसङ्गः ॥१७॥**

सप्तमीपञ्चम्योश्च भावादुभयत्रैव षष्ठी प्राप्नोति। तास्यादिभ्य इत्येषा पञ्चमी लसार्वधातुक इत्यस्याः सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मादित्युत्तरस्येति। तथा

---

णारीं हीं सूत्रें आहेत' असें मानलें तर त्या कामीं हीं सूत्रें खर्चीं पडत असल्यामुळें नियम मानतां येणार नाहीं. आणि 'हीं सूत्रें नियमाकरतां केलीं आहेत, म्ह. सप्तम्यंतपद उच्चारलें असेल तेथें पूर्वालाच कार्य करावें व पंचम्यंतपद उच्चारलें असेल तेथें परालाच कार्य करावें असा नियम करण्याच्या उद्देशानें हीं सूत्रें केलीं आहेत' असें आतांच सांगितलें आहे. शिवाय षष्ठीप्रत्ययाची कल्पना करणारीं हीं सूत्रें आहेत असें मानलें तर प्रत्ययाचें विधान केलें असेल तेथें देखील पंचमीनिर्देशाच्या जोरावर त्या सूत्रांमध्यें त्या प्रत्ययाच्या पुढें षष्ठीप्रत्ययाची कल्पना होईल.

मग तसें झालें तर दोष काय ?

दोष असा की 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' (३।१।५) या सूत्रामध्यें 'गुप्तिज्किद्भ्यः' या पंचमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रकृतपरिभाषेनें 'सन्' या प्रथमान्तपदाच्या ऐवजीं 'सनः' अशी षष्ठ्यन्तपदाची कल्पना होईल.

तशी कल्पना झाली तर होऊं दे. (गुप्, तिज् आणि कित् या धातुंहून पर जो सन् प्रत्यय त्याला आदेश होतो असा अर्थ होईल. आणि तेथें अमुक आदेश होतो असा दुसरा कोणी आदेश सांगितल्यामुळें 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें सनाला त्याच्याशीं अत्यंत सदृश असा सन्‌च आदेश होईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण ह्या कल्पित सन्‌आदेशाच्या नकाराला इत्संज्ञा होणार नाहीं. आद्योच्चारणांतील अंत्य हलाला इत्संज्ञा (१।३।३) सांगितली आहे.

(वा.१६) शिवाय आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें स्थानी कोण आणि आदेश कोण ही व्यवस्था लागणार नाहीं. कारण 'इको यणचि' (६।१।७७) या ठिकाणी 'अचि' ह्या सप्तमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या प्रकृतपरिभाषेनें 'यण्' ह्या प्रथमान्तपदाच्या ऐवजीं 'यणः' अशा षष्ठ्यंतपदाची कल्पना होईल. (तेव्हां 'इकः' आणि 'यणः' अशीं दोन्ही पदें षष्ठ्यंत झाल्यामुळें त्यांतील कोण स्थानी आणि कोण आदेश हें समजणार नाहीं.

(वा.१७) शिवाय ज्या ठिकाणीं सप्तम्यंत आणि पंचम्यंत अशीं दोन्ही प्रकारचीं पदें आहेत तेथें परस्परांच्या जोरावर त्या दोन्ही पदांच्या ऐवजी षष्ठ्यंत पदांची कल्पना होईल. जसें—'तास्यनुदात्तेत्' (६।१।१८६) ह्या सूत्रामध्यें 'तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशात्' या पंचमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रकृतपरिभाषेनें 'लसार्वधातुके' या सप्तम्यंत

लसार्वधातुक इत्येषा सप्तमी तास्यादिभ्य इति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्येति । तत्र को दोषः। तत्रोभयकार्यप्रसङ्गः उभयोः कार्यं तत्र प्राप्नोति।। नैष दोषः। यत्तावदुच्यते प्रकल्पकमिति चेन्नियमाभाव इति मा भून्नियमः। सप्तमीनिर्दिष्टे पूर्वस्य षष्ठी प्रकल्प्यते- पञ्चमीनिर्दिष्टे परस्य । यावता सप्तमीनिर्दिष्टे पूर्वस्य षष्ठी प्र कल्प्यत एवं पञ्चमीनिर्दिष्टे परस्य नोत्सहते सप्तमीनिर्दिष्टे परस्य कार्यं भवितुं नापि पञ्चमीनिर्दिष्टे पूर्वस्य ।। यदप्युच्यते प्रत्ययविधौ खल्वपि पच्चम्यः प्रकल्पिकाः स्युरिति सन्तु प्रकल्पिकाः । ननु चोक्तं गुप्तिज्किद्भ्यः सन्नित्येषा पञ्चमी सन्निति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मादित्युत्तरस्येति । परिहृतमेतन्न कश्चिदन्य आदेशः प्रतिनिर्दिश्यते तत्रान्तर्यतः सनः सन्नेव भविष्यतीति । ननु चोक्तं नैवं शक्यमित्संज्ञा न प्रकल्पेतोपदेश इतीत्संज्ञोच्यत इति । स्यादेष दोषो यदीत्संज्ञादेशं प्रतीक्षेत । तत्र खलु कृतायामित्संज्ञायां लोपे च

---

पदाच्या ऐवजीं 'लसार्वधातुकस्य' अशा षष्ठ्यंत पदाची कल्पना होईल. तसेंच 'लसार्वधातुके' या सप्तमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या प्रकृतपरिभाषेनें 'तास्यनुदात्तेन्ङिदद्रुपदेशात्' या पंचम्यंत पदाच्या ऐवजीं 'तास्यनुदात्तेन्ङिदद्रु पदेशस्य' अशा षष्ठ्यंत पदाची कल्पना होईल.

तसें झालें तर दोष कोणता ?

दोष असा की त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य त्या दोघांना होऊं लागेल.

हे सर्वच दोष येत नाहींत. आरंभीं जो दोष दिला आहे की 'षष्ठीप्रत्ययाची कल्पना करणारीं हीं सूत्रें आहेत असें मानलें तर पूर्वालाच कार्य करावें व परालाच कार्य करावें' असे नियम होणार तर त्यावर आमचें म्हणणें असें आहे की नियम झाले नाहींत तरी कांहीं हरकत नाहीं. 'सप्तमीनिर्देश असेल तेथें पूर्वाला षष्ठीप्रत्ययाची कल्पना होते आणि पंचमीनिर्देश असेल तेथें पराला षष्ठीप्रत्ययाची कल्पना होते' असें म्हणण्यानें अर्थातच नियम सिद्ध होत आहे. असें पाहा की सप्तमीनिर्देश असेल तेथें जर षष्ठीप्रत्ययाची कल्पना पूर्वाला झाली तर तसा सप्तमीनिर्देश असतांना तेथें पराला कार्य होण्याची शंका तरी कशी येईल? तसेंच पंचमीनिर्देश असेल तेथें जर षष्ठीप्रत्ययाची कल्पना पराला झाली तर तसा पंचमीनिर्देश असतांना तेथें पूर्वाला कार्य होण्याची शंका तरी कशी येईल?

तसेंच, 'प्रत्ययाचें विधान केलें असेल तेथें देखील पंचमीनिर्देशाच्या जोरावर त्या सूत्रामध्यें त्या प्रत्ययाच्या पुढें षष्ठीप्रत्ययाची कल्पना होईल' असें जें म्हटलें आहे तेथें देखील षष्ठीप्रत्ययाची कल्पना झाली तर होऊं दे.

पण तशी कल्पना झाली तर 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' या सूत्रामध्यें 'गुप्तिज्किद्भ्यः' या पंचमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रकृतपरिभाषेनें 'सन्' या प्रथमान्त पदाच्या ऐवजीं 'सनः' अशी षष्ठ्यंतपदाची कल्पना होईल असा दोष दिला आहे ना ?

दोष दिला आहे खरा, पण त्याला परिहारही केलाच आहे. तो असा की तेथें सनाला दुसरा कोणी आदेश सांगितला नसल्यामुळें 'स्थानेन्तरतमः' या परिभाषेनें सनाला त्याच्याशीं अत्यंत सदृश असा सन्‌च आदेश होईल.

पण त्यानंतर सुद्धां 'सनाला सन्‌च आदेश केला तर त्या कल्पित सन्‌आदेशाच्या नकाराला इत्संज्ञा होणार नाहीं. कारण आद्य उच्चारणांतील अंत्य हलाला इत्संज्ञा सांगितली आहे' असा दोष दाखविलाच आहे.

हा दोष दाखविला आहे खरा, पण तो केव्हां येईल? जर इत्संज्ञा सनाला सन् आदेश होण्याची वाट पाहात बसेल तेव्हां. वस्तुतः तो

कृत आदेशो भविष्यति। उपदेश इति हीत्संज्ञोच्यते। अथवा नानुत्पन्ने सनि प्रक्लृप्त्या भवितव्यं यदा चोत्पन्नः संस्तदा कृतसामर्थ्या पञ्चमीति कृत्वा प्रक्लृप्तिर्न भविष्यति॥ यदप्युच्यते प्रकृतिविकाराव्यवस्था चेति तत्रापि कृता प्रकृतौ षष्ठीक इति विकृतौ। प्रथमा यणिति यत्र च नाम सौत्री षष्ठी नास्ति तत्र प्रक्लृप्त्या भवितव्यम्। अथवास्तु तावदिको यणचीति यत्र नाम सौत्री षष्ठी। यदि चेदानीमचीत्येषा सप्तमी यणिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयेत्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्येत्यस्तु। न कश्चिदन्य आदेशः प्रतिनिर्दिश्यते तत्रान्तर्यतो यणो यणेव भविष्यति॥ यदप्युच्यते सप्तमीपञ्चम्योश्च भावादुभयत्र षष्ठीप्रक्लृप्तिस्तत्रोभयकार्यप्रसङ्ग इत्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नोभे युगपत्प्रकल्पिके भवत इति यदयमेकः पूर्व-

---

पर्यंत थांबण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. कारण आद्य उच्चारणांतीलच अंत्य हलाला इत्संज्ञा सांगितली आहे. तेव्हां खरोखरच इत्संज्ञा (१।३।३) अगोदर होईल, नंतर त्या नकाराचा लोप (१।३।९)ही होईल आणि नंतर त्या 'स' याला 'स' असा आदेश होईल. तेव्हां कांहींच दोष येत नाहीं.

अथवा, कांहीं कार्य करण्याकरतां करावयाची जी षष्ठीची कल्पना ती ज्याला करावयाची तो अस्तित्वांत आलेला असला पाहिजे. तेव्हां सन्प्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी 'सनः' अशी षष्ठीची कल्पना होणें अशक्यच आहे. बरें, आतां सन्प्रत्यय उत्पन्न झाल्यानंतर षष्ठीची कल्पना होईल असें म्हणावें तर तो सन्प्रत्यय 'गुप्तिज्किद्भ्यः०'याच सूत्रानें उत्पन्न होत असल्यामुळें तो सन्प्रत्यय गुप् ,तिज् ,कित् , या धातूंहून पर असा उत्पन्न होण्याच्या कामीं पंचमी खर्ची पडत आहे. तेव्हां तिच्या अंगचा जोर नष्ट झाला असल्यामुळें षष्ठीची कल्पना तेथें होणारच नाहीं.

तसेंच, 'आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें स्थानी कोण आणि आदेश कोण ही व्यवस्था लागणार नाहीं' असा जो दोष दिला आहे तोही बरोबर नाहीं. कारण तेथें स्थानी कोण तें दाखविणारी 'इकः' अशी षष्ठी मूळ सूत्रामध्यें पाणिनीनें केलीच आहे व आदेश कोण तें दाखविणारी 'यण्' अशी प्रथमाही मूळ सूत्रामध्यें केलीच आहे. ज्या ठिकाणीं अशी मूळ सूत्रामध्यें षष्ठी नसेल तेथें 'तें कार्य कोणाला करावयाचें' तें समजत नसल्यामुळें षष्ठीची कल्पना करावयाकरतां प्रकृतपरिभाषेची जरूर लागते.

अथवा 'इको यणचि' अशी पाणिनीनेंच सूत्रामध्यें षष्ठी उच्चारली असेल तेथें प्रथमतः 'इकाचे स्थानीं यण् होतो' असा अर्थ होणारच. आतां जर त्यानंतर अचि या सप्तमीनिर्देशाच्या जोरावर 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या प्रकृतपरिभाषेनें यण् प्रथमान्त पदाच्या ऐवजीं यणः अशी षष्ठ्यंत पदाची कल्पना होईल व त्यामुळें यणाचे स्थानीं आदेश होतो असा अर्थ होईल तर होऊं दे. यणाला अमुक आदेश होतो असा दुसरा कोणी सांगितला नसल्यामुळें 'स्थानेन्तरतमः' या परिभाषेनें यणाला अत्यंत सदृश असा यणच् आदेश होईल.

तसेंच 'ज्या ठिकाणीं सप्तम्यंत आणि पंचम्यंत अशीं दोन्ही प्रकारचीं पदें आहेत तेथें

---

७. तेव्हां इको यणचि इत्यादि ठिकाणीं षष्ठीची कल्पना करण्याची जरूर नसल्यामुळें प्रकृत परिभाषा येथें उपस्थित झाली तरी ती तें काम करीत नाहीं. फक्त सूत्रांत उच्चारलेली षष्ठी जमेस धरून तिचा 'अव्यवहित पूर्वाकडे संबंध दाखविणें' एवढें काम प्रकृतपरिभाषा करते.

८. प्रकृतपरिभाषेनें यणः अशी षष्ठीची कल्पना करण्यापूर्वीच वाक्यार्थ होण्याला आवश्यक गोष्टी सिद्ध असतील तर तेथें तत्क्षणीं वाक्यार्थ झालाच पाहिजे.

परयोः [६.१.८४] इति पूर्वपरग्रहणं करोति ॥

## स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा ॥ १.१.६८॥

रूपग्रहणं किमर्थं न स्वं शब्दस्याशब्दसंज्ञाभवतीत्येव रूपं शब्दस्य संज्ञा भविष्यति । न ह्यन्यत्स्वं शब्दस्यास्त्यन्यदतो रूपात् । एवं तर्हि सिद्धे सति यद्रूपग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽस्त्यन्यद्रूपात्स्वं शब्दस्येति । किं पुनस्तत् । अर्थः । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येषा परिभाषा न कर्तव्या भवति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**शब्देनार्थगतेरर्थस्यासंभवात्तद्वाचिनः संज्ञाप्रतिषेधार्थं स्वंरूपवचनम् ॥ १ ॥**

शब्देनोच्चारितेनार्थो गम्यते । गामानय दध्यशानेत्यर्थ आनीयतेऽर्थश्च भुज्यते । अर्थेकार्यस्यासंभवात् । इह व्याकरणेऽर्थे कार्यस्यासंभवः अग्रेर्ढक् [४.२.३३] इति

---

परस्परांच्या जोरावर त्या दोन्ही पदांच्या ऐवजीं याच षष्ठ्यंत पदांची कल्पना होईलआणि त्या दोघांना कार्य होईल' असा जो दोष दिला आहे तोही दोष येत नाहीं. ज्या अर्थीं हा आचार्य पाणिनि 'एकः पूर्वपरयोः'(६।१।८४) या सूत्रामध्यें दोघांना एकदम कार्य होण्याकरतां 'पूर्वपरयोः' असा शब्द घालतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'ज्या ठिकाणीं पंचमीनिर्देश आणि सप्तमीनिर्देश हे दोन्ही असतील तेथें ते दोन्ही एकदम षष्ठीची कल्पना करीत नाहींत'; तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

(सू.६८) ह्या सूत्रामध्यें 'रूप' हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

तो घालावयास नको. 'स्वं शब्दस्याशब्दसंज्ञा' एवढेंच सूत्र केलें तरी ज्या शब्दाचें जें स्वतःचें रूप असेल तेंच त्या शब्दाचें बोध्य होईल. कारण शब्दाचें स्वतःचें असें ह्या रूपाशिवाय निराळें कांहींच नाहीं.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असूनही जो हा आचार्य पाणिनि ह्या सूत्रामध्यें 'रूप' असा शब्द घालतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'शब्दाचें स्वतःचें असें रूपाशिवाय दुसरें कांहींतरी येथें स्वशब्दानें घ्यावयाचें आहे.

पण तें दुसरें काय बरें ?

शब्दाचा जो अर्थ म्हणून आपल्या मनांत येतो तेंच तें होय.[२]

ह्या ज्ञापनाचा उपयोग काय ?

उपयोग असा की 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य ग्रहणम्' ही जी परिभाषा आहे ती आतां निराळी करावयास नको.

पण हें सूत्रच मुळीं कोणत्या उद्देशानें केलें आहे ?

(वा.१) शब्द उच्चारला असतां त्यापासून अर्थ मनांत येतो. उदा० 'गाम् आनय' म्ह. 'गो आण' असें म्हटलें असतां गोशब्दाचा अर्थ गाय आणिली जाते. तसेच 'दधि

---

९. जर एकाच सूत्रामध्यें दोन निर्देशांवरून दोन षष्ठ्यंत पदांची कल्पना होईल तर 'आद्गुणः' (६।१।८७) येथें आत् या पंचमीनिर्देशाच्या जोरावर अचि याच्याऐवजीं 'अचः' अशी षष्ठ्यंत पदाची कल्पना होईल आणि अचि या सप्तमीनिर्देशाच्या जोरावर आत् याच्याऐवजीं 'अस्य' अशी षष्ठ्यंत पदाची कल्पना होईल. तेव्हां अर्थातच पूर्वीचा अकार आणि पुढचा अच् या दोघांचे स्थानीं गुण होत असल्यामुळें 'पूर्वपरयोः' हा शब्द व्यर्थ होईल.

१. कोणत्याही शब्दाचें स्वतःचें जें स्वरूप तें त्याच शब्दाचें बोध्य समजावें ह्या शब्दशास्त्रामध्यें मान्य असलेले जे संज्ञाशब्द त्यांविषयीं मात्र हा नियम लागू होत नाहीं.

२. तेव्हां स्वशब्दानें अर्थ घेतला आणि रूपशब्दानें स्वरूप घेतलें म्हणजे त्या अर्थानें युक्त असें जें त्या शब्दानें स्वरूप तें सूत्रांतील त्या शब्दाचें बोध्य होतें. म्हणून प्रनिदारयति येथें 'दा' हें शब्दस्वरूप अनर्थक असल्यामुळें त्याला घुसंज्ञा (१।१ २०) होत नाहीं.

न शक्यतेऽङ्गारेभ्यः परो ढक्कर्तुम्। शब्देनार्थगतेरर्थस्यासंभवाद्यावन्तस्तद्वाचिनः शब्दास्तावद्भ्यः सर्वेभ्य उत्पत्तिः प्राप्नोति। इष्यते च तस्मादेव स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति तद्वाचिनः संज्ञाप्रतिषेधार्थं स्वंरूपवचनम्। एवमर्थमिदमुच्यते॥

**न वा शब्दपूर्वको ह्यर्थे संप्रत्ययस्तस्मादर्थनिवृत्तिः ॥ २ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति। किं कारणम्। शब्दपूर्वको ह्यर्थे संप्रत्ययः। शब्दपूर्वको ह्यर्थस्य संप्रत्ययः। आतश्च शब्दपूर्वको योऽपि ह्यसावाहूयते नाम्ना नाम यदानेन नोपलब्धं भवति तदा पृच्छति किं भवानाहेति। शब्दपूर्वकश्चार्थस्य संप्रत्यय इह च व्याकरणे शब्दे कार्यस्य संभवोऽर्थेऽसंभवस्तस्मादर्थनिवृत्तिः। तस्मादर्थनिवृत्तिर्भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनमशब्दसंज्ञेति वक्ष्यामीति। इह मा भूत्। दाधा घ्वदाप्

---

अशान' म्ह. 'दधि खा' असें म्हटलें असतां दधिशब्दाचा अर्थ जें दहीं ते खाण्यांत येतें. परंतु 'अर्थे कार्यस्यासंभवात्' म्ह. ह्या व्याकरणशास्त्रामध्यें अर्थाला कार्य संभवत नाहीं. 'अग्नेर्ढक्' (४।२।३३) 'अग्नि याच्या पुढें ढक् प्रत्यय होतो' असें म्हटलें असतां अग्निशब्दाचा जो अर्थ निखारा त्याच्या पुढें ढक्प्रत्यय करणें शक्य नाहीं. तेव्हां अशा रीतीनें शब्दापासून अर्थ मनांत येतो, पण शास्त्रामध्यें अर्थाला कार्य संभवत नसल्यामुळें त्या 'निखारा' या अर्थाचे जितके शब्द असतील तितक्या सर्व शब्दांचा तो सूत्रांतील 'अग्नि' हा शब्द बोधक आहे असें समजून त्या सर्व शब्दांच्या पुढें ढक्प्रत्यय होऊं लागेल. आणि इष्ट तर असें आहे की एकट्या अग्नि याच शब्दाच्या पुढें ढक् प्रत्यय झाला पाहिजे. तेव्हां ही इष्ट गोष्ट, तिच्याकरतां कांहीं तरी विशेष प्रयत्न केल्याशिवाय, सिद्ध होणार नाहीं म्हणून सूत्रांतील अग्नि हा शब्द निखारा या अर्थाच्या इतर सर्व शब्दांचा बोधक होऊं नये या उद्देशानें 'स्वंरूपवचनम्' म्ह. हें प्रकृत सूत्र केलें आहे.

(वा. २) हा जो प्रकृत सूत्राचा उपयोग दाखविला आहे तो बरोबर नाहीं.

कां बरें?

शब्दपूर्वको ह्यर्थे संप्रत्ययः म्ह. लोकामध्यें शब्द उचारल्याबरोबर त्याचा अर्थ मनांत येतो हें खरें, परंतु अगोदर शब्द मनांत येऊन नंतरच त्याचा अर्थ मनांत येतो.

आणखी 'अगोदर शब्दच मनांत येतो' ही गोष्ट अशावरून सिद्ध होते की एखाद्या मनुष्याला त्याच्या नांवानें दुसऱ्यानें हाक मारिली असतां जर त्यानें तें नांव ऐकलें नसेल तर 'काय तूं म्हणतोस' असें पुन्हा त्याला तो विचारतांना दृष्टीस पडतो. एकंदरींत अगोदर शब्द मनांत येऊन नंतरच अर्थ मनांत येतो. आणि ह्या व्याकरणशास्त्रामध्यें तर अगोदर मनांत येणाऱ्या अशा शब्दालाच कार्य संभवत आहे. उलट अर्थालाच संभवत नाहीं, 'तस्मादर्थनिवृत्तिः' म्हणून आपोआपच अर्थाची निवृत्ति होईल. आणि प्रथम मनांत आलेला जो अग्नि वगैरे शब्द त्या एका शब्दालाच तें कार्य होईल. (तेव्हां त्याकरतां प्रकृत सूत्र करावयास नको.)

तर मग ह्या प्रकृतसूत्राचा असा उपयोग समजावा की—हें जें आपोआप त्या उचारलेल्या एका शब्दालाच कार्य होतें तें ह्या शास्त्रामध्यें ज्या संज्ञा सांगितल्या आहेत, उदा० दा, धा यांना घु अशी संज्ञा होते (१।१।२०), तरप्, तमप् यांना घ अशी संज्ञा होते (१।१।२२), त्या ठिकाणीं मूळ स्वरूपाला, म्ह. त्या घु, घ, इत्यादि शब्दांना कार्य नको आहे; त्याकरतां 'अशब्दसंज्ञा हा निषेध सांगावा म्हणून हें सूत्र केलें आहे.

[१.१.२०] तरप्तमपौ घः [२२] इति ।

**संज्ञाप्रतिषेधानर्थक्यं वचनप्रामाण्यात् ॥ ३ ॥**

संज्ञाप्रतिषेधश्चानर्थकः । शब्दसंज्ञायां स्वरूपविधिःकस्मान्न भवति।वचनप्रामाण्यात्। शब्दसंज्ञावचनसामर्थ्यात् ॥ ननु च वचनप्रामाण्यात्संज्ञिनां संप्रत्ययः स्यात्स्वरूपग्रहणाच्च संज्ञायाः । एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति शब्दसंज्ञायां न स्वरूपविधिर्भवतीति यदयं ष्णान्ता षट् [१.१.२४] इति षकारान्तायाः संख्यायाः षट्संज्ञां शास्ति । इतरथा हि वचनप्रामाण्याच्च नकारान्तायाः संख्यायाः संप्रत्ययः स्यात्स्वरूपग्रहणाच्च षकारान्तायाः । नैतदस्ति ज्ञापकं न हि षकारान्ता संज्ञा । का तर्हि । डकारान्ता । असिद्धं जश्त्वं तस्यासिद्धत्वात्षकारान्ता ॥ मन्त्राद्यर्थं तर्हीदं वक्तव्यम् । मन्त्र ऋचि यजुषीति यदुच्यते तन्मन्त्रशब्द ऋक्शब्दे च यजुःशब्दे च मा भूत् ।

**मन्त्राद्यर्थमिति चेच्छास्त्रसामर्थ्यादर्थगतेः सिद्धम् ॥ ४ ॥**

---

(वा.३) याकरितांही हें सूत्र नको आहे. कारण 'अशब्दसंज्ञा' या निषेधाचीच कांहीं जरूर नाहीं.

पण मग शास्त्रामध्यें घु,घ, वगैरे संज्ञाशब्द उच्चारून सांगितलेलीं कार्यें घु, घ, इत्यादि शब्दांना कां होत नाहींत ?

जर घु शब्द उच्चारून सांगितलेलें कार्य त्याच्या मूळ स्वरूपाला म्ह. 'घु' या शब्दाला होईल तर दा व धा यांना सांगितलेली घु संज्ञा व्यर्थ होईल. म्हणून तिच्या सामर्थ्यास्तव तें कार्य 'घु' या शब्दाला होणार नाहीं.

पण तिच्या सामर्थ्यास्तव तें कार्य दा, धा, यांना होऊं दे. घु या शब्दाला न होण्याचें कारण कांहींच दिसत नाहीं. (तेव्हां घु या मूळ शब्दस्वरूपाला कार्य न व्हावें याकरितां 'अशब्दसंज्ञा' हा निषेध पाहिजे.)

हा देखील उपयोग बरोबर नाहीं. कारण ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'ष्णान्ता षट्' (१।१।२४) या सूत्रामध्यें पंचन्, सप्तन् इत्यादि नकारान्तशब्दांना 'षष्'संज्ञा सांगून त्याशिवाय निराळी षकारान्त संख्येला म्ह. 'षष्' या शब्दाला षष् अशी संज्ञा सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की 'संज्ञाशब्दानें मूळस्वरूपाचें म्ह. त्याच शब्दाचें ग्रहण होत नाहीं. नाहीं तर षष्संज्ञक शब्दाला सांगितलेलें कार्य (७।१।२२) पंचन्, सप्तन् ह्या नकारान्त संख्याशब्दांना षष्संज्ञा सांगितली तिच्या सामर्थ्यास्तव त्यांना होईल आणि त्या संज्ञाशब्दाच्या मूळ स्वरूपाला म्ह. षष्शब्दालाही होईल. (तेव्हां षष् या शब्दाला जी मुद्दाम निराळी षष्संज्ञा सांगितली ती व्यर्थ होईल.)

पण हें ज्ञापक बरोबर जमत नाहीं. कारण 'ष्णान्ता षट्' (१।१।२४) या सूत्रानें 'षष्'अशी संज्ञा सांगितलीच नाहीं.

तर मग कोणती संज्ञा सांगितली आहे ?

'षड्' अशी डकारान्त संज्ञा सांगितली आहे.

मूळ संज्ञा षष् अशीच आहे. त्रिपादींतील जश्त्व (८।२।३९) होऊन षड् असा उच्चार झाला तरी तें जश्त्व असिद्ध (८।२।१) असल्यामुळें मूळ संज्ञा षकारान्तच आहे. (तेव्हां ज्ञापक बरोबर जमत असल्यामुळें 'अशब्दसंज्ञा' या निषेधाची जरूर नाहीं म्हणून त्याकरतां हें प्रकृतसूत्र नको असें सिद्ध होतें.)

तर मग मन्त्र वगैरेंकरतां 'अशब्दसंज्ञा' या निषेधाची जरूर आहे. म्ह. मन्त्र (२।४।८०), ऋचि (६।३।१३३), यजुषि (७।४।३८), असे शब्द उच्चारून जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं (६।३।१३१) मन्त्र, ऋच् आणि यजुष् या शब्दांना होऊं नयेत.

मन्त्राद्यर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । शास्त्रस्य सामर्थ्यादर्थस्य गतिर्भविष्यति । मन्त्र ऋचि यजुषीति यदुच्यते मन्त्रशब्द ऋक्शब्दे च यजुःशब्दे च तस्य कार्यस्य संभवो नास्तीति कृत्वा मन्त्रादिसहचरितो योऽर्थस्तस्य गतिर्भविष्यति साहचर्यात् ॥

**सित्तद्विशेषाणां वृक्षाद्यर्थम् ॥ ५ ॥**

सिन्निर्देशः कर्तव्यः । ततो वक्तव्यं तद्विशेषाणां ग्रहणं भवतीति । किं प्रयोजनम् । वृक्षाद्यर्थम् । विभाषा वृक्षमृग [२.४.१२] इति । प्लक्षन्यग्रोधम् प्लक्षन्यग्रोधाः ॥

**पित्पर्यायवचनस्य च स्वाद्यर्थम् ॥६॥**

पिन्निर्देशः कर्तव्यः । ततो वक्तव्यं पर्यायवचनस्य तद्विशेषाणां च ग्रहणं भवति स्वस्य च रूपस्येति । किं प्रयोजनम् । स्वाद्यर्थम् । स्वे पुषः [३.४.४०] । स्वपोषं पुष्यति । रैपोषं विद्यापोषम् गोपोषम् अश्वपोषम् ॥

**जित्पर्यायवचनस्यैव राजाद्यर्थम् ॥७॥**

जिन्निर्देशः कर्तव्यः । ततो वक्तव्यं पर्यायवचनस्यैव ग्रहणं भवति । किं प्रयोजनम् । राजाद्यर्थम् । सभा राजामनुष्यपूर्वा [२.४.२३] । इनसभम् ईश्वरसभम् ।

---

(वा.४) मन्त्र वगैरे शब्दांकरितां 'अशब्दसंज्ञा' हा निषेध पाहिजे असें म्हणाल तर तसें नाहीं.

तसें नसण्याचें कारण काय ?

कारण असें की शास्त्राच्या सामर्थ्यास्तव मन्त्र वगैरे शब्दांच्या अर्थाचें ग्रहण होईल, म्ह. मन्त्रामध्यें, ऋचेमध्यें, यजूमध्यें असें म्हणून जें कार्य सांगितलें असेल त्या कार्याचा मन्त्र, ऋच् व यजुष् या शब्दांमध्यें संभव नाहीं म्हणून त्या शब्दांबरोबर नेहमीं मनांत येणारा जो त्या शब्दांचा अर्थ 'अग्निमीळे' (ऋ. सं. १।१।१) वगैरे वाक्यें त्यांचें ग्रहण होईल. कारण शब्द आणि त्याचा अर्थ यांचें साहचर्य कायमचें आहे.

(वा.५) सिताचा निर्देश करावा म्ह. इत्संज्ञक सकार जोडावा. आणि असा सिताचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें त्याच्या विशेषाचें ग्रहण होतें असें म्हणावें.

ह्याचा उपयोग कुठें ?

वृक्षाद्यर्थम् म्ह. 'विभाषा वृक्षमृग०' (२।४।१२) येथें वृक्ष वगैरे शब्दांनीं त्यांच्या विशेषांचें ग्रहण झालें पाहिजे. उदा० प्लक्षन्यग्रोधम् प्लक्षन्यग्रोधौ.

(वा.६) पिताचा निर्देश करावा म्ह. इत्संज्ञक पकार जोडावा. आणि असा पिताचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें त्याच्या पर्यायशब्दांचें, त्याच्या विशेष शब्दांचें व मूळ उच्चारलेल्या त्या शब्दस्वरूपांचें ग्रहण होतें असें म्हणावें.

त्याचा उपयोग कुठें ?

स्वाद्यर्थम् म्ह. 'स्वे पुषः' (३।४।४०) येथें स्वशब्दानें रै, धन, या पर्यायशब्दांचें अश्व, गो, या विशेषद्रव्यवाचक शब्दांचें आणि आपलें स्वतःचें म्ह. 'स्व' या शब्दाचें ग्रहण होतें; उदा० स्वपोषं पुष्यति, रैपोषम्, धनपोषम्, अश्वपोषम्, गोपोषम्.

(वा.७) जिताचा निर्देश करावा म्ह. इत्संज्ञक जकार जोडावा. आणि असा जिताचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें फक्त त्याच्या पर्यायशब्दांचेंच ग्रहण होतें असें म्हणावें.

त्याचा उपयोग कुठें ?

राजाद्यर्थम् म्ह. सभा राजामनुष्यपूर्वा (२।४।२३) येथें राजशब्दानें इन, ईश्वर या पर्यायशब्दांचेंच ग्रहण होतें; उदा० इनसभम् ईश्वरसभम्. 'पर्यायशब्दांचेंच ग्रहण होतें' असें म्हटलें असल्यामुळें मूळ उच्चारलेल्या राजश-

---

१. सूत्रामध्यें वृक्ष याला इत्संज्ञक सकार जोडून वृक्षस् असें म्हणावें. त्यामुळें येथें प्लक्ष, न्यग्रोध, वगैरे विशेष वृक्षच घेतले जातात. 'वृक्ष' हा शब्द आणि त्याचें ग्रहण होत नाहीं.

तस्यैव न भवति । राजसभा । तद्विशेषाणां च न भवति । पुष्पमित्रसभा चन्द्रगुप्तसभा॥

## झित्तस्य च तद्विशेषाणां च मत्स्याद्यर्थम् ॥ ८ ॥

झिन्निर्देशः कर्तव्यः । ततो वक्तव्यं तस्य च ग्रहणं भवति तद्विशेषाणां चेति । किं प्रयोजनम् । मत्स्याद्यर्थम् । पक्षिमत्स्यमृगान्हन्ति [४.४.३५] । मात्स्यिकः । तद्विशेषाणाम् । शाफरिकः शाकुलिकः । पर्यायवचनानां न भवति । अजिह्मान्हन्तीति ॥ अस्यैकस्य पर्यायवचनस्येष्यते । मीनान्हन्ति मैनिकः ॥

## अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः ॥१.१.६९॥

अप्रत्यय इति किमर्थम् । सनाशसंभिक्ष उः [३.२.१६८] । अ सांप्रतिके [४.३.९] ॥ अत्यल्पमिदमुच्यतेऽप्रत्यय इति । अप्रत्ययादेशटित्किन्मित इति वक्तव्यम् । प्रत्यय उदाहृतम् । आदेशे । इदम इश् [५.३.३] । इतः इह । टिति । लविता लवितुम् । किति । बभूव । मिति । हेऽनडुन् ॥ टितः परिहारः । आचार्यप्रवृत्ति-

ब्दाचें ग्रहण होत नाहीं म्हणून राजसभा येथें नपुंसकलिंग होत नाहीं. तसेंच विशेषांचें म्ह. पुष्पमित्र वगैरे शब्दांचेंही ग्रहण होत नाहीं म्हणून पुष्पमित्रसभा, चन्द्रगुप्तसभा, येथें नपुंसकलिंग होत नाहीं.

(वा.८) झिताचा निर्देश करावा म्ह. इत्संज्ञक झकार जोडावा आणि असा झिताचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें त्या मूळ उच्चारलेल्या शब्दाचें आणि त्याच्या विशेष शब्दांचें ग्रहण होतें असें म्हणावें.

ह्याचा उपयोग कुठें ?

मत्स्याद्यर्थम् म्ह. 'पक्षिमत्स्यमृगान्हन्ति' (४।४।३५) येथें मत्स्यशब्दानें 'मत्स्य' या शब्दाचें आणि शफर, शकुल, या मत्स्यविशेषवाचक शब्दांचें ग्रहण होतें; उदा० मत्स्यान् हन्ति मात्स्यिकः. विशेषशब्दांचें उदाहरण— शाफरिकः, शाकुलिकः. 'मूळ शब्द व विशेष शब्द यांचेंच ग्रहण होतें' असें म्हटलें असल्यामुळें पर्यायशब्दांचें ग्रहण होत नाहीं; म्हणून 'अजिह्मान् हन्ति', अशीं वाक्येंच राहतात; तेथें ठक् प्रत्यय होत नाहीं. पर्यायशब्दांपैकीं एकट्या 'मीन' या शब्दाचें मात्र 'मत्स्य' या शब्दानें तेथें ग्रहण होतें असें इष्ट आहे; उदा० मीनान् हन्ति मैनिकः. (६८)

(सू. ६९) ह्या सूत्रामध्यें 'अप्रत्ययः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'सनाशंसभिक्ष उः' (३।२।१६८) 'अ सांप्रतिके' (४।३।९) या सूत्रांनीं जे उ आणि अ हे प्रत्यय सांगितले आहेत त्यांनीं दीर्घ ऊ, आ इत्यादिक सवर्णांचें ग्रहण करूं नये म्हणून म्हटलें आहे.

हा जो येथें 'अप्रत्ययः' असा सवर्णग्रहणाचा निषेध फक्त प्रत्ययाविषयींच केला आहे तो फारच कमी आहे.

प्रत्यय, आदेश आणि टित्, कित्, मित् आगम हे सवर्णांचें ग्रहण करीत नाहींत असें म्हणावें. त्यांपैकीं प्रत्ययाचें उदाहरण दाखविलेंच आहे. आदेशाचें उदाहरण—इदम इश् (५।३।३). येथें आदेशानें सवर्णांचें ग्रहण झालें तर इतः इह येथें दीर्घ ई वगैरेही आदेश होऊं लागतील. टित् आगमाचें उदाहरण— लविता लवितुम्. येथें सवर्णग्रहण झालें तर

१. येथें अण् हा प्रत्याहार परणकाराशीं आहे. (मागें पाहा पृ. ८८.) अइउण् ऋलक् इत्यादि वर्णपाठामध्यें उच्चारलेला अणप्रत्याहारांतील जो वर्ण आणि ह्रस्व उकार इत्संज्ञक ज्याला जोडला आहे असा वर्ण, म्ह. कु चु टु तु पु असा उकार जोडून उच्चारलेला ककार, चकार, वगैरे वर्ण, हा आपल्या सर्व सवर्णांचा ग्राहक होतो. तेव्हां अर्थातच त्याला सांगितलेलें कार्य त्याच्या सर्व सवर्णांना करतां येतें.

**ज्ञापयति न टिता सवर्णानां ग्रहणं भवतीति यदयं ग्रहोऽलिटि दीर्घत्वं शास्ति। नैतदस्ति ज्ञापकम्। नियमार्थमेतत्स्यात्। ग्रहोऽलिटि दीर्घ एवेति। यत्तर्हि वृतो वा [७.२.३८] इति विभाषां शास्ति॥ सर्वेषामेष परिहारः। भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेत्येवं न भविष्यति॥ प्रत्यये भूयान्परिहारः। अनभिधानात्प्रत्ययः सवर्णान्न ग्रहीष्यति। यान्हि प्रत्ययः सवर्णग्रहणेन गृह्णीयान्न तैरर्थस्याभिधानं स्यात्। अनभिधानान्न भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनम्। इह केचित्प्रतीयन्ते केचित्प्रत्याय्यन्ते। ह्रस्वाः प्रतीयन्ते दीर्घाः प्रत्याय्यन्ते। यावद्ब्रूयात्प्रत्याय्यमानेन सवर्णानां ग्रहणं**

---

(७।२।३५) कदाचित् दीर्घ ई वगैरेही आगम होऊं लागतील. कित्आगमाचें उदाहरण-बभूव. येथें सवर्णाचें ग्रहण झालें तर (६।४।८८) कदाचित् सानुनासिक वकारही आगम होईल. मित्आगमाचें उदाहरण—हे अनड्वन्. येथें सवर्णाचें ग्रहण झालें तर (७।१।९९) कदाचित् दीर्घ आ वगैरेही आगम होऊं लागतील.

ठित्आगमाच्या संबंधानें जो दोष दाखविला त्याचा परिहार असा की हा आचार्य पाणिनि ज्या अर्थी 'ग्रहोऽलिटि दीर्घः' (७।२।३७) यानें इट्आगमाला दीर्घ सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की टित्आगमानें सवर्णाचें ग्रहण होत नाहीं.

हें ज्ञापक बरोबर नाहीं. कारण 'ग्रह धातूच्या पुढील लिट्प्रत्ययाशिवाय इतर वलादि आर्धधातुक प्रत्ययाला जर ऱ्हस्व, दीर्घ, वगैरे अनेक प्रकारचा इट् आगम होईल तर दीर्घच ईट् आगम करावा, दुसरा कोणी करूं नये' असा नियम होण्याकरतां तें सूत्र उपयोगीं पडेल.[2]

तर मग त्याच्यापुढील 'वृतो वा' (७।२।३८) यानें जो इट्आगमाला विकल्पानें दीर्घ सांगितला आहे त्या ज्ञापकावरून वरील गोष्ट सिद्ध होईल.

प्रत्यय, आदेश आणि आगम ह्या सर्वांच्याच संबंधानें असा एक परिहार आहे की 'भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न' म्ह. 'ज्याचें ज्या ठिकाणीं विधान केलें असेल तेथें त्यानें सवर्णाचें ग्रहण होत नाहीं' या परिभाषेनें त्या सर्व ठिकाणीं सवर्णाचें ग्रहण होणार नाहीं. त्यांत प्रत्ययासंबंधानें तर दुसरा एक चांगलाच परिहार सांगतां येतो. तो असा की अनभिधानास्तव प्रत्ययानें सवर्णाचें ग्रहण होणार नाहीं, कारण उ वगैरे प्रत्यय ज्या सवर्णाचें म्ह. दीर्घ ऊ वगैरेंचें ग्रहण करील ते दीर्घ ऊ वगैरे प्रत्यय जर चिकीर्षु वगैरे उदाहरणांत केले तर त्यापासून म्ह. चिकीर्षू अशा दीर्घान्त शब्दापासून किंवा चिकीर्षू३ अशा प्लुतान्त शब्दापासून विवक्षित अर्थ मनांत येत नाहीं. तेव्हां तशा ठिकाणीं दीर्घ ऊकार वगैरे प्रत्ययांना अर्थ प्रतिपादन करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें तेथें सवर्णाचें ग्रहण होत नाहीं.(कारण 'प्रत्यय' ही अन्वर्थ संज्ञा आहे. तेव्हां ज्याला अर्थ दाखविण्याचें सामर्थ्य नाहीं त्याला प्रत्ययच म्हणतां येत नाहीं.)

तर मग ह्या सूत्रांतील 'अप्रत्ययः' याचा उपयोग असा समजावा की—ह्या अइउण् इत्यादि अक्षरसमाम्नायामध्यें प्रत्यक्ष उच्चारल्यामुळें कांहीं वर्ण म्ह. ऱ्हस्व वर्ण समजण्यांत येतात. आणि दुसरे कांही वर्ण म्ह. दीर्घ वगैरे हे त्या ऱ्हस्व वर्णांकडून प्रकृत-सूत्राच्या जोरावर समजविण्यांत येणारे 'ते जे समजविण्यांत' येणारे दीर्घ वगैरे वर्ण त्यांनीं पुनः आपल्या सवर्णाचें ग्रहण होईल तें होऊं

---

२. तेव्हां ग्रहधातूशिवाय इतर धातूंच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इट्आगम कदाचित् दीर्घही होईल हा दोष कायम राहतो.

नेति तावदप्रत्यय इति। कं पुनर्दीर्घः सवर्णग्रहणेन गृह्णीयात्। ह्रस्वम्। यत्नाधिक्यान्न ग्रहीष्यति। प्लुतं तर्हि गृह्णीयात्। अनण्त्वान्न ग्रहीष्यति। एवं तर्हि सिद्धे सति यदप्रत्यय इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

## अण्सवर्णस्येति स्वरानुनासिक्यकालभेदात् ॥ १ ॥

अण्सवर्णस्येत्युच्यते। स्वरभेदादानुनासिक्यभेदात्कालभेदाच्चाण्सवर्णान्न गृह्णीयात्। इष्यते च सवर्णग्रहणं स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्येवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

## तत्र प्रत्याहारग्रहणे सवर्णाग्रहणमनुपदेशात् ॥२॥

तत्र प्रत्याहारग्रहणे सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति। अकः सवर्णे दीर्घः [६.१.

---

नये या अर्थानें 'अप्रत्ययः' असें सूत्रांत म्हटलें आहे.

पण 'दीर्घांनीं आपल्या सवर्णांचें ग्रहण होतें' असें म्हटलें तर ते दीर्घ कोणत्या सवर्णांचें ग्रहण करतील बरें?

ऱ्हस्वांचें. (उदा० यूस्त्र्याख्यौ नदी' (१।४।३) येथें उच्चारलेल्या दीर्घ ई, ऊ यांनीं ऱ्हस्व इकार, उकार याचें ग्रहण होईल.)

पण तसें इष्ट असतें तर तेथें पाणिनीनें ऱ्हस्वच उच्चारलें असतें. तेव्हां तसें ऱ्हस्व न उच्चारतां अधिक प्रयत्न करून जें दीर्घ उच्चारलें त्यामुळें दीर्घांनीं ऱ्हस्वांचें ग्रहण होणार नाहीं.

तर मग त्या दीर्घांनीं प्लुतांचें ग्रहण होईल.

पण दीर्घ वर्ण हे मुळीं अण्च जर नव्हेत तर तेथें प्रकृतसूत्र येत नसल्यामुळें त्यांनीं ऱ्हस्वांचें काय, प्लुतांचें काय, कोणाचेंच ग्रहण होणार नाहीं.

तर मग ज्या अर्थीं आचार्य पाणिनि ह्या अशा रीतीनें म्ह. 'भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न' या परिभाषेनें सिद्ध होणाऱ्या गोष्टींपैकींच अप्रत्ययः असा प्रत्ययाचा उल्लेख करून सवर्णग्रहणाचा निषेध सांगतो त्यावरून तो त्या परिभाषेविषयीं आपली संमति आहे असें ज्ञापित करतो असें समजावें.

पण हें सूत्रच मुळीं कशाकरितां बरें केलें आहे?

(वा.१) 'अण् सवर्णांचें ग्रहण करतो' असें जें म्हटलें आहे तें अशाकरितां की उदात्त वगैरे स्वरांमुळें जे वर्ण निराळे दिसतात, तसेंच अनुनासिकामुळें जे वर्ण निराळे दिसतात आणि उच्चारणाला काल कमजास्त लागल्यामुळें जे वर्ण निराळे दिसतात, त्या निराळेपणामुळें सूत्रामध्यें उच्चारलेल्या अणानें त्यांचें ग्रहण होणार नाहीं. आणि इष्ट तर असें आहे की त्यांचें ग्रहण झालें पाहिजे. तेव्हां ही इष्ट गोष्ट त्याकरितां कांहीं तरी विशेष यत्न केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं. म्हणून 'अण् सवर्णांचें ग्रहण करतो' असें येथें म्हटलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा.

---

३. अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें न उच्चारलेला व त्यांत उच्चारलेल्या वर्णापासून प्रतीत होणारा वर्ण हा येथें प्रत्ययशब्दाचा अर्थ आहे असा अभिप्राय आहे.

४. उच्चारणाच्या कालामध्यें कमजास्तपणा होत असल्यामुळें अवर्णाचे प्रत्येकीं ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत असे तीन प्रकार होतात. त्यांचे प्रत्येकीं पुन्हा उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे तीन प्रकार होऊन एकंदर नऊ प्रकार होतात. त्यांचे पुन्हा प्रत्येकीं दोन प्रकार, सानुनासिक आणि निरनुनासिक, असे होऊन एकंदर एका अवर्णाचे अठरा प्रकार होतात. इ, उ व ऋ यांचे तसेच होतात. ऌ दीर्घ नसल्यामुळें त्याचे बारा प्रकार होतात. ए, ओ, ऐ आणि औ यांचे प्रत्येकीं बाराच प्रकार होतात. कारण त्यांना ऱ्हस्व नाहीं.

१०१] इति । किं कारणम् । अनुपदेशात् । यथाजातीयकानां संज्ञा कृता तथाजातीयकानां संप्रत्यायिका स्यात् । ह्रस्वानां च क्रियते ह्रस्वानामेव संप्रत्यायिका स्याद्दीर्घाणां न स्यात् ॥ ननु च ह्रस्वाः प्रतीयमाना दीर्घान्संप्रत्याययिष्यन्ति ।

**ह्रस्वसंप्रत्ययादिति चेदुच्चार्यमाणसंप्रत्यायकत्वाच्छब्दस्यावचनम् ॥३॥**

ह्रस्वसंप्रत्ययादिति चेदुच्चार्यमाणः शब्दः संप्रत्यायको भवति न संप्रतीयमानः। तद्यथा । ऋगित्युक्ते संपाठमात्रं गम्यते नास्या अर्थो गम्यते ॥ एवं तर्हि वर्णपाठ एवोपदेशः करिष्यते ।

**वर्णपाठ उपदेश इति चेदवरकालत्वात्परिभाषाया अनुपदेशः ॥ ४ ॥**

वर्णपाठ उपदेश इति चेदवरकालत्वात्परिभाषाया अनुपदेशः । किं परा सूत्रात्क्रियत इत्यतोऽवरकाला। नेत्याह । सर्वाथावरकालैव । वर्णानामुपदेशस्तावत् । उपदेशोत्तरकालेत्संज्ञा । इत्संज्ञोत्तरकाल आदिरन्त्येन सहेता[१.१.७१]इति प्रत्याहारः। प्रत्याहारोत्तरकाला सवर्णसंज्ञा ।

---

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

(वा.२) प्रत्याहाराचें उच्चारण केलें असेल तेथें सवर्णांचें ग्रहण होणार नाहीं; उदा० 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) येथें अक् या शब्दानें दीर्घ प्लुत यांचें ग्रहण होणार नाहीं.

कां बरें ?

अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें दीर्घ वगैरेंचा उपदेश केला नाहीं म्हणून. अक् ही संज्ञा ज्या प्रकारच्या वर्णांना केली असेल त्या प्रकारचेच वर्ण अक् या शब्दापासून मनांत येतील. अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें ऱ्हस्वच फक्त उच्चारले असल्यामुळें त्या ऱ्हस्वांनाच ती अक्संज्ञा होईल. म्हणून अक् या शब्दापासून ऱ्हस्वांचाच बोध होईल, दीर्घांचा होणार नाहीं.

पण अक्शब्दापासून जरी ऱ्हस्वच फक्त मनांत आले तरी ते ऱ्हस्व प्रकृतसूत्राच्या जोरावर आपल्या सवर्णांचा म्ह. दीर्घ वगैरेंचा बोध करून देतील.

(वा.३) ऱ्हस्वांपासून दीर्घांचा बोध होईल असें म्हणाल तर तसें नाहीं. कारण उच्चारलेला शब्दच आपल्या अर्थाचा बोधक होतो. तेव्हां असे जे उच्चारलेल्या शब्दापासून प्रतीत झालेले शब्द ते त्या ठिकाणीं स्वतः अनुच्चारित असल्यामुळें इतरांचा बोध करून देण्यास समर्थ होत नाहींत; जसें—'ऋक्' हा शब्द उच्चारला असतां त्या शब्दापासून फक्त मंत्रपाठाचा बोध होतो. (त्या मंत्राच्या अर्थाचा तेथें बोध होत नाहीं.)

तर मग अइउण् इत्यादि वर्णपाठामध्येंच उच्चारलेले ऱ्हस्व वर्ण प्रकृतपरिभाषेच्या जोरावर आपल्या सवर्णांचें म्ह. दीर्घ वगैरेंचें ग्रहण करतील. (तेव्हां अक् ही संज्ञा होतांनाच ऱ्हस्वाबरोबरच दीर्घ वगैरेंना होईल.)

(वा.४) वर्णपाठामध्यें प्रकृत परिभाषेमुळें 'ऱ्हस्वांनीं दीर्घ वगैरेंचें ग्रहण होईल' असें म्हणाल तर तसें तेथें दीर्घ वगैरेंचें ग्रहण करतां येणार नाहीं. कारण प्रकृत परिभाषा अलीकडची आहे.

अइउण् इत्यादि सूत्रें महेश्वरानें केल्यानंतर पाणिनीनें हीं सूत्रें केलीं म्हणून 'अणुदित्०' ह्या प्रकृतपरिभाषेला अलीकडची म्हणतां कीं काय ?

तसेंच केवळ समजूं नये. सर्व बाजूंनींच ही परिभाषा अइउण् इत्यादि वर्णपाठापेक्षां अलीकडची आहे. प्रथमतः वर्णांचा अइउण् इत्यादि उपदेश, त्या उपदेशानंतर त्या उपदेशांतील णकार वगैरेंना इत्संज्ञा (१।३।३), इत्संज्ञा झाल्यानंतर त्या इत्संज्ञकाशीं 'आदिरन्त्येन सहेता' (१।१।७१) यानें अच्, हल्, वगैरे प्रत्याहार होतात. अच्, हल्, हे

सवर्णसंज्ञोत्तरकालमणुदित्सवर्णस्य चाप्रत्यय इति । सैषोपदेशोत्तरकालात्वरकाला सती वर्णानामुत्पत्तौ निमित्तत्वाय कल्पयिष्यत इत्येतन्न ॥

**तस्मादुपदेशः ॥ ५ ॥**

तस्मादुपदेशः कर्तव्यः ॥

**तत्रानुवृत्तिनिर्देशे सवर्णाग्रहणमनण्त्वात् ॥६॥**

तत्रानुवृत्तिनिर्देशे सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति । अस्य च्वौ [७.४.३२] यस्येति च [६.४.१४८] । किं कारणम् । अनण्त्वात् । न ह्येतेऽणो येऽनुवृत्तिनिर्देशे । के तर्हि । येऽक्षरसमाम्नाय उपदिश्यन्ते ॥ एवं तर्ह्यनण्त्वादनुवृत्तौ नानुपदेशाच्च प्रत्याहारे न । उच्यते चेदमणसवर्णान्गृह्णातीति । तत्र वचनाद्भविष्यति ॥

**वचनाद्यत्र तन्नास्ति ।**

नेदं वचनाल्लभ्यम् । अस्ति ह्यन्यदे-

---

प्रत्याहार समजल्यानंतर सवर्णसंज्ञा (१।१।९, १०) होते. आणि सवर्णसंज्ञा झाल्यानंतर 'त्या सवर्णांचें ग्रहण करावें' असें 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' या प्रकृत परिभाषेनें सांगण्यांत येणार आहे. तेव्हां वर्णांचा अइउण् इत्यादि उपदेश झाल्यानंतर बऱ्याच वेळानें अस्तित्वांत येणारी म्हणून अलीकडची ही प्रकृत परिभाषा आपल्यापूर्वींच्या अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें दीर्घ वगैरे सवर्णांचें ग्रहण करण्याच्या कामीं उपयोगीं पडेल असें म्हणतां येत नाहीं.

(वा.५) तेव्हां अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें दीर्घ वगैरेंचा उपदेश केला पाहिजे.

(वा.६) ह्या शास्त्रामध्यें वर्णपाठासारखाच पाणिनीनें ज्या ठिकाणीं वर्णांचा स्वरूपानें निर्देश केला असेल तेथें म्ह. 'अस्य च्वौ' (७।४।३२), 'यस्येति च' (६।४।१४८) येथें अ, इ, वगैरे उच्चारलेल्या वर्णांनीं प्रकृत परिभाषेमुळें जें आपआपल्या सवर्णांचें ग्रहण होत असतें तें होणार नाहीं.

कां बरें ?

अनण्त्वात्, म्ह. ते अ, इ, वगैरे वर्ण अण् नव्हेत म्हणून. 'अस्य च्वौ' इत्यादि ठिकाणीं जे अ, इ, इत्यादि वर्ण उच्चारले आहेत ते अइउण् यांतील वर्णांसारखे उच्चारले आहेत. परंतु ते अण् नव्हेत.

मग कोणत्या ठिकाणच्या वर्णांना अण् म्हणावयाचें ?

अइउण् इत्यादि वर्णपाठामध्यें जे उच्चारले आहेत ते अण् होत. (कारण त्या वर्णपाठामध्येंच अपासून णूपर्यंत उच्चारलेल्या वर्णांना अण्संज्ञा (१।१।७१) होत आहे.)

तर मग 'अस्य च्वौ' इत्यादि ठिकाणीं अ वगैरे वर्ण जरी उच्चारले आहेत तरी ते अण् नसल्यामुळें सवर्णांचें ग्रहण करीत नाहींत. आणि जे वर्णपाठांतील अण्, इ, उ, इत्यादि वर्ण अण् आहेत ते 'अकः सवर्णे दीर्घः' (६।१।१०१) इत्यादि ठिकाणीं अक् वगैरे प्रत्याहारशब्दापासून प्रतीत झाले तरी ते तेथें उच्चारले नसल्यामुळें सवर्णांचें ग्रहण करीत नाहींत. आणि 'अणानें सवर्णांचें ग्रहण होतें' असें तर येथें प्रकृतपरिभाषेनें सांगितलें आहे. तेव्हां ह्या परिभाषेच्या सामर्थ्यास्तव 'अस्य च्वौ' इत्यादि ठिकाणीं अणासारख्या वर्णानें सवर्णांचें ग्रहण होईल.

'ह्या परिभाषेच्या सामर्थ्यास्तव अणासारख्या वर्णानें सवर्णांचें ग्रहण होईल' असें म्हणतां येणार नाहीं. कारण परिभाषा व्यर्थ होत नाहीं. ज्या ठिकाणीं ह्या दोन्ही गोष्टी नाहींत म्ह. प्रत्यक्ष अण्च असल्यामुळें अणा-

---

५. 'तुल्यास्य०' (१।१।९) आणि नाज्झलौ (१।१।१०) ह्या दोन सूत्रांवरून 'कोणते वर्ण कोणत्या वर्णाचे सवर्ण होतात आणि कोणते होत नाहींत' हें ठरतें. तेव्हां त्यांत अच्, हल्, या प्रत्याहारांचें उच्चारण केलें असल्यामुळें प्रत्याहार सिद्ध झाल्यानंतरच सवर्णसंज्ञेचा निश्चय होतो.

तस्य वचने प्रयोजनम् । किम् । य एते प्रत्याहाराणामादितो वर्णास्तैः सवर्णानां ग्रहणं यथा स्यात् ॥ एवं तर्हि

**सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यमाकृतिग्रहणात् ॥ ७ ॥**

सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यम् । कुतः । आकृतिग्रहणात् । अवर्णाकृतिरुपदिष्टा सा सर्वमवर्णकुलं ग्रहीष्यति । तथेवर्णाकृतिः । तथोवर्णाकृतिः ॥ ननु चान्याकृतिरकारस्याकारस्य च ।

**अनन्यत्वाच्च ॥ ८ ॥**

अनन्याकृतिरकारस्याकारस्य च ।

**अनेकान्तो ह्यनन्यत्वकरः ॥ ९ ॥**

यो ह्यनेकान्तेन भेदो नासावन्यत्वं करोति । तद्यथा । न यो गोश्च गोश्च भेदः सोऽन्यत्वं करोति । यस्तु खलु गोश्चाश्वस्य च भेदः सोऽन्यत्वं करोति ॥

अपर आह । सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यमाकृतिग्रहणादनन्यत्वम् । सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यम् । आकृतिग्रहणादनन्यत्वं भविष्यति । अनन्याकृतिरकारस्याकारस्य च । अनेकान्तो ह्यनन्यत्वकरः । यो ह्यनेकान्तेन भेदो नासावन्यत्वं करोति । तद्यथा । न यो गोश्च गोश्च भेदः सोऽ-

---

सारखा नाहीं आणि उच्चारित असल्यामुळें अनुच्चारितही नाहीं, त्या ठिकाणीं ह्या प्रकृत-परिभाषेच्या उपयोग होत आहे.

तो कोठें ?

जे हे प्रत्याहाराचे पहिले वर्ण आहेत ते अणूही आहेत आणि उच्चारितही आहेत. त्यांनीं आपल्या सवर्णांचें ग्रहण झालें पाहिजे. (तेव्हां असा चांगला उपयोग ह्या परिभाषेचा संभवत असल्यामुळें अणासारख्या ठिकाणीं ही परिभाषा प्रवृत्त होणार नाहीं आणि 'अस्य च्वौ' या ठिकाणीं सवर्णांचें ग्रहण होणार नाहीं असा दोष येतो).

तर मग—

(वा. ७) ह्या सवर्णग्राहक प्रकृत परिभाषेमध्यें अण् हा शब्द मुळीं घालूंच नये.

कां बरें ?

जातीचें ग्रहण केलें आहे म्हणून. 'अस्य च्वौ' इत्यादि ठिकाणीं अस्य या शब्दानें जी एक प्रकारची अवर्णावरील अत्वजाति दाखविली आहे ती त्या जातीच्या सर्व अवर्णांचें ग्रहण करील. तसेंच 'एरनेकाचो०' (६।४।८१) येथें इवर्णावरील इत्वजाति सर्व इवर्णांचें ग्रहण करील व 'ओः सुपि' (६।४।८२) येथें उवर्णावरील जाति उत्व सर्व उ-वर्णांचें ग्रहण करील.

पण ऱ्हस्व अ याचा आकार निराळा आणि दीर्घ आ याचा आकार निराळा दिसतो ना ?

(वा. ८) अ आणि आ यांमध्यें जाति निराळी नाहीं.

(वा. ९) जो कांहीं अ आणि आ या प्रत्येक व्यक्तीच्या स्वरूपांत थोडा भेद दिसतो त्या भेदामुळें कांहीं त्यांच्या जातीमध्यें निराळेपणा येत नाहीं; जसें बैलांबैलांमध्यें लहान, मोठा, स्थूल, कृश, या भेदांमुळें गोत्वजाति निराळी होत नाहीं. आतां बैल आणि घोडा यांमधील जो भेद त्या भेदामुळें मात्र त्या जातींमध्यें निराळेपणा उत्पन्न होतो.

ह्या वार्तिकांची योजना दुसऱ्या एकानें अशी केली आहे.

ह्या सवर्णग्राहक प्रकृतपरिभाषेमध्यें अण् हा शब्द मुळीं घालूंच नये. कारण सर्व अवर्णांमध्यें अत्वजाति एक असल्यामुळें त्या दृष्टीनें त्या सर्व अवर्णांचें ऐक्य मानतां येईल. अ आणि आ यांमध्यें कांहीं जाति निराळी असत नाहीं.

जो कांहीं अ आणि आ या प्रत्येक व्यक्तीच्या स्वरूपांत थोडा भेद दिसतो त्या भेदामुळें कांहीं त्यांच्या जातीमध्यें निराळेपणा

न्यत्वं करोति । यस्तु खलु गोश्चाश्वस्य च भेदः सोऽन्यत्वं करोति ॥

**तद्वच्च हल्ग्रहणेषु ॥ १० ॥**

एवं च कृत्वा हल्ग्रहणेषु सिद्धं भवति । झलो झलि [८.२.२६] अवात्ताम् अवात्तम् अवात्त । यत्रैतन्नास्त्यणसवर्णान्गृह्णातीति । अनेकान्तो ह्यनन्यत्वकर इत्युक्तार्थम् ॥

**द्रुतविलम्बितयोश्चानुपदेशात् ॥ ११ ॥**

द्रुतविलम्बितयोश्चानुपदेशान्मन्यामह आकृतिग्रहणात्सिद्धमिति । यदयं कस्यांचिद्वृत्तौ वर्णानुपदिश्य सर्वत्र कृती भवति ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**वृत्तिपृथक्त्वं नोपपद्यते ॥ १२ ॥**

वृत्तेस्तु पृथक्त्वं नोपपद्यते ॥

**तस्मात्तत्र तपरनिर्देशात्सिद्धम् ॥ १३ ॥**

तस्मात्तत्र तपरनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । क्रियत एतन्न्यास एव । अतो भिस ऐस् [७.१.९] इति ॥

---

येत नाहीं; जसें बैलांबैलांमध्यें लहान, मोठा, स्थूल, कृश, या भेदांमुळें गोत्वजाति निराळी होत नाहीं. आतां बैल आणि घोडा यांमधील जो भेद त्या भेदामुळें मात्र त्या जातींमध्यें निराळेपणा उत्पन्न होतो.

(वा.१०) आणि याप्रमाणेंच हलांचा निर्देश केला असेल तेथें देखील सिद्ध होतें; उदा० 'झलो झलि'(८।२।२६) येथें झल् या या शब्दानें झल्त्वजाति दाखविली असल्यामुळें अवात्ताम्, अवात्तम्, अवात्त, या उदाहरणांमध्यें दोन तकार हे एकदम झल् या शब्दानें घेतां येतात. आणि त्यांच्यामधील सकाराचा लोप होतो. झल् हे अण् नसल्यामुळें 'अणानें सवर्णांचें ग्रहण होतें' ही प्रकृत परिभाषा तेथें येत नाहीं. (आणि झल् या शब्दानें झल्त्वजाति न दाखवितां व्यक्ति दाखविली आहे असें म्हटलें तर अवात्ताम् येथें दोन तकारव्यक्ति एकदम झल् या शब्दानें घेतां येणार नाहींत. झल् या शब्दानें झल्त्वजाति दाखविली आहे असें घेतलें म्हणजे मात्र हीं उदाहरणें सिद्ध होतात.) कारण हा धातूमधील तकार, हा प्रत्ययांतील तकार, या भेदामुळें कांहीं त्यांच्या जातीमध्यें निराळेपणा येत नाहीं असें आतांच सांगितलें आहे.

(वा.११) शिवाय 'धात्वादेः षः सः' (६।१।६४), 'णो नः' (६।१।६५), इत्यादि सूत्रांमध्यें षः,णः, हे वर्ण मध्यमवृत्तीमध्यें उच्चारले आहेत असें गृहीत धरलें तर द्रुतवृत्तीमध्यें किंवा विलंबित वृत्तीमध्यें ते वर्ण उच्चारले नसल्यामुळें सुनोति, नदति, या उदाहरणांतील ते वर्ण जर द्रुतवृत्तीमध्यें किंवा विलम्बित वृत्तीमध्यें उच्चारले तर त्यांना तीं कार्यें होणार नाहींत; त्यावरून आम्ही असें समजतो की पाणिनीनें षः, णः, हे जातीकडे नजर ठेवूनच उच्चारलें आहेत कारण कोणत्याही एखाद्या वृत्तीमध्यें वर्ण उच्चारला तरी त्यानें सर्व वृत्तींमध्यें काम भागेल असेंच पाणिनि समजत आहे.

जातिपक्ष घेण्याचा हा उपयोग आहे खरा.

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

(वा.१२) जातिपक्ष घेतला तर उच्चारणाच्या वेळामध्यें कमजास्तपणा झाल्यामुळें प्रतीत होणारा वर्णांमधील निराळेपणा कोठेंच पुढें करतां येणार नाहीं. (तेव्हां ऱ्हस्व दीर्घ हा भेद देखील कुचकामाचा होईल आणि ऱ्हस्व अकारापुढील भिस्प्रत्ययाला ऐस् आदेश (७।१।९) रामैः येथें जसा होतो तसा खट्वाभिः येथें दीर्घ आकारापुढील भिस्प्रत्ययालाही होऊं लागेल.)

(वा.१३) तेव्हां तशा ठिकाणीं त्या ऱ्हस्व अकाराच्यापुढें तकार लावून उच्चारण करावें.[६]

---

६. तसें उच्चारण केलें म्हणजे तेथें 'तपरस्तत्कालस्य' या पुढील सूत्रानें फक्त ऱ्हस्वांचेंच ग्रहण होईल.

## तपरस्तत्कालस्य ॥१.१.७०॥

अयुक्तोऽयं निर्देशः । तादित्यनेन कालः प्रतिनिर्दिश्यते तदित्ययं च वर्णः । तत्रायुक्तं वर्णस्य कालेन सह सामानाधिकरण्यम् ॥ कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः । तत्कालकालस्येति । किमिदं तत्कालकालस्येति । तस्य कालस्तत्कालः । तत्कालः कालो यस्य सोऽयं तत्कालकालः । तत्कालकालस्येति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । उष्ट्रमुखमिव मुखमस्य सोऽयमुष्ट्रमुखः । खरमुखः । एवं तत्कालकालस्तत्कालः । तत्कालस्येति ॥ अथवा साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । कालसहचरितो वर्णोऽपि काल एव ॥

किं पुनरिदं नियमार्थमाहोस्वित्प्रापकम् । कथं च नियमार्थं स्यात्कथं वा प्रापकम् । यद्यत्राण्ग्रहणमनुवर्तते ततो

---

तशा ठिकाणीं मुद्दाम निराळा तकार लावावयास नको. कारण आचार्य पाणिनीनें तशा ठिकाणीं म्ह. 'अतो भिस ऐस्' इत्यादि सूत्रामध्यें तकार लावलेलाच आहे.

(सू.७०) ह्या सूत्रामध्यें पाणिनीनें जें 'तत्कालस्य' असें पद घातलें आहे तें बरोबर नाहीं असें दिसतें. कारण त्यांतील 'तत्' या शब्दाचें 'काल' हें विशेष्य आहे. आणि 'तत्' या शब्दानें परामर्श तर वर्णाचा होत आहे. तेव्हां त्या वर्णाचें कालाबरोबर ऐक्य होणें अशक्य आहे.

तर मग सूत्रामध्यें कसें पद घातलें पाहिजे ?

'तत्कालकालस्य' असें पद घातलें पाहिजे.

'तत्कालकालस्य' याचा अर्थ काय ?

त्याचा म्ह. त्या वर्णाचा जो काल म्ह. उच्चारणाचा काल तो तत्काल होय; तो तत्काल आहे काल ज्या वर्णाचा तो वर्ण 'तत्कालकाल' होय; त्या तत्कालकाल वर्णाचा, असा 'तत्कालकालस्य' याचा अर्थ आहे.

तर मग सूत्रामध्यें तसें पद घातलें पाहिजे.

तसें पद घालावयास नको. 'तत्कालस्य' असें जें मूळ पाणिनीनें पद घातलें आहे तें 'तत्कालकालस्य' याच्या अर्थीचेंच घातलें आहे. तत्कालशब्दाचा जो कालशब्दाशीं बहुव्रीहि समास केला आहे त्या तत्काल शब्दांतील उत्तरपदाचा म्ह. कालशब्दाचा लोप येथें केला आहे; जसें उष्ट्रमुखाप्रमाणें आहे मुख ज्याचें त्याला 'उष्ट्रमुख' असें म्हणतात. 'खरमुख' हा ही शब्द तसाच आहे. तसें येथें तत्कालकाल असें म्हणावयाचें तें 'तत्काल' असें म्हणून त्याला पुढें 'तत्कालस्य' असा षष्ठीप्रत्यय लावला आहे. अथवा, ज्या दोन पदार्थांचा निकट संबंध असतो त्या पदार्थांतील एकाचा शब्द दुसऱ्याला लावण्यांत येतो. वर्ण आणि त्याच्या उच्चारणाचा काल यांचा निकट संबंध असल्यामुळें वर्णाचा परामर्श करणारा तत् हा शब्द त्या वर्णाचा उच्चारणकाल या अर्थीं घातला आहे असें समजावें.

पण काय, ह्या सूत्रानें नियम केला आहे किंवा विधि केला आहे ?

नियम कसा संभवतो आणि विधि कसा संभवतो ?

जर पूर्वसूत्रांतून अण् या शब्दाची येथें अनुवृत्ति केली तर हा नियम होईल, म्हणजे अणाच्या जवळ तकार उच्चारला असल्यास तेथें पूर्वसूत्रावरून प्राप्त झालेलें सर्व सवर्णांचें ग्रहण न करतां त्यांतील तत्कालसवर्ण जे असतील तेवढ्यांचेंच फक्त ग्रहण केलें जाईल.

---

१. ज्या वर्णाच्या जवळ, मागें किंवा पुढें तकार उच्चारला असेल त्या वर्णानें आपणाशीं समकाल अशाच सवर्णांचें ग्रहण करावें. ऱ्हस्वांपैकीं उदात्त, अनुदात्त, वगैरे सहा प्रकार एकमेकांशीं समकाल आहेत. तसेच दीर्घांचे सहा प्रकार समजावेत, ऱ्हस्वांशीं दीर्घ मात्र समकाल होत नाहींत. ऱ्हस्वाचें उच्चारण करण्याला जेवढा वेळ लागतो त्यापेक्षां दुप्पट वेळ दीर्घाचे उच्चारणाला लागतो आणि प्लुताच्या उच्चारणाला तिप्पट लागतो.

नियमार्थम् । अथ निवृत्तं ततः प्रापकम् ॥ कश्चात्र विशेषः ।

**तपरस्तत्कालस्येति नियमार्थमिति चेद्दीर्घग्रहणे स्वरभिन्नाग्रहणम् ॥ १ ॥**

तपरस्तत्कालस्येति नियमार्थमिति चेद्दीर्घग्रहणे स्वरभिन्नानां ग्रहणं न प्राप्नोति । केषाम् । उदात्तानुदात्तस्वरितानाम् ॥ अस्तु तर्हि प्रापकम् ।

**प्रापकमिति चेद्ध्रस्वग्रहणे दीर्घप्लुतप्रतिषेधः ॥ २ ॥**

प्रापकमिति चेद्ध्रस्वग्रहणे दीर्घप्लुतयोस्तु प्रतिषेधो वक्तव्यः ॥

**विप्रतिषेधात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अण्सवर्णान्गृह्णातीत्येतदस्तु तपरस्तत्कालस्येति वा तपरस्तत्कालस्येत्येतद्भवति विप्रतिषेधेन । अण्सवर्णान्गृह्णातीत्यस्यावकाशः । ह्रस्वा अतपरा अणः । तपरस्तत्कालस्येत्यस्यावकाशः । दीर्घास्तपराः । ह्रस्वेषु तपरेषूभयं प्राप्नोति । तपरस्तत्कालस्येत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ यद्येवम्

**द्रुतायां तपरकरणे मध्यमविलम्बित-**

---

आणि अण् या शब्दाची अनुवृत्ति केली नाहीं तर हा विधि होईल म्हणजे अणाशिवाय इतराच्या जवळ तकार उच्चारला असल्यास तेथें कोणत्याही सवर्णांचें ग्रहण प्राप्त झालें नाहीं तेथें त्या तकाराच्या जोरावर तत्काल अशा सवर्णांचें ग्रहण केलें जाईल.

ह्या दोहोंमध्यें फरक काय ?

(वा.१) 'तपरस्तत्कालस्य' ह्या प्रकृतसूत्रानें अणाविषयीं सवर्णग्रहणाचा नियम केला आहे असें म्हटलें तर जेथें 'आतः' (६।४।६४) असा दीर्घाला तकार जोडला असेल तेथें सूत्रांत उच्चारलेल्या स्वरापेक्षां निराळ्या स्वरानें युक्त अशा त्या दीर्घांचें ग्रहण होणार नाहीं.

निराळ्या स्वरानें युक्त म्हणजे कसें ?

उदात्त, अनुदात्त , स्वरित आणि अनुनासिक यांपैकीं सूत्रामध्यें जो उच्चारला असेल त्यापेक्षां निराळें.

तर मग ह्या सूत्रानें विधि केला आहे असेंच असूं दे.

(वा.२) विधि केला आहे असें म्हटलें तर ऱ्हस्वाला तकार जोडला असेल तेथें (७।१।९) पूर्वसूत्रानें दीर्घ आणि प्लुत यांचें ग्रहण होऊं लागेल त्याचा निषेध केला पाहिजे.

त्या ठिकाणीं निषेध करावयास नको. कारण—

(वा.३) अत्, इत् , असा ऱ्हस्वाला तकार जोडला असेल तेथें 'अणानें आपल्या सवर्णांचें ग्रहण होतें' असें सांगणारें पूर्वसूत्र प्राप्त होऊं दे. पण तसें 'तपरस्तत्कालस्य' हें देखील तेथें प्राप्त होणारच. तेव्हां त्या दोहोंमध्यें 'तपरस्तत्कालस्य' हें प्रकृतसूत्र पूर्वसूत्राचा परत्वास्तव (१।४।२) बाध करील. 'अणानें सवर्णांचें ग्रहण होतें' असें सांगणाऱ्या पूर्वसूत्राचा उपयोग ऱ्हस्वाला तकार जोडला नसेल तेथें होतो. (उदा० 'अस्य च्वौ' (७।४।३२) येथें ऱ्हस्व हा अण् असल्यामुळें पूर्वसूत्र लागू पडतें. तकार न जोडल्यामुळें हें प्रकृतसूत्र लागू पडत नाहीं). तसाच 'तपरस्तत्कालस्य' या प्रकृतसूत्राचा उपयोग दीर्घाला तकार जोडला असेल तेथें होतो (उदा० 'आतो लोप इटि च' (६।४।६४). येथें दीर्घ हा अण् नसल्यामुळें पूर्वसूत्र लागू पडत नाहीं. तकार जोडला असल्यामुळें प्रकृतसूत्र लागू पडत आहे.) आतां ऱ्हस्वाला तकार जोडला असेल तेथें पूर्वसूत्र आणि हें प्रकृतसूत्र अशीं दोन्ही सूत्रें उपस्थित होतात त्यांमध्यें 'तपरस्तत्कालस्य' ह्यानें पूर्वसूत्राचा परत्वास्तव बाध करून तत्काल अशाच सवर्णांचें ग्रहण होतें.

पण तत्काल अशाच सवर्णांचें ग्रहण झालें तर—

**योरुपसंख्यानं कालभेदात् ॥ ४ ॥**

द्रुतायां तपरकरणे मध्यमविलम्बितयोरुपसंख्यानं कर्तव्यं तथा मध्यमायां द्रुतविलम्बितयोस्तथा विलम्बितायां द्रुतमध्यमयोः । किं पुनः कारणं न सिध्यति । कालभेदात् । ये हि द्रुतायां वृत्तौ वर्णास्त्रिभागाधिकास्ते मध्यमायां ये मध्यमायां वर्णास्त्रिभागाधिकास्ते विलम्बितायाम् ॥

**सिद्धं त्ववस्थिता वर्णा वक्तुश्चिराचिरवचनाद्वृत्तयो विशिष्यन्ते ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अवस्थिता वर्णा द्रुतमध्यमविलम्बितासु । किं कृतस्तर्हि वृत्तिविशेषः। वक्तुश्चिराचिरवचनाद्वृत्तयो विशिष्यन्ते । वक्ता कश्चिदाश्वभिधायी भवति । आशु वर्णानभिधत्ते । कश्चिच्चिरेण कश्चिच्चिरतरेण । तद्यथा । तमेवाध्वानं कश्चिदाशु गच्छति कश्चिच्चिरेण गच्छति

---

(वा.४) सूत्रामध्यें तकार जोडलेल्या वर्णांचें द्रुतवृत्तीमध्यें उच्चारण केलें असेल तर मध्यमवृत्तीमध्यें किंवा विलंबितवृत्तीमध्यें उच्चारलेल्या उदाहरणांत त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य करावें असें निराळें सांगावें लागेल. तसेंच सूत्रांतील उच्चारण मध्यमवृत्तीमध्यें केलें असेल तर द्रुतवृत्तीमध्यें किंवा विलंबित वृत्तीमध्यें उच्चारलेल्या उदाहरणांत त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य करावें असें निराळें सांगावें लागेल आणि सूत्रांतील उच्चारण विलंबितवृत्तीमध्यें केलें असेल तर द्रुतवृत्तीमध्यें किंवा मध्यमवृत्तीमध्यें उच्चारलेल्या उदाहरणांत त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य करावें असें निराळें सांगावें लागेल.

पण तेथें तें कार्य न होण्याचें कारण काय?

कारण असें की 'कालभेदात्' म्ह. सूत्रांतील त्या वर्णाच्या उच्चारणाचा आणि उदाहरणांतील त्याच वर्णाचा उच्चारणाचा काल कमजास्त होत आहे. असें पाहा की, द्रुतवृत्तीमध्यें उच्चारलेले वर्णच जर मध्यमवृत्तीमध्यें उच्चारले तर तेथें द्रुतवृत्तीपेक्षां एकतृतीयांश वेळ जास्त लागतो. तसेंच मध्यमवृत्तीमध्यें उच्चारलेले वर्णच जर विलंबितवृत्तीमध्यें उच्चारले तर तेथें मध्यमवृत्तीपेक्षां एकतृतीयांश वेळ जास्त लागतो.

(वा.५) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

द्रुतवृत्ति, मध्यमवृत्ति आणि विलंबितवृत्ति या तिन्ही वृत्तींमध्यें वर्ण हे एकाच स्वरूपाचे असतात. (तेव्हां अर्थातच त्यांच्या कालांत कमजास्तपणा होत नाहीं.)

तर मग ह्या तिन्ही वृत्तींमध्यें वेळांत फरक कसा होतो ?

एखादा वक्ता जलद बोलणारा असतो.त्याच्या बोलण्यांत वर्ण लवकर उच्चारले जातात[२]. एखादा वक्ता त्याच्यापेक्षां जरा सावकाश बोलतो. एखादा वक्ता त्याच्याहीपेक्षां सावकाश बोलतो आणि एखाद्या वक्त्याला तर बोलण्याला फारच वेळ लागतो; जसें एकाच मार्गानें अनेक लोक जातात, पण त्यांमध्यें एखादा फारच लवकर जातो, एखाद्याला त्याच्यापेक्षां जरा जास्त वेळ लागतो, एखाद्याला त्याच्याहीपेक्षां जास्त वेळ लागतो आणि एखाद्याला तर फारच वेळ लागतो. गाडींतून जाणारा मनुष्य फार लवकर जातो. त्याच्यापेक्षां

---

२. वर्णांचें जें मूळचें नित्य स्वरूप तें उत्पन्न होत नाहीं. व्यञ्जक ध्वनीच्या उच्चारणानें फक्त तें अभिव्यक्त होतें. तेव्हां वृत्तिभेदामुळें व्यञ्जक ध्वनीच्या उच्चारण्याच्या वेळांत फरक झाला तरी त्यानें होणारी वर्णाच्या मूळ स्वरूपाची जी अभिव्यक्ति त्या अभिव्यक्तीचा वेळ तिन्ही वृत्तींमध्यें सारखाच असतो. बोलतांना जो वेळ लागतो त्यापैकीं वर्णांच्या उच्चारणाला कांहीं वेळ जातो आणि कांहीं वेळ दोन वर्णांच्या उच्चारणाच्या मध्यें जातो. अगदीं जलद भाषण केलें तरी दोन वर्णांच्या उच्चारणामध्यें कमींत कमी अर्धमात्रेइतका वेळ जातोच. तो आपल्या समजण्यांतही येत नाहीं.

कश्चिच्चिरतरेण गच्छति । रथिक आशु गच्छत्याश्विकश्चिरेण पदातिश्चिरतरेण ॥

विषम उपन्यासः । अधिकरणमत्राध्वा व्रजतिक्रियायाः । तत्रायुक्तं यदधिकरणस्य वृद्धिह्रासौ स्याताम् ॥ एवं तर्हि स्फोटः शब्दो ध्वनिः शब्दगुणः । कथम् । भेर्याघातवत् । तद्यथा भेर्याघातः । भेरीमाहत्य कश्चिद्विंशतिं पदानि गच्छति कश्चित्त्रिंशत्कश्चिच्चत्वारिंशत् । स्फोटश्च तावानेव भवति ध्वनिकृता वृद्धिः ॥

ध्वनिः स्फोटश्च शब्दानां ध्वनिस्तु खलु लक्ष्यते । अल्पो महांश्च केषांचिदुभयं तत्स्वभावतः ॥

## आदिरन्त्येन सहेता ॥ १.१.७१॥

**आदिरन्त्येन सहेतेत्यसंप्रत्ययः संज्ञिनोऽनिर्देशात् ॥ १ ॥**

आदिरन्त्येन सहेतेत्यसंप्रत्ययः । किं कारणम् । संज्ञिनोऽनिर्देशात् । न हि संज्ञिनो निर्दिश्यन्ते ॥

**सिद्धं त्वादिरिता सह तन्मध्यस्येति वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । आदिरन्त्येन सहेता गृह्यमाणः स्वस्य च रूपस्य ग्राहकस्तन्मध्यानां चेति वक्तव्यम् ।

---

घोड्यावर बसून जाणाऱ्या मनुष्याला जरा जास्त वेळ लागतो. पायानें चालत जाणाऱ्या मनुष्याला त्याच्याहीपेक्षां जास्त वेळ लागतो. आणि लहान मुलाला तर फारच वेळ लागतो.

पण हा दृष्टान्त बरोबर लागू पडत नाहीं. कारण मार्ग हा गमनक्रियेचें फक्त अधिकरण आहे (तो कांहीं त्या गमनक्रियेच्या योगानें उत्पन्न होत नाहीं). तेव्हां गमनक्रियेच्या निरनिराळ्या प्रकारांमुळें त्या अधिकरणामध्यें कमजास्तपणा होणें शक्यच नाहीं. (आणि येथें उच्चारणक्रियेनें वर्ण उत्पन्न होत असल्यामुळें त्या क्रियेच्या निरनिराळ्या प्रकारांमुळें वर्णांच्या उच्चारणकालामध्यें कमजास्तपणा होणें शक्य आहे.)

तर मग येथेंही शब्द नित्यच आहे (तो कांहीं उच्चारणक्रियेनें उत्पन्न होत नाहीं.) उच्चारणक्रियेनें उत्पन्न होणारा जो ध्वनि तो त्या नित्यशब्दाचा व्यंजक आहे.

तो कसा ?

जसा नगारा वाजविणारा माणूस नगारा बाजवून निघाला म्हणजे त्या नगाऱ्याचा नाद ऐकूं येत आहे तोंपर्यंत कोणी वीस पावलें जातो, कोणी तीस पावलें जातो, कोणी चाळीस पावलें जातो (म्हणून त्या आवाजामध्यें फरक होतोच असें नाहीं) तसा येथें नित्यशब्द एका स्वरूपाचाच तिन्ही वृत्तींमध्यें आहे; फक्त ध्वनीच्या भेदामुळें वेळ जास्त लागतो. ध्वनि आणि स्फोट (म्ह.मूळचा नित्यशब्द) असे शब्दाचे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं ध्वनि हा कोणाला लहान, कोणाला मोठा, असा भासतो. त्या दोन्ही गोष्टी त्या ध्वनीच्या स्वभावावर अवलंबून आहेत. (मूळ ध्वनीनें व्यक्त होणारा मूळचा नित्यशब्द सर्वत्र एकस्वरूपाचाच आहे.)

(वा.१) 'आदिरन्त्येन सहेता' या प्रकृत सूत्रापासून कांहींच अर्थाचा बोध होत नाहीं.

कां बरें ?

संज्ञिनोऽनिर्देशात् म्ह. ह्या सूत्रानें सांगितलेली संज्ञा ज्यांना करावयाची असे संज्ञी कोण ते या सूत्रांत दाखविले नाहींत म्हणून.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

अंत्य इत्संज्ञकासहवर्तमान उच्चारलेला आदि हा स्वतःच्या स्वरूपाची आणि आदि व

---

१. एखादा वर्ण, प्रत्यय, धातु, वगैरेंचा समुदाय असा मनांत धरावा की ज्याच्या शेवटचा वर्ण इत्संज्ञक आहे. नंतर त्या समुदायांतील पहिल्या वर्णाला, प्रत्ययाला किंवा धातूला तो शेवटचा इत्संज्ञक वर्ण पुढें जोडून जो शब्द तयार होईल तो शब्द त्या समुदायाची संज्ञा होते.

## संबन्धिशब्दैर्वा तुल्यम् ॥ ३ ॥

संबन्धिशब्दैर्वा तुल्यमेतत् । तद्यथा संबन्धिशब्दाः । मातरि वर्तितव्यं पितरि शुश्रूषितव्यमिति । न चोच्यते स्वस्यां मातरि स्वस्मिन्पितरीति संबन्धाच्च गम्यते या यस्य माता यश्च यस्य पितेति । एवमिहाप्यादिरन्त्य इति संबन्धिशब्दावेतौ । तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यं प्रत्यादिरन्त्य इति च भवति तस्य ग्रहणं भवति स्वस्य च रूपस्येति ॥

## येन विधिस्तदन्तस्य ॥१.१.७२॥

इह कस्मान्न भवति । इको यणचि [६.१.७७] दध्यत्र मध्वत्र । अस्तु । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य भविष्यति । नैवं शक्यम् । येऽनेकाल आदेशास्तेषु दोषः स्यात् । एचोऽयवायावः [६.१.७८] इति । नैष दोषः । यथैव प्रकृतितस्तदन्तविधिर्भवत्येवमादेशतोऽपि भविष्यति । तत्रैजन्तस्यायाद्यन्ता आदेशा भविष्यन्ति ॥ यदि चैवं क्वचिद्वै-

अंत्य या दोहोंच्यामध्यें जे असतील त्यांची संज्ञा होतें असें म्हणावें.

(वा.३) अथवा संबंधी शब्दांप्रमाणें येथें समजावें; जसें लोकामध्यें 'आईच्या पुढें नम्रतेनें वागावें, बापाची सेवा करावी' या वाक्यामध्यें आई, बाप, हे संबंधी शब्द आहेत. तेथें आपली आई, आपला बाप, असें जरी म्हटलें नसलें तरी त्या संबंधी शब्दांच्या जोरावर जी ज्याची आई आणि जो ज्याचा बाप त्यानेंच त्या आईबापांच्या संबंधानें तसें वर्तन ठेवावें असें आपोआपच समजतें. त्याप्रमाणें येथेंही आदि व अंत्य हे संबंधी शब्द आहेत. तेव्हां त्यांच्या त्या संबंधामुळें असें समजतें की हे आदि व अंत्य ज्याचे आहेत त्यांचीच ती संज्ञा होते आणि स्वतःच्या स्वरूपाचीही संज्ञा होते.

(सू.७२) ह्या प्रकृतसूत्रानें 'इको यणचि' (६।१।७७) येथें तदंतविधि कां होतें[2] नाहीं? झाला तर इगंताला म्ह. इक् अंतीं असलेल्या शब्दस्वरूपाला यण् होतो असा अर्थ होईल, आणि दध्यत्र, मध्वत्र, येथें दधि, मधु, ह्या इगंतांला यण् प्राप्त होईल.

तेथें तदंतविधि झाला तर होऊं दे. 'अंत्य अलाचे स्थानीं आदेश होतो' (१।१।५२) या परिभाषेनें दधि, मधु, यांतील शेवटच्या इकाला यण् होईल.

पण असा सर्व ठिकाणीं शेवटच्याच वर्णाला आदेश करणें शक्य नाहीं. कारण 'एचोयवायावः' (६।१।७८) इत्यादि सूत्रांनीं जे अनेकाल् आदेश सांगितले आहेत ते सर्वादेश (१।१।५५) होतील असा दोष येतो.

हा दोष येत नाहीं. कारण जसा एच् या स्थानीच्या संबंधानें तदंतविधि होईल तसा अय् वगैरे आदेशांच्या संबंधानेंही होईल. तेव्हां एजंतशब्दांना अय् वगैरे अंतीं असलेलें शब्द आदेश होतील. म्ह. एकारान्त शब्दाला अय् अंतीं असलेला शब्द आदेश[3] होतो तसेंच ओ, ए, औ, यांविषयीं समजावें.

असें असलें तरी ज्या एखाद्या ठिकाणीं रूपामध्यें फरक होत असेल तेथें दोष येणारच; उदा० ब्रह्मेन्द्रे, ब्रह्मोदकम्. शिवाय अंतरंग-

१. वर्ण, प्रत्यय वगैरे विशेषण जर कोणत्याही विशेष्याला दिलें असेल तर तेथें तें विशेषण अंतीं असलेल्या समुदायाची तें विशेषण संज्ञा होते आणि स्वतःचीही संज्ञा होते.

२. शब्दस्वरूप हें विशेष्य घेऊन ही तदंतविधीची शंका केली आहे. ह्या शब्दशास्त्रामध्यें शब्दस्वरूप हें विशेष्य अध्याहृत सर्वत्र घेतां येतें.

३. हरे एहि येथें 'हरे' या एकारान्त शब्दाला अयु अंतीं असलेला आदेश करावयाचा तो रामय् वगैरे दुसरा कोणी न करतां अत्यंत सदृश असा 'हरय्' हाच आदेश 'स्थानेन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें होतो.

४. येथें ब्रह्म या अकारान्ताहून इन्द्र हा अजादि पुढें असतांना पूर्वपर या दोघांचे स्थानीं 'ब्रह्मेन्द्र' असा एकार हा गुण मध्यें असलेला आदेश झाला पाहिजे. परंतु तदंतविधि झाला तर गुणान्त, म्ह. गुण अंतीं असलेला, आदेश होऊन रूप बिघडेल.

रूप्यं तत्र दोषः स्यात्। अपि चान्तरङ्ग-बहिरङ्गे न प्रकल्पेयाताम्। तत्र को दोषः। स्योनः स्योना। अन्तरङ्गलक्षणस्य यणादेशस्य बहिरङ्गलक्षणो गुणो बाधकः प्रसज्येत। ऊनशब्दं ह्याश्रित्य यणादेशो नशब्दमाश्रित्य गुणः॥ अल्विधिश्च न प्रकल्पेत। द्यौः पन्थाः स इति॥ तस्मात्प्रकृते तदन्तविधिरिति वक्तव्यम्। न वक्तव्यम्। येनेति करण एषा तृतीया। अन्येन चान्यस्य विधिर्भवति। तद्यथा। देवदत्तस्य समाशं शरावैरोदनेन च यज्ञदत्तः प्रतिविधत्ते। तथा संग्रामं हस्त्यश्वरथपदातिभिः। एवमिहाप्यचा धातोर्यतं विधत्ते। अकारेण प्रातिपदिकस्येञं विधत्ते॥

**येन विधिस्तदन्तस्येति चेद्ग्रहणोपाधीनां तदन्तोपाधिप्रसङ्गः॥ १॥**

येन विधिस्तदन्तस्येति चेद्ग्रहणोपाधीनां तदन्तोपाधिताप्रसङ्गः। ये ग्रहणोपाधयस्तेऽपि तदन्तोपाधयः स्युः। तत्र को दोषः। उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात् [६.४.१०६] इत्यसंयोगपूर्वग्रहणमुकारान्तविशेषणं स्यात्। तत्र को दोषः। असंयोगपूर्वग्रहणेनेहैव पर्युदासः स्यात्।

---

बहिरंगभाव पूर्वीप्रमाणें कायम राहणार नाहीं.

मग त्यांत दोष कोणता?

स्योनः स्योना येथें दोष येतो. येथें सिव् धातूहून नप्रत्यय व ऊठ् (६।१।१९) केल्यानंतर 'सिऊ न' अशी स्थिति असतांना गुण (७।३।८६) बहिरंग असल्यामुळें त्याचा बाध करून अंतरंगत्वास्तव इकाराला यण् (६।१।७७) होत असतो, तो आतां उलट यणाचा गुण बाधक होईल. कारण ऊनशब्दाच्या निमित्तानें यण् प्राप्त होतो आणि त्यांतील न-शब्दाच्या निमित्तानें गुण प्राप्त होतो (म्हणून यणापेक्षां गुणच अंतरंग होत आहे). शिवाय अलाचे स्थानीं होणारे आदेश आतां अल् अंतीं असलेल्या शब्दाला होत असल्यामुळें द्यौः पन्थाः सः येथें सुप्रत्ययाचा लोप (६।१।६८) हा अल्विधि कसा तें सांगतां येणार नाहीं. तेव्हां विशेष्य उपस्थित असेल तरच प्रकृतसूत्रानें तदंतविधि होतो असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. ह्या प्रकृतसूत्रामध्यें येन ही तृतीया करण या अर्थी केलेली आहे (२।३।१८). करण म्ह. साधन होय. एका साधनानें दुसऱ्या कोणाला तरी विधि सांगतां येतो; जसें, यज्ञदत्त हा थाळा, भात, वगैरे साधनांनीं देवदत्ताला भोजन देतो. हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ या साधनांनीं युद्ध करतो इत्यादि. तसें ह्या शास्त्रामध्यें आचार्य पाणिनि हा अच् या साधनानें धातूला यत् प्रत्यय पुढें करण्यास सांगतो (३।१।९७). तसेंच अकार या साधनानें प्रातिपदिकाला इञ् प्रत्यय पुढें करण्यास सांगतो (४।१।९). (तेव्हां तेथें अच्, अकार, हीं साधनें असल्यामुळें तेथें प्रकृतसूत्रानें तदंतविधि होतो. 'इको यणचि' इत्यादि ठिकाणीं इकालाच यण्विधि सांगितला आहे. इक् या साधनानें दुसऱ्या कोणाला तरी यण् सांगितला आहे असें येथें म्हणतां येत नाहीं. कारण तसा येथें दुसरा कांहींच शब्द दृष्टीस पडत नाहीं. एकंदरींत विशेष्य असल्याशिवाय तदंतविधि होत नाहीं असें सिद्ध होतें)

(वा. १) 'कोणत्याही विशेष्याला ज्या विशेषणाच्या योगानें कांहीं कार्य सांगितलें जातें तें विशेषण तदंताची संज्ञा होतें' असें म्हटलें तर 'ग्रहणोपाधीनां तदन्तोपाधिताप्रसङ्गः' म्ह. सूत्रामध्यें उच्चारलेल्या अशा त्या विशेषणाला जीं विशेषणें लावलीं असतील तीं तदंताचीं विशेषणें होतील.

मग तसें झालें तर दोष कोणता?

'उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात्' (६।४।१०६)

---

५. ह्या अल्विधीचें उपपादन पूर्वी केलें आहे; सू. ५६ टीप ६ पाहा.

अक्ष्णुहि तक्ष्णुहीति। इह न स्यात्। आप्नुहि शक्नुहीति॥ तथोदोष्ठ्यपूर्वस्य [७.१.१०२] इत्योष्ठ्यपूर्वग्रहणमॄकारान्तविशेषणं स्यात्। तत्र को दोषः। ओष्ठ्यपूर्वग्रहणेनेह च प्रसज्येत। संकीर्णमिति। इह च न स्यात्। निपूर्ताः पिण्डा इति॥

**सिद्धं तु विशेषणविशेष्ययोर्यथेष्टत्वात्॥ २॥**

सिद्धमेतत्। कथम्। यथेष्टं विशेषणविशेष्ययोर्योगो भवति। यावता यथेष्टमिह तावदुतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वादिति नासंयोगपूर्वग्रहणेनोकारान्तं विशेष्यते। किं तर्हि। उकार एव विशेष्यते। उकारो योऽसंयोगपूर्वस्तदन्तात्प्रत्ययादिति॥ तथोदोष्ठ्यपूर्वस्येति नौष्ठ्यपूर्वग्रहणेन ॠकारान्तं विशेष्यते। किं तर्हि। ॠकार एव विशेष्यते। ॠकारो य ओष्ठ्यपूर्वस्तदन्तस्य धातोरिति॥

**समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः॥ ३॥**

समासविधौ प्रत्ययविधौ च प्रतिषेधो वक्तव्यः॥ समासविधौ तावत्। द्वितीया

---

येथें 'असंयोगपूर्व' हें जें उकाराचें विशेषण तें आतां उकारान्ताचें होईल. (कारण प्रकृतसूत्रानें उकार ही उकारान्ताची संज्ञा होत आहे.)

मग तसें झालें तर दोष कोणता ?

'उकाराच्या पूर्वी संयोग असल्यास पुढील हिप्रत्ययाचा लोप होत नाहीं' असा जो 'असंयोगपूर्व' या शब्दानें निषेध केला आहे तो आतां अक्ष्णुहि येथें उकारान्ताच्या, म्ह. नु या प्रत्ययाच्या, पूर्वी क्ष् हा संयोग असल्यामुळें तेथेंच होईल. आणि आप्नुहि, शक्नुहि, येथें उकाराच्या पूर्वी जरी संयोग आहे तरी उकारान्ताच्या, म्ह. नु या प्रत्ययाच्या, पूर्वी संयोग नसल्यामुळें होणार नाहीं. तेव्हां तेथें हिप्रत्ययाचा लोप होऊं लागेल असा दोष येतो. तसेंच 'उदोष्ठ्यपूर्वस्य' (७।१।१०२ येथें 'ओष्ठ्यपूर्व' हें विशेषण ॠकाराचें न होतां ॠकारान्ताचें होईल.

मग तसें झालें तर दोष कोणता ?

दोष असा की संकीर्णम् येथें कॄ, गॄ, या ॠकारान्ताच्या पूर्वी सम् या उपसर्गातील मकार हा ओष्ठस्थानाचा वर्ण असल्यामुळें ॠकाराला उकार आदेश होऊं लागेल आणि निपूर्ताः पिण्डाः येथें पॄधातूंतील ॠकाराच्या पूर्वी पकार हा ओष्ठस्थानाचा वर्ण जरी आहे तरी ॠकारान्ताच्या मॄ, पॄ, या धातूच्या पूर्वी ओष्ठस्थानाचा वर्ण नसल्यामुळें ॠकाराला उकार आदेश होणार नाहीं.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

विशेषण आणि विशेष्य यांचा संबंध आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसा करतां येतो. तेव्हां अमुक विशेषण अमुकाचेंच होईल असा नियम कोठेंही समजूं नये. तेव्हां ही गोष्ट जर आपल्या इच्छेवरच अवलंबून आहे तर 'उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात्' (६।४।१०६) येथें 'असंयोगपूर्व' हें विशेषण उकारान्ताचें करीत नाहीं, तर उकाराचेंच करतों. म्हणजे ज्याच्या पूर्वी संयोग नाहीं असा जो उकार तदंतप्रत्ययाच्या पुढील हिप्रत्ययाचा लुक् होतो असा अर्थ होईल. 'उदोष्ठ्यपूर्वस्य' (७।१।१०२) येथें 'ओष्ठस्थानाचा वर्ण ज्याच्या पूर्वी आहे असा जो ॠकारान्त धातु' असें ओष्ठ्यपूर्व हें विशेषण ॠकारान्ताचें करीत नाहीं तर ॠकाराचेंच करतो. म्हणजे 'ओष्ठस्थानाचा वर्ण ज्याच्या पूर्वी आहे असा जो ॠकार तदंत जो धातु' असा अर्थहोईल.

(वा.३) समासविधायक शास्त्रामध्यें आणि प्रत्ययविधायक शास्त्रामध्यें प्रकृतसूत्रानें तदंतविधि होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे. त्यांपैकीं समासविधायक शास्त्राचें उदाहरण— द्वितीयान्त पूर्वपदाचा जो श्रित वगैरे उत्तरपदाबरोबर सांगितलेला (२।१।२४) तत्पुरुष-

श्रितादिभिः समस्यते । कष्टश्रितः नरकाश्रितः । कष्टं परमाश्रित इत्यत्र मा भूत् ॥ प्रत्ययविधौ । नडस्यापत्यं नाडायनः । इह न भवति । सूत्रनडस्यापत्यं सौत्रनाडिः ॥ किमविशेषेण । नेत्याह ।

**उगिद्वर्णग्रहणवर्जम् ॥ ४ ॥**

उगिद्ग्रहणं वर्णग्रहणं च वर्जयित्वा । उगिद्ग्रहणम् । भवती अतिभवती महती अति महती । वर्णग्रहणम् । अत इञ् [४.१.९५] दाक्षिः प्लाक्षिः ॥ अस्ति चेदानीं कश्चित्केवलोऽकारः प्रातिपदिकं यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । अततेर्डः अः तस्यापत्यम् अत इञ् इः ॥

**अकच्श्नम्वतः सर्वनामाव्ययधातुविधावुपसंख्यानम् ॥५॥**

अकज्वतः सर्वनामाव्ययविधौ श्नम्वतो धातुविधावुपसंख्यानं कर्तव्यम् । अकज्वतः । सर्वके विश्वके । अव्ययविधौ । उच्चकैः नीचकैः । श्नम्वतः । भिनत्ति । छिनत्ति ॥ किं पुनः कारणं

---

समास कष्टं श्रितः कष्टश्रितः, नरकं श्रितः नरकश्रितः, येथें होतो तसा कष्टं परमश्रितः येथें श्रितान्त उत्तरपदाबरोबर न झाला पाहिजे. प्रत्ययविधायक शास्त्राचें उदाहरणः— नड वगैरे शब्दांहून अपत्य या अर्थी सांगितलेला (४।१।९९) फक् प्रत्यय नडस्य अपत्यं नाडायनः येथें होतो तसा सूत्रनडस्यापत्यं सौत्रनाडिः येथें नडशब्दान्ताहून न झाला पाहिजे.

'हा तदंतविधीचा निषेध अमुक प्रकारच्या विशेषणासंबंधानेंच घ्यावयाचा' असा विशेष न मानतां सरसकट सर्व विशेषणासंबंधानें घ्यावयाचा कीं काय?

तसें नाहीं म्हणून वार्तिककार सांगतात.

(वा.४) उगित् असें उच्चारलें असेल किंवा अ, इ वगैरे वर्ण उच्चारले असतील तर ते वगळून इतर विशेषणासंबंधानें तो निषेध घ्याव याचा आहे. (तेव्हां उगित् किंवा वर्ण जर विशेषण होतील तर येथें ते तदंताची संज्ञा होणारच.) उगिताचें उदाहरणः— उगितश्च (४।१।६) या सूत्रानें सांगितलेला ङीप्प्रत्यय भवती, महती येथें भवत्, महत्, या उगित् प्रातिपदिकांहून होतो तसा अतिभवती, अतिमहती, येथें अतिभवत्, अतिमहत्, या उगित् अंतीं असलेल्या प्रातिपदिकाहूनही होतो. वर्णग्रहणाचें उदाहरण अत इञ् (४।१।९५) या सूत्रानें ऱ्हस्व अकाराहून अपत्य या अर्थी सांगितलेला इञ् प्रत्यय दाक्षिः, प्लाक्षिः, येथें दक्ष, प्लक्ष, या ऱ्हस्व अकारान्त प्रातिपदिकाहून होतो.

पण काय हो, 'अत इञ्' येथें तदंतविधि झाला नाहीं तर त्याला उदाहरण मिळण्याकरतां 'अ' एवढेंच केवल प्रातिपदिक आहे काय?

आहे असें म्हणतो. अत्धातूहून डप्रत्यय करून अत् या टीचा लोप झाला म्हणजे केवळ 'अ' एवढें प्रातिपदिक तयार होतें. याहून 'अत इञ्' यानें अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय केला म्हणजे अस्य अपत्यम् इः असें रूप होतें.

(वा.५) अकच् प्रत्ययानें युक्त अशा शब्दस्वरूपाला सर्वनामसंज्ञा आणि अव्ययसंज्ञा होते आणि श्नम् प्रत्ययानें युक्तअशा शब्दस्वरूपाला धातुसंज्ञा होते असें त्या त्या संज्ञा सांगणाऱ्या शास्त्रामध्यें म्हणावें. सर्वके, विश्वके, येथें सर्व आणि विश्व या शब्दांतील शेवटच्या अकाराच्या पूर्वी अकच् (५।३।७१) म्ह. अक् असा प्रत्यय झाल्यानंतर त्या अकच् प्रत्ययानें युक्त अशा सर्वक, विश्वक, या शब्दस्वरूपांना सर्वनामसंज्ञा झाल्यामुळें त्याच्या पुढील जस्प्रत्ययाला शी आदेश (७।१।१७) होतो. तसेंच उच्चकैः, नीचकैः, येथें उच्चैस् आणि नीचैस् या शब्दांतील ऐस् या भागाच्या पूर्वी अकच् प्रत्यय झाल्यानंतर त्या अकच्प्रत्ययानें युक्त अशा उच्चकैस्, नीचकैस्, या शब्दस्वरूपांना अव्ययसंज्ञा (१।१।३७) झाल्यामुळें पुढील सुप्रत्ययाचा लुक् (२।४।८२) होतो. तसेंच

न सिध्यति । इह तस्य वा ग्रहणं भवति तदन्तस्य वा न चेदं तत्रापि तदन्तम् ॥

**सिद्धं तु तदन्तान्तवचनात् ॥ ६ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । तदन्तान्तवचनात् । तदन्तान्तस्येति वक्तव्यम् । किमिदं तदन्तान्तस्येति। तस्यान्तस्तदन्तः। तदन्तोऽन्तो यस्य तादिदं तदन्तान्तम् । तदन्तान्तस्येति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । उष्ट्रमुखमिव मुखमस्योष्ट्रमुखः । खरमुखः । एवमिहापि तदन्तोऽन्तो यस्य तदन्तस्येति ॥

**तदेकदेशविज्ञानाद्वा सिद्धम् ॥ ७ ॥**

तदेकदेशविज्ञानाद्वा पुनः सिद्धमेतत्। तदेकदेशभूतस्तद्ग्रहणेन गृह्यते । तद्यथा। गङ्गा यमुना देवदत्तेति । अनेका नदी गङ्गां यमुनां च प्रविष्टा गङ्गायमुनाग्रहणेन गृह्यते। तथा देवदत्तास्थो गर्भो देवदत्ता-

---

भिनत्ति, छिनत्ति, येथें भिद् आणि छिद् या धातूंतील इकाराच्या पुढें श्नम् म्ह. न असा प्रत्यय झाल्यानंतर त्या श्नम्प्रत्ययानें युक्त अशा भिनद्, छिनद्, या शब्दस्वरूपांना धातुसंज्ञा (१।२।१) झाल्यामुळें अंत्य उदात्त होणें (६।१।१६२) वगैरे कार्यें होतात.

पण या उदाहरणांमध्यें अकच् आणि श्नम् हे प्रत्यय झाल्यानंतर त्या संज्ञा त्यांना न होण्याचें काय बरें कारण असावें ?

कारण असें की ह्या शास्त्रामध्यें उच्चारलेल्या शब्दानें त्याचें म्ह. स्वतःचें ग्रहण होतें आणि प्रकृतसूत्रानें तदंताचें ग्रहण होतें. सर्वनामसंज्ञा सांगतांना गणामध्यें सर्व, विश्व, असे शब्द उच्चारले आहेत. अकच्प्रत्ययानें युक्त सर्वक हा सर्वशब्द नव्हे आणि सर्वशब्दान्तही नव्हे. (तेव्हां सर्वक याला सर्वनामसंज्ञा होणार नाहीं.)

(वा.६) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तदन्तान्तवचनात् म्ह. प्रकृतसूत्रामध्यें ‘तदन्तस्य’ याच्या ऐवजीं ‘तदन्तान्तस्य’ असें म्हणावें.

तदन्तान्तस्य म्हणजे काय ?

त्याचा अंत तो तदंत होय. तो तदंत आहे अंतीं ज्याच्या तें तदन्तान्त शब्दस्वरूप होय. त्या तदंतान्ताचें विशेषणानें ग्रहण[६] होतें असा प्रकृतसूत्राचा अर्थ होय.

तर मग प्रकृतसूत्रामध्यें तसें म्ह. तदन्तान्तस्य असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. प्रकृतसूत्रामध्यें जो तदन्तस्य असा शब्द उच्चारला आहे त्यामध्यें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावें. ज्याप्रमाणें उष्ट्रमुखासारखें ज्याचें मुख आहे त्याला ‘उष्ट्रमुखमुख’ असें न म्हणतां उष्ट्रमुख असेंच म्हणतात, तसेंच खरमुख म्हणतात, त्याप्रमाणें प्रकृतसूत्रामध्येंही तदंत आहे अंत ज्याचा त्याला ‘तदंतान्त’ असें न म्हणतां ‘तदन्त’ असें म्हटलें आहे; त्या तदंताचें म्ह. तदंतान्ताचें विशेषणानें ग्रहण होतें असा प्रकृतसूत्राचा अर्थ होय.

(वा.७) अथवा जो ज्या शब्दामध्यें प्रविष्ट होतो तो त्या शब्दाचा एकदेश असाच समजला जात असल्यामुळें हें सिद्ध होतें. कारण जो ज्या शब्दाचा एकदेशासारखा असतो तो त्या शब्दानेंच घेतला जातो. जसें गंगा, यमुना, देवदत्ता इत्यादि. गंगेमध्यें यमुनेमध्यें अनेक नद्या प्रविष्ट झालेल्या गंगा यमुना अशाच घेतल्या जातात तसेंच देवदत्तानामक स्त्रीच्या उदरामध्यें गर्भ प्रविष्ट झाला असतां त्या गर्भासहित स्त्रीला देवदत्ता असें म्हणतात.

---

६. सर्वशब्दानें सर्वशब्द अंतीं असलेल्या शब्दाचें ग्रहण होतें असें न घेतां सर्वशब्दाचा जो अंत म्ह. अकार तो अंतीं असलेला सर्वकशब्द आहे त्याचें ग्रहण होतें. सर्वक याच्या शेवटीं सर्वशब्द नाहीं पण सर्वशब्दाचा अंत जो अकार तो सर्वक याच्या शेवटीं आहे.

ग्रहणेन गृह्यते ॥ विषम उपन्यासः । इह केचिच्छब्दा अक्तपरिमाणानामर्थानां वाचका भवन्ति य एते संख्याशब्दाः परिमाणशब्दाश्च । पञ्च सप्तेत्येकेनाप्यपाये न भवन्ति । द्रोणः खार्याढकमिति नैवाधिके भवन्ति न न्यूने । केचिद्यावदेव तद्भवति तावदेवाहुर्य एते जातिशब्दा गुणशब्दाश्च । तैलं घृतमिति खार्यामपि भवन्ति द्रोणेऽपि । शुक्लो नीलः कृष्ण इति हिमवत्यपि भवति वटकणिकामात्रेऽपि द्रव्ये । इमाश्चापि संज्ञा अक्तपरिमाणानामर्थानां क्रियन्ते ताः केनाधिकस्य स्युः ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यत इति यदयं नेदमदसोरकोः [७.१.११] इति सककारयोरिदमदसोः प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । इदमदसोः कार्यमुच्यमानं कः प्रसङ्गो यत्सककारयोः स्यात् । पश्यति त्वाचार्यस्तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यत इति ततः सककारयोः प्रतिषेधं शास्ति ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनं सर्वनामाव्ययसंज्ञायाम् ॥ ८ ॥**

सर्वनामाव्ययसंज्ञायां प्रयोजनम् ।

---

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. असें पाहा की कांहीं शब्द नियतस्वरूपाच्याच अर्थांचे वाचक असतात; उदा० संख्याशब्द आणि परिमाणशब्द. पांच, सात, इत्यादि संख्याशब्दांचा प्रयोग एखादा कमी झाला की तेवढ्यानें करतां येत नाहीं. तसेंच द्रोण (अर्धा मण), खारी (दीडमण), आढक (पायली),इत्यादि परिमाणशब्दांचा प्रयोग थोडें कमजास्त झालें की तेवढ्यानें करतां येत नाहीं. कांहीं शब्द असे आहेत की वस्तु थोडी असो, फार असो, ती त्या शब्दानें दाखविली जाते; जसें, तेल, तूप, हे जातिशब्द तेल, तूप, ह्या वस्तूंना दाखवितात. मग त्या वस्तु तेथें खारीभर असोत किंवा द्रोणभर असोत. तसेंच, पांढरा, निळा, काळा, हे गुणशब्द लहान मोठ्या सर्व वस्तूंना दाखवितात, मग त्या वस्तु हिमवान् पर्वतासारख्या मोठ्या असोत किंवा वटबीजासारख्या लहान असोत. ह्या शास्त्रामध्यें सर्वनाम,अव्यय, धातु, या संज्ञा नियतस्वरूप अशा त्या त्या शब्दांना सांगितलेल्या असल्यामुळें त्या स्वरूपामध्यें अकच् वगैरे प्रत्यय होऊन कांहीं अधिक वर्ण दिसतील तर तेथें कारण कशा बरें होतील ?

तर मग ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'नेदमदसोरकोः' (७।१।११) ह्या ऐस्आदेशाच्या निषेध सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'अकोः' असें म्हणून ककारानें युक्त अशा इदम् आणि अदस् या शब्दांना त्यांतून वगळतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो कीं 'जो ज्या शब्दाच्या एकदेशासारखा असतो तो त्या शब्दानेंच घेतला जातो.'

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की इदम् आणि अदस् अशा स्वरूपांच्या शब्दांना जें कांहीं कार्य सांगितलें त्या कार्याचा, ते इदम्, अदस्, शब्द ककारानें युक्त झाल्यामुळें शब्दान्तावर मानलें तर, तेथ कसा बरें संबंध संभवेल ? पण आचार्य पाणिनि असेंच मानतो की 'जो ज्या शब्दाच्या एकदेशासारखा असतो तो त्या शब्दानेंच घेतला जातो' आणि म्हणूनच 'अकोः' असें म्हणून तेथें तेवढे ककारानें युक्त असे इदम् आणि अदस् शब्द मुद्दाम वगळतो.

पण आतां ह्या प्रकृतसूत्राचीं उदाहरणें तरी कोणतीं तीं सांगा बरें ?

(वा.८) सर्वनामसंज्ञा आणि अव्ययसंज्ञा ही ज्या शब्दांना सांगितली आहे ते शब्द अंतीं असलेल्या अशा शब्दांनाही ती संज्ञा होते हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० सर्वे, परमसर्वे; विश्वे, परमविश्वे; उच्चैः, परमोच्चैः;

सर्वे परमसर्वे विश्वे परमविश्वे। उच्चैः परमोच्चैः नीचैः परमनीचैरिति॥

**उपपदविधौ भयाढ्यादिग्रहणम्॥ ९॥**

उपपदविधौ भयाढ्यादिग्रहणं प्रयोजनम्। भयंकरः अभयंकरः। आढ्यंकरणम् स्वाढ्यंकरणम्॥

**ङीब्विधावुगिद्ग्रहणम्॥ १०॥**

ङीब्विधावुगिद्ग्रहणं प्रयोजनम्। भवती अतिभवती। महती अतिमहती॥

**प्रतिषेधे स्वस्रादिग्रहणम्॥ ११॥**

प्रतिषेधे स्वस्रादिग्रहणं प्रयोजनम्। स्वसा परमस्वसा। दुहिता परमदुहिता॥

**अपरिमाणबिस्तादिग्रहणं च प्रतिषेधे॥ १२॥**

अपरिमाणबिस्तादिग्रहणं च प्रतिषेधे प्रयोजनम्। अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि [४.१.२२]। द्विबिस्ता द्विपरमबिस्ता। त्रिबिस्ता त्रिपरमबिस्ता। द्व्याचिता द्विपरमाचिता॥

**दिति॥ १३॥**

दितिग्रहणं च प्रयोजनम्। दितेरपत्यं दैत्यः। अदितेरपत्यमादित्यः। दित्यदित्यादित्य [४.१.८५] इत्यदितिग्रहणं न कर्तव्यं भवति॥

**रोण्या अण्॥ १४॥**

रोण्या अण्ग्रहणं च प्रयोजनम्। आजकरोणः सैंहकरोणः॥

**तस्य च॥ १५॥**

तस्य चेति वक्तव्यम्। रौणः॥ किं पुनः कारणं न सिध्यति। तदन्ताच्च

---

नीचैः, परमनीचैः.

(वा. ९) उपपदविधीमधील भय(३।२।४३), आढ्य(६।२।५६), वगैरे शब्दांनीं तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० भयंकरः, अभयंकरः; आढ्यंकरणम्, स्वाढ्यंकरणम्.

(वा. १०) ङीप्प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रा-(४।१।६) मध्यें उगित् या शब्दानें तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय. उदा० भवती, अतिभवती; महती, अतिमहती.

(वा. ११) ङीप्प्रत्ययाचा निषेध सांगणाऱ्या शास्त्रा-(४।१।१०) मध्यें स्वसृ वगैरे शब्दांनीं तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय—उदा० स्वसा, परमस्वसा; दुहिता, परमदुहिता.

(वा. १२) 'अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि' (४।१।२२) या ङीप्प्रत्ययाच्या निषेध सांगणाऱ्या शास्त्रामध्यें बिस्त वगैरे शब्दांनीं तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृत सूत्राचा उपयोग होय; उदा० द्विबिस्ता, द्विपरमबिस्ता; त्रिबिस्ता, त्रिपरमबिस्ता; द्व्याचिता, द्विपरमाचिता; त्र्याचिता, त्रिपरमाचिता.

(वा. १३) दितिशब्दानें तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० दितेः अपत्यं दैत्यः; अदितेरपत्यम् आदित्यः. तेव्हां दिति या शब्दानेंच अदितिशब्दाचें ग्रहण होत असल्यामुळें 'दित्यदित्यादित्य०' (४।१।८५) या सूत्रामध्यें निराळा अदिति हा शब्द घालावयास नको.

(वा. १४) रोणीशब्दाहून अण् प्रत्यय सांगितला (४।२।७८) आहे तेथें रोणीशब्दानें तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० आजकरोणः, सैंहिकरोणः.

(वा. १५) ज्या शब्दानें तदंताचें ग्रहण होतें त्या शब्दानें त्याचें म्ह. स्वतःचें ग्रहण होतें असें म्हणावें; उदा० रौणः.

पण हें उदाहरण सिद्ध न होण्याचें काय बरें कारण? असें पाहा की प्रकृतसूत्रानें तदंत-

---

७. अमुक शब्द उपपद असतांना अमुक धातूहून अमुक प्रत्यय होतो असे जे विधि त्यांना उपपदविधि म्हणतात. पाणिनीनें असे विधि कर्मण्यण् (३।२।१) या सूत्रापासून पुढें सांगितले आहेत.

तदन्तविधिना सिद्धं केवलाच्च व्यपदेशिवद्भावेन । व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन । किं पुनः कारणं व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन । इह सूत्रान्ताट्ठग्भवति दशान्ताड्डो भवतीति केवलादुत्पत्तिर्मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धमत्र तदन्ताच्च तदन्तविधिना केवलाच्च व्यपदेशिवद्भावेन । सोऽयमेवं सिद्धे सति यदन्तग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः सूत्रान्तादेव दशान्तादेवेति । नात्र तदन्तादुत्पत्तिः प्राप्नोति । इदानीमेव ह्युक्तं समासप्रत्ययविधौ प्रतिषेध इति ॥ सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेनेति यदयं पूर्वादिनिः सपूर्वाच्च [५.२.८६,८७] इत्याह । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । सपूर्वात्पूर्वा-

---

विधि झाल्यामुळें तदंताहून म्ह. आजकरोणी वगैरे शब्दांहून अण्प्रत्यय सिद्ध होत आहे. आणि केवळ 'रोणी' या शब्दाहून व्यपदेशिवद्भावानें अण्प्रत्यय सिद्ध होत आहे.

'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' म्ह. प्रातिपदिकाचें उच्चारण केलें असेल तेथें व्यपदेशिवद्भाव होत नाहीं अशी परिभाषा आहे ना ?

पण 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा तरी मानण्याचें काय कारण ?

कारण असें की सूत्रशब्दांताहून जो ठक्प्रत्यय सांगितला आहे (४।२।६०) तसाच दशान्ताहून डप्रत्यय सांगितला आहे (५।२।४५) तो केवल सूत्रशब्दाहून आणि केवल दशन् शब्दाहून न झाला पाहिजे.

हा त्या परिभाषेचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. जर येथें केवल सूत्र आणि दशन् या शब्दाहून ते प्रत्यय होतील तर त्या सूत्रांमध्यें पाणिनीनें अंत हा शब्दच मुळीं घातला नसता. कारण प्रकृतसूत्रानें तदंतविधि झाल्यामुळें तदंताहून ते प्रत्यय होतील आणि केवल त्या शब्दांहून व्यपदेशिवद्भावानें ते प्रत्यय होतील. तेव्हां अशा रीतीनें सिद्ध होत असतांना हा आचार्य पाणिनि ज्या अर्थी त्या सूत्रांमध्यें अंत असा शब्द उच्चारतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो की येथें 'सूत्रशब्दांताहूनच ठक्प्रत्यय होतो आणि दशन् शब्दांताहूनच डप्रत्यय होतो' म्हणजे केवलाहून होत नाहीं.

पण ह्या सूत्रांमध्यें अंतशब्द घातला नाहीं तर तदंताहून ते प्रत्यय होणार नाहींत. कारण 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' असा तदंतविधीचा निषेध वार्तिककारांनीं आतांच सांगितला आहे. (तेव्हां अशा रीतीनें अंतशब्दाचा उपयोग असल्यामुळें त्याच्या जोरावर 'तदंताहूनच प्रत्यय होतो, केवलाहून होत नाहीं' ही गोष्ट सिद्ध होत नाहीं. म्हणून केवलाहून प्रत्यय न होण्याकरतां 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' या परिभाषेची जरूर आहे असें दिसतें.)

तर मग ती परिभाषा स्वतंत्र सांगितली पाहिजे.

तशी स्वतंत्र सांगावयास नको. हा आचार्य पाणिनि ज्या अर्थीं 'पूर्वादिनिः' (५।२।८६)' 'सपूर्वाच्च' (५।२।८७) अशीं सूत्रें करतो त्यावरूनच तो 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा ज्ञापित करतो. (नाहीं तर 'सपूर्वाच्च' यानेंच व्यपदेशिवद्भावाच्या मदतीनें केवल पूर्वशब्दाहून इनिप्रत्यय सिद्ध होत असल्यामुळें 'पूर्वादिनिः' हें सूत्र व्यर्थ होईल.)

हें ज्ञापक बरोबर नाहीं. कारण 'पूर्वादिनिः' असें म्हणण्याचा निराळा उपयोग आहे.

तो कोणता ?

ज्याच्या पूर्वीं दुसरा एखादा कोणताही शब्द आहे अशा पूर्वशब्दाहून इनिप्रत्यय

---

८. अ.१ पा.१ सू.२१ पृ.२०० पाहा.

दिनिं वक्ष्यामीति । यत्तर्हि योगविभागं करोति । इतरथा हि पूर्वात्सपूर्वादिनिरित्येव ब्रूयात् ॥ किं पुनरयमस्यैव शेषस्तस्य चेति । नेत्याह । यच्चानुक्रान्तं यच्चानुक्रंस्यते सर्वस्यैव शेषस्तस्य चेति ॥

**रथसीताहलेभ्यो यद्विधौ ॥ १६ ॥**

रथसीताहलेभ्यो यद्विधौ प्रयोजनम् । रथ्यः परमरथ्यः । सीत्यम् परमसीत्यम् । हल्याया परमहल्या ॥

**सुसर्वार्धदिक्शब्देभ्यो जनपदस्य ॥ १७ ॥**

सुसर्वार्धदिक्शब्देभ्यो जनपदस्य प्रयोजनम् । सुपाञ्चालकः सुमागधकः । सु ॥ सर्व । सर्वपाञ्चालकः सर्वमागधकः । सर्व ॥ अर्ध । अर्धपाञ्चालकः अर्धमागधकः । अर्ध ॥ दिक्शब्द । पूर्वपाञ्चालकः पूर्वमागधकः ॥

**ऋतोर्वृद्धिमद्विधाववयवानाम् ॥ १८ ॥**

ऋतोर्वृद्धिमद्विधाववयवानां प्रयोजनम् । पूर्वशारदम् अपरशारदम् । पूर्वनैदाघम् अपरनैदाघम् ॥

**ठञ्विधौ संख्यायाः ॥ १९ ॥**

ठञ्विधौ संख्यायाः प्रयोजनम् । द्विषाष्टिकम् पञ्चषाष्टिकम् ॥

**धर्मान्नञः ॥ २० ॥**

धर्मान्नञः प्रयोजनम् । धर्मं चरति धार्मिकः । अधर्मं चरत्याधर्मिकः ।

---

'सपूर्वाच्च' या पुढील सूत्रानें सांगावयाचा आहे (तेव्हां तेथें अनुवृत्ति होण्याकरितां 'पूर्वात् इनिः' असें त्याच्या पूर्वीं म्हटलेंच पाहिजे).

तर मग हा आचार्य पाणिनि ज्या अर्थी 'पूर्वादिनिः' आणि सपूर्वाच्च' अशीं दोन निरनिराळीं सूत्रें करतो त्यावरून तो ही परिभाषा ज्ञापित करतो. नाहीं तर त्यानें 'पूर्वात्सपूर्वादिनिः' असें एकच सूत्र केलें असतें.

पण काय हो, हें जें वार्तिककारांनीं 'तस्य च' असें येथें म्हटलें आहे तें फक्त रोणीशब्दासंबंधानेंच समजावयाचें कीं काय ?

तसें नाहीं. तर जीं प्रकृतसूत्राचीं उदाहरणें वार्तिककारांनीं पूर्वीं दाखविलीं आहेत तशींच जीं पुढें दाखविलीं जाणार आहेत, त्या सर्व ठिकाणीं 'तस्य च' हें समजावें.

(वा. १६) यत् प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें रथ (४।४।७६), सीता (४।४।९१) आणि हल (४।४।९७) या शब्दांनीं तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० रथ्यः, परमरथ्यः; सीत्यम्, परमसीत्यम्; हल्या, परमहल्या.

(वा. १७) सु, सर्व, अर्ध आणि दिक् हे शब्द यांहून पर जो जनपदवाचक शब्द तदंताचें जनपदवाचक शब्दानें (४।२।१२५) ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय. सुशब्दाचें उदाहरण—सुपाञ्चालकः, सुमागधकः; सर्वशब्दाचें उदाहरण—सर्वपाञ्चालकः, सर्वमागधकः; अर्धशब्दाचें उदाहरण— अर्धपाञ्चालकः, अर्धमागधकः; दिक्शब्दाचें उदाहरण— पूर्वपाञ्चालकः, अपरपाञ्चालकः; पूर्वमागधकः, अपरमागधकः.

(वा. १८) वृद्धीला कारणीभूत असा प्रत्यय सांगणाऱ्या (४।३।१६) शास्त्रामध्यें ऋतुवाचक शब्दानें तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय. फक्त त्या तदंतशब्दामध्यें ऋतुवाचक शब्दाच्या मागील पूर्वपद ऋतूच्या अवयवाचें म्ह. ऋतूच्या कांहीं भागाचें निदर्शक असलें पाहिजे; उदा० पूर्वशारदम्, अपरशारदम्; पूर्वनैदाघम्, अपरनैदाघम्.

(वा. १९) ठञ् प्रत्यय कर्तव्य असतांना संख्यावाचक शब्दानें तदंताचें ग्रहण होतें (५।१।५८) हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय. उदा० द्विषाष्टिकम्, पञ्चषाष्टिकम्.

(वा. २०) नञाहून पर जो धर्मशब्द तदं-

अधर्माच्चेति न वक्तव्यं भवति ॥

**पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य च ॥ २१ ॥**

पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य चेति वक्तव्यम् ॥ पदाधिकारे किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनमिष्टकेषीकामालानां चिततूलभारिषु ॥ २२ ॥**

इष्टकचितं चिन्वीत । पक्वेष्टकचितं चिन्वीत । इषीकतूलेन मुञ्जेषीकतूलेन । मालभारिणी कन्या उत्पलमालभारिणी कन्या ॥ अङ्गाधिकारे किं प्रयोजनम् ।

**महदप्स्वसृनप्तृणां दीर्घविधौ ॥ २३ ॥**

महदप्स्वसृनप्तृणां दीर्घविधौ प्रयोजनम् । महान् परममहान् । महत् ॥ अप् । आपस्तिष्ठन्ति स्वापस्तिष्ठन्ति । अप् ॥ स्वसृ । स्वसा स्वसारौ स्वसारः परमस्वसा परमस्वसारौ परमस्वसारः । स्वसृ ॥ नप्तृ । नप्ता नप्तारौ नप्तारः । एवं परमनप्ता परमनप्तारौ परमनप्तारः ॥

**पद्युष्मदस्मदस्थ्याद्यनडुहो नुम् ॥ २४ ॥**

पद्भावः प्रयोजनम् । द्विपदः पश्य । अस्ति चेदानीं कश्चित्केवलः पाच्छब्दो यदर्थो विधिः स्यात् । नास्तीत्याह । एवं

---

ताचें धर्मशब्दानें (४।४।४१) ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय; उदा० धर्मं चरति धार्मिकः, अधर्मं चरति आधर्मिकः. 'धर्मं चरति' (४।४।४१) या सूत्रावर वार्तिककारांनीं जें 'अधर्माच्च' असें म्हटलें आहे तें आतां म्हणावयास नको.

(वा.२१) पदाधिकारामध्यें आणि अंगाधिकारामध्यें सूत्रांत उच्चारलेल्या शब्दानें त्याचें म्ह. स्वतःचें आणि तो शब्द ज्यामध्यें उत्तरपद आहे अशा तदंताचें ग्रहण होतें असें म्हणावें.

असें म्हणण्याचा पदाधिकारामध्यें उपयोग कोणता ?

(वा.२२) 'इष्टकेषीकामालानां चिततूलभारिषु' (६।३।६५) या शास्त्रामध्यें इष्टका वगैरे शब्दांनीं त्यांचें म्ह. स्वतःचें आणि ते इष्टका वगैरे शब्द ज्यामध्यें उत्तरपद आहेत अशा तदंतशब्दांचें ग्रहण होतें हा त्याचा उपयोग होय; उदा० इष्टकचितं चिन्वीत, पक्वेष्टकचितं चिन्वीत; इषीकतूलेन, मुञ्जेषीकतूलेन; मालभारिणी कन्या, उत्पलमालभारिणी कन्या.

अंगाधिकारामध्यें त्याचा उपयोग कोणता ?

(वा.२३) दीर्घ सांगणाऱ्या शास्त्रामध्यें महत् (६।४।१०) अप्, स्वसृ आणि नप्तृ (६।४।११) या शब्दांनीं त्यांचें म्ह. स्वतःचें आणि ते महत् वगैरे शब्द ज्यामध्यें उत्तरपद आहेत अशा तदंतशब्दांचें ग्रहण होतें; हा त्याचा उपयोग होय; महत्शब्दाचें—महान्, परममहान्. अप् शब्दाचें उदाहरण—आपस्तिष्ठन्ति, स्वापस्तिष्ठन्तिः. स्वसृशब्दाचें उदाहरण—स्वसा स्वसारौ स्वसारः, परमस्वसा परमस्वसारौ परमस्वसारः. नप्तृशब्दाचें उदाहरण—नप्ता नप्तारौ नप्तारः; तसेंच परमनप्ता परमनप्तारौ परमनप्तारः .

(वा.२४) पद् आदेश ज्याला सांगितला आहे तो म्ह. पाद् (६।४।१३०) किंवा पाद (६।६।५४) शब्द, तसेंच युष्मद्, अस्मद् (७।१।९३) व अस्थि वगैरे शब्द (७।१।७५), नुम् आगम सांगणाऱ्या शास्त्रामधील (७।१।८२) अनडुह् शब्द या शब्दांनीं त्यांचे म्ह. स्वतःचें आणि ते शब्द ज्यामध्यें उत्तरपद आहेत अशा तदंतशब्दांचें ग्रहण होतें हाही त्याचा उपयोग होय. त्यांपैकीं पद् आदेशाचे उदाहरण—द्विपदः पश्य.

पण केवळ पाद एवढाच शब्द आहे काय की पाद् शब्दानें तदंताचें ग्रहण झालें नाहीं तरी पद् आदेश सांगणारें शास्त्र त्याच्याकरता उपयोगीं पडेल ?

तर्ह्यङ्गाधिकारे प्रयोजनं नास्तीति कृत्वा पदाधिकारस्येदं प्रयोजनमुक्तम् । हिमकाषिहतिषु च [६.३.५४] । यथा पत्काषिणौ पत्काषिण एवं परमपत्काषिणौ परमपत्काषिणः । यदि तर्हि पदाधिकारे पादस्य तदन्तविधिर्भवति पादस्य पदाज्यातिगोपहतेषु [६.३.५२] यथेह भवति । पादेनोपहतं पदोपहतम् । अत्रापि स्यात् । दिग्धपादेनोपहतं दिग्धपादोपहतमिति । एवं तर्ह्यङ्गाधिकार एव प्रयोजनम् । ननु चोक्तं नास्ति केवलः पाच्छब्द इति । अयमस्ति पादयतेरप्रत्ययः पात् । पदा पदे । पद ॥ युष्मद् अस्मद् । यूयम् वयम् अतियूयम् अतिवयम् । अस्थ्यादि । अस्थ्ना दध्ना सक्थ्ना परमास्थ्ना परमदध्ना परमसक्थ्ना ॥ अनडुहो नुम् । अनड्वान् परमानड्वान् ॥

**द्युपथिमथिपुंगोसखिचतुरनडुत्त्रिग्रहणम् ॥ २५ ॥**

द्युपथिमथिपुंगोसखिचतुरनडुत्त्रिग्रहणं प्रयोजनम् । द्यौः सुद्यौः । पन्थाः सुपन्थाः । मन्थाः सुमन्थाः परममन्थाः । पुमान् परमपुमान् । गौः सुगौः । सखा सखायौ सखायः सुसखा सुसखायौ सुसखायः परमसखा परमसखायौ परमसखायः । चत्वारः परमचत्वारः । अनड्वाहः परमानड्वाहः । त्रयाणाम् परमत्रयाणाम् ॥

---

तसा केवळ पाद् एवढा शब्द नाहीं; (आतां पद् आदेश सांगणाऱ्या त्या शास्त्राच्या (६।४।१३०) जोरावरच द्विपदः येथें पद् आदेश सिद्ध होत असल्यामुळें त्या वार्तिकांत पद् असें म्हणण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं; असें म्हणाल तर अंगाधिकारांतील पद्आदेशासंबंधानें त्याचा उपयोग होत नाहीं म्हणून पदाधिकारांतील पद्आदेशासंबंधानें वार्तिककारांनीं पद् असें म्हटलें आहे असें समजा. उदा० 'हिमकाषिहतिषु च' (६।३।५४) यानें सांगितलेला पद् आदेश जसा पत्काषिणौ पत्काषिणः येथें होतो तसा परमपत्काषिणौ परमपत्काषिणः येथेंही होतो.

जर वार्तिकांतील पद्शब्दानें पदाधिकारांतील पद् आदेश घेऊन तेथें 'पादस्य पदाज्यातिगोपहतेषु' (६।३।५२) या मागील सूत्रांतून अनुवृत्त झालेल्या पाद्शब्दानें तदंताचें ग्रहण केलें तर मागील सूत्रामध्येंही पादशब्दानें तदंताचें ग्रहण होईल. आणि जसा पादेन उपहतं पदोपहतम् येथें पादशब्दाला पद-आदेश होतो तसा दिग्धपादेन उपहतं दिग्धपादोपहतम् येथेंही होऊं लागेल.

तर मग वार्तिककारांनीं पद्शब्दानें अंगाधिकारांतीलच पद् आदेश घेऊन उपयोग दाखविला आहे असें समजावें.

पण 'केवळ पाद् एवढाच शब्द नाहीं' असें त्यावर म्हटलें होतें ना ?

म्हटलें होतें खरें, पण केवळ पाद् एवढाच शब्द आहे. पादि या णिच्प्रत्ययांत पद् धातूहून क्विप् प्रत्यय केला म्हणजे णिच्प्रत्ययाचा लोप (६।४।५१) होऊन पाद् असा शब्द सिद्ध होतो. त्याला पद् आदेश (६।४।१३०) होऊन पदः पदा पदे अशीं रूपें होतात. युष्मद्, अस्मद्, शब्दांचीं उदाहरणें—यूयम्, वयम्, परमयूयम्, परमवयम्. अस्थि वगैरे शब्दांचीं उदाहरणें—अस्थ्ना, दध्ना, सक्थ्ना, परमास्थ्ना, परमदध्ना, परमसक्थ्ना. नुम् आगम सांगणाऱ्या शास्त्रांतील अनडुह् शब्दाचें उदाहरण—अनड्वान्, परमानड्वान्.

(वा.२५) दिव् (७।१।८४), पथिन्, मथिन् (७।१।८५), पुम्स् (७।१।८९), गो (७।१।९०), सखि (७।१।९२), चतुर्, अनडुह् (७।१।९८) आणि त्रि (७।१।५३) या शब्दांनीं त्यांचें म्ह. स्वतःचें आणि दिव् वगैरे शब्द ज्यामध्यें उत्तरपद आहेत अशा तदंतशब्दांचें ग्रहण होतें हाही त्याचा उपयोग होय; उदा० द्यौः

**त्यदादिविधिभस्त्रादिस्त्रीग्रहणं च ॥ २६ ॥**

त्यदादिविधिभस्त्रादिस्त्रीग्रहणं च प्रयोजनम् । सः अतिसः । भस्त्रका भस्त्रिका निर्भस्त्रका निर्भस्त्रिका बहुभस्त्रका बहुभस्त्रिका । स्त्रीग्रहणं च प्रयोजनम् । स्त्रियौ स्त्रियः राजस्त्रियौ राजस्त्रियः ॥

**वर्णग्रहणं च सर्वत्र ॥ २७ ॥**

वर्णग्रहणं च सर्वत्र प्रयोजनम् । क्व सर्वत्र । अङ्गाधिकारे चान्यत्र च । अन्यत्रोदाहृतम् । अङ्गाधिकारे । अतो दीर्घो यञि सुपि च [७.३.१०१,१०२] इहैव स्यात् आभ्याम् । घटाभ्यामित्यत्र न स्यात् ॥

**प्रत्ययग्रहणं चापञ्चम्याः ॥ २८ ॥**

प्रत्ययग्रहणं चापञ्चम्याः प्रयोजनम् । यञिञोः फग्भवति । गार्ग्यायणः वात्स्यायनः परमगार्ग्यायणः परमवात्स्यायनः । अपञ्चम्या इति किमर्थम् । दृषत्तीर्णा

---

सुद्यौः, पन्थाः सुपन्थाः, मन्थाः परममन्थाः, पुमान् परमपुमान्, गौः सुगौः, सखा सखायौ सखायः, सुसखा सुसखायौ सुसखायः, परमसखा परमसखायौ परमसखायः, चत्वारः परमचत्वारः, अनड्वाहः परमानड्वाहः, त्रयाणाम् परमत्रयाणाम्.

(वा.२६) त्यदादीनामः (७।२।१०२) यांतील त्यद् वगैरे शब्द, भस्त्रा वगैरे शब्द (७।३।४७) आणि स्त्रीशब्द (६।४।७९) यांनीं त्यांचें म्ह. स्वतःचें आणि ते, त्यद् वगैरे शब्द, ज्यामध्यें उत्तरपद आहेत अशा तदंतशब्दांचें ग्रहण होतें हाही त्याचा उपयोग होय; उदा० सः अतिसः, भस्त्रका भस्त्रिका, बहुभस्त्रका बहुभस्त्रिका, निर्भस्त्रका निर्भस्त्रिका. तसाच स्त्रीशब्दासंबंधानेंही उपयोग होतो—स्त्रियौ स्त्रियः, राजस्त्रियौ राजस्त्रियः.

(वा.२७) वर्णाचें उच्चारण केलें असेल तेथें त्या वर्णानें तदंताचें ग्रहण होतें हा उपयोग सर्व ठिकाणींच आहे.

सर्व ठिकाणीं तें कोठें ?

अंगाधिकारामध्येंच असें नाहीं, तर इतर ठिकाणीं सुद्धां. त्यांपैकीं इतर ठिकाणचें उदाहरण 'अत इञ्' हें पूर्वीच दाखविलें आहे. आतां अंगाधिकारांतील वर्णग्रहणाचें उदाहरण सांगतों— 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१) या सूत्रांतून अतः याची अनुवृत्ति 'सुपि च' (७।३।१०२) येथें होत आहे. त्या अतः यानें म्ह. ऱ्हस्व अकारानें जर तदंताचें ग्रहण झालें नाहीं तर आभ्याम् येथेंच फक्त त्या सूत्रानें दीर्घ होईल, घटाभ्याम् येथें होणार नाहीं.

(वा.२८) प्रत्ययाचें उच्चारण जेथें केलें असेल तेथें त्या प्रत्ययानें तदंताचें ग्रहण होतें हा प्रकृतसूत्राचा उपयोग होय. फक्त तेथें त्या प्रत्ययावर कोणत्याही पंचम्यंतपदाचा अन्वय नसला पाहिजे. 'यञिञोः' (४।१।१०१) यानें फक्प्रत्यय सांगितला आहे. तेथें यञ्, इञ्, या प्रत्ययांनीं तदंताचें ग्रहण केलें असल्यामुळें गार्ग्यायणः वात्स्यायनः, परमगार्ग्यायणः परमवात्स्यायनः, या उदाहरणांमध्यें गार्ग्य, वात्स्य, या यञ्प्रत्ययान्त शब्दांहून फक्[१]

---

१. गर्ग, वत्स या शब्दांहून गोत्रापत्य या अर्थी यञ् प्रत्यय (४।१।१०५) केला आहे त्या यञ्प्रत्ययान्त अशा गार्ग्य, वात्स्य, या शब्दांहून युवापत्य या अर्थी फक् प्रत्यय होऊन त्याला आयन् आदेश (७।१।२) झाला आहे. ज्या ठिकाणीं प्रत्ययानें तदंताचें ग्रहण होतें तेथें तो प्रत्यय अंतीं असलेल्या वाटेल तेवढ्या शब्दस्वरूपाचें ग्रहण होत नाहीं. फक्त तो प्रत्यय ज्याहून केला तो आदि त्या शब्दस्वरूपाचा असला पाहिजे. याच अर्थाची 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम्' अशी परिभाषा आहे. तेव्हां परमगार्ग्यायणः येथेंही परमगार्ग्य हे यञ्प्रत्ययान्त म्हणून घेतां येत नाहीं. गार्ग्य हेंच यञ्प्रत्ययान्त होय. म्हणून तेथेंही गार्ग्य याहूनच फक् प्रत्यय झाला. जर परमगार्ग्य याहून फक् प्रत्यय झाला असता तर त्याच्या आदि अचाला वृद्धि (७।२।११७) होऊन पारमगार्ग्यायण असें भलतेंच रूप झालें असतें.

परिषत्तीर्णा ॥ अलैवानर्थकेन नान्येनार्थकेनेति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । हन्ग्रहणे प्लीहन्ग्रहणं मा भूत् । उद्ग्रहणे गर्मुद्ग्रहणं । स्त्रीग्रहणे शस्त्रीग्रहणम् । संग्रहणे पायसं करोतीति मा भूत् ॥ किमर्थमिदमुच्यते न पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य चेत्येव सिद्धं न चेदं तत्रापि तदुत्तरपदम् । तत्र वक्तव्यं भवति ॥ किं पुनरत्र ज्यायः । तदन्तविधिरेव ज्यायान् । इदमपि सिद्धं भवति । परमातिमहान् ।

---

प्रत्यय होतो. तसेंच, दाक्षायणः, परमदाक्षायणः, या उदाहरणांमध्यें दाक्षि या इञ्प्रत्ययान्त शब्दाहून फक् प्रत्यय होतो.

'त्या प्रत्ययावर कोणत्याही पंचम्यंतपदाचा अन्वय नसला पाहिजे' असें कशाकरतां म्हटलें आहे ?

दृषत्तीर्णा[10], परिषत्तीर्णा, येथें दोष येऊं नये म्हणून तसें म्हटलें आहे.

विशेषणानें तदंताचें ग्रहण होतें, पण तो त्या तदंतशब्दांतील शेवटचा भाग अनर्थक नसला पाहिजे. फक्त एका वर्णानें जेथें तदंताचें ग्रहण होतें तेथें मात्र 'तो त्या तदंतशब्दांतील शेवटचा वर्ण अनर्थक असला तरी चालेल' असें म्हटलें पाहिजे.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा की हन् (६।४।१२) या शब्दानें तदंताचें ग्रहण[11] झालें तरी 'प्लीहन्' या तदंतशब्दाचें ग्रहण होऊं नये; तसेंच 'उद्' (८।४।६१) या शब्दानें 'गर्मुद्' या तदंत शब्दाचें ग्रहण होऊं नये; 'स्त्री' (६।४।६९) या शब्दानें 'शस्त्री'या तदंतशब्दाचें ग्रहण होऊं नये; 'सम्' (६।१।१३७) या शब्दानें 'पायसम्' या तदंतशब्दाचें ग्रहण होऊं नये.

पण 'अलैवानर्थकेन०' असें निराळें वचन कशाकरतां बरें केलें पाहिजे ? तसें निराळें वचन करावयास नको. 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य च' या पूर्वीच्या वार्तिकानेंच हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत. कारण 'प्लीहन्' हे हन् ही नव्हे आणि प्लीहन् यांतील हन् हें उत्तरपदही[12] नाहीं. याप्रमाणेंच इतर ठिकाणीं समजावें.

पण 'अलैवानर्थकेन०' हें वचन केलें म्हणजे 'पदाङ्गाधिकारे०' हें वार्तिक करावयास नको. (एकंदरींत दोहोंपैकीं कोणतें तरी एक केलें पाहिजे.)

आतां या दोहोंमध्यें कोणतें एक करावें हें बरें ?

'अलैवानर्थकेन०' यानें मोघम तदंतविधि सांगणें हें बरें. कारण महत् (६।४।१०) शब्दानें मोघम तदंतशब्दस्वरूपाचें ग्रहण होत असल्यामुळें परमातिमहान्[13] हें उदाहरण सिद्ध होत आहे. (पदाङ्गाधिकारे तस्य च तदुत्तरपदस्य च' हें वार्तिक घेतलें असतां येथें दीर्घ होणार नाहीं.) कारण 'परमातिमहत्' हा महत् शब्द नव्हे.

---

१०. 'रदाभ्यां निष्ठा०' (८।२।४२) येथें रदाभ्याम् या पंचम्यंत पदाचा निष्ठा या प्रत्ययावर अन्वय असल्यामुळें निष्ठाप्रत्ययानें निष्ठाप्रत्ययान्ताचें ग्रहण होत नाहीं. नाहीं तर दृषत्तीर्णा येथें 'तीर्ण' हें निष्ठाप्रत्ययांत असल्यामुळें त्याच्या आरंभींच्या तकाराला 'रदाभ्यां०' या सूत्रानें नकार आदेश होऊं लागेल.

११. वृत्रहन्शब्दांतील हन् याला अर्थ आहे म्हणून हन् यानें वृत्रहन् या तदंताचें ग्रहण होतें; प्लीहन् या तदंताचें ग्रहण होत नाहीं. प्लिह्धातूहून कनिन् प्रत्यय केला असल्यामुळें त्यांतील हन् याला कांहींच अर्थ नाहीं. तसेंच गर्मुद् यांतील उद्, शस्त्री यांतील स्त्री आणि पायसम् यांतील सम् या भागांना कांहींच अर्थ नाहीं.

१२. उत्तरपद हें अनर्थक कुठेंच नसतें. कारण समासांतील पुढच्या पदाला उत्तरपद म्हणतात. आणि समास हा अर्थवानाचा अर्थवानाशींच होत असतो.

१३. अतिशब्दाचा महत्शब्दाशीं समास होऊन नंतर त्या अतिमहत्शब्दाबरोबर परमशब्दाचा समास झाला आहे. तेव्हां अतिमहत्शब्दामध्यें महत् हें उत्तरपद असल्यामुळें अतिमहान् येथें दीर्घ होईल. परंतु परमातिमहत्शब्दामध्यें अतिमहत् हें उत्तरपद आहे, महत् हें त्यामध्यें उत्तरपद नाहीं म्हणून तेथें दीर्घ होणार नाहीं.

एताद्धि नैव तन्नापि तदुत्तरपदम् ॥ अनिनस्मन्ग्रहणानि चार्थवता चानर्थकेन च तदन्तविधिं प्रयोजयन्ति । अन् । राज्ञेत्यर्थवता साम्नेत्यनर्थकेन । अन् ॥ इन् । दण्डीत्यर्थवता वाग्मीत्यनर्थकेन । इन् ॥ अस् । सुपया इत्यर्थवता सुस्रोता इत्यनर्थकेन । अस् ॥ मन् । सुशर्मेत्यर्थवता सुप्रथिमेत्यनर्थकेन । मन् ॥

**यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे ॥२९॥**

अल्ग्रहणेषु यस्मिन्विधिस्तदादाविति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ [६.४.७७] इतीहैव स्यात् श्रियौ भ्रुवौ । श्रियः भ्रुव इत्यत्र न स्यात् ॥

## वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम् ॥ १.१.७३ ॥

वृद्धिग्रहणं किमर्थम् । यस्याचामादिस्तद्वृद्धमितीयत्युच्यमाने दात्ताः रक्षिताः अत्रापि प्रसज्येत । वृद्धिग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ यस्यग्रहणं

---

आणि त्यामध्यें महत्शब्द उत्तरपदही नाहीं.

अन् (६।४।१३४), इन् (६।४।१२), अस् (६।४।१४) आणि मन् (४।१।११) ह्या शब्दांनीं तदंताचें ग्रहण होतें तेथें त्या तदंत-शब्दांतील जो अन्, इन्, अस् आणि मन् हा शेवटचा भाग तो अर्थवान् असो अथवा अनर्थक असो कसाही चालेल. अन् याचें उदाहरण— राज्ञा येथें राजन्शब्दांतील अन् (उणा.१।१५४) हा अर्थवान् आहे. साम्ना येथें सामन् शब्दांतील अन् (उणा.४।१५२) हा अनर्थक आहे. (दोन्ही ठिकाणीं त्यांतील अकाराचा लोप (६।४।१३४) होतो.) इन् याचें उदाहरण— दण्डी येथें दण्डिन् शब्दांतील इन् हा अर्थवान् (५।२।११५) आहे. वाग्मी येथें वाग्मिन्शब्दांतील इन् हा अनर्थक आहे (५।२।१२४). दोन्ही ठिकाणीं दीर्घ (६।४।१२) होतो. अस् याचें उदाहरण— सुपयाः. येथें पयस्शब्दांतील अस् (उणा. ४।१८८) हा अर्थवान् आहे. सुस्रोताः येथें स्रोतस्शब्दांतील अस् (उणा. ४।२०१) हा अनर्थक आहे. (दोन्ही ठिकाणीं दीर्घ (६।४।१४) होतो.) मन् याचें उदाहरण— सुशर्मा. येथें शर्मन्शब्दांतील मन् (३।२।७५) हा अर्थवान् आहे. सुप्रथिमा येथें प्रथिमन् शब्दांतील मन् हा अनर्थक (५।१।१२२) आहे. (दोन्ही ठिकाणीं ङीप् प्रत्ययाचा निषेध [४।१।११] होतो.)

(वा.२९) जो अल् पुढें असतांना एखादा विधि सांगितला जातो त्या अलानें तदादीचें म्ह. अल् ज्याच्या आरंभीं आहे अशा समुदायाचें ग्रहण होतें असें म्हणावें.

याचा उपयोग कोणता ?

उपयोग असा की असें म्हटलें नाहीं तर अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ' (६।४।७७) या सूत्रानें सांगितलेले इयङ्, उवङ्, हे आदेश श्रियौ, भ्रुवौ, येथें अच् पुढें असल्यामुळें होतील. श्रियः, भ्रुवः, येथें होणार[१४] नाहींत.

(सू.७३) ह्या सूत्रामध्यें वृद्धि हा शब्द कशाकरतां घेतला आहे ?

'यस्याचामादिस्तद्वृद्धम्' एवढेंच सूत्र केलें तर[२] दात्ताः, राक्षिताः, येथें दत्त, रक्षित, या शब्दांना वृद्धसंज्ञा होऊं लागेल. ह्या सूत्रामध्यें वृद्धि हा शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

---

**१४.** कारण येथें अस्प्रत्यय अजादि आहे; अच्-स्वरूप नाही.

१. ज्या शब्दांतील अचांपैकीं पहिला अच् वृद्धि-संज्ञक आहे त्या शब्दाला वृद्ध अशी संज्ञा होते.

२. वृद्धिशब्द नसला तर सूत्राचा अर्थ असा होईल...'ज्या शब्दांतील अचांच्या प्रारंभीं दुसरा कोणी तरी म्ह. हल् आहे त्या शब्दाला वृद्धसंज्ञा होते.' अथवा 'ज्या शब्दांतील अचांपैकीं आदि हा आदि म्ह. अ पहिला वर्ण आहे त्या शब्दाला वृद्ध-संज्ञा होते' असाही अर्थ होईल.

किमर्थम् । यस्येति व्यपदेशाय ॥ अथाज्ग्रहणं किमर्थम् । वृद्धिर्यस्यादिस्तद्वृद्धमितीयत्युच्यमान इहैव स्यात् । ऐतिकायनीयाः आपगवीयाः । इह न स्यात् । गार्गीयाः वात्सीया इति । अज्ग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथादिग्रहणं किमर्थम् । वृद्धिर्यस्याचां तद्वृद्धमितीयत्युच्यमाने सभासंनयने भवः साभासंनयन इत्यत्र प्रसज्येत। आदिग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥

**वृद्धसंज्ञायामजसंनिवेशादनादित्वम् १**

वृद्धसंज्ञायामजसंनिवेशादादिरित्येतन्नोपपद्यते । न ह्यचां संनिवेशोऽस्ति ॥ ननु चैवं विज्ञायतेऽजेवादिरजादेरिति । नैवं शक्यम् । इहैव प्रसज्येत । औपगवीयाः । इह न स्यात् । गार्गीया इति ॥ एकान्तादित्वं तर्हि विज्ञायते ।

**एकान्तादित्वे च सर्वप्रसङ्गः ॥ २ ॥**

इहापि प्रसज्येत । सभासंनयने भवः साभासंनयन इति ॥

**सिद्धमजाकृतिनिर्देशात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अजाकृतिर्निर्दि-

---

आतां ह्या सूत्रामध्यें यस्य हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

ह्या प्रकृतसूत्रानें सांगितलेली जी वृद्धसंज्ञा ती कोणाला करावयाची तें समजण्याकरतां तो शब्द घातला आहे.

आतां ह्या सूत्रामध्यें अचाम् हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

'वृद्धिर्यस्यादिस्तद्वृद्धम्' एवढेंच सूत्र केलें तर ऐतिकायनीयाः, औपगवीयाः, इत्यादि ठिकाणींच फक्त ऐतिकायन, औपगव, अशा शब्दांना वृद्धसंज्ञा होईल. आणि गार्गीयाः, वात्सीयाः, येथें गार्ग्य, वात्स्य, यांना वृद्धसंज्ञा होणार नाहीं.[३] सूत्रामध्यें अचाम् असें म्हटलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां ह्या सूत्रामध्यें आदि हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

'वृद्धिर्यस्याचां तद्वृद्धम्' एवढेंच सूत्र केलें तर सभासंनयने भवः साभासंनयनः येथें 'संभासंनयन' शब्दालाही वृद्धसंज्ञा होऊं लागेल. आदिशब्द सूत्रामध्यें घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

(वा.१) ह्या वृद्धसंज्ञा सांगणाऱ्या शास्त्रामध्यें 'अचांपैकीं आदि' असें जें म्हटलें आहे[४] तें जुळत नाहीं. कारण 'अजसंनिवेशात्' म्ह. नुसते अनेक अच्च एके ठिकाणीं जुळून बसलेले कोणत्याही शब्दामध्यें दिसत नाहींत.

'ज्या शब्दाचा आदि वृद्धि आहे आणि तो अचांपैकींच आहे म्ह. अर्थात् अच्च आहे त्या शब्दाला वृद्धसंज्ञा होते' असा अर्थ करतां येईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर औपगवीयाः येथेंच औपगव याला वृद्धसंज्ञा होईल. गार्गीयाः येथें गार्ग्य याला होणार नाहीं.

तर मग शब्दाचा आदि न घेतां शब्दाचे अवयव अशा भागाचा आदि घेऊं.

(२) अवयवाचा आदि घेतला[६] तर प्रायः सर्वच ठिकाणीं वृद्धसंज्ञा होऊं लागेल. सभासंनयने भवः साभासंनयनः येथेंही सभासंनयन शब्दाला वृद्धसंज्ञा होऊं लागेल.

---

३. कारण गार्ग्य, वात्स्य, या शब्दांतील आदिवर्ण गकार, वकार हे आहेत. ते वृद्धिसंज्ञक नव्हेत.

४. 'अचांपैकीं आदि' असें म्हटलें असतां 'जे सगळे अच् आहेत त्यांतील आदि' असा सहजच अर्थ मनांत येतो.

५. अचांपैकींच आहे म्ह. 'मूळ अचांपैकीं.' अइउण् इत्यादि अक्षरसमाम्नायामध्ये उच्चारलेले अच् ते मूळ अच् होत. असा अर्थ घेतला नाहीं तर 'अचांपैकींच आहे' हे शब्द व्यर्थ होतील.

६. गार्ग्यशब्दांतील 'आर्ग्य' या भागाचा आदि आकार आहे.

श्यते ॥ एवमपि व्यञ्जनैर्व्यवहितत्वान्न प्राप्नोति ।

**व्यञ्जनस्याविद्यमानत्वं यथान्यत्र ॥४॥**

व्यञ्जनस्याविद्यमानवद्भावो वक्तव्यो यथान्यत्रापि व्यञ्जनस्याविद्यमानवद्भावो भवति । क्वान्यत्र । स्वरे ॥

**वा नामधेयस्य ॥ ५ ॥**

वा नामधेयस्य वृद्धसंज्ञा वक्तव्या । देवदत्तीयाः दैवदत्ताः । यज्ञदत्तीयाः याज्ञदत्ताः ॥

**गोत्रोत्तरपदस्य च ॥ ६ ॥**

गोत्रोत्तरपदस्य च वृद्धसंज्ञा वक्तव्या । कम्बलचारायणीयाः ओदनपाणिनीयाः घृतरौढीयाः ॥

**गोत्रान्ताद्वासमस्तवत् ॥ ७ ॥**

गोत्रान्ताद्वासमस्तवत्प्रत्ययो भवतीति वक्तव्यम् । एतान्येवोदाहरणानि ॥ किमविशेषेण । नेत्याह ।

**जिह्वाकात्यहरितकात्यवर्जम् ॥ ८ ॥**

जिह्वाकात्यं हरितकात्यं च वर्जयित्वा । जैह्वाकाताः हारितकाताः । किं पुनरत्र ज्यायः । गोत्रान्ताद्वासमस्तवदित्येव

---

(३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

शब्दांतील स्वर, व्यंजनें, मिळून जो एक प्रकारचा शब्दाचा आकार बनलेला असतो त्यापैकीं स्वररूपी आकाराचा येथें अचाम् यानें निर्देश केला आहे.

पण तसे घेतले तरी वृद्धसंज्ञा होणार नाहीं. कारण शब्दामध्यें जीं व्यंजनें आहेत तीं आड येतील त्याचीं वाट काय ?

(वा.४) व्यंजनें हीं नसल्यासारखींच समजावींत असें येथें म्हटलें पाहिजे. जसें इतर ठिकाणींही व्यंजनें नसल्यासारखींच समजलीं जातात तसेंच येथें होय.

इतर ठिकाणीं तें कोठें बरें ?

उदात्त वगैरे स्वर कर्तव्य असतांना.

(वा.५) जो शब्द एखाद्या मनुष्याचें नांव म्हणून ठेवलें जातें त्या शब्दाला वृद्धसंज्ञा विकल्पानें होते; उदा० देवदत्तीयाः दैवदत्ताः, यज्ञदत्तीयाः याज्ञदत्ताः.

(वा.६) ज्या शब्दांतील उत्तरपद गोत्रप्रत्ययांत आहे त्या शब्दाला वृद्धसंज्ञा होते असें म्हणावें; उदाहरण— कम्बलचारायणीयाः, ओदनपाणिनीयाः, घृतरौढीयाः.

(वा.७) अथवा ज्या शब्दांतील उत्तरपद गोत्र प्रत्ययांत आहे त्या शब्दाला वृद्धसंज्ञा न सांगतां फक्त इतकेंच म्हणावें की समास गोत्रें नसेल येथें त्या गोत्रप्रत्ययान्त शब्दांहून हे प्रत्यय होतात; तेच प्रत्यय त्या गोत्रप्रत्ययांताचा मागील पूर्वपदाबरोबर समास केला असतांही त्या सामासिक शब्दांहून होतात.' उदाहरणें पूर्वी दिलींच आहेत.

कसेंही म्हटलें तरी ते सरसकट वाटेल त्या गोत्रप्रत्ययांत शब्दासंबंधानें समजावयाचें कीं काय ?

तसें नाहीं म्हणून वार्तिककार म्हणतात—

(वा.८) जिव्हाकात्य आणि हरितकात्य हे दोन शब्द वगळून बाकीच्या गोत्रप्रत्ययान्त शब्दासंबंधानें तें समजावे. त्यांचीं रूपें जैव्हाका-

---

७. प्रत्ययाच्या आदिवर्णाला उदात्त सांगितला आहे (३।१।३) सन् यद् वगैरे प्रत्ययांच्या आदि असलेलीं सकार, यकार वगैरे व्यंजनें नसल्यासारखीं समजून अकारालाच तो उदात्त केला जातो. तसेंच धातूच्या अंताला उदात्त सांगितला आहे (६।१।१६२). पच् वगैरे धातूंतील चकार वगैरे व्यंजनें नसल्यासारखीं समजून अकारालाच तो उदात्त होतो.

८. वृद्धसंज्ञा झाली तेव्हां छप्रत्यय (४।२।११४) झाला. वृद्धसंज्ञा नाहीं तेव्हां अण् प्रत्यय (४।३।१२०) झाला.

९. येथें गोत्रशब्दानें सामान्य अपत्य घ्यावें. 'अपत्य अधिकाराशिवाय इतर ठिकाणीं कोणीं गोत्रशब्दानें सामान्य अपत्य घ्यावें' असा ठराव आहे.

ज्यायः । इदमपि सिद्धं भवति । पिङ्गलकाण्वस्य च्छात्राः पैङ्गलकाण्वाः ॥

## त्यदादीनि च ॥ १.१.७४ ॥

यस्याचामादिग्रहणमनुवर्तेत उताहो न। किं चातः । यद्यनुवर्तेत इह च प्रसज्येत त्वत्पुत्रस्य च्छात्रास्त्वात्पुत्राः मात्पुत्राः । इह च न स्यात् त्वदीयः मदीय इति । अथ निवृत्तमेङ्प्राचां देशे [१.१ ७५] यस्याचामादिग्रहणं कर्तव्यम् । एवं तर्ह्यनुवर्तते । कथं त्वात्पुत्राः मात्पुत्रा इति । संबन्धमनुवर्तिष्यते । वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम् । त्यदादीनि च वृद्धसंज्ञानि भवन्ति । वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम् । एङ् प्राचां देशे । यस्याचामादिग्रहणमनुवर्तते वृद्धिग्रहणं निवृत्तम् । तद्यथा । कश्चित्कान्तारे समुपस्थिते

---

ताः, हारितकाताः, अशींच होतात. (तेथें जिह्वाकात्य आणि हरितकात्य या शब्दांना वृद्धसंज्ञा नसल्यामुळें त्याहून छप्रत्यय (४।२।११४) न होतां अण्प्रत्ययच झाला आहे.)

पण येथें 'गोत्रोत्तरपदस्य च' आणि 'गोत्रान्ताद्वाऽसमस्तवत्' या दोन वार्तिकांपैकीं कोणतें वार्तिक घेणें चांगलें ?

'गोत्रान्ताद्वाऽसमस्तवत्' हेंच वार्तिक घेणें चांगलें. कारण तें घेतलें म्हणजे पिङ्गलकाण्वस्य छात्राः पैङ्गलकाण्वाः हेंही उदाहरण सिद्ध[१०] होतें. (७३)

(सू.७४) पूर्वसूत्रांतून 'यस्य अचाम् आदिः' हीं पदें पुढें अनुवृत्त होतात किंवा नाहींत ?

अनुवृत्त झालीं किंवा न झालीं यांत फरक काय ?

फरक असा की जर त्या पदांची अनुवृत्ति येथें केली तर 'ज्या शब्दांतील अचांपैकीं आदि अच्, त्यद्, वगैरे शब्दांपैकीं आहे त्याला वृद्धसंज्ञा होते' असा अर्थ होऊन 'त्वत्पुत्रस्य छात्राः त्वात्पुत्राः', 'मात्पुत्राः', येथें त्वत्पुत्रः, मत्पुत्र, ह्या शब्दांना वृद्धसंज्ञा होईल आणि छप्रत्यय होईल. आणि त्वदीयः, मदीयः, येथें साध्या युष्मद्, अस्मद्, या शब्दांना वृद्धसंज्ञा होणार नाहीं आणि छप्रत्यय होणार नाहीं. बरें, आतां त्या पदांची अनुवृत्ति येथें न करावी तर 'एङ् प्राचां देशे' या पुढील सूत्रामध्यें त्या पदांची जरूर असल्यामुळें तेथें तीं 'यस्य अचाम् आदिः' हीं पदें निराळीं उच्चारावीं लागतील.

तर मग त्या पदांची अनुवृत्ति येथें करावी हेंच बरें.

पण अनुवृत्ति केली तर त्वत्पुत्राः, मात्पुत्राः, हीं उदाहरणें कशीं साधावींत ?

अशीं साधावींत की जरी अनुवृत्ति केली तरी त्यांतील आदि हा शब्द पूर्वसूत्रामध्यें वृद्धिपदाशीं झालेल्या संबंधालाच अनुसरतो (म्हणजे त्या आदिशब्दाचा येथें त्यद् वगैरेंशीं संबंध होत नाहीं तेव्हां असा अर्थ होतो). 'वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम्' या सूत्राच्या पुढील 'त्यदादीनि च' या सूत्रामध्यें 'वृद्धिः यस्य अचाम् आदिः तत् वृद्धम्' हीं सर्व पदें अनुवृत्त होतात. त्याचा अर्थ—त्यद् वगैरे शब्दांना वृद्धसंज्ञा होते[१] आणि ज्या शब्दाच्या अचांपैकीं आदि अच् वृद्धि आहे त्याला वृद्धसंज्ञा होते[२]. त्याच्या पुढील सूत्र— 'एङ् प्राचां देशे' येथें 'यस्य अचाम् आदिः तत् वृद्धम्' हीं पदें अनुवृत्त होतात; वृद्धिशब्दाची अनुवृत्ति होत नाहीं. (तेव्हां अर्थातच आदि शब्द हा पूर्वी वृद्धिपदाशीं केलेल्या संबंधाला येथें सोडतो.) जसा एखादा वाटसरू खिंडीं-

---

१०. समास नसतां केवळ कण्वशब्दाहून शैषिक अण्प्रत्यय सांगितला (४।२।१११) आहे. तोच पिङ्गलकाण्व या शब्दाहून होतो. जर पिङ्गलकाण्व याला वृद्धसंज्ञा केली तर त्याहून छप्रत्यय (४।२।११४) होऊं लागेल.

१. त्यद्, तद्, वगैरे शब्दांना वृद्धसंज्ञा होते.

२. हा अर्थ येथें पूर्वसूत्रार्थाचा पुनः फक्त अनुवाद केला आहे.

सार्थमुपादत्ते । स यदा निष्कान्तारीभूतो भवति तदा सार्थं जहाति ॥

## एङ् प्राचां देशे ॥ १.१.७५॥

एङ् प्राचां देशे शैषिकेष्विति वक्तव्यम् । सैपुरिकी सैपुरिका । स्कौनगरिकी स्कौनगरिकेति ॥

इति श्री भगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य प्रथमे पादे नवममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

तून अवघड वाटेनें जाण्याची वेळ आली म्हणजे चार माणसांची सोबत पाहून त्यांच्याबरोबर जातो पण पुढें त्या अवघड वाटेंतून तो पलीकडे गेला म्हणजे ती सोबत सोडून पुढें चालता होतो, तसेंच हें होयँ.

(सू.७५) 'एङ् प्राचां देशे' या सूत्रानें सांगितलेली वृद्धसंज्ञा 'शेषे' (४।२।९२) या अधिकारांतील प्रत्यय कर्तव्य असतांनाच होते असें म्हणावें; उदा० स्कौनगरिकी, स्कौनगरिका.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील नववें आन्हिक समाप्त झालें; व पहिला पाद समाप्त झाला.

३. त्याप्रमाणें त्यद् वगैरे शब्द हें पूर्वसूत्रांतून अनुवृत्त आलेल्या आदिशब्दाला आपणाकडे ओढतील या भीतीनें त्या आदिशब्दानें 'वृद्धिर्यस्या०' या सूत्रामध्यें धरलेली वृद्धिशब्दाची सोबत त्यदादीनि च येथें अनुवृत्ति झाल्यानंतरही सोडली नाहीं. पुढें एङ् प्राचां देशे येथें अनुवृत्ति झाल्याबरोबर ती भीति नाहींशी झाल्यामुळें वृद्धि या पदाची सोबत सोडली.

१. ज्या देशवाचक शब्दांतील आदि अच् एङ् आहे त्या शब्दाला वृद्धसंज्ञा विकल्पानें होते.

## गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङित् ॥१.२.१॥

## ङित्किद्वचने तयोरभावादप्रसिद्धिः॥१

ङित्किद्वचने तयोरभावान्ङकारककारयोरभावान्ङित्त्वकित्त्वयोरप्रसिद्धिः। सता ह्यभिसंबन्धः शक्यते कर्तुं न चात्र ङकारककारावितौ पश्यामः। तद्यथा। चित्रगुर्देवदत्त इति यस्य ता गावो भवन्ति स एव ताभ्यां शब्दाभ्यां शक्यतेऽभिसंबन्द्धुम् ॥ भाव्येते तर्ह्यनेन। गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङिद्भवतीति। असंयोगाल्लिट् किद्भवतीति।

## भवतीति चेदादेशप्रतिषेधः ॥२॥

भवतीति चेदादेशस्य प्रतिषेधो वक्तव्यः। ङकारककारावितावादेशौ प्राप्नुतः। कथं पुनरित्संज्ञो नामादेशः स्यात्। किं हि

---

(सू.१ वा.१) या प्रकृतसूत्रानें ञित् आणि णित् या प्रत्ययांशिवाय इतर प्रत्ययांचा जो इत्संज्ञक ङकाराशीं संबंध सांगितला आहे तसाच असंयोगाल्लिट् कित् (१।२।५) या सूत्रानें पिद्भिन्न अशा लिट्प्रत्ययाचा जो इत्संज्ञक ककाराशीं संबंध सांगितला आहे तो सांगतां येणार नाहीं.कारण त्या त्या प्रत्ययाजवळ ङकार आणि ककार हे दृष्टीस पडत नाहींत. एखादी वस्तु जवळ असेल तर तिचा दुसऱ्याबरोबर संबंध जुळवितां येईल. परंतु प्रकृतस्थळीं तर इत्संज्ञक ङकार आणि ककार त्या त्या प्रत्ययाजवळ दृष्टीस पडतच नाहींत. असें पाहा की लोकांमध्यें हा देवदत्त चित्रगु आहे म्हणजे ज्याच्या गायी चित्रविचित्र आहेत असा आहे असें वाक्य उच्चारलें असतां ज्याच्या जवळ त्या गायी असतात त्याचाच त्या गायीबरोबर संबंध त्या वाक्यानें दाखविला जातो.

तर मग, या सूत्राचा आम्ही असा अर्थ समजूं की ञित्-णित्-भिन्न-जो प्रत्यय तो ङित् होतो. तसेंच पुढें 'असंयोगाल्लिट् ह्या सूत्रानें देखील पिद्भिन्न जी लिट् तो कित् होतो.

(वा.२) ङित् होतो, कित् होतो, असें या सूत्राचें तात्पर्य मानलें तर तशा प्रकारचा त्या त्या प्रत्ययाला आदेश होऊं लागेल, त्याचा निषेध केला पाहिजे. नाहीं तर इत्संज्ञक ङकार आणि इत्संज्ञक ककार असे त्या त्या प्रत्ययाला आदेश होऊं लागतील.

पण जो वर्ण इत्संज्ञक असतो तो कसा बरें उदाहरणामध्यें आदेश म्हणून करतां येईल ?

ही दाखविलेली अडचण बरोबर नाहीं.

---

१. गाङ्लिटि, विभाषा लुङ्लृङोः, या दोन सूत्रांनीं इङ्धातूला सांगितलेला गाङ्आदेश, आणि कुटादि (कुटादि गणामध्यें कुट्धातूपासून कुङ्धातूपर्यंत चाळीस धातु हे कुटादि होत) गणांतील धातूंच्या पुढील ञित् किंवा णित् प्रत्ययाखेरीज जे प्रत्यय ते ङकारेत्संज्ञक प्रत्ययाप्रमाणें समजावेत. जसें— अध्यगीष्ट अध्यगीषाताम्, कुटिता कुटितुम्, वगैरे.

२. गाङ्कुटा० असंयोगा० येथें चार पक्ष उद्भवतात. संबंधप्रतिपादन, आदेशविधान, संज्ञाकरण आणि अतिदेश. पैकीं पहिल्या पक्षीं 'गाङ्आदेश किंवा कुटादि धातु यांच्यापुढील ञित् आणि णित् त्या प्रत्ययांखेरीज जो इतर प्रत्यय तो इत्संज्ञक ङकारयुक्त आहे', असा सूत्राचा अर्थ होतो. त्यांत जेथें यङ् वगैरे ठिकाणीं प्रत्ययाजवळ ङकार आहे तेथें तो संबंध सिद्ध असल्यानें त्याचा अनुवाद करणें फुकट होणार आहे. आणि जेथें प्रत्ययाजवळ ङकार नाहीं, उ० तव्य वगैरे ठिकाणीं, तेथें 'त्या प्रत्ययाजवळ इत्संज्ञक ङकार आहे' हें सांगणें खोटें ठरतें. एकंदरींत हा पहिला पक्ष संभतव नाहीं.

३. या पक्षीं ङित् या पदामध्यें कर्मधारयसमास करावयाचा. तेव्हां गाङ्आदेश कुटादि धातु यांच्यापुढील ञित् किंवा णित् या प्रत्ययांखेरीज इतर प्रत्ययाला इत्संज्ञक ङकार आदेश होतो, असा अर्थ समजावा. तो 'आदेः परस्य' या परिभाषेनें त्या प्रत्ययाच्या आद्य वर्णाला होईल. तेव्हां तो लोपाप्रमाणें स्थानीची निवृत्ति करील, आणि इत्संज्ञक असल्यामुळें तो स्वतःही निवृत्त होईल; एकंदरींत दोष येईल; म्हणून आदेशाचा निषेध केला पाहिजे. अर्थात् हाही पक्ष बरोबर नाहीं.

वचनान्न भवति ॥ एवं तर्हि षष्ठीनिर्दिष्टस्यादेशा उच्यन्ते न चात्र षष्ठीं पश्यामः। गाङ्कुटादिभ्य इत्येषा पञ्चम्यञ्णिदिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति ॥ संज्ञाकरणं तर्हीदम् । गाङ्कुटादिभ्यो ऽञ्णिन्ङित्संज्ञो भवतीति। असंयोगाल्लिट्कित्संज्ञो भवतीति ।

संज्ञाकरणे क्ङिद्ग्रहणेऽसंप्रत्ययः शब्दभेदात् ॥३॥

संज्ञाकरणे क्ङिद्ग्रहणे ऽसंप्रत्ययः स्यात् । किं कारणम् । शब्दभेदात् । अन्यो हि शब्दः क्ङितीत्यन्यः कितीति ङितीति च । तथा किद्ग्रहणेषु ङिद्ग्रहणेषु चानयोरेव संप्रत्ययः स्यात् ॥ तद्वदतिदेशस्तर्ह्ययम् । गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङिद्वद्भवतीति । असंयोगाल्लिट्किद्वद्भवतीति । स तर्हि वतिनिर्देशः

---

कारण वचनाच्या जोरावर काय होणार नाहीं ?

तर मग याचें उत्तर आम्ही असें देतों की आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें ज्याला आदेश करावयाचे ते स्थानी षष्ठी विभक्ति लावून उच्चारले असतात. आणि येथें तर अञ्णित् लिट् अशी प्रथमाविभक्ति घातली आहे, षष्ठीविभक्ति घातलेली दृष्टीस पडत नाहीं.

जरी येथें षष्ठीविभक्ति दृष्टीस पडत नाहीं तरी 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) या परिभाषेच्या जोरावर गाङ्कुटादिभ्यः या पंचमीविभक्तीमुळें अञ्णित् या प्रथमाविभक्तीबद्दल षष्ठीविभक्ति आहे अशी कल्पना करितां येईल. एकंदरींत, इत्संज्ञक ङ कार आणि इत्संज्ञक ककार असे आदेश या सूत्रानें होतील असा दोष येतो.

तर मग 'हीं संज्ञा सांगणारीं सूत्रें आहेत असें घेऊं या. म्हणजे गाङ् आणि कुटादि' गणांतील धातु यांच्यापुढील ञित्णित्भिन्न प्रत्ययाला ङित् अशी संज्ञा होते. तसेंच धातूच्या शेवटीं संयोग नसेल तर त्याच्या पुढील पिद्भिन्न अशा लिट्प्रत्ययाला कित् अशी संज्ञा होते.

(वा.३) ह्या सूत्रांनीं ङित्, कित् अशा संज्ञा सांगितल्या आहेत असें गृहीत धरलें तर ज्या सूत्रामध्यें क्ङित् असा शब्द उच्चारला असेल तेथें या ङित्–कित्संज्ञा झालेल्या प्रत्ययांचा बोध होणार नाहीं.

कां बरें ?

शब्द भिन्न होतो म्हणून. असें पाहा की क्ङिति हा शब्द निराळा आणि किति किंवा ङिति हा शब्द निराळा होत आहे.

तसेंच ज्या सूत्रामध्यें कित् किंवा ङित् असे शब्द उच्चारले असतील तेथें ह्यांचाच म्हणजे ङित्, कित् अशा संज्ञा झालेल्या प्रत्ययांचाच बोध होऊं लागेल. (आणि ज्या प्रत्ययाला यङ्, यक् असे प्रत्यक्ष ङकार, ककार लावले आहेत त्यांचा बोध होणार नाहीं.)

तर मग हें अतिदेश दाखविणारें सूत्र आहे. म्हणजे या सूत्राचें तात्पर्य आम्ही असें समजतों की गाङ् आणि कुटादिगणांतील धातु त्यांच्या पुढें असलेला जो ञिद्भिन्न प्रत्यय तो ङित्प्रत्ययासारखा समजावा. तसेंच 'ज्या

---

४. संज्ञापक्ष घेतला असतां 'क्ङिति च' (१।१।१५) येथें ङकार किंवा ककार आहे इत्संज्ञक ज्याचा, अशा अर्थाचा व्युत्पन्न (यौगिक) क्ङित् शब्द असल्यानें त्या शब्दानें ङित् किंवा कित् अशा संज्ञा-(रूढ-)शब्दाचें ग्रहण होणार नाहीं. कारण ङित्, कित्, असा ठराविक वर्णानुक्रम उच्चारून तो शब्द संज्ञाभूत मानला आहे. तो वर्णानुक्रम क्ङित् या शब्दांत नाहीं. तेव्हां ङित् किंवा कित् आणि क्ङित् हे शब्द उभयतां निरनिराळे आहेत म्हणून. शिवाय 'ग्रहिज्या० ङिति च' (६।१।१६) 'वचिस्वपि० किति' (६।१।१५) येथें ङित् किंवा कित्पदानें कृत्रिमाकृत्रिमन्यायानें संज्ञाशब्दाचेंच ग्रहण होईल, आणि यौगिकाचें ग्रहण होणार नाहीं. मात्र उभयगति मनांत न घेतां हा दोष समजावा. एकंदरींत तिसरा पक्षही दुष्ट होय.

कर्तव्यो न ह्यन्तरेण वतिमतिदेशो गम्यते। अन्तरेणापि वतिमातिदेशो गम्यते । तद्यथा । एष ब्रह्मदत्तः । अब्रह्मदत्तं ब्रह्मदत्त इत्याह ते मन्यामहे ब्रह्मदत्तवदयं भवतीति । एवमिहाप्यङितं ङिदित्याह ङिद्वदिति गम्यते । अकितं किदित्याह किद्वदिति गम्यते ।

धातूच्या शेवटीं संयोग नसेल त्याच्यापुढील जो पिद्‌भिन्न लिट् प्रत्यय तो कित्प्रत्ययासारखा समजावा' असें 'असंयोगा०' (१।२।५) याचें तात्पर्य होय[५].

तर मग सूत्रामध्यें जें नुसतें ङित् असें म्हटलें आहे तेथें त्याच्यापुढें वत्प्रत्यय लावून ङिद्वत् असें म्हटलें पाहिजे. कारण वत्-प्रत्यय उचारल्याशिवाय ह्यानें अतिदेश सांगितला आहे असें कसें समजतां येईल ?

पण वत्प्रत्यय उच्चारल्याशिवाय देखील अतिदेश आहे असें समजतां येतें; उदा० हा ब्रह्मदत्त आहे हें वाक्य जो ब्रह्मदत्त नव्हे त्याला उद्देशून उच्चारलें असल्यास अर्थातच त्या वाक्याचें तात्पर्य असें गृहीत धरावें लागतें की 'ब्रह्मदत्तासारखा हा आहे; त्याप्रमाणें प्रकृतस्थळीं देखील ङित् नसून त्याला ङित् असें जें पाणिनीनें म्हटलें आहे तें 'ङितासारखा' अशाच अभिप्रायानें म्हटलें आहे. तसेंच 'असंयोगा०' (१।२।५) या पुढील सूत्रानें देखील कित् नसलेल्या प्रत्ययाला जें कित् असें म्हटलें आहे त्याचें तात्पर्य 'तो कित्प्रत्ययासारखा होतो' असें गृहीत धरतां येईल.

तद्वदतिदेशेऽकिद्विधिप्रसंगः ॥४॥

तद्वदतिदेशेऽकिद्विधिरपि प्राप्नोति । सृजिदृशोर्झल्यमकिति [६.१.५८] । सिसृक्षति दिदृक्षते । अकिल्लक्षणोऽमागमः प्राप्नोति ॥

सिद्धं तु प्रसज्यप्रतिषेधात् ॥५॥

सिद्धमेतत् । कथम् । प्रसज्यायं

(वा.४) ङित्प्रत्ययासारखा आणि कित्-प्रत्ययासारखा समजावा अशा रीतीनें हा अतिदेश घेतला तर वास्तविक तो कित् नसल्यामुळें किद्‌भिन्नाला उद्देशून सांगितलेला जो विधि तो देखील तेथें होऊं लागेल; उदा. सिसृक्षति, दिदृक्षते. या उदाहरणांमध्यें 'हलन्ताच्च' (१।२।१०) या सूत्रानें सन्प्रत्यय कितासारखा आहे असें समजलें तरी वास्तविक तो किद्‌भिन्न असल्यामुळें 'सृजिदृशोर्झल्यमकिति' (६।१।१५८) या सूत्रानें सृज् आणि दृश् या धातूंना किद्‌भिन्न झलादि प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला अम् आगम होऊं लागेल.

(५) सिसृक्षति हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें की, अकिति या पदानें कित् प्रत्यय पुढें असतानां अमागम होत नाहीं अशा रीतीनें सामान्य विधीनें प्राप्त झालेल्या अमागमाचा निषेध केला आहे. तेव्हा 'हलन्ताच्च' या अतिदेशानें हा सन्प्रत्यय कितासारखा समजला जात असल्यामुळें अमागमाचा निषेध होईल[६].

५. ञितणितभिन्न प्रत्यय तो वस्तुतः ङित् किंवा कित् नसतां ज्यापेक्षां त्याला ङित्, कित्,असें म्हटलें जात आहे त्यापेक्षां ङित्कित्प्रयुक्त कार्य होण्याकरितां तो ङित् किंवा कित् प्रत्ययासारखा समजण्यांत येईल. अर्थात् अतिदेश हा चवथा पक्ष सिद्ध होत आहे.

६. प्रसज्यप्रतिषेध स्वीकारला असतां कित्-प्रत्यय पुढें असतां अमागमाचा निषेध हेंच कित्वाचें मुख्य कर्तव्य असल्यानें सामान्य शास्त्रानें वस्तुतः अकित् आहे म्हणून प्राप्त झालेल्या अमागमाचा निषेध होईल. आतां प्रसज्यप्रतिषेध घेण्यांत वाक्यभेद, असमर्थ समास, वगैरे दोष असल्यानें लाघवास्तव पर्युदास घेतला तरी 'अतिदेशानें आरोपित केला जाणारा जो धर्म त्याच्या उलट स्वभावाचा स्वाभाविक मूळचा असलेला जो धर्म त्याच्या निमित्तानें कांहीं एक कार्य करावयाचें नाहीं' अशी अतिदेशस्थलीं स्वभावसिद्ध मर्यादा असल्यानें दोष येत नाहीं.

प्रतिषेधः क्रियते किति नेति ॥

**सर्वत्र सनन्तादात्मनेपदप्रतिषेधः ॥६॥**

सर्वेषु पक्षेषु सनन्तादात्मनेपदं प्राप्नोति। उच्चुकुटिषति निचुकुटिषति। ङित इत्यात्मनेपदं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः॥

**सिद्धं तु पूर्वस्य कार्यातिदेशात् ॥७॥**

सिद्धमेतत्। कथम्। पूर्वस्य यत्कार्यं तदतिदिश्यते। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। सप्तम्यर्थेऽपि वतिर्भवति। तद्यथा। मथुरायामिव मथुरावत्। पाटलिपुत्र इव पाटलिपुत्रवत्। एवं ङितीव ङिद्वत्॥

अथ किमर्थं पृथङ्ङिक्तितौ क्रियेते न सर्वं किदेव वा स्यान्ङिदेव वा।

**पृथगनुबन्धत्वे प्रयोजनं वचिस्वपियजादीनामसंप्रसारणं सार्वधातुकचङादिषु ॥८॥**

पृथगनुबन्धत्वे प्रयोजनं वचिस्वपि-

---

(वा.६) वर दाखविलेल्या या चारही पक्षांमध्यें सन्प्रत्ययान्त धातूच्या पुढें आत्मनेपद होत नाहीं असें म्हणावें; उदा.- उच्चुकुटिषति, निचुकुटिषति. येथें प्रकृतसूत्रानें सन्प्रत्यय ङित् समजून 'अनुदात्तङितः' (१।३।१२) या सूत्रानें आत्मनेपद प्राप्त होतें त्याचा निषेध केला पाहिजे.

(वा.७) उच्चुकुटिषति हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तें कसें ?

प्रकृत सूत्रानें जो ङिताचा अतिदेश केलेला आहे तो अतिदेश त्या प्रत्ययाच्या पूर्वीच्या भागाला जें कार्य प्राप्त होतें, तें करण्याकरतांच फक्त केला आहे. म्हणजे अर्थातच प्रकृतसूत्रानें सन्प्रत्यय हा ङित् समजला तरी त्याच्यापुढें होणारें आत्मनेपद ह्या अतिदेशानें करतां येणार नाहीं.

हें सांगावयास पाहिजे का ?

नको. कारण सूत्रामध्यें तसा स्पष्ट शब्द असल्याशिवाय पूर्वीच्यालाच कार्य होतें असें कसें समजावें ?

वत् हा प्रत्यय सप्तमीविभक्तीचा अर्थ मनांत घेऊन देखील होत असतो. जसें—'मथुरावत्' याचा अर्थ 'मथुरा नगरीमध्यें जसें' असा होतो. तसेंच 'पाटलिपुत्रवत्' याचा अर्थ 'पाटलिपुत्रनगरामध्यें जसें' असा अर्थ होतो. तसें येथें देखील 'ङिद्वत्' असा कल्पिलेला जो वत् प्रत्यय त्याचा अर्थ 'कित्प्रत्यय पुढें असतांना जसें' असा समजावा.

आतां या व्याकरणशास्त्रामध्यें पाणिनीनें कांहीं प्रत्यय ङित् केले आहेत, व कांहीं प्रत्यय कित् केले आहेत; उदा. यङ्, यक् वगैरे. ते असे निरनिराळे न करतां सर्व प्रत्यय कित्च करावेत, अथवा ते सर्व प्रत्यय ङित्च करावेत.

'वचिस्वपियजादीनां किति' (६।१।१५) या सूत्रानें कित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेलें

---

७. ञित् किंवा णित् भिन्न प्रत्ययाच्या मागील भागाला ङित्प्रयुक्त किंवा कित्प्रयुक्त कार्य व्हावें हाच हेतु मनांत धरून त्या प्रत्ययाला ङिद्वत्, किद्वत्, हा अतिदेश केला आहे. त्या प्रत्ययाच्या पुढील भागाला प्राप्त होणाऱ्या ङिदादिप्रयुक्त कार्याविषयीं अतिदेश सांगितलाच नाहीं. जसें सत्कार वगैरे जें विशेष प्रकारचें कार्य तेंच मनांत धरून 'या क्षत्रियाला ब्राह्मणासारखें समजावें' असें म्हटलें जातें. ब्राह्मणत्वावर अवलंबून असलेलीं सर्व कार्यें मनांत धरून 'ब्राह्मणासारखें' असें म्हटलेलें नसतें. म्हणूनच त्यांच्याशीं ब्राह्मणांचा बेटीव्यवहार होत नाहीं. तसेंच प्रकृतस्थलींही समजावें.

८. अनुबन्ध नांवाचा वर्ण कांहीं एक कार्याकरितां त्या त्या ठिकाणीं जोडला असतो. तें गुणनिषेधादिक कार्य सर्व ठिकाणीं कोणता तरी एक क् किंवा ङ् अनुबन्ध जोडल्यानें साधत आहे. तेव्हां निरनिराळे अनुबन्ध जोडावयास नकोत. आणि एकच अनुबन्ध सर्वत्र जोडला असतां ङित्प्रत्ययाप्रमाणें, कित्प्रत्ययाप्रमाणें, असा निरनिराळा अतिदेशही करावयास लागत नाहीं, असें लाघव होत आहे.

**यजादीनामसंप्रसारणं सार्वधातुके चङादिषु च ॥ सार्वधातुके प्रयोजनम् । यथेह भवति सुप्तः सुप्तवानित्येवं स्वपितः स्वपिथः अत्रापि प्राप्नोति ॥ चङादिषु प्रयोजनम् । के पुनश्चङादयः । चङङ्नजिङ्ङ्वनिबथङ्नङः । चङ् । यथेह भवति शूनः शूनवानित्येवमशिश्वियत् अत्रापि प्राप्नोति । अङ् । यथेह भवति शूनः उक्त इत्येवमश्वत् अवोचत् अत्रापि प्राप्नोति । नजिङ् । यथेह भवति सुप्त इत्येवं स्वप्नक् अत्रापि प्राप्नोति । ङ्वनिप् । यथेह भवतीष्ट इत्येवं यज्वा अत्रापि प्राप्नोति ।**

---

संप्रसारण, हें सार्वधातुक ङित्प्रत्यय पुढें असतांना आणि तसेंच चङ् वगैरे प्रत्यय पुढें असतांना होऊं नये असा ङकार आणि ककार हे दोन निरनिराळे अनुबन्ध लावण्याचा उपयोग आहे. त्यापैकीं सार्वधातुकाचें उदाहरण असें की सुप्तः सुप्तवान् या उदाहरणामध्यें जसें 'वचिस्वपि' या सूत्रानें स्वप्धातूला संप्रसारण होतें तसेंच स्वपितः स्वपिथः या उदाहरणामध्यें देखील होऊं लागेल[९]. चङ् वगैरे प्रत्ययांचें असेंच उदाहरण येतें.

चङ् वगैरे प्रत्यय ते कोणते?

चङ्, अङ्, नजिङ्, ङ्वनिप्, अथङ् आणि नङ्. त्यापैकीं चङ्प्रत्ययाचें उदाहरण असें की, शूनः शूनवान् या उदाहरणामध्यें जसें 'वचिस्वपि०' (६।१।१५) या सूत्रानें श्विधातूला संप्रसारण होतें तसें अशिश्वियत् या उदाहरणामध्यें चङ्प्रत्यय पुढें असतांना देखील संप्रसारण होऊं लागेल[१०]. अङ्प्रत्ययाचें उदाहरण-शूनः उक्तः. या उदाहरणामध्यें 'वचिस्वपि०' या सूत्रानें जसें श्विधातूला आणि वच्धातूला संप्रसारण होतें तसें अश्वत्, अवोचत्, या उदाहरणांमध्यें अङ्प्रत्यय पुढें असतांना देखील त्यानें संप्रसारण होऊं लागेल[११]. नजिङ्प्रत्ययाचें उदाहरण—सुप्तः, सुप्तवान्. या उदाहरणामध्यें 'वचिस्वपि' या सूत्रानें स्वप्धातूला जसें संप्रसारण होतें तसें स्वप्नक् या उदाहरणामध्यें नजिङ्प्रत्यय पुढें असतांना देखील होऊं लागेल[१२]. ङ्वनिप्प्रत्ययाचें उदा०—इष्टम्, इष्टवान्. या उदाहरणामध्यें जसें 'वचिस्वपि' या सूत्रानें यज्धातूला संप्रसारण होतें तसें यज्वा या उदाहरणामध्यें ङ्वनिप्प्रत्यय पुढें

---

९. सुप्तः,सुप्तवान्,येथें अदादिगणांतील स्वप्धातूहून क्त, क्तवतु, प्रत्यय, 'वचिस्वपि' (६।१।१५) यानें संप्रसारण, पूर्वरूप. स्वपितः स्वपिथः येथें स्वप् धातूहून लट्, तस् किंवा थस्, रुदादिभ्यः सार्वधातुके (७।२।७६) यानें सार्वधातुक प्रत्ययाला इडागम. सर्व ठिकाणीं ककारच अनुबन्ध जोडून एकच किद्वत् असा अतिदेश केला तर 'सार्वधातुकमपित्' यानेंही सार्वधातुक प्रत्यय कित्प्रत्ययासारखा समजला असतां सुप्तः येथीलप्रमाणें स्वपितः वगैरे स्थलींही संप्रसारण होईल आणि भलतेंच रूप होईल.

१०. 'श्वि' या धातूहून क्त, क्तवतु, प्रत्यय 'श्वीदितो' (७।२।१४) यानें इण्निषेध, 'वचिस्वपि' (६।१।१५) यानें संप्रसारण, पूर्वरूप (६।१।१०८). 'हलः' (६।४।२) यानें दीर्घ, 'ओदितश्च' (८।२।४५) यानें प्रत्ययाच्या तकाराला नकार, शूनः शूनवान्. श्विधातूहून लुङ्, तिप्, च्लि (३।१।४३), 'विभाषा धेट्श्व्योः' (३।१।४९) यानें चङ्, द्वित्व (६।१।११), अडागम (६।४।७१), इयङ् (६।४।७७), अशिश्वियत्. चङातील ङकाराचे ऐवजीं ककार अनुबन्ध जोडला असतां संप्रसारण झाल्यानें अशुशुवत् असें भलतेंच रूप होईल.

११. वच्धातूहून क्तप्रत्यय, 'एकाच उपदेशे, (७।२।१०) यानें इण्निषेध, संप्रसारण वगैरे, उक्तः; श्विधातु, लुङ्, च्लि, 'जॄस्तम्भु' (३।१।५८) यानें अङ्, श्वयतेरः (७।४।१८) यानें धातूच्या इकाराला अकार वगैरे, अश्वत्. वच्धातूहून लुङ्, 'अस्यतिवक्ति' (३।१।५२) यानें अङ्, वच उम् (७।४।२०), अवोचत्. अङातील ङकाराचे ऐवजीं ककार अनुबन्ध जोडला असतां शूनः, उक्तः, येथीलप्रमाणें प्रकृत उदाहरणीं संप्रसारण झाल्यानें भलतेंच रूप होईल.

१२. 'स्वपितृषोर्नजिङ्' (३।२।७२), स्वप्नक्. नजिङ्प्रत्ययांतील ङकाराचे ऐवजीं ककार अनुबन्ध जोडला असतां 'वचिस्वपि' यानें संप्रसारण होईल.

अथङ् । यथेह भवत्युषित इत्येवमावसथः अत्रापि प्राप्नोति । नङ् । यथेह भवतीष्टमित्येवं यज्ञः अत्रापि प्राप्नोति ॥

**जाग्रोऽगुणविधिः ॥ ९ ॥**

जागर्तेरगुणविधिः प्रयोजनम् । यथेह भवति जागृतः जागृथ इत्यङ्क्तीति पर्युदास एवं जागरितः जागरितवानित्यत्रापि प्राप्नोति ॥

अपर आह । जाग्रो गुणविधिः । जागर्तेर्गुणविधिः प्रयोजनम् । यथेह भवति जागरितः जागरितवानित्येवं जागृतः जागृथ इत्यत्रापि प्राप्नोति ॥

**कुटादीनामिट्प्रतिषेधः ॥ १० ॥**

कुटादीनामिट्प्रतिषेधः प्रयोजनम् ।

---

असतांना देखील होऊं लागेल.[13] अथङ्प्रत्ययाचें उदा०— उषितः या उदाहरणामध्यें जसें 'वचिस्वपि' या सूत्रानें वस्धातूला संप्रसारण होतें तसें आवसथः या उदाहरणामध्यें अथङ्प्रत्यय पुढें असतांना देखील होऊं लागेल.[14] नङ्प्रत्ययाचें उदा०— इष्टम्. या उदाहरणामध्यें जसें 'वचस्वपि' या सूत्रानें यज्धातूला संप्रसारण होतें तसें यज्ञः या उदाहरणामध्यें नङ्प्रत्यय पुढें असतांना देखील होऊं लागेल.[15]

(वा.९) जागृधातूला गुण न होणें हा कित् आणि ङित्प्रत्यय निरनिराळे करण्याचा उपयोग आहे. तो असा की जागृतः जागृथः या उदाहरणामध्यें सार्वधातुक प्रत्यय ङित् असल्यामुळें जसा जागृधातूला 'जाग्रो०' (७।३।८५) या सूत्रानें गुण होत नाहीं तसा जागरितवान् या उदाहरणामध्यें देखील गुणाचा निषेध होऊं लागेल.[16]

येथें दुसरा कोणी असें म्हणतो की, प्रकृतवार्तिकामध्यें अगुणविधिः असा पदच्छेद न करतां गुणविधिः असाच पदच्छेद करावा. म्हणजे त्याचा अर्थ असा की, जागृधातूला गुण होणें हा कित् आणि ङित् प्रत्यय निरनिराळे करण्याचा उपयोग आहे. तो असा की जागरितः जागरिवान् या उदाहरणामध्यें जसा 'जाग्रो०' (७।३।८५) या सूत्रानें गुण होतो तसा जागृतः जागृथः या उदाहरणामध्यें देखील होऊं लागेल.[17]

(वा.१०) कुट् वगैरे धातूंच्या पुढील आर्धधातुक प्रत्ययाला इडागमाचा निषेध होणें हा कित् आणि ङित्प्रत्यय निरनिराळे करण्याचा उपयोग आहे. तो असा की, लूत्वा, पूत्वा या उदाहरणांमध्यें 'श्र्युकः' (७।२।११) या सूत्रानें

---

१३. सुयजोर्ङ्वनिप्, यज्वा, येथें पूर्वींप्रमाणेंच दोष येतो.

१४. वस्धातूहून क्तप्रत्यय, इट्, संप्रसारण, 'शासिवसि' (३।३।६०) यानें षत्व, उषितः; 'उपसर्गे वसेः' (उणादि, ४०३) यानें आङ्पूर्वक वस्धातूहून अथङ्प्रत्यय, पूर्वींप्रमाणें अथप्रत्ययाला ककारानुबन्ध लावला असतां दोष जाणावा.

१५. इष्टम् येथें यज्धातूहून क्त प्रत्यय, संप्रसारण वगैरे 'यजयाचयत' (३।३।९०) या सूत्रानें नङ्प्रत्यय केला असतां यज्ञः असें रूप होतें. तेथें नङ्प्रत्ययांतील ङकाराचे ऐवजीं ककारानुबन्ध जोडला असतां इष्टम्. येथीलप्रमाणें यज्ञः येथेंही संप्रसारण झाल्यानें भलतेंच रूप होईल.

१६. सर्वत्रच ककार अनुबन्ध जोडला असतां 'जाग्रोऽविचि०' येथें ङित्सु याचे ऐवजीं कित्सु असें म्हटलें पाहिजे. तेव्हां जागृतः या उदाहरणामध्यें जसा 'जाग्रो०' या सूत्रानें गुण होत नाहीं, तसा 'सार्वधातुकमपित्' यानेंहि कित्वाचा अतिदेश केला आहे म्हणून, जागरितवान् येथेंही गुण न झाल्यानें जाग्रितवान् असें भलतेंच रूप होईल.

१७. आतां सर्वच ठिकाणीं ककार किंवा ङकार असा एकच अनुबन्ध जोडला असतां 'जाग्रो०' या सूत्रामध्यें कित् किंवा ङित् असें एकच घातलें पाहिजे, तेव्हां जागरितवान् येथें गुण साधत नाहीं. सबब 'जागरितवान् या उदाहरणामध्यें 'जसा 'जाग्रो०' या सूत्रानें गुण होतो' हा भाष्यांतील दृष्टान्त जुळत नाहीं. तथापि जागरितवान् या उदाहरणाच्या सिद्धीकरितां 'जाग्रो०' या सूत्रामध्यें जर कित् किंवा ङित् यांपैकीं कोणतेंच पद घातलें नाहीं तर वरील ग्रंथ जुळून येतो असें समजावें.

यथेह भवति लूत्वा पूत्वा श्र्युकः किति [७.२.११] इतीट्प्रतिषेध एवं नुविता धुविता अत्रापि प्राप्नोति ॥

**क्त्वायां कित्प्रतिषेधश्च ॥ ११ ॥**

क्त्वायां कित्प्रतिषेधश्च प्रयोजनम् । किं च । इट्प्रतिषेधश्चः। नेत्याह । अदेशेऽयं चः पठितः । क्त्वायां च कित्प्रतिषेध इति । यथेह भवति देवित्वा सेवित्वा न क्त्वा सेट् [ १.२.१८ ] इति प्रतिषेध एवं कुटित्वा पुटित्वा अत्रापि प्राप्नोति ॥ अथवा देश एवायं चः पठितः । क्त्वायां कित्प्रतिषेधश्चेट्प्रतिषेधश्च । कित्प्रतिषेध उदाहृतम् । इट्प्रतिषेधः । यथेह भवति लूत्वा पूत्वा श्र्युकः कितीतीट्प्रतिषेधः एवं नुवित्वा धुवित्वा अत्रापि प्राप्नोति । स्यादेतत्प्रयोजनं यद्यस्य नियोगत आति-

---

जसा इडागमाचा निषेध होतो तसा नुविता, धुविता, या उदाहरणांमध्यें देखील त्या सूत्रानें इडागमाचा निषेध होऊं लागेल[१८].

(वा. ११) क्त्वाप्रत्ययाला कित्त्वाचा निषेध होणें हा कित् आणि ङित् प्रत्यय निरनिराळे करण्याचा उपयोग आहे. आणखी—

आणखी म्हणजे काय ?

आणखी म्हणजे इडागमाचा निषेध होणें.

'आणखी' या शब्दानें 'इडागमाचा निषेध होणें' हें जें गृहीत धरलें आहे तें बरोबर नाहीं. वस्तुतः विचार केला असतां वार्तिककरांनीं या वार्तिकामध्यें 'च' म्हणजे आणखी हा शब्द भलत्याच ठिकाणीं घातला आहे असें दिसतें. तो शब्द वास्तविक क्त्वाशब्दाच्या पुढें पाहिजे आहे. उदाहरण असें की, देवित्वा, सेवित्वा. या उदाहरणांमध्यें जसा 'न क्त्वा सेट्' (१।२।१८) या सूत्रानें कित्त्वाचा निषेध होतो तसा कुटित्वा, पुटित्वा, या उदाहरणांमध्यें देखील कित्त्वाचा निषेध होऊं लागेल[१९].

अथवा वार्तिककारांनीं प्रकृत वार्तिकामध्यें जो 'च' म्हणजे 'आणखी' हा शब्द घातला आहे तो योग्य ठिकाणींच घातला आहे. म्हणजे क्त्वाप्रत्ययाला कित्त्वाचा निषेध 'आणखी' या शब्दानें त्या क्त्वाप्रत्ययालाच इडागमाचा निषेध होणें हा ङित् आणि कित् निरनिराळे प्रत्यय सांगण्याचा उपयोग आहे. त्यांपैकीं कित्त्वाच्या निषेधाचें उदाहरण आतांच दाखविलें. इडागमाच्या निषेधाचें उदाहरण असें की, लूत्वा, पूत्वा या उदाहरणांमध्यें श्र्युकः किति' (७।२।११) या सूत्रानें जसा इडागमाचा निषेध होतो तसा नुवित्वा, धुवित्वा या उदाहरणांमध्यें देखील त्या सूत्रानें इडागमाचा निषेध होऊं लागेल[२०].

हा उपयोग संभवेल, पण जर प्रकृतसूत्रानें केलेल्या अतिदेशानें प्राप्त झालेलें जें क्त्वाप्रत्ययाला ङित्त्व तें त्याच विधीच्या जोरावर त्या त्वाप्रत्ययाच्या वास्तविक मूळच्या कित्त्वाचा बाध करील. वास्तविक विचार केला असतां

---

१८. 'गाङ्कुटा०' या सूत्रानें कित्त्वाचा अतिदेश केला असतां लूत्वा येथीलप्रमाणें नुविता येथें तृच् प्रत्ययाला कित्त्वाचा अतिदेश झाल्यानें 'श्र्युकः किति' (७।२।११) यानें इडागमाचा निषेध प्रसक्त होईल.

१९. देवित्वा या उदाहरणामध्यें 'न क्त्वा सेट्' या सूत्रानें कित्त्वाचा निषेध झाल्यानें जसा गुण होतो तसा कुटित्वा येथेंही होईल.

२०. सर्वत्र ककार अनुबन्ध केला असतां 'गाङ्कुटा०' यानेंही कित्त्वाचाच अतिदेश केला जाणार. तेव्हां लूत्वा वगैरे स्थलीं जसा 'श्र्युकः' यानें इडागमाचा निषेध होतो तसा नू-त्वा असें असतां येथेंही श्र्युकः' यानें इण्निषेध होईल. म्हणून 'गाङ्कुटा०' या सूत्रानें ङित्त्वाचा अतिदेश केला तेव्हां क्त्वाप्रत्ययाला ङित्त्वाचा अतिदेश केला तरी विरोध नसल्यानें ङित्त्वानें कित्त्वाची निवृत्ति होणार नसल्यानें 'श्र्युकः' यानें इण्निषेध होणारच. तेव्हां ङित्त्वाचा अतिदेश करण्याचा येथें उपयोग होत नाहीं अशी शंका येते. त्याकरितां आतिदेशिक ङित्त्वानें औपदेशिक कित्त्वाचा येननाप्राप्तन्यायानें बाध करावयाचा असा या भाष्याचा आशय समजावा.

देशिकेन ङित्त्वेनौपदेशिकं कित्त्वं बाध्येत। सत्यपि तु ङित्त्वे किदेवैषः। तस्मान्नूत्वा धूत्वेत्येव भवितव्यम्।

[ विज इट् ॥ १. २. २ ]

[ विभाषोर्णोः ॥ १. २. ३. ]

सार्वधातुकमपित् ॥ १. २. ४.

सार्वधातुकग्रहणं किमर्थम्। अपिदितीयत्युच्यमान आर्धधातुकस्याप्यनेनापितो ङित्त्वं प्रसज्येत। कर्ता हर्ता। नैष दोषः। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानेनार्धधातुकस्यापितो ङित्त्वं भवतीति यदयमार्धधातुकीयान्कांश्चिन्ङितः करोति चङङ्नजिङ्ङ्वनिबथङ्नङः। सार्वधातुकेऽप्येतज्ज्ञापकं स्यात्। नेत्याह। तुल्यजातीयस्य ज्ञापकम्। कश्च तुल्यजातीयः। यथाजातीयकाश्चङङ्नजिङ्ङ्वनिबथङ्नङः। कथंजातीयकाश्चैते। आर्धधातुकाः॥ यद्येतदस्ति तुल्यजातीयस्य ज्ञापकमिति चङङौ लुग्विकरणानां ज्ञापकौ स्यातां नजिङ्वर्तमानकालानां ङ्वनिब्भूतकाला-

---

तसा बाध होत नाहीं. तेव्हा नू वगैरे धातूंच्या क्त्वाप्रत्ययसूत्रानें ङित् असा जरी समजला गेला तरी तो मूळचा क्त्वाप्रत्यय कित् आहे तो आहेच. तेव्हां अर्थातच तेथें 'श्र्युकः किति' (७।२।११) या सूत्रानें इडागमाचा निषेध होऊन नूत्वा, धूत्वा, अशींच रूपें होतात.[२१]

(सू.४) या सूत्रामध्यें 'सार्वधातुकम्' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'पित्भिन्न जो प्रत्यय तो ङित् होतो' एवढेंच म्हटलें तर जो पित्भिन्न आर्धधातुक प्रत्यय त्याला देखील प्रकृतसूत्रानें ङित्त्व होऊं लागेल; उदा. कर्ता, हर्ता.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि कांहीं आर्धधातुक प्रत्ययांना इत्संज्ञक ङकार लावतो त्यावरून तो असें सुचवितो की, पित्भिन्न अशा आर्धधातुक प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें ङित्त्व होत नाहीं. पाणिनीनें प्रत्यक्ष इत्संज्ञक ङकार लावलेले आर्धधातुक प्रत्यय चङ्, अङ्, नजिङ्, ङ्वनिप्, अथङ् आणि नङ् हे होत.

'कर्ता, हर्ता वगैरे उदाहरणांमध्यें तास् या प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें ङित्त्व होत नाहीं' अशाबद्दल जें हें ज्ञापक दाखविलें तें सार्वधातुक प्रत्ययांना देखील लागू पडेल.

सार्वधातुक प्रत्ययांना तें ज्ञापक लागू पडत नाहीं असें आम्ही म्हणतों. कारण चङ् वगैरे प्रत्ययांना जो ङकार लावला आहे तो येथें ज्ञापक म्हणून सांगितला आहे. तेव्हां अर्थातच चङ् वगैरे प्रत्ययांच्या जातीचे जे प्रत्यय असतील त्यांच्यासंबंधानेंच तें ज्ञापक लागू पडेल.

त्यांच्या जातीचे म्हणजे कसे ?

चङ्, अङ्, नजिङ्, ङ्वनिप्, अथङ् आणि नङ् हे प्रत्यय ज्या जातीचे आहेत तशा जातीचे.

चङ् वगैरे प्रत्यय कोणत्या जातीचे आहेत ?

चङ् वगैरे प्रत्यय आर्धधातुकसंज्ञक आहेत.

आपल्या जातीच्या प्रत्ययांच्या संबंधानेंच हें ज्ञापक लागू होतें असेंच जर असेल तर चङ् वगैरे प्रत्ययांपैकीं चङ् आणि अङ् हे दोन प्रत्यय लुङ्प्रत्यय पुढें असतांना मध्यें होणाऱ्या विकरणप्रत्ययांसंबंधानें ज्ञापक होतील.

---

२१. कुटिता वगैरे स्थळीं कित्त्व प्राप्त नसतांही ङित्त्वाचा आरंभ केला आहे, तेव्हां कित्त्व हें नाप्राप्त नसल्यानें त्याचा आतिदेशिक ङित्त्वानें बाध होणार नाहीं. एकंदरींत ककार, ङकार, असे निरनिराळे अनुबंध जोडण्याचें हें फल होत नाहीं.

१. 'ओविजी भयचलनयोः' हा जो विज्धातु, त्याच्यापुढील इडागम झालेला जो प्रत्यय तो ङित्प्रत्ययासारखा समजावा; जसें--उद्विजिता, उद्विजितुम्.

१. ऊर्णुञ्धातूच्या पुढील जो इडागम झालेला प्रत्यय तो विकल्पानें ङित्प्रत्ययासारखा समजावा; जसें—प्रोर्णविता, प्रोर्णुविता.

१. ज्यांत पकार इत्संज्ञक नाहीं असा जो सार्वधातुक नांवाचा प्रत्यय तो ङित्प्रत्ययासारखा समजावा; जसें-कुरुतः वगैरे.

नामथङ्शब्द औणादिकानां नङ्शब्दो घञर्थानाम्। तस्मात्सार्वधातुकग्रहणं कर्तव्यम् ॥

किं पुनरयं पर्युदासो यदन्यत्पित इति। आहोस्वित्प्रसज्यायं प्रतिषेधः पिन्नेति। कश्चात्र विशेषः।

**अपिन्ङिदिति चेच्छबेकादेशप्रतिषेध आदिवत्त्वात् ॥ १ ॥**

अपिन्ङिदिति चेच्छबेकादेशे प्रतिषेधो वक्तव्यः। च्यवन्ते प्लवन्ते। किं कारणम्। आदिवत्त्वात्। पिदपितोरेकादेशोऽपित आदिवत्स्यात्। अस्त्यन्यत्पित इति कृत्वा ङित्त्वं प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि प्रसज्यप्रतिषेधः पिन्नेति।

**न पिन्ङिदिति चेदुत्तमैकादेशप्रतिषेधः ॥ २ ॥**

पिन्नेति चेदुत्तमैकादेशे प्रतिषेधः प्राप्नोति। तुदानि लिखानि। किं कारणम्।

---

अथङ् या प्रत्ययाचा ङ्कार वर्तमान काल दाखविणाऱ्या प्रत्ययांसंबंधानेंच ज्ञापक होईल. ङ्वनिप् या प्रत्ययाचा ङकार भूतकाल दाखविणाऱ्या प्रत्ययासंबधानेंच ज्ञापक होईल. अथङ्प्रत्ययाचा ङकार उणादि प्रत्ययांच्या संबंधानेंच ज्ञापक होईल. आणि नङ्प्रत्ययाचा ङ्कार हा घञ्प्रत्ययाच्या अर्थी सांगितलेले जे प्रत्यय त्यांच्यासंबंधानेंच ज्ञापक होईल. एकंदरींत, कर्ता वगैरे उदाहरणांमधील जो तास् हा प्रत्यय त्याच्यासंबंधानें या वर दाखविलेल्या ज्ञापकांपैकीं कोणतेंच ज्ञापक लागू पडत नसल्यामुळें प्रकृतसूत्रानें ङित्त्व होईल असा दोष येतो. त्याकरितां या प्रकृतसूत्रामध्यें 'सार्वधातुकम्' असें म्हटलें पाहिजे.

आतां या प्रकृत सूत्रामध्यें अपित् असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ कसा समजावा?म्हणजे अपित् हा पर्युदास आहे की ज्याच्या योगानें पित्भिन्न अशा प्रत्ययाला ङित्त्व होतें असा अर्थ होईल, किंवा अपित् हा प्रसज्यप्रतिषेध आहे, म्हणजे प्रकृतसूत्रानें सामान्यतः सर्व सार्वधातुक प्रत्ययांना ङित्त्व सांगून तें ङित्त्व पित्प्रत्ययाला प्राप्त झाल्यानंतर त्याचा निषेध 'पित्प्रत्यय ङित् होत नाहीं' असा अर्थ होईल?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

(वा. १) पित्भिन्न प्रत्यय ङित् होतो असें जर म्हटलें तर ज्या उदाहरणामध्यें शप् या प्रत्ययाचा पुढील प्रत्ययाबरोबर एकादेश होतो तेथें प्रकृतसूत्रानें ङित्त्व होत नाहीं, असा निषेध सांगितला पाहिजे; उदा.—च्यवन्ते, प्लवन्ते.

येथें निषेध कशाकरतां सांगितला पाहिजे बरें ?

अन्तादिवच्च (६।१।८५) या सूत्रानें परादिवद्भाव होत आहे म्हणून च्यवन्ते या उदाहरणामध्यें शप् हा पित्प्रत्यय आणि अन्ते हा पित्भिन्न प्रत्यय, या दोहोंमध्यें अतो गुणे (६।१।९७) या सूत्रानें झालेला जो अ हा एकादेश तो अन्ते या पुढें असणाऱ्या पिद्भिन्न प्रत्ययाचा आद्यावयव आहे असें परादिवद्भावानें समजलें जाईल. तेव्हां अर्थातच तो पित् जरी असला तरी 'पिद्भिन्नप्रत्यय आहे' असें समजून प्रकृतसूत्रानें ङित्त्व होऊं लागेल.

तर मग अपित् हा प्रसज्यप्रतिषेधच असूं दे. म्हणजे सामान्यतः सर्व सार्वधातुक प्रत्ययांना ङित्त्व सांगून पित्प्रत्ययासंबंधानें 'पित् हा ङित् होत नाहीं' असा त्या ङित्त्वाचा निषेध समजला जाईल.

(वा. २) 'पित्प्रत्यय ङित् होत नाहीं' असा हा ङित्त्वाचा निषेध मानला तर ज्या उदाहरणामध्यें विकरणप्रत्ययाचा उत्तम पुरुष प्रत्ययाबरोबर एकादेश होतो तेथें ङित्त्वाचा

---

२. च्युधातूहून लट्-झ-अन्तादेश (७।१।३), शप् (३।१।६८), च्यु अ अन्ते असें असतां गुण करण्याचे पूर्वी नित्य असल्यामुळें किंवा वर्णद्वयावर अवलंबून असल्यानें अन्तरंग असल्यामुळें अतो गुणे (६।१।९७) यानें पररूपरूप एकादेश झाला आहे.

**आदिवत्त्वादेव । पिदपितोरेकादेशः पित आदिवत्स्यात्तत्र पिन्नेति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ यथेच्छसि तथास्तु । ननु चोक्तमुभयथापि दोष इति । उभयथापि न दोषः । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवदिति स्थानिवद्भावाद्व्यवधानम् ॥**

## असंयोगाल्लिट् कित् ॥१.२.५॥

**ऋदुपधेभ्यो लिटः कित्त्वं गुणाद्विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

ऋदुपधेभ्यो लिटः कित्त्वं गुणाद्भवति विप्रतिषेधेन । ववृते ववृधे ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । न वा क्सस्यानवकाशत्वादपवादो गुणस्येति ॥ विषम उपन्यासः ।

---

निषेध होऊं लागेल; उदा. तुदानि, लिखानि.[3]

येथें ङित्वाचा निषेध होण्याचें कारण काय ?

'अन्तादिवच्च (६।१।८५) या सूत्रानें सांगितलेला परादिवद्भाव' हेंच कारण होय. तुदानि या उदाहरणामध्यें आनि हा पित्प्रत्यय आणि मध्यें झालेला विकरण श हा अपित्प्रत्यय. या दोहोंमध्यें झालेला जो दीर्घ एकादेश तो पुढील प्रत्ययाचा आद्यावयव होईल, आणि त्यामुळें 'पित्प्रत्यय हा ङित् होत नाहीं' असा निषेध होऊं लागेल.

तर मग येथें अपित् याचा अर्थ तुला वाटेल तसा कर. कांहीं हरकत नाहीं.

पण आतांच दोन्ही तऱ्हांनीं दोष दाखविला आहे ना ?

हा दोन्ही तऱ्हांनीं दाखविलेला दोष येत नाहीं. कारण च्यवन्ते आणि तुदानि या दोन्ही उदाहरणांमध्यें विकरणप्रत्ययाचा पुढील प्रत्ययाबरोबर झालेला जो एकादेश त्याला पूर्वाला विधि कर्तव्य असतांना अचः परस्मिन् (१।१।५७) या सूत्रानें सांगितलेला स्थानिवद्भाव होत आहे. तो स्थानिवद्भाव झाला असतां मध्यें विकरणप्रत्ययानें व्यवधान येतें. (तेव्हां च्यवन्ते या उदाहरणामध्यें विकरणप्रत्यय शप् असल्यामुळें गुण होईल, आणि तोदानि येथें विकरणप्रत्यय श असल्यामुळें गुण होणार नाहीं.)

(सू.५,वा.१०) ज्या धातूंच्या उपधेला ऱ्हस्व ऋकार आहे अशा धातूंच्या पुढील लिट्प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेलें जें कित्त्व तें गुणापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतें असें म्हणावें.

उदा— ववृते, ववृधे, वगैरे.[2]

(वा.२) अथवा सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे कीं 'न वा क्सस्यानवकाशत्वादपवादो गुणस्य' (३।१।४५ वा.) क्सप्रत्ययासंबंधानें पूर्वविप्रतिषेध सांगावयास नको. कारण क्सप्रत्यय अनवकाश असल्यामुळें तो गुणाचा अपवादच होत आहे.' तेव्हां तसेंच ववृते या उदाहरणामध्यें देखील प्रकृतसूत्रानें

---

३. तुद्, लिख्, या धातूंहून 'लोट्--मेर्निः' (३।४।८९) यानें मिप् प्रत्ययाला नि आदेश, त्याला आड् आगम (३।४।९२), मध्यें श प्रत्यय, तुद् अ आनि असें असतां अकार आणि आकार यांचा सवर्ण दीर्घ (६।१।१०१) केला असतां अपित् शप्रत्यय व पित् आडागम यांच्या एकादेशाला 'अन्तादिवत्' या सूत्रानें परादिवद्भावानें पित्त्व समजलें जात असल्यामुळें 'पित् हा ङित् होत नाहीं' या प्रकृत सूत्रानें ङित्त्वनिषेध होईल, आणि गुण होऊन तोदानि असें भलतेंच रूप होईल.

१. संयोगाच्यापुढें नसलेला जो अपित् लिट् प्रत्यय तो कित्प्रत्ययासारखा समजावा, जसें-बिभिदतुः वगैरे.

२. वृतु, वृधु, धातूंहून लिट्प्रत्यय; त, एश्, द्वित्व, वगैरे होऊन ववृत ए असें असतां लिटाला कित्त्व मानलें तर निषेधामुळें गुण येऊं शकत नाहीं, आणि पूर्वीं गुण केला तर संयोगाच्या पुढें असल्यानें लिटाला कित्त्व येऊं शकत नाहीं. एकंदरींत गुण आणि कित्त्व या उभयतांलाही अनित्यत्व असल्यामुळें पर असल्यामुळें गुण प्राप्त होतो त्याचें पूर्वविप्रतिषेधानें वारण केलें आहे.

युक्तं तत्र यदनवकाशं कित्करणं गुणं बाधत इह पुनरुभयं सावकाशम् । कित्करणस्यावकाशः । ईजतुः ईजुः । गुणस्यावकाशः । वर्तित्वा वर्धित्वा । इहोभयं प्राप्नोति । ववृते ववृधे । परत्वाद्गुणः प्राप्नोति ॥ इदं तर्ह्युक्तमिष्टवाची परशब्दो विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

**इन्धिभवतिभ्यां च ॥१.२.६॥**

किमर्थमिदमुच्यते । इन्धेः संयोगार्थं वचनं भवतेः पिदर्थम् ॥ अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथम् ।

**इन्धेश्छन्दोविषयत्वाद्भुवो वुको नित्यत्वात्ताभ्यां किद्वचनानर्थक्यम् ॥१**

इन्धेश्छन्दोविषयो लिट् । न ह्यन्तरेण च्छन्द इन्धेरनन्तरो लिड् लभ्यः ।

---

प्राप्त झालेलें कित्त्व गुणाचा अपवाद होईल[3].

पण क्स प्रत्ययासंबंधानें हा जो तुम्ही इष्टान्त दाखविला तो बरोबर नाहीं. कारण त्यांत आणि यांत फरक आहे. तो असा की जर अलिक्षत् वगैरे उदाहरणांमध्यें क्सप्रत्यच्या अगोदर गुण होईल तर त्या क्सप्रत्ययाला लावलेल्या ककाराचा कांहीं उपयोग नाहीं असें होईल. तेव्हां तें क्सप्रत्ययाचें कित्त्व अनवकाश होत असल्यामुळें त्याच्या जोरावर तेथें क्सप्रत्ययानें गुणाचा बाध होतो हें बरोबरच आहे. पण प्रकृत विषयामध्यें मात्र तसें नाहीं. कारण येथें दोहोंनाही चारितार्थ्य मिळत आहे. प्रकृतसूत्रानें सांगतलेल्या कित्त्वाला ईजतुः, ईजुः, या उदाहरणांमध्यें यज्धातूला 'वचिस्वपि०' (६।१।१५) या सूत्रानें संप्रसारण करून चारितार्थ्य मिळत आहे. तसेंच वर्तिता, वर्धिता, या उदाहरणांमध्यें गुणालाही चारितार्थ्य आहे.आणि ववृते, ववृधे, या उदाहरणांमध्यें कित्त्व आणि गुण हे दोनही विधि प्राप्त होत आहेत. तेव्हां त्यांमध्यें कित्त्वाचा बाध करून परत्वास्तव गुण होईल असा दोष येतो.

तर मग 'उक्तं वा' या वार्तिकाचें तात्पर्य असें समजावें की 'विप्रतिषेधे परम्' (१।४।२) या सूत्रामध्यें पर हा शब्द इष्ट या अर्थाचा आहे असें सांगितलेंच आहे[4].

तेव्हां दोन कार्यें एका उदाहरणामध्यें विप्रतिषेधानें प्राप्त झालीं असतां तेथें त्यांमध्यें जें इष्ट असेल तें होतें. तेव्हां ववृते या उदाहरणामध्यें कित्त्व इष्ट असल्यामुळें तें गुणाचा बाध करून अगोदर होईल.

(सू.६) हें सूत्र कशाकरतां केलें आहे ?

इन्धधातूच्या शेवटीं संयोग असल्यामुळें त्याच्यापुढील लिट्प्रत्ययाला पूर्वसूत्रानें कित्त्व होणार नाहीं. त्याकरतां इन्धि असें सूत्रांत म्हटलें आहे. तसेंच भूधातूच्या पुढील लिट्प्रत्यय पित् असला तरी देखील त्याला कित्त्व झालें पाहिजे. याकरतां सूत्रामध्यें भवति असें म्हटलें आहे.

हें सूत्र न केलें तरी चालेल.

तें कसें ?

(वा.१) इन्ध्धातूच्या पुढें लिट्प्रत्यय

---

३. लिह् धातूहून लुङ्, तिप्, इकारलोप (३।४।१००), मध्यें च्लिप्रत्यय, अडागम, अलिह्, ल् त् असें असतां लघूपध गुण (७।३।८६) आणि क्स आदेश (३।१।४५) हे उभयतां प्रत्यय होत आहेत. त्यांत पर असल्यामुळें जर प्रथमतः गुण होईल तर क्सप्रत्ययामध्यें इत्संज्ञक ककार जोडणें निरुपयोगी ठरेल. तेव्हां त्याच्या जोरावर च्लि कायम असतां प्राप्त झालेल्या गुणाचा बाध करावयाचा. तसें प्रकृतस्थलीं ववृत् ए असें असतां गुण पूर्वी होईल तर धातूच्या शेवटीं संयोग होत असल्यामुळें कित्त्वविधायक प्रकृतसूत्राची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां कित्त्वविधायक सूत्राच्या जोरावर गुणाचा बाध होईल.

४. सूत्रकारांनीं सांगितलें आहे. कारण सूत्रकारांनींच 'विप्रतिषेधे' (१।४।२) या सूत्रामध्यें पर हा शब्द इष्ट या अर्थी घातला आहे.

१. इन्ध् धातु आणि भूधातु यांच्या पुढील लिट्प्रत्यय कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा. ईधे, बभूव.

आमा भाषायां भवितव्यम् । भुवो वुको नित्यत्वात् । भवतेरपि नित्यो वुक् । कृतेऽपि प्राप्नोत्यकृतेऽपि । ताभ्यां किद्वचनानर्थक्यम् । ताभ्यामिन्धिभवतिभ्यां किद्वचनमनर्थकम् ॥

## मृडमृदगुधकुषक्लिशवदवसः क्त्वा ॥१.२.७॥

किमर्थं मृडादिभ्यः परस्य क्त्वः कित्त्वमुच्यते किदेव हि क्त्वा । न क्त्वा सेट् [१.२.१८] इति प्रतिषेधः प्राप्नोति तद्बाधनार्थम् ॥ यदि तर्हि मृडादिभ्यः परस्य क्त्वः कित्त्वमुच्यते नार्थो न क्त्वा सेडित्यनेन कित्त्वप्रतिषेधेन । इदं नियमार्थं भविष्यति । मृडादिभ्य एव परस्य क्त्वः कित्त्वं भवति नान्येभ्य इति । यदि नियमः क्रियत इहापि तर्हि नियमान्न प्राप्नोति । लूत्वा पूत्वा । अत्राप्यकित्वं प्राप्नोति । तुल्यजातीयस्य नियमः । कश्च तुल्यजातीयः । यथाजातीयको मृडादिभ्यः परः क्त्वा । कथंजातीयकश्च

---

वैदिक प्रयोगांमध्येंच होणार आहे. कारण वैदिक प्रयोगांशिवाय इन्ध्धातूच्या पुढें अव्यवहित लिट्प्रत्यय मिळत नाहीं. तशा ठिकाणीं म्हणजे लौकिक प्रयोगांमध्यें लिट् प्रत्यय पुढें असतां इन्धधातूच्या पुढें 'इजादेश्च०' (३।१।३६) या सूत्रानें आम्प्रत्यय होणार आहे. तसेंच भूधातूला सांगितलेला वुक्आगम नित्य आहे. बभूव या उदाहरणामध्यें भुवो वुक् (६।४।८८) या सूत्रानें प्राप्त झालेला वुक् आगम गुण केला तरी प्राप्त होतो आणि गुण करण्याच्या पूर्वींही प्राप्त होतो. तेव्हां अर्थातच तो वुक् आगम नित्यत्वास्तव गुणाचा बाध करील. तेव्हां इन्ध आणि भू या दोन धातूंच्या पुढील लिट्प्रत्ययाला जें प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगितलें आहे तें निरर्थक होय.

(सू.७) मृड्, मृद्, वगैरे धातूंच्या पुढील क्त्वाप्रत्ययाला जें प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगितलें आहे तें कशाकरतां ? तें सांगावयास नको. कारण क्त्वा हा प्रत्यय मूळचाच कित् आहे म्हणजे ककारेत्संज्ञक आहे.

परंतु त्या क्त्वा या प्रत्ययाला इट्आगम झाला असतां 'न क्त्वा सेट्' (१।२।१८) या सूत्रानें कित्त्वाचा निषेध प्राप्त होतो. त्या निषेधाचा बाध करण्याकरतां हें सूत्र केलें आहे.

पण जर मृड्, मृद् वगैरे धातूंच्या पुढील क्त्वाप्रत्ययाला 'न क्त्वा सेट्' या निषेधाचा बाध करून प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगितलें आहे तर मग 'न क्त्वा सेट्' या सूत्रानें केलेला जो कित्त्वाचा निषेध तो निरर्थक होय. कारण तो निषेध केला नाहीं तर हें प्रकृत सूत्र नियमार्थ होईल आणि काम भागेल. तो नियम असा की, क्त्वाप्रत्ययाला जर कित्त्व मानावयाचें असेल तर मृड्, मृद् वगैरे धातूंच्या पुढील क्त्वाप्रत्ययालाच कित्त्व मानावें. म्हणजे अर्थातच इतर धातूंच्यापुढील क्त्वाप्रत्ययाला कित्त्व मानतां येणार नाहीं.

पण जर असा हा नियम केला तर ह्याच नियमावरून लूत्वा, पूत्वा, या उदाहरणांमध्यें देखील क्त्वाप्रत्ययाला कित्त्व मानतां येणार नाहीं. म्हणजे प्रकृत नियमाच्या जोरावर क्त्वाप्रत्यय मूळचा कित् असून देखील तो कित् समजला जाणार नाहीं.

पण हा जो प्रकृतसूत्रानें कित्त्वाच्या संबंधानें नियम केला आहे तो सजातीयाच्या संबंधानेंच आहे.

सजातीय असा क्त्वाप्रत्यय तो कोणता ?

---

१. मृड, मृद, गुध, कुष, क्लिश, वद आणि वस या धातूंच्या पुढील जो क्त्वाप्रत्यय तो कित्प्रत्ययासारखा समजावा. 'न क्त्वा सेट्' (१।२।१८) या कित्त्वनिषेधाच्या अपवादादाखल हें सूत्र लिहिलें आहे; उदा.—मृडित्वा.

मृडादिभ्यः परः क्त्वा। सेट्॥ एवमप्यस्त्यत्र कश्चिद्विभाषितेट् सोऽनिटां नियामकः स्यात्। अस्तु तावद्ये सेटस्तेषां ग्रहणं नियमार्थं य इदानीं विभाषितेट् तस्य ग्रहणं विध्यर्थं भविष्यति॥

## रुदविदमुषग्रहिस्वपिप्रच्छः संश्च ॥ १.२.८ ॥

स्वपिप्रच्छयोः सनर्थं ग्रहणं किदेव हि क्त्वा॥

## इको झल् ॥ १.२.९ ॥

किमर्थमिकः परस्य सनः कित्त्वमुच्यते।

### इकः कित्त्वं गुणो मा भूत्

इकः कित्त्वमुच्यते गुणो मा भूदिति। चिचीषति तुष्टूषति॥ नैतदस्ति प्रयोजनम्।

### दीर्घारम्भात्

दीर्घत्वमत्र बाधकं भविष्यति॥

---

मृड्, मृद्, वगैरे धातूंच्या पुढील क्त्वा प्रत्यय जसा आहे तशा प्रकारचा जो क्त्वाप्रत्यय तो सजातीय होय.

मृड्, मृद्, वगैरे धातूंच्या पुढील क्त्वाप्रत्यय कशा प्रकारचा आहे ?

तो क्त्वाप्रत्यय सेट् आहे म्हणजे इडागम झालेला आहे. (तेव्हां अर्थातच 'लूत्वा, पूत्वा, या उदाहरणांमध्यें क्त्वाप्रत्ययाला इडागम झाला नसल्यामुळें त्या क्त्वाप्रत्ययाचें कित्त्व प्रकृत नियमानें दूर करतां येणार नाहीं.)

पण असें मानलें तर प्रकृतसूत्रामध्यें उच्चारलेल्या मृड्, मृद्, वगैरे धातूमध्यें एक धातु म्हणजे क्लिश् हा विभाषितेट् आहे म्हणजे त्याच्यापुढील क्त्वाप्रत्ययाला 'क्लिशः क्त्वा' (७।२।५०) या सूत्रानें इडागम विकल्पानें होत आहे. तेव्हा अर्थातच त्या क्लिश्धातूच्या पुढील क्त्वाप्रत्ययाला एकदां इडागम होत नसल्यामुळें तो अनिट् क्त्वाप्रत्ययासंबंधानें कित्त्वाचा नियम करूं शकेल आणि तसें झालें असतां लूत्वा वगैरे उदाहरणांमध्यें दोष येईल.

ह्या सूत्रामध्यें जे सेट् धातु उच्चारले आहेत तेवढेच आपण नियमार्थक समजूं आणि 'जो क्लिश् हा धातु विभाषितेट् आहे तो त्याच्यापुढील इडागम झालेल्या क्त्वा प्रत्ययाला कित्त्वाचा विधि सांगण्याकरतां उच्चारला आहे' असें समजूं म्हणजे कांहीं दोष येत नाहीं.

(सू.८) ह्या सूत्रामध्यें स्वप् आणि प्रच्छ् हे जे दोन धातु त्यांच्यापुढील फक्त सन्प्रत्ययाला कित्त्व होण्याकरतांच उच्चारले आहेत. त्यांच्यापुढील क्त्वाप्रत्ययाला कित्त्व होण्याकरतां उच्चारले नाहींत. कारण ते दोन धातु अनिट् असल्यामुळें त्यांच्यापुढील क्त्वाप्रत्ययाचें कित्त्व मूळचें आहे तें कायमच राहत आहे.

(सू.९) इगन्त धातूंच्या पुढील सन्प्रत्ययाला जें हें प्रकृत सूत्रानें कित्त्व सांगितलें आहें तें कशाकरतां ?

(वा.१) इगन्तधातूच्या पुढील सन्प्रत्ययाला कित्त्व सांगण्याचा उपयोग असा की त्या इगन्त धातूला 'सार्वधातुकार्ध०' (७।३।८४) या सूत्रानें प्राप्त झालेला गुण होऊं नये; उदा०—चिचीषति, तुष्टूषति. येथें सन्प्रत्यय कित् झाल्यामुळें क्ङिति च (१।१।५) या सूत्रानें गुणाचा निषेध होत आहे.

कारण चिचीषति या उदाहरणामध्यें 'अज्झन०' (६।४।१६) या सूत्रानें प्राप्त झालेला

---

१. रुद्, विद्, मुष्, ग्रह्, स्वप् आणि प्रच्छ् या धातूंच्या पुढील सन् प्रत्यय आणि क्त्वाप्रत्यय हे कित् समजावेत; उदा. रुरुदिषति, रुदित्वा.

१. इगन्त धातूच्या पुढील झलादि सन्प्रत्यय कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा.—चिचीषति, तुष्टूषति.

**कृते भवेत् ।**

कृते खलु दीर्घत्वे गुणः प्राप्नोति ॥

**अनर्थकं तु**

अनर्थकमेवं सति दीर्घत्वं स्यात् ॥

नानर्थकम् ।

**ह्रस्वार्थम्**

ह्रस्वानां दीर्घवचनसामर्थ्याद्गुणो न भविष्यति ॥ भवेद्ध्रस्वानां दीर्घवचनसामर्थ्याद्गुणो न स्यात्

**दीर्घाणां तु प्रसज्यते ॥ १ ॥**

दीर्घाणां तु खलु गुणः प्राप्नोति । ननु च दीर्घाणामपि दीर्घवचनसामर्थ्याद्गुणो न भविष्यति । न दीर्घाणां दीर्घाः प्राप्नुवन्ति । किं कारणम् । न हि भुक्तवान्पुनर्भुङ्क्ते न च कृतश्मश्रुः पुनः श्मश्रूणि कारयति । ननु च पुनः प्रवृत्तिरपि दृष्टा । भुक्तवांश्च पुनर्भुङ्क्ते कृतश्मश्रुश्च पुनः श्मश्रूणि कारयति ।

**सामर्थ्याद्धि पुनर्भाव्यम्**

सामर्थ्यात्तत्र पुनःप्रवृत्तिर्भवति

---

दीर्घ गुणाचा बाध करीलें.

परंतु चिचीषति या उदाहरणामध्यें गुणाचा बाध करून अगोदर दीर्घ केल्यानंतर त्याच्यामागून पुनः गुण प्राप्त होत आहे. तो गुण न होण्याकरतां प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगितलें पाहिजे.

जर दीर्घ केल्यानंतर मागून प्राप्त झालेला गुण होईल तर दीर्घविधान व्यर्थ होईलें.

पण मागून गुण झाला तरी दीर्घविधान निरर्थक होत नाहीं.

ज्या धातूंच्या शेवटीं ह्रस्व वर्ण आहे त्यांना दीर्घ झाल्यानंतर त्याच्या जोरावर गुण होणार नाहीं. तेव्हां अर्थातच ह्रस्वान्त धातूंना दीर्घ विधानाच्या जोरावर मागून गुण होत नाहीं अशी कल्पना करून दीर्घविधानाला चारितार्थ्य मिळतें. म्हणून ज्या धातूंच्या शेवटीं मूळचाच दीर्घ वर्ण असेल त्यांना सन्प्रत्यय पुढें असतांना गुण प्राप्त होत आहे[४].

पण धातूच्या शेवटीं मूळचा जरी दीर्घ वर्ण असलातरी देखील अज्झन० (६।१।१६) या सूत्रानें त्या दीर्घालाच दीर्घ करून त्याच्या जोरावर मागून प्राप्त झालेला गुण होणार नाहीं.

पण मूळचाच दीर्घ असला तर त्या ठिकाणीं दीर्घालाच दीर्घ करतां येत नाहीं.

कां बरें ?

असें पाहा की लोकांमध्यें एकादा मनुष्य मूळचाच जर भोजन केलेला असला तर पुनः लगेंच भोजन करण्यास प्रवृत्त होत नाहीं. तसेंच श्मश्रुकर्म केलेला मनुष्य लगेंच पुनः श्मश्रुकर्म करण्यास प्रवृत्त होत नाहीं.

पण लोकामध्यें सुद्धां कांहीं ठिकाणीं पुनःप्रवृत्ति झालेली दृष्टीस पडते. भोजन केलेला मनुष्य देखील एखादे वेळीं पुनः भोजन करण्यास प्रवृत्त झालेला दृष्टीस पडतो. तसेंच श्मश्रुकर्म केलेला मनुष्य देखील एखादे वेळीं पुनः श्मश्रुकर्म करण्यास प्रवृत्त झालेला दृष्टीस पडतो.

लोकामध्यें जी एखादे वेळीं तेंच काम

---

२. चिचीषति वगैरे उदाहरणांमध्यें अष्टाध्यायीपाठक्रमानें परत्वास्तव दीर्घाचा (६।४।१६) बाध करून गुण (७।३।८४) होईल तर दीर्घ अनवकाश होईल. तेव्हां त्या जोरावर दीर्घ हा गुणाचा बाध करील. तेव्हां कित्त्व न सांगितलें तरी हरकत नाहीं.

३. अर्थात् अशा ठिकाणीं कायमचा बाध स्वीकारला पाहिजे म्हणजे दीर्घ झाल्यानंतरही गुण होणार नाहीं.

४. दीर्घस्थलीं मूळचाच दीर्घ आहे, व शब्दस्वरूपांत फेरफार करणें हें तर शास्त्राचें मुख्य कर्तव्य आहे. तेव्हां दीर्घस्थलीं तें संभवत नाहीं म्हणून तेथें दीर्घशास्त्र प्रवृत्त होणार नाहीं आणि गुण होईल.

५. तेथें प्राप्त झालेला गुण परत फिरवून मूळस्वरूप कायम ठेवणें एवढ्याच कामाकरतां दीर्घशास्त्र प्रवृत्त होईल आणि त्यानें गुणाचा बाध होईल.

भोजनविशेषाच्छिल्पिविशेषाद्वा। दीर्घाणां पुनर्दीर्घत्ववचने न किंचित्प्रयोजनमस्ति। अकृतकारि खल्वपि शास्त्रमग्निवत्। तद्यथा। अग्निर्यदद्ग्धं तद्दहति॥ दीर्घाणामपि दीर्घवचन एतत्प्रयोजनं गुणो मा भूदिति। कृतकारि खल्वपि शास्त्रं पर्जन्यवत्। तद्यथा। पर्जन्यो यावदूनं पूर्णं च सर्वमभिवर्षति॥ यथैव तर्हि दीर्घवचनसामर्थ्याद्गुणो न भवत्येवमृदित्त्वमपि न प्राप्नोति। चिकीर्षति जिहीर्षतीति।

**ऋदित्त्वं दीर्घसंश्रयम्।**

नाकृते दीर्घे ऋदित्त्वं प्राप्नोति। किं कारणम्। ऋत इत्युच्यते॥ भवेद्ध्रस्वानां नाकृते दीर्घे ऋदित्त्वं स्याद्दीर्घाणां तु खल्वकृतेऽपि दीर्घत्व ऋदित्त्वं प्राप्नोति।

**दीर्घाणां नाकृते दीर्घे**

दीर्घाणामपि नाकृते दीर्घे ऋदित्वं प्राप्नोति। यदा दीर्घत्वेन गुणो बाधि-

करण्याकरतां पुनःप्रवृत्ति झालेली दृष्टीस पडते ती तेथें कांहीं तरी विशेष कारण झालें असल्यामुळेंच दृष्टीस पडते. म्हणजे कांहीं विशेष पक्कान्न दृष्टीस पडेल तर पुनः भोजन करण्यास प्रवृत्ति होईल. तसेंच एखादा चांगला कारागीर दृष्टीस पडला तर पुनः श्मश्रुकर्म करण्यास प्रवृत्ति होईल. पण येथें तर धातूंच्या शेवटीं मूळचाच दीर्घ वर्ण असल्यास त्याला पुनः दीर्घ करण्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. आणि शास्त्र हें तर खरोखरच जें मूळचें नसेल तें करून दाखविणारें आहे. अग्नीप्रमाणें हें होय. तें असें की अग्नि हा जें मूळचें जळलेलें नसेल तेंच जाळण्यास प्रवृत्त होतो. जें मूळचेंच जळून गेलेलें असेल तें जाळण्यास तो कधीं प्रवृत्त होत नाहीं. (तेव्हां ज्या धातूंच्या शेवटीं मूळचा दीर्घ वर्ण आहे त्यांना पुनः दीर्घ होणार नाहीं, आणि तेथें गुण होऊं लागेल; त्या गुणाचा निषेध करण्याकरतां प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगतलें आहे.)

पण या ठिकाणीं मूळचा दीर्घ असून सुद्धां त्याला पुनः दीर्घ करण्यांत एक फायदा होत आहे तो हा की त्या दीर्घाला गुण होऊं नये. आतां मूळच्या जरी दीर्घ आहे तरी देखील शास्त्र मूळचें स्वरूप जसें असेल तसेंच हें कांही ठिकाणीं करून दाखविणारें असतें. पर्जन्याप्रमाणें हें होय; जसें— पर्जन्य हा सर्व ठिकाणीं सारखाच पडतो; ज्या ठिकाणीं पाण्याची उणीव असेल त्या ठिकाणीं आणि ज्या ठिकाणीं पाणी मूळचें पूर्ण भरलेलें असेल त्या ठिकाणीं देखील पडतो. त्याप्रमाणें शास्त्रानें दीर्घालाही दीर्घ होईल.

तर मग दीर्घ केल्यानंतर त्याच्या जोरावर मागून प्राप्त झालेला गुण होत नाहीं त्याप्रमाणें दीर्घ केल्यानंतर दीर्घ ऋकाराला प्राप्त झालेलें इत्त्वही होणार नाहीं; उदा०—चिकीर्षति, जिहीर्षति.

चिकीर्षति वगैरे उदाहरणामध्यें दीर्घ केला नसतांना ऋकाराला इत्त्वाची प्राप्तिच येत नाहीं.

कां बरें ?

इत्त्व हें दीर्घ ऋकाराला सांगितलें आहे म्हणून. (तेव्हां अर्थातच तेथें दीर्घ हा इत्त्वाला उपजीव्यच होत असल्यामुळें त्या इत्त्वाचा

६. चिचीर्षति येथें दीर्घ केल्यानंतर जर गुण होईल तर दीर्घविधायक शास्त्र सर्वथा निरर्थक होत असल्यानें तें जसें गुणाचा कायमचा बाध करतें तसें चिकीर्षति वगैरे स्थलीं दीर्घ केल्यानंतर इत्त्वाची प्रवृत्ति झाली असतां दीर्घविधायक शास्त्र जर निरर्थक होईल तर त्यानें गुणाप्रमाणें ऋदित्त्वाचाही बाध केला असता. पण तसें करण्यांत दीर्घ विधान व्यर्थ होत नाहीं तर ऋदित्त्वाचें उद्देश्य तयार करणें हेंच दीर्घ विधानाचें फल असल्यामुळें चिकीर्षति येथें केलेल्या दीर्घांत इत्त्व परत फिरविण्याची शक्ति नाहीं. उलट इत्त्व आणून देण्याचीच शक्ति आहे, सबब तेथें दीर्घाकडून इत्त्वाचा बाध होत नाहीं.

तस्तत उत्तरकालमृदित्त्वं भवति ॥

**णिलोपस्तु प्रयोजनम् ॥ २ ॥**

इदं तर्हि प्रयोजनं णिलोपो यथा स्यादिति । ज्ञीप्सति ॥ कास्तु ताः क निपतिताः । क किंत्त्वं क णिलोपः । को वाभिसंबन्धो यत्सति किंत्त्वे णिलोपः स्यादसति न स्यात् । एषोऽभिसंबन्धो यत्सति किंत्त्वे सावकाशं दीर्घत्वं परत्वाण्णिलोपो बाधेताऽसति पुनः किंत्त्वेऽनवकाशं दीर्घत्वं यथैव गुणं बाधत एवं णिलोपमपि बाधेत । तत्र णिलोपस्यावकाशः । कारणा हारणा । दीर्घत्वस्यावकाशः । चिचीषति तुष्टूषति । इहोभयं प्राप्नोति । ज्ञीप्सति । परत्वाण्णिलोपः ॥ असत्यपि किंत्त्वे सावकाशं दीर्घत्वम् । कोऽवकाशः । इस्भावः । निमित्सति प्रमित्सति ।

बाध होत नाहीं.)

पण ह्रस्व ऋकारान्त धातूंविषयीं दीर्घ करण्याच्या पूर्वी ऋकाराला इत्त्व प्राप्त होत नाहीं हें खरें, परंतु जे धातु मूळचेच दीर्घ ॠकारान्त आहेत त्यांना दीर्घ करण्याच्या पूर्वी देखील ॠकाराला इत्त्व प्राप्त होत आहे. त्याची वाट काय ?

मूळचा दीर्घ ॠकार असला तरी त्याला दीर्घ केला नाहीं तर त्या ॠकाराला इत्त्व प्राप्त होत नाहीं. कारण इत्त्वाचा गुण बाधक आहे. तेव्हां गुणाचा बाध करून दीर्घ केल्यानंतरच तेथें ॠकाराला इत्त्व करतां येतें[७]. (म्हणजे जोंपर्यंत दीर्घ झाला नाहीं तोंपर्यंत गुण हा इत्त्वाला होऊं देणार नाहीं.)

तर मग प्रकृतसूत्राचा णिप्रत्ययाचा लोप होणें हा उपयोग आहे; उदा.— ज्ञीप्सति.

अहो हें आहे तरी काय? हे बाण फेकले कोणीकडे आणि पडतात कोणीकडे? कारण प्रकृतसूत्रानें सांगितलें कित्त्व कोणीकडे आणि णिप्रत्ययाचा लोप कोणीकडे यांमध्यें असा काय संबंध आहे की ज्ञीप्सति या उदाहरणामध्यें प्रकृतसूत्रानें सन्प्रत्ययाला कित्त्व केलें तरच णिप्रत्ययाचा लोप होईल, आणि कित्त्व जर केलें नाहीं तर णिप्रत्ययाचा लोप होणार नाहीं.

हें असंबद्ध भाषण आहे असें समजूं नका. कित्त्व आणि लोप यांमध्यें तसा संबंधच आहे. तो असा की सन्प्रत्ययाला कित्त्व केलें तर दीर्घाला गुणाशिवाय चारितार्थ्य येत असल्यामुळें ज्ञीप्सति या उदाहरणामध्यें दीर्घाचा णिलोपानें परत्वास्तव बाध होतो. आणि जर प्रकृतसूत्रानें कित्त्व सांगितलें नाहीं तर सर्व ठिकाणीं गुणाची प्राप्ति येत असल्यामुळें जसा दीर्घ अनवकाशत्वास्तव गुणाचा बाध करतो तसा णिलोपाचाही बाध करील. (आतां प्रकृत सूत्रानें कित्त्व सांगितलें म्हणजे ज्ञीप्सति या उदाहरणामध्यें दीर्घाचा बाध करून परत्वास्तव णिलोप होत असतो. तो असा की,) कारणा, हारणा, या उदाहरणांमध्यें दीर्घाची प्राप्ति नाहीं. तेथें णिलोपाला चारितार्थ्य आहे, तसेंच चिचीषति, तुष्टूषति, या उदाहरणांमध्यें णिलोपाची प्राप्ति येत नाहीं; तेथें दीर्घाला चारितार्थ्य आहे. आणि ज्ञीप्सति या उदाहरणामध्यें णिप्रत्ययाला दीर्घ आणि लोप हे दोनही विधि प्राप्त होत आहेत. तेव्हां अर्थातच तेथें दीर्घाचा बाध करून णिप्रत्ययाचा लोप होतो.

७. तॄ धातूहून सन् प्रत्यय करून त्या सनाला 'सनिग्रह०' (७।२।१२) या सूत्रानें इडागमाचा निषेध होतो. तॄ स असें असतां इत्त्व (७।१।१००) आणि गुण (७।३।८४) प्राप्त होतो. त्यांत गुण हा विप्रतिषेधानें इत्त्वाचा बाधक असल्यामुळें इत्त्व दूर सरलें व गुण एकटा उरला. त्या गुणाचाही 'अज्झन०' (६।४।१६) हा दीर्घ कायमचा बाध करीत असल्यामुळें गुणाला मागें सारून दीर्घ केला तेव्हां गुण कायमचा मागें सरला हें पाहून बाधकाची भीति राहिली नसल्यानें आतां इत्त्व पूढें सरसावलें.

८. पकारान्त ज्ञप् धातूच्यापुढें णिच् प्रत्यय, त्याच्यापुढें सन प्रत्यय, त्याला 'सनीवन्तर्ध०' (७।२।४८) या सूत्रानें इडागमाचा विकल्प सांगितला असल्यामुळें इडागम केला नाहीं, नंतर ईत्व (७।४।५५), अभ्यासलोप (७।४।५८) होऊन ज्ञीप्सति असें रूप सिद्ध होतें.

मीनातिमिनोत्योर्दीर्घत्वे कृते मीग्रहणेन ग्रहणं यथा स्यात् ॥ यथैव तर्ह्यसति किन्त्वे सावकाशं दीर्घत्वं परत्वाण्णिलोपो बाधत एवं गुणोऽपि बाधेत । तस्मात्किन्त्वं वक्तव्यम् ॥

इकः किन्त्वं गुणो मा भूद्दीर्घारम्भात्कृते भवेत् ।
अनर्थकं तु ह्रस्वार्थं दीर्घाणां तु प्रसज्यते ॥ १ ॥
सामर्थ्याद्धि पुनर्भाव्यमृदित्त्वं दीर्घसंश्रयम् ।
दीर्घाणां नाकृते दीर्घे णिलोपस्तु प्रयोजनम् ॥ २ ॥

**हलन्ताच्च ॥ १.२.१० ॥**

अयुक्तोऽयं निर्देशः । कथं हीको नाम हलन्तः स्यादन्यस्यान्यः । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः । इग्वतो हल इति । यद्येवं यियक्षति अत्रापि प्राप्नोति । एवं तर्हीगुपधाद्धलन्तादिति वक्ष्यामि । एवमपि दम्भेर्न प्राप्नोति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमयुक्तोऽयं निर्देश इति । नायुक्तः । अन्तशब्दो-

---

पण हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. कारण प्रकृतसूत्रानें किन्त्व सांगितलें तरी देखील दीर्घाला चारितार्थ्य मिळत आहे.

तें कोठें ?

'निमित्सति, प्रमित्सति, या उदाहरणांमध्यें 'सनि मीमा०' (७।४।५४) या सूत्रानें मी याला इस् आदेश होणें' असा दीर्घ करण्याचा उपयोग आहे. क्र्यादिगणांतील मी धातु आणि स्वादिगणातील मि धातु या दोनही धातूंना सनि मीमा० (७।४।५४) या सूत्रानें इस् आदेश झाला पाहिजे. तेव्हां ह्रस्व मिधातूला दीर्घ केल्यानंतरच त्याचें 'सनि मीमा०' या सूत्रांतील मी या शब्दानें ग्रहण होऊन इस् आदेश करतां येतो, असा तेथें दीर्घ करण्याचा उपयोग संभवतो.

तर मग, आतां प्रकृतसूत्रानें किन्त्व सांगितलें नाहीं तरी देखील मित्सति या उदाहरणामध्यें दीर्घाला चारितार्थ्य येत असल्यामुळें त्याचा णिलोप बाध करतो, तसा चिचीषति या उदाहरणामध्यें गुण देखील त्या दीर्घाचा बाध करील. याकरितां प्रकृतसूत्रानें किन्त्व अवश्य सांगितलें पाहिजे.

(सू.१०) येथें जें सूत्रकारांनीं हलन्तात् असें म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. कारण हल् हा कसा बरें इकाचा अन्त्यावयव होऊं शकेल ? वर्ण हे निरनिराळे असल्यामुळें त्यांतील एक दुसऱ्याचा अन्त्यावयव होत नसतो.

तर मग सूत्रांत कसें बरें म्हटलें पाहिजे ?

'इग्वतो हलः' असें म्हटलें पाहिजे. म्हणजे ज्या धातूमध्यें इक् वर्ण आहे असा हलन्त धातु असा त्याचा अर्थ होईल.

असें जर म्हटलें तर यियक्षति या उदाहरणांमध्यें यज् धातूला द्वित्व केल्यानंतर यियज् हा तसा होत असल्यामुळें प्रकृत सूत्रानें सन् प्रत्ययाला किन्त्व[२] होऊं लागेल.

तर मग 'इगुपधात् हलन्तात्' असें म्हणूं, म्हणजे ज्या धातूच्या उपधेला इक् आहे आणि शेवटचा वर्ण हल् आहे तेथेंच सन्प्रत्ययाला किन्त्व होईल.

पण असें म्हटलें तरी देखील दम्भ् धातूच्या पुढील सन्प्रत्ययाला किन्त्व प्राप्त होत नाहीं हा दोष येतोच. आणि सूत्र देखील बरेंच फिरविलें जात आहे.

तर मग पाणिनीनें मूळचें सूत्र जसें केलें आहे तसेंच असूं दे.

पण आतांच म्हटलें आहे ना की हलन्तात् हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं म्हणून ?

---

१. इकाच्याजवळ असलेला जो हल् त्याच्यापुढील जो झलादि सन् तो कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा.-बुभुत्सते, पिपक्षति.

२. तेव्हां यियक्षति येथें 'वचिस्वपि०' (६।१।१५) या सूत्रानें संप्रसारण होईल.

ऽयमस्त्येवावयववाची । तद्यथा । वस्त्रान्तः वसनान्तः । वस्त्रावयवो वसनावयव इति गम्यते । अस्ति सामीप्ये वर्तते । तद्यथा । उदकान्तं गत इति । उदकसमीपं गत इति गम्यते । तद्यः सामीप्ये वर्तते तस्येदं ग्रहणम् ॥ एवमपि दम्भेर्न सिध्यति । योऽत्रेक्समीपे हल्न तस्मादुत्तरः सन् । यस्मादुत्तरः सन्नासाविक्समीपे हल् । एवं तर्हि

**दम्भेर्हल्ग्रहणस्य जातिवाचकत्वात्सिद्धम् ॥ १ ॥**

हल्जातिर्निर्दिश्यते । इक उत्तरा या हल्जातिरिति ॥

## [1]लिङ्सिचावात्मनेपदेषु ॥ १.२.११ ॥

कथमिदं विज्ञायते । आत्मनेपदं यौ लिङ्सिचाविति । आहोस्विदात्मनेपदेषु परतो यौ लिङ्सिचाविति । किं चातः । यदि विज्ञायत आत्मनेपदं यौ लिङ्सिचाविति लिङ्विशेषितः सिजविशे-

---

हलन्तात् हें जें म्हटलें आहे तें अयोग्य आहे असें समजूं नये. कारण अन्त हा शब्द अन्त्यावयव या अर्थाचा आहे; जसें 'वस्त्रान्तः, वसनान्तः'. येथें 'वस्त्राचा शेवटचा अवयव, वसनाचा शेवटचा अवयव' म्हणजे 'पदर' अशा अर्थाचा बोध होतो. तसेंच अन्त शब्दाचा दुसरा सामीप्य हाही अर्थ आहे. जसें 'उदकान्तं गतः' येथें 'उदकाच्या जवळ गेला' हा अर्थबोध होतो. तेव्हां सामीप्य या अर्थाचा जो अन्तशब्द तो येथें पाणिनीनें उच्चारला आहे.

पण असें मानलें तरी दम्भ् धातूच्या पुढील सन्प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें कित्त्व होणार नाहीं[3] हा दोष येत आहेच. कारण दम्भधातूला सन्प्रत्यय पुढें असतांना 'दम्भ इच्च' (७।४।५६) या सूत्रानें इत्त्व केल्यानंतर त्या इकाच्या जवळ तो हल् नकार आहे त्याच्या पुढें सन् नाहीं. कारण मध्यें भकारानें व्यवधान आहे. आणि ज्या हलाच्या म्हणजे भकाराच्या पुढें सन् आहे तो हल् इकाच्या जवळ नाहीं.

(वा.१) तर मग प्रकृतसूत्रामध्यें पाणिनीनें हा जो हल्शब्द उच्चारला आहे तो हल्जातीचा बोधक[4] आहे. म्हणजे इकाच्याजवळ जे हल्त्व जातीचे वर्ण—मग ते 'एक किंवा अनेक' कसेही असोत—त्यांच्या पुढील सन्प्रत्ययाला कित्त्व होतें, असा अर्थ झाला म्हणजे कांहीं एक दोष येत नाहीं.

(सू.११) या सूत्राचा अर्थ कसा समजावा ? आत्मनेपदामधील जे लिङ् आणि सिच् असा समजावा किंवा आत्मनेपद पुढें असतांना जे लिङ् आणि सिच् असा समजावा ?

यांत काय बरें फरक आहे ?

फरक असा होतो की, आत्मनेपदामधील जे लिङ् आणि सिच् असा अर्थ समजला तर आत्मनेपद हें विशेषण लिङाला बरोबर लागेल. परंतु सिच्प्रत्ययाला तें विशेषण

---

३. दम्भ्धातूहून सन्प्रत्यय, 'सनीवन्त०' (७।२।४९) यानें इडभाव, 'दम्भ इच्च' (७।४।५६) यानें इत्त्व, हल्ग्रहण जातिपर आहे म्हणून प्रकृतसूत्रानें सनाला कित्त्व होतें. नंतर नकारलोप (६।४।२४) होतो, भष्भाव वगैरे केल्यानें धिप्सति असें रूप होतें, इगुपधाद्धलन्तात् असें सूत्र केलें तर इत्त्व केल्यानंतर दिम्भ् हा धातु इगुपध होत नसल्यानें त्याच्या पुढील सनाला कित्त्व होणार नाहीं.

४. इकाच्या पुढील जी हल्जाति तिच्यापुढील सनाला कित्त्व होतें असा या सूत्राचा अर्थ होतो. पण जाति अमूर्त पदार्थ असल्यामुळें तिला अमुक्याहून पुढें किंवा अमक्याहून मागें असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां तें म्हणणें त्या जातीला आश्रय असलेल्या वर्णांकडून जुळवावें.

१. इकाच्या पुढील जो हल् त्याच्या पुढील जो झलादि लिङ् किंवा आत्मनेपदाच्या मागील सिच् तो कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा. भित्सीष्ट, अभित्त.

षितः । अथ विज्ञायत आत्मनेपदेषु परतो यौ लिङ्सिचाविति सिज्विशेषितो लिङ्विशेषितः ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावदात्मनेपदं यौ लिङ्सिचाविति । ननु चोक्तं लिङ्विशेषितः सिजविशेषित इति । सिच्च विशेषितः । कथम् । आत्मनेपदं सिज्नास्तीति कृत्वात्मनेपदपरे सिचि कार्यं विज्ञास्यते । अथवा पुनरस्त्वात्मनेपदेषु परतो यौ लिङ्सिचाविति । ननु चोक्तं सिज्विशेषितो लिङ्विशेषित इति । लिङ्च विशेषितः । कथम् । आत्मनेपदेषु परतो लिङ्नास्तीति कृत्वात्मनेपदे लिङि कार्यं विज्ञास्यते ॥ नैव वा पुनरर्थो लिङ्विशेषणेनात्मनेपदग्रहणेन । किं कारणम् । झलिति वर्तते । आत्मनेपदेषु चैव लिङ् झला-

लावतां येणार नाहीं.[2] आतां आत्मनेपद पुढें असतांना जे लिङ् आणि सिच् असा अर्थ समजला तर आत्मनेपद हें विशेषण सिचाला बरोबर जुळेल, परंतु तें विशेषण लिङ्प्रत्ययाला संभवत नाहीं.[3]

तर मग येथें तुला वाटेल तसा अर्थ होऊं दे. आत्मनेपदामधील जे लिङ् आणि सिच् असा का अर्थ होईना, होऊं दे. कांहीं हरकत नाहीं.

पण आतांच सांगितलें ना की तसा अर्थ केला तर आत्मनेपद हें विशेषण लिङाला बरोबर जमतें, सिचाला तें विशेषण जमत नाहीं?

सिचालाही तें विशेषण देतां येतें.

तें कसें?

तें असें की, सिच्प्रत्यय हा आत्मनेपदामधील नसल्यामुळें अर्थातच आत्मनेपद पुढें असतांना जो सिच्प्रत्यय त्यालाच तें कार्य म्हणजें कित्त्व सांगितलें आहे असें समजतां येईल.[4]

अथवा आत्मनेपद पुढें असतांना जे लिङ् आणि सिच् असा अर्थ केला तरीही हरकत नाहीं.

पण तसा अर्थ केला तर आत्मनेपद हें विशेषण सिच्प्रत्ययाला देतां येतें, लिङाला देतां येत नाहीं, असें आतांच सांगितलें आहे ना?

लिङालाही आत्मनेपद हें विशेषण देतां येईल.

तें कसें?

आत्मनेपद पुढें असतां त्याच्यामागें लिङ् संभवत नाहीं. म्हणून आत्मनेपदामधील जो लिङ् त्यालाच तें कार्य म्हणजे कित्त्व सांगितलें आहे असें समजतां येईल.[5]

अथवा आत्मनेपद हें लिङाला विशेषण करण्यांत कांहींच उपयोग नाहीं.

कां बरें?

या सूत्रामध्यें झल् हें पद अनुवृत्त होत आहे. आणि लिङ् हा झलादि जो दिसतो तो आत्मनेपद केलें असतांनाच दिसतो. परस्मैपदामध्यें झलादि लिङ् कुठेंही दृष्टीस पडत नाहीं. एकंदरींत सूत्रामध्यें पाणिनीनें जो

२. आत्मनेपदेषु ही निर्धारणसप्तमी घेतली तर आत्मनेपदामधील जो लिङ्, अर्थात् आत्मनेपद जो लिङ्, तो कित् होतो असा या सूत्राचा अर्थ मनांत येतो. तेव्हां आत्मनेपदप्रत्यय हे लिङाचे स्थानीच होत असल्यामुळें लिङाला आत्मनेपदांतील असें जें विशेषण दिलें तें जुळून येत आहे. पण सिच् हा लुङ् पुढें असतां त्याच्यामागें होत असतो; तेव्हां त्या सिचाला आत्मनेपदामधील हें विशेषण लागू करतां येणार नाही.

३. कारण आत्मनेपद हें लिङाचे स्थानीं होतें, लिङाच्या पुढें असत नाहीं.

४. आत्मनेपदाच्या मागें जवळच सिच् असल्यानें लक्षणेनें आत्मनेपद हा शब्द सिचाला लागू करतां येईल.

५. सूत्रांतील 'आत्मनेपदेषु' हा शब्द तन्त्रानें आत्मनेपदाच्या मागील आणि आत्मनेपदामधील अशा दोन अर्थानें वापरला आहे असें समजावें.

दिर्न परस्मैपदेषु । तदेतत्सिज्विशेषणमात्मनेपदग्रहणम् ॥ अथ सिज्विशेषण आत्मनेपदग्रहणे सति किं प्रयोजनम् । इह मा भूत् । अयाक्षीत् अवात्सीत् । नैतदस्ति । इक इति वर्तते ॥ एवमप्यनैषीत् अचैषीत् अत्रापि प्राप्नोति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । हलन्तादिति वर्तते ॥ एवमप्यकोषीत् अमोषीत् अत्रापि प्राप्नोति । नैतदस्ति । झलिति वर्तते ॥ एवमप्यभैत्सीत् अच्छैत्सीत् अत्रापि प्राप्नोति । नैतदस्ति । इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधो न चैषेग्लक्षणा वृद्धिः ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । इह मा भूत् । अद्राक्षीत् अस्राक्षीत् । किं च स्यात् । अकि-

---

आत्मनेपद शब्द उच्चारला आहे तो सिच्प्रत्ययाला विशेषण देण्याकरतांच उच्चारला आहे.

आतां आत्मनेपद हें जें सिचाला विशेषण दिलें आहे त्याचा तरी उपयोग कोणता ?

उपयोग असा की अयाक्षीत्, अवाप्सीत्, या उदाहरणांमध्यें आत्मनेपद केलें नसल्यामुळें सिच्प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें कित्त्व होऊं नये म्हणून.

पण हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण प्रकृतसूत्रामध्यें 'इकः' हें पद अनुवृत्त होत आहे. आणि यज्, वप्, हे धातु इगन्त नाहींत.

तरी पण अचैषीत्, अनैषीत्, या उदाहरणांमध्यें 'चि', 'नी', हे धातु इगन्त असल्यामुळें प्रकृतसूत्रानें सिच्प्रत्ययाला किरव होऊं लागेल, असा दोष येतो.

हा देखील दोष येत नाहीं. कारण हलन्त या पदाची अनुवृत्ति मागून येत आहे (म्हणजे इकाच्या जवळचा जो हल् असा अर्थ होईल).

तरी देखील अकोषीत्, अमोषीत्, या ठिकाणीं कुष्, मुष्, धातूंच्या पुढील सिच्प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें किरव होऊं लागेल असा दोष येतोच.

हा देखील दोष येत नाहीं. कारण प्रकृतसूत्रामध्यें झल् या पदाची अनुवृत्ति होत आहे आणि अकोषीत्, अमोषीत्, या उदाहरणांमध्यें सिच्प्रत्ययाला इडागम झाला असल्यामुळें सिच् प्रत्यय झलादि नाहीं.

तरी देखील अभैत्सीत्, अच्छैत्सीत्, या उदाहरणांमध्यें प्रकृतसूत्रानें सिच्प्रत्ययाला किरव होईल असा दोष येतोच.

हा देखील दोष येत नाहीं. कारण या उदाहरणांमध्यें प्रकृतसूत्रानें सिच्प्रत्ययाला किरव झालें तरी दोष येत नाहीं. कारण 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें वृद्धीचा निषेध होईल असें मुळींच म्हणतां येत नाहीं. कारण 'इको गुणवृद्धी' (१।१।१३) या परिभाषेनें जे गुण आणि वृद्धि इकाला होतात त्याच गुणवृद्धींचा 'क्ङिति च' (१।१।३) या सूत्रानें निषेध होत असतो. आणि अभैत्सीत् या उदाहरणामध्यें प्राप्त झालेली 'वदव्रज०' (७।२।३) या सूत्रानें सांगितलेली जी वृद्धि ती इग्लक्षण नाहीं. म्हणजे इको गुणवृद्धी या परिभाषेच्या जोरावर इकाला होते असें नाहीं. तेव्हां त्या वृद्धीचा निषेध होणार नाहीं.

तर मग प्रकृतसूत्रामध्यें आत्मनेपद हें जें सिचाला विशेषण दिलेलें आहे त्याचा उपयोग असा समजावा की, अस्राक्षीत्, अद्राक्षीत्, या उदाहरणांमध्यें सिच्प्रत्ययाला किरव न झालें पाहिजे.

येथें प्रकृतसूत्रानें सिच्प्रत्ययाला किरव झालें तर काय बरें दोष येईल ?

'सृजिदृशो०' (६।१।५८) या सूत्रानें अकित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला जो अम् आगम तो प्रकृतसूत्रानें सिच् प्रत्ययाला किरव

---

६. सृज् व दृश् धातूंहून लुङ्, तिप्, इकाराचा लोप, च्लि; न दृशः (३।१।४७) यानें क्स प्रत्ययाचा निषेध केल्यानें दृश्धातूच्या पुढील च्लिप्रत्ययाला सिच्, अमागम, हलन्तलक्षण वृद्धि वगैरे होऊन हीं रूपें सिद्ध होतात.

ह्लक्षणोऽमागमो न स्यात् ॥

[ उश्च ॥ १.२.१२ ॥ ]

[ वा गमः ॥ १.२.१३ ॥ ]

[ हनः सिच् ॥ १.२.१४ ॥ ]

[ यमो गन्धने ॥ १.२.१५ ॥ ]

[ विभाषोपयमने ॥ १.२.१६ ॥ ]

स्थाघ्वोरिच्च ॥ १.२.१७ ॥

**इच्च कस्य तकारेत्त्वम्**

कस्य हेतोरिकारस्तपरः क्रियते ।

**दीर्घो मा भूत्**

दीर्घो मा भूदिति ॥

**ऋतेऽपि सः ।**

अन्तरेणाप्यारम्भं सिद्धोऽत्र दीर्घो घुमास्थागापाजहाति [६.४.६६] इति॥

**अनन्तरे प्लुतो मा भूत्**

इदं तर्हि प्रयोजनमनन्तरे प्लुतो मा भूदिति । कुतो नु खल्वेतदनन्तरार्थे आरम्भे ह्रस्वो भविष्यति न पुनः प्लुत इति ॥

**प्लुतश्च विषये स्मृतः ॥ १ ॥**

---

केलें असतांना होणार नाहीं.

(सू.१७) प्रकृतसूत्रामध्यें इत् असें जें म्हटलें आहे म्हणजे इकाराच्या पुढें जो तकार लावला आहे तो काय हेतु मनांत धरून लावला आहे ?

प्रकृतसूत्रानें इकार आदेश होतांना 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें स्थानीसारखा दीर्घ ईकार आदेश होईल, तो न होण्याकरितां तकार उच्चारला आहे.

दीर्घ आकार स्थानी असल्यामुळें इकार आदेश होतांना जर त्याच्यासारखा दीर्घ ईकारच आदेश होईल तर तो प्रकृतसूत्र मुळीं केलें नाहीं तरी देखील सिद्ध होतच आहे. कारण 'घुमास्थागा०' (६।४।६६) या सूत्रानें आकाराला दीर्घ ईकार आदेश सांगितलाच आहे. त्या 'घुमास्थागा' या सूत्रानें दीर्घ ईकार सिद्ध होत असतांना ज्या अर्थी प्रकृतसूत्रानें इकार आदेश सांगितला आहे त्या अर्थी तो स्थानीसारखा दीर्घ न होतां स्थानीपेक्षां विजातीय म्हणजे ह्रस्व इकार आदेश होईल.

तर मग इकाराच्या पुढें तकार उच्चारण्याचा उपयोग आम्ही असा सांगतों की, स्थानीपेक्षां विजातीयच जर इकार होणार तर कदाचित् प्लुत देखील होऊं लागेल तो न व्हावा याकरतां तपरकरण केलें पाहिजे. कारण विजातीय आदेश करण्याकरतांच जर हें सूत्र केलें आहे तर तो इकार आदेश ह्रस्वच होईल आणि प्लुत होणारच नाहीं असें कशावरून समजतां येईल ?

प्रकृतसूत्रानें प्लुत इकार आदेश होणार

---

१. ऋवर्णान्त धातूच्या पुढील झलादि लिङ्-प्रत्यय किंवा आत्मनेपदाच्या मागील सिच्प्रत्यय हे कित्प्रत्ययासारखे समजावेत; उदा. कृषीष्ट, हृषीष्ट, अकृत, अहृत.

१. गम्धातूच्या पुढील झलादि लिङ् किंवा आत्मनेपदाच्या मागील झलादि सिच्प्रत्यय हे कित्प्रत्ययासारखे विकल्पानें समजावेत; उदा. संगसीष्ट, संगसीष्ट; समगत, समगंस्त.

१. हन्धातूच्या पुढील जो सिच्प्रत्यय तो कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा. आहत, आहसाताम्, आहसत.

१. सूचन या अर्थाला दर्शविणाऱ्या यम्धातूच्या पुढील सिच्प्रत्यय कित्प्रत्ययासारखा समजावा, आत्मनेपद पुढें असतां; उदा. उदायत, उदायसाताम् उदायसत.

१. विवाहक्रिया या अर्थाला दाखविणाऱ्या यम्धातूच्या पुढील सिच् प्रत्यय विकल्पानें कित्प्रत्ययासारखा समजावा, आत्मनेपद पुढें असतां; उदा. उपायत उपायंस्त वा कन्याम्.

१. स्थाधातु व घुसंज्ञक (१।१।२०) धातु यांच्या शेवटच्या वर्णाला ह्रस्व इकार आदेश होतो, आणि त्यांच्यापुढील सिच्प्रत्यय कित्प्रत्ययासारखा होतो, आत्मनेपद पुढें असतां; उदा. उपास्थित, उपास्थिषाताम्; अदित, अधित.

२. या प्रकृतसूत्रानें फक्त कित्त्वच सांगावें असा अभिप्राय आहे.

विषये प्लुत उच्यते यदा च स विषयो भवितव्यमेव तदा प्लुतेन ॥

इच्च कस्य तकारेत्त्वं दीर्घो मा भूदृतेऽपि सः ।
अनन्तरे प्लुतो मा भूत्प्लुतश्च विषये स्मृतः ॥ १ ॥

**न क्त्वा सेट् ॥ १।२।१८ ॥**

**न सेडिति कृतेऽकित्त्वे**

न सेडित्येव सिद्धं नार्थः क्त्वाग्रहणेन ॥ निष्ठायामपि तर्हि प्राप्नोति । गुधितः गुधितवानिति ।

**निष्ठायामवधारणात् ।**

निष्ठायामवधारणान्न भविष्यति । किमवधारणम् । निष्ठा शीङ्स्विदिमिदिक्ष्विदिधृषः [१. २. १९] इति ॥ परोक्षायां तर्हि प्राप्नोति । किं च स्यात् । पपिव पपिम । क्ङितीत्याकारलोपो न स्यात् । मा भूदेवम् । इटीत्येवं भविष्यति ॥ इदं तर्हि । जग्मिव जघ्निव । क्ङितीत्युपधालोपो न स्यात् ।

**ज्ञापकान्न परोक्षायाम्**

ज्ञापकात्परोक्षायां न भविष्यति । किं ज्ञापकम् ।

---

नाहीं. कारण प्लुत हा त्याच्या विषयामध्येंच[३] होत असतो. आणि जर एखाद्या उदाहरणामध्यें प्लुताचा विषय ठेवला जाईल तर तेथें प्लुत करावाच लागेल. (एकंदरींत प्रकृत सूत्रामध्यें तपरकरण करावयांस नको.)

(सू. १८) या सूत्रामध्यें क्त्वा असा शब्द घालण्याचा कांहीं उपयोग नाहीं. 'न सेट्' इतकेंच सूत्र केलें तरी काम भागेल. तेवढेंच सूत्र केलें तर निष्ठाप्रत्यय म्हणजे क्त, क्तवतु, हे प्रत्यय केले असतांना देखील प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होऊं लागेल; उदा०—गुधितः, गुधितवान्.

नियम केला असल्यामुळें निष्ठाप्रत्ययाला प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होणार नाहीं.

तो नियम कोणता ?

निष्ठा शीङ्स्विदिमिदिक्ष्विदिधृषः (१।२।१९) या सूत्रानें केलेला नियम होय. (तो नियम असा की, इडागम झालेल्या निष्ठाप्रत्ययाला जर प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होईल तर त्या निष्ठाप्रत्ययाच्या मागें शीङ्, स्विदि, वगैरे धातु असतील तरच होईल. म्हणजे अर्थात् इतर धातु असतांना त्याच्यापुढील निष्ठाप्रत्ययाला प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होणार नाहीं.)

तर मग परोक्ष अर्थ दाखविणारा म्हणजे लिट्प्रत्यय केला असतांना तेथें प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होऊं लागेल.

लिट्प्रत्यय केला असतांना प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध झाला तर काय होईल ?

'आतो लोप' (६।४।६४) या सूत्रानें कित्, ङित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला जो आकाराचा लोप तो पपिव, पपिम, या उदाहरणांमध्यें होणार नाहीं.

तशा रीतीनें म्हणजे कित्प्रत्ययाच्या निमित्तानें आकाराचा लोप झाला नाहीं तरी हरकत नाहीं. त्याच सूत्रानें इट् आगम पुढें असतांना आकाराचा लोप सांगितला आहे तो पपिव येथें करतां येईल.

तर मग 'गमहन०' (६।४।९८) या सूत्रानें कित्, ङित्, प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला जो उपधेचा लोप तो जग्मिव, जघ्निम, या उदाहरणांमध्यें होणार नाहीं.

परोक्ष अर्थाला दाखविणारा म्ह. लिट्प्रत्यय केला असतांना प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होत नाहीं अशाविषयीं एक ज्ञापक आहे.

तें ज्ञापक कोणतें ?

---

३. प्रश्न किंवा त्याचें उत्तर वगैरे विषय असतां 'अनन्त्यस्यापि प्रश्ना०' (८।२।१०५) या सूत्रानें प्लुत विहित आहे.

१. इडागम झालेला क्त्वा प्रत्यय कित् आहे असें समजूं नये; उदा. देवित्वा, वर्तित्वा.

सनि झल्ग्रहणं विदुः ॥ १ ॥

यदयमिको झल् [ १. २. ९ ] इति झल्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्य औपदेशिकस्य कित्त्वस्य प्रतिषेधो नातिदेशिकस्येति । कथं कृत्वा ज्ञापकम् । झल्ग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् । शिशयिषत इति । यदि चात्रातिदेशिकस्यापि कित्त्वस्य प्रतिषेधः स्याज्झल्ग्रहणमनर्थकं स्यात् । अस्त्वत्र कित्त्वं न सेडिति प्रतिषेधो भविष्यति । पश्यति त्वाचार्य औपदेशिकस्य कित्त्वस्य प्रतिषेधो नातिदेशिकस्येति ततो झल्ग्रहणं करोति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । उत्तरार्थमेतत्स्यात् । स्थाघ्वोरिच्च [ १. २. १७. ] झलादौ यथा स्यादिह मा भूत् । उपास्थायिषाताम् उपास्थायिषत ।

इत्त्वं कित्संनियोगेन

कित्त्वसंनियोगेनेत्त्वमुच्यते । तेनासति कित्त्व इत्त्वं न भविष्यति ।

रेण तुल्यं सुधीवनि ।

तद्यथा । सुधीवा सुपीवेति । ङीप्संनि-

तें ज्ञापक असें की, हा आचार्य पाणिनि 'इको झल्' (१।२।९) या सूत्रामध्यें जें झल् असें म्हणतो त्यावरून तो असें सुचवितो की, क्त्वा-प्रत्ययाप्रमाणें ज्या प्रत्ययाला प्रत्यक्ष ककार मूळचा लावलेला असेल त्या ठिकाणींच प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होतो. आणि ज्या प्रत्ययाला मूळचा ककार लावलेला नसून असंयोगात् (१।२।५) वगैरे सूत्रांनीं 'कितासारखा समजावा' असा अतिदेश केला असल्यामुळें कित्त्व प्राप्त होतें त्या कित्त्वाचा प्रकृतसूत्रानें निषेध होत नाहीं.

हें ज्ञापक कसें बरें जमतें?

असें जमतें की, 'इको झल्' या सूत्रामध्यें झल् असें म्हटलें आहे त्याचा उपयोग 'झलादि सन् असतांनाच त्या सूत्रानें कित्त्व व्हावें, शिशयिषते वगैरे उदाहरणांमध्यें सन्प्रत्ययाला इडागम झाला असल्यामुळें तो सन्प्रत्यय झलादि असत नाहीं, तेव्हां तशा ठिकाणीं कित्त्व होऊं नये,' हा होय. परंतु जर प्रकृतसूत्रानें आतिदेशिक कित्त्वाचा देखील निषेध होईल तर तें झल्ग्रहण निरर्थक होईल. कारण शिशयिषते या उदाहरणामध्यें 'इकः'(१।२।९) या सूत्रानें कित्त्व प्राप्त झालें तरी त्याचा प्रकृत 'न सेट्' या सूत्रानें निषेध होईल. तेव्हां आचार्य पाणिनि असें समजतो की, प्रकृतसूत्रानें जो कित्त्वाचा निषेध होतो तो औपदेशिक कित्त्वाचाच होतो, आतिदेशिक कित्त्वाचा होत नाहीं. आणि असें समजूनच तो 'इको झल्' या सूत्रामध्यें झल् असा शब्द उच्चारतो.

हें झल्ग्रहणज्ञापक बरोबर नाहीं. कारण त्या झल् या पदाचा पुढील सूत्रामध्यें उपयोग आहे तो असा की, 'स्थाघ्वोरिच्च' (१।२।१७) या सूत्रानें सांगितलेलें इत्त्व झलादि सिच्प्रत्यय पुढें असतांनाच झालें पाहिजे. उपास्थायिषाताम्, उपास्थायिषत, या उदाहरणांमध्यें सिच्प्रत्यय झलादि नसल्यामुळें तेथें इत्त्व न झालें पाहिजे.

उपास्थायिषाताम् या उदाहरणामध्यें इत्त्व होणार नाहीं. कारण स्थाघ्वोरिच्च या सूत्रानें जें इत्त्व सांगितलें आहे ते सिच्प्रत्ययाला कित्त्व सांगून त्याच्याबरोबर सांगितलें आहे. तेव्हां अर्थातच ज्या ठिकाणीं सिच्प्रत्ययाला कित्त्व करतां येत नाहीं त्या ठिकाणीं इत्त्वही करितां येणार नाहीं. (उपास्थायिषाताम् या उदाहरणामध्यें 'न सेट्' या प्रकृतसूत्रानें सांगितलेला कित्त्वाचा निषेध प्राप्त होत असल्यामुळें तेथें 'स्थाघ्वोरिच्च' या सूत्रानें कित्त्व करितां येत नाहीं.)

सुधीवन् शब्दामध्यें जसा रेफ आदेश होत नाहीं तसेंच हें होय. तें असें—वनो र च (४।१।७) या सूत्रानें 'वन्प्रत्ययान्त शब्दाच्या पुढें स्त्रीलिंगाला दाखविणारा ङीप्प्रत्यय

२. उप उपसर्गपूर्वक स्थाधातूहून लुङ्प्रत्यय, आत्मनेपद, आताम्, च्लि, सिच्, चिण्वद्भावानें (६।४।६२) युक् (७।३।३३), इडागम, अडागम वगैरे.

योगेन र उच्यमानोऽसति ङीपि न भवति ॥ अथवास्त्वत्रेत्त्वम् । का रूपसिद्धिः । वृद्धौ कृतायामायादेशो भविष्यति ॥

## वस्वर्थम्

वस्वर्थं तर्हि क्त्वाग्रहणं कर्तव्यम् । वसौ ह्यौपदेशिकं कित्त्वम् । किं च स्यात् । पपिवान् तस्थिवान् । क्ङितीत्याकारलोपो न स्यात् । मा भूदेवम् । इटि चेत्येवं भविष्यति ॥ इदं तर्हि जग्मिवान् जघ्निवान् । क्ङितीत्युपधालोपो न स्यात् ।

## किद्वतीदेशात्

अस्त्वत्रौपदेशिकस्य कित्त्वस्य प्रतिषेधः । आतिदेशिकमत्र कित्त्वं भविष्यति ॥ यत्र तर्हि तत्प्रतिषिध्यते । अञ्जेराजिवानिति ॥

---

आणि वन्प्रत्ययाच्या नकाराला रेफ आदेश, हे बरोबर सांगितले आहेत. सुधीवा[3], सुपीवा, या उदाहरणांमध्यें ङीप्प्रत्ययाचा निषेध होत असल्यामुळें अर्थातच त्याच्याबरोबर सांगितलेला रेफ आदेश देखील तेथें होत नसतो.

अथवा उपास्थायिषाताम् या उदाहरणामध्यें धातूच्या आकाराला इत्त्व झालें तरी हरकत नाहीं.

इत्त्व झालें तर उपास्थायिषाताम् या रूपाची सिद्धि कशी होईल ?

रूपाची सिद्धि अशी होईल की, इत्त्व केल्यानंतर या इकाराला अचोञ्णिति (७।२।११५) यानें चिण्वद्भावाच्या (६।४।६२) साहाय्यानें वृद्धि करून आयादेश केला म्हणजे तें रूप साधेल.

तर मग प्रकृतसूत्रामध्यें जें क्त्वा असें म्हटलें आहे तें वसुप्रत्ययाला कित्त्वाचा निषेध होऊं नये याकरतां म्हटलें आहे. कारण वसुप्रत्यय हा मूळचा क्वसु असल्यामुळें त्याचें कित्त्व क्त्वाप्रत्ययाप्रमाणें औपदेशिकच आहे.

क्वसुप्रत्ययाला प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध झाला तर कोठें दोष होईल ?

'आतो लोप' (६।४।६४) या सूत्रानें कित्, ङित्, प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला जो आकाराचा लोप तो पपिवान्, तस्थिवान्, या उदाहरणांमध्यें होणार नाहीं.

तशा रीतीनें म्हणजे प्रत्ययाच्या निमित्तानें आकाराचा लोप झाला तरी हरकत नाहीं. त्याच सूत्रानें इट् आगम पुढें असतांना आकाराचा लोप सांगितला आहे तो पपिवान् येथें करतां येईल.

तर मग 'गमहन' (६।४।९८) या सूत्रानें कित्, ङित्, पुढें असतांना सांगितलेला जो उपधेचा लोप तो जग्मिवान् जघ्निवान्[5], या उदाहरणांमध्यें होणार नाहीं.

जग्मिवान् या उदाहरणामध्यें जें क्वसुप्रत्ययाचें औपदेशिक कित्त्व त्याचा प्रकृतसूत्रानें निषेध झाला तरी होऊं दे. त्याच क्वसुप्रत्ययाला 'असंयोगा०' (१।२।५) या सूत्रानें सांगितलेलें जें आतिदेशिक कित्त्व त्याच्या निमित्तानें लोप करतां येईल.

तर मग त्या आतिदेशिक कित्त्वाचा ज्या ठिकाणीं निषेध होत आहे तेथें कसें कित्त्वामुळें कार्य करतां येईल ? उदा० अञ्ज धातूचें आजिवान् असें क्वसुप्रत्यय केला असतांना रूप होतें. तेथें धातूच्या शेवटीं संयोग असल्यामुळें 'असंयोगा०'(१।२।५) या सूत्रानें सांगितलेल्या आतिदेशिक कित्त्वाची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां येथें नकाराचा लोप (६।४।२४) होणार नाहीं.

तर मग आजिवान् हें उदाहरण अशा

---

३. सु या शब्दाचा धीवन् आणि पीवन् या शब्दांबरोबर बहुव्रीहि समास झाला आहे. येथें वनो र च (४।१।७) यानें प्राप्त झालेल्या ङीपाचा अनो बहुव्रीहेः (४।१।१२) यानें निषेध होऊन सुधीवा, सुपीवा नगरी अशीं रूपें होतात.

४. स्था, पा, या धातूंहून लिट्प्रत्यय, त्याचे स्थानीं क्वसुश्च (३।२।१०७) यानें क्वसु, द्वित्व, क्वसुप्रत्ययाला इडागम, आणि अकारलोप (६।४।६४) झाला आहे.

५. गम् आणि हन् धातूंहून पूर्वीप्रमाणें क्वसुप्रत्यय, आणि विभाषा गमहन० (७।२।६८) यानें विकल्पानें क्वसुप्रत्ययाला इडागम झाला आहे.

एवं तर्हि च्छान्दसः क्सुः। लिट् च च्छन्दसि सार्वधातुकमपि भवति। तत्र सार्वधातुकमपिन्ङिद्भवतीति ङित्युपधालोपो भविष्यति ॥

**निगृहीतिः**

निगृहीतिः प्रयोजनम् । इदं तर्हि प्रयोजनम्। इह मा भूत्। निगृहीतिः उपस्निहितिः निकुचितिः ॥ तत्तर्हि क्त्वाग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् ।

**क्त्वा च विग्रहात् ॥ २ ॥**

उपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । न सेट् । निष्ठा शीङ्स्विदिमिदिक्ष्विदिधृषः [ १९ ]। मृषस्तितिक्षायाम् [ २० ]। उदुपधाद्भावादिकर्मणोरन्यतरस्याम् [२१]। ततः पूङः। पूङश्च निष्ठा सेण्न किद्भवति । ततः क्त्वा च। क्त्वा च सेण्न किद्भवति। पूङ इति निवृत्तम् ॥

**न सेडिति कृतेऽकित्त्वे निष्ठायामवधारणात् । ज्ञापकान्न परोक्षायां सनि झल्ग्रहणं विदुः ॥ १ ॥**

**इत्त्वं कित्संनियोगेन रेण तुल्यं सुधीवनि । वस्वर्थं किदतीदेशाद्गृहीतिः क्त्वा च विग्रहात् ॥ २ ॥**

**[[1]निष्ठा शीङ्स्विदिमिदिक्ष्विदिधृषः॥ १.२.१९॥]**

**[[1]मृषस्तितिक्षायाम् ॥१.२.२०॥]**

**उदुपधाद्भावादिकर्मणोरन्य-**

---

रीतीनें साधतां येईल की, क्सु हा प्रत्यय वैदिक प्रयोगामध्येंच होत असतो. आणि वैदिक प्रयोगामध्यें लिट्प्रत्ययाला 'छन्दस्युभयथा' (३।४।११७) या सूत्रानें सार्वधातुकसंज्ञा देखील होत असते. ती संज्ञा झाली असतांना 'सार्वधातुकमपित्' (१।२।४) या सूत्रानें तो लिट्प्रत्यय ङित् समजतां येईल, आणि ङित् समजून अनिदिताम् (६।४।२४) या सूत्रानें आजिवान् येथें नकाराचा लोप करितां येईल.

तर मग प्रकृत सूत्रामध्यें जें क्त्वा असें म्हटलें आहे त्याचा उपयोग असा समजावा की, 'निगृहीतिः[६], उपस्निहितिः, निकुचितिः, या उदाहरणांमध्यें क्तिन् प्रत्ययांतील कित्त्वाचा प्रकृतसूत्रानें निषेध होऊं नये.

तर मग एकंदरींत विचार करितां प्रकृतसूत्रामध्यें क्त्वा असें म्हटलें पाहिजे असें दिसतें. क्त्वा असें म्हणावयास नको.

पुढील सूत्रांचा विभाग अशा प्रकारचा आम्ही करतों की, 'न सेट्,' 'निष्ठा शीङ्स्विदिमिदिक्ष्विदिधृषः,' 'मृषस्तितिक्षायाम्' 'उदुपधाद्भावादिकर्मणोरन्यतरस्याम्' हीं तीन सूत्रें झाल्यानंतर 'पूङः' इतकेंच सूत्र करतों. 'पूङ् धातूच्या पुढील इडागम झालेला निष्ठाप्रत्यय कित् होत नाहीं' असा याचा अर्थ होय. त्यानंतर 'क्त्वा च' हें पुढील सूत्र होय. या सूत्रामध्यें 'पूङः' या सूत्रांतून 'पूङः' या पदाचा संबंध करूं नये. तेव्हां 'कोणत्याही धातूच्या पुढील) इडागम झालेला क्त्वा प्रत्यय कित् होत नाहीं' असा त्याचा अर्थ होय. (तेव्हां प्रकृत 'न क्त्वा सेट्' हें सूत्र मुळींच करावयास नको असें सिद्ध होतें.)

---

६. ग्रह्धातूहून क्तिन् (६।३।९४), इडागम, 'तितुत्रेष्वग्रहा०' (वा.७।२।९) यानें ग्रहादिकांचा पर्युदास केला असल्यामुळें 'तितुत्रत०' (७।२।९) यानें इण्निषेध होत नाहीं. 'ग्रहोऽलिटि' (७।२।३७) यानें इडागमाला दीर्घ, कित्त्वामुळें 'ग्रहिज्या' (६।१।१६) यानें संप्रसारण, उपस्निहितिः येथें कित्त्वामुळें गुणनिषेध (१।१।५).

१. शीङ्, स्विदि, मिदि, क्ष्विदि, आणि धृष् या धातूंच्या पुढील इडागम झालेला निष्ठाप्रत्यय (१।१।२६) तो कित्प्रत्ययासारखा समजूं नये; उदा. शयितः, प्रस्वेदितवान्, क्ष्वेदितः, धर्षितवान्.

१. क्षमा या अर्थाला दाखविणाऱ्या मृष् धातूच्या पुढील इडागम झालेला निष्ठाप्रत्यय कित्प्रत्ययासारखा समजूं नये; उदा. मर्षितः

**तरस्याम् ॥ १.२.२१ ॥**

इह कस्मान्न भवति । गुधितः गुधितवानिति ।

**उदुपधाच्छपः ॥ १ ॥**

शब्विकरणेभ्य इष्यते ॥

**पूङः क्त्वा च ॥ १.२.२२ ॥**

**पूङः क्त्वानिष्ठयोरिटि वा प्रसङ्गः सेट्प्रकरणात् ॥ १ ॥**

पूङः क्त्वानिष्ठयोरिटि विभाषा प्राप्नोति । किं कारणम् । सेट्प्रकरणात् । सेडिति वर्तते ॥

**न वा सेट्त्वस्याकिदाश्रयत्वादनिटि वा कित्त्वम् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । सेट्त्वस्याकिदाश्रयत्वात् । अकिदाश्रयं सेट्त्वम् । यदाकित्त्वं तदेटा भवितव्यम् । सेट्त्वस्याकिदाश्रयत्वादनिटयेव विभाषा कित्त्वं भविष्यति ॥ इड्विधौ पूङो ग्रहणं क्रियते तेन वचनादिट् सेट्प्रकरणाच्चेटयेव विभाषा कित्त्वं प्राप्नोति ।

---

(सू.२१) गुधितः, गुधितवान्, या उदाहरणांमध्यें प्रकृतसूत्रानें निष्ठाप्रत्ययाला कित्त्वाचा निषेध कां होत नाहीं. १

(वा.१) 'ज्या धातूंना विकरणप्रत्यय शप् लागतो त्याच धातूंसंबंधानें हें प्रकृतसूत्र प्रवृत्त होतें' अशी इष्टि आहे.

(सू.२२ वा.१) पूङ्धातूच्या पुढील इडागम झालेल्या क्त्वाप्रत्ययाला आणि निष्ठा प्रत्ययाला प्रकृतसूत्रानें विकल्पानें कित्त्व होऊं लागेल.

कां बरें ?

इडागम झालेल्या प्रत्ययासंबंधानेंच कित्त्व सांगण्याबद्दल मागून प्रकरण चालू झालें आहे. (आणि 'अन्यतरस्याम्' म्हणजे विभाषा हेंही पद अनुवृत्त होत आहे.)

(वा.२) हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

'पूङ्धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठाप्रत्ययांना इडागम होणें' हें कित्त्वाच्या निषेधावर अवलंबून आहे. जेव्हां प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध होईल तेव्हांच 'श्र्युकः किति' (७।२।११) हा निषेध बाजूला सारून क्त्वाप्रत्ययाला आणि निष्ठाप्रत्ययाला इडागम होईल. अशा रीतीनें प्रत्ययाला इडागम होणें हें कित्त्वाच्या निषेधावर अवलंबून असल्यामुळें पूर्वीं म्ह. इडागम न होतांनाच त्याच्या पूर्वीं प्रत्ययाला विकल्पानें कित्त्व होईल. तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

पण पूङ्धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना 'पूङश्च' (७।२।५१) या सूत्रानें स्वतंत्र इडागम सांगितलाच आहे. तेव्हां त्या सूत्रानें इडागम करून त्या इडागम झालेल्या प्रत्ययांना प्रकृतसूत्रानें विकल्पानें कित्त्व होऊं लागेल असा दोष येतोच.

---

१ ज्या धातूच्या उपधेला ह्रस्व उकार आहे त्या धातूच्या पुढील भाव किंवा आदिकर्म म्ह. क्रियारंभ त्या अर्थी इडागम झालेला जो निष्ठाप्रत्यय तो विकल्पानें कित् होतो; उदा० द्युतितम्, द्योतितम्, प्रमुदितः, प्रमोदितः.

१. पूङ् धातूच्या पुढील जो निष्ठाप्रत्यय किंवा क्त्वाप्रत्यय तो कित्प्रत्ययासारखा समजूं नये; उदा. पवितः, पवितवान्, पवित्वा.

२. तेव्हां सेट्प्रत्ययाला कित्त्व सांगण्याबद्दल मागून प्रकरण चालू आहे तरी प्रकृतसूत्रानें सेट् निष्ठा किंवा क्त्वाप्रत्ययाला कित्त्व विकल्पानें सांगणें संभवतच नाहीं. अर्थातच इडागम होण्याच्या पूर्वीं पू त्वा, पू त अशा स्थितीमध्यें कित्त्वाचा विकल्प होतो. जेव्हां कित्व नाहीं तेव्हां इट् आणि गुण होऊन पवित्वा पवितः अशीं रूपें होतात. आणि जेव्हां कित्त्व आहे तेव्हां 'श्र्युकः किति' (७२।।११) यानें इडागमाचा प्रतिषेध झाल्यानें पूत्वा, पूतः, अशीं रूपें होत आहेत. तेव्हां 'पूङश्च' हें इड्विधायक सूत्र करावयास नको.

इड्विधौ ह्यग्रहणम् ॥ ३ ॥

इड्विधौ हि पूङो ग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

भारद्वाजीयाः पठन्ति ॥ नित्यमकित्त्वमिडाद्योः क्त्वाग्रहणमुत्तरार्थम् ॥ नित्यमकित्त्वमिडाद्योः सिद्धम् । कथम् । विभाषामध्येऽयं योगः क्रियते विभाषामध्ये च ये विधयस्ते नित्या भवन्ति । किमर्थं तर्हि क्त्वाग्रहणम् । क्त्वाग्रहणमुत्तरार्थम् । उत्तरार्थं क्त्वाग्रहणं क्रियते । नोपधात्थफान्ताद्वा [२३] वञ्चिलुञ्च्यृतश्च [२४] इति ॥

[नोपधात्थफान्ताद्वा ॥१.२.२३॥]

[वञ्चिलुञ्च्यृतश्च ॥१.२.२४॥]

तृषिमृषिकृशेः काश्यपस्य ॥ १.२.२५॥

काश्यपग्रहणं किमर्थम् । काश्यपग्रहणं पूजार्थम् । वेत्येव हि वर्तते ॥

रलो व्युपधाद्धलादेः संश्च ॥१.२.२६॥

---

(वा.३) इडागमाच्या प्रकरणामध्यें 'पूङश्च' (७।२।५१) असें जें सूत्र केलें आहे तें आतां करावयास नको. म्हणजे कांहीं दोष येत नाहीं.

येथें भारद्वाजीयांचा पाठ असा आहे की—

नित्यमकित्त्वमिडाद्योः क्त्वाग्रहणमुत्तरार्थम्.

पूङ्धातूच्या पुढील इडागम झालेल्या क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेधच होतो. आणि हा निषेध नित्यच होतो. त्यामुळें सर्व उदाहरणें सिद्ध होतात.

तीं कशीं ?

तीं अशीं की, दोन विकल्पाच्यामध्यें पाणिनीनें हें सूत्र घातलें आहे. आणि अशा रीतीनें दोन विकल्पांच्यामध्यें असलेलीं जीं शास्त्रें तीं नित्यच होत असतात.

तर मग या सूत्रामध्यें क्त्वा या शब्दाचा उपयोग काय ?

(कारण 'न क्त्वा सेट्' (१।२।१८) या सामान्य सूत्रानेंच कित्त्वाचा निषेध सिद्ध होत आहे.)

या सूत्रामध्यें क्त्वा हा शब्द घातला आहे त्याचा येथें जरी कांहीं उपयोग झाला नाहीं तरी पुढें अनुवृत्त होण्याकरतां तो शब्द येथें घातला आहे. म्हणजे 'नोपधात्थफान्ताद्वा,' 'वञ्चिलुञ्च्यृतश्च' या दोन सूत्रांमध्यें क्त्वा या पदाचा संबंध होऊन विकल्पानें कित्त्व तेथें होतें.

(सू.२५) या सूत्रामध्यें काश्यपस्य असे कशाकरितां म्हटलें आहे ?

काश्यपऋषीच्या नांवाचा उल्लेख करून त्याचा मोठेपणा दाखवावा या उद्देशानें काश्यप असें म्हटलें आहे. (म्हणजे 'तृष् वगैरे धातूंच्या पुढील क्त्वाप्रत्ययाला काश्यपाच्या मतानेंच कित्त्व होतें आणि इतरांच्या मतानें होत नाहीं; अशा रीतीनें दोन रूपें करण्याकरितां काश्यपस्य हा शब्द सूत्रामध्यें पाणिनीनें घातला आहे' असें समजूं नये.) कारण मागून 'वा' या पदाचा संबंध येथें होत आहे. (तेव्हां 'काश्यपस्य' असें येथें म्हटलें नाहीं तरी दोन रूपें होतीलच.)

---

१. ज्या धातूचा उपान्त्य वर्ण नकार आहे आणि ज्याच्या शेवटीं थकार किंवा फकार आहे अशा धातूच्या पुढील इडागम झालेला क्त्वाप्रत्यय कित्प्रत्ययासारखा होत नाहीं असें विकल्पानें समजावें; उदा. ग्रन्थित्वा ग्रथित्वा, श्रन्थित्वा श्रथित्वा.

१ वन्च्, लुन्च् आणि ऋत् या धातूंच्या पुढील इडागम झालेला क्त्वा प्रत्यय कित्प्रत्ययासारखा होत नाहीं असें विकल्पानें समजावें; उदा०— वचित्वा वञ्चित्वा, लुचित्वा लुञ्चित्वा.

१. तृष् , मृष् आणि कृश् या धातूंच्या पुढील इडागम झालेला क्त्वाप्रत्यय विकल्पानें कित्प्रत्ययासारखा समजावा; उदा० -तृषित्वा तर्षित्वा, मृषित्वा-मर्षित्वा, कृशित्वा कर्शित्वा.

१. ज्या धातूच्या आरंभीं व्यञ्जन आणि शेवटीं

किमिदं रलः क्त्वासनोः किर्त्वं विधीयत आहोस्वित्प्रतिषिध्यते । किं चातः । यदि विधीयते क्त्वाग्रहणमनर्थकम् । किदेव हि क्त्वा । अथ प्रतिषिध्यते सन्ग्रहणमनर्थकम् । अकिदेव हि सन् ॥ अत उत्तरं पठति ।

**रलः क्त्वासनोः कित्त्वम् ॥ १ ॥**

रलः क्त्वासनोः कित्त्वं विधीयते । ननु चोक्तं क्त्वाग्रहणमनर्थकं किदेव हि क्त्वेति । नानर्थकम् । न क्त्वा सेट् [१.२.१८] इति प्रतिषेधः प्राप्नोति तद्बाधनार्थम् ॥

**ऊकालोऽज्ह्रस्वदीर्घप्लुतः ॥ १.२.२७ ॥**

अयुक्तोऽयं निर्देशः । ऊ इत्यनेन कालः प्रतिनिर्दिश्यत ऊ इत्ययं च वर्णः । तत्रायुक्तं वर्णस्य कालेन सह सामानाधिकरण्यम् ॥ कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः । ऊकालकाल इति । किमिदमूकालकाल इति । ऊ इत्येतस्य काल

(सू.२६) रलन्त धातूच्या पुढील क्त्वा आणि सन् या प्रत्ययांना प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा विधि केला आहे किंवा त्या प्रत्ययांना कित्त्व होत नाहीं असा निषेध केला आहे ?

यांत काय बरें फरक आहे ?

जर प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा विधि सांगितला असेल तर येथें क्त्वा हें पद निरर्थक होईल. कारण 'क्त्वा' हा प्रत्यय मूळचा कित् आहेच.

बरें, आतां 'प्रकृतसूत्रानें कित्त्वाचा निषेध सांगितला आहे' असें म्हणावें तर 'सन्' हें पद निरर्थक होईल. कारण 'सन्' हा प्रत्यय मूळचा कित् नाहींच.

हा सर्व विचार मनांत घेऊन वार्तिककार असें म्हणतातः—

रलन्त धातूच्या पुढील क्त्वा आणि सन् या प्रत्ययांना प्रकृतसूत्रानें कित्त्वाचें विधानच केलें आहे.

पण 'प्रकृतसूत्रानें कित्त्वाचें विधान केलें तर क्त्वा हा शब्द निरर्थक होईल' असें आतांच म्हटलें आहे ना ?

'प्रकृतसूत्रानें कित्त्वाचें विधान केलें आहे' असें गृहीत धरलें तरी 'क्त्वा' हा शब्द निरर्थक होत नाहीं. कारण क्त्वा हा प्रत्यय मूळचा जरी कित् आहे तरी 'न क्त्वा सेट्' (१ २।१८) या सूत्रानें जो कित्त्वाचा निषेध प्राप्त झालेला आहे त्याचा बाध करून कित्त्व झालें पाहिजे असा येथें क्त्वा या शब्दाचा उपयोग होत आहे.

(सू.२७) या सूत्रामध्यें पाणिनीनें 'ऊकालः' असें जें म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. कारण 'ऊ' हें जें म्हटलें आहे तें 'एक प्रकारच्या विशेष कालाचें दर्शक आहे' असें गृहीत धरून म्हटलें आहे. परंतु 'ऊ' हा तर एक वर्ण आहे. तेव्हां त्या वर्णाबरोबर कालाचें सामानाधिकरण्य कसें जमेल ? म्हणजे 'ऊ' हा कालाचा दर्शक आहे असें कसें समजतां येईल ?

तर मग सूत्रामध्यें कसें बरें म्हटलें पाहिजे ?

'ऊकालकालः' असें येथें म्हटलें पाहिजे.

'ऊकालकालः' म्हणजे काय ?

'ऊ' या वर्णाच्या उच्चारणाचा जो काल तो 'ऊकाल' आणि त्या ऊकालाइतकाच ज्या वर्णाच्या उच्चारणाला काल लागतो तो

रल्प्रत्याहारांतील वर्ण, व उपान्त्य इकार किंवा उकार असेल अशा धातूंच्या पुढील इडागम झालेला क्त्वा किंवा सन्प्रत्यय हे विकल्पानें कित्प्रत्ययासारखे समजावेत; उदा०–द्युतित्वा द्योतित्वा, दिद्युतिषते दिद्योतिषते.

२. ही अप्राप्तविभाषा असेल तर क्त्वाप्रत्याची अनुवृत्ति निरर्थक होते, आणि प्राप्तविभाषा असेल तर सन् ग्रहण निरर्थक होतें, असा अभिप्राय आहे.

१. उ यासारखा अर्थात् एकमात्रिक अच् ह्रस्वसंज्ञक होतो, ऊ यासारखा म्ह. द्विमात्रिक अच् दीर्घसंज्ञक होतो, आणि ऊ३ यासारखा

ऊकालः। ऊकालः कालोऽस्य ऊकालकाल इति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः। उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः। तद्यथा। उष्ट्रमुखमिव मुखमस्योष्ट्रमुखः। खरमुखः। एवमूकालकाल ऊकाल इति॥ अथवा साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति। कालसहचरितो वर्णः। वर्णोऽपि काल एव॥

## ह्रस्वादिषु समसंख्याप्रसिद्धिर्निर्देशवैषम्यात् ॥ १ ॥

ह्रस्वादिषु समसंख्यत्वस्याप्रसिद्धिः। किं कारणम्। निर्देशवैषम्यात्। तिस्रः संज्ञा एकः संज्ञी वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति॥

## सिद्धं तु समसंख्यत्वात् ॥ २ ॥

सिद्धमेतत्। कथम्। समसंख्यत्वात् कथं समसंख्यत्वम्।

## त्रयाणां हि विकारनिर्देशः ॥ ३ ॥

त्रयाणामयं प्रश्लिष्टनिर्देशः। कथं पुनर्ज्ञायते त्रयाणामयं प्रश्लिष्टनिर्देश इति। तिसृणां संज्ञानां करणसामर्थ्यात्॥ यद्यपि तावत्तिसृणां संज्ञानां करणसामर्थ्याज्ज्ञा-

---

वर्ण ऊकालकाल होय.

तर मग सूत्रामध्यें तसें म्हणजे 'ऊकालकालः' असें म्हटलें पाहिजे कीं काय?

तसें म्हणावयास नको. कारण 'ऊकालः' असें पाणिनीनें म्हटलें आहे. त्यामध्यें उत्तरपदांतील एका कालशब्दाचा लोप झाला आहे असें समजावें. जसें—उष्ट्राच्या मुखाप्रमाणें ज्याचें मुख आहे त्याला 'उष्ट्रमुखमुख' असें म्हटलें पाहिजे. पण उष्ट्रमुख असेंही म्हणतात. तसेंच खराच्या मुखाप्रमाणें ज्याचें मुख त्याला खरमुख असें म्हणतात. तसें प्रकृतस्थलीं 'ऊ' या वर्णाच्या कालासारखा ज्या वर्णाच्या उच्चारणाला काल लागतो त्या वर्णाला 'ऊकाल' असें येथें म्हटलें आहे.

अथवा वर्ण आणि त्याच्या उच्चारण्याचा काल यांचा निकट संबंध असल्यामुळें वर्णबोधक 'ऊ' हा शब्द येथें कालबोधक घातला आहे असें समजावें. कालाशीं सहचरित जो वर्ण तो देखील कालच होय.

(वा.१) ह्या सूत्रामध्यें ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत अशा ज्या क्रमानें तीन संज्ञा सांगितल्या आहेत त्यांचे त्यांच्या बरोबरीचे म्हणजे तीन असे संज्ञी प्रकृतसूत्रामध्यें दृष्टीस पडत नाहींत.

कां बरें?

सूत्रामध्यें संज्ञा आणि संज्ञी ह्यांचे दर्शक म्हणून जे शब्द पाणिनीनें घातले आहेत ते विषम घातले आहेत. असें पाहा की ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत या तीन संज्ञा दृष्टीस पडतात. आणि ह्या संज्ञा ज्याला सांगावयाच्या तो संज्ञी ऊकालः असा एकच दृष्टीस पडतो. तेव्हां दोघाचें संख्येनें साम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं.

(वा.२) येथें संज्ञा आणि संज्ञी यांचा क्रमानें अन्वय सिद्ध होत आहे.

तो कसा?

दोघांची संख्या सारखी आहे म्हणून.

'दोघांची सारखी संख्या आहे' म्हणून असें येथें कसें समजतां येईल?

(वा.३) प्रकृतसूत्रांमध्यें जें 'ऊ' असें म्हटलें आहे तें तिघांचा येथें प्रश्लेषानें निर्देश केला आहे असें समजावें.

पण येथें एक 'ऊ' हा वर्ण उच्चारलेला दृष्टीस पडतो. तेव्हां 'तो तीन उकारांचा संधि करून उच्चारला आहे' असें कसें बरें गृहीत धरतां येईल?

'ज्या अर्थीं पाणिनीनें या सूत्रामध्यें ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत ह्या निरनिराळ्या तीन संज्ञा केल्या आहेत त्या अर्थीं येथें त्या तीन संज्ञांचे

---

म्हणजे त्रिमात्रिक जो अच् तो प्लुतसंज्ञक होतो.

२. तीन उकारांचा एकादेश करून निर्देश केला असल्यामुळें संज्ञीही तीन असल्यामुळें यथासंख्य अन्वय होण्यास अडचण नाहीं.

येत त्रयाणामयं प्रश्लिष्टनिर्देश इति कुतस्त्वेतदेतेनानुपूर्व्येण संनिविष्टानां संज्ञा भविष्यन्तीति। आदौ मात्रिकस्ततो द्विमात्रस्ततस्त्रिमात्र इति। न पुनर्मात्रिको मध्ये वान्ते वा स्यात्तथा द्विमात्र आदौ वान्ते वा स्यात्तथा त्रिमात्र आदौ वा मध्ये वा स्यात्॥ अयं तावत्त्रिमात्रोऽशक्य आदौ वा मध्ये वा कर्तुम्। कुतः। प्लुताश्रयो हि प्रकृतिभावः प्रसज्येत। मात्रिकद्विमात्रिकयोरपि घ्यन्तं पूर्वं निपततीति मात्रिकस्य पूर्वनिपातो भविष्यति॥ यत्तावदुच्यतेऽयं तावत्त्रिमात्रोऽशक्य आदौ वा मध्ये वा कर्तुं प्लुताश्रयो हि प्रकृतिभावः प्रसज्येतेति। प्लुताश्रयः प्रकृतिभावः प्लुतसंज्ञा चानेनैव यदि च त्रिमात्र आदौ वा मध्ये वा स्यात्प्लुतसंज्ञैवास्य न स्यात्कुतः प्रकृतिभावः॥ यदप्युच्यते मात्रिकद्विमात्रिकयोरपि घ्यन्तं पूर्वं निपततीति मात्रिकस्य पूर्वनिपातो भविष्यतीति ह्रस्वाश्रया हि घिसंज्ञा ह्रस्वसंज्ञा चानेनैव। यदि च

---

निरनिराळे तीन संज्ञी उच्चारले आहेत' असें गृहीत धरावेंच लागतें. (नाहीं तर तीन संज्ञा न करतांना एकच संज्ञा केली असती.)

आतां जरी येथें तीन संज्ञा केल्या असल्यामुळें त्यांच्या जोरावर 'ऊ' हा तीन उकारांचा संधि करून उच्चार केला आहे असें समजलें तरी 'त्या तिघांमध्यें प्रथमतः एकमात्रिक उकार उच्चारला आहे. त्यानंतर दोन मात्रांचा उकार उच्चारला आहे. आणि त्यानंतर शेवटीं तीन मात्रांचा उकार उच्चारला आहे' असें गृहीत धरलें तर त्याप्रमाणें त्यांना क्रमानें तीन संज्ञा होतील. म्हणजे एकमात्रिक स्वराला ह्रस्व संज्ञा होईल, दोन मात्रांच्या स्वराला दीर्घ संज्ञा होईल, आणि तीन मात्रांच्या स्वराला प्लुत ही संज्ञा होईल. परंतु अशाच क्रमानें हे उच्चारले आहेत असें येथें कां गृहीत धरावें? एक मात्रेचा उकार प्रथमतःच उच्चारला आहे असेंच कशावरून? तो एकमात्रेचा उकार मध्यें उच्चारला आहे किंवा शेवटीं उच्चारला आहे असें कां गृहीत धरूं नये? तसेंच दोन मात्रांचा उकार हा मध्येंच उच्चारला आहे असेंच कां म्हणून गृहीत धरावें? तो दोन मात्रांचा उकार आरंभीं उच्चारला आहे किंवा शेवटीं उच्चारला आहे असें कां गृहीत धरूं नये? तसेंच तीन मात्रांचा उकार शेवटीं उच्चारला आहे असेंच कां गृहीत धरावें? तो तीन मात्रांचा उकार आरंभीं उच्चारला आहे किंवा मध्यें उच्चारला आहे असें कां गृहीत धरूं नये?

('आरंभीं एक मात्रेचा उकार, नंतर दोन मात्रांचा उकार, त्यानंतर तीन मात्रांचा उकार' असा जो क्रम आम्हीं येथें गृहीत धरला आहे त्याचें कारण असें की) तीन मात्रांचा उकार हा आरंभीं किंवा मध्यें उच्चारतांच येणार नाहीं.

कां बरें?

प्लुत जो वर्ण त्याला प्रकृतिभाव सांगितला आहे म्हणजे येथें त्या तीन मात्रांच्या उकाराचा पुढील उकाराबरोबर संधि होणार नाहीं. तेव्हां 'तीन मात्रांचा उकार शेवटीं उच्चारला आहे' असेंच मानलें पाहिजे. तसेंच त्याच्यामागचे जे दोन म्हणजे एक मात्रेचा उकार आणि दोन मात्रांचा उकार यामध्यें देखील एक मात्रेचा पूर्वी आहे असें मानलें पाहिजे. कारण एक मात्रेच्या उकाराला शेषो घ्यसखि' (१।४।७) या सूत्रानें घिसंज्ञा होऊन त्यालाच 'द्वंद्वे घि' (२।२।३२) यासूत्रानें पूर्व निपात होणार आहे. म्हणजे तिघांच्या द्वंद्वामध्यें ह्रस्व उकारच पूर्वी येणार आहे.

परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. असें पाहा की. हा तीन मात्रांचा उकार आरंभीं किंवा मध्यें घेतां येणार नाहीं. तसा घेतला तर त्याला 'प्लुताला सांगितलेला प्रकृतिभाव' होऊं लागेल असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं.

**मात्रिको मध्ये वान्ते वा स्याद्ध्रस्वसंज्ञैवास्य न स्यात्कुतो घिसंज्ञा कुतः पूर्वनिपातः॥ एवमेषा व्यवस्था न प्रकल्पते॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न मात्रिकोऽन्ते भवतीति यदयं विभाषा पृष्टप्रतिवचने हेः [८.२.९३] इति मात्रिकस्य प्लुतं शास्ति। कथं कृत्वा ज्ञापकम्। योऽन्ते स प्लुतसंज्ञकः। यदि च मात्रिकोऽन्ते स्यात्प्लुतसंज्ञास्य स्यात्। तत्र मात्राकालस्य मात्राकालवचनमनर्थकं स्यात्॥ मध्ये तर्हि स्यादिति। अत्राप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न मात्रिको मध्ये भवतीति यदयमतो दीर्घो यञि सुपि च [७.३.१०१-१०२] इति दीर्घत्वं शास्ति। कथं कृत्वा ज्ञापकम्। यो मध्ये स दीर्घसंज्ञकः। यदि च मात्रिको मध्ये स्याद्दीर्घसंज्ञास्य स्यात्।**

---

कारण प्लुताला प्रकृतिभाव होतो हें खरें, पण प्लुत ही संज्ञा या प्रकृतसूत्रानेंच होणारी आहे. जर तीन मात्रांचा उकार आरंभीं किंवा मध्यें घेतला जाईल तर त्याला मुळीं प्लुतसंज्ञाच होणार नाहीं. मग त्याला प्रकृतिभाव तर कोठून होणार? तसेंच एकमात्रेचा उकार आणि दोन मात्रांचा उकार यांमध्यें एक मात्रेचा उकारच पूर्वी गृहीत धरला पाहिजे; कारण त्यालाच 'द्वंद्वे घि' या सूत्रानें पूर्वनिपात होणार आहे, तो देखील बरोबर दिसत नाहीं. कारण घिसंज्ञा ही ह्रस्व संज्ञेवर अवलंबून आहे आणि ह्रस्व ही संज्ञा तर प्रकृतसूत्रानें प्रथमतः उच्चारलेल्यालाच होणारी आहे. जर एक मात्रेचा उकार हा मध्यें किंवा शेवटीं घेतला जाईल तर त्याला ह्रस्व ही संज्ञाच होणार नाहीं. मग त्याला घिसंज्ञा कोठून होईल? व त्याला पूर्वनिपात तरी कोठून होणार? एकंदरींत येथें 'आरंभीं एकमात्रेचा उकार उच्चारला आहे, नंतर दोन मात्रांचा उकार उच्चारला आहे, आणि नंतर तीन मात्रांचा उकार उच्चारला आहे' असा क्रम गृहीत धरण्याला कांहींच प्रमाण दिसत नाहीं.

तर मग याचें उत्तर आम्ही असें देतों की, ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'विभाषा पृष्टप्रतिवचने हेः' (८।२।९३) या सूत्रानें 'हि' या शब्दांतील एकमात्रेच्या इकाराला प्लुत करावा म्हणून सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, एकमात्रेचा उकार हा प्रकृत सूत्रामध्यें शेवटीं उच्चारला नाहीं.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की, प्रकृतसूत्रामध्यें जो शेवटीं उच्चारला असेल त्याला प्लुत ही संज्ञा होणार आहे. जर एकमात्रेचा उकार शेवटीं उच्चारला असेल तर त्यालाच प्लुत ही संज्ञा होईल. आणि तशी झाली असतां 'हि' या शब्दांतील एकमात्रेच्या इकाराला प्लुत सांगणें म्हणजे एकमात्रिकच इकार सांगणें हें अगदींच निरर्थक होऊं लागेल.

तर मग एकमात्रिक इकार हा जरी शेवटीं घेतां आला नाही तरी तो मध्यें घेतां येईल. आरंभींच कां घ्यावा ?

याविषयींही एक ज्ञापक आहे. तें असें की, हा आचार्य पाणिनि 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१), 'सुपि च' (७।३।१०२) या सूत्रांनीं एकमात्रेच्या अकाराला दीर्घ आदेश सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, एकमात्रेचा उकार हा येथें मध्यें उच्चारला नाहीं.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

हें ज्ञापक असें जमतें कीं जो येथें मध्यें उच्चारला असेल त्याला दीर्घ ही संज्ञा होणार आहे. जर येथें मध्यें एकमात्रेचा उकार उच्चारला असेल तर एकमात्रिकालाच दीर्घ ही संज्ञा होणार आहे. तेव्हां 'अतो दीर्घो यञि', 'सुपि च' या दोन सूत्रांनीं एक मात्रेच्या अकाराला दीर्घ आदेश सांगणें म्हणजे एकमात्रिकच आदेश सांगणें निरर्थक होईल.

तर मग दोन मात्रांचा उकार हा शेवटीं आहे असें मानतां येईल. असेंही मानतां

तत्र मात्राकालस्य मात्राकालवचनमनर्थकं स्यात् ॥ द्विमात्रस्तर्ह्यन्ते स्यादिति । अत्राप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न द्विमात्रोऽन्ते भवतीति यदयमोमभ्यादाने [८.२.८७] इति द्विमात्रिकस्य प्लुतं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । योऽन्ते स प्लुतसंज्ञकः । यदि च द्विमात्रोऽन्ते स्यात्प्लुतसंज्ञास्य स्यात् । तत्र द्विमात्राकालस्य द्विमात्राकालवचनमनर्थकं स्यात् ॥ मात्रिकेण चास्य पूर्वनिपातो बाधित इति कृत्वा कान्यत्रोत्सहते भवितुमन्यदतो मध्यात् ॥ एवमेषा व्यवस्था प्रक्लृप्ता ॥ भवेद्व्यवस्था प्रक्लृप्ता

**दीर्घप्लुतयोस्तु पूर्वसंज्ञाप्रसङ्गः ॥४॥**

दीर्घप्लुतयोरपि पूर्वसंज्ञा प्राप्नोति । का । ह्रस्वसंज्ञा । किं कारणम् । अण्सवर्णान्गृह्णातीति ॥

**सिद्धं तु तपरनिर्देशात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । तपरनिर्देशः कर्तव्यः । उदूकाल इति ॥ यद्येवं द्रुतायां तपरकरणे मध्यविलम्बितयोरुपसंख्यानं

---

येणार नाहीं. याविषयीं एक ज्ञापक आहे तें असें की हा आचार्य पाणिनि 'ओमभ्यादाने' (८।२।८७) या सूत्रानें ओम् यातील दोन मात्रांच्या ओकाराला ज्या अर्थी प्लुत सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, प्रकृतसूत्रामध्यें दोन मात्रांचा उकार शेवटीं नाहीं.

हें ज्ञापक कसें जमतें ?

असें जमतें की प्रकृतसूत्रामध्यें जो शेवटीं घेतला जाईल त्याला प्लुतसंज्ञा होणार. आणि जर दोन मात्रांचा उकार येथें शेवटीं उच्चारला असेल तर दोन मात्रांच्या स्वरालाच प्लुत संज्ञा होणार आहे. तेव्हां अर्थातच ओम् यांतील दोन मात्रांच्या आकाराला प्लुत आदेश सांगणें निरर्थक होईल.

आतां हा दोन मात्रांचा उकार आरंभींच घ्यावा तर त्याचें तें स्थान विसंज्ञक अशा एकमात्रिक उकारानें 'द्वंद्वे घि' (२।२।३२) या सूत्राच्या जोरावर हिसकावून घेतलें असल्यामुळें अर्थातच हा दोन मात्रांचा उकार मध्यभाग सोडून दुसरीकडे कोठें बरें बसण्याला धजेल ? अशा तऱ्हेनें या तीन उकारांची प्रकृत सूत्रामध्यें व्यवस्था बरोबर लागणार आहे.

ही तीन उकारांची क्रमानें व्यवस्था लागली खरी, पण—

(वा.४) दीर्घ आणि प्लुत म्हणजे द्विमात्र, त्रिमात्र, अशा स्वरांना देखील पूर्वीची संज्ञा होऊं लागेल.

पूर्वीची म्हणजे कोणती ?

ह्रस्व ही पूर्वीची संज्ञा होय.

पण एकमात्रेच्या उकाराला सांगितलेली जी ह्रस्वसंज्ञा ती दोन मात्रांच्या आणि तीन मात्रांच्या उकाराला होईल असें म्हणतां त्याचें कारण काय ?

'अणुदित्' (१।१।६९) या सूत्रानें 'अण् हा आपल्या सवर्णाचें ग्रहण करतो' असें जें सांगितलें आहे तें त्याचें कारण होय.

(वा.५) हें सिद्ध होईल.

तें कसें ?

तें असें की, प्रकृतसूत्रामध्यें पहिल्या उकाराच्या पुढें एक तकार उच्चारावा म्हणजे 'उदूकालः' असें म्हणावें असा तकार उच्चारला असतां 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें ज्यांच्या उच्चारणाला अधिक वेळ लागतो अशांचें म्हणजे द्विमात्र आणि त्रिमात्र अशा स्वरांचें एकमात्रिक उकारानें ग्रहण होणार नाहीं.

जर उकाराच्या पुढें तकार लावला तर द्रुतवृत्तीमध्यें सूत्रांतील उकार उच्चारला असतां मध्यमवृत्तीमध्यें उच्चारलेल्या आणि

---

३. कारण 'पृष्टप्रतिवचने हेः' आणि 'सुपि च' या दोन ज्ञापकांवरून एकमात्रिक उकार शेवटीं किंवा मध्यें घालतां येत नसल्यामुळें पहिलें स्थान ह्रस्व उकारानें पटकावलें आहे. तेव्हां एकमात्रिक उकारालाच घिसंज्ञा आहे असा निश्चय होत आहे.

कालभेदात् ॥

**द्रुतादिषु चोक्तम् ॥ ६ ॥**

किमुक्तम्। सिद्धं त्ववस्थिता वर्णा वक्तुश्चिराचिरवचनाद्वृत्तयो विशिष्यन्त इति ॥ स तर्हि तपरनिर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः। इह कालग्रहणं क्रियते यावच्च तपरकरणं तावत्कालग्रहणम्। प्रत्येकं च कालशब्दः परिसमाप्यते। उकाल ऊकाल ऊ३काल इति ॥ अथवैकसंज्ञाधिकारेऽयं योगः कर्तव्यः। तत्रैका संज्ञा भवति या परानवकाशा चेत्येवं हि दीर्घप्लुतयोः पूर्वसंज्ञा न भविष्यति ॥ अथवा स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा [१.१.६८] इत्ययं योगः प्रत्याख्यायते। तत्र यदेतदशब्दसंज्ञेत्येतद्यया विभक्त्या निर्दिश्यमानमर्थवद्भवति तया निर्दिष्टमुत्तरत्रानुवर्तिष्यते। अणुदित्सव-

---

विलम्बितवृत्तीमध्यें उच्चारलेल्या अशा एकमात्रिक स्वराचें देखील सूत्रामध्यें उच्चारलेल्या एकमात्रिक उकारानें ग्रहण होणार नाहीं. कारण मध्यमवृत्ति आणि विलम्बितवृत्ति यांमध्यें वर्ण उच्चारतांना काल अधिक लागत आहे म्हणून.

(वा.६) द्रुत वगैरे वृत्तींच्या संबंधानें पूर्वींच (१।१।७०वा.५) सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तें असें सांगितलें आहे की, वर्ण हे सर्वत्र आपापल्या नियतकालामध्येंच उच्चारले जातात. आतां द्रुत वगैरे वृत्तींच्या योगानें जो उच्चारणाच्या कालामध्यें फरक झालेला दृष्टीस पडतो तो केवळ वक्त्यावर अवलंबून होत आहे. असें पाहा की, एखादा वक्ता घाईनें बोलतो, एखादा मध्यम पद्धतीनें भाषण करतो, आणि एखादा सावकाश पद्धतीनें भाषण करतो. त्यामुळें द्रुत वगैरे वृत्तींमध्यें फरक दृष्टीस पडतो. वस्तुतः पाहिलें असतां ह्रस्व वगैरे एकच वर्ण द्रुत वगैरे तिन्ही वृत्तींमध्यें उच्चारला तरी त्याच्या उच्चारण्याच्या कालामध्यें कांहीं एक कमजास्तपणा होत नाहीं.

तर मग एकंदरींत प्रकृतसूत्रामध्यें पहिल्या उकाराच्या पुढें तकार उच्चारला पाहिजे असें दिसतें.

तकार उच्चारावयास नको. कारण पाणिनीनें प्रकृतसूत्रामध्यें काल असा शब्द घातला आहे. आणि पुढें उच्चारण्यानें जें कालाचें साम्य दाखविलें जातें तेंच कालशब्दानें दाखविलें जातें. आणि तो हा कालशब्द त्याच्या मागील तिन्ही उकारांशीं संबद्ध होत आहे. म्हणजे उकालः, ऊकालः आणि ऊ३कालः असें येथें म्हटल्यासारखें होत आहे.

अथवा 'आकडारा०' (१।४।१) या एकसंज्ञेच्या अधिकारामध्यें हें प्रकृतसूत्र घालावें. म्हणजे द्विमात्र आणि त्रिमात्र या स्वरांना एकच संज्ञा होईल. म्हणजे जी पर असेल किंवा अनवकाश असेल ती एकच संज्ञा होईल. तेव्हां द्विमात्र आणि त्रिमात्र अशा स्वरांना दीर्घ आणि प्लुत या संज्ञांनीं ह्रस्वसंज्ञेचा बाध होत असल्यामुळें ती पूर्वीं सांगितलेली म्हणजे ह्रस्व ही संज्ञा त्यांना होणार नाहीं.

अथवा 'स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा' (१।१।६८) या सूत्रानें प्रत्याख्यान केलें आहे. तेव्हां त्या सूत्रांतील जो 'अशब्दसंज्ञा' हा शब्द तो जी विभक्ति लावून पुढें अनुवृत्त केला असतां उपयोगीं पडेल ती विभक्ति घालून तेथें उच्चारला आहे असें गृहीत धरून त्याचा पुढील सूत्रामध्यें संबंध करतां

---

४. वर्णांच्या उच्चारणाविषयीं तीन पद्धति आहेत. त्या अशा—'जलदीनें उच्चारणें'; याला द्रुतवृत्ति असें म्हणतात. 'सावकाश उच्चारणें' याला विलम्बितवृत्ति म्हणतात. आणि 'जलदी नाहीं व सावकाशही नाहीं असें उच्चारणें' याला मध्यमवृत्ति असें म्हणतात. त्यांत द्रुतवृत्तीमध्यें ज्या एखाद्या वर्णाच्या उच्चाराला नऊ विपळें लागतात, त्याच वर्णाच्या उच्चाराला मध्यमवृत्तीमध्यें पहिल्यापेक्षां अधिक तीन म्हणजे बारा विपळें लागतात आणि विलम्बितवृत्तीमध्यें तर दुसऱ्या वृत्तीपेक्षां अधिक चार म्हणजे सोळा विपळें लागतात. अर्थात् या तीन वृत्तींमध्यें कालभेद स्पष्टच आहे.

र्णस्य चाप्रत्ययः [१.१.६९] अशब्दसंज्ञायामिति ॥ अथवा ह्रस्वसंज्ञावचनसामर्थ्याद्दीर्घप्लुतयोः पूर्वसंज्ञा न भविष्यति। ननु चेदं प्रयोजनं स्यात्संज्ञया विधाने नियमं वक्ष्यामीति ह्रस्वसंज्ञया यदुच्यते तदचः स्थाने यथा स्यादिति। स्यादेतत्प्रयोजनं यदि किंचित्कराणि ह्रस्वशासनानि स्युः। यतस्तु खलु यावदज्ग्रहणं तावद्ध्रस्वग्रहणमतोऽकिंचित्कराणि ह्रस्वशासनानि ॥ इदं तर्हि प्रयोजनमेच इग्ध्रस्वादेशो [१.१.४८] इति वक्ष्यामीति। अनुच्यमाने ह्येतस्मिन्निर्ह्रस्वप्रदेशेष्वेच इग्भवतीति वक्तव्यं स्यात्। ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य [१.२.४७] एच इग्भवतीति। णौ चङ्युपधाया ह्रस्वः [७.४.१] एच इग्भवतीति। ह्रस्वः

येईल. तो असा की, त्याच्या पुढील 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' (१।१।६९) या सूत्रामध्यें 'अशब्दसंज्ञा' हें पद सप्तमी विभक्ति लावून अनवृत्त होत आहे, (तेव्हां शब्दाला ज्या संज्ञा सांगितल्या आहेत त्या ठिकाणीं अणांनीं आपल्या सवर्णांचें ग्रहण होत नाहीं असा निषेध सिद्ध होतो. त्यामुळें प्रकृतसूत्रामध्यें प्रथम उच्चारलेल्या एकमात्रिक उकारानें आपल्या सवर्णांचे म्हणजे द्विमात्रिक आणि त्रिमात्रिक उकाराचें ग्रहण होणार नाहीं.

अथवा जर प्रथमतः उच्चारलेल्या उकारानें आपल्या सवर्णांचें म्हणजे सर्व प्रकारच्या उकाराचें ग्रहण होईल तर ह्रस्व ही संज्ञा सर्वेच स्वरांना होऊं लागेल. आणि तसें झालें तर त्या संज्ञेचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. तेव्हां अर्थातच ह्रस्व या संज्ञेचा कांहीं उपयोग झाला पाहिजे म्हणून दीर्घ आणि प्लुत यांना ह्रस्वसंज्ञा होत नाहीं, अशी कल्पना करितां येईल.

पण ह्रस्वसंज्ञा सांगण्याचा उपयोग असा संभवतो कीं, जेथें ह्रस्व या संज्ञेनें विधि केला असेल तेथें 'अचश्च' हा पुढील नियम लागू पडतो. म्हणजे ह्रस्व असा आदेश जेथें सांगितला असतो तेथें तो आदेश अचालाच होत असतो.

हा उपयोग संभवेल. पण ह्रस्व सांगणारीं शास्त्रें ह्रस्व सांगून कांहीं एक निराळें स्वरूप करून दाखवितील तर संभवेल. परंतु तसें तर कांहीं होत नाहीं. कारण सर्व प्रकारच्या अचांना जर ह्रस्वसंज्ञा होत आहे तर 'अचाला ह्रस्वच होतो' याचा अर्थ 'अचाला अच् होतो' असाच होत आहे. तेव्हां अर्थातच ह्रस्व सांगणारीं सर्व शास्त्रें कुचकामाचीं होणार आहेत.

तर मग ह्रस्व सांगण्याचा उपयोग आम्ही असा दाखवितों की, 'एच इग्घ्रस्वादेशे' (१।१।४८) असें सूत्र आहे. तेथें ह्रस्व म्हणजे काय तें समजलें पाहिजे. जर प्रकृतसूत्रानें ह्रस्वसंज्ञा सांगितली नाहीं तर ह्रस्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें ह्रस्व असा शब्द न घालतां त्याच्या ऐवजीं 'एच इक्' असें म्हणावें लागेल. उदा. ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' (१।२ ४७) या सूत्रामध्यें ह्रस्व शब्द काढून त्याच्या ऐवजीं 'एच इक्' म्हणजे एचाला इक् होतो

५. एकमात्रिक, द्विमात्रिक आणि त्रिमात्रिक अशा सर्व स्वरांना जर ह्रस्व संज्ञा होईल तर 'ह्रस्वो नपुंसके' (१।२४७) वगैरे स्थलीं ह्रस्व पदानें तिघांचीही उपस्थिति होईल, आणि 'श्रीपम्' वगैरे ठिकाणीं अन्तरतम परिभाषेनें एकमात्रिकाला एकमात्रिक, दीर्घाला दीर्घ अशाच क्रमानें आदेश होणार असल्यामुळें ह्रस्वाचें विधान निरर्थक होईल. आतां जें कार्य ह्रस्वाला उद्देशून सांगितलें असेल तें अचालाच उद्देशून सांगावें.

६. ह्रस्वादेशे हा शब्द तोंडांतून काढतांच येत नाहीं. तेव्हां अनेक ठिकाणीं उपयोग व्हावा याकरतां जें हें 'एच इक् ह्रस्वा०' (१।१४८) असें सामान्य शास्त्र करून ठेविलें तें करतां येत नाहीं. अर्थात् अनेक ठिकाणीं 'एच इक्' असें वारंवार म्हणावें लागेल.

हलादिः शेषः [७.४.५९,६०] एच इग्भवतीति ॥ संज्ञा च नाम यतो न लघीयः ॥ कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम्। लघीयश्च त्रिर्ह्रस्वप्रदेशेष्वेच इग्भवतीति न पुनः संज्ञाकरणम्। त्रिर्ह्रस्वप्रदेशेष्वेच इग्भवतीति षड्ग्रहणानि। संज्ञाकरणे पुनरष्टौ। ह्रस्वसंज्ञा वक्तव्या। त्रिर्ह्रस्वप्रदेशेषु ह्रस्वग्रहणं कर्तव्यं ह्रस्वो ह्रस्वो ह्रस्व इति। एच इग्घ्रस्वादेश इति। सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे यद्गरीयांसं यत्नमारभते तस्यैतत्प्रयोजनं दीर्घप्लुतयोस्तु पूर्वसंज्ञा मा भूदिति ॥

## अचश्च ॥ १.२.२८ ॥

किमयमलोऽन्त्यशेष आहोस्विदलोऽन्त्यापवादः। कथं चायं तच्छेषः स्यात्कथं वा तदपवादः। यद्येकं वाक्यं तच्चेदं च

---

असें सांगावें लागेल. तसेंच 'णौ चङ्युपधाया ह्रस्वः' (७।४।१) या सूत्रामध्यें देखील ह्रस्व काढून त्याच्या ऐवजीं 'एच इक्' असें म्हणावें लागेल. तसेंच 'ह्रस्वः' 'हलादिः शेषः' (७।४। ५९,६०) येथें देखील ह्रस्वः असें न म्हणतां 'एच इक्' असें म्हणावें लागेल.

परंतु संज्ञा म्हणून जिला म्हणतात ती अशी असली पाहिजे की जिच्यापेक्षां दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें थोडक्यांत बोलतां येणार नाहीं.

असें कशावरून ?

अशावरून की, संज्ञा न करण्यापेक्षां संज्ञा करण्यांत थोडें तरी लाघव झालेंच पाहिजे. परंतु येथें पाहावें तर तीन ठिकाणीं ह्रस्व शब्द काढून त्याच्या ऐवजीं 'एच इक्' अशीं दोन पदें घातलीं तरी देखील ह्रस्वसंज्ञा करण्यापेक्षां बरेंच लाघव होत आहे. उलट 'ह्रस्व संज्ञा करणें' यांतच लाघव होत नाहीं. तें असें की, तिन्ही ठिकाणीं एक 'ह्रस्व' हा शब्द काढून त्याच्या ऐवजीं 'एच इक्' असे दोन शब्द घातले तरी ते तिन्ही ठिकाणीं मिळून सहाच शब्द होतात आणि ह्रस्व संज्ञा केली तर आठ शब्द उच्चारावे लागतात. ते असे—प्रकृतसूत्रामध्यें ह्रस्वसंज्ञा सांगण्याकरितां एक ह्रस्व शब्द उच्चारला पाहिजे व पूर्वीं दाखविलेल्या 'ह्रस्वो नपुंसके०' वगैरे तिन्ही सूत्रांमध्यें मिळून तीनदां ह्रस्व शब्द उच्चारला पाहिजे. तेव्हां एकंदर चार शब्द झाले. आणि 'एच इग्घ्रस्वादेशे' हें सूत्र करावें लागणार आहे. तेव्हां या सूत्रांतील चार शब्द असे एकंदर आठ शब्द होतात. तेव्हां ह्रस्वसंज्ञा करून आठ शब्द उच्चारण्यापेक्षां ह्रस्वसंज्ञा न करतांना आठ शब्दांच्या ऐवजीं सहा शब्द उच्चारून थोडक्यांत काम भागतें. असें असतांही जो हा आचार्य पाणिनि आठ शब्द घालण्याचा अधिक प्रयत्न करतो त्याचा कांहीं तरी उपयोग झालाच पाहिजे. तो उपयोग असा की, दीर्घ आणि प्लुत म्हणजे द्विमात्र आणि त्रिमात्र यांना पूर्वीची संज्ञा म्हणजे ह्रस्व ही संज्ञा होत नाहीं.

(सू.२८) हें शास्त्र 'अलोऽन्त्यस्य' (१।१। ५२) या परिभाषेचा शेष म्हणून समजावें किंवा त्या परिभाषेचा अपवाद म्हणून समजावें.

कशा रीतीनें त्या परिभाषेचा शेष समजतां येईल ? व कशा रीतीनें त्या परिभाषेचा अपवाद समजतां येईल ?

जर ती 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा आणि

---

१. ह्रस्व होतो, दीर्घ होतो आणि प्लुत होतो अशा तऱ्हेनें ह्रस्वादिक शब्दानें जेथें अचाचें विधान केलें जातें तेथें 'अचः' असें षष्ठ्यन्तपद उपस्थित होतें. अर्थात् ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत या शब्दांनीं सांगितलेले आदेश अचाचेच स्थानीं होतात; उदा० 'ह्रस्वो नपुंस०' (१।२।४७), 'अकृत्सार्व०' (७।४ २५), 'वाक्यस्य टेःप्लुत०' (८।२।८२), 'प्रत्यभिवादे' (८।२।८३).

अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति अचो ह्रस्वदीर्घप्लुता अन्त्यस्येति ततोऽयं तच्छेषः । अथ नाना वाक्यम् अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति अचो ह्रस्वदीर्घप्लुता अन्त्यस्यानन्त्यस्य चेति ततोऽयं तदपवादः । कश्चात्र विशेषः ।

**ह्रस्वादिविधिरलोऽन्त्यस्येति चेद्वचिप्रच्छिशमादिप्रभृतिहनिगमिदीर्घेष्वज्ग्रहणम् ॥ १ ॥**

ह्रस्वादिविधिरलोऽन्त्यस्येति चेद्वचिप्रच्छिशमादिप्रभृतिहनिगमिदीर्घेष्वज्ग्रहणं कर्तव्यम् । वचिप्रच्छ्योर्दीर्घोऽच इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति ॥ शमादीनां दीर्घोऽच इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति ॥ हनिगम्योर्दीर्घोऽच इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि

---

प्रकृत 'अचश्च' हें शास्त्र हीं दोन्ही मिळून एकच वाक्य[२] समजलें तर 'अन्त्य अलाच्या स्थानीं विधि होतात, आणि ह्रस्व, दीर्घ, प्लुत, हें अन्त्य अचाच्या स्थानीं होतात' असा एकंदर अर्थ होईल. आणि असा अर्थ झाला म्हणजेच 'प्रकृतशास्त्र हें अलोऽन्त्यस्य या परिभाषेचें अंगभूत आहे' असें समजलें जातें. आतां अलोऽन्त्यस्य ही परिभाषा आणि प्रकृतशास्त्र हीं दोन्ही वाक्यें निरनिराळीं समजलीं तर 'अन्त्य अलाला विधि होतात' आणि ह्रस्व, दीर्घ, प्लुत, हे अचाला होतात, मग तो अच् अन्तीं असो अथवा नसो' असा अर्थ झाला म्हणजे प्रकृतशास्त्र हें अलोऽन्त्यस्य या परिभाषेचा अपवाद समजलें जाईल.

या दोन पक्षांमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा.१) 'ह्रस्व वगैरे विधि जे प्रकृतशास्त्रानें अचाला करावयाचे खरे, पण तो अच् अन्त्य अल् असेल तर' असा हा तच्छेषपक्ष घेतला असतां वच्, प्रच्छ्, शम् वगैरे, हन् आणि गम् इतक्यांना दीर्घ कर्तव्य असतांना तेथें अज्ग्रहण करावें लागेल. तें असें की, वच् आणि प्रच्छ् या धातूंहून क्विप्प्रत्ययें[३] करून धातूंमधील अचांला दीर्घ करून वाक्, प्राट्, असे शब्द सिद्ध होतात. येथें धातूमधील अच् हा अन्त्य नसल्यामुळें प्रकृतशास्त्र तेथें प्रवृत्त होणार नाहीं. म्हणून तेथें धातूमधील अकारालाच दीर्घ व्हावा याकरितां 'अचः' असें म्हणावें लागेल. तसेंच शाम्यति वगैरे उदाहरणांमध्यें जो 'शमामष्टानाम्०' (७।३।७४) या सूत्रानें दीर्घ होतो तेथें देखील अन्त्य अच् नसल्यामुळें प्रकृत 'अचश्च' हें शास्त्र प्रवृत्त होणार नाहीं. तेव्हां तेथें धातूमधील अचालाच दीर्घ व्हावा याकरितां 'अचः' असें तेथें म्हणावें लागेल. तसेंच हन्[४] आणि गम् या धातूंना जो 'अज्झन०' (६।४।१६) या सूत्रानें दीर्घ सांगितला आहे तेथें देखील अन्त्य अच् नसल्यामुळें प्रकृतशास्त्र प्रवृत्त होणार नाहीं. म्हणून तेथें धातूमधील अकारालाच दीर्घ व्हावा याकरितां 'अचः' असें म्हणावें लागेल.

तर मग 'तच्छेष'पक्ष सोडून 'अपवाद'पक्ष घेऊं या. म्हणजे वर दाखविलेल्या तिन्ही ठिकाणीं अन्तीं अच् नसला तरी देखील 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेचा बाध करून प्रकृतशास्त्र प्रवृत्त होईल. आणि अच् शेवटीं नसला तरी

---

२. आपापलें निमित्त पाहून एका ठिकाणीं प्राप्त झालेल्या दोन वाक्यांचा विशेषणविशेष्यभावानें अन्वय केल्यानें दोन्ही मिळून एक वाक्य होत आहे.

३. 'वचिप्रच्छ्यायतस्तुकटप्रुजुश्रीणां दीर्घश्च' (३।२।१७८ वा.२) या वार्तिकानें क्विप्प्रत्यय आणि दीर्घ सांगितला आहे.

४. उदा०—जिघांसति, जिगांस्यते. जिघांसति येथें हन्धातूहून सन्, 'एकाच उपदेशे' (७।२।१०) यानें इण्निषेध, 'अज्झन०' यानें दीर्घ, द्वित्व, अभ्यासकार्य, इत्व (७।४।७९), 'अभ्यासाच्च' (७।३।५५) यानें कुत्व झालें आहे. जिगांस्यते येथें इण्धातूहून सन्, 'सनि च' (२।४।४७) यानें गम् आदेश, 'अज्झन०' यानें दीर्घ, द्वित्व वगैरे, सन्नन्ताहून कर्मणि लट्, यक् (३।१।६७), झाला आहे.

न प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि तदपवादः ।

**अचश्चेन्नपुंसकह्रस्वाकृत्सार्वधातुकनामिदीर्घेष्वनन्त्यप्रतिषेधः ॥ २ ॥**

अचश्चेन्नपुंसकह्रस्वाकृत्सार्वधातुकनामिदीर्घेष्वनन्त्यस्य प्रतिषेधो वक्तव्यः । ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य [१.२.४७] यथेह भवति । रै अतिरि । नौ अतिनु । एवं सुवाग्ब्राह्मणकुलमित्यत्रापि प्राप्नोति ॥ अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः [७.४.२५] यथेह भवति । चीयते स्तूयते । एवं भिद्यते अत्रापि प्राप्नोति ॥ नामि [६.४.३] दीर्घो यथेह भवति । अग्नीनाम् वायूनाम् । एवमत्रापि प्राप्नोति । षण्णाम् ॥ नैष दोषः । नोपधायाः [६.४.७] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । प्रकृतस्यैष नियमः स्यात् । किं च प्रकृतम् । नामीति । तेन भवेदिह नियमान्न स्यात् । षण्णाम् । अन्यते तन्यते अत्रापि प्राप्नोति । अथाप्येवं नियमः स्यान्नोपधाया नाम्येवेति । एवमपि भवेदिह नियमान्न स्यात् । अन्यते तन्यत इति । षण्णामित्यत्र प्राप्नोति । अथाप्युभयतो नियमः स्यान्नोपधाया एव नामि

---

त्याला दीर्घ करतां येईल. तेव्हां तेथें कोठेंही 'अचः' असें म्हणावयास नको.

(वा.२) प्रकृत 'अचश्च' या शास्त्रानें अन्त्य अच् नसला तरी तेथें 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेचा बाध करून अनन्त्य अचाला ह्रस्व, दीर्घ वगैरे करतां येतात असें म्हटलें तर 'ह्रस्वो नपुंसके'(१।२।४७) या सूत्रानें सांगितलेला ह्रस्व व 'अकृत्सार्वधा०' (७।४।२५) आणि 'नामि- (६।४।३) या सूत्रांनीं सांगितलेला दीर्घ हे अनन्त्य म्हणजे मधल्या अचाला होऊं लागतील त्याचा निषेध सांगावा लागेल. तें असें—

'ह्रस्वो नपुंसके' या सूत्रानें सांगितलेला ह्रस्व जसा 'अतिरि' या उदाहरणामध्यें अतिरै शब्दाच्या अचाला म्हणजे अन्त्य ऐकाराला होतो व अतिनु या उदाहरणामध्यें अतिनौ-शब्दाच्या अन्त्य अचाला म्हणजे अन्त्य औकाराला ह्रस्व होतो, तसें 'सुवाक् ब्राह्मण कुलम्' या वाक्यामध्यें सुवाक् येथील आकार अन्त्य नसला तरी त्याला ह्रस्व होऊं लागेल. तसेंच 'अकृत्सार्व०' या सूत्रानें सांगितलेला दीर्घ चीयते, स्तूयते या उदाहरणांमध्यें धातूच्या अन्त्य अचाला जसा होतो तसा छिद्यते, भिद्यते या उदाहरणांमध्यें धातूमधील अच् अन्त्य नसला तरी त्याला होऊं लागेल. तसेंच 'नामि' या सूत्रानें सांगितलेला दीर्घ अग्नीनां, वायूनाम् या उदाहरणांमध्यें अग्नि, वायु, या शब्दांच्या अन्त्य अचाला जसा होतो तसा षण्णाम् या उदाहरणामध्यें षष्शब्दामधील अच् अन्त्य नसला तरी त्याला होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'नोपधायाः' (६।४।७) हें शास्त्र नियमार्थ होईल. तो नियम असा की, नाम् पुढें असतांना पूर्वीच्या कोणत्याही ठिकाणीं अनन्त्य अचाला जर दीर्घ होईल तर नकारान्त शब्दाच्या उपधेलाच होईल.

पण हा नियम प्रकृत दीर्घासंबंधानेंच लागू पडेल.

प्रकृत दीर्घ कोणता ?

'नामि' (६।४।३) या शास्त्रानें सांगितलेला दीर्घ हा प्रकृतदीर्घ होय. तेव्हां त्याचा नियम झाल्यामुळें षण्णाम् या उदाहरणामध्यें दीर्घ होणार नाहीं. परंतु अन्यते, तन्यते, या उदाहरणांमध्यें 'अकृत्सार्व०' (७।४।२५) या शास्त्रानें दीर्घ होऊं लागेल. आतां जर 'नकारान्ताच्या उपधेला जर दीर्घ होईल तर नाम् पुढें असतांनाच होईल' असा नियम करावा तर त्या नियमामुळें अन्यते, तन्यते, या उदाहरणांमध्यें दीर्घ होणार नाहीं. परंतु षण्णाम् या उदाहरणामध्यें 'नामि' या शास्त्रानें दीर्घ होऊं लागेल.

आतां 'नोपधायाः' हा नियम दोन प्रका-

नाम्येव नोपधाया इति। एवमपि भिद्यते सुवाग्ब्राह्मणकुलमित्यत्रापि प्राप्नोति॥ एवं तर्हि ह्रस्वो दीर्घः प्लुत इति यत्र ब्रूयादच इत्येतत्तत्रोपस्थितं द्रष्टव्यम्। किं कृतं भवति। द्वितीया षष्ठी प्रादुर्भाव्यते। तत्र कामचारो गृह्यमाणेन वाचं विशेषयितुमचा वा गृह्यमाणम्। यावता कामचार इह तावद्वचिप्रच्छिशमादिप्रभृतिहनिगमिदीर्घेषु गृह्यमाणेनाचं विशेषयिष्यामः। एतेषामचो दीर्घो भवतीति। इहेदानीं नपुंसकह्रस्वाकृत्सार्वधातुकनामिदीर्घेष्वचा गृह्यमाणं विशेषयिष्यामः। नपुंसकस्य ह्रस्वो भवत्यचः। अजन्तस्येति। अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घोऽचः। अजन्तस्येति। नामि दीर्घो भवत्यचः। अजन्तस्येति॥

इह कस्मान्न भवति द्यौः पन्थाः स

---

रचा केला तर चालेल. म्हणजे असें की, नाम् पुढें असतांना जर दीर्घ होईल तर नकारान्त अंगाच्या उपधेलाच होईल. म्हणजे षण्णाम् या ठिकाणीं होणार नाहीं. आणि नकारान्त अंगाच्या उपधेला जर दीर्घ होईल तर नाम् पुढें असतांनाच होईल, असा नियम केला म्हणजे अन्यते, तन्यते, या ठिकाणीं होणार नाहीं.

असे दोन प्रकारचे नियम करून काम भागलें तरी भिद्यते, छिद्यते, या ठिकाणीं अनन्त्य अचाला 'अकृत्सार्व०' (७।४।२५) या शास्त्रानें दीर्घ होऊं लागेल. तसेंच सुवाक् ब्राह्मणकुलम् या वाक्यामध्यें सुवाक् येथें अनन्त्य अचाला म्हणजे अकाराला 'ह्रस्वो नपुंसके' (१।२।४७) या शास्त्रानें ह्रस्व होऊं लागेल हे पूर्वी दाखविलेले दोष कायम आहेतच.

तर मग प्रकृत 'अचश्च' हें शास्त्र अलोऽन्त्यस्य या परिभाषेचा शेषही नव्हे आणि अपवादही नव्हे. त्याचा अर्थ असा समजावा की, ज्या शास्त्रामध्यें ह्रस्व होतो, दीर्घ होतो, प्लुत होतो असें सांगितलें असेल त्याचा वाक्यार्थ करतांना 'अचः' असें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें.

असें केल्यानें काय बरें होईल?

असें होईल की, ह्रस्व' वगैरे सांगणाऱ्या शास्त्रामध्यें एक षष्ठ्यन्त पद त्या ह्रस्व वगैरेंचा स्थानी म्हणून आचार्यानें जें घातलें असेल त्याच्याजवळ 'अचः' असें दुसरें षष्ठ्यन्त पद प्राप्त होतें. आणि अशीं दोन षष्ठ्यन्त पदें दिसूं लागलीं म्हणजे अर्थ करतांना आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसा अर्थ करतां येईल. म्हणजे सूत्रामध्यें मूळचें उच्चारलेलें जें षष्ठ्यन्त पद तें 'अचः' याचें विशेषण करावें. किंवा 'अचः' हें त्याचें विशेषण करावें. तेव्हां अशा रीतीनें वाटेल तसा अर्थ करण्याला मोकळीक मिळाली म्हणजे वच्, प्रच्छ्, शम् वगैरे, हन् आणि गम् यांना जो दीर्घ सांगितला आहे त्या ठिकाणीं ते वच् वगैरे 'अचः' याचें विशेषण करूं. म्हणजे वच्, प्रच्छ्, वगैरेंचा जो अच् त्याला दीर्घ होतो, असा अर्थ होईल. आणि 'ह्रस्वो नपुंसके' (१।२।४७), 'अकृत्सार्व०' (७।४।२५) आणि 'नामि' (६।४।३) या तीन ठिकाणीं सूत्रामध्यें मूळचें पाणिनीनें षष्ठ्यन्त पद उच्चारलें आहे त्याचें 'अचः' हें विशेषण करतो. म्हणजे 'ह्रस्वो नपुंसके' याचा असा अर्थ होईल की, अजन्त जें नपुंसकलिङ्गी प्रातिपदिक त्याला ह्रस्व होतो. तसाच 'अकृत्सार्व०' याचा अर्थ असा होईल की, कृत् आणि सार्वधातुक याशिवाय इतर प्रत्यय पुढें असतांना अजन्त धातूला दीर्घ होतो. तसाच 'नामि' या शास्त्राचा असा अर्थ होईल की, नाम् प्रत्यय पुढें असतांना अजन्त अंगाला दीर्घ होतो. अशा व्यवस्थेनें कांहीं दोष येत नाहीं.

आतां द्यौः, पन्थाः, सः, या ठिकाणीं जे आदेश होतात, म्ह. द्यौः या उदाहरणामध्यें 'दिव औत्' (७।१।८४) या शास्त्रानें वकाराला

इति ।

**संज्ञया विधाने नियमः ॥३॥**

संज्ञया ये विधीयन्ते तेषु नियमः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अजिति हि वर्तते । तत्रैवमभिसंबन्धः करिष्यते । अचोऽज्भवति ह्रस्वो दीर्घः प्लुत इत्येवं भाव्यमान इति॥ अथ पूर्वस्मिन्योगेऽज्ग्रहणे सति किं प्रयोजनम् ।

**अज्ग्रहणं संयोगाच्समुदायनिवृत्त्यर्थम् ॥४॥**

अज्ग्रहणं क्रियते संयोगनिवृत्त्यर्थमच्समुदायनिवृत्त्यर्थं च । संयोगनिवृत्त्यर्थं तावत् । प्रतक्ष्य प्ररक्ष्य । ह्रस्वस्य पिति कृति तुक् [६.१.७१] इति तुग्मा भूदिति । अच्समुदायनिवृत्त्यर्थम् । तितउच्छत्रम् । तितउच्छाया । दीर्घात्पदान्ताद्वा [६.१.७५,७६] इति विभाषा मा भूदिति ॥

**ऊँच्चैरुदात्तः ॥१.२.२९॥**

**नीचैरनुदात्तः ॥१.२.३०॥**

किं षष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणमनुवर्तेत उताहो

---

औकार होतो, पन्थाः या उदाहरणामध्यें 'पथिमथि०' (७।१।८५) या शास्त्रानें पथिन् शब्दाच्या नकाराला आकार होतो, तसेंच सः या उदाहरणामध्यें 'त्यदादीनामः' (७।२।१०२) या शास्त्रानें दकाराला अकार होतो, हे औकार वगैरे आदेश प्रकृत 'अचश्च' या शास्त्रामुळें त्या त्या शब्दामधील अचाला कां केलें जात नाहींत ?

(वा. ३) ह्रस्व, दीर्घ, वगैरे संज्ञाशब्द उच्चारून जे आदेश सांगितले आहेत त्यांच्या संबंधानें 'ते अचालाच करावेत' असा प्रकृत 'अचश्च' या शास्त्रानें केलेला नियम लागू पडतो.

पण असें कसें म्हणतां येईल ? असें म्हणूं नये. कारण तशा अर्थाचा स्पष्ट शब्द सूत्रामध्यें पाणिनीनें उच्चारला नसतांना तसा अर्थ कसा घेतां येईल ?

प्रकृत 'अचश्च' या शास्त्रामध्यें मागून अच् असें प्रथमान्त पद अनुवृत्त होत आहे. तें धरून प्रकृतशास्त्राचा अर्थ करतांना त्याचा संबंध असा करावा की, ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत या शब्दांनीं सांगितलेला जो अच् आदेश तो अचालाच होतो.

याप्रमाणें पूर्वसूत्रांतून अच् या प्रथमान्त पदाचा येथें संबंध करून त्याचा उपयोग दाखविला खरा, परंतु पूर्वीच्या म्हणजे 'ऊकालोऽच्' या शास्त्रामध्यें अच् असें जें प्रथमान्त पद उच्चारलें आहे त्याचा तेथें काय उपयोग आहे ?

(वा.४) 'ह्रस्व, दीर्घ, वगैरे संज्ञा संयोगाला होऊं नयेत, आणि अचांच्या समुदायाला होऊं नयेत' अशाकरितां तेथें अच् असें प्रथमान्त पद उच्चारलें आहे. संयोगाला त्या संज्ञा होत नाहींत याचें उदाहरण — प्रतक्ष्य, प्ररक्ष्य. या ठिकाणीं ककार आणि षकार या दोन व्यञ्जनांचा संयोग एकमात्रिक असल्यामुळें त्याला ह्रस्व ही संज्ञा होईल. आणि त्याला 'ह्रस्वस्य पिति कृति' (६।१।७१), या शास्त्रानें तुगागम होऊं लागेल. तो न झाला पाहिजे.

तसेंच अच्समुदायाला संज्ञा होऊं नये याचें उदाहरण— तितउच्छत्रम्, तितउच्छाया. या ठिकाणीं अ आणि उ या दोन अचांच्या समुदायाला मिळून द्विमात्र समजून दीर्घ संज्ञा होईल. आणि 'दीर्घात्'(६।१।७५) 'पदान्ताद्वा', (६।१।७६) या शास्त्रांनीं विकल्पानें तुगागम होऊं लागेल, तो होऊं नये. तेव्हां अच् या पदाचा येथेंही उपयोग आहे आणि पूर्वसूत्रामध्येंही उपयोग आहे.

---

१. तालु, कण्ठ वगैरे स्थानांच्या ऊर्ध्वभागामध्यें उगम पावलेला जो अच् तो उदात्तसंज्ञक होतो.

१. ताल्वादिक स्थानांच्या अधोभागामध्यें उगम पावलेला जो अच् तो अनुदात्तसंज्ञक होतो.

न। किं चातः। यद्यनुवर्तते हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवदित्येषा परिभाषा न प्रकल्पते। कथं हलो नाम स्वरप्राप्तिः स्यात्। एवं तर्हि निवृत्तम्। बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि॥ अथ प्रथमानिर्दिष्टमज्ग्रहणमनुवर्तत उताहो न। किं चार्थोऽनुवृत्त्या। बाढमर्थो यद्येते व्यञ्जनस्यापि गुणा लक्ष्यन्ते। ननु च प्रत्यक्षमुपलभ्यन्ते। इषे त्वोर्जे त्वा। नैते व्यञ्जनस्य गुणाः। अच एते गुणास्तत्सामीप्यात्तु व्यञ्जनमपि तद्गुणमुपलभ्यते। तद्यथा। द्वयो रक्तयोर्वस्त्रयोर्मध्ये शुक्लं वस्त्रं तद्गुणमुपलभ्यते। बदरपिटके रिक्तको लोहकंसस्तद्गुण उपलभ्यते॥ कुतो नु खल्वेतदच एते गुणास्तत्सामीप्यात्तु व्यञ्जनमपि तद्गुणमुपलभ्यत इति न पुनर्व्यञ्जनस्यैते गुणाः स्युस्तत्सामीप्यादज्ञपि तद्गुण उपलभ्यत इति। अन्तरेणापि

---

(सू.३०) या दोन सूत्रांमध्यें मागून 'अचः' असें षष्ठयन्त पद अनुवृत्त होत आहे किंवा नाहीं?

अनुवृत्त केलें तर काय बरें होईल?

'अचः' असें पद येथें अनुवृत्त केलें तर 'ज्या उदाहरणामध्यें व्यञ्जनाला स्वर प्राप्त होत असेल तेथें तें व्यञ्जन नसल्यासारखें समजावें' अशी जी परिभाषा आहे ती परिभाषा व्यावयास नको. कारण प्रकृतसूत्रामध्यें 'अचः' असें पद अनुवृत्त होतें असल्यामुळें उदात्त वगैरे हे स्वर व्यंजनाला कसे बरें प्राप्त होतील?

असें असेल तर 'अचः' या पदाची अनुवृत्ति करूं नये हेंच बरें. कारण ती परिभाषा अवश्य मानली पाहिजे. त्या परिभाषेचा या शास्त्रामध्यें बहुत ठिकाणीं उपयोग होत आहे.

आतां या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून 'अच्' असें प्रथमान्त पद अनुवृत्त होत आहे किंवा नाहीं?

येथें अच् पद अनुवृत्त करण्यांत काय बरें फायदा आहे?

फायदा तर पुष्कळच आहे. पण उदात्त, अनुदात्त, वगैरे धर्म व्यंजनाला कोठेंही दृष्टीस पडत असतील तर.

दृष्टीस पडत असतील तर असें कां म्हणतां?

प्रत्यक्ष अनुभवांत येत आहेत. तें असें की, 'इषे त्वोर्जे त्वा' या उदाहरणांमध्यें षकार, तकार, वकार हीं व्यंजनें उच्चारतांना अनुदात्त धर्माचीं अनुभवास येतात.

वरील उदाहरणांमध्यें उदात्त वगैरे धर्म व्यंजनाचे नव्हेत. ते त्या व्यंजनांच्या जवळ असलेल्या स्वराचेच आहेत. फक्त इतकेंच की त्या स्वराजवळ तीं व्यंजनें असल्यामुळें 'तें व्यंजन तशा धर्माचें आहे' असा भास होतो. लोकांमध्यें देखील असें पाहा की, दोन तांबड्या रंगाच्या वस्त्रांमध्यें ठेवलेलें पांढरें वस्त्र तांबड्या रंगाचें आहे असें दिसूं लागतें. तसेंच बोरांनीं भरलेल्या पेटाऱ्यामध्यें ठेवलेला स्वच्छ आरसा बोरांनीं भरल्यासारखा भासूं लागतो.

पण 'उदात्त वगैरे हे धर्म स्वराचेच आहेत, फक्त व्यंजन हें त्या स्वराच्या जवळ असल्यामुळें तशा स्वराचें भासतें' असेंच कशावरून गृहीत धरावें? याच्या उलट म्हणजे 'उदात्त वगैरे हे धर्म वस्तुतः व्यंजनाचेच आहेत, आणि त्या व्यंजनाच्या जवळ असल्यामुळें त्याच्याजवळचा स्वर तशा धर्माचा म्हणजे उदात्त वगैरे धर्माचा उपलब्ध होतो' असें कां गृहीत धरूं नये?

तसें न धरण्याचें कारण हें की कांहीं उदाहरणांमध्यें व्यंजन मुळींच नसतांना नुसत्या अचाचे म्हणजे स्वराचेच उदात्त वगैरे हे धर्म उपलब्ध होत आहेत.[3] (पण अचाशिवाय

---

२. अचः असें षष्ठयन्त पद अनुवृत्त केलें तर उदात्त किंवा अनुदात्त हा अचाचे स्थानीं होतो, असा या सूत्रद्वयाचा दुसरा एक वाक्यार्थ होईल.

३. आप्यायध्वम् या उदाहरणामध्यें 'आ' हा उपसर्ग उदात्तस्वराचा उपलब्ध होत आहे.

व्यञ्जनमच एवैते गुणा लक्ष्यन्ते न पुनरन्तरेणाचं व्यञ्जनस्योच्चारणमपि भवति। अन्वर्थं खल्वपि निर्वचनम्। स्वयं राजन्ते स्वरा अन्वग्भवति व्यञ्जनमिति॥

**उच्चनीचस्यानवस्थितत्वात्संज्ञाप्रसिद्धिः ॥१॥**

इदमुच्चनीचमनवस्थितपदार्थकम्। तदेव हि कंचित्प्रत्युच्चैर्भवति कंचित्प्रति नीचैः। एवं कंचित्कश्चिदधीयानमाह किमुच्चै रोरूयसेऽथ नीचैर्वर्तताभिति। तमेव तथाधीयानमपर आह किमन्तर्दन्तकेनाधीष उच्चैर्वर्ततामिति। एवमुच्चनीचमनवस्थितपदार्थकं तस्यानवस्थानात्संज्ञाया अप्रसिद्धिः॥ एवं तर्हि लक्षणं करिष्यते। आयामो दारुण्यमणुता खस्येत्युच्चैःकराणि शब्दस्य। आयामो गात्राणां निग्रहः। दारुण्यं स्वरस्य दारुणता रूक्षता। अणुता खस्य कण्ठस्य संवृतता। उच्चैःकराणि शब्दस्य॥ अथ नीचैःकराणि शब्दस्य। अन्ववसर्गो मार्दवमुरुता खस्येति नीचैःकराणि शब्दस्य। अन्ववसर्गो गात्राणां शिथिलता। मार्दवं स्वरस्य मृदुता स्निग्धता। उरुता खस्य महत्ता कण्ठस्य। इति नीचैःकराणि शब्दस्य॥ एतदप्यनै-

---

नुसतें व्यंजन उदात्त वगैरे धर्मांचे उपलब्ध होत नाहीं.)

इतकेंच नव्हे तर अचाशिवाय नुसत्या व्यंजनाचेंच उच्चारण देखील नीट करतां येत नाहीं.

शिवाय अचाला स्वर हें जें नांव तें अन्वर्थ आहे. तें असें की, 'स्वयं राजन्ते इति स्वराः' अशी स्वरशब्दाची व्युत्पत्ति आहे. म्हणजे स्वर हे स्वतःच भासणारे आहेत, दुसऱ्याच्या अनुषंगाने ते भासणारे नव्हेत. तसेंच व्यंजन हें नांव देखील अन्वर्थ आहे. तें असें की 'अन्वक् भवति तत् व्यञ्जनम्' म्हणजे जें नेहमीं दुसऱ्याला अनुसरून भासमान होतें तें. (एकंदरींत येथें पूर्वसूत्रांतून 'अच्' अशा प्रथमान्त शब्दाची अनुवृत्ति करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.)

(वा.१) 'हें उच्चारण उच्च प्रतीचें आहे' व 'हें नीच प्रतीचें आहे' असें कांहीं नियमित ठरवितां येत नाहीं. असें पाहा कीं 'एखादा मनुष्य कांहीं वाक्य उच्चारित असतानां 'तें त्याचें उच्चारण मोठ्यांदा होत आहे' असें एकाला वाटते, तर 'तेंच उच्चारण हळू आहे' असें दुसऱ्याला वाटते एखादा मुलगा अध्ययन करूं लागला म्हणजे त्याला दुसरा कोणी एखादा असें म्हणतो की, 'मोठ्यांदा काय ओरडतोस, जरा हळू म्हण'. पण त्यालाच तशा रीतीनें म्हणत असतांनाच दुसरा कोणी म्हणतो की, तोंडांतल्या तोंडांत काय म्हणतोस? जरा मोठ्यांदा म्हण.' एकंदरींत 'अमुक प्रमाणांत उच्चारण केलें असतां तें उच्च प्रतीचें समजावें' आणि 'अमुक प्रमाणांत उच्चारण केलें असतां तें नीच प्रतीचें समजावें' असें कांहीं नियमित रीतीनें ठरवितां येत नाहीं. आणि तसें ठरवितां येत नसल्यामुळें उदात्त कोणाला म्हणावें व अनुदात्त कोणाला म्हणावें तीही व्यवस्था लागत नाहीं.

तर मग उच्च आणि नीच यांचें स्वरूप आम्ही सांगतों. त्यांपैकीं उच्च उच्चारण्याचें स्वरूप असें—

आयाम म्हणजे शरिरांतील अवयवांचा दीर्घपणा, दारुण्य म्हणजे स्वराचा रूक्षपणा, अणुता म्हणजे कंठांतील मोकळ्या भागाचा संकोच, ह्या गोष्टी 'आवाज मोठा आहे' असें दाखवितात.

अन्ववसर्ग म्हणजे शरिरांतील अवयवांचा शिथिलपणा, मार्दव म्हणजे स्वराचा कोमलपणा, आणि उरुता म्हणजे कंठांतील मोकळ्या भागाचा विकास, या गोष्टी 'आवाज हलका आहे' असें दाखवितात.

कान्तिक्रम्। यदल्पप्राणस्य सर्वोच्चैस्तन्महाप्राणस्य सर्वनीचैः ॥

**सिद्धं तु समानप्रक्रमवचनात् ॥२॥**

सिद्धमेतत्। कथम्। समाने प्रक्रम इति वक्तव्यम्। कः पुनः प्रक्रमः। उरः कण्ठः शिर इति ॥

**[1]समाहारः स्वरितः ॥१.२.३१॥**

समाहारः स्वरित इत्युच्यते। कस्य समाहारः स्वरितसंज्ञो भवति। अचोरित्याह।

**समाहारोऽचोश्चेन्नाभावात् ॥१॥**

समाहारोऽचोश्चेत्तन्न। किं कारणम्। अभावात्। न ह्यचोः समाहारोऽस्ति। नन्वयमास्ति गाङ्गेऽनूप इति। नैषोऽचोः समाहारः। अन्योऽयमुदात्तानुदात्तयोः स्थान एक आदिश्यते॥ एवं तर्हि गुणयोः।

---

पण उच्च उच्चारण आणि नीच उच्चारण यांचीं जीं हीं स्वरूपें दाखविलीं तीं देखील अनियतच आहेत असें दृष्टीस पडतें. असें पाहा की, एखाद्या मनुष्याच्या प्राणवायूचा संचार शब्द उच्चारतांना अल्प प्रमाणांत होतो, आणि एखाद्या मनुष्याच्या प्राणवायूचा संचार शब्द उच्चारतांना मोठ्या प्रमाणांत होतो. तेव्हां अल्पप्राण अशा मनुष्यानें कितीही मोठ्यानें शब्द उच्चारला तरी तो महाप्राण मनुष्याच्या दृष्टीनें अगदीं हळू आहे असेंच होणार आहे. (एकंदरींत उच्च उच्चारण कोणतें आणि नीच उच्चारण कोणतें त्याची कांहीं व्यवस्था लागत नाहीं.)

(वा.२) ही सर्व व्यवस्था सिद्ध होत आहे.

ती कशी ?

ती अशी की, एका प्रक्रमामध्यें उच्च आणि नीच अशी व्यवस्था दोन भागांची कल्पना करून बरोबर जमते.

प्रक्रम म्हणून म्हणतां तें काय आहे? उर, कंठ, शिर वगैरे जीं अनेक प्रकारचीं वाणीचीं स्थानें आहेत त्यांना येथें प्रक्रम असें म्हटलें आहे. (म्हणजे मनुष्याचा आवाज कोता असो वा मोठा असो, कसाही असो; वाणीचा उच्चार करतांना जिव्हेच्या अग्र वगैरेंचा स्पर्श त्या त्या स्थानाच्या वरच्या भागांत होईल तर तें उच्च उच्चारण समजावें. आणि तशा ठिकाणींच त्या स्वराला उदात्त म्हणावें. तसेंच त्या त्या स्थानांच्या अधोभागीं जिव्हेचा स्पर्श होत असेल तेव्हां नीच उच्चारण समजावें. आणि तशा ठिकाणींच त्या स्वराला अनुदात्त म्हणावें.)

(सू.३१) समाहार म्हणजे मिश्रण होऊन बनलेला समुदाय. त्याला स्वरित अशी संज्ञा केली आहे. परंतु कोणाच्या समाहाराला स्वरित म्हणावें ?

तो समाहार अचांचा पाहिजे असें आम्ही म्हणतों.

(वा.१) अचांच्या समाहाराला स्वरित म्हणावें असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं.

कां बरें ?

अचांचा समाहार नाहीं म्हणून. असें पाहा की, कोणत्याही उदाहरणामध्यें दोन अचांचें मिश्रण झालेलें दृष्टीस पडत नाहीं.

पण ज्या ठिकाणीं दोन अचांचा संधि होतो त्या ठिकाणीं दोन अचांचें मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें; उदा०—गाङ्गेऽनूपे. या ठिकाणीं गाङ्गे या पदांतील शेवटचा एकार आणि अनूपे या पदांतील आरंभींचा अकार या दोन अचांचा संधि होऊन मिश्रण झालें आहे.

हें अचांचें मिश्रण नव्हे, तर उदात्त एकार आणि अनुदात्त अकार या दोघांचें मिश्रण न होतां ते दोन वर्ण जातात आणि त्या दोघांच्या स्थानीं स्वतंत्र असा निराळाच एकार आदेश होतो.

तर मग 'उदात्त आणि अनुदात्त या दोन

---

१. उदात्त आणि अनुदात्त हे दोनही वर्ण धर्म ज्या एकाच अचाचे ठिकाणीं दृष्टीस पडतात तो अच् स्वरितसंज्ञक होतो.

**गुणयोश्चेन्नाच्प्रकरणात् ॥२॥**

गुणयोः समाहार इति चेत्तन्न । किं कारणम् । अच्प्रकरणात् । अजिति वर्तते ॥

**सिद्धं त्वच्समुदायस्याभावात्तद्गुणे संप्रत्ययः ॥३॥**

सिद्धमेतत् । कथम् । अच्समुदायो नास्तीति कृत्वा तद्गुणस्याचः समाहारगुणस्य संप्रत्ययो भविष्यति ॥ कथं पुनः समाहार इत्यनेनाच्शक्यः प्रतिनिर्देष्टुम् । मतुब्लोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । पुष्पका एषां ते पुष्पकाः । कालका एषां ते कालका इति । एवं समाहारवान्समाहारः ॥ अथवाकारो मत्वर्थीयः । तद्यथा । तुन्दः घाट इति ॥ यद्येवं त्रैस्वर्यं न प्रकल्पते । तत्र को दोषः । त्रैस्वर्येणाधीमह इत्येतन्नोपपद्यते । नैतद्गुणापेक्षम् । किं तर्हि । अज-

---

गुणांचें मिश्रण' असा समाहार या शब्दाचा अर्थ घेऊं या.

(वा. २) मिश्रित गुणांचा समुदाय असा येथें अर्थ घेतां येत नाहीं.

कां बरें ?

अचांचें प्रकरण चालू आहे, म्हणजे मागून अच् असें प्रथमान्त पद अनुवृत्त होत आहे. (तेव्हां अच् सोडून गुण कसा घेतां येईलच ?)

(वा. ३) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

तें असें की, मिश्रित अचांचा समुदाय कोठेंही मिळत नाहीं म्हणून ज्या अचामध्यें उदात्त आणि अनुदात्त या गुणांचें मिश्रण होतें असा अच् येथें घेतां येईल.

पण समाहार या शब्दापासून 'गुणांचा समुदाय' या अर्थाचा बोध होईल, 'तो गुणांचा समुदाय ज्या अचामध्यें होतो' अशा अचाचा बोध समाहारशब्दापासून कसा होईल ? म्हणजे तशा प्रकारचा अच् या अर्थीं समाहार हा शब्द कसा लावतां येईल ?

**समाहारशब्दापुढें मतुप्प्रत्ययाचा लोप झाला आहे असें समजावें; जसें:— पुष्पक म्हणजे नेत्ररोग (डोळ्यांतील फूल). तें ज्यांना आहे त्या मनुष्यांना लोकांमध्यें पुष्पक असेंच म्हणतात. तसेंच कालक म्हणजे काळा चट्टा. तो ज्यांच्या अंगावर आहे त्या मनुष्यांना देखील कालक असेंच म्हणतात. त्याप्रमाणें येथेंही समाहार म्हणजे उदात्त आणि अनुदात्त यांचा समुदाय. तो ज्या अचामध्यें होत आहे त्या[२] अचालाही समाहार असें म्हणतां येईल.**

अथवा समाहार या शब्दाहून समाहार ज्या ठिकाणीं होत आहे अशा अर्थी 'अर्शआदि०' (५।२।१२७) या सूत्रानें अ-प्रत्यय होतो. ज्याप्रमाणें तुन्द म्हणजे मोठें पोट. तें ज्याचें आहे त्याला 'तुन्द' असें म्हणतात. तसेंच 'घाट' म्हणजे एक विशेष प्रकारची चेष्टा. ती ज्यांना आहे त्यांना 'घाट' असेंच म्हणतात. येथें तुन्द आणि घाट या शब्दांहून 'अर्शआदि०' (५।२।१२७) या सूत्रानें अ प्रत्यय झालेला आहे. तसेंच येथें समजावें.

एकंदरींत 'उदात्त आणि अनुदात्त या दोन गुणांच्या समुदायामुळेंच स्वरित असें म्हणावयाचें' असेंच जर असेल तर लोकामध्यें 'त्रैस्वर्य' म्हणजे तीन स्वर असा जो म्हणण्याचा प्रघात आहे तो जमत नाहीं. कारण स्वर दोनच होत आहेत.

तसें झालें असतां काय दोष येईल ?

दोष असा येईल की, 'आम्ही तीन स्वर लावून वेदाध्ययन करतों' असें जें म्हणतात तें बरोबर जमणार नाहीं.

हा जो लोकांमध्यें असें बोलण्याचा प्रघात आहे त्याचा अभिप्राय 'स्वर तीन आहेत' असा नव्हे तर 'स्वरभेदामुळें स्वरयुक्त अच्

---

२. जसें लोकांमध्यें पुष्पक, कालक, हे शब्द तशा तऱ्हेचा मनुष्य या अर्थीं लक्षणेनें योजतात तसाच येथें समाहार हा शब्द तशा तऱ्हेचा अच् या अर्थीं लक्षणेनें योजिला आहे.

पेक्षम्। त्रैस्वर्येणाधीमहे त्रिप्रकारैरज्भिरधीमहे कैश्चिदुदात्तगुणैः कैश्चिदनुदात्तगुणैः कैश्चिदुभयगुणैः। तद्यथा। शुक्लगुणः शुक्लः। कृष्णगुणः कृष्णः। य इदानीमुभयगुणः स तृतीयामाख्यां लभते कल्माष इति वा सारङ्ग इति वा। एवमिहाप्युदात्तगुण उदात्तः। अनुदात्तगुणोऽनुदात्तः। य इदानीमुभयवान्स तृतीयामाख्यां लभते स्वरित इति ॥

## तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम् ॥१.२.३२॥

अर्धह्रस्वमित्युच्यते तत्र दीर्घप्लुतयोर्न प्राप्नोति। कन्या। शक्तिके३ शक्तिके। नैष दोषः। मात्रचोऽत्र लोपो द्रष्टव्यः। अर्धह्रस्वमात्रमर्धह्रस्वमिति॥ किमर्थमिदमुच्यते। आमिश्रीभूतमिवेदं भवति।

---

तीन प्रकारचे होतात' असा त्याचा अभिप्राय आहे. 'तीन स्वरांनीं वेदाध्ययन करतो' म्हणजे 'तीन प्रकारच्या अचांनीं वेदाध्ययन करतो.' कांहीं अच् उदात्त गुणाचे, कांहीं अच् अनुदात्त गुणाचे, आणि कांहीं अच् दोन्ही गुणांचे. लोकांमध्यें देखील मिश्रण झालें असतां तिसरा प्रकार समजण्याची वहिवाट आहे असें पाहा की, पांढऱ्या रंगाच्या वस्त्राला पांढरें म्हणतात, काळ्या रंगाच्या वस्त्राला काळें असें म्हणतात आणि जें वस्त्र पांढऱ्या आणि काळ्या अशा दोन्ही रंगांचें आहे त्याला पांढरा किंवा काळा असें न म्हणता 'कल्माष' किंवा 'सारंग' असें तिसरेंच नांव देतात. याप्रमाणें येथें देखील जो एकट्या उदात्त धर्मानें युक्त अच् असेल त्याला उदात्त असें म्हणावें. जो एकट्या अनुदात्त धर्मानें युक्त असेल त्याला अनुदात्त म्हणावें आणि जो उदात्त व अनुदात्त या दोन्ही धर्मांनें युक्त त्या अचाला उदात्त किंवा अनुदात्त असें न म्हणतां त्याला स्वरित असें म्हणजे त्याला तिसरेंच नांव द्यावें.

(सू. ३२) स्वरितामध्यें ह्रस्वाचा पहिला अर्धा भाग तो उदात्त होय' असें येथें सांगितलें आहे असें दिसतें. तेव्हां ज्या ठिकाणीं दीर्घ किंवा प्लुत स्वरित असेल त्या ठिकाणीं 'त्याचा पहिला अर्धा भाग उदात्त आहे' असें समजलें जाणार नाहीं; उदा० कन्या, शक्तिके३ शक्तिके.

हा दोष येत नाहीं. कारण सूत्रामध्यें 'अर्धह्रस्व' या शब्दाच्या पुढें 'मात्रच्' असा प्रत्यय लावून त्याचा लोप करून 'अर्धह्रस्व' असें म्हटलें आहे. म्हणजे 'अर्ध्या ह्रस्वाइतका भाग' असा 'अर्धह्रस्व' या शब्दाचा अर्थ समजावा. मग तो दीर्घापैकीं असो अथवा प्लुतापैकीं असो. सर्व ठिकाणीं स्वरितापैकीं पहिला अर्धमात्रेचा भाग उदात्त समजावा.

हें प्रकृतसूत्र कशाकरितां केलें आहे ?

अशाकरितां केलें आहे की, या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त हे दोन गुण मिश्रित झाल्यासारखे दिसतात. तेव्हां, जसें दूध आणि पाणी मिसळलें असतां तेथें 'केवढा भाग दुधाचा आहे व केवढा भाग पाण्याचा आहे'

---

१. स्वरित नांवाच्या स्वरांतील पहिला अर्धा मात्रेयेवढा भाग उदात्त समजावा, आणि बाकी उरलेला भाग (म्हणजे ह्रस्व स्वरितामध्यें पुढील अर्धी मात्रा, दीर्घ स्वरितापेक्षां दीड मात्रा, आणि प्लुत स्वरितामध्यें अडीच मात्रा) अर्थात् अनुदात्त समजावा.

२. 'तिल्यशिक्यकाश्मर्यधान्यकन्या०' (फि. सू. ४।८) यानें कन्याशब्दांतील दीर्घ स्वरित केला आहे. शक्तिके३ शक्तिके येथें 'वाक्यादेरामन्त्रित०' (८।१।८) यानें द्वित्व, 'स्वरितमाम्रेडिते' (८।२।१०३) यानें एकाराला प्लुत स्वरित केला आहे. येथें क्रमानें दीर्घ स्वरित व प्लुत स्वरित आहे. येथें पहिला भाग उदात्त आहे असें समजतां येत नाहीं. कारण स्वरितामध्यें ह्रस्वापैकीं पहिला अर्धा भाग उदात्त असें येथें म्हटलें आहे. आणि कन्या व शक्तिके येथें तर दीर्घ व प्लुत आहे. तेव्हां प्रकृतसूत्र वरील उदाहरणांना लागू होत नाहीं.

३. 'प्रमाणे द्वयसच्' (५।२।३७) ह्या सूत्रानें परिमाणार्थी मात्रच्. त्याचा 'प्रमाणे लः' (५।२।३७ भा. वा.) यानें लोप झाला आहे.

तद्यथा । क्षीरोदके संपृक्त आमिश्रीभूतत्वान्न ज्ञायते कियत्क्षीरं कियदुदकं कस्मिन्नवकाशे क्षीरं कस्मिन्नवकाश उदकमिति । एवमिहाप्यामिश्रीभूतत्वान्न ज्ञायते कियदुदात्तं कियदनुदात्तं कस्मिन्नवकाश उदात्तं कस्मिन्नवकाशेऽनुदात्तमिति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्ट इयदुदात्तमियदनुदात्तमस्मिन्नवकाश उदात्तमस्मिन्नवकाशेऽनुदात्तमिति ॥ यद्ययमेवं सुहृत्किमन्यान्यप्येवंजातीयकानि नोपदिशति । कानि पुनस्तानि । स्थानकरणानुप्रदानानि । व्याकरणं नामेयमुत्तरा विद्या । सोऽसौ छन्दःशास्त्रेष्वभिविनीत उपलब्ध्यावगन्तुमुत्सहते । यद्येवं नार्थोऽनेन । इदमप्युपलब्ध्या गमिष्यति ॥ संज्ञाकरणं तर्हीदम् । तस्य स्वरितस्यादितोऽर्धह्रस्व उदात्तसंज्ञमिति । किं कृतं भवति । त्रिरुदात्तप्रदेशेषु स्वरितग्रहणं न कर्तव्यं भवति । उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः [१.२.४०] उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य [८.२.४] नो-

तें सांगतां येत नाहीं, तसेंच 'त्यामध्यें अमक्या बाजूला दूध आहे आणि अमक्या बाजूला पाणी आहे' असेंही सांगतां येत नाहीं; त्याप्रमाणें येथेंही स्वरित अचामध्यें उदात्त आणि अनुदात्त या दोन गुणांचें मिश्रण झालें म्हणजे त्यांपैकीं 'केवढा भाग उदात्त गुणाचा आहे आणि केवढा भाग अनुदात्त गुणाचा आहे' तें समजणार नाहीं. तसेंच 'कोणता भाग उदात्त गुणाचा आहे व कोणता भाग अनुदात्त गुणाचा आहे' तेंहीं समजणार नाहीं. तेव्हां हा लोकांना होत असलेला मोह दूर करावा अशा सद्बुद्धीनें आणि मित्रत्वाच्या नात्यानें आचार्य पाणिनि येथें असें सांगत आहेत की 'स्वरितापैकीं अर्ध्या मात्रेइतका भाग उदात्त आहे आणि बाकीचा सर्व भाग अनुदात्त आहे. तसेंच उदात्त हा भाग प्रथम आहे आणि त्याच्या नंतर अनुदात्त भाग आहे.

जर येथें स्वरिताविषयीं आचार्य पाणिनि मित्रत्वाच्या नात्यानें वस्तुस्थिति काय आहे ती दाखवीत आहेत तर अशा प्रकारची इतर ठिकाणीं वस्तुस्थिति कां दाखवीत नाहींत ?

पाणिनीनें आणखी काय काय दाखवावें असें तुम्हांला वाटतें बरें ? तालु वगैरे वर्णांचीं स्थानें, स्पृष्ट वगैरे वर्णांचे आभ्यन्तरप्रयत्न आणि विवार, संवार वगैरे वर्णांचे बाह्य प्रयत्न यांच्या संबंधानें देखील पाणिनीनें माहिती दिली पाहिजे.

व्याकरण म्हणून ज्याला म्हणतात ती विद्या प्रथमतः शिकण्याची नव्हे. हिला 'उत्तरविद्या' असें म्हणतात. तेव्हां अर्थातच व्याकरण शिकण्याच्या पूर्वीं छन्दःशास्त्रामध्यें ज्यानें अभ्यास केला आहे त्याची 'कोणत्या वर्णाचें कोणतें स्थान व कोणत्या वर्णाचा कोणता आभ्यन्तरप्रयत्न' हे सर्व अनुभवावरून ओळखतां यावें अशी प्रवृत्ति असते.

पण असेंच जर आहे तर हें प्रकृत सूत्रही करावयास नको. कारण ही स्वरितस्वरासंबंधाची माहिती देखील छन्दःशास्त्राच्या शिक्षणानें त्याला अनुभवावरून आपोआप मिळेल.

तर मग 'हें संज्ञासूत्र आहे' असें आपण समजूं. म्हणजे त्या स्वरितापैकीं आरंभींच्या अर्धमात्रिक भागाला 'उदात्त' अशी संज्ञा होते.

ही संज्ञा करण्यांत फायदा काय ?

फायदा असा की, 'उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः' (१।२।४०), 'उदात्तस्वरितयोः०' (८।२।४), 'नोदात्तस्वरितोदयम्०' (८।४।६७) या तीन सूत्रांमध्यें 'उदात्त'शब्द घालून त्याच्याबरोबर जो 'स्वरित' असा शब्द घातला आहे तो घालावयास नको. (कारण स्वरितापैकीं आरंभींच्या अर्धमात्रिक भागाला प्रकृतसूत्रानें 'उदात्त' अशी संज्ञा केली असल्यामुळें एकट्या

४. वेदशिक्षा, प्रतिशाख्य, वगैरेंमध्यें.

दात्तस्वरितोदयम् [८.४.६७] इति ॥ संज्ञाकरणं हि नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । लघीयश्च त्रिरुदात्तप्रदेशेषु स्वरितग्रहणं न पुनः संज्ञाकरणम् । त्रिरुदात्तप्रदेशेषु स्वरितग्रहणे नवाक्षराणि संज्ञाकरणे पुनरेकादश ॥ एवं तर्ह्युभयमनेन क्रियतेऽन्वाख्यानं च संज्ञा च । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । अन्वर्थग्रहणं विज्ञास्यते । तस्य स्वरितस्यादितोऽर्धह्रस्वमुदात्तसंज्ञं भवतीति । ऊर्ध्वमात्तमिति चात उदात्तम् ॥ यदि तर्हि संज्ञाकरणमुदात्तादेर्यदुच्यते तत्स्वरितादेरपि प्राप्नोति । अन्वाख्यानमेव तर्हीदं मन्दबुद्धेः ॥

**स्वरितस्यार्धह्रस्वोदात्तादोदात्तस्वरितपरस्य सन्नतरादूर्ध्वमुदात्तादनुदात्तस्य स्वरितात्कार्यं स्वरितादिति**

'उदात्त'शब्दानेंच सर्व कामें भागणार आहे.)[5]

हा देखील प्रकृत सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण कोणतीही संज्ञा करणें म्हणजे ती अशी पाहिजे की, तिच्यापेक्षां दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें अधिक थोडक्यांत बोलतां येणार नाहीं.

असें कशावरून ?

'संज्ञाशास्त्र' हें लाघवाकरितांच केलें जात आहे म्हणून. आणि प्रकृत विषयामध्यें पाहावें तर वर दाखविलेल्या तीन सूत्रांमध्यें उदात्तशब्दाच्या जवळ स्वरितशब्द घातला तरी त्यांतच लाघव होत आहे. प्रकृतसूत्रानें उदात्तसंज्ञा करण्यांत त्याच्यापेक्षां कांहीं लाघव होत नाहीं. असें पाहा की, तीन सूत्रांमध्यें उदात्तशब्दाच्या जवळ तीन अक्षरांचा स्वरित असा शब्द उच्चारला असतां एकंदर नऊ अक्षरें होतील. आणि प्रकृत संज्ञासूत्र केलें तर हें अकरा अक्षरांचें सूत्र करावें लागतें. एकंदरींत येथें संज्ञा केली आहे असें दिसत नाहीं.

तर मग प्रकृतशास्त्रानें दोन्ही गोष्टी केल्या आहेत असें आम्ही समजूं. म्हणजे स्वरितासंबंधानें माहितीही दिली आहे अणि स्वरितांतील आरंभींच्या अर्धमात्रिक भागाला उदात्त अशी संज्ञाही केली आहे.

पण एकदां एक सूत्र उच्चारण्यांत या दोन गोष्टी कशा साधतील ?

एकदां उच्चारण्यानेंसुद्धां दोन गोष्टी साधतां येतील असें म्हणतां येतें.

तें कसें ?

उदात्त हें 'अन्वर्थनाम' आहे म्हणून. उदात्त हा शब्द अन्वर्थ घेतला म्हणजे दोन्ही गोष्टी साधतात. त्या अशा की, त्या स्वरिताच्या आरंभींच्या अर्धमात्रिक भागाला उदात्त ही संज्ञा होते आणि ती संज्ञा ज्याला होते तो भाग कसा असावा तें उदात्त या संज्ञेवरूनच समजतें. उदात्त या शब्दामध्यें 'उत्' आणि 'आत्त' अशीं दोन पदें आहेत. 'उत् म्हणजे ऊर्ध्वभागामध्यें आत्त म्हणजे उच्चारित' असा उदात्तशब्दाचा अर्थ होय.

पण अशा रीतीनें जर हें संज्ञासूत्रही आहे असें समजलें तर ज्या शब्दाच्या आरंभीं उदात्त आहे त्याला सांगितलेलें कार्य स्वरित आरंभीं असलेल्या शब्दाला देखील होऊं लागेल.

तर मग येथें आतां असें समजावें की, हें संज्ञासूत्र तर नव्हेच. फक्त स्वरितासंबंधानें या सूत्रानें माहिती दिली आहे. ती माहिती देखील बुद्धिमान् मनुष्याला छन्दःशास्त्राच्या अवलोकनानें होण्यासारखी आहे. फक्त हें सूत्र 'मन्दबुद्धीच्या मनुष्याला सुलभ रीतीनें स्वरिताचें स्वरूप कळावें' अशा अभिप्रायात आचार्य पाणिनीनें केलें आहे.

(वा.१) 'तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम्' (१।२।३२) या सूत्रापासून 'उदात्तस्वरितपरस्य सन्न-

५. उदात्तशब्दानें स्वतंत्र उदात्ताप्रमाणें स्वरितांतील आद्यभाग जो उदात्त त्याचेंही ग्रहण होईल.

## सिद्ध्यर्थम् ॥ १ ॥

स्वरितस्यार्धह्रस्वोदात्तादा उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः [ १.२.४० ] इत्येतस्मात्सूत्रादिदं सूत्रकाण्डमूर्ध्वमुदात्तादनुदात्तस्य स्वरितः [ ८.४.६६ ] इत्यतः कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्वरितादिति सिद्ध्यर्थम् । स्वरितादिति सिद्धिर्यथा स्यात् । स्वरितात्संहितायामनुदात्तानाम् । [१.२.३९] इति । इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि । क्व तर्हि स्यात् । यः सिद्धः स्वरितः । कार्यं देवदत्तयज्ञदत्तौ ॥

## स्वरितोदात्तार्थं च ॥ २ ॥

स्वरितोदात्तार्थं च तत्रैव कर्तव्यम् । न सुब्रह्मण्यायां स्वरितस्य तूदात्तः [१.२.३७] । इन्द्र आगच्छ । क्व तर्हि स्यात् । यः सिद्धः स्वरितः । सुब्रह्मण्योमिन्द्र आगच्छ ॥

---

तरः' (१।२।४०) या सूत्रापर्यंतचीं हीं नऊ सूत्रें येथून काढून त्रिपादीमध्यें 'उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' (८।४।६६) या सूत्राच्या पुढें (म्हणजे त्याच्या पुढील 'नोदात्त' (८।४।६७) या निषेधसूत्राच्या पुढें) घालावींत.

ही नऊ सूत्रें तेथें घालण्याचा उपयोग काय ?

उपयोग असा की, 'स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्' (१।२।३९) या सूत्रानें स्वरिताच्या पुढील अनुदात्तांना सांगितलेली जी एकश्रुति ती 'इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि,' या उदाहरणामध्यें मे याच्या पुढील सर्व अनुदात्तांना झाली पाहिजे. (येथें मे यांतील एकार हा 'उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' (८।४।६६) या त्रिपादींतील शास्त्रानें स्वरित झालेला आहे).

पण मे यांतील एकार स्वरित असिद्ध असल्यामुळें जर त्याच्यापुढील अनुदात्तांना 'स्वरितात्संहितायाम्' या शास्त्रानें एकश्रुति होणार नाहीं तर ती होईल तरी कोठें ?

सपादीमधील शास्त्रानें ज्या ठिकाणीं स्वरित होतो त्या ठिकाणीं त्या स्वरिताच्या पुढील अनुदात्तांना 'स्वरितात्संहितायाम्' या शास्त्रानें एकश्रुति होईल; उदा०– कार्यं देवदत्तयज्ञदत्तौ. (या वाक्यामध्यें कार्यं हा यप्रत्ययांतील अकार 'तित्स्वरितम्' (६।१।१८५) या सपादींतील शास्त्रानें स्वरित झालेला आहे).

(वा.२) स्वरिताला उदात्त झाला पाहिजे हाही हीं नऊ सूत्रें त्रिपादीमध्यें नेण्याचा उपयोग आहे. नाहीं तर 'न सुब्रह्मण्यायां स्वरितस्य तूदात्तः' (१।२।३७) या सूत्रानें स्वरिताला जो सांगितलेला उदात्त तो 'इन्द्र आगच्छ' या उदाहरणांमध्यें होणार नाहीं. (कारण इन्द्र या शब्दातील इकाराला 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९८) यानें आद्युदात्त केल्यानंतर त्याच्यापुढील अकाराला 'उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' (८।४।६६) या त्रिपादीमधील शास्त्रानें स्वरित झाला आहे तो असिद्ध आहे.)

तर मग 'न सुब्रह्मण्यायां स्वरितस्य तूदात्तः' या शास्त्रानें सांगितलेला उदात्त होईल तरी कोठें ?

ज्या उदाहरणामध्यें सपादीमधील शास्त्रानें स्वरित झाला आहे तेथें अर्थातच तो स्वरित सिद्ध असल्यामुळें तेथें उदात्त होईल; उदा० सुब्रह्मण्योमिन्द्र आगच्छ (येथें सुब्रह्मण्य यांतील शेवटचा अकार 'तित्स्वरितम्' (६।१।१८५) या शास्त्रानें स्वरित झालेला आहे. नंतर त्या अकाराचा पुढील टाप्प्रत्ययाबरोबर झालेला दीर्घ एकादेश स्थानीसारखा स्वरित झालेला आहे. त्याही आकाराचा पुढील ओम्शब्दामधील ओकाराबरोबर 'ओमाङोश्च' (६।१।९५) या शास्त्रानें एकादेश म्हणून झालेला जो ओकार तोही स्थानीसारखा स्वरितच झालेला आहे. तेव्हां अर्थातच तो स्वरित सिद्ध आहे.)

(वा.३) हा जो 'न सुब्रह्मण्यायाम्' या शा-

**स्वरितोदात्ताच्चास्वरितार्थम् ॥ ३ ॥**

स्वरितोदात्ताच्चास्वरितार्थं तत्रैव कर्तव्यम् । इन्द्र आगच्छ । हरिव आगच्छ ॥

**स्वरितपरसन्नतरार्थं च ॥ ४ ॥**

स्वरितपरसन्नतरार्थं च तत्रैव कर्तव्यम् । उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः [१. २.४०] । माणवक जटिलकाध्यापक न्यङ् । क तर्हि स्यात् । यः सिद्धः स्वरितः । माणवक जटिलकाभिरूपक क्व ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**देवब्रह्मणोरनुदात्तवचनं ज्ञापकं स्वरितादिति सिद्धत्वस्य ॥ ५ ॥**

देवब्रह्मणोरनुदात्तवचनं ज्ञापकं सिद्ध इह

---

स्त्रानें स्वरिताला झालेला उदात्त त्याच्यापुढील अनुदात्ताला 'उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' (८।४।६६) या शास्त्रानें स्वरित होऊं नये अशाकरितांही हीं नऊ सूत्रें त्याच्यापुढें घातलीं पाहिजेत; उदा० इन्द्र आगच्छ, हरिव आगच्छ, (येथें आगच्छ यामधील गम्‌धातूच्या स्वरित अकाराला 'न सुब्रह्मण्यायाम्' या शास्त्रानें उदात्त झालेला आहे, तो असिद्ध असल्यामुळें त्याच्यापुढील छ यांतील अकाराला 'उदात्तादनुदात्तस्य०' (८।४।६६) या शास्त्रानें स्वरित[६] होत नाहीं.)

(वा.४) त्रिपादीमधील शास्त्रानें झालेला स्वरित ज्याच्यापुढें आहे अशा अनुदात्ताला 'उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः' (१।२।४०) या शास्त्रानें अनुदात्ततर झाला पाहिजे याकरितां हीं नऊ सूत्रें तेथें नेलीं पाहिजेत; उदा. माणवक जटिलक अध्यापक न्यङ्. (नाहीं तर येथें न्यङ्[७] यांतील अकार 'उदात्तस्वरितयोः०' (८।२।४) या त्रिपादीमधील शास्त्रानें स्वरित झालेला असल्यामुळें त्याच्यामागील अकाराला अनुदात्ततर होणार नाहीं.)

तर मग हा जो स्वरिताच्या मागील अनुदात्ताला अनुदात्ततर आदेश सांगितला आहे हा होईल तरी कोठें ?

सपादीमधील शास्त्रानें जेथें स्वरित होतो तेथें त्याच्यामागील अनुदात्ताला अनुदात्ततर होईल; उदा०— माणवक जटिलकाभिरूपक क्व. (येथें क्व यामध्यें अत्प्रत्ययाच्या अकाराला 'तित्स्वरितम्' (६।१।१८५) या शास्त्रानें स्वरित झालेला आहे.)

तर मग प्रकृतसूत्राला आरंभ करून हीं नऊ सूत्रें पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्रिपादीमध्यें घातलीं पाहिजेत.

तेथें घालावयास नकोत. कारण देव आणि ब्रह्मन् या शब्दांमध्यें 'व' आणि 'ह्म' यांतील अकाराला जो 'उदात्तादनु०' (८।४।६६) या त्रिपादीमधील शास्त्रानें स्वरित झाला आहे त्या स्वरिताला 'देवब्रह्मणोरनुदात्तः' (१।२।३८) या सूत्रानें अनुदात्त सांगितला आहे. त्यावरूनच 'ह्या प्रकरणाच्या दृष्टीनें स्वरित सिद्ध आहे' असें ज्ञापन करतां येईल.

(वा.५) असें ज्ञापन केलें तर स्वरिताला 'सुब्रह्मण्यायाम्' (१।२।३७) या शास्त्रानें जो उदात्त होतो त्याच्यापुढील अनुदात्ताला

---

६. ही प्रकृतनवसूत्री मूळ जाग्यावरून हालवून 'उदात्तादनुदा०' (८।४।६६) या सूत्राच्यापुढें घातल्यामुळें 'उदात्तादनुदात्तस्य०' या सूत्राच्या दृष्टीनें 'न सुब्रह्मण्यायाम्' या सूत्रानें केलेला उदात्त असिद्ध असल्यामुळें गच्छ येथें छकाराच्या पुढील अकार अनुदात्तच कायम राहतो, त्याला स्वरित होत नाहीं.

७. 'न्यधी च' (६।२।५३) या सूत्रानें नि-शब्दांतील इकार उदात्तच कायम राहिल्यानें त्या इकाराला यण् आदेश केल्यानंतर त्या यणाच्या पुढील अनुदात्त अकार.

८. देवा ब्रह्माणः या दोन्ही शब्दांमध्यें 'आमन्त्रितस्य' (६।१) या सूत्रानें आद्युदात्त झाल्यामुळें त्याच्यापुढील अचाला 'अनुदात्तं पद०' (६।१।१५८) या सूत्रानें अनुदात्त होतो. त्याला स्वरित (८।४।६६) झाल्यानंतर त्या स्वरिताला 'न सुब्रह्मण्यायाम्' या सूत्रानें उदात्त प्राप्त झाला असतां 'देवब्रह्मणोः' या सूत्रानें अनुदात्त सांगितला आहे.

स्वरित इति ॥ यद्येतज्ज्ञाप्यते स्वरितोदात्तात्परस्यानुदात्तस्य स्वरितत्वं प्राप्नोति। न ब्रूमो देवब्रह्मणोरनुदात्तवचनं ज्ञापकं सिद्ध इह स्वरित इति । किं तर्हि । परमेतत्काण्डमिति ॥

**एकश्रुति दूरात्संबुद्धौ ॥१.२.३३॥**

किमिदं पारिभाषिक्याः संबुद्धेर्ग्रहणमेकवचनं संबुद्धिः [२.३.४९]। आहोस्विदन्वर्थग्रहणं संबोधनं संबुद्धिरिति । किं चातः । यदि पारिभाषिक्या देवा ब्रह्माणः अत्र न प्राप्नोति । अथान्वर्थग्रहणं न दोषः। यथा न दोषस्तथास्तु ॥

किं पुनरियमेकश्रुतिरुदात्ताहोस्विदनुदात्ता । नोदात्ता । कथं ज्ञायते । यदयमुच्चैस्तरां वा वषट्कारः [१.२.३५] इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् । अतन्त्रं

---

'उदात्तादनुदात्तस्य' (८।४।६६) या शास्त्रानें स्वरित होऊं लागेल हा दोष कायम राहतो.

देव आणि ब्रह्मन् या शब्दांतील स्वरिताला जो अनुदात्त सांगितला आहे त्यावरून 'ह्या प्रकरणाच्या दृष्टीनें स्वरित सिद्ध आहे' असें आम्हीं ज्ञापन करीत नाहीं.

तर मग तें ज्ञापन कसें करावयाचें?

तें ज्ञापन इतकेंच समजावें की, 'तस्यादितः' (१।२।३२) या प्रकृत सूत्राला आरंभ करून हीं नऊ सूत्रें जरी पाणिनीनें या ठिकाणीं घातलीं आहेत तरी तीं नऊ सूत्रें त्रिपादीमध्यें पूर्वीं सांगितल्या ठिकाणीं आहेत.

(सू.३३)या सूत्रामध्यें 'संबुद्धौ' असें जें म्हटलें आहे तेथें 'संबुद्धि' या शब्दाचा अर्थ कोणता समजावा?

'एकवचनं संबुद्धिः' (२।३।४९) या शास्त्रानें जें फक्त एकवचनाला संबुद्धि असें नांव दिलेलें आहे तें येथें घ्यावें किंवा संबुद्धि हा शब्द अन्वर्थ घ्यावा म्हणजे संबोधनाला संबुद्धि म्हणावें. मग तें वचन कोणतेंही असो.

यांत काय बरें फरक आहे ?

फरक असा की पाणिनीनें ठरविलेल्या संबुद्धीचें म्हणजे फक्त एकवचनाचें येथें ग्रहण केलें तर 'देवाः' 'ब्रह्माणः' या बहुवचनान्त संबोधनांना प्रकृतसूत्रानें एकश्रुति होणार नाहीं; आणि जर 'संबुद्धि' हा शब्द अन्वर्थ घेतला तर तेथें एकश्रुति करितां येईल. दोष राहणार नाहीं.

असें जर असेल तर मग ज्या रीतीनें दोष न राहील तसें घ्यावें म्हणजे झालें.

आतां प्रकृतसूत्रानें सांगितलेली जी ही एकश्रुति म्हणजे एक तऱ्हेचें उच्चारण करणें तें उदात्त म्हणजे वस्तुतः त्या त्या स्थानांच्या ऊर्ध्वभागीं करावयाचें किंवा अनुदात्त म्हणजे अधोभागीं करावयाचें?

एकश्रुति केली असतांना जें उच्चारण करावयाचें तें उदात्त म्हणजे ऊर्ध्वभागीं करावयाचें नाहीं.

असें कशावरून समजावें ?

अशावरून समजावें की, हा आचार्य पाणिनि एकश्रुति केली असतांना त्यामधील 'वषट्' हा शब्द ऊर्ध्वभागीं उच्चारावा असें म्हणतो.

हें ज्ञापक कसें बरें समजतें ?

असें समजतें कीं, 'उच्चैस्तरां वा वषट्कारः' (१।२।३५) या सूत्रामध्यें 'उच्चैः' या शब्दाच्या पुढें जो 'तरप्'प्रत्यय लावलेला आहे त्याच्या अर्थाची म्हणजे अतिशय या अर्थाची विवक्षा आहे असें समजू नये. 'उच्चैः' याचा जो अर्थ तितकाच 'उच्चैस्तराम्' याचा अर्थ होय.

---

आतां जर या नवसूत्रीच्या दृष्टीनें स्वरित असिद्ध आहे तर अनुदात्ताला अनुदात्ताचें विधान करणें निरर्थक होतें. यावरून नवसूत्रीच्या दृष्टीनें स्वरिताला सिद्धत्व आहे असें अनुमान निघतें.

१. दुरूनच कांहीं एक गोष्ट कळविण्यास योजलेलें जें वाक्य त्या वाक्यामध्यें एकश्रुति करावी. म्हणजे तेथें उदात्त, अनुदात्त व स्वरित हे कांहींही भासत नाहींत. लोकांमध्यें आपण जें बोलतों तें एकश्रुतीनेंच बोलतों.

तरनिर्देशः । यावदुच्चैस्तावदुच्चैस्तरामिति ॥ यदि तर्हि नोदात्तानुदात्ता । अनुदात्ता च न । कथं ज्ञायते । यदयमुदात्तस्वरितपरस्य सन्नतरः [ १-२-४० ] इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् । अतन्त्रं तरनिर्देशः । यावत्सन्नस्तावत्सन्नतर इति ॥ सैषा ज्ञापकाभ्यामुदात्तानुदात्तयोर्मध्यमेकश्रुतिरन्तरालं ह्रियते ॥

अपर आह । किमियमेकश्रुतिरुदात्तोतानुदात्ता । उदात्ता । कथं ज्ञायते । यदयमुच्चैस्तरां वा वषट्कार इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् । तन्त्रं तरनिर्देशः । उच्चैर्दृष्टोच्चैस्तरामित्येतद्भवति ॥ यदि तर्ह्युदात्ता । नानुदात्ता । अनुदात्ता च । कथं ज्ञायते । यदयमुदात्तस्वरितपरस्य सन्नतर इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् ।

---

(तेव्हां एकश्रुति केली असतां तेथें जर उदात्त म्हणजे ऊर्ध्वभागामध्यें उच्चारण आपोआपच होत असेल तर वषट् या शब्दाला पुनः तसें सांगणें निरर्थक होईल.)

तर मग एकश्रुतीमधील उच्चारण अनुदात्त म्हणजे अधोभागीं करावयाचें कीं काय ?

एकश्रुतीमधील उच्चारण अनुदात्त आहे, असेंही गृहीत धरतां येत नाहीं.

असें कशावरून समजतें ?

अशावरून समजतें की, हा आचार्य पाणिनि 'उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः' (१।२।४०) असें म्हणतो म्हणजे एकश्रुतीमधील शेवटचा वर्ण 'ज्याच्यापुढें उदात्त किंवा स्वरित आहे' असा असेल त्याला अनुदात्त होतो असें सांगतो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की, 'सन्नतर' या ठिकाणीं 'सन्न'शब्दाच्या पुढें जो तरप्प्रत्यय उच्चारला आहे त्याच्या अर्थाची म्हणजे अतिशय या अर्थाची येथें विवक्षा नाहीं. 'सन्न' म्हणजे अनुदात्त. तोच 'सन्नतर' होय. (तेव्हां एकश्रुतीमध्यें कांहीं ठिकाणीं जो हा पाणिनि उदात्त करावा म्हणून सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, एकश्रुतीमधील उच्चारण अनुदात्त नाहीं.) तेव्हां या वरील दोन ज्ञापकांवरून एकश्रुतीमधील उच्चारण हें ऊर्ध्वभाग आणि अधोभाग या दोन्ही भागांतून दूर केलेलें तें त्या दोहोंच्या दरम्यान कायम होतें. (तात्पर्य, एकश्रुति म्हणजे उदात्त आणि अनुदात्त या दोहोंमधील संधिभाग होय.)

येथें कांहीं लोकांची विचारसरणी अशी आहे— हें जें एकश्रुतीमधील उच्चारण तें उदात्त समजावें किंवा अनुदात्त समजावें ?

एकश्रुतीमधील उच्चारण उदात्त समजावें.

असें कशावरून समजतें ?

अशावरून समजतें की हा आचार्य पाणिनि एकश्रुतीमधील 'वषट्' शब्दाचें उच्चारण अतिशय ऊर्ध्वभागीं करावें असें म्हणतो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की 'उच्चैस्तराम्' या पदामध्यें जो 'उच्चैः' या शब्दाच्या पुढें 'तरप्' प्रत्यय लावलेला आहे त्याचा अर्थ विवक्षित आहे. म्हणजे 'अतिशय ऊर्ध्वभागीं केलेलें उच्चारण' असा 'उच्चैस्तराम्' याचा अर्थ होय. आतां जेथें सामान्यतः ऊर्ध्वभागीं उच्चारण प्राप्त होतें तेथेंच त्याला तें उच्चारण अतिशय ऊर्ध्वभागीं करावें असें म्हणतां येतें. एकंदरींत एकश्रुतीमधील उच्चारण उदात्त आहे असें सिद्ध होतें.

अशा रीतीनें जर हें एकश्रुतीमधील उच्चारण उदात्त गृहीत धरावें तर तें अनुदात्त नाहीं असें म्हणावें लागेल.

एकश्रुतीमधील उच्चारण अनुदात्तही आहे, म्हणजे अधोभागींही करावयाचें आहे.

असें कशावरून समजतें ?

अशावरून समजतें की, आचार्य पाणिनि 'उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः' (१।२।४०) असें म्हणतो. म्हणजे एकश्रुतीमधील कांहीं वर्णांचें उच्चारण अतिशय अनुदात्त करावें असें

तन्त्रं तरनिर्देशः । सन्नं दृष्ट्वा सन्नतर इत्येतद्भवति ॥ त एते तन्त्रे तरनिर्देशे सप्त स्वरा भवन्ति । उदात्तः । उदात्ततरः । अनुदात्तः । अनुदात्ततरः । स्वरितः । स्वरिते य उदात्तः सोऽन्येन विशिष्टः । एकश्रुतिः सप्तमः ॥

**[यज्ञकर्मण्यजपन्यूङ्खसामसु ॥१.२.३४]**

**[उच्चैस्तरां वा वषट्कारः ॥१.२.३५]**

**[विभाषा छन्दसि ॥१.२.३६]**

**न सुब्रह्मण्यायां स्वरितस्य तूदात्तः ॥ १।२।३७ ॥**

**सुब्रह्मण्यायामोकार उदात्तः ॥ १ ॥**

सुब्रह्मण्यायामोकार उदात्तो भवति । सुब्रह्मण्योम् ॥

**आकार आख्याते परादिश्च ॥ २ ॥**

आकार आख्याते परादिश्चोदात्तो भवति । इन्द्र आगच्छ । हरिव आगच्छ ॥

**वाक्यादौ च द्वे द्वे ॥ ३ ॥**

वाक्यादौ च द्वे द्वे उदात्ते भवतः । इन्द्र आगच्छ । हरिव आगच्छ ॥

**मघवन्वर्जम् ॥ ४ ॥**

आगच्छ मघवन् ॥

---

सांगतो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें?

असें जमतें की, 'सन्नतरः' या पदामध्यें 'सन्न' या शब्दाच्या पुढें जो 'तरप्'प्रत्यय उच्चारला आहे तो विवक्षित आहे, म्हणजे अतिशय अनुदात्त असा त्याचा अर्थ आहे. आतां जेथें अनुदात्त उच्चारण प्राप्त होत असेल तेथेंच तें उच्चारण अतिशय अनुदात्त करावें असें म्हणतां येतें.

एकंदरींत 'उच्चैस्तराम्' आणि 'सन्नतरः' या दोन ठिकाणीं पाणिनीनें उच्चारलेल्या तरप्-प्रत्ययाच्या अर्थाकडे लक्ष दिलें असतां एकंदर सात स्वर होतात. ते असे— १ उदात्त, २ उदात्ततर म्ह. अतिशय उदात्त, ३ अनुदात्त, ४ अनुदात्ततर म्ह. अतिशय अनुदात्त, ५ स्वरित, ६ स्वरितामधील उदात्त तो अन्यानें म्ह. अनुदात्तानें युक्त, आणि ७ एकश्रुति.

(सू.३७ वा.१) सुब्रह्मण्याशब्दाला आरंभ करून उच्चारलेल्या वेदवाक्यामध्यें सुब्रह्मण्योम् या ठिकाणीं प्रकृतसूत्रानें स्वरित ओकाराला उदात्त झालेला आहे.

(वा.२)'इन्द्र आगच्छ,' 'हरिव आगच्छ' या उदाहरणांमध्यें गच्छ या क्रियापदाच्या मागील आ हा उपसर्ग उदात्त आहे. त्याच्या-पुढील गच्छ यामधील जो पहिला स्वरित अकार त्यालाही प्रकृतसूत्रानें उदात्त झालेला आहे.

(वा.३) 'इन्द्र आगच्छ', 'हरिव आगच्छ या दोन वाक्यांमध्यें आरंभींचे जे इन्द्र आणि हरिवन् हे दोन शब्द त्यांमधील पहिला स्वर उदात्त आहेच. त्याच्यापुढील दुसऱ्या स्वरित-स्वराला प्रकृतसूत्रानें उदात्त झालेला आहे. एकंदरींत 'इन्द्र' हे दोन्ही वर्ण आणि 'हरि' हे दोन्ही वर्ण उदात्त होत आहेत.

(वा.४) 'आगच्छ मघवन्' या उदाहरणा-मध्यें मघवन् या शब्दामध्यें स्वरित नसल्या-

---

१. जप, न्यूङ्ख आणि साम हीं वगळून यज्ञकर्म चालू असतां उपयोगांत आणलेल्या मन्त्रामध्यें एकश्रुति होते; उदा०—अग्निर्मूर्धा दिवः०, जिन्वतो३म्. हा मन्त्र त्रैस्वर्यानें म्हणावयाचा नाहीं. न्यूङ्ख म्हणजे १६ ओंकार; त्यांतील कांहीं उदात्त व कांहीं अनुदात्त आहेत. ते तसेच म्हणावयाचे आहेत.

१. यज्ञकर्म चालू असतां तदङ्गभूत मन्त्रामधील वौषट्शब्दाला एकदां उदात्त होतो आणि एकदां एकश्रुति होते.

१. वेदामध्यें एकश्रुति विकल्पानें होते; अर्थात् एकदां त्रैस्वर्यानें पाठ करावयाचा; उदा०-इषे त्वोर्जे त्वा किंवा इषे त्वोर्जे त्वा.

१. सुब्रह्मण्यानामक निगदमन्त्रामध्यें 'यज्ञकर्मण्य०', 'विभाषा छन्दसि' या सूत्रद्वयानें विहित असलेली एकश्रुति करूं नये; मात्र तेथील स्वरिताला उदात्त होतो; उदा०-सुब्रह्मण्योमिन्द्रागच्छ.

**सुत्यापराणामन्तः ॥ ५ ॥**

सुत्यापराणामन्त उदात्तो भवति ॥ द्व्यहे सुत्याम् । त्र्यहे सुत्याम् ॥

**असावित्यन्तः ॥ ६ ॥**

असावित्यन्त उदात्तो भवति । गार्ग्यो यजते । वात्स्यो यजते ॥

**अमुष्येत्यन्तः ॥ ७ ॥**

अमुष्येत्यन्त उदात्तो भवति । दाक्षेः पिता यजते ॥

**स्यान्तस्योपोत्तमं च ॥ ८ ॥**

स्यान्तस्योपोत्तममुदात्तं भवत्यन्तश्च । गार्ग्यस्य पिता यजते । वात्स्यस्य पिता यजते ॥

**वा नामधेयस्य ॥ ९ ॥**

वा नामधेयस्य स्यान्तस्योपोत्तममुदात्तं भवति । देवदत्तस्य पिता यजते । देवदत्तस्य पिता यजते ॥

**देवब्रह्मणोरनुदात्तः ॥ १.२.३८ ॥**

**देवब्रह्मणोरनुदात्तत्वमेके ॥१॥**

देवब्रह्मणोरनुदात्तत्वमेक इच्छन्ति । देवा ब्रह्माणः । देवा ब्रह्माणः ॥

**स्वरितात्संहितायामनुदात्तानाम् ॥ १.२.३९ ॥**

**स्वरितात्संहितायामनुदात्तानामिति चेद्द्वेचकयोरैकश्रुत्यवचनम् ॥ १ ॥**

स्वरितात्संहितायामनुदात्तानामिति चेद्द्व्येकयोरैकश्रुत्यं वक्तव्यम् । आग्निवेश्यः । पचति । किं पुनः कारणं न

---

मुळें त्याला प्रकृतसूत्रानें उदात्त झालेला नाहीं.

(वा.५) सुत्याशब्दाच्या मागील जे शब्द त्यांचा अन्त्य वर्ण उदात्त आहे; उदा० द्व्यहे सुत्याम्, त्र्यहे सुत्याम्. येथपर्यंतच्या पांच वार्तिकांनीं सुब्रह्मण्या नांवाच्या वेदभागामध्यें वस्तुतः स्वर कसे होतात तें सांगितलें आहे.

(वा.६) सुब्रह्मण्या नांवाच्या वेदभागामध्यें प्रथमान्तपदाचा अन्त्य वर्ण उदात्त होतो; उदा०— गार्ग्यो यजते वात्स्यो यजते.

(वा.७) सुब्रह्मण्या नांवाच्या वेदभागामध्यें षष्ठ्यन्तपदामधील अन्त्य वर्ण उदात्त होतो; दाक्षेः पिता यजते.

(वा.८) सुब्रह्मण्या नांवाच्या वेदभागामध्यें 'स्य' अक्षर अन्तीं असलेल्या पदामध्यें अन्त्य वर्ण आणि त्याच्या पूर्वीचा वर्ण हे दोन्ही उदात्त होतात; उदा०— गार्ग्यस्य पिता यजते, वात्स्यस्य पिता यजते.

(वा.९) 'स्य' अक्षर शेवटीं असलेलें जें नांव त्यामध्यें अन्त्य वर्णाच्या पूर्वीच्या वर्णाला उदात्त विकल्पानें होतो; उदा० देवदत्तस्य पिता यजते, देवदत्तस्य पिता यजते.

(सू.३८, वा.१) सुब्रह्मण्या नांवाच्या वेदभागामध्यें 'देव' आणि 'ब्रह्मन्' या दोन्ही शब्दांमधील स्वरिताला जो प्रकृतसूत्रानें अनुदात्त सांगितला आहे तो कांहीं लोकांच्या मतानें सांगितला आहे असें समजावें; उदा०— देवा ब्रह्माणः, देवा ब्रह्माणः.

(सू.३९, वा.१) संहितेमध्यें स्वरितापुढील बहुत अनुदात्तांना जी ही प्रकृतसूत्रानें एकश्रुति सांगितली आहे ती एकश्रुति स्वरिताच्या पुढें दोन अनुदात्त असले तरी व एक अनुदात्त असला तरी तेथें होते असें म्हणावें; उदा० आग्निवेश्यः, पचति;

दोन किंवा एक अनुदात्त असतांना तेथें प्रकृतसूत्रानें एकश्रुति होणार नाहीं, याचें काय बरें कारण ?

कारण असें की, सूत्रामध्यें 'अनुदात्तानाम्' असा शब्द बहुवचनाचा आम्प्रत्यय

---

१. सुब्रह्मण्या नांवाच्या निगदमन्त्रामध्ये देव आणि ब्रह्मन् या शब्दांतील स्वरिताला अनुदात्त आदेश होतो. उदा० देवा ब्रह्माण आगच्छत.

१. स्वरिताच्या पुढील अनुदात्तांना एकश्रुति होते, संहिताविषय असतां; उदा०—इमं मे गङ्गे यमुने सरस्वति.

सिध्यति। बहुवचनेन निर्देशः क्रियते तेन बहूनामैकश्रुत्यं स्याद्द्व्येकयोर्न स्यात्॥ नैष दोषः। नात्र निर्देशस्तन्त्रम्। कथं पुनस्तेनैव नाम निर्देशः क्रियते तच्चातन्त्रं स्यात्। तत्कारी च भवांस्तद्द्वेषी च। नान्तरीयकत्वादत्र बहुवचनेन निर्देशः क्रियतेऽवश्यं कयाचिद्विभक्त्या केनचिद्वचनेन निर्देशः कर्तव्य इति। तद्यथा। कश्चिदन्नार्थी शालिकलापं सपलालं सतुषमाहरति नान्तरीयकत्वात्। स यावदादेयं तावदादाय तुषपलालान्युत्सृजति। तथा कश्चिन्मांसार्थी मत्स्यान्सकण्टकान्सशकलानाहरति नान्तरीयकत्वात्। स यावदादेयं तावदादाय शकलकण्टकानुत्सृजति। एवमिहापि नान्तरीयकत्वाद्बहुवचनेन निर्देशः क्रियतेऽविशेषेणैकश्रुत्यम् ॥

**अविशेषेणैकश्रुत्यामिति चेद्व्यवहितानामप्रसिद्धिः ॥ २ ॥**

अविशेषेणैकश्रुत्यमिति चेद्व्यवहितानामैकश्रुत्यं न प्राप्नोति। इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि ॥

**अनेकमपीति तु वचनात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अनेकमप्येकमपि स्वरितात्परं संहितायामेकश्रुति भवतीति वक्तव्यम्। सिध्यति। सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्या-

---

लावून सूत्रकारांनीं उच्चारला आहे. त्यामुळें बहुत अनुदात्त म्हणजे निदान तीन तरी असले पाहिजेत. त्या ठिकाणींच एकश्रुति होईल. दोन किंवा एक अनुदात्त असेल त्या ठिकाणीं एकश्रुति होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण सूत्रामध्यें बहुवचनप्रत्यय जरी उच्चारला आहे तरी तो सूत्रकाराला विवक्षित आहे असें समजूं नये.

पण बहुवचनप्रत्यय त्यानेंच उच्चारला आहे, आणि त्यालाच तो विवक्षित नाहीं असें कसें बरें म्हणतां येईल ? कारण आपणच एखादी गोष्ट करावी आणि आपणच तिचा द्वेष करावा हें बरोबर दिसत नाहीं.

पाणिनीनें येथें जें बहुवचन उच्चारलें आहे तें मुद्दाम उच्चारलेले नव्हे. नाइलाजास्तव तें उच्चारलें आहे कारण कोणताही शब्द उच्चारावयाचा म्हणजे त्याला कोणती तरी एक विभक्ति अवश्य लावून व कोणतें तरी एकवचन अवश्य लावूनच उच्चारावा लागतो. तेव्हां जसें लोकांमध्यें अन्नार्थी मनुष्य भात सांठवितो तें सांठवितांना नाइलाजास्तव कोंडा व भूस यांसकटच सांठवीत असतो. परंतु पुढें मात्र तें भात सडून त्यांतील ग्राह्य जेवढा भाग असतो तेवढाच घेऊन बाकीचें कोंडा व भूस हें टाकून देतो. तसेंच मांसार्थी माणूस देखील आरंभीं नाइलाजास्तव कांटे, खवले, यांसुद्धां सबंध मासे आणतो. परंतु मागून त्यांतील ग्राह्य भाग जेवढा असतो तेवढाच घेऊन बाकीचे खवले व कांटे टाकून देतो. त्याप्रमाणें येथें देखील पाणिनीनें नाइलाजास्तव 'अनुदात्तानाम्' असें बहुवचन उच्चारलें आहें. परंतु एकश्रुति करतांना मात्र त्या बहुवचनाकडे लक्ष न देतां सामान्यतः सर्व ठिकाणीं म्हणजे स्वरिताच्या पुढें एक अनुदात्त असो, दोन असोत किंवा कितीही असोत, त्या सर्व ठिकाणीं एकश्रुति होते.

(वा. २) 'सामान्यतः स्वरिताच्या पुढील अनुदात्ताला एकश्रुति होते' असें म्हटलें तर स्वरिताच्या पुढील व्यवहित अशा अनुदात्ताला एकश्रुति होणार नाहीं; उदा०—इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि.

(वा. ३) 'संहितेमध्यें स्वरिताच्या पुढें अनुदात्त एक असो किंवा अनेक असोत त्या सर्वांना एकश्रुति होते' असे सूत्रामध्यें स्पष्ट शब्द घालावेत म्हणजे हें सिद्ध होईल.

अशा रीतीनें स्पष्ट शब्द उच्चारले असतांना उदाहरणें सिद्ध होतील, हें खरें, परंतु सूत्र फिरवावें लागतें ना ?

समेवास्तु । ननु चोक्तं स्वरितात्संहितायामनुदात्तानामिति चेद्‌द्व्येकयोरैकश्रुत्यवचनमविशेषेण व्यवहितानामप्रसिद्धिरिति । नैष दोषः । कथम् । एकशेषनिर्देशोऽयम् । अनुदात्तस्य चानुदात्तयोश्चानुदात्तानां चानुदात्तानामिति ।एवमपि षट्प्रभृतीनामेव प्राप्नोति । षट्प्रभृतिष्वेकशेषः परिसमाप्यते । प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति द्व्येकयोरपि भविष्यति ॥

[[1]उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः ॥ १.२.४० ॥]

[1]अपृक्त एकाल्प्रत्ययः ॥१.२.४१॥

अपृक्तसंज्ञायां हल्ग्रहणं स्वादिलोपे हलोऽग्रहणार्थम् ॥१॥

अपृक्तसंज्ञायां हल्ग्रहणं कर्तव्यम् । एकहल्प्रत्ययोऽपृक्तसंज्ञो भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्वादिलोपे हलोऽग्रहणार्थम् । स्वादिलोपे हलो ग्रहणं न कर्तव्यं भवति । हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल् [६.१.६८] इत्यपृक्तस्येत्येव सिद्धम् ॥ अणिञोर्लुगर्थमल्ग्रहणम् । अणिञोर्लुगर्थमल्ग्रहणं कर्तव्यम् ।

---

तर मग सूत्रकारांनीं मूळचें जसें सूत्र उच्चारलें आहे तसेंच असूं दे.

"पण 'अनुदात्ताम्' असें बहुवचन उच्चारलें असल्यामुळें दोन अनुदात्ताला एकश्रुति होणार नाहीं. व सामान्यतः स्वरिताच्या पुढील अनुदात्ताला एकश्रुति सांगावी तर व्यवहित अनुदात्ताला एकश्रुति होणार नाहीं" असा आतांच दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

तो असा की, सूत्रामध्यें पाणिनीनें 'अनुदात्तानाम्' हें जें पद उच्चारलें आहे तें एकशेष करून उच्चारलें आहे असें समजावें. तेव्हां अर्थातच एक अनुदात्त आणि बहुत अनुदात्त इतक्यांचा संग्रह 'अनुदात्तानाम्' या एका पदामध्यें होतो.

पण असें म्हटलें तर कमींत कमी निदान सहा अनुदात्त असतील तेथेंच त्यांना एकश्रुति होईल.कारण एकशेष केला असतां तेथें अर्थाची पूर्णता कमींत कमी सहामध्यें होणार आहे.

हा दोष येत नाहीं. कारण या वाक्यामध्यें एखादी गोष्ट समुदायाला उद्देशून सांगितली असली तरी तिची पूर्णता त्या समुदायांतील प्रत्येकाच्या ठिकाणीं झालेली लोकांमध्यें दृष्टोत्पत्तीस येते. तेव्हां दोन अनुदात्त असोत किंवा एक अनुदात्त असो, तेथें एकश्रुति होईल.

(सू.४१ वा.१) अपृक्तसंज्ञा सांगणाऱ्या या प्रकृतसूत्रामध्यें 'अल्' असें जें म्हटलें आहे तें न म्हणतां त्याच्या ऐवजीं 'हल्' असें म्हणावें. म्हणजे 'एकहल्रूप जो प्रत्यय त्याला अपृक्तसंज्ञा होते' असें सांगावें.

असें सांगण्याचा उपयोग काय ?

उपयोग असा की, सु वगैरे प्रत्ययांचा लोप सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'हल्' असा शब्द घालावयास नको. म्हणजे प्रकृतसूत्रानें हल्रूपप्रत्ययालाच अपृक्तसंज्ञा केली असतां 'हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल्' (६।१।६८) या सूत्रामध्यें 'हल्' अस म्हणावयास नको. तेथें अपृक्ताचा लोप सांगितला आहे तेवढ्यानेंच काम भागेल.

---

२. एक, दोन आणि तीन मिळून सहा होतात, आणि सहविवक्षा असेल तरच एकशेष होतो.

१. उदात्ताच्या मागील किंवा स्वरिताच्या मागील अनुदात्ताला अनुदात्ततर आदेश होतो; उदा० सरस्वति शुतुद्रि.

१. ज्या प्रत्ययामध्यें एकच वर्ण आहे तो प्रत्यय अपृक्तसंज्ञक होतो; उदा०—स्पृशोऽनुदके किन्.

किं प्रयोजनम् । अणिञोर्लुकि ग्रहणं न कर्तव्यं भवति । ण्यक्षत्रियार्षञितो यूनि-लुगणिञोः [२.४.५८] इत्यपृक्तस्येत्येव सिद्धम् ।

**अणिञोर्लुगर्थमिति चेण्णेऽतिप्रसङ्गः ॥२॥**

अणिञोर्लुगर्थमिति चेण्णेऽतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । फाण्टाहृतेरपत्यं माणवकः फाण्टाहृत इति ॥ णवचनसामर्थ्यान्न भविष्यति ।

**वचनप्रामाण्यादिति चेत्फग्निवृत्त्यर्थं वचनम् ॥३॥**

वचनप्रामाण्यादिति चेत्फग्निवृत्त्यर्थमेतत्स्यात् । फगतो मा भूदिति ॥

**पैलादिषु वचनात्सिद्धम् ॥४॥**

यद्येतावत्प्रयोजनं स्यात्पैलादिष्वेव पाठं कुर्वीत । तत्र पाठादन्येषामपि फको निवृत्तिर्भवति । एवं सिद्धे सति यदयं णं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो नास्य लुग्भवतीति ॥

तान्येतानि त्रीणि ग्रहणानि भवन्ति । अपृक्तसंज्ञायां हल्ग्रहणं कर्तव्यम् । स्वा-

---

प्रकृतसूत्रामध्यें अल् असें जें मूळचें पाणिनीनें उच्चारलें आहे तें अण् आणि इञ् या दोन प्रत्ययांचाच लुक् व्हावा या उद्देशानें म्हटलें आहे. म्हणजे त्याचा उपयोग असा की, 'ण्यक्षत्रियार्षञितो यूनि लुगणिञोः' (२।४।५८) या सूत्रानें जो लुक् सांगितला आहे तेथें 'अपृक्ताचा लोप होतो' असें म्हणण्यानें काम भागेल. 'अण् प्रत्ययाचा आणि इञ्प्रत्ययाचा लुक् होतो' असें जें तेथें विशेष सांगितले आहे तें सांगावयास नको.

(वा.२) 'अण् आणि इञ् या दोन प्रत्ययांचाच लुक् झाला पाहिजे व तो अपृक्ताचा लुक् होतो असें म्हणण्यानें होईल' असें म्हणाल तर 'ण' हा प्रत्यय देखील अपृक्त असल्यामुळें त्याचा देखील लुक् होऊं लागेल असा दोष येतो; उदा०—'फाण्टाहृतीचा मुलगा' या अर्थी फाण्टाहृतिशब्दाहून फाण्टाहृतिमिमात०' (४।१।१५०) या सूत्रानें 'ण'प्रत्यय होऊन 'फाण्टाहृत' असा शब्द तयार होतो. (तेव्हां तेथें णप्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.)

परंतु 'फाण्टाहृति०' या सूत्रानें फाण्टाहृति या शब्दाहून मुद्दाम 'ण' हा प्रत्यय सांगितला असल्यानें त्याच्या जोरावर त्याचा लुक् होणार नाहीं.

(वा.३) मुद्दाम णप्रत्यय सांगितला म्हणून त्याच्या जोरावर त्याचा लुक् होणार नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. णप्रत्यय सांगण्याचा उपयोग असा होईल की, 'यञिञोश्च' (४।१।१०१) या सूत्रानें प्राप्त झालेला जो फक्प्रत्यय तो न झाला पाहिजे. म्हणून त्याच्या बाधाकरितां णप्रत्ययाचें विधान केलें पाहिजे. (तेव्हां त्या णप्रत्ययाचा लुक् झाला तरी त्यानें फक्प्रत्यय करून दिला नाहीं हा त्याचा उपयोग आहे.)

(वा.४) 'फक्प्रत्यय न होणें' एवढाच जर णप्रत्यय सांगण्याचा उपयोग असेल तर या फाण्टाहृतिशब्दाचा पैलादिगणामध्यें (२।४।५९) पाठ केला असतां काम भागेल. तेथें पाठ केल्यामुळें सौवीराशिवाय इतर गोत्र विवक्षित असले तरी देखील फक्प्रत्ययाची निवृत्ति होईल. अशा रीतीनें काम भागत असतांना ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'फाण्टाहृतिशब्दाहून णप्रत्यय करावा' असें सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, णप्रत्ययाचा लुक् होत नाहीं.

तेव्हां प्रकृतसूत्रामध्यें 'अल्' असें म्हणावें किंवा 'हल्' असें म्हणावें यासंबंधानें लाघवगौरवविचार केला असतां सारखीच स्थिति होते असें दृष्टीस पडतें. ती अशी की, हल् असें म्हटलें असतां तीन पदें उच्चारावीं लागतात. तीं अशीं की, प्रकृतसूत्रामध्यें 'हल्' असें एक पद आणि 'ण्यक्षत्रियार्ष' (२।४।५८०) या सूत्रामध्यें अण् आणि इञ् अशीं दोन पदें उच्चारावीं लागतात. मिळून तीन पदें होत. या

दिलोपे हलो ग्रहणं न कर्तव्यम् । अणिञोर्लुकि ग्रहणं कर्तव्यम् । अल्ग्रहणेऽपि वै क्रियमाणे तान्येव त्रीणि ग्रहणानि भवन्ति । अपृक्तसंज्ञायामल्ग्रहणं कर्तव्यम् । स्वादिलोपे हलो ग्रहणं कर्तव्यम् । अणिञोर्लुकि ग्रहणं न कर्तव्यं भवत्यपृक्तग्रहणं कर्तव्यम् । तत्र नास्ति लाघवकृतो विशेषः ॥ अयमस्ति विशेषः । अल्ग्रहणे क्रियमाण एकग्रहणं न करिष्यते । कस्मान्न भवति । दर्विः जागृविः । अलेव यः प्रत्ययः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अल्ग्रहणसामर्थ्यात् । यदि योऽल् चान्यश्च तत्र स्यादल्ग्रहणमनर्थकं स्यात् ॥ हल्ग्रहणेऽपि क्रियमाण एकग्रहणं न करिष्यते । कस्मान्न भवति । दर्विः जागृविः ॥ हलेव यः प्रत्ययः । किं वक्तव्यमेतत् । न

---

वेळीं 'हल्ङ्याप्' (६।१।६७) या सूत्रामध्यें 'हल्' असें पद घालावयास नको. तसेंच प्रकृतसूत्रामध्यें 'अल्' असें म्हटलें तरी देखील तीनच पदें उच्चारावीं लागतात. तीं अशीं की प्रकृतसूत्रामध्यें 'अल्' असें एक पद, हल्ङ्याब्भ्यो० या सूत्रामधील 'हल्' हें दुसरें पद, आणि 'ण्यक्षत्रिया०' या सूत्रामध्यें अण्, इञ्, हीं दोन पदें काढून त्यांच्या ऐवजीं घातलेलें 'अपृक्त' हें तिसरें पद. एकंदरींत लाघव असें कोणत्याच पक्षांत दृष्टीस पडत नाहीं. तेव्हां दोन्ही पक्ष सारखेच दिसत आहेत.

पण त्या दोन पक्षांमध्यें एक फरक असा दृष्टीस पडतो की, प्रकृतसूत्रामध्यें 'अल्' असें म्हटलें असतां 'एक' हा शब्द काढला तरी चालेल.

पण 'एक' शब्द उच्चारला नाहीं तर दर्विः, जागृविः, या शब्दांमध्ये 'वि' हा जो अनेकाल्प्रत्यय त्याला अपृक्त संज्ञा कां होत नाहीं ?

हा दोष येत नाहीं. कारण 'अल्रूपच जो प्रत्यय त्याला अपृक्तसंज्ञा होते' असा प्रकृतसूत्राचा अर्थ आहे.

हें काय हो असें म्हणतां ? असें म्हणूं नका. कारण सूत्रामध्यें तसा स्पष्ट शब्द न उच्चारतांना तसा अर्थ कसा घेतां येईल ?

'अल्' या शब्दाच्या जोरावरच तसा अर्थ घेतां येईल. कारण जो प्रत्यय अल्रूपी असेल किंवा जो त्याहून निराळा असेल म्हणजे 'अल्समुदायरूपी' असेल त्या दोन्ही ठिकाणीं जर प्रकृतसूत्रानें अपृक्तसंज्ञा होत असेल तर अल् या म्हणण्याचा कांहींच उपयोग नाहीं असें होईल. (एकंदरींत, अल् या म्हणण्यानेंच 'एक अल्रूप प्रत्यय' असा अर्थ होऊन एक हा शब्द टाकण्यांत येतो, असा अल्शब्द घालण्यांत विशेष आहे.)

प्रकृतसूत्रामध्यें 'हल्' असें म्हटलें तरी देखील 'एक' हा शब्द टाकतां येईल.

पण एक शब्द उच्चारला नाहीं तर दर्वि जागृवि, या शब्दांमध्यें 'वि' हा जो हल् आणि अच् मिळून झालेला प्रत्यय त्याला अपृक्त संज्ञा कां होत नाहीं ?

हा दोष येत नाहीं. कारण 'हल्रूपच जो प्रत्यय त्याला अपृक्तसंज्ञा होते' असा प्रकृत सूत्राचा अर्थ आहे.

हें म्हणावयास पाहिजे का ?

असें म्हणू नका. कारण सूत्रामध्यें तसा स्पष्ट शब्द न उच्चारतां तसा अर्थ कसा घेतां येईल ?

'हल्' या शब्दाच्या जोरावरच तसा अर्थ घेतां येईल.

कारण जर जो प्रत्यय हल्रूपी असेल किंवा जो त्याहून निराळा म्हणजे हल् आणि अच् मिळून झालेला असेल त्या दोन्ही ठिकाणीं प्रकृतसूत्रानें अपृक्तसंज्ञा होईल तर सूत्रामध्यें 'हल्' या शब्दाचा कांहींच उपयोग नाहीं असें होईल.

पण हल् या शब्दाचा उपयोग निराळा संभवतो.

तो कोणता ?

हल् म्हणण्यानें हलन्त जो प्रत्यय त्यालाच अपृक्तसंज्ञा होईल. जो अजन्तप्रत्यय त्याला

हि। कथमनुच्यमानं गंस्यते। हल्ग्रहणसामर्थ्यात्। यदि यो हल् चान्यश्च तत्र स्याद्धल्ग्रहणमनर्थकं स्यात्। अस्त्यन्यद्धल्ग्रहणस्य प्रयोजनम्। किम्। हलन्तस्य यथा स्यादजन्तस्य मा भूदिति॥ एवं तर्हि सिद्धे सति यदल्ग्रहणे क्रियमाण एकग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र वर्णग्रहणे जातिग्रहणं भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। दम्भेर्हल्ग्रहणस्य जातिवाचकत्वात्सिद्धमित्युक्तं तदुपपन्नं भवति॥

**तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारयः ॥१.२.४२॥**

**तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारय इति चेत्समासैकार्थत्वादप्रसिद्धिः ॥१**

तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारय इति चेत्समासस्यैकार्थत्वात्संज्ञाया अप्रसिद्धिः। एकोऽयमर्थस्तत्पुरुषो नामानेकार्थाश्रयं च सामानाधिकरण्यम्॥

**सिद्धं तु पदसामानाधिकरण्यात् ॥२**

सिद्धमेतत्। कथम्। तत्पुरुषः समानाधिकरणपदः कर्मधारयसंज्ञो भवतीति वक्तव्यम्। सिध्यति। सूत्रं तर्हि भि-

---

होणार नाहीं.

(एकंदरींत, सूत्रामध्यें हल्ग्रहण ठेवलें असतां हलन्त असा भलता अर्थ होण्याकरतां एक हा शब्द ठेवावा लागतो आणि सूत्रामध्यें अल् असें म्हटलें असतां तेवढ्यानेंच म्हणजे एक हा शब्द न उच्चारतांना देखील काम भागतें असें सिद्ध होतें.)

तर मग अशा रीतीनें फक्त 'अल्' या शब्दानें काम भागत असतांना जो हा आचार्य पाणिनि सूत्रामध्यें 'एक' असा शब्द उच्चारतो त्यावरून तो असें सुचवितो की, इतर ठिकाणीं वर्णाला उद्देशून कार्य सांगितलें असतां तेथें जातीची विवक्षा करावी; म्हणजे ती वर्ण्य व्यक्ति एक आहे किंवा दोन आहेत असें तेथें कांहीं पाहूं नये.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा की, पूर्वीं जे 'दम्भेर्हल्ग्रहणस्य जातिवाचकत्वात्सिद्धम्' (१।२।१० वार्तिक) असें म्हटलें आहे तें आतां म्हणावयास नको.

(सू.४२, वा.१) 'समानाधिकरण अशा तत्पुरुषाला कर्मधारयसंज्ञा होते' असें येथें सांगितलें आहे. परंतु तें बरोबर जमत नाहीं. कारण सामासिक शब्दापासून एकाच अर्थाची प्रतीति होत असल्यामुळें त्याला कर्मधारयसंज्ञा होणार नाहीं. तत्पुरुष असें येथें निमित्त म्हणून गृहीत धरलें आहे. आणि तत्पुरुष हा तर समास असल्यामुळें एकाच अर्थाचा शब्द होत आहे. आणि सामानाधिकरण्य हें अनेक अर्थांवर अवलंबून असतें. (एकच वस्तु अनेक शब्दांनीं भिन्न भिन्न अर्थांनीं दाखविली जात असेल तेथें ते अनेक शब्द एकमेकांशीं समानाधिकरण म्हणजे एकाच वस्तूला प्रतिपादन करणारे असे समजले जातात.)

(वा.२) हें सिद्ध होतें.

तें कसें ?

सूत्रामध्यें 'समानाधिकरण' असें जें म्हटलें आहे तें तसें न म्हणतां त्याच्या ऐवजीं 'सामानाधिकरणपद' असें म्हणावें. म्हणजे असा अर्थ होईल की, 'ज्या तत्पुरुषसमासामध्यें आंतील पदें एकमेकांशीं समानाधिकरण होत आहेत त्या तत्पुरुषाला कर्मधारय असें म्हणावें.'

असें म्हटलें असतां सिद्ध होतें हें खरें. परंतु सूत्र फिरवावें लागतें ना ?

---

१. ज्या तत्पुरुषसमासांतील दोन्ही पदें एकाच अर्थाला दाखवितात अशा तत्पुरुषसमासाला कर्मधारय ही संज्ञा होते; उ०—परमराज्यम्.

द्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारय इति चेत्समासैकार्थत्वादप्रसिद्धिरिति । नैष दोषः । अयं तत्पुरुषोऽस्त्येव प्राथमकल्पिको यस्मिन्नैकपद्यमैकस्वर्यमेकविभक्तित्वं च । अस्ति तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तत्पुरुषार्थानि पदानि तत्पुरुष इति । तद्यस्तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तस्येदं ग्रहणम् ॥

**प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनम् ॥१.२.४३॥**

**प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनमिति चेदनिर्देशात्प्रथमायाः समासे संज्ञाप्रसिद्धिः ॥ १ ॥**

प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनमिति चेदनिर्देशात्प्रथमायाः समास उपसर्जनसंज्ञाया अप्रसिद्धिः । न हि कष्टादीनां समासे प्रथमां पश्यामः ॥

**सिद्धं तु समासविधाने वचनात् ॥२**

सिद्धमेतत् । कथम् । समासविधाने प्रथमानिर्दिष्टमुपसर्जनसंज्ञं भवतीति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

---

तर मग सूत्र जसें पाणिनीनें मुळचें केले आहे तसेंच असूं दे. पण 'समानाधिकरण तत्पुरुषाला कर्मधारयसंज्ञा सांगितली आहे ती बरोबर जमत नाहीं, कारण सामासिक शब्दापासून एकाच अर्थाची प्रतीति होत आहे' असा आतांच दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण तत्पुरुष या शब्दाचा मुख्य अर्थ पाहिला तर जेवढ्या भागाला एक पद म्हटलें जातें व जेवढ्या भागामध्यें एक स्वर होतो आणि जेवढ्या भागाला एक विभक्ति लागते तेवढा सामासिक शब्दाचा भाग हा तत्पुरुष या शब्दापासून प्रथमतः मनांत येणारा अर्थ आहे. म्हणूनच तो त्याचा मुख्यार्थ आहे हें खरें, परंतु त्या तत्पुरुषशब्दाचा जो दुसरा गौणार्थ आहे तो असा की तत्पुरुष समास करण्याकरतां उच्चारलेलीं जीं पदें त्यांना तत्पुरुष असा शब्द गौण रीतीनें दिला जातो. हा जो तत्पुरुषसमासाकरितां घेतलेल्या पदांना गौण रीतीनें तत्पुरुषशब्द लावला जातो तोच 'तत्पुरुष' हा गौणार्थाचा शब्द येथें पाणिनीनें उच्चारला आहे असें समजावें.

(सू.४३,वा.१)'समासामध्यें प्रथमाविभक्ति लावून उच्चारलेल्या शब्दाला उपसर्जनसंज्ञा होते' असें म्हटलें तर 'कष्टश्रित' वगैरे समासांमध्यें 'कष्ट' वगैरे शब्दांना प्रथमाविभक्ति लावली नसल्यानें त्यांना उपसर्जनसंज्ञा होणार नाहीं. कारण 'कष्टं श्रितः कष्टश्रितः' या द्वितीयातत्पुरुषामध्यें कष्टशब्दाला द्वितीया विभक्ति लावलेली आहे. तेथें प्रथमाविभक्ति लावलेली दिसत नाहीं. (तेव्हां अर्थातच त्याला उपसर्जनसंज्ञा होत नसल्यामुळें 'उपसर्जनं पूर्वम्' (२।२।३०) या सूत्रानें पूर्वनिपात होणार नाहीं.)

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

'समास सांगणाऱ्या शास्त्रामध्यें जो प्रथमाविभक्ति लावून उच्चारलेला शब्द त्याला उपर्जनसंज्ञा होते' असें म्हणावें.

तर मग तसें म्हणजे 'समासविधौ' असें

---

१. समासाचें विधान करणाऱ्या शास्त्रामध्यें ज्या पदापुढें प्रथमाविभक्ति लावलेली दृष्टीस पडते तें उपसर्जनसंज्ञक होतें; उदा०—कष्टं श्रितः कष्टश्रितः. 'द्वितीयाश्रिता०' (२।१।२४) या शास्त्रामध्यें 'द्वितीया' हें पद प्रथमाविभक्ति लावून उच्चारलें आहे म्हणून कष्टम् या द्वितीयान्त पदाला समासामध्यें उपसर्जन संज्ञा होते. त्यामुळेंच त्या पदाला पूर्वनिपात (२।२।३०) झाला आहे.

२. समासामध्यें प्रथमाविभक्ति लावून उच्चारलेल्या शब्दाला उपसर्जनसंज्ञा होते, असा या सूत्राचा अर्थ सकृद्दर्शनीं मनांत येतो, तो गृहीत धरून वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

**न वा तादर्थ्यात्ताच्छब्द्यम् ॥ ३ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भवति । समासार्थं शास्त्रं समास इति ॥

**यस्य विधौ प्रथमानिर्देशस्ततोऽन्यत्राप्युपसर्जनसंज्ञाप्रसङ्गः ॥ ४ ॥**

यस्य विधौ प्रथमानिर्देशः क्रियते ततोऽन्यत्रापि तस्योपसर्जनसंज्ञा प्राप्नोति। राज्ञः कुमारीं राजकुमारीं श्रितः । श्रितादिसमासे द्वितीयान्तं प्रथमानिर्दिष्टं तस्य षष्ठीसमासेऽप्युपसर्जनसंज्ञा प्राप्नोति ॥

**सिद्धं तु यस्य विधौ तं प्रतीति वचनात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यस्य विधौ यत्प्रथमानिर्दिष्टं तं प्रति तदुपसर्जनसंज्ञं भवतीति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । उपसर्जनमिति महती संज्ञा क्रियते । संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत। अप्रधानमुपसर्जनमिति । प्रधानमुपसर्जनमिति च संबन्धिशब्दावेतौ । तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यं प्रति यदप्रधानं तं प्रति तदुपसर्जनसंज्ञं भवतीति ॥

---

सूत्रामध्यें म्हटलें पाहिजे.

(वा.३) तसें म्हणावयास नको.

कां बरें ?

समासाकरतां कल्पिलेलें जें त्याला समास हा शब्द लावतां येईल. म्हणजे पाणिनीनें शास्त्र हें समास होण्याकरतां कल्पिलेलें आहे. तेव्हां अर्थातच प्रकृतसूत्रामध्यें जो 'समास' हा शब्द उच्चारला आहे तो 'समाससंज्ञा सांगणारें शास्त्र' अशा अर्थाचा घेतां येईल.

(वा.४) समासविधायक शास्त्रामध्येंजो शब्द प्रथमाविभक्ति लावून उच्चारला असेल त्याला इतर ठिकाणीं देखील उपसर्जनसंज्ञा होऊं लागेल; उदा०— राज्ञः कुमारीं श्रितः. द्वितीया तत्पुरुष सांगणाऱ्या 'द्वितीयाश्रिता'०(२।४।२४) या सूत्रामध्यें द्वितीया हा शब्द प्रथमाविभक्ति लावून उच्चारला आहे. म्हणून त्याला उपसर्जनसंज्ञा होऊन पूर्वनिपात होतो. म्हणजे कुमारीश्रित या तत्पुरुषामध्यें कुमारी हा शब्द द्वितीयान्त शब्दापूर्वी येतो. परंतु तसाच तो कुमारीशब्द 'राजकुमारीश्रित' या शब्दांतील राजकुमारी या षष्ठीतत्पुरुषामध्यें देखील उपसर्जनसंज्ञक होऊन पूर्वी येऊं लागेल.

(वा.५) ज्या समासविधायक शास्त्रामध्यें जो शब्द प्रथमाविभक्ति लावून उच्चारला असेल त्याला त्याच समासामध्यें पूर्वनिपात करण्याकरतां उपसर्जनसंज्ञा होते असें म्हणावें.

तर मग तें तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'उपसर्जन' ही मोठी संज्ञा म्हणजे पांच अक्षरांची केलेली दृष्टीस पडते. आणि संज्ञा तर अशी असली पाहिजे की, जिच्यापेक्षां दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें थोडक्यांत बोलतां येणार नाहीं.

असें कशावरून ?

अशावरून की, संज्ञा ही लाघवाकरतांच केलेली असते. अशी स्थिति असतांही येथें जी पाणिनीनें 'उपसर्जन' ही मोठी संज्ञा केली आहे त्यांत त्याचा कांहीं तरी हेतु असला पाहिजे. तो हा की, उपसर्जन ही अन्वर्थसंज्ञा मानली जावी. लोकांमध्यें अप्रधान मनुष्यांना 'उपसर्जन असें म्हणतात. 'प्रधान' आणि 'उपसर्जन' हे दोन परस्परसंबंधी शब्द आहेत. म्हणजे प्रधानाला प्रधानपणा उपसर्जनामुळें येतो, आणि उपसर्जनाला उपसर्जनपणा प्रधानामुळें येतो. ह्या त्यांच्या संबंधावरून प्रकृत स्थलीं ज्याच्यामुळें ज्याला अप्राधान्य येतें त्याला त्याच्यामुळेंच उपसर्जनसंज्ञा होत असते. (एकंदरींत पूर्वीच्या उदाहरणामध्यें कु-

अथ यत्र द्वे षष्ठ्यन्ते कस्मात्तत्र प्रधानस्योपसर्जनसंज्ञा न भवति । राज्ञः पुरुषस्य राजपुरुषस्येति ।

**षष्ठ्यन्तयोश्चोपसर्जनत्व उक्तम् ॥६**

किमुक्तम् । षष्ठ्यन्तयोः समासेऽर्थाभेदात्प्रधानस्यापूर्वनिपात इति । एवं न चेदमकृतं भवेदुपसर्जनं पूर्वमित्यर्थश्चाभिन्न इति कृत्वा प्रधानस्य पूर्वनिपातो न भविष्यति ॥ यद्यपि तावदेतदुपसर्जनकार्यं परिहृतमिदमपरं प्राप्नोति । राज्ञः कुमार्याः राजकुमार्याः । गोस्त्रियोरुपसर्जनस्य [१.२.४८] इति ह्रस्वत्वं प्राप्नोति ।

**उक्तं वा ॥ ७ ॥**

किमुक्तम् । परवल्लिङ्गमिति शब्दशब्दार्थाविति । तत्रौपदेशिकस्य ह्रस्वत्वमातिदेशिकस्य श्रवणं भविष्यति ॥

## एकविभक्ति चापूर्वनिपाते ॥१.२.४४॥

द्वितीयादीनामप्यनेनोपसर्जनसंज्ञा

---

मारी या द्वितीयान्त शब्दाला जी उपसर्जनसंज्ञा झालेली आहे ती श्रितामुळें झालेली आहे, राजामुळें झालेली नाहीं. तेव्हां तेथें कांहीं दोष येत नाहीं.)

आतां ज्या उदाहरणामध्यें दोन्ही शब्द षष्ठ्यन्त असतील तेथें प्रधानाला उपसर्जनसंज्ञा कां होत नाहीं? उदा०— राज्ञः पुरुषस्य (गृहम्) राजपुरुषस्य.

(वा.६) दोन षष्ठ्यन्त शब्द जेथें येतील तेथें उपसर्जनसंज्ञेबद्दल सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे?

तें असें सांगितलें आहे (२।२।३० वा.३) की, राज्ञः पुरुषस्य गृहम् असे जरी येथें दोन षष्ठ्यन्त शब्द असले तरी तेथें पुरुष या शब्दाचा अर्थ राज्ञः पुरुषः यांतील प्रथमान्त पुरुषशब्दाच्या अर्थापेक्षां कांहीं निराळा होत नाहीं. त्यामुळें राजाचा प्रधान म्हणजे विशेष्य जो पुरुष त्याला येथेंही पूर्वनिपात होत नाहीं.

असें मानलें म्हणजे 'उपसर्जनं पूर्वम्' (२।२।३०) हें शास्त्र येथें सोडलें असें होत नाहीं. तें शास्त्र घेतलें तरी पुरुषशब्दाचा अर्थ राजपुरुषः यांतील पुरुषशब्दाच्या अर्थापेक्षां भिन्न होत नसल्यामुळें राज्ञः पुरुषस्य गृहम् येथें विशेष्य जो पुरुषशब्द त्याला राजन् या शब्दापेक्षां पूर्वनिपात होणार नाहीं.

पण अशा रीतीनें उपर्जनसंज्ञा झाली असतांना तिच्यामुळें प्राप्त झालेला जो पूर्वनिपात तो जरी दूर झाला तरी उपसर्जनसंज्ञा झाल्यामुळें दुसरीं कार्यें होतील असा दोष येतोच; उदा०— राज्ञः कुमार्याःराजकुमार्याः या ठिकाणीं कुमारीशब्दाला 'गोस्त्रियोरुपर्जनस्य'. (१।२।४८) या सूत्रानें ह्रस्व होऊं लागेल.

(वा.७) अथवा यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे?

असें सांगितलें आहे (२।४।२६ वा.६) की, द्वंद्व आणि तत्पुरुष यांमध्यें उत्तरपदाच्या लिङ्गाप्रमाणें सामासिक शब्दाचें लिङ्ग समजावें.

आणि लिङ्गबोधक टाप्, ङीप्, वगैरे शब्द देखील स्वतंत्र उत्तरपदासारखाच सामासिक शब्दांमध्यें करावा. तेव्हां मूळचा जो समास करण्याकरतां घेतलेला कुमारीशब्द त्याला जरी ह्रस्व झाला तरी 'परवल्लिङ्गम्०' (२।४।२६) या शास्त्रानें पुनः त्याला जे कुमारी असें दीर्घ ईकारान्त स्वरूप प्राप्त झालें तें कायम राहील, आणि त्यामुळें तेथें कांहीं दोष येणार नाहीं.

(सू.४४) कष्टश्रित वगैरे तत्पुरुषामध्यें कष्ट वगैरे द्वितीयान्त पदांना प्रकृतसूत्रानें

३. पुढील सूत्र (१।२।४४) टीप २ पाहावी.

१. समासांतील दोन पदार्थांपैकीं ज्याचा संबंध ठराविक अशा एकाच विभक्तीनें जोडला जातो त्याला उपसर्जनसंज्ञा होते. पण त्याला या उपसर्जनसंज्ञेमुळे पूर्वनिपात मात्र करूं नये; उदा० मालामतिक्रान्तः अतिमालः.

प्राप्नोति । तत्र को दोषः । तत्रापूर्वनिपात इति प्रतिषेधः प्रसज्येत ॥ नाप्रतिषेधात् । नायं प्रसज्यप्रतिषेधः पूर्वनिपाते नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यत्पूर्वनिपातादिति । पूर्वनिपातेऽव्यापारः । यदि केनचित्प्राप्नोति तेन भविष्यति । पूर्वेण च प्राप्नोति तेन भविष्यति ॥ अप्राप्तेर्वा । अथवानन्तरा या प्राप्तिः सा प्रतिषिध्यते । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । पूर्वा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया भविष्यति । ननु चेयं प्राप्तिः पूर्वां प्राप्तिं बाधते । नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥

**एकविभक्तावषष्ठ्यन्तवचनम् ॥ १ ॥**

एकविभक्तावषष्ठ्यन्तानामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । अर्धं पिप्पल्या अर्धपिप्पली इति ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । परवाल्लिङ्गमिति शब्द-

---

उपसर्जनसंज्ञा प्राप्त होते.

तेथें उपसर्जनसंज्ञा झाली असतां कोणता दोष येतो ?

दोष असा की, प्रकृतसूत्रामध्यें पूर्वनिपात होत नाहीं असा जो निषेध सांगितला आहे तो तेथें होऊं लागेल.

प्रकृतसूत्रामध्यें 'अपूर्वनिपाते' या पदानें 'प्राप्त झालेल्या पूर्वनिपाताचा प्रतिषेध सांगितला आहे, असें समजूं नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावा ?

त्याचा अर्थ असा समजावा की, 'अपूर्वनिपाते' या पदांतील 'न' हें अव्यय 'पर्युदास' या अर्थाचें आहे. त्यामुळें प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा झाली असतां 'पूर्वनिपाताशिवाय इतर कार्यें त्या उपसर्जनसंज्ञेमुळें होतात' असा अर्थ होतो. प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा झाली असतां तेथें 'त्याला पूर्वनिपात करण्याविषयीं हें सूत्र उदासीन असतें. जर तेथें दुसऱ्या कोणत्याही शास्त्रानें उपसर्जनसंज्ञा होऊन पूर्वनिपात होईल तर त्याला मोकळीक आहे. आणि तत्पुरुषामध्यें द्वितीयान्त वगैरे पदांना तर पूर्वसूत्रानें उपसर्जनसंज्ञा प्राप्त होत आहे तेव्हां ती होऊन पूर्वनिपात होईल.

अथवा प्रकृतसूत्रामध्यें 'अपूर्वनिपाते' या पदाचा अर्थ 'पूर्वनिपात होत नाहीं' असा जरी घेतला तरी दोष येत नाहीं. कारण प्रकृतसूत्रानेंच उपसर्जनसंज्ञा झाल्यामुळें प्राप्त झालेल्या पूर्वनिपाताचाच तो निषेध होईल.

असें कशावरून ?

'विधि किंवा निषेध हे आपल्याजवळ असलेल्याच्या संबंधानेंच होत असतात. अर्थात् दूर सांगितलेल्याच्या संबंधानें होत नाहींत' अशी परिभाषा आहे. तेव्हां येथें पूर्वसूत्रानें प्राप्त झालेली उपसर्जन संज्ञा निषिद्ध होत नसल्यामुळें तिच्यामुळें पूर्वनिपात होईल.

पण प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेली उपसर्जनसंज्ञा ही पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या उपसर्जनसंज्ञेचा बाध करीत आहे ना ?

प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेली उपसर्जनसंज्ञा ही 'अपूर्वनिपाते' यानें पूर्वनिपाताविषयीं निषिद्ध होत असल्यामुळें ती पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या उपसर्जनसंज्ञेचा बाध करण्याला धजत नाहीं.

(वा.१) 'ही जी प्रकृतसूत्रानें नियत विभक्त्यन्त पदाला उपसर्जनसंज्ञा सांगितली आहे ती षष्ठ्यन्ताला होत नाहीं' असें म्हणावें. कारण 'अर्धं पिप्पल्याः अर्धपिप्पली' या तत्पुरुषसमासामध्यें 'पिप्पली' या षष्ठ्यन्त पदाला प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा न झाली पाहिजे. (नाहीं तर येथें ह्रस्व होऊं लागेल.)

(वा.२) अथवा यासंबंधानें सांगितलेंच आहे.

शब्दार्थाविति । तत्रौपदेशिकस्य ह्रस्वत्वमातिदेशिकस्य श्रवणं भविष्यति ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि।

**प्रयोजनं द्विगुप्राप्तापन्नालंपूर्वोपसर्गाः क्तार्थे ॥ ३ ॥**

द्विगुः । पञ्चभिर्गोभिः क्रीतः पञ्चगुः॥ प्राप्तापन्न । प्राप्तो जीविकां प्राप्तजीविकः। आपन्नो जीविकामापन्नजीविकः॥ अलंपूर्व । अलं कुमार्या अलंकुमारिः । उपसर्गाः क्तार्थे । निष्कौशाम्बिः । निर्वाराणसिः ॥

**इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम् ॥**

---

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे (२।४।२६ वार्ति.) की, द्वंद्व आणि तत्पुरुष यांमध्यें उत्तरपदाच्या लिङ्गाप्रमाणें सामासिक शब्दाचें लिङ्ग समजावें. आणि लिङ्गबोधक टाप्, ङीप्, वगैरे शब्द देखील स्वतंत्र उत्तरपदासारखाच सामासिक शब्दांमध्यें करावा. तेव्हां मूळचा जो समास करण्याकरतां घेतलेला पिप्पलीशब्द त्याला जरी ह्रस्व झाला तरी 'परवल्लिङ्ग०' (२।४।२६) या शास्त्रानें पुनः त्याला जें 'पिप्पली' असें दीर्घ ईकारान्त स्वरूप प्राप्त झालें आहे तें कायम राहील. आणि त्यामुळें तेथें कांहीं दोष येणार नाहीं.

बरें आतां प्रकृतसूत्राचीं उदाहरणें तरी कोणतीं संभवतात ?

(वा.३) द्विगु, प्राप्त, आपन्न, अलंपूर्वकसमास, आणि क्त वगैरे प्रत्ययाच्या अर्थाला दाखविणारे उपसर्ग इतक्या ठिकाणीं प्रकृत सूत्राचा उपयोग आहे. त्यांपैकीं द्विगूचें उदाहरण— पञ्चभिर्गोभिः क्रीतः पञ्चगुः. या ठिकाणीं गोशब्दाला प्रकृतसूत्रानें उपसजनसंज्ञा होऊन ह्रस्व झाला आहे. प्राप्त, आपन्न, या शब्दांचीं उदाहरणें—प्राप्तो जीविकां प्राप्तजीविकः, आपन्नो जीविकामापन्नजीविकः. येथें जीविकाशब्दाला प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा झाल्यानें ह्रस्व होत आहे. अलंशब्दपूर्वकसमासाचें उदाहरण—अलं कुमार्यै अलंकुमारिः. येथें कुमारी शब्दाला प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा होऊन ह्रस्व झालेला आहे. क्त वगैरे प्रत्ययांच्या अर्थाना दाखविणाऱ्या शब्दांचीं उदाहरणें—निष्कौशाम्बिः, निर्वाराणसिः. येथेंही कौशाम्बी आणि वाराणसी या शब्दांना प्रकृतसूत्रानें उपसर्जनसंज्ञा होऊन ह्रस्व झालेला आहे. कौशाम्बीनगरीपासून निघालेला, वाराणसीपासून निघालेला, असा त्यांचा अर्थ आहे.

याप्रमाणें भगवान पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या पदांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

२. 'परवल्लिङ्गम्०' येथील लिङ्गशब्दानें शब्दार्थ म्हणजे स्त्रीत्व, पुंस्त्व, वगैरे अर्थ आणि शब्द म्हणजे लिङ्गबोधक टाप्, ङीप्, वगैरे प्रत्यय असे दोन अर्थ तन्त्रानें विवक्षित आहेत. तेव्हां द्वंद्व किंवा तत्पुरुष यांमधील जें उत्तरपद त्याचें लिङ्ग आणि तद्बोधक प्रत्यय हे त्या सामासिक पदाला लागू करावेत असा अर्थ होतो. तेव्हां अर्धपिप्पली येथें पिप्पली या शब्दाला 'एकविभक्ति' यानें उपसर्जनसंज्ञा असल्यामुळे ह्रस्व होतो. परंतु मागून 'परवल्लिङ्गम्०' या अतिदेशाने सामासिक पदाच्या पुढे केलेला जो स्त्रीप्रत्यय तदन्ताला म्हणजे अर्धपिप्पली या शब्दाला उपसर्जनत्व नसल्याने आणि प्रत्ययान्तत्वामुळे प्रातिपदिक संज्ञाही नसल्यानें ह्रस्व येऊं शकत नाहीं.

**अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम् ॥ १.२.४५ ॥**

अर्थवदिति व्यपदेशाय वर्णानां च मा भूदिति । किं च स्यात् । वनम् धनमिति नलोपः प्रातिपदिकान्तस्य [८.२.७] इति नलोपः प्रसज्येत ॥ अधातुरिति किमर्थम् । अहन्वृत्रमिति ॥ अधातुरिति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति अहन्वृत्रमिति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न धातोः प्रातिपदिकसंज्ञा भवतीति यदयं सुपो धातुप्रातिपदिकयोः [२.४.७१] इति धातुग्रहणं करोति । नैतदस्ति ज्ञापकम् । प्रतिषिद्धार्थमेतत्स्यात् । अपि काकः श्येनायत इति ॥ अप्रत्यय इति किमर्थम् । काण्डे कुड्ये ॥ अप्रत्यय इति शक्यमक-

---

(सू.४५) ह्या सूत्रानें जी ही प्रातिपदिकसंज्ञा सांगितली आहे ती अमक्यालाच होते असें विशेष रीतीनें समजण्याकरतां सूत्रामध्यें 'अर्थवत्' असें म्हटलें आहे. कारण अर्थवाना शिवाय इतरांना म्हणजे वर्णांना प्रातिपदिक संज्ञा न झाली पाहिजे.

वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा झाली असतां काय दोष येईल ?

धन, वन, वगैरे शब्दांमधील प्रत्येक वर्णाला जर प्रातिपदिकसंज्ञा झाली तर 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' (८।२।७) या शास्त्रानें नकाराचा लोप होऊं लागेल.

आतां या सूत्रामध्यें 'अधातु' असा शब्द उच्चारून जो धातूला प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध केला आहे तो कशाकरतां केला आहे ?

अहन् वृत्रम् या वाक्यामध्यें 'अहन्' या क्रियापदाला प्रातिपदिकसंज्ञा होऊं नये म्हणून 'अधातु' असें म्हटलें आहे.

प्रकृतसूत्रामध्यें 'अधातु' असें न म्हटलें तरी चालेल.

अधातु असें म्हटलें नाहीं तर 'अहन् वृत्रम्' या वाक्यामध्यें 'अहन्' याला प्रातिपदिकसंज्ञा कां होत नाहीं ?

अहन् याला प्रातिपदिक संज्ञा होत नाहीं अशाविषयीं एक ज्ञापक आहे. तें असें की, हा आचार्य पाणिनि 'सुपो धातुप्रातिपादिकयोः' (२।४।७१) या शास्त्रामध्यें प्रातिपदिक असा शब्द उच्चारून त्याशिवाय निराळा आणखी 'धातु' असा शब्द उच्चारतो त्यावरून तो असें सुचवितो की, धातूला प्रातिपादिकसंज्ञा होत नाहीं.

हें ज्ञापक बरोबर दिसत नाहीं. कारण ज्या ठिकाणीं धातूला अन्य कारणानें प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होत असेल त्या ठिकाणीं त्या धातूमधील विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याकरितां तेथें 'धातु' असा शब्द उच्चारला आहे असें म्हणतां येईल; उदा०— अपि काकः श्येनायते. (या ठिकाणीं 'श्येन+सु+य' या धातूला 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा निषेध प्राप्त होत आहे.)

आतां प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं असें येथें कशाकरतां म्हटलें आहे ?

---

१. धातु, प्रत्यय आणि प्रत्ययान्त या शिवाय अर्थवान् जो शब्द तो प्रातिपदिकसंज्ञक होतो; उदा०—डित्थः, कपित्थः.

२. धन, वन, या शब्दांतील केवल नकाराला जर प्रातिपदिकसंज्ञा झाली तर तेवढ्याला विभक्तिप्रत्यय सु हा लागेल. त्या प्रत्ययाचा जरी लोप (६।१।६८) झाला तरी तेवढ्याला पद म्हणतां येत असल्यामुळे त्या नकाराचा लोप होईल.

३. या क्रियापदामध्ये हन् धातूहून लङ्प्रत्यय, तिप्, इकाराचा लोप (३।४।१००), शप्, त्याचा लुक् (२।४।७२), अट्, तिप् प्रत्ययाचा लोप (६।१।६८) होऊन फक्त धातु शिल्लक राहिला आहे.

४. जर धातूला प्रातिपदिकसंज्ञा होईल तर 'प्रातिपदिकांतील सुपाचा लुक् होतो' या एका विधानानेंच काम भागेल. त्याकरितां निराळा धातुशब्द सूत्रामध्यें घालावयास नको. तो घातल्यावरून हें अनुमान निघतें.

तुम् । कस्मान्न भवति काण्डे कुड्ये इति। कृत्तद्धितग्रहणं नियमार्थं भविष्यति। कृत्तद्धितान्तस्यैव प्रत्ययान्तस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति नान्यस्येति ॥

**अर्थवत्यनेकपदप्रसङ्गः ॥ १ ॥**

अर्थवति प्रातिपदिकसंज्ञायामनेकस्यापि पदस्य प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति। दश दाडिमानि षडपूपाः कुण्डमजाजिनं पललपिण्डः अधरोरुकमेतत्कुमार्याः स्फैयकृतस्य पिता प्रतिशीन इति ॥ समुदायोऽत्रानर्थकः ।

**समुदायोऽनर्थक इति चेदवयवार्थवत्त्वात्समुदायार्थवत्त्वं यथा लोके॥२॥**

समुदायोऽनर्थक इति चेदवयवैरर्थवाद्भिः समुदाया अप्यर्थवन्तो भवन्ति यथा लोके। तद्यथा। लोक आढ्यमिदं नगरं गोमदिदं नगरमित्युच्यते न च तत्र सर्वे आढ्या भवन्ति सर्वे वा गोमन्तः ॥ यथा लोक इत्युच्यते लोके चावयवा एवार्थवन्तो न समु-

'काण्डे', 'कुड्ये', या ठिकाणीं सप्तम्यन्ताला प्रातिपादिकसंज्ञा न झाली पाहिजे.

पण प्रकृतसूत्रामध्यें 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिक संज्ञा होत नाहीं' असा निषेध केला नाहीं तरी चालेल.

तो निषेध केला नाहीं तर 'काण्डे', 'कुड्ये', या प्रत्ययान्त पदांना प्रातिपदिकसंज्ञा कां होत नाहीं?

त्या ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा न होण्याचें कारण असें की, पुढील सूत्रामध्यें कृत् आणि तद्धित असे जे शब्द उच्चारले आहेत ते नियमार्थ होतील. तो नियम असा की, प्रत्ययान्ताला जर अर्थवत् या प्रकृतसूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होईल तर कृत्प्रत्ययान्त किंवा तद्धितप्रत्ययान्त अशा शब्दालाच होईल. याशिवाय इतर प्रत्ययान्त शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होणार नाहीं.

(वा.१) ही जी प्रकृतसूत्रानें अर्थवानाला प्रातिपदिकसंज्ञा सांगितली आहे तिच्यासंबंधानें असा दोष येतो की, अनेक पदांच्या समुदायाला मिळून प्रातिपदिकसंज्ञा होऊं लागेल; उदा०— दश दाडिमानि, षडपूपाः, कुण्डमजाजिनं, पललपिण्डः, अधरोरुकमेतत्कुमार्याः स्फैयकृतस्य पिता प्रतिशीनः. पण या ठिकाणीं प्रत्येक शब्दाला जरी अर्थ आहे तरी अनेक पदें मिळून झालेल्या[५] या संबंध वाक्यसमुदायाला अर्थ मुळींच नाहीं.

(वा.२) 'समुदायाला अर्थ नाहीं' असें म्हणाल तर तें बरोबर दिसत नाहीं. कारण आंतील अवयवांना म्हणजे प्रत्येक पदाला अर्थ असल्यामुळें समुदायालाही अर्थ आहे असें गृहीत धरावें लागतें. अवयव जर अर्थवान् असतील तर तेथें त्यामुळें त्यांचा समुदायही अर्थवान् होत असतो. लोकाप्रमाणेंच हें होय. जसें लोकांमध्यें 'हें शहर मोठें संपन्न आहे' अथवा 'हें शहर गोमत् आहे' असें म्हटलें जातें. पण वस्तुतः विचार केला तर त्या शहरांतील सर्व मिळून संपन्न असत नाहींत, व गोमत् म्हणजे गाई वगैरे बाळगणारे असेही असत नाहींत[६].

पण तुम्ही 'लोकांमध्यें असें दृष्टीस पडतें' असें म्हणत आहांत. परंतु लोकांमध्यें अवयवच अर्थवान् आहेत. समुदाय अर्थवान् असत नाहीं. शिवाय लोकांमध्यें अवयवच अर्थवान्

५. दश याचा दाडिमाशीं संबंध असल्यामुळें 'दश दाडिमानि' हें वाक्य अर्थवान् म्हणतां येतें. तसेंच षडपूपाः वगैरे वाक्यें देखील अर्थवान् आहेत. तथापि त्या वाक्यांचा परस्परसंबंध नसल्यामुळें त्या वाक्यसमुदायाला अर्थवान् म्हणतां येत नाहीं.

६. तर त्यांतील कांहीं लोक तसे असतात. पण तेवढ्यावरून म्हणजे अवयवांवरील गुणधर्म समुदायावर लादून हें शहर संपन्न आहे, इत्यादि व्यवहार जगांत दृष्टीस पडतात. तसें येथेंही अवयवांवरील अर्थवत्त्व वाक्यांच्या समुदायावर लादून प्रातिपदिकसंज्ञा होऊं लागेल.

दायाः । आतश्चावयवा एवार्थवन्तो न समुदाया यस्य हि तद्द्रव्यं भवति स तेन कार्यं करोति यस्य च ता गावः सन्ति स तासां क्षीरं घृतं चोपभुङ्क्ते-ऽन्यैरेतद्द्रष्टुमप्यशक्यम् । का तर्हीयं वाचोयुक्तिराढ्यमिदं नगरं गोमदिदमिति एषैषा वाचोयुक्तिः । इह तावदाढ्यमिदं नगरमित्यकारो मत्वर्थीयः । आढ्या अस्मिन्सन्ति तदिदमाढ्यमिति । गोमदिदमिति मत्वन्तान्मत्वर्थीयो लुप्यते ॥ एवमपि

**वाक्यप्रतिषेधोऽर्थवत्त्वात् ॥ ३ ॥**

वाक्यस्य प्रातिपदिकसंज्ञायाः प्रतिषेधो वक्तव्यः । देवदत्त गामभ्याज शुक्लाम् देवदत्त गामभ्याज कृष्णामिति । किं कारणम् । अर्थवत्त्वात् । अर्थवद्ध्येतद्वाक्यं भवति ॥ न वै पदार्थादन्यस्यार्थस्योपलब्धिर्भवति वाक्ये ।

**पदार्थादन्यस्यानुपलब्धिरिति चेत्पदार्थाभिसंबन्धस्योपलब्धिः ॥ ४ ॥**

---

आहेत, समुदाय अर्थवान् नाहींत याचें कारण असें की, ज्याच्या मालकीचें जें द्रव्य असेल त्याला त्या द्रव्याच्या योगानें वाटेल तें कार्य करतां येतें. तसेंच ज्याच्या मालकीच्या ज्या गाई असतील त्या गाईच्या दूध, तूप, वगैरे पदार्थांचा वाटेल तसा त्याला उपयोग करून घेता येतो. पण इतरांना मात्र त्या द्रव्याकडे किंवा त्या गाईकडे बघण्याचीही सोय नाहीं.

तर मग हें शहर संपन्न आहे' किंवा 'हें शहर गोमत् आहे' अशी जी लोकांमध्यें बोलण्याची पद्धत दृष्टीस पडते तिची काय वाट ?

ही पद्धत आपली अशीच आहे, म्ह. तशी एक बोलण्याची ढब आहे. खरेंच सर्व शहर संपन्न आहे असें समजूं नये. 'आढ्यमिदं नगरम्' या वाक्यामध्यें संपन्न या अर्थाच्या 'आढ्य' या शब्दापुढें 'तसे आढ्य लोक ज्या नगरामध्यें आहेत' या अर्थी 'अ' हा प्रत्यय झालेला आहे. तेव्हां आढ्य लोक ज्यामध्यें आहेत तें नगर आढ्य होय. तसेंच गोमत् म्हणजे गाई बाळगणारे लोक ज्या नगरामध्यें आहेत तें नगर गोमत् होय. येथें गोमत् या मतुप्प्रत्ययान्त शब्दाहून पुनः आणखी 'ते गोमत् लोक ज्यामध्यें आहेत' अशा अर्थी दुसरा प्रत्यय करून त्याचा लोप झालेला आहे.

अशा रीतीनें निरर्थक अशा पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा झाली नाहीं तरी—

(वा.३) वाक्याला प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध सांगितला पाहिजे; उदा०—देवदत्त गामभ्याज शुक्लाम्, देवदत्त गामभ्याज कृष्णाम्.

येथें कशाकरितां निषेध सांगितला पाहिजे ?

या वाक्याला अर्थ असल्यामुळें येथें संबंध वाक्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊं नये म्हणून अनेक पदांचा परस्पर अन्वय होऊन तयार झालेलीं अशीं हीं वाक्यें अर्थवान् असतात.

हा निषेध करावयास नको. कारण प्रत्येक पदापासून मनांत येणाऱ्या अर्थापेक्षां निराळा असा अर्थ संबंध वाक्यापासून कांहींच मनांत येत नाहीं.

(वा.४) 'प्रत्येक पदापासून मनांत येणाऱ्या

---

७. अवयवांना अर्थ असला म्हणजे त्यांच्या समुदायालाही अर्थ असतो असें लोकांमध्यें स्वयंसिद्ध आहे असें म्हटलें गेलें. परंतु जगावर जर नजर फेकली तर तसें दिसून येत नाहीं. उलट अन्वयव्यतिरेकावरून अवयवांनाच अर्थ असतो आणि त्यांच्या समुदायाला नसतो असेंच ठरतें. तेव्हा अवयवाला अर्थ असला तरी त्यांच्या समुदायाला अर्थवत्त्व लौकिकयुक्तीनें पटवून देतां येत नाहीं.

८. 'अर्शआदिभ्योऽच्' (५।२।१२६) या सूत्रानें. तेव्हां अवयवाचे गुणधर्म समुदायावर लादून 'आढ्यं नगरम्' असें लोकांत म्हणत नाहीत, हें सिद्ध झालें.

९. गोमत्शब्दाहून ते गोमत् लोक ज्यामध्यें आहेत अशा अर्थाला दाखविणारा 'एकगोपूर्वाट्ठञ्' (५।२।११८) या सूत्रानें ठञ्प्रत्यय करून त्याचा भाष्यकारांच्या जबाबदारीवर लोप होतो.

पदार्थादन्यस्यानुपलब्धिरिति चेदेवमुच्यते । पदार्थाभिसंबन्धस्योपलब्धिर्भवति वाक्ये । इह देवदत्त इत्युक्ते कर्ता निर्दिष्टः कर्म क्रियागुणौ चानिर्दिष्टौ । गामित्युक्ते कर्म निर्दिष्टं कर्ता क्रियागुणौ चानिर्दिष्टौ । अभ्याजेत्युक्ते क्रिया निर्दिष्टा कर्तृकर्मणी गुणश्चानिर्दिष्टः । शुक्लामित्युक्ते गुणो निर्दिष्टः कर्तृ कर्मणीक्रिया चानिर्दिष्टा । इहेदानीं देवदत्त गामभ्याज शुक्लामित्युक्ते सर्वं निर्दिष्टं भवति । देवदत्त एव कर्ता नान्यः । गौरेव कर्म नान्यत् । अभ्याजिरेव क्रिया नान्या । शुक्लामेव न कृष्णामिति । एतेषां पदानां सामान्ये वर्तमानानां यद्विशेषेऽवस्थानं स वाक्यार्थः ॥

**तस्मात्प्रतिषेधः ॥ ५ ॥**

तस्मात्प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः ।

**अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थम् ॥ ६ ॥**

अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थं भविष्यति । समास एवार्थवतां समुदायानां प्रातिपदिकसंज्ञो भवति नान्य इति ॥ यदि नियमः क्रियते प्र-

---

(वा.४)'अर्थापेक्षां निराळा असा सबंध वाक्यापासूनकांहींच अर्थ मनांत येत नाहीं' असें म्हणाल तर त्यासंबंधानें आम्हांला असें सांगावयाचें आहे की, पदार्थांचा जो संबंध म्हणजे अन्वय तो वाक्यापासून मनांत येत आहे.

असें पाहा की, वरील वाक्यापैकींच नुसता 'देवदत्त' असा एकच शब्द उच्चारला असतां तेथें कर्ता दाखविला जात आहे, पण कर्म कोणतें, त्या कर्मांचा गुण कोणता आणि क्रिया कोणती हें कांहीं दाखविलें जात नाहीं; तसेंच नुसतें 'गाम्' असें उच्चारलें असतां गो हें कर्म दाखविलें जातें, पण कर्ता कोण, क्रिया कोणती आणि त्या कर्मांचा गुण कोणता, हें कांहीं दाखविलें जात नाहीं; तसेंच 'अभ्याज' एवढें क्रियापदच उच्चारलें तर आणणें ही क्रिया दाखविली जाते, पण कर्ता कोण, कर्म कोण, कर्मांचा गुण काय, हें कांहींच दाखविलें जात नाहीं. तसेंच नुसतें 'शुक्लाम्' एवढेंच उच्चारलें तर 'पांढऱ्या रंगाची' असा फक्त गुण दाखविला जातो. पण कर्ता कोण, कर्म कोण, क्रिया कोणती, हें कांहींच दाखविलें जात नाहीं. आणि आतां जर 'देवदत्त गामभ्याज शुक्लाम्' असें सबंध वाक्य उच्चारलें तर मात्र सर्व दाखविलें जातें. तें असें की, देवदत्त हाच कर्ता, दुसरा कोणी नव्हे; गो हेंच कर्म, दुसरें कोणी नव्हे; अभ्याज हीच क्रिया, दुसरी कोणी नाहीं; आणि शुक्ल हाच गुण, दुसरा कोणी नव्हे. तेव्हां सर्वसामान्य रीतीनें कोणत्याही इतर पदार्थाशीं अन्वय करण्याला योग्य अशा पदांचें 'ज्याच्याजवळ दुसरें पद उच्चारून अमुकच ठिकाणीं त्याचा अन्वय आहे' असें जें विशेष दाखविलें जातें तो वाक्यापासून मनांत येणारा अर्थ होय.[१०]

(वा.५) तेव्हां 'वाक्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको. कारण---

(वा.६) अर्थवान् अशा समुदायाला प्रातिपदिकसंज्ञेच्या संबंधानें पुढील सूत्रांतील समासग्रहण नियमार्थ होईल. तो नियम असा की, अर्थवान् अशा समुदायाला जर प्रकृतसूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होईल तर ती फक्त समासालाच होईल. त्याशिवाय इतराला म्हणजे वाक्याला होणार नाहीं.

पण असा जर नियम केला तर बहुपटवः, उच्चकैः, नीचकैः, या ठिकाणीं प्रकृति आणि

---

१०. तात्पर्य विशेष्यविशेषणभाव हा संसर्ग (अन्वय) पदार्थापेक्षां निराळा वाक्यापासूनच मनांत येत असल्यामुळें वाक्य हें त्या पदार्थसंसर्गाचें वाचक होय.

कृतिप्रत्ययसमुदायस्य प्रातिपदिकसंज्ञा न प्राप्नोति । बहुपटवः उच्चकैरिति । किं पुनरत्र प्रातिपदिकसंज्ञया प्रार्थ्यते । प्रातिपदिकादिति स्वाद्युत्पत्तिर्यथा स्यात् । नैष दोषः । यथैवात्राप्रातिपदिकत्वात्स्वाद्युत्पत्तिर्न भवत्येवं लुगपि न भविष्यति । तत्र यैवासावन्तर्वर्तिनी विभक्तिस्तस्या एव श्रवणं भविष्यति । नैवं शक्यम् । स्वरे हि दोषः स्यात् । बहुपटव इत्येवं स्वरः प्रसज्येत बहुपटव इति चेष्यते । पठिष्यति ह्याचार्यः 'चितः सप्रकृतेर्बह्वकजर्थम्' (६।१।१६३ वा. १) इति । तस्यां पुनर्लुप्तायां यान्या विभक्तिरुत्पद्यते तस्याः प्रकृत्यनेकदेशत्वादन्तोदात्तत्वं न भविष्यति ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति प्रकृतिप्रत्ययसमुदायस्य प्रातिपदिकसंज्ञेति यदयमप्रत्यय इति प्रतिषेधं शास्ति । स च तदन्तप्रतिषेधः ।

---

प्रत्यय हीं दोन मिळून झालेला जो समुदाय त्याला प्रातिपदिकसंज्ञा होणार नाहीं.

या ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा करून कर्तव्य काय ?

कर्तव्य असें की, प्रातिपदिकाहून होणारें जे सु वगैरे विभक्तिप्रत्यय ते 'बहुपटु जस्' या प्रातिपदिकाहून पुढें झाले पाहिजेत.

हा दोष येत नाहीं. कारण 'बहुपटु जस्' याला प्रातिपदिकसंज्ञा नसल्यामुळें जसा त्याच्या पुढें विभक्तिप्रत्यय उत्पन्न होणार नाहीं तसा त्यांतील 'जस्' या सुप्प्रत्ययाचा लुक् देखील प्रातिपदिकसंज्ञा नसल्यामुळें होणार नाहीं. तेव्हां अर्थातच 'बहुपटु जस्' यामधील जो बहुच्प्रत्यय करण्याकरितां पटुशब्दाहून केलेला जस् प्रत्यय तोच कायम राहील.

अशा रीतीनें या उदाहरणाची वाट लावतां येणार नाहीं. कारण 'बहुपटवः' हें उदाहरण जरी साधलें तरी त्यांतील स्वरासंबंधानें दोष येतो. तो असा—पटुशब्दाहून केलेला जस् प्रत्यय जर कायम राहिला तर बहुपटवः असें हें पद अन्तोदात्त होईल. आणि बहुपटवः असा 'ट' या अक्षरांतील अकार उदात्त इष्ट आहे. आचार्य वार्तिककारांनीं 'चितः' (६।१।१६३) या सूत्रावर असें म्हटलें आहे की, 'चित्प्रत्ययामुळें होणारा अन्त्यवर्णाला उदात्त हा चित्प्रत्यय आणि त्याची प्रकृति हे दोन मिळून जो समुदाय होतो त्याच्या अन्त्य वर्णाला करावा, कारण बहुच् आणि अकच्प्रत्यय या ठिकाणीं तसाच होणें इष्ट आहे.' (तेव्हां बहुच्प्रत्ययाची 'पटु जस्' ही प्रकृति असल्यामुळें बहुच् या चित्प्रत्ययामुळें होणारा अन्तोदात्त जस्प्रत्ययांतील अकाराला होईल.) आणि 'बहुपटु जस्' याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन जस् या विभक्तीचा लुक् झाला म्हणजे मात्र जी पुनः बहुपटु याहून जस् ही विभक्ति उत्पन्न होते ती बहुच् प्रत्ययाच्या प्रकृतीपैकीं नसल्यामुळें त्या जस्प्रत्ययांतील अकाराला अन्तोदात्त होत नाहीं. (तर त्याच्या मागील वर्णालाच होतो. एकंदरींत 'बहु पटु जस्' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा झाली पाहिजे ती समासग्रहण नियमार्थ मानल्यानें होणार नाहीं असा दोष येतो.)

तर मग हा दोष आम्ही एका ज्ञापकानें दूर करतों. तें ज्ञापक असें की, हा आचार्य पाणिनि प्रकृतसूत्रामध्यें 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा निषेध सांगतो त्यावरून तो असें सुचवितो की, 'प्रकृति आणि प्रत्यय हे दोन मिळून होणाऱ्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा[११] होते.'

---

११. 'अर्थवान् समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा करणें झाल्यास समासालाच करावी' असा समासग्रहणानें नियम केला असल्यामुळें 'गां पश्य' वगैरे वाक्यांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं. त्याप्रमाणें जेथें प्रत्यय पूर्वीं आहे, मध्यें आहे, किंवा शेवटीं आहे, अशा तीन प्रकारच्या अर्थवत्समुदायाला देखील प्रातिपदिक संज्ञा होणार नाहींच. मग त्या तिघांतील एका म्ह. प्रत्यय शेवटीं असलेल्या समु-

स तर्हि ज्ञापकार्थः प्रत्ययप्रतिषेधो वक्तव्यः। ननु चायं प्राप्त्यर्थोऽपि वक्तव्यः। नार्थः प्राप्त्यर्थेन। कृत्तद्धितग्रहणं नियमार्थं भविष्यति। कृत्तद्धितान्तस्यैव प्रत्ययान्तस्य प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति नान्यस्य प्रत्ययान्तस्येति। स एषोऽनन्यार्थः प्रत्ययप्रतिषेधो वक्तव्यः प्रकृतिप्रत्ययसमुदायस्य वा प्रातिपदिकसंज्ञा वक्तव्या॥ उभयं न वक्तव्यम्। तुल्यजातीयस्य नियमः। कश्च तुल्यजातीयः। यथाजातीयकानां समासः। कथंजातीयकानां समासः। सुबन्तानाम्॥ सुप्तिङ्समुदायस्य तर्हि प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति। सुप्तिङ्समुदायस्य प्रातिपदिकसंज्ञारभ्यते। जहि कर्मणा बहुलमाभीक्ष्ण्ये कर्तारं चाभिदधातीति। तन्नियमार्थं भविष्यति। एतस्यैव सुप्तिङ्समुदायस्य प्रातिपादिकसंज्ञा भवति नान्यस्येति॥ तिङ्समुदायस्य तर्हि प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति। तिङ्समुदायस्यापि प्रातिपदिक-

---

तर मग ज्ञापकाकरितां प्रकृतसूत्रामध्यें 'अप्रत्ययः' असा प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध सांगितला पाहिजे.

पण या ज्ञापकाकरितांच नव्हे तर प्रत्ययान्ताला प्राप्त झालेल्या प्रातिपदिक संज्ञेचा निषेध व्हावा याकरितांही 'अप्रत्यय' असें म्हटलेंच पाहिजे ना?

प्रत्ययान्ताला प्राप्त झालेल्या प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध व्हावा याकरितां 'अप्रत्ययः' असें प्रकृतसूत्रामध्यें म्हणावयास नको. कारण पुढील सूत्रामध्यें कृदन्ताला आणि तद्धितान्ताला जी प्रातिपदिकसंज्ञा सांगितली आहे ती नियमार्थ होईल. तो नियम असा की, प्रत्ययान्त शब्दस्वरूपाला जर प्रातिपदिकसंज्ञा होईल तर तें शब्दस्वरूप कृदन्त किंवा तद्धितान्त असेल तरच होईल. अर्थात् इतर प्रत्ययान्ताला होणार नाहीं. अशा रीतीनें 'अप्रत्यय' याचा दुसरा कांहीं एक उपयोग संभवत नाहीं. तेव्हां एक असें की वर दाखविलेल्या ज्ञापकाकरितांच 'अप्रत्ययः, असा निषेध तरी म्हटला पाहिजे किंवा प्रकृति आणि प्रत्यय हे दोन मिळून होणाऱ्या समुदायाला स्वतंत्र रीतीनें प्रातिपदिकसंज्ञा तरी सांगितली पाहिजे.

पण या दोहोंपैकीं कांहींच करावयास नको. कारण पुढील सूत्रामध्यें समासग्रहणानें जो नियम केला आहे तो सजातीयासंबंधानेंच लागू होतो.

तेथें कोण बरें सजातीय असें समजावें?

जशा प्रकारच्या शब्दांचा समास होतो तशा शब्दांचा समुदाय हा समासाशीं सजातीय असा समजावा.

कशा प्रकारच्या शब्दांचा समास होत असतो?

अनेक सुबन्तांचा समास होत असतो. (तेव्हां अनेक सुबन्तांचा जो समुदाय 'राज्ञः पुरुषः' वगैरे तशा समुदायाला प्रातिपदिकसंज्ञेची नियमानें व्यावृत्ति होईल. 'बहु पटु जस्' अशा प्रकृति आणि प्रत्ययांच्या समुदायाची व्यावृत्ति होणार नाहीं. तेव्हां त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन काम भागेल.)

पण असा सजातीयासंबंधानेंच नियम मानला तर सुबन्त आणि तिङन्त यांच्या समुदायाला म्ह. 'देवदत्तः पचति' अशा वाक्यांना प्रातिपदिकसंज्ञा होऊं लागेल.

पण सुबन्त आणि तिङन्त यांच्या समुदायाला कांहीं ठिकाणीं मुद्दाम प्रातिपदिकसंज्ञा सांगितली आहे. म्हणजे 'जहि कर्मणा बहुल माभीक्ष्ण्ये कर्तारं चाभिदधाति' (६।१।७२ गणसू.) या वचनानें तिङन्त आणि सुबन्त यांच्या समुदायाला समाससंज्ञा, प्रातिपदिक-

---

दायाला ज्यापेक्षां प्रकृतसूत्रामध्यें पाणिनीनें निषेध केला आहे त्यापेक्षां 'प्रकृतिप्रत्ययसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होणें इष्ट आहे' असें पाणिनीच्या मनांत आहे असें समजतें.

संज्ञारभ्यते । आख्यातमाख्यातेन क्रियासातत्य इति । तन्नियमार्थं भविष्यति । एतस्यैव तिङ्समुदायस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति नान्यस्येति ॥

**अर्थवत्ता नोपपद्यते केवलेनावचनात् ॥ ७ ॥**

अर्थवत्ता नोपपद्यते वृक्षशब्दस्य । किं कारणम् । केवलेनावचनात् । न केवलेन वृक्षशब्देनार्थो गम्यते । केन तर्हि । सप्रत्ययकेन ॥

**न वा प्रत्ययेन नित्यसंबन्धात्केवलस्याप्रयोगः ॥ ८ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । प्रत्ययेन नित्यसंबन्धात् । नित्यसंबन्धावेतावर्थौ प्रकृतिः प्रत्यय इति । प्रत्ययेन नित्यसंबन्धात्केवलस्य प्रयोगो न भविष्यति ॥ अन्यद्भवान्पृष्टोऽन्यदाचष्टे । आम्रान्पृष्टः कोविदारानाचष्टे । अर्थवत्ता नोपपद्यते केवलेनावचनादिति भवानस्माभिश्चोदितः केवलस्याप्रयोगे हेतुमाह । एवं च किल नाम कृत्वा चोद्यते समुदायस्यार्थे प्रयोगादवयवानामप्रसिद्धिरिति ॥

**सिद्धं त्वन्वयव्यतिरेकाभ्याम् ॥ ९ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अन्वयाद्व्यति-

---

संज्ञा होण्याकरतां सांगितली आहे. तेव्हां ती नियमार्थ घेतां येईल. नियम असा की, तिङन्तांच्या समुदायाला जर प्रातिपदिकसंज्ञा होईल तर तशा तऱ्हेच्या समासालाच होईल. इतरांना (म्ह. तशा प्रकारच्या 'पचति भवति' इत्यादि वाक्यांना प्रातिपदिकसंज्ञा) होणार नाहीं.

(वा.७) वृक्ष वगैरे शब्द अर्थवान् आहेत असें म्हणतां येत नाहीं.

कां बरें ?

नुसत्या शब्दानें कांहींच अर्थ दाखविला जात नाहीं म्हणून; म्ह. पुढील विभक्तिप्रत्ययाशिवाय नुसत्या वृक्ष वगैरे शब्दांपासून लोकांमध्यें कांहींच मनांत येत नाहीं.

तर मग लोकांमध्यें अर्थाचा बोध कोणापासून होतो ?

विभक्तिप्रत्ययासहित शब्दापासून लोकांना अर्थाचा बोध होतो.

(वा.८) हा दोष येत नाहीं.

का बरें ?

प्रत्ययाशीं नित्य संबंध आहे म्हणून. प्रकृति म्ह. मूळशब्द आणि त्याच्या पुढील विभक्तिप्रत्यय ह्या दोहोंचा कायमचा संबंध आहे. तेव्हां वृक्ष वगैरे मूळ शब्दांचा विभक्तिप्रत्ययाशीं कायमचा संबंध असल्यामुळें विभक्तीशिवाय नुसत्या वृक्ष वगैरे शब्दांचा प्रयोग होत नाहीं.

काय हो, आम्हीं तुम्हांला विचारलें काय आणि तुम्ही उत्तर देतां काय ? आंब्याच्या झाडाबद्दल प्रश्न केला असतां तेथें कांचनाच्या झाडाची माहिती सांगत बसणें अशांतलेंच हें होत आहे. 'वृक्ष या शब्दाला अर्थ नाहीं. कारण नुसत्या शब्दापासून कांहींच अर्थाचा बोध होत नाहीं' असें आम्हीं विचारलें, त्यावर तुम्ही नुसत्या वृक्षशब्दाचा प्रयोग कां होत नाहीं याचें कारण दाखवितां.

हें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण लोकांमध्यें अर्थबोध होण्याकरतां समुदायाचाच प्रयोग केला जातो म्हणून अवयवाला म्हणजे नुसत्या शब्दाला अर्थ नाहीं म्हणूनच तेवढ्याचा प्रयोग होत नाहीं, अशा समजुतीनेंच तुम्हीं प्रश्न विचारला आहे ना ? (पण वस्तुस्थिति पाहतां नुसत्या शब्दाचा जो प्रयोग होत नाहीं याचें कारण 'त्याला अर्थ नाहीं' हें नव्हे. तर 'त्याचा विभक्तिप्रत्ययाशीं कायमचा संबंध आहे' हें होय.

(आतां 'त्या नुसत्या शब्दाला अर्थ आहेच' असें तरी कशावरून गृहीत धरावें ? असें म्हणाल तर सांगतों–)

(वा.९) नुसत्या शब्दाला अर्थ आहे हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

**रेकाच्च । कोऽसावन्वयो व्यतिरेको वा । इह वृक्ष इत्युक्ते कश्चिच्छब्दः श्रूयते वृक्षशब्दोऽकारान्तः सकारश्च प्रत्ययः । अर्थोऽपि कश्चिद्गम्यते मूलस्कन्धफलपलाशवानेकत्वं च । वृक्षावित्युक्ते कश्चिच्छब्दो हीयते कश्चिदुपजायते कश्चिदन्वयी । सकारो हीयत औकार उपजायते वृक्षशब्दोऽकारान्तोऽन्वयी । अर्थोऽपि कश्चिद्धीयते कश्चिदुपजायते कश्चिदन्वयी । एकत्वं हीयते द्वित्वमुपजायते मूलस्कन्धफलपलाशवानन्वयी । ते मन्यामहे यः शब्दो हीयते तस्यासावर्थो योऽर्थो हीयते यः शब्द उपजायते तस्यासावर्थो योऽर्थ उपजायते यः शब्दोऽन्वयी तस्यासावर्थो योऽर्थोऽन्वयी ॥ विषम उपन्यासः । बहवो हि शब्दा एकार्था भवन्ति । तद्यथा । इन्द्रः शक्रः पुरुहूतः पुरंदरः । कन्दुः कोष्ठः कुशूल इति । एकश्च शब्दो बह्वर्थः । तद्यथा । अक्षाः पादाः माषा इति । अतः किं न साधीयोऽर्थवत्ता सिद्धा भवति ।**

अन्वय आणि व्यतिरेक यांवरून तें सिद्ध होतें.

तो अन्वय कोणता आणि व्यतिरेक कोणता ?

असें पाहा की, 'वृक्षः' असें म्हटलें असतां तेथें कांहीं शब्द ऐकू येतो. अकारान्त वृक्ष शब्द आणि दुसरा सकारप्रत्यय. तसाच तेथें देखील कांहीं अर्थ प्रतीत होतो. एक 'फळें, मुळें, पानें व खांद्या यांनीं युक्त असें झाड' आणि दुसरा 'त्या झाडाची एकत्वसंख्या.' तसेंच 'वृक्षौ' असें म्हटलें असतां तेथें वृक्षः येथील शब्दापेक्षां एखादा शब्द कमी होतो, एखादा अधिक होतो आणि एखादा त्यांतील कायमच राहिलेला दिसतो. वृक्षः येथें जो सकारप्रत्यय ऐकूं येत होता तो वृक्षौ येथें ऐकूं येत नाहीं; वृक्षः येथें औकारप्रत्यय ऐकूं येत नव्हता तो वृक्षौ येथें ऐकूं येत आहे; अकारान्त वृक्षशब्द मात्र दोन्ही ठिकाणीं सारखाच ऐकूं येत आहे. तसाच अर्थ देखील एखादा कमी होतो, एखादा अधिक होतो आणि एखादा कायमच राहिलेला दिसतो. वृक्षः येथें जी एकत्वसंख्या भासते ती वृक्षौ येथें भासत नाहीं. वृक्षः येथें द्वित्वसंख्या भासत नव्हती ती वृक्षौ येथें भासत आहे, आणि 'फळें, मुळें, पानें व खांद्या यांनीं युक्त झाड' हें मात्र दोन्ही ठिकाणीं सारखेंच भासत आहे; तेव्हां यावरून आम्ही असें मानतों की, एखाद्या ठिकाणीं जो शब्द ऐकूं येत नाहीं त्या शब्दाचाच तो अर्थ समजावा की जो अर्थ तेथें भासत नाहीं. तसेंच जो शब्द अधिक ऐकूं येतो त्या शब्दाचाच तो अर्थ समजावा की जो अर्थ तेथें अधिक भासतो. तसेंच जो शब्द दोन्ही ठिकाणीं सारखाच ऐकूं येतो त्या शब्दाचाच तो अर्थ समजावा की जो अर्थ दोन्ही ठिकाणीं सारखाच प्रतीत होतो.

हा युक्तिवाद बरोबर दिसत नाहीं. कारण एकाच अर्थाचे पुष्कळ शब्द असतात; जसें– इन्द्र, शक्र, पुरुहूत आणि पुरंदर. या चारही शब्दांचा 'इन्द्र' असा एकच अर्थ आहे. कन्दु, कोष्ठ आणि कुशूल यांचा एकच अर्थ (धान्यागार असा) आहे. तसेंच एका शब्दाचे पुष्कळ अर्थही असतात, उदा०–अक्ष, पाद, माष, हे शब्द पाहा.[१२]

मग असें असलें म्हणून काय झालें ?

इतकेंच झालें की शब्दाचें अर्थवत्त्व

१२. जर 'एका शब्दाला एकच अर्थ' असा नियम असेल तर हे अन्वयव्यतिरेक बरोबर जुळून येतील. पण तसा नियम दिसत नाहीं. कांहीं ठिकाणीं अनेक शब्दांना एकच अर्थ असतो. आणि कांहीं ठिकाणीं एकाच शब्दाला अनेक अर्थ असतात. तेव्हां इन्द्र या शब्दापासून जो अर्थ प्रतीत होतो, त्या अर्थाची प्रतीति इन्द्र शब्द नसेल त्या ठिकाणीं न झाली पाहिजे. परंतु 'शक्रः' येथें इन्द्रशब्द नसतांही त्या अर्थाची प्रतीति होते. तेव्हां येथें व्यतिरेक जुळत नाहीं. तसेंच अक्ष शब्द उच्चा-

न ब्रूमोऽर्थवत्ता न सिध्यतीति । वर्णितार्थवत्तान्वयव्यतिरेकाभ्यामेव । तत्र कुत एतदयं प्रकृत्यर्थोऽयं प्रत्ययार्थ इति न पुनः प्रकृतिरेवोभावर्थौ ब्रूयात्प्रत्यय एव वा । सामान्यशब्दा एत एवं स्युः । सामान्यशब्दाश्च नान्तरेण विशेषं प्रकरणं वा विशेषेष्ववतिष्ठन्ते । यतस्तु खलु नियोगतो वृक्ष इत्युक्ते स्वभावतः कस्मिंश्चिदर्थे प्रतीतिरुपजायतेऽतो मन्यामहे नेमे सामान्यशब्दा इति । न चेत्सामान्यशब्दाः प्रकृतिः प्रकृत्यर्थे वर्तते प्रत्ययः प्रत्ययार्थे ॥

किं पुनरिमे वर्णा अर्थवन्त आहोस्विदनर्थकाः ।

**वर्णस्यार्थवदनर्थकत्व उक्तम् ॥ १० ॥**

किमुक्तम् । अर्थवन्तो वर्णा धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामेकवर्णानामर्थदर्शनाद्वर्णव्यत्यये चार्थान्तरगमनाद्वर्णानुपलब्धौ चानर्थगतेः संघातार्थवत्त्वाच्च । संघातस्यै-

---

बरोबर सिद्ध होत नाहीं.

'शब्द अर्थवान् आहे हें सिद्ध होत नाहीं' असें आमचें म्हणणें नाहीं. तुम्हीं ज्या शब्दाचा अर्थ दाखविला तो अन्वय आणि व्यतिरेक यांवरूनच सिद्ध होत आहे, पण त्यामध्यें इतकाच मूळ शब्दाचा अर्थ आहे आणि इतकाच प्रत्ययाचा अर्थ आहे असा विभाग कसा सिद्ध होतो? दोन्ही अर्थ मूळ शब्दाचेच कशावरूनच नव्हेत[१३]? किंवा ते दोन्ही अर्थ प्रत्ययाचे कशावरून नव्हेत ?

पण असें मानलें तर वृक्ष वगैरे मूळ शब्द आणि पुढील सु वगैरे प्रत्यय हे अगदींच सामान्य अर्थाचे शब्द आहेत असें मानावें लागेल. आणि सामान्य शब्द तर कांहीं विशेष शब्द जवळ नसल्यास किंवा कांहीं प्रकरण उपस्थित होत नसल्यास ते विशेष अर्थाला कधींही दाखवीत नाहींत. परंतु प्रकृत स्थळीं पाहिलें तर वृक्ष असें नुसतें म्हटल्याबरोबर त्यापासून स्वभावतःच एक विशेष अर्थ मनांत येतो. तेव्हां त्यावरून आम्ही असें मानतों की, मूळ वृक्ष वगैरे शब्द आणि सु वगैरे प्रत्यय हे सामान्य शब्द नव्हेत. आणि अशा रीतीनें जर हे सामान्य शब्द नव्हेत तर मूळ शब्द हा आपला कांहीं तरी विशेष अर्थ दाखवितो. आणि प्रत्यय हा देखील आपला कांहीं तरी विशेष अर्थ दाखवितो असेंच गृहीत धरावें लागतें.

आतां (वर्ण अनर्थक असल्यामुळें त्यांना प्रत्येकीं प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं असें पूर्वीं सांगितलें, परंतु) वर्ण हे अर्थवान् आहेत किंवा खरोखर अनर्थकच आहेत ?

(वा.१०) वर्ण अर्थवान् आहेत किंवा अनर्थक आहेत याविषयीं आचार्य वार्तिककारांनीं पूर्वीं (प्रत्याहाराह्निकामध्यें) सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तें असें सांगितलें आहे की, वर्ण हे अर्थवान् आहेत. कारण धातु, प्रातिपदिक, प्रत्यय आणि निपात हे कांहीं ठिकाणीं वर्णरूपच असून त्यांना अर्थ असलेला दृष्टीस पडतो तसेंच कांहीं शब्दांमध्यें एखादा वर्ण बदलला की लगेच तेवढ्यानें निराळा अर्थ प्रतीत होतो, तसेंच कांहीं ठिकाणीं एखादा वर्ण ऐकू आला नाहीं की तेवढ्यानें त्याचा अर्थ मनांत येत नाहीं. आणि वर्णांना अर्थ आहे म्हणून समुदायापासून अर्थ मनांत येतो. आतां वर्णांना जरी अर्थ आहे तरी त्याहून

---

रला असतांही कांहीं ठिकाणीं गाडीचा कणा या अर्थाची प्रतीति होत नाहीं. फासे या अर्थाची प्रतीति होते. तेव्हां येथें अन्वय जमत नाहीं. एकंदरींत अन्वयव्यतिरेक हे कुचकामाचे ठरतात. तेव्हां वृक्षः वृक्षौ येथें एकत्व आणि द्वित्व प्रत्ययाचेच अर्थ आहेत असा निश्चय होत नाहीं.

१३. कारण एका शब्दाचे अनेक अर्थ असू शकतात.

कार्थ्यात्सुबभावो वर्णात् । अनर्थकास्तु प्रतिवर्णमर्थानुपलब्धेर्वर्णव्यत्ययापायोपजनविकारेष्वर्थदर्शनादिति ॥ तत्रेदमपरिहृतं संघातार्थवत्त्वाच्चेति । तस्य परिहारः ।

**संघातार्थवत्त्वाच्चेति चेद्दृष्टो ह्यतदर्थेन गुणेन गुणिनोऽर्थभावः ॥११॥**

संघातार्थवत्त्वाच्चेति चेद्दृश्यते हि पुनरतदर्थेन गुणेन गुणिनोऽर्थभावः । तद्यथा । एकस्तन्तुस्त्वक्त्राणेऽसमर्थस्तत्समुदायश्च कम्बलः समर्थः । एकश्च तण्डुलः क्षुत्प्रतिघातेऽसमर्थस्तत्समुदायश्च वर्धितकं समर्थम् । एकश्च बल्वजो बन्धनेऽसमर्थस्तत्समुदायश्च रज्जुः समर्था भवति ॥ विषम उपन्यासः । भवति हि तत्र या च यावती चार्थमात्रा । भवति हि किंचित्प्रत्येकस्तन्तुस्त्वक्त्राणे समर्थ एकश्च तण्डुलः क्षुत्प्रतिघाते समर्थ एकश्च बल्वजो बन्धने समर्थः । इमे पुनर्वर्णा अत्यन्तायैवानर्थकाः ॥ यथा तर्हि रथाङ्गानि विहृ-

विभक्तिप्रत्यय मात्र उत्पन्न होत नाहीं. कारण वर्णांच्या समुदायापासून एक अर्थ मनांत येतो.[१४]

तसेंच वर्ण अनर्थक आहेत, असें मानण्याचींही कारणें पूर्वीं दाखविलीं आहेत तीं अशीं की, प्रत्येक वर्णापासून अर्थ मनांत येत नाहीं. तसेंच कांहीं ठिकाणीं वर्ण बदलणें, वर्ण कमी होणें, आणि वर्ण अधिक येणें, असे वर्णांचे विकार झाले तरी पूर्वींचेच अर्थ मनांत येतात. हीं कारणें दाखवून वर्ण अनर्थक आहेत असें तेथें ठरविलें. परंतु तें ठरवितांना 'ज्या अर्थीं वर्णांच्या समुदायाला अर्थ आहे त्या अर्थीं त्यांतील वर्णांना अर्थ असलाच पाहिजे' असें जें वर्ण अर्थवान् मानण्याचें कारण वार्तिककारांनीं पूर्वपक्षाची उभारणी करतांना पुढें केलें होतें त्याचें उत्तर तेथें कांहीं दिलें नाहीं. तें तेथें राहिलेलें उत्तर वार्तिककार येथें देत आहेत.

(वा. ११) समुदायाला अर्थ आहे म्हणून अवयवाला अर्थ असलाच पाहिजे असें म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण असेंही दृष्टोत्पत्तीस येतें की ज्या कामीं अवयवांचा उपयोग होत नाहीं तें काम समुदायाच्या हातून घडून येतें. तें असें— एक तंतु थंडीपासून शरीराचें रक्षण करण्याला समर्थ होत नाहीं, परंतु त्या अनेक तंतूंचा समुदाय म्हणजे कांबळा वगैरे वस्त्र हें थंडीपासून शरीराचें रक्षण करण्याला समर्थ होतें. तसेंच एक तांदूळ क्षुधेची पीडा दूर करण्याला समर्थ होत नाहीं, परंतु त्याच तांदुळांचा समुदाय 'वर्धितक' म्हणजे शेर क्षुधेची पीडा दूर करण्याला समर्थ होतो; तसेंच एक गवताची काडी एखादा पदार्थ बांधावयाला समर्थ होत नाहीं, पण त्यांचा समुदाय म्हणजे दोरी ही कोणतीही वस्तु बांधावयाला समर्थ होते

हे जे लोकांतील अनुभव दाखविले ते प्रकृत ठिकाणीं दृष्टान्त म्हणून घेण्याला अयोग्य आहेत; कारण तेथें एकाच्या अंगीं जशी आणि जेवढी शक्ति असेल त्या मानानें तेथें त्यापासून कार्य झालेलें दृष्टोत्पत्तीस येतें. एक तंतु देखील मुंगी वगैरे बारिक प्राण्याच्या शरीराचें रक्षण करण्याला समर्थ होतो; तसाच एक तांदूळ देखील त्या ठिकाणीं क्षुधेची पीडा दूर करण्याला समर्थ होतो; तशीच एक गवताची काडी देखील त्या क्षुद्र प्राण्याला बंधन करण्याला समर्थ होते. आणि प्रकृत ठिकाणीं पहावें तर वर्ण हे सर्वथा अनर्थकच दृष्टीस पडतात.

तर मग येथें आम्ही दुसरा दृष्टान्त

१४. अवयवाला आणि समुदायालाही अर्थवत्त्व असल्यामुळें उभयताला पृथक् पृथक् प्रातिपदिक संज्ञा प्राप्त होते तथापि प्रत्येक अवयवाला निरनिराळी संज्ञा करण्यांत गौरव होतें. आणि समुदायाला करणांत थोडक्यांत काम होतें, व सगळ्याही अवयवांना संज्ञा केल्यासारखें होतें. तेव्हां समुदायालाच संज्ञा होत असल्यामुळें अवयवाहून सुपांची उत्पत्ति होत नाहीं.

तानि प्रत्येकं व्रजिक्रियां प्रत्यसमर्थानि भवन्ति तत्समुदायश्च रथः समर्थ एवमेषां वर्णानां समुदाया अर्थवन्तोऽवयवा अनर्थका इति ॥

## निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम् ॥ १२ ॥

निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकसंज्ञा वक्तव्या । खञ्जति निखञ्जति । लम्बते प्रलम्बते ॥ किं पुनरत्र प्रातिपदिकसंज्ञया प्रार्थ्यते । प्रातिपदिकादिति स्वाद्युत्पत्तिः सुबन्तं पदमिति पदसंज्ञा पदस्य पदात् [८.१.१६–१७] इति निघातो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सत्यामपि प्रातिपदिकसंज्ञायां स्वाद्युत्पत्तिर्न प्राप्नोति । किं कारणम् । न हि प्रातिपदिकसंज्ञायामेव स्वाद्युत्पत्तिः प्रतिबद्धा । किं तर्हि । एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते न चैषामेकत्वादयः सन्ति ॥ नैष दोषः । अविशेषेणोत्पद्यन्त उत्पन्नानां नियमः क्रियते ॥ अथवा

---

दाखवितों. तो असा कीं, रथाचे अवयव–कणा, चाक, जूं वगैरे–ते प्रत्येकीं गमन करण्याला समर्थ होत नाहींत, तथापि त्यांचा समुदाय जो रथ तो गमनक्रिया करण्याला समर्थ होतो; तेव्हां त्याप्रमाणें वर्णांचे समुदाय अर्थवान् आहेत आणि त्यांतील वर्ण प्रत्येकीं अनर्थक आहेत असें मानण्याला कांहीं हरकत दिसत नाहीं.

(वा.१२) जे निपात अनर्थक आहेत त्यांना प्रातिपदिकसंज्ञा होते असें म्हणावें; उदा०–खञ्जति, निखञ्जति, लम्बते, प्रलम्बते. (येथें नि आणि प्र हे निपात अनर्थक आहेत. कारण त्यांपासून जास्त अर्थ कांहींच प्रतीत होत नाहीं.)

पण या ठिकाणीं प्रातिपदिक करून कर्तव्य काय ?

कर्तव्य असें की, नि आणि प्र यांना प्रातिपदिकसंज्ञा झाली असतां त्याच्यापुढें सु वगैरे (विभक्ति) प्रत्यय उत्पन्न होतील. ते प्रत्यय उत्पन्न झाले म्हणजे ते सुबन्त होऊन त्याला 'सुप्तिङन्तं पदम्' (१।४।१४) या सूत्रानें पदसंज्ञा होते. त्या पदाच्या पुढील खञ्जति, लम्बते, या क्रियापदांना 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्त होतो.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण 'नि', 'प्र' यांना प्रातिपदिकसंज्ञा झाली तरी देखील त्याच्यापुढें सु वगैरे विभक्तिप्रत्यय उत्पन्न होणार नाहींत.

तेथें विभक्तिप्रत्यय न होण्याचें कारण काय ?

कारण असें की, सु वगैरे विभक्तिप्रत्ययांची उत्पत्ति ही निव्वळ प्रातिपदिकसंज्ञेवरच अवलंबून नाहीं.

तर ती आणखी कशावर अवलंबून आहे ?

ती अशावर अवलंबून आहे की, एकत्व, द्वित्व, वगैरे अर्थ जेथें दाखवावयाचे असतात तेथेंच ते अर्थ दाखविण्याकरितां सु वगैरे प्रत्यय केले जातात[१५]. आणि 'नि', 'प्र' या ठिकाणीं तर एकत्व, द्वित्व, हे अर्थ मुळींच संभवत नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण सु वगैरे प्रत्यय हे 'स्वौजसमौट्०' (४।१।२) या सूत्रानें वाटेल त्या प्रातिपदिकाहून करितां येतात. आतां जेथें त्या प्रत्ययांनीं संख्या दाखवावयाची असते तेथें त्यांचा नियम केला जातो. तो असा की, जर एकच संख्या दाखवावयाची असेल तर

---

१५, 'स्वौजसमौट्०', 'द्व्येकयोर्द्वि०' आणि 'बहुषु बहु०' या सर्वांच्या एकवाक्यतेनें, एकत्व दाखवावयाचें असेल तर प्रातिपदिकाहून स्वादिकांपैकीं एकवचन करावें, द्वित्व दाखवावयाचें असेल तर द्विवचन करावें, व बहुत्व दाखवावयाचें असेल तर बहुवचन करावें, असा अर्थ होतो. म्हणून स्वादिकांची उत्पत्ति केवळ प्रातिपदिक संज्ञेवर अवलंबून नसून एक, दोन वगैरे संख्येवरही अवलंबून आहे.

प्रकृतानर्थानपेक्ष्य नियमः । के च प्रकृताः । एकत्वादयः । एकस्मिन्नेवार्थे एकवचनं न द्वयोर्न बहुषु । द्वयोरेवार्थयोर्द्विवचनं नैकस्मिन्न बहुषु । बहुष्वेवार्थेषु बहुवचनं नैकस्मिन्न द्वयोरिति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यनर्थकानामप्येतेषां भवत्यर्थवत्कृतमिति यदयमधिपरी अनर्थकौ [१.४.९३]इत्यनर्थकयोर्गत्युपसर्गसंज्ञाबाधिकां कर्मप्रवचनीयसंज्ञां शास्ति ॥

किं पुनरयं पर्युदासो यदन्यत्प्रत्ययादिति । आहोस्वित्प्रसज्यायं प्रतिषेधः

---

त्या ठिकाणीं एकवचन करावें. असाच द्वित्व आणि बहुत्व यांसंबंधानें नियम[१६] समजावा. तेव्हां जेथें कोणतीच संख्या दाखवावयाची नसेल तेथें या नियमांपैकीं कोणताच नियम लागू पडत नसल्यामुळें तेथें 'स्वौजसमौट्०' या सामान्य सूत्रानें सु वगैरे सर्वच प्रत्यय करण्यास मोकळीक मिळते.

अथवा[१७] ते नियम प्रकृत अर्थांच्या संबन्धानें आहेत असें समजावें.

प्रकृत अर्थ ते कोणते ?

एकत्व, द्वित्व आणि बहुत्व हे प्रकृत अर्थ होत. म्हणजे नियमांचें स्वरूप असें समजावें की, कोणतीही संख्या दाखवावयाची असेल त्या ठिकाणीं जर प्रातिपदिकांहून एकवचन होईल तर एकत्व संख्या दाखवावयाची असेल तेव्हांच होईल; म्हणजे जेथें द्वित्वसंख्या दाखवावयाची असेल किंवा बहुत्वसंख्या दाखवावयाची असेल तेथें या नियमावरून एकवचन करतां येणार नाहीं. तसेंच कोणतीही संख्या दाखवावयाची असतांना जर प्रातिपदिकांहून द्विवचन होईल तर द्वित्वसंख्या दाखवावयाची असेल तरच तें उत्पन्न होईल; म्हणजे एकत्वसंख्या किंवाबहुत्वसंख्या दाखवावयाची असेल तेथें द्विवचन उत्पन्न होणार नाहीं. तसेंच कोणतीही संख्या दाखवावयाची असल्यास प्रातिपदिकांहून जर बहुवचनप्रत्यय उत्पन्न होईल तर बहुत्वसंख्या दाखवावयाची असेल तेव्हांच उत्पन्न होईल; म्हणजे ज्या ठिकाणीं एकत्वसंख्या दाखवावयाची असेल किंवा ज्या ठिकाणीं द्वित्वसंख्या दाखवावयाची असेल तेथें बहुवचन उत्पन्न होणार नाहीं. असें नियमांचें स्वरूप मानलें म्हणजे ज्या ठिकाणीं संख्या मुळींच दाखवावयाची नसेल त्या ठिकाणीं नियमानें व्यावृत्ति होत नसल्यामुळें सु वगैरे सर्वच प्रत्यय तेथें करतां येतात.

अथवा अनर्थकाला प्रातिपदिक संज्ञा करण्याविषयीं एक ज्ञापक आहे. तें ज्ञापक असें की, आचार्य पाणिनि 'अधिपरी अनर्थकौ' (१।४।९३) या सूत्रानें अनर्थक अशा 'अधि' आणि 'परि' यांना गतिसंज्ञा आणि उपसर्गसंज्ञा यांचा बाध[१८] करण्याकरतां मुद्दाम 'कर्मप्रवचनीय' अशी संज्ञा सांगतो. त्यावरून तो असें सुचवितो[१९] की, 'अधि', 'परि' अशा तऱ्हेचे निपात अनर्थक असले तरी ते अर्थवान् आहेत असें समजून कार्य करावें.

आतां ह्या प्रकृतसूत्रामध्यें 'अप्रत्ययः' असें

---

१६. या नियमाला 'अर्थनियम' असें म्हणतात. स्वौजसमौट्०, द्व्येकयोर्द्वि० इत्यादि सूत्रें मूळचीं निरनिराळीं असल्यामुळ 'प्रातिपदिकांहून स्वादिक प्रत्यय होतात' असें मोघम 'स्वौजसमौट्०, या सूत्रानें स्वादिकांचें विधान करून 'द्व्येकयोः' इत्यादि सूत्रांनीं त्यांचा नियम केला आहे.

१७. 'एकत्वसंख्या दाखविणें असेल तरच एकवचन करावें' या नियमाला प्रत्ययनियम म्हणतात. या पक्षींही दोष नाहीं. कारण नियम हा सजातीयांचाच करणें योग्य आहे.

१८. त्यामुळें कुतोऽध्यागच्छति येथें 'गतिर्गतौ' (८।१।७०) यानें अधि याला अनुदात्त होत नाहीं.

१९. क्रियेचा योग असतां गति आणि उपसर्ग ह्या संज्ञा होत असतात, आणि अनर्थक अशा अधि व परि या शब्दांना क्रियेचा योग संभवत नसल्यामुळें त्या संज्ञांची प्राप्तिच येऊं शकत नाहीं. तेव्हां त्यांच्या बाधाकरतां कर्मप्रवचनीय संज्ञा सांगणें व्यर्थ होतें, त्यावरून हें सूचित होतें.

प्रत्ययो नेति । कश्चात्र विशेषः ।

**अप्रत्यय इति चेत्तिबेकादेशे प्रतिषेधोऽन्तवत्त्वात् ॥ १३ ॥**

अप्रत्यय इति चेत्तिबेकादेशे प्रतिषेधो वक्तव्यः । काण्डे कुड्ये । किं कारणम् । अन्तवत्त्वात् । तिबतिपोरेकादेशोऽतिपोऽन्तवत्स्यात्। अस्त्यन्यत्तिप इति कृत्वा प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति ॥

अस्तु तर्हि प्रसज्यप्रतिषेधः प्रत्ययो नेति ।

**न प्रत्यय इति चेदूङेकादेशे प्रतिषेध आदिवत्त्वात् ॥ १४ ॥**

न प्रत्यय इति चेदूङेकादेशे प्रतिषेधः प्राप्नोति । ब्रह्मबन्धूः । किं कारणम् । आदिवत्त्वात् । प्रत्ययाप्रत्यययोरेकादेशः प्रत्ययस्यादिवत्स्यात् । तत्र

जें म्हटलें आहे तो काय 'पर्युदास' घ्यावा किंवा प्रसज्यप्रतिषेध घ्यावा ? 'पर्युदास' घेतला तर 'प्रत्ययान्तभिन्न अशा शब्दस्वरूपाला प्रातिपदिकसंज्ञा होते, असा अर्थ होईल. आणि 'प्रसज्यप्रतिषेध' घेतला तर 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा वाक्यार्थ होईल.[२०]

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा.१३) प्रत्ययान्तभिन्नाला प्रातिपदिकसंज्ञा होते' असें म्हटलें तर तिप्[२१] प्रत्ययाबरोबर एकादेश झाला असतां तेथें प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं असा निषेध करावा लागेल; उदा० काण्डे, कुड्ये.

या उदाहरणांमध्यें प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध कशाकरितां करावा लागेल ?

अशाकरितां करावा लागेल की, येथें पूर्वान्तवद्भावानें दोष येतो. म्हणजे काण्डे या ठिकाणीं 'तिप्' म्हणजे पुढील सप्तमीचा प्रत्यय, आणि 'अतिप्' म्हणजे काण्ड वगैरे शब्दांतील शेवटचा अकार या दोघांच्या ठिकाणीं झालेला एकार हा एकादेश पूर्वीचें जें प्रत्यान्तभिन्न काण्ड वगैरे शब्दस्वरूप त्यापैकींच एक शेवटचा वर्ण आहे असें समजलें जाईल, आणि यामुळें 'काण्डे' हें शब्दस्वरूप प्रत्ययान्त भिन्न आहे असें समजून त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊं लागेल.

तर मग हा दोष जाण्याकरितां आपण प्रसज्यप्रतिषेधच घेऊं; म्ह. 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिक संज्ञा होत नाहीं' असा अर्थ होऊन 'काण्डे' या ठिकाणीं प्रतिपदिकसंज्ञेचा निषेध होईल.

(वा.१४) 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असें म्हटलें तर ज्या ठिकाणीं ऊङ्-प्रत्ययाबरोबर एकादेश होतो त्या ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होऊं लागेल; उदा०— ब्रह्मबन्धूः.

येथें कशाकरितां निषेध करावा लागेल ?

अशाकरितां लागेल की, येथें परादिवद्भावानें 'प्रत्ययान्त आहे' असें म्हणतां येतें म्हणजे ऊ हा प्रत्यय आणि ब्रह्मबन्धु हें प्रत्ययान्तभिन्न या दोहोंमध्यें झालेला एकादेश म्हणजे दीर्घ ऊकार हा परादिवद्भावानें पुढील प्रत्ययापैकीं आहे असा समजला जाईल. आणि त्यामुळें

२०. पर्युदासामध्यें नञाचा संबंध उत्तरपदाशीं असतो. आणि प्रसज्यप्रतिषेधामध्यें नञाचा संबंध क्रियेशीं असतो.

२१. 'तिप्तस्झि०' (३।४।७८) या सूत्रांतील ति शब्दाला आरंभ करून 'स्वौजसमौट्.०'(४।१।२) या सूत्रांतील सुप् या पकारापर्यंत तिप् असा प्रत्याहार समजावा. यामध्यें सर्व विभक्तिप्रत्ययांचा समावेश होतो.

२२. पर्युदास घेतला असतां प्रत्ययान्त हें निषेधशास्त्राचें निमित्त होत नाहीं. फक्त विधिशास्त्राचें निमित्त होतें. प्रसज्यप्रतिषेध घेतला असतां प्रत्ययान्तभिन्न हें विधिशास्त्राचें निमित्त होत नाहीं. फक्त प्रत्ययान्त हें निषेधशास्त्राचें निमित्त होतें. विधिशास्त्र किंवा निषेधशास्त्र हें आपापलें निमित्त सिद्ध करणाऱ्या अशाच 'अन्तादिवच्च' या अतिदेशाचा पुरस्कार करितें; आणि शास्त्रानें पुरस्कार केल्याशिवाय 'अन्तादिवच्च' हा अतिदेश प्रवृत्त होत नाहीं.

प्रत्ययो नेति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्युत्पद्यन्त ऊङन्तात्स्वादय इति यदयं नोङ्धात्वोः [६.१.१७५] इति विभक्तिस्वरस्य प्रतिषेधं शास्ति ॥ अथवा द्वे ह्यत्र प्रातिपदिकसंज्ञे अवयवस्यापि समुदायस्यापि । तत्रावयवस्य या प्रातिपदिकसंज्ञा तयान्तवद्भावात्स्वाद्युत्पत्तिर्भविष्यति ॥

**सुब्लोपे च प्रत्ययलक्षणत्वात् ॥१५॥**

सुब्लोपे च प्रत्ययलक्षणेन प्रतिषेधः प्राप्नोति । राजा तक्षा । प्रत्ययलक्षणेन प्रत्ययो नेति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययलक्षणेन प्रतिषेधो भवतीति यदयं न ङिसंबुद्ध्योः [८-२.८] इति प्रतिषेधं शास्ति ॥

अथवा पुनरस्तु पर्युदासः । ननु चोक्तमप्रत्यय इति चेत्तिबेकादेशे प्रतिषेधोऽन्तवत्त्वादिति । प्रसज्यप्रतिषेधेऽप्येष दोषः । द्वे ह्यत्र प्रातिपदिकसंज्ञे

---

'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा निषेध होऊं लागेल.

पण या ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा करून कर्तव्य काय आहे ?

कर्तव्य असें आहे की, 'ब्रह्मबन्धू' याला प्रातिपदिकसंज्ञा झाल्यामुळें त्याच्यापुढें सु वगैरे विभक्तीचे प्रत्यय झाले पाहिजेत.

हा दोष येत नाहीं. कारण याविषयीं एक ज्ञापक आहे. तें ज्ञापक असें की, हा आचार्य पाणिनि 'नोङ्धात्वोः (६।१।१७५) या सूत्रानें ऊङ्प्रत्ययान्त शब्दाच्या पुढील विभक्तिप्रत्ययाला उदात्त स्वराचा निषेध सांगतो त्यावरून तो असें सुचवतो की, ऊङ्प्रत्ययान्त शब्दाच्या पुढें विभक्तिप्रत्यय उत्पन्न होतात.

अथवा ब्रह्मबन्धू या ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा दोन ठिकाणीं प्राप्त होते. एक अवयवाला म्हणजे ऊङ्प्रत्ययाच्या मागील 'ब्रह्मबन्धू' या भागाला आणि दुसरी समुदायाला म्हणजे 'ब्रह्मबन्धू' या ऊङ्प्रत्ययान्ताला. त्यापैकीं अवयवाला जी प्रातिपदिकसंज्ञा झाली आहे ती पूर्वान्तवद्भावानें ब्रम्हबन्धू याला गृहीत धरतां येते, तेव्हां अर्थातच त्याच्यापुढें सु वगैरे प्रत्यय करतां येतील.

(वा.१५) विभक्तिप्रत्ययाचा लोप झाला असतांना प्रत्ययलक्षणानें तें प्रत्ययान्त शब्दस्वरूप आहे असें समजून प्रातिपदिकसंज्ञेचनिषेध होऊं लागेल; उदा०—राजा, तक्षा. येथें सुप्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाला असतांना त्याला प्रत्ययलक्षण (२।१।६२) करून 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' असा प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण याविषयीं एक ज्ञापक आहे. तें ज्ञापक असें की, हा आचार्य पाणिनि 'न ङिसंबुद्ध्योः' (८।२।८) या सूत्रानें ङिप्रत्ययान्त आणि संबुद्धिप्रत्ययान्त यांच्या नकाराच्या लोपाचा निषेध सांगतो, त्यावरून तो असें सुचवितो की, प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त समजून प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध[२३] होत नाहीं.

अथवा प्रकृत सूत्रामध्यें 'अप्रत्यय' हा पर्युदासच असूं दे.

पण 'अप्रत्यय' हा पर्युदास घेतला तरा 'काण्डे' वगैरे उदाहरणांमध्यें तिप्प्रत्ययाबरोबर एकादेश झाला असतांन तेथें पूर्वान्तवद्भावानें 'काण्डे' हें शब्दस्वरूप प्रत्ययान्तभिन्न आहे असें समजून प्रातिपादिकसंज्ञा होऊं लागेल, असा दोष आतांच दाखविला आहे ना ?

हा दोष दाखविला आहे खरा पण 'अप्रत्ययः

---

२३. जर प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त समजून 'प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं' हा निषेध प्रवृत्त होईल तर हे राजन् येथें प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध झाल्यामुळें जें पद तें प्रातिपदिकसंज्ञक नसल्यानें तेथें नलोप प्राप्तच होऊं शकत नाहीं. तेव्हां तेथें नलोपनिषेध करण्याची कांहीं जरूरी नाहीं. यावरून असें अनुमान काढतां येतें.

अवयवस्यापि समुदायस्यापि। गृह्यते च प्रातिपदिकाप्रातिपदिकयोरेकादेशः प्रातिपदिकग्रहणेन । तस्मादुभाभ्यामपि वक्तव्यं स्याद्ध्रस्वो नपुंसके यत्तस्येति । किं च नपुंसके । नपुंसकं यस्य गुणः । कस्य च नपुंसकं गुणः । प्रातिपदिकस्य ॥

**कृत्तद्धितसमासाश्च ॥१.२.४६॥**

समासग्रहणं किमर्थम् ।

**समासग्रहण उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थमिति ॥

**ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य ॥ १.२.४७ ॥**

प्रातिपदिकग्रहणं किमर्थम् ।

**नपुंसकह्रस्वत्वे प्रातिपदिकग्रहणं तिन्निवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

नपुंसकह्रस्वत्वे प्रातिपदिकग्रहणं क्रियते तिन्निवृत्त्यर्थम् । तिबन्तस्य ह्रस्वत्वं मा भूत् । काण्डे कुड्ये । रमते

---

हा प्रसज्यप्रतिषेध घेतला तरी देखील हा दोष येत आहेच. कारण 'काण्डे' या ठिकाणीं काण्ड या अवयवाला आणि काण्डे या समुदायाला अशी दोन ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होत आहे. तेव्हां त्यांपैकीं काण्ड याला जी प्रातिपदिकसंज्ञा झालेली आहे ती पूर्वान्तवद्भावानें काण्डे याला आहे असें समजतां येईल. काण्ड हें प्रातिपादिक आणि त्याच्यापुढील इ हा प्रातिपादिकभिन्न प्रत्यय या दोघांमध्यें झालेला एकादेश म्हणजे एकार हा पूर्वान्तवद्भावानें मागील प्रातिपदिकांपैकींच एक शेवटचा वर्ण समजला जाणार आहे. तात्पर्य–'अप्रत्ययः' येथें पर्युदास घेणारे असोत किंवा प्रसज्यप्रतिषेधपक्ष घेणारे असोत, दोघांच्याही मतीं काण्डे हें प्रातिपदिक आहे असें समजून तेथें 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' (१।२।४७) या सूत्रानें ह्रस्व होऊं लागेल. तो दोष दूर करण्याकरितां 'ह्रस्वो नपुंसके०' या सूत्राच्या ऐवजीं 'ह्रस्वो नपुंसके यत्तस्य' असें सूत्र करावें लागेल. तसें सूत्र केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण 'नपुंसकलिङ्गी जें त्याला ह्रस्व होतो' असा तेथें अर्थ होतो.

नपुंसकलिङ्गी कोण असतें ?

'नपुंसकलिङ्ग' हा ज्याचा धर्म असतो त्यालाच नपुंसकलिंगी असें म्हणतां येतें.

नपुंसकलिङ्ग हा धर्म कोणाचा असतो ?

नपुंसकलिंग हा धर्म मूळ प्रातिपादिकाच्या अर्थाचा असतो.

(म्हणजे काण्डे या विभक्तिप्रत्ययान्त शब्दाचा जो 'काण्डाचे ठिकाणीं' हा अर्थ त्या अर्थाला लिंग मुळींच संभवत नाहीं.)

(सू.४६) या सूत्रामध्यें समास हा शब्द कशाकरतां घातला आहे ?

(वा.१) समास यासंबंधानें पूर्वसूत्रामध्येंच सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

ते असें सांगितलें आहे की, अर्थवान् अशा समुदायाला जर प्रातिपदिकसंज्ञा होय तर समासालाच होय. म्हणजे समासासारखीं इतर जीं वाक्यें त्यांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं, असा नियम होण्याकरितां समास हा शब्द घातला आहे.

(सू.४७) या सूत्रामध्यें प्रातिपदिकस्य असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा.१) नपुंसकलिंगी शब्दाला ह्रस्व सांगण्याऱ्या अशा या सूत्रामध्यें 'प्रातिपदिकस्य' असें जें म्हटलें आहे तें 'तिप्प्रत्ययान्ताला ह्रस्व न व्हावा' याकरितां म्हटलें आहे. काण्डे, कुडये, रमते ब्राह्मणकुलम्, या ठिकाणीं

---

१. कृद् किंवा तद्धित नांवाचा प्रत्यय शेवटीं असलेले शब्द आणि समास यांना प्रादिपदिकसंज्ञा ...

१. नपुंसकलिंगविशिष्ट अशा अर्थाला दाखविणारें जें प्रादिपदिक त्याला ह्रस्व होतो; उदा०– ...

ब्राह्मणकुलमिति ॥

अव्ययप्रतिषेधः ॥ २ ॥

अव्ययानां प्रतिषेधो वक्तव्यः । दोषा ब्राह्मणकुलम् । दिवा ब्राह्मणकुलमिति ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । नात्राव्ययं नपुंसके वर्तते । किं तर्हि । अधिकरणमत्राव्ययं नपुंसकस्य ॥ इह तर्हि प्राप्नोति । काण्डीभूतं वृषलकुलम् । कुड्यीभूतं वृषलकुलमिति ॥

न वा लिङ्गाभावात् ॥ ३ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । लिङ्गाभावात् । अलिङ्गमव्ययम् ॥ किं पुनरयमव्ययस्यैव परिहार आहोस्वित्तिबन्तस्यापि । तिबन्तस्यापीत्याह । कथम् । अव्ययं हि किंचिद्विभक्त्यर्थप्रधानं किंचित्क्रियाप्रधानम् । उच्चैर्नीचैरिति विभक्त्यर्थप्रधानं हिरुक्पृथगिति क्रियाप्रधानम् । तिबन्तं चापि किंचिद्विभक्त्य-

---

'काण्डे', 'कुड्ये' आणि 'रमते' या विभक्तिप्रत्ययान्तांना ह्रस्व न झाला पाहिजे[३].

(वा.२) 'अव्ययाला हा ह्रस्व होत नाहीं' असें म्हणावें. कारण 'दोषा ब्राह्मणकुलम्' 'दिवा ब्राह्मणकुलम्' या ठिकाणीं 'दोषा' आणि 'दिवा' अव्ययांच्या मधील आकाराला ह्रस्व न झाला पाहिजे.

तर मग तसा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको. कारण दोषा आणि दिवा हीं अव्ययें नपुंसकलिंगी अर्थाला दाखविणारीं नव्हेत.

तर मग तीं अव्ययें कोणत्या अर्थाला दाखवितात ?

ब्राह्मणकुल हा जो नपुंकलिंगी अर्थ त्याचें अधिकरण हें त्या अव्ययानें दाखविलें जातें.

तर मग दोषा, दिवा, या ठिकाणीं जरी दोष येत नाहीं तरी काण्डीभूतं वृषलकुलम्, कुड्यीभूतं वृषलकुलम् या ठिकाणीं 'काण्डी' 'कुड्यी' या च्विप्रत्ययान्त अव्ययांमधील ईकाराला ह्रस्व होऊं लागेल. त्याकरितां अव्ययाला ह्रस्व होत नाहीं असा निषेध करावा लागेल.)

(वा.३) अव्ययाला ह्रस्व होत नाहीं असा निषेध सांगावयास नको.

कां बरें ?

अव्ययाला लिंग नाहीं म्हणून. म्हणजे अव्ययापासून मनांत येणारा जो अर्थ असतो, तो लिंगरहितच असतो. त्यामुळें अव्ययाला ह्रस्वाची प्राप्तिच येत नाहीं.

अव्ययाला लिंग नाहीं म्हणून ह्रस्वाची प्राप्ति येत नाहीं हें जें आतां उत्तर दिलें आहे तें फक्त अव्ययासंबंधानेंच समजावयाचें किंवा काण्डे वगैरे विभक्तिप्रत्ययान्तांसंबंधानें देखील तें उत्तर समजावयाचें ?

विभक्तिप्रत्ययान्तांसंबंधानें देखील तें उत्तर देतां येतें.

तें कसें ?

तें असें की, अव्ययांपैकीं कांहीं अव्ययें अशीं असतात की, त्यांपासून मनांत येणाऱ्या अर्थामध्यें मुख्यत्व विभक्तिप्रत्ययाच्या अर्थाला असतें. अव्ययांना 'विभक्त्यर्थप्रधान अव्यय' असें म्हणतात. आणि कांहीं अव्ययें अशीं असतात की, त्यांपासून मनांत येणाऱ्या अर्थामध्यें मुख्यत्व क्रियेला असतें. त्या अव्ययांना 'क्रियाप्रधान अव्ययें' असें म्हणतात. उच्चैः, नीचैः, हीं अव्ययें 'विभक्त्यर्थप्रधान' होत. उंच ठिकाणीं आणि नीच ठिकाणीं अशा रीतीनें त्यांच्या अर्थामध्यें सप्तम्यर्थाला मुख्यत्व दिसत आहे. 'हिरुक्', 'पृथक्' हीं अव्ययें 'क्रियाप्रधान' होत. हिरुक्

---

२. रमते ब्राह्मणकुलं येथें ज्याप्रमाणें ब्राह्मणकुल या कर्त्याच्या एकत्वामुळें रमते येथें एकवचन झालें आहे त्याप्रमाणें त्या कर्त्याच्या नपुंसकलिंगामुळें रमते येथें ह्रस्व होईल.

३. 'दोषा' या अव्ययाचा अर्थ रात्रीं असा आहे.

र्थप्रधानं किंचित्क्रियाप्रधानम् । काण्डे कुड्ये इति विभक्त्यर्थप्रधानं रमते ब्राह्मणकुलमिति क्रियाप्रधानम् । न चैतयोरर्थयोर्लिङ्गसंख्याभ्यां योगोऽस्ति ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । क्रियमाणेऽपि हि प्रातिपदिकग्रहण इह प्रसज्येत । काण्डे कुडये । द्वे ह्यत्र प्रातिपदिकसंज्ञे अवयवस्यापि समुदायस्यापि । गृह्यते च प्रातिपदिकाप्रातिपदिकयोरेकादेशः प्रातिपदिकग्रहणेन । तस्मादुभाभ्यामपि वक्तव्यं स्याद्ध्रस्वो नपुंसके यत्तस्येति । किं च नपुंसके । नपुंसकं यस्य गुणः । कस्य च नपुंसकं गुणः । प्रातिपदिकस्य ॥

## यञेकादेशदीर्घेत्त्वेषु

---

म्हणजे वगळून आणि पृथक् म्हणजे वेगळें करून. अशा रीतीनें त्यांच्या अर्थामध्यें क्रियेला मुख्यत्व दिसतें. हे जसे अव्ययांसंबंधानें दोन प्रकार दाखविले असे दोन प्रकार विभक्तिप्रत्ययान्ताचे देखील होतात. म्हणजे काहीं विभक्तिप्रत्ययान्त पदें 'विभक्त्यर्थप्रधान' असतात आणि कांहीं विभक्तिप्रत्ययान्त पदें क्रियाप्रधान' असतात. काण्डे, कुडये, हीं विभक्त्यन्त पदें विभक्त्यर्थप्रधान होत. यांच्या अर्थामध्यें काण्डाचे ठिकाणीं, कुड्याचे ठिकाणीं अशा रीतीनें सप्तम्यर्थाला मुख्यत्व दिसतें. 'रमते ब्राह्मणकुलम्' या ठिकाणीं 'रमते' हें क्रियापद 'क्रियाप्रधान' होय. या ठिकाणीं 'रममाण होणें' या क्रियेला मुख्यत्व दिसतें. हे जे मुख्यत्वानें भासणारे विभक्त्यर्थ आणि क्रिया या दोन अर्थांचा लिंगाशीं आणि संख्येशीं योग मुळींच संभवत नाहीं. (तेव्हां 'नपुंसकलिंग संभवत नसल्यामुळें ह्रस्व होत नाहीं' हें उत्तर दिवा, दोषा, काण्डी, कुड्यी या ठिकाणीं अव्ययांसंबंधीं जसें देतां येतें तसें काण्डे, कुड्ये, रमते या विभक्तिप्रत्ययान्त पदांसंबंधानेंही देतां येतें).

आणि हेंच उत्तर येथें अवश्य धरलें पाहिजे. कारण सूत्रामध्यें 'प्रातिपदिकस्य' असें म्हटलें तरी देखील काण्डे, कुड्ये, या ठिकाणीं ह्रस्व होऊं लागेल असा दोष येतो. तो असा:— काण्डे या ठिकाणीं काण्ड या अवयवाला आणि काण्डे या समुदायाला अशा दोन ठिकाणीं प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होत आहे. तेव्हां त्यांपैकीं काण्ड याला जी प्रातिपदिकसंज्ञा झालेली आहे ती पूर्वान्तवद्भावानें 'काण्डे' याला आहे असें समजतां येईल. काण्ड हें प्रातिपदिक आणि त्याच्यापुढील इ हा प्रातिपदिकभिन्न प्रत्यय या दोघांमध्यें झालेला एकादेश म्हणजे एकार हा पूर्वान्तवद्भावानें मागील प्रातिपदिकांपैकींच एक शेवटचा वर्ण समजला जाणार आहे. तात्पर्य, प्रकृत सूत्रामध्यें प्रातिपादिकग्रहण करूं नये असें म्हणणारा आणि काण्डे येथें ह्रस्व न होण्याकरितां प्रातिपदिकग्रहण करावें असें म्हणणारा या दोघांच्याही मतीं ह्रस्व होऊं लागेल; हा दोष दूर करण्याकरतां 'ह्रस्वो नपुसंके प्रातिपदिकस्य' या सूत्राच्या ऐवजीं 'ह्रस्वो नपुंसके यत्तस्य' असें सूत्र करावें लागेल. तसें सूत्र केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण नपुंसकलिंगी जें त्याला ह्रस्व होतो असा तेथें अर्थ होतो.

नपुंसकलिंगी कोण असतें ?

नपुंसकलिंग हा ज्याचा धर्म असतो त्यालाच नपुसकलिंगी असें म्हणतां येतें.

'नपुंसकलिंग' हा धर्म कोणाचा असतो ?

'नपुंसकलिंग' हा धर्म मूळ प्रातिपदिकाच्या अर्थाचा असतो (म्हणजे काण्डे या विभक्तिप्रत्ययान्त शब्दाचा जो 'काण्डाचे ठिकाणीं' हा अर्थ त्या अर्थाला लिंग मुळींच संभवत नाहीं).

(वा.४) यञादिप्रत्यय पुढें असतांना सांगितलेला दीर्घ, एकादेश म्हणून सांगित-

**प्रतिषेधः ॥४॥**

यञेकादेशदीर्घैत्त्वेषु प्रतिषेधो वक्तव्यः । युगवरत्राय युगवरत्रार्थम् युगवरत्रेभ्यः ॥

**यञेकादेशदीर्घैत्त्वेषु बहिरङ्गलक्षणत्वात्सिद्धम् ॥ ५ ॥**

बहिरङ्गा एते विधयः । अन्तरङ्गं ह्रस्वत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**गोस्त्रियोरुपसर्जनस्य ॥१.२.४८॥**

**उपसर्जनह्रस्वत्वे च ॥ १ ॥**

उपसर्जनह्रस्वत्वे च । किम् । यञेकादेशदीर्घैत्त्वेषु प्रतिषेधो वक्तव्यः । अतिखट्वाय अतिखट्वार्थम् अतिखट्वेभ्यः ॥ उपसर्जनह्रस्वत्वे च । किम् । बहिरङ्गलक्षणत्वात्सिद्धमित्येव । बहिरङ्गा एते विधयः । अन्तरङ्गं ह्रस्वत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**गोटाङ्ग्रहणं कृन्निवृत्त्यर्थम् ॥ २ ॥**

गोटाङ्ग्रहणं कर्तव्यम् । किमिदं टाङिति । प्रत्याहारग्रहणम् । क संनि-

---

लेला दीर्घ आणि एत्त्व हे विधि केल्यानंतर तेथें प्रकृतसूत्रानें ह्रस्व होत नाहीं असें म्हणावें; उदा०—युगवरत्राय, युगवरत्रार्थम्, युगवरत्रेभ्यः.

(वा.५) हे दीर्घ वगैरे विधि 'बहिरङ्ग' आहेत. आणि प्रकृतसूत्रानें सांगितलेला ह्रस्व अन्तरङ्ग आहे. आणि 'अन्तरङ्गशास्त्र कर्तव्य असतांना बहिरङ्गशास्त्र असिद्ध समजावें' अशी परिभाषा आहे. (तेव्हां अर्थातच वरील उदाहरणांमध्यें दीर्घ वगैरे विधि झाल्यानंतर ते असिद्ध असल्यामुळें त्यांना ह्रस्व करतां येत नाहीं.)

(सू.४८ वा.१) हा जो प्रकृतसूत्रानें उपसर्जनाला ह्रस्व सांगितला आहे त्याविषयीं देखील ?

त्याविषयीं देखील म्हणजे काय ?

त्याविषयीं देखील म्हणजे यञादिप्रत्यय पुढें असतांना सांगितलेला दीर्घ, एकादेश म्हणून सांगितलेला दीर्घ आणि एत्त्व हे विधि केल्यानंतर तेथें पूर्वीप्रमाणें प्रकृतसूत्रानें सांगितलेला ह्रस्व देखील होत नाहीं असें म्हणावें; उदा०—अतिखट्वाय, अतिखट्वार्थम्, अतिखट्वेभ्यः.

हा जो प्रकृतसूत्रानें उपसर्जनाला ह्रस्व सांगितला आहे त्याविषयीं देखील—

त्या विषयीं देखील म्हणजे काय ?

त्याविषयीं देखील म्हणजे हे दीर्घ वगैरे विधि बहिरङ्ग असल्यामुळें सिद्ध होईल. अतिखट्वाय वगैरे उदाहरणांमध्यें झालेले हे दीर्घ वगैरे विधि 'बहिरङ्ग' आहेत. आणि त्यानंतर प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेला ह्रस्व 'अन्तरङ्ग' आहे आणि 'अन्तरङ्गशास्त्र कर्तव्य असतांना बहिरङ्गशास्त्र असिद्ध समजावें' अशी परिभाषा आहे. तेव्हां परिभाषेनें काम भागेल म्हणजे ह्रस्व होणार नाहीं.

(वा.२) प्रकृतसूत्रामध्यें 'गोस्त्रियोः' असें जें म्हटलें आहे त्याच्या ऐवजीं 'गोटाङ्' असें म्हणावें. कारण कृत्प्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्दाला प्रकृतसूत्रानें ह्रस्व न झाला पाहिजे.

पण येथें 'टाङ्' म्हणजे काय समजावें ?

'टाङ्' हा प्रत्याहाराचा निर्देश आहे.

कोणत्या एका ठिकाणीं उच्चारलेल्यांचा टाङ् हा प्रत्याहार केला आहे ?

'अजाद्यतष्टाप्' (४।१।४) या सूत्रांतील 'टा' या शब्दापासून 'अणिञोः' (४।१।७८) या सूत्रामध्यें ष्यङ् असा जो प्रत्यय उच्चारला आहे त्याच्या ङकारापर्यंत जे सर्व प्रत्यय ते सर्व येथें टाङ् या प्रत्याहारानें घेतले जातात.

टाङ् असा शब्द घालण्याचा उपयोग

---

४. अमुक पुढें असतां अशा रीतीनें परनिमित्त नसल्यामुळें नपुंसक ह्रस्व हा अन्तरंग आहे. आणि दीर्घ, एत्त्व वगैरे विधींना परनिमित्त असल्यामुळें ते बहिरङ्ग आहेत.

१. उपसर्जनसंज्ञक जो गोशब्द किंवा स्त्रीप्रत्ययान्त शब्द, तो आहे शेवटीं ज्याच्या अशा प्रातिपदिकाला ह्रस्व होतो; उदा०—चित्रगुः, निष्कौशाम्बिः.

विष्टानां प्रत्याहारः । टापः प्रभृत्या ष्यङो ङकारात् । किं प्रयोजनम् । कृन्निवृत्त्यर्थम् । कृत्स्त्रिया धातुस्त्रियाश्च ह्रस्वत्वं मा भूदिति । अतितन्त्रीः अतिश्रीः अतिलक्ष्मीरिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । स्त्रीग्रहणं स्वर्यते तत्र स्वरितेनाधिकारगतिर्भवति । स्त्रियाम् [४.१.३] इत्येवं प्रकृत्य ये विहितास्तेषां ग्रहणं विज्ञास्यते । स्वरितेनाधिकारगतिर्भवतीति न दोषो भवति ॥ यद्येवं प्रत्ययग्रहणमिदं भवति तत्र प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीतीह न प्राप्नोति । अतिराजकुमारिः अतिसेनानीकुमारिरिति । अस्त्रीप्रत्ययेनेत्येवं तत् ॥

## ईयसो बहुव्रीहौ पुंवद्वचनम् ॥ ३ ॥

ईयसो बहुव्रीहौ पुंवद्भावो वक्तव्यः । बह्व्यः श्रेयस्योऽस्य बहुश्रेयसी । विद्य-

---

कोणता ?

'कृत्प्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्दाची निवृत्ति व्हावी' हा त्याचा उपयोग आहे. म्हणजे कृत्प्रत्ययांतील जो ईकार आणि धातूमधील जो ईकार तो ईकार शेवटीं असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाला प्रकृतसूत्रानें ह्रस्व न झाला पाहिजे. उदा०—अतितन्त्रीः, अतिश्रीः, अतिलक्ष्मीः.

तर मग येथें 'गोटाङ्' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण प्रकृतसूत्रामध्यें पाणिनीनें जो 'स्त्री' असा शब्द उच्चारला आहे तो स्वरित उच्चारला आहे असें समजावें. आणि अशा रीतीनें जो मुद्दाम स्वरित असा उच्चारला असेल तेथें त्या शब्दाचा कांहीं तरी अधिक अर्थ आहे असें समजलें जातें. तेव्हां प्रकृतसूत्रामध्यें 'स्त्री' या शब्दाचा नुसता 'स्त्रीलिंगी शब्द' असा अर्थ नव्हे तर 'स्त्रियाम् असा अधिकार चालू करून पुढें सांगितलेले जे प्रत्यय' ते येथें 'स्त्री' या शब्दानें घेतले जातात. आणि अशा रीतीनें स्वरित मानून त्याच्या जोरावर अधिक अर्थ मानला असतां अतितन्त्रीः वगैरे उदाहरणामध्यें दोष येत नाहीं.

तर मग सूत्रांतील स्त्री हा शब्द कांहीं विशेष प्रकारच्या प्रत्ययांना दाखविणारा आहे असें होतें. आणि असें झालें असतां 'ज्या ठिकाणीं प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करूनच पुढील समुदायाला तें कार्य करावें म्हणजे त्या प्रकृतीच्या मागें कांहीं निराळा शब्द त्या कार्याला उपयोगीं पडण्यासारखा असतां कामा नये' अशी परिभाषा आहे. तेव्हां 'अतिराजकुमारिः', 'अतिसेनानीकुमारिः' या उदाहरणांमध्यें प्रकृतसूत्रानें ह्रस्व होणार नाहीं. ( कारण या ठिकाणीं कुमारी या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाच्या मागें राज शब्द आहे आणि त्या राजशब्दासकटच म्हणजे राजकुमारी याला उपसर्जन संज्ञा आहे). स्त्रीप्रत्ययाशिवाय इतर प्रत्ययांसंबंधानें तो नियम आहे. तेव्हां येथें 'स्त्री' हें प्रत्ययाचें ग्रहण असलें तरी अतिराजकुमारि या ठिकाणीं ह्रस्व करतां येईल.

(वा.३) ईयसूप्रत्ययान्त शब्दाच्या पुढें स्त्रीप्रत्यय लावून त्या शब्दाचा दुसऱ्या कोणत्याही पूर्वपदाबरोबर बहुव्रीहि समास केला असतां तेथें तो स्त्रीप्रत्ययान्त शब्द पुंलिंगासारखा समजावा म्हणजे स्त्रीलिंगी आहे असें समजूं नये. म्हणजे अर्थातच तेथें प्रकृतसूत्रानें ह्रस्व होणार नाहीं; उदा०—बह्व्यः श्रेयस्यो यस्य बहुश्रेयसी, विद्यमानश्रेयसी.

---

२. तन्त्रधातूहून 'अवितॄस्तृ' (उणा. ३।१७८) या उणादिसूत्रानें ई प्रत्यय. श्रिधातूहून 'वचिप्रच्छि०,' (३।२।१७८ वा.२) या वार्तिकानें क्विप्, आणि धातूला दीर्घ. लक्षधातूहून 'लक्षेर्मुट् च' (उ. ३।१८०) या उणादिसूत्रानें ईप्रत्यय व मुडागम.

मानश्रेयसी ॥

## पूर्वपदस्य च प्रतिषेधो गोसमासनिवृत्त्यर्थम् ॥ ४ ॥

पूर्वपदस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । गोसमासनिवृत्त्यर्थम् । गोनिवृत्त्यर्थं समासनिवृत्त्यर्थं च ॥ गोनिवृत्त्यर्थं तावत् । गोकुलम् गोक्षीरम् गोपालक इति ॥ समासनिवृत्त्यर्थम् । राजकुमारीपुत्रः सेनानीकुमारीपुत्र इति । किमुच्यते समासनिवृत्त्यर्थमिति न पुनरसमासोऽपि किंचित्पूर्वपदं यदर्थः प्रतिषेधः स्यात् । स्त्र्यन्तस्य प्रातिपदिकस्योपसर्जनस्य ह्रस्वो भवतीत्युच्यते न चान्तरेण समासं स्त्र्यन्तं प्रातिपदिकमुपसर्जनमस्ति । ननु चेदमस्ति । खट्वापादः मालापाद इति । एकादेशे कृतेऽन्तादिवद्भावात्प्राप्नोति । उभयत आश्रये नान्तादिवत् ॥

गोनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः । गोऽन्तस्य प्रातिपदिकस्योपसर्जनस्य ह्रस्वो भवतीत्युच्यते न चैतद्गोऽन्तम् । ननु चैतदपि व्यपदेशिवद्भावेन गोऽन्तम् । व्यपदेशि-

---

(वा.४) 'हा प्रकृतसूत्रानें सांगितलेला ह्रस्व समासांतील पूर्वपदाला होत नाहीं' असें म्हणावें.'

कशाकरतां ?

गोशब्द आणि समास हे जर पूर्वपद असतील तर त्यांना ह्रस्व न झाला पाहिजे. त्यांपैकीं 'पूर्वपद अशा गोशब्दाला ह्रस्व होत नाहीं' याचें उदा०— गोकुलम्, गोक्षीरम्, गोपालकः. समासाचें उदा०— राजकुमारीपुत्रः, सेनानीकुमारीपुत्रः. या ठिकाणीं 'राजकुमारी' आणि 'सेनानीकुमारी' या समासरूपी पूर्वपदाला ह्रस्व होत नाहीं.

पण येथें समासरूपी पूर्वपदाला ह्रस्व होऊं नये असें मुद्दाम विशेष कां म्हटलें आहे? समासाशिवाय साधा शब्द पूर्वपदभूत असला म्हणजे तेथें दोष येत नाहीं कीं काय, की ज्याच्याकरितां हा निषेध 'समासरूपी पूर्वपदाला' असा विशेष रीतीनें न म्हणतां सामान्यतः 'पूर्वपदाला ह्रस्व होत नाहीं' असा म्हणावा लागत असता ?

तसें सामान्य रीतीनें न म्हणण्याचें कारण असें आहे की, प्रकृतसूत्रानें स्त्रीप्रत्ययान्त उपसर्जनाला जो ह्रस्व सांगितला आहे तो तें उपसर्जनसंज्ञक पूर्वपद असेल तरच त्याला होत असतो. आणि समासाशिवाय साधें जर स्त्रीप्रत्ययान्त उपसर्जनपूर्वपद घेतलें तर त्याला प्रातिपदिक ही संज्ञाच नसते. कारण प्रत्ययायान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं म्हणून त्या ठिकाणीं ह्रस्व होईल असा दोष येत नाहीं.

परंतु खट्वापादः, मालापादः, या उदाहरणांमध्यें 'खट्वा' आणि 'माला' हे साधेच शब्द प्रातिपदिकसंज्ञक आहेत. कारण येथें 'खट्व' आणि 'माल' या शब्दांतील अकाराच्या पुढील टाप्प्रत्ययाबरोबर एकादेश केला असतांना त्या ठिकाणीं पूर्वान्तवद्भावानें 'खट्वा' आणि 'माला' यांना प्रातिपदिक असें म्हणतां येतें.

पण 'अन्तादिवच्च' (६।१।८५) या सूत्रानें पूर्वान्तवद्भाव आणि परादिवद्भाव हे दोन्ही एकदम एका उदाहरणामध्यें होत नसतात. (आणि येथें तर 'खट्वा' हें परादिवद्भावानें स्त्रीप्रत्ययान्त आहे, आणि पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिक आहे; असे दोन्ही प्रकारचे अतिदेश घेतल्याशिवाय ह्रस्वाची प्राप्तिच येत नाहीं.)

पूर्वपदाला हा जो ह्रस्वाचा निषेध सांगितला आहे तो गोशब्दाकरितां तर करावयास नको. कारण 'गोशब्दान्त जें उपसर्जनसंज्ञक प्रातिपदिक त्याला ह्रस्व होतो' अशा सूत्राचा वाक्यार्थ आहे. आणि 'गोकुलम्' वगैरे उदाहरणांमध्यें जें गो हें पूर्वपद आहे तें गोशब्दान्त नव्हे.

पण नुसता 'गो' हा शब्द देखील व्यपदेशिवद्भावानें 'गोशब्दान्त' आहे असें गृहीत धरतां

वद्भावोऽप्रातिपदिकेन ॥ समासनिवृत्त्यर्थेन चापि नार्थः । स्त्र्यन्तस्य प्रातिपदिकस्योपसर्जनस्य ह्रस्वो भवतीत्युच्यते प्रधानमुपसर्जनमिति च संबन्धिशब्दावेतौ । तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यं प्रति यदप्रधानं तस्य चेत्सोऽन्तो भवतीति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । उच्यमानेऽपि हि प्रतिषेध इह प्रसज्येत । पञ्च कुमार्यः प्रिया अस्य पञ्चकुमारीप्रियः । दशकुमारीप्रिय इति ॥

कपि च ॥ ५ ॥

कपि च प्रतिषेधो वक्तव्यः । बहुकुमारीकः बहुवृषलीकः ॥

द्वन्द्वे च ॥ ६ ॥

द्वन्द्वे च प्रतिषेधो वक्तव्यः । कुक्कुटमयूर्यौ ॥

उक्तं वा ॥ ७ ॥

किमुक्तम् । कपि तावदुक्तं न कपि [७.४.१४] इति प्रतिषेध इति । नैतदस्त्युक्तम् । केऽणः [७.४.१३] इति या ह्रस्वप्राप्तिस्तस्याः प्रतिषेधः । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो

---

येतें ना?

गृहीत धरतां येतें खरें, परंतु 'व्यपदेशिवद्भाव हा प्रातिपदिकाशीं करूं नये' असा त्याचा निषेध आहे. तसेंच पूर्वपदाला ह्रस्व होत नाहीं असा जो निषेध वार्तिककारांनीं केला आहे त्याचा समाससंबंधानेंही उपयोग संभवत नाहीं. कारण 'स्त्रीप्रत्ययान्त उपसर्जनसंज्ञक जें प्रातिपदिक त्याला ह्रस्व होतो' असा प्रकृतसूत्राचा वाक्यार्थ आहे. आणि अप्रधान उपसर्जन हे शब्द संबन्धिशब्द आहेत. म्हणजे अप्रधानपणा किंवा उपसर्जनपणा हा प्रधानामुळेंच संभवत असतो. असा उपसर्जनाचा प्रधानाबरोबर कायमचा संबंध असल्यामुळें येथें असा अर्थ होतो की उपसर्जन हें अप्रधान असतें. ह्याला ज्या प्रधानामुळें अप्रधानपणा येत असेल त्या प्रधानवाचक शब्दाचा तो उपसर्जनसंज्ञक शब्द अन्तावयव असेल तर ह्रस्व होतो.

हा जो संबंधी शब्दाच्या जोरावर अर्थ होतो तो येथें अवश्य गृहीत धरलाच पाहिजे. कारण पूर्वपदाला ह्रस्व होत नाहीं असा जरी निषेध वार्तिककारांनीं केला आहे तरी तेवढया निषेधानें काम भागत नाहीं. पांच कुमारी आहेत प्रिय ज्याला तो 'पञ्चकुमारीप्रिय'. तसेंच दहा कुमारी आहेत प्रिय ज्याला तो 'दशकुमारीप्रिय' होय. या उदाहरणांमध्यें कुमारी हा शब्द पूर्वपद नसल्यामुळें ह्रस्वाचा निषेध होणार नाहीं. तेव्हां येथें ह्रस्व होऊं लागेल असा कायमचाच दोष येतो.

(वा.५) 'कप् प्रत्यय पुढें असतांना ह्रस्व होत नाहीं' असें म्हणावें; उदा०—बहुकुमारीकः, बहुवृषलीकः.

(वा.६) 'द्वंद्वसमासामध्यें प्रकृतसूत्रानें ह्रस्व होत नाहीं' असें म्हणावें; उदा०— कुक्कुटमयूर्यौ.

(वा.७) अथवा याविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे?

कप्प्रत्ययासंबंधानें तर आचार्य पाणिनीनेंच 'न कपि' (७।४।१४) असा स्पष्टच निषेध करून ठेवला आहे.

परंतु 'न कपि' हा निषेध सांगितला आहे येथें गृहीत धरतां येणार नाहीं. कारण 'केऽणः (७।४।१३) या सूत्रानें प्राप्त झालेला जो ह्रस्व त्याचाच 'न कपि' हा निषेध पाणिनीनें केला आहे.

'तो त्याच ह्रस्वाचा निषेध आहे' आहे असें कशावरून?

'विधि किंवा निषेध हे आपल्याजवळ असलेल्या कार्यासंबंधानेंच लागू पडतात', अशी परिभाषा आहे. (तेव्हां अर्थातच प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेल्या ह्रस्वाचा 'न कपि' या सूत्रानें निषेध होणार नाहीं.) आणि असें

वेति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । यो हि मन्यते या च यावती च ह्रस्वप्राप्तिस्तस्याः सर्वस्याः प्रतिषेध इतीहापि तस्य प्रतिषेधः प्रसज्येत । प्रियं ग्रामणि ब्राह्मणकुलमस्य प्रियग्रामणिकः । प्रियसेनानिकः ॥ इदं तर्ह्युक्तम् । कपि कृतेऽनन्त्यत्वाद्ध्रस्वत्वं न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । कप्क्रियतां ह्रस्वत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्कप् । अन्तरङ्गं ह्रस्वत्वम् । अन्तरङ्गतरः कप् । ननु चायं कप्समासान्त इत्युच्यते । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । येषां पदानां समासो न तावत्तेषामन्यद्भवति कपं तावत्प्रतीक्षते ॥ द्वन्द्वेऽप्युक्तम् । किमुक्तम् । परवल्लिङ्गमिति शब्दशब्दार्थाविति । तत्रौपदेशिकस्य ह्रस्वत्वमा-

---

अवश्यच मानलें पाहिजे. कारण जेवढा म्हणून या शास्त्रामध्यें ह्रस्व सांगितला आहे त्या सर्वांचा 'न कपि' हा निषेध होतो असें जो मानतो त्याच्या मतीं 'प्रियग्राणिकः', या उदाहरणामध्यें 'ह्रस्वो नपुंसके०' (१।२।४६) या सूत्रानें प्राप्त झालेल्या ह्रस्वाचा देखील 'न कपि' या सूत्रानें निषेध होऊं लागेल. या उदाहरणामध्यें ग्रामणी आणि सेनानी हे शब्द नपुंसकलिंगी आहेत. म्हणजे त्याचा अर्थ असा आहे की ग्रामणि म्हणजे गांवाला पोंचविणारें ब्राह्मणकुल, तें आहे प्रिय ज्याला तो 'प्रियग्रामणिक' होय. 'प्रियसेनानिक' याचाही अर्थ असाच समजावा. (एकंदरींत 'उक्तं वा' या वार्तिकाचें तात्पर्य 'न कपि' हा निषेध सागितला आहे असें गृहीत धरतां येत नाहीं.)

तर मग त्या वार्तिकाचें तात्पर्य असें समजावें की, 'पूर्वपदाला ह्रस्व होत नाहीं' असा आतांच निषेध सांगितला आहे त्यानेंच हें साधेल. पूर्वपद म्हणजें समासाचा शेवटचा भाग नव्हे असें पद. 'बहुकुमारीकः' या उदाहरणामध्यें कप्प्रत्यय हा समासान्त केला असतांना त्याच्या मागील कुमारीशब्दामधील ईकार हा प्रातिपदिकाचा अन्तच होत नाहीं. तेव्हां तेथें ह्रस्वाची प्राप्तिच येत नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की, 'बहुकुमारीकः' या उदाहरणामध्यें कप्प्रत्यय अगोदर करावा किंवा प्रकृतसूत्रानें प्राप्त झालेला ह्रस्व अगोदर करावा ?

मग ह्यांत काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव ह्रस्वाचा बाध करून अगोदर कप्प्रत्यय करावा.

पण ह्रस्व हा अन्तरङ्ग आहे ना ?

ह्रस्व जरी अन्तरङ्ग आहे तरी कप् प्रत्यय हा त्याच्याही पेक्षां जास्त अन्तरंग आहे.

पण कप् हा प्रत्यय समासान्त म्हणून सांगितला आहे. (तेव्हां अर्थातच त्या कप् प्रत्ययाची प्राप्ति समास केल्यानंतर येणार आहे. तेव्हां तो ह्रस्वापेक्षां जास्त अंतरंग कसा होईल )?

कप्प्रत्यय हा समासान्त होतो हें खरें, पण त्यांतील 'समास' हा शब्द 'समासाकरितां कल्पिलेलें वाक्य' अशा अर्थी घातलेला आहे; तेव्हां ज्या पदांचा समास कर्तव्य आहे त्या पदांना कप्प्रत्यय होईतोंपर्यंत दुसरें कांहीं एक करितां येत नाहीं.

द्वंद्वासंबंधानेंही सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तें असें सांगितलें आहे की, द्वंद्व आणि तत्पुरुष यांमध्यें उत्तरपदाच्या लिंगाप्रमाणें सामासिक शब्दाचें लिंग समजावें आणि शब्द देखील स्वतंत्र उत्तरपदासारखाच सामासिक शब्दामध्यें करावा. तेव्हां मूळचा जो समास करण्याकरितां घेतलेला मयूरी शब्द त्याला जरी ह्रस्व झाला तरी 'परवल्लिङ्गम्' (२।४।२६) या शास्त्रानें पुनः त्याला जें मयूरी असें दीर्घ ईकारान्त स्वरूप प्राप्त झालें आहे तें कायम राहील. आणि त्यामुळें तेथें कांहीं दोष येणार नाहीं.

तिदेशिकस्य श्रवणं भविष्यति ॥

**लुक्तद्धितलुकि ॥ १.२.४९ ॥**

**तद्धितलुक्यवन्त्यादीनां प्रतिषेधः ॥१**

तद्धितलुक्यवन्त्यादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । अवन्ती कुन्ती कुरूः ॥

**तद्धितलुक्यवन्त्यादीनामप्रतिषेधोऽलुक्परत्वात् ॥२॥**

तद्धितलुक्यवन्त्यादीनामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । लुक्कस्मान्न भवति । अलुक्परत्वात् । लुकीत्युच्यते न चात्र लुकं पश्यामः ॥ लुकीति नैषा परसप्तमी शक्या विज्ञातुं न हि लुका पौर्वापर्यमस्ति । का तर्हि । सत्सप्तमी । लुकि सतीति । सत्सप्तमी चेत्प्राप्नोति ॥ एवं तर्हीदमिह व्यपदेश्यं सदाचार्यो न व्यपदिशति । किम् ।

---

(सू.४९ वा.१) 'तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना अवन्ती वगैरे शब्दांमधील स्त्रीप्रत्ययाचा लुक् होत नाहीं', असें म्हणावें; उदा०–अवन्ती, कुरूः.

(वा.२) तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना अवन्ती वगैरे शब्दांमधील लुकचा अप्रतिषेध म्हणजे निषेध सांगावयास नको. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय.

तर मग अवन्ती वगैरे शब्दांमधील स्त्रीप्रत्ययाचा लुक् कां होत नाहीं ?

लुक् पुढें नाहीं म्हणून. सूत्रामध्यें लुकि असें परनिमित्त धरलें आहे. आणि अवन्ती वगैरे उदाहरणांमध्यें तर स्त्रीप्रत्ययाच्या पुढें तद्धितप्रत्ययाचा लुक् झालेला दिसत नाहीं.

पण सूत्रामध्यें लुकि अशी जी सप्तमी उच्चारली आहे ती परसप्तमी म्हणजे लुक् पुढें असतांना अशा अर्थाची घेणें शक्य नाहीं. कारण लुक् हें नांव कोणत्याही वर्णाचें नव्हे, तर वर्णाचें जें अनुच्चारण त्याला लुक् असें म्हणतात. तेव्हां अर्थातच अनुच्चारण हें अभावरूपी असल्यामुळें त्याच्याशीं पौर्वापर्य संभवत नाहीं.

तर मग सूत्रामधील लुकि ही सप्तमी कोणत्या अर्थानें घातली आहे ?

लुकि ही सतिसप्तमी आहे. म्हणजे फक्त लुक् झाला असतांना इतकाच अर्थ होतो. आणि अशी सत्सप्तमी घेतल्यामुळें अवन्ती वगैरे उदाहरणांमध्यें स्त्रीप्रत्ययाचा लुक् होईल असा दोष येतो.

तर मग आचार्य वार्तिककार यांनीं खरें उत्तर सांगितलें पाहिजे असें असूनही येथें सांगितलें नाहीं. परंतु तें त्यांच्या मनांतून आहे.

तें उत्तर कोणतें ?

तें उत्तर असें की, पूर्वसूत्रांतून 'उपसर्जनस्य' हें पद येथें अनुवृत्त होत आहे. आणि अवन्ती वगैरे उदाहरणामध्यें जाति म्हणजे अपत्यार्थ हा मुख्य आहे. उपसर्जन म्हणजे

---

१. तद्धिताचा लुक् झाला असतां तेथें उपसर्जन अशा स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो; उदा०– पञ्च इन्द्राण्यो देवता अस्य पञ्चेन्द्रः.

२. अवन्ति आणि कुन्ति या शब्दांहून अपत्यार्थी 'वृद्धेत्कोसल' (४।१।१५१) या सूत्रानें ञ्यङ्प्रत्यय, त्या यङाचा 'स्त्रियामवन्तिकुन्ति' (४।१।१५६) यानें लुक्, नंतर 'इतो मनुष्य०' (४।१।६५) यानें ङीष् केला असतां अवन्तिराजाची मुलगी, कुन्तिराजाची मुलगी, या अर्थाचे अवन्ती, कुन्ती, हे शब्द तयार होतात. कुरूः येथें 'कुरुनादिभ्यो०' (४।१।१५२) यानें ण्यप्रत्ययः, त्याचा पूर्वोक्त सूत्रानें लुक्, नंतर 'ऊङुतः' (४।१।६६) यानें ऊङ् केला आहे. येथें अवन्ति वगैरे शब्द अपत्यार्थाचें उपसर्जन झाले आहेत. 'उपसर्जनसंबंधी स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो, तद्धितलुक् झाला असतां', असा सूत्राचा अर्थ मनांत धरून हा आक्षेप घेतला आहे.

३. 'तद्धितलुकि' ही परसप्तमी असल्यामुळें स्त्रीप्रत्ययाच्या पुढील तद्धिताचा लुक् जेथें होत असेल तेथें स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो. आणि प्रकृत उदाहरणामध्यें तर लुक् केल्यानंतर त्याच्यापुढें स्त्रीप्रत्यय झाला आहे.

उपसर्जनस्येति वर्तते। न च जातिरुपसर्जनम् ॥

## इद्गोण्याः ॥ १.२.५० ॥

**इद्गोण्या नेति वक्तव्यम्**

गोण्या नेत्येव सिद्धम्। नार्थ इत्त्वेन॥ का रूपसिद्धिः। पञ्चगोणिः दशगोणिः।

**ह्रस्वता हि विधीयते।**

ह्रस्वत्वमत्र विधीयते गोस्त्रियोरुपसर्जनस्य [१.२.४८] इति॥

**इति वा वचने तावत्**

इदिति वोच्यते नेति वा को न्वत्र विशेषः॥

**मात्रार्थे वा कृतं भवेत् ॥१॥**

अथवा मात्रार्थमिदं वक्तव्यम्। गोणीमात्रमिदं गोणिः॥

अपर आह।

**गोण्या इत्त्वं प्रकरणात्**

अशिष्यं गोण्या इत्त्वम्। किं कारणम्। प्रकरणात्। प्रकृतं ह्रस्वत्वम्। ह्रस्व इति वर्तते॥ ननु सूच्याः।

**सूच्याद्यर्थमथापि वा॥**

सूच्याद्यर्थमिदं द्रष्टव्यम्। पञ्चसूचिः

---

अप्रधान नाहीं तेव्हां अर्थातच येथें लुक् होत नाहीं.

(सू. ५०) हें सूत्र 'गोण्या न' असें केल्यानेंच काम भागेल. इत् असें म्हणण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

अशा रीतीनें जर प्रकृतसूत्रानें ह्रस्व इकार आदेश सांगितला नाहीं तर पञ्चगोणिः, दशगोणिः, हीं उदाहरणें कशीं सिद्ध होतील ?

पञ्चगोणिः या उदाहरणामध्यें गोणीशब्दामधील स्त्रीप्रत्ययाच्या लुकाचा प्रकृतसूत्रानें निषेध केला असतां 'गोस्त्रियोः' (१।२।४८) या सूत्रानें ह्रस्व होईल.

प्रकृतसूत्रामध्यें 'इत्' असें म्हटलें काय आणि 'न' असें म्हटलें काय, या दोहोंमध्यें फरक काय आहे ? (फरक कांहीं दिसत नाहीं.)

अथवा मात्रच्प्रत्ययाचा लुक् झाला असतांना तेथें इत्त्व होण्याकरितां सूत्रामध्यें इत् असेंच म्हटलें पाहिजे; उदा०—गोणिः. गोणि परिमाणभर जें धान्य त्याला गोणिः असें म्हणतात.

येथें दुसरे कांहीं लोक असें म्हणतात की— प्रकृतसूत्रानें गोणीशब्दाला इत्त्व सांगावयास नको.

कां बरें ?

मागें ह्रस्व सांगितला आहे त्याची येथें अनुवृत्ति करितां येईल.

पण सूचीशब्दासंबंधानें उदाहरण कसें बरें साधेल ?

अथवा सूची वगैरे शब्दांना इत्त्व होण्याकरितां सूत्रामध्यें इत् असें म्हटलें आहे. (इत् असा योगविभाग करून पञ्चसूचिः, दशसूचिः, हीं उदाहरणें साधतील.)

---

४. अनुवृत्त 'उपसर्जनस्य' हें स्त्रीप्रत्ययाचें विशेषण केलें आहे व त्याचा अप्रधान हा लौकिक अर्थ येथें घेतला आहे.

१. तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतां गोणीशब्दाला इकार अन्तादेश होतो; उदा०— पञ्चभिर्गोणीभिः क्रीतः पञ्चगोणिः.

२. गोणीशब्दाहून मात्रच् प्रत्यय करून त्याचा 'प्रमाणे लः' (वार्ति०) यानें लुक् केला असतां गोणभर व्रीहि या अर्थाचा जो गोणी शब्द तेथें तद्धितलुक् झाला असल्यानें पूर्वसूत्रानें स्त्रीप्रत्ययाचा लुक् प्राप्त होतो. तेथें 'गोण्या न' असें सूत्र करून स्त्रीप्रत्ययाच्या लुकाचा निषेध केला असतां 'गोस्त्रियोः' यानें ह्रस्व होणार नाहीं. कारण उपसर्जन हें अप्रधान असतें. तो त्याचा अप्रधानपणा ज्या प्रधानामुळें येत असेल त्या प्रधानवाचक शब्दाचा तो उपसर्जनसंज्ञक शब्द अन्त्यावयव पाहिजे.

३. 'इत्', 'गोण्याः', असा योगविभाग करून दोन सूत्रें मानावयाचीं. त्यांत 'तद्धितलुक् झाला असतां उपसर्जन स्त्रीप्रत्ययान्ताला इत्त्व होतें' असा पहिल्या सूत्राचा अर्थ समजावा. व हें सूत्र 'लुक्-

दशसूचिः ॥

**इद्गोण्या नेति वक्तव्यं ह्रस्वता हि विधीयते ।**
**इति वा वचने तावन्मात्रार्थं वा कृतं भवेत् ॥ १ ॥**
**गोण्या इत्त्वं प्रकरणात्सूच्याद्यर्थमथापि वा ॥**

**लुपि युक्तवद्व्यक्तिवचने ॥ १.२.५१॥**

व्यक्तिवचने इति किमर्थम् । शिरीषाणामदूरभवो ग्रामः शिरीषाः । तस्य ग्रामस्य वनं शिरीषवनम् । किं च स्यात् । विभाषौषधिवनस्पतिभ्यः [८.४.६] इति णत्वं प्रसज्येत ॥

अपर आह । कटुबदर्या अदूरभवो ग्रामः कटुबदरी । षष्ठी युक्तवद्भावेन मा भूदिति ॥ अथ व्यक्तिवचने इत्यप्युच्यमाने कस्मादेवात्र न भवति षष्ठ्यपि हि वचनम् । नेदं पारिभाषिकस्य वचनस्य ग्रहणम् । किं तर्हि ।

---

(सू.५१) या सूत्रामध्यें 'व्यक्तिवचने' असें कशाकरतां म्हटलें आहे ?

शिरीषवनम् हें उदाहरण साधण्याकरतां तसें म्हटलें आहे. शिरीष नांवाच्या वनस्पतीच्या जवळच्या गांवाला शिरीष असें म्हणतात. त्या गांवाच्या जवळचें जें वन तें शिरीषवन होय.

शिरीषवनम् या उदाहरणामध्यें प्रकृतसूत्रानें लिंग आणि वचन यांशिवाय इतरांचा अतिदेश झाला असतां काय दोष येईल ?

वनस्पतित्वाचा अतिदेश झाला असतां 'विभाषौषधिवनस्पतिभ्यः' (८।४।६) या सूत्रानें णत्व होऊं लागेल.

येथें दुसरे आचार्य असें म्हणतात की, कटुबदरी या उदाहरणामध्यें प्रकृतसूत्रानें षष्ठीचा अतिदेश होऊं लागेल. तो न व्हावा त्याकरितां सूत्रामध्यें 'व्यक्तिवचने' असें म्हटलें आहे. कटुबदरीजवळचा गांव असा येथें कटु या शब्दाचा अर्थ आहे.

आतां प्रकृतसूत्रामध्यें 'व्यक्तिवचने' असें ह्मटलें तरी देखील कटुबदरी येथें षष्ठी कां होत नाहीं ? कारण षष्ठी म्हणजे हें एक वचनेंच आहे.

सूत्रामध्यें वचन असें जें म्हटलें आहे त्या वचनशब्दानें सु वगैरे प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे असें समजूं नये.

तर मग सूत्रामधील वचन या शब्दाचा अर्थ काय ?

---

तद्धितलुकि' या लुकाचा अपवाद होय. त्यामुळें पञ्चगोणिः, पञ्चसूचिः, वगैरे ठिकाणीं इकार आदेश साधत आहे. आतां 'इत्' या योगविभागानेंच पञ्चगोणिः हें साधत असल्यामुळें 'गोण्याः' हें दुसरें सूत्र पहिल्या सूत्राला अनित्यता सुचवितें. त्यामुळें पञ्चसूचिः इत्यादि इष्टस्थलींच पहिल्या सूत्राची प्रवृत्ति होत असल्यामुळें अतिप्रसंग येत नाहीं.

१. प्रत्ययाचा लुप् झाला असतां तेथें प्रकृतीच्या अर्थाला अनुसरून लिंग आणि वचन समजावें; उदा०— अङ्गानां निवासो जनपदः अङ्गाः, वङ्गाः, कलिङ्गाः. येथें 'जनपदे लुप्' (४।२।८१) यानें लुप् झाला आहे.

२. शिरीषशब्दाहून 'अदूरभवश्च' (४।२।७०) या सूत्रानें अण्प्रत्यय, त्याचा 'वरणादिभ्यश्च' (४।२।८२) यानें लुप्, त्यानंतर वनशब्दाशीं षष्ठीतत्पुरुष. येथील शिरीषशब्द वनस्पतिवाचक नसल्यामुळें त्याच्यापुढील वनशब्दाच्या नकाराला णकार (८।४।६) होत नाहीं. आतां प्रकृतसूत्रामध्यें 'व्यक्तिवचने' असें म्हटलें नाहीं तर वनस्पतित्वाचाही अतिदेश होऊन णत्व होईल.

३. कटुकबदरी येथें 'अदूरभवश्च' (४।२।७०) यानें केलेल्या अण्प्रत्ययाचा लुप् झाला आहे. तो अण्प्रत्यय करतांना कटुकबदरी या शब्दाला षष्ठीप्रत्यय लागला होता.

४. षष्ठीविभक्तीचें जें एकवचन, द्विवचन आणि बहुवचन असे ङस्, ओस्, आम्, हे तीन प्रत्यय त्यांना अर्थातच वचन असें म्हणतां येतें.

अन्वर्थग्रहणम् । उच्यते वचनमिति । एवमपि षष्ठी प्राप्नोति षष्ठ्यपि ह्युच्यते । लुपोक्तत्वात्तस्यार्थस्य द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यमुक्तार्थानामप्रयोग इति । आतिदेशिकी तर्हि प्राप्नोति । एवं तर्हि

**प्रागपि वृत्तेर्युक्तं वृत्तं चापीह यावता युक्तम् ।**
**वक्तुश्च कामचारः प्राग्वृत्तेर्लिङ्गसंख्ये ये ॥**

प्रागपि वृत्तेर्युक्तं वनस्पतिभिर्नगरं वृत्तं चापि युक्तं वनस्पतिभिर्नगरम् । वृत्ते च युक्तवद्भावो विधीयते । कामचारश्च प्रयोक्तुः प्राग्वृत्तेर्ये लिङ्गसंख्ये ते अतिदेष्टुं वृत्तस्य वा ये लिङ्गसंख्ये ते । यावता कामचारो वृत्तस्य ये लिङ्गसंख्ये ते अतिदेक्ष्येते न प्राग्वृत्तेर्ये ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

---

हा वचनशब्द अन्वर्थ आहे. जें सांगितलें जातें तें वचन होय.

असें म्हटलें तरी देखील कटुकबदरी या उदाहरणामध्यें षष्ठी होते असा दोष येतोच. कारण षष्ठीदेखील सांगितली असल्यामुळेंच तिला वचन असें म्हणतां येतें.

पण कटुकबदरी येथें कटुकबदरीच्या जवळचा गांव या अर्थी केलेल्या तद्धित प्रत्ययाचा लुप् झाला आहे. त्यामुळें तो सर्वच अर्थ कटुकबदरी या शब्दापासून बोधित होतो. तेव्हां संबंध हा देखील अर्थ कटुकबदरी या शब्दानेंच दाखविला[५] जात असल्यामुळें त्या संबंध या अर्थाला दाखविणारा दुसरा शब्द म्हणजे षष्ठीप्रत्यय लागणार नाहीं.

कां बरें ?

जो अर्थ एका शब्दापासून बोधित होतो त्या अर्थी पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग होत नाहीं असा न्याय आहे.

तर मग प्रकृतसूत्रानें केलेल्या अतिदेशाच्या जोरावर कटुकबदरी येथें षष्ठीप्रत्यय होईल असा दोष येतोच.

तर मग आतां आम्ही याचें उत्तर असें देतोंः— वृत्तीच्या पूर्वी देखील म्हणजे फक्त तद्धितप्रत्ययाची विवक्षा मात्र केली असेल त्या वेळीं तद्धितप्रत्ययार्थ नगर हें वनस्पतीनें म्हणजे प्रकृतीच्या अर्थानें युक्त म्हणजे अन्वित आहेच. तसेंच त्यानंतर वृत्ति केली असतांना म्हणजे तद्धितप्रत्यय केला असतांना देखील तद्धितप्रत्ययार्थ नगर हें प्रकृत्यर्थ वनस्पतीनें युक्त आहेच. आणि प्रकृतसूत्रानें जो युक्तवद्भाव सांगितला आहे तो वृत्ति केल्यानंतरच सांगितला आहे. तेव्हां अर्थातच वर दाखविलेल्या दोन युक्तांपैकीं कोणत्या अवस्थेतील युक्त मनांत घेऊन त्याचा अतिदेश करावा ही गोष्ट प्रयोग करणाऱ्याच्या मनावर अवलंबून राहते. म्हणजे वृत्ति करणाच्या पूर्वावस्थेमधिल ज्या लिंग आणि संख्या त्यांचा वाटेल तर अतिदेश करावा; अथवा वृत्ति झाल्यानंतर ज्या युक्ताच्या लिंग आणि संख्या त्यांचा अतिदेश करावा आणि हा अतिदेश करणें प्रयोग करणाऱ्याच्या मर्जीवर जर आहे तर वृत्ति केल्यानंतर ज्या युक्ताच्या लिंग आणि संख्या त्यांचाच अतिदेश करूं. वृत्ति करण्याच्या पूर्वावस्थेमधील युक्ताच्या ज्या लिंग आणि संख्या त्यांचा अतिदेश करणार नाहीं म्हणजे कांहीं दोष येणार[६] नाहीं.

---

५. कटुकबदरीच्या जवळ असलेला गांव इतका आंतील षष्ठीविभक्तीच्या अर्थासकट सगळा अर्थ कटुकबदरी हा शब्द दाखवीत आहे.

६. वृत्ति ही नेहमीं वाक्यावरूनच करावयाची असते; जसें कटुकबदरीच्या जवळचा गांव. या वाक्यांतील 'जवळचा गांव' या अर्थी कटुकबदरीशब्दाहून प्रत्यय केला म्हणजे वृत्ति होते. तेव्हां प्रत्यय करण्याचें मनांत आणिलें असतां प्रकृत्यर्थ वनस्पति हा, त्यानें तो गांव अन्वित होत आहे, आणि वृत्ति केल्यानंतर तर हा अर्थ स्पष्टच लोकांना कळतो. अर्थातच याच्या उलट प्रकृत्यर्थ वनस्पति हा त्या गांवानें युक्त असतो. याच अभिप्रायानें सूत्रामध्यें 'युक्त' हा शब्द प्रकृत्यर्थ या अर्थी सूत्रकारांनीं योजिला आहे. आतां तो वनस्पति हा प्रकृत्यर्थ

**अन्यत्राभिधेयव्यक्तिवचनभावाल्लुपि युक्तवदनुदेशः ॥ १ ॥**

अन्यत्राभिधेयवल्लिङ्गवचनानि भवन्ति । कान्यत्र । लुकि । लवणः सूपः । लवणा यवागूः । लवणं शाकमिति । अन्यत्राभिधेयवद्व्यक्तिवचनानि भवन्ति लुकि । इहाप्यभिधेयवल्लिङ्गवचनानि प्राप्नुवन्ति । इष्यन्ते चाभिधानवत्स्युरिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति लुपि युक्तवदनुदेशः । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**लुपोऽदर्शनसंज्ञित्वादर्थगतिर्नोपपद्यते ॥ २ ॥**

लुब्नामेयमदर्शनस्य संज्ञा क्रियते न चादर्शनस्य लिङ्गसंख्ये शक्येते अतिदेष्टुम् । लुपोऽदर्शनसंज्ञित्वादर्थगतिर्नोपपद्यते ॥

**न वादर्शनस्याशक्यत्वादर्थगतिः साहचर्यात् ॥ ३ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अदर्श-

---

पण हें सूत्र आचार्य पाणिनीनें कशाकरितां बरें केलें आहे ?

(वा.१) लुपाशिवाय इतर ठिकाणीं मुख्य अर्थाच्या धोरणानें लिंग आणि संख्या यांचा संबंध होत असतो.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें ?

इतर ठिकाणीं म्हणजे प्रत्ययाचा लुक् झाला असतांना; उदा०— लवणः सूपः, लवणा यवागूः, लवणं शाकम्. येथें लवणानें संसृष्ट या अर्थी लवणशब्दाच्या पुढें 'संसृष्टे' (४।४।२२) यानें केलेल्या तद्धित ठक् प्रत्ययाचा 'लवणाल्लुक्' (४।४।२४) या सूत्रानें लुक् झाला आहे. येथें सूप, यवागू आणि शाक या मुख्य अर्थांना अनुसरून लवणशब्दाचें लिंग बदललें आहे. तेव्हां अर्थातच लुपाशिवाय इतर ठिकाणीं म्हणजे लुक् झाला असतांना मुख्य अर्थाला अनुसरून लिंगवचनें होत असतात तशीं येथें देखील म्हणजे लुप् झाला असतांना देखील मुख्य अर्थाला अनुसरून त्याप्रमाणें लिंगवचनें होऊं लागतील. आणि येथें तर मूळचा जो अर्थ त्याचींच लिंगवचनें कायम राहिलीं पाहिजेत, असें इष्ट आहे. आणि ही गोष्ट तर कांहीं तरी अधिक यत्न केल्याशिवाय सिद्धीला जाणार नाहीं; म्हणून आचार्य पाणिनीनें येथें लुप् झाला असतांना युक्तवत् असा अतिदेश केला आहे. तेव्हां अशाकरितां हें सूत्र केलें.

हा प्रकृतसूत्राचा उपयोग आहे खरा, पण—

पण काय ?

(वा.२) लुप् म्हणून जें काय म्हणतात तें एक विशेष प्रकारच्या अदर्शनाचें म्हणजे उच्चारण न करण्याचें नांव आहे. आणि त्या अदर्शनाला तर अमक्यासारखें लिंगवचन लावा असा अतिदेश करतां येत नाहीं. एकंदरींत येथें लुप् यापासून अदर्शन या अर्थाचा बोध होत असल्यामुळें त्या अदर्शनाला युक्तवत् म्हणजे कसें करावें तो अर्थाचा बोध येथें कांहीं बरोबर होत नाहीं.

(वा.३) अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

---

वृत्तीच्या पूर्वीं आणि वृत्ति केल्यानंतर अशा दोन्ही वेळीं त्या गांवानें युक्त आहे खरा परंतु पूर्वावस्थेंतील त्या युक्ताच्या लिंगसंख्यांचा अतिदेश होत नाहीं. कारण लुप् झाला असतां असें म्हटलें असल्यामुळें, अर्थात् वृत्ति केल्यानंतरच, प्रत्ययार्थाच्या ठिकाणीं प्रकृत्यर्थासंबंधी लिंगसंख्यांचा अतिदेश प्रकृतसूत्रानें सांगितला आहे. आणि त्या वृत्त अवस्थेंत कटुकबदरी हा शब्द आपल्या अर्थाला पूर्वींप्रमाणें मोकळेपणानें न दाखवितां प्रधानार्थानें म्हणजे त्या गांवानें संसृष्ट अशा आपल्या अर्थाला दाखवितो. संसृष्ट म्हणजे संसर्गयुक्त, तेव्हां संसर्ग या अर्थी होणारी षष्ठी अर्थातच त्या वेळीं संभवत नसल्यामुळें तिचा अतिदेश होत नाहीं.

नस्याशक्यत्वात् । अदर्शनस्य लिङ्गसंख्ये अशक्ये अतिदेष्टुमिति कृत्वादर्शनसहचरितो योऽर्थस्तस्य गतिर्भविष्यति साहचर्यात् ॥

**योगाभावाच्चान्यस्य ॥ ४ ॥**

अदर्शनेन च योगो नास्तीति कृत्वादर्शनसहचरितो योऽर्थस्तस्य गतिर्भविष्यति साहचर्यात् ॥

**समास उत्तरपदस्य बहुवचनस्य लुपः ॥ ५ ॥**

समास उत्तरपदस्य बहुवचनस्य लुपो युक्तवद्भावो वक्तव्यः । मधुरापञ्चालाः । किं प्रयोजनम् । नियमार्थम् । समास उत्तरपदस्यैव । क मा भूत् । पञ्चालमधुरे इति ॥

## विशेषणानां चाजातेः ॥१.२.५२॥

कथमिदं विज्ञायते । जातिर्यद्विशेषणमिति । आहोस्विज्जातेर्यानि विशेषणानीति । किं चातः । यदि विज्ञायते जातिर्यद्विशेषणमिति सिद्धं पञ्चाला

---

अदर्शनाला दुसऱ्या कशाचाही अतिदेश शक्य नाहीं म्हणून. म्हणजे ज्या अर्थी अदर्शनाला दुसऱ्याच्या लिंगाचा आणि संख्येचा अतिदेश करणें अशक्य आहे त्या अर्थी येथें अदर्शन या शब्दानें अदर्शन झालें असतांना त्या ठिकाणीं अवशिष्ट भागापासून मनांत येणारा जो अर्थ त्या अर्थाचा बोध अदर्शन शब्दापासून होईल. कारण त्या दोघांचें म्हणजे अवशिष्ट भागाचा अर्थ आणि अदर्शन यांचें साहचर्य आहे म्हणजे निकट संबंध आहे.

(वा.४) शिवाय दुसऱ्या कोणाचा अदर्शनाशीं संबंध घडत नाहीं म्हणून येथें अदर्शन झालें असतांना मनांत येणारा अर्थ त्याचा संबंध असल्यामुळें तो घेतां येईल.

(वा.५) समासामध्यें जें बहुवचनान्त उत्तरपद, तें जर लुप् केलेलें असेल तर तेथें त्या समासाला युक्तवद्भाव होतो असें म्हणावें; उदा० मधुरापञ्चालाः.

हें वार्तिक कशाकरितां केलें आहे ?

हें वार्तिक नियमाकरितां केलें आहे. तो नियम असा की समासामध्यें जर युक्तवद्भाव होईल तर तो उत्तरपदालाच करावा; म्हणजे अर्थात् पूर्वपदाला करूं नये.

या नियमानें कोणत्या ठिकाणीं युक्तवद्भाव होत नाहीं ?

पञ्चालमधुरे या द्वंद्वसमासामध्यें पञ्चाल हें पूर्वपद असल्यामुळें त्याला युक्तवद्भाव होत नाहीं.

(सू.४२) या सूत्रामध्यें अजातेः या पदानें जो युक्तवद्भावाचा निषेध सांगितला तो कसा समजावा ? म्हणजे जातिरूपी जें विशेषण त्याला युक्तवद्भाव होत नाहीं असा समजावा किंवा जातीचीं जीं विशेषणें त्यांना युक्तवद्भाव होत नाहीं असा समजावा ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

फरक असा की, जातिरूपि जें विशेषण त्याला युक्तवद्भाव होत नाहीं.

असें समजलें तर पञ्चालाः जनपदः हें उदा-

---

७. पञ्चालनांवाच्या क्षत्रियांचें निवासस्थान या अर्थी पञ्चालशब्दाहून 'तस्य निवासः' (४।२।७९) या सूत्रानें अण् प्रत्यय करून त्याचा 'जनपदे लुप्' (४।२।८१) या सूत्रानें लुप् केला असतां पञ्चाल नांवाच्या क्षत्रियांचा राहण्याचा देश अशा अर्थाला दाखविणारा पञ्चालशब्द सिद्ध झाला आहे. हा शब्द बहुवचनांतच चालतो. कारण युक्तवद्भावानें बहुत्वाचा अतिदेश होत आहे. त्याचा नगरीविशेषवाचक मधुराशब्दाबरोबर द्वंद्वसमास केला असतां 'रामकृष्णौ' येथीलप्रमाणें एक मधुरा नगरी व एक पंचाल राजांचा राहण्याचा देश असे दोनच अर्थ असल्यामुळें त्या द्वंद्वाहून द्विवचनच सरळ प्राप्त आहे. तथापि द्विवचन होत नाहीं. कारण पंचालशब्द युक्तवद्भावानें बहुवचनान्त आहे. घटश्च पटाश्च घटपटाः याप्रमाणें हें होय.

१. लुबर्थाचें जें विशेषण त्यालाही लुबर्थाप्रमाणें लिंगवचन करावें; उदा० -पञ्चाला रमणीयाः, गोदौ रमणीयौ.

जनपद इति सुभिक्षः संपन्नपानीयो बहुमाल्यफल इति न सिध्यति। अथ विज्ञायते जातेर्यानि विशेषणानीति सिद्धं सुभिक्षः संपन्नपानीयो बहुमाल्यफल इति पञ्चाला जनपद इति न सिध्यति॥ एवं तर्हि नैवं विज्ञायते जातिर्यद्विशेषणमिति नापि जातेर्यानि विशेषणानीति। कथं तर्हि। विशेषणानां युक्तवद्भावो भवत्या जातिप्रयोगात्॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**विशेषणानां वचनं जातिनिवृत्त्यर्थम् ॥ १॥**

जातिनिवृत्त्यर्थोऽयमारम्भः॥ किमुच्यते जातिनिवृत्त्यर्थ इति न पुनर्विशेषणानामपि युक्तवद्भावो यथा स्यादिति।

**समानाधिकरणत्वात्सिद्धम् ॥ २॥**

समानाधिकरणत्वाद्विशेषणानां युक्तवद्भावो भविष्यति॥ यद्येवं नार्थोऽनेन। लुपोऽन्यत्रापि जातेर्युक्तवद्भावो न भवति। क्वान्यत्र। बदरी सूक्ष्मकण्टका मधुरा वृक्ष इति। किं पुनः कारणमन्यत्रापि जातेर्युक्तवद्भावो न भवति। आविष्ट-

---

हरण सिद्ध होईल. म्हणजे जनपद या जातीला युक्तवद्भाव न झाल्यामुळें बहुवचन न करतां जनपदः असें एकवचन केलें आहे तें बरोबर आहे असें म्हणतां येईल. परंतु त्याच जनपदाला सुभिक्षः, संपन्नपानीयः, बहुमाल्यफलः, अशीं जीं एकवचनान्त विशेषणें लागतात तीं बरोबर होणार नाहींत. कारण तेथें पञ्चालाः या विशेष्याप्रमाणें युक्तवद्भावानें बहुवचन झालें पाहिजे.

आतां जातीचीं जीं विशेषणें त्यांना युक्तवद्भाव होत नाहीं असें समजलें तर सुभिक्षः, संपन्नपानीयः, बहुमाल्यफलः, हा एकवचनान्त प्रयोग बरोबर आहे असें म्हणतां येईल. परंतु पञ्चालाः जनपदः येथें जनपदः हा एकवचनान्त प्रयोग बरोबर आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण तेथें पञ्चालाः या विशेष्याप्रमाणें युक्तवद्भावानें जनपदाः असें बहुवचन झालें पाहिजे.

अशा रीतीनें जर दोन्ही तऱ्हेनें अर्थ केला असतांना दोष येतो तर जातिस्वरूपी जें विशेषण त्याला युक्तवद्भाव होत नाहीं असा अर्थ समजूं नये, आणि जातीचीं जीं विशेषणें त्यांना युक्तवद्भाव होत नाहीं असेंही समजूं नये.

तर मग प्रकृतसूत्रानें सांगितलेला जो विशेषणाला युक्तवद्भाव तो कसा समजावा?

तो असा समजावा की, सूत्रामध्यें 'अजातेः' असें पद न घेतां आ, जातेः अशीं पदें समजावींत. म्हणजे विशेषणाला युक्तवद्भाव करण्याची मर्यादा जातिवाचक शब्दाचा प्रयोग ही होय. (म्हणजे जोंपर्यंत वाक्यामध्यें जातिवाचक शब्दाचा प्रयोग केला नाहीं तोपर्यंत विशेषणाला युक्तवद्भाव होतो. आणि जातिवाचक शब्दाचा प्रयोग केला तर युक्तवद्भाव होत नाहीं. म्हणजे त्या जातीलाही होत नाहीं. आणि त्या जातीच्या विशेषणालाही होत नाहीं.)

पण आतां हें सूत्र कशाकरतां बरें केलें आहे?

(वा.१) जातीला युक्तवद्भाव न व्हावा या निषेधाकरितां फक्त हें सूत्र केलें आहे. जातीला युक्तवद्भाव न व्हावा एवढ्याचकरितां फक्त हें सूत्र केलें आहे असें काय म्हणून म्हणतां? विशेषणाला युक्तवद्भाव झाला पाहिजे अशा युक्तवद्भावाच्या विधीकरितां हें सूत्र केलें आहे असें कां म्हणत नाहीं?

(वा.२) विशेषणें हीं विशेष्याशीं समानाधिकरण असतात म्हणून; म्हणजे त्याच अर्थाला निराळ्या स्वरूपानें दाखवितात, म्हणून त्यांना युक्तवद्भाव आपोआपच होईल. त्याकरितां स्वतन्त्र विधि सांगावयास नको.

तेव्हां हें सूत्र फक्त जातीला युक्तवद्भाव न व्हावा एवढा फक्त निषेध सांगण्याकरितां केलें आहे.

असें जर असेल तर हें सूत्र मुळींच करा-

लिङ्गा जातिर्यल्लिङ्गमुपादाय प्रवर्तते उत्पत्तिप्रभृत्या विनाशान्न तल्लिङ्गं जहाति ॥ न तर्हीदानीमयं योगो वक्तव्यः। वक्तव्यश्च। किं प्रयोजनम्। इदं तत्र तत्रोच्यते गुणवचनानां शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्तीति। तदनेन क्रियते ॥

**हरीतक्यादिषु व्यक्तिः ॥ ३ ॥**

हरीतक्यादिषु व्यक्तिर्भवति युक्तवद्भावेन। हरीतक्याः फलानि हरीतक्यः फलानि ॥

**खलतिकादिषु वचनम् ॥ ४ ॥**

खलतिकादिषु वचनं भवति युक्तवद्भावेन। खलतिकस्य पर्वतस्यादूरभवानि वनानि खलतिकं वनानि ॥

**मनुष्यलुपि प्रतिषेधः ॥ ५ ॥**

मनुष्यलुपि प्रतिषेधो वक्तव्यः। चञ्चाभिरूपः। वध्रिका दर्शनीयः ॥

---

वयास नको. कारण लुप् नसतांना इतर ठिकाणींसुद्धां जातीला युक्तवद्भाव होत नसतो; म्हणजे विशेष्याप्रमाणें लिंगवचनें होत नसतात.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें ?

बदरी सूक्ष्मकण्टका मधुरा वृक्षः. येथें वृक्षः याप्रमाणें पुंलिंग झालेलें बदरी येथेंही दृष्टीस पडत नाहीं; सूक्ष्मकण्टका या विशेषणालाही दृष्टीस पडत नाहीं.

पण असें असण्याचें काय बरें कारण असावें, की लुपाशिवाय इतर ठिकाणीं सुद्धां जातीला विशेष्याप्रमाणें लिंगवचनें होत नाहींत?

कारण असें की, जातीचें लिंग कायम असतें; म्हणजे ती जाती जें लिंग गृहीत धरून प्रवृत्त होते, म्हणजे अस्तित्वांत येते, तें लिंग उत्पत्तीपासून नाश होईपर्यंत ती जाति सोडीत नाहीं.

तर मग एकंदरींत प्रकृत सूत्र करावयास नको असेंच समजावयाचें ना ?

तसें नाहीं; हें सूत्र केलें पाहिजे.

कशाकरितां हें सूत्र केलें पाहिजे ?

अशाकरितां केलें पाहिजे की, गुणवाचक शब्दांना आपल्या आश्रयाप्रमाणें लिंगवचनें होतात असें जें ठिकठिकाणीं म्हटलें जातें तेंच या सूत्रानें सांगितलें आहे.[२]

(वा. ३) हरीतकी वगैरे शब्दांमध्यें युक्तवद्भावानें मूळ प्रकृतीसारखें फक्त लिंग होतें असें म्हणावें; म्हणजे पुढील विशेष्याप्रमाणें वचन फिरविण्यास हरकत नाहीं; उदा०—हरीतक्याः फलानि. हरीतकीचीं फळें असा हरीतक्यः याचा अर्थ आहे. येथें फक्त मूळचें स्त्रीलिंग कायम राहिलें आहे. एकवचन कायम राहिलें नाहीं.

(वा. ४) खलतिक वगैरे शब्दांमध्यें युक्तवद्भावानें मूळ प्रकृतीसारखें फक्त वचन होतें असें म्हणावें; म्हणजे अर्थात् पुढील विशेष्याप्रमाणें लिंग फिरवण्यास हरकत नाहीं; उदा० खलतिकं वनानि. खलतिक नांवाच्या पर्वताच्या जवळ असलेलीं वनें असा येथें अर्थ आहे. येथें मूळ शब्दाप्रमाणें खलतिकम् असें एकवचन कायम राहिलें आहे; पुंलिंग कायम राहिलें नाहीं.

'लुम्मनुष्ये' (५।२।९८) या सूत्रानें लुप् झाला असतांना तेथें विशेषणाला युक्तवद्भाव होत नाहीं असें म्हणावें; उदा० चञ्चाऽभिरूपः, वध्रिका दर्शनीयः; येथें चञ्चा आणि वध्रिका यांप्रमाणें त्यांच्या विशेषणाला स्त्रीलिंग कायम राहिलें नाहीं.[३]

---

२. विशेषण म्हणजे शुक्ल वगैरे गुण होत. त्या गुणांचा आश्रय हा त्या गुणांनीं युक्त असतो. म्हणून येथें अनुवृत्त झालेल्या 'युक्तवत्' या पदाचा 'आश्रयाप्रमाणें' असा अर्थ होतो. तेव्हां हें सूत्र 'गुणवाचकांना आश्रयाप्रमाणें लिंगवचनें लागू होतात' या अर्थाचें आहे असें समजावें.

३. गवत वगैरेंनीं केलेला पुतळा या अर्थाला दाखविणाऱ्या चञ्चा या स्त्रीलिंगी शब्दाहून 'त्यासारखा' (मनुष्य) या अर्थीं 'संज्ञायां च' (५।३।९७) या सूत्रानें कन् प्रत्यय करून त्याचा 'लुम्मनुष्ये' (५।३।९८) या सूत्रानें लुप् केला असतां गवताच्या पुतळ्यासारखा मनुष्य या अर्थाला चञ्चा हा स्त्रीलिंगी शब्द दाखवीत आहे. त्याला अभिरूपः हें विशेषण लावलें असतां विशेष्यभूत चञ्चाशब्दा-

**तदशिष्यं संज्ञाप्रमाणत्वात् ॥१.२.५३॥**

किं या एताः कृत्रिमाष्टिघुघभादिसंज्ञास्तत्प्रामाण्यादशिष्यम्। नेत्याह। संज्ञानं संज्ञा॥

**[लुब्योगाप्रख्यानात् ॥१.२.५४॥]**

**[योगप्रमाणे च तदभावेऽदर्शनं स्यात् ॥१.२.५५॥]**

**[प्रधानप्रत्ययार्थवचनमर्थस्यान्यप्रमाणत्वात् ॥१.२.५६॥]**

**[कालोपसर्जने च तुल्यम् ॥१.२.५७॥]**

**जात्याख्यायामेकस्मिन्बहुवचन-**

---

(सू.५३) या सूत्रामध्यें 'संज्ञा प्रमाणभूत असल्यामुळें युक्तवद्भाव सांगावयास नको' असें जें म्हटलें आहे त्याचें तात्पर्य त्या ह्या पाणिनीनें टि घु भ या कृत्रिम संज्ञा केलेल्या आहेत त्या प्रमाणभूत असल्यामुळें युक्तवद्भाव सांगावयास नको असें समजावयाचें कीं काय?

तसें समजावयाचें नाहीं असें आम्ही म्हणतों. येथें फक्त संज्ञा याचा अर्थ शब्दापासून तसा होणारा बोध इतकाच अर्थ विवक्षित आहे.

---

प्रमाणें विशेषणालाही स्त्रीलिंग युक्तवद्भावानें प्राप्त होत आहे, त्याचा 'मनुष्यलुपि' या वार्तिकानें निषेध केला आहे; म्हणून विशेष्यभूत मनुष्याप्रमाणें येथें पुंलिंग होतें. तेव्हां चञ्चा अभिरूपः असा प्रयोग होतो.

१. अमुक शब्दाचा अमुक अर्थ हें ठरविण्याविषयीं त्या शब्दापासून होणारा बोध तो प्रमाणभूत असल्यामुळें 'लुपि युक्तवत्' हें सूत्र करावयास नको. तात्पर्य असें की, दाराः असें म्हटलें असतां दारशब्दाचा अर्थ स्त्री आहे व ती एक आहे. तथापि तो दारशब्द जसें आपल्या अर्थावरील लिंगसंख्येपेक्षां निराळ्या लिंगसंख्येनें म्हणजे पुंस्त्व आणि बहुत्व यानें युक्त असा स्त्रीरूपी स्वार्थ दाखवीत आहे, व ही गोष्ट तशा अर्थाचें सूत्र केलें नसतांही प्रमाण समजली जाते, तसें पञ्चाल, कटुबदरी, वगैरे शब्दसुद्धां आपल्या अर्थावरील वास्तविक लिंगसंख्येपेक्षां निराळ्या लिंगसंख्येनें युक्त असा स्वार्थ स्वभावतःच दर्शवीत आहेत. सबब युक्तवद्भावाचें सूत्र करावयास नको.

२. कारण 'युक्तवद्भाव सांगावयास नको' ही गोष्ट 'टि घु भ वगैरे संज्ञांचें प्रामाण्य' यावरून कशी सिद्ध होते हें सांगतां येत नाहीं.

१. जनपदे लुप् इत्यादि लुप्विधायक सूत्रही करावयास नको. कारण पञ्चाल वगैरे शब्दांपासून अवयवार्थाचा बोध झालेला लोकांमध्यें दिसत नाहीं. दारशब्द हा जसा स्वभावतः स्त्रीरूप अर्थाला दाखवितो तसे पञ्चाल वगैरे शब्दही स्वभावतःच 'विशेष प्रकारचा देश' वगैरे अर्थ दाखवितात. तेव्हां तेथें तद्धितप्रत्ययही उत्पन्न होत नाहीं. सबब लुब्विधान करावयास नको.

१. पञ्चाल, कलिङ्ग, शिरीष, वरण वगैरे शब्द जनपद (देश), नगर इत्यादि अर्थाला दाखविणारे, ते जर पंचाल नांवाच्या क्षत्रियांचा राहण्याचा देश, शिरसांच्या झाडांजवळचा गांव, अशा प्रकारानें क्षत्रियादिकांच्या संबंधामुळें त्या जनपदादिक अर्थाला दाखविणारे असतील तर हल्लीं पंचाल (पंजाब) देशांत क्षत्रियांचें राहणें नसल्यामुळें त्याला पंचाल देश असें नांव लागू करतां येणार नाहीं. तें तर लागू केलें जात आहे. तेव्हां हे शब्द यौगिक नव्हेत; तर केवळ रूढीनेंच आपला अर्थ दाखविण्याविषयीं प्रवृत्त झाले आहेत.

१. प्रकृति आणि प्रत्यय यांच्या अर्थांमध्यें प्रत्ययाचा अर्थ हा प्रधान असतो. अशा अर्थाचें जें पूर्वाचार्यांनीं सूत्र केलें आहे तें करावयास नको. कारण लोकव्यवहारावरूनच तें सिद्ध होत आहे. शिवाय पाचक, औपगव, या शब्दांमध्यें जरी प्रत्ययाच्या अर्थाला प्राधान्य दिसतें तरी पचति, पच्यते, या क्रियापदांमध्यें तसें दिसत नाहीं.

१. काल आणि उपसर्जन याविषयींही पूर्वीप्रमाणेंच समजावें.

१. ज्या दिवसाच्या पूर्वीची १५ घटि उत्तररात्र व त्याच दिवसाच्या पुढील १५ घटि पूर्वरात्र, आणि त्या दोहोंमधील ३० घटि दिवस मिळून ६० घटिका हा आजचा दिवस होय, असें आजच्या दिवसाचें

## बहुवचनमन्यतरस्याम् ॥१.२.५८॥

इदमयुक्तं वर्तते । किमत्रायुक्तम् । बहवस्तेऽर्थास्तत्र युक्तं बहुवचनम् । तद्यदेकवचने शासितव्ये बहुवचनं शिष्यत एतदयुक्तम् । बहुष्वेकवचनमिति नाम वक्तव्यम् ॥ अत उत्तरं पठति ।

**जात्याख्यायां सामान्याभिधानादैकार्थ्यम् ॥ १ ॥**

जात्याख्यायां सामान्याभिधानादैकार्थ्यं भविष्यति । यत्तद्व्रीहौ व्रीहित्वं यवे यवत्वं गार्ग्ये गार्ग्यत्वं तदेकं तच्च विवक्षितम् । तस्यैकत्वादेकवचनमेव प्राप्नोति । इष्यते च बहुवचनं स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति जात्याख्यायामेकस्मिन्बहुवचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्रैकवचनादेश उक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम् । व्रीहिभ्य आगत इत्यत्र घेर्ङिति [७.३.१११] इति गुणः प्राप्नोती-

---

(सू.५८) प्रकृत सूत्रानें जें हें एकवचनाच्या ऐवजीं एकदा बहुवचन करावें असें सांगितलें आहे तें अयोग्य सांगितलें आहे असें दिसतें.

यांत अयोग्य तें काय ?

अयोग्य असें की ज्या ठिकाणीं जातीच्यासंबंधानें बोलावयाचे असतें त्या ठिकाणीं तज्जातीय पदार्थ बहुत असल्यामुळें न्यायानेंच बहुवचन होत आहे; तेव्हां बहुवचनाला एकदां एकवचन होते असें वस्तुतः सांगितलें पाहिजे. तें न सांगतांना एकवचनाच्या ऐवजीं बहुवचन होतें हें सांगणें अयोग्य नाहीं काय? तेव्हां खरोखर जातीच्यासंबंधानें बोलावयाचें असतांना बहुवचनाच्या ऐवजीं एकवचन होतें असेंच खरोखर सूत्रकारांनीं सांगितलें पाहिजे; हा सर्व विचार मनांत घेऊन आचार्य वार्तिककार असें म्हणतात.

(वा.१) जातीच्यासंबंधानें बोलावयाचें असतांना ती एक जाति प्रतिपादन केली जात असल्यामुळें तेथें अर्थ एकच विवक्षित आहे असें म्हणतां येईल. असें पहा की, अनेक व्रीहींमध्यें व्रीहित्व म्हणून जें काय आहे तें एकच आहे. तसेंच यवांमध्यें यवत्व, गार्ग्यांमध्यें गार्ग्यत्व, हीही जाति एकच आहे; तेव्हां ती जी विवक्षित असलेली व्रीहित्व एक जाति तिच्या एकत्वसंख्येला अनुसरून वस्तुतः एकवचनच होऊं लागेल, आणि प्रयोगामध्यें पहावें तर तशा ठिकाणीं बहुवचन होणें देखील इष्ट आहे. तेव्हां तें बहुवचन कांहीं तरी यत्न केल्याशिवाय सिद्धीला जाणार नाहीं, म्हणून जात्याख्यायामेकस्मिन् बहुवचनमन्यतरस्याम् हें प्रकृत सूत्र केलें आहे.

असा सूत्राचा उपयोग आहे खरा, पण—

(वा.२) त्या ठिकाणीं एकवचनाला आदेश झाला असतांना सांगितलेंच आहे. (१।१।५६ वा.१९).

तें काय सांगितलें आहे?

व्रीहिभ्य आगतः या उदाहरणामध्यें व्रीहि या जातिवाचक शब्दाच्या पुढील पञ्चमी एकवचन ङसिप्रत्ययाला बहुवचन भ्यस् प्रत्यय आदेश झाला असल्यामुळें तेथें 'स्थानिवदादेशो' (१।१।५६) या सूत्रानें स्थानिवद्भाव होऊन 'घेर्ङिति' (७।३।१११) या सूत्रानें गुण होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं.

---

लक्षण पूर्ववैयाकरणांनीं केलें आहे. तसेंच 'अप्रधान तें उपसर्जन होय' असें उपसर्जनाचें लक्षण सांगितलें आहे. तीं हीं सूत्रें करावयास नकोत. कारण ही गोष्ट व्याकरण न म्हटलेल्याला देखील लोकव्यवहारावरूनच कळली जात आहे. तेव्हां साहजिक कळणाऱ्या गोष्टीविषयीं यत्न करण्याची आवश्यकता नाहीं.

१. मुख्यत्वानें जाति विवक्षित असेल तर तो जातिरूपी अर्थ एकच आहे, तरी त्याला एकदा बहुतासारखा समजून बहुवचन करावें; उदा० संपन्नो व्रीहिः, संपन्ना व्रीहयः.

ति ॥ नैष दोषः ।

**अर्थातिदेशात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अर्थातिदेशोऽयम् । नेदं पारिभाषिकस्य वचनस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । उच्यते वचनम् । बहूनामार्थानां वचनं बहुवचनमिति । यावद्ब्रूयादेकोऽर्थो बहुवद्भवतीति तावदेकस्मिन्बहुवचनमिति ॥

**संख्याप्रयोगे प्रतिषेधः ॥ ४ ॥**

संख्याप्रयोगे प्रतिषेधो वक्तव्यः । एको व्रीहिः संपन्नः सुभिक्षं करोति ॥

**अस्मदो नामयुवप्रत्यययोश्च ॥५॥**

अस्मदो नामप्रयोगे युवप्रत्ययप्रयोगे च प्रतिषेधो वक्तव्यः ॥ नामप्रयोगे । अहं देवदत्तो ब्रवीमि । अहं यज्ञदत्तो ब्रवीमि ॥ युवप्रत्ययप्रयोगे । अहं गार्ग्यायणो ब्रवीमि । अहं वात्स्यायनो ब्रवीमि ॥ युवग्रहणेण नार्थः । अस्मदो नामप्रत्ययप्रयोगे नेत्येव । इदमपि सिद्धं भवति । अहं गार्ग्यो ब्रवीमि । अहं वात्स्यो ब्रवीमि ॥

अपर आह । अस्मदः सविशेषणस्य प्रयोगे नेत्येव । इदमपि सिद्धं भवति । अहं पटुर्ब्रवीमि । अहं पण्डितो ब्रवीमि ॥

**अशिष्यं वा बहुवत्पृथक्त्वाभिधानात् ॥६॥**

---

(वा.३) प्रकृत सूत्रानें फक्त अर्थाचा अतिदेश सांगितला आहे. एकवचन, बहुवचन म्हणून ठरविलेले जे प्रत्यय ते प्रकृतसूत्रामध्यें एकस्मिन्बहुवचनं या पदांनीं घ्यावयाचे नाहींत. येथें वचन हा शब्द अन्वर्थ आहे. जें सांगितलें जातें तें वचन होय. तेव्हां येथें बहुवचन म्हणजे बहुत अर्थांचें प्रतिपादन होय. तेव्हां एकच पदार्थ बहुत असल्यासारखा असतो असें जें लोकांमध्यें म्हणतात त्याच अर्थांचें सूत्रकारांनीं एकस्मिन् बहुवचनं असें म्हटलें आहे. (एकंदरींत व्रीहिभ्यः आगतः या ठिकाणीं व्रीहित्व जाति जरी एक आहे तरी त्या एकत्वावर प्रकृतसूत्रानें बहुत्वाचा अतिदेश केला असल्यामुळें व्रीहिशब्दाहून प्रत्यय करतांनाच आरंभीं भ्यस् असा प्रत्यय होतो. त्यामुळें दोष येत नाहीं.)

(वा.४) संख्यावाचक शब्दाचा प्रयोग असतांना प्रकृत सूत्रानें बहुत्वाचा अतिदेश होत नाहीं असें म्हणावें; उदा० एको व्रीहिः संपन्नः सुभिक्षं करोति; एको यवः संपन्नः सुभिक्षं करोति. एक तांदूळ किंवा सातु पिकला तर सर्व देशभर सुकाळ करून सोडतो.

(वा.५) नांवाचा आणि युव प्रत्ययान्त शब्दाचा प्रयोग केला असतांना अस्मत्शब्दाला पुढील सूत्रानें प्राप्त झालेला बहुत्वाचा अतिदेश होत नाहीं असें म्हणावें. त्यांपैकीं नांवाच्या प्रयोगाचें उदा०— अहं देवदत्तो ब्रवीमि, अहं यज्ञदत्तो ब्रवीमि. युवप्रत्ययान्त शब्दाच्या प्रयोगाचें उदा०— अहं गार्ग्यायणो ब्रवीमि, अहं वात्स्यायनो ब्रवीमि.

ह्या वार्तिकामध्यें जो युवशब्द घातलेला आहे त्याचा कांहीं उपयोग नाहीं. नांवाचा आणि प्रत्ययान्त शब्दाचा प्रयोग असतांना अस्मत्शब्दार्थाला बहुत्वाचा अतिदेश होत नाहीं, इतकेंच पुरें आहे. आणि असें म्हटलें असतां अहं गार्ग्यो ब्रवीमि, अहं वात्स्यो ब्रवीमि, हीं देखील उदाहरणें सिद्ध होतात.

येथें दुसरे कोणी असें म्हणतात की, ह्या वार्तिकामध्यें प्रत्ययान्त शब्दाचा प्रयोग असतांना असेंही म्हणूं नये. फक्त इतकेंच म्हणावें की, कोणतेंही एखादें विशेषण लावून अस्मत्शब्दाचा प्रयोग केला असतांना तेथें त्या अस्मद् शब्दाच्या अर्थाला बहुत्वाचा अतिदेश होत नाहीं. आणि असें म्हटल्यानें अहं पटुर्ब्रवीमि, अहं पण्डितो ब्रवीमि, हींही उदाहरणें सिद्ध होतात.

(वा.७) अथवा हा बहुत्वाचा अतिदेश सांगावयास नको.

अशिष्यो वा बहुवद्भावः। किं कारणम् । पृथक्त्वाभिधानात् । पृथक्त्वेन हि द्रव्याण्यभिधीयन्ते । बहवस्तेऽर्थास्तत्र युक्तं बहुवचनम् । किमुच्यते पृथक्त्वाभिधानादिति यावतेदानीमेवोक्तं जात्याख्यायां सामान्याभिधानादैकार्थ्यमिति ।

**जातिशब्देन हि द्रव्याभिधानम् ॥७॥**

जातिशब्देन हि द्रव्यमप्यभिधीयते जातिरपि । कथं पुनर्ज्ञायते जातिशब्देन द्रव्यमप्यभिधीयत इति । एवं हि कश्चिन्महति गोमण्डले गोपालकमासीनं पृच्छति । अस्त्यत्र कांचिद्गां पश्यसीति । स पश्यति पश्यति चायं गाः पृच्छति च कांचिदत्र गां पश्यसीति नूनमस्य द्रव्यं विवक्षितमिति । तद्यदा द्रव्याभिधानं तदा बहुवचनं भविष्यति यदा सामान्याभिधानं तदैकवचनं भविष्यति ॥

**अस्मदो द्वयोश्च ॥१.२.५९॥**

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथम् । अहं ब्रवीमि आवां ब्रूवः

---

का बरें ?

पार्थक्यानें प्रतिपादन केलें जात आहे म्हणून. एका जातीचे अनेक पदार्थ जेव्हां पार्थक्यानें प्रतिपादन केले जातात तेव्हां ते पदार्थ बहुत असल्यामुळें तेथें बहुवचन न्यायानेंच होत आहे.

पार्थक्यानें प्रतिपादन केलें जातें म्हणजे काय समजावयाचें ? कारण जातीच्यासंबंधानें बोलावयाचें असतांना ती एक जाति प्रतिपादन केली जात असल्यामुळें तेथें अर्थ एकच विवक्षित आहे, असें आतांच म्हटलें आहे ना ?

(वा.७) जातिवाचक शब्दानें पदार्थांचेंही प्रतिपादन केलें जातें, आणि त्या पदार्थांमधील एका जातीचेंही प्रतिपादन केलें जातें.

जातिवाचक शब्दानें पदार्थांचेंही प्रतिपादन केलें जातें असें कशावरून समजावें ?

अशावरून समजावें की, एखाद्या एकमेकाला चिकटून असलेल्या अशा पुष्कळ गायींनीं भरलेल्या गोठ्यामध्यें असलेल्या गुराख्याला दुसरा कोणी एक मनुष्य असें विचारतांना दृष्टीस पडतो की, यांमध्यें तूं कोणत्या तरी गाईला पाहत आहेस का ? तो गुराखीदेखील गायींचा मेळा पाहत आहे. आणि त्याला विचारणारा देखील गायींचा मेळा पाहत आहे. आणि असें असूनही 'कोणत्या तरी गायीला पाहतोस' असें विचारीत आहे तेव्हां अर्थातच येथें गो या जातिवाचक शब्दानें तज्जातीय पदार्थांचें प्रतिपादन करण्याविषयीं वक्त्याचें तात्पर्य आहे असें समजतें. एकंदरींत असें जेव्हां जातिवाचक शब्दानें तज्जातीय पदार्थांचें प्रतिपादन केलें जाईल तेव्हां बहुवचन होईल. आणि जेव्हां जातीचें प्रतिपादन केलें जाईल तेव्हां एकवचन होईल. (एकंदरींत प्रकृत सूत्र करावयास नको असें सिद्ध झालें.)

(सू.५९) हें देखील सूत्र नाहीं केलें तरी चालेल.

वक्ता एक असतांना तेथें अहं ब्रवीमि आणि वयं ब्रूमः असे दोन तऱ्हेचे प्रयोग होतात तसेंच वक्ते दोन असतांना तेथें आवां ब्रूवः आणि वयं ब्रूमः असे दोन तऱ्हेचे प्रयोग

---

२. जातिशब्द हा केवळ जातीलाच बोलतो किंवा केवळ व्यक्तीलाच बोलतो असें नाहीं तर वैयाकरणांच्या मतीं जाति आणि व्यक्ति या दोन्ही अर्थांना बोलतो. त्यांत जाति ही अप्रधान आणि व्यक्ति ही प्रधान असें गृहीत धरलें तेव्हां व्यक्ति ह्या बहुत असल्यानें त्या व्यक्तींवरील बहुत्व दाखविण्याकरितां योग्य असल्यामुळें बहुवचन होईल. आणि व्यक्ति अप्रधान व जाति प्रधान असें गृहीत धरलें तेव्हां ती जाति एक असल्यानें तिच्यावरील एकत्व दाखविण्यासाठीं योग्य असल्यामुळें एकवचन होईल. अशा रीतीनें संपन्नो यवः, संपन्ना यवाः, हे दोन्ही प्रयोग यत्नावाचून साधत असल्यामुळें बहुत्वाचा अतिदेश करावयास नको.

१. अस्मत्शब्दाच्या अर्थाला एकत्व किंवा द्वित्व विवक्षित असतां त्या एकत्वाला किंवा द्वित्वाला एकदां बहुत्वाप्रमाणें समजून बहुवचन करावें; उदा०— अहं ब्रवीमि, वयं ब्रूमः, आवां ब्रूवः, वयं ब्रूमः.

वयं ब्रूमः। इमानीन्द्रियाणि कदाचित्स्वातन्त्र्येण विवक्षितानि भवन्ति। तद्यथा। इदं मेऽक्षि सुष्ठु पश्यति। अयं मे कर्णः शुष्ठु शृणोतीति। कदाचित्पारतन्त्र्येण। अनेनाक्ष्णा सुष्ठु पश्यामि। अनेन कर्णेन सुष्ठु शृणोमीति। तद्यदा स्वातन्त्र्येण विवक्षा तदा बहुवचनं भविष्यति यदा पारतन्त्र्येण तदैकवचनद्विवचने भविष्यतः॥

## फल्गुनीप्रोष्ठपदानां च नक्षत्रे ॥१.२.६०॥

अयमपि योगः शक्योऽवक्तुम्। कथम् उदिते पूर्वे फल्गुन्यौ उदिताः पूर्वाः फल्गुन्यः उदिते पूर्वे प्रोष्ठपदे उदिताः पूर्वाः प्रोष्ठपदाः। फल्गुनीसमीपगते चन्द्रमासि फल्गुनीशब्दो वर्तते। बहवस्तेऽर्थास्तत्र युक्तं बहुवचनम्। यदा तयोरेवाभिधानं तदा द्विवचनं भविष्यति॥

## छन्दसि पुनर्वस्वोरेकवचनम् ॥१.२.६१॥

होत असतात.

ते कसे होतील?

ते अशा रीतीनें सिद्ध होतील की, इंद्रियांच्यासंबंधानें दोन तऱ्हेचे प्रयोग केलेले लोकांमध्यें दृष्टीस पडतात. जणूं काय तीं इन्द्रियें स्वतंत्रच आहेत असें गृहीत धरून हा माझा डोळा चांगलें स्वच्छ पाहतो, हा माझा कान चांगलें ऐकतो, असा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो. आणि एखादे वेळीं इंद्रियें परतंत्र आहेत असें गृहीत धरून ह्या डोळ्याच्या योगानें मी चांगलें पाहतों, तसेंच ह्या कानानें मी चांगलें ऐकतों, अशा तऱ्हेचा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो. तेव्हां इन्द्रियांचें स्वातंत्र्य गृहीत धरलें असतां इंद्रियें बहुत्व असल्यामुळें वयं ब्रूमः असा बहुवचनाचा प्रयोग करितां येईल आणि इंद्रियें परतन्त्र आहेत असें गृहीत धरलें असतां वक्ता एक असल्यास अहं ब्रवीमि असा एकवचनाचा प्रयोग होईल आणि वक्ते दोन असल्यास आवां ब्रूवः असा प्रयोग होईल. (एकंदरींत हें सूत्र करावयास नको.)

(सू.६०) हें देखील सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

सूत्र केलें नाहीं तर उदिते पूर्वे फल्गुन्यौ, उदिताः पूर्वाः फल्गुन्यः, उदिते पूर्वे प्रोष्ठपदे, उदिताः पूर्वाः प्रोष्ठपदाः, या उदाहरणांमध्यें फल्गुनी आणि प्रोष्ठपदा हीं प्रत्येकीं दोन नक्षत्रें असतांना बहुवचनाचा देखील जो प्रयोग केला जातो तो कसा साधेल?

ज्या ठिकाणीं बहुवचनाचा प्रयोग केला असेल त्या ठिकाणीं फल्गुनीशब्दाचा अर्थ तीं दोन नक्षत्रें आणि त्यांच्या जवळ असलेला चंद्र इतका लक्षणेनें गृहीत धरावा. तेव्हां तीं दोन नक्षत्रे आणि चंद्र मिळून बहुत पदार्थ होत असल्यामुळें रीतीनेंच बहुवचन करितां येईल. आणि जेव्हां तीं दोन इतकाच फल्गुनीशब्दाचा अर्थ गृहीत धरावा त्या वेळीं द्विवचनाचा प्रयोग करतां येईल.

(सू.६१-६२) हीं देखील दोन सूत्रें केलीं

२. मी काणा, मी बहिरा, मी मुका, मी थोटा, मी लंगडा, या व्यवहारांवरून शरीराप्रमाणें इन्द्रियें देखील अस्मत्शब्दानें घेतलीं जातात, त्यांच्या बहुत्वामुळें अस्मत्शब्दावरून बहुवचन करितां येईल.

१. फल्गुनी आणि प्रोष्ठपदा या शब्दांचा नक्षत्र असा अर्थ असतांना त्या अर्थावरील द्वित्वसंख्येला एकदां बहुत्वाप्रमाणें समजून बहुवचन करावें; उदा०— पूर्वे फल्गुन्यौ, पूर्वाः फल्गुन्यः, पूर्वे प्रोष्ठपदे, पूर्वाः

१. वेदामध्यें पुनर्वसुशब्दाचा नक्षत्र हा अर्थ असतां त्या अर्थावरील द्वित्वसंख्येला एकदां एकत्वाप्रमाणें समजून एकवचन करावें; उदा०— पुनर्वसुर्नक्षत्रं, पुनर्वसू नक्षत्रं वा.

१. वेदामध्यें विशाखाशब्दाचा नक्षत्र हा अर्थ असतां त्या अर्थावरील द्विसंख्येला एकदा एकत्वाप्रमाणें मानून एकवचन करावें; उदा०— विशाखा नक्षत्रं, विशाखे नक्षत्रम्.

## [1]विशाखयोश्च ॥१.२.६२॥

इमामपि योगौ शक्याववक्तुम् । कथम् ।

**पुनर्वसुविशाखयोः सुपां सुलुक्पूर्वसवर्णेति सिद्धम् ॥१॥**

पुनर्वसुविशाखयोः सुपां सुलुक्पूर्वसवर्ण [७.१.३९] इत्येव सिद्धम् ॥

## [1]तिष्यपुनर्वस्वोर्नक्षत्रद्वन्द्वे बहुवचनस्य द्विवचनं नित्यम् ॥१.२.६३॥

तिष्यपुनर्वस्वोरिति किमर्थम् । कृत्तिकारोहिण्यः ॥ नक्षत्र इति किमर्थम् । तिष्यश्च माणवकः पुनर्वसू च माणवको तिष्यपुनर्वसवः ॥ अथ नक्षत्र इति वर्तमाने पुनर्नक्षत्रग्रहणं किमर्थम् । अयं तिष्यपुनर्वसुशब्दोऽस्त्येव ज्योतिषि वर्तते । अस्ति च कालवाची । तद्यथा । बहवस्तिष्यपुनर्वसवोऽतिक्रान्ताः । कतरेण तिष्येण गत इति । तद्यो ज्योतिषि वर्तते तस्येदं

---

नाहींत तरी चालेल.

सूत्रें केलीं नाहींत तर पुनर्वसुः, विशाखा, हें एकवचनान्त प्रयोग कसे साधतील ?

(वा.१) पुनर्वसु आणि विशाखा या शब्दांच्या पुढील द्विवचनाला 'सुपां सुलुक्पूर्व०' (७।१।३९) या सूत्रानें सु आदेश केला असतां तीं उदाहरणें सिद्ध होतील.

या सूत्रामध्यें 'तिष्यपुनर्वस्वोः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

कृत्तिकारोहिण्यः या उदाहरणामध्यें प्रकृत सूत्रानें बहुवचनाला द्विवचन न व्हावें याकरितां तें म्हटलें आहे.

आतां या सूत्रामध्यें नक्षत्र हा शब्द कां घातला आहे ?

नक्षत्र हा शब्द घातला नाहीं तर तिष्य आणि पुनर्वसु या नांवाचीं माणसें असा तिष्य आणि पुनर्वसु या शब्दांचा अर्थ घेतला असतां तेथें 'तिष्यपुनर्वसवः' असा प्रयोग होतो. येथें तिष्य नांवाचा माणूस एक आणि पुनर्वसु नांवाचीं माणसें दोन मिळून तीन होत असल्यामुळें बहुवचन झालें आहे. येथें तिष्य वगैरे शब्दांचा नक्षत्र हा अर्थ नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें बहुवचनाला द्विवचन होत नाहीं.

आतां पूर्वसूत्रांतून येथें 'नक्षत्रे' या पदाची अनुवृत्ति होत असतांना पुनः येथें नक्षत्र हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

तिष्य आणि पुनर्वसु या शब्दांचा अर्थ त्या नांवाच्या तारा असा एक आहेच आणि त्याच शब्दांचा त्या नक्षत्रांनीं युक्त काल असाही दुसरा अर्थ आहे; उदा०—तिष्य आणि पुनर्वसु किती तरी गेले त्यांपैकीं कोणत्या तिष्यावर तो मनुष्य निघून गेला असावा; येथें तिष्य वगैरे शब्दांचा अर्थ एक प्रकारचा काल असा आहे. तेव्हां तारा या अर्थाला दाखविणारे जे हे तिष्य वगैरे शब्द त्यांचेंच येथें ग्रहण झालें पाहिजे. याकरितां मुद्दाम पुनः येथें नक्षत्र हा शब्द घातला आहे. (म्हणजे नक्षत्र या अर्थाला प्राधान्य पाहिजे आहे. त्या नक्षत्रांनीं युक्त काल असा अर्थ घेतला असतां कालाला प्राधान्य येतें. तेथें प्रकृत सूत्रानें द्विवचन होऊं नये याकरितां नक्षत्र शब्द घातला आहे.)

अथवा पूर्वसूत्रांतून 'नक्षत्रे' असें पद अनुवृत्त होत असतांना पुनः जो येथें मुद्दाम नक्षत्र शब्द घातला आहे त्याचा असा उपयोग समजावा की, तिष्य आणि पुनर्वसु या शब्दांना

---

१. नक्षत्र या अर्थाला दाखविणाऱ्या तिष्य आणि पुनर्वसु या शब्दांचा द्वंद्व समास केला असतां त्याच्या अर्थावरील बहुत्वसंख्येला द्वित्वसंख्येप्रमाणें मानून तेथें नित्य द्विवचन करावें; उदा०- तिष्यश्च पुनर्वसू च 'तिष्य पुनर्वसू'. तिष्यनक्षत्राचा एक तारा व पुनर्वसूचे दोन तारे मिळून तीन होतात. म्हणून बहुवचन प्राप्त झालें आहे. त्याकरितां द्विवचन सांगितलें आहे.

ग्रहणम् ॥ अथवा नक्षत्र इति वर्तमाने पुनर्नक्षत्रग्रहणस्यैतत्प्रयोजनं विदेशस्थमपि तिष्यपुनर्वस्वोः कार्यं तदपि नक्षत्रस्यैव यथा स्यात्। तिष्यपुष्ययोर्नक्षत्राणि.यलोपो वक्तव्य इति नक्षत्रग्रहणं न कर्तव्यं भवति ॥ अथवा नक्षत्र इति वर्तमाने पुनर्नक्षत्रग्रहणस्यैतत्प्रयोजनं तिष्यपुनर्वसुपर्यायवाचिनामपि यथा स्यात् । पुष्यपुनर्वसू सिध्यपुनर्वसू ॥अथ द्वन्द्व इति किमर्थम्। यस्तिष्यस्तौ पुनर्वसू येषां त इमे तिष्यपुनर्वसव उन्मुग्धाः ॥बहुवचनस्येति किमर्थम्। उदितं तिष्यपुनर्वसु। कथं चात्रैकवचनम्। जातिद्वन्द्व एकवद्भवतीति । अप्राणिनामिति प्रतिषेधः प्राप्नोति । एवं तर्हि सिद्धे सति यद्बहुवचनग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः सर्वो द्वन्द्वो विभाषैकवद्भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । बाभ्रवशालङ्कायनम बाभ्रवशालङ्कायना इत्येतत्सिद्धं भवति ॥

---

अष्टाध्यायीमध्यें पाणिनीनें इतर कोणत्याही ठिकाणीं जें कार्य सांगितलें असेल तें कार्य देखील नक्षत्र अर्थ असतांनाच झालें पाहिजे. याचा उपयोग असा होईल की, नक्षत्रवाचक तिष्य आणि पुष्य या शब्दांच्या यकाराचा अण् प्रत्यय पुढें असतांना जो लोप वार्तिककारांनीं सांगितला आहे (६।४।१४९ वा.७) तेथें त्या वार्तिकामध्यें नक्षत्र हा शब्द घालण्याचें कारण नाहीं.

अथवा, पूर्वसूत्रांतून नक्षत्रे असें पद अनुवृत्त होत असतांना येथें पुनः जो नक्षत्र शब्द घातला आहे त्याचा उपयोग असा समजावा की, तिष्य आणि पुनर्वसु याच अर्थी दुसऱ्या शब्दांचा प्रयोग केला असतांही प्रकृत सूत्रानें द्विवचन झालें पाहिजे; उदा०—तिष्यपुनर्वसू, सिध्यपुनर्वसू.

आतां प्रकृत सूत्रामध्यें द्वंद्वे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

तिष्य आणि पुनर्वसु या शब्दांचा बहुव्रीहि समास केला असतांना प्रकृत सूत्रानें द्विवचन न झालें पाहिजे; उदा०-तिष्यपुनर्वसवः. जे तिष्य नक्षत्र तेंच पुनर्वसु आहे असें जे मूढ लोक समजतात ते येथें तिष्यपुनर्वसवः या बहुव्रीहि समासानें दाखविले जातात.

आतां या सूत्रामध्यें बहुवचनस्य असें कां म्हटलें आहे ?

'उदितंतिष्य पुनर्वसु' या ठिकाणीं या शब्दाच्या एकवचनाला द्विवचन न व्हावें म्हणून बहुवचनस्य असें म्हटलें आहे.

पण अगोदर येथें एकवचन करितां आलें कसें ?

'जातिरप्राणिनाम्' (२।४।६) या सूत्रानें जातिवाचक शब्दांच्या द्वंद्वाला एकवद्भाव सांगितला असल्यामुळें एकवचन करितां येतें.

पण त्यांच सूत्रामध्यें प्राणिवाचक शब्दांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होत नाहीं असा निषेध सांगितला आहे ना ?

तर मग अशा रीतीनें तेथें एकवचन उत्पन्नच होत नाहीं; तेव्हां त्या ठिकाणीं द्विवचन न व्हावें याकरितां प्रकृत सूत्रामध्यें बहुवचनस्य असें म्हणावयास नको, असें असतांही ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि प्रकृतसूत्रामध्यें बहुवचनस्य असें म्हणतो त्यावरून तो असें सुचवितो की, वाटेल त्या शब्दांचा द्वंद्व केला तरी देखील तेथें विकल्पानें एकवद्भाव होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

बाभ्रवशालङ्कायनं बाभ्रवशालङ्कायनाः येथें एकवचन करितां येतें हा त्या ज्ञापकाचा उपयोग होय.

अथवा सर्वत्रांना पूज्य असे तिष्यपुन-

अथवा नात्रभवन्तः प्राणिनः प्राणा एवात्र-भवन्तः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ।

---

वैसु हे प्राणी आहेत असें समजूं नये, तर ते इतर प्राण्यांचे खुद्द प्राणभूतच आहेत. (तेव्हां तेथें 'अप्राणिनाम्' हा निषेध येत नाहीं.)

याप्रमाणें भगवान पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें.

## [1]सरूपाणामेकशेष एकविभक्तौ ॥१.२.६४॥

रूपग्रहणं किमर्थम् । समानानामेकशेष एकविभक्ताविति यत्युच्यमाने यत्रैव सर्वं समानं शब्दोऽर्थश्च तत्रैव स्यात् । वृक्षाः प्लक्षा इति । इह न स्यात् । अक्षाः पादाः माषा इति । रूपग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । रूपं निमित्तत्वेनाश्रीयते श्रुतौ च रूपग्रहणम् ॥ अथैकग्रहणं किमर्थम् । सरूपाणां शेष एकविभक्ताविति यत्युच्यमाने द्विबह्वोरपि शेषः प्रसज्येत । एकग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ शेषग्रहणं किमर्थम् । सरूपाणामेक एकविभक्ताविति यत्युच्यमान आदेशोऽयं विज्ञायेत । तत्र को दोषः । अश्वश्चाश्वश्च अश्वौ । आन्तर्यतो व्युदात्तवतः स्थानिनो व्युदात्तवानादेशः प्रसज्येत । लोप्यलोपिता च न प्रकल्पेत । तत्र को दोषः । गर्गाः

---

या सूत्रामध्यें रूप हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

रूप हा शब्द काढून 'समानानामेकशेष एकविभक्तौ' इतकेंच सूत्र जर केलें तर जे शब्द सर्वांशांनीं सारखे आहेत म्हणजे शब्दाचा आकारही सारखा आहे आणि अर्थही सारखाच आहे त्याच शब्दांचा एकशेष होईल. उदा० वृक्षाः, लक्षाः; आणि ज्या ठिकाणीं फक्त शब्दांचा आकार तेवढा सारखा आहे अशा ठिकाणीं एकशेष झाला पाहिजे तो होणार नाहीं; उदा० अक्षाः, पादाः, माषाः. आतां सूत्रामध्यें रूप हा शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं, कारण रूप शब्द घातला म्हणजें रूप सारखें असणें इतकेंच फक्त एकशेषाचें निमित्त धरलें जातें. शब्दाचें रूप म्हणजे शब्दाचें उच्चारण केलें असतां जें ऐकण्यांत येतें तें होय.

आतां या सूत्रामध्यें एक हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

एक हा शब्द न घालतां 'सरूपाणां शेष एकविभक्तौ' इतकेंच सूत्र केलें तर एकाच शब्दाचा शेष न होतां कदाचित् दोघांचा व कदाचित् बहुत शब्दांचा देखील शेष होऊं लागेल, आणि एक हा शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां या सूत्रामध्यें शेष हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

शेष शब्द न घालतां सरूपाणामेक एकविभक्तौ इतकेंच फक्त सूत्र केलें तर अनेक शब्दांना एक शब्द आदेश होतो असें समजलें जाईल.

मग एक शब्द आदेश झाला तर काय दोष येईल ?

असा दोष येईल की, अश्वश्च अश्वश्च अश्वौ येथें अश्व अश्व या प्रत्येकीं आद्युदात्त असलेल्या अशा दोन अश्व शब्दाला म्हणजे दोन उदात्त असलेल्या 'अश्व अश्व' एवढ्या स्थानीला एक 'अश्व' शब्द आदेश होणार, तो स्थानीसारखा दोन्ही वर्ण उदात्त असलेला कदाचित् होऊं लागेल. शिवाय आदेशपक्षीं ज्याचा लोप झाला पाहिजे त्याचा लोप होणार नाहीं.

तसें झालें असतां दोष कोणता ?

गर्गाः, वत्साः, बिदाः, उर्वाः, येथें बहुत

---

१. सात विभक्तींपैकीं कोणताही प्रत्यय केला असतांना ज्या शब्दांतील वर्णानुक्रम सारखाच दृष्टीस पडतो अशा अनेक शब्दांच्या उच्चारणाचा प्रसंग आला असतां त्यांपैकीं एकच शब्द शिल्लक राहतो आणि बाकीच्यांची निवृत्ति होते; उदा०—रामश्च रामश्च रामौ.

तीन अर्थांचे तीन अक्षशब्द आहेत. त्या तीन शब्दांचा आकार (वर्णानुक्रम) सारखा आहे. तसेंच पाय, चतुर्थांश, मुळें, किरण व प्रत्यन्तपर्वत, अशा अनेक अर्थांचे अनेक पाद शब्द आहेत. उडीद, वजन (मासा) व व्रीहिविशेष, अशा अनेक अर्थांचे अनेक माषशब्द आहेत.

वत्साः । बिदाः उर्वाः । अञ्यो बहुषु यञ्यो बहुष्वित्युच्यमानो लुग्न प्राप्नोति । मा भूदेवम् । अञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति ॥ एकविभक्ताविति किमर्थम् । पयः पयो जरयति । वासो वासश्छादयति । ब्राह्मणाभ्यां च कृतं ब्राह्मणाभ्यां च देहीति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**प्रत्यर्थं शब्दनिवेशान्नैकेनानेकस्याभिधानम् ॥१॥**

प्रत्यर्थं शब्दा अभिनिविशन्ते । किमिदं प्रत्यर्थमिति । अर्थमर्थं प्रति प्रत्यर्थम् । प्रत्यर्थं शब्दनिवेशादेतस्मात्कारणान्नैकेन शब्देनानेकस्यार्थस्याभिधानं प्राप्नोति ॥ तत्र को

---

अपत्य या अर्थाला दाखविणारा जो यञ् प्रत्यय आणि बहुत अपत्य या अर्थाला दाखविणारा जो अञ् प्रत्यय त्याचा 'यञञोश्च' (२।४।६४) या सूत्रानें सांगितलेला लुक् होणार नाहीं. (कारण तीन अपत्यें या अर्थी तीन यञ् प्रत्यय गर्गशब्दाच्या पुढें करून 'गर्ग य' गर्ग य, गर्ग य', एवढ्या स्थानीला 'गर्ग य' असा आदेश झाल्यानंतर त्या यञ्प्रत्ययान्त 'गर्ग य' याला गर्गाचीं बहुत अपत्यें हा अर्थ आहे, त्यांतील यञ् प्रत्ययाला नाहीं.

तशा अर्थानें लुक् झाला नाहीं तरी न होऊं दे. बहुत अपत्यें या अर्थाला दाखविणारें जे यञ् प्रत्ययान्त आणि बहुत अपत्यें या अर्थाला दाखविणारें जे अञ्प्रत्ययान्त शब्दस्वरूप त्यांतील यञ् आणि अञ् या प्रत्ययांचा लुक् होतो अशा अर्थानें तेथें लुक् करितां येईल.[३]

'यञञोश्च' (२।४।६४) या सूत्राचा तसा अर्थ करणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ केला तर काश्यपाचे जे प्रतिकृति ते काश्यपच होत अशा अर्थी काश्यपाः असें जें रूप होत असतें तेथें दोष येईल. येथें काश्यप शब्द अञ् प्रत्ययान्त आहे. त्या काश्यपासारखी त्यांची प्रतिकृति या अर्थी 'इवे प्रतिकृतौ' (५।३।९६) या सूत्रानें झालेल्या कन्प्रत्ययाचा 'जीविकार्थे चापण्ये' (५।३।९९) या सूत्रानें लुक् झाला आहे. तशा प्रकारच्या तीन काश्यपशब्दांचे स्थानीं एक काश्यप शब्द आदेश झाला आहे.[४]

आतां या सूत्रामध्यें एकविभक्तौ असें कशाकरितां ह्मटलें आहे ?

'पयः पयो जरयति, वासो वासश्छादयति, ब्राह्मणाभ्यां च कृतं ब्राह्मणाभ्यां च देहि', या ठिकाणीं एकशेष होऊं नये याकरितां एकविभक्तौ असें ह्मटलें आहे. (येथें एक पयः हें पद प्रथमान्त आहे, आणि दुसरें पयः हें पद द्वितीयान्त आहे. वासः हेंही तसेंच आहे ब्राह्मणाभ्यां हें एक तृतीयान्त आहे व दुसरें चतुर्थ्यन्त आहे. येथें विभक्ति एक नाहीं म्हणून एकशेष होत नाहीं.)

बरें, आतां हें सूत्रच कशाकरितां केलें आहे?

(वा.१) वक्त्यानें प्रत्यर्थ शब्द उच्चारलेले दृष्टीस पडतात.

प्रत्यर्थं ह्मणजे काय?

'अर्थमर्थं प्रति प्रत्यर्थम्' असा प्रत्यर्थशब्दाचा विग्रह आहे.

अर्थ म्हणजे वस्तु. प्रत्येक वस्तूबद्दल निरनिराळा शब्द उच्चारलेला दृष्टीस पडतो. या कारणावरून असें अनुमित होतें कीं, एका शब्दानें अनेक अर्थ दाखविले जाणार नाहींत.

---

३. 'बहुषु' हें यञन्त अञन्त शब्दस्वरूपाचें विशेषण करून हा अर्थ केला आहे.

४. येथें काश्यप हा शब्द मूळचाच अञन्त आहे व आतां तो बहुत्वार्थाचा दर्शक झाला आहे.

दोषः ।

**तत्रानेकार्थाभिधानेऽनेकशब्दत्वम् ॥२**

तत्रानेकार्थाभिधानेऽनेकशब्दत्वं प्राप्नोति । इष्यते चैकेनाप्यनेकस्याभिधानं स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यति ।

**तस्मादेकशेषः ॥३॥**

एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । किमिदं प्रत्यर्थं शब्दा अभिनिविशन्त इत्येतं दृष्टान्तमास्थाय सरूपाणामेकशेष आरभ्यते न पुनरप्रत्यर्थं शब्दा अभिनिविशन्त इत्येतं दृष्टान्तमास्थाय विरूपाणामनेकशेष आरभ्यते । तत्रैतत्स्याल्लघीयसी सरूपनिवृत्तिर्गरीयसी विरूपप्रतिपत्तिरिति । तच्च न । लघीयसी विरूपप्रतिपत्तिः । किं कारणम् । यत्र हि बहूनां सरूपाणामेकः शिष्यते तत्रावरतो द्वयोः सरूपयोर्निवृत्तिर्वक्तव्या स्यात् । एवमप्येतस्मिन्सति किंचिदाचार्यः सुकरतरकं मन्यते सुकरतरकं चैकशेषारम्भं मन्यते ॥

---

मग तसें झालें तर दोष कोणता ?

(वा.२) दोष असा की वृक्षाः वगैरे उदाहरणांमध्यें जितक्या वस्तू प्रतिपादन करावयाच्या असतील तितक्या वृक्ष वगैरे शब्दांचा प्रयोग होऊं लागेल, आणि तशा ठिकाणीं एकाच शब्दापासून अनेक अर्थांचा बोध व्हावा असें इष्ट आहे. तें तर कांहीं विशेष यत्न केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं.

(वा.३) याकरितां आचार्य पाणिनीनें प्रकृत सूत्र केलें आहे.

असा या सूत्राचा उपयोग आहे खरा पण—

पण काय ?

पण असें की, लोकांमध्यें वक्त्यानें प्रत्येक वस्तूबद्दल घटः घटः असे निरनिराळे शब्द उच्चारलेले दृष्टीस पडतात. या दृष्टान्तावर भिस्त ठेवून सरूप अशा अनेक शब्दांचा पाणिनीनें एकशेष सांगितला अशीच येथें आचार्य पाणिनीची प्रवृत्ति कां झाली आणि कांहीं ठिकाणीं जें लोकांमध्यें अनेक वस्तूंबद्दल निरनिराळा शब्द न उच्चारतां घटाः असा एकच उच्चारण्यांत येतें तो दृष्टांत घेऊन त्या सारखा घट, पट, वगैरे विरूप शब्दांचा एकशेष होऊं नये याकरितां एखादें सूत्र करण्याविषयीं आचार्यपाणिनीची प्रवृत्ति कां झाली नाहीं ? आतां येथें कदाचित आचार्यांचा अभिप्राय असा असेल की, 'सरूप अशा अनेक शब्दांमध्यें इतरांचा लोप करून फक्त त्यांतील एक शब्द ठेवावा,' असें सांगण्यांत लाघव आहे. आणि विरूप शब्द असल्यास ते सर्व ठेवा असें सांगण्यांत गौरव आहे; तर अशी कल्पना करणें बरोबर दिसत नाहीं. कारण विरूप शब्द असल्यास ते सर्व ठेवा असें सांगण्यांतच लाघव होणार आहे.

याचें काय बरें कारण ?

कारण असें की, ज्या ठिकाणीं वृक्षाः अशा सरूप बहुत शब्दामध्यें एक शब्द अवशिष्ट राहतो तेथें कमींत कमी दोन तरी शब्दांचा लोप सांगितला पाहिजे.

अशा रीतीनें वर वर विचार करतांना सरूप शब्दांचा एकशेष सांगणेंच गौरवास्पद दिसतें, तरी पण सूक्ष्म विचाराअंतीं एकशेष सांगणेंच चांगलें असें आचार्य मानीत आहे.

पण कायहो, हा पाणिनीनें सांगितलेला एकशेष एक विभक्ति पुढें असतांना होतो ?

---

५. 'वृद्धो यूना०' इत्यादि पुढील सूत्रांनीं एकशेषच सांगितला आहे. तेव्हां या प्रकृतसूत्रानेंही एकशेष सांगितला असतां सर्व प्रकरण एका तऱ्हेचें होतें. आणि प्रकृत 'विरूपाणामनेकशेषः' असें सूत्र करून विरूप शब्दांचा एकशेष होत नाहीं असें सांगितलें तर हें एक सूत्र निराळें आणि याच्या पुढील 'वृद्धो यूना' इत्यादि सूत्रें निराळीं असें भिन्न भिन्न प्रकरण होईल. तसें झालें असतां 'वृद्धो यूना' या सूत्रामध्यें 'एकशेषः' असा शब्द निराळा घालावा लागणार असल्यामुळें मोठें गौरव होईल.

किं पुनरयमेकविभक्तावेकशेषो भवति । एवं भवितुमर्हति ।

**एकविभक्ताविति चेन्नाभावाद्विभक्तेः ॥४॥**

एकविभक्ताविति चेत्तन्न । किं कारणम् । अभावाद्विभक्तेः । न हि समुदायात्परा विभक्तिरस्ति । किं कारणम् । अप्रातिपदिकत्वात् । ननु चार्थवत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति । नियमान्न प्राप्नोति । अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थमिति ॥

यदि पुनः पृथक्सर्वेषां विभक्तिपराणामेकशेष उच्येत ।

**पृथक्सर्वेषामिति चेदेकशेषे पृथग्विभक्त्युपलब्धिस्तदाश्रयत्वात् ॥५॥**

पृथक्सर्वेषामिति चेदेकशेषे पृथग्विभक्त्युपलब्धिः प्राप्नोति ।किमुच्यतएकशेषे पृथग्विभक्त्युपलब्धिरिति यावता समयः कृतो न केवला प्रकृतिः प्रयोक्तव्या न केवलः प्रत्यय इति। तदाश्रयत्वात्प्राप्नोति। यत्र हि प्रकृतिनिमित्ता प्रत्ययनिवृत्तिस्तत्राप्रत्ययिकायाः प्रकृतेः प्रयोगो भवति । अग्निचित् सोमसुदिति यथा । यत्र च प्रत्ययनिमित्ता प्रकृतिनिवृत्तिस्तत्राप्रकृति-

---

होय. एक विभक्ति पुढें असतांना होतो असेंच मानणें योग्य दिसतें.

(वा.४) एक विभक्ति पुढें असतांना एकशेष होतो असें म्हणाल तर तसें म्हणतां येणार नाहीं.

कां बरें ?

विभक्तीचा अभाव आहे म्हणून. म्हणजे ज्या अनेक शब्दांचा एकशेष करावयाचा त्या अनेक शब्दांच्या समुदायापुढें एक विभक्ति उत्पन्न होणें शक्य नाहीं; कारण त्या अनेक शब्दांच्या समुदायाला प्रातिपदिक संज्ञा नाहीं.

पण अर्थवान् अशा केवळ्याही भागाला प्रातिपदिक संज्ञा सांगितली असल्यामुळें ती प्रातिपदिक संज्ञा अनेक शब्दांच्या समुदायाला होऊं शकेल.

अशा रीतीनें जरी अनेक शब्दांच्या समुदायाला प्रातिपदिक संज्ञा प्राप्त होत आहे, तरी पण ती नियमानें होणार नाही. म्हणजे अर्थवान् अशा समुदायाला जर प्रातिपदिक संज्ञा होय तर समासालाच होय, असा नियम केलेला आहे.

आतां जर प्रत्येक शब्दाच्या पुढें निरनिराळी विभक्ति करून नंतर एकशेष[६] होतो, असें म्हणावें तर—

(वा.५) प्रत्येक शब्दाच्या पुढें विभक्ति उत्पन्न करून नंतर एकशेष होतो असें म्हटलें तर प्रकृतिभागाचा एकशेष होऊन निरनिराळ्या केलेल्या विभक्ति मात्र कायम राहूं लागतील.

प्रकृतिभागाचा एकशेष केला असतांना नुसत्या विभक्ति शिल्लक राहतील असें कसें म्हणतां येतें? कारण नुसत्या प्रकृतिभागाचा प्रयोग होत नाहीं आणि नुसत्या प्रत्ययभागाचाही प्रयोग होत नाहीं असा शास्त्रकारानीं कायमचा ठरावच केला आहे.

असा जरी ठराव आहे तरी शास्त्राच्याच आश्रयानें नुसत्या विभक्ति राहूं लागतील असा येथें दोष येतो. कारण असें पहा की, ज्या ठिकाणीं विशेष प्रकृतीच्या कारणामुळें प्रत्ययाचा लोप होतो तेथें प्रत्यय जवळ नसतांना नुसत्या प्रकृतीचा प्रयोग होत असतो; उदा०—अग्निचित्[७], सोमसुत्. तसेंच ज्या ठिकाणीं प्रत्ययविशेषामुळें प्रकृतीचा लोप होतो तेथें प्रकृति जवळ नसतांना नुसत्या प्रत्ययाचा प्रयोग होत असतो; उदा०—

---

६. एक शब्द समान या अर्थाचा गृहीत धरला असतां अनेक शब्दांच्या पुढें समान विभक्ति असतांना एकशेष होतो असा अर्थ होतो.

७. अग्निचित्,सोमसुत्,या प्रातिपदिकांच्या पुढील सु या प्रत्ययाचा लोप (६।१।६८) होऊन फक्त प्रकृति शिल्लक राहिली आहे.

कस्य प्रत्ययस्य प्रयोगो भवति । अधुना इयानिति यथा । अस्तु । संयोगान्तलोपेन सिद्धम् । कुतो नु खल्वेतत्परयोर्वृक्षशब्दयोर्निवृत्तिर्भविष्यति न पुनः पूर्वयोरिति । तत्रैतत्स्यात्पूर्वनिवृत्तावपि सत्यां संयोगादिलोपेन सिद्धमिति । न सिध्यति । तत्रावरतो द्वयोः सकारयोः श्रवणं प्रसज्येत । यत्र च संयोगान्तलोपो नास्ति तत्र च न सिध्यति । क्व च संयोगान्तलोपो नास्ति । द्विवचनबहुवचनयोः ॥

यदि पुनः समास एकशेष उच्येत । किं कृतं भवति । कश्चिद्वचनलोपः परिहृतो भवति ॥ तत्तर्हि समासग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व

---

अधुना, इयान्.

तर मग अशा रीतीनें नुसत्या रहातील तर राहोत. 'संयोगान्तस्य०' (८।२।२३) या सूत्रानें लोप करून भागविता येईल.

'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें काम भागेल असें म्हणतां खरें, परंतु अनेक वृक्षशब्दांपैकीं पहिला वृक्षशब्द कायम राहून पुढील वृक्षशब्दाचीच निवृत्ति होते असेंच कशावरून गृहीत धरावें ? पुढील वृक्षशब्द कायम राहून पूर्वींच्या वृक्षशब्दांची निवृत्ति होते असें कां गृहीत धरूं नये ?

तसें गृहीत धरून पूर्वींच्या वृक्षशब्दांची निवृत्ति झाली तरी देखील 'स्कोः संयोगाद्योः' (८।२।२९) या सूत्रानें लोप करून काम भागेल.

तशा रीतीनेंही काम भागणार नाहीं. कारण शेवटचा एक वृक्षशब्द कायम राहिला असतां त्याच्या मागील अनेक सकारांपैकीं कमींत कमी निदान एक सकार तरी लोप न होतां कायम राहील. शिवाय 'संयोगान्तस्य०' (८।२।२३) या सूत्राची प्राप्ति जेथें येत नाहीं तेथें त्या सर्वच विभक्ति कायम रहातील.

'संयोगान्तस्य लोपः' या सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं असें उदाहरण कोणतें ?

उभ, दार, वगैरे शब्दांपुढें औ आणि जस् असे द्विवचनबहुवचनप्रत्यय उत्पन्न झाले असतां तेथें 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्राची प्रवृत्ति येत नाहीं.

बरें आतां समास करून नंतर एकशेष होतो असें मानलें तर काय बरें होईल ?

इतकें होईल की, 'विभक्तीचें श्रवण होईल' हा दोष दूर होईल. (कारण कोणतीही विभक्ति असो, समास केला असल्यामुळें 'सुपो धातु०' (२।४।७१) या सूत्रानें लुक् होईल.)

तर मग समास केल्यानंतर एकशेष होतो असा अर्थ होण्याकरितां सूत्रामध्यें समासे असा शब्द घातला पाहिजे.

तो शब्द घालावयास नको. कारण पूर्वसूत्रांतून अनुवृत्त होत आहे.

पूर्वसूत्रामध्यें समासे हा शब्द कोठें आहे ?

तिष्यपुनर्वस्वोर्नक्षत्रद्वंद्वे बहुवचनस्य द्विवचनं नित्यम् (१।२।६३) या सूत्रांतून द्वंद्वे

---

८. अधुना येथें 'अधुना' हा नुसता प्रत्यय शिल्लक राहिला आहे (५।३।१७). तसेंच इयान् येथें इदम् शब्दाच्या पुढील व तुप् प्रत्ययाच्या वकाराला घकार (५।२।४०), त्याला इय् आदेश (७।१।२), इदम् शब्दाला ईश आदेश (६।३।८९), त्याचा लोप (६।४।१४८) होऊन फक्त प्रत्यय शिल्लक राहिला आहे. तेव्हां शास्त्रानेंच सिद्ध होत असेल तर तेथें नुसत्या प्रकृतीचा आणि नुसत्या प्रत्ययाचा प्रयोग होतो. अर्थात् ज्या प्रकृतीहून प्रत्यय उत्पन्नच झाला नाहीं, आणि ज्या प्रत्ययाच्या मागें प्रकृति लावलीच नाहीं अशा केवळ प्रकृतीचा व केवळ प्रत्ययाचा प्रयोग करूं नये असा त्या नियमाचा अर्थ समजावा.

९. 'संयोगाचा आणि पदाचा जो अन्त्य वर्ण, त्याचा लोप होतो, असा त्या सूत्राचा अर्थ येथें भाष्यकारांनीं गृहीत धरला आहे.

१० कारण एकच सकार उरला तर तेथें संयोग म्हणतां येत नाहीं. त्याकरितां दुसरा सकार पाहिजे आणि पुढें झल् म्हणून तिसरा सकार पाहिजे. कारण वृक्षशब्दाच्या आरंभींचा वकार हा झल् नाहीं.

प्रकृतम् । तिष्यपुनर्वस्वोर्नक्षत्रद्वन्द्वे बहुवचनस्य द्विवचनं नित्यम् [१.२.६३] इति॥

**समास इति चेत्स्वरसमासान्तेषु दोषः ॥६॥**

समास इति चेत्स्वरसमासान्तेषु दोषो भवति । स्वर । अश्वश्चाश्वश्च अश्वौ । समासान्तोदात्तत्वे कृत एकशेषः प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । समासान्तोदात्तत्वं क्रियतामेकशेष इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्समासान्तोदात्तत्वम् । समासान्तोदात्तत्वे च दोषो भवति । स्वर ॥ समासान्त । ऋक्च ऋक्च ऋचौ । समासान्ते कृतेऽसारूप्यादेकशेषो न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । समासान्तः क्रियतामेकशेष इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्समासान्तः । समासान्ते च दोषो भवति ॥

**अङ्गाश्रये चैकशेषवचनम् ॥७॥**

अङ्गाश्रये च कार्ये एकशेषो वक्तव्यः । स्वसा च स्वसारौ च स्वसारः । अङ्गाश्रये कृतेऽसारूप्यादेकशेषो न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । अङ्गाश्रयं क्रियतामेकशेष इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादङ्गा-

---

या शब्दाची अनुवृत्ति येथें होईल. (एकशेष ज्या शब्दांचा होतो त्या शब्दांचा द्वंद्व समासाशिवाय दुसरा कोणताही समास संभवत नाहीं. तेव्हां द्वंद्वे या अनुवृत्तीनें काम भागेल.)

(वा.६) समास करून एकशेष होतो असें म्हटलें तर स्वर आणि समासान्त प्रत्यय यांच्यासंबंधानें दोष येतो. त्यांपैकीं स्वराच्यासंबंधानें दोष असा की, अश्वश्च अश्वश्च अश्वौ या ठिकाणीं दोन अश्व शब्दांचा द्वंद्वसमास करून 'अश्व अश्व' या समासांतील शेवटचा अकार उदात्त (६।१।२२३) झाला असतांना नंतर एकशेष केला तर दोष[११] येईल.

पण या ठिकाणीं अगोदर असा विचार उत्पन्न होतो की, दोन अश्वशब्दांचा द्वंद्व समास केल्यानंतर अगोदर त्या समासाचा शेवटचा अकार उदात्त करावा किंवा अगोदर एकशेष करावा ?

मग या दोहोंमध्यें अगोदर काय बरें करावें ?

एकशेषाचा परत्वास्तव बाध करून समासाला अंत्य उदात्त अगोदर होईल, आणि तो समासाचा अंत्य उदात्त झाल्यानंतर मागून एकशेष केला असतां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें दोष येतो.

समासान्ताच्यासंबंधानें दोष असा की, ऋक् च, ऋक् च, ऋचौ. या ठिकाणीं ऋच् ऋच् या द्वंद्व समासापुढें समासान्त प्रत्यय (५।४।७४) अकार केल्यानंतर ऋच् आणि ऋच असे दोन शब्द सरूप नसल्यामुळें त्यांचा एकशेष होणार नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की, ऋच् ऋच् असा द्वंद्व समास केल्यानंतर तेथें अगोदर समासान्त अकार प्रत्यय करावा किंवा अगोदर एकशेष करावा ?

मग यामध्यें अगोदर काय बरें करावें ?

एकशेषाचा परत्वास्तव बाध करून समासान्त अकार प्रत्यय अगोदर होईल, आणि नंतर एकशेष होणार नाहीं असा दोष येतो.

(वा.७) अङ्गाच्या आश्रयानें प्राप्त झालेलें कार्य केल्यानंतर एकशेष होतो असें म्हणावें. उदा०—स्वसा च, स्वसारौ च, स्वसारः. येथें अङ्गाच्या आश्रयानें प्राप्त होणारा गुण (७।३।११०) केल्यानंतर ते शब्द सरूप नसल्यामुळें सूत्रानें एकशेष प्राप्त होत नाहीं. याकरितां स्वतंत्र वचन केलें पाहिजे.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की, अङ्गाच्या आश्रयानें प्राप्त होणारें कार्य अगोदर करावें किंवा एकशेष अगोदर करावा ?

---

११. पहिल्या अश्वशब्दाचा शेष केला तर सर्वानुदात्त अश्वशब्द राहूं लागेल. व पुढील अश्वशब्दाचा शेष केला तर अन्तोदात्त अश्वशब्द राहूं लागेल. आणि अश्वशब्द क्वन्प्रत्ययान्त असल्यामुळें आद्युदात्त राहणें तर इष्ट आहे.

श्रयम् ॥

**तिङ्समासे तिङ्समासवचनम् ॥८॥**

तिङ्समासे तिङ्समासो वक्तव्यः ॥ एकं तिङ्ग्रहणमनर्थकम् । समासे तिङ्समास इत्येव । नानर्थकम् । तिङ्समासे प्रकृते तिङ्समासो वक्तव्यः ॥

**तिङ्विधिप्रतिषेधश्च ॥९॥**

तिङ्च कश्चिद्विधेयः कश्चित्प्रतिषेध्यः । पचति च पचति च पचतः । तःशब्दो विधेयस्तिशब्दः प्रतिषेध्यः ॥

यदि पुनरसमास एकशेष उच्येत ।

**असमासे वचनलोपः ॥१०॥**

यद्यसमासे वचनलोपो वक्तव्यः ॥ ननु चोत्पततैव वचनलोपं चोदिताः स्मः । द्विवचनबहुवचनविधिं द्वन्द्वप्रतिषेधं च वक्ष्यति तदर्थं पुनश्चोद्यते ॥

**द्विवचनबहुवचनविधिः ॥११॥**

द्विवचनबहुवचनानि विधेयानि । वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ । वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षा इति ॥

---

मग यामध्यें काय बरें अगोदर करावें ?

एकशेषाचा परत्वास्तव बाध करून अङ्गाच्या आश्रयानें प्राप्त झालेलें कार्य अगोदर करावें.

(वा.८) तिङन्ताचा द्वंद्वसमास झाल्यानंतर तेथें एकशेष होणार, याकरितां तिङन्ताचा द्वंद्वसमास होतो असें अगोदर सांगितलें[१२] पाहिजे.

या वार्तिकामध्यें जे दोन तिङ्शब्द घातलेले आहेत त्यांपैकीं एक तिङ् हा शब्द निरर्थक आहे. 'समासे तिङ्समासवचनम्' इतकेंच वार्तिककारांनीं बोलावें.

तिङ् हा शब्द निरर्थक नाहीं. वार्तिकामध्यें दोन्ही तिङ्शब्द पाहिजे आहेत. त्यांचा अर्थ असा की, तिङन्ताचा समास ज्या प्रकरणामध्यें सांगितला आहे त्या प्रकरणामध्यें हा तिङन्तांचा द्वंद्वसमास एकशेष होण्याकरितां सांगितला पाहिजे.

(वा.९) शिवाय तिङन्तांचा एकशेष ज्या ठिकाणीं होतो त्या ठिकाणीं एखाद्या तिङ्प्रत्ययाचें नवीन विधान केलें पाहिजे आणि एखाद्या तिङ्प्रत्ययाचा निषेध केला पाहिजे; उदा०— पचति च, पचति च, पचतः, या ठिकाणीं एक शेष केल्यानंतर तस् हा तिङ्प्रत्यय होतो असें सांगितलें पाहिजे. आणि ति या तिङ्प्रत्ययाचा लोप केला पाहिजे. आतां पुनः जर समास न करितांच एकशेष होतो असें म्हणावें तर—

(वा.१०) समास करण्याच्यापूर्वी एकशेष झाला असतां त्यांतील सु वगैरे प्रत्ययांचा लोप होतो असें म्हणावें लागेल. नाहीं तर त्या प्रत्ययांचें श्रवण होईल.

हें येथें वार्तिककारांनीं पुनः कशाकरितां सांगितलें आहे ? कारण आरंभींच सु वगैरे प्रत्ययांचा लोप सांगितला पाहिजे; नाहीं तर त्यांचें श्रवण होऊं लागेल असा दोष 'पृथक् सर्वेषाम्' (वा.५) या वार्तिकामध्यें दिलेला आहे.

येथें मुद्दाम फिरून त्या दोषाचा उल्लेख करण्याचें कारण असें की, त्याच्याचसंबंधानें द्विवचन आणि बहुवचन यांचा विधि आणि द्वंद्वाचा निषेध सांगावयाचा आहे.

(वा.११) विभक्ति करून समास न करतांना जर एकशेष केला तर द्विवचन आणि बहुवचन हे उत्पन्न होतात असें म्हटलें पाहिजे; उदा० वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ, वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षाः.

---

१२. पचति येथें एका पच्धातूनें एक पचनक्रिया बोलली गेली. आणि एका तिप्प्रत्ययानें एक कर्ता बोलला गेला. तेव्हां अशा अनेक क्रिया आणि त्यांचे अनेक कर्ते दाखवावयाचे असल्यास पचति [illegible] तेथें पचतः असा एकशेष होणें इष्ट आहे. आणि एकशेष द्वंद्व समासामध्यें विहित आहे व तिङन्ताचा तर द्वंद्व सांगितलेला नाहीं. तेव्हां तिङन्तांचा एकशेष होण्याकरतां सरूप अशा तिङन्तांचा द्वंद्वसमास होतो असें वचन केलें पाहिजे.

**द्वन्द्वप्रतिषेधश्च ॥१२॥**

द्वन्द्वस्य च प्रतिषेधो वक्तव्यः। वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ। वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षा इति। चार्थे द्वन्द्वः [२.२.२९] इति द्वन्द्वः प्राप्नोति। नैष दोषः। अनवकाश एकशेषो द्वन्द्वं बाधिष्यते। सावकाश एकशेषः। कोऽवकाशः। तिङन्तान्यवकाशः॥

यदि पुनः पृथक्सर्वेषां विभक्त्यन्तानामेकशेष उच्येत। किं कृतं भवति। कश्चिद्वचनलोपः परिहृतो भवति।

**विभक्त्यन्तानामेकशेषे**

विभक्त्यन्तानामेकशेषे विभक्त्यन्तानामेव तु निवृत्तिर्भवति।

**एकविभक्त्यन्तानामिति तु पृथग्विभक्तिप्रतिषेधार्थम् ॥१३॥**

एकविभक्त्यन्तानामिति तु वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। पृथग्विभक्तिप्रतिषेधार्थम्। पृथग्विभक्त्यन्तानां मा भूत्। ब्राह्मणाभ्यां च कृतं ब्राह्मणाभ्यां च देहि॥

**न वार्थविप्रतिषेधाद्युगपद्वचनाभावः ॥१४॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अर्थविप्रतिषेधात्। विप्रतिषिद्धावेतावर्थौ कर्ता संप्रदानमित्यशक्यौ युगपन्निर्देष्टुम्। तयो-

---

(वा. १२) विभक्ति झाल्यानंतर समास न करतांना जर एकशेष होणार, तर त्या ठिकाणीं त्या विभक्तिप्रत्ययान्त शब्दांचा प्राप्त झालेला द्वंद्वसमास होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. कारण वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ, वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षाः, या ठिकाणीं दोन वृक्षशब्दांचा आणि तीन वृक्षशब्दांचा 'चार्थे द्वंद्वः' (२।२।२९) या सूत्रानें द्वंद्वसमास प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण एकशेषाला कोठेंही चारितार्थ्य नसल्यामुळें तो एकशेष द्वंद्वसमासाचा बाध करून अगोदर होईल.

पण एकशेषाला चारितार्थ्य आहे ना?

तें कोणतें बरें?

क्रियापदांचा एकशेष ज्या ठिकाणीं होतो त्या ठिकाणीं एकशेषाला चारितार्थ्य आहे. तेव्हां अर्थातच द्वंद्वसमासाचा निषेध सांगितला पाहिजे.

बरें, आतां जर प्रत्येक शब्दाहून निरनिराळी विभक्ति करून समास करण्याच्या पूर्वीच एकशेष करावयाचा; परंतु तो विभक्ति सोडून फक्त प्रकृतिभागाचा न करतां विभक्त्यन्ताचा होतो, असा पक्ष घेतला तर काय होईल?

हा पक्ष घेतला तर विभक्तीच्या लोपाबद्दल वचन करावयास नको; आपोआपच त्याचा परिहार होत आहे. कारण विभक्त्यन्ताचा एकशेष केला म्हणजे जी इतरांची निवृत्ति होते ती विभक्त्यन्ताचीच होईल.

(वा. १३) हा पक्ष घेतला असतांना सूत्रामध्यें 'एकविभक्तौ' या पदाच्या ऐवजीं एकविभक्त्यन्तानाम् असें म्हटलें पाहिजे.

तें कशाकरितां?

पृथक्विभक्त्यन्तांचा एकशेष होऊं नये याकरितां; उदा० 'ब्राह्मणाभ्यां च कृतं ब्राह्मणाभ्यां च देहि' या ठिकाणीं ब्राह्मणाभ्यां देहि या वाक्यामध्यें ब्राह्मणाभ्यां हें संप्रदान असल्यामुळें चतुर्थीविभक्त्यन्त आहे, आणि ब्राह्मणाभ्यां कृतं या वाक्यामध्यें ब्राह्मण हा कर्ता असल्यामुळें ब्राह्मणाभ्यां हें तृतीयान्त पद आहे.

(वा. १४) हा दोष येत नाहीं.

कां बरें?

अर्थामध्यें विरोध आहे, म्हणून. एका वाक्यामध्यें ब्राह्मण हा कर्ता आहे आणि एका वाक्यामध्यें ब्राह्मण संप्रदान आहे. कर्ता आणि संप्रदान या दोन अर्थांचा एकदम एका शब्दानें निर्देश करणें अशक्य आहे. तेव्हां अर्थातच कर्ता आणि संप्रदान हे दोन अर्थ वि-

विप्रतिषिद्धत्वाद्युगपद्वचनं न भविष्यति ॥

**अनेकार्थाश्रयश्च पुनरेकशेषः ॥१५॥**

अनेकमर्थं संप्रत्याययिष्यामीत्येकशेष आरभ्यते ।

**तस्मान्नैकशब्दत्वम् ॥१६॥**

तस्मादेकशब्दत्वं न भविष्यति ॥ अयं तर्हि दोषः । कश्चिद्वचनलोपो द्विवचनबहुवचनविधिर्द्वन्द्वप्रतिषेधश्चेति ॥

यदि पुनः प्रातिपदिकानामेकशेष उच्येत । किं कृतं भवति । वचनलोपः परिहृतो भवति ।

**प्रातिपदिकानामेकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधः सरूपत्वात् ॥१७॥**

प्रातिपदिकानामेकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्यः । माता च जनयित्री मातारौ च धान्यस्य मातृमातारः । किं कारणम् । सरूपत्वात् । सरूपाणि ह्येतानि प्रातिपदिकानि ॥ किमुच्यते प्रातिपदिका-

---

रुद्ध असल्यामुळें ते दोन अर्थ वक्त्याला एकदम बोलतां येणार[13] नाहींत.

(वा.१५) आणि हें एकशेषप्रकरण तर अनेक अर्थ एकदम बोलून दाखवितां यावेत या उद्देशानें केलें आहे.

(वा.१६) तेव्हां एकंदरींत कर्ता आणि संप्रदान दोन अर्थ दाखविणें हें काम एक ब्राह्मण शब्द उच्चारून भागत नसल्यामुळें तेथें एकशेष होणारच नाहीं. तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

तर मग या पक्षीं असा दोष येतो की, एकशेष होऊन जो विभक्त्यन्त शब्द अवशिष्ट राहील त्यांतील विभक्तीचा लोप होतो असें म्हटलें पाहिजे. आणि त्या शब्दाहून द्विवचन किंवा बहुवचन प्रत्यय उत्पन्न होतो असें म्हटलें पाहिजे; तसाच एकशेष होण्याच्या पूर्वी द्वंद्वसमास होत नाहीं असा निषेधही पण या पक्षीं सांगितला पाहिजे.

आतां प्रत्येक शब्दाहून विभक्ति करण्याच्या पूर्वीच नुसत्या प्रातिपदिकांचाच एकशेष होतो असा पक्ष घेतला तर काय बरें होईल ?

हा पक्ष घेतला तर विभक्तीचा लोप सांगावयास नको.

परंतु विभक्ति उत्पन्न होण्याच्या पूर्वी नुसत्या प्रातिपदिकाचा एकशेष होतो असा पक्ष घेतला तर भिन्नभिन्न अर्थाच्या दोन मातृशब्दांचा एकशेष होत नाहीं असा निषेध केला पाहिजे; उदा० माता च मातारौ च मातृमातारः, येथें मातृ याचा अर्थ आई आणि मातारौ यांतील माता याचा धान्य मोजणारा असा अर्थ आहे.

मग येथें एकशेषाचा निषेध कशाकरितां केला पाहिजे ?

सरूप आहेत म्हणून; म्हणजे दोन्ही अर्थांचे नुसते मातृशब्द अगदीं सारखे आहेत. (जरी आई या अर्थाच्या मातृशब्दाचें द्विवचन मातरौ[14] असें होतें आणि मोजणारा या अर्थाच्या मातृशब्दाचें द्विवचन मातारौ असें होतें. असा जरी फरक दिसतो तरी हा फरक प्रत्ययान्त रूपामध्यें आहे, नुसत्या प्रातिपादकामध्यें नाहीं, आणि एकशेष तर नुसत्या प्रातिपदिकाचा होतो असा पक्ष आतांच तुम्हीं घेतला आहे.)

भिन्नभिन्न अर्थाच्या दोन मातृशब्दांचा एकशेष होत नाहीं असा निषेध 'प्रातिपदिकांचा

---

१३. चतुर्थ्यन्ताचा शेष करून ब्राह्मणेभ्यः असें उच्चारिलें तर यापासून संप्रदानाची प्रतीति होते पण कर्त्याची प्रतीति होत नाहीं. आणि तृतीयान्ताचा शेष करून ब्राह्मणैः असें म्हटलें तर त्यापासून कर्त्याची प्रतीति होते, पण संप्रदानाची प्रतीति होणार नाहीं. अर्थात् ज्या ठिकाणीं एक शब्द अनेक अर्थ दाखविण्याविषयीं समर्थ असेल त्या ठिकाणीं एकशेष होतो. प्रकृत स्थलीं तर एक शब्द अनेक अर्थाला दाखविण्याला समर्थ नसल्यामुळें येथें एकशेष होणार नाहीं.

१४. येथें फक्त गुण (७।३।११०) झाला आहे. मोजणारा या अर्थाच्या मातृशब्दाला गुण होऊन दीर्घ (६।४।११) होतो. कारण तो तृच्प्रत्ययान्त आहे.

नामेकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्य इति न पुनर्यस्यापि विभक्त्यन्तानामेकशेषस्तेनापि मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्यः स्यात्। तस्यापि ह्येतानि क्वचिद्विभक्त्यन्तानि सरूपाणि। मातृभ्यां च मातृभ्यां चेति। अथ मतमेतद्विभक्त्यन्तानां सारूप्ये भवितव्यमेवैकशेषेणेति प्रातिपदिकानामेवैकशेषे दोषो भवति। एवं च कृत्वा चोद्यते ॥

**हरितहरिणश्येतश्येनरोहितरोहिणानां स्त्रियामुपसंख्यानम् ॥१८॥**

हरितहरिणश्येतश्येनरोहितरोहिणानां स्त्रियामुपसंख्यानं कर्तव्यम्। हरितस्य स्त्री हरिणी। हरिणस्यापि हरिणी। हरिणी च हरिणी च हरिण्यौ। श्येतस्य स्त्री श्येनी। श्येनस्यापि श्येनी। श्येनी च श्येनी च श्येन्यौ। रोहितस्य स्त्री रोहिणी। रोहिणस्यापि रोहिणी। रोहिणी च रोहिणी च रोहिण्यौ ॥

**न वा पदस्यार्थे प्रयोगात् ॥१९॥**

न वैष दोषः। किं कारणम्। पदस्यार्थे प्रयोगात्। पदमर्थे प्रयुज्यते विभक्त्यन्तं च पदम्। रूपं चेहाश्रीयते रूपनिर्ग्रहश्च शब्दस्य नान्तरेण लौकिकं प्रयोगम्।

---

एकशेष होतो' या पक्षीं केला पाहिजे असें कां विचारतां? 'विभक्त्यन्ताचा एकशेष होतो' या पक्षीं सुद्धां 'भिन्न भिन्न अर्थांच्या दोन मातृशब्दांचा एकशेष होत नाहीं' असा निषेध केला पाहिजे. कारण त्याच्यामध्यें देखील हे दोन मातृशब्द कांहीं ठिकाणीं विभक्ति करून देखील सरूपच कायम रहात आहेत; उदा० मातृभ्यां च मातृभ्यां च. (आई या अर्थाच्या मातृशब्दाचें मातृभ्याम् असेंच रूप होतें आणि मोजणारा या अर्थाच्या मातृशब्दाचें ही मातृभ्याम् असेंच रूप होतें.)

आतां त्याचें मत असेंच जर असेल की, मातृभ्यां याप्रमाणें विभक्त्यन्त रूपें ज्या ठिकाणीं सरूप कायम रहातील त्या ठिकाणीं एकशेष होणें इष्टच आहे तर मात्र मातरौ या ठिकाणीं एकशेष होईल, हा दोष प्रातिपदिकांचा एकशेष होतो हा पक्ष घेणाऱ्यावरच येतो. अशा दृष्टीनें हें विचारलें आहे असें म्हणतां येतें.

(वा.१८) प्रातिपदिकांचा एकशेष होतो, हा पक्ष घेतला तर हरित आणि हरिण हीं प्रातिपदिकें विरूप असल्यामुळें, तसेंच रोहित रोहिण हींही प्रातिपदिकें विरूप असल्यामुळें त्यांहून स्त्रीप्रत्यय केला असतांना एकशेष झाला पाहिजे तो होणार नाहीं, याकरितां तेथें एकशेष होतो असें म्हटलें पाहिजे; उदा० हिरव्या रंगाची स्त्री [१५] हरिणी; हरिणाचीही स्त्री हरिणी; हरिणी च हरिणी च हरिण्यौ. तसेंच, श्येत वर्णाची स्त्री श्येनी; श्येनाचीही स्त्री श्येनी; श्येनी च श्येनी च श्येन्यौ. तसेंच रोहित वर्णाची स्त्री रोहिणी; रोहिणाचीही स्त्री रोहिणी; रोहिणी च रोहिणी च रोहिण्यौ.

(वा.१९) अथवा हा दोष येत नाहीं.

कां बरें?

अर्थाचा बोध होण्याकरितां पदाचा प्रयोग करावा लागतो म्हणून. असें पहा की, कांहीं एक अर्थ दाखविण्याकरितां पदाचाच प्रयोग लोक करीत असतात, आणि पदसंज्ञा ही तर नुसत्या प्रातिपादिकाला न होतां विभक्त्यन्ताला होत आहे, आणि प्रातिपदिकाचा एकशेष होतो हा पक्ष घेतला तरी देखील सारखेपणा हा प्रातिपदिकांमध्यें पहावयाचा नाहीं. कारण सूत्रामध्यें पाणिनीनें रूप असा शब्द उच्चारला आहे. आणि अमक्या शब्दाचें रूप अमुकच आहे असा निश्चय लौकिक प्रयोगावांचून होणें अशक्य आहे. त्या लौकिक प्रयोगामध्यें सारखेपणा पहावयाचा असें गृहीत धरलें म्हणजे हरित धरलें म्हणजे हरित,

१५. 'वर्णादनुदात्तात्तो०' (४।१।३९) यानें ङीप् व तकाराला नकारादेश. हरिणस्य स्त्री अशा अर्थी 'पुंयोगादा०' (४।१।४८) यानें ङीष्.

तस्मिंश्च लौकिके प्रयोगे सरूपाण्येतानि ॥

अपर आह। न वा पदस्यार्थे प्रयोगात्। न वैष पक्ष एवास्ति प्रातिपदिकानामेकशेष इति। किं कारणम्। पदस्यार्थे प्रयोगात्। पदमर्थे प्रयुज्यते विभक्त्यन्तं च पदम्। रूपं चेहाश्रीयते रूपनिर्ग्रहश्च शब्दस्य नान्तरेण लौकिकं प्रयोगम्। तस्मिंश्च लौकिके प्रयोगे प्रातिपदिकानां प्रयोगो नास्ति ॥

अथानेन पक्षेणार्थः स्यात्प्रातिपदिकानामेकशेष इति। बाढमर्थः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। एतेनैवाभिहितं सूत्रेण सरूपाणामेकशेष एकविभक्ताविति। कथम्। विभक्तिः सारूप्येणाश्रीयते। अनैमित्तिक एकशेषः। एकविभक्तौ यानि सरूपाणि तेषामेकशेषो भवति। क्व। यत्र वा तत्र वेति ॥

अथानेन पक्षेणार्थः स्याद्विभक्त्यन्तानामेकशेष इति। बाढमर्थः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते।

---

हरिण, अशीं प्रातिपदिकें जरी विरूप असलीं तरी त्या दोहोंचेंही लौकिक प्रयोगामध्यें स्त्रीलिंगी हरिणी असें रूप सारखेंच दृष्टीस पडत आहे. तेव्हां येथें सूत्रानेंच एकशेष होण्याला कांहीं अडचण दिसत नाहीं.

या वार्तिकाचा अभिप्राय दुसऱ्या तऱ्हेनें वर्णन करतात—

प्रातिपदिकांचा एकशेष होतो हा पक्षच मुळीं येथें अस्तित्वांत नाहीं.

कां बरें ?

अर्थाचा बोध होण्याकरतां पदाचा प्रयोग करावा लागतो म्हणून. असें पहा की, कांहीं एक अर्थ दाखविण्याकरितां पदाचाच प्रयोग लोक करीत असतात, आणि पदसंज्ञा ही तर नुसत्या प्रातिपदिकाला न होतां विभक्त्यन्ताला होत आहे; आणि येथें तर सूत्रामध्यें पाणिनीनें रूप असा शब्द उच्चारला आहे, आणि अमक्या शब्दाचें रूप अमुकच आहे असा निश्चय लौकिक प्रयोगावांचून होणें अशक्य आहे. त्या लौकिक प्रयोगांमध्यें प्रातिपदिकांचा मुळीं प्रयोगच केला जात नाहीं. (तेव्हां सारखें रूप असणें हें जर एकशेषाचें निमित्त आहे आणि तें रूप तर लौकिक पदप्रयोगामध्यें पदाचेंच निश्चित केलें जातें, तर हा त्या निमित्तानें होणारा एकशेष प्रातिपदिकांचा होतो असें कसें म्हणतां येईल ?)

आतां प्रातिपदिकांचा एकशेष होतो या पक्षाचा कांहीं उपयोग आहे काय ?

चांगलाच उपयोग आहे.

तर मग प्रातिपदिकांचा एकशेष होतो असें वचन केलें पाहिजे कीं काय ?

तसें वचन करावयास नको.

पण सूत्रामध्यें तसा स्पष्ट शब्द असल्याशिवाय तसा अर्थ कसा धरतां येईल ?

'सरूपाणामेकशेषः' या सूत्रानेंच हा पक्ष सांगितला आहे.

तो कसा ?

तो असा की, सूत्रामध्यें एकविभक्तौ असें जें म्हटलें आहे, तें शब्दांचें सारूप्य कोठें आहे हें पाहण्याकरतां म्हटलें आहे. एकविभक्तौ हें एकशेषांचें निमित्त म्हणून उच्चारलें नाहीं; एकशेष हा अनिमित्तच आहे. म्हणजे एकंदर असा अर्थ होतो की, लौकिक प्रयोगामध्यें एक विभक्ति पुढें केली असतांना अर्थात् ज्या प्रातिपदिकांचें रूप सारखें दृष्टीस पडतें त्या प्रातिपदिकांचा एकशेष होतो. केव्हां तो होतो असें म्हणाल तर विभक्ति वगैरे कांहीं प्रत्यय पुढें असतांना असें त्याला कांहींच निमित्त नाहीं. वाटेल तेव्हां होतो. (तेव्हां प्रातिपदिकें उच्चारल्याबरोबर त्यांचा एकशेष प्राप्त होतो.)

बरें आतां विभक्त्यन्ताचा एकशेष होतो या पक्षाचा कांहीं उपयोग आहे काय ?

चांगलाच उपयोग आहे.

एतदप्येतेनैवाभिहितं सूत्रेण सरूपाणामेकशेष एकविभक्ताविति । कथम् । नेदं पारिभाषिक्या विभक्तेर्ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । विभागो विभक्तिरिति । एकविभागे यानि सरूपाणि तेषामेकशेषो भवतीति ॥ ननु चोक्तं कश्चिद्वचनलोपो द्विवचनबहुवचनविधिर्द्वन्द्वप्रतिषेधश्चेति । नैष दोषः । यत्तावदुच्यते कश्चिद्वचनलोपो द्विवचनबहुवचनविधिरिति । सहविवक्षायामेकशेषः । युगपद्विवक्षायामेकशेषेण भवितव्यम् । न तर्हीदानीमिदं भवति वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षा इति । नैतत्सहविवक्षायां भवति । अथापि निदर्शयितुं बुद्धिरेवं निदर्शयितव्यम् । वृक्षौ च वृक्षौ च वृक्षौ । वृक्षाश्च वृक्षाश्च वृक्षाश्च वृक्षा इति ॥ यदप्युच्यते द्वन्द्वप्रतिषेधश्च वक्तव्य इति । नैष दोषः । अनवकाश एकशेषो द्वन्द्वं बाधिष्यते ।

---

तर मग विभक्त्यन्तांचा एकशेष होतो असें वचन केलें पाहिजे की काय ?

तसें वचन करावयास नको.

पण सूत्रामध्यें तसा स्पष्ट शब्द असल्याशिवाय तसा अर्थ कसा गृहीत धरतां येईल ?

हा पक्ष देखील 'सरूपाणामेकशेष' या सूत्रानेंच सांगितला आहे.

तो कसा ?

तो असा की, सूत्रामध्यें एकविभक्तौ असें जें म्हटलें आहे त्यामध्यें विभक्ति या शब्दानें विभक्तिसंज्ञा झालेल्या प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे असें समजूं नये, तर विभक्ति हा शब्द अन्वर्थ आहे. विभक्ति म्हणजे विभाग होय. म्हणजे एकंदर अर्थ असा होतो की, कर्ता, कर्म, वगैरे कोणत्याही एक विभागामध्यें जीं सारखीं रूपें दृष्टीस पडतात त्यांचा एकशेष[१६] होतो.

पण या पक्षावर पूर्वी दोष दिलेच आहेत. ते असे की, जो विभक्त्यन्त शब्द एकशेष होऊन अवशिष्ट राहील त्यांतील विभक्तीचा लोप होतो आणि तेथें द्विवचन किंवा बहुवचन उत्पन्न होतें, आणि एकशेषाच्या पूर्वी द्वंद्वसमास होत नाहीं. या तीन गोष्टी मुद्दाम नवीन सांगावयास लागतील.

हा दोष येत नाहीं. पूर्वीच्या विभक्तीचा लोप होतो, आणि तेथें द्विवचन किंवा बहुवचन करावें असें म्हटलें आहे त्यासंबंधानें आमचें म्हणणें असें की, एकशेष सहविवक्षा असतांना होतो. तेव्हां अनेक अर्थ एकदमच बोलावयाचे असतील तर एकशेष होणार. (म्हणजे दोन शब्द असतील तर आरंभींच प्रत्येकाहून एकवचन न होतां द्विवचन होणार. कारण प्रत्येक वृक्षशब्दाचे दोन दोन वृक्ष असे अर्थ आहेत. तसेंच दोहोंपेक्षां जास्त वृक्ष दाखवावयाचे असतील तर प्रत्येक वृक्षशब्दाचा तितका अर्थ होत असल्यामुळें आरंभींच प्रत्येक वृक्षशब्दाहून बहुवचनप्रत्ययच उत्पन्न होणार आहे.)

तर मग आतां वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ, वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षाः असें बोलतां येणार नाहीं काय ?

सहविवक्षा असतांना असें बोलतां येणार नाहीं. तरी पण या एकशेषवृत्तीचा विग्रह दाखवावा असेंच जर तुमच्या मनांत असेल तर वृक्षौ च वृक्षौ च वृक्षौ, वृक्षाश्च वृक्षाश्च वृक्षाश्च वृक्षाः अशा रीतीनें विग्रह दाखवितां येईल.

आतां विभक्त्यन्तांचा एकशेष होतो असा पक्ष घेतला असतां एकशेष करण्याच्या पूर्वी प्राप्त झालेला द्वंद्वसमास होत नाहीं असा निषेध करावा लागेल असें जें म्हटलें आहे तोही दोष येत नाहीं. कारण एकशेष हा

---

१६. प्रातिपतिकाच्या अर्थाचे पोटविभाग जे कर्ता, कर्म, वगैरे ते विभक्तिप्रत्ययांनें दाखविले जातात तेव्हां अर्थातच विभक्त्यन्ताचा एकशेष होतो हा पक्ष सिद्ध होतो.

ननु चोक्तं सावकाश एकशेषः कोऽवकाशः तिङन्तान्यत्रकाश इति । न तिङन्तान्येकशेषारम्भं प्रयोजयन्ति । किं कारणम् । यथाजातीयकानां द्वितीयस्य पदस्य प्रयोगे सामर्थ्यमस्ति तथाजातीयकानामेकशेषः । न च तिङन्तानां द्वितीयस्य पदस्य प्रयोगे सामर्थ्यमस्ति । किं कारणम् । एका हि क्रिया । एकेनोक्तत्वात्तस्यार्थस्य द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यमुक्तार्थानामप्रयोग इति । यदि तर्ह्येका क्रिया द्विवचनबहुवचनानि न सिध्यन्ति । पचतः पचन्ति । नैतानि क्रियापेक्षाणि । किं तर्हि । साधनापेक्षाणि ॥

अथवा पुनरस्त्वेकविभक्ताविती ननु

---

अनवकाश असल्यामुळें तो द्वंद्वसमासाचा बाध करून अगोदर होईल.

पण एकशेषाला द्वंद्वसमासावांचून इतर ठिकाणीं चारितार्थ्य आहे ना ?

तें कोठें ?

क्रियापदांचा एकशेष ज्या ठिकाणीं होतो त्या ठिकाणीं द्वंद्वसमासाची प्राप्ति नाहीं. तेव्हां तेथें एकशेषाला चारितार्थ्य आहे.

पण क्रियापदाकरितां पाणिनीनें एकशेष मुळींच केला नाहीं.

कां बरें ?

ज्या प्रकारच्या पदांपैकीं एका पदाचा प्रयोग केला असतांना फिरून तसला दुसरा अर्थ दाखविण्याकरितां दुसऱ्या पदाचा प्रयोग करतां[१७] येतो, तशा प्रकारच्या पदांचाच एकशेष होत असतो आणि क्रियापदासंबंधानें पाहिलें तर कांहीं एक क्रिया दाखविण्याकरितां एका क्रियापदाचा प्रयोग केला असतांना फिरून तशा प्रकारची क्रिया दाखविण्याकरितां फिरून त्याच क्रियापदाचा दुसऱ्यांदा प्रयोग करतां येत नाहीं.

क्रियापदाच्यासंबंधानें असा जो फरक दृष्टीस पडतो त्याचें कारण काय ?

कारण असें की, क्रिया ही सर्व एक असल्या[१८]मुळें ती एका क्रियापदानें उक्त झाल्यानें पुनः तेथें दुसऱ्या क्रियापदाचा प्रयोग करितां येत नाहीं. कारण जो अर्थ कोणत्याही शब्दानें उक्त होतो त्या अर्थी फिरून शब्दाचा प्रयोग होत नाहीं असा न्याय आहे.

अशा रीतीनें क्रिया जर एकच असेल तर पचतः, पचन्ति, असें जें क्रियापदांमध्यें द्विवचन आणि बहुवचन झालेलें दृष्टीस पडतें तें सिद्ध होणार नाहीं.

क्रियापदामध्यें जें द्विवचन किंवा बहुवचन झालेलें असतें तें क्रियांचें द्वित्व किंवा बहुत्व दाखविण्याकरतां केलेलें आहे असें समजूं नये. क्रियेची जीं कर्ता, कर्म, हीं साधनें त्यांची संख्या दाखविण्याकरितां क्रियापदामध्यें एकवचन, द्विवचन आणि बहुवचन केलें जातें.

अथवा अनेक शब्दांच्या समुदायाहून एक विभक्ति केली असतांना त्या शब्दांमध्यें एकशेष होतो, असा पक्ष घेतला तरी हरकत नाहीं.

पण असा पक्ष घेतां येत नाहीं. कारण

---

१७. घट, पट, वगैरे द्रव्यवाचक शब्दासंबंधानें घटरूपी अर्थ दाखविण्याकरितां घटशब्दाचा प्रयोग केला असतां फिरून दुसरा घटरूपी अर्थ दाखविण्याकरितां दुसऱ्यांदा घटशब्दाचा प्रयोग करतां येतो. कारण एका घटशब्दापासून एकच घटरूपी अर्थ मनांत येतो. एकदम दोन अर्थ मनांत येत नाहींत.

१८. जसें मधमाशांनीं अनेक पुष्परस एकत्र साठवून मध तयार केला जातो, त्या मधामध्यें वस्ततः अनेक रस आहेत. पण ते भिन्नभिन्न रूपांनीं अनुभवांत येत नाहींत, तर मध या एका स्वरूपांत एकवट होऊनच ते सर्व रस प्रतीत होतात, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे; तसें एका तिङन्ता-(क्रियापदा-)पासून अनेक क्रिया भिन्नभिन्न रूपांनीं मनांत येत नसून क्रिया या एका स्वरूपांत एकवट होऊनच त्या सर्व क्रिया मनांत येतात, असाच क्रियापदाचा स्वभाव आहे. तेव्हां एका क्रियापदानेंच सर्व उक्त झाल्यानें फिरून तसलें क्रियापद घालण्याचें प्रयोजनच रहात नाहीं.

चोक्तमेकविभक्ताविति चेन्नाभावाद्विभक्तेरिति । नैष दोषः । परिहृतमेतत् । अर्थवत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा भविष्यतीति । ननु चोक्तं नियमान्न प्राप्नोति अर्थवत्समुदायानां समासग्रहणं नियमार्थमिति । नैष दोषः । तुल्यजातीयस्य नियमः । कश्च तुल्यजातीयः । यथाजातीयकानां समासः । कथंजातीयकानां समासः । सुबन्तानाम् ॥

सर्वत्रापत्यादिषूपसंख्यानम् ॥२०॥

सर्वेषु पक्षेष्वपत्यादिषूपसंख्यानं कर्तव्यम् । भिक्षाणां समूहो भैक्षमिति ॥ सर्वत्रेत्युच्यते प्रातिपदिकानां चैकशेषे सिद्धम् । अपत्यादिष्वित्युच्यते बहवश्चापत्यादयः । गर्गस्यापत्यं बहवो गर्गाः । एका प्रकृतिर्बहवश्च यञः । असारूप्यादेकशेषो न

---

समुदायाहून एक विभक्ति करतां येत नाहीं, असें मागें (वा.४) सांगितलें आहे.

हा दोष येत नाहीं. कारण याचा परिहार पूर्वींच केला आहे. कारण समुदाय अर्थवान् असल्यामुळें त्याला 'अर्थवदधातुः' (१।२।४५) या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होईल.

पण अर्थवान् अशा समुदायाला जर प्रातिपदिकसंज्ञा होय तर समासालाच होय, अशा रीतीनें नियम होत असल्यामुळें अनेक शब्दांच्या समुदायाला प्रातिपदिक संज्ञेची प्राप्ति येत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण तो नियम समासासारखा जो समुदाय असेल त्याच्या संबंधानेंच तो लागू होईल.

समासासारखा तो समुदाय कोणता ?

जशा प्रकारच्या शब्दांचा समास होतो तशा प्रकारच्या शब्दांचा जो समुदाय तोच समासासारखा समुदाय होय.

समास कशा प्रकारच्या शब्दांचा होत असतो ?

सुबन्त अशा पदांचा समास होत असतो. (तेव्हां नुसत्या प्रातिपदिकांचा समुदाय हा सुबन्तांचा समुदाय नसल्यामुळें नियमानें त्याची व्यावृत्ति होणार नाहीं. तेव्हां त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून विभक्ति करतां येईल. तेव्हां समुदायाहून एक विभक्ति पुढें असतांना एकशेष होतो हा पक्ष घेतला असतां कांहीं हरकत दिसत नाहीं.)

(वा.२०) सर्वपक्षीं अपत्य वगैरे अर्थाला दाखविणारे प्रत्यय पुढें असतांना प्रकृतिभूत शब्दांचा एकशेष होतो असें म्हणावें; उदा० भिक्षाणां समूहो भैक्षम्. (येथें भिक्षा भिक्षा भिक्षा आम् याहून समूह या अर्थी अण् प्रत्यय केल्यानंतर 'सुपोधातु०' (२।४।७१) या सूत्रानें आम् या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होत असल्यामुळें विभक्ति पुढें नाहीं. म्हणून एकशेष होणार नाहीं.

या वार्तिकामध्यें सर्वपक्षीं असें म्हटलें आहे. परंतु विभक्ति करण्यापूर्वीच प्रातिपदिकांचा एकशेष होतो असा पक्ष घेतला असतांना भैक्षम् हें उदाहरण सहजच सिद्ध होत आहे.[१९] तसेंच 'अपत्य वगैरे अर्थाला दाखविणारे प्रत्यय पुढें असतांना' असें वार्तिकामध्यें म्हटलें आहे. पण ते अपत्य वगैरे अर्थच जेथें बहुत दाखवावयाचे असतील तेथें एकशेष होणार नाहीं; उदा०— गर्गाः. गर्गाचीं बहुत अपत्यें असा याचा अर्थ आहे. येथें एक गर्गशब्द व त्याच्यापुढें अपत्यार्थाला दाखविणारे प्रत्यय बहुत म्हणजे गर्ग —य य य असे तीन आहेत. येथें गर्ग हा शब्द

---

१९. तेव्हां वार्तिकामधील सर्वत्र (सर्वपक्षीं) हा शब्द बरोबर नाहीं.

२०. तेव्हां वार्तिकामधील अपत्यादिषु (अपत्य वगैरे अर्थाला दाखविणारे प्रत्यय पुढें असतांना) हें म्हणणेंहीं बरोबर दिसत नाहीं. कारण अपत्य बहुत असतील तेथील दोषाचें निराकरण होत नाहीं.

प्राप्नोति । ननु च यथैव बह्वो यञ एवं प्रकृतयोऽपि बह्व्यः स्युः । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । गर्गाः वत्साः बिदाः उर्वा इति । अञ्यो बहुषु यञ्यो बहुष्विन्त्युच्यमानो लुग्न प्राप्नोति । मा भूदेवम् । अञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति । ननु चोक्तं नैवं शक्यमिह हि दोषः स्यात्काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति । नैष दोषः । लौकिकस्य तत्र गोत्रस्य ग्रहणं न चैतल्लौकिकं गोत्रम् ॥ अथवा पुनरस्त्वेका प्रकृतिर्बह्वश्च यञः । ननु चोक्तमसारूप्यादेकशेषो न प्राप्नोतीति ।

## सिद्धं तु समानार्थानामेकशेषवचनात् ॥२१॥

सिद्धमेतत् । कथम् । समानार्थानामेकशेषो भवतीति वक्तव्यम् ॥ यदि समा-

---

तीन वेळ नसल्यामुळें ते तीन शब्द सरूप होत नाहींत. त्यामुळें एकशेष होणार[२१] नाहीं.

या ठिकाणीं प्रत्यय जसा तीन वेळ उच्चारला आहे तशी त्याची प्रकृति जो गर्गशब्द तोही तीन वेळां उच्चारला म्हणजे गर्ग-य, गर्ग-य, गर्ग-य, अशा रीतीनें हे शब्द सरूप होत आहेत.

असें करणें शक्य नाहीं. कारण अशी कल्पना करून एकशेष करतां आला तरी गर्गाः, वत्साः, बिदाः, उर्वाः, या ठिकाणीं दोष येतोच. तो असा की, 'बहुत अपत्य या अर्थाला दाखविणारा जो यञ्प्रत्यय व बहुत अपत्य या अर्थाला दाखविणारा जो अञ्प्रत्यय त्याचा लुक् होतो' असा 'यञञोश्च' (२।४।६४) या सूत्रानें सांगितलेला लुक् होणार[२२] नाहीं.

तशा अर्थानें लुक् झाला नाहीं तरी न होऊं दे. त्या सूत्राचा अर्थ असा की, बहुत अपत्य या अर्थाला दाखविणारा जो यञ्प्रत्ययान्त शब्द तसाच बहुत अपत्य या अर्थाला दाखविणारा जो अञ्प्रत्ययान्त शब्द त्यांतील यञ् आणि अञ् या प्रत्ययांचा लुक् होतो, असा त्या सूत्राचा अर्थ घेतला असतांना गर्गाः वगैरे उदाहरणांमध्यें लुक् होईल असा अर्थ घेणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ घेतला तर काश्यपशब्दामधील अञ्प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल. येथें काश्यपाच्या (काश्यपाशीं) प्रतिकृति असा [२३]अर्थ आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या गोत्र या अर्थाला दाखविणाऱ्या यञ् आणि अञ्प्रत्ययांचा लुक् सांगितला आहे. तें गोत्र तेथें लौकिक घेतलें आहे आणि काश्यप हें गोत्र लौकिक नव्हे. हें प्रवराध्यायप्रसिद्ध असल्यामुळें शास्त्रीय आहे.

अथवा एक गर्गशब्द आणि यञ् प्रत्यय तीन तीन असे घेतले तरी हरकत नाहीं.

पण असे घेतले असतां गर्गशब्द हा तीन ठिकाणीं नसल्यामुळें सारूप्य होत नाहीं, त्यामुळें एकशेष होणार नाहीं, असें आतांच सांगितलें आहे ना ?

(वा. २१) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ते असें की, ज्याचा अर्थ सारखा आहे ते शब्द जरी सारखे नसतील तरी त्यांचा एकशेष होतो.

अर्थ सारखा असतांना एकशेष होतो असें जर म्हटलें तर अक्षाः, पादाः, माषाः, या ठिकाणीं एकशेष कसा करतां येईल ? (कारण येथें अक्ष अक्ष अक्ष असे तीन अक्षशब्द

---

२१. गर्ग, य आणि पुढील दोन य शब्द हे तीन शब्द प्रत्येकीं गर्गाचें अपत्य या अर्थाला दाखवीत असल्यानें समानार्थक आहेत तरी सरूप नसल्यानें एकशेष होणार नाहीं.

२२. कारण 'गर्ग, य' या विशिष्ट समुदायाचा एकशेष झाल्यामुळें त्या समुदायाला 'गर्गाचीं बहुत अपत्यें' इतका अर्थ येईल, परंतु त्यांतील नुसत्या प्रत्ययाला 'बहुत अपत्यें' हा अर्थ येणार नाहीं.

२३. याच सूत्रावरील मागील टीप ४ पहा.

नार्थानामेकशेष उच्यते कथमक्षाः पादाः माषा इति ।

## नानार्थानामपि सरूपाणाम् ॥२२॥

नानार्थानामपि सरूपाणामेकशेषो वक्तव्यः ॥

## एकार्थानामपि विरूपाणाम् ॥२३॥

एकार्थानामपि विरूपाणामेकशेषो वक्तव्यः । वक्रदण्डश्च कुटिलदण्डश्च वक्रदण्डौ कुटिलदण्डाविति वा ॥

## स्वरभिन्नानां यस्योत्तरस्वरविधिः ॥२४

स्वरभिन्नानां यस्योत्तरस्वरविधिस्तस्यैकशेषो वक्तव्यः । अक्षश्चाक्षश्च अक्षौ । मीमांसकश्च मीमांसकश्च मीमांसकौ ॥

इह कस्मान्न भवति । एकश्चैकश्च द्वौ च द्वौ चेति ।

## संख्याया अर्थासंप्रत्ययादन्यपदार्थत्वाच्चानेकशेषः ॥२५॥

संख्याया अर्थासंप्रत्ययादेकशेषो न भविष्यति । न ह्येकावित्यनेनार्थो गम्यते । अन्यपदार्थत्वाच्च संख्याया एकशेषो न भ-

निरनिराळ्या तीन अर्थांचे आहेत.)[२४]

(वा.२२) अर्थ सारखा नसला तरी जे शब्द सारखे आहेत त्यांचाही पण एकशेष होतो.

(वा.२३) एकाच अर्थाचे जे शब्द ते जरी स्वतः सारखे नसतील तरी त्यांचा एकशेष होतो असें म्हणावें; उदा०—वक्रदण्ड आणि कुटिलदण्ड या दोन शब्दांचा एकशेष होऊन वक्रदण्डौ असें किंवा कुटिलदण्डौ असें रूप होतें.

(वा.२४) ज्या शब्दांचीं अक्षरें सारखीं असून उदात्त वगैरे स्वर मात्र निरनिराळे असतील त्या शब्दांमध्यें एकशेष जो एक शब्द राहतो तो असा राहतो की ज्यामधील उदात्त वगैरे स्वर अष्टाध्यायीमध्यें पुढील सूत्रानें झालेला आहे; उदा०—अक्षश्च अक्षश्च अक्षौ, मीमांसकश्च मीमांसकश्च मीमांसकौ. (येथें अक्ष व मीमांसक हे शब्द जर निरनिराळ्या स्वरांचे घेतले तर त्यांपैकीं एका अक्षशब्दामध्यें स या प्रत्ययाला 'आद्युदात्तश्च' (३।१।३) या सूत्रानें उदात्त झालेला आहे. आणि दुसऱ्या अक्षशब्दामध्यें 'ञ्नित्यादिर्नित्यम्' (६।१,९७) या सूत्रानें आदि उदात्त झालें आहे. हें सूत्र अष्टाध्यायीमध्यें 'प्रत्ययः' या सूत्राच्यापुढें घातलें आहे. म्हणून आद्युदात्त अक्ष शब्द शिल्लक राहतो. तसेंच एका मीमांसकशब्दामध्यें लिति (६।३।१९३) या सूत्रानें स या अक्षरामधील अकार उदात्त झालेला आहे, आणि दुसऱ्या मीमांसकशब्दामध्यें 'ञ्नित्यादि' (६।१।१९७) या सूत्रानें मी या अक्षरांतील ईकार उदात्त झालेला आहे. आणि अष्टाध्यायीमध्यें पाणिनीनें 'ञ्नित्यादिर्नित्यम्' हें सूत्र 'लिति' या सूत्राच्या पुढें घातलें आहे. तेव्हां येथें आद्युदात्त मीमांसकशब्द शिल्लक राहतो.)

आतां दोन एक शब्दांचा एकशेष करून एकौ असें रूप दोन या अर्थीं कां होत नाहीं ?[२५] तसेंच प्रत्येकीं दोन या अर्थाचे दोन द्विशब्द घेऊन त्यांमध्यें एकशेष करून द्वाः असें रूप चार या अर्थीं कां होत नाहीं ?

(वा.२५) संख्यावाचकांचा एकशेष केला असतां त्यापासून विवक्षित अर्थाचा बोध होत नाहीं म्हणून तेथें एकशेष होत नाहीं. कारण असें पाहा की, लोकांमध्यें एकौ आणि द्वाः असा शब्द उच्चारला असतां त्यापासून दोन आणि चार हा अर्थ मनांत येत नाहीं. शिवाय निराळ्या शब्दापासून तो अर्थ मनांत येत असल्यामुळें तेथें एकशेष होणार नाहीं. कारण एक आणि एक म्हणजे दोन असा अर्थ तेथें विवक्षित आहे, तसाच दोन आणि दोन म्हणजे चार असा अर्थ तेथें विवक्षित आहे; ती

२४. याच सूत्रावरील मागील टीप २ पहा.

२५. 'द्विवचन व बहुवचन हे एकशेष केल्यावांचून कोठेंही होत नाहींत. द्वौ या ठिकाणीं सुद्धां दोन द्विशब्दांचा एकशेष करूनच द्विवचन झालें आहे' असें गृहीत धरून त्या द्वौ याप्रमाणें एकशेषानें 'एकौ' असें रूप कां होत नाहीं, असें विचारलें आहे.

विष्यति। एकश्चैकश्चेत्यस्य द्वावित्यर्थः। द्वौ च द्वौ चेत्यस्य चत्वार इत्यर्थः॥ नैतौ स्तः परिहारौ। यत्तावदुच्यते संख्याया अर्थासंप्रत्ययादिति। अर्थासंप्रत्ययेऽप्येकशेषो भवति। तद्यथा। गार्ग्यश्च गार्ग्यायणश्च गार्ग्यौ। न चोच्यते वृद्धयुवानाविति भवति चैकशेषः। यदप्युच्यतेऽन्यपदार्थत्वाच्चेति। अन्यपदार्थेऽप्येकशेषो भवति। तद्यथा। विंशतिश्च विंशतिश्च विंशती इति। तयोश्चत्वारिंशदित्यर्थः॥ एवं तर्हि नेमौ पृथक्परिहारौ। एकपरिहारोऽयम्। संख्याया अर्थासंप्रत्ययादन्यपदार्थत्वाच्चेति। यत्र ह्यर्थासंप्रत्यय एव वान्यपदार्थतैव वा भवति तत्रैकशेषो गार्ग्यौ विंशती इति यथा॥ अथवा नेम एकशेषशब्दाः। यदि तर्हि नेम एकशेषशब्दाः समुदायशब्दास्तर्हि भवन्ति।

---

दोन आणि चार ही विवक्षित संख्या द्वौ आणि चत्वारः या स्वतंत्र पदापासून मनांत येत आहे.

एकौ असा एकशेष न होण्याला जीं हीं दोन उत्तरें दिलीं आहेत तीं बरोबर दिसत नाहींत. त्यांपैकीं पहिलें जें उत्तर दिलें आहे की, एकौ या शब्दापासून दोन या संख्येचा बोध होत नाहीं. परंतु लोकामध्यें विवक्षित अर्थाचा बोध होत नसला तरी देखील एकशेष होत असतो; उदा०— गार्ग्य आणि गार्ग्यायण यांमध्यें एकशेष होऊन गार्ग्यौ असें रूप होतें. त्या गार्ग्यौ या शब्दापासून 'वृद्ध म्हणजे गार्ग्य, युवा म्हणजे गार्ग्यायण' या दोघांचा सहज रीतीनें बोध होत नाहीं. तथापि तेथें गार्ग्यौ असा एकशेष झालेला दृष्टीस पडतो. तसेंच दुसरें जें उत्तर दिलें आहे की, विवक्षित अर्थाचा बोध दुसऱ्या पदापासून होत असल्यामुळें तेथें एकशेष होत नाहीं हेंही उत्तर बरोबर नाहीं. कारण विवक्षित अर्थाचा बोध दुसऱ्या पदापासून होत असूनही कांहीं ठिकाणीं एकशेष झालेला दृष्टीस पडतो; उदा० — दोन विंशतिशब्दांचा एकशेष होऊन विंशती असें रूप होतें. त्याचा अर्थ असा चाळीस असा विवक्षित आहे. त्या चाळीस या अर्थाचा बोध चत्वारिंशत् या निराळ्या शब्दापासून होत आहे.

तर मग हीं उत्तरें निरनिराळीं आहेत असें समजूं नये. हीं दोन्ही कारणें मिळून एकच उत्तर होय. तें असें की, एकौ या पदापासून विवक्षित दोन या संख्येचा बोध होत नाहीं. आणि त्या दोन या विवक्षित संख्येला दाखविणारें द्वौ हें पद आहे. म्हणून एकौ असा एकशेष होत नाहीं. या दोहोंपैकीं, ज्या ठिकाणीं नुसतें एकच असेल म्हणजे विवक्षित अर्थाचा एकशेष केलेल्या पदापासून बोध होत नाहीं एवढेंच असेल, किंवा विवक्षित अर्थाला दाखविणारें दुसरें पद आहे एवढेंच असेल, तर त्या दोन्ही ठिकाणीं एकशेष होतो; उदा०—गार्ग्यौ विंशती.

[२६] अथवा द्वौ, त्रयः, हीं रूपें एकशेषानें झालेलीं नव्हेत.

जर दोन या अर्थी द्वौ हें रूप एकशेषानें झालेलें नसेल म्हणजे दोघांचा समुदाय हा द्विशब्दाचा मूळचाच अर्थ असेल तर द्वि हा समुदायवाचक शब्द होईल.

मग तसें झालें असतां काय दोष येईल ?

दोष असा येईल की, द्वि, त्रि, शब्दांवरून एकवचन होऊं लागेल. कारण समुदाय हा एकच अर्थ धरला जातो; जसें यूथं, शतं, वनम्. हे समुदायवाचक शब्द एकवचना-

---

२६. 'एकौ' असा एकशेष कां होत नाहीं असें विचारणाऱ्याच्या मनांतील दृष्टान्त बरोबर नाहीं असें येथून भाष्यकार दाखवीत आहेत.

तत्र को दोषः। एकवचनं प्राप्नोति। एकार्था हि समुदाया भवन्ति। तद्यथा। यूथम् शतम् वनमिति॥ सन्तु तर्ह्येकशेषशब्दाः। किंकृतं सारूप्यम्। अन्योन्यकृतं सारूप्यम्। सन्ति पुनः केचिदन्येऽपि शब्दा येषामन्योन्यकृतो भावः। सन्तीत्याह। तद्यथा। माता पिता भ्रातेति॥ विषम उपन्यासः। सकृदेते शब्दाः प्रवृत्ता अपायेष्वपि वर्तन्ते। इह पुनरेकेनाप्यपाये न भवति चत्वार इति॥ अन्यदिदानीमेतदुच्यते सकृदेते शब्दाः प्रवृत्ता अपायेष्वपि वर्तन्त इति। यत्तु भवानस्मांश्चोदयति सन्ति पुनः केचिदन्येऽपि शब्दा येषामन्योन्यकृतो भाव इति तत्रैतेऽस्माभिरुपन्यस्ताः। तत्रैतद्भवानाह सकृदेते शब्दाः प्रवृत्ता अपायेष्वपि वर्तन्त इति। एतच्च वार्त्तम्।

एकैको नोद्यन्तुं भारं शक्नोति यत्कथं तत्र।
एकैकः कर्ता स्यात्सर्वे वा स्युः कथं युक्तम्॥

---

न्तच दृष्टीस पडतात.

तर मग द्वौ, त्रयः, हीं रूपें एकशेष होऊनच सिद्ध झालेलीं आहेत असेंच असूं दे.

पण तेथें सारूप्य कसें ?

(दोन एकशब्द घेऊन एकशेष करून द्वौ असें रूप होतें असें गृहीत धरलें असतां एकशब्द लुप्त झालेला आहे आणि द्विशब्द राहिलेला आहे. तेव्हां लुप्त आणि अवशिष्ट यांमध्यें सारखेपणा नाहीं.

येथें सारखेपणा दोन द्विशब्दाचा एकमेकांमुळें आलेला आहे. (म्हणजे द्वौ हें जें एकशेषानें रूप सिद्ध होतें तेथें मूळ दोन एकशब्द न घेतां दोन द्विशब्दच घ्यावयाचे आहेत. त्या दोन द्विशब्दांपैकीं प्रत्येकाला दुसऱ्या जवळच्या द्विशब्दामुळेंच दोन असा अर्थ आलेला आहे. म्हणजे एकंदर तेथें दोनच असा अर्थ होतो. चार नाहीं.)

पण अशा तऱ्हेचें लोकांमध्यें दुसरें कांहीं शब्द आहेत काय की ज्यांचा अर्थ एकमेकांवर अवलंबून आहे ?

असे शब्द आहेत; उदा०—माता, पिता, भ्राता.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण माता वगैरे हे शब्द पुत्र वगैरे दुसऱ्या अर्थामुळेंच आपल्या अर्थाला दाखवितात हें खरें, परंतु एकदा ते माता वगैरे शब्द आपल्या अर्थाचे दर्शक झाले म्हणजे मागून त्या पुत्र वगैरे अर्थांचा वियोग झाला तरी देखील ते आपल्या अर्थाला दाखवितच असतात, आणि संख्यावाचक शब्दांविषयीं पाहिलें तर चारांतील एखाद्याचा वियोग झाला तरी देखील तेवढ्यानें त्याला चार असें म्हणतां येत नाहीं.

हे तुम्ही आतां निराळेंच बोलत आहांत की माता वगैरे शब्द पुत्र वगैरेंचा वियोग झाला तरी देखील आपल्या अर्थाला दाखवीत असतातच म्हणून हा विचार निराळा. प्रकृत तुम्हीं आम्हांला जो प्रश्न केला की, असे कांहीं दुसरे शब्द आहेत काय की ज्यांचा अर्थ एकमेकांवर अवलंबून राहतो ? त्या प्रश्नाचें उत्तर म्हणून आम्ही माता, पिता वगैरे शब्द दाखविले आहेत. तेव्हां हा आमचा दृष्टान्त बरोबरच आहे. तेथें तुम्हीं निराळेंच कांहींतरी वैलक्षण्य दाखविलें की, माता वगैरे शब्द पुत्र वगैरेंचा वियोग झाला तरी देखील आपल्या अर्थाला दाखवितात. हें वैलक्षण्य दाखविणें येथें अगदीं निष्फळ होय.

अथवा आम्ही दुसरा दृष्टान्त देतों.

एखादें मोठें ओझें अनेक लोक मिळून उचलतात. त्या ठिकाणीं प्रत्येकाला तो भार उचलण्याचें सामर्थ्य नाहीं. अशा ठिकाणीं त्या उचलणें या क्रियेचा कर्ता प्रत्येक मनुष्य समजावा, किंवा ते सगळे मिळून समजावे,

कारणमुद्यमनं चेन्नोद्यच्छति चान्तरेण तत्तुल्यम् ।
तस्मात्पृथक्पृथक्ते कर्तारः सव्यपेक्षास्तु ॥

## प्रथममध्यमोत्तमानामेकशेषोऽसरूपत्वात् ॥२६॥

प्रथममध्यमोत्तमानामेकशेषो वक्तव्यः । पचति च पचसि च पचथः । पचसि च पचामि च पचावः । पचति च पचसि च पचामि च पचामः । किं पुनः कारणं न सिध्यति । असरूपत्वात् ॥

## द्विवचनबहुवचनाप्रसिद्धिश्चैकार्थत्वात् ॥२७॥

द्विवचनबहुवचनयोश्चाप्रसिद्धिः । किं कारणम् । एकार्थत्वात् । एकोऽयमवशिष्यते तेनानेन तदर्थेन भवितव्यम् । किमर्थेन । यदर्थ एकः । किमर्थश्चैकः । एक एकार्थः ॥ नैकार्थ्यम् । नायमेकार्थः । किं तर्हि । द्व्यर्थो बह्वर्थश्च ।

## नैकार्थ्यमिति चेदारम्भानर्थक्यम् ॥२८॥

नैकार्थ्यमिति चेदेकशेषारम्भोऽनर्थकः स्यात् ॥ इह हि शब्दस्य स्वाभाविकी वानेकार्थता स्याद्वाचनिकी वा । तद्यदि तावत्स्वाभाविकी

## अशिष्य एकशेष एकेनोक्तत्वात् ॥२९॥

अशिष्य एकशेषः । किं कारणम् ।

---

यांत योग्य काय आहे ? उचलणें ही क्रिया कर्तृत्व येण्याला कारणीभूत असेल तर प्रत्येकाला त्याच्यासारख्या दुसऱ्या मनुष्याच्या साहाय्यावांचून ती क्रिया करतां येत नाहीं. अशा रीतीनें त्यांचें कर्तृत्व जरी परस्परांवर अवलंबून आहे तरी देखील तेथें प्रत्येकाला कर्तृत्व मानलें जातें. त्याप्रमाणेंच द्वौ, त्रयः, या एकशेष केलेल्या उदाहरणांमध्यें मूळच्या अनेक शब्दांचा अर्थ परस्परांवर अवलंबून आहे असें समजावें.

(वा.२६) प्रथमपुरुषी, मध्यमपुरुषी आणि उत्तम पुरुषी प्रत्ययान्ताचा एकशेष होतो असें म्हणावें; उदा० पचति आणि पचसि यांचा एकशेष होऊन पचथः असें होतें. तसेंच पचसि आणि पचामि यांचा एकशेष होऊन पचावः असें होतें. तसेंच पचति पचसि आणि पचामि यांचा एकशेष होऊन पचामः असें होतें.

पण या उदाहरणांमध्यें सूत्रानेंच एकशेष कां बरें होणार नाहीं ?

ते प्रत्यय सरूप नाहींत म्हणून.

(वा.२७) एकशेष केल्यानंतर त्या शब्दाच्या पुढें जें द्विवचन किंवा बहुवचन केलें जातें तें करतां येणार नाहीं.

तें कां बरें ?

एकच अर्थ आहे म्हणून. एकशेष केल्यानंतर एकच शब्द अवशिष्ट राहतो तेव्हां तो तेवढ्याच अर्थाला दाखवील.

केवढ्या अर्थाला दाखवील ?

तो मूळचा शब्द जेवढ्या अर्थाचा आहे तेवढ्याच अर्थाला दाखवील.

मूळचा केवढ्या अर्थाचा आहे ?

एक शब्द मूळचा एकच अर्थ प्रतिपादन करणारा आहे.

या ठिकाणीं एक अर्थ आहे असें म्हणतां येत नाहीं.

मग काय ?

हा अवशिष्ट राहिलेला एक शब्द एकच अर्थ प्रतिपादन करतो असें नाहीं. तर तो दोन किंवा बहुत अशा अर्थांचें प्रतिपादन करतो.

(वा.२८) अवशिष्ट राहिलेला एक शब्द एकाच अर्थाचें प्रतिपादन करीत नाहीं असें असेल तर एकशेष सांगणारें हें सूत्रच मुळीं निरर्थक होईल. कारण या अवशिष्ट राहिलेल्या शब्दाला जें अनेकार्थत्व दिसतें तें स्वाभाविकच आहे किंवा शब्दाच्या जोरावर मानलें जातें. जर तें शब्दाचें अनेकार्थत्व स्वाभाविक असेल तर—

(वा.२९) हें एकशेषसूत्र मुळींच कराव-

एकेनोक्तत्वात्तस्यार्थस्य द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यमुक्तार्थानामप्रयोग इति ॥ अथ वाचनिकी तद्वक्तव्यमेकोऽयमवशिष्यते स च द्व्यर्थो भवति बह्वर्थश्चेति । न वक्तव्यम् । सिद्धमेकशेष इत्येव । कथं पुनरेकोऽयमवशिष्यत इत्यनेन द्व्यर्थता बह्वर्थता वा शक्या लब्धुम् । तच्चैकशेषकृतम् ॥ न ह्यन्तरेण तद्वाचिनः शब्दस्य प्रयोगं तस्यार्थस्य गतिर्भवति । पश्यामश्च पुनरन्तरेणापि तद्वाचिनः शब्दस्य प्रयोगं तस्यार्थस्य गतिर्भवतीति अग्निचित् सोमसुदिति यथा । ते मन्यामहे लोपकृतमेतद्येनात्रान्तरेणापि तद्वाचिनः शब्दस्य प्रयोगं तस्यार्थस्य गतिर्भवतीति । एवमिहाप्येकशेषकृतमेतद्येनात्रैकोऽयमवशिष्यत इत्यनेन द्व्यर्थता बह्वर्थता वा भवति ॥ उच्येत तर्हि न तु गम्येत । यो हि गामश्व इति ब्रूयादश्वं वा गौरिति न जातु चित्संप्रत्ययः स्यात् ॥

---

यास नको.

कां बरें ?

एकाच शब्दानें अनेक अर्थ दाखविले जात असल्यामुळें त्या अर्थी मुद्दाम दुसऱ्यांदा त्याच शब्दाचा पुनः प्रयोग होणार नाहीं. कारण ज्या शब्दाचा अर्थ पूर्वी दाखविला जात असेल त्या शब्दाचा प्रयोग करूं नये असा न्याय आहे.

आतां हें एका शब्दाचें अनेकार्थत्व वचनाच्या जोरावर ध्यावयाचें असेल तर सूत्रकारांनीं येथें असें वचन करावयास पाहिजे की, सरूप अशा अनेक शब्दांमध्यें एक शब्द अवशिष्ट राहतो आणि तो शब्द दोन किंवा बहुत अशा अर्थांचें प्रतिपादन करतो.

असें वचन करावयास नको. सरूप अशा अनेक शब्दांमध्यें एक शब्द अवशिष्ट राहतो एवढ्या म्हणण्यानेंच काम भागेल.

पण एक शब्द अवशिष्ट राहतो एवढ्या म्हणण्यानेंच त्या अवशिष्ट राहिलेल्या एका शब्दापासून दोन किंवा बहुत अर्थांचा बोध कसा होऊं शकेल ?

एकशेष सांगण्यानेंच तसा बोध होईल.

पण दोन किंवा बहुत अशा अर्थांचा बोध तशा अर्थी शब्दाचा प्रयोग केल्यावांचून होणार नाहीं.

पण अशीं उदाहरणें दृष्टीस पडतात की, त्या अर्थाच्या शब्दाचा प्रयोग केल्यावांचूनही त्या अर्थाचा बोध होतो; उदा०— अग्निचित् सोमसुत्. (या ठिकाणीं प्रत्ययाचा प्रयोग नसतांनाही चयनाचा कर्ता आणि त्याचें एकत्व यांचा बोध होत आहे. त्यावरून आम्ही असें समजतों की, हा जो अग्निचित् वगैरे उदाहरणांमध्यें क्विप्प्रत्यय आणि सुप्प्रत्यय यांचा लोप झालेला आहे त्यामुळें त्यांचा प्रयोग नसूनही कर्ता आणि एकत्व या अर्थांचा बोध होतो. तसें प्रकृत ठिकाणीं एकशेष सांगितला असल्यामुळें हें अनेकार्थत्व सिद्ध होतें. या ठिकाणीं पाणिनि एक शब्द अवशिष्ट राहतो असें म्हणतो त्यावरून अर्थातच त्या शब्दाला दोन किंवा बहुत अशा अर्थांचें बोधकत्व आहे असें मानतां येईल.

तर मग एकशेष सांगा, परंतु लोकांमध्यें त्या एका शब्दापासून दोन किंवा बहुत अर्थांचा बोध मात्र होणार नाहीं.[२७] कारण असें पाहा की, लोकामध्यें एखाद्यानें घोड्यासारखा बैल असल्यामुळें त्या बैलाला घोडा असें म्हटलें किंवा बैलासारखा घोडा असल्यामुळें त्या घोड्याला बैल असें म्हटलें तरी त्या घोडा, बैल, या शब्दांपासून बैलाचा आणि घोड्याचा बोध लोकांना होत नाहीं. तेव्हां येथें एका

---

२७. कारण एकशेषाच्या जोरावर द्विवचन व बहुवचन करतां येईल. परंतु त्यापासून द्वित्वाचा व बहुत्वाचा लोकांना बोध व्हावा अशाकरितां पाणिनीनें यत्न केलेला दिसत नाहीं.

तेनानेकार्थाभिधाने यत्नं कुर्वतावश्यं लोकः पृष्ठतो ऽनुगन्तव्यः। केष्वर्थेषु लौकिकाः काञ्शब्दान्प्रयुञ्जत इति। लोके चैकस्मिन्वृक्ष इति प्रयुञ्जते द्वयोर्वृक्षाविति बहुषु वृक्षा इति। यदि तर्हि लोकोऽवश्यं शब्देषु प्रमाणं किमर्थमेकशेष आरभ्यते। अथ किमर्थं लोप आरभ्यते। प्रत्ययलक्षणमाचार्यः प्रार्थयमानो लोपमारभत एकशेषारम्भे पुनरस्य न किंचित्प्रयोजनमस्ति॥ ननु चोक्तं प्रत्यर्थं शब्दनिवेशान्नैकेनानेकस्याभिधानमिति। यदि चैकेन शब्देनानेकस्यार्थस्याभिधानं स्यान्न प्रत्यर्थं शब्दनिवेशः कृतः स्यात्।

**प्रत्यर्थं शब्दनिवेशादेकेनानेकस्याभिधानादप्रत्यर्थमिति चेत्तदपि प्रत्यर्थमेव॥३०॥**

प्रत्यर्थं शब्दनिवेशादेकेनानेकस्याभिधानादप्रत्यर्थमिति चेदेवमुच्यते। यद्प्येकेनानेकस्याभिधानं भवति तदपि प्रत्यर्थमेव। यदपि ह्यर्थावर्थौ प्रति तदपि प्रत्यर्थमेव। यदपि ह्यर्थानर्थान्प्रति तदपि प्रत्यर्थमेव॥ यावतामभिधानं तावतां

---

शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपादन होऊन त्याप्रमाणें त्यापासून लोकांना बोध झाला पाहिजे अशाविषयीं यत्न करणाऱ्या आचार्यानें कोणत्या अर्थी लोक कोणत्या शब्दाचा प्रयोग करतात तें पाहून त्यांची कांस धरली पाहिजे. लोकांमध्यें एक वृक्ष विवक्षित असेल तर वृक्षः असा प्रयोग करतात, दोन वृक्ष विवक्षित असतील तर वृक्षौ असा प्रयोग करतात आणि बहुत वृक्ष विवक्षित असतील तर वृक्षाः असा प्रयोग करतात.[२८]

पण अशा रीतीनें कोणत्या शब्दापासून कशा अर्थाचा बोध होतो याविषयीं लोकव्यवहारच जर प्रमाणभूत धरावयाचा असेल तर मग हें एकशेष सांगणारें सूत्र आचार्यांनें कशाकरितां केलें?

हें एकशेषसूत्र कशाकरितां केलें असें म्हणतां तसाच अग्निचित् वगैरे उदाहरणांमध्यें क्विप्प्रत्यय आणि सुप्प्रत्यय यांचा जो लोप सांगितला आहे तो देखील कशाकरितां सांगितला आहे?

क्विप्प्रत्यय आणि सुप्प्रत्यय ह्यांच्या निमित्तानें कार्यें झालीं पाहिजेत म्हणून त्या ठिकाणीं त्या प्रत्ययांची कल्पना करून त्यांचा लोप सांगितला आहे. पण तसा येथें एकशेष सांगण्यांत कांहींच उपयोग दिसत नाहीं.

पण आतांच सांगितलें आहे ना की, प्रत्येक अर्थी शब्दाचा प्रयोग होत असतो म्हणून एका शब्दानें अनेक अर्थ दाखविले जाणार नाहींत. (त्याकरितां एकशेष सांगितला पाहिजे.) जर एक शब्दानें अनेकार्थ दाखविले जात असतील तर त्या ठिकाणीं तो शब्दाचा प्रयोग प्रत्यर्थ आहे असें म्हणतां येणार नाहीं.

(वा.३०)प्रत्येक वस्तूला दाखविण्याकरतां निरनिराळ्या शब्दांचा प्रयोग केला जातो म्हणून 'एका शब्दानें अनेक अर्थ दाखविले जातात' असें गृहीत धरलें तर त्या ठिकाणीं प्रत्येक वस्तूला दाखविणारा निरनिराळा शब्द नाहीं' असें होईल. असें म्हणाल तर त्यावर आमचें म्हणणें असें कीं, एका शब्दानें जें अनेक अर्थ दाखविणें तेंही प्रत्यर्थच होय. म्हणजे एका शब्दानें सजातीय असे दोन दोन अर्थ दाखविणें तेंही प्रत्यर्थच होय. तसेंच एका शब्दानें सजातीय असे बहुत अर्थ दाखविणें तेंही प्रत्यर्थच होय.[२९]

परंतु जितक्या वस्तु दाखवावयाच्या अस-

---

२८. या लोकव्यवहारावरून एका शब्दाला अनेकार्थप्रतिपादकत्व स्वभावसिद्धच असलेलें आचार्यांनें एकशेषाच्या द्वारानें युक्तीनें जुळवून दाखविलें आहे. तेव्हां एका शब्दाला अनेकार्थता नुसती मानावयाची इतकेंच नव्हे तर ती वस्तुतःच आहे असें समजावें.

२९. 'एक अर्थ दाखवावयाचा असतां एकच शब्द घालणें' असा 'प्रत्यर्थं शब्दनिवेशः' याचा अर्थ समजूं नये तर 'जो शब्द जितके अर्थ दाखवितो तितक्या अर्थाबद्दल एक शब्द घालणें' असा 'प्रत्यर्थ-'

प्रयोगो न्याय्यः। यावतामर्थानामभिधानं भवति तावतां शब्दानां प्रयोग इत्येष पक्षो न्याय्यः।

**यावतामभिधानं तावतां प्रयोगो न्याय्य इति चेदेकेनाप्यनेकस्याभिधानम् ॥३१॥**

यावतामभिधानं तावतां प्रयोगो न्याय्य इति चेदेवमुच्यते। एषोऽपि न्याय्य एव यदप्येकेनानेकस्याभिधानं भवति ॥ यदि तर्ह्येकेनानेकस्याभिधानं भवति प्लक्षन्यग्रोधौ एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्नः। एकेनोक्तत्वात्तस्यार्थस्यापरस्य प्रयोगेण न भवितव्यम्। किं कारणम्। उक्तार्थानामप्रयोग इति।

**एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्न इति चेदनुक्तत्वात्प्लक्षेण न्यग्रोधस्य न्यग्रोधप्रयोगः ॥३२॥**

एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्न इति चेदनुक्तः प्लक्षेण न्यग्रोधार्थ इति कृत्वा न्यग्रोधशब्दः प्रयुज्यते। कथमनुक्तो यावतेदानीमेवोक्तमेकेनाप्यनेकस्याभिधानं भवतीति। सरूपाणामेकेनाप्यनेकस्याभिधानं भवति न विरूपाणाम् ॥ किं पुनः कारणं सरूपाणामेकेनाप्यने-

---

तील तितक्या शब्दांचा प्रयोग करणें हाच पक्ष न्याय्य दिसतो.[३०]

(वा.३१) जितके अर्थ दाखवावयाचे असतील तितक्या शब्दांचा प्रयोग करणें हाच पक्ष न्याय्य आहे असें म्हणाल तर त्यावर आमचें म्हणणें असें आहे की, एका शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपादन करणें हा देखील पक्ष न्याय्यच[३१] आहे.

जर एका शब्दानें अनेकार्थांचें प्रतिपादन केलें जाईल तर प्लक्षन्यग्रोधौ या उदाहरणामध्यें एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्नः एका शब्दानें म्हणजे प्लक्ष या शब्दानें प्लक्ष आणि न्यग्रोध या दोन्ही अर्थांचें प्रतिपादन होत असल्यामुळें तेथें दुसऱ्या पदाचा म्हणजे न्यग्रोध या पदाचा प्रयोग होणार नाहीं.

कां बरें ?

'ज्या पदाचा अर्थ दुसऱ्या पदानें दाखविला जातो त्याचा पुनः प्रयोग करूं नये, असा न्याय आहे.

(वा.३२) 'एका शब्दानें प्लक्ष आणि न्यग्रोध हे दोन्ही अर्थ दाखविले जात असल्यामुळें तेथें दुसऱ्या म्हणजे न्यग्रोध या पदाचा केलेला प्रयोग बरोबर नाहीं' असें म्हणाल तर त्यावर आम्ही असें म्हणतों की, न्यग्रोध हा अर्थ प्लक्ष या शब्दानें दाखविला जात नाहीं म्हणून तेथें न्यग्रोध हा शब्द उच्चारला आहे तो बरोबरच आहे.

प्लक्ष या शब्दानें न्यग्रोध हा अर्थ दाखविला जात नाहीं असें कसें म्हणतां येतें ? कारण एका शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपादन केलें जातें असें आतांच तुम्हीं सांगितलें आहे.

सांगितलें आहे खरें, पण जे शब्द सरूप असतील तेथें एका शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपान होतें. प्लक्ष, न्यग्रोध, अशा तऱ्हेचे जे

---

त्याचा अर्थ होय. तात्पर्य असें की, एका शब्दानें एक अर्थ दाखविणें याचें आम्ही खंडन करीत नाहीं. तर तें कायम असून सहविवक्षा (अनेक अर्थांचा एकाकालीं एका पदार्थाशीं एका तऱ्हेनें संबंध कळवावयाचा) असतां एक शब्द अनेक अर्थांचा देखील दर्शक होतो. तेव्हां एका शब्दाला व्यर्थता किंवा बह्वर्थप्रतिपादकता ही मूळचीच असल्यामुळें एकशेष सूत्र करावयास नको.

३०. कारण वृक्षश्च वृक्षश्च असें अनेक अर्थ दाखविण्याकरतां अनेक शब्दघटित वाक्य लोकामध्यें वापरलेलें दृष्टीस पडतें.

३१. कारण लोकामध्यें वृक्षौ असाही प्रयोग दृष्टीस पडत असल्यामुळें एक शब्द अनेक अर्थांचाही प्रतिपादक होत आहे.

कस्याभिधानं भवति न पुनर्विरूपाणाम्।

**अभिधानं पुनः स्वाभाविकम् ॥३३॥**

स्वाभाविकमभिधानम् ॥

**उभयदर्शनाच्च ॥३४॥**

उभयं खल्वपि दृश्यते। विरूपाणामप्येकेनानेकस्याभिधानं भवति। तद्यथा। द्यावा ह क्षामा। द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते इति। विरूपाणां किल नामैकेनानेकस्याभिधानं स्यात्किं पुनः सरूपाणाम् ॥

**आकृत्यभिधानाद्वैकं विभक्तौ वाजप्यायनः ॥३५॥**

आकृत्यभिधानाद्वैकं शब्दं विभक्तौ वाजप्यायन आचार्यो न्याय्यं मन्यते। एकाकृतिः सा चाभिधीयत इति ॥ कथं पुनर्ज्ञायत एकाकृतिः सा चाभिधीयत इति।

**प्रख्याविशेषात् ॥३६॥**

न हि गौरित्युक्ते विशेषः प्रख्यायते शुक्ला नीला कपिला कपोतिकेति ॥ यद्यपि

---

विरूप शब्द तेथें एकच शब्द उच्चारून काम भागत[३२] नाहीं.

पण सरूप शब्दामध्येंच एकानें अनेक अर्थांचें प्रतिपादन होतें तसें विरूप शब्दामध्यें होत नाहीं असें जें म्हणतां त्याचें काय बरें कारण आहे?

(वा.३३) शब्दामध्यें जी अर्थ दाखविण्याची शक्ति आहे ती स्वाभाविकच आहे. तेव्हां त्यासंबंधानें कांहीं प्रश्न करतां येत नाहीं.

(वा.३४) पण लोकांमध्यें दोन्ही तऱ्हा दृष्टीस पडतात. विरूपशब्दामध्यें देखील एका शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपादन केलेलें दृष्टीस पडतें; उदा०— द्यावा ह क्षामा[३३]; द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते. (येथें द्यावा या एकाच दिव् शब्दानें द्युलोक आणि पृथिवीलोक या दोन अर्थांचें प्रतिपादन केलें आहे.)

एकंदरींत विरूपशब्द असतांना देखील जर एका शब्दानें अनेक अर्थांचें प्रतिपादन होत आहे तर सरूपशब्दामध्यें अनेक अर्थांचें प्रतिपादन होईल यांत काय आश्चर्य आहे?

(वा.३५) अथवा शब्द हा जातीचा वाचक आहे आणि जाति एकच आहे त्यामुळें व्यक्ति कितीही दाखवावयाच्या असल्या तरी एकाच शब्दाचा प्रयोग विभक्ति पुढें असतांना होतो, हेंच बरोबर आहे असें वाजप्यायन आचार्य मानतो. जाति एक आहे आणि ती शब्दानें प्रतिपादन केली जाते.

जाति एक आहे आणि तीच शब्दानें प्रतिपादन केली जाते असें कशावरून समजावें?

(वा.३६) व्यक्ति अनेक असल्या तरी त्या सर्व व्यक्तींच्या ठिकाणीं बुद्धि एका प्रकारची सारखीच असते. असें पाहा की गौः असें म्हटलें असतां कांहीं विशेष म्हणजे ती काळी, पारवी, वगैरे कोणताही विशेष मनांत येत नाहीं.

पण अशा रीतीनें बुद्धि एक प्रकारची सर्वत्र सारखीच होत असल्यामुळें अनेक व्यक्तींवर जाति एक आहे इतकेंच सिद्ध

---

३२. प्लक्षौ असें उच्चारले असतां तेथें दोन पदार्थ प्रतीत होतात. पैकीं एक प्लक्ष स्पष्ट उच्चारलाच आहे. दुसरा मात्र कोण असावा असा विचार चालू झाला असतां सजातीयत्वामुळें शीघ्र मनांत येणारा असा दुसरा प्लक्षच असावा असें ठरतें. त्यावरून सरूप असा एक शब्द अनेक अर्थांचें प्रतिपादन करतो. पण विरूप असा एक शब्द अनेक अर्थांचें प्रतिपादन करूं शकत नाहीं, असें सिद्ध होतें.

३३. द्यावा येथीलप्रमाणें प्लक्षौ येथें मात्र विजातीय अनेक अर्थांचें अभिधान होत नाहीं. कारण शब्दशक्ति ही स्वभावाला अनुसरून अर्थ दाखवीत असते. म्हणजे लोकांमध्यें जेथें जसा अर्थबोध अनुभवांत येतो तेथें त्याच स्वभावाची शब्दशक्ति आहे असें समजावें.

तावत्प्रख्याविशेषाज्ज्ञायत एकाकृतिरिति कुतस्त्वेतत्साभिधीयत इति ।

**अव्यपवर्गगतेश्च ॥३७॥**

अव्यपवर्गगतेश्च मन्यामह आकृतिरभिधीयत इति । न हि गौरित्युक्ते व्यपवर्गो गम्यते शुक्ला नीला कपिला कपोतिकेति ॥

**ज्ञायते चैकोपदिष्टम् ॥३८॥**

ज्ञायते खल्वप्येकोपदिष्टम् । गौरस्य कदाचिदुपदिष्टो भवति । स तमन्यस्मिन्देशेऽन्यस्मिन्कालेऽन्यस्यां च वयोऽवस्थायां दृष्ट्वा जानात्ययं गौरिति ॥ कः पुनरस्य विशेषः प्रख्याविशेषादित्यतः । तस्यैवोपोद्बलकमेतत् । प्रख्याविशेषाज्ज्ञायते चैकोपदिष्टमिति ॥

**धर्मशास्त्रं च तथा ॥३९॥**

एवं च कृत्वा धर्मशास्त्रं प्रवृत्तम् । ब्राह्मणो न हन्तव्यः सुरा न पेयेति ब्राह्मणमात्रं न हन्यते सुरामात्रं च न पीयते । यदि द्रव्यं पदार्थः स्यादेकं ब्राह्मणमहत्वैकां च सुरामपीत्वान्यत्र कामचारः स्यात् ॥ कः पुनरस्य विशेषोऽव्यपवर्गगतेश्चेत्यतः । तस्यैवोपोद्बलकमेतत् । अव्यपवर्गगतेश्च धर्मशास्त्रं च

---

होईल. पण ती एक जाति शब्दानें प्रतिपादन केली जाते असें कशावरून समजावें ?

(वा.३७) अवांतर विशेषाचा शब्दापासून बोध होत नाहीं त्यावरून ती एक जाति शब्दानें प्रतिपादन केली जाते असें आम्ही म्हणतों. असें पहा की, लोकामध्यें गौः असा शब्द उच्चारला असतां त्यापासून श्रोत्याला ती गाय काळी, निळी, पांढरी, असा कांहीं विशेष बोध होत नाहीं.

(वा.३८) शिवाय एकदा उपदेश केल्यानें सर्वांचें ज्ञान होतें. एखादे वेळीं हा बैल आहे असें एकादा बैल पुढें करून सांगितलें असतां तो मनुष्य कोणत्याही ठिकाणीं, कोणत्याही वेळीं, कोणत्याही अवस्थेमध्यें असलेला कोणताही बैल पाहून हा बैल आहे असें समजतो.

पूर्वी जाति एक असण्याचें जें कारण दाखविलें की, बुद्धि सारखीच आहे म्हणून, त्यापेक्षां एकदाच उपदेश केल्यानें सर्वत्र ज्ञान होतें असा जो हेतु दिला आहे त्यामध्यें फरक काय ?

हे दोन हेतु भिन्न आहेत असें समजूं नये. एकदा उपदेश केला असतां अशा प्रकारचा आतां जो उपदेश दिला आहे तो बुद्धि सारखीच होते या वर दिलेल्या हेतूच्या दृढीकरणार्थच दिलेला आहे. म्हणजे एकंदर तात्पर्य असें समजावें की, बुद्धीमध्यें कांहीं फरक होत नाहीं म्हणून एक ठिकाणीं उपदेश केला असतांना काम भागतें. यावरून जाति ही एक आहे असें सिद्ध होतें.

(पा.३९) त्या एका जातीचें शब्दानें प्रतिपादन केलें जातें असें गृहीत धरूनच 'ब्राह्मण मारूं नये', 'दारू पिऊं नये' हें धर्मशास्त्र प्रवृत्त झालें आहे. म्हणजे याचें तात्पर्य असें की, ब्राह्मणजातीच्या कोणत्याही ब्राह्मणाला मारूं नये. तसेंच कोणत्याही प्रकारची दारू पिऊं नये. जर शब्दानें जातीचें प्रतिपादन न करतां व्यक्तीचें प्रतिपादन केलें जाईल तर एका ब्राह्मणव्यक्तीला न मारून व एक तऱ्हेची दारू न पिऊन धर्मशास्त्र संभाळलें असें होईल. आणि इतर व्यक्तींविषयीं त्याला यथेच्छ वर्तन करावयास सांपडेल.

अवांतर विशेषाचा शब्दांपासून बोध होत नाही असें जें शब्दाचा अर्थ जाति घेण्याविषयीं कारण दाखविलें त्यापेक्षां हीं धर्मशास्त्रांतील उदाहरणें दाखवून निराळें काय शिकविलें ?

निराळें कांहीं सिद्ध केलें नाहीं. त्याच्याच दृढीकरणार्थ हें सांगितलें आहे. म्हणजे एकंदर तात्पर्य असें समजावें कीं, अवान्तर विशे-

तथेति ॥

**अस्ति चैकमनेकाधिकरणस्थं युगपत्**

अस्ति खल्वप्येकमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभ्यते । किम् । आदित्यः । तद्यथा । एक आदित्योऽनेकाधिकरणस्थो युगपदुपलभ्यते ॥ विषम उपन्यासः । नैको द्रष्टादित्यमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभते ॥ एवं तर्हि

**इतीन्द्रवद्विषयः ॥४०॥**

तद्यथा । एक इन्द्रोऽनेकस्मिन्क्रतुशत आहूतो युगपत्सर्वत्र भवति । एवमाकृतिरपि युगपत्सर्वत्र भविष्यति ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयमेकमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभ्यत इति ।

**नैकमनेकाधिकरणस्थं युगपदिति चेत्तथैकशेषे ॥४१॥**

यो हि मन्यते नैकमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभ्यत इत्येकशेषे तस्य दोषः स्यात् । एकशेषेऽपि नैको वृक्षशब्दोऽनेकमर्थं युगपदभिदधीत ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयमाकृतिरभिधीयत इति ।

**द्रव्याभिधाने ह्याकृत्यसंप्रत्ययः॥४२॥**

द्रव्याभिधाने सत्याकृतेरसंप्रत्ययः स्यात् ॥ तत्र को दोषः ।

**तत्रासर्वद्रव्यगतिः ॥४३॥**

तत्रासर्वद्रव्यगतिः प्राप्नोति । असर्व-

---

षाचा शब्दापासून बोध होत नाहीं म्हणून हें धर्मशास्त्र बरोबर जुळतें.

अनेक व्यक्तींवर एक जाति असें सिद्ध केलें खरें, पण अशा तऱ्हेचा कोणताही एक पदार्थ एकदम अनेक ठिकाणीं असणारा इतर ठिकाणीं कोठेंही दृष्टीस पडत आहे काय ?

होय. तसा दृष्टोत्पत्तीस येत आहे.

तो कोणता ?

सूर्य हा तसा पदार्थ होय. असें पाहा की, अनेक देशांमध्यें एकच सूर्य एकदम उपलब्ध होतो.

पण हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण एकच पाहणारा माणूस एका सूर्याला एकदम अनेक ठिकाणीं पाहूं शकत नाहीं.

तर मग आम्ही येथें दुसरा दृष्टान्त दाखवितों.

(वा.४०) तो असा की, अनेक यज्ञांमध्यें अनेक यजमानांनीं आव्हान केलेला एकच इन्द्र एकदम सर्व ठिकाणीं प्रादुर्भूत होतो त्याप्रमाणें ही एकच जाति अनेक व्यक्तींशीं संबंध पावूं शकेल. एकाच पदार्थाचा एकदम अनेकांशीं संबंध होतो असें अवश्य मानलेंच पाहिजे.

(वा.४१) कारण जो असें मानतो की, एका पदार्थाचा एकदम अनेकांशीं संबंध होत नाहीं. त्याच्या मतीं हें प्रकृत एकशेष सांगणारें सूत्र केलें तरी दोष येतो. अनेक शब्दांमध्यें एक शब्द अवशिष्ट म्हणून ठेवला तरी तो वृक्ष वगैरे शब्द एकच असल्यामुळें तो एकदम अनेक वृक्षांचें प्रतिपादन कसें करूं शकेल ?

तसेंच शब्दानें जातीचें प्रतिपादन केलें जातें हेंही पण अवश्य मानलेंच पाहिजे.

(वा.४२) जर शब्दानें व्यक्तीचें प्रतिपादन केलें तर तेथें जातीचा बोध होणार नाहीं.

जातीचा बोध झाला नाहीं तर काय दोष येईल ?

(वा.४३) जातीचा बोध झाला नाहीं तर शब्दापासून सगळ्या व्यक्तींचा बोध न होतां कोणत्या तरी एका व्यक्तीचा बोध होईल.

अशा रीतीने कोणत्या तरी एका व्यक्तीचा बोध झाला असतां दोष काय येतो ?

दोष असा की 'यज्ञामध्यें गोपशूचें अनुबन्धन करावें व अग्नि आणि सोम या देव-

द्रव्यगतौ को दोषः । गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति । एकः शास्त्रोक्तं कुर्वीतापरोऽशास्त्रोक्तम् । अशास्त्रोक्ते च क्रियमाणे विगुणं कर्म भवति विगुणे च कर्मणि फलानवाप्तिः ॥ ननु च यस्याप्याकृतिः पदार्थस्तस्यापि यद्यनवयवेन चोद्यते न चानुबध्यते विगुणं कर्म भवति विगुणे च कर्मणि फलानवाप्तिः । एकाकृतिरिति च प्रतिज्ञा हीयेत । यच्चास्य पक्षस्योपादाने प्रयोजनमेकशेषो न वक्तव्य इति स चेदानीं वक्तव्यो भवति । एवं तर्ह्यनवयवेन चोद्यते प्रत्येकं च परिसमाप्यते यथादित्यः । ननु च यस्यापि द्रव्यं पदार्थस्तस्याप्यनवयवेन चोद्यते प्रत्येकं

तांना उद्देशून अजपशु द्यावा' असें म्हटलें असतां त्या ठिकाणीं गो आणि अज या पदांचा जी एक गोव्यक्ति आणि जी एक अजव्यक्ति अर्थ म्हणून गृहीत धरली जाईल तीच गोव्यक्ति आणि तीच अजव्यक्ति आणली असतां तें कर्म सशास्त्र झालें असें होईल, दुसरी गोव्यक्ति आणि दुसरी अजव्यक्ति आणली असतां तें कर्म सशास्त्र होणार नाहीं, आणि सशास्त्र कर्म झालें नसल्यामुळें कर्मामध्यें वैगुण्य उत्पन्न होईल; आणि अशा रीतीनें कर्मामध्यें वैगुण्य उत्पन्न झालें असतां यज्ञ करणाऱ्याला त्या यजाचें फळ मिळणार नाहीं.

पण ज्याच्या मतीं जाति हा शब्दाचा अर्थ आहे त्याच्या मतीं देखील गोपशूचें अनुबंधन करावें वगैरे विधि हे त्या जातीच्या सगळ्या व्यक्तींसंबंधानें लागू पडतील. आणि सगळ्या व्यक्तींचें तर तेथें अनुबंधन करतां येणार नाहीं, त्यामुळें कर्मामध्यें वैगुण्य उत्पन्न होईल. आणि कर्मामध्यें वैगुण्य उत्पन्न झालें असतां यज्ञ करणाऱ्याला फळ मिळणार नाहीं असा दोष येतोच. शिवाय जाति एक आहे ही प्रतिज्ञा सोडावी लागेल. (म्हणजे जर जाति ही प्रत्येक व्यक्तीवर निरनिराळी राहते असें मानून एकही व्यक्तीचें अनुबंधन केलें असतांही तें कर्म विगुण होत नाहीं असें म्हटलें तर अर्थातच जाति एक आहे या प्रतिज्ञेचा भङ्ग होणार आहे.) शिवाय जातिपक्ष घेण्याचा उपयोग म्हणून हें एकशेषसूत्र करावयास नको असें जें पूर्वी म्हटलें होतें तेंही आतां बरोबर जुळणार नाहीं. कारण प्रत्येक व्यक्तीवर जाति निरनिराळी राहते असें मानलें असतां अर्थातच एकशेषसूत्र करावें लागणार आहे.

तर मग अनेक गोव्यक्तींवर गोत्व ही जाति एकच आहे. तेव्हां गोचें (गाईचें) अनुबंधन करावें हा विधि सर्व व्यक्तींना धरून जरी होणार आहे तरी ती गोत्वजाति प्रत्येक व्यक्तीवर पूर्णपणें राहत आहे. सूर्याप्रमाणेंच हें होय. तेव्हां अर्थातच गोचें अनुबन्धन करावें हा विधि एक गोव्यक्तीचें अनुबन्धन केलें तरी उपपन्न होतो.

अशा तऱ्हेनें जातिपक्ष घेऊन समाधान केलें तर व्यक्ति हाच शब्दाचा अर्थ आहे अशा रीतीनें व्यक्तिपक्ष घेणाऱ्याच्या मतीं देखील दोष येत नाहीं. कारण गोचें अनुबन्धन करावें हा विधि सर्व व्यक्तींना अनुसरून आहे तरी विधीची पूर्णता कोणतीही एक गोव्यक्ति घेतली असतां होऊं शकेल.

पण अशा रीतीनें या दोषाचें निवारण झालें तरी व्यक्तिपक्ष घेतला असतांना तुला एकशेषसूत्र[३५] करावें लागेल हा दोष येत आहेच. जातिपक्ष घेतला असतां एकशेषसूत्र केलें होतें.

३४. सूर्य हा एक आहे तरी अनेक देशांमध्यें सर्वांशानें परिपूर्ण दृष्टीस पडतो. तशी जाति ही एक आहे तरी देखील प्रत्येक गोव्यक्तीवरती परिपूर्ण रहात आहे. तेव्हां एका व्यक्तीचें ठिकाणीं अनुबन्धनक्रियेचें अनुष्ठान केलें तरी तें जातीचें ठिकाणीं केलेंसें

३५. 'व्यक्तिः पदार्थः' या पक्षीं व्यक्ति ह्या अनेक असल्यामुळें अनेक व्यक्ति दाखविण्याकरितां अनेक शब्द घालणें अवश्यप्राप्त होतें. तेव्हां इतरांच्या निवृत्तीकरितां एकशेष सांगितला पाहिजे.

च परिसमाप्यते । एकशेषस्त्वया वक्तव्यः। त्वयापि तर्हि द्विवचनबहुवचनानि साध्यानि ॥

**चोदनायां चैकस्योपाधिवृत्तेः ॥४४॥**

चोदनायां चैकस्योपाधिवृत्तेर्मन्यामह आकृतिरभिधीयत इति । आग्नेयमष्टाकपालं निर्वपेत्। एकं निरुप्य द्वितीयस्तृतीयश्च निरुप्यते। यदि च द्रव्यं पदार्थः स्यादेकं निरुप्य द्वितीयस्य तृतीयस्य च निर्वपणं न प्रकल्पेत ॥ कः पुनरेतयोर्जातिचोदनयोर्विशेषः। एका निर्वृत्तेनापरा निर्वर्त्येन ॥

**द्रव्याभिधानं व्याडिः ॥४५॥**

द्रव्याभिधानं व्याडिराचार्यो न्याय्यं मन्यते। द्रव्यमभिधीयत इति ॥

**तथा च लिङ्गवचनसिद्धिः ॥४६॥**

एवं च कृत्वा लिङ्गवचनानि सिद्धानि

---

नसतांही जरी काम भागतें तरी जाति एक असल्यामुळें जातिवाचक शब्दाच्या पुढें द्विवचन किंवा बहुवचनप्रत्यय उत्पन्न होणार नाहीं त्याची तुला कांहीं तरी वाट लावावी लागेल.

(वा.४४) विधिवाक्यामध्यें निर्दिष्ट जे धर्म ते अनेकावर राहू शकतात म्हणून शब्दानें जातीचें प्रतिपादन केलें जातें असेंच आम्ही मानतों. असें पाहा की, अग्निदेवतेला उद्देशून आठ कपालामध्यें संस्कार केलेल्या द्रव्याचा निर्वाप करावा असें म्हटलें असतां तेथें यज्ञ करणाऱ्याला तशा तऱ्हेनें एकदा निवाप करून पुनः दुसऱ्यांदा आणि तिसऱ्यांदाही निर्वाप करतां येतो, पण 'व्यक्ति हा पदाचा अर्थ आहे' अशा रीतीनें जर व्यक्तिपक्ष घेतला तर मात्र एकाच व्यक्तीचा निर्वाप केला असतांना पुनः दुसऱ्यांदा आणि तिसऱ्यांदा त्याला निर्वाप करतां येणार नाहीं.[३६]

पूर्वी (वा.४३) व्यक्तिपक्ष घेतला असतांना 'गोचें अनुबन्धन करावें' हा विधि कोणत्या तरी एकाच गोव्यक्तीला अनुलक्षून लागू पडेल. त्या कामीं इतर गोव्यक्तींचा उपयोग करतां नाहीं असा व्यक्तिपक्षावर दोष दिला आहे आणि आतांही 'चोदनायाम्' ह्या प्रकृत वार्तिकानें तशा तऱ्हेचाच दोष दाखविला जात आहे. तेव्हां या दोन वार्तिकांचा निरनिराळा अभिप्राय काय समजावा?

दोहोंमध्यें फरक इतकाच की, गोचें अनुबंधन करावें हा विधि पूर्वी सिद्ध असलेलाच फक्त पशु यज्ञाचें साधन म्हणून गृहीत धरला जातो. आणि प्रकृतस्थलीं यज्ञाकरितां जें हव्य द्रव्य घ्यावयाचें तें पूर्वी सिद्ध नाहीं तर तें एक विशेष प्रकारचा संस्कार करून तयार करावयाचें आहे. त्यामुळें सिद्ध असलेला पशु वाटेल तो आरंभाला घेतां येईल. परंतु साध्य वस्तु मात्र जी एक संस्कार करून तयार केलेली असेल ती घेतली असतां तेथें दुसरी घेतां येणार नाहीं.

(वा.४५) शब्द हा द्रव्याचें प्रतिपादन करतो हेंच न्याय्य आहे असें आचार्य व्याडि मानतो. म्हणजे शब्दाचा अर्थ व्यक्ति हाच आहे; जाति नव्हे.

(वा.४६) आणि शब्दाचा अर्थ व्यक्ति हा मानला म्हणजेच ब्राह्मणी ब्राह्मणः, ब्राह्मणौ ब्राह्मणाः, या उदाहरणांमध्यें स्त्रीलिंग आणि पुंलिंग तसेंच द्विवचन आणि बहु-

---

३६. जातिः पदार्थः, या जातिपक्षीं आग्नेय शब्दानें अग्निदेवताक हविर्द्रव्यावरील जातीचें प्रतिपादन केलें जातें. त्या अमूर्त जातीला निर्वाप वगैरे संस्कार संभवत नसल्यामुळें ते संस्कार त्या जातीचा आश्रय अशा द्रव्याच्या द्वारानेंच घडवून आणावे लागतात. तेव्हां तीं द्रव्यें अनेक असल्यामुळें वारंवार [illegible] व्यक्तिपक्षीं आग्नेय शब्दानें कोणत्या तरी एका अग्निदेवताक हविर्द्रव्याचें प्रतिपादन केलें जातें. तेव्हां जें एक हविर्द्रव्य आग्नेयपदानें घेतलें असेल त्याचाच तेवढा एकदा निर्वाप करतां येईल. दुसऱ्या तिसऱ्या वेळीं घेतलें जाणारें हविर्द्रव्य हें आग्नेय पदाचा अर्थ होत नसल्यामुळें त्याचा निर्वाप करतां येणार नाहीं.

भवन्ति । ब्राह्मणी ब्राह्मणः ब्राह्मणौ ब्राह्मणा इति ॥

## चोदनासु च तस्यारम्भात् ॥४७॥

चोदनासु च तस्यारम्भान्मन्यामहे द्रव्यमभिधीयत इति । गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति । आकृतौ चोदितायां द्रव्य आरम्भणालम्भनप्रोक्षणविशसनादीनि क्रियन्ते ॥

## न चैकमनेकाधिकारणस्थं युगपत् ॥४८॥

न खल्वप्येकमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभ्यते । नं ह्येको देवदत्तो युगपत्स्रुघ्ने भवति मथुरायां च ॥

## विनाशे प्रादुर्भावे च सर्वं तथा स्यात् ॥४९॥

किम् । विनश्येच्च प्रादुःष्याच्च । श्वा मृत इति श्वा नाम लोके न प्रचरेत् । गौर्जात इति सर्वं गोभूतमनवकाशं स्यात् ॥

## अस्ति च वैरूप्यम् ॥५०॥

अस्ति खल्वपि वैरूप्यम् । गौश्च गौश्च खण्डो मुण्ड इति ॥

## तथा च विग्रहः ॥५१॥

एवं च कृत्वा विग्रह उपपन्नो भवति ।

---

वचन जें भासतें तें बरोबर जुळतें.

(वा.४७) गोचें अनुबंधन करावें, अग्नि आणि सोम या देवतांना उद्देशून अजपशु द्यावा, इत्यादि विधिवाक्यांमध्यें व्यक्तिच गृहीत धरावी लागत असल्यामुळें शब्दाचा अर्थ व्यक्ति हाच आहे असें आम्ही मानतों. आतां 'शब्दाचा अर्थ जाति आहे' असा पक्ष घेतला तर हे विधि जातीला उद्देशून सांगितले आहेत असें म्हणावें लागेल. आणि वस्तुतः पाहिलें तर या विधीवरून केल्या जाणाऱ्या आरम्भण, आलम्भन, प्रोक्षण, विशसन, वगैरे क्रिया व्यक्तीच्या ठिकाणींच केल्या जातात. तेव्हां जातिपक्ष घेतला असतां तें करणें अयोग्य आहे असें म्हणावें लागेल.

(वा.४८) शिवाय एकच पदार्थ एकदम अनेक ठिकाणीं खरोखरच असूं शकत नाहीं. असें पाहा की लोकांमध्यें एकच वस्तु एकदम अनेक ठिकाणीं दृष्टीस पडत नाहीं. देवदत्त नांवाचा एकच माणूस स्रुघ्न देशामध्यें आणि मथुरेमध्यें एकदम असूं शकत नाहीं.[३७]

(वा.४९) शिवाय उत्पत्ति आणि नाश झाला असतांना जाति एक असल्यामुळें त्या जातीच्या सर्व पदार्थांची एकदम उत्पत्ति होते आणि एकदम नाश होतो असें म्हणावें लागेल. कुत्रा मेला असें म्हटलें असतां इतर ठिकाणीं कोठेंही कुत्र्याचा संसार झालेला दृष्टीस पडूं नये. तसेंच खोंड झाला असें म्हटलें असतां सर्व खोंडानीं सर्व जग भरून जाईल.[३८]

(वा.५०) शिवाय एकाच जातीच्या अनेक व्यक्तींमध्यें अनेक तऱ्हा दृष्टीस पडतात, एखादा बैल खंड असतो व एखादा बैल मुंड असतो असें दृष्टीस पडतें.

(वा.५१) आणि व्यक्ति हा शब्दाचा अर्थ आहे असें गृहीत धरलें म्हणजे गौश्च गौश्च असा जो लोकांमध्यें विग्रह केला जातो तोही बरोबर[३९] जुळतो.

---

३७. तेव्हां जाति ही एकच असली तरी ती एकदम अनेक ठिकाणीं राहूं शकेल हें म्हणणें लोकविरुद्ध दिसते.

३८. जाति ही सर्वांवर मिळून एक आहे व तिला अभिव्यञ्जक (प्रकाशक) तिचा आश्रय असतो. म्ह. सर्व आश्रय व्यक्तींनीं मिळून तिचा प्रकाश केला जातो. तेव्हां त्यापैकीं एक व्यक्ति नष्ट होण्याबरोबर तिची अभिव्यक्ति बंद पडली पाहिजे. तसेंच एक गोव्यक्ति उत्पन्न होण्याबरोबर गोत्वजाति ही उत्पन्न झाली, असें होईल आणि ती सर्व व्यक्तीवर एक असल्यामुळें सर्व व्यक्तींकडून प्रकाशित झाली पाहिजे, तेव्हां त्या गोत्व जातीचें प्रकाशन होण्याकरितां अतीत अनागत आणि वर्तमान अशा अनंत गोव्यक्ति तेथें असल्या पाहिजेत; तेव्हां अर्थातच गोव्यक्तींनीं सर्व जग भरून जाईल.

३९. जाति ही एक आहे, आणि ती एका

गौश्च गौश्चेति ॥

**व्यर्थेषु च मुक्तसंशयम् ॥५२॥**

व्यर्थेषु च मुक्तसंशयं भवति । आकृतावपि पदार्थ एकशेषो वक्तव्यः । अक्षाः पादाः माषा इति ॥

**लिङ्गवचनसिद्धिर्गुणस्यानित्यत्वात् ॥५३॥**

लिङ्गवचनानि सिद्धानि भवन्ति । कुतः । गुणस्यानित्यत्वात् । अनित्या गुणा अपायिन उपायिनश्च । किं य एते शुक्लादयः । नेत्याह । स्त्रीपुंनपुंसकानि सत्त्वगुणा एकत्वद्वित्वबहुत्वानि च । कदाचिदाकृतिरेकत्वेन युज्यते कदाचिद्द्वित्वेन कदाचिद्बहुत्वेन कदाचित्स्त्रीत्वेन कदाचित्पुंस्त्वेन कदाचिन्नपुंसकत्वेन ॥ भवेल्लिङ्गपरिहार उपपन्नो वचनपरिहारस्तु नोपपद्यते । यदि हि कदाचिदाकृतिरेकत्वेन युज्यते कदाचिद्द्वित्वेन कदाचिद्बहुत्वेनैकाकृतिरिति प्रतिज्ञा हीयेत यच्चास्य पक्षस्योपादाने प्रयोजनमुक्त-

(वा.५२) शिवाय नानार्थ शब्दाच्या संबंधानें विचार केला तर संशयच मुळीं येत नाहीं, म्हणजे जातिपक्ष घेतला तरी एकशेष सांगणारें सूत्र केलेंच [४०] पाहिजे; उदा०— अक्षाः, पादाः, माषाः.

(आतां येथून जातिपक्ष मानणारा हे सर्व दोष दूर करीत आहे.)

(वा.५३) शब्दाचा अर्थ जाति आहे असें मानलें असतांही ब्राह्मणी ब्राह्मणौ ब्राह्मणाः या उदाहरणांमध्यें लिङ्ग आणि वचन यांची उपपत्ति करतां येते.

ती उपपत्ति कशी ?

ती उपपत्ति अशी की, गुण अनित्य आहेत म्हणून; म्हणजे गुण हे उत्पन्न होणारे आणि विनाश पावणारे असे अनित्य आहेत.

गुण अनित्य आहेत असें जें म्हणतां तेथें गुण म्हणजे तांबडा, पांढरा, वगैरे अनेक रंग हेच गुण गृहीत धरले आहेत काय ?

ते गुण नव्हेत. या ठिकाणीं गुण म्हणजे व्यक्तीच्या ठिकाणीं जे स्त्रीलिंग, पुंलिंग आणि नपुंसकलिंग हे गुण दृष्टीस पडतात, तशीच एकत्व, द्वित्व आणि बहुत्व ही संख्या दृष्टीस पडते ते येथें गुणशब्दानें गृहीत धरले आहेत. ते गुण अनित्य आहेत. म्हणजे जाति ही एखादे वेळीं एकत्वसंख्येशीं युक्त होते म्हणजे एका व्यक्तीनें दाखविली जाते. तशीच एखादे वेळीं द्वित्वसंख्येनें युक्त होते व एखादे वेळीं बहुत्वसंख्येनें युक्त होते. तशीच जाति ही एखादे वेळीं स्त्रीलिंगानें युक्त होते म्हणजे स्त्रीलिंगी व्यक्तीनें दाखविली जाते, तशीच एखादे वेळीं पुंलिंगी व्यक्तीनें दाखविली जाते. आणि तशीच एखादे वेळीं नपुंसकलिंगी व्यक्तीनें दाखविली [४१] जाते.

हे जे जातिपक्ष घेऊन ब्राह्मणी, ब्राह्मणौ, वगैरे प्रयोग जुळविले त्यासंबंधानें विचार केला असतां लिंगाच्या संबंधानें जें उत्तर दिलें तें बरोबर जमेल परंतु एकवचन, द्विवचन, वगैरे वचनांसंबंधानें जें उत्तर दिलें तें मात्र बरोबर जमेल असें दिसत नाहीं. कारण जर जाति ही एखादे वेळीं एकत्वसंख्येशीं युक्त होईल व एखादे वेळीं द्वित्वसंख्येशीं युक्त होईल व एखादे वेळीं बहुत्वसंख्येशीं युक्त

शब्दानें दाखविली जाते. तेव्हां दोन वेळ गो-शब्दाचा प्रयोग करतां येणार नाहीं.

४०. व्यर्थ म्हणजे विभिन्नार्थक अक्ष, पाद, वगैरे शब्द. त्या ठिकाणीं त्या अनेक प्रकारच्या अर्थांवर एक जाति नसल्यामुळें एक शब्द उच्चारून तसले अनेक अर्थ दाखवितां येणार नाहींत. त्याकरितां निःसंशयच हें एकशेषसूत्र जातिपक्षींही केलें पाहिजे.

४१. जरी जातीला स्वतः लिंग आणि संख्या नाहीं तथापि जाति ही ज्या व्यक्तीवर राहते त्या-व्यक्तीवर लिंग व संख्या रहात असल्यामुळें व्यक्तीच्या द्वारानें लिंगाचा व संख्येचा संबंध जातीशीं जुळतो; अशा रीतीनें जातिपक्षींही लिंगवचनांची उपपत्ति होते.

मेकशेषो न वक्तव्य इति स चेदानीं वक्तव्यो भवति ।। एवं तर्हि लिङ्गवचनसिद्धिर्गुणविवक्षानित्यत्वात् । लिङ्गवचनानि सिद्धानि भवन्ति । कुतः । गुणविवक्षाया अनित्यत्वात् । अनित्या गुणविवक्षा । कदाचिदाकृतिरेकत्वेन विवक्षिता भवति कदाचिद्द्वित्वेन कदाचिद्बहुत्वेन कदाचित्स्त्रीत्वेन कदाचित्पुंस्त्वेन कदाचिन्नपुंसकत्वेन ।। भवेल्लिङ्गपरिहार उपपन्नो वचनपरिहारस्तु नोपपद्यते । यदि कदाचिदाकृतिरेकत्वेन विवक्षिता भवति कदाचिद्द्वित्वेन कदाचिद्बहुत्वेनैकाकृतिरिति प्रतिज्ञा हीयेत यच्चास्य पक्षस्योपादाने प्रयोजनमुक्तमेकशेषो न वक्तव्य इति स चेदानीं वक्तव्यो भवति ।। लिङ्गपरिहारश्चापि नोपपद्यते । किं कारणम् । आविष्टलिङ्गा जातिर्यल्लिङ्गमुपादाय प्रवर्तते उत्पत्तिप्रभृत्या वि-

---

होईल तर अगोदर जाति एक आहे या प्रतिज्ञेचा भंग होईल. शिवाय जातिपक्ष घेण्याचा जो फायदा एकशेषसूत्र करावयास नको असा दाखविला तोही आतां मिळणार नाहीं. एकशेषसूत्र उलट करावेंच लागेल.

तर मग पूर्ववार्तिकाचें तात्पर्य असें समजा— ब्राह्मणी, ब्राह्मणौ, इत्यादि उदाहरणांमध्यें जातिपक्ष घेतला असतांनाही लिंग आणि वचन हीं सिद्ध होतात.

तीं कशीं ?

लिंग आणि वचन हे गुण दाखविण्याची इच्छा अनित्य आहे. म्हणजे लिंग आणि वचन दाखविणें हें वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून राहतें. एखादे वेळीं वक्त्याला जाति ही एकत्वसंख्येनें युक्त अशी वाटते, तशीच एखादे वेळीं द्वित्वसंख्येनें युक्त, तशीच एखादे वेळीं बहुत्वसंख्येनें युक्त, अशी दाखवावी असें वाटतें. तशीच जाति ही एखादे वेळीं पुंस्त्वधर्मानें युक्त म्हणजे पुंलिंगी व्यक्तीनें युक्त अशी दाखवावी असें वाटतें, तसेंच कदाचित् स्त्रीलिंगी व्यक्तीनें युक्त व कदाचित् नपुंसकलिंगी व्यक्तीनें युक्त अशी दाखवावी असें वाटतें.[42]

हें जें जातिपक्ष घेऊन लिंगासंबंधानें उत्तर दिलें तें बरोबर दिसतें. परंतु संख्येसंबंधानें उत्तर दिलें तें मात्र बरोबर दिसत[43] नाहीं. जर एखादे वेळीं जाति ही एकत्वसंख्येनें युक्त अशी दाखवितां येत असेल, तशीच एखादे वेळीं द्वित्वसंख्येनें युक्त, तशीच एखादे वेळीं बहुत्वसंख्येनें युक्त, अशी दाखवितां येत असेल तर 'जाति एक आहे' या प्रतिज्ञेचा भंग होईल. शिवाय 'एकशेषसूत्र करावयास नको,' असा जो जातिपक्ष घेण्याचा फायदा दाखविला तोही आतां बरोबर दिसत नाहीं. उलट, जर जातीचा संख्येशीं योग होत असेल तर हें एकशेषसूत्र करावेंच लागेल.

वास्तविक विचार केला तर लिंगासंबंधानें जें उत्तर दिलें तें देखील बरोबर दिसत नाहीं.

कां बरें ?

जाति ही व्यक्तीचें एक प्रकारचें विशेष लिंग घेत असते. तेव्हां जें लिंग घेऊन जाति प्रवृत्त होते त्या लिंगाचा ती वस्तु उत्पन्न झाल्यापासून

---

४२. जातीला द्वित्वस्त्रीत्वादि गुणांची विवक्षा करावयाची म्हणजे आश्रयावरील संख्येचा संबंध आरोपानें जातीचे ठिकाणीं मानावयाचा; खऱ्या रीतीनें समजावयाचा नाहीं. म्हणजे आरोपित संख्येनें जातीच्या खऱ्या एकत्वाला धक्का पोचत नस त्यामुळें जाति एक आहे ही गोष्ट कायमच राहते व एकशेषही करावा लागत नाही.

४३. जातीचे ठिकाणीं आरोपानें संख्यासंबन्ध जोडला तरी ही त्याचा परिणाम वाक्यप्रयोगांत दृष्टोत्पत्तीस येतो, त्यामुळें जरी खऱ्या रीतीनें जाति एक आहे तरी वाक्यप्रयोगावरून द्वित्व, बहुत्व, हीं भासत असल्यामुळें प्रतिज्ञेचा मोड व एकशेषाचा आरंभ हे गळीं पडत आहेत.

नाशात्तल्लिङ्गं न जहाति । तस्मान्न वैयाकरणैः शक्यं लौकिकं लिङ्गमास्थातुम् । अवश्यं कश्चित्स्वकृतान्त आस्थेयः । कोऽसौ स्वकृतान्तः ।

संस्त्यानप्रसवौ लिङ्गम् ।

संस्त्यानप्रसवौ लिङ्गमास्थेयौ । किमिदं संस्त्यानप्रसवाविति ।

संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री सूतेः सप्प्रसवे पुमान् ॥

ननु च लोकेऽपि स्त्यायतेरेव स्त्री सूतेश्च पुमान् । अधिकरणसाधना लोके स्त्री । स्त्यायत्यस्यां गर्भ इति । कर्तृसाधनश्च पुमान् । सूते पुमानिति । इह पुनरुभयं भावसाधनम् । स्त्यानं प्रवृत्तिश्च । कस्य पुनः स्त्यानं स्त्री प्रवृत्तिर्वा पुमान् । गुणानाम् । केषाम् । शब्दस्पर्शरूपरसग-

---

तिचा नाश होईपर्यंत ती जाति त्याग करीत नाहीं. तात्पर्य, वैयाकरणलोकांनीं शास्त्रीय कार्य कर्तव्य असतांना लौकिक लिंग घेणें शक्य नाहीं तर त्यांनीं आपल्या शास्त्रापुरता लिंगासंबधानें एखादा स्वतंत्र सिद्धान्त केला पाहिजे.

तो सिद्धान्त कोणता ?

संस्त्यान आणि प्रसव हेच शास्त्रामध्यें लिङ्ग असे समजले पाहिजेत.

संस्त्यान आणि प्रसव म्हणजे काय ?

संस्त्यान हा स्त्री शब्दाचा अर्थ आहे. स्त्री हा शब्द स्त्यै धातूहून ड्रट्प्रत्यय करून साधला आहे. तसेंच प्रसव हा पुमान् शब्दाचा अर्थ आहे. पुमान् हा शब्द सूधातूपासून सप् प्रत्यय करून साधला आहे.

पण, लोकांमध्यें देखील स्त्री हा शब्द स्त्यैधातूपासूनच साधला आहे आणि पुमान् हा शब्द सूधातूपासूनच साधलेला आहे. तेव्हां लौकिक आणि शास्त्रीय लिंगांमध्यें फरक कसा होणार ?

फरक असा की, लोकांमध्यें स्त्री हा शब्द जरी स्त्याधातूहून ड्रट्प्रत्यय करूनच साधला आहे तरी त्या ड्रट्प्रत्ययाचा अर्थ तेथें अधिकरण असा आहे. म्हणजे जिच्यामध्यें गर्भ जुळून येतो तिलाच स्त्री म्हणावें. तसाच पुमान् हा शब्द लोकांमध्यें जरी सूधातूपासूनच साधलेला आहे तरी तेथें त्या सूधातूच्या पुढें केलेल्या म्सुन् प्रत्ययाचा अर्थ[४४] कर्ता असा आहे. आणि या व्याकरणशास्त्रामध्यें पाहिलें तर स्त्री आणि पुमान् या दोन्ही शब्दांमध्यें प्रत्ययाचा अर्थ भाव म्हणजे शुद्ध धात्वर्थ असा आहे. तेव्हां स्त्री म्हणजे स्त्यान[४५] होय. आणि पुमान् म्हणजे प्रवृत्ति होय.

स्त्री म्हणजे स्त्यान असें जें म्हटलें तें कोणाचें स्त्यान ? तसेंच पुमान् म्हणजे प्रवृत्ति जी म्हटली आहे ती प्रवृत्ति कोणाची ?

स्त्यान आणि प्रवृत्ति ही गुणाची समजावी.

ते गुण कोणते ?

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे ते गुण[४६] होत.

---

४४. गर्भ जुळून येण्याकरतां जो उद्युक्त होतो तो कर्ता होय.

४५. स्त्यान म्हणजे जुळणें, व प्रवृत्ति म्हणजे उद्युक्त होणें.

४६. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचें परिणामभूत आणि म्हणूनच सत्त्वाद्यात्मक असे जे शब्दादि पांच गुण यांचा संघात हेच घटादि सर्व वस्तूंचें स्वरूप होय. उक्त-संघाताखेरीज अवयविद्रव्य म्हणून निराळें कांहीं नाहीं. सांख्यलोकांचें असेंच मत आहे. तेव्हां प्रत्येक वस्तूंचे ठिकाणीं या पांचांपैकीं कांहीं तरी गुण आहेतच. आतां ते गुण चलस्वभावाचे असल्यामुळें त्यांचे उपचयापचय (वृद्धि आणि ह्रास) हे सारखे चालूच आहेत. त्यांत त्या गुणांची जी उपचयावस्था तें पुंलिंग. व जी अपचयावस्था तें स्त्रीलिंग. आणि उपचय व अपचय यांच्यामधील जी अवस्था, अर्थात् साम्यावस्था, तें नपुंसकलिंग होय. तात्पर्य असें कीं,—प्रकृतिपरिणामविशेषरूप जी जाति तिला स्वतःच लिंगसंबंध संभवतो.

न्धानाम्। सर्वाश्च पुनर्मूर्तय एवमात्मिकाः संस्त्यानप्रसवगुणाः शब्दस्पर्शरूपरसगन्धवत्यः। यत्राल्पीयांसो गुणास्तत्रावरतस्त्रयः शब्दः स्पर्शो रूपमिति। रसगन्धौ न सर्वत्र। प्रवृत्तिः खल्वपि नित्या। न हीह कश्चिदपि स्वस्मिन्नात्मनि मुहूर्तमप्यवतिष्ठते। वर्धते यावदनेन वर्धितव्यमपचयेन वा युज्यते। तच्चोभयं सर्वत्र। यद्युभयं सर्वत्र कुतो व्यवस्था। विवक्षातः। संस्त्यानविवक्षायां स्त्री प्रसवविवक्षायां पुमानुभयोरप्यविवक्षायां नपुंसकम्॥ तत्र लिङ्गवचनसिद्धिर्गुणविवक्षानित्यत्वादिति लिङ्गपरिहार उपपन्नः। वचनपरिहारस्तु नोपपद्यते। वचनपरिहारश्चाप्युपपन्नः। इदं तावदयं प्रष्टव्यः। अथ यस्य द्रव्यं पदार्थः कथं तस्यैकवचनद्विवचनबहुवचनानि भवन्तीति। एवं स वक्ष्यति। एकस्मिन्नेकवचनं द्वयोर्द्विवचनं बहुषु बहुवचनमिति। यदि तस्यापि वाचनिकानि न स्वाभाविकान्यहमप्येवं वक्ष्या-

पण लोकांमध्यें सर्वच मूर्ति अशा स्वरूपाच्या आहेत की त्यांमध्यें संस्त्यान आणि प्रसव ह्या ज्यांच्या अवस्था आहेत असे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे गुण आहेतच. एखाद्या वस्तूमध्यें गुण कमी असले तरी फार तर रस आणि गन्ध हे दोन गुण सर्व ठिकाणीं उपलब्ध होणार नाहींत. परंतु शब्द, स्पर्श आणि रूप हे तीन गुण असणारच. तसेंच, पुमान् या शब्दाचा अर्थ जो प्रवृत्ति म्हणून केला आहे ती प्रवृत्ति देखील खरोखर सर्व वस्तूंमध्यें कायमचीच आहे. असें पाहा की, कोणताही पदार्थ अंशतःही वृद्धि किंवा क्षय न होतां निव्वळ आपल्या एकाच स्वरूपांत असलेला असा क्षणभर तरी दृष्टीस पडतो काय? तर त्याची जेवढी वाढ होण्याची असेल किंवा त्याचा जेवढा क्षय होणें असेल त्या मानानें त्या पदार्थाची वाढ किंवा क्षय प्रत्येक क्षणीं अंशतः होतच असतो. एकंदरींत संस्त्यान आणि प्रसव हे दोन्ही सर्व ठिकाणीं उपलब्ध होत असल्यामुळें सर्व ठिकाणीं दोन्ही लिंगें आहेत.

तर मग आतां अमुक पदार्थ हा पुंलिंगीच आहे आणि अमुक पदार्थ हा स्त्रीलिंगीच आहे ही व्यवस्था कशी समजावी?

लिंग ठरवणें हें विवक्षेवर अवलंबून आहे; म्हणजे संस्त्यानाची विवक्षा असेल तर स्त्रीलिंग समजावें, प्रसवाची विवक्षा असेल तर पुंलिंग समजावें, आणि दोघांचीही विवक्षा नसेल तर नपुंसकलिंग समजावें.

ब्राह्मणी, ब्राह्मणौ, वगैरे उदाहरणांमध्यें लिंग आणि वचन या गुणांची विवक्षा अनित्य असल्यामुळें म्हणजे कायमची एक नसल्यामुळें अनेक लिंगांची आणि वचनांची उपपत्ति होते असें जें वार्तिककारांनीं सांगितलें आहे त्यांपैकीं लिंगासंबंधानें दिलेलें उत्तर वर सांगितलेल्या रीतीनें बरोबर जुळते. वचनासंबंधानें दिलेलें उत्तर मात्र बरोबर जुळत नाहीं.

वचनासंबंधानें दिलेले उत्तर देखील बरोबर जुळतें. कारण आम्ही त्याला अगोदर असें विचारतों की, व्यक्ति हा शब्दाचा अर्थ आहे हा पक्ष घेतला असतां एकवचन, द्विवचन आणि बहुवचन हें कसें बरें जुळतें? आतां जर तो असें म्हणेल की, एक व्यक्तीची विवक्षा असतांना एकवचन होतें, द्वित्वसंख्येची विवक्षा असतां द्विवचन होतें आणि बहुसंख्येची विवक्षा असतांना बहुवचन होतें तर त्याच्या मतीं ही संख्येची व्यवस्था वचनाचे जोरावरच होत आहे, आपोआप होत नाहीं. तेव्हां शब्दाचा अर्थ जाति आहे असें मग गृहीत धरलें तरी देखील मला तसें बोलतां येईल की, एकसंख्येची विवक्षा असतांना एकवचन होतें, द्वित्वसंख्येची विवक्षा असतांना द्विवचन होतें, आणि बहुत्वसंख्येची विवक्षा असतां बहुवचन होतें. कारण जाति हा शब्दाचा

स्यैकस्मिन्नेकवचनं द्वयोर्द्विवचनं बहुषु बहुवचनमिति । न ह्याकृतिपदार्थिकस्य द्रव्यं न पदार्थो द्रव्यपदार्थिकस्य वाकृतिर्न पदार्थः । उभयोरुभयं पदार्थः कस्यचित्तु किंचित्प्रधानभूतं किंचिद्गुणभूतम् । आकृतिपदार्थिकस्याकृतिः प्रधानभूता द्रव्यं गुणभूतम् । द्रव्यपदार्थिकस्य द्रव्यं प्रधानभूतमाकृतिर्गुणभूता॥

**गुणवचनवद्वा ॥५४॥**

गुणवचनवद्वा लिङ्गवचनानि भविष्यन्ति । तद्यथा । गुणवचनानां शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भवति एवमिहापि यदसौ द्रव्यं श्रिताकृतिस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तदाकृतेरपि भविष्यति ॥

**अधिकरणगतिः साहचर्यात् ॥५५॥**

आकृतावारम्भणादीनां संभवो नास्तीति कृत्वाकृतिसहचरिते द्रव्य आरम्भणादीनि भविष्यन्ति ॥

**न चैकमनेकाधिकरणस्थं युगपदित्यादित्यवद्विषयः ॥५६॥**

न खल्वप्येकमनेकाधिकरणस्थं युगपदुपलभ्यत इत्यादित्यवद्विषयो भविष्यति । तद्यथा । एक आदित्योऽनेकाधिकरणस्थो युगपदुपलभ्यते ॥ विषम उपन्यासः । नैको द्रष्टानेकाधिकरणस्थमादित्यं युगपदुपलभते ॥ एवं तर्हीती-

---

अर्थ आहे असें म्हणणाऱ्याच्या मतीं व्यक्ति हा शब्दाचा अर्थ नव्हे असें होत नाहीं. तसेंच व्यक्ति हा शब्दाचा अर्थ आहे असें मानणाऱ्याच्या मतीं जाति हा शब्दाचा अर्थ नव्हे असें होत नाहीं; तेव्हां दोघांच्याही मतीं जाति आणि व्यक्ति हे दोन्ही अर्थ आहेतच. त्यांमध्यें फरक इतकाच की कोणाच्या मतीं कांहींतरी प्रधान असतें आणि कांहींतरी गौण असतें. जातिपक्ष घेणाऱ्याच्या मतीं जातीला मुख्यत्व आहे आणि व्यक्तीला गौणत्व आहे. तसेंच व्यक्ति हा शब्दाचा अर्थ आहे असें मानणाऱ्याच्या मतीं व्यक्तीला मुख्यत्व आहे आणि जातीला गौणत्व आहे.

(वा.५४) अथवा जातिपक्ष घेतला असतांही गुणवाचक शब्दाप्रमाणें लिंग आणि वचन यांची व्यवस्था होईल; जशीं गुणवाचक शब्दांना त्या गुणांच्या आश्रयाप्रमाणें लिंग आणि वचनें होत असतात; उदा०—शुक्लं वस्त्रं, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. या ठिकाणीं शुक्ल हा गुण ज्या व्यक्तीच्या आश्रयानें असतो त्या व्यक्तीचें जें लिंग आणि वचन तेंच त्या गुणवाचक व्यक्तीला लागलेलें दृष्टीस पडतें. त्याप्रमाणें प्रकृत ठिकाणीं देखील ब्राह्मणत्व वगैरे जाति ज्या व्यक्तीच्या आश्रयानें दाखविली जाते त्या व्यक्तीचें जें लिंग आणि वचन तेंच त्या जातिवाचक शब्दाला लावतां येईल.

(वा.५५) जातिपक्ष घेतला असतांना आरम्भण वगैरे क्रिया गोत्व वगैरे जातींच्या ठिकाणीं संभवत नाहींत म्हणून त्या आरम्भण वगैरे क्रिया जातीशीं नेहमीं संबद्ध असलेल्या व्यक्तीचे ठिकाणीं केल्या जातील; तेव्हां तोही दोष येत नाहीं.

एक वस्तु एकदम अनेक ठिकाणीं उपलब्ध होत नाहीं असा जो जातिपक्षावर दोष दिला आहे तोही बरोबर नाहीं. कारण सूर्याप्रमाणें जाति आहे असें गृहीत धरतां येईल; जसें एकच सूर्य एकदम अनेक देशांमध्यें असलेला उपलब्ध होतो तशी जाति देखील एकदम अनेक व्यक्तींमध्यें असूं शकेल.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण एकाच ठिकाणीं असलेल्या मनुष्याला अनेक ठिकाणीं असलेला सूर्य एकदम दिसत नाहीं.

न्द्रवद्विषयः । तद्यथा । एक इन्द्रोऽनेकस्मिन्क्रतुशत आहूतो युगपत्सर्वत्र भवति । एवमाकृतिर्युगपत्सर्वत्र भविष्यति ॥

अविनाशोऽनाश्रितत्वात् ॥५७॥

द्रव्यविनाश आकृतेरविनाशः । कुतः । अनाश्रितत्वात् । अनाश्रिताकृतिर्द्रव्यम् ॥ किमुच्यतेऽनाश्रितत्वादिति यदिदानीमेवोक्तमधिकरणगतिः साहचर्यादिति ॥ एवं तर्ह्यविनाशोऽनैकात्म्यात् । द्रव्यविनाश आकृतेरविनाशः । कुतः । अनैकात्म्यात् । अनेक आत्माकृतेर्द्रव्यस्य च । तद्यथा । वृक्षस्थोऽवतानो वृक्षे छिन्नेऽपि न विनश्यति ॥

वैरूप्यविग्रहौ द्रव्यभेदात् ॥५८॥

वैरूप्यविग्रहावपि द्रव्यभेदाद्भविष्यतः ॥

व्यर्थेषु च सामान्यात्सिद्धम् ॥ ५९ ॥

विभिन्नार्थेषु च सामान्यात्सिद्धं सर्वम् । अश्नोतेरक्षः । पद्यतेः पादः । मिमीतेर्माषः । तत्र क्रियासामान्यात्सिद्धम् ॥

---

तर मग येथें इन्द्राचा दृष्टान्त घ्यावा. जसा एकच इन्द्र एकाच वेळीं शेंकडों यज्ञांमध्यें आह्वान केलेला एकदम सर्वत्र जातो, तशी जाति ही एकदम सर्वत्र असूं शकेल.

(वा.५६) व्यक्तीचा नाश झाला तरी जातीचा नाश होत नाहीं, तेव्हां तोही दोष येत नाहीं.

व्यक्तीचा नाश झाला असतां जातीचा नाश कां बरें होत नाहीं ?

जाति ही व्यक्तीच्या आश्रयानें असत नाहीं म्हणून.

हें काय हो, तुम्ही म्हणत आहांत की जाति ही व्यक्तीच्या आश्रयानें असत नाहीं म्हणून ? आतांच तुम्ही म्हटलें आहे ना की, आरम्भण वगैरे क्रिया जातीला संभवत नाहींत, म्हणून तिच्याशीं संबद्ध असें जें त्या जातीचें व्यक्ति हें अधिकरण त्या ठिकाणीं त्या क्रिया करतां येतील.

तर मग व्यक्तीचा नाश झाला तरी जातीचा नाश होत नाहीं याचें कारण जाति ही तादात्म्यानें व्यक्तीचा आश्रय करीत नाहीं, असें समजावें. तात्पर्य असें की व्यक्तीचा नाश झाला तरी जातीचा नाश होणार नाहीं. कारण त्या दोहोंचें स्वरूप एक नाहीं. म्हणजे जातीचें स्वरूप निराळें आणि व्यक्तीचें स्वरूप निराळें. जसें, वृक्षावर चढलेल्या वेलीचा वृक्षाचा नाश झाला तरी नाश होत नाहीं त्याप्रमाणेंच हें होय.

(वा.५८) जातिपक्ष घेतला तरी देखील व्यक्ति भिन्न असल्यामुळें त्यांमध्यें वैरूप्य असूं शकेल व गौश्च गौश्च असा विग्रहही पण त्या व्यक्तींच्या दृष्टीनें करतां येईल.

(वा.५९) अनेकार्थ शब्दाविषयीं देखील त्या अनेक अर्थांमध्यें कांहींतरी एक प्रकारचें सामान्य असल्यामुळें सिद्ध होईल. तेव्हां अक्षाः, पादाः, वगैरे उदाहरणें साधण्याकरतांही एकशेषसूत्र जातिपक्षीं करावयास नको. याचें स्पष्टीकरण—

अक्ष शब्द अनेक अर्थीं आहे, म्हणजे गाडीचा कणा, फासा, आणि बिब्बा असे याचे अनेक अर्थ आहेत. परंतु त्या सर्व अर्थीं अक्षशब्द हा व्यापणें या अर्थाच्या अश्-धातूला 'स' प्रत्यय लागूनच साधलेला आहे. त्याप्रमाणें पादशब्दाचे चरण, किरण, चतुर्थांश, असे अर्थ आहेत. परंतु त्या सर्व अर्थीं गमन करणें या अर्थाच्या पद्धातूला घञ्-प्रत्यय लागून पादशब्द साधलेला आहे. तसेंच माष शब्दाचे मासा (एक प्रकारचें परिमाण), उडीद (एक प्रकारचें धान्य), वगैरे अनेक अर्थ आहेत. परंतु त्या सर्व अर्थीं मान या अर्थाच्या माधातूला 'स' प्रत्यय लागून माष शब्द साधलेला आहे. तेव्हां एकच क्रिया अनेक अर्थांमध्यें अनेक तऱ्हेनें जरी दृष्टीस

अपरस्त्वाह । पुराकल्प एतदासीत्षोडश माषाः कार्षापणं षोडशफलाश्च माषशंवत्यः । तत्र संख्यासामान्यात्सिद्धम् ॥

**वृद्धो यूना तल्लक्षणश्चेदेव विशेषः ॥१.२.६५॥**

इह कस्मान्न भवति । अजश्च बर्करश्च । अश्वश्च किशोरश्च । उष्ट्रश्च करभश्चेति । तल्लक्षणश्चेदेव विशेष इत्युच्यते न चात्र तल्लक्षण एव विशेषः । तल्लक्षण एव विशेषो यत्समानायामाकृतौ शब्दभेदः ॥

**स्त्री पुंवच्च ॥१.२.६६॥**

पडली तरी त्या क्रियांमध्यें सारखेपणा असल्यामुळें जातिपक्षीं सिद्ध होत आहे.

येथें कांहीं लोक असें उत्तर देतात की, पूर्वींच्या कल्पीं अशा तऱ्हेनें परिमाण धरलें जात होतें की, सोळा मासे म्हणजे एक कार्षापण, आणि उडीदाच्या शेंगेमध्यें जास्तींत जास्त सोळा बिया असतात; तेव्हां संख्या सारखी असल्यामुळें त्या दृष्टीनें माष हा शब्द समानार्थांच होत आहे. तेव्हां अर्थातच तेथें सिद्ध होईल.

(सू. ६५) अज आणि बर्कर ह्या दोन शब्दांमध्यें, तसेंच अश्व आणि किशोर या दोन शब्दांमध्यें, त्याचप्रमाणें उष्ट्र आणि करभ या दोन शब्दांमध्यें प्रकृतसूत्रानें एकशेष कां होत नाहीं ?

पण प्रकृतसूत्रामध्यें वृद्ध आणि युवा या अर्थसंबंधानेंच फक्त शब्दांमध्यें फरक झालेला असला पाहिजे, असें म्हटलें आहे ना? आणि प्रकृत उदाहरणामध्यें तर तेवढाच फरक आहे असें दिसत नाहीं.

तेवढाच फरक येथेंआहे. कारण दोन अर्थांची जाति एकच असून शब्द भिन्न आहे.

(सू. ६६) पाणिनीनें स्त्री असा शब्द ज्या ज्या सूत्रामध्यें उच्चारलेला आहे त्या सर्वच

४७. जसे मनुष्य, पशु, पक्षी, किडा, मुंगी, वगैरे अनेक प्रकारचे प्राणी आहेत तरी त्या सर्वांमध्यें प्राणसंबन्ध हा सर्वत्र सारखा असल्यामुळें त्या सर्वांवर प्राणित्व ही एक जाति राहते. त्याप्रमाणेंच येथेंही गाडीचा कणा, फासा, वगैरे पदार्थ निरनिराळ्या प्रकारचे आहेत तरी त्या सर्वांमध्यें व्यापणें ही क्रिया सर्वत्र सारखी असल्यामुळें त्या सर्वांवर अक्षत्व ही एक जाति राहूं शकेल. तेव्हां जातिपक्षीं अक्षाः असा त्या अनेक प्रकारच्या अर्थांना दाखविणारा प्रयोग एकशेषसूत्रावांचून सिद्ध होईल.

४८. तेव्हां माष, परिमाण आणि उडीद यांवर माषत्व जाति एक असल्यामुळें त्या अनेक अर्थाला दाखविणारा असा माषशब्दाचा प्रयोग जातिपक्षीं करतां येईल. तेव्हां त्याकरितां एकशेषसूत्र करावयास नको.

१. गोत्रापत्य (४।१।१६२) आणि युवापत्य (४।१।१६३) हे दोन अर्थ शब्दानें एकदम दाखवावयाचे असतां गोत्रापत्यवाचक शब्द शिल्लक राहतो आणि युवापत्यवाचक शब्दाची निवृत्ति होते; मात्र त्या दोन्ही शब्दांमध्यें वैरूप्य गोत्रप्रत्यय व युवप्रत्यय यांमुळेंच असावें, इतरामुळें नसावें; उदा०—गार्ग्यश्च गार्ग्यायणश्च गार्ग्यौ.

२. बोकडाचें तरुण पोर या अर्थाला बर्कर शब्द दाखवितो; अश्वाचें तरुण पोर या अर्थाला किशोर हा शब्द दाखवितो; तसेंच उंटाचें तरुण पोर या अर्थाला करभ शब्द दाखवितो. म्हणून अज, अश्व व उष्ट्र हे शब्द सामान्यतः त्या त्या जातींतील व्यक्तीला दाखविणारे आहेत. सूत्रांतील वृद्ध आणि युवन् हे शब्द लौकिक अर्थाचे गृहीत धरून हा प्रश्न केला आहे.

३. अज आणि बर्कर यांची अजत्व ही एकच जाति. तरुण अजालाच बर्कर म्हणतात. याप्रमाणेंच अश्व, किशोर, यांची अश्वत्व ही जाति एक आहे. उष्ट्र, करभ, यांचीही तशीच उष्ट्रत्व ही एक जाति आहे. 'मूळ शब्दांच्या स्वरूपांत फरक नसावा,' हें उत्तर येथें दिलें नाहीं. पुढें (सूत्र ६८) भाष्यकारांनीं दिलें आहे.

१. गोत्रापत्य स्त्री आणि युवापत्य पुरुष असे दोन अर्थ एकदम दाखवावयाचे असतां गोत्रापत्यवाचक स्त्रीलिंगी शब्द शिल्लक राहतो, आणि युवापत्यवाचक शब्द निवृत्त होतो; व राहिलेला गोत्रापत्यवाचक शब्द पुंलिंगाप्रमाणें होतो; पण त्या दोन शब्दांमध्यें स्त्रीलिंगी गोत्रापत्य या अर्थाचा प्रत्यय आणि युवापत्य या अर्थाचा प्रत्यय यांमुळेंच वैरूप्य असेल तर; उदा०—दाक्षी च दाक्षायणश्च दाक्षी.

इदं सर्वेष्वेव स्त्रीग्रहणेषु विचार्यते स्त्रीग्रहणे स्त्रीप्रत्ययग्रहणं वा स्यात्स्त्र्यर्थग्रहणं वा स्त्रीशब्दग्रहणं वेति। किं चातः। यदि प्रत्ययग्रहणं वा शब्दग्रहणं वा गार्गी च गार्ग्यायणौ च गर्गाः केन यशब्दो न श्रूयेत। अस्त्रियामिति हि लुगुच्यते। इह च गार्गी च गार्ग्यायणौ च गर्गान्पश्य तस्माच्छसो नः पुंसि [६.१.१०३] इति नत्वं न प्राप्नोति॥ अथार्थग्रहणं न दोषो भवति। यथा न दोषस्तथास्तु॥

इह कस्मान्न भवति। अजा च बर्करश्च। वडवा च किशोरश्च। उष्ट्री च करभश्चेति। तल्लक्षणश्चेदेव विशेष इत्युच्यते न चात्र तल्लक्षण एव विशेषः। तल्लक्षण एव विशेषो यत्समानायामाकृतौ शब्दभेदः॥

## पुमान्स्त्रिया॥१.२.६७॥

इह कस्मान्न भवति। हंसश्च वरटा च। कच्छपश्च डुली च। ऋश्यश्च

ठिकाणीं असा प्रश्न उद्भवतो की, स्त्री या शब्दानें स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण करावें किंवा स्त्रीलिंगी असलेल्या अर्थाचें ग्रहण करावें किंवा स्त्रीलिंगी असलेल्या शब्दाचेंच ग्रहण करावें?

यांत फरक काय बरें होईल?

फरक असा होईल की, जर स्त्री या शब्दानें स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण केलें किंवा स्त्रीलिंगी शब्दाचें ग्रहण केलें तर गार्गी च गार्ग्यायणौ च गर्गाः या ठिकाणीं एकशेष होऊन जें गर्गाः असें रूप होतें तें होणार नाहीं. म्हणजे या पक्षीं पुंवद्भावानें स्त्रीत्वाची निवृत्ति न झाल्यानें 'य'प्रत्ययाचें श्रवण होऊं लागेल; कारण 'य' प्रत्ययाचा लुक् जो सांगितला आहे तो स्त्रीलिंगीं होत नाहीं, असा त्याचा निषेध आहे. तसेंच गार्गी च गार्ग्यायणौ च असे दोन शब्द घेऊन त्यांमध्यें एकशेष होऊन पुढें द्वितीयेच्या बहुवचनीं गर्गान् पश्य असें रूप होतें. त्या ठिकाणीं प्रकृत सूत्रानें पुंवद्भावानें स्त्रीत्वाची निवृत्ति होत नसल्यामुळें 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१ १३०) या सूत्रानें सांगितलेलें नत्व होणार नाहीं.

आतां स्त्री या शब्दानें स्त्रीत्वरूप अर्थाचें ग्रहण केलें तर वर दाखविलेल्या उदाहरणामध्यें दोष येणार नाहीं.

तर मग ज्या रीतीनें दोष येत नाहीं तसेंच घ्यावें म्हणजे झालें.

आतां अजा आणि बर्कर या दोन् शब्दांमध्यें, तसेंच वडवा आणि किशोर या दोन शब्दांमध्यें, त्याचप्रमाणें उष्ट्री आणि करभ या दोन शब्दांमध्यें, प्रकृतसूत्रानें एकशेष कां होत नाहीं?

पण वृद्ध आणि युवा एवढ्यासंबंधानेंच फक्त शब्दांमध्यें फरक झालेला असला पाहिजे असें सूत्रामध्यें म्हटलें आहे ना? आणि प्रकृत उदाहरणांमध्यें पाहावें तर तेवढाच फरक येथें आहे असें दिसत नाहीं.

तेवढाच फरक येथें आहे. कारण दोन अर्थांची जाति एकच असून शब्द भिन्न आहेत.

(सू. ६७) हंस आणि वरटा या दोन शब्दांमध्यें, तसेंच कच्छ आणि डुली या दोन शब्दांमध्यें, त्याचप्रमाणें ऋश्य आणि रोहित् या दोन शब्दांमध्यें प्रकृतसूत्रानें एकशेष

२. स्त्री या शब्दानें स्त्रीलिंगी असलेल्या अर्थाचें ग्रहण केलें नाहीं तर पुंवत् हा अतिदेश त्या स्त्रीलिंगी अर्थावर होणार नाहीं, तेव्हां तो स्त्रीलिंगी अर्थ कायम असल्यामुळें लुक् (२।४।६४) व नत्व (६।१।१०३) होणार नाहीं.

३. पूर्वीच्या सूत्रावरील टीप ३ पाहा.

१. स्त्रीलिंगी असलेल्या अर्थाबरोबर पुंलिंगी अर्थाची उक्ति असतां त्यांमध्यें पुंलिंगी शब्द शिल्लक राहतो, पण त्या दोन शब्दांमध्यें पुंलिंग व स्त्रीलिंग यांमुळेंच तेवढा फरक असेल तर; उदा०—हंसी च हंसश्च हंसौ.

रोहिच्चेति । तल्लक्षणश्चेदेव विशेष इत्युच्यते न चात्र तल्लक्षण एव विशेषः । तल्लक्षण एव विशेषो यत्समानायामाकृतौ शब्दभेदः ॥

## भ्रातृपुत्रौ स्वसृदुहितृभ्याम् ॥१.२.६८॥

किमर्थमिदमुच्यते । न पुमान्स्त्रियेत्येव सिद्धम् । न सिध्यति । तल्लक्षणश्चेदेव विशेष इत्युच्यते न चात्र तल्लक्षण एव विशेषः । तल्लक्षण एव विशेषो यत्समानायामाकृतौ शब्दभेदः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदिमं योगं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो यत्रोर्ध्वं प्रकृतेस्तल्लक्षण एव विशेषस्तत्रैकशेषो भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । हंसश्च वरटा च कच्छपश्च डुली च ऋश्यश्च रोहिच्चेत्यत्रैकशेषो न भवति ॥ पूर्वयोर्योगयोर्भूयान्परिहारः । यावद्ब्रूयाद्गोत्रं यूनेति तावद्वृद्धो यूनेति । पूर्वसूत्रे गोत्रस्य वृद्धमिति संज्ञा क्रियते ॥

---

कां होत नाहीं ?

पण स्त्रीलिंग आणि पुंलिग एवढ्याचसंबंधानें शब्दांमध्यें फरक झालेला असला पाहिजे, असें म्हटलें आहे ना ? आणि हंस, वरटा वगैरे उदाहरणांमध्यें पाहिलें तर एवढाच फरक नाहीं.

एवढाच फरक येथें आहे. कारण दोन अर्थांची जाति एक असून शब्द भिन्न आहे.

(सू.६८) हें सूत्र पाणिनीनें कशाकरितां केलें आहे ? हें सूत्र करावयास नको. कारण या सूत्राचीं उदाहरणें 'पुमान् स्त्रिया' या मागील सूत्रानेंच सिद्ध होतील.

याचीं उदाहरणें 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें सिद्ध होणार नाहींत. कारण तेथें स्त्रीलिंग, पुंल्लिंग, यांसंबंधानेंच फक्त शब्दांमध्यें फरक झालेला असला पाहिजे असें म्हटलें आहे आणि याच्या उदाहरणांमध्यें पाहिलें तर एवढाच फरक आहे असें दिसत नाहीं. (कारण भ्रातृ आणि स्वसृ हीं अक्षरेंही भिन्नभिन्नच आहेत.)

असा जरी अक्षरांमध्यें फरक दृष्टीस पडत आहे तरी हा फरक स्त्रीलिंग आणि पुंलिंग या भेदांमुळेंच झालेला आहे. कारण भ्रातृ आणि स्वसृ यांच्या अर्थाकडे लक्ष दिलें असतां तीं एकाचींच अपत्यें असल्यामुळें ह्यांची जाति एक आहे आणि शब्द भिन्न आहेत.

तर मग अशा रीतीनें प्रकृतसूत्राचीं उदाहरणें 'पुमान् स्त्रिया' या पूर्वसूत्रानें सिद्ध होत असूनही ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि प्रकृत सूत्र करतो त्यावरून असें सुचवितो की, ज्या शब्दांमध्यें एकशेष करावयाचा त्या शब्दांच्या मूळ स्वरूपामध्यें फरक मुळींच नसला पाहिजे. फक्त त्याच्यापुढील प्रत्ययामध्येंच फरक असला तर तेथें एकशेष होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा की, हंस आणि वरटा या दोन शब्दांमध्यें, तसेंच कच्छप आणि डुली या दोन शब्दांमध्यें, तसेंच ऋश्य आणि रोहित् या उदाहरणांमध्यें एकशेष होत नाहीं.

याच्या पूर्वींच्या दोन सूत्रांमध्यें जे प्रश्न विचारले आहेत त्यांचेंही अशा प्रकारानें उत्तर देतां येतेंच. तथापि त्यांच्यासंबंधानें आणखीही निराळ्या तऱ्हेनें बरींचशीं उत्तरें देतां येतात. तीं अशीं की, गोत्र आणि युवा या दोन शब्दांमध्यें जो अर्थ होतो तोच 'वृद्धो यूना' या सूत्रामध्यें वृद्ध आणि युवा या शब्दांचा अर्थ आहे. कारण पूर्वींच्या आचार्यांनीं

---

२. मागील सूत्र ६५ टीप ३ पहा.

१. भाऊ आणि बहीण हे दोन अर्थ क्रमानें भ्रातृ व स्वसृ या शब्दांनीं एकदम दाखवावयाचे असतां त्यांमध्यें एक भ्रातृशब्द शिल्लक राहतो. तसेंच पुत्र आणि कन्या हे दोन अर्थ क्रमानें पुत्र व दुहितृ या शब्दांनीं एकदम दाखवावयाचे असतां त्यांमधील एक पुत्रशब्दच शिल्लक राहतो; उदा०— भ्राता च स्वसा च भ्रातरौ. पुत्रश्च दुहिता च पुत्रौ.

**असरूपाणां युवस्थविरस्त्रीपुंसानां विशेषस्याविवक्षितत्वात्सामान्यस्य च विवक्षितत्वात्सिद्धम् ॥१॥**

असरूपाणां युवस्थविरस्त्रीपुंसानां विशेषश्चाविवक्षितः सामान्यं च विवक्षितम् । विशेषस्याविवक्षितत्वात्सामान्यस्य च विवक्षितत्वात्सरूपाणामेकशेष एकविभक्तौ [१.२.६४] इत्येव सिद्धम् ॥

पुमान्स्त्रिया [१.२.६७] इह कस्मान्न भवति । ब्राह्मणवत्सा च ब्राह्मणीवत्सश्चेति ।

**ब्राह्मणवत्साब्राह्मणीवत्सयोर्लिङ्गस्य विभक्तिपरस्य विशेषवाचकत्वादनेकशेषः ॥२॥**

ब्राह्मणवत्साब्राह्मणीवत्सयोर्लिङ्गस्य विभक्तिपरस्य विशेषवाचकत्वादेकशेषो न भविष्यति । यत्र लिङ्गं विभक्तिपरमेव विशेषवाचकं तत्रैकशेषो भवति । नात्र लिङ्गं विभक्तिपरमेव विशेषवाचकम् ॥ यदि तर्हि यत्र लिङ्गं विभक्तिपरमेव विशेषवाचकं तत्रैकशेषो भवतीह न प्राप्नोति । कारकश्च कारिका च कारकौ । न ह्यत्र लिङ्गं विभक्तिपरमेव विशेषवाचकम् ॥ कथं पुनरिदं विज्ञायते । शब्दो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति । आहोस्विद्-

---

गोत्रालाच वृद्ध असें नांव दिलेलें आहे. (तेव्हां तेथें वृद्ध म्हणजे म्हातारा असा अर्थ समजूं नये.)

(वा.१) शिवाय 'वृद्धो यूना' आणि 'स्त्री पुंवच्च' हीं दोन सूत्रें करावयास नकोत. कारण गार्ग्य आणि गार्ग्यायण हे दोन शब्द, तसेंच गार्गी आणि गार्ग्यायण असे जे गोत्रवाचक आणि युववाचक शब्द, ते जरी सरूप नाहींत तरी त्या दोन्ही अर्थीं गर्गांचें अपत्य या सामान्य अर्थानें गार्ग्यशब्दाचा उपयोग केला असतांना 'सरूपाणां' या पूर्वसूत्रानेंच एकशेष सिद्ध होईल. त्यामध्यें गर्गांचें गोत्रापत्य म्हणजे नातू आणि गर्गांचें युवापत्य म्हणजे पणतू अशी विशेष विवक्षा करूं नये म्हणजे झालें.

आतां येथें स्वतंत्र शंका अशी उत्पन्न होते की, ब्राह्मणवत्सा आणि ब्राह्मणीवत्स ह्या दोन शब्दांमध्यें 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें एकशेष कां होत नाहीं. ?

(वा.२) ब्राह्मणवत्सा आणि ब्राह्मणीवत्स या दोन शब्दांमध्यें वत्सा आणि वत्स यांच्यापुढें विभक्ति आहे; त्यांतील ब्राह्मण आणि ब्राह्मणी या शब्दांच्यापुढें विभक्ति नाहीं; आणि विभक्ति पुढें नसलेल्या ब्राह्मण आणि ब्राह्मणी या शब्दांनीं विशेष प्रकारचें लिंग दाखविलें जातें; म्हणून एकशेष होणार नाहीं. ज्या ठिकाणीं विभक्ति पुढें असलेल्या शब्दानेंच फक्त विशेष लिंग दाखविलें जातें तेथेंच 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें एकशेष होतो. आणि ब्राह्मणवत्सा आणि ब्राह्मणीवत्स या दोन शब्दांमध्यें विभक्ति पुढें असलेले वत्सा आणि वत्स हे शब्दच फक्त विशेष लिंग दाखवितात असें नाहीं. (विभक्ति पुढें नसलेले ब्राह्मण आणि ब्राह्मणी या शब्दांनीं येथें लिंगाचा भेद दाखविला जातो.)

जर विभक्ति पुढें असलेल्याच शब्दानें फक्त विशेष लिंग दाखविलें असता एकशेष होतो असें म्हटलें तर कारक आणि कारिका या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन कारकौ असें जें रूप होतें तें होणार नाहीं. कारण येथें विभक्तीपुढें असलेला जो लिंग-बोधक प्रत्यय म्हणजे टाप्प्रत्यय त्यानेंच फक्त स्त्रीलिंग दाखविलें जातें असें नाहीं. तर कारिकाशब्दामध्यें जें इत्त्व झालेलें आहे तेंही स्त्रीलिंगाला दाखवीत आहे.

पण अगोदर या ठिकाणीं असा विचार उत्पन्न होतो की, शब्द जो स्त्रीप्रत्यय त्याच्या-मुळेंच फक्त विशेष झालेला पाहिजे असा

र्थो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति। किं चातः। यदि विज्ञायते शब्दो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति सिद्धं कारकश्च कारिका च कारकौ। इदं तु न सिध्यति गोमांश्च गोमती च गोमन्तौ। अथ विज्ञायतेऽर्थो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति सिद्धं गोमांश्च गोमती च गोमन्तौ। इदं तु न सिध्यति कारकश्च कारिका च कारकौ। उभयथापि पटुश्च पट्वी च पटू इत्येतन्न सिध्यति॥ एवं तर्हि नैवं विज्ञायते शब्दो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति नाप्यर्थो या स्त्री तल्लक्षणश्चेदेव विशेष इति। कथं तर्हि। शब्दार्थौ या स्त्री तत्सद्भावेन च तल्लक्ष-

---

अर्थ समजावा किंवा स्त्रीरूप जो अर्थ त्याच्यामुळेंच विशेष[२] झालेला असावा असा अर्थ समजावा ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक होईल ?

फरक असा होईल की, शब्द जो स्त्रीप्रत्यय त्याच्यामुळेंच फक्त विशेष झाला असला पाहिजे असा अर्थ गृहीत धरला तर कारक आणि कारिका या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन कारकौ असें रूप सिद्ध होईल. (कारण तेथें टाप् हा जो स्त्रीप्रत्यय शब्द त्यामुळेंच इकार होऊन फरक झालेला आहे.) परंतु गोमान् आणि गोमती या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन गोमन्तौ असें जें रूप सिद्ध होतें तें सिद्ध होणार नाहीं. बरें आतां स्त्रीरूपी जो अर्थ त्याच्यामुळेंच फक्त विशेष झाला असला पाहिजे असा अर्थ गृहीत धरला तर गोमान् आणि गोमती या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन गोमन्तौ असें रूप सिद्ध होईल. कारण यामध्यें गोमान् या शब्दापेक्षां गोमती शब्दामध्यें स्त्रीरूपी अर्थामुळें झालेला जो स्त्रीप्रत्यय ईकार तो जास्त येऊन फरक झालेला दृष्टीस पडतो. तो फक्त स्त्रीरूपी अर्थामुळेंच झालेला आहे. परंतु कारक आणि कारिका या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन कारकौ असें जें रूप होतें तें होणार नाहीं. (कारण तेथें इत्व होऊन जो फरक झालेला आहे तो त्या टाप्प्रत्यय या शब्दामुळें झालेला आहे; स्त्रीरूपी अर्थामुळें झालेला नाहीं. आतां कारिका या शब्दामध्यें शेवटीं टाप्प्रत्यय लावून जो फरक झालेला आहे तो जरी स्त्रीरूपी अर्थामुळें झालेला आहे तरी तेवढाच फरक नसल्यामुळें तेथें एकशेष होणार नाहीं.) शिवाय दोन्ही प्रकारांपैकीं कसाही अर्थ घेतला तरी पटु आणि पट्वी या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊन पटू असें जें रूप होत असतें तें सिद्ध होणार नाहीं[३].

तर मग आता येथें शब्द जो स्त्रीप्रत्यय त्याच्यामुळेंच फक्त फरक झालेला पाहिजे असेंही आम्ही म्हणत नाहीं. आणि स्त्रीरूपी जो अर्थ त्याच्यामुळेंच फक्त फरक झालेला असला पाहिजे असाही अर्थ आम्ही घेत नाहीं.

तर मग याचा अर्थ घेतां तरी कसा ?

असा अर्थ घेतों की, स्त्रीरूपी जो अर्थ आणि त्याला दाखविणारा जो शब्द यांच्या अस्तित्वानें जेवढा कांहीं दोन शब्दांमध्यें फरक होईल तेवढा झाला असतांना एकशेष होतो.

तर मग असा अर्थ गृहीत धरला तर

---

२. 'इत्व वगैरे होणें' हा स्त्रीप्रत्ययामुळें होणारा विशेष होय. 'टाप्, ङीप्, वगैरे स्त्रीप्रत्यय होणें' हा स्त्रीरूपी अर्थामुळें होणारा विशेष होय.

३. पट्वी येथें जो यणादेश झालेला आहे तो कांहीं स्त्रीरूपी अर्थामुळें झालेला नाहीं, तर त्या अर्थामुळें ङीप्प्रत्यय झालेला आहे. आतां त्या ङीपामुळें जरी यणादेश झालेला आहे, तरी तो ङीप्प्रत्यय या नात्यानें यणाला निमित्त झाला नाहीं, तर अच् या नात्यानें निमित्त झाला आहे. तेव्हां यणादेश हा स्त्रीरूपी अर्थामुळें झालेला नव्हे, आणि स्त्रीप्रत्ययामुळेंही झालेला नव्हे. म्हणून एकशेष होणार नाहीं.

णो विशेष आश्रीयते । एवं च कृत्वेहापि प्राप्तिः । ब्राह्मणवत्सा च ब्राह्मणीवत्सश्चेति ॥ एवं तर्हीदमिह व्यपदेश्यं सदाचार्यो न व्यपदिशति । किम् । तदित्यनुवर्तते । तदित्यनेन प्रकृतौ स्त्रीपुंसौ प्रतिनिर्दिश्येते । कौ च प्रकृतौ । प्रधाने । प्रधानं या शब्दस्त्री प्रधानं यार्थस्त्रीति ॥

## [1]नपुंसकमनपुंसकेनैकवच्चास्यान्यतरस्याम् ॥१.२.६९॥

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथं शुक्लश्च कम्बलः शुक्लं च वस्त्रं तदिदं शुक्लं ते इमे शुक्ले । शुक्लश्च कम्बलः शुक्ला च बृहतिका शुक्लं च वस्त्रं तदिदं शुक्लं तानीमानि शुक्लानि ।

### प्रधाने कार्यसंप्रत्ययाच्छेषः ॥१॥

प्रधाने कार्यसंप्रत्ययाच्छेषो भविष्यति । किं च प्रधानम् । नपुंसकम् । कथं पुनर्ज्ञायते नपुंसकं प्रधानमिति । एवं हि

---

ब्राह्मणवत्सा आणि ब्राह्मणीवत्स या दोन शब्दांमध्यें एकशेष होऊं लागेल हा दोष कायमच राहतो. ( व त्याकरितां तेथें एकशेष न होण्याकरितां पूर्वीं दाखविलेलें वार्तिक करावें लागेल).

तर मग येथें असें आम्ही म्हणतों की, येथें आचार्यांनीं जें स्पष्ट बोलून दाखविलें पाहिजे तें त्यांनीं बोलून दाखविलें नाहीं.

तें कोणतें ?

तें असें की, 'तल्लक्षणः' असा पूर्वसूत्रांतून अनुवृत्त झालेला जो शब्द त्यांतील तच्छब्द प्रकृत जे स्त्री आणि पुरुष त्यांचा दर्शक आहे.

स्त्री आणि पुरुष हे प्रकृत कोणते समजावे ?

जे शब्दानें मुख्यत्वानें प्रतिपादिले जातात ते मुख्य होत. तेव्हां एकंदरींत मुख्य जे स्त्रीपुरुष आणि त्यांचा वाचक जो शब्द तेवढ्यांमुळेंच फरक झाला असला पाहिजे असा सूत्राचा अर्थ [4]होतो. (ब्राह्मणवत्सा आणि ब्राह्मणीवत्स या दोन शब्दांमध्यें वत्स आणि वत्सा हे स्त्रीपुरुष मुख्य होत. ब्राह्मण आणि ब्राह्मणी हे स्त्रीपुरुष मुख्य नव्हेत.)

(सू.६९) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

शुक्लः कम्बलः आणि शुक्लं वस्त्रं या दोन शुक्लशब्दांमध्यें एकशेष होऊन शुक्लं असें रूप होतें किंवा शुक्ले असें रूप होतें; तसेंच शुक्ल कम्बल, शुक्ल बृहतिका म्हणजे अंगवस्त्र आणि शुक्ल वस्त्र या तीन शुक्लशब्दांमध्यें एकशेष होऊन शुक्लं किंवा शुक्लानि अशीं रूपें होतात; प्रकृतसूत्र केलें नाहीं तर हीं रूपें कशीं साधतील[2] ?

(वा.१) शब्दानें अर्थांचें प्रतिपादन करणें हें जें शब्दाचें कार्य तें कार्य मुख्य शब्दानें पुढें होऊन केलें म्हणजे आपोआपच हीं रूपें साधतील.

मुख्य शब्द तो कोणता ?

नपुंसकलिंग हा शब्द मुख्य होय.

नपुंसकलिंगाला मुख्यत्व आहे असें कशावरून बरें समजावें ?

अशावरून समजावें की, लोकांमध्यें असें

---

४. स्त्री आणि पुरुष या अर्थांची सहविवक्षा असतां 'पुमान् स्त्रिया' यानें एकशेष सांगितला आहे. तो 'प्रधानाप्रधानयोः प्रधाने कार्यसंप्रत्ययः' या परिभाषेनें प्रधान स्त्रीपुरुषांचाच होतो. तेव्हां जेथें प्रधान अशा स्त्रीपुरुषांमुळेंच फक्त झालेला फरक शब्दांत आढळतो तेथेंच एकशेष होतो. प्रकृत स्थलीं अप्रधान असे स्त्रीपुरुष ब्राह्मणब्राह्मणी यांमुळेंही शब्दांत फरक झाला असल्यामुळें एकशेष होत नाहीं.

१. नपुंसकलिंगी नव्हे असा पदार्थ आणि नपुंसकलिंगी असलेला पदार्थ असे दोन पदार्थ शब्दानें एकदम दाखविण्याची इच्छा असतां त्यापैकीं नपुंसकलिंगी शब्द शिल्लक राहतो आणि त्या शब्दाला विकल्पानें एकवचनाचें कार्य लागू होतें; पण त्या शब्दामध्यें नपुंसकलिंग व अनपुंसकलिंग यामुळेंच फक्त झालेला फरक असेल तर; उदा०- शुक्लः पटः, शुक्ला शाटी, शुक्लं वस्त्रं, तदिदं शुक्लम् ; किंवा तानीमानि शुक्लानि.

दृश्यते लोके। अनिर्ज्ञातेऽर्थे गुणसंदेहे च नपुंसकलिङ्गं प्रयुज्यते। किं जातमित्युच्यते। द्वयं चैव हि जायते स्त्री वा पुमान्वा। तथा विदूरेऽव्यक्तमारूपं दृष्ट्वा वक्तारो भवन्ति महिषी रूपमिव ब्राह्मणी रूपमिव। प्रधाने कार्यसंप्रत्ययान्नपुंसकस्य शेषो भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनमेकवच्चास्यान्यतरस्यामिति वक्ष्यामीति। एतदपि नास्ति प्रयोजनम्।

**आकृतिवाचित्वादेकवचनम् ॥२॥**

आकृतिवाचित्वादेकवचनं भविष्यति। यदा द्रव्याभिधानं तदा द्विवचनबहुवचने भविष्यतः॥

**भ्रातृपुत्रौ स्वसृदुहितृभ्याम् ॥ १.२.६८**

**पिता मात्रा ॥१.२.७०॥**

**श्वशुरः श्वश्र्वा ॥१.२.७१॥**

किमर्थमिदमुच्यते न पुमान्स्त्रिया [१.२.६७] इत्येव सिद्धम्। भ्रातृपुत्रपितृश्वशुराणां कारणाद्द्रव्ये शब्दनिवेशः। भ्रातृपुत्रपितृश्वशुराणां कारणाद्द्रव्ये शब्दनिवेशो भवति।

---

दृष्टीस पडतें: मुलगा आहे किंवा मुलगी आहे या गुणाविषयीं संशय उत्पन्न झाल्यामुळें असुकच आहे असा निश्चय होत नाहीं अशा अवस्थेमध्यें 'काय मूल झालें' अशा नपुंसकलिंगी शब्दाचा उपयोग करतात. वस्तुतः विचार केला असतांना मुलगा किंवा मुलगी हे दोनच प्रायः होत असतात. तसेंच दुरून मनुष्याचा आकार अस्पष्ट पाहून वक्ते असे बोलतात की, हें महिषीसारखें रूप दिसत आहे किंवा हें ब्राह्मणीसारखें रूप दिसत आहे. अशा रीतीनें मोघम शब्दाचा उपयोग करतांना नपुंसकलिंगच पुढें येतें. त्यामुळें नपुंसकलिंगाला प्राधान्य आहे. तेव्हां अर्थात् प्रतिपादन करणें हें कार्य मुख्य जो नपुंसकलिंगी शब्द तोच पुढें होऊन आपल्या अंगावर घेईल. त्यामुळें आपोआपच नपुंसकलिंगी शब्दच उपयोगांत येईल.

तर मग या सूत्राचा उपयोग असा दिसतो की, सूत्रामध्यें एकशेष करून एकवचन विकल्पानें करावें असें सांगितलें आहे, त्यामुळें शुक्लं असें एकदा एकवचन होऊन एकदा शुक्ले आणि शुक्लानि असें द्विवचन किंवा बहुवचन करतां येतें.

हा देखील या सूत्राचा उपयोग संभवत नाहीं.

(वा.२) जाति हा शब्दाचा अर्थ मुख्यत्वानें मानला असतां एकवचन होईल, आणि ज्या वेळेला व्यक्ति हा शब्दाचा अर्थ मुख्यत्वानें मानला त्या वेळीं द्विवचन किंवा बहुवचन होईल. (एकंदरींत हें सूत्र करावयास नको.)

(सू.६८,७०,७१) हीं सूत्रें कशाकरितां केलीं आहेत? हीं करावयास नकोत. ह्या सूत्रांचीं उदाहरणें 'पुमान् स्त्रिया' (१।२।६७) या सूत्रानेंच सिद्ध होतील.

भ्रातृ, पुत्र, पितृ, आणि श्वशुर हे चार शब्द त्या त्या विशेष कारणांमुळें त्या त्या अर्थाला दाखवितात. (तेव्हां भ्रातृ वगैरे शब्दापासून बहीण, मुलगी, आई आणि सासू यांचा क्रमानें बोध होणार नाहीं याकरितां हीं सूत्रें आणि

२. 'सरूपाणाम्'० या सूत्रानें एकशेष केला तर कदाचित् पुंलिंगी शब्दही राहील असा दोष येईल.

१. आई आणि बाप हे दोन अर्थ एकदम मातृ व पितृ या शब्दानें दाखविण्याची इच्छा असतां त्यापैकीं एकदा एक पितृशब्दच शिल्लक राहतो, आणि एकदा दोन्ही शिल्लक राहतात. उदा०— माता च पिता च पितरौ, किंवा मातापितरौ.

१. सासू आणि सासरा हे दोन अर्थ एकदम श्वश्रू व श्वशुर या शब्दानें दाखवावयाचे असतां त्यांपैकीं एकदा एक श्वशुरशब्दच शिल्लक राहतो, आणि एकदा दोन्ही शिल्लक राहतात; उदा०— श्वश्रूश्च श्वशुरश्च श्वशुरौ, किंवा श्वश्रूश्वशुरौ.

**भ्रातृपुत्रपितृश्वशुराणां कारणाद्द्रव्ये शब्दनिवेश इति चेत्तुल्यकारणत्वात्सिद्धम् ॥१॥**

यदि तावद्बिभर्तीति भ्राता स्वसर्यप्येतद्भवति। तथा यदि पुनाति प्रीणातीति वा पुत्रो दुहितर्यप्येतद्भवति। तथा यदि पाति पालयतीति वा पिता मातर्यप्येतद्भवति। तथा यद्याश्वाप्तव्यः श्वशुरः श्वश्र्वामप्यतेद्भवति॥ दर्शनं वै हेतुः। न हि स्वसरि भ्रातृशब्दो दृश्यते।

**दर्शनं हेतुरिति चेत्तुल्यम् ॥२॥**

दर्शनं हेतुरिति चेत्तुल्यमेतद्भवति। स्वसर्यपि भ्रातृशब्दो दृश्यतां तुल्यं हि कारणम् ॥ न वा एष लोके संप्रत्ययः। न हि लोके भ्रातानीयतामित्युक्ते स्वसानीयते।

**तद्विषयं च ॥३॥**

तद्विषयं चैतद्द्रष्टव्यं भवति स्वसरि भ्रातृत्वम्। किंविषयम्। एकशेषविषयम्॥ युक्तं पुनर्यन्नियतविषया नाम शब्दाः

---

भ्रातृपुत्रौ' हें मागील सूत्र केलें पाहिजे.

(वा.१) भ्रातृ, पुत्र, पितृ आणि श्वशुर या चार शब्दांचा विशेष कारणामुळें भाऊ, मुलगा, बाप आणि सासरा या चार अर्थींच क्रमानें प्रयोग होतो. तेव्हां अर्थातच त्या चार शब्दांपासून बहीण, मुलगी, आई आणि सासू यांचा बोध होणार नाहीं असें म्हणाल तर तसें नाहीं. भ्रातृ वगैरे शब्द ज्या कारणामुळें भाऊ वगैरे अर्थांना बोलतात त्याच कारणामुळें ते शब्द बहीण वगैरे अर्थालाही दाखवूं शकतील. तें असें की, बिभर्ति म्हणजे पोषण करतो तो भ्राता असें गृहीत धरलें तर बहीण देखील पोषण करणारी असल्यामुळें त्या अर्थींही भ्रातृशब्दाचा उपयोग करतां येईल. तसेंच पुनाति म्हणजे पवित्र करणारा किंवा प्रीणाति म्हणजे संतुष्ट करणारा असा पुत्रशब्दाचा अर्थ गृहीत धरला तर मुलगीही तशीच असल्यामुळें मुलगी या अर्थींही पुत्रशब्दाचा उपयोग करतां येईल. तसेंच पाति म्हणजे रक्षण करणारा किंवा पालयति म्हणजे रक्षण करविणारा तो पिता असा पितृशब्दाचा अर्थ घेतला असतांना आई देखील तशीच असल्यामुळें त्या अर्थींही पितृशब्दाचा उपयोग करतां येईल. तसेंच आशु आप्तव्यः म्हणजे शीघ्र संबंध करण्याला योग्य असा अर्थ श्वशुरशब्दाचा घेतला तर त्याच अर्थानें सासू या अर्थीं देखील श्वशुरशब्दाचा उपयोग करतां येईल. (तेव्हां हीं सर्व उदाहरणें 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें सिद्ध होतील.)

जरी अशा रीतीनें शब्दांचा अर्थ होत असला तरी देखील त्या अर्थीं त्या शब्दांचा प्रयोग दृष्टीस पडत नाहीं. तेव्हां दर्शन हें अर्थ ठरविण्याचें कारण आहे.

(वा.२) प्रयोगदर्शन हें अर्थ ठरविण्याचें कारण आहे असें म्हणाल तें देखील येथें सारखेंच होईल. जर कारण सारखें आहे तर बहीण या अर्थीं देखील भ्रातृशब्दाचा प्रयोग खुशाल करतां येईल.

पण लोकांमध्यें तसा बोध होत नाहीं. असें पहा की, लोकांमध्यें 'भावाला घेऊन या' असें म्हटलें असतां तेथें बहिणीला कोणीही आणीत नाहींत.

(वा.३) भ्रातृशब्द हा बहिणीचाही दर्शक आहे हें म्हणणें फक्त त्याविषयींच आहे असें समजावें.

त्याविषयीं म्हणजे कशाविषयीं?

त्याविषयीं म्हणजे सूत्रकारांनीं एकशेष ज्या प्रयोगाकरितां सांगितला आहे त्याविषयीं.

पण 'विशेष अर्थाचे दर्शक' असे हे शब्द अमक्याच ठिकाणीं उपयोगांत आणावेत असा त्यांचा विषय नियमित करणें हें बरें दिसतें काय?

याबद्दल संशय घेण्याचें कारणच नाहीं. हें खरोखरच योग्य आहे.

स्युः । बाढं युक्तम् ।

**अन्यत्रापि तद्विषयदर्शनात् ॥४॥**

अन्यत्रापि नियतविषयाः शब्दा दृश्यन्ते । तद्यथा । समाने रक्ते वर्णे गौर्लोहित इति भवत्यश्वः शोण इति । समाने च काले वर्णे गौः कृष्ण इति भवत्यश्वो हेम इति । समाने च शुक्ले वर्णे गौः श्वेत इति भवत्यश्वः कर्क इति ॥

## त्यदादीनि सर्वैर्नित्यम् ॥१.२.७२॥

**त्यदादितः शेषे पुंनपुंसकतो लिङ्गवचनानि ॥१॥**

त्यदादितः शेषे पुंनपुंसकतो लिङ्गवचनानि भवन्ति । सा च देवदत्तश्च तौ । सा च कुण्डे च तानि ॥

**अद्वन्द्वतत्पुरुषविशेषणानाम् ॥२॥**

अद्वन्द्वतत्पुरुषविशेषणानामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । स च कुक्कुटः सा च मयूरी कुक्कुटमयूर्यौ ते । अर्धं पिप्पल्यास्तदर्धपिप्पली च सा अर्धपिप्पल्यौ ते ॥

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथम् ।

**त्यदादीनां सामान्यार्थत्वात् ॥३॥**

(वा.४) कारण इतर ठिकाणीं देखील ज्यांचा विषय नियमित केलेला आहे असे शब्द दृष्टीस पडतात; उदा०—बैल आणि घोडा या दोघांचा तांबडा रंग सारखाच असतांना त्यामध्यें बैलाचा तांबडेपणा दाखवितांना लोहितशब्द उपयोगांत आणतात आणि घोड्याचा तांबडेपणा दाखवितांना शोणशब्दाचा उपयोग करतात. तसेंच बैल आणि घोडा या दोघांचा काळा रंग सारखाच असतांना त्यामध्यें बैलाचा काळेपणा दाखवितांना कृष्ण शब्दाचा उपयोग करतात आणि घोड्याचा काळेपणा दाखवितांना हेमशब्दाचा उपयोग करतात. तसेंच पांढरा रंग सारखा असतांना देखील बैलाचा पांढरेपणा दाखवितांना श्वेत असें म्हणतात आणि घोड्याचा पांढरेपणा दाखवितांना कर्कशब्दाचा उपयोग करतात.

(सू.७२, वा.१) त्यदादिगणपठित शब्दांचा एकशेष केला असतां तेथें पुंलिंगी किंवा नपुंसकलिंगी जो शब्द असेल त्याप्रमाणें त्या त्यदादि गणांतील शब्दाला लिंग आणि वचनें लावावींत; उदा०—सा च देवदत्तश्च तौ, सा च कुण्डे च तानि.

(वा.२) एकशेष झालेला त्यदादि गणांतील शब्द जर द्वंद्वाला किंवा तत्पुरुषाला विशेषण झाला असेल तर वरचा नियम लागू होत नाहीं असें म्हणावें; उदा०—कुक्कुटमयूर्यौ ते, पुंलिंगी तच्छब्द कुक्कुटाचा दर्शक आहे, आणि स्त्रीलिंगी तच्छब्द मयूरीचा दर्शक आहे. त्या दोन तच्छब्दांचा एकशेष होऊन 'ते' असें स्त्रीलिंगी रूप होतें; तौ असें पुंलिंगी रूप होत नाहीं. कारण कुक्कुटमयूर्यौ या द्वंद्वाचें 'ते' हें विशेषण आहे. म्हणूनच येथें स्त्रीलिंगीच 'ते' असें रूप होतें. तसेंच 'अर्धपिप्पल्यौ ते' येथेंही नपुंसकलिंगी तच्छब्द हा पिप्पलीच्या अर्ध्याचा दर्शक आहे आणि स्त्रीलिंगी तच्छब्द हा अर्ध्या पिंपळीचा दर्शक आहे. त्या दोन तच्छब्दांचा एकशेष होऊन 'ते' असें स्त्रीलिंगीच रूप होतें. कारण 'अर्धपिप्पल्यौ' या तत्पुरुष समासाचें तें विशेषण आहे.

हें देखील सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

तें कसें ?

त्यद्, तद्, वगैरे शब्द हे सामान्य अर्थाचे

१. त्यद्, तद्, वगैरे त्यदादिकांपैकीं एक शब्द आणि दुसरा कोणताही शब्द अशा दोन शब्दांनी दोन अर्थ एकदम दाखविण्याची इच्छा असतां त्यांपैकीं त्यदादि शब्दच एक नेहमीं शिल्लक राहतो, आणि इतरांची निवृत्ति होते; उदा. स च देवदत्तश्च तौ, स च यश्च यौ.

त्यदादीनां सामान्यमर्थः । आतश्च सामान्यं देवदत्तेऽपि हि स इत्येतद्भवति यज्ञदत्तेऽपि । त्यदादीनां सामान्यार्थत्वाच्छेषो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं परस्य शेषं वक्ष्यामीति ।

**परस्य चोभयवाचित्वात् ॥४॥**

उभयवाचि परम् ॥

**पूर्वशेषदर्शनाच्च ॥५॥**

पूर्वस्य खल्वपि शेषो दृश्यते । स च यश्च तावानय यावानयेति ॥ इदं तर्हि प्रयोजनं द्वन्द्वो मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् ।

**सामान्यविशेषवाचिनोश्च द्वन्द्वाभावात्सिद्धम् ॥ ६ ॥**

सामान्यविशेषवाचिनोश्च द्वन्द्वो न भवतीति वक्तव्यम् ॥ यदि सामान्यविशेषवाचिनोर्द्वन्द्वो न भवतीत्युच्यते शूद्राभीरम् गोबलीवर्दम् तृणोलपमिति न सिध्यति । नैष दोषः । इह तावच्छूद्राभीरमिति । आभीरा जात्यन्तराणि । गोबलीवर्दमिति । गाव उत्कालितपुंस्का वाहाय च विक्रयाय च । स्त्रिय एवावशिष्यन्ते । तृणोलपमिति । अपामुलपमिति नामधेयम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

---

आहेत. सामान्य अर्थाचे आहेत असें म्हणण्याचें कारण हें की, देवदत्तालाही तो असें म्हणतां येतें, यज्ञदत्तालाही तो असें म्हणतां येतें. अशा रीतीनें त्यद्, तद्, वगैरे शब्द सामान्य रूपानें वाटेल त्या अर्थाचे दर्शक होत असल्यामुळें तेच वाक्यामध्यें उपयोगांत येतील. कारण तेवढ्यानेंच काम भागणार आहे.

तर मग या सूत्राचा उपयोग आम्ही असा सांगतों की, त्यदादि गणांतील अनेक शब्द एके ठिकाणीं कांहीं एक अर्थ दाखविण्याकरितां घेतले असतां त्या ठिकाणीं गणामध्यें जो पर शब्द आहे तोच राहिला पाहिजे.

(वा.४) हा देखील उपयोग संभवत नाहीं. कारण पराचा शेष होतो, या ठिकाणीं परशब्द योजिला आहे. आणि 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या परिभाषेमध्यें पर हा शब्द इष्ट या अर्थाचा असल्यामुळें इष्ट असल्यास तो परशब्द पूर्व या अर्थालाही दाखवितो.

(वा.५) शिवाय त्यदादि गणामधील अनेक शब्द घेतले असतां त्यांमध्यें क्वचित् पूर्वीचा शब्दही अवशिष्ट राहिलेला दृष्टीस पडतो; उदा०—तद् आणि यद् हे दोन शब्द घेतले असतां तेथें त्यांमध्यें एकशेष होऊन तौ आनय आणि यौ आनय अशीं दोन्ही तऱ्हेचीं रूपें होतात.

तर मग आतां या सूत्राचा उपयोग असा संभवतो की, हा सूत्रानें एकशेष सांगितला असल्यामुळें त्यांचा द्वंद्वसमास होत नाहीं.

हा देखील उपयोग संभवत नाहीं.

(वा.६) सामान्य अर्थाचा दर्शक शब्द आणि त्या सामान्यांतील विशेष अर्थाचा शब्द यांचा द्वंद्वसमास होत नाहीं असें म्हणण्यानेंच हें साधत आहे.

सामान्यवाचक शब्द आणि विशेषवाचक शब्द यांचा द्वंद्वसमास होत नाहीं असें जर म्हटलें तर शूद्राभीरम्, गोबलीवर्दम्, तृणोलपम्, हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण शूद्राभीरम् या उदाहरणामध्यें आभीर हा शब्द शूद्रविशेष या अर्थाचा दर्शक आहे असें समजूं नये. आभीर म्हणजे गवळी ही एक स्वतन्त्र जाति आहे. तसेंच गोबलीवर्दम् या ठिकाणीं गो हा शब्द सामान्य अर्थाचा आहे असें समजूं नये, तर तो गोशब्द गाईचाच दर्शक आहे. कारण असें पाहा की, गो नांवाच्या पशूमधील पुरुष म्हणून जेवढे आहेत तेवढे निराळेच काढिले जातात; कारण त्यांचा उपयोग भार वाहणें किंवा विकणें असा होत असतो. तेव्हां प्रायः स्त्रिया म्हणजे गाईच अवशिष्ट राहिलेल्या असतात. तसेंच तृणोलपम् या उदाहरणामध्यें

न वक्तव्यम् । सामान्येनोक्तत्वाद्विशेषस्य प्रयोगो न भविष्यति । सामान्येनोक्तत्वात्तस्यार्थस्य विशेषस्य प्रयोगेण न भवितव्यम् । किं कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति ॥ न तर्हीदानीमिदं भवति तं ब्राह्मणमानय गार्ग्यमिति । भवति यदा नियोगतस्तस्यैवानयनं भवति । एवं तर्हि येनैव खल्वपि हेतुनैतद्वाक्यं भवति तं ब्राह्मणमानय गार्ग्यमिति तेनैव हेतुना वृत्तिरपि प्राप्नोति । तस्मात्सामान्यविशेषवाचिनोर्द्वन्द्वो न भवतीति वक्तव्यम् ॥

## ग्राम्यपशुसंघेष्वतरुणेषु स्त्री ॥१.२.७३॥

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथं गाव इमाश्चरन्ति अजा इमाश्चरन्ति । गाव उत्कालितपुंस्का वाहाय च विक्राय च । स्त्रिय एवावशिष्यन्ते ॥ इदं तर्हि प्रयोजनं ग्राम्येष्विति वक्ष्यामीति । इह मा भूत् । न्यङ्कव इमे शूकरा इमे

---

देखील उलप हा शब्द तृणविशेषवाचक आहे असें समजूं नये. उलप हें तेथें उदकाचें नांव आहे.

तर मग सामान्यवाचक आणि विशेषवाचक यांचा द्वंद्व होत नाहीं असें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको. सामान्य अर्थाचा दर्शक अशा शब्दानें त्या सामान्यांतील विशेष अर्थ देखील दाखविला जात असल्यामुळें पुनः विशेषवाचक शब्दाचा प्रयोग होणार नाहीं.

कां बरें?

अन्यशब्दानें जो अर्थ दाखविला जातो त्या अर्थी पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग करूं नये असा ठराव आहे.

तर मग आतां 'तं ब्राह्मणमानय गार्ग्यम्' असा प्रयोग होत नाहीं काय ?

जेव्हां गार्ग्यालाच मुद्दाम आणावयाचें असतें तेव्हां तसा प्रयोग होतो.

तर मग ज्या कारणानें 'तं ब्राह्मणमानय गार्ग्यम्' असा प्रयोग होतो म्हणजे ब्राह्मण आणि गार्ग्य हे सामान्यवाचक आणि विशेषवाचक हे दोन्ही शब्द एकदम एका वाक्यांत उपयोगांत आणतां येतात, त्याच कारणानें त्या दोन शब्दांचा प्रयोग करून त्यांची वृत्ति म्हणजे द्वंद्वसमास करावा लागेल. याकरितां सामान्यवाचक आणि विशेषवाचक या दोन शब्दांचा द्वंद्व होत नाहीं असें वचन केलें पाहिजे.

(सू.७३) हें देखील सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

सूत्र केलें नाहीं तर गाव इमाश्चरन्ति, अजा इमाश्चरन्ति, या ठिकाणीं गावः आणि अजाः असे जे स्त्रीलिंगी शब्द एकशेष होऊन राहिले आहेत ते कशा रीतीनें ठेवतां येतील?

ते अशा रीतीनें ठेवतां येतील की, सामान्यतः गोपशूंमधील पुरुष म्हणजे बैल हे भार वाहण्याकरतां किंवा विकण्याकरितां निराळेच काढलेले असतात. तेव्हां प्रायः गाईच सर्व अवशिष्ट राहतात. ( तेव्हां तेथें गावः असा स्त्रीलिंगी प्रयोग करणें योग्यच आहे.)

तर मग या सूत्राचा उपयोग आम्ही सांगतों की, सूत्रामध्यें ग्राम्य असा शब्द पाणिनीनें घातलेला आहे. तेव्हां हरण, डुक्कर, वगैरे रानटी जे पशु त्या अर्थी न्यङ्कव इमे, शूकरा, इमे असा प्रयोग होतो. (येथें 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें एकशेष झालेला आहे. जर प्रकृत सूत्र केलें नाहीं तर वरच्या रीतीनेंच हरण, डुक्कर, वगैरे जातींच्या सर्व शब्दांची निवृत्ति होते. पण स्त्रीलिंग व पुंलिंग यांमुळेंच त्या शब्दांमध्यें फरक असला पाहिजे; उदा०– गौश्च स्त्रीगौश्च स्त्री गौश्च पुमान् गाव इमाः, अजश्च अजश्च अजा च अजा इमाः ।

१. कांहीं स्त्रीलिंगी आणि कांहीं पुंलिंगी असून तरुण नव्हेत असे बहुत ग्राम्य (गांवढळ) पशु एकदम शब्दांनीं दाखवावेत अशी इच्छा असल्यास त्यांपैकीं एक स्त्रीलिंगी शब्द शिल्लक राहतो, व बाका-

इति । कः पुनरर्हत्यग्राम्याणां पुंस उत्कालयितुं ये ग्रहीतुमशक्याः कुत एव वाहाय च विक्रयाय च ॥ इदं तर्हि प्रयोजनं पशुष्विति वक्ष्यामीति । इह मा भूत् । ब्राह्मणा इमे वृषला इमे । कः पुनरर्हत्यपशूनां पुंस उत्कालयितुं येऽशक्या वाहाय च विक्रयाय च ॥ इदं तर्हि प्रयोजनं संघेष्विति वक्ष्यामीति । इह मा भूत् । एतौ गावौ चरतः । कः पुनरर्हति निर्ज्ञातेऽर्थेऽन्यथा प्रयोक्तुम् ॥ इदं तर्हि प्रयोजनमतरुणेष्विति वक्ष्यामीति । इह मा भूत् । उरणका इमे बर्करा इम इति । कः पुनरर्हति तरुणानां पुंस उत्कालयितुं येऽशक्या वाहाय च विक्रयाय च ॥

अनेकशफेष्विति वक्तव्यम् । इह मा भूत् । अश्वाश्चरन्ति । गर्दभाश्चरन्तीति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरण-महाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य द्वितीये पादे तृतीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

मधील पुरुष निराळे काढले जात असल्यामुळें न्यङ्कु वगैरे शब्द स्त्रीलिंगीच उपयोगांत येतील[2].)

पण रानटी पशूंमधील पुरुष निराळे कोणाला बरें काढतां येतील? कारण ते नुसते धरतांही येत नाहींत मग त्यांच्याकडून भार वाहविणें किंवा ते विकणें याचें तर नांवच काढावयास नको.

तर मग आतां या सूत्राचा उपयोग असा संभवतो की, सूत्रामध्यें पाणिनीनें पशु असा शब्द उच्चारला आहे. तेव्हां ब्राह्मणा इमे, वृषला इमे, या वाक्यांमध्यें 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें एकशेष होऊन ब्राह्मणाः, वृषलाः, असें पुंलिंगी रूप होतें. जर प्रकृत सूत्र केलें नाहीं तर वर सांगितल्याप्रमाणें पुरुष वेगळे होत असल्यामुळें ब्राह्मण्यः, वृषल्यः, असा प्रयोग होऊं लागेल.

पण जे पशु नव्हेत अशा मनुष्यजातीमध्यें स्त्रियांपेक्षां पुरुष निराळे काढण्याचें कांहीं कारणच नाहीं. कारण ते भार वाहण्याचे किंवा विकण्याचे कामीं उपयोगीं पडत नाहींत.

तर मग या सूत्राचा उपयोग असा संभवतो की, या सूत्रामध्यें पाणिनीनें संघशब्द घातला आहे, त्यामुळें एतौ गावौ चरतः या वाक्यामध्यें गावौ असा पुंलिंगी शब्द उपयोगांत आणतां येतो. (तेव्हां या ठिकाणीं स्त्रीलिंगी शब्द उपयोगांत येऊं नये तो न यावा याकरतां संघशब्द घालून हें सूत्र केलें पाहिजे.)

पण ज्या ठिकाणीं एक बैल आणि एक गाय अशा निश्चित वस्तु दाखवावयाच्या असतात त्या ठिकाणीं भलत्या ठिकाणचा प्रयोग कसा बरें करतां येईल?

तर मग आतां या सूत्राचा उपयोग असा संभवतो की, या सूत्रामध्यें पाणिनीनें 'अतरुण' असें म्हटलें आहे. प्रकृत सूत्र केलें नाहीं तर तरुणका इमे, बर्करा इमे, या वाक्यांमध्यें वर सांगितल्याप्रमाणें पुरुष वेगळे करून स्त्रीलिंगी शब्दाचा प्रयोग होईल; तो न व्हावा याकरितां प्रकृत सूत्र केलें पाहिजे.

पण या तरुण खोंड पशूंमध्यें पुरुष निराळे कसे काढतां येतील की जे भार वाहण्याला किंवा विकण्याला अयोग्य आहेत?

प्रकृतसूत्रानें ग्राम्य पशूंसंबंधानें जो स्त्रीलिंगी शब्दाचा एकशेष सांगितला आहे तो एकशेष ते पशु अनेक शफांचे असतील तरच होईल. कारण अश्वाश्चरन्ति, गर्दभाश्चरन्ति, या ठिकाणीं प्रकृत सूत्रानें स्त्रीलिंगी शब्दांचा एकशेष न झाला पाहिजे.

याप्रमाणें भगवान पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील तिसरें आह्निक समाप्त झालें व दुसरा पाद समाप्त झाला.

---

२. हा दोष टाळण्याकरतां नियमार्थ हें सूत्र केलें पाहिजे, असा अभिप्राय आहे.